महर्षि श्रीवाल्मीकिप्रणीत

# योगवासिष्ठ

या ग्रंथाचें

# मराठी सुरस भाषांतर

## भाग दुसरा

आवृत्ति दुसरी

प्रकरणें

५ वें उपशम, ६ वें निर्वाण—पूर्वार्ध

भाषांतरकार

वे० शा० सं० विष्णुशास्त्री बापट

प्रकाशकः—बाळकृष्ण पांडुरंग ठकार, मालक
गणेश विष्णु चिपळूणकर आणि मंडळी,
बुधवार पेठ, पुणें शहर.

मुद्रकः—रा. अच्युत चिंतामण भट,
यशवंत छापखाना, १२१ शनवार, पुणें सिटी.

मि. भाद्रपद व. ९, शके १८४८, क्षयनाम संवत्सरे.

३० सप्टेंबर, सन १९२६ इसवी.

# चित्रांची सूचि.

सशक्तिक श्रीसीताराम प्रसन्न.

# दुसऱ्या आवृत्तीसंबंधीं प्रकाशकांचे चार शब्द.

यत्कृतं यत्करिष्यामि तत्सर्वं न मया कृतम् ।
त्वया कृतं तु फलभुक् त्वमेव रघुनंदन ॥

श्रीमत्सत्यसंकल्प षड्गुणैश्वर्यसंपन्न सशक्तिक राजा श्रीरामचंद्राच्या अनुपम कृपेनें आज पुनर्मुद्रित केलेला श्रीबृहद्योगवासिष्ठाच्या मराठी भाषांतराचा दुसरा भाग आमच्या वाचकांच्या हातीं देऊन कृतार्थता मानीत आहों. ही कृतकृत्यता पुनर्मुद्रणाचा योग आल्याची नव्हे, तर तो आल्यानें एका कल्पनातीत संकटांतून मुक्त झाल्याची होय. यांत आश्चर्याची गोष्ट इतकीच आहे कीं, या भागाच्या प्रथम मुद्रणाचे प्रसंगींही आम्हांस बराच त्रास झाला होता. पण आजच्या संकटाचा विचार करितां त्या वेळचें संकटच नव्हे असें वाटतें. त्याचा यापेक्षां जास्त खुलासा देणें अयोग्य होय. तसें करणें म्हणजे वयोमानानें आलेल्या बुद्धिमांद्याचा व बुद्धिभ्रंशाचा आपण होऊन स्फोट करणें होय. आलेल्या संकटाचा खेद मानावा तितका थोडाच आहे, इतकें सांगणें आमच्या ग्रहमानानें जरूर आहे. अखेर अचिंत्यशक्ति ईश्वरी घटना मानवी बुद्धीला अगम्य होय, हेंच खरें ठरलें. " भयकृद्भयनाशक " प्रभूनेंच त्या संकटांतून आमची मुक्तता ज्या दोन सत्पुरुषांच्या साहाय्यानें केली, त्यांचे येथें आभार मानणें जरूर आहे.

त्यांतील पहिले गृहस्थ म्हणजे संस्थेचे व आमचे हितचिंतक आणि प्रचारक रा. रामचंद्र वामन आठवले; आणि दुसरे गृहस्थ म्हणजे श्रीदेवी भागवताच्या कामापासून विशेष परिचित झालेले रा० अच्युतराव चिंतामण भट, मालक यशवंत प्रेस पुणें, हे होत. दोघांनींही आम्हांस कायमचें ऋणी केलें आहे. व्यवहार पूर्णपणें संपल्यावरही त्यांच्या उपकारांची फेड होणें शक्य नाहीं.

येथपर्यंत जरूर त्या गोष्टीचा खुलासा केल्यावर राहिलेलें कर्तव्य बजावून सर्वांची रजा घेतों. मधल्या दोन वर्षांच्या संकटांत आमचें दुःख परमावधीला पोंचल्यावर आर्थिक साहाय्याकरितां आम्ही श्रीमंत सरकार अण्णासाहेब पटवर्धन, बी. ए. चीफ ऑफ कुरुंदवाड सीनियर व त्यांच्या प्रस्तुतच्या राणीसाहेब श्री. सौ. सीताबाई ऊर्फ माईसाहेब या उभयतांस प्रार्थना केल्यावरून दोघांनीं पूर्वीच्या राणीसाहेब कै० श्री० अखंडवज्रचूडेमंडित सौभाग्यवती यशोदाबाई ऊर्फ वहिनीसाहेबमहाराज यांच्या वाङ्मयात्मक स्मारकाकरितां म्हणून साहाय्य केलें. त्यामुळेंच हा पुनर्मुद्रित केलेला दुसरा भाग सदर राणीसाहेबांच्या दिवंगत आत्म्यास अत्यंत भक्तीनें समर्पण केला आहे. या भागाच्या

आरंभीं कै० राणीसाहेबांचा फोटो—छायाचित्र—व अल्प जीवनचरित्रही दिलें आहे. हा योगही ईश्वरी घटितानेंच आला. कारण, यांत उपशमप्रकरणानंतर निर्वाण प्रकरणाचा पूर्वार्ध आल्यानें सहजच राणीसाहेबांच्या वाङ्मयात्मक स्मारकाला ती गोष्ट पोषक झाली. या भागाची पहिली आवृत्ति परमेश्वरार्पण केली होती.

मदतीबद्दल प्रार्थना केली असतां प्रस्तुतच्या राणी श्री. सौभाग्यवती माईसाहेबांनीं श्रीमंत सरकार अण्णासाहेबांशीं सहमत करून सुविचारपूर्वक जी योजना केली तीवरून त्यांचा मुत्सद्दीपणा व दूरदर्शित्व सहज प्रत्ययास येतें. प्रस्तुत श्रीमंत अण्णासाहेबांची प्रकृति बरी नसल्यामुळें संस्थानचा सर्व कारभार रा. ब. लक्ष्मणराव फणसळकर बी. ए. एल्‌एल्‌, बी. कारभारीसाहेब यांच्या सल्ल्यानें स्वतः श्री. सौ. माईसाहेबच पहात असतात.

असो. आतांपर्यंत जरूर त्या गोष्टींचा उल्लेख केल्यावर जुन्या नव्या आश्रयदात्यांचें आणि युवराजांसहित सहकुटुंब श्री. अण्णासाहेबांचें आरोग्य वाढविण्याबद्दल मंगलधाम प्रभूची अनन्य प्रेमानें प्रार्थना करून सर्वांची रजा घेतों. इति शम्.

पुणें, शुक्रवार ता. १।१०।२६ सर्वांचा नम्र सेवक<br>
बाळकृष्ण पांडुरंग ठकार, प्रकाशक.

॥ सप्रत्यक्ष श्रीगजानन प्रसन्न ॥

श्रीमंत सरकार भालचंद्रराव ऊर्फ अण्णासाहेब पटवर्धन बी. ए.
चीफ् ऑफ् कुरुंदवाड सीनीयर, यांच्या प्रथमपत्नी कैलासवासी श्रीमती सौभाग्यवती
वज्रचूडेमंडित यशोदाबाई राणीसाहेब ऊर्फ वहिनीसाहेब यांचें

# जीवनचरित.

## चरित्रनायिकेचे वडील व मातोश्री.

सुप्रसिद्ध बडोदा राज्यांतील सरदार कैलासवासी श्रीमंत चिंतामणराव ऊर्फ भाऊसाहेब मुजुमदार या सर्वगुणसंपन्न पुरुषानें आपल्या सद्गुणांनीं श्रीमान् महाराजासाहेब सयाजीराव गायकवाड यांस प्रसन्न करून त्यांच्या कृपेनें बडोदा राज्यांत मोठमोठ्या हुद्यांचीं कामें केलीं. रत्नपारख हा यांच्या ठिकाणचा विशिष्ट गुण महाराजासाहेबांच्या नजरेंत भरल्यामुळें अखेर जवाहिरखान्याचें कामही त्यांच्यावरच सोंपविलें होतें. महाराजांच्या कृपेनें भाऊसाहेबांनीं सहकुटुंब विलायतेचा प्रवास केला होता. तरी त्यांची स्वधर्मनिष्ठा, स्नानसंध्या वगैरे कडक होती. मुंबईचे प्रख्यात डॉक्टर श्री० नानासाहेब देशमुख एम्. डी. यांच्या भगिनी याच भाऊसाहेबांच्या प्रथमपत्नी होत. त्याही आपल्या पतीप्रमाणें अत्यंत सच्चरित होत्या. त्यांचें आचरण उभय कुलांला भूषणभूत असेंच होतें.

## चरित्रनायिकेचा जन्म.

अशा या सुखी दंपत्यास ता० २०।२।१८८० या दिवशीं जें पहिलें अपत्य—कन्या झाली, तीच या चरित्राची नायिका होय. या मुलीचें नांव काशीताई असें ठेवलें होतें. इच्यानंतर दुसरें अपत्य मुलगा झाला. त्याचें नांव दत्तात्रेय ऊर्फ आबासाहेब. हेच प्रस्तुत सरदारकीचा उपभोग घेत आहेत. भाऊसाहेबांच्या गृहिणीनें आपल्या पतीस दोन अपत्यें मागें ठेवून आपलें इहलोकींचें कार्य संपविलें. पुढें भाऊसाहेबांनीं द्वितीय संबंध केला. पण या दोन्ही अज्ञान मुलांच्या सुदैवानें सापत्नपणाचा कटु अनुभव त्यांस आला नाहीं.

## अगदींच अल्पवयांत विवाह-सौभाग्य-योग.

कन्याविवाह हा कोणत्याही कालांतील व स्थलांतील प्रश्न मानिला तरी, मुलीच्या लग्नाची बाब म्हणजे चिंताजनक अशीच असते. पण एखादी मुलगी भाग्यवान् असली

तर सर्व काळीं सर्वांना कष्टतर वाटणारा हा प्रश्न विनायास सुटतो. कुमारी काशीताईच्या सौभाग्यानें वा बलवत्तर पूर्वपुण्याईनें तिच्या लग्नाचा योग तिच्या वयाच्या नवव्याच वर्षी घरबसल्या येऊन ही मुलगी एका संस्थानची युवराज्ञी झाली.

## पटवर्धन राजघराणें.

स्वराज्याच्या ऐन भरभराटींत मुख्य प्रधान पेशव्यांच्या कृपेनें महाराष्ट्रांत जीं अनेक जातींचीं सरदार—घराणीं उदयाला आलीं, त्यांतच पटवर्धन घराण्याचा उदय झाला आहे. कै. श्री. परशरामभाऊ पटवर्धन या रणगाजी पुरुषाच्या रणकौशल्याची साक्ष इतिहास देत आहेच. सध्यांचीं सर्व पटवर्धन—राजघराणीं भाऊंच्या भाग्याची साक्ष आजही देत आहेत. कुरुंदवाड राजघराणेंही त्यांपैकींच होय. अशा या ऐतिहासिक कुरुंदवाड संस्थानच्या राजघराण्यांत जन्माला आलेल्या भाग्यवान् युवराजाशीं—श्रीमंत सरकार भालचंद्रराव ऊर्फ अण्णासाहेब यांच्याशीं—कुमारी काशीताईचा विवाहसमारंभ संस्थान कुरुंदवाड येथें अपूर्व थाटानें झाला. मुलीचें नांव श्री. सौ. यशोदाबाई ऊर्फ वहिनीसाहेब असें ठेविलें. विवाहोत्सवानंतर आपल्या बालवधूशीं युवराजांचा कांहीं काल एकत्र सहवास झाल्यानें या बाल पतिपत्नींच्या बालक्रीडा पाहणें हाच सर्वांच्या कौतुकाचा विषय होता. पुढें वयांत येऊन संसार करूं लागलेल्या या राणीच्या सहवासांत श्रीमंत अण्णासाहेबांनीं गंगायमुनेच्या संगमावर—प्रयागांत—जो सुखाचा काल घालविला, तो अजूनही श्रीमंतांच्या स्मरणांत आहे.

## पतिपत्नींचें शिक्षण.

विवाहानंतर थोड्याच कालांत श्रीमंत अण्णासाहेब हे इंग्रजी शिक्षणाकरितां प्रथम पुण्यास व पुढें प्रयागास राहूं लागले. युवराज्ञीचें शिक्षण कुरुंदवाडास त्यांच्या आजेसासूबाई कै० श्री. खाशासाहेब यांच्या देखरेखीखालीं सुरू झालें. इकडे श्री. अण्णासाहेब १८९२ सालांत पहिल्या परीक्षेंत उत्तीर्ण होऊन त्यांच्या उच्च शिक्षणास आरंभ झाला; आणि योग्य वेळीं ते बी. ए. च्या परीक्षेंत उत्तीर्ण होऊन त्यांनीं संस्कृत-भाषानैपुण्याबद्दल विश्वविद्यालयाकडून सुवर्णपदकही मिळविलें.

## युवराज्ञीचें प्रयागास गमन.

दरम्यान इकडे कुरुंदवाडांत युवराज्ञीचें व्यवहार-शिक्षण व गृहशिक्षण योग्य प्रकारें चाललें असतां, आजेसासूबाईनीं आपली ऐहिक यात्रा संपविली. नंतर अण्णासाहेबांनीं आपल्या पत्नीस प्रयागास नेऊन तिचें राहिलेलें शिक्षण आपल्या सहवासांत पुरें केलें. प्रयागांत दोघांनाही पाश्चात्त्यांचा निकट सहवास होता. तरी दोघांच्याहि धर्मश्रद्धेंत, देवार्चनांत, सदाचरणांत, रतिमात्र फरक झाला नाहीं. कुलीन, सुशील, विद्वान्, धर्मशील,

अशा जांवयाचें आपल्या कन्येशीं प्रेमाचें आचरण पाहून, युवराज्ञीच्या पित्याला अत्यंत धन्यता वाटे. सुशिक्षित, संसारदक्ष, सदाचरणी, प्रेमळ, उभय कुलांला भूषणभूत आणि पतिनिष्ठ अशा पत्नीच्या सहवासांत श्रीमंत अण्णासाहेबांचे दिवसही फार आनंदानें गेले.

## मुख्य गृहशिक्षण.

युवराज्ञीच्या कुरुंदवाडच्या शिक्षणांत इतर शिक्षणाबरोबर आजेसासूबाईच्या सहवासांत मुख्य गृहशिक्षण सुरू होतें. त्यांच्या आजेसासूबाई राणी असून व्यवहार-शिक्षणांत व राजकार्यांत अत्यंत तरबेज होत्या. त्याप्रमाणें संसारदक्षता व सूपशास्त्र यांतही त्या फार कुशल होत्या. तसेंच, त्यांनीं आपल्या नातसुनेला त्या विषयांत पूर्ण पारंगत केलें. प्रत्येक कुलस्त्रीला—मग ती राजाची राणी असो, कीं मध्यम गृहस्थाची बायको असो—सर्व गृहकृत्यें उत्तम प्रकारें करितां आलीं पाहिजेत, असें त्यांचें मत असून, आचरणही तसेंच होतें. अर्थात् त्यांनीं आपल्या नातसुनेला तसेंच शिक्षण दिलें असल्यास नवल नाहीं. युवराज्ञी ही मोठ्या हौसेनें प्रत्यहीं श्रीमंतांच्या आवडीचे वेगवेगळे पदार्थ, पक्वान्नें, लोणचीं, मुरांबे, सरबतें वगैरे करून आपल्या आप्तेष्टांस वाढीत असत. शास्त्रशुद्ध पद्धतीनें आंबे वगैरे फळें नेहमीं उपयोगांत यावीं म्हणून कांचेच्या पात्रांत त्या घालून ठेवीत, आणि सर्वांस मोठ्या प्रेमानें नेहमीं देत असत.

## संतति व तत्संबंधीं प्रखर चिंता.

वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें हें सुखी दंपत्य ऐन तारुण्यांत संसारसुखाचा अनुभव घेत असतां ता० १०।२।१८९७ या दिवशीं युवराज्ञीला एक कन्या झाली. पण सर्वांच्याच दुर्दैवानें त्या बालिकेनें चार महिन्यांच्या आंत आपलें ऐहिक कार्य संपवून आपल्या मातापित्यांना ती कायमची दुःखी करून गेली. कारण त्यानंतर राणीसाहेबांना मुळींच संतति झाली नाहीं. संततिकरितां त्यांनीं आपल्या पतीच्या अनुमतीनें व्रतेंवैकल्यें, उपासतापास, दानधर्म, अनुष्ठानें केलीं व करविलीं. उभयतांची कुलदेवतेवर—श्रीगजानना वर अत्यंत जाज्वल्य निष्ठा होती व आहे. तात्पर्य, अनेक उपाय झाले, पण राणीसाहेबांना स्वतःचें मूल आपल्या मांडीवर खेळविण्याचा योग पुनश्च आला नाहीं. संततिसंबंधीं स्त्रीस्वभावसुलभ प्रखर चिंतेच्या योगानें त्यांचें आयुष्य खचत चाललें व अखेर त्यांच्या प्रकृतीवर तिचा कायमचा परिणाम होऊन त्या निरंतरच्या आजारी झाल्या.

## दिनचर्या.

त्या नित्य पहाटे पांच वाजतां उठून आरंभींचीं दैहिक कृत्यें करीत व भूपाळ्या, पदें, अभंग, स्तोत्रपाठ वगैरे म्हणत. नंतर वेणीफणी इ० कामें उरकीत. साडेसहाला डॉक्टर त्यांची

प्रकृति पाहून गेल्यावर त्या वाकनिसाला बोलावून रोजच्या स्वयंपाकाची व्यवस्था नित्य बदल करून सांगत व मग स्नानाला उठत. स्नान, पूजन झाल्याशिवाय त्या कांहींच खात-पीत नसत. सुमारें दोन अडीच तास श्रीगजाननाच्या पूजेंत त्या अत्यंत भक्तीनें निमग्न असत. त्यानंतर स्वयंपाकावर देखरेख करीत आणि एखादा दुसरा यजमानांच्या आवडीचा पदार्थ स्वतः करीत. ११ वाजतां उभयतांचें भोजन झाल्यावर एक तास विश्रांति घेऊन मग तासभर पुराणश्रवणांत घालवीत. स्वतः केलेल्या पदार्थांनींच मधल्या वेळचा उभयतां पतीपत्नींचा उपहार होई. तीन ते चारच्या दरम्यान मुलींस व स्त्रियांस शिवणें, कशिदा काढणें इत्यादि कामांचें शिक्षण देऊन स्वतःही त्या नमुनेदार कामें करीत. चार ते पांच हा एक तास पत्रव्यवहार व खाजगीकडील कामें पहात. नंतर पुनश्च वाकनिसास सायंकाळच्या भोजनाची व्यवस्था सांगून मैत्रिणींबरोबर नवबाग मळ्यांत व्यायामाकरितां जात. श्रीमंतांच्या पूजेंतील एक हजार दुर्वा स्वतः काढीत व त्यांच्या पूजेच्या इतर बाया काढीत. ऋतुमानानें येणाऱ्या फुलांचे हार, तुरे, गजरे इत्यादि देवाकरितां व यजमानांकरितां करण्याची त्यांना फार आवड असे. याप्रमाणें सुमारें १॥ तास मोकळ्या हवेंतील व्यायाम करून सायंकाळीं वाड्यांत येत व वस्त्रें बदलून आणि हातपाय धुऊन नंतर देवाची सायंकाळची पूजा करीत. आठ वाजतां उभयतांचें भोजन झाल्यावर मग देवाच्या शेजारतीचा समारंभ होई. त्या प्रसंगीं अत्यंत प्रेमळपणानें स्तोत्रें, पदें, वगैरेंनीं त्या देवास सद्गदित चित्तानें आळवीत असत. पुढें १०॥ वाजतां झोपीं जात. या कार्यक्रमांत केव्हांही अंतर होत नसे. प्रकृतीच्या अस्वस्थ स्थितींत वरील सर्व कामें इतरांकडून करवीत. संततीच्या बाबतींत जों जों निराशा वाढूं लागली तों तों त्यांची परमेश्वरावरील निष्ठा न डळमळतां ती अखंड वाढीस लागली. वाटतें कीं, त्यांच्या भक्तिवेलीला निराशा हेंच जीवन ठरून ती उत्तरोत्तर वाढतच राहिली. श्री० सौ० राणीसाहेबांच्या अखंड परमेश्वरभक्तीचें फळ त्यांना लाभलें नाहीं, हें खरें. पण तें त्यांचपाठीमागें श्रीमंतांना त्यांच्या द्वितीय कुटुंबास— प्रस्तुतच्या राणीसाहेब श्री० सौ० माईसाहेब यांस औरस पुत्रसंतति झाल्यानें मिळालें; आणि त्यामुळें संसारांत भासणारा उणेपणा भरून निघाला. हा आनंदाचा दिवस श्री० सौ० वहिनीसाहेबांच्या उत्कट पुण्याईनेंच उगवला, असें सौ० माईसाहेबांसहित श्रीमंत अण्णासाहेबांना व इतरांना वाटत आहे. श्रीमती सौभाग्यवती माईसाहेबही उदार स्वभावाच्या असून राजकार्यधुरंधर व संसारदक्ष आहेत. त्यांच्या औदार्यानेंच आज आम्हांस पूर्वींच्या राणीसाहेबांचें जीवनचरित्र लिहिण्याचा योग आला, हीच त्यांच्या उदार मनाची व सौजन्याची साक्ष होय.

## स्वभाव.

श्री० वहिनीसाहेबांचा स्वभाव अत्यंत प्रेमळ, दयाशील, सरळ, मनमिळाऊ असा

असून नोकराचाकरांपर्यंत त्यांचें वागणें प्रेमळपणाचें असे. प्रत्येक काम सर्वांत मिसळून व सर्वांशीं गोड बोलून त्या करून घेत व करीत. त्यांचा कारभार म्हणजे उघडा दरबार. त्यांत आडपडदा किंवा खाचखोंच मुळींच नसावयाची. त्यांच्या गर्भश्रीमंतीला शोभण्यासारखाच त्यांचा स्वभाव उदार होता. त्या प्रसंग पाहून सर्वांना योग्य ती मदत करीत व करवीत असत.

## उपसंहार.

उत्पत्ति–स्थिति–लयाची जागा अशा ह्या मृत्युभूमींत सुकीर्तीशिवाय सर्व कांहीं अशाश्वत आहे. गजांत लक्ष्मी वा अठरा विश्वे दारिद्य यांतुन पूर्व सुकृताप्रमाणें जीवाच्या वाट्यास जें कांहीं आलें असेल त्याचा **कर्मवश जीव** कांहीं काल उपभोग घेतो व आचरणाप्रमाणें सुकीर्ति वा अपकीर्ति मागें ठेवून अदृश्य होतो. या नियमानुरूप श्री० सौ० **यशोदाबाई राणीसाहेब यांनीं** आपलें अवतारकार्य निमोनियाच्या आजाराचें निमित्त होऊन शके १८४१ मित्ती मार्गशीर्ष वद्य ४ र्थी या दिवशीं रात्रीं एक वाजतां संपवून त्या श्रीगजाननाच्या शुद्ध सत्वरूपांत विलीन झाल्या. डॉक्टर नानासाहेब देशमुखांसारखा प्रख्यात धन्वंतरी त्यांच्याजवळ सारखा बसून असतां व "**यावत्कंठगतप्राणा तावत् कार्या प्रतिक्रिया**" या उक्तीप्रमाणें त्यांनीं कल्पनातीत परिश्रम केले असतांही "**न वैद्यः प्रभुरायुषः**" या वैद्यकग्रंथांतील उक्तीप्रमाणें घडून आलें व सर्वांना 'अशीच श्रीगजाननाची इच्छा' म्हणून स्वस्थ बसण्याचा प्रसंग आला!

## अखेरचा आत्मविश्वास.

वर नमूद केलेला दिवस संकष्टी चतुर्थीचा असल्यामुळें त्या रात्रीं चंद्रोदयीं श्रीगजाननाला नैवेद्य समर्पण करून ब्राह्मणांसहित पारणा करण्याचा श्रीमंत अण्णासाहेबांचा परिपाठ. पण त्याच चतुर्थीला राणीसाहेबांची प्रकृति अत्यंत अस्वस्थ होती, म्हणून श्रीमंतांनीं ब्राह्मणांस भोजनाऐवजीं नुसती दक्षणा दिली. कांहीं वेळानें राणीसाहेब थोड्या शुद्धीवर आल्या, तेव्हां त्यांना ही गोष्ट कळली. लगेच यजमानांस त्यांनीं जवळ बोलावून सांगितलें कीं, आपण बिलकुल न घाबरतां नियमाप्रमाणें देवाला नैवेद्य दाखवून ब्राह्मणांसहित भोजन करावें. तीर्थप्रसाद घेतल्याशिवाय मी जाणार नाहीं. पुढें राणीसाहेबांच्या इच्छेप्रमाणेंच सर्व झालें. श्रीमंतांनीं त्यांना स्वहस्तानें तीर्थप्रसाद देऊन पारणें केलें. भोजनोत्तर सर्वांना दूर करून आणि प्रेमळ पतीबरोबर अखेरचे चार शब्द अत्यंत कष्टानें बोलून स्वेच्छेप्रमाणें दानधर्म करीत त्या माउलीनें सर्वांचा निरोप घेतला. पुढचा सर्व विधि प्रेमळ धर्मपत्नीच्या आत्म्याची शांति होण्यासारखाच श्रीमंतांनीं केला हें वेगळें सांगणें नकोच.

## चरित्राचें रहस्य.

श्रीमंत वा गरीब कोणीही असो, प्रत्येक भावी व वर्तमान कुलवधूनें अनुसरण्यास योग्य असेंच हें आदर्शभूत चरित्र असल्याचें कोणीही कबूल करील. ही चरित्रलेखनरूप अल्प सेवा स्वानंदसाम्राज्यसिंहासनावर पदार्पण केलेल्या सौभाग्यवती राणीसाहेबांच्या आत्म्यास अनन्य प्रेमानें अर्पण केली आहे. इति शम्.

# योगवासिष्ठ, भाग २ रा.

## विषयानुक्रमणिका.

### ५ उपशम-प्रकरण.

समाप्त.



ॐ

# योगवासिष्ठ.

## ५ उपशम-प्रकरण.

### सर्ग १

१. मध्यान्हकाळीं शंखध्वनि होतांच सभेचें विसर्जन.

**श्रीवसिष्ठ:**—बा रामचंद्रा ! स्थिति-प्रकरणानंतर जें हें उपशम प्रकरण मी आतां सांगत आहें तें ऐक. हें उपशम प्रकरण ऐकून त्यांतील सिद्धान्त बुद्धीवर चांगले आरूढ झाले, म्हणजे त्यामुळे मनुष्याला निर्वाणस्थिति निःसंशय प्राप्त होते.

**श्रीवाल्मीकि:**—वसिष्ठमुनींचें अशा तऱ्हेचें आल्हादकारक आणि पवित्र भाषण श्रवण करतांच सर्व सभा स्तब्ध होऊन शरदृतूंतील तारकायुक्त आकाशाप्रमाणे गंभीर दिसूं लागली. त्या सभेंतील राजे वसिष्ठमुनींचें भाषण एकाग्रचित्तानें श्रवण करीत असल्यामुळें एखाद्या निर्वात प्रदेशांतील कमळें हालचाल करीतनाशीं होतात, त्याप्रमाणे सर्व राजे निश्चळ झाले. फार काय सांगावें ? त्या सभेंतील विलासिनी स्त्रिया सुद्धां पुष्कळ वर्षांपूर्वीपासून संन्यासदीक्षा धारण केलेल्या स्त्रियांप्रमाणे मद आणि मोह यांचा वेग शांत होऊन स्थिरचित्त झालेल्या दिसत होत्या. विलासिनी स्त्रियांच्या हस्तांमध्यें हंसाप्रमाणे शोभणाऱ्या शुभ्र चामरांची हालचाल, श्रवण केलेल्या अर्थाचें मनन करण्यांत गढून गेल्यामुळेंच जणु काय, अजिबात बंद पडली; आणि त्याबरोबरच त्यांच्या हातांतील कंकणांचा मंजुळ ध्वनीहि बंद पडल्यानें एखाद्या वृक्षावरील पक्ष्यांचा आवाज बंद झाल्यामुळें जशी जिकडेतिकडे शांतता उत्पन्न होते, तशी त्या सभेमध्यें सर्वत्र निःशब्दता पसरली. त्या सभेंतील विवेकसंपन्न राजे नासाग्रावर तर्जनी ठेवून विज्ञानकलेचा विचार करण्यांत निमग्न झाले. आकाशांत सूर्योदय होतांच अंधकार आपलें स्थान सोडून निघून जातो, त्यावेळीं फुललेल्या प्रभातकाळच्या कमलाप्रमाणें श्रीरामाचें अज्ञान नष्ट होऊन त्याचें मुख प्रफुल्लित दिसूं

लागलें. तसेंच मेघाचा नाद ऐकून मयुराच्या डोळ्यांतून आनंदाश्रू येतात त्याप्रमाणें दशरथ राजा वसिष्ठांचें भाषण श्रवण करीत असतां आनंदाश्रूंनीं आर्द्र झाला. दशरथाच्या **सारण** नांवाच्या मंत्र्यानें आपलें मर्कटाप्रमाणें चंचल असलेलें मन सर्व विषयभोगांपासून परावृत्त करून श्रवणाभिमुख केलें. शिक्षणाच्या योगानें विचक्षण झालेल्या आणि वसिष्ठांच्या भाषणामुळें चंद्रकलेप्रमाणें शुद्धचित्त होऊन आत्मबोध झालेल्या **लक्ष्मणाच्या** हृदयांत ब्रह्म स्फुरण पावूं लागलें. शत्रूचें निर्दलन करणारा **शत्रुघ्न** पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणें पूर्णानंदानें शोभूं लागला. ज्याप्रमाणें कोमेजून मिटलेलें कमल सूर्योदय होताच तत्काल विकास पावतें, त्याप्रमाणें **सुमित्र** नांवाच्या मंत्र्याचें दुःखानें पीडित झालेलें हृत्कमल ज्ञानरवीच्या प्रकाशानें आनंदित झालें. त्यासमयीं त्या सभागृहाच्या आंतील आणि बाहेरील मुनी आणि राजे यांचीं चित्तें निर्मल झालीं आणि वसिष्ठाचा उपदेश ऐकून धुतलेल्या रत्नाप्रमाणें अंतःकरणें उल्लसित झालीं. इतक्यांत मध्यान्हकाळ झाला आहे असें सूचित करण्याकरितां कल्पांतींच्या मेघगर्जनेप्रमाणें मोठा आणि समुद्राच्या गर्जनेप्रमाणें गंभीर असा शंखांचा नाद होऊं लागला व त्या प्रचंड नादापुढें मेघगर्जनेमुळें कोकिलांचे स्वर ऐकूं येत नाहीत, त्याप्रमाणें, वसिष्ठ मुनींच्या मुखांतून निघणारे शब्द ऐकूं येईनात. शंखाच्या गंभीर नादापुढें आपलें भाषण कोणाला ऐकूं जाणार ? हें जाणून वसिष्ठमुनि क्षणभर स्तब्ध राहिले. कारण, उघडच आहे का, **आपल्या अंगच्या ज्या गुणानें लोकांना आनंद होत नाहींसा झाला, तो गुण कोण शहाणा मनुष्य बाहेर दाखवील ?** मध्यान्हींच्या शंखाचा अवाज होताच भगवान् वसिष्ठमुनि मुहूर्तमात्र स्वस्थ राहिले आणि झालेला गोंगाट शांत झाल्यानंतर ते श्रीरामाला म्हणाले:—'शत्रुमर्दना रामा ! आतां आज सांगितलें इतकेंच पुरें; यापुढें जें सांगावयाचें आहे तें उद्यईक सांगेन. कारण, द्विजांचें मध्यान्हकाळचें नियतीनें प्राप्त झालेलें जें कर्तव्य आहे, तें करण्यासाठीं मला आतां गेलें पाहिजे. तसेंच, हे आचारचतुरा सुभगा रामा ! तूंही आतां ऊठ आणि स्नान, दान, अर्चन वगैरे सत्क्रिया आचरण्यासाठीं आपल्या स्वतःच्या मंदिरात जा. ' असें सांगून वसिष्ठमुनि दशरथराजासह सभास्थानांतून उठले, त्या वेळीं चंद्रासहवर्तमान सूर्यनारायणच उदयाचलावर आला आहे कीं काय, असा भास झाला. वसिष्ठ आणि राजा दशरथ सभागृहांतून उठतांच सर्व सभासदांमध्यें उठण्याविषयीं हालचाल सुरू झाली व मंदवायूनें हालविल्यामुळें एखादी कमलिनी आपल्या भ्रमररूपी नेत्रांच्या हालचालीमुळें शोभूं लागते, त्याप्रमाणें सभासदांच्या भ्रमराप्रमाणें रमणीय नेत्रांनीं युक्त असलेली ती सभा सुशोभित दिसूं लागली. राजेलोक सभेंतून उठूं लागतांच त्यांच्या गळ्यांतील पुष्पहार हालूं लागून त्यावरील भ्रमरपंक्ती उठूं लागल्यामुळें संध्याद्रीवरील हत्तींची सेना प्रभातकाळ झाल्यामुळें आपले शुंडादंडच हालवीत आहे कीं काय, असें वाटूं लागलें. राजे लोकांच्या झुंडीच्या झुंडी सभागृहांतून जाऊं लागल्या असतां परस्परांच्या अंगांची खेचाखेंच होऊं लागल्यामुळें त्यावरील अलंकार खालीं गळून पडूं लागले; व त्यामुळें रत्नपूर्ण झालेली ती सभा संध्याकाळचे ताम्बूस किरण ज्यावर पडले आहेत, अशा समुद्राच सर्वांना स्मरण करून देऊं लागली. राजांच्या शिरोभूषणांवरील तुरे सभास्थानीं गळून भ्रमरांची दाणादाण झाल्यामुळें त्यांच्या गुंजारवानें सर्व सभा भरून गेली; व मुकुटांवरील नानाप्रकारच्या रत्नांच्या प्रभेनें त्या सभेला

आकाशांतील इंद्रधनुष्याची शोभा आणून दिली. सभागृहांतील स्त्रिया उठूं लागतांच त्यांच्या हालचालीमुळें त्यांच्या हातांतील सुंदर चवऱ्या हालूं लागल्या व त्यामुळें हस्तींचें मंडल क्षुब्ध होऊन त्यांच्या हालचालीमुळें एखाद्या वनांतील लतांचीं पानें आणि मंजरी हालूं लागाव्या, त्याप्रमाणें त्या सभेची स्थिति दिसूं लागली. स्त्रियांच्या हातांतील सुवर्णवलयांची कांति त्यांच्या वस्त्रांवर पडून त्यांची आरक्त प्रभा त्या सभेमध्यें फांकली होती; व त्यामुळें वायूनें हालणाऱ्या मंदारपुष्पांच्या वनमालेप्रमाणें ती सभा शोभूं लागली. कापराच्या कणांप्रमाणे दिसणाऱ्या हिमकणांच्या योगानें बनलेल्या पांढऱ्या शुभ्र मेघांमुळें शरदृतूमधील दिशांचे तट रमणीय दिसतात, त्याप्रमाणे नीहार, काश वगैरे पुष्पांच्या योगानें त्या सभास्थानांतील सर्व भूभाग रमणीय दिसत होता. राजांच्या मुकुटांवरील रत्नांची प्रभा चोहोंकडे फांकली गेली असून त्यामुळें आकाशाच्या पोकळीमध्येंहि गुलाबी रंगाची छटा पसरली, व तेणेंकरून किंचित् फुललेल्या नीलकमलांच्या योगानें शोभणारी संध्याकाळची शोभा त्या सभेला आली असून त्या समयाप्रमाणें दिवसाच्या सर्व कृत्यांची आतां समाप्ति होणार, असें सुचविलें जात होतें. रत्नांचे किरण हेंच कोणी उदक, स्त्रियांचीं मुखें हीं आरक्त कमलें, व त्यांच्या नूपुरांचा मंजुळ ध्वनि हेंच सारस पक्ष्यांचें मधुर गायन, अशा रीतीनें ती सभा एखाद्या कमलिनीप्रमाणें शोभत असून तीमध्यें सर्वत्र भ्रमरांची गर्दी झालेली दिसत होती. सभेंतील शेकडों राजे उठूं लागतांच मोठी गडबड उडाली व भूतांच्या उत्पत्तीमुळें जीमध्यें धांदल उडून गेलेली आहे, अशी ती एक शेकडों पर्वत असलेली नूतन सृष्टीच आहे कीं काय, असें वाटूं लागलें. असो.

अशा रीतीनें सभास्थानांतून निघालेले सर्व राजे दशरथाच्या मंदिरांत जाऊन आणि त्याला वंदन करून जेव्हां बाहेर पडूं लागले, तेव्हां त्यांच्या अंगावरील अगणित रत्नांची प्रभा चोहोंकडे फांकल्यामुळें राजांच्या रांगा ह्या जणुं काय इंद्रधनुष्यासारख्या समुद्राच्या लाटा आहेत, असा भास होऊं लागला. नंतर सुमंत्र आदि करून ब्रह्मरसज्ञ मंत्री, वसिष्ठमुनि, आणि दशरथ राजा यांना नमस्कार करून जलक्रीडेची महती ओळखणार असल्यामुळें स्नान करण्यासाठीं आपल्या घरीं गेले. वामदेव व विश्वामित्र-प्रभृति ऋषी वसिष्ठांना पुढें करून राजाच्या अनुज्ञेची वाट पहात उभे राहिले. नंतर शत्रु-मर्दन दशरथानें त्या मुनींची यथाविधि पूजा केली व त्यांची आज्ञा घेऊन आणि त्यांना निरोप देऊन आपल्या पुढील कार्याकरितां राजमंदिरांत गमन केलें. यावेळीं दुसऱ्या दिवशीं परत यावयाच्या बेतानें वानप्रस्थ वनांत गेले, व्योमनिवासी आकाशांत दिसेनासे झाले, व नागरिक नगरामध्यें निघून गेले. प्रभु विश्वामित्र मात्र राजा दशरथ आणि वसिष्ठ यांनीं नम्रपणानें प्रार्थना केल्यामुळें वसिष्ठाच्या घरीं गेले आणि त्यानीं ती रात्र तेथेंच घालविली. सर्व श्रेष्ठ ब्राह्मण, राजे, मुनी व रामप्रभृति दशरथाचे पुत्र, ज्यांच्या तैनातींत आहेत, असे वसिष्ठमुनि सर्व मंडळीसह मोठ्या ऐश्वर्यानें आपल्या आश्रमाकडे जाण्यासाठीं निघाले, त्या वेळीं वाटेमध्यें सर्व लोकांचे नमस्कार घेत घेत त्यांना जातांना पाहून देवगणांनीं वेष्टिलेला हा साक्षात् ब्रह्मदेवच ब्रह्म-लोकाप्रत जात आहे कीं काय, असा सर्वांना भास झाला. आश्रमांत पोहोंचतांच आपल्या-बरोबर आलेल्या रामादि दशरथपुत्रांना परत जाण्याची वसिष्ठमुनींनीं जेव्हां अनुज्ञा दिली, तेव्हां त्या सर्वांनीं वसिष्ठाच्या पायांवर आपलें मस्तक नमविलें व आपल्या मंदिराचा रस्ता

धरला. त्याचप्रमाणें अंतरिक्ष, पृथ्वी व पाताळादि लोक यांमध्यें वास करणाऱ्या गुणिजनांना आपापल्या स्थानीं गमन करण्याविषयीं यथाक्रम अनुज्ञा दिल्यानंतर वसिष्ठ मुनींनी आपल्या आश्रमांत प्रवेश करून द्विजांना उचित अशा सर्व आन्हिक क्रिया यथाविधि केल्या.

---

## सर्ग २

—:*:—

१ रामाचें आन्हिक. २ रात्रीं श्रुतार्थाचें चिंतन आणि त्यामध्ये स्थिर होण्याविषयीं त्यानें केलेली बुद्धीची प्रार्थना.

**श्रीवाल्मीकिः**—चंद्राप्रमाणें रमणीय दिसणारे रामादि राजपुत्र वसिष्ठांच्या आश्रमांतून निघाले, ते आपल्या मंदिरांत परत आले आणि त्यांनीं आपली दिनचर्या आटोपली. वसिष्ठ, श्रीराम, राजे, मुनी आणि ब्राह्मण यांनीं आपपल्या घरीं आणि बाहेर गेल्यावर इतर ठिकाणीं करावयाचीं पुढीलप्रमाणें दिनकृत्यें केलीं. ज्यांत कमल, कल्हार, कुमुद, उत्पल वगैरे पुष्पांच्या रांगाच्या रांगा पसरलेल्या आहेत आणि चक्रवाक, हंस, सारस वगैरे पक्षिगण क्रीडा करीत आहे, अशा जलाशयांमध्यें त्यांनीं स्नानें केलीं; गाई, भूमि, तीळ, सोनें, शय्या, आसनें, पात्रें व वस्त्रें यांचें ब्राह्मणांना दान केलें; व तदनंतर सुवर्ण, रत्नें यांच्या योगानें सुशोभित झालेल्या देवघरामध्यें त्यांनीं विष्णु, शंकर, अग्नि, सूर्य वगैरे उपास्य देवतांचें पूजन केलें. त्यानंतर पुत्र, पौत्र, सुहृद, भृत्य, बंधू, मित्र इत्यादिकांसहवर्तमान त्यांनीं उचित भोजन केलें. इतकें होत आहे तों संध्याकाळचा कंटाळवाणा प्रहर दिवस अवशिष्ट राहिला आहे असें पहातांच तत्कालोचित पुराणश्रवण, धर्मशास्त्रावलोकन, इत्यादि गोष्टी करीत असतां सूर्यास्ताचा काल अगदीं समीप येऊन ठेपला. त्यावेळीं त्यांनीं संध्यावंदन व जप केला आणि स्तोत्रपाठ करून नंतर मनोहर गाथा गाइल्या. इतक्यांत रात्रीची आपल्या पतीशीं म्हणजे चंद्राशीं गांठ घालून देऊन तिचा शोक हरण करणारी आणि चंद्राला समागमसुख प्राप्त करून देणारी तिची मैत्रीण जी पूर्वदिशा ती जणुं क्षीरसमुद्रांतूनच उदित झाल्यासारखी दिसूं लागली. तेव्हां सर्व राजपुत्र कापराचें चूर्ण पसरलेल्या आणि दीर्घ झालेल्या जणुं चंद्रबिंबाप्रमाणें रमणीय दिसणाऱ्या, पुष्पशय्यांवर जाऊन पहुडले, व रामाशिवाय बाकीच्या राजपुत्रांना ती रात्र गाढ निद्रासुख अनुभवीत असतां मुहूर्तमात्र वाटली.

रामाला मात्र त्या रात्रीं मुळींच झोंप येईनाशी झाली. त्याच्या मनांत वसिष्ठांचें मधुर आणि उदार भाषण एकसारखें घोळत होतें; व एखादा हत्तीचा छावा आपल्या मातेसंबंधानें चिंतन करण्यांत गढून जातो, त्याप्रमाणें वसिष्ठमुनींनीं केलेल्या उपदेशाचें मनन करण्यांत श्रीराम गर्क झाला व त्यामुळें त्याला झोंपेचेंहि विस्मरण झालें. त्याच्या मनात यावेळीं पुढील विचारतरंग उद्भवूं लागले —"या संसारभ्रमणाचा अर्थ काय? आणि हे सर्व जन म्हणजे तरी काय प्रकार आहे? हीं सर्व विचित्र भूतें येतात कां? आणि निघून जातात कां? तसेंच या मनाचें वास्तविक स्वरूप काय आणि हे मन शांत कसें होईल? ही माया मुळीं उत्पन्नच कां झाली? आणि ही कशानें निवृत्त होईल? बरें, ही माया एकवेळ निवृत्त झाली असें मानलें, तरी तेवढ्यानें कोणता गुण किंवा दोष उत्पन्न होईल? शिवाय आत्मा हा आकाशाहूनहि व्यापक असतां त्याच्या ठिकाणीं हें मनाचें संकुचित स्वरूप उत्पन्न कसें झालें? या मनाचा क्षय करण्यासंबंधानें भगवान् वसिष्ठांनीं काय बरें सांगितलें आहे? इंद्रियजय करण्यासाठीं कोणत्या साधनाचा अव-

लंब करावा असं ते बोलले ? तसेंच आत्मज्ञान प्राप्त झालें म्हणजे कोणतें फल प्राप्त होतें म्हणून त्यांनीं सांगितलें आहे ? जीव, चित्त, मन, माया इत्यादि रूपांनी विस्तार पावलेला आत्माच हा असन्मय संसार निर्माण करतो. अशा रीतीनें मनोरूपी तंतूनें बद्ध झालेल्या ह्या निरनिराळ्या स्वरूपांना क्षीण करून टाकलें असतां दुःखोपशांति होईल, ही गोष्ट खरी; परंतु हें काम माझ्यानें कसें होणार ? हंस हा नीरक्षीराचा विवेक करतो, म्हणजे पाण्यापासून दूध निराळें काढतो; परंतु चित्तामध्यें दृढ झालेल्या विषयांच्या संस्कारांनीं चित्ताकाशावर आवरण घातलेलें असून हे विषयसंसाररूपी मेघ हजारों दुःखांच्या रूपानें पर्जन्यधारांचा सतत वर्षाव करीत असतात. अशा स्थितींत ही चित्तवृत्तिरूपी बगळी त्या मेघांच्या मागें धांवत जाऊन त्यांच्या भोंवतीं घिरट्या घालीत असल्यामुळें त्या वासनारूपी मेघांपासून तिला कशी परतवितां येईल ? विषयोपभोगांचा सर्वस्वी त्याग करणें जवळ जवळ अशक्यच आहे, कारण तसें करावयाचें म्हणजे जीवितावर पाणी सोडावें लागणार परंतु अशा तऱ्हेनें विषयांचा त्याग केल्याशिवाय आम्हीं विपत्तींतून सुटणेंहि शक्य नाहीं. अशा स्थितींत हा दुहेरी पेंच पडून आम्हीं केवढ्या संकटांत पडलों आहों ! आतां आत्मतत्त्वाचा साक्षात्कार व्हावयाचा तो मनाच्या योगानेंच व्हावयाचा असतो परंतु तें मन तर बाह्यविषयांमध्येंच आसक्त होऊन राहिलें आहे, व त्याला विषयांपासून परावृत्त करण्याचें काम एखाद्या पर्वताच्या कड्यावर चढून जाण्यापेक्षांहि दुष्कर आहे. अशा स्थितींत अज्ञ बालकाच्या मानगुटीस बसणाऱ्या बागुलबोवापासून त्याला आपली सुटका करून घेतां येत नाहीं, त्याप्रमाणें आमच्या मनाची स्थिति झालेली असल्यामुळें ते विषयांच्या कचाटींतून मुक्त होऊन तत्त्वसाक्षात्कार करून घेण्याला असमर्थ झालें आहे. कारण, मन विषयपराङ्मुख होणार नाहीं, तर त्याला आत्मदर्शन कसें होणार ? अर्थात्, हें दुसरें एक संकट उत्पन्न झालें आहे. माझी मति परम शांत आणि संसारभ्रमशून्य होऊन, एखादी पतिव्रता तरुणी आपल्या प्रेमळ पतीची प्राप्ती झाल्यावर त्यांत गढून जाते, त्याप्रमाणें ब्रह्माकार बनून जाऊन माझ्या मतिला इतर सर्व गोष्टींचें विस्मरण केव्हां पडेल ? माझ्या मनांतील कामक्रोधादि विकारांचें ठाणें उठून तें अत्यंत पवित्र केव्हां होईल आणि पापपुण्यरहित होऊन आत्म्यामध्यें विश्रांति केव्हां घेईल ? षोडशकलांनीं परिपूर्ण असलेल्या चंद्रापेक्षांहि शीतल अशा परमपदाच्या ठायीं सुदृढ होऊन जीवन्मुक्तिसुख अनुभवीत असतां मी आपल्या सत्तेनें सर्व जगाला भ्रमण करावयास केव्हां लावीन ? पाण्यावरील शुद्र तरंग जसा आपलें आपलें भिन्न स्वरूप टाकून देऊन त्यांत लीन होतो, तसें आपलें काल्पनिक आणि संकुचित स्वरूप झुगारून देऊन माझें मन आत्मस्वरूपामध्यें लीन होऊन निरतिशय शांतीचा आस्वाद केव्हां बरें घेऊं लागेल ? तृष्णारूपी भयंकर लाटा आणि आशारूपी भीषण मगरी यांनीं युक्त असलेला संसारसागर तरून जाऊन मी तापांतून मुक्त केव्हां होईन ? आत्मज्ञानसंपन्न होऊन मुमुक्षूंना प्राप्त होणाऱ्या आणि उपशमानें शुद्ध झालेल्या मार्गांत मी निःशोक आणि समदर्शन होत्साता केव्हां स्थिर होईन ? सर्वांगाची लाही करून सोडणारा आणि सर्व धातूंचें भस्म करून टाकणारा असा हा फार दिवसांचा संसारज्वर केव्हां नष्ट होणार ? निर्वातस्थानीं असलेल्या दीपाप्रमाणें हें चित्त विषयव्यथारहित आणि ज्ञानप्रकाशयुक्त होऊन शांत आणि स्थिर केव्हां होईल ? ज्याप्रमाणें गरुड समुद्राचें लीलेनें उल्लंघन करून जातात, त्याप्रमाणें विषयसंस्काररूपी संचित

ज्ञानाग्नीमध्यें जाळून टाकून माझीं इंद्रियें दुःखसागरांतून केव्हां बरें तरून जातील ? पशू, पुत्र, अन्नपान इत्यादिकांच्या अप्राप्तीमुळें किंवा वियोगदुःखामुळें तळमळत असणारा जो मी मूढ, त्या माझा देहादिविषयींचा आत्मबुद्धिभ्रम, वर्षाकालांतील कृष्णमेघ शरदतूच्या आरंभीं निर्मल आकाशांतून नष्ट होतात त्याप्रमाणें प्रबोधाच्या विमलतेमुळें केव्हां विलय पावेल ? ज्या परमात्मपदाबद्दल दृढ इच्छा उत्पन्न होतांच कल्पवृक्षांनीं भरलेला स्वर्ग सुद्धां कस्पटासमान वाटूं लागतो, त्या आत्मपदाची प्राप्ति केव्हां एकदांची होईल, असें मला झालें आहे ! बा मना ! विरक्त पुरुषांनीं सांगितलेल्या निर्मल ज्ञानदृष्टी तुझ्या ठिकाणीं केव्हां तरी येतील का ? बा चित्ता ! दुःखरूपी अजगरांचें भक्ष्य बनल्यामुळें 'अहो बाबा' 'अग आई' 'अरे बाळा' अशा रीतीनें आक्रोश करून अश्रू ढाळण्याचा प्रसंग माझ्यावर न यावा, हीच माझी इच्छा आहे. हे बुद्धे ! ( जीव आणि त्याची बुद्धि अशा दोहोंचा जन्म अविद्येपासून झाल्यामुळें ) तूं माझी बहीण असून मी तुझा भाऊ आहें. अशा स्थितींत आपणां उभयतां बंधुभगिनींचें दुःख नाहींसें व्हावें असें तुला खरोखर वाटत असेल, तर वसिष्ठमुनींच्या भाषणाचा चांगला विचार कर. हे सन्मते ! तूं ( परमात्मनिष्ट होत असल्यामुळें ) निःसंशय साध्वी आहेस आणि ( शास्त्र व सज्जन यांच्या प्रसादानंतर उत्पन्न होत असल्यामुळें ) कन्या आहेस. तरी मी तुझ्या पायां पडून तुझी सविनय प्रार्थना करतों कीं, तूं संसारोच्छेद करून आत्मकल्याण साध्य करून घेण्यासाठीं भव्य अशा आत्मस्वरूपामध्यें सुस्थिर हो; आणि वसिष्ठमुनींनीं वैराग्य, मुमुक्षुव्यवहार, उत्पत्ति व स्थिति या चार प्रकरणांचें विवेचन करीत असतां दृष्टान्तांच्या योगानें रमणीय आणि सुबोध केलेल्या विज्ञानाचें यथातथ्य अनुसंधान कर. आतां 'प्रथम मनाची प्रार्थना केली असतां अखेर वैराग्यादि चारी प्रकरणांतील अर्थाचें अनुसंधान करण्याविषयीं तुलाच कां हात जोडीत आहें ?' असा या ठिकाणीं कदाचित् प्रश्न उत्पन्न होईल. परंतु याचें कारण उघडच आहे; व तें हें कीं, मनानें एकाद्या गोष्टीचें कितीहि मनन केलें, तरी बुद्धि ही अध्यवसायात्मिका असल्यामुळें, अर्थात् मनानें केलेल्या विचाराचें निश्चयामध्यें पर्यवसान करण्याचें सामर्थ्य बुद्धीमध्येंच असल्यामुळें मनाला बुद्धीच्या सहाय्याची अत्यंत अपेक्षा आहे, व तसें नसेल तर मनानें केलेला विचार शरदृतूंतील मेघाप्रमाणें स्थिर होणें सर्वथा अशक्य आहे. यास्तव कोणत्याहि बाबतींत विचारवंतांना बुद्धीच श्रेष्ठ मानावी लागते व अशा दृष्टीनें हे सद्बुद्धे ! मी तुझी प्रार्थना करीत आहें तें अगदीं योग्य आहे, असें कोण म्हणणार नाहीं ?"

## दहावा दिवस समाप्त.

# सर्ग ३

१ प्रातःस्नानादि विधी उरकल्यानंतर रामादिकांचें वसिष्ठाश्रमांत आगमन. २ सर्व मंडळीसह वसिष्ठ सभागृहांत प्रवेश करतात.

**श्रीवाल्मीकिः**—ज्याप्रमाणें सूर्योदयाची मार्गप्रतीक्षा करणाऱ्या कमलाची रात्र चिंतेमध्यें निघून जाते, त्याप्रमाणें पूर्वोक्तरीतीनें चिंतन करीत असणाऱ्या रामाची ती रात्र निघून गेली. पहांटेची वेळ होतांच अंधकार आणि अरुणोदय यांच्या संमिश्रणामुळें पश्चिम दिशा किंचित् पिंगट वर्णाची दिसूं लागली व पूर्व दिशेकडे आरक्तवर्णाचें तेज फांकूं लागलें. सर्व दिशांतील तारका विरल दिसूं लागून आका-

शरूपी आंगण कोणी झाडून टाकलें आहे कीं काय, असें वाटूं लागलें. पुढें प्रभातकाळीं मंगल वाद्यांचा घोष होऊं लागतांच चंद्राप्रमाणें रमणीय कांतीनें युक्त असलेला श्रीराम आपल्या शय्येवरून प्रसन्न मनानें उठला. त्यानें प्रातःस्नान, संध्यावंदन वगैरे द्विजांना उचित असलेले सर्व विधी उरकले व नंतर आपले लक्ष्मणादि बंधू आणि अगदीं जवळचे आप्तजन यांच्यासह तो वसिष्ठमुनींच्या आश्रमांत गेला. त्या ठिकाणीं आत्मपरायण वसिष्ठमुनि आपल्या नित्य नियमाप्रमाणें एकान्तांत समाधिस्थितींत बसले होते, त्यांना रामानें अत्यंत नम्रतापूर्वक परंतु दुरूनच वंदन केलें. त्याचप्रमाणे बाकीच्या राजपुत्रांनीहि वसिष्ठांना वंदन केल्यानंतर ते सर्व विनयशील राजपुत्र बाहेरच्या आंगणांत उभे राहिले. इतक्यांत सूर्योदयाची वेळ होऊन दिशा स्वच्छ दिसूं लागल्या. तेव्हां ब्रह्मलोकांत सर्व देव जमा व्हावे, त्याप्रमाणें अनेक राजे, राजपुत्र, ऋषी, ब्राह्मण वगैरे वसिष्ठांच्या आश्रमाबाहेर येऊन मुकाट्यानें उभे राहिले. त्यावेळीं वसिष्ठांच्या आश्रमांत राजेरजवाड्यांची आणि आश्रमाबाहेरच्या आंगणांत हत्ती, घोडे रथ यांची गर्दी झाल्यामुळें तो आश्रम एखाद्या राजवाड्याप्रमाणें शोभूं लागला. क्षणांत भगवान् वसिष्ठमुनि समाधि विसर्जन करून उठले आणि विनयानें नम्र झालेल्या त्या सर्वांचें विनयादि आचार आणि प्रियवचनादि उपचार यांच्यायोगानें त्यांनीं स्वागत केलें. नंतर ब्रह्मदेव कमलावर आरोहण करतो, त्याप्रमाणें विश्वामित्रासहवर्तमान आणि इतर मुनींना बरोबर घेऊन वसिष्ठ मुनींनीं रथामध्यें आरोहण केलें आणि सर्व देवांसह ब्रह्मदेव इंद्राच्या नगरीप्रत जातो, त्याप्रमाणें मोठ्या सैन्यासहवर्तमान ते दशरथाच्या मंदिरांत जाऊन पोहोंचले. ज्याप्रमाणें हंसगणानें परिवेष्टित झालेला राजहंस कमलिनीमध्यें मोठ्या थाटानें प्रवेश करतो, त्याप्रमाणें सर्व सभासद उभे राहून अतिशय नम्रपणानें वंदन करीत आहेत, अशा स्थितींत भगवान् वसिष्ठांनीं मुनिजनांच्या परिवारासह दशरथाच्या सभागृहामध्यें प्रवेश केला. महाराजा दशरथहि आपल्या सिंहासनावरून उठून वसिष्ठांचें स्वागत करण्यासाठीं तीन पावलें पुढे गेला.

नंतर दशरथादि राजे, वसिष्ठादिमुनि, ऋषी, ब्राह्मण, सुमंत्रादि मंत्री, सौम्यादि पंडित, रामादि राजपुत्र, शुभादि मंत्रिपुत्र, अमात्यादि अष्टप्रधान, सुहोत्रादि श्रेष्ठ नागरिक, मालवादि देशांतील लोक, नोकर, पौरजन वगैरे सर्वजण क्रमाक्रमानें आपापल्या उचित स्थानीं जाऊन बसले. सभागृहांतील सर्वांची दृष्टि वसिष्ठांच्या मुखाकडे लागली. इतक्यांत सभेंतील गोंगाट शांत झाला, स्तुतिपाठक गप्प बसले, लोकांची आपसांतील कुजबूज बंद झाली व सभेंत सर्वत्र शांतता पसरली. त्या सभागृहांतील द्वारांवरून पुष्पांच्या माळा लटकत होत्या व त्यांवरून वहाणारा वायु इतका सुगंधित होता कीं, भ्रमरांनीं कमलांचा त्याग करून त्या सुगंधित वायूच्या धोरणानें सभागृहाकडे धांव घेतली. सभागृहाच्या भोंवताली असलेल्या माड्यांवरील खिडक्यांतून मृदु पुष्पशय्यांवर बसलेल्या नागरिक स्त्रियांची दृष्टि सभेचें अवलोकन करण्यांत गढून गेली होती. परंतु खिडक्यांच्या जाळींतून येणारे सूर्यकिरण त्यांच्या दृष्टीला किंचित् प्रतिबंध करीत व त्यामुळें त्यांना आपल्या डोळ्यांच्या पापण्या नाइलाजास्तव हालवाव्या लागत. त्यांच्या मुखांवर रत्नांची प्रभा पडून तीं विशेषच खुलून दिसत होतीं. सभेची शोभा पहाण्यांत चित्तवृत्ती गढून गेल्यामुळें हातामध्यें शुभ्र चवऱ्या धारण करणाऱ्या तरुणींच्या हातांची हालचाल अजिबात बंद पडली होती, व त्या मौनवृत्ति

धारण करून बसल्या होत्या. सभास्थानांतील भूमि नानाविध रत्नांच्या योगानें खचित करण्यांत आलेली असून सूर्यकिरणांच्या योगानें तीमध्यें मुक्ताफळांचीं प्रतिबिंबें पडत असल्यामुळें सर्वत्र पुष्पेंच पसरलीं आहेत कीं काय, असा भास होई. परंतु या अपूर्व देखाव्यामुळें भ्रमरांची चांगलीच फजीती होऊं लागली. कारण, मुक्ताफळांच्या प्रतिबिंबांना तीं बालरवीचीं बिंबेंच आहेत असें समजून ते बिचारे त्यांवर बसण्याकरितां जात, परंतु तीं हातीं न लागल्यामुळें हिरमुसले होऊन ते मेघांप्रमाणें आकाशांत उगाच घिरट्या घालीत फिरूं लागत ! असो. त्या सभेमध्यें जमलेल्या सज्जनांच्या समुदायामध्यें कित्येक आर्यजन आपणांस वसिष्ठमुनींची वाणी पूर्वपुण्याईनें ऐकावयास मिळाली, याबद्दल अंतःकरणांत धन्यता मानीत होते. व ती धन्यता, वसिष्ठांच्या उपदेशाचा लोकोत्तरपणा आणि त्यापासून उत्पन्न होणारें आश्चर्य ते एकमेकांच्या कानांशीं लागून मोठ्या प्रेमानें आणि कौतुकानें बोलून दाखवीत होते अशा रीतीनें सभागृहांतील सज्जनांच्या कानगोष्टी चालल्या असतां निरनिराळ्या दिशा, पुरें, अंतरिक्ष, अरण्यें यांमधून सिद्ध, विद्याधर, मुनी, विप्र वगैरे अधिकारी जनांचे संघच्या संघ सभास्थानीं येऊं लागले, मुखानें एकहि शब्दाचा उच्चार न करतां त्यांनीं सर्वांनीं वसिष्ठमुनींना वंदन केलें व आपल्या स्वागतप्रसंगीं कोणाशीं भाषण करणें आवश्यक असेल तेंहि अगदीं हलक्या स्वरांत कोणाला त्रास न होईल अशा बेतानें केलें व नंतर ते आपापल्या आसनांवर विराजमान झाले. ती प्रभाताची वेळ असल्यामुळें त्यावेळीं रक्तकमलें विकसित झालीं होतीं; व रात्रीच्या वेळीं त्यामध्यें अडकून गेलेले भ्रमरसमूह बाहेर पडूं लागल्यामुळें, तसेंच कमलांतील मकरंद आणि सुवर्णपराग यांच्यामुळें, किंचित् पिंगलवर्ण झालेल्या वायूच्या मंद मंद झुळुका वाहूं लागल्या होत्या, त्यामुळें, वाजूं लागलेल्या घंटांचा नाद घरांतून प्रातःकाळीं म्हटल्या जाणाऱ्या गीतांच्या ध्वनीलाही मागें सारीत होता. त्या सभास्थानीं जिकडे तिकडे निरनिराळ्या रंगाच्या फुलांच्या माळा लटकत होत्या व त्यांच्या सुगंधांत अगरु, तगर, चंदन यांच्या धुराची भर पडत असून तो आकाशांत जात असतां त्या सभेंतील छताला लावलेल्या कमलांच्या सुगंधानें तो मिश्रित होत होता. अशा तऱ्हेच्या त्या नीलवर्ण धुरामध्यें उडणारे भ्रमर केवळ गुंजारवामुळेंच कायते ओळखले जात होते.

---

# सर्ग ४

—:*:—

१ दशरथानें केलेली वसिष्ठांची प्रशंसा. २ वसिष्ठ श्रीरामाला प्रश्न करतात व श्रीराम त्यांचीं उत्तरें देऊन पुढील उपदेश करण्याविषयीं त्यांची प्रार्थना करतो.

**श्रीवाल्मीकिः**—अशा रीतीनें त्या सभेमध्यें सर्वत्र शांतता आणि रमणीयता पसरली असतां आपल्या मेघासारख्या गंभीर आणि श्रद्धायुक्त वाणीनें दशरथ राजा मुनिश्रेष्ठ वसिष्ठांना म्हणालाः—" भगवन् ! कालच्या उपदेशानें आपल्याला झालेले विलक्षण श्रम रात्रीं घेतलेल्या विश्रांतीमुळें अंशतः तरी कमी झाले ना ? आपल्या कालच्या मधुर वाणीनें व आनंददायक आणि विशद प्रतिपादनशैलीनें अमृताचा वर्षाव व्हावा त्याप्रमाणें होऊन आमचे कान तृप्त झाले आहेत व आमच्या अंतःकरणाला अपूर्व समाधान प्राप्त झालें आहे. महात्म्यांच्या वाणी चंद्रकिरणांसारख्या निर्मल, शीतल आणि अमृतयुक्त असून त्या मोहांधकार नष्ट करून चित्ताला विलक्षण

सुख देतात. मनुष्यापासून तों तहत हिरण्यगर्भाच्या स्थितीपर्यंत सर्वांना मिळणाऱ्या सुखापेक्षां ज्यास्त सुख, अर्थात् ब्रह्मानंदाचें दिव्य सुख महात्म्यांच्या वाणीपासून मिळतें आणि त्यामुळें अनर्थकारक मोहाची निवृत्ति होते. सत्पुरुषांच्या सरस वाणी म्हणजे आत्मरत्नाचें दर्शन करून देणाऱ्या स्नेहयुक्त दीपज्योतीच होत. ज्याच्यापासून युक्तिरूपी लता उत्पन्न होतात, असा सुजनवृक्ष खरोखरच वंद्य होय. ज्याप्रमाणें चंद्राचे किरण अंधकाराचा नाश करतात, त्याप्रमाणें सज्जनांच्या सदुक्ती सर्व शारीरिक आणि मानसिक दोषांचें परिमार्जन करतात. ज्याप्रमाणें वर्षाकालांतील कृष्णमेघ शरदृतूच्या आगमनाबरोबर क्षीण होतात, त्याप्रमाणें हे मुनिवर्या ! आमच्या मनांतील तृष्णालोभादि संसारबंध आपल्या उपदेशानें क्षीण होऊं लागले आहेत. सिद्धरसाचें अंजन डोळ्यांत घातलें असतां एखाद्या जन्मान्धाला सुद्धां दृष्टि येते आणि त्याला भूमिगत द्रव्य दिसूं लागतें, त्याप्रमाणें आपल्या दिव्य वाणीच्या प्रभावानें आमच्या नेत्रांत ब्रह्मरसाचें अंजन पडलें असून आमची प्रत्यग्दृष्टि निष्पाप आणि निष्कलंक अशा आत्म्याचें दर्शन करून घेण्यास समर्थ झाली आहे. आपली उक्ति हाच जणुं शरदृतु असून त्यामुळें आमच्या हृदयाकाशांतील वासनारूपी धुकें हळु हळु क्षीण होऊं लागलें आहे. मुनिवर्या ! इंद्राच्या नंदनवनांतील कल्पवृक्षाच्या मंजरी किंवा अमृतसागराच्या लाटा जो आल्हाद देऊं शकत नाहींत, तो महात्म्यांच्या वाणी देऊं शकतात. राघवा ! जो दिवस ब्रह्मवेत्त्यांच्या पूजनांत जातो, तोच तेवढा प्रकाशयुक्त होय, बाकीचे दिवस अंधकारयुक्त आहेत असेंच या जगांत समजलें पाहिजे. यास्तव राजीवलोचना रामा ! प्रसाद करण्याविषयीं उत्सुक असलेल्या ह्या वसिष्ठमुनींना आपलें शाश्वत कल्याण करणाऱ्या प्रकृत विषयासंबंधानें प्रश्न कर.'

येणेंप्रमाणें भाषण करून रामाला प्रश्न विचारण्यासंबंधानें दशरथानें अनुज्ञा दिली असतां रामचंद्राच्या संमुख असलेले उदार वसिष्ठमुनि बोलूं लागले.

**श्रीवसिष्ठः**—आपल्या कुलाची कीर्ति वृद्धिंगत करणाऱ्या महाबुद्धिवान् राघवा ! मीं पूर्वी केलेला उपदेश तुझ्या ध्यानांत आहेना ? माझ्या भाषणांतील वाक्यार्थ आणि पूर्वापारसंबंध यांच्या संबंधानें तूं नीट विचार केला आहेस ना ? हे शत्रुमर्दना ! सत्त्वादि गुणभेदांमुळें या विश्वांतील विचित्र जीवजातींची उत्पत्ति कशी होते, यासंबंधानें मीं केलेलें विवेचन तुझ्या स्मरणांत असेलच. परमात्म्याचें सर्व—नटाप्रमाणें मायेमुळें जगद्वेषानें स्थित असलेलें, असर्व—निष्प्रपंच, सत्—स्थूल, असत्—सूक्ष्म व सदसद्रूप वगैरे अंगांनीं युक्त असलेले रूप दृश्यापासून भिन्नपणानें तूं जाणलें असशील व त्याचें तुला स्मरणहि होत असेल. सर्वशक्तिसंपन्न ईश्वरापासून हें विश्व कसें उदित झालें आहे, हें तुझ्या स्मरणांतून गेलें नसेलच. कारण, तूं सद्बुद्धिसंपन्न असल्यामुळें साधूंची वाणी श्रवण करण्याची योग्यता फक्त तुझीच आहे. कालबलाच्या दृष्टीनें भंगुर असलेले अविद्येचें स्वरूप संख्येनें अनंत पण देशकालादिकांनीं अंतवंत कसें आहे, तें तुला आठवत असेलच. चित्त हाच पुरुष आहे, त्यावांचून त्याचें निराळें रूप नाहीं, असें मीं लक्षणादिकांच्या योगानें प्रतिपादन केलेलें तूं विसरला नसशील, अशी माझी खात्री आहे. सारांश, माझ्या संपूर्ण भाषणाचा तूं गेल्या रात्रीं चांगला विचार करून ठेवला असशीलच. कारण, तत्त्वोपदेश श्रवण केल्यानंतर त्याचें वारंवार

मनन होईल तरच तो फलद्रूप होतो; तोच उपदेश अनादरानें श्रवण करणाऱ्या किंवा त्यावर मनन न करणाऱ्या मूढाच्या पदरांत ऐकण्याच्या श्रमाशिवाय दुसरें कांहीं पडत नाहीं. परंतु राघवा! तुझी स्थिति मात्र अशांतली नाहीं. तुझें हृदय विवेकसंपन्न असल्यामुळें ज्याप्रमाणें मोकळा गळा मोत्यांचा हार ग्रहण करण्याला योग्य असतो, त्याप्रमाणें तें तात्त्विक आणि चित्तशुद्धिकारक उपदेश गृहण करण्याला सर्वथा योग्य आहे.

**श्रीवाल्मीकिः**—अशा रीतीनें त्या महातेजस्वी ब्रह्मपुत्र वसिष्ठमुनींनीं अनेक प्रश्न करून रामाला भाषण करण्याला अवसर दिला असतां रामचंद्र बोलूं लागला.

**श्रीरामः**—भगवन्! सर्व गोष्टी आपण जाणत आहां! आपल्या परम उदार वचनांचा अर्थ मीं जाणला ही गोष्ट खरी, पण तो प्रभाव आपला असून त्यांत माझी प्रशंसा करण्यासारखें कांहीं नाहीं. कारण, आपली कृपादृष्टि नसती, तर आपल्या उपदेशाचें आकलन करण्याचें सामर्थ्य माझ्या ठिकाणीं कदापि आलें नसतें. मननाशिवाय केलेलें श्रवण व्यर्थ आहे असें आपण आत्तांच सांगितलें, तें अक्षरशः खरें आहे व गेल्या रात्रीं माझी स्थिति तशीच झाली. कारण, आपल्या तत्त्वोपदेशाच्या चिंतनांत गढून गेल्यामुळें मला निद्रा अजिबात सोडून गेली. प्रभो! ज्याप्रमाणें पृथ्वीवरील अंधकार नाहींसा करण्यासाठीं भगवान् सूर्यनारायण प्रकाशाचे आल्हादकारक किरण बाहेर फेंकतो, त्याप्रमाणें संसाररूपी अंधकाराचा नायनाट करण्यास समर्थ असलेलीं आणि मनाला आनंद देणारीं जीं वचनें काल आपल्या मुखांतून बाहेर पडलीं, तीं सर्व मीं आपल्या हृदयसंपुटांत सांठवून ठेविलीं आहेत. एवढेंच नव्हे, तर एखादा मनुष्य रम्य, पवित्र आणि पुण्यकारक रत्नें जितक्या दक्षतेनें मोजून ठेवतो, तितक्याच दक्षतेनें आपल्या वचनरूपी बहुमोल रत्नांचा मीं आपल्या हृदयांत संग्रह करून ठेवला आहे. परंतु यांत मीं कांहीं विशेष केलें आहे, असें मला वाटत नाहीं. आपलीं वचनें हितकारी, मधुर, पावन आणि परमपुरुषार्थाचें साधन हस्तगत करून देणारीं असल्यामुळें तीं कोणते सिद्ध पुरुष आपल्या मस्तकावर धारण करणार नाहींत? अशा स्थितींत मी आपलें अनुशासन शिरसावंद्य मानतों, यांत माझें कौतुक करण्यासारखें वास्तविक काय आहे? वर्षाकाल संपून शरत्काल लागतांच हवेंतील धुकें नाहींसें होत जाऊन दिवस स्वच्छ होत जावेत, त्याप्रमाणें आपल्या कृपाप्रसादामुळें आमच्या हृदयांतील संसाराचें दाट धुकें नष्ट होत जाऊन हृदयाकाश स्वच्छ आणि रमणीय झालें आहे, व हें सर्व आपल्या कृपेचें फल आहे. आपला पवित्र उपदेश श्रवणकालीं मधुर, मनन आणि निदिध्यासकालीं शमदमादि संपत्तिसुख वृद्धिंगत करणारा आणि परिणामीं मोक्षरूपी सर्वश्रेष्ठ फल प्राप्त करून देणारा आहे. आपलें सुभाषितरूपी कल्पवृक्षाचें पुष्प दिवसानुदिवस विकास पावणारें, स्वच्छ, शुभ्र, सदा प्रफुल्लित, तसेंच पापपुण्यें आणि त्यांचीं फलें यांना आनंदैकरसमय करणारें असून तें आम्हांला नित्य उत्कृष्ट फल प्राप्त करून देवो, हीच आमची अंतःकरणपूर्वक प्रार्थना आहे. भगवन्! आपण सकल शास्त्रांच्या विचारामध्यें विशारद म्हणजे निपुण आहां. किंबहुना, आपण सर्व शास्त्ररूपी पक्ष्यांच्या संचारानें शोभायमान होणारे, सर्वत्र पसरलेल्या पुण्यरूपी, जलाचे निधि आहां. तसेंच आपल्या या अगाध पाप नाहींसे करणाऱ्या जलाचा दुसऱ्यांना उपयोग करून देण्यासंबंधाचें आपलें औदार्य सर्वमतच आहे. वास्तव आपल्या वाणीचा

पवित्र प्रवाह आमच्यावर सोडून आम्हांला कृतार्थ करावें, अशी माझी आपल्याला हात जोडून प्रार्थना आहे.

# सर्ग ५

—:❀:—

१ केवळ अविवेकामुळेंच वृद्धि पावलेल्या आणि मनोमात्र अशा जगत्स्थितीच्या उपशमाचा उपायक्रम.

**श्रीवसिष्ठः**—बा सुंदर रामा! उत्तम सिद्धान्तांच्या योगानें रमणीयता पावलेलें हें उपशम-प्रकरण आतां सावधान चित्तानें श्रवण कर. रामा! ज्याप्रमाणें एखादा मंडप चांगल्या बळकट खांबांच्यामुळें धारण केला जातो, त्याप्रमाणें ही दीर्घ संसारमाया नेहमीं राजस-तामस जीवांकडून धारण केली जाते. परंतु तुझ्यासारखे राजससात्त्विक किंवा शुद्धसात्त्विक जीव जीर्ण झालेली कात सर्प सहज टाकून देतो त्याप्रमाणें, या तुच्छ मायेचा लीलेनें त्याग करतात. आतां असले जीव मायेचा त्याग कोणत्या उपायानें करतात तें सांगतों. शुद्धसात्त्विक अथवा राजस–सात्त्विक जीव जगाच्या मूल परंपरेचा चांगला विचार करतात. शास्त्रावलोकन, सत्संगति, तसेंच यज्ञ, दान, तप इत्यादि पुण्यकर्मांच्या योगानें ज्यांची चित्तशुद्धि झाली आहे, अशा पुरुषांची बुद्धि एखाद्या दीपाप्रमाणें त्यांना तत्त्वदर्शन करून घेण्यास समर्थ करते. तत्त्वज्ञान करून घेण्याचें हें कार्य ज्याचें त्यानेंच आपल्या शुद्ध बुद्धीच्या साहाय्यानें करून घ्यावयाचें असतें, व अशा रीतीनें जोंपर्यंत ज्ञेय वस्तूचें ज्ञान झालें नाहीं, तोंपर्यंत तिच्या प्राप्तीची गोष्टच बोलावयास नको. परंतु बा रघुनंदना! तुझी गोष्ट अशांतली नाहीं. कारण, तूं बुद्धिमान्, प्रमाणकुशल, धैर्यशाली आणि कुलीन असून स्वभावतःच राजस–सात्त्विक जीवांमध्यें अग्रगण्य आहेस. वास्तव या संसाराच्या पूर्वेतिहासामध्यें सत्य काय आहे आणि असत्य काय आहे, याचा बुद्धीनें चांगला निवाडा करून नंतर सत्यपरायण हो. ज्याचे आदि आणि अंत सत्य नाहींत, तें मधल्या स्थितींत तरी सत्य कसें असणार? कारण, जें आदिअंतीं सत्य असतें तेंच वास्तविक सत्य होय; तद्व्यतिरिक्त सत्य असणें शक्य नाहीं. अशी वस्तुस्थिति असतां आदि-अंतीं असन्मय असलेल्या वस्तूवर सत्यत्वाचा आरोप करून जो तिच्यावर मनानें आसक्त होतो, अशा मूढ पशूवर विवेकाचा परिणाम कसा होणार? प्रपंच काय किंवा परमार्थ काय सर्व मनाचा खेळ आहे. तत्त्वदृष्टीनें पाहिलें तर या जगांत मनच उत्पन्न होतें, तेंच वृद्धिंगत होतें आणि तेंच मुक्त होतें, असें दिसून येतें.

**श्रीरामः**—ब्रह्मन्! या त्रिभुवनांत मनच संसारी आहे आणि जरामरणाला तेंच पात्र आहे, हें मीं जाणलें. परंतु आतां त्यांतून तरून जाण्याचा जो उपाय असेल, तो मला निश्चयात्मक सांगा. कारण, आपण रघुकुलोत्पन्न पुरुषांच्या हृदयांतील अज्ञानतिमिर नष्ट करणारे प्रत्यक्ष सूर्यच आहां.

**श्रीवसिष्ठः**—राघवा! प्रथम शास्त्रावलोकन, वैराग्य आणि सत्संगति यांच्या योगानें चित्तशुद्धि करून घेऊन ज्ञानयोग्यता संपादन करावी. अशा क्रमानें अंतःकरण अभिमानरहित होऊन तीव्रवैराग्ययुक्त झालें, म्हणजे विज्ञानानें संपन्न असून प्रबोधशक्तीनें युक्त असलेल्या सद्गुरूला विधिपूर्वक शरण जावें. नंतर गुरूपदिष्ट मार्गानें सगुण ईश्वराची ध्यानार्चनादि मार्गानें उपासना करावी, म्हणजे क्रमाक्-

१ उमासहायं परमेश्वरं प्रभुं त्रिलोचनं नीलकण्ठं प्रशान्तम्। ध्यात्वा मुनिर्गच्छति भूतयोनिं समस्तसाक्षिं तमसः परस्तत्॥

मानें परमपावन अशा पदाची प्राप्ति होते. सद्गुरूनें निर्दिष्ट केलेल्या मार्गानें मनुष्य जाऊं लागला, म्हणजे त्याच्या अनुग्रहामुळें त्याची बुद्धि विवेकसपन्न आणि स्वरूपानुसंधानकुशल बनूं लागते व यामुळें सर्व आकाश चंद्राच्या शीतल किरणांनीं पूर्ण दिसावें, त्याप्रमाणें आत्म्याचा उज्ज्वल प्रकाश सर्वत्र दिसूं लागतो. जोंपर्यंत बुद्धिरूपी नौकेचा आश्रय करून जीव विचाररूपी तीरावर येऊन विश्रांति घेऊं लागला नाहीं, तोंपर्यंतच तो संसाररूपी महासागरामध्यें एकाद्या गवताच्या काडीप्रमाणें हेलकावे खात वहात जात असतो. परंतु विचारानें ह्या जीवाला एकदां ज्ञेय वस्तूचें परिज्ञान झालें, म्हणजे सपाट प्रदेशावर वाहूं लागलेला नदीचा प्रवाह प्रसन्न होऊन त्यांतील वाळूचे कण खालीं तळाशीं फेंकले जातात, त्याप्रमाणें अशा जीवाची बुद्धि यच्चयावत् मानसदुःखांना तुच्छ करून टाकते. ज्याप्रमाणें भस्मामध्यें अदृश्य झालेल्या सुवर्णाचें ज्ञान नसलेल्या मनुष्यांना सुवर्ण नाहींसें झाल्याबद्दल हळहळ वाटली, तरी सुवर्णाची परीक्षा असलेल्या सोनाराला 'हें सुवर्ण' आणि 'हें भस्म' अशा तऱ्हेचें ज्ञान असल्यामुळें 'सुवर्ण गमावलें' असा मोह उत्पन्न होणें शक्य नाहीं; त्याचप्रमाणें अज्ञानामुळें परिच्छिन्न बनलेल्या जीवाला आत्मज्ञानामुळें कालादिपरिच्छेदशून्य आणि अक्षय असा आत्मा आपण आहों असा अनुभव आला म्हणजे मग मोहाला अवकाश कोठून राहील ? ज्याला तत्त्वसाक्षात्कार झालेला नाहीं असा पुरुष मोह पावला तर पावो, परंतु ज्याला आत्म्याचें निःसंशय ज्ञान झालें, त्याला मोह उत्पन्न होण्याची शक्यताच नाहीं. हे सभाजनहो ! तुम्हांला आत्म्याचें यथार्थज्ञान झालेलें नाहीं व हेंच तुमच्या दुःखाचें बीज आहे. परंतु त्या आत्म्याचा तुम्हांला अपरोक्षसाक्षात्कार झाला, म्हणजे तुम्हांला अक्षयसुख आणि शांति प्राप्त झाल्याशिवाय रहाणार नाहीं. आत्म्याचें वास्तविक स्वरूप लुप्तप्राय होऊन तो ह्या देहाशीं जणूं मिसळून गेला आहे. यास्तव पंचकोशविवरणाच्या योगानें त्याला देहापासून भिन्नत्वानें ओळखून त्या आत्म्यामध्येंच स्थिर व्हा व असें करण्याला विलंब लावूं नका.

देहापासून आत्मा निराळा आहे हें ज्ञान करून घेणे फारसें कठीण आहे असें नाहीं. कारण, सोनें चिखलांत पडलें आणि त्यानें लिप्त झालें, तथापि त्याला चिखलाचा मुळींच संपर्क नसतो, तद्वत् अत्यंत निर्मल अशा आत्म्याचा ह्या देहाशीं यत्किंचितहि संबंध नाहीं. आतां ब्रह्म आणि जीव ह्यांच्यामध्यें जो भिन्नपणा दिसतो, तो कमलाला आधारभूत असलेलें जल आणि कमलपत्रावर त्या जलाचा असलेला बिंदु ह्यांप्रमाणें आहे, अर्थात् ब्रह्म आणि जीव ह्यांमधील भिन्नता केवळ औपाधिक आहे, स्वाभाविक नव्हे. आतां ह्या ठिकाणीं असा प्रश्न उत्पन्न होतो कीं, 'कमलाला आधारभूत असलेलें जल वायूच्या योगानें परिच्छिन्न होऊन बिंदुरूप पावतें; परंतु पूर्णात्मा संकुचित कसा बनतो आणि तो देही म्हणजे देहाचा अभिमान कसा धारण करतो ?' तर ह्याचें उत्तर हेंच कीं, असें होण्याचें कारण हें द्वाड मनच असून त्याचा प्रथम नायनाट केला पाहिजे ! हा सिद्धान्त मी आपले हात वर करून[1] कंठरवानें सांगत आहें; परंतु त्याच्याकडे कोणीच लक्ष देत नाहीं ! हें जडधर्मी मन आत्मविचार

---

१ ऊर्ध्वबाहुर्विरौम्येष नच कश्चित् शृणोति मे । हीच ओळ महाभारतांतील स्वर्गारोहणपर्व अ. ५ श्लो. ६२ मध्यें अक्षरशः आली आहे. तो श्लोक असाः—'ऊर्ध्वबाहुर्विरौम्येष न च कश्चित् शृणोति मे । धर्मादर्थश्च कामश्च स किमर्थं न सेव्यते ॥'

सरून चिखलांतील कांसवाप्रमाणें वासनेंत बुडून भोगप्राप्तीच्या मार्गामध्यें द्वारभूत असलेल्या इंद्रियांच्या योगानें विषयामध्यें आसक्त होऊन जोंपर्यंत मूढ बनलेलें आहे, तोंपर्यंत चंद्र, अग्नि, किंबहुना बाराहि सूर्य यांच्या योगानें संसारांधकार लवमात्रहि कमी होणार नाहीं हें खास. परंतु तेंच मन एकदां प्रबुद्ध झालें आणि आपल्या पारमार्थिक स्थितीसंबंधानें विचार करूं लागलें व आपल्या मिथ्या स्वरूपाला ओळखूं लागलें, म्हणजे सूर्योदयाबरोबर रात्रीचा अंधकार अस्तंगत होतो, त्याप्रमाणें हृदयांतील अज्ञानाचा नायनाट होतो. यास्तव योगशय्येवर आरूढ झालेल्या, अर्थात् देहाशीं तादात्म्य अनुभवणाऱ्या मनाला भवबंधाचा निरास करण्याकरितां आणि आत्मज्ञान प्राप्त करून देण्याकरितां नेहमीं बोध करावा. कारण, संसार हा अत्यंत दुःखप्रद आहे. ज्याप्रमाणें आकाशांत धूळ उडाली म्हणून तें मलिन होत नाहीं, किंवा कमलपत्रावर उदक पडलें तरी तें त्याला चिकटत नाहीं, तद्वत् आत्म्यावर कितीहि देह येऊन गेले तरी तो त्यांच्या योगानें लिप्त होत नाहीं. सुवर्णाचा चिखलाशीं बाह्यतः संयोग झालेला दिसला तरी तें आंतमध्यें केव्हांहि मलिन होत नाहीं, निराळेंच राहतें, त्याप्रमाणें जड देहांच्या योगानें आत्म्याच्या स्वरूपांत वस्तुतः कांहींच विकार होत नाहीं. आकाशांत दृष्टिदोषामुळें क्वचित् निरनिराळे बिंदू दिसतात किंवा क्वचित् तें मलिन दिसतें, तसे मूढाला आत्म्यामध्यें सुखदुःखांचे अनुभव मिथ्याच येत असतात. वस्तुतः सुख आणि दुःख यांचा अनुभव जड देहाला असणें शक्य नाहीं, त्याचप्रमाणें सर्वांच्या अतीत असलेल्या आत्म्यालाहि असणें शक्य नाहीं, अर्थात्, सुखदुःख हा अज्ञानामुळें उत्पन्न होणारा केवळ भास आहे व तें अज्ञान एकदां नष्ट झालें, म्हणजे सुखदुःखांच्या भ्रमाचा भोंपळा आपोआपच फुटतो.

राघवा ! तत्त्वदृष्टीनें विचार करतां या जगांत कोणी सुख भोगीत नाहीं व कोणी दुःखहि भोगीत नाहीं. यास्तव सर्वत्र आत्ममय, शांत आणि अनंतस्वरूपच आहे, असें पहात जा. आतां ह्या ज्या अनंत सृष्टी दृष्टीला दिसतात, त्या जलांतील तरंग किंवा भ्रमामुळें आकाशांत दिसणारीं पिसें यांच्याप्रमाणें आत्म्यामध्यें विवर्तरूपानें भासतात, हें लक्षांत ठेव. ज्याप्रमाणें एखादें रत्न कांहीं प्रयत्न न करतां स्वाभाविकपणेंच आपलें तेज सर्वत्र प्रसृत करतें, त्याप्रमाणें हा आत्मा सर्व सृष्टींचा अकारण विस्तार करतो; म्हणजे त्यासंबंधानें त्याला कांहीं क्रिया करावी लागत नाहीं. आत्मा आणि जग हीं एकरूप नाहींत, द्वैतरूप नाहींत किंवा अनेकरूपहि नाहींत. कारण, जग हें असद्रूप असल्यामुळें त्याचा सत्स्वरूपाशीं अभेद आहे किंवा भेद आहे, हें सांगतां येणेंच शक्य नाहीं. स्थितिकाळीं प्रतीतीस येणारें जग केवळ आभासमात्र आहे. परंतु परमार्थदृष्टचा अज्ञान किंवा तज्जन्य भ्रांति यांना स्वतंत्ररीतीनें आस्तित्व नसल्यामुळें ‘ सर्व ब्रह्मच आहे,’ ‘हा सर्व आत्म्याचाच विस्तार आहे’ असें म्हणणें ओघानेंच प्राप्त होतें. यास्तव बा राघवा ! मी निराळा आणि हें जग निराळें ही भ्रांति सोडून दे. ज्याप्रमाणें एखाद्या समुद्रामध्यें पाण्याच्या भिन्न भिन्न राशींची कल्पना संभवत नाहीं, त्याप्रमाणें देश, काल आणि वस्तु या त्रिविध परिच्छेदानें शून्य असलेल्या ब्रह्मामध्यें अनेकत्वाच्या कल्पना संभवत नाहींत. जशी अग्नीमध्यें हिमकणाची कल्पना संभवत नाहीं, त्याचप्रमाणें एका सर्वव्यापी परमात्मवस्तूमध्यें त्याहून निराळी वस्तु असणें शक्यच नाहीं. अशा दृष्टीनें विचार करून तूं सदोदित शुद्ध

अंतःकरणानें चिद्रूप आत्म्याची भावना करीत जा, म्हणजे माय.कौटिल्यरहित आणि मालिन्यरहित अशा आत्मस्वरूपामध्यें तुला विश्रांति मिळूं लागेल. अशा तऱ्हेनें अभ्यास करूं लागलास म्हणजे तूं जीवन्मुक्तपदावर आरूढ होशील. त्या स्थितींत शोक नाहीं, मोह नाहीं, जन्म नाहीं आणि जन्म घेणाराहि नाहीं; तर सद्वस्तु आहे तशीच कायम आहे, असा अनुभव येतो. तरी हा अनुभव करून घेऊन राघवा! तूं निर्द्वंद्व, नित्यसत्त्वस्थ, योगक्षेमरहित, आत्मनिष्ठ, अद्वितीय, शोक आणि चितारहित, सम, स्वस्थ, स्थिरबुद्धि, शांत, मननशील आणि निर्मलांतःकरण होऊन अविद्या आणि तिचें कार्य यांनीं रहित, संकल्पशून्य, धीर, स्वाधीनचित्त व यथाप्राप्त आचरण करणारा होऊन दुःखरहित हो. बा रामचंद्रा! तूं रागरहित, आयासरहित, शुद्ध, निष्पाप, गृहणत्यागबुद्धिरहित, जें विश्वातीतपद तें प्राप्त करून घेतलेला, सर्वप्राप्तव्यसंपन्न, सागराप्रमाणें पूर्ण आणि शांत, विकल्पजालापासून मुक्त झालेला, मायांजनरहित, आत्मतृप्त, अनंत आणि अपार अशा शरीरानें युक्त, आत्मवेत्त्यांमध्यें अग्रेसर, मेरुपर्वताप्रमाणें अढळ, प्रारब्धानुसार वर्तणारा, सर्वत्र इच्छारहित, त्यागगृहणकल्पनाशून्य, सागराप्रमाणें गंभीर आणि पूर्णेंदूप्रमाणे स्वतःच्याच ठिकाणीं आल्हाद पावणारा असा हो. रामा! ही विश्वप्रपंचरचना असद्रूप असल्यामुळें तत्त्वज्ञ अशा मृगजळापाठीमागे केव्हांहि धांवत जात नाहीं. तूं तज्ज्ञ आहेत, संकल्परहित आहेस, निरामय आहेस, नित्यतृप्त आहेस. यास्तव हे सुंदरा! तूं शोकरहित हो. आतां यावर कदाचित् तुझ्या मनांत असें येण्याचा संभव आहे कीं, 'तत्त्वज्ञ मनुष्य संसाररूपी मृगजळाच्या मागें धांवत जात नाहीं, तर मग मला तरी राज्य घेऊन काय करावयाचें आहे? मीहि संन्यासच घेईन म्हणजे झालें!' परंतु ही तुझी विचारसरणी बरोबर नव्हे. कारण, कर्मफलाची आसक्ति सोडून नित्यतृप्त आणि निराश्रय अशा स्थितींत ज्ञानी पुरुषानें केलेले कर्म त्याला बंधनकारक होत नाहीं, असा सिद्धान्त आहे. यास्तव तुझा पिता जेव्हां तुला एकछत्री राज्य देईल, तेव्हां त्याचा अवश्य स्वीकार कर आणि आपल्या अंगच्या गुणांच्या योगानें सर्व मांडलिक राजे व प्रजाजन तुझ्यावर अनुरक्त होतील अशा रीतीनें तें राज्य समदृष्टीने कर. कारण, **अवश्यप्राप्त कर्मांचा आणि फलांचा त्याग किंवा त्यांच्या संबंधाचा अनुराग हीं दोन्हीहि युक्त नव्हत.**

१ निर्द्वंद्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान्। हीच ओळ अक्षरशः गीता अ. २ श्लोक ४५ मध्यें आली आहे.

---

# सर्ग ६.

१ भिन्न भिन्न कर्मानुरूप प्राप्त होणाऱ्या गती. २ ज्यांचा हा जन्म अखेरचा आहे अशांनीं जीवन्मुक्तिसुखासाठीं संपादन करावयाच्या गुणांचा सामान्य क्रम.

**श्रीवसिष्ठः**—रामा! ज्याप्रमाणें लोहचुंबकाच्या केवळ सान्निध्यामुळें लोखंडामध्यें हालचाल सुरू होते, त्याप्रमाणें श्रुति, स्मृति आणि सदाचार यांच्यामुळें प्राप्त होणारे व्यवहार मी केवळ आत्म्याच्या सान्निध्यानें करीत आहें, अशा अनुभवपदावर आरूढ होऊन जो वासनारहित बुद्धीनें सर्व कार्यांमध्यें प्रवृत्त होतो, तो मुक्त होय असें माझें मत आहे. ज्यांना नरदेह प्राप्त झाला आहे. अशांपैकीं कित्येक अविचारी पुरुष निष्काम कर्मे करण्यामध्यें रत न होतां सकाम कर्मांमध्येंच आसक्त होतात; व

त्यामुळें ते स्वर्गांतून नरक आणि नरकांतून पुन्हां स्वर्ग अशा रीतीनें एकसारखे हेलकावे खात रहातात. कित्येक मनुष्य अकर्मांमध्यें–निषिद्ध कर्मांमध्यें रत असतात, तर कित्येक विहित कर्मांपासून पराङ्मुख होतात. असे मनुष्य एका नरकांतून दुसऱ्या नरकांत, एका दुःखांतून दुसऱ्या दुःखांत आणि एका भयांतून दुसऱ्या भयांत जाऊन पडतात.' कित्येक जीव तर स्वतःच्या वासनारूपी तंतूंनीं बद्ध झालेले असून आपल्या दुष्कर्मांच्या परिपाकामुळें पशुपक्ष्यादि तिर्यक् योनींमध्यें प्रवेश करतात व तेथून वृक्षपाषाणादि स्थावर योनींत व पुन्हां तिर्यक् योनींत अशा रीतीनें भ्रमण करीत रहातात. राजस, तामस आणि शुद्ध तामस जीवांची गति अशा प्रकारची होत असते. आतां शुद्धसात्त्विक जीवांची स्थिति कशी असते ते सांगतों. असले भाग्यवान् जीव आत्मवेत्ते असून त्यांनीं मनाच्या साक्षिभूत असलेल्या आत्म्याचें पूर्ण ज्ञान करून घेतलेलें असल्यामुळें तृष्णारूपी बंध ताडकन् सोडून ते परमकैवल्याच्या स्थितीप्रत जाऊन पोहोंचतात. परंतु असले शुद्धसात्त्विक धन्य जीव फार विरळा होत. पूर्वीं एकामागून एक श्रेष्ठ प्रतीचे मानवजन्म घेऊन जे या जन्मांत मुक्त होतात, अशा जीवांना राजससात्त्विक असें म्हणतात. या राजससात्त्विक वर्गांतील जीव उत्पन्न होतांच पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणें दिसूं लागतो आणि वर्षाकाल येतांच कुड्याच्या फुलांना भर येतो, तद्वत् तो साधनचतुष्टय होऊन शोभूं लागतो. महाबुद्धिवान् रामा! ज्याचा हा जन्म पाश्चात्त्य म्हणजे शेवटचा असतो, त्याच्यामध्यें वेळूमधील मोत्यांप्रमाणें ब्रह्मविद्येच्या अंगभूत असलेल्या सर्व श्रेष्ठ विद्या स्वभावतःच प्रवेश करतात. तसेंच अंतःपुराचा आश्रय करून कुलीन स्त्रिया राहतात, त्याप्रमाणें सौजन्य, आकर्षकता, मैत्री, सौम्यपणा, करुणा, ज्ञातेपणा वगैरे अनेक गुण त्याचा आश्रय करून राहतात. तो सर्व प्रारब्धप्राप्त कर्मे करतो, पण त्यांचें फळ मिळालें तरी आनंदानें फुगून जात नाहीं किंवा तीं कार्यें त्याच्या मनाप्रमाणें झालीं नाहींत अथवा बिघडलीं, तरी तो खिन्न होत नाहीं; तर सदासर्वदा समचित्त असतो. ज्याप्रमाणें अंधकार दिवसा क्षीण होतो, त्याप्रमाणें सुखदुःखादि द्वंद्वे त्याची भेट होतांच नामशेष होतात व शरत्कालच्या मेघांप्रमाणें त्याच्या ठिकाणचे गुण शुद्ध होतात. कळकाच्या बेटांतल्या कळकांच्या भोंकांतून जोरानें वहाणाऱ्या वायूमुळें स्वाभाविकपणानें होणारा मंजुळ ध्वनि कानीं पडतांच अरण्यांतील पशू मोहित होऊन जातात आणि त्या आवाजाच्या दिशेने धावूं लागतात, तद्वत् सर्व लोक त्याच्या पवित्र आचारांवर आणि

---

१ विहितस्याननुष्ठानान्निन्दितस्य च सेवनात् । अनिग्रहाच्चेंद्रियाणां नरः पतनमृच्छति ॥ अर्थः– विहित कर्मांचें अनुष्ठान न करणें, निषिद्ध कर्माचरण करणें आणि इंद्रियांचा निग्रह न करणें, यांच्यामुळें मनुष्य पतन पावतो.

१ करींद्रजीमूतवराहशंखमत्स्याहिशुक्त्युद्भववेणुजानि । मुक्ताफलानि प्रथितानि लोके तेषां तु शुक्त्युद्भवमेव भूरि ॥ श्रेष्ठ हत्ती, मेघ, डुक्कर, शंख, मत्स्य, सर्प, शिंपा, वेळू, यांच्यापासून मोत्यें उत्पन्न होतात, अशी प्रसिद्धी आहे, परंतु विशेषतः तीं शिंपांपासूनच पैदा होतात.

२ अंगानि वेदाश्चत्वारो मीमांसा न्यायविस्तरः ।
धर्मशास्त्रं पुराणं च विद्या ह्येताश्चतुर्दश ।
आयुर्वेदो धनुर्वेदो गांधर्वश्चेति ते त्रयः ।
अर्थशास्त्रं चतुर्थं तु विद्या ह्यष्टादशैव तु ॥

षडंगांसहित चार वेद (१०), मीमांसा (११), न्याय (१२), धर्मशास्त्र (१३), पुराण (१४), आयुर्वेद (१५), धनुर्वेद (१६), गांधर्ववेद (१७) व अर्थशास्त्र (१८) मिळून विद्या अठरा मानल्या जातात.

मधुर स्वभावावर लुब्ध होऊन त्याच्या समागमाची निरंतर इच्छा करतात. ज्याप्रमाणें वर्षाऋतूतील जलपूर्ण मेघांना पाहून बगळ्या त्यांच्या मागोमाग धांवत सुटतात, त्याप्रमाणें मुक्त होण्यापूर्वीचा ज्याचा हा शेवटचाच जन्म आहे, अशा जीवन्मुक्ताच्या जन्माबरोबर सर्व श्रेष्ठ गुणसंपत्ती त्याच्याकडे निसर्गतःच धांवत जातात. अशा तऱ्हेचा गुणसंपन्न पुरुष सद्गुरूला शरण जातो आणि तोहि त्याला पावन अशा विवेकामध्यें नियुक्त करतो. नंतर विचार, वैराग्य आणि गुणशाली चित्त यांच्या योगानें तो आनंदैकरस आणि अनामय अशा आत्मदेवाला पहातो. प्रथम तो आपल्या शांत चित्तानें विचार करून आत्म्याचें अनुसंधान करूं लागतो. ज्यांचा हा अखेरचा जन्म असतो असे महागुणसंपन्न पुरुष आपल्या मनोरूपी मृगाला जागृत करून प्रथम त्रिगुणातीत अशा ब्रह्माच्या अनुसंधानामध्यें मनाची योजना करतात. असो. रामा ! अशा रीतीनें ज्या पुरुषांचा हा जन्म शेवटचा असतो, ते जीवन्मुक्तोच अनुपम सुख अनुभवीत असलेल्या गुणसंपन्न सद्गुरूला शरण जातात, यत्नानें त्यांची सेवा करून आणि त्यांनीं निर्दिष्ट केलेल्या युक्तीचा अवलंब करून आपल्या शुद्ध चित्तानें चित्तामध्यें वास करणाऱ्या रत्नाचें, अर्थात् प्रत्यगात्म्याचें अनुसंधान करतात व त्यामुळें ब्रह्माचा अपरोक्षसाक्षात्कार करून घेऊन अखेरीस परमपुरुषार्थरूपी उत्तम गतीप्रत जाऊन पोहोंचतात.

## सर्ग ७

—:*:—

१ कित्येक महाभाग्यवान् पुरुषांना अनायासानें ज्ञानप्राप्ति होते.

श्रीवसिष्ठः—राजीवलोचना रामा ! येथपर्यंत सर्व प्राण्यांचा सामान्य क्रम तुला सांगितला. आतां हा दुसरा विशेष क्रम सांगत आहें तो ऐक. या संसाराच्या धांगडधिंग्यामध्यें उत्पन्न झालेल्या देहधाऱ्यांच्या मोक्षप्राप्तीचे दोन उत्तम मार्ग आहेत. त्यांपैकीं एक मार्ग म्हटला म्हणजे गुरूपदिष्ट मार्गानें क्रमाक्रमानें जातां जातां एक किंवा अनेक जन्म घेऊन मुक्त होणें हा होय. यासंबंधाचें विवेचन मीं पूर्वी केलेंच आहे. दुसरा मार्ग म्हटला म्हणजे दैववशात् आकाशांतून खालीं फळ पडावें त्याप्रमाणें जीव आणि जगत् यांच्या संबंधांचा तत्त्वविचार अकस्मात् सुचून थोडा चित्तबोध होतांच अनायासें ज्ञानप्राप्ति होणें हा होय. आतां 'आकाशांतून अचानक फळ खालीं पडावें त्याप्रमाणें ज्ञानप्राप्ति होणें ही गोष्ट संभवेल तरी कशी ?' अशी शंका कदाचित् तुझ्या मनांत येईल. तरी या शंकेचा निरास करणारी जनकाची प्राचीन आख्यायिका मी तुला आतां सांगत आहे ती श्रवण कर; म्हणजे शुभाशुभ कर्मबंधापासून मुक्त असलेले चरमजन्मवान् महानुभव आकाशांतून अकस्मात् फळ पडावें त्याप्रमाणें आत्मज्ञान कसें संपादन करतात, तें तुला चांगलें कळून येईल.

## सर्ग ८

—:*:—

**जनकाख्यायिका.** १ वसंतऋतूमध्यें उपवनांत विहार करणारा जनक राजा सिद्धांनीं गाइलेले श्लोक ऐकतो.

श्रीवसिष्ठः—राघवा विदेह देशाचा जनक नांवाचा एक राजा होऊन गेला. तो आपत्तिरहित, दैवि संपत्तीनें युक्त, उदारबुद्धि, वीर्यवान्, याचक वृंदांचा कल्पवृक्ष, मित्ररूपी कमलांना विकसित करणारा सूर्य, बंधुरूपी पुष्पांना टवटवीत करणारा वसंत, स्त्रीजनांचा मदन, द्विजरूपी कैरवांचा म्हणजे चंद्रविकासी कमलांचा

चंद्र, शत्रुरूपी अंधकार नाहींसा करणारा भास्कर आणि सौजन्यरत्नांचा समुद्र असून भगवान् विष्णूप्रमाणें पृथ्वीचें पालन करीत असे. अशा तऱ्हेचा तो जनक राजा एके दिवशीं वसंतऋतूच्या आरंभीं बाललता प्रफुल्लित झाल्या आहेत, लतांवरील तांबूस रंगाच्या मंजरी शोभायमान होत आहेत आणि कोकिलांच्या मधुर ध्वनीबरोबर उन्मत्त वसंत जणुं काय नृत्य करीत आहे, अशा स्थितींत, इंद्रानें आपल्या नंदनवनांत प्रवेश करावा त्याप्रमाणें, आपल्या रमणीय उपवनांत विहार करण्यासाठीं गेला. त्या ठिकाणीं अनेक पुष्पें धारण करणाऱ्या आणि विलासिनी स्त्रियांप्रमाणें हावभाव करणाऱ्या लतांची शोभा अवलोकन करीत आणि सुगंधि वायूचें सेवन करीत तो लीलेनें संचार करूं लागला. नंतर आपल्या अनुचरांना दूर रहाण्यास सांगून तो त्या रमणीय उद्यानांतील क्रीडापर्वतावरील लताकुंजामध्यें वायूच्या सुगंधित आणि मंद लहरींचा आस्वाद घेण्यासाठीं जाऊन बसला. त्या ठिकाणच्या रमणीय एकान्तांत बसून मनाची करमणूक करून घेत असतां तमाल वृक्षांच्या एका झाडींत अदृश्य असलेल्या सिद्धांनीं त्याच्यावर अनुग्रह करण्यासाठीं गाइलेल्या गीता त्याच्या कानीं पडल्या. सदरहू सिद्धगीता श्रुति, स्मृति, पुराणें आणि इतिहास यांच्या सारभूत असून त्या श्रवण करतांच आत्मसाक्षात्कार करून देण्यास समर्थ होत्या. कमलपत्राक्षा रामा ! गिरिकंदरांतील एकान्तवासांत रहाणाऱ्या सिद्धांनीं गाइलेल्या त्या गीता पुढीलप्रमाणें होत्या.—

## सिद्धगीता

**द्रष्टृदृश्यसमायोगात्प्रत्ययानन्दनिश्चयः ।**
**यस्तं स्वमात्मतत्त्वोत्थं निस्पन्दं समुपास्महे ॥ १ ॥**
**द्रष्टृदर्शनदृश्यानि त्यक्त्वा वासनया सह ।**
**दर्शनप्रथमाभासमात्मानं समुपास्महे ॥ २ ॥**
**द्वयोर्मध्यगतं नित्यमस्ति नास्तीति पक्षयोः ।**
**प्रकाशनं प्रकाश्यानामात्मानं समुपास्महे ॥ ३ ॥**
**यस्मिन्सर्वं यस्य सर्वं यतः सर्वं यस्मा इदम् ।**
**येन सर्वं यद्धि सर्वं तत्सत्यं समुपास्महे ॥ ४ ॥**
**आशिरस्कं हकारान्तमशेषाकारसंस्थितम् ।**
**अजस्रमुच्चरन्तं स्वं तमात्मानमुपास्महे ॥ ५ ॥**
**संत्यज्य हृद्गुहेशानं देवमन्यं प्रयान्ति ये ।**
**ते रत्नमभिवाञ्छन्ति त्यक्तहस्तस्थकौस्तुभाः ॥ ६ ॥**
**सर्वाशाः किल संत्यज्य फलमेतदवाप्यते ।**
**येनाशाविषवल्लीनां मूलमाला विलूयते ॥ ७ ॥**
**बुध्वाप्यत्यन्तवैरस्यं यः पदार्थेषु दुर्मतिः ।**
**बध्नाति भावनां भूयो नरो नासौ स गर्दभः ॥ ८ ॥**
**उत्थितानुत्थितानेतानिन्द्रियाहीन्पुनः पुनः ।**
**हन्याद्विवेकदण्डेन वज्रेणेव हरिर्गिरीन् ॥ ९ ॥**

**उपशमसुखमाहरेत्पवित्रं**
**शमवशतः शममेति साधुचेतः ।**
**प्रशमितमनसः स्वके स्वरूपे**
**भवति सुखे स्थितिरुत्तमा सुखाय ॥ १० ॥**

अर्थ:—द्रष्टा आणि दृश्य यांचा संयोग झाला असतां ( चित्तवृत्ति विषयाकार होऊन ) उत्पन्न होणारा आनंद हाच ज्याचा स्वभाव आहे, अशा आत्म्याचें परिशोधन केल्यामुळें आविर्भूत होणाऱ्या त्याच्या निरतिशयानंद स्वरूपाची आम्हीं विक्षेपरहित होऊन स्थिर चित्तानें उपासना करतों. द्रष्टा, दर्शन व दृश्य ( इत्यादि त्रिपुटी ) यांचा वासनेसह त्याग करून दर्शनादिकांच्याहि पूर्वीं सिद्ध असणाऱ्या (तुरियावस्थेंतील ) स्वयंप्रकाश आत्म्याची आम्हीं एकाग्रचित्तानें उपासना करतों. अस्तित्व आणि नास्तित्व अशा दोन्ही पक्षांमध्यें आणि त्यांना अधिष्ठानभूत असणारें, तसेंच भावाभावांचें प्रकाशन करणारें असें जें नित्य साक्षिभूत आत्मतत्त्व त्याची आम्हीं निश्चल अंतःकरणानें उपासना करतों. ज्याच्यामध्यें हें सर्व आहे ज्याचें हें सर्व आहे, ज्याच्यापासून हें सर्व आहे, ज्याच्याकरितां हें सर्व आहे, ज्याच्यामुळें हें सर्व आहे आणि जें हें सर्व आहे, ( सारांश,

जें सर्वाधिष्ठानभूत आणि सर्वात्मक आहे) अशा परमार्थसत्य प्रत्यगात्म्याचें आम्हीं तद्रूपत्वानें अनुसंधान करतों. अ हा वर्ण ज्यांत आदि आहे आणि ह हा वर्ण ज्याच्या अंतीं आहे, तसेंच ज्याच्यामध्यें वेदशास्त्रादि सर्व शब्दजाल आणि पंचमहाभूतात्मक जगत् स्थित आहे, अशा सर्वव्यापी आणि अखिल व्यवहारांत उच्चारल्या जाणाऱ्या अहंपदांतील उपाधीचा निरास करून अवशिष्ट रहाणाऱ्या प्रत्यगात्मतत्त्वाची आम्हीं निरंतर उपासना करतों. आपल्या हृदयरूपी गुहेचें[1] नियंतृत्व करणाऱ्या देवाला सोडून जे इतर देवांकडे धांव घेतात, ते आपल्या हातांतील कौस्तुभ मणी फेंकून देऊन अन्य रत्नांची इच्छा करतात, असेंच म्हटलें पाहिजे. सर्व आशांचा त्याग केला म्हणजे हें हृदयस्थ ब्रह्मरूपी फल प्राप्त होतें, अर्थात् त्याचें ज्ञान होतें; व त्यामुळें उलट आशारूपी विषवल्लीचीं, वासनारूपी बद्धमूल झालेलीं, पाळेंमुळें खणून काढतां येतात. विषयांचा उपभोग घेतल्यानंतर भोग्य विषयांसंबंधानें अत्यंत विरसता उत्पन्न होते, याचा प्रत्यक्ष अनुभव येत असूनहि जो मूढ भोग्य विषयांमध्यें पुनःपुन्हां आसक्त होतो, तो मनुष्य नसून गर्दभच आहे असें खुशाल समजावें! इंद्र आपल्या वज्रानें पर्वतांचें चूर्ण करून टाकतो, त्याप्रमाणें इंद्रियरूपी सर्पांनीं आपलीं डोकीं वर उचललीं असोत किंवा नसोत, तीं विवेकरूपी दंडानें पुनःपुन्हां फोडून टाकावीं. उपशम हेंच खरें पवित्र सुख असल्यामुळें त्याचेंच नेहमीं संपादन करीत जावें. बाह्य व आंतर इंद्रियव्यापारांचा उपशम होणें यालाच उपशम असें नांव दिलें जातें. अशा तऱ्हेच्या उपशमापासून उत्पन्न होणारें सुख विषयसुखाप्रमाणें दोषमुक्त नाहीं, तरी तें चित्तप्रसादाला कारणीभूत होत असल्यामुळें अत्यंत पवित्र होय. इंधनें संपल्यानंतर अग्नि आपोआप शांत होतो, त्याप्रमाणें शमाच्या योगानें चित्त शांत होतें व अशा रीतीनें शांत झालेलें चित्त क्रमाक्रमानें सप्त भूमिकांचें आक्रमण करून आपल्या परमार्थरूपामध्यें विदेहकैवल्यस्थिति प्राप्त होईपर्यंत निरतिशयानंदाचा अनुभव घेत स्थिर असतें.

[1] अङ्गुष्ठमात्रः पुरुषोऽन्तरात्मा सदा जनानां हृदये संनिविष्टः। (श्वेताश्वतरोपनिषद्. ३।१३)
अङ्गुष्ठमात्रः पुरुषो ज्योतिरिवाधूमकः ईशानो भूतभव्यस्य स एवाद्य स उ श्वः।
(कठोपनिषद्. २।४।१३.)

---

# सर्ग ९

१. सिध्दगीता ऐकतांच उद्विग्न झालेला जनक राजा राजवाड्यांत जातो. २. सर्व पुरुषार्थांचें मूळ मन आहे, असा, विचारानें तो निर्णय करतो.

श्रीवसिष्ठः--रामा! याप्रमाणें सिद्धगणांच्या मुखांतून निघालेल्या गीता ऐकतांच, रणवाद्यांचा भयंकर गर्जना होतांच, एखादा भित्रा मनुष्य चिंताक्रांत होतो त्याप्रमाणें, जनक राजा अगदीं खिन्न झाला. लगेंच आपला परिवार बरोबर घेऊन त्यानें आपल्या राजधानीकडे प्रयाण केलें. एखाद्या नदीचा प्रचंड ओघ तीरावरील वृक्षांना आपल्या मागोमाग ओढून घेत घेत मोठ्या वेगानें समुद्राकडे धांव घेत असतो, तद्वत् जनक राजा मोठ्या त्वरेनें राजवाड्याकडे चालला होता. राजवाड्यांत प्रवेश करतांच आपल्या बरोबरच्या सर्व मंडळींना आपापल्या घरीं जाण्यास सांगून उदयाचलावर सूर्य एकटाच आरूढ होतो त्याप्रमाणें, तो आपल्या प्रासादशिखरावरील सौधावर एकटाच जाऊन बसला. त्या ठिकाणीं एकान्तात बसला

असतां वरील आकाशांत उडणाऱ्या पक्ष्यांच्या पंखांच्या मुळांशीं असणाऱ्या लहान पिसां-प्रमाणें या जगांतील लोकगती अत्यंत चंचल आहेत, असें मनांत येऊन तो येणेंप्रमाणें विलाप करूं लागला:—“ शिव शिव ! जन्म, जरा, भय, मरण इत्यादिकांच्या योगानें अत्यंत चंचल आणि कष्टप्रद असलेल्या जीवांच्या ह्या दशांमध्यें, एखाद्या दगडांच्या राशींत दगड जाऊन पडावे त्याप्रमाणें, मीं लोळत पडावें ना ! माझें जीवित म्हणजे अमर्याद कालाचा अगदीं अल्प असा एक भाग आहे. अशा या क्षुद्र जीवितावर विसंबून रहाणाऱ्या मला धिक्कार असो ! वास्तविक विचार केला तर माझें हें राज्य तरी केवढेंसें आहे ? आणि त्याचाहि उपभोग मी जिवंत असेपर्यंतच घेणार. परंतु असल्या टीचभर जमिनीच्या तुकड्यावरच संतुष्ट राहून आणि त्याच्या उपभोगांत दंग होऊन भावी दुःखांच्या प्रतीकाराचा विचार मनांत न आणतां एखाद्या मूढाप्रमाणें मी स्वस्थ पडलों आहें, याला म्हणावें तरी काय ! देहा-लाच आत्मा मानून देहनाशाबरोबर सर्व दुःखांचा नाश होतो, असें म्हणणारे खुशाल पाहिजे तें बरळोत; परंतु ही गोष्ट उघड आहे कीं, कामकर्मवासनाबीजावांचून भोगवैचित्र्याला कारणीभूत होणारा जन्मच संभवत नाहीं. शिवाय देहालाच आत्मा मानूं लागल्यास विधि-निषेधरूपी कर्मकांड आणि मोक्षशास्त्रहि व्यर्थ ठरूं लागेल. तस्मात् देह म्हणजे आत्मा नव्हे. आतां मधल्या स्थितीमध्यें जरी हें क्षुद्र जीवित दिसतें, तरी वेदान्तशास्त्रदृष्टचा माझें, अर्थात् आत्म्याचें स्वरूप अनादि आणि अनंत आहे. अशा स्थितींत आरशांतील चांदोबाला खरा चंद्र म्हणून समजणाऱ्या बालकाप्रमाणें या जड देहा-लाच आत्मा समजून मी त्याच्यावर विसंबून रहातों, हा माझा मूर्खपणा नाहीं का ? हाय हाय ! प्रपंचांतून मुक्त झालेल्या कोणत्या जादू-गारानें माझ्यावर भुरळ घालून मला मोहित केलें आहे बरें ? या जगांत सत्य, सुखैकरूप, अपरिच्छिन्न आणि अकृत्रिम अशी एकहि वस्तु नाहीं, असें असतां मीं कोणत्या वस्तूवर भरंवसा ठेवून दिवस कंठावे ? बरें जिच्यावर निष्ठा ठेवून मला रहातां येईल अशी वस्तु एखाद्या दूरच्या प्रदेशांत असेल असें म्हणावें, तर तीहि कल्पना संभवत नाहीं. कारण, सर्व जग माझ्या मनांत आहे. माझें मन देहांतून बाहेर कोठेंहि न जातां त्याला सर्व बाह्य पदार्थांचा अनुभव आंतच येतो. यास्तव दूरस्थ कल्पना हा केवळ भास आहे, ती खरी नव्हे, असा निश्चय करून मी आतां बाह्य विषयांची भाव-नाच सोडून देतों. तसेंच द्रव्यार्जनादि भोग-साधनें प्राप्त करून घेण्यासंबंधानें लोकांची एकसारखी चाललेली धडपड पाण्यांतील भोंव-ऱ्यांप्रमाणें क्षणभंगुर असून तिचा परिणाम जन्ममरणादि दुःखांत होतो. असा मला अनेक वेळां अनुभव येत असूनहि विषयसुखाबद्दल आस्था बाळगण्यांत काय अर्थ आहे ? प्रतिवर्षी, प्रतिमासीं, प्रतिदिवशीं, किंबहुना प्रतिक्षणीं जीवांना संसारांत निवळ दुःखें किंवा दुःख-मिश्रित सुखें वारंवार प्राप्त होतात. या संसा-रांत आतां दृष्टीस पडणारी वस्तु पहातां पहातांच नष्ट होते. माझ्या राज्याचीहि गति अशीच क्षणभंगुर असल्यामुळें त्याच्याबद्दल लोभ धरण्यांत काय बरें अर्थ आहे ? माझ्या क्षुद्र राज्याची गोष्ट राहोच, परंतु इंद्र, प्रजापति वगैरे श्रेष्ठ देवांचें वैभव तरी विचारान्तीं शाश्वत आहे किंवा त्यांत आत्यंतिक सुख आहे, असें तरी म्हणतां येईल का ? अर्थात् नाहीं. यास्तव विवेकी पुरुष असल्या श्रेष्ठ पदाचीहि पर्वा करीत नाहींत. आज जे मनुष्य वैभवाच्या शिखरावर आरूढ झालेले दिसतात, तेच उद्यां

पहावें तों धुळीस मिळालेले दिसतात. अशा स्थितीत चित्ताला नीच स्थितीप्रत नेऊन पोहों-चविणाऱ्या वैभवावर विश्वास कोण ठेवणार ? हर हर ! हा काय चमत्कार आहे कीं, मी दोरीवांचून बांधला गेलों आहें, चिखलावांचून मलिन झालों आहे, आणि उच्च स्थानीं स्थित असतांहि अधोगतीस गेलों आहें ! हायरे आत्म्या ! माझी सर्व सुस्थिति अजिबात ढांस-ळून गेली आहे, मी मोठा बुद्धिवान् असूनहि, सूर्यासमोर एखादा काळाकुट्ट ढग येऊन सर्वत्र निबिड अंधकार पडावा त्याप्रमाणें, माझ्या बुद्धीपुढें अकस्मात् मोहरूपी मेघ येऊन त्यामुळें माझ्या बुद्धीचा प्रभाव असा कुंठित काय म्हणून व्हावा ? हे महाभोग, तसेंच हे बांधव वास्तविक माझे कोण ? पिशाचाच्या कल्पनेमुळें एखादें मूल भिऊन जातें, त्याप्रमाणें ममत्वाच्या भल-त्याच कल्पनेला बळी पडून मी व्याकुल झालों आहे. जरा आणि मरण यांची जणुं प्रियसखी आणि उद्वेग उत्पन्न करणारी अशी ही भोगा-दिकांची आस्था मी आपण होऊनच आपल्या उराशीं काय म्हणून बाळगली आहे ? ही भोग-बांधवादिकांची संपत्ति आज नष्ट होवो, कालां-तरानें नष्ट होवो, किंवा युगांच्या युगें कायम राहो, तिच्याशीं मला काय करावयाचें आहे ? कारण, हा सर्व संपत्तीचा देखावा पाण्यावरील बुडबुड्यांप्रमाणें मिथ्याच उत्पन्न झालेला आहे, हें मी पक्कें जाणून आहें. ते महावैभवशाली ( पृथुमरुत्तादि ) प्राचीन चक्रवर्ती राजे, त्यांची अलोट संपत्ति, त्यांचे भोग, त्यांचे सद्-गुण, त्यांचे प्रेमळ बांधव वगैरे सर्व नामशेष झाले. तर मग वर्तमानकाळीं भासमान होणाऱ्या वस्तूंवर तरी मीं कसा विश्वास ठेवावा ? आज-पर्यंत गेलेल्या वैभवशाली राजाची संपत्ति तरी आज शिल्लक आहे का ? छे ! ती कोठें पार निघून गेली. पूर्वीच्या हिरण्यगर्भाचीं भुवनें तरी आज जाग्यावर आहेत का ? छे ! त्यांचा आतां मागमूसहि नाहींसा झाला आहे. अशी जर वस्तुस्थिति आहे, तर मग मी तरी या जगांतील कोणत्या पदार्थावर अवलंबून रहावें ? आजप-र्यंत झालेले लक्षावधि इंद्र सुद्धां जर पाण्याव-रील बुडबुड्यांप्रमाणें अनंत काळाच्या पोटांत गडप झाले आहेत, तर मग माझी ती कथा काय ? हें सर्व मला माहीत असतांहि मी आ-पल्या जीविताबद्दल आस्था बाळगतों, हें पाहून सत्पुरूष मला हंसतील, यात शंका नाहीं. आजपर्यंत कोट्यवधि ब्रह्मदेव होऊन गेले, सृष्टीच्या अनेक परंपरा नाहींशा झाल्या आणि हजारों राजे धुळीच्या कणासारखे उधळून नष्ट झाले, तेथें माझ्या क्षुद्र जीविताची कथा काय? संसाररूपी रात्रींत दिसणाऱ्या दुःस्वप्नांतील मिथ्या देह आणि त्यांतील अहंममतादि व्यवहार-भ्रम यांच्यावर विश्वास ठेवून बसणाऱ्या माझ्या अविवेकाला धिक्कार असो ! 'हा देह म्हणजेच आत्मा ' ही कल्पना व्यर्थ आहे. कारण ती मिथ्या आहे. मग मी एखाद्या अज्ञ मनुष्या-सारखा या अहंकारपिशाचाच्या तावडींत कसा सांपडलों आहें ? क्षण, लव, मुहुर्त इत्यादि सूक्ष्म काललेखा माझें आयुष्य एकसारखें कमी कमी करीत आहेत, हें दिसत असूनहि मी त्याच्या-कडे कानाडोळा करतों, याला काय म्हणावें ! एखाद्या आसनावर मूर्ती करून बसवाव्या, त्या-प्रमाणें सर्व भुवनांमधून ब्रम्हदेवादिकांच्या मूर्ती ज्यांनीं स्थापित केल्या आणि युद्धादि प्रसंगां-मध्यें विष्णु आदिकरून देवांना ज्यांनीं खेळ-ण्याच्या चेंडूप्रमाणें भराभर आकाशांत उडवून दिलें, अशा कपालवेषधारी रुद्रांना सुद्धां जर महाकालानें ग्रस्त केलें, तर हे जीविताशे ! तूं माझ्यापुढें कशाला नाचतेस ? हे दिवस एका-मागून एक येत आहेत आणि जात आहेत; पण नित्य, निर्दोष आणि आनन्दैकरस अशी

सद्वस्तु दाखविणारा एकहि शुभ दिवस मला आजपर्यंत उगवलेला दिसला नाहीं. सरोवरांत ज्याप्रमाणें सारस पक्षी क्रीडा करतात त्याप्रमाणें सर्वांच्या अंतःकरणांत भोगदृष्टी स्फुरण पावतात, परंतु आत्मसाक्षात्कारदृष्टी स्फुरण पावत नाहींत. अरेरे! कष्ट सोसण्याचा कळस झाला, दुःखें भोगण्याचाही कडेलोट झाला. तरी मला अजून विषयांबद्दल वैराग्य उत्पन्न होऊं नये ना? रागलोभादि विकारांमुळें दूषित झालेल्या आशेला बाळगणाऱ्या मला खरोखर धिक्कार असो! आजपर्यंत ज्या ज्या रमणीय विषयांवर मीं अत्यंत प्रेम केलें, ते ते सर्व विषय नष्ट झाले, असें मला प्रत्यक्ष दिसून आलें आहे. तेव्हां या जगांत प्रीति करण्यासारखें उत्तम. अर्थात् चिरस्थायी असें काय आहे? कांहीं गोष्टी (उ०वय) मध्यावस्थेंत रमणीय असतात. कांहीं अखेर (उ० धर्म), आणि कांहीं तेवढ्या पुरत्या भोगकाळीं (उ० विषय) रमणीय असतात; परंतु हें सर्व रमणीयत्व विनाशरूपी नरकानें दूषित झालेलें असल्यामुळें अपवित्र होय. मनुष्य ज्या ज्या पदार्थांवर प्रेम करतो, ते ते पदार्थ नष्ट होत असल्यामुळें त्याला त्यांपासून दुःख मात्र होतें. अज्ञ मनुष्याला त्याच्या उत्तर वयांत देखील सुखाची आशा नाहीं. कारण, तो उत्तरोत्तर रागलोभादिकांच्या अभिवृद्धीमुळें अधिक पापी होतो, हिंसादि प्रवृत्तीमुळें जास्त क्रूर होत जातो आणि आपल्या कृतीचीं फळें मिळूं लागलीं म्हणजे दिवसेंदिवस त्याचा खेद वाढत जातो. बाल्यावस्थेंत अज्ञानांत गुरफटलेला, तारुण्यांत मदनानें भ्रमलेला आणि वृद्धापकाळीं कुटुंबपोषणाच्या चिंतेनें झुरणीस लागलेला मूढ पुरुष आत्मोद्धारासाठीं केव्हां आणि कसे प्रयत्न करणार बरें? ज्याचा आदि आणि अंत असत्, जो भोगकाळींहि विरस, जो दारिद्य, रोग, वार्धक्य वगैरे दशांनीं दूषित, असा हा असार संसार ज्याअर्थी सारभूत आहे, अशी अज्ञ मनुष्याची भावना होते, त्याअर्थी तो डोळे असून आंधळा आहे, असेंच सिद्ध होत नाहीं का?

आतां या ठिकाणीं कदाचित् कोणी असें म्हणेल कीं, 'अज्ञ आणि दुष्कर्मरत पुरुषांना सुखप्राप्ति होत नाहीं, हें म्हणणें योग्य आहे, परंतु राजसूय, अश्वमेध, इत्यादि शेंकडों यज्ञयाग करणाराला स्वर्गसुख प्राप्त होत नाहीं का?' पण याचें उत्तर हेंच आहे कीं, यज्ञापासून स्वर्गप्राप्ति होते, हें म्हणणें बरोबर आहे. परंतु ती सुखाची स्थिति सुद्धां फार दिवस टिकणारी नाहीं. स्वर्गसुख हें फार फार झालें तर महाकल्पपर्यंत टिकेल. परंतु हा कालहि महाकालाच्या दृष्टीनें अत्यंत अल्प असाच भाग आहे. अर्थात्, स्वर्गसुख हें अनित्यत्वामुळें असारच ठरतें. शिवाय स्वर्गांतील देवांनाहि असुरांकडून पीडा होते, हें प्रसिद्धच आहे. स्वर्ग, मृत्यु व पाताळ यामध्यें असा कोणता प्रदेश आहे कीं, त्या ठिकाणीं दुष्ट भ्रमरींप्रमाणें आपत्ती मनुष्याला त्रास देण्याला टपून बसलेल्या नाहींत? जोंपर्यंत मनुष्याच्या ठिकाणीं देहाभिमान आहे, तोंपर्यंत चित्तरूपी बिळामध्यें असलेले आधिरूपी सर्प आणि शरीररूपी घरामध्यें असलेल्या व्याधिरूपी पाली यांच्यापासून त्याला आपलें निवारण कसें बरें करून घेतां येईल? वर्तमानकालीं दिसणाऱ्या सर्व पदार्थांच्या बोडवयावर नाश बसलेला आहे, रम्य पदार्थांच्या बोकांडीं अरम्यता ठेवलेली आहे आणि सुखाच्या मागें दुःखाचा ससेमिरा लागलेला आहे! अशा स्थितींत मीं कोणत्या वस्तूचा आश्रय करूं? एकसारख्या उत्पन्न होऊन मरणाऱ्या क्षुद्र प्राकृत जीवांनीं ही पृथ्वी खचून भरलेली असून या जगांत खरे साधू दुर्लभच आहेत! ज्यांचे नेत्र नीलकमलांप्रमाणें

मनोहर आहेत आणि ज्या परम प्रेमाला पात्र आहेत, अशा विलासिनी स्त्रिया क्षणांत नष्ट होणाऱ्या असल्यामुळें उपहासास्पदच ठरतात. आतां माझ्या राजवैभवावर आणि राजसत्तेवर मीं अवलंबून रहावें, तर आपल्या नेत्रांच्या निमेषोन्मेषाबरोबर जगाचा उदयास्त करणारे, अर्थात् अलौकिक सामर्थ्यसंपन्न असेहि कांहीं पुरूष या जगांत आहेत, तेथें माझ्यासारख्या क्षुद्राची गणना काय करावयाची आहे? रम्याहून रम्य आणि स्थिराहून स्थिर असे पदार्थ या सृष्टींत आहेत; परंतु त्यांची प्राप्ति, रक्षण आणि वियोग यांच्या बाबतींत जो अनुभव येतो, त्याच्याकडे पाहिलें असतां त्यांचें पर्यवसान चिंतेमध्येंच होतें, असें म्हणावें लागतें. अशा स्थितींत बा मना! जगांतील नश्वर आणि दुःखपर्यवसायी पदार्थांची आसक्ति कशाला धरतोस? हत्ती, घोडे, रत्नें, धन, स्त्रिया इत्यादि नानाविध संपत्तीवर मनानें आसक्त होणें म्हणजे मोठाल्या आपत्तींना निमंत्रण करण्यासारखेंच आहे असें मी समजतों. कारण संपत्ति प्राप्त करून घेतांना आणि तिचें रक्षण करतांना कष्ट आहेत आणि शेवटीं तिचा नाश झाला म्हणजे तर त्या दुःखाला पारावारच नाहीं. आतां दारिद्र्य, बंधुनाश, राज्यादिकांचा नाश वगैरे आपत्ती या जगांत सत्संग, तीर्थाटन, तप, ज्ञान इत्यादिकांना कारणीभूत होणाऱ्या असल्यामुळें श्रेयस्करच आहेत असें मानूं लागलें आणि त्या आपत्तींपासून वैराग्यादिकांची उत्पत्ति होऊं लागली, तर त्या आपत्ती म्हणजे संपत्तीच आहेत, असें मानण्याला काय हरकत आहे? समुद्रांत पडलेल्या चंद्राच्या प्रतिबिंबाप्रमाणें अस्थिर आणि असत्य अशा या मनोमात्र जगाच्या ठिकाणीं 'हें माझें' ही अक्षरमालिकाच निरर्थक आहे. तात्पर्य, या मिथ्या जगाच्या ठिकाणीं आसक्ति वाढविणें—ममत्व करणें हीच आपत्ति आणि विवेकानें तिचा क्षय करणें हीच संपत्ति होय. हें जग काकतालीय न्यायानें अकस्मात् उत्पन्न झालें आहे; परंतु या भोगलंपट मनानें त्यांतील कांहीं पदार्थ ग्राह्य आणि कांहीं त्याज्य अशी खोटीच कल्पना केली आहे. अग्नीच्या ज्वालेवर पतंगानें आसक्त व्हावें, त्याप्रमाणे देशकालादिकांनीं परिच्छिन्न आणि त्रिविधतापांनीं ग्रस्त असल्यामुळें तप्त अशा ह्या सुखनामक ऐहिक अनुभवांवर मी कसा अनुरक्त झालो आहें पहा! रौरवादि नरकांत दुःख असतें हें खरें; पण एका दृष्टीनें ते संसारांतील दुःखांपेक्षां बरें. कारण, नरकांतील दुःख एकदां आंगवळणीं पडलें म्हणजे त्या दुःखाची तीव्रता तितकी भासत नाहीं. परंतु संसारांतील दुःखें सुखाभासमिश्रित असल्यामुळें अत्यंत दुःसह होतात. संसार म्हणजे दुःखांची पराकाष्ठा असें सत्पुरूष सांगतात. तेव्हां अशा संसारांत पडलेल्या देहामध्यें सुखप्राप्ति कोठून होणार? पण काय चमत्कार आहे पहा कीं, संसाररूपी स्वाभाविक महादुःखांत पडलेल्या जीवांना त्यांतील सामान्य दुःखें तुलनेनें मोठीं सुखेंच वाटतात! तरवारीच्या वारापुढें चाबकाचा मार सुखकर भासावा, अशांतलाच हा प्रकार होय. कोणी अधम असो कीं उत्कृष्ट असो, या सर्वांकडे काष्ठ किंवा लोष्ठ यांच्याप्रमाणें समदृष्टीनें पहाणारा अर्थात् श्रुतिस्मृतिप्रमाणकुशल, बुद्धिवान् आणि मोठा विवेकपटु असा मी शास्त्रावलोकनशून्य अशा अज्ञजनांप्रमाणें वागतों, याला काय म्हणावें? ज्याला संकल्परूपी हजारों अंकुर फुटलेले आहेत, देहभुवनादि शाखांच्या योगानें जो विराट्स्वरूपी बनलेला आहे, तसेंच जो सुखदुःखरूपी फळें आणि रागलोभादि पल्लव यांच्यामुळें सुशोभित झालेला आहे, अशा या संसारवृक्षाचा पहिला अंकुर होय. यास्तव प्रथम या संकल्पाचाच

क्षय केला म्हणजे संसारवृक्ष आपोआप सुकून जाईल. तरी आतां असेंच केलें पाहिजे. केवळ दिसण्यांत मात्र रम्य आणि माकडाप्रमाणें चंचल अशा मनाच्या वृत्ती मीं पक्क्या ओळखल्या आहेत. यासाठीं असल्या नाशिवंत वृत्तींमध्यें मी आजपासून कधींहि रममाण होणार नाहीं. शेंकडों आशापाशांनीं भरलेल्या आणि उत्कर्षापकर्षांच्या योगानें दुःखदायक होणाऱ्या अशा हजारों संसारगती मी आजपावेतों अनेकवेळां भोगल्या आहेत, यास्तव मी आतां कायमची विश्रांति घेणार. 'हाय हाय ! मी मेलों,' 'माझा सर्वस्वी नाश झाला,' 'मी साफ बुडालों' अशा रीतीनें मीं पुर्वी पुनःपुन्हां शोक केला तेवढा पुरे झाला. आतां यापुढें मी कधीं शोक म्हणून करणार नाहीं. कारण मी आतां चांगला जागा झालों आहे; माझ्या नेत्रांत आतां उत्तम अंजन पडलें आहे; व माझें परमार्थरूपी द्रव्य हरण करणारा चोर सांपडल्यामुळें मला मोठा आनंद झाला आहे. या मन नांवाच्या चोराला मीं पुरापूर ओळखलें आहे. यानें माझें नुसतें आत्मधनच चोरलें होतें असें नाहीं. तर यानें मला किती तरी दिवस छळलें असल्यामुळे हा माझा हाडवैरी आहे. यास्तव याला आतां कडक शासन केलें पाहिजे; याला आतां ठारच केलें पाहिजे ! आजतागायत हें मनोरूपी मोतीं अविध्द होतें; पण मी त्याला आतां भोंक पाडलें आहे. तरी यापुढें मी त्याला शमदमरूपी दोरीमध्यें ओंवून टाकणार. हा मनोरूपी जलबिंदु विवेकसूर्याच्या तापानें अनादिब्रह्मस्वरूपी वायूमध्यें कायमचा मिसळून जाण्याकरितां लवकरच लय पावेल. मला त्या निरनिराळ्या सिध्दांनीं उत्तम उपदेश केला आहे. तरी परमानंद प्राप्त करून देणाऱ्या आत्मतत्त्वाचेंच मी आजपासून अनुसंधान करणार. आत्म्याच्या एकान्तांत बसून मी सर्व प्रकारच्या आशांना कायमची रजा देईन आणि हिमालय पर्वतावरील शरदृतूमधील मेघाप्रमाणें स्वच्छ असलेल्या आत्ममण्याला पहात आणि त्याचेंच अनुपम सुख अनुभवीत स्वस्थ बसेन. 'हा देह म्हणजेच मी,' 'धन, राज्य वगैरे वैभव माझें आहे' इत्यादि मिथ्या कल्पना झुगारून देऊन—ज्ञानबलानें त्यांचें मनांतून उच्चाटन करून समाधीच्या अभ्यासानें मी मनोरूपी बलिष्ठ शत्रूला ठार मारीन तेव्हांच शांत होईन. हें सर्व करण्याला विवेकाचें अवश्य पाठबळ पाहिजे. यास्तव बा विवेका ! मी तुला नमस्कार करीत आहें."

## सर्ग १०

—:❋:—

१. मध्यान्हकाळचे नित्यविधी करण्याविषयीं प्रतीहारीची प्रार्थना. २. जनकराजाची स्तब्धता आणि त्याचे विचार.

**श्रीवसिष्ठः**—रामा ! अशा रीतीनें जनक राजा एकान्तांत विचार करीत बसला असतां सूर्याच्या रथापुढें अरुण यावा त्याप्रमाणें, त्याचा प्रतीहारी ( द्वारपाल ) त्याच्यापुढें येऊन उभा राहिला व नम्रतापूर्वक म्हणालाः—"महाराज ! आपल्या बाहुरूपी स्तंभांनीं आपण सर्व पृथ्वीचा भार धारण केला आहे. यास्तव उठा आणि आपल्या राजत्वाला अनुरूप अशा सर्व दिनक्रिया करा. प्रभो ! पुष्पें, कापूर व केशर यांच्या योगानें सुवासित केलेल्या उदकाच्या घागरी भरून घेऊन ह्या पहा सुंदर स्त्रिया स्नानागारांत साक्षात् नद्यांप्रमाणें उभ्या आहेत. स्नान करावयाच्या सरोवराच्या तीरावर कमलिनींच्या पाशांच्या योगानें तयार केलेल्या नाजूक वस्त्रांचें आच्छादन घालून मंडप तयार केले आहेत; व त्या मंडपांवरील निरनिराळ्या

रंगांचीं कमलयुक्त बिसतंतूंचीं जाळीं पाहून हें कमलवनच आहे, अशा समजुतीनें त्यांच्या भोंवतीं हे भ्रमरांचे संघच्या संघ सारखे भ्रमण करीत आहेत. स्नानोत्तरकालीं आवश्यक असणाऱ्या छत्र, चामर, रथ, अश्व, हत्ती इत्यादि सर्व वस्तू त्या कमलें असलेल्या सरोवराच्या काठांवर परिपूर्ण आहेत. त्याचप्रमाणें देवगृहांत पूजेचीं सर्व तयारी झाली आहे. तसेंच त्या ठिकाणीं नानाविध पुष्पें. दुर्वा आणि नैवेद्याचीं षड्रस अन्नें यांची सेवकांनीं तयारी करून ठेविली आहे. दक्षिणा देण्याला योग्य असलेले विद्वान् ब्राह्मणांचे थवेच्या थवे आपण स्नान, जप व अघमर्षणविधि आटोपून केव्हां एकदांचे येतां, म्हणून देवपूजागृहामध्यें मार्गप्रतीक्षा करीत बसले आहेत. महाराज ! भोजनगृहांतहि सर्व तयारी झाली असून हातांत चामरें धारण करणाऱ्या सुंदर स्त्रिया चंदनाचा सडा घालून शीतल केलेल्या भोजनागारांत आपली वाट पहात आहेत. म्हणून म्हणतों कीं, महाराज ! लवकर उठा आणि आपलें नियत कार्य करा. कारण, **महात्मे आपल्या कर्तव्यकर्माविषयीं केव्हांहि कालातिक्रम होऊं देत नाहींत.** ”

राघवा ! अशा रीतीनं त्या प्रतीहारीनें **जनक**राजाजवळ जाऊन भाषण केलें, तरीहि संसाराच्या विचित्र गतीसंबंधानें चाललेलें त्याचें चिंतन तसेंच चालू होतें. तो आपल्याशीं म्हणाला:—“ हें माझें राज्य तें काय आणि त्यांत सुख तें कसलें ? या क्षणभंगुर राज्याची मला बिलकुल गरज नाहीं, हें सर्व गौडबंगाल झुगारून देऊन मी आतां एकान्तांत समुद्रासारखा शांत बसणार. हे मिथ्या भोग आतां बस्स झाले, व ही कर्मकटकट आतां पुरे झाली ! हें सर्व सोडून देऊन केवळ आत्मसुखाचा अनुभव घेत मी आतां स्वस्थ बसतों. बा चित्ता ! जन्म, जरा, जाड्य इत्यादि दुःखांची निवृत्ति होण्याकरितां तूं विषयोपभोगांतून तरी थोडें सुख मिळविण्यांचें आपलें चातुर्य सोड. विषयाभिलाष, त्यांच्या प्राप्तीचा प्रयत्न, त्यांचा उपभोग, त्यांचे वारंवार स्मरण इत्यादि दशांमध्यें जेथें जेथें सुखाचा लवलेश आहे असा तुला भ्रम होईल, तेथें तेथें त्यापासून तुला अखेरीस निःसंशय दुःख होईल. झाडून साऱ्या भोगभूमीमध्यें कितीहि दिवस चित्ताला पुनःपुन्हां फिरवीत ठेवलें, किंवा शास्त्रादिकांची भीति दाखवून त्याला भोगनिवृत्त करण्यासाठीं कितीहि खटपट केली, तरी त्याची तृप्ति म्हणून कधीं होत नाहीं. यास्तव हे नीच चित्ता ! ही तुच्छ भोगवासना आतां पुरे झाली. ज्याच्याकडे आपली वृत्ति वळविल्यानें तुला अकृत्रिम आनंदाचा लाभ होईल, अशा वस्तूच्या मागें आतां तरी लाग. ” येणेंप्रमाणें चिंतन करून **जनक** राजा स्वस्थ बसला. त्याचें चंचल मन शांत झाल्यामुळें तो यावेळीं चित्राप्रमाणें निश्चल दिसूं लागला. परंतु राजेलोकांच्या मनाप्रमाणें वागण्यांत आणि चित्तांत काय आहे तें ओळखण्यांत कुशल असलेला तो प्रतीहारीहि **जनक** राजाची ती स्थिति पाहून भय आणि गौरव यांचा मनावर पगडा बसल्यामुळें काहीं एक बोलला नाहीं.

अशा स्थितींत थोडा वेळ गेला असेल नसेल तोंच **जनक** राजा पुन्हां शांत मनानें जनजीवितासंबंधानें विचार करूं लागला. तो म्हणाला:—“ या सृष्टींत कोणती ग्राह्य वस्तु आहे कीं, जी मीं प्रयत्नानें संपादन करावी ? या जगांतील कोणत्या अविनाशी वस्तूवर विसंबून मीं आपला कालक्षेप करावा बरें ? मी क्रियापर झालों किंवा निष्क्रिय झालों, तरी त्यापासून कोणती लाभहानि होणार आहे ? कारण, या जगांत जें जें उत्पन्न झालें आहे

त्यात नाशरहित असें मला कांहींच दिसत नाहीं. हा माझा देह मिथ्या असल्यामुळें तो क्रियावान् असो कीं अक्रिय असो, त्यामुळें माझ्या सम आणि शुद्ध चैतन्याची हानि ती काय होणार ? मी अप्राप्त वस्तूची इच्छा करीत नाहीं आणि प्राप्त वस्तूचा त्यागहि करीत नाहीं; तर प्रारब्धप्राप्त व्यवहार करून आपल्या स्वरूपांत स्वस्थ रहातों. कर्म करून मला कांहीं प्राप्त करून घ्यावयाचें, किंवा अक्रिय राहूनहि मला कांहीं साध्य करून घ्यावयाचें आहे, अशांतला भाग नाहीं. कारण, कर्म करण्यानें किंवा न करण्यानें जें काय प्राप्त होणार तें मिथ्याच आहे. एवंच, शास्त्रविहित किंवा लौकिक क्रिया मीं केल्या किंवा न केल्या, तरी त्यापासून मला कांहीं प्राप्त करून घ्यावयाचें नाहीं व त्यांत माझ्या दृष्टीनें कांहीं ग्राह्य उरलेलें नाहीं, यास्तव हा माझा देह उठून पूर्वीप्रमाणें क्रमप्राप्त व्यवहार करीना का ? कारण, या देहाची यत्किंचितहि हालचाल झाली नाहीं, तर तो सुकून जाईल. परंतु त्यांत काय अर्थ आहे ? मन निष्काम, सम आणि आसक्तिरहित असलें म्हणजे मग प्रारब्धानुसार शरीराच्या अवयवांची हालचाल झाली किंवा न झाली, तरी त्यामुळें पापपुण्याचा उदय होण्याची शक्यता न राहिल्यामुळें त्यांची किंमत सारखीच. कर्माचें कर्तृत्व आणि त्यांच्या फलांचें भोक्तृत्व मन आपल्याकडे ओढून घेत असतें. परंतु त्या मनाला स्वरूपानुभवामुळें पूर्ण शांत स्थिति प्राप्त झाली आणि कर्तृत्व व भोक्तृत्व यांच्या संबंधांच्या त्याच्या भ्रमाचा निरास झाला, म्हणजे करून अकर्ता आणि भोगून अभोक्ता ही स्थिति मनुष्याला प्राप्त होते. कर्तृत्व आणि भोक्तृत्व यांच्या संबंधानें मनुष्याचा जो निश्चय असेल, तदनुरूप तो क्रियादिकांमध्यें अनुभव घेत असतो. सांप्रत माझ्या बुद्धीमधील कर्तृत्व-भोक्तृत्वाचा रोग नष्ट झाला असून तिला आत्म्याच्या अनुसंधानाशिवाय आतां दुसरा कोणताहि विषय शिलक राहिलेला नाहीं. यास्तव क्रियापरता किंवा अक्रियता यांच्यामुळें इष्टानिष्टफलप्राप्ति किंवा पुनर्जन्मादि फलप्राप्ति यांच्या संबंधाच्या सर्व शकांचा त्याग करून आणि मनाला शांत ठेवून या देहाला त्याचे प्राप्त व्यवहार मी खुशाल करूं देतों. "

---

# सर्ग ११

—:*:—

१. पहांटेच्या वेळीं जनकानें आपल्या चित्ताला केलेला बोध.

**श्रीवसिष्ठः**—रामचंद्रा ! अशा रीतीनें आत्मगत भाषण केल्यानंतर, जगताला प्रकाश देण्याचें आपलें स्वाभाविक कर्म करण्यासाठीं सूर्य उदय पावतो त्याप्रमाणें, आपलें प्राप्त कर्म कर्तृत्वभोक्तृत्वाभिमानरहित बुद्धीनें करण्यास प्रवृत्त झालेला **जनक** राजा आपल्या जाग्यावरून उठला; व इष्टानिष्ट भावनांचा त्याग करून त्यानें आत्मजागृतींत राहून सुषुप्तींत असल्याप्रमाणें आपल्या सर्व क्रमप्राप्त क्रिया केल्या. त्या दिवशीं नित्याप्रमाणें देवांचें पूजन, ब्राह्मणांना दान देणें वगैरे सर्व आन्हिक क्रिया त्यानें केल्या आणि ती रात्र पूर्वीप्रमाणें ध्यानलीला करण्यांत घालविली. त्यानंतर रात्र संपून पहांटेची वेळ होतांच, ज्याचा सर्व विषयभ्रम शांत झालेला आहे, अशा मनाला एकाग्र करून तो आपल्या चित्ताला बोध करूं लागला. तो म्हणाला:—" हा चंचल चित्ता ! हा संसार

---

१ 'न ममेह कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन ।' हेच बोल गीता अ. ३ श्लोक १८ मध्यें थोड्या शब्दभेदानें अशी आली आहे:—'नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन ।'

तुला सुखदायक होणार नाहीं. यास्तव शांत हो. कारण, शांतीनेंच विक्षेपरहित आणि सारभूत असें आत्मसुख तुला प्राप्त होईल. तूं जसजसा संकल्प करीत राहशील, तसातसा त्याच्या योगानें तुझ्या चिंतेचा संसार तेवढा वृद्धिंगत होत जाईल. ज्याप्रमाणें एखाद्या वृक्षाला पाणी शिंपीत राहिल्यामुळे त्याला सहस्रावधि शाखा फुटतात, त्याप्रमाणें विषयोपभोगाच्या निरंतर इच्छा करीत गेल्यानें तुला अनंत व्यथा मात्र भोगाव्या लागतील. कारण, जन्ममरणरूपी संसार हा विषयचिंतनाच्या योगानेंच उत्पन्न झाला आहे. तस्मात् या विचित्र चिंतेचा त्याग करून शांत हो. बा विवेकी चित्ता! तराजूच्या एका पारड्यांत शमसुख आणि दुसऱ्यांत नश्वर संसारसृष्टी घालून दोहोंची तुलना करून पहा आणि त्यानंतर संसारांत कांही सार आहेसें तुला दिसलें, तर मग त्याच्यावर खुशाल आसक्त हो. परंतु ज्या अर्थीं हें सर्व असार आहे त्या अर्थीं तूं त्यावरील आस्था टाकून दे. हे असार दृश्य दर्शनार्ह आहे असें समजून तें प्रिय मानूं नकोस आणि दर्शनार्ह नाहीं असें म्हणून तें अप्रियहि मानूं नकोस; तर केवळ दोहोंचा साक्षिभूत राहून आणि आत्मरत होऊन यथेच्छ विहार कर. हें दृश्य सद्रूप असो कीं असद्रूप असो, त्याचा उदय होवो किंवा अस्त होवो, तूं त्याच्या गुणावगुणांमुळें हर्षविषादयुक्त होऊं नकोस. वास्तविक तुझा आणि या दृश्याचा यत्किंचितहि संबंध नाहीं. कारण, ज्याप्रमाणें तूं असत् आहेस, त्याप्रमाणें हें दृश्यहि असद्रूपच आहे; अर्थात् दोन असद्वस्तूंचा संबंध कोणी कधीं तरी पाहिला आहे का? तुमचा दोघांचा संबंध आहे हें म्हणणें वंध्यापुत्र आणि आकाशपुष्प यांचा संबंध आहे, या म्हणण्याइतकेंच असंबद्ध आहे! आतां यावर कदाचित् तूं असें म्हणशील कीं, 'दृश्य हें असत् आहे, पण मी आत्मा असल्यामुळें सद्रूप आहें.' परंतु तुझें म्हणणें मान्य केलें तर प्रश्न असा उत्पन्न होतो कीं, सत् आणि असत् यांचा संबंध कसा होणार? एक मेलेला आणि एक जिवंत अशा दोहोंचा संबंध कधीं तरी होतो का? बरें, कदाचित् दृश्यहि सत् आणि तूंहि सत् असें क्षणभर मानलें, तर मग इष्ट वस्तूंचा वियोग होण्याची शक्यताच न राहिल्यामुळें विषादाला जागा कोठून रहाणार? आणि जें नित्य आहे त्याबद्दल हर्ष तरी कसला मानावयाचा? यास्तव बा चित्ता! तूं दृश्यरूपी महा आधीचा त्याग कर आणि सदा आत्मस्वरूपामध्यें तल्लीन होऊन रहा; व विक्षेपरूपी समुद्रांत शिरून उगाच बुडूं नकोस. स्वतः जळणाऱ्या चेंडूसारख्या दारूकामाच्या चक्राकार यंत्राप्रमाणें व्यर्थ संताप करून घेऊं नकोस व मोहमलानें भरून मूढ होऊं नकोस. बाबारे! ज्याच्या योगानें तूं परिपूर्ण होशील अशा तऱ्हेची श्रेष्ठ वस्तु या जगांत एकहि नाहीं. यास्तव अभ्यास, वैराग्य इत्यादिकांच्या योगानें ब्रह्माचा अवलंब कर आणि धैर्य धरून चंचलतेचा त्याग कर."

## सर्ग १२

१. जनकाच्या जीवन्मुक्तस्थितीचें वर्णन.
२ विचार आणि प्रज्ञा यांचें विचित्र माहात्म्य.

**श्रीवसिष्ठः**—राघवा! याप्रमाणें विचार करणारा तो जनक राजा स्वराज्यांतील आपलें सर्व कामकाज व व्यवहार करूं लागला. परंतु त्याची बुद्धि या वेळीं ज्ञानानें प्रबुद्ध झाल्यामुळें ती पूर्वींसारखी अहंममतादिकांनीं व्याकुल होईनाशी झाली. कोणत्याहि अनुकुल परिस्थितीमध्यें त्याची चित्तवृत्ति उल्लसित झाली नाहीं, किंवा प्रतिकूल दशेमध्यें खिन्न झाली नाहीं, तर

सुषुप्तावस्थेंतील हालचालीप्रमाणें त्याचे सर्व व्यापार विक्षेपरहितबुद्धीनें होऊं लागले. त्या दिवसापासून त्यानें दृश्याचा इष्टबुद्धीनें आदर केला नाहीं किंवा अनिष्टबुद्धीनें अनादरहि केला नाहीं; तर ज्या ज्या वेळीं जे जे व्यवहार प्राप्त होतील, त्यांचा त्यांचा तो निःशंक मनानें परामर्श घेत असे. त्याची बुद्धि नेहमीं विवेकनिष्ठ राहिल्यामुळें धुळीचे कण आकाशाला मलिन करूं शकत नाहींत त्याप्रमाणें, अहंममत्वादि विकारांच्या योगानें स्वरूपानुभवामुळें प्राप्त झालेली त्याच्या चित्ताची अनादिसिद्ध निर्मलता नष्ट झाली नाहीं. अर्थात् राजसगुणांची धूळ त्याच्या चित्ताला चिकटली नाहीं. निरंतर आत्मानुसंधान करूं लागल्यामुळें सम्यक् ज्ञानाची प्राप्ति होऊन त्याची बुद्धि अपरिच्छिन्न ब्रम्हाकार झाली व तिच्यामध्यें ब्रह्मज्ञानाचें तेज झळकूं लागलें. ज्याप्रमाणें आकाशांत सूर्याचा उदय व्हावा, त्याप्रमाणें त्याच्या हृदयाकाशामध्यें चित्सूर्याचा उदय होऊन त्यामुळें सर्व विक्षेपरूपी मेघपटलांचा आपोआप निरास झाला आणि सर्व भाव आत्म्यामध्यें अध्यस्त असल्यामुळें परमार्थदृष्ट्या ते आत्मरूपच आहेत, असें तो सर्व भूतात्मकोविद पाहूं लागला. यामुळें तो सुखभोगानें केव्हांहि हर्षित झाला नाहीं आणि दुःखभोगानें दुःखी-कष्टी झाला नाहीं; तर हा सर्व मायेनें उत्पन्न केलेला खेळ आहे असे जाणून, आत्मदर्शनामुळें तो निरंतर समचित्त राहूं लागला. त्या वेळेपासून ज्ञानदृष्ट्या सर्वांना सारखे लेखणारा तो जनक राजा जीवन्मुक्तस्थितीप्रत जाऊन पोहोंचला; व तेव्हांपासून तो ज्ञानवृध्द आणि लोकस्थितीचें यथार्थ हृद्गत जाणणारा जनक राजा विदेह देशाचें राज्य करीत असतां लोकांना प्राणाप्रमाणें प्रिय झाला. तो हर्षविषादांच्या तावडींत केव्हांहि सांपडला नाहीं, व मानसिक गुणदोषांनीं त्याच्या आत्मस्वरूपानुभवाचा उदयास्त झाला नाहीं. तसेंच राज्यांतील अर्थानर्थकारक उलाढालींच्या योगानें त्याला कधीं आनंद किंवा दुःख यांचा स्पर्शहि झाला नाहीं. त्यामुळें तो सर्व व्यावहारिक क्रिया करीत असूनहि आत्म्याच्या अकर्तृत्वानुभवामुळें कांहींच करीत नसल्याप्रमाणें राहिला. तो सर्वदा अंतर्यामीं आत्मस्वरूपच पहात असे. सर्व पदर्थांविषयींच्या रागादि वासना त्याच्या ठिकाणीं अस्तंगत झालेल्या असत्याकारणानें गाढ निद्रावस्थेंत असलेल्या मनुष्याप्रमाणें त्याच्या चित्ताची शांतता केव्हांच ढळली नाहीं. तो भावी गोष्टींची चिंता वहात नसे आणि गत गोष्टींचें स्मरण करीत नसे. तसेंच वर्तमानकालींसुद्धां सर्व व्यवहार करीत असतां त्याच्या सहजानंदवृत्तीमध्यें यत्किंचितहि खळ पडत नसे.

कमलनयना रामा! त्या जनकराजानें स्वतःच्या विचारानें सर्व प्राप्तव्य प्राप्त करून घेतलें होतें. जितका जितका विचार करावा तितकी तितकी विचाराची सीमा जवळ येते. यास्तव फलप्राप्ति—अर्थात् आत्मज्ञान होईपर्यंत विचार चालू ठेवावा. गुरु, शास्त्र व पुण्य यांच्या योगानें त्या परमपदाची प्राप्ति होत नाहीं, असें सांगण्यांत येत असतें; परंतु त्याचा अर्थ हीं साधनें अगदीं कुचकामाचीं आहेत असा नसून स्वतःची बुद्धि विचारप्रवण होणें हेंच अध्यात्मप्राप्तीचें मुख्य साधन आहे असाच आहे. अशा दृष्टीनें सत्संगापासून उत्पन्न झालेल्या विचाराची योग्यता कांहीं विशेष आहे. सच्छास्त्र, सत्संग व विवेक यांच्या योगानें शोभणारी प्रज्ञा—ऊहापोहकुशलबुद्धि हीच कोणी सखी असून तिच्या योगानें परमपदाची प्राप्ति होते, याशिवाय दुसऱ्या कोणत्याहि क्रियेनें होत नाहीं. ज्याच्या ठिकाणीं पूर्वा-

पर विचार करणारी प्रज्ञारूपी ज्योति प्रज्वलित झालेली असते, त्याला अज्ञानरूपी अंधकार बाधा करीत नाहीं. दुःखरूपी लाटांच्या योगानें भयंकर आणि दुस्तर भासणारी विपत्तिरूपी नदी, प्रज्ञारूपी नौकेचा आश्रय केल्यानें सहज तरून जातां येते. ज्याप्रमाणें वायूची मंद झुळुक उलप नांवाचें हलकें गवत पाहिजे तिकडे उडवून लावते, त्याप्रमाणें प्रज्ञाविरहित पुरुषाला थोडेसें संकट आलें तरी तें मोठ्या विपत्तींत पाडतें. परंतु प्राज्ञ पुरुषाला गुरूचें साहाय्य आणि शास्त्रश्रवण नसले, तरी तो संसारसागरांतून तरून जातो. कारण, संसार हा ज्ञानानें बाधित होणारा आहे, व ज्ञानाच्या बाबतींत प्रज्ञा हेंच मुख्य साधन आहे. व्यवहारांतसुद्धां प्रज्ञावान् मनुष्याला कोणत्याहि प्रकारची मदत नसली तरी तो मोठमोठीं कार्यें करतो; पण प्रज्ञाशून्य मनुष्याला केवढेंहि मोठें सहाय्य असलें तरी त्याचा कार्यनाश होतो. यास्तव बा रामचंद्रा ! एखाद्या वेलीला चांगलीं फळें यावीं असे वाटत असेल, तर तिला पाणी घालून तिचें रक्षण करावें लागतें. त्याप्रमाणें कार्येच्छु पुरुषानें शास्त्र आणि सत्समागम यांच्या साय्यानें प्रथम आपली प्रज्ञा वृद्धिंगत करावी. ज्याप्रमाणें चंद्रप्रकाशाचें मूळ सूर्यप्रकाश असतो व तो हळुहळू चंद्रप्रकाशाला वाढवीत जाऊन त्याला पूर्णावस्थेप्रत नेतो, त्याप्रमाणें प्रज्ञारूपी दृढमूल बनलेला प्राक्तन-भाग्यरूपी वृक्ष कालेंकरून उत्तम फळें देतो. द्रव्यादि बाह्यार्थ प्राप्त करून घेण्यासाठीं ज्याप्रमाणें मनुष्य वारंवार प्रयत्न करतात, त्याप्रमाणें प्रथमतः प्रज्ञावृद्धीसाठीं नेटानें प्रयत्न करावे, म्हणजे इष्टफलाची प्राप्ति होण्याला उशीर लागत नाहीं. सर्व दुःखांची पराकाष्ठा, आपत्तींचें जणुं भांडार आणि संसारवृक्षाचें बीनच अशा प्रज्ञामांद्याचा नाश करावा. स्वर्ग, पाताळ किंवा राज्यप्राप्ति यांच्यामध्यें जें सर्व प्राप्त होऊं शकेल, तें सर्व एकट्या प्रज्ञेच्या भांडारापासून मिळूं शकतें. राघवा! हा भयंकर संसारसागर जसा प्रज्ञाबलानें तरून जातां येतो तसा तो दान, तीर्थें आणि तप यांच्या योगानेंहि तरून जातां येणें शक्य नाहीं. भूमीवरील नरांना आकाशसंचारादि दैवी संपत्ति प्राप्त होते, तें तरी प्रज्ञारूपी लतेचेंच गोड फल होय. ज्याप्रमाणें सिंहानें अरण्यांतील हरिणांना लीलेनें जिंकावें, त्याप्रमाणें आपल्या भयंकर पंजांनीं उन्मत्त हत्तींच्या कळपांना फाडून टाकणाऱ्या बलाढ्य सिंहांनाहि आपल्या प्रज्ञेच्या बळावर कोल्ह्यांनीं अनेक वेळां जिंकलेलें आहे. अगदीं सामान्य स्थितींत उत्पन्न झालेल्या मनुष्यांनीं प्रज्ञेच्याच योगानें राज्यें संपादन केल्याचीं उदाहरणें आढळून येतात. सारांश, स्वर्ग किंवा मोक्ष प्राप्त करून घेण्याला प्रज्ञावान् मनुष्यच योग्य आहे. प्रज्ञेच्या योगानें वाद करणारांनीं मोठमोठ्या वादशूर प्रतिपक्ष्यांनाहि चीत केलें आहे. विवेकी पुरुषांच्या हृदय-कोशांत असलेली प्रज्ञा हा चिंतामणीच आहे, अथवा चिंतित फल देणारी ती एक कल्पलताच आहे. नौकेचें साहाय्य असलें तरी समुद्राच्या पैलतीरास जाण्याला चांगला शिकलेला नावाडी पाहिजे, अशिक्षित नावाड्याचें तें काम नाहीं; तद्वत् संसारसागर तरून जाण्याला प्रज्ञावान् पुरुष पाहिजे. ज्याप्रमाणें अशिक्षित नावाड्याची नौका समुद्रांतील भोंवऱ्यांमध्यें गिरक्या खाते, त्याप्रमाणें मंदबुद्धि पुरुष या संसारसागरांत गटंगळ्या खात रहातो. आशा, तृष्णा, लोभ, मोह क्रोध, चिन्ता इत्यादिकांपासून उत्पन्न होणारे दोष प्रज्ञावान् मनुष्याला बाधा करूं शकत नाहींत. उघडच आहे कीं, मजबूत चिलखत धारण करणाऱ्या वीराला बाणांपासून भीति ती कसली ? बा रामचंद्रा ! प्रज्ञावान पुरुषाला सर्व जग मागर्वें

म्हणजे आत्मरूपच दिसत असतें; अर्थात् अशा सम्यक्दर्शनसंपन्न पुरुषाला संपत्ति किंवा विपत्ति यांची किंमत सारखीच वाटते. परमात्मस्वरूपी सूर्याला अहंकाररूपी जड आणि विस्तीर्ण नील मेघ झांकून टाकतो; परंतु प्रज्ञारूपी वायूच्या योगानें तो पार उडवून लावतां येतो. यास्तव रामा ! ज्याप्रमाणें चांगल्या पिकाची इच्छा करणारा शेतकरी प्रथम जमीन नांगरून तिची उत्तम मशागत करतो, त्याप्रमाणें अतुल अशा परमात्मपदाच्या प्राप्तीची इच्छा करणाऱ्या पुरुषानें प्रथम विवेकाच्या योगानें आपली बुद्धि शुद्ध करावी, म्हणजे कालेंकरून त्याला इच्छित फल प्राप्त होतें.

## सर्ग १३

—:*:—

१. जनकाच्या दृष्टान्तानें वसिष्ठमुनि श्रीरामाला चित्तोपशमाचे उपाय सांगतात.

**श्रीवसिष्ठः**—रामा ! याप्रमाणें तूंहि **जनक**राजासारखा विचार कर, म्हणजे ब्रह्मज्ञानी पुरुषांचें तें श्रेष्ठ पद तुलाहि असंभावनादि प्रतिबंधाच्या निरासानें अनायासें प्राप्त होईल. **जनका**प्रमाणें जे राजससात्त्विक पुरुष असतात, त्यांचा तो अखेरचा जन्म असल्यामुळें आकाशांतून अकस्मात् फळ पडावें, त्याप्रमाणें ते आत्मज्ञानाचे अचानक अधिकारी होऊन तें पद प्राप्त करून घेतात. यास्तव शुद्धसत्त्वाच्या वृद्धीनें अंतःकरण प्रसन्न होईपर्यंत इंद्रियरूपी शत्रूंना वारंवार जिंकीत रहावें; व अशा रीतीनें अध्यात्माचा अधिकार प्राप्त होऊन इंद्रियांचा स्वामी जो सर्वव्यापी परमात्मा तो प्रसन्न झाला, म्हणजे त्याच्या दर्शनानें संपूर्ण दुःखदृष्टी क्षय पावतात. त्या परावर परमात्म्याचा साक्षात्कार झाला असतां चित्तरूपी क्षेत्रांत पेरल्या गेलेल्या मोहबीजांच्या-दुर्वासनांच्या मुष्टी आणि विविध आपत्तींच्या जणुं वृष्टीच, अशा अहंममतादि सर्व कुदृष्टी—हृदयग्रंथी आपोआप क्षीण होतात.[1] रामा ! तूंहि **जनका**प्रमाणें सर्व जगताच्या उत्पत्त्यादिकांचें अधिष्ठानभूत असलेल्या ब्रह्माचा अपरोक्षानुभव करून घेऊन परमपुरुषार्थरूपी लक्ष्मीनें अलंकृत हो. तूं नेहमीं अंतःकरणांत विचार करून जग हें क्षणभंगुर आहे असें पाहूं लागलास, म्हणजे तुझी बुद्धि **जनका**प्रमाणें कालेंकरून आत्मज्ञानानें सुप्रसन्न होईल. **संसारभीतीमुळें ग्रस्त झालेल्या पुरुषांना आत्मप्रयत्नच हात देऊं शकतो; दैव, कर्म, धन, बांधव यांपैकीं कोणीहि हात देऊं शकत नाहीं.** प्रयत्न, विवेक, वैराग्य इत्यादिकांच्या बाबतींत 'ज्ञान नशिबीं असेल तर प्राप्त होईल,' असें म्हणून दैवावर हवाला ठेवून जे स्वस्थ बसतात आणि कोणत्याहि कृत्याला आरंभ करण्याच्या वेळीं नसत्या कुशंका काढीत रहातात, अशा मंद पुरुषांची आत्मघातकी बुद्धि अनुकरण करण्याला मुळींच योग्य नाहीं. तरी उत्कृष्ट विवेकाचा आश्रय करून आपल्या शुद्धबुद्धीनें आत्मदर्शन करून घ्यावें आणि वैराग्य उत्पन्न करणाऱ्या बुद्धीबलानें संसारसमुद्रांतून उत्तीर्ण व्हावें. आकाशांतून अचानक जमिनीवर फळ पडावें, त्याप्रमाणें **जनक**राजाला ज्ञान प्राप्त झाल्याची जी आख्यायिका उदाहरणार्थ मीं तुला सांगितली, ती लीलेनें ज्ञानप्राप्ति करून देऊन अज्ञानवृ-

---

१. भिद्यते हृदयग्रंथिश्छिद्यन्ते सर्वसंशयाः ।
क्षीयन्ते चास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे परावरे ॥'
( मुण्डकोपनिषद्. २।२।८ )

परावरः—मानुष आनंदापासून तो हिरण्यगर्भाच्या आनंदापर्यंतचे सर्व आनंद ज्याच्यापुढें अवर म्हणजे न्यून पडतात, अर्थात् फिके पडतात असें ब्रह्म.

क्षाचा छेद करणारी आहे. रामा ! जो पुरुष जनकाप्रमाणें विचारशील असतो, त्याचें हृदय प्रातःकाळच्या कमलाप्रमाणें विकास पावून आंतील परमात्मा व्यक्त होतो. ज्याप्रमाणें सूर्याचा प्रकाश पडतांच दंवामधील शैत्य नाहींसें होतें, त्याप्रमाणें संसारविषयक विचित्र चिंतन विचाराच्या योगानें अस्तंगत होतें. 'मी देह' या अहंभावाची रात्र एकदां संपून गेली, म्हणजे सर्वव्यापी आणि विशाल असा आत्मप्रकाश स्वयमेव उत्पन्न होतो. 'मी देह आहें' ही संकुचित बुद्धि विलय पावली, म्हणजे 'मी अनंत भुवनांना व्यापून राहिलों आहें,' ही विस्तृत भावना उदित होते. यास्तव बुद्धिवान् रामा ! ज्याप्रमाणें जनकानें अहंकारवासनेचा त्याग केला, त्याप्रमाणें अंतःकरणांत चांगला विचार करून तूंहि अहंकाराचा निरास कर. कारण अहंकाररूपी मेघ नाहींसा होऊन चिदाकाश अत्यंत निर्मल झालें, म्हणजे त्या विस्तीर्ण आकाशांत आत्मानुभवरूपी सूर्य शरदृतूमधील सूर्याप्रमाणें निःसंशय उत्तम प्रकाश पाडूं लागतो. अहंकाराची भावना हाच निबिड अंधकार असल्याकारणानें त्याचा निरास करतांच आत्मा आपल्या स्वयंतेजानें प्रकाशमान होतो. 'मी नाहीं' आणि 'हें जगहि नाहीं, तर त्या दोघांचा साक्षी मात्र आहे,' अशा तऱ्हेची भावना करीत गेल्यानें चित्त प्रशांत होऊन तें विषयांमध्ये ग्रहण बुद्धीनें निमग्न होत नाहीं, कारण उपादेय ( ग्राह्य ) वस्तूविषयीं राग आणि हेय (त्याज्य) वस्तूविषयीं द्वेष हेंच, मनाचें बंधन आहे, याशिवाय दुसरें कोणतेंहि नाहीं. यास्तव हेय वस्तूविषयीं तिरस्कार व उपादेय वस्तूविषयीं आदर चित्तामध्यें धारण करूं नकोस; तर हेयाहेय—त्याज्यात्याज्यदृष्टी टाकून देऊन त्यांचा साक्षी जो आत्मा त्याविषयीं एकनिष्ठ-राहून विक्षेपरहित हो. ज्यांची हेयोपादेयदृष्टि अजिबात नष्ट झाली, असे पुरुष कशाचाहि तिरस्कार करीत नाहींत व कशाचीहि इच्छा करीत नाहींत. जोंपर्यंत विषयांसंबंधाची हेयोपादेयबुद्धि नष्ट झाली नाहीं, तोंपर्यंत अभ्राच्छादित आकाशांत चांदणें स्वच्छ पडत नाहीं त्याप्रमाणें, बुद्धीमध्यें ब्रह्मात्मतेच्या समतेचा उदय होत नाहीं. 'ही वस्तु अप्रशस्त अर्थात् त्याज्य आहे' व 'ही वस्तु प्रशस्त अर्थात् ग्राह्य आहे' अशा तऱ्हेचे विकल्प उत्पन्न होऊन ज्याचें मन चंचल होतें, त्याच्या त्या मनामध्यें शाखोट (हेंदी) वृक्षावर मंजरी उत्पन्न होत नाहीं त्याप्रमाणें समता उदित होत नाहीं. ज्या पुरुषाच्या ठिकाणीं 'ही वस्तु हिताची असल्यामुळें मला अनुकूल आहे' 'व ही वस्तु अहिताची असल्यामुळें मला प्रतिकूल आहे' अशा प्रकारची बुद्धि उत्पन्न होते, त्याच्या ठिकाणीं वैराग्याचा प्रकाश पाडणारी समता व स्वच्छता कशी बरें उत्पन्न होणार ? कारण, वास्तविक ब्रह्मतत्त्व हें जर एकमेवाद्वितीय आणि निरामय ( शुद्ध ) आहे, तर त्याच्यामध्यें भेदाभेदकल्पनेला आणि अर्थातच युक्तायुक्तभावनेला अवकाश कोठून असणार ? परंतु चित्तरूपी चंचल वृक्षावर इच्छा व अनिच्छारूपी माकडें एकदां का उड्या मारूं लागलीं, म्हणजे मग तो वृक्ष स्थिर कसा राहणार ? कारण, निराशता, निर्भयता, नित्यता, समता, ज्ञता, निरिच्छता, निष्क्रियता, सौम्यता, निर्विकल्पता, धृति, मैत्री, मननशीलता, तुष्टि, मृदुता, मृदुभाषिता हे पंधरा गुण, ज्याच्या ठिकाणची हेयोपादेयबुद्धि नष्ट झाली आणि ज्याचें चित्त निर्वासन झालें, अशा जीवन्मुक्त पुरुषाच्या ठिकाणींच वास्तव्य करीत असतात.

यास्तव बा रामचंद्रा ! हे गुण आपल्या

अंगीं यावे आणि ही जीवन्मुक्तीची श्रेष्ठ स्थिति आपल्या अंगीं बाणावी अशी तुझी इच्छा असेल, तर अधोभागीं धांवणाऱ्या उदकप्रवाहाला बंधारा घालून अडवून धरतात त्याप्रमाणें, नीच विषयांकडे धांव घेणाऱ्या मनाला इंद्रियांचा निरोध करून बाह्य विषयांपासून प्रथम परावृत्त करीत जावें. बाह्य विषयांसंबंधाची आत्मबुद्धि नाहींशी होण्याला त्यांचा त्याग हाच उपाय आहे व अशा तऱ्हेचा त्याग आरंभीं करून नंतर आंतर विषयांसंबंधाची आत्मत्वबुद्धि नाहींशी करण्यासाठीं, जाणें, येणें, बोलणेंचालणें, श्वासोच्छ्वास करणें, झोंप घेणें वगैरे क्रिया होत असतां बुद्धि नेहमीं विचारप्रवण करावी. संसाररूपी प्रवाहामध्यें चिंतातंतूंनीं युक्त असलेलें आणि मोहरूपी शेवाळीनें मलिन झालेलें वासनारूपी जाळें पसरले गेलें असून त्यामध्यें तृष्णारूपी शफरी ( मासोळी ) अडकली गेली आहे. यास्तव बा राघवा ! पूर्वीं सांगितलेल्या प्रज्ञारूपी कातरीनें तें जाळें कातरून टाक, म्हणजे वर्षाकालांतील वादळी वाऱ्यानें वहात जाणाऱ्या मेघाप्रमाणे ती शफरी कालेंकरून ब्रम्हस्वरूपी विस्तीर्ण समुद्रांत जाऊन पडेल. ह्या संसारवृक्षाचें दोषरूपी अंकुर उत्पन्न करणारें अज्ञानरूपी मूळ आत्मोद्धार करण्याला समर्थ असलेल्या अपरोक्ष साक्षात्कारसंपन्न बुद्धीनें दृढ प्रयत्न करून उपटून टाक. ज्याप्रमाणें लांकडी दांडा कुऱ्हाडीच्या साहाय्यानें मोठा वृक्षहि तोडूं शकतो, त्याप्रमाणें ब्रह्मसाक्षात्कारसंपन्न मनानें मनाचा छेद करून त्याला पावन अशा परमात्मपदामध्यें स्थिर करावें. सारांश, मनानेंच मनाचा छेद करून सर्व वासनांचा उच्छेद होईपर्यंत स्वरूपानुसंधान करीत जा, म्हणजे मग वासना गलित झाल्यामुळें भविष्यत्कालीं विषयवृत्तींचा उदय होण्याची शक्यताच रहाणार नाहीं; व अशा रीतीनें सर्व संसाराचा निरास होईल. एकदां वासनेचा क्षय झाला म्हणजे मोहाचा अंकुर वाढणार नाहीं आणि एकदां चित्तांतील संस्कारांचा उच्छेद झाला म्हणजे चैत्याचा-विषयांचा अंकुर उत्पन्न होणेंच शक्य नाहीं. आतां चित्त आणि चेत्य म्हणजे चित्ताचे विषय अशा दोहोंचा क्षय व्हावा असें वाटत असेल, तर बसतां, उठतां, जागें असता, निजलें असतां, चालतांना अथवा धांवतांना, सारांश, कोणत्याहि क्रिया चालल्या असतां ‘ हें सर्व असत् आहे ’ अशी अंतःकरणाची भावना करीत जाऊन त्यांच्या संबंधाच्या आस्थेचा त्याग करण्याचा अभ्यास केला पाहिजे. यास्तव राघवा! तूं समतेचा आश्रय करून जें प्राप्त कार्य असेल तें करीत जा आणि जें अप्राप्त असेल त्याची चिंता करूं नकोस; व अशा रीतीनें या जगांत वागत जा. ज्याप्रमाणें महेश्वर ( शिव ) हा शुद्ध चिन्मात्रदृष्टीनें पाहिला असतां भूजलादि अष्टमूर्तिरूप चिन्हें धारण केलेला दिसत नाहीं, पण जगदाकारविवर्ताचें मायाधिष्ठान असल्यामुळें त्यानें तीं चिन्हें धारण केलीं आहेत आणि तो जगत्कर्ता आहे असें मानण्यांत येतें; अर्थात् संनिधिमात्रानें तो कर्ता, पण वास्तविक अकर्ता असतो, त्याप्रमाणे तूंहि राज्यादि कार्यांचा संनिधिमात्रानें कर्ता हो, परंतु वस्तुतः अकर्ता रहा. रामा ! तूं सर्व शरीरांचा वेत्ता म्हणजे साक्षी आहेस, अज आहेस, आत्मरूप आहेस, किंबहुना महेश्वर आहेस; व आपल्या स्व-भावापासून च्युत न होतां आपल्या मोहाच्या योगानें तूंच या जगाचा विस्तार केला आहेस. आतां या ठिकाणीं तूं कदाचित् अशी शंका घेशील कीं, ‘ जर हें जग मींच विस्तारलें आहे तर मला त्यापासून हर्षामर्षादि विकार कां उत्पन्न व्हावे ? ’ तर याचें उत्तर हेंच

आहे कीं, ज्या तत्त्ववेत्त्यानें दृश्यासंबंधानें सन्मात्रभावना करून तद्व्यतिरिक्त इतर भावनेचा त्याग केला आहे, त्याला हर्षामर्षादिकांपासून उत्पन्न होणाऱ्या दोषांची केव्हांहि बाधा होत नाहीं. यास्तव तूंहि दृश्य विषय जड आहेत या भावनेला अजिबात फांटा दे. जो रागद्वेषरहित आहे, ज्यानें संसारवासनेचा त्याग केलेला आहे, जो मातीचें ढेंकूळ, पाषाण आणि सुवर्ण यांना सारखेंच लेखतो, अशा पुरुषालाच योगयुक्त असें म्हणतात. अशा तऱ्हेचा मनुष्य जें जें करतो, खातो, देतो, टाकतो त्यामध्यें त्याची बुद्धि आसक्त नसल्यामुळें त्याला केव्हांहि सुखदुःखाची किंमत सारखीच वाटते. जो प्राप्त कर्तव्य म्हणून कोणत्याहि कार्याला आरंभ करतो, परंतु ज्यानें इष्टानिष्टभावनेचा सर्वथा त्याग केला आहे, तो सुखदुःखांमध्यें कधींच मग्न होत नाहीं. महाबुद्धिवान् रामा! ही सर्व चित्सत्ता आहे, असा मनाचा पूर्ण निश्चय होऊन ज्याचें सर्व भोगांविषयींचें चिंतन नष्ट झालें, त्यालाच शाश्वत शांति प्राप्त होते. ज्याप्रमाणें आपलें आणि आपल्या पोरांचें उदरपोषण करण्याकरितां मांजर मांसाच्या लालचीनें सिंहाच्या मागून अरण्यांत जातें, याप्रमाणें मन स्वभावतःच जड असल्यामुळें आपल्या विषयसिद्धीकरितां तें स्वयंप्रकाश चिदात्म्याच्या मागोमाग धांवत जातें. व सिंहाच्या पराक्रमानें मिळालेलें मांस त्याच्या मागून जाणाऱ्या मांजराला आयतेंच मिळतें, त्याप्रमाणें आत्मप्रकाशाच्या योगानें प्राप्त झालेल्या दृश्य विषयांमध्यें मन आसक्त होतें. एवंच, मन हें असद्रूप असून तें एकमेवाद्वितीय अशा आत्मस्वरूपाला विसरून त्याच्या साहाय्यानें जगदाकाराची भावना करतें व त्याप्रमाणें जगदाकार बनून त्यावर आपली उपजीविका चालवितें; परंतु त्याला आत्मस्मृति झाली म्हणजे तें आपलें मनोरूप टाकून पुनरपि चिद्रूप बनतें. जड मनाची प्रकाशशक्ति आणि हालचालीचें सामर्थ्य चित्च्या स्वाधीन आहे. अर्थात चित्चें साहाय्य नसेल तर हें शवप्राय मन हालचाल कसें करणार? शास्त्रवेत्ते तरी ह्या मनाला चित्त म्हणतात, ह्यामध्यें सुद्धां तें स्वभावानें चित्तानेंच पोसलें जाणारें, त्याचीच ती स्पंदशक्ति, कल्पना, केवळ असत् होय, हेंच कारण दिसते. चित्तरूपी सर्पाच्या फूत्कारालाच दृश्याकार कल्पना असें ह्मणतात व 'मी ब्रह्म आहें' असा साक्षात्कार झाला, म्हणजे ही कल्पना शुद्ध चिन्मात्ररूप होते. सारांश, चेत्य (विषय) रहित चित् हेंच सनातन ब्रह्म होय व चेत्ययुक्त चित् हीच त्रिपुटीरूपी कलना होय. ब्रह्माची स्पंदरूपी जी ही कल्पना ती मिथ्या असताहि सद्रूपत्वानें हृदयांत वावरूं लागली आणि संकल्पविकल्प करूं लागली म्हणजे तिला मन म्हणतात. ही कल्पना जेव्हां आपल्या नित्यस्वरूपाला विसरून चित्तरूपानें हृदयांत रूढ होते, तेव्हां ती जडाप्रमाणें व्यवहार करूं लागते. एवंच, चित्च कल्पना होतें, तीच पूर्वी अनुभवलेल्या विषयांच्या स्मरणानें चित्त बनते आणि भावी विषयांचे संकल्पविकल्प करण्यामुळें मन बनते; व अशा रीतीनें मुख्य चित्च ह्या कल्पनेच्या योगानें पूर्व आणि भावी विषयांच्या इष्टानिष्टभावना करणारीं हीं दोन मिथ्या रूपें धारण करते.

याप्रमाणें ही चित्च आपल्या ठिकाणच्या मायाशक्तीच्या योगानें जगत्स्थितीप्रत जाऊन पोहोंचली आहे. परंतु जोंपर्यंत गुरु, शास्त्र

---

१ 'रागद्वेषविनिर्मुक्तः समलोष्ठाश्मकाञ्चनः। युक्त इत्युच्यते योगी व्यक्तससारवासनः॥' हा श्लोक गीतेमध्यें थोड्या फरकानें असा आला आहेः— ज्ञानविज्ञानतृप्तात्मा कूटस्थो विजितेन्द्रियः। युक्त इत्युच्यते योगी समलोष्ठाश्मकाञ्चनः (गीता. ६।८.)

आणि आत्मविचार या साधनांनीं तिचें स्वरूप जाणलें नाहीं, तोंपर्यंत पूर्णानंद आणि अद्वय असें आत्मरूप कळणें शक्य नाहीं. यास्तव शास्त्रविचार, तीव्र वैराग्य आणि इंद्रियनिग्रह यांच्या योगानें जडाकार कल्पनारूपी स्वप्नांतून चित्‌ला जागें करावें. विज्ञान आणि शमादि साधनसंपत्ति यांच्या योगानें जागृत झालेली सर्व जंतूंची कलना-चित्तवृत्ति ब्रह्मरूप होते, पण या साधनांच्या अभावीं ती सर्वत्र जगरूपानें भ्रमण करीत रहाते. यास्तव व्यामोहरूपी मदिरा प्राशन केल्यामुळें उन्मत्त होऊन विषयरूपी खळग्यामध्यें लोळत पडलेल्या आणि अज्ञानरूपी निद्रेमध्यें घोरत पडलेल्या कलनेला—चित्तवृत्तीला जागृत करावें. (कलना जर गाढ निजली आहे तर जग कसें दिसतें, ती जागी झाल्यावर ब्रह्मरूपच असल्यामुळें ती ब्रह्म होते, ह्यांत ज्यास्त काय झालें, अशी शंका असेल तर ऐक.) कलना जेव्हां जागी नसते, तेव्हां कांहींच कळत नाहीं. ती संकल्प करूं लागून स्वप्नांतल्या सारखी दिसूं लागली तरी ती खोटीच. जगताची दृश्यमान स्थिति ही एखाद्या सांकल्पिक प्रासादाप्रमाणें-कल्पनेंतील राजवाड्याप्रमाणें मिथ्या असून तो आत्मस्वरूपाचा विलास आहे. ज्याप्रमाणें एखादी पुष्पमंजरी आपल्या ठिकाणच्या गंधशक्तीमुळें शोभायमान होते, याप्रमाणें चित्तवृत्ति ही अंतस्थ सर्वसाक्षी परमात्मदृष्टीनें व्याप्त झाली असते; म्हणूनच जगांतील पदार्थांना प्रकाशित करूं शकते. आतां या ठिकाणीं तुझ्या मनांत अशी शंका उत्पन्न होण्याचा संभव आहे कीं, 'कलना जर वस्तुतः सर्वसाक्षिणी आहे, तर ती अंतःकरणाचे धर्म तेवढेच कां प्रकाशित करते? ती सर्व धर्म कां प्रकाशित करीत नाहीं?' तर याचें उत्तर हेंच आहे कीं, कलना जरी ज्ञानरूप आणि नित्यबोधस्वभाव आहे, तरी प्राण्यांनीं तिला आपल्या भावनेनें अंतःकरणापुरती मर्यादित केलेली असल्यामुळें ती त्यांचे त्यांचे विशिष्ट अंतःकरणधर्म तेवढेच प्रकाशित करते. वृत्तिरूपी कलना ही अविवेकामुळे पाषाणाप्रमाणें जड बनलेली आहे; परंतु सूर्यप्रकाशामुळें कमलिनी प्रफुल्लित होते, त्याप्रमाणें चैतन्यसूर्याचा उदय होतांच ती प्रबुद्ध होते. (नैय्यायिकप्रभृति) कांहीं मतवादी या साक्षिचैतन्याला मानीत नाहींत. परप्रकाशरूपी अनित्य ज्ञानच विषयांना प्रकाशित करतें, असें त्यांचें मत आहे. परंतु हें मत अगदीं अयोग्य आहे. कारण ज्याप्रमाणें पाषाणाची पुतळी करून तिला नाच म्हणून कितीहि सांगितलें तरी ती नाचेल काय? अर्थात् ती जड असल्यामुळें यत्किंचितहि हालचाल करूं शकत नाहीं, त्याप्रमाणें चित्तवृत्तिरूपी कलना जड असल्यामुळें यत्किंचितहि हालचाल करूं शकत नाहीं, त्याप्रमाणें चित्तवृत्तिरूपी कलना जड असल्यामुळें चैतन्याच्या सान्निध्याशिवाय तिची विषयोन्मुखप्रवृत्ति होणेंच दुर्लभ; मग तिच्या प्रकाशनाची गोष्ट लांबच राहिली. चित्रांतील राजांनीं रणसंग्राम केल्याचा घनघोर शब्द कोणी ऐकिला आहे का? केवळ चंद्रकिरणांच्या योगानें वनस्पतींना पालवी फुटून त्यांची वाढ होते काय? रक्तानें माखलेलीं प्रेतें कधीं पळत जातात का? अरण्यांतील पाषाण मधुर गायन करतांना कोणी ऐकले आहेत काय? माणसानीं दगडाचे किंवा मण्याचे कल्पिलेले सूर्य रात्रीचा अंधकार नष्ट करूं शकतील काय? आकाशांतील कल्पित उद्यानांमधील वृक्षांची छाया कधीं कोणाचा ताप हरण करील काय? सारांश, पाषाणाप्रमाणें जड आणि मृगजळाप्रमाणें मिथ्या भ्रमामुळें उत्पन्न होणाऱ्या मनाकडून कोणत्या क्रिया होणें शक्य आहे? ज्याप्रमाणें सूर्याचें कडकडीत ऊन पडलेलें असलें म्हणजे त्यामध्यें मृग-

जळाची नदी दिसते, त्याप्रमाणें ही विषय-वृत्तिरूपी कलना आत्म्यामध्येंच स्फुरण पावत असते. अर्थात्, कलना हा अध्यास आहे ही गोष्ट खरी; परंतु तो अध्यासमुद्धां चिदात्म्याचा स्वीकार न केल्यास सिद्ध होऊं शकत नाहीं.

रामा! अज्ञलोक म्हणतात कीं, चैतन्याची परिच्छिन्न स्पंदकल्पना म्हणजेच मन, असें मीं तुला पूर्वी सांगितलें. पण वास्तविक विचार केला तर मन हें सुद्धां जड आहे; अन्नमय कोशाच्या आंत असलेल्या प्राणवायूची ती शक्ति आहे. परंतु ही गोष्ट अज्ञ जनांच्या लक्षांत येत नाहीं. ही प्राणशक्ति संकल्पामुळें उत्पन्न झालेली असून जे योगी निःसंकल्प आणि विषयस्फुरणरहित झालेले असतात, त्यांची चित् म्हणजे पारमार्थिक प्रभाच होय. ही प्राणशक्ति जेव्हां 'हा मी' आणि 'हें माझें' अशा तऱ्हेचे आकार धारण करूं लागते, तेव्हां स्पंदात्मक प्राणतत्त्व व चित् यांचें अविवेकामुळे अध्यासरूपी ऐक्य भासतें व या जड-चैतन्याच्या कलुषित कल्पनेलाच जीव ही संज्ञा दिली जाते. यावरून ही गोष्ट तुझ्या लक्षांत आली असेल कीं, बुद्धि, चित्त, जीव वगैरे संज्ञा तज्ज्ञांनीं मिथ्या संकल्पालाच दिलेल्या असून त्या परमार्थदृष्ट्या सत्य नाहींत. कारण, वास्तविक पाहूं गेलें तर मन, बुद्धि, चित्त, जीव, शरीर यांपैकीं कशालाहि पारमार्थिक सत्यता नसून सत्य असा कायतो एक आत्माच आहे. हा सिद्धान्त शेंकडों श्रुती, विद्वानांचे अनुभव आणि युक्ती यांच्यावरून खरा ठरतो. आतां या ठिकाणीं कदाचित् तूं म्हणशील कीं, 'जर आत्मा आहे म्हणतां तर त्याचा अनुभव कां येत नाहीं? तसेच जगद्रूपानें कोण भासतो?' तर याचें उत्तर असें आहे कीं, या सर्व जगद्रूपानें आत्माच भासमान होत आहे, व कालक्रमहि तोच आहे, तो आकाशाहून स्वच्छतर असून तो आहे आणि नाहीं अशा उभय स्वरूपाचा आहे. तो स्वयंप्रकाश आणि इतरांचा प्रकाशक असल्यामुळें तो आहे असें म्हणावेंच लागतें. परंतु चक्षुरादि इंद्रियांच्या योगानें गोचर होणाऱ्या स्थूलता, नीलता वगैरे गुणांनीं रहित असल्यामुळें त्याचें स्वरूप अनुभवास येत नाहीं व तो नाहींसा भासतो. तो सर्वपदातीत असून अंतर्मुख होऊन तद्रूपत्वानेंच जाणतां येण्यासारखा, अर्थात् स्वसंवेद्य असून त्याचें स्वरूप बाह्यवृत्तीच्या इंद्रियांना गोचर होणें अशक्य आहे. इंद्रियांची गोष्ट एक वेळ बाजूला ठेविली, तरी मन हें सूक्ष्मार्थनिर्णयाविषयीं सुप्रसिद्ध आहे ना? मग तें तरी आत्म्याला कां जाणत नाहीं?' असें तूं विचारशील परंतु याचें कारण असें आहे कीं, मन हें अविद्येचें कार्य असल्यामुळें तें आत्म्याचें दर्शन करून घेण्यास गेलें पुरें, कीं त्याचा अविद्येसह नायनाट होतो. यामुळें त्याच्या ठिकाणीं आत्मदर्शनाचें सामर्थ्य नाहीं. अंधकार प्रकाशाजवळ जातांच त्याचा मागमूसहि नाहींसा होतो, मग त्याला प्रकाशाचा अनुभव येणार कसा? त्याचप्रमाणें आत्मदर्शनाबरोबर मन नाहींसें होत असल्यामुळें तें आत्म्याचें दर्शन करूं शकत नाहीं. आतां मनाची प्रवृत्ति—मनाचा उदय केव्हां होतो तें सांगतों. ज्या वेळीं स्वच्छतर आत्मसंवित् बाह्य विषयांची संकल्पवशात् इच्छा करूं लागते, त्यावेळीं तिला पारमार्थिक आत्म्याचें विस्मरण आणि चित्तजन्य मिथ्या पदार्थांचें स्मरण होऊं लागून त्या अनात्मपदार्थांच्या ठिकाणीं मनाची प्रवृत्ति होऊं लागते. **मनाची आत्मदर्शनशक्ति ही त्याच्या उत्पत्तीलाच प्रतिकूल आहे. कारण, परमपुरुषाचें संकल्पमय होणें याचेंच नांव चित्त, संकल्पाचा त्याग करणें हें अचित्त आणि अचित्तता म्हणजेच मोक्ष.** सारांश, मन हें चित्ताधीन अस-

त्यामुळें आत्मदर्शन हें मनाच्या उत्पत्तीलाच प्रतिकूल आहे. अतएव चित्ताचा जन्म हेंच संसाराचें बीज होय. संकल्पोन्मुख झालेल्या संवित्चा म्हणजे चित्स्वभावाचा थोडासा अन्यथाभाव झाला, म्हणजे चित्ताचा जन्म होतो. निर्विकल्प स्थितीपासून च्युत झालेल्या चित्ची संकल्पकलंकित सत्ता म्हणजेच कलना असून ज्याप्रमाणें स्त्रीच्या संकल्पामुळें प्रजाप्रसवाविषयीं पुरुषाच्या शरीरांतील इंद्रियचेतना वगैरे(पुरुषत्व) भाव प्रकट होतो,त्याप्रमाणें जगत्प्रसाराकरितां त्या कलनेपासून मन उदय पावतें.रामा! प्राणशक्तिचा निरोध केला म्हणजे मन आपोआप लीन होतें. कारण, आरसा नष्ट झाला म्हणजे त्याबरोबर आरशांत पडलेलें पदार्थाचें प्रतिबिंबहि नष्ट होतें. ज्याप्रमाणें आरशांतील प्रतिबिंब हें आरशाचें कल्पित रूप आहे, त्याप्रमाणें मन हें प्राणाचें कल्पित रूप आहे. ( आतां 'मन हें प्राणाचें कल्पित रूप आहे ) हें कशावरून ? असें म्हणशील तर त्याचें उत्तर असें आहे की, जिवंत पुरुषाला दूर देशांतील जो अनुभव मनानें येतो, तो त्याच्या मनस्पंदामुळेंच येतो. परंतु देशांतराचा मनानें होणारा संबंध आणि तज्जन्य होणारा अनुभव प्राणस्पंद आणि वेदनाशरूपी चित् यांच्यावांचून होणें शक्य नसल्यामुळें मनामध्यें स्पंद आणि ज्ञान ह्या दोन्ही शक्ती आहेत, असें मानणें भाग आहे. यास्तव मन हें प्राणाचेंच रूप आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

अशा रीतीनें प्राण व मन यांचा अत्यंत निकट संबंध असल्यामुळें प्राणनिरोधाच्या योगानें मनोनिरोध होतो. यास्तव प्राणनिरोध कसा करावा तें आतां सांगतों. वैराग्य, प्राणायामाचा अभ्यास, योग ( समाधि ), परमार्थावबोध यांच्या योगानें, तसेंच बाह्यविषयाकार होणें हें जें चित्ताचें व्यसन तें घालविल्यानें प्राणनिरोध होतो. कदाचित् एखाद्या पाषाणामध्यें चलनशक्ति किंवा ज्वलनशक्ति संभवेल, परंतु मनाच्या ठिकाणीं स्पंदशक्ति किंवा संवेदनशक्ति कदापि संभवणार नाहीं. कारण, स्पंद ही प्राणवायूची शक्ति असून ती चलद्रूप आणि जड आहे; व संवेदन म्हणजे ज्ञान ही आत्म्याची शक्ति असून ती नित्य, सर्वव्यापी व स्वच्छ आहे. परंतु प्राणाची स्पंदशक्ति व आत्म्याची संवेदनशक्ति यांचा संबंध झाला, म्हणजे त्याठिकाणीं मनाची कल्पना उदित होते. परंतु हें मन मिथ्या असून त्याच्या ज्ञानालाहि मिथ्याज्ञान हेंच नांव दिलें जातें. हें मन म्हणजेच अविद्या, तीच विक्षेपशक्ति—माया व तेंच संसारादि विषप्रद असें महा अज्ञान होय. आतां चिच्छक्ति आणि प्राणशक्ति यांच्या संबंधापासून उत्पन्न होणारी संकल्पाची कल्पना केली नाहीं, तर संसारभीतिच नष्ट झाली असें समजावें. प्राणवायूची स्पंदशक्ति जेव्हां चैतन्याकडून चेतविली जाते, तेव्हां ती विषययुक्त चित्च अंतःसंकल्पामुळें चित्ततेस प्राप्त होते. परंतु ही चित्ची चित्तता लहान मुलांनीं कल्पिलेल्या वेताळाप्रमाणें मिथ्या असून जिच्यामध्यें अखंड मंडलाकार अशीं स्पंदरूपें केव्हांहि विद्यमान नाहींत, अशी चित्च सत्य होय. अशी वस्तुस्थिति असल्यामुळें ही अखंड आणि पूर्ण अशी चित्रूपचित्तता कोणाकडून बाधित होणार ? ज्याची शक्ति अखंड आहे अशा परमेश्वराबरोबर रणसंग्राम कोण करणार ? एवंच, चित् व अचित् परस्परविरोधी असल्यामुळें त्यांचा संबंध होणें शक्यच नाहीं, व चित् आणि अचित् यांचा जर वस्तुतः संबंधच होऊं शकत नाहीं, तर मग मनाची तरी सिद्धि कशी होणार ? सारांश, चित् व अचित् हे भिन्न पदार्थ मान-

१. 'पुंस्त्वादिवत्त्वस्य सतोऽभिव्यक्तियोगात् ।' ( ब्र. सू. २।३।३१ )

त्यास मन मिथ्या आहे असें मानावें लागतें. आतां चित् आणि स्पंद हे एकरूप आहेत असें मानलें, तर मग एक चैतन्यसत्ताच आहे असें ठरून मनाचें अस्तित्वच बाधित होतें. चित् आणि अचित् यांची एकरूपता चित्च्या अपलापानें होऊं शकणार नाहीं. कारण, तसें झाल्यास स्पंदाच्या उत्पत्तीचा अभाव मानावा लागणार. बरें, अचित्च्या अपलापानें त्यांची एकरूपता होते असें मानावें, तर हत्ती, घोडे यांच्यावांचून नुसत्या राजाला सेना असें म्हणतां येत नाहीं, त्याचप्रमाणें नुसत्या चित्ला मन नांव देतां येणार नाहीं. तस्मात् रामा ! या जगत्रयामध्यें हें दुष्ट मन नाहींच, असा तत्त्वज्ञानामुळें अनुभव होणें यालाच **मनोनाश** असें म्हणतात. निष्पापा रामा ! आपणांवर अनर्थ ओढवून घेण्याकरितां त्या मनाची तूं उगाच कल्पना करूं नकोस. कारण, तें मिथ्या उद्भवलें आहे, परमार्थतः तें नाहींच. महाबुद्धिवाना ! तूं अंतःकरणांत यत्किंचित्‌हि संकल्प करूं नकोस. कारण, मन हें संकल्पामुळेंच उत्पन्न होतें, संकल्प केला नाहीं म्हणजे त्याचा कोठें ठाव ठिकाणहि लागत नाहीं. बा मननशीला ! तुझ्या हृदयरूपी ओसाड भूमीमध्यें अयथार्थज्ञानामुळें जें कल्पनारूपी मृगजळ उद्भवलें आहे, तें सम्यक्‌ज्ञानाने नष्ट झाल्याशिवाय रहाणार नाहीं. मन हें जड आणि निःस्वरूप असल्यामुळें सर्वदा मेलेलेंच आहे. परंतु या मृत मनाकडून अनेक जीव मारले जातात, ही मूर्खपणाची परंपरा विचित्रच म्हणावयाची ! ज्याला आत्मा नाहीं, देह नाहीं, आधार नाहीं व आकारहि नाहीं, अशा तऱ्हेच्या ज्या मनोरूपी पाशांत अडकवून मूर्खांना भक्षण करण्यांत येतें, तो पाश खरोखरच अजब होय ! सर्व प्रकारच्या सामग्रीनें विरहित अशा मनाकडूनहि जो मूढ ठार केला जातो. त्याचें मस्तक नीलकमलाच्या पाकळीनेंहि फुटलें जाईल, असें म्हणणें गैर होणार नाहीं. जड, मूक आणि अंध अशा मनाकडून जो मारला जातो, असा मूढ पुरुष पूर्णचंद्राच्या शीतल किरणांनीं सुद्धां जाळला जाण्याला काय हरकत आहे ? अविद्यमान असलेलें मन विद्यमान असलेल्या महाशूरांनाहि जिंकतें ! आतां एखादा विवेकी शूर मनुष्य मनाला मारतो, असेंहि म्हणण्यांत येतें; परंतु वस्तुतः ही कल्पनाच व्यर्थ आहे. कारण, ज्याचें अस्तित्वच नाहीं त्याला कोण आणि कसें मारणार ? मिथ्या संकल्पानें उद्भवलेलें आणि मिथ्या आरूढ झालेलें मन शोधूं लागलें तरी सांपडत नाहीं. अशा स्थितींत दुसऱ्याचा पराभव करण्याची शक्ति त्याच्या ठिकाणीं कोठून असणार ? परंतु अत्यंत चंचल अशा या मनाकडून सर्वांचा पराजय व्हावा, ही सामान्य माया नव्हे; तर महा मायावी म्हणून प्रसिद्ध असलेल्या मयासुरालाहि निर्माण करणारी अशी ही अगाध माया आहे ! ज्याच्यामध्यें मूर्खताच भरलेली आहे, अशा मनुष्याला कोणत्या आपत्ती येत नाहींत ? अर्थात् तो सर्व आपत्तींचें माहेरघरच असतो. ही सृष्टिसुद्धां अशा मूर्खांच्या अज्ञानानें उत्पन्न केलेली असून ती सर्व आपत्तींचें अधिष्ठान आहे, यांत विशेष आश्चर्य नाहीं. पण हाय हाय ! अशा रीतीनें कष्टानें भरलेल्या ह्या सृष्टींत अज्ञानी जीव असन्मार्गानें वागून मनादिकांच्या दुःखसृष्टींत अधिकच भर घालतो, याला काय म्हणावें ? ही मनादि मौर्ख्यमयी सृष्टि अत्यंत नाजूक आहे, असें मला वाटतें. कारण, अविचारामुळें उत्पन्न झालेली ही मनोमयी सृष्टि विचारानें क्षीण होऊन जाते. ज्याप्रमाणें नदीच्या प्रवाहांतील पाणी प्रवाहाच्या वेगामुळें कणांच्या रूपानें उडूं लागतें, एखाद्या भोंवऱ्यांत सांपडलेल्या पाण्याचें यंत्रांत घातल्याप्रमाणें चूर्ण होते किंवा पाण्यावर लाटांची हाल-

चाल होऊं लागली असतां पूर्ण चंद्राच्या करस्पर्शामुळें त्याला उन्माद होत आहे, अशी भ्रांति उत्पन्न व्हावी, त्याप्रमाणें ही मनोमयी सृष्टीची भ्रांति असून ती विचारानें क्षणांत नष्ट होते. शत्रूची दृष्टादृष्ट होतांच त्याच्या नेत्रांतून उत्पन्न होणाऱ्या सूत्रांनीं आपण बद्ध झालों आहों, किंवा शत्रूच्या काल्पनिक शूर सेनेकडून आपण पराजित झालों आहों असा भ्रम व्हावा, त्याप्रमाणें ही मानसिक सृष्टि आहे; व अशी स्थिति असल्यामुळें विचारानें नाहींशी होणारी ही सृष्टि जो क्षीण करून टाकीत नाहीं, तो पुरुष निःसंशय आत्मघातकी होय. रामा ! ही मूर्खलोकमयी सृष्टि आणि मिथ्या मन यांना वश करून घेण्याला जो समर्थ नाहीं, तो अध्यात्मशास्त्राच्या उपदेशाला पात्र नाहीं. कारण, त्याची प्रज्ञा बाह्य विषयांमध्यें गढून गेलेली असून ती मनोनिग्रह करण्याला उद्युक्त नसते व आत्मस्वरूपाकडे तिचा ओढा नसतो, यामुळें सूक्ष्म विचार करण्याची तिच्या ठिकाणीं शक्ति नसते. ती वीण्याच्या तारेंतून निघणाऱ्या सूक्ष्म ध्वनीलाहि भिते, आपल्या निजलेल्या बंधूचें तोंड दिसलें तरी घाबरते, व ‘ शत्रु आला ’ इतके शब्द कोणीं उच्चारले, तरी तेवढ्यानें तिचा थरकांप होऊन ती पळ काढूं लागते. रामा ! फार काय सांगूं ? तिला तिच्या मनानेंच भिववलें असून आपलें गुलाम केलें आहे ! परंतु ही दुष्प्रज्ञा भितरी असली तरी असेनां कां ? पुरुषानें तिचा मोह धरला नाहीं म्हणजे झालें. थोडेसें विषयसुख प्राप्त होतांच बेहोष होणारी, आपल्याच हृदयांतील चित्तरूपी शत्रूनें प्रहार केल्यामुळें संतप्त झालेली आणि विवेकशून्य अशी प्रज्ञा, सत्य म्हणजे काय हें जाणण्याला समर्थ नसते. परंतु असल्या प्रज्ञारूपी दुर्बल शत्रूपासून मनुष्याला मोह उत्पन्न व्हावा, हें मात्र सर्वथा अनुचित होय !

१. सर्पाच्या दृष्टीबरोबर बेडूक वगैरेची अशी स्थिति होते.

## सर्ग १४

—:*:—

१. नाना योनींमध्ये दुःख भोगणाऱ्या आणि ज्ञानोपदेशाला पात्र नसलेल्या लोकांची उपेक्षा करणेंच युक्त आहे. २. मन नाहींसे करण्याचा उपाय.

**श्रीवसिष्ठः**—राघवा ! संसारसागराच्या असार लाटांबरोबर वहात जाणारा जो जनसमूह आहे, तो मनोनिग्रह, विवेक, वैराग्य इत्यादि साधनांची उपेक्षा करणारा असून दैववशात् एखादा तत्त्ववेत्ता भेटला, तरी प्रश्नप्रार्थनादिकांविषयीं मूकवृत्ति धारण करणारा असल्यामुळें त्याला उपदेश करून काय करावयाचें आहे ? यास्तव मी आतां ह्या शास्त्रामधल्या ज्या तात्त्विक विचाराच्या चार गोष्टी सांगणार आहें, त्या अशा जनसमुदायाकरितां नव्हत. जो डोळस आहे पण ज्याला लांबचें दिसत नाहीं, अशा मनुष्याला विचित्र मंजरींनीं युक्त असलेलें उपवन कोण आणि कशाला दाखवील ? ज्याचें नाक कुष्टरोगानें गलित झालें असून आवाज गेंगाणा झाला आहे, अशा मनुष्याला निरनिराळ्या सुगंधांची परीक्षा करण्याच्या कामावर कोणता निर्बुद्ध मनुष्य नेमणार आहे ? ज्याला आपल्या अवयवांचीहि शुद्धि राहिली नाहीं, अशा मद्यपानानें धुंद झालेल्या मनुष्याची धर्मनिर्णयाच्या कामावर योजना करणारा कोणता वेडापीर सांपडेल ? व त्याला नेमला तरी त्याचें वचन प्रमाण कोण मानील ? स्मशानांतील प्रेताजवळ गोष्टी सांगत कोण बसेल ? व मूर्खाला कोण पढवील ? जो आपल्या हृदयरूपी बिळामध्यें बसलेल्या मनोरूपी अंध आणि मूक सर्पालाहि आळा घालूं शकत नाहीं, अशा मूर्खाला

कोण कसा उपदेश करणार ? वस्तुतः जें मन नाहींच तें जिंकल्यासारखेंच आहे. कारण, जी शिला विद्यमान नाहीं ती आपणाजवळून दूर फेंकल्यासारखीच आहे. ज्या दुर्बुद्धि मनुष्याला हें मिथ्या मन जिंकतां येत नाहीं, तो प्रत्यक्ष विषप्राशन न करतांहि विषानें मूर्च्छित होऊं शकेल. आतां हें मन वस्तुतः नाहींच असें मीं जें म्हटलें, तें अधिक स्पष्ट करून सांगतों. मनाचें अस्तित्व कशाकरितां मानावयाचें ? तें विषयज्ञानाकरितां हवें, कीं स्पंदाकरितां हवें, कीं ज्ञानेंद्रियें आणि कर्मेंद्रियें यांच्या सिद्धीकरितां हवें ? परंतु यांपैकीं एकाच्याहि सिद्धीकरितां त्याच्या अस्तित्वाची गरज नाहीं. कारण, प्राणांनीं प्रेरणा केलेल्या इंद्रियांनीं जवळ आणलेल्या विषयांचें ज्ञान सर्वदा साक्षिरूपानें असणाऱ्या आत्म्याला होणें शक्य आहे. अशा स्थितींत मनाचें अस्तित्व मानण्याची आवश्यकता ती कोठें उरली ? आतां या ठिकाणीं कोणी कदाचित् असें म्हणेल कीं, 'प्राण, इंद्रियें, चिदात्मा इत्यादि भिन्न भिन्न शक्तींची कल्पना सोडून एका मनाची कल्पना केली व तें सर्वशक्तिसंपन्न आहे असें मानलें, तर त्यांत काय बिघडलें ?' परंतु हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण, स्पंद ही प्राणाची शक्ति आहे, ज्ञान ही चिदात्म्याची शक्ति आहे, व विषयांशीं संबद्ध होणें ही इंद्रियांची शक्ति आहे. तेव्हां या शक्ती भिन्न भिन्न असल्यामुळें त्या एका जड मनामध्यें कशा असूं शकतील ? यास्तव सर्वव्यवहारशक्ती सर्वनिर्माता जो परमेश्वर त्याच्याच अंशभूत आहेत असें मानलें, म्हणजे मन म्हणून एक निराळी शक्ति आहे असें मानण्याचें कारण नाहीं. आतां जीव हा अधिष्ठाता असून तो चित्तरूपी लगामावांचून इंद्रियांचें नियमन करूं शकणार नाहीं असें म्हणशील, तर यावर मी असें विचारतों कीं, ज्यानें सर्व जग आंधळें केलें आहे असा जीव, हा आत्म्याव्यतिरिक्त दुसरा एखादा चेतन पदार्थ आहे असें मानावें, तर आत्म्यावांचून दुसरा कोणताहि चेतनपदार्थ नाहीं, असें श्रुतींचें स्पष्ट सांगणें आहे. बरें जीव अचेतन आहे असें म्हणावें, तर तो इंद्रियांप्रमाणें जड ठरूं लागेल; व मग त्याच्याकडे इंद्रियांचें अधिष्ठातृत्व कसें येणार ! अर्थात् जीव आणि चित्त हीं दोन्हीहि असत् आहेत हें लक्षांत ठेव.

रामा ! स्वकल्पित मनानें ज्यांच्या परमार्थदृष्टीला जाळून टाकलें आहे, अशा जीवांची दुःखपरंपरा पाहून मला अतिशय दुःख होतें; आणि कितीहि विचार केला तरी त्यांच्या दुःखनिवारणाचा उपाय सुचत नाहींसा होऊन बुद्धि भांबावल्यासारखी होते ! असें कां होतें म्हणशील, तर एखाद्या कारणानें एखाद्या मनुष्याला दुःख होत असलें, तर तें कारण नाहींसें केलें म्हणजे त्या दुःखरूपी कार्याचा नाश होऊं शकतो. पण मूर्खांचें दुःख निर्निमित्त असल्यामुळे तें दुर्निवार आहे ! अथवा मूर्खांच्या दुःखाबद्दल खेद तरी कां करावा ? गर्दभांना ज्याप्रमाणें ओझें वहाण्याचें दुःख भोगण्याकरितांच उत्पन्न करण्यांत आलें आहे, त्याचप्रमाणें मूर्खांचा जन्महि दुःख भोगण्यासाठींच आहे. यास्तव त्यांच्याबद्दल खेद करीत न बसतां त्यांची उपेक्षा करणेंच युक्त होय. पापी जन पाण्यावरील असंख्य बुडबुड्यांप्रमाणें प्रतिक्षणीं उत्पन्न होत असून त्यांचा जन्म, दुःख आणि नाश यांच्याकरितांच असतो. रामा ! जगांत एखादाच मनुष्य दुःखी असता, तर त्याच्याबद्दल वाईट वाटलें असतें; परंतु जेथें सर्वच दुःखीकष्टी तेथें खेद तरी कोणाबद्दल करावयाचा आणि कोणाबद्दल करावयाचा नाहीं ? प्रत्येक देशांतील पशुहिंसास्थानें पाहिलीं तर त्यांत किती पशूंची नित्य हत्त्या होत असते, याची

गणतीसुद्धां करतां येणें शक्य नाहीं. मग या असंख्य हतभागी पशूंबद्दल शोक तरी किती करावयाचा ? पृथ्वीवरील पशूंची गोष्ट बाजूला ठेवली, तरी भूमीपासून उद्भवणाऱ्या किडे. मुंग्या, माशा इत्यादि कोट्यवधि जीवांना वायु क्षणांत नाहींसे करीत असतो. अशा ह्या असंख्य जीवांबद्दल दुःख तरी किती करावयाचें ? सर्व दिशांकडे पाहिलें तर निरनिराळ्या अरण्यांतील पर्वतांवरून रहाणारे भिल्ल, मांग, वगैरे क्रूर रानटी लोक लक्षावधि पशूंची शिकार करतात; व त्यांच्याबद्दल तरी खेद किती करणार ? प्रबलांकडून दुर्बलांना पीडा व्हावयाची, असा या सृष्टींतील नियमच आहे. याचीं उदाहरणे जगांत सर्वत्र दिसून येतात. तीं कशीं तें पहा. जलांतील मोठाले जलचर आपणांपेक्षां लहान जलचरांना खाऊन टाकतात; अणूसारख्या सूक्ष्म लिखांना माशा गट्ट करतात; त्या माशांना कोळी आपल्या जाळ्यांत पकडतो; कोळ्याला वनमक्षिका भक्षण करतात; वनमक्षिकेला बेडूक खाऊक टाकतो; बेडकाचा समाचार सर्प घेतो; सर्पाला गरुड किंवा मुंगुस मारतो; मुंगसाला मांजर पकडतें; मांजराला कुत्रा धरतो; कुत्र्याला अस्वल मारतें; अस्वलाला वाघ खाऊन टाकतो; वाघाला सिंह मारतो; सिंहाला शरभै ठार करतो व तो शरभहि आकाशांत मेघगर्जना होतांच उंच उड्या मारूं लागतो व अशा रीतीनें आकाशांत उड्डाण करतां करतां अखेर एखाद्या दगडावर आपटून मरून जातो. मेघाला वायु उडवून लावतो; वायूची गति पर्वत कुंठित करतात; वज्र पर्वतांचें चूर्ण करतें; व तें वज्र इंद्राच्या ताब्यांत असतें. इंद्र हा विष्णूच्या ताब्यांत असतो; कारण, त्यानेंच इंद्राला त्रैलोक्यनाथ केलें आहे. आतां विष्णु तरी सुखी असेल असें म्हणावें, तर तसेंहि दिसत नाहीं. तोहि मत्स्यकूर्मादि अवतार धारण करतो आणि सर्व जीवांच्या शरीरांत प्रवेश करून तोच सर्व संसारदुःखें भोगीत असतो. मोठमोठीं धिप्पाड शरीरें, तसेंच विद्या आणि शस्त्रास्त्रें यांनीं युक्त असलेल्या जीवांना उवा, ढेंकूण, पिसवा इत्यादि प्राणी नेहेमीं त्रास देतात. सारांश, हें प्राणिरूपी जंगल आधिभौतिक, आधिदैविक आणि आध्यात्मिक दुःखांनीं विदीर्ण व विशीर्ण झालेलें आहे. याप्रमाणें सर्व भूतजात एकमेकांना भक्षण करतात किंवा उत्तरकालीं भक्षण करण्याकरितां त्यांचें रक्षण करतात.

या जगांत विविध भूतजाती एकसारख्या उत्पन्न होतात आणि नाश पावतात. जलामध्यें मासे, सुसरी वगैरे जलचर; भूमीमध्यें विंचू, सर्प वगैरे किडे; अंतरिक्षांत आकाशविहग नांवाचे क्षुद्रपक्षी; अरण्यांत सिंह, व्याघ्र, मृग इत्यादि पशू; प्राण्यांच्या शरीरांवर उवा, गोचीड वगैरे विचित्र किडे; वृक्षांमध्यें घुणा नांवाचे लांकडें पोखरणारे कीटक व भ्रमर; पाषाणांमध्यें बेडूक, व विष्ठेमध्यें किडे अशा अनेक प्रकारें अनेक ठिकाणीं प्राणी प्रतिक्षणीं उत्पन्न होतात आणि मरतात. तेव्हां असल्या असंख्य उत्पत्तिविनाशशील प्राण्यांविषयीं करुणावंत पुरुषानें हंसावें कीं रडावें ? अर्थात्, सतत उत्पत्ति व विनाश यांनीं युक्त असलेल्या या संसारांत कोणी कोणाविषयीं सुखदुःख मानूं नये, हेंच योग्य होय. झाडांवरील पानांप्रमाणें या जगांतील भूतपरंपरा पुनःपुन्हां उत्पन्न होतात आणि नष्ट होतात. सारांश, या जगांतील यच्चयावत् भूतांची करुणा करून त्यांचें दुःख निवारण करतां येणें शक्य नसतांहि भूतदयेची शेखी मिरविणारा एखादा पुरुष सर्वांचें दुःख नाहींसें करण्याचा प्रयत्न करूं लागला असतां तें त्याचें कृत्य आपल्या डोकीवरील छत्रीनें आकाशा-

१. शरभः--काल्पनिक हिंस्र पशु. याला आठ पाय असून तो सिंहाला ठार मारतो, असें वर्णन आहे.

तील सर्व उन्हाचें निवारण करण्यास तयार होण्याइतकें हास्यास्पद आहे ! राघवा, या जगांतील पशुतुल्य मूढांना उपदेश करण्यांत कांहींच अर्थ नाहीं. कारण, अरण्यांतील वृक्षाजवळ गोष्टी सांगत बसण्यापासून कोणता उपयोग होणार आहे ? ज्यांचें मन विषयांमध्येंच गढून गेलेलें आहे, असे मनुष्य आणि पशू यांच्यामध्यें वास्तविक काय फरक आहे ? फरक असला तर तो एवढाच कीं, पशूंच्या गळ्यांत दोराचें दावें असून त्यांच्या योगानें ते ओढले जातात व मूर्ख मनुष्य आपल्या मनाच्या पाशांत सांपडून त्याच्या योगानें हवेतसे आकृष्ट केले जातात. चित्तरूपी पंकांत रुतलेल्या आणि आपल्या नाशालाच कारणीभूत होणारीं कर्में करण्यांत दंग झालेल्या मूर्खांचें दुःख पाहून प्रत्यक्ष पाषाणसुद्धां शोक करतात; मग सचेतन मनुष्याला त्याबद्दल वाईट वाटेल, यात नवल काय ? ज्यांनीं आपल्या चित्ताला जिंकलेलें नाहीं, अशा मनुष्यांना दाही दिशा दुःखप्रद होतात. परंतु सर्व पृथ्वीवरील धूळ झाडून टाकणें ज्याप्रमाणें अशक्य आहे, त्याप्रमाणें त्या सर्वांचें दुःख निवारण करणें अशक्य आहे. यास्तव बा रघुनंदना ! ज्यांनीं आपलें चित्त जिंकण्याचा प्रयत्न सुरू केला आहे, अशांच्या दुःखांचा निरास करणें सुलभ असल्यामुळें ज्ञात्यानें असला प्रयत्न करणेंच योग्य आहे.

राघवा ! आतापर्यंत केलेल्या विवेचनावरून मनाचा वस्तुतः अभाव आहे, ही गोष्ट तुझ्या लक्षांत आलीच असेल. यासाठीं मनाच्या अस्तित्वाची उगाच कल्पना करीत बसून आत्मघात करूं नकोस. लहान मुलाला सांगितलेल्या कल्पित गोष्टींतील वेताळहि कल्पितच असतो. परंतु त्यामुळें मुलाची बोबडी वळते त्याप्रमाणें, मिथ्या मनाची कल्पना करून त्याला सत्यत्व दिल्यानें मनुष्याचा घात होतो. जोंपर्यंत तुला आत्मतत्त्वाचें ज्ञान नव्हतें व तूं अज्ञानी होतास, तोंपर्यंत तुझा मनोरूपी सर्प फूत्कार करीत होता, तें ठीकच होतें. परंतु आतां तुला आत्मतत्त्व यथार्थरीतीनें ज्ञात झालेलें आहे; याकरितां संकल्पत्याग करून चित्ताला वृद्धिंगत होऊं देऊं नकोस. या दृश्यासंबंधानें संकल्प करून त्याचा आश्रय केलास, म्हणजे तूं सचित्त आणि बद्ध झालास; व दृश्यासंबंधानें संकल्प करीनासा होऊन त्याचा त्याग केलास, म्हणजे तूं अचित्त आणि मुक्त झालास म्हणून समज. या त्रिगुणात्मक मायेचा आश्रय केला असतां तो बंधाला कारण होतो, व त्या मायेचा त्याग मोक्षाला कारण होतो, हें ध्यानांत ठेवून मग तुला जें योग्य वाटेल तें कर. 'मी' आणि 'माझें' या आंतर आणि बाह्य दृश्यांचा त्याग कर; अर्थात्, तीं नाहींत अशी भावना करीत जाऊन पर्वताप्रमाणें अचल रहा. तुझा आत्मा आकाशाप्रमाणें अनंत आणि निर्मल आहे, याचें नेहमीं स्मरण करीत जा, रामा ! 'मी' आणि 'माझें' या द्वैतभावनेचा सर्वथा त्याग करून आत्मस्वरूपामध्यें सुस्थिर हो. कारण, मी व माझें या द्वैतभावनेचा निरास केल्यानंतर जें अवशिष्ट रहातें तेंच आत्मस्वरूप होय. द्रष्टा आणि दृश्य यांचा त्याग केला म्हणजे त्रिपुटीमध्यें अनुस्यूत असलेलें असें जें आत्मस्वरूप शिल्लक रहातें, त्याचीच निरंतर भावना करीत जा. तसेंच भोक्ता आणि भोग्य यांचा त्याग करून त्यांच्या दरम्यान असलेल्या केवळ भोक्तृत्वशक्तिस्वरूपी आत्म्याचें नेहमीं अनुसंधान करीत जा. रामा ! तूं जगांतील कोणत्याहि पदार्थांचा अनुभव घेत असतां विषयभूत असलेल्या त्रिपुटीचा त्याग करून तिला व्यापून रहाणाऱ्या केवळ स्वानुभवरूपतेचें हृदयांत ध्यान करून त्याच्याशीं तद्रूप हो. सारांश, जागृत, स्वप्न आणि सुषुप्ति या अव

स्थांनीं रहित असलेल्या आत्मस्वरूपाची भावना करीत जाऊन तूं आत्मस्वरूपांत स्थिर रहा. रामा! तूं जेव्हां आत्मसत्तेचा त्याग करून विषयांची भावना करतोस, तेव्हां तूं अति दुःखप्रद अशा चित्तदशेप्रत जाऊन पोहोंचतोस. यास्तव स्वरूपज्ञानरूपी युक्तीचा अवलंब करून हे महापराक्रमी रामा! तूं ह्या चित्ततेच्या शृंखला तोडून टाकून आपल्या आत्मसिंहाला चित्तरूपी पिंजऱ्यांतून मुक्त कर. आपल्या परमात्मदशेचा त्याग करून तूं जेव्हां विषयोन्मुख होत्साता विषयांचे संकल्प करूं लागतोस, तेव्हां तुला विषयांचा अनुभव येतो. जेव्हां विषयांच्या पूर्वानुभवामुळें चित्तांतील विषयसंस्कार जागृत होतो व त्यामुळें चित्त किंचित् स्थूल बनून आत्म्याहून निराळें होतें, तेव्हां विषयांचें पुनःपुन्हां मनन करीत जाऊन तें मन होतें; व हें मनच दुःखदायी आहे. यासाठीं मन हें आत्मव्यतिरिक्त आहे ही भावना सोडली व त्यांतील संकल्प नाहींसे केले, म्हणजे तें क्षीण होतें. हें सर्व जगत् आत्मा आहे, तद्व्यतिरिक्त दुसरें कांहीं नाहीं, अशा तऱ्हेचें ज्ञान अंतःकरणात उदित झालें, म्हणजे चेत्ता ( चेतविणारा ), चित्त ( उपाधि ), चेत्य ( चित्तवृत्तीला व्यापून रहाणारा विषय ) आणि चेतना ( वृत्ति ) हीं कोठें रहाणार ? अर्थात् या सर्वांचा क्षय होतो. 'मी शरीर आहें,' 'मी देहेंद्रियांचा अनुभव घेणारा जीव आहें' अशी भावना झाली कीं चित्ताचा उदय झाला व अनादि आणि अनंत असें दुःख बोकांडीस बसलेंच म्हणून समजावें! याच्या उलट 'मी ब्रह्म आहें व जीवादिकांना पारमार्थिक सत्ता नाहीं' असा अनुभवानें बुद्धीचा पूर्ण निश्चय झाला, म्हणजे चित्ताचा उपशम होऊन परमसुख प्राप्त होतें. राघवा! सर्व जग आत्मरूप आहे असा साक्षात्कार झाला म्हणजे चित्ताचें मिथ्यात्व अनुभवास आल्याशिवाय निःसंशय रहात नाहीं. एवंच, सत्यावबोध होऊन आपला आत्माच हें सर्व आहे असा वृत्तीमध्यें अनुभव बाणला, म्हणजे सूर्यप्रकाशानें अंधकार नष्ट होतो त्याप्रमाणें, मन आपोआप गलित होतें. जोंपर्यंत शरीरामध्यें मनोरूपी सर्प वास करीत आहे तोंपर्यंत मोठें भय आहे परंतु योगाभ्यासानें ह्या सर्पाला एकदां झुगारून दिला, म्हणजे मग भयाला अवकाश कोठून रहाणार? यास्तव रामा! भ्रांतीमुळें उत्पन्न झालेल्या ह्या अति बलाढ्य चित्तरूपी वेताळाला तूं सम्यक्ज्ञानरूपी मंत्रानें पुरा मारून टाक; व अशा रीतीनें हा बलवान् चित्तरूपी यक्ष देहरूपी घरांतून नाहींसा झाला, म्हणजे मग तूं सर्वदुःखरहित आणि उद्वेगरहित होशील व तुला कशापासूनहि भय उत्पन्न होणार नाहीं. यास्तव बा राघवा! आत्मज्ञानानें निष्काम होऊन बाह्य सुखसाधनांचा त्याग कर म्हणजे तुझी चित्तसत्ता नष्ट होईल; व अशा रीतीनें सर्व इच्छा नाहींशा करून तूं दुःखरहित अशा परमपदाप्रत जाऊन पोहोंच व त्याच स्थितीमध्यें निरंतर स्थिर रहात जा.

---

# सर्ग १५

—:*:—

**१. संसारामध्यें सर्व अनर्थांना कारणीभूत होणाऱ्या तृष्णेचें वर्णन.**

**श्रीवसिष्ठः**—रामा! चित्ताचा नाश झाला म्हणजे परम पुरुषार्थाची प्राप्ति होते, हें तुला कळलेंच आहे. आतां अपवित्र अशा चित्तसत्तेला अनुसरलें असतां कोणती अनर्थपरंपरा उद्भवते, याचें वर्णन करतों. आपली ब्रम्हात्मस्थिति टाकून संसार वृक्षाचें बारीकसें बीं, आणि जीवाला बांधण्याचें जाळें अशा मलीन चित्तसत्तेला सत्य मानून तिच्या मागोमाग आत्मा जाऊं

लागला, म्हणजे चित्तानें कल्पिलेला देहादि संघातच मी आहें, असें समजून चित्तानें आणलेल्या नानाविध विषयांसंबंधानें तो रागद्वेषादि मलिन वासना धारण करतो. तृष्णा ही झपाट्यानें वाढणाऱ्या विषवल्लीप्रमाणें असून भयंकर मोह आणि भय उत्पन्न करणारी आहे, ती विषयासक्त आत्म्याला मरणमूर्च्छादि हजारो दुःखें देण्यालाच कारणीभूत होते. महामोह उत्पन्न करणारी तृष्णा जेव्हां जेव्हां उदय पावते, तेव्हां तेव्हां वर्षाऋतूमधील काळोखी रात्र आकाशामध्यें विजा, मेघगर्जना, पर्जन्य वगैरे विकार उत्पन्न करते, त्याप्रमाणें ती अनंत आत्म्यामध्यें अनेक विकार उत्पन्न करते. कल्पांतकाळच्या अग्निज्वाला सहन करण्याला हरिहरादि देव समर्थ असतात, परंतु तृष्णाग्नीच्या ज्वालांची उष्णता सोसण्याला कोणीहि समर्थ नाहीं. तृष्णा ही एक अत्यंत तीव्र, कृष्णवर्ण दीर्घ आणि भयंकर अशी तलवार असून ती शीतल असतांहि दुःखरूपी फल देणारी आहे. राघवा! या जगांत जीं जीं महा भयंकर, चिरकाल टिकणारीं आणि दुर्निवार अशीं दुःखें आहेत, तीं तीं सर्व तृष्णावल्लीचीं फळें आहेत, हें लक्षांत ठेव. मनोरूपी बिळांत दडून बसलेली तृष्णारूपी लांडगी अदृश्य राहूनच मनुष्यांच्या शरीरांतील मांस, अस्थि व रुधिर खाऊन टाकते. ज्याप्रमाणें वर्षाऋतूमधील नदी क्षणांत वृद्धिंगत होते, क्षणांत क्षय पावते आणि क्षणांत मोठमोठ्या शिला व कांट्यांनीं युक्त असलेलीं अरण्यें यांच्यामध्यें प्रवेश करून त्यांना विदीर्ण करते, त्याप्रमाणें ही जड तृष्णा क्षणांत वृद्धि व क्षणांत क्षय पावते व अशा रीतीनें मनुष्यांचा नाश करते. तृष्णेच्या तावडींत सांपडलेला पुरुष दीन, उत्साहशून्य आणि निस्तेज होऊन अत्यंत नीच स्थितीप्रत जाऊन पोहोंचतो, तृष्णेनें मूढ बनून तो रडत बसतो व अखेरीस जमीनदोस्त होतो. ज्याच्या हृदयरूपी कोठारांत तृष्णारूपी काळी नागीण वावरत नसते, त्या पुरुषाचे प्राणवायू स्वस्थ असतात. ज्याच्या हृदयांतील तृष्णारूपी कृष्णपक्षांतील रात्रीचा क्रम अस्तंगत झाला, त्यामध्यें शुक्लपक्षांतील चंद्रकलांप्रमाणें पुण्यें वृद्धिंगत होऊं लागतात. जो पुरुषवृक्ष तृष्णारूपी कीटकांनीं पोखरलेला नसतो, त्याच्यावर पुण्यरूपी पुष्पें येऊन तो सदासर्वदा शोभिवंत दिसत असतो. परंतु जे पुरुष विवेकहीन असतात, अशांच्या चित्तारण्यांत हजारों लाटा आणि लक्षावधि भोंवरे यांच्या योगानें तुफान बनलेली तृष्णारूपी नदी वहात असते. जाळ्यामध्यें पकडलेल्या एखाद्या पक्ष्याला पाहिजे तिकडे नेतां येतें, त्याप्रमाणें तृष्णा ही सर्व लोकांना पक्षांप्रमाणें दोरीच्या पाशांत अडकवून द्रव्यार्जनाच्या आशेनें दारोदार भटकावयास लावते. द्रव्याचें रक्षण, व्यय व क्षय यांच्या चिंतेच्या रूपानें त्यांचीं पिसें उपटते व अखेरीस त्यांना ठार मारते. दयाविवेकादि गुण हे धर्मज्ञानाचे अंकूर असून ते जरा वर येतात न येतात, तों ही तृष्णा एखाद्या कठोर कुऱ्हाडीप्रमाणें त्यांच्यावर पडून त्यांना तोडून टाकते. ज्याप्रमाणें एखाद्या खळग्याभोंवतीं उगवलेल्या हिरव्यागार गवताच्या नादीं लागून हरिण त्यामध्यें पडतो, त्याप्रमाणें तृष्णेच्या मागें लागलेला मूढ पुरुष नरकाच्या अंधकूपांत पडतो. मनुष्याच्या हृदयांत वास्तव्य करणारी तृष्णारूपी हडकुळी पिशाची त्याला जसा आंधळा करते, तशी पूर्णावस्थेस पोंचलेली जराही मनुष्याला अंध करूं शकत नाहीं. हृदयरूपी घरट्यामध्यें वास करणाऱ्या या तृष्णारूपी दुष्ट घुबडीणीनें प्रत्यक्ष भगवान् विष्णूलाही वामन बनविलें! या हृदयस्थ तृष्णारूपी दोरीनें जखडलेला सूर्यसुद्धां देवांना प्राप्त होणाऱ्या सुखलवाच्या नादीं लागल्यामुळें आकाशांत प्रतिदिनीं भ्रमण करीत असतो. याकरितां जगांतील

सर्व प्राण्यांना दुःख देणारी आणि त्यांचे प्राण हरण करणारी तृष्णा नागिणीप्रमाणें महाभयंकर आहे. हें मनांत वागवून तिची संगति टाळावी. तृष्णेच्या योगानें वायू वहातात, पर्वत स्थिर असतात, पृथ्वी सर्व प्राण्यांना धारण करते आणि त्रैलोक्यसुद्धां तृष्णेमुळेंच धारण केलें गेलें आहे. सर्व लोकसमुदाय तृष्णारूपी चामड्याच्या वादीमध्यें ओंवले गेले आहेत; मात्र इतर कसल्याहि दोरीनें बद्ध झालेला मनुष्य त्या बंधांतून मुक्त होऊं शकतो, परंतु तृष्णेच्या बंधांतून कोणीहि सहसा मुक्त होऊं शकत नाहीं. यास्तव राघवा ! तूं सर्व संकल्पांचा त्याग करून तृष्णेच्या कचाटींतून आपली मुक्तता करून घे. तत्त्वतः मन हें नाहींच, हा सिद्धान्त मीं नुकताच अनेक युक्तींनीं प्रतिपादन केला आहे व मनच जर नाहीं तर तृष्णेला तरी अवकाश कोठून असणार ? यासाठीं हे महावीरा ! 'हा,' 'तूं,' 'मी' इत्यादि अज्ञानमय संकल्प चित्तांत आणूं नकोस. रामा ! ही अनात्म्याचे ठिकाणची आत्मभावना अनंत दुःखें प्रसवणारी असून तूं तिचा त्याग केलास, म्हणजे तुझी गणना तत्त्ववेत्त्यांमध्यें होईल. या अहंभावरूपी पापिणीला अहंभावत्यागरूपी कातरीनें छाटून टाक, म्हणजे बा भव्य रामा ! ज्या ठिकाणीं कोणत्याहि तऱ्हेचें भय स्पर्शहि करूं शकत नाहीं, अशा संसाराच्या अतीत असलेल्या ब्रह्मपदाप्रत तूं जाऊन पोहोंचशील व त्या ठिकाणीं स्थिर होशील.

---

# सर्ग १६

—:*:—

१. ध्येय आणि ज्ञेय वासनात्याग. २. जीवन्मुक्त आणि विदेहमुक्त यांचीं लक्षणें.

**श्रीरामः**—भगवन् ! अहंकारतृष्णेचें ग्रहण करूं नकोस असें जें आपण मला सांगितलें तें आपलें वचन स्वभावतःच गंभीर आहे. परंतु प्रभो ! या ठिकाणीं मला एक शंका आली आहे. ती अशी कीं, अहंकाराचा सर्वथा त्याग करावयाचा म्हणजे अर्थातच त्या अहंकाराला आश्रयभूत असलेल्या देहाचाहि त्याग करावा लागणार. कारण, प्राण आणि अहंकार हे एकरूप आहेत असें आपण मला नुकतेंच सांगितलें आहे. यास्तव अहंकाराचा त्याग म्हटला म्हणजे त्याबरोबर प्राणाचाहि त्याग ओघानेंच आला. ज्याप्रमाणें वृक्ष हा त्याच्या भक्कम खोडाच्या योगानें धारण केला जातो, त्याप्रमाणें हा देह अहंकारामुळें धारण केला जातो. अशी स्थिति असल्यामुळें वृक्षाचें खोड करवतीनें कापतांच तो खालीं पडतो, त्याप्रमाणें अहंकाराचा क्षय होतांच या देहाचा नाश होणें अपरिहार्य आहे. यास्तव मुनिवर्या ! मी या अहंकाराचा त्याग कसा करूं व त्याबरोबरच जिवंत कसा राहूं, हें मला कृपा करून सांगा.

**श्रीवसिष्ठः**—राजीवलोचना रामा ! तत्त्ववेत्त्यांनीं वासनात्याग दोन प्रकारचा सांगितला आहे. एक ध्येय व दुसरा ज्ञेय, **वासनात्याग.** यांपैकीं ध्येय वासनात्याग म्हणजे काय तें तुला प्रथम सांगतों. देहेंद्रियादि आणि अन्नपानादि सर्व पदार्थांचा समुदाय असा आत्मा मी आहें; हे सर्व पदार्थ माझ्या स्वरूपसिद्धीला निमित्तभूत असल्यामुळें हे माझें जीवित आहेत, यांच्यावांचून मी नाहीं व माझ्यावांचून हे नाहींत, अशा रीतीनें अहंपदासंबंधानें प्रथम निश्चय करून नंतर मनासह त्यांचें पृथक्करण केलें, म्हणजे मी चिदात्मा असून ह्यांचा माझा वस्तुतः कांहीं संबंध नाहीं, असा अनुभव येतो; व तदनंतर या भावनेचें निरंतर अनुसंधान करीत जाऊन बुद्धि स्वरूपनिष्ठ झाल्यामुळें सर्व

व्यावहारिक क्रिया लीलेनें होत असतां जो वासनात्याग होत असतो, त्याला ध्येय वासनात्याग असें नांव ज्ञाते पुरुष देतात. आतां ज्ञेय वासनात्याग म्हणजे काय तें सांगतों. सर्व जग एकसारखें ब्रह्मरूप आहे असा अपरोक्ष साक्षात्कार झाल्यानंतर ज्ञानभूमिकांच्या अभ्यासक्रमानें जो वासनाक्षय केला जातो व त्यामुळें पुरुष निर्मम, निरहंकार आणि निर्विकल्पसमाधिस्थ होतो, अथवा सर्व प्रारब्धकर्माचा क्षय झाल्यानंतर देहाचा त्याग करतो, त्याला ज्ञेय वासनात्याग असें म्हणतात. जो अहंकाररूपी वासनेचा त्याग करून प्रारब्धप्राप्त व्यवहार लीलेनें करीत असतो, त्याला ध्येय वासनात्याग करणारा जीवन्मुक्त हे नांव दिलें जातें. आतां मूलाज्ञानासह सर्व वासनांचा त्याग करून जो शांत झालेला असतो व जो केवळ चिन्मात्ररूप होतो, त्याला ध्येय वासनात्याग करणारा विदेहमुक्त म्हणतात. महात्म्या जनकासारखे सुजन ध्येय वासनात्याग करून लीलेनें व्यवहार करीत असतात. परंतु विदेहमुक्त महात्म्यांनीं ज्ञेय वासनात्याग केलेला असून ते देहाचा त्याग करून उपशमाच्या प्राप्तीनें परावर ब्रह्मामध्येंच लीन झालेले असतात.

राघवा ! आतां सांगितलेले हे दोन्ही त्याग एकसारख्याच योग्यतेचे आहेत. दोन्ही तऱ्हेचे पुरुष ब्रह्मामध्यें स्थित असतात व दोन्ही स्थितींत दुःखाचा अभावच असतो. त्या दोघांमध्यें फरक असला तर तो एवढाच कीं, विदेहमुक्त हा देहाचा त्याग करून मुक्त झालेला असतो किंवा देहांत असतांहि निर्विकल्पसमाधींत असून त्याला देहाचें भान नसतें; व जो जीवन्मुक्त असतो तो समाधिव्युत्थानकालीं व्यवहार करतांना दिसतो, परंतु त्याचें [1]परमात्मज्ञान त्या स्थितींतसुद्धां अखंडच असतें. जीवन्मुक्त हा देहयुक्त असूनहि मुक्त आणि विगतज्वर असतो, तर विदेहमुक्त हा देहत्याग करून मुक्त होतो व देहांत असतांहि वासनारहित असतो. रामा ! आतां समाधिव्युत्थानकालीं व्यवहार करणाऱ्या जीवन्मुक्ताचीं लक्षणें तुला सांगतों. यथाकालीं सुखदुःखें प्राप्त होत असतां जो हर्षविषादयुक्त होत नाहीं, त्याला जीवन्मुक्त असें म्हणतात. जो इष्टानिष्ट वस्तूंविषयीं रागद्वेषरहित असतो व केवळ निद्रित मनुष्याप्रमाणें सर्व व्यवहार करतो, अशा महात्म्याला जीवन्मुक्त ही पदवी दिली जाते. अमुक गोष्ट त्याज्य आणि अमुक ग्राह्य ह्या त्याज्यात्याज्यभावना ज्याच्या ठिकाणीं अस्तंगत झालेल्या आहेत व अहंममत्वादि वासना क्षीण झालेल्या आहेत, तो जीवन्मुक्त होय. तसेंच हर्षामर्ष, भय, क्रोध, काम इत्यादि दीन दृष्टींनीं जो आंतून व्याकुल होत नाहीं, तो जीवन्मुक्त समजावा. जागृतस्थितीमध्यें असतांहि ज्याचें चित्त सुषुप्तावस्थेप्रमाणें पदार्थांच्या आस्थेविषयीं आंतून शांत असतें, तसेंच जो सदासर्वदा पूर्णचंद्राप्रमाणें आल्हादयुक्त असतो, अशा पुरुषाला जीवन्मुक्त ही संज्ञा दिली जाते.

**श्रीवाल्मीकिः**—याप्रमाणें वसिष्ठमुनि भाषण करीत आहेत तों सूर्यास्ताचा समय झाल्यामुळें सर्व सभाजन आपल्या सायंकाळच्या क्रिया करण्याकरितां निघून गेले आणि दुसऱ्या दिवशीं सकाळीं आपले स्नानादि प्रातर्विधी

१. जीवन्मुक्त आणि विदेहमुक्त यांचें विस्तृत वर्णन तेजोबिंदूपनिषदामध्यें कार्तिकस्वामी व सदाशिव यांच्या संवादरूपानें आलें आहे. महोपनिषदामधील जीवन्मुक्ताच्या वर्णनांत तर योगवासिष्ठांतील या ठिकाणचे ३।४ श्लोक जसेच्या तसेच आले आहेत.

उरकून सूर्यकिरणांबरोबर सभास्थानीं येऊन दाखल झाले.

अकरावा दिवस समाप्त.

## सर्ग १७

—:*:—

१. ज्या निश्चयांमुळें जीवन्मुक्त बद्ध होत नाहीं आणि अज्ञजन बद्ध होतात त्यांचे वर्णन.

**श्रीवासिष्ठः**—रामा ! जे महात्मे विदेहमुक्त स्थितीमध्यें असतात, ते वाणीचा विषय होऊं शकत नाहींत. त्यांचें वर्णन करतां येत नाहीं. यास्तव मी आतां जीवन्मुक्त स्थितीचें वर्णन करीत आहें तें ऐक. आतां या ठिकाणीं कदाचित् तुला अशी शंका येईल कीं, ' जीवन्मुक्त जीं जीं वर्णाश्रमोचित कर्में करतात त्यांमध्यें कर्मफलांची तृष्णा त्यांच्या ठिकाणीं असेल, तर सामान्य अज्ञ मनुष्यांप्रमाणें त्यांना पुनःपुन्हां जन्म प्राप्त होणें अपरिहार्य आहे. बरें जीवन्मुक्ताच्या ठिकाणीं कर्मफलतृष्णा नसते असें म्हणणें असेल, तर त्याच्या मनांत कर्मप्रवृत्ति उत्पन्न होणेंच शक्य नाहीं.' परंतु ही शंका बरोबर नाहीं. कारण जीवन्मुक्त पुरुष वर्णाश्रमोचित किंवा स्वभावप्राप्त कर्में करतात ही गोष्ट खरी; परंतु त्यांच्या ठिकाणीं विषयास्वादनासंबंधानें मुळींच उत्साह नसतो व यामुळें यथोचित क्रिया होऊनहि त्यांची जीवन्मुक्तस्थिति कधींच भंग पावत नाहीं. बाह्यार्थ सत्य आहेत अशा दृढ भावनेनें विषयोपभोगांसंबंधानें तृष्णा उत्पन्न होऊन जें कर्म केलें जातें, तेंच प्राणिमात्रांच्या बंधाला कारणीभूत होतें, असें पूर्वाचार्य म्हणतात. जगांतील सर्व भोग्य पदार्थ अनित्य आहेत असा स्वानुभवपूर्वक बुद्धीचा पूर्ण निश्चय होऊन जिनें चित्तांतून सर्व भोगसंकल्प झुगारून दिले आहेत आणि जी केवळ लोकसंग्रहाकरितांच बाह्यतः व्यवहार करीत आहे, अशी वासना जीवन्मुक्तांच्या ठिकाणीं वास्तव्य करीत असते. राघवा ! बाह्य विषयांवर लंपट होणारी तृष्णा बद्ध समजली जाते व बाह्य आणि आंतर अशा सर्व विषयांपासून अलिप्त असलेली तृष्णा मुक्त समजली जाते. विषयप्राप्तीच्या पूर्वी आणि त्यांच्या नाशानंतरहि जी रागाविरहादि भावजन्य दुःखांपासून अलिप्त असते, इतकेंच नव्हे तर प्रत्यक्ष भोगकालींहि जी वृद्धिंगत होत नाहीं, ती मुक्त तृष्णा आहे असें तत्त्ववेत्ते जाणतात. परंतु याच्या उलट 'मला हें पाहिजे' अशी अंतर्यामीं भावना उत्पन्न करणारी तृष्णा किंवा वासना बंधनकारक असते. यास्तव महात्मे पुरुष सदसद्भावांतील तृष्णेचा क्षय करून जीवन्मुक्त पदाप्रत जाऊन पोहोंचतात. रामा ! तूं सुद्धां देहादिकांचा बंध व त्यांचा मोक्ष, सत् व असत्, तसेंच सुख व दुःख वगैरे कल्पना स्वप्नवत् मिथ्या आहेत असें जाणून त्याच्या संबंधाची आशा सोडून दे आणि एखाद्या महासागराप्रमाणें शांत स्थितीमध्यें रहा. आत्मा हा अजर आणि अमर आहे हें जाणून जरामरणादि शंकांनीं आपलें मन व्यर्थ कलुषित करून घेऊं नकोस.

आतां आशांचा समूळ त्याग कसा करावा तें सांगतों. राघवा ! हें पदार्थरूपी दृश्य तुझें नाहीं, तूंहि जीव नाहींस व हें सर्व परमार्थसत्य नसून त्याहून निराळें, अर्थात् तुच्छ आहे हें लक्षांत ठेव. हें विश्व वस्तुतः असद्रूप असतांहि तुझ्या आत्मस्वरूपामध्यें सद्रूपत्वानें भासत आहे. अशी स्थिति असल्यामुळें तुझ्या वास्तविक स्वरूपामध्यें तृष्णेचा संभवच नाहीं. रामा ! विचारी पुरुषाच्या मनांत चार प्रकारचा निश्चय उत्पन्न होत असतो, तो तुला सांगतों तो ऐक. पायांपासून डोक्यापर्यंत हा

जो माझा देह आहे तो आईबापांनीं निर्माण केला आहे, हा एक विचार होय. परंतु मिथ्या देहाला सत्यत्व देणारा हा निश्चय बंधालाच कारणीभूत होतो. देहेंद्रियादि सर्व भावांहून मी निराळा आहें व माझें स्वरूप केशाग्राहूनही सूक्ष्म आहे, हा दुसऱ्या प्रकारचा निश्चय सून तो ' त्वं ' पदार्थाच्या शोधनाला उपयोगी असल्यामुळें ज्ञात्या पुरुषांना मोक्षप्रद होतो. या जगांतील अनंत पदार्थांचा मी आत्मा आहें, मी अक्षय आहें व हें सर्व मीच आहे, हा तिसऱ्या तऱ्हेचा निश्चय असून त्यामुळें आत्म्याच्या परिच्छिन्न भ्रमाचा निरास आणि ' तत् ' पदार्थाचें शोधन होत असल्यामुळें तो निःसंशय मोक्षोपयोगी आहे. मी आणि हे जगत् अशीं दोन्हीं आकाशाप्रमाणे शून्यरूप आहेत, हा चवथा निश्चय असून तोहि मोक्षसिद्धि देणारा आहे. सारांश, या चार निश्चयांतील पहिला मलिन भावनेपासून उत्पन्न झालेला असल्यामुळें बंधाला कारण होत असून बाकीचे तिन्ही शुद्ध भावनेपासून उत्पन्न झालेले असल्यामुळें मोक्षप्रद होतात. आतां तृष्णेच्या दृष्टीनें विचार केला असतां पहिल्या निश्चयामध्यें तिचें स्वरूप अशुद्ध असल्यामुळें तिच्यामध्यें बंधाचें सामर्थ्य असतें, व बाकीच्या तीन निश्चयांमधील तृष्णेचें स्वरूप शुद्ध असल्यामुळें त्यांच्यामध्यें मोक्ष देण्याचें सामर्थ्य असतें व म्हणूनच त्यांचें वास्तव्य जीवन्मुक्तांमध्यें असतें. आतां हे तिन्ही निश्चय जरी चांगले आहेत तरी बा बुद्धिवान् रामा! त्यांतल्या त्यांत ' मीच हें सर्व आहें ' हा निश्चय मला अत्यंत प्रिय आहे. कारण, खालीं वर, आजुबाजूला, जिकडे पहावें तिकडे मीच आहें, अशा तऱ्हेचा अपरोक्ष साक्षात्कार मनुष्याला झाला म्हणजे मग विषादाला आणि बंधाला अवकाशच रहात नाहीं. या नित्य आत्म्याला शिव, पुरुष, ईशान हीं नांवें असून कित्येक मतवादी तर याला शून्य, प्रकृति, माया, ब्रह्म, विज्ञान इत्यादि नांवानें संबोधितात. हा आत्मा सदोदित, सर्वसत्य, नित्य आणि एकमेवाद्वितीय असून त्याच्याशिवाय दुसरें कांहीं नाहीं हें जगत् परमार्थस्वरूप दृष्टीनें भरलेलें आहे, दुसऱ्या कोणत्याही दृष्टीनें भरलेलें नाहीं. ज्याप्रमाणें समुद्र येथून तेथून पाण्यानें व्यापलेला असतो, त्याप्रमाणें पाताळापासून तों तहत स्वर्गापर्यंत, किंबहुना आब्रह्मस्तंबपर्यंत सर्वच आत्मा ओतप्रोत भरलेला आहे. सारांश, समुद्रांत लाटा वगैरे दिसल्या तरी तें सर्व पाणीच असतें, त्याप्रमाणें हें सर्व प्रमाणांनीं बोधित होणारें आणि नित्यसत्य असें ब्रह्मैक्यच आहे, तद्व्यतिरिक्त मिथ्या जगद्रूप म्हणून कांहीं नाहीं, ही गोष्ट सिद्ध आहे. ज्याप्रमाणें कडीं, कुंडलें, नूपुरें इत्यादि सुवर्णाचे अलंकार सुवर्णाहून भिन्न नसतात, त्याप्रमाणें तरु, तृण वगैरे कोठ्यावधि पदार्थ आत्म्याच्या पृथ्वीरूपाहून भिन्न नाहींत. परमात्म्याची अद्वैत शक्तिच अज्ञ जनांच्या दृष्टीला जगाची निर्माण करणारी द्वैताद्वैतरूप भासत असते. यास्तव रामा! तूं आपलें किंवा दुसऱ्याचें कार्य सफल झालें म्हणून हर्ष मानूं नकोस; अथवा ते विफल झालें तरी त्याबद्दल खेद करीत बसूं नकोस, व अशा रीतीनें आंतून ब्रह्माप्रमाणें अद्वैतपर रहा व बाह्यतः द्वैतपर रहा. कारण, व्यवहारकाळीं सुद्धां तूं अद्वैतपर राहूं लागलास तर जगद्व्यवस्था आणि धर्मशास्त्रादि आचारशास्त्रें यांना बाध येईल. यास्तव कर्मसृष्टीमध्यें तुझ्या ठिकाणीं द्वैत असणेंच युक्त आहे. सारांश अशा रीतीनें अंतरंग अद्वैतमय आणि बाह्यांग द्वैतमय राखून तूं ब्रह्माप्रमाणें द्वैताद्वैतमय रहात जा. व्यवहारदृष्टीनें द्वैतमय असावें असें मी तुला सांगितलें; परंतु अंतःकरणाची अद्वैतपरता

नाहींशी होऊन तूं द्वैतमय व्यवहार करीत राहिलास, तर मात्र बेसावधपणानें धांवत जाणारा हत्ती खोल खड्ड्यांत पडतो त्याप्रमाणें तूं संसाररूपी खोल आणि भयंकर दरींत पडशील, हें लक्षांत ठेव. बाबारे ! द्वैत हें मिथ्या चित्तानें कल्पिलेलें असल्यामुळें तें वस्तुतः संभवतच नाहीं. तसेंच आत्म्याच्या ठिकाणीं एकत्व हाहि गुण नाहीं; तर एकत्वाची कल्पना द्वित्वादि कल्पनांच्या निरासापुरतीच आहे. यास्तव एकत्वादि कल्पनाविरहित असलेलें अद्वैत हें स्वतःसिद्ध असें स्वरूप असून 'तेंचें सर्व जगद्रूप बनलें आहे' 'आत्म्यामध्यें वस्तुतः नानात्व नाहीं' इत्यादि श्रुति अन्वयव्यतिरेकानें त्या आत्म्याचें वर्णन करतात. 'मी' 'तूं' इत्यादि विभक्त रूपें वस्तुतः नाहींत, तर हें सर्व निर्विकार विज्ञानमात्रच आहे; व त्याचा साक्षात्कार झाला म्हणजे हें जग सदसद्विलक्षण आणि शांत आहे, असें तुझ्या अनुभवास येईल. ते तत्त्व सर्वश्रेष्ठ, अमृत, अनादि, सर्व प्रकाशाचें प्रकाशक, अजर, अमर, अचिंत्य, निष्कल, निर्विकार, इंद्रियजालरहित, जीवशक्तींचें जीवन, कल्पनाशून्य आणि सर्व कारणांचें कारण आहे. यास्तव बा रामचंद्रा ! अनंत अशा चित्प्रकाशामध्यें सतत उदित असणारें, नेत्रादि इंद्रियांच्या अनुभवाचें मूलबीज, स्वसंवेद्य आणि आनंदैकरस असें ब्रह्म तेंच 'तूं', 'मी' आणि हें सर्व जग आहे, असा तुझ्या अंतःकरणाचा दृढ निश्चय असूं दे.

---

# सर्ग १८

—:*:—

१. ज्या स्थितीमुळें आत्मवेत्ते पुरुष संसारांत असतांहि दुःखी होत नाहींत, त्या स्थितीचा उपदेश.

१ 'तस्मात्तत्सर्वमभवत् ।'

२ 'नेह नानाऽस्ति किंचन ।'

श्रीवसिष्ठः—पराक्रमी रामा ! ज्यांचें चित्त सदासर्वकाळ समाधिस्थितीमध्यें असतें, ज्यांची वृत्ति कामलोभादि विकारांनीं दूषित होत नाहीं व ज्यांचे लोकव्यवहार लीलेनें चालले असतात, अशा महात्म्यांच्या स्थितीचें मी आतां वर्णन करीत आहें तें ऐक. संसारांत विहार करीत असूनहि जीवन्मुक्त मुनी, जिच्या आरंभीं जन्मादि दुःखें असतात, मधल्या स्थितींत आध्यात्मिकादि संकटें असतात आणि अंतीं मृत्युनरकादि दुःखें भरलेलीं असतात, अशा सर्वथा विरस जगद्गतीकडे पाहून हंसत असतो. जीवन्मुक्त पुरुष ज्या ज्या काळीं जो जो व्यवहार उचित असेल तो तो करणारा, शत्रुमित्रादिकांचे ठायीं समदृष्टि ठेवणारा, ध्येय परमात्मस्वरूपाचें निरंतर अनुसंधान करून वासनात्याग करणारा, सर्वत्र उद्वेगशून्य, सर्वांचें हित करणारा, विवेकशील, प्रबोधरूपी उपवनांत विहार करणारा, सर्वातीत अशा पदाचा अवलंब करणारा, पूर्ण चंद्राप्रमाणें शीतलचित्त उद्वेगशून्य आणि प्रिय वस्तूच्या लाभानें फुगून न जाणारा असा असल्यामुळें संसारांत केव्हांहि खिन्न होत नाहीं. जो मनुष्य सर्व शत्रूंविषयीं आणि मित्रांविषयीं समचित्त, दया व दाक्षिण्य यांनीं युक्त आणि गुरुप्रभृतींची सेवा वगैरे प्राप्त कार्य करण्यांत तत्पर असतो, तो संसारांत दुःखी होत नाहीं. जो कशाचें अभिनंदन करीत नाहीं आणि कशाचा द्वेषहि करीत नाहीं, जो कोण त्याही गत गोष्टींचा शोक करीत नाहीं किंवा भविष्यकालीन गोष्टींची आकांक्षा धरीत नाहीं जो मितभाषी असतो व आवश्य कर्तव्याविषयीं आळस करीत नाहीं अशा मनुष्याला संसारांत दुःख प्राप्त होण्याचे कारण उरत नाहीं. जो सर्वांना प्रिय असेल तेंच बोलतो, विचारलेल्या प्रश्नाचें योग्य उत्तर देऊन चातुर्यानें त्याचें समाधान करितो, परंतु कोणी कांहीं

विचाराळें नसतां जो भाषण करीत नाहीं, तसेंच सर्व भूतांचा आश्रय जाणून जो त्यांना सुख देण्याचा यथाशक्ति प्रयत्न करतो, असा मनुष्य प्रपंचांत असला तरी दुःखी होत नाहीं. परमपदावर आरूढ झालेल्या जीवन्मुक्त पुरुषाला जगांतील लोकांची स्थिति तळहातावरील बेलफळाप्रमाणें स्पष्टपणें दिसत असते. या जगांतील यच्चयावत् लोक आशापाशांमध्यें गुरफटून गेलेले असून 'हें युक्त' आणि 'हें अयुक्त' या वैषम्यदृष्टीनें ग्रस्त झालेले आहेत, हें तो जाणतो व जगाची स्थिति क्षणभंगूर आहे, असें मनांत घेऊन तो आपल्या स्वरूपनिष्ठ आणि शांत बुद्धीमुळें जगाकडे पाहून हंसतो.

राघवा! ज्यांनीं चित्ताला जिंकलें आहे व ज्यांना परावर ब्रह्माचें ज्ञान झालेलें आहे, त्यांचा स्वभाव मी तुला सांगितला. परंतु ज्यांनीं आपल्या चित्ताला जिंकलेलें नाहीं व जे सदासर्वदा भोगरूपी चिखलांत रुतलेले असतात, अशा मूर्खांचे मनोरथ, भ्रांति, दुश्चेष्टा आणि दुःखवैचित्र्य अनंत असल्यामुळें त्यांचें वर्णन करण्यास आम्ही समर्थ नाहीं. कारण, स्त्रिया ह्या वास्तविक सुवर्णाप्रमाणें दिसणाऱ्या नरकाग्नीच्या ज्वाला असतां आणि विवेकबुद्धीचा अत्यंताभाव, पूर्व सुकृताचा प्रध्वंसाभाव व भावी सुकृत, तप, संयम वगैरेंचा प्रागभाव अशा तीन अभावांनीं संपन्न असतां त्या असल्या मूर्खांना प्रिय वाटतात. तसेंच अर्जन, पालन, व्यय आणि नाश ह्या चारी अवस्थांमध्यें ज्यापासून आयास व दुःख प्राप्त होतें, आणि ज्याच्यापासून कलहादिक अनर्थ उद्भवतात, अशा प्रकारच्या अनर्थकारक धनाविषयीं या मूर्खांची अतिशय आसक्ति असते. बरें, द्रव्यार्जन केल्यानंतर ब्रह्मयज्ञादि सत्कर्मे करून ते आत्महित साधतील म्हणावें, तर तसेंही होत नाहीं. कारण, त्यांचीं तीं सत्कर्मे फलाभिसंधियुक्त असल्यामुळें दंभ, मान, मद, मात्सर्य वगैरे दुराचार, आणि जन्ममरणादि सुखदुःखें यांनीं व्याप्त असतात. अशी स्थिति असल्यामुळें मूर्खांच्या स्थितीचें आम्हांला वर्णन करतां येणें शक्य नाहीं.

यास्तव राघवा! तूं ध्येयत्यागरूपी पूर्णदृष्टीचा अवलंब करून महात्म्यांच्या जीवन्मुक्त स्थितीमध्यें स्थिर राहून लोकांमध्यें विहार करीत जा; परंतु अज्ञजनांच्या मार्गांचें केव्हांहि अनुकरण करूं नकोस. अंतःकरणांतील सर्व आशा, विषयप्रीति आणि वासना यांना दूर झुगारून दे आणि बाह्यतः सर्व लोकव्यवहार करीत जा. बाहेरून उदार व सुंदर आचरण कर आणि अज्ञ जनांचा केव्हांहि बुद्धिभेद करूं नकोस परंतु आंतून सर्वसंगपरित्याग करून जगामध्यें वागत जा. सर्व संसारदशा, आणि अत्यंत श्रेष्ठ असें परमपद प्राप्त करून देणाऱ्या ज्ञानाच्या सप्तभूमिका यांचा चांगला विचार करून आणि सर्वश्रेष्ठ अशा ब्रह्मपदाचा अंतःकरणानें आश्रय करून लोकांत वाग. आंतून नैराश्याचा अवलंब कर, पण बाहेरून आशावान् असल्यासारखा वाग; तसेंच धनादिकांचा नाश झाला असतां आंतून शांत रहा, पण बाह्यतः संतप्त असल्याप्रमाणें आपलें वर्तन ठेव. बाह्यतः कोणत्याहि कार्यासंबंधानें कृत्रिम उत्साह धारण कर, परंतु आंतून कर्माचें मिथ्यात्व ओळखून त्यांपासून सर्वथा अलिप्त रहा. बाह्यतः कर्माचें कर्तृत्व धारण कर, पण अंतःकरणानें आत्म्याच्या अकर्तृत्वाचें अनुसंधान ठेवीत जा. व्यावहारिक आणि पारमार्थिक दृष्ट्या या जगांतील भावांमध्यें काय अंतर आहे, याचें रहस्य तुला आतां ठाऊक झालें आहे; अर्थात्, त्यांतील तारतम्याकडे नजर देऊन तुला योग्य वाटेल त्याप्रमाणें आपला वर्तनक्रम ठेवीत जा. आपल्या बाह्य व्यवहारांत कृत्रिम उल्लास, कृत्रिम हर्ष, कृत्रिम उद्वेग,

कृत्रिम निंदा, कृत्रिम आरंभ आणि कृत्रिम उत्साह दाखवीत जा; परंतु वृत्ति नेहमी आत्मानुसंधानपर राखून या विकारांचा आंत स्पर्शहि होऊं देऊं नकोस. मी रात्रीचा प्रकाशक आहें अशी आकाशांतील चंद्राला मोठी घमेंड असते; परंतु तो क्षयरोगानें निरंतर खंगलेला असतो व त्याच्या कपाळीं कृष्णवर्णाचा कलंक कायमचा लागलेला आहे. यास्तव रामा! तूं अशा चंद्राचें अनुकरण करूं नकोस तर अहंकाराचा त्याग करून सुप्रसन्न वृत्तीनें वाग आणि अशा रीतीनें सर्व जगाला अलंकृत कर. अंतःकरणांतील सर्व आशापाश तोडून टाक आणि सर्व वृत्तींमध्यें समत्व राखून आपल्या वर्णाश्रमाला, स्वभावाला किंवा राजधर्माला उचित असलेलीं कार्यें कर. कारण, पारमार्थिक दृष्टीनें विचार केला तर जीवाला बंध नाहीं आणि मोक्षहि नाहीं; तर संसाराचें परिवर्तन करविणारा हा गारुडविद्येचा प्रकार मिथ्याच उत्पन्न झाला आहे. ज्याप्रमाणें सूर्याच्या तीव्र प्रकाशामध्यें मृगजळाची भ्रांति उत्पन्न होते, त्याप्रमाणें आत्म्यामध्यें हें भ्रांतिमय जग मोहामुळें भासमान होत असतें. वास्तविक आत्मा हा वस्तुतः सर्वव्यापी, असंग आणि एकरूप असल्यामुळें त्याला बंध उत्पन्न होणार कोठून? व जर बंधच नाहीं तर मग त्याला मोक्ष तरी कसला? ही संसारभ्रांति तत्त्वज्ञानाच्या अभावीं उत्पन्न झाली असून रज्जूवरील सर्पभ्रांतीप्रमाणें तत्त्व कळतांच तिचा क्षय होतो. राघवा! तुझ्या ठिकाणच्या सूक्ष्मबुद्धीमुळें तुला आतां तत्त्वज्ञान आलें असून तूं निरहंकार झाला आहेस. यास्तव तूं आकाशाप्रमाणें निर्मल आणि निर्विकार रहा. देहादिकांचा तूं केवळ साक्षी आहेस, यासाठीं इष्टमित्र व बांधव यांच्यासंबंधाच्या ममत्वभावनेला फांटा दे. कारण, ज्यांना वास्तविक अस्तित्वच नाहीं, अशा सुहृद्बांधवांसंबंधानें ममत्व धारण करण्यांत काय अर्थ आहे? [ तुझें स्वरूप परमार्थतः सद्रूप असून तें अविद्या आणि तिचें कार्य यांच्याहून बलवान् आहे.] यास्तव मायारूपी परम कारणापासून उत्पन्न झालेला अनादि बंध टाकून दे. भोग, बांधवादि जगद्भाव, तसेंच शुभाशुभ कर्में यांचा वस्तुतः आत्म्याशीं यत्किंचितहि संबंध नाहीं; मग त्यांच्याबद्दल तूं व्यर्थ शोक कां करतोस? परमानंदस्वरूपी आत्मा हेंच माझें स्वरूप आहे, अशा तऱ्हेचें ज्ञान झाल्यामुळें तुला भय वाटण्याचें कांहीं कारण नाहीं; मग जगरूपी भ्रमाला विनाकारण कां भितोस? राघवा! या जगांत तुझा जर कोणी बंधुच नाहीं, तर त्यांच्या सुखदुःखांनीं सुखी किंवा दुःखी होणें युक्त आहे कां?

एवंच, आत्मा असंग असल्यामुळें तूं आपल्या बांधवांनिमित्त शोक करणें उचित नाहीं, असे सिद्ध झालें, आतां तो संगी आहे असें मानलें तरीहि शोक संभवत नाहीं. आत्मा नित्य असो, क्षणिक असो कीं, घटादिकाप्रमाणें कालांतरानें नष्ट होणारा असो; यापैकीं कोणताहि पक्ष घेतला तरी बंधुशोक उचित नाही. कारण, नित्यपक्ष स्वीकारल्यास तूं पूर्वजन्मीं होतास, हल्लीं आहेस आणि पुढेंहि असणार हें जर तुला पक्कें माहीत आहे, तर वर्तमानकाळच्या बांधवांसंबंधानें शोक कां करतोस? व मागच्या अनंत जन्मांतील बांधवांबद्दल शोक कां करीत नाहींस? बरें तूं पूर्वीं निराळा होतास, हल्लीं निराळा आहेस व पुढेंहि निराळा होशील, असें मानून आत्म्याचें स्वरूप क्षणिक आहे असें तुझें म्हणणे असलें, तथापि त्यांपैकीं कोणत्या सद्रूपाबद्दल तूं शोक करणार? जो आत्मा दरक्षणीं बदलणारा आहे, त्याच्या कोणत्या स्वरूपाबद्दल आणि कोणी शोक करावयाचा? आतां हा आत्मा पूर्वीं होता, सध्यां आहे, परंतु पुढें नष्ट होईल असे तुला वाटत

असलें, तरीहि त्याबद्दल तूं शोक करणें अयुक्त आहे. कारण, तसें झाल्यास सर्व संसारच नष्ट होईल; मग त्याबद्दल व्यर्थ शोक कां? सारांश, या जगाच्या रहाटीविषयीं दुःख किंवा हर्ष वाटणें योग्य नाहीं; तर मनुष्यानें नेहमीं वृत्तीचें समत्व राखून आपला प्राप्त व्यवहार करीत जावा. म्हणून म्हणतो कीं रामा! तूं कोणत्याही गोष्टीबद्दल सुखःदुख न मानतां सर्वत्र समबुद्धीनें वागत जा. कारण, सर्वत्र परमात्मतत्त्व ओतप्रोत भरलेलें आहे व तूंहि अनंत, सत्स्वरूप आकाशाप्रमाणें विस्तीर्ण, नित्यशुद्ध आणि अग्निज्वालेप्रमाणें अंतर्बाह्य प्रकाशमान असून तुझ्या स्वरूपामध्यें अज्ञानांधकार व दुःख यांना अवकाशच नाहीं. ज्याप्रमाणें मोत्यांच्या हारामध्यें सूक्ष्म दोरा अनुस्यूत असतो, त्याप्रमाणें जगांतील यच्चयावत् पदार्थांमध्य अव्यक्त आत्मस्वरूप ओतप्रोत भरलेलें आहे. रामा! ही संसारस्थिति पुनःपुन्हां उत्पन्न होते अशा तऱ्हेची भीति अज्ञजनांना वाटते, ज्ञात्यांना ही भीति बाळगण्याचें कारण नसते व तूं ज्ञानी असल्यामुळें ही भीति झुगारून दे आणि सुखी हो. या सृष्टीचें स्वरूप दुःखमय असून तें अज्ञानामुळें भासत असतें. परंतु तूं ज्ञानी असल्यामुळें तुला त्यापासून बाधा होणें शक्य नाहीं. ज्याप्रमाणें स्वप्नामध्यें स्वप्नावांचून दुसरें कांहीं असत नाहीं त्याप्रमाणें भ्रमामध्यें तरी भ्रमावांचून दुसरें काय असणार?

आतां 'हा जगताचा भ्रम असत्य असतां सत्य कसा दिसतो?' असें विचारशील, तर त्याचें उत्तर हेंच आहे कीं, सर्वशक्तिसंपन्न परमात्म्याचे हें सामर्थ्य आहे व त्यामुळें या व्यक्त जगदाकाराचा भ्रम उत्पन्न होतो. वास्तव या जगांत कोणी कोणाचा मित्र नाहीं व कोणी कोणाचा शत्रु नाहीं; तर त्या सर्वेश्वराच्या इच्छेनें शत्रु, मित्र व उदासीन हे संबंध भासमान होतात. ज्याप्रमाणें पाण्यांतील तरंग एकमेकांच्या उत्पत्तीला आणि नाशाला कारणीभूत होतात, त्याप्रमाणें या जगांतील सर्व भाव एकमेकांच्या आश्रयानें उत्पन्न होतात आणि नाहींसे होतात. गाडीच्या चाकाचा वरचा भाग खालीं येतो आणि खालचा भाग वर जातो, त्याप्रमाणें चक्रनेमिक्रमानें फिरणाऱ्या या संसारांतील सर्व पदार्थांची स्थिति आहे. स्वर्गांत असलेले जीव कालगतीनें नरकांत पडतात व नरकांत असलेले जीव कालांतरानें स्वर्गांत जातात. तसेंच एका योनींतील जीव दुसऱ्या योनीमध्यें आणि एका द्वीपांतील जीव दुसऱ्या द्वीपामध्यें जन्म पावतात. जे मानी असतात त्यांना दुसऱ्यापुढें याचना करण्याची पाळी येते व याचना करणें हेंच ज्यांचें शील आहे, अशानाहि कालांतरानें दुसऱ्यापुढें हात पसरण्याचें कारण उरत नाहीं. सारांश, अशा रीतीनें या जगांतील भूतमात्रांच्या स्थितींची उलटापालट होत असते. तात्पर्य, ज्याप्रमाणें अग्नीमध्यें हिमकण असणें संभवनीय नाहीं, त्याप्रमाणें या जगांतील पदार्थमंडल कधींकाळीं एकरूप, स्थिर, निर्मल आणि सुखदायी होईल, असें मानण्याचें कारण नाहीं. आज जे जे भाग्यशाली पुरुष आणि बांधव दिसत आहेत, ते ते कांहीं दिवसांनीं कां होईना, पण नष्ट झाल्याशिवाय रहाणार नाहींत. परता, आत्मीयता, अन्यता मीतूंपणा वगैरे भावना आकाशांतील दोन चंद्रांच्या देखाव्याप्रमाणें भ्रमरूप आहेत. यास्तव 'हा माझा बंधु' 'हा परका' 'हा मी' 'हे आपण' इत्यादि मिथ्या दृष्टी बा रामचंद्रा! तुझ्या मनांतून आतां समूळ नष्ट होवोत. व्यवहारांत वागत असतां तूं या मिथ्या दृष्टींचा लीलेनें स्वीकार कर; परंतु अंतःकरणांत त्यांना मुळींच थारा देऊं नकोस. हे सुव्रता! या संसारप्रवाहांत तूं अशा रीतीनें वाग कीं, ज्यामुळें डोईजड ओझ्याखालीं वांकून गेलेल्या मजुराप्रमाणें तूं वासनाभारानें श्रम पावणार नाहींस.

रामा ! ज्या ज्या मानानें वासनाक्षय करणारी विचारणा तुझ्या ठिकाणीं उदय पावत जाईल, त्या त्या मानानें तुझे व्यवहार क्षीण होत जातील. ' हा माझा बंधु ' आणि ' हा माझा बंधु नव्हे' ही विचारसरणी क्षुद्र पुरुषांच्या ठिकाणींच असते; परंतु उदारचरित महात्म्यांच्या बुद्धीवरील असल्या संकुचित भावनेचें आवरण नाहींसें होऊन त्यांची बुद्धि सर्वत्र सम झालेली असते. यामुळें ज्या ठिकाणीं मी नाहीं असें या जगांत एकहि स्थल नाहीं व जी माझी नाहीं अशी या जगांत एकहि वस्तु नाहीं, असा त्याच्या बुद्धीचा ठाम निश्चय झालेला असतो. ज्याप्रमाणें आकाशांतून पहाणाऱ्याला सर्व भूमि दिसत असते, त्याप्रमाणें स्वरूपनिष्ठ पुरुषाला ज्याचा कधीं उदय होत नाहीं व अस्तहि होत नाहीं, असें चिदाकाश सर्वत्र व्यापून राहिलेलें दिसतें. रामा ! या अनादि संसारामध्यें तुझे आजपर्यंत अनंत योनींमध्यें जन्म झालेले असल्यामुळें संपूर्ण भूतमात्र तुझे बांधव आहेत अथवा ते तुझे कोणी नव्हत. नाना योनींमधील शेंकडों विचित्र जन्मांनीं युक्त असणाऱ्या या जगांत ' हा माझा मित्र ' आणि ' हा माझा शत्रु ' अशा तऱ्हेची भेददृष्टि म्हणजे निवळ भ्रम होय. कारण जीवदृष्टीनें विचार केल्यास सर्वच तुझे बंधू आहेत; परंतु ब्रह्मदृष्टीनें विचार केल्यास तूंच सर्व असल्यामुळें कोणीहि तुझे बंधू होण्याला निराळे उरत नाहींत.

---

## सर्ग १९

—:०:—

१. पुण्य आणि पावन यांचें आख्यान. २ पितृशोकानें आर्त झालेल्या पावनाला पुण्यानें केलेला उपदेश.

श्रीवसिष्ठः—राघवा ! हा माझा बंधु ' नव्हे, या कथाप्रसंगानें दोघां ऋषिपुत्रांचा गंगानदीच्या तीरीं झालेला प्राचीन संवादरूप इतिहास सांगत असतात. तो आश्चर्यकारक आणि पावन संवाद मी तुला सांगत आहें,तो ऐक.

ह्या जंबुद्वीपाच्या एका भागांत लहान लहान डोंगरांनीं वेढलेला आणि अरण्यांनीं सुशोभित झालेला महेंद्र नामक एक पर्वत आहे. त्या पर्वतावरील कल्पवृक्षाच्या छायेंत मुनी आणि किन्नर विश्रांति घेत असतात. त्या पर्वताच्या उंच उंच शिखरांनीं आकाशालाहि जणुं जिंकलें आहे असा भास होतो. ब्रह्मलोकापर्यंतच जणुं काय जाऊन पोहोंचलेल्या त्या पर्वताच्या शिखरांवरील गुहांतून संचार करणाऱ्या मुनींच्या सामघोषाच्या प्रतिध्वनीमुळें तो महेंद्र पर्वत गायनच करीत आहे कीं काय असें वाटतें. त्या पर्वताच्या शिखरांवरील नीलवर्ण मेघ आणि विद्युत्प्रकाश हे त्याच्या केशकलापाप्रमाणें दिसत असून पुष्पलतांवरील कुसुमें हीं त्या केशांमध्यें अंवतंसाप्रमाणें रमणीय दिसतात. तटांवरून उड्डाण करण्यास उत्सुक असलेल्या शरभांच्या गंभीर गर्जनेमुळें तो पर्वत आपल्या गुहारूपी मुखांनीं कल्पांतकाळच्या मेघांना जणुं वेडावीत आहे असें वाटे. त्याच्या गुहांतून वहाणाऱ्या निर्झरांचे प्रतिध्वनी समुद्राच्या जलकल्लोळांचे गंभीर ध्वनी आणि नृत्य यांनाहि लाजवीत होते. अशा त्या महेंद्र पर्वताच्या एका विस्तीर्ण आणि मनोरम रत्नशिखरावर मुनींनीं स्नानपानाकरितां स्वर्गंगा उतरविली होती. मेरुपर्वताप्रमाणें सुवर्णतट असणाऱ्या आणि पुष्पवृक्षांनीं गजबजलेल्या त्या मंदाकिनीचे तीरीं ज्याला परमात्मबोध झाला आहे आणि जो मूर्तिमंत तपाप्रमाणें दिसत आहे, असा दीर्घतपा नांवाचा उदारधी तपस्वी रहात असे. बृहस्पतीला ज्याप्रमाणें कच

या नांवाचा पुत्र होता, त्याप्रमाणें त्या दीर्घतपा मुनीला पुण्य आणि पावन नांवाचे दोन चंद्राप्रमाणें सुंदर पुत्र होते. तो मुनि आपले दोघे पुत्र आणि भार्या यांसहवर्तमान त्या नदीच्या कांठीं असलेल्या एका फलयुक्त वृक्षाखालीं रहात असे. राघवा ! अशा स्थितींत कांहीं काळ लोटल्यानंतर त्या मुनीचा वयानें ज्येष्ठ आणि सर्व गुणांनीं श्रेष्ठ असलेला पुण्य नांवाचा मुलगा तत्त्वज्ञानसंपन्न झाला. परंतु पावन मात्र अर्धवट फुटलेल्या कमलाप्रमाणें अपूर्ण ज्ञानी राहिला. तो अगदीं मूर्ख नव्हता ही गोष्ट जरी खरी, तरी परम पदाप्रत जाऊन न पोहोंचल्यामुळें तो मध्यंच लोंबकळत राहिला होता. असो.

तदनंतर मनुष्यजीविताची शंभर वर्षांची मर्यादा पुरी होताच त्या मुनीची देहलता आणि आयुष्य हीं क्षीण झालीं; व प्राण्यांनीं भरलेल्या आणि जरामरणादिकांनीं भीषण असलेल्या ह्या संसाराची प्रीति सोडून देऊन जरेनें जर्जर झालेल्या त्या मुनीनें कलनारूपी पक्षिणीच्या घरट्याप्रमाणें असलेल्या आपल्या देहाचा त्या पर्वतावरील गुहेमध्यें त्याग केला. ज्याप्रमाणें एखादा पाणक्या आपल्या खांद्यावरील कावडीचें ओझें घरांत टाकून देऊन शांत होतो, त्याप्रमाणें तो मुनि शांत झाला व पुष्पाचा सुगंध आकाशांत जातो त्याप्रमाणें चित्त निर्वासन झाल्यामुळें ज्या ठिकाणीं सर्व तऱ्हेच्या कल्पना शांत होतात आणि सर्व जीवचैतन्यें विषयरहित होतात, अशा परमपदाप्रत तो जाऊन पोहोंचला. नंतर त्या मुनीचा देह प्राणापानरहित झालेला आहे असें पहातांच त्याची भार्या देंठ तुटलेल्या कमलाप्रमाणें जमिनीवर पडली आणि तिला जरी कोणत्याहि तऱ्हेचा रोग झाला नव्हता किंवा जरा आली नव्हती, तरी पतीनें उपदेशिलेल्या आणि तिनें बहुत वर्षें अभ्यासिलेल्या योगसामर्थ्यामुळें, भ्रमरीनें कमलिनीचा त्याग करावा त्याप्रमाणें, तिनें आपल्या कुडीचा त्याग केला; व चंद्र अस्तंगत होतांच त्याची प्रभा त्याच्याबरोबर नाहींशी होते त्याप्रमाणें, पतीच्या मागोमाग ती मुद्धां ब्रह्मस्थितीप्रत गेली. अशा रीतीनें माता आणि पिता यांचा एकाच वेळीं देहान्त झाला, तरी त्यांचा ज्येष्ठ पुत्र पुण्य विवेकी असल्यामुळें व्यग्रचित्त न होतां त्यांचें और्ध्वदेहिक कर्म करूं लागला. परंतु पावन मात्र शोकमग्न होऊन अरण्यांतून इतस्ततः भटकूं लागला व आपल्या भावानें कसें धैर्य धरलें आहे, याचा यत्किंचितहि विचार न करतां एकसारखा रडत सुटला. पुढें त्या उदारधी पुण्यानें मात्यापित्यांची और्ध्वदेहिक क्रिया आटोपून पावनाचें सांत्वन करण्याकरितां अरण्यांत प्रयाण केलें व ज्या ठिकाणीं पावन शोक करीत बसला होता, त्या ठिकाणीं जाऊन तो आपल्या धाकट्या भावाला म्हणाला.

पुण्यः—बाळा पावना ! वर्षाकालीं मेघ भयंकर वर्षाव करून सर्वत्र अंधकार उत्पन्न करतात, त्याप्रमाणें तूं आपल्या नेत्रांतून अश्रुधारांचा पाऊस पाडून आपलें अज्ञान कां बरें वृद्धिंगत करीत आहेस ? महाबुद्धिवंता ! तुझा पिता तुझ्या मातेसह आपल्या मोक्षनामक परमात्मपदाप्रत जाऊन पोहोंचला आहे. परमात्मपद हें सर्व उत्पन्न होणाऱ्या प्राण्यांचें आश्रयस्थान असून ब्रह्मवेत्त्यांचें तर तें माहेरघरच आहे. मग तुझा पिता आपल्या स्वरूपाप्रत जाऊन पोहोंचला असतां तूं त्याच्याबद्दल व्यर्थ शोक कां करतोस ? ‘ हा माझा पिता ’ आणि ‘ ही माझी माता ’ अशा तऱ्हेची मोहजन्य भावना तूं धारण केली आहेस व याच भावनेमुळें शोक करण्याला योग्य नसलेल्या आपल्या पित्याबद्दल तूं विनाकारण शोक करीत

आहेस. ती तुझी माता नाहीं, तो तुझा पिता नाहीं व तूं त्यांचा एवढाच पुत्र आहेस असेंहि नाहीं. बाबा! तुझी मातापितरें आजपर्यंत हजारों झालीं आहेत व त्यांनाहि आजपर्यंत तुझ्यासारखे हजारों पुत्र झाले आहेत. ज्याप्रमाणें पाण्याच्या प्रवाहाला आश्रयभूत असलेलीं गंभीर स्थानें वनावनांतून अनेक असतात, त्याप्रमाणें तुझीं आजपावेतों शेंकडों मातापितरें होऊन गेलीं. नदीच्या पाण्यावर लक्षावधि तरंग उत्पन्न होतात, त्याप्रमाणें मनुष्यांना हजारों पुत्र होऊन गेलेले असतात. ज्याप्रमाणें लता आणि वृक्ष यांच्यावर असंख्य कळ्या आणि पानें उत्पन्न होतात, त्याप्रमाणें आमचीं मातापितरें आणि पुत्र लक्षावधि होऊन गेले आहेत. तसेंच प्रत्येक ऋतूमध्यें वृक्षांना अनेक फळें येतात, त्याप्रमाणे निरनिराळ्या जन्मांमध्ये प्राण्यांचे हजारो मित्र आणि बांधव होऊन गेलेले असतात. अशी वस्तुस्थिति असल्यामुळें मातापिता आणि पुत्र यांच्याबद्दल शोकच करावयाचा म्हटला, तर बाळा! जन्मजन्मांतरीं होऊन गेलेल्या लक्षावधि नातलगांबद्दल तरी शोक कां करूं नये? महाभागा! हा प्रपंच वास्तविक भ्रमरूप असतां सद्रूप भासतो. पण परमार्थदृष्टीनें पाहिल्यास तुझे कोणी बांधव नाहींत आणि मित्रही नाहींत. तसेंच मृगजळामध्यें पाण्याचा लवलेशही नसतो, त्याप्रमाणे व्यवहारतः जो जगांत नाश दिसतो, तो परमार्थदृष्टया मुळींच दिसणार नाहीं. या जगांत छत्रचामरयुक्त अशी जी राजलक्ष्मी तुला दिसते, तीहि स्वप्नवत् मिथ्या असून तिचें आयुष्य फार तर पांच चार दिवसांचें असते. यास्तव बाळा! तूं आपल्या मनांतील भ्रांति सोड आणि परमार्थदृष्टीचा अवलंब करून सत्य काय आहे, याचा विचार कर. वस्तुतः 'तूं' 'मी' ही भ्रांति आहे हें जाणून तिचा त्याग कर. 'हा गेला' 'हा मेला' ह्या कल्पना भ्रमामुळें सत्य वाटतात, पण वास्तविक त्या सत्य नाहींत. सारांश एखाद्या विस्तीर्ण वाळवंटाप्रमाणें आत्म्यामध्यें अज्ञानरूपी तापामुळें शुभाशुभरूपी लाटांनीं युक्त असलेलें हें संकल्पवासनारूपी मृगजळ अनंत रूपांनीं स्फुरण पावत असतें.

## सर्ग २०

—:*:—

१. पावनाच्या शोकमोहाचा परिहार करण्याकरितां त्याच्या व आपल्या अनेक जन्मांचें पुण्य वर्णन करतो.

**पुण्य**—बा पावना! तुझा पिता कोण, माता कोण, मित्र कोण आणि बांधव तरी कोण? हा पसारा तूं केवळ भ्रमानें कल्पिलेला असून निवेकरूपी वावटळींमुळें हे स्वजनरूपी धुळीचे कण कोठच्या कोठें उडून जातील. बंधु, मित्र, पुत्र यांच्यासंबंधाचा स्नेह, द्वेष, व मोह यांनीं युक्त असलेला हा प्रपंचरूपी रोग प्राणी आपल्या संकल्पानेंच उत्पन्न करतो. एखाद्या मनुष्यासंबंधानें बंधूची भावना केली, म्हणजे तो बंधु वाटूं लागतो आणि शत्रूची भावना केली, म्हणजे तो शत्रु आहे असें वाटूं लागतें. विषांत राहणाऱ्या किड्यांना त्यांच्या दृढभावनेमुळें विष हें अमृतासमान जीवनदायी होतें, परंतु तें इतरांचा प्राण घेतें. सारांश, संसार हा केवळ भावनेचा खेळ आहे. सर्वग आणि सद्रूप अशा एकीएक आत्मस्वरूपामध्यें वास्तविक 'हा आपला' आणि 'हा परका' ह्या भेदबुद्धीला अवकाश कोठून असणार? रक्त मांस आणि अस्थि यांच्या संघातरूप देहाहून निराळा असा जो चेतनस्वभाव 'मी' तो कोण आहे. याचा आपल्या मनानेंच विचार कर. पारमार्थिक दृष्टया विचार केला तर

ज्याला पुण्य हें नांव दिलें जातें, तो देह मी नव्हे व ज्याला पावन हें नांव दिलें जातें, तो देह तूंहि नाहींस; तर हा केवळ देहात्मताभ्रम आहे. तसेंच त्याच्या पिता, माता, बंधू वगैरेंच्या शरीरासंबंधानें विचार केला तर तीहि भ्रांतिमात्र आहेत. असेंच दिसून येतें. आतां माता पिता वगैरे नात्यागोत्याचीं माणसें चिदाकाशरूप आहेत असें तूं मानीत असशील, तर त्या अनंतरूपानीं विलसणाऱ्या चिदाकाशामध्यें ‘ हा माझा पिता ’ व ‘ ही माझी माता ’ असले भेदघटित संबंध मानण्याला जागाच नाहीं. बरें तूं लिंगदेहांना आपले आप्तबांधव मानून त्यांच्याबद्दल शोक करीत असतील, तर तसें करणेंहि अयुक्त आहे. कारण, तुझ्या आजपर्यंतच्या अनेक जन्मांमध्यें तुझे जे आप्तेष्ट होऊन गेले, त्यांच्याबद्दल तरी तूं शोक कां करीत नाहींस ? आजपर्यंत नद्यांचे पुष्पयुक्त तट, अरण्यें वगैरे अनेक स्थानांमध्यें आणि मृगादि अनेक योनींमध्यें तुझे किती तरी जन्म झालेले आहेत; मग त्या त्या ठिकाणच्या आणि त्या त्या योनींतील आपल्या बांधवांबद्दल तूं शोक कां करीत नाहींस? कमलवनांनीं प्रफुल्लित झालेल्या नद्यांच्या तीरांवरून तूं हंस झालेला आहेस व त्यावेळीं अनेक हंस तुझे बांधव झालेले होते; मग त्यांच्याबद्दल तूं शोक कां करीत नाहींस ! कित्येक जन्मांमध्यें तूं वृक्ष झाला होतास, तेव्हां वृक्षकोटींत असणाऱ्या तुझ्या असंख्य बांधवाबद्दल तूं शोक कां करीत नाहींस? मोठमोठ्या पर्वतशिखरांवरील गुहांमधून रहाणारे सिंह हेहि तुझे बांधव होते, मग त्यांच्याबद्दल तुला दुःख कां होत नाहीं ? अनेक नद्या व सरोवरें यांच्यामधील मासे तुझे बांधव होते, मग त्यांच्यासंबंधानें तुला खेद होत नाहीं हें कसें ? बाळा! आजपर्यंत तुझे किती तरी जन्म झाले आहेत आणि तूं किती योनी फिरला आहेस तें पहा. तूं दशार्ण देशांत कपिलवर्णाचा वनवानर झाला होतास, तुषार देशांत राजपुत्र झाला होतास, पुंड्र देशांत वनकावळा झाला होतास, हैहय देशांत हत्ती व त्रिगर्त देशांत गर्दभ झाला होतास. शाल्व देशांत कुत्रा व एका सरलवृक्षावरील पक्षी, विंध्य पर्वतावरील पिंपळ व लांकूड कोरणारा कीटक, मंदर पर्वतावर रानकोंबडा व त्या पर्वतावरील एका दरीमध्यें रहाणारा विप्र झालास. पुढें कोसल देशांत द्विज, वंग देशांत तित्तिरपक्षी व तुषार देशांत अश्व होऊन तुझा ब्रह्मदेवाच्या यज्ञांत बळी पडला. पुढें जो तूं विंध्यारण्यांतील एका ताडाच्या मुळांतील कीटक, उंबराच्या फळांतील मशक आणि विंध्यारण्यांत बगळा होऊन राहिलास, तोच सध्यां माझा धाकटा भाऊ झाला आहेस. एका वेळीं जो तूं हिमालय पर्वतावरील एका भूर्जवृक्षाच्या ढोलींत मुंगी झाला होतास, तोच सहा महिने उलटून गेल्यावर माझा कनिष्ठ भ्राता झालास. जो तूं आपल्या ह्या देशाच्या सीमेवरील एका कुग्रामाच्या बाहेर असलेल्या शेणाच्या राशींत विंचू होऊन राहिला होतास, तोच दीड वर्षाच्या अवधींत माझा धाकटा भाऊ झाला आहेस. पुलिंद नामक एका रानटी जातींतील एका स्त्रीच्या पोटीं जन्म घेऊन जो तिचें स्तनपान करीत होता आणि भ्रमराचा जन्म घेऊन अरण्यांतील कमलांत संचार करीत होता, तोच तूं सांप्रत माझा भाऊ झाला आहेस. बाळा! अशा रीतीनें तूं पूर्वी या जंबुद्वीपामध्यें हजारों योनींत जन्म घेतले आहेस. हे सर्व जन्म तुझ्या वासनेचीं फळें असून माझ्या ज्ञानदृष्टीनें ते मला दिसले व मीं ते तुला सांगितले. तुझ्याप्रमाणें माझेहि अज्ञानामुळें अनेक जन्म झाले आहेत व माझ्या ठिकाणच्या ज्ञानदृष्टीमुळें ते सर्व मला यावेळीं स्मरत आहेत. मी त्रिगर्त देशांत पोपट व त्या देशांतील एका नदीच्या कांठीं बेडूक झालों;

पुढें वनांत लावकपक्षी झालों व या अरण्यांत जन्माला आलों, विंध्यपर्वतावर पुलिंद ( भिल्ल ) जातींत जन्म पावलों, वंग देशांत वृक्ष होऊन राहिलों, विंध्य पर्वतावर उंट झालों, पुढें या अरण्यांत उत्पन्न झालों, हिमालयावर चातक झालों, पौंड्र देशाचा राजा झालों, कांहीं काळ सह्याद्रीवर व्याघ्र झालों, तो मी तुझा भाऊ आहें, दहा वर्षें गृध्रपक्षी झालों, पांच महिने नक्र झालों, शंभर वर्षें सिंह योनींत काढलीं, तुषार देशांतील राजाचा आंध्र नगरांतील मांडलिक झालों व अखेरीस श्रीशैलाचार्यांचा पुत्र होऊन सांप्रत तुझा ज्येष्ठ बंधू झालों आहें, व दंभानें ह्या गोष्टी सांगत आहें.

बाळा ! याप्रमाणें सर्व तऱ्हेचे संसार आणि त्यांमधील नानाविध आचार व चेष्टा हे जन्मभेदरूपी भ्रांतीचे विलास असून त्यांचें मला यावेळीं स्मरण झालें. प्राक्तनजन्मांच्या या इतिवृत्तावरून ही गोष्ट तुझ्या लक्षांत आलीच असेल कीं, आमचे आजपावेतों हजारों आईबाप आणि नातलग होऊन गेले आहेत. अशा स्थितींत त्यांपैकीं कोणाबद्दल शोक करावा आणि कोणाबद्दल करूं नये ? अर्थात् कोणाबद्दलहि शोक करूं नये हेंच उत्तम. कारण, ही जगताची नेहमींची चाल आहे. वृक्षांवर ज्याप्रमाणें असंख्य पानें येतात आणि गळून जातात, त्याप्रमाणें या संसारांत आपले अनंत आईबाप होतात आणि जातात. अशा स्थितींत बाळा ! या संसारांतील सुखाला आणि दुःखाला कांहीं प्रमाण आहे का ? यास्तव आपण सर्वांचा त्याग करून परंपदाचे ठिकाणीं स्थिर होऊं या. मनामध्यें स्थित असलेल्या 'मी' या प्रपंचभावनेचा त्याग करून ज्या ठिकाणीं आत्मवेत्ते जाऊन पोहोंचतात, त्या ठिकाणीं तूं जा. या संसारांत सदोदित उच्चनीच गतींनीं युक्त असलेलें अविश्रांत भ्रमण चाललेलें असतें, यास्तव विचारशील पुरुष त्याबद्दल कधीं शोक करीत नाहींत; तर केवळ निरभिमानवृत्तीनें जगांत रहातत असतात. यास्तव 'तूंहि भावाभाव आणि जरामरण यांनीं रहित असलेल्या आत्म्याचें अव्यग्रचित्तानें स्मरण कर; मूढ बनूं नकोस. बुद्धिवाना ! तुला दुःख नाहीं, जन्म नाहीं, माता नाहीं व पिता नाहीं. तूं आत्मा आहेस, तद्व्यतिरिक्त दुसरें कांहीं नाहींस. या संसारयात्रेमध्यें नटाप्रमाणें नानाविध हावभाव करणारे मूढ पुरुष आपणांस पुरुषार्थ साधण्याचें ज्ञान आहे असें समजतात. मध्यम प्रकारचे लोक स्वस्थ जो समय येईल, त्यांत पुरुषार्थ साधतात; परंतु जे तत्त्वज्ञ असतात, ते या संसारांत प्रेक्षकांप्रमाणें वागून नेहमीं सर्व व्यवहारांचें साक्षित्व करीत असतात; अर्थात्, इष्टानिष्ट वस्तूंबद्दल त्यांच्या ठिकाणीं रागद्वेष उत्पन्न होत नाहींत. रात्रीच्या वेळीं दिवा प्रकाश पाडीत असतो, पण मी प्रकाश उत्पन्न करणारा आहें हा अभिमान त्याच्या ठिकाणीं नसल्यामुळें तत्त्वतः तो प्रकाशक्रियेचा कर्ता नसतो; तद्वत् ज्ञानीसुद्धां लोकव्यवहारांत कर्ते असल्याप्रमाणें बाह्यतः दिसतात, परंतु आत्म्याच्या अकर्तृत्वासंबंधाचें त्यांचें अनुसंधान केव्हांहि नष्ट होत नाहीं. ज्याप्रमाणें हातातील आरसा किंवा रत्न यांच्यामध्यें आपल्या मुखाचें प्रतिबिंब दिसत असतें, पण तें प्रतिबिंब म्हणजे आपण नव्हे, हें आपण कधींहि विसरत नाहीं, त्याचप्रमाणें ज्ञानी लोकव्यवहार करीत असले, तरी मनानें त्यांच्यामध्यें कधींच आसक्त होत नाहींत. यास्तव बाळा ! तूं सुद्धां आपल्या मनातील सर्व एषणामय कलंक नाहींसा करून आपल्या शुद्ध बुद्धीच्या योगानें आत्मसाक्षात्कार करून घे आणि सर्व संसारभ्रमाचा सर्वथैव त्याग करून आत्मस्वरूपामध्यें स्थिर रहा, म्हणजे तुझ्या अंतःसमाधानाचा केव्हांहि भंग होणार नाहीं.

# सर्ग २१

—:*:—

१. तृष्णाचाशक्षय हाच मोक्ष २. आशांच्या योगानें चित्तवृत्ती उदित होतात. यास्तव आशारहित आत्मज्ञानी पुरुषाला मोक्ष आपोआप प्राप्त होतो.

**श्रीवसिष्ठः**—राघवा ! याप्रमाणे **पुण्यानें** आपल्या धाकट्या भावाला बोध केल्यानंतर त्याला आत्मज्ञान झालें आणि प्रभातकाळच्या प्रकाशाच्या योगानें सर्व भूतल सुशोभित दिसतें, त्याप्रमाणें **पावन** प्रबुद्ध झाल्यामुळे शोभूं लागला. नंतर ज्ञानविज्ञानपारंगत आणि सिद्ध झालेले ते दोघे बंधु प्रारब्धक्षय होईपर्यंत त्या अरण्यांत खुशाल संचार करीत राहिले. अशा रीतीनें कांहीं काळ लोटल्यानंतर तेल नाहींसें झालेला दिवा आपोआप विझून जातो त्याप्रमाणें प्रारब्ध सरतांच देहाचा त्याग करून ते दोघेजण निर्वाणपदाप्रत पोहोंचले. रामा ! पुण्य आणि पावन यांच्या या इतिहासांत वर्णन केल्याप्रमाणें जर स्थिति आहे, अर्थात् आपल्या प्राग्भुक्त देहांतील बंधू जर अनंत आहेत, तर त्यांमध्यें कोणी कोणाबद्दल शोक करावा आणि कोणी कोणाबद्दल करूं नये ? यास्तव बा रघुनंदना ! सर्व शोकांना मूलभूत असलेल्या या अनंत तृष्णांचा त्याग करणें हाच एक शांतीचा उपाय आहे; विषय संपादन करून तृष्णा वृद्धिंगत करणें हा शांतीचा उपाय खात्रीनें नव्हे. ज्याप्रमाणें अग्नीमध्यें इंधनें टाकीत गेल्यास तो एकसारखा वाढत जातो, परंतु इंधनें टाकण्याचें काम बंद केलें म्हणजे अग्नि आपोआप विझतो; त्याचप्रमाणें विषयांचें चिंतन करीत गेल्यानें चिंता वाढूं लागते, पण तें चिंतन थांबविलें म्हणजे चिंतेचाहि नाश झाल्याशिवाय रहात नाहीं. यास्तव राघवा ! तूंहि ध्येयवासनात्यागरूपी रथावर आरूढ होऊन करुणापूर्ण आणि उदार दृष्टीनें दीन लोकस्थितीकडे पाहून आपले प्रकृत व्यवहार करीत जा. रामा ! हीच निर्मल, निष्काम आणि निर्विकार अशी **ब्राह्मी स्थिति** असून ती एकदां मनुष्याला प्राप्त झाली, म्हणजे तो व्यवहारामध्यें चतुर नसला तरीहि कधीं मोहित होत नाहीं. **विवेक हा एक मित्र आणि परमार्थबोधरूपी बुद्धि हीच एक प्रियसखी यांना बरोबर घेऊन विहार करणारा पुरुष संसारांतील संकटांमध्यें केव्हांहि मोह पावत नाहीं. ज्याच्या योगानें सर्व धनांचा त्याग करतां येतो आणि सर्व बांधवस्नेहाला हृदयांतून हुसकावून लावतां येतें, अशा आत्मधैर्यावांचून कोणीहि स्वतःला संकटांतून तारूं शकणार नाहीं.** यास्तव वैराग्य, शास्त्रविचार आणि महत्त्वादि गुण यांच्या साहाय्यानें मनाची उन्नति करून आपणां स्वतःला आपत्तीमधून मुक्त करून घ्यावें. तुच्छ विषयांचा अभिलाप धारण न करण्यामुळें पुष्ट होणाऱ्या चित्ताला जें निरतिशयानंदरूपी फल प्राप्त होतें, तें त्रिभुवनाचें ऐश्वर्य हस्तगत झालें किंवा रत्नांचा कोश स्वाधीन झाला, तरी त्यापासूनहि प्राप्त होत नाहीं. उर्ध्वगति, अधोगति आणि इहलोकीं मरणपरंपरा यांना कारणीभूत होणाऱ्या विषयाभिलाषाच्या तावडींत सांपडून जे पुरूष पतन पावत नाहींत, त्यांचें मन नेहेमी गतज्वर, अर्थात् संतापशून्य असतें. ज्यांचें मन ब्रह्मामृतरसानें पूर्ण झालें, त्यांना सर्व जग अमृतरसानें ओतप्रोत भरलेलें दिसतें. कारण, उघडच आहे कीं, ज्यानें पायांत जोडा घातलेला आहे, त्याला सर्व पृथ्वी चर्माच्छादित असल्याप्रमाणें वाटते. मन वैराग्यानेंच पूर्ण होतें, आशावश झाल्यानें होत नाहीं. उलट आशेच्या योगानें शरत्कालांतील सरोवराच्या पाण्याप्रमाणें मन रिक्त

होत जातें. ज्यांचें चित्त आशापाशांमध्यें गुरफटून विवश बनलेलें असतें, त्यांचें हृदय अगस्तिमुनीनें प्राशन केलेल्या समुद्राप्रमाणे रिकामें होतें आणि त्यांतील लोभदैन्यादि दोष प्रकट होतात. ज्याचा चित्तवृक्ष धर्मज्ञान, वैराग्य, शांति, दांति इत्यादि पुष्पपल्लवादिकांनीं समृद्ध असून ज्याच्यावर तृष्णारूपी मर्कटी नृत्य करीत नसते, त्याचें अंतःकरणरूपी वन सुशोभित दिसतें. निःस्पृह पुरुषांना त्रिभुवन कमलबीजांतील कोशासारखें अल्प भासतें; शेंकडों योजनें विस्तीर्ण प्रदेश गाईच्या पावलाइतका क्षुद्र वाटतो आणि महाकल्पाची कालमर्यादाहि निमिषार्धाप्रमाणें अल्प वाटते. अपरिछिन्न ब्रह्मसुखाच्या दृष्टीनें त्रिभुवनांतील सर्व सुखें अत्यंत क्षुद्रच होत. निःस्पृह पुरुषांच्या अंतःकरणांत जी शीतलता वास करीत असते, ती चंद्रबिंब, हिमालयाची गुहा किंवा केळीचें अथवा चंदनाचें उद्यान यांमध्येंहि वास करीत नाहीं. निस्पृह मनुष्याचें मन जसें शोभतें, तसें पूर्ण चंद्राचें बिंब, क्षीरसागर किंवा लक्ष्मीचें मुखसुद्धां शोभत नाहीं. ज्याप्रमाणें चंद्राला मेघमाला, किंवा चुना लाविलेल्या भिंतीला काजळ मलिन करतें, त्याप्रमाणें मनुष्याच्या चित्ताला आशापिशाचिका दूषित करिते. चित्तरूपी वृक्षाच्या आशारूपी शाखा दिगंतराला आच्छादून टाकतात, परंतु त्या एकदां तोडून टाकल्या म्हणजे तो वृक्ष स्थाणुरूप, अर्थात् ब्रह्मरूप होतो. चित्तरूपी वृक्षाच्या तृष्णारूपी शाखा छिन्नभिन्न केल्यानंतर तो स्थाणुरूप बनला असतां त्याच्या खालीं असणाऱ्या धैर्यवृक्षाचा अंकुर वाढीस लागून त्याला शेंकडों फांद्या फुटतात. रामा! वैराग्य, जितेंद्रियत्व, द्वंद्वसहिष्णुता वगैरे गुणांनीं युक्त असलेल्या पुरुषाचा चित्तक्षय झाला, म्हणजे त्याला अविनाशी पदाची प्राप्ति होते. यास्तव राघवा! आशारूपी चित्तवृत्तींचा अंकुर तूं उद्भवूं दिला नाहींस, तर तुला जन्मादिकांचें भय बाळगण्याचें यत्किंचितही कारण नाहीं. चित्त विषयवृत्तिरहित करण्याचा अभ्यास करीत जाऊन तें एकदां अचित्ततेच्या स्थितीप्रत जाऊन पोहोंचलें म्हणजे पूर्ण मोक्षमयी सत्ता तुझ्या हस्तगत होईल. एखाद्या वेळीं घरांत चुकून घुबडीण शिरली तरी तेवढ्यानेंमृत्यु, दारिद्र्य, रोग इत्यादि अनर्थ उद्भवतात, तर मग चित्तरूपी घरांत घरटें करून निरंतर रहाणारी तृष्णारूपी घुबडीण सर्व अमंगल गोष्टींची समृद्धि करील, यांत आश्चर्य काय? **चिंतनाला वृत्ति असें म्हणतात व चिंतनाचा उद्भव आशेमुळें होतो.** यास्तव आशेचा समूळ त्याग करून निश्चिंतता प्राप्त करून घे. कारण, जो ज्या वृत्तीनें युक्त असतो तो तिचा क्षय झाला म्हणजे नष्ट होतो, असा नियमच आहे. यासाठीं चित्तोपशान्त्यर्थ चित्ताचें वृत्तिरूप असें जें चिंतन त्याचा क्षय करून टाक. वा राघवा! सर्व एषणांचा म्हणजे इच्छांचा त्याग करून आणि भवबंध तोडून मुक्तचित्त हो. मनामध्यें कुत्सित आशांचें प्राबल्य असणें हाच आत्म्याचा बंध असल्यामुळें मनांतील आशा समूळ नष्ट झाल्या असतां कोणता पुरुष मुक्त होणार नाहीं?

---

# सर्ग २२.

**१. बलीचें आख्यान. २. पाताळाचें वर्णन. ३. बलीचें राज्य व विरक्तचित्त झालेल्या बलीनें मेरुपर्वतावर केलेला विचार.**

**श्रीवसिष्ठः**—अथवा रघुकुलरूपी आकाशामध्यें पूर्णचंद्राप्रमाणें शोभणाऱ्या रामा! तूं बलीप्रमाणें अकस्मात् विचारसंपन्न होऊन ज्ञानवान् हो.

श्रीराम:—भगवन्! आपल्या कृपाप्रसादानें मी आपल्या हृदयात संपूर्ण मासल्य प्राप्त करून घेतलें असून मी आतां विमल अशा आत्मपदीं विश्रांति घेत आहें. शरत्कालीं आकाशांतील मेघ नष्ट होऊन तें अतिशय स्वच्छ होतें, त्याप्रमाणें माझ्या चित्ताकाशातून तृष्णारूपी काळेकुट्ट मेघ पार निघून गेले असून तें आतां अत्यंत निर्मल झालें आहे. सायंकाळ आकाशांत अमृतानें भरलेला, शीतलात्मा आणि मोठा तेजस्वी पूर्णचंद्र शोभत असतो, त्याप्रमाणें माझी स्थिति झाली असून मी अंतःकरणांत परम सुख अनुभवीत आहें. परंतु आपण शरणागतांच्या [illegible] उच्छेद करणारें वात्सल्ययुक्त असें आपलें भाषण कितीहि श्रवण केलें, तरी तृप्ति म्हणून होत नाहीं. यास्तव बलीला विज्ञानाची प्राप्ति कशी झाली तें सांगून माझा बोध वृद्धिंगत करावा, अशी माझी आपल्याला प्रार्थना आहे. कारण, नम्रभावनानें प्रश्न करणाऱ्या शिष्याला उपदेश करण्याच्या कामांत सज्जनांना कधींहि कंटाळा येत नाहीं, हें मला चांगलें माहीत आहे.

श्रीवसिष्ठ:—राघवा! बलीचा वृत्तान्त मी तुला आता सांगत आहें तो श्रवण कर; म्हणजे त्यावरून तुला शाश्वत असा तत्त्वबोध होईल.

या ब्रह्मांडकाशाच्या एका कोपऱ्यात भूलोकाच्या खालीं पाताल म्हणून एक विख्यात लोक आहे. त्याचा अंतर्भाग क्वचित् स्थळीं रसातळापासून उत्पन्न झालेल्या आणि अमूल्य किरणांनीं लिप्त झाल्यामुळें रम्य भासणाऱ्या [illegible] व्याप्त झाला आहे. तो [illegible], व्याकरण, छंदःशास्त्र इत्यादि शास्त्रांचें व्याख्यान करीत असताना हालणाऱ्या दांतांपासून दोन हजार जिव्हांनीं युक्त असलेल्या शेषादिकांच्या सर्पांनीं आणि त्यांच्या असंख्य मस्तकांनीं भरलेला असतो. कित्येक ठिकाणचा प्रदेश मेरुपर्वताप्रमाणें प्रचंड शरीरें धारण करणाऱ्या आणि बलात्कारानें यज्ञांतील हविर्भाग उचलून नेणाऱ्या दानवांनीं भरलेला असतो. त्या पातालांतील निरनिराळे भाग, ज्यांनीं आपल्या मस्तकशिखरावर भूमंडल धारण केलें आहे आणि ज्याचे दांत पर्वतावरील वृक्षाप्रमाणें दिसत आहेत, अशा दिग्गजांनीं व्यापलेले आहेत. कांहीं ठिकाणीं कट कट् असे घर्षणध्वनी चाललेले असून त्यामुळें तेथील भूतपरंपरा त्रस्त होत असते व पाताळांतील कांहीं खालच्या भागांतून नरकमंडलांतील दुर्गंधि पसरलेली असते. नरकप्रदेशापासून आपल्या या भूमंडलापर्यंतचीं सप्त पाताळें लोखंडी सळ[illegible]त [illegible]ल्याप्रमाणें दिसतात. त्या पाताळांतील कांहीं ठिकाणचे भाग मेरु आदिकरून रत्नमय पर्वतांच्या पायथ्यांनीं व्यापलेले आहेत, तर कांहीं भाग पातालांतील विवरांनीं व्यापलेले आहेत. ज्यांच्या चरणकमलाचे रजःकण सुरासुरांच्या मस्तकांवर विश्रांति पावत आहेत, अशा त्रैलोक्यवंदित भगवान् कपिलानें कांहीं भाग पवित्र केला आहे. तसेंच असुरांगनांनीं जमा केलेल्या पूजासाहित्याचा आणि क्रीडनसामग्रीचा अभिलाष धारण करणाऱ्या हाटकेश्वर शिवानें तेथील कांहीं भाग पावन केला आहे.

अशा रीतीनें असुरांच्या बाहुबलानें संरक्षित केल्या गेलेल्या त्या पाताळांत विरोचनपुत्र बलि राजा राज्य करीत होता. त्याचा दरारा एवढा विलक्षण होता कीं, देव, विद्याधर व नाग यांच्यासहवर्तमान प्रत्यक्ष देवराज इंद्रसुद्धां त्याच्या पुढें थरथर कांपे आणि डोळ्यांतून अश्रू गाळीत त्याच्या पादसंवाहनाची इच्छा करी. अखिल त्रैलोक्यांतील रत्नांचा तो जणुं कोश असून सर्व जीवांचा पालनकर्ता होता; तसेंच इंद्र, मनु, शेष वगैरे त्रैलोक्यपालांचा तो आधारस्तंभ होता; व

स्वतः हरि त्यांचें पालन करीत असे. त्या दानवराजाचें नांव कानीं पडतांच ऐरावताच्या गंडस्थळावरील मदजल शुष्क होऊन जाई व मंदराचा शब्द ऐकतांच सर्पांच्या नख्या आंखडून त्यांच्या अंगाला भीतीनें घाम सुटतो त्याप्रमाणे ऐरावताची स्थिति होई. तो रागावला असतां, त्याच्या प्रतापाच्या उग्र तापामुळें सप्तसमुद्र कल्पांतकालाप्रमाणें आटून जाण्याच्या बेतांत येत आणि त्यांचे जणुं विस्तीर्ण खड्डे झाल्यामुळें ते सहज मोजतां येत असत. त्यानें केलेल्या अश्वमेध यज्ञांतील धुरामुळें योगानें बनलेले मेघ आकाशांत जमून ते जणुं समुद्रांचें जल आटवून टाकीत व सर्व ब्रह्माण्डांतील प्राण्यांना कवचाप्रमाणें झांकून टाकीत. त्याच्या कठोर नेत्रकटाक्षामुळें पृथ्वीला आधारभूत असलेले कुलपर्वत थरथर कांपत आणि फलभारामुळें लता नम्र होतात त्याप्रमाणें, सर्व दिशा त्याच्यापुढें नम्र होत असत. एवंच, अखिल त्रिभुवनाला अलंकारभूत असलेल्या इंद्रादि देवानांहि ज्यानें लीलेनें जिंकलें आहे, अशा त्या दैत्यराजानें दहा कोटी वर्षे राज्यसुख भोगलें. अशा रीतीनें पाण्यातील भोंवऱ्यांप्रमाणें चंचल असलेलीं अनेक युगें उलटून गेलीं. तितक्या अवधींत देवासुरांचीं अनेक स्थित्यंतरें झालीं आणि त्या दानवाधिपतीनें त्रिभुवनांतील सर्व उत्कृष्ट भोग यथेच्छ भोगले. अखेरीस त्याच्या मनांत विषयोपभोगांसंबंधानें उद्वेग उत्पन्न झाला. एकदां मेरु पर्वताच्या शिखरावरील आपल्या रत्नजडित राजमंदिराच्या खिडकींत बसून संसारस्थितीसंबंधानें तो आपल्या मनाशीं विचार करूं लागला. तो म्हणाला:—"ज्याची शक्ति अकुंठित आहे असा मी, आतां आणखी किती दिवस ह्या साम्राज्याचा उपभोग घेणार ? आणि त्रिभुवनांत किती काल संचार करणार ? सर्व त्रैलोक्याला अद्भूत वाटणाऱ्या ह्या अफाट राष्ट्राचा आणि अनेक प्रकारच्या रमणीय विषयांचा उपभोग घेतल्यानें कोणता लाभ होणार ? आपातरमणीय म्हणजे सकृद्दर्शनीं मनोहर दिसणार, परंतु अखेरीस खात्रीनें क्षय पावणार असे हे सर्व भोग मी सतत भोगीत राहिलों, तरी त्यांपासून मला कोणतें शाश्वत सुख मिळणार ? पुनःपुन्हा तेच दिवस उगवतो आणि दिवस समाप्त होतांच पुन्हां तीच रात्र येते; तसेंच स्नान, भोजन, शयन वगैरे तीच तीच कर्मे पुनःपुन्हां करावीं लागतात. त्यांत नवीन असें कांहींच नसल्याकारणानें मला त्यांत सुख वाटेनासें झालें आहे. इतकेंच नव्हे, तर असल्या सुखाबद्दल लज्जा वाटूं लागली आहे. पुनःपुन्हां कांतेला आलिंगन देणें आणि पुनःपुन्हां तिचा उपभोग घेणें हा निवळ पोरखेळ असून मोठ्या मनुष्यांना त्याबद्दल लज्जाच वाटली पाहिजे ? प्रत्येक दिवशीं उपभोग [illegible] उत्पन्न करणारे तेच तेच व्यापार पुनःपुनः करण्याला शहाणा मनुष्य प्रवृत्त होतो, याबद्दल त्याला शरम कशी वाटत नाहीं ? पुन्हा दिवस, पुन्हा रात्र आणि पुनःपुन्हा तीच कार्यपरंपरा ही प्राज्ञ मनुष्याच्या दृष्टीनें विटंबनाच आहे असें मला वाटतें. ज्याप्रमाणें पाण्यावर लाटा उत्पन्न होण्याचा आणि त्या नाहींशा होण्याचा क्रम अविरत चाललेला असतो, त्याप्रमाणें मनुष्यप्राणी त्याच त्याच क्रिया पुनःपुन्हां करीत असतो. उन्मत्त मनुष्याच्या चेष्टाप्रमाणें किंवा बाललीलाप्रमाणें तीच क्रिया पुनःपुन्हा करण्यांत दंग झालेल्या प्राण्याला पाहून ज्ञान्याला हंसूं येतें. जी क्रिया [illegible] असतां कृतकार्य होऊन मनुष्याला पुन्हा [illegible] करण्याचें प्रयोजन रहात नाहीं, असा [illegible] विषय या जगांत आहे बरें ? हें कर्मांचें अवडंबर आम्ही किती काळ करीत बसणार ? व

त्यापासून अखेर फलप्राप्ति तरी काय होणार ? वस्तुतः हा कर्माचा पोरखेळ अर्थशून्य असला तरी त्याचा प्रवाह अनंत आहे व त्याच्या नादीं लागलेल्या मनुष्यांच्या पदरांत दुःखपरंपरेशिवाय दुसरें कांहीं पडणें शक्य नाहीं. सारांश ज्याची प्राप्ति झाली असतां कांहीं कार्य उरत नाहीं, अशा तऱ्हेचा कोणताहि पुरुषार्थ मला या जगांत दिसत नाहीं. यास्तव क्षणिक आणि तुच्छ विषयोपभोगावांचून या जगांत दुसरी कोणती अविनाशी आणि भव्य वस्तु आहे, याचा मी आतां विचार करतों."

अशा तऱ्हेचा विचार करून बलीनें लगेच ध्यान करण्याला सुरुवात केली. कांहीं वेळ आपल्या भुंवया वक्र करून विचार केल्यानंतर कांहीं आठवल्यासारखें होऊन तो पुन्हां आपल्याशीं बोलू लागला. तो म्हणालाः—

" हां आत्तां आठवलें ! सर्व आठवलें ! मी पूर्वीं आपला पिता भगवान् **विरोचन** यांना म्हटलें होतें कीं, ' भगवन् ! आपल्याला परावरब्रह्माचें पूर्ण ज्ञान आहे. यासाठीं संसारांतील सर्व दुःखांचा परिहार आणि सुखांची प्राप्ति करून घेण्यासाठीं जे जे भ्रामक व्यवहार केले जातात, ते ते ज्या ठिकाणीं शांत होतात आणि ज्याला संसारसीमेचा अंत हें नांव ज्ञात्यांकडून देण्यांत येतें, तें ठिकाण कोणतें ? तसेंच मनोमोह कोठें अस्तंगत होतो ? संपूर्ण एषणाकामना कोठें नष्ट होतात ? तसेंच पुनरावृत्तिरहित अशी विश्रांति कोठें मिळते ? या जगांत असें कोणतें सुख आहे कीं, जें प्राप्त झालें असतां त्या तृप्तीमुळें ब्रह्मलोकापर्यंत प्राप्त होणाऱ्या सुखांची इच्छा म्हणून रहात नाहीं ? या जगांत दर्शनार्ह असें काय आहे कीं, जें पाहिलें असतां पुन्हां या जगांत कांहीं पहाण्यासारखें रहात नाहीं ? माझ्या भोंवतीं असंख्य भोग पसरलेले आहेत ही गोष्ट खरी; परंतु विषयोपभोग हे सुखदायक नाहींत, ते सज्जनांच्याहि मनाला क्षुब्ध करून मोहांत पाडतात, असा माझ्या बुद्धीचा पूर्ण निश्चय झालेला आहे. म्हणून म्हणतों कीं, बाबा! ज्या ठिकाणचा आनंद अखंडित आहे आणि जेथें मला चिरकाल विश्रांति घेतां येईल, अशा तऱ्हेचें सुंदर स्थान कोणतें तें मला सांगा.' हें माझें भाषण ऐकल्यानंतर, ज्याला माझ्या पित्यानें स्वर्गांतून बलात्कारानें आणून आपल्या अंगणांत लावलें होतें, व ज्याच्या मुळाशीं चंद्रकिरणांबरोबर स्पर्धा करणारे पुष्पगुच्छ आणि फलसमूह यांचा खच पडला होता, अशा क्षीरसागरोत्पन्न कल्पवृक्षाच्या खालीं बसलेल्या माझ्या पित्यानें माझ्या भ्रमनिरासार्थ त्या कल्पवृक्षाच्या फळाप्रमाणें अमृततुल्य आणि अत्यंत मधुर असें जें भाषण केलें, तें सर्व मला या वेळीं आठवलें आहे."

# सर्ग २३

१. चित्तजयाचा उपाय सांगण्यासाठीं राजमंत्र्याचें उपाख्यान.

**विरोचनः**—बाळा ! एक मोठा विस्तीर्ण (मोक्षाख्य) देश आहे. त्यांत हजारों ब्रह्माण्डें मावतात. त्या देशांत जलाशय, समुद्र, पर्वत, वनें, तीर्थें, नद्या, सरोवरं, पृथ्वी, आकाश, अंतरिक्ष, वायु, चंद्र, सूर्य, लोकपाल, देव, दानव, भूत, यक्ष, राक्षस, गुल्म, वनश्रेणी, लांकूड, गवत, स्थिर व चर प्राणी, पाणी, अग्नि, दिशा, ऊर्ध्वभाग, अधोभाग, स्वर्गपातालादि लोक, प्रकाश, मी विरोचन, तसेंच इंद्र, हरि, हर वगैरे देव यांपैकीं कांहीं एक नाहीं. एक मोठा तेजस्वी राजा ( आत्मा ) त्या देशाचें राज्य करीत असतो. तो सर्वकर्ता, सर्वव्यापी आणि सर्व असून अगदीं स्वस्थ असतो. त्यानें आपल्या सर्व मंत्र्यांत श्रेष्ठ असा एक ( मन ) मंत्री

कल्पिलेला असून त्याच्याकडे सर्व राज्यकारभार सोंपविला आहे. तो मंत्रि कोणतेंहि अघटित कार्य घडवतो आणि सुघटित कार्य नाहींसें करून टाकतो. आणि तो स्वतः कशाचाहि उपभोग घेऊं शकत नाहीं व त्याला मुळींच ज्ञान नाहीं. परंतु स्वतः अज्ञ असतांहि तो राजाकरितां सर्व काहीं करीत असतो. अशा त्या मंत्र्याकडे सर्व कारभार सोंपवून तो राजा स्वतः एकान्तांत स्वस्थ बसून रहातो.

बलिः—बाबा ! आधिव्याधिरहित असा तो देश तरी कोणता ? तो कसा प्राप्त होतो ? व आजपर्यंत तो कोणाला प्राप्त झाला आहे का ? तसेंच तो मंत्री कोण ? व त्या पराक्रमी राजाचें नांव तरी काय ? आम्हीं लीलेनें त्रैलोक्य जिंकणारे असूनहि त्याला अद्याप जिंकलें नाहीं, एवढा महाबलाढ्य असा तो राजा कोणता ? देवांनाहि भय उत्पन्न करणाऱ्या ताता ! हें आख्यान मला सांगून माझ्या अंतःकरणरूपी आकाशांतील संशयमेघ नाहींसा करा.

विरोचनः—बाळा ! त्या राजाचा मंत्री एवढा पराक्रमी आहे कीं, लक्षावधि देव आणि असुर त्याच्यावर चालून गेले तरी ते त्याचा यत्किंचित् सुद्धां पराभव करूं शकत नाहींत. तो इंद्र नव्हे, यम नव्हे, कुबेर नव्हे; तो देव नाहीं किंवा असुरहि नाहीं. मग त्याला जिंकतां येणार कसें ? पण त्यानें मात्र सर्वांना जिंकलें आहे. त्याच्यावर तलवार, मुसल, प्रास, वज्र, चक्र, गदा वगैरे आयुधें दगडावर आपटलेल्या कमलांप्रमाणें कुंठित होतात. शस्त्रास्त्रें आणि शूरांचा पराक्रम यांचा तो विषयच होऊं शकत नाहीं. त्यानें सर्व देवासुरांना आपल्या अंकित करून टाकलें आहे. ज्याप्रमाणें कल्पांतकाळचा प्रचंड वायु मेरुपर्वतावरील वृक्षांना उलथून टाकतो, त्याप्रमाणें विष्णु नसतांहि त्यानें हिरण्याक्षादि प्रबल असुरांना जमीनदोस्त केलें आहे. सर्वांना विवेकाचा उपदेश करणाऱ्या नारायणादि देवांनाहि त्यानें स्ववश करून गर्भच्छिद्रांमध्यें घातलें आहे. मदनाजवळ जरी पांचच बाण आहेत तरी त्याला त्रैलोक्याचें आक्रमण करतां येऊन सार्वभौमपद पटकावतां आलें आहे, यांचें इंगित त्याच्या कृपाप्रसादांतच आहे. देवासुरांना पादाक्रांत करणारा, गुणहीन दुर्बुद्धि आणि दुराचारी क्रोधसुद्धां या मंत्र्याच्या प्रसादानेंच वृद्धिंगत होतो. हजारों देवासुरांचें जें पुनः पुन्हां रणकंदन माजतें, तो या कारस्थानी मंत्र्याचा केवळ खेळ आहे बाळा ! त्या मंत्र्याला जिंकतां येणें शक्य असेल, तर तें फक्त त्या राजालाच शक्य आहे; इतरांना तो पर्वताप्रमाणें अजिंक्य आहे. कधींकाळीं जेव्हां त्या राजाच्या मनांत त्याला जिंकण्याचें येतें, तेव्हां तो त्याला सहज जिंकतो. सर्व त्रिभुवनांतील वीराग्रणींनाहि चीत करणारा व त्यांना धापा टाकावयास लावणारा असा जो हा मंत्री त्याला तूं जिंकलेंस, तरच तूं खरा पराक्रमी असें मी समजेन. तो मंत्रिरूपी सूर्य उगवला म्हणजे त्रैलोक्यरूपी कमलसमूह प्रफुल्लित होतात आणि त्याचा अस्त झाला म्हणजे तेहि अस्तंगत होतात. सारांश, सर्वांना जिंकण्याप्रमाणें सर्वांना उत्पन्न करण्याचीहि शक्ति त्या मंत्र्याच्या ठिकाणीं आहे. तूं व्यामोहरहित आणि एकाग्र बुद्धीनें त्याला जिंकलेंस, तरच तूं खरा धीर पुरुष. त्याला जिंकलें म्हणजे सर्व लोकांना जिंकल्यासारखें होतें. त्याला जिंकलें नाहीं तोंपर्यंत सर्व लोक जिंकूनही कांहीं उपयोग नाहीं. यास्तव अनंत सिद्धी आणि शाश्वत सुख यांच्या करितां पाहिजे तितके कष्ट करावे लागले, तरी करून त्याला जिंकण्याचा प्रयत्न कर. कारण, त्या अति बलाढ्य मंत्र्यानें देव, दानव, दिग्गज, यक्ष, मनुष्य, शेषादि नाग, किन्नर वगैरे सर्वांसह हें त्रिभुवन लीलेनें जिंकलें आहे.

# सर्ग २४

—:*:—

१. राजदर्शन हाच त्या दुर्मंत्र्याला जिंकण्याचा आणि वैराग्य हाच राजदर्शनाचा उपाय.

**बलिः**—बरें ! तो महाबलवान् मंत्री कोणत्या उपायानें जिंकावा ? आणि एवढा हा महावीर्यवान मंत्री आहे तरी कोण ? तें सर्व मला कृपा करून सांगा.

विरोचनः—बाळा ! तो मंत्री अजिंक्य आहे असें जरी मीं सांगितलें, तरी कोणत्या उपायाचा अवलंब केला असतां त्याला लीलेनें जिंकतां येतें, हें मी तुला आतां सांगतो ऐक. पुत्रा ! त्या मंत्र्याला युक्तीनें कडण्याचा प्रयत्न केला तर तो क्षणांत वश होतो; पण युक्तीचा आश्रय न करतां नुसत्या आडदांडपणानें त्याला कह्यांत आणण्याचा प्रयत्न केला असतां एखाद्या खवळलेल्या सर्पाप्रमाणें तो आपल्या विषमय फूत्कारानें मनुष्याला दग्ध करून टाकतो. एखाद्या लहान मुलाच्या तंत्राप्रमाणें वागलें आणि त्याच्याशीं गोड बोलून त्याला थोडा खाऊ देत गेलें म्हणजे या युक्तीनें तें आपल्या तंत्र्यांत येतें, त्याप्रमाणें या मंत्र्याला मधून मधून विषयोपभोग देत गेलें आणि त्याच्या पुढें विषयदोषांचें वर्णन करीत गेलें, म्हणजे तो वश होतो; व अशा रीतीनें जे पुरुष त्याला युक्तीनें कह्यांत आणतात, तेच राजदर्शन आणि राजपदाची प्राप्ति करून घेण्याला समर्थ होतात. कारण, तो राजा आणि मंत्री यांचा संबंधच मुळीं असा विलक्षण आहे कीं, त्या राजाचें दर्शन होतांच त्याचा मंत्री आपोआप वश होतो आणि उलट त्या मंत्र्याला वश करून घेतला म्हणजे त्या राजाचें दर्शन होतें. अर्थात्, जोंपर्यंत त्या राजाचें दर्शन घडलें नाहीं, तोंपर्यंत त्याचा मंत्री जिंकला जाणें शक्य नाहीं व जोंपर्यंत त्या मंत्र्याला जिंकलें नाहीं, तोंपर्यंत राजाचेंहि दर्शन होणें शक्य नाहीं. जेथपर्यंत राजदर्शन झालें नाहीं तेथपर्यंत त्याच मंत्री रागद्वेषांच्या द्वारा अत्यंत दुःख देतो व जथपर्यंत मंत्र्याला जिंकलें नाहीं तथपर्यंत त्या राजाच्या दर्शनाची गोष्ट सुद्धां बोलावयास नको ! यास्तव राजदर्शन आणि त्या दुष्ट मंत्र्याला जिंकणें या दोन्ही गोष्टी साध्य करून घेण्यासाठीं एकाच वेळीं प्रयत्न करावा लागतो. ह्याचा उपाय म्हटला म्हणजे पौरुषप्रयत्न आणि हळूहळू अभ्यास हाच होय. व अशा रीतीनें तूं प्रयत्न करशील तर या दोन्ही गोष्टी साध्य होऊन तुला तो शुभ देश अनायासानें प्राप्त होईल. बाळा ! याप्रमाणें प्रयत्न करीत असतां ज्ञानरूपानें तुझा अभ्यास परिणत झाला, म्हणजे त्या देशाची प्राप्ति होऊन तूं देवेन्द्र आहेस तरी तुला यत्किंचितहि शोक करण्याची पाळी येणार नाहीं. त्या देशामध्यें कोण राहतात म्हणून म्हणशील, तर ज्यांचे सर्व आयास शांत झाले आहेत, सकल संशय निरास पावले आहेत आणि ज्यांच्या चित्तांत अखंड आनंद वास करीत आहे, असे सत्पुरुष त्या ठिकाणीं निरंतर विश्रांति घेत असतात.

बाळा ! ज्या देशाचें मीं आतां वर्णन केलें, त्याला मोक्ष असें म्हणतात. त्या देशांत दुःखाचें नांव सुद्धां ऐकूं येत नाहीं. सर्वपदार्थांत भगवान् आत्मा त्या देशाचा राजा असून मनाला त्या राजानें आपला शहाणा मंत्री म्हणून नेमला आहे. ज्याप्रमाणें मातीचा गोळा घटाच्या रूपानें आणि धूर मेघाच्या रूपानें परिणत होतो, त्याप्रमाणें सूक्ष्म वासनारूपानें मनामध्यें स्थित असलेलें हें विश्व स्थूलरूपानें परिणत होतें. अशा ह्या मनाला एकदां जिंकलें म्हणजे सर्व कांहीं जिंकल्यासारखें होतें आणि जें प्राप्तव्य आहे तें सर्व प्राप्त होतें. ह्या मनाला

जिंकण्याचें काम अत्यंत बिकट आहे, अर्थात्, त्याला युक्तीनेंच जिंकावें लागतें.

बलिः—भगवन्! चित्ताला जिंकण्याची जी युक्ति असेल ती मला अगोदर सांगा, म्हणजे त्या दुष्टाला मी सहज जिंकून टाकतों.

विरोचनः—पुत्रा! सर्व विषयासंबंधानें पूर्णपणें अनास्था असणें हीच मनोजयाची सर्वोत्कृष्ट युक्ति आहे. ह्या युक्तीचा अवलंब केला म्हणजे तिच्या योगानें मनोरूपी मदोन्मत्त हत्ती तावडतोब वठणीस आणतां येतो. ही युक्ति जशी अतिशय कठीण आहे तशीच अतिशय सोपी आहे. अनभ्यस्तांना ही युक्ति दुष्प्राप्य आहे, परंतु अभ्यासशील मनुष्यांना ती सहज प्राप्त होणारी आहे. या युक्तीचा क्रमाक्रमानें अवलंब केला आणि त्याप्रमाणें अभ्यास करण्याचा प्रयत्न केला, म्हणजे एखाद्या वलीला नेहेमी पाणी घालीत गेल्यानें ती वाढूं लागते त्याप्रमाणें, मनातील विषयांसबंधाची अरति वृद्धिंगत होत जाते. परंतु ज्याचें मन विषयलुब्ध झालेलें आहे आणि जो मनाला विषयांपासून पराङ्मुख करण्याचा अभ्यास करीत नाहीं, त्याला नुसती इच्छा करून कांहीं ही युक्ति प्राप्त होणार नाहीं. कारण, उघडच आहे कीं, शेतात धान्य न पेरता नुसती पिकाची इच्छा करण्याऱ्या शेतकऱ्याला त्याची प्राप्ति कशी बरें होईल? म्हणून सांगतों कीं, अभ्यासानें मनाला स्थिर कर. संसाररूपी खळग्यांत लोळत पडलेले जीव जोंपर्यंत विषयासंबंधानें विरक्त झाले नाहींत, तोंपर्यंत दुःख भोगीत रहातात. अर्थात्, अभ्यासावाचून विषयविरक्ति कव्हांहि उत्पन्न होणार नाहीं. कारण, एखादा मनुष्य अति बलवान् असला तरी तो मार्गक्रमणच करणार नाहीं, तर दुसऱ्या गांवाला जाऊन कसा पोहोंचणार? यासाठीं ध्येयवासनात्याग करूं इच्छिणाऱ्या मनुष्यानें एखाद्या लतेप्रमाणें अभ्यासानें विषयांसंबंधाची विरक्ति वृद्धिंगत करावी. मुला! पुरुषप्रयत्नावांचून हर्षामर्षविवर्जित असें नियामफल प्राप्त करून घेण्याचें दुसरें कोणतेंहि साधन या जगांत नाहीं. आता हे साधन दैवानेच प्राप्त होईल असें म्हणाल, तर दैव हें कांहीं देहामारखें द्रव्य नाहीं. ज्याला दैव किंवा भवितव्यता असें लोक म्हणतात, तें नियतिप्रयुक्त शुभाशुभकर्मच आहे. पूर्वकर्म अदृष्ट असल्यामुळें सामान्य दृष्टीचे पुरुष त्याला दैव हें नाव देतात; परंतु दिव्य शास्त्रीय दृष्टीचे पुरुष त्याला दैव हें नाव केव्हाच देत नाहींत. आता एखाद्याला कचित् प्रयत्नाशिवायच जीवन्मुक्तस्थिति प्राप्त झालेली दिसते, ही गोष्ट खरी. परंतु त्याच्या हर्षामर्ष-विनाशाला कारणीभूत असलेल्या कर्माचा क्षय त्याच्या अदृष्ट प्रयत्नांनीच झालेला असतो व तो प्रयत्न ज्याना दिसू शकत नाहीं असे मनुष्य त्याला दैव हें नाव देतात इतकेंच. अर्थात्, दैव हें सुद्धा नियतिरूप कर्मच आहे व तेंहि पौरुषप्रयत्नानें निःसंशय जिंकता येतें. ज्याप्रमाणें सूर्यकिरणाचें सम्यग्ज्ञान झाल्याबरोबर मृगजळाचा भ्रम नाहींसा होतो, त्याप्रमाणें आत्मज्ञान होताच दैवाचा भ्रमहि नष्ट होतो. ज्या ज्याप्रमाणें मनुष्य संकल्प करतो त्याप्रमाणें पौरुषप्रयत्नानें फलप्राप्ति होत असते व जें फल मनानें सुखप्रद मानलें तें सुखप्रद भासत असतें. कर्ता जो जीव तो आमच्या मतें मनच आहे. वास्तव तो जसजसा संकल्प करतो, तसतसें अनुभवास येत असतें. हें मन ज्या ज्या तऱ्हेच्या नियतीचा संकल्प करतें, त्या त्याप्रमाणें गोष्टी घडून येतात. निसर्गाच्या ठराविक नियमाप्रमाणें घडून येणाऱ्या किंवा त्याला अपवादभूत असलेल्या गोष्टी हा सर्व नियतीचा, अर्थात् मनाच्या संकल्पाचाच खेळ आहे. चित्त हें नियतियोजक आहे;

म्हणजे तें आपल्या संकल्पानुसार नियतीचें योजक होतें. अतएव, हा चित्तात्मा जीव मोक्षाधिकारी जन्मामध्यें आपल्या नित्यनियत परमात्मस्वरूपाचा अपरोक्षसाक्षात्कार करून घेऊन आणि त्याच्याशीं अखंड तदाकार होऊन आकाशांतील वायूप्रमाणें संगरहित जगत्कोशामध्यें स्वस्वरूपानें प्रकाशित होतो. क्वचित् समाधिव्युत्थानकालीं तोच जीव जेव्हां शास्त्ररूपी नियतीनें नेमलेलें वर्णाश्रमोचित कर्म अज्ञजनांच्या बोधाकरितां करीत असतो, तेव्हां याज्ञिक, शिष्ट, सदाचारप्रवर्तक वगैरे नांवांनीं तो विख्यात होतो. याचा अर्थ असा कीं, एखाद्या पर्वतावरील वृक्ष वाऱ्यानें हालूं लागले असतां तो अचल असतांहि हालल्यासारखा दिसतो व वृक्ष हालत नसले म्हणजे स्थिर दिसतो, तद्वत् अशा पुरुषाची स्थिति असते. यास्तव जोंपर्यंत मन आहे तोंपर्यंत दैवाचा किंवा नियतीचा आश्रय न करतां आतां सांगितलेल्या द्विविध स्थितीचा अवलंब कर व एकदां मन अस्तंगत झालें, म्हणजे त्यानंतर जी स्थिति असेल ती नित्यच आहे. जो जीव कर्मज्ञानाविकारसंपन्न अशा मानुष शरीरास प्राप्त होतो, तो जसजसे संकल्प करतो तसतसें घडून येतें. मुला ! पुरुषार्थावांचून या जगांत दुसरें कांहीं श्रेष्ठ नाहीं. यास्तव त्या श्रेष्ठ पुरुषार्थाचा आश्रय करून मनुष्यानें भोगांविषयीं विरक्त व्हावें. कारण, संसाराचा नाश करण्यास समर्थ असलेली भोगविषयक अरति जोंपर्यंत चित्तात उदित झाली नाहीं, तोंपर्यंत जयप्रद अशा पराशांतीची स्थिति मनुष्याला प्राप्त होणें शक्य नाहीं. जेथपर्यंत संमोह उत्पन्न करणारी विषयासक्ति चित्तांत कायम आहे, तेथपर्यंत संसारांतील दशांमध्यें आंदोलन पावण्याची चंचल स्थिति चुकणें अशक्य आहे, सारांश अभ्यासावांचून दुसऱ्या कोणत्याहि उपायानें भोगरूपी सर्पांनीं भरलेली ही दुःखदायक भवदशा निवृत्त होणें केव्हांहि शक्य नाहीं. यासाठीं वैराग्यादिकांचा दृढ अभ्यास कर.

**बलिः**—भगवन् ! नित्यात्मभाव प्राप्त करून देणारी भोगविषयक अरति माझ्या ठिकाणीं स्थिर कशी होईल ?

**विरोचनः**—ज्याप्रमाणें द्राक्षादि महालता शरत्कालामध्यें शलाटुसारखीं अवांतर फळें प्रसवतात, त्याप्रमाणें आत्मज्ञानरूपी मोक्षदायक लता वैराग्यादि इतर फळें प्रसवते. कमलाच्या गाभ्यामध्यें लक्ष्मी वास करते, तद्वत् आत्मदर्शनानें विषयांसंबंधाचें तीव्र वैराग्य हृदयांत स्थिर होतें. यासाठीं प्रज्ञारूपी रत्नाला विचाररूपी सहाणेवर घांसून आत्मदेवाचें दर्शन करून घेणें आणि विषयविरक्तीचा अभ्यास करणें ह्या दोन्ही गोष्टी मनुष्यानें एकाच वेळीं करीत जाव्या. आतां चित्तपरिपाकाच्या भेदानुसार अभ्यासाच्या भूमिका सांगतो. अव्युत्पन्न चित्ताला शास्त्रीय मार्गांत प्रवृत्त करावयाचें झाल्यास तें कार्य हळुहळु करावें लागतें. प्रथमारंभीं त्याला दिवसाचे दोन भाग विषयोपभोगांकरितां द्यावे, व तिसऱ्या भागांत त्याच्याकडून शास्त्रावलोकन आणि चवथ्यांत गुरुशुश्रूषा करवावी. अशा रीतीनें कांहीं दिवसांनंतर तें थोडें व्युत्पन्न झालें म्हणजे त्याला विषयसेवनाकरितां दिवसाचा फक्त एक भाग द्यावा, गुरुशुश्रूषेकरितां दोन भाग द्यावे आणि एक भाग शास्त्रार्थतचिंतनाकरितां द्यावा. अशा योजनेनें चित्त चांगलें व्युत्पन्न झालें आणि त्याच्यावर उत्तम संस्कार घडले, म्हणजे त्याला विषयभोगांकरितां दिलेला एकहि भाग कमी करून दोन भाग शास्त्र आणि वैराग्य यांच्या विचाराकरितां द्यावे आणि बाकीच्या दोन भागांत ध्यान आणि गुरुसेवा करावी व अशा रीतीनें त्याला क्रमाक्रमानें सन्मार्गाला लावावें.

हा जो ज्ञानप्राप्तीच्या साधनांचा क्रम मी तुला सांगितला त्याचा अधिकारी कोण ? असें विचारशील, तर ज्याचें चित्त शुद्ध झालेलें आहे असा पुरुषच ह्याचा अधिकारी होय. कारण, वस्त्र निर्मल असेल तरच त्याच्यावर रंग खुलतो, त्याप्रमाणें ज्याचें चित्त निर्मल आहे त्यालाच हा ज्ञानाचा क्रम साध्य होतो. आतां ज्याचें चित्त किंचित्मलिन असेल, त्यानें लहान मुलाला गोडीगुलाबीनें वळवितात त्याप्रमाणें, आपल्या चित्ताला विषयांच्या अन्वयव्यतिरेकद्वारा, म्हणजे विषयांची अनासक्ति सुखावह होते आणि विषयांची आसक्ति दुःखावह होते, असे सांगून बोध करावा; तसेंच श्रुति, स्मृति आणि गुरुवाक्यें यांचा नेहमीं परिचय करून देऊन चित्ताला शांतस्थितीमध्यें स्थिर करावें. अशा रीतीनें चित्त ब्रम्हज्ञानामध्यें स्थिर झालें आणि बाह्य जडाकारग्रहणाची त्याची संवय मोडली, म्हणजे चंद्रकिरणांशीं तद्रूप झालेल्या स्फटिकाप्रमाणें तें स्वच्छ आणि शांत होऊन शोभूं लागतें.

आतां ब्रह्मज्ञानामध्यें परिणति झाल्यानें स्थिति कशी होते, तें सांगतों. भेद, वैषम्य, कौटिल्य वगैरे दोषांनीं रहित आणि ब्रह्माकार झालेल्या बुद्धीला देह, इंद्रियें, विषय, भोक्ता, जीव, भोग्यवस्तू वगैरे सर्व सच्चिदानंदरूप दिसूं लागतें. यास्तव प्रज्ञा आणि विचार यांच्या योगानें आत्मज्ञान आणि तृष्णात्याग हीं एकदमच संपादन करावीं. परमात्म्याचें दर्शन झालें म्हणजे तृष्णाराहित्य येतें आणि तृष्णेचा अभाव झाला म्हणजे परमात्म्याचें दर्शन होतें. ह्या दोन्ही गोष्टी तेज आणि दीप यांच्याप्रमाणे अन्योन्याश्रयी आहेत. विषयभोगांतील रस नाहींसा झाला आणि परमात्म्याचें दर्शन झालें, म्हणजे परब्रह्मामध्यें अनंत आणि शाश्वत तील सारसर्वस्व आहे असें समजून जे त्यांचा उपभोग घेण्यांत निमग्न होतात, त्यांना निरतिशयानंदाची केव्हांही प्राप्ति होत नाहीं. यज्ञ, दान, तप, तीर्थसेवन यांच्यामुळें सुख होतें, परंतु त्यांच्यामुळें भोगविरक्ति उत्पन्न होत नाहीं. अंतःकरणांत आत्मज्ञान दृढ बाणल्यावांचून भोगविषयक खरें वैराग्य उत्पन्न होत नाहीं व भोगत्यागरूपी पुरुषप्रयत्नावांचून दुसऱ्या कोणत्याहि उपायानें पुरुषाची बुद्धि आत्मावलोकनाकडे प्रवृत्त होत नाहीं, तसेंच स्वस्वरूपाचा अभ्यास केल्याशिवाय आत्मदर्शनामध्यें बुद्धि स्थिर होत नाहीं. यास्तव अभ्यास आणि वैराग्य यांच्या योगानें ब्रह्मपदाची प्राप्ति करून घ्यावी. या ब्रह्मपदप्राप्तीपासून प्राप्त होणारें सुख आब्रह्मस्तंबपर्यंत जगांत कोठेंहि आढळून येत नाहीं. यास्तव दैवाला दूर झुगारून देऊन प्राज्ञ पुरुषानें पौरुषप्रयत्न करावा आणि परमश्रेय संपादन करण्याच्या कामीं विघ्नें करणाऱ्या भोगांना तुच्छ लेखावें. अशा रीतीनें एकदां भोगविषयक तुच्छता मनांत बाणली, म्हणजे वर्षाकाल संपतांच धान्यादिकांच्या योगानें शोभणारा निर्मल शरत्काल उदित होतो त्याप्रमाणें, मनुष्याच्या बुद्धीमध्यें सदसद्विवेक उत्पन्न होतो. ज्याप्रमाणें समुद्र आणि मेघ हे एकमेकांना पोषक असतात, त्याप्रमाणें विचार आणि भोगतृष्णाक्षय हे परस्परांच्या अभिवृद्धीला कारणीभूत होतात. भोगविरक्ति विचार आणि आत्मदर्शन असे तिघेजण जिवलग मित्रांप्रमाणें एकमेकांना पुष्टिकारक होत असतात. परंतु हें सर्व साधण्यासाठीं प्रथम मनुष्यानें दैवाला बाजूला सारून आणि मोठ्या नेटानें पौरुषप्रयत्न करून भोगविरक्ति संपादन करावी. आतां भोगविरक्ति कशी प्राप्त करून घ्यावी, हें तुला सांगतों.

साधूंना संमत होईल अशा मार्गानें द्रव्यार्जन करावें व दानधर्मादिकांच्या योगानें त्याचा सद्व्यय करून साधुपुरुषांना संतुष्ट करावें. कारण, साधुसंतांचा सहवास घडला, म्हणजे विषयासंबंधाची विरक्ति चित्तांत उदित होते. त्यानंतर मनननिदिध्यासानें महावाक्याच्या अर्थाचें ज्ञान, त्या ज्ञानानें अद्वितीय ब्रह्मासंबंधाचा तात्पर्यनिर्णय आणि त्याच्या योगानें अखेर परमपदाची प्राप्ति, अशा तऱ्हेचा ज्ञानक्रम आहे. यास्तव बाळा! तूंहि याच क्रमानें प्रयत्न करून चित्तांत विषयविरक्ति बाणवून घे. कारण, विषयविरक्तीवांचून इतर सर्व यत्न निष्फळ होत. सांप्रत तूं तरुण असल्यामुळें विषयांचा त्याग करणें तुला जड वाटत असेल, तर मनननिदिध्यास एकसारखा चालू ठेवल्यास तारुण्याचा काळ संपला म्हणजे तुला उतारवयांत परमपदाची प्राप्ति होईल. परंतु वृद्धापकाळ येईपर्यंत वाट पहाणें बरें नव्हे. यासाठीं तूं आतांच विषयविरक्तीचा अभ्यास कर, म्हणजे विचाराच्या योगानें तूं सम्यक्ज्ञानसंपन्न होऊन अत्यंत पावन अशा परमपदाच्या ठिकाणीं विश्रांति घेऊं लागशील, व या संसारपंकांत पुनःपुन्हां पडून दुःख भोगणार नाहींस. बाळा! ज्याअर्थी तूं विषयभोगांच्या स्थानांत राहूनहि विरक्त झाला आहेस, त्याअर्थी तूं साक्षात् सदाशिव आहेस. यास्तव मी तुला ब्रह्मभावदृष्टया नमस्कार करतों. सारांश बाळा! तूं देशाचारांप्रमाणें वागून धन संपादन कर; परंतु त्याचा विनियोग तुच्छ विषयोपभोगांकडे न करतां संतांच्या सेवेप्रीत्यर्थ कर आणि आदरानें त्यांचें पूजन करून त्यांच्या संगतींत साधनचतुष्टयसंपन्न हो, अध्यात्मशास्त्राचा विचार कर आणि सम्यक्ज्ञानानें, गळ्यांतील विस्मृत हाराचें स्मरण होऊन त्याची प्राप्ति व्हावी त्याप्रमाणें, आत्मलाभ करून घे.

# सर्ग २५

—:०:—

१. बलीच्या मनांत विवेकाचा उदय होऊन तो शुक्राचार्यांचें स्मरण करतो.

बलिः—माझ्या सुविचारी पित्यानें मला अशा रीतीचा जो उपदेश पूर्वी केला होता, त्याचें मला या वेळीं स्मरण झालें, हें माझें महद्भाग्यच समजलें पाहिजे. कारण, त्यामुळें मी आतां जागृत झालों आहें व माझ्या डोळ्यांत चांगलें अंजन पडलें आहे. त्या वेळीं माझ्या मनांत जें विषयवैराग्य बाणलें नव्हतें, तें सांप्रत बाणलें असून मी आतां अमृताप्रमाणें शीतल आणि स्वच्छ अशा शमसुखांत प्रवेश करीत आहें. पुनःपुन्हां आशेच्या नादीं लागणें, पुनःपुन्हां द्रव्यार्जन करणें, पुनःपुन्हां कांतेची मनधरणी करणें आणि अहोरात्र संपत्तीचें रक्षण करणें या गोष्टींचा मला आतां अगदीं वीट आला आहे. अहाहा! शमभूमिमध्यें, मी आतां प्रवेश करणार आहें, ती किती रम्य आहे! व तिचा अंतर्भाग किती शीतल आहे! शांतिगुणामध्यें खरोखरच सर्व सुखदुःखदृष्टी शांत होतात! माझा सर्व ताप शांत झाला आहे, मला अनिर्वचनीय सुख प्राप्त झालें आहे, किंबहुना मीं चंद्रबिंबांतच प्रवेश केला आहे कीं काय, असें मला वाटतें! अरेरे! आजपर्यंत मी भोगोत्कंठित होऊन मनोवेगानें किती देशामध्यें वणवण करीत फिरलों आणि शरीराला किती क्लेश दिले! वैभव संपादन करणें हें निःसंशय कष्टप्रद आहे! शरीर, मग तें माझें असो किंवा स्त्रीचें असो, मांसमयच ना? परंतु आपल्या स्त्रीला आलिंगन देण्यांत आणि तिचा उपभोग घेण्यांत मी आजपर्यंत केवढी धन्यता मानीत होतों! परंतु हा सर्व केवळ मोहविलास आहे, हें माझ्या आतां पूर्णपणें लक्षांत आलें आहे. मीं जगांतील वैभवाची

सीमा पाहिली, निष्कंटक राज्यादि सुखांचा उपभोग घेतला आणि संपूर्ण भूतमात्रांना स्वपराक्रमानें आपल्या पायाखालीं लोळावयास लावलें. तथापि त्यापासून कोणत्या शाश्वत सुखाचा लाभ झाला ? या लोकांत रहा, नागलोकांत जा, कीं परलोकांत जा, पुनः पुन्हां तेच तेच भोग भोगावयाचे ! भोगांत अपूर्वता अशी कोठेंच नाहीं. यास्तव सर्व दृश्य विषयांचा त्याग करून मी आतां आत्मस्वरूपाच्या पूर्णानंदांत स्थिर होतों म्हणजे झालें. स्वर्ग, मृत्यु आणि पाताळ या लोकांमध्यें स्त्रिया, रत्नें वगैरे जे जे विषय सारभूत वाटतात, ते ते सर्व नश्वर असल्यामुळें निःसंशय असार आहेत. या तुच्छ जगताचा लोभ धरून एखाद्या बालिश मनुष्याप्रमाणें मीं एवढा केउ देवांबरोबर विनाकारण कलह केला. केवळ मनानेंच निर्माण केलेल्या या जगताच्या अधिपत्यरूपी महाव्याधीला घेऊन मला काय करावयाचें आहे ! महात्म्यांच्या ठिकाणीं विषयांचा अनुराग कोठून असणार ? पण हाय हाय ! मी इतके दिवस अनर्थालाच अर्थ मानून कवटाळीत होतों आणि अज्ञानमदिरेच्या धुंदींत आपल्याच मरणाला कारणीभूत होणाऱ्या विषयांचें सेवन करण्यांत गढून गेलों होतों. चंचल तृष्णेच्या नादीं लागून म्यां मूढानें आपल्या पश्चात्तापाच्या अभिवृद्धीकरितां या त्रिभुवनांत कोणतीं पातकीं कर्में करावयाचीं ठेविलीं आहेत ! परंतु आतां गतगोष्टींबद्दल शोक करण्यांत काय अर्थ आहे ? सांप्रत मोहाची चिकित्सा करून मनुष्यजन्माचें साफल्य कसें होईल, याचाच विचार करणें युक्त आहे. ज्याप्रमाणें क्षीरसमुद्राचें मंथन करतां करतां अखेरीस अमृताची प्राप्ति झाली, त्याप्रमाणें अपरिमित ब्रह्मस्वरूपाशीं तादात्म्य पावून मी केव्हां एकदांचा पूर्णानंदांत निमग्न होईन ! यास्तव ' हा प्रपंच म्हणजे काय ? अहंप्रत्ययानें जाणलें जाणारें जीवत्व काय आहे ? ' वगैरे गोष्टींचें ज्ञान ज्या आत्मदर्शनानें होतें, त्याच्या प्राप्तीचा उपाय गुरुवर्य शुक्राचार्यांना विचारून मी आपल्या अज्ञानाची भ्रांती आतां शांति करून टाकतों म्हणजे झालें. स्वतः योगसंसिद्ध असून शिष्यांवर अनुग्रह करण्यास उद्यक्त असलेल्या भगवान् शुक्राचार्यांचें मी आतां स्मरण करतों; व त्यांनीं मला उपदेश केला म्हणजे त्याचा दृढ अभ्यास करून त्या अनंत वैभवानें संपन्न असलेल्या आत्म्याचे ठिकाणीं तद्रूप होऊन राहीन. कारण, महात्म्यांची अर्थपूर्ण उपदेशवाणी केव्हांहि विफल होत नाहीं !

---

## सर्ग २६

१. शुक्राचार्य बलीजवळ येतात आणि त्याला संक्षेपतः तत्त्वोपदेश करून आकाशमार्गानें निघून जातात.

**श्रीवसिष्ठः**—राघवा ! अशा रीतीनें विचार केल्यानंतर त्या महापराक्रमी बलीनें नेत्र अर्धोन्मीलित करून ब्रह्माकाशामध्यें विश्रांति घेणाऱ्या कमलनयन शुक्राचार्यांचें स्मरण केलें. त्याबरोबर निरंतर ध्यानामध्यें निमग्न असलेल्या त्या भार्गवाला आपल्या ब्रह्मस्वरूपी अंतःकरणांत बलीची स्थिति दिसली व तत्त्वजिज्ञासेमुळें तो आपल्या दर्शनाची इच्छा करीत आहे असें पाहून, ज्या रत्नखचित वातायनामध्यें बलि चिंतन करीत बसला होता, त्या ठिकाणीं येऊन शुक्राचार्यांनीं बलीला साक्षात् दर्शन दिलें. त्याबरोबर सूर्यकिरणांचा स्पर्श होतांच कमल प्रफुल्लित होतें त्याप्रमाणें, गुरुवर्य शुक्राचार्यांच्या शरीरांतून फाकलेल्या प्रभाचे शररिास स्पर्श होतांच बलि देहभानावर आला व गुरुवर्य शुक्राचार्य यांच्या मूर्तीचें दर्शन होतां.

बलीनें रत्नें आणि ( कल्पवृक्षावरील ) मंदार-पुष्पें यांनीं युक्त असलेल्या अर्घ्यानें त्यांची पूजा करून त्यांना वंदन केलें. नंतर मूल्यवान् आसनावर गुरुवर्य बसलेले आहेत, अशा स्थितींत बलीनें भाषण करण्यास सुरुवात केली.

**बलिः**—भगवान्! ज्याप्रमाणें सूर्याची प्रभा प्राण्यांना आपलीं उचित कार्यें करण्याला प्रवृत्त करते, त्याप्रमाणें आपल्या प्रसादाने उत्पन्न झालेली प्रतिभा मला आपणाशीं बोलण्यास प्रवृत्त करीत आहे. महामोहांत पाडणाऱ्या भोगांविषयीं मी विरक्त झालों आहें; यास्तव ज्ञानाच्या योगानें मोहसंमोह नष्ट करणारें तत्त्व काय आहे, तें जाणण्याची मला उत्कंठा लागली आहे. म्हणून मी विचारतों कीं, या विषयसुखांची मर्यादा तरी कोठपर्यंत आहे ? या भोगांचें रहस्य काय आहे ? तसेंच मी, आपण व हे सर्व लोक ह्यांचें तत्त्व काय आहे ? सारांश, भोग, भोक्ता आणि भोग्य वस्तू यांचें स्वरूप काय आहे, हें आपल्या मुखानें ऐकण्याची मला इच्छा झाली आहे. तरी त्यासंबंधाचें सविस्तर विवेचन करावें, अशी आपणांस माझी प्रार्थना आहे.

**श्रीशुक्रः**—दानवश्रेष्ठ बले ! उगीच पाल्हाळिक बोलण्यांत काय अर्थ आहे? शिवाय मला लवकरच आकाशमंडलांत स्वस्थानीं जावयाचें असल्यामुळें सध्यां तितका वेळहि नाहीं. याकरितां तुझ्या तिन्ही प्रश्नांचें उत्तर मी संक्षिप्त रीतीनें देत आहें तें ऐक. या जगतांत सर्व चित् आहे, या सर्व दृश्याचा उत्कर्षावधि चितच आहे आणि हें सर्व भोग्यजातहि चिन्मय आहे. तसेंच तूं, मी वगैरे भोक्तृवर्गहि चिद्रूपच आहे. मीं सांगितलेल्या संक्षिप्त उपदेशावर पूर्ण श्रद्धा ठेवून तूं त्याप्रमाणें विचार करीत जाशील, तर तुला निश्चयानें सर्व प्राप्त होईल. परंतु तसें न करशील, तर मी कितीहि कंठशोष करून उपदेश केला, तरी श्रद्धा आणि विवेक यांच्या अभावीं, राखेंत टाकलेल्या आहुतीप्रमाणें तो उपदेश व्यर्थ झाल्याशिवाय राहणार नाहीं. चितूतत्त्वानें विषयाकार होणें हाच मोठा बंध असून त्यापासून मुक्त होणें हीच मुक्ति होय. चितूनें चेत्याकाररहित होणें म्हणजेच पूर्णात्मा होणें असून हेंच सर्व सिद्धान्तांचें सार आहे. हें तत्त्व लक्षांत ठेवून तूं आपली वृत्ति अखंड चिदाकार करून पाहूं लागशील, तर तुला आपोआपच त्या अनंत पदाची प्राप्ति होईल. असो. दानवेंद्रा ! मी आतां याच चिदाकाशांतील स्वस्थानाप्रत जातों. त्या ठिकाणीं सात मुनी कांहीं देवकार्यासाठीं जमलेले आहेत व त्या ठिकाणीं मलाहि अवश्य गेलें पाहिजे. कारण राजन्!, जोंपर्यंत हा देह आहे, तोंपर्यंत जीवन्मुक्त पुरुषांनाहि आपल्या यथाप्राप्त क्रियांचा त्याग करणे स्वभावतःच आवडत नाहीं.

अशा रीतीनें भाषण केल्यानंतर भृगुपुत्र शुक्राचार्यांनीं पुष्परेणूंनीं व्याप्त झालेल्या भ्रमराप्रमाणें नक्षत्रांनीं व्याप्त झालेल्या आकाशांत समुद्र आणि मेघमंडळ यांवरून मोठ्या वेगानें उड्डाण केलें.

# सर्ग २७

—:*:—

१. शुक्राचार्योनीं सांगितलेल्या मार्गानें विचार करणाऱ्या बलीला ज्ञान होतें आणि तो ब्रह्मानंदाचा अनुभव घेत पुष्कळ काळपर्यंत रहातो.

**श्रीवसिष्ठः**—राघवा ! सुर आणि असुर यांच्या सभेमध्यें श्रेष्ठता पावलेले भृगुपुत्र शुक्राचार्य निघून गेल्यानंतर तो बुद्धिमंतांमधील श्रेष्ठ बलि याप्रमाणे विचार करूं लागलाः—“ भगवान् शुक्राचार्यांनीं मला आतां जो उपदेश केला, तो अगदीं योग्य आहे. हें जग-

त्रय चितच आहे. तसेंच मी, हे लोक, ह्या दिशा आणि सर्व क्रिया चिद्रूपच आहेत. फार काय, पण हें सर्व सबाह्याभ्यंतर परमार्थदृष्ट्या चितच आहे; चिद्व्यतिरिक्त कोठें कांहींच पदार्थ नाहीं. कारण, 'हा सूर्य आहे' अशा रीतीनें चित्नें सूर्याला प्रकाशित केलें नाहीं, तर मग सूर्य आणि अंधकार यांत भेद तो काय रहाणार? व 'ही भूमि आहे' अशा रीतीनें चित्नें भूमीला प्रकाशित केले नाहीं, तर भूमीचें भूमित्व तें काय रहाणार? तसेंच 'ह्या दिशा आहेत' अशा रीतीनें दिशांचा किंवा 'हे पर्वत आहेत' अशा रीतीनें पर्वतांचा त्या चित्नें निर्देश केला नाहीं, तर दिशांचें दिशात्व किंवा पर्वतांचें पर्वतत्व तें काय रहाणार? सारांश जगत्, आकाश इत्यादि सर्व पदार्थ चित्प्रकाशानेंच प्रकाशित होतात. हा पर्वतासारखा स्थूल अचेतन देह चित्कडून प्रकाशित केला गेला नाहीं, तर त्याला देह म्हणून कोण म्हणेल? सारांश, इंद्रियें चित्, शरीर चित्, मन चित्, इच्छा चित्, आंत चित् व बाहेरहि चितच आहे. तसेंच भाव चित् व अभावहि चितच आहे. ही सर्व संसारस्थिति त्या चित्ची सत्ता आहे. बोलणें, चालणें वगैरे ज्या ज्या विषयभोगाच्या क्रिया मी करतों, तो तो सर्व चित्चा विलास आहे; कारण, केवळ जड शरीरानें कांहींच होणें शक्य नाहीं. मग ह्या अचेतन शरीराचा अभिमान बाळगण्यांत तरी काय अर्थ आहे! लांकडाचा ओंडका किंवा पाषाण यांच्याप्रमाणें असणाऱ्या ह्या जड शरीराला घेऊन मला काय करावयाचें आहें? कारण, सर्व जगाचा चेतनात्मक आत्मा मी आहें. मी चित् आकाशांत, सूर्यादिकांच्या तेजांत आणि अवशिष्ट भूतत्रयांत आहें. तसेंच देवदानवांच्या देहांत आणि स्थावरजंगमांत मीच आहें. सर्वत्र चितच व्यापून आहे, त्यावांचून येथें दुसरी कल्पनाच संभवत नाहीं. अशा रीतीनें जर दुजेपणाचा पूर्ण अभाव आहे, तर मग या जगांत शत्रु कोण आणि मित्र तरी कोण आहे? या बलिनामक शरीराचें मस्तक जरी कोणी तोडलें, तरी त्यामुळें असंग आणि सर्वव्यापी चित्स्वरूपानें युक्त असा जो मी, त्या माझी हानि काय होणार? ज्याला चित्नें प्रकाशित केलें आहे असा द्वेषच द्वेष होऊं शकतो, एरवीं होऊं शकत नाहीं. यास्तव द्वेषादि सर्व भावाभाव चिदात्मकच होत. विस्तीर्ण त्रिभुवनोदरांत चित्वांचून दुसरें कांहीं, कितीहि विचार केला, तरी आढळून येत नाहीं. वास्तविकपणें पाहूं गेलें तर द्वेष नाहीं, राग नाहीं मन नाहीं किंवा त्याच्या वृत्तीहि नाहींत. कारण, अतिशुद्ध अशा चिन्मात्राच्या ठिकाणीं ह्या विकल्पकलना असणार कशा? मी चित् सर्वांचें अधिष्ठान, सर्वव्यापी, नित्यानंदमयात्मक, विकल्पकलनातीत आणि द्वितीयांशविवर्जित आहें. सर्व नामरूपांना अधिष्ठानभूत असणारी जी चित् तिचें चित् हें नांव सुद्धां वस्तुतः काल्पनिकच आहे. परंतु शब्दात्मक चिच्छक्ति सर्वांला आधारभूत असून सर्वत्र स्फुरण पावणारी आहे, यांत शंका नाहीं. गुरुवर्य शुक्राचार्यांना 'कोऽहं'—'मी कोण आहें' असा प्रश्न मीं केला होता, त्याचें उत्तर मला या विचारानें आतां आपोआप मिळालें. मी दुसरा कोण असणार? दृश्यादि त्रिपुटीरहित केवळ शुद्धस्वरूप, नित्य उदित, आभासरहित असा द्रष्टा परमेश्वर मीच आहें; व असा जो मी परमेश्वर त्या मजमध्ये हा जीवभाव आरशांत किंवा पाण्यांत पडलेल्या चंद्राच्या प्रतिबिंबाप्रमाणें केवळ मिथ्याच भासमान होत आहे. यास्तव त्या जीवभावाला चरमसाक्षात्कारवृत्तीनें युक्त होऊन मी जिंकून टाकीन. अशा रीतीनें ज्यामधील सर्व दृश्यभाव आणि जीवभाव नाहींसा झालेला आहे, अशा माझ्या प्रत्यक्चैतनरूप

आत्मस्वरूपाला नमस्कार असो ! साक्षात्काराला योग्य अशा मनननिदिध्यासरूपी युक्तीनें युक्त असलेल्या आणि यत्त्चयावत् आभासांचा प्रकाश करणाऱ्या माझ्या ब्रह्मस्वरूपाला नमस्कार असो ! चेत्यरहित असलेलें चिद्रूप मीच आहे. मी सर्व विश्वाला सर्व बाजूंनीं व्यापून राहिलों आहें. ज्यामधील सर्व विषयसंवेदना नाहींशा झाल्या आहेत, असा सच्चिन्मात्र मी, आकाशासारखा अनंत आहें आणि अणूहूनहि अणु आहें. म्हणून या सुखदु:खदशा माझ्या दृष्टीनें नाहींतच. तसेंच वर्तमानसंवेदन आणि भूत व भविष्यकाळच्या विषयांचें स्मरण ह्या वृत्ती वस्तुतः माझ्या ठिकाणीं नाहींतच. जगांतील भावाभाव माझ्या ब्रह्मस्वरूपाचा परिच्छेद करूं शकत नाहींत, अर्थात् त्याला मर्यादित करूं शकत नाहींत. अथवा त्यांनीं माझें स्वरूप संकुचित केलें असें जरी क्षणभर मानलें, तरी त्यामुळें माझें काय बिघडलें ? सर्वच जर मी आहें, माझ्या व्यतिरिक्त दुसरें कांहीं नाहीं, तर जगांतील भावाभावांनीं उत्पन्न केलेला मर्यादितपणा मला बाधक होऊं शकत नाहीं. कारण, डाव्या हातांतील वस्तु उजव्या हातानें चोरली, तरी त्या दोन्ही हातांशीं अभिन्न असलेल्या मनुष्याचें त्यामुळें कोणतें नुकसान होणार ? याच न्यायानें कोणी कोणाला कांहीं दिलें किंवा कोणापासून कांहीं घेतलें, तरी त्या क्रिया वास्तविक माझ्या ठिकाणींच होत असल्यामुळें मला त्यांबद्दल कांहीं वाटण्याचें कारण नाहीं. मी जर चिद्रूप आहें, जें जें आहे तें तें सर्व जर मीच आहें, तर मला संकल्पविकल्प करून तरी काय करावयाचें आहे ? मी आजपर्यंत अज्ञानामुळें क्षुब्ध होत असें, परंतु आतां तत्त्वबोध करून घेऊन शांत होतों म्हणजे झालें."

अशा रीतीनें विचार करून परमतत्त्वज्ञ बलि ॐकारामधील [ स्थूल, सूक्ष्म व कारण, किंवा जागृत, स्वप्न आणि सुषुप्ति यांच्या दर्शक असलेल्या अ, उ, म ह्या ] तीन मात्रांचा त्याग करून अर्धमात्रेनें दर्शित केल्या जाणाऱ्या तुरीय आत्म्याच ध्यान करीत मौन धारण करून स्वस्थ बसला. या वेळीं त्याचे सर्व संकल्प शांत झाले, झाडून साऱ्या वृत्ती लीन झाल्या, चेत्य, चिंतक आणि चिंतन, ध्याता, ध्येय आणि ध्यान इत्यादि त्रिपुटी आजिबात मावळून गेल्या आणि सर्व वासना अस्तंगत झाल्या. यामुळें एखाद्या निर्वात प्रदेशांतील दीपज्योतीप्रमाणें त्याची वृत्ति निश्चल होऊन आत्मस्वरूपामध्यें स्थिर झाली. अशा रीतीनें शांतचित्त झालेला बलि त्या रत्नखचित वातायनामध्यें पुष्कळ काळपर्यंत बसून राहिला. त्या वेळीं पाषाणामध्यें खोदलेल्या एखाद्या मूर्तीप्रमाणें तो स्थिर दिसत होता. सारांश, ज्याच्या सर्व एषणा शांत झाल्या आहेत, तसेंच जो मननादि दोषांनीं रहित आणि आत्मसत्तेनें परिपूर्ण झालेला आहे असा तो शुद्धचित्त बलि शरदृतूंतील मेघरहित स्वच्छ आकाशाप्रमाणें शोभूं लागला.

## सर्ग २८

१. बलीची निश्चेष्टता पाहून दानव खिन्न होतात. २. दानवांनीं स्मरण करतांच शुक्राचार्य प्रकट होतात आणि बलीच्या स्थितीचें वर्णन करून दानवांचा शोक घालवतात.

श्रीवसिष्ठः—रामा ! याप्रमाणें कांहीं दिवस लोटल्यानंतर बलिचे अनुचरभूत दानव आपला स्वामी इतके दिवस राजमंदिराच्या सौधावर एकान्तांत बसून काय करीत आहे, हें पहाण्याच्या इच्छेनें त्या स्फटिकमय सौधावर चढून ज्या रत्नखचित वातायनामध्यें तो बसला होता, त्या ठिकाणीं गेले. त्या दानवसमूहांत त्याचे डिंभादि मंत्री, कुमुदादि धैर्यशाली सामंत,

सुरादिराजे, वृत्रप्रभृति सेनापती हयग्रीवादि, सैनिक, चक्रजादि बांधव, लडुकादि मित्र व वल्लकादि खुषमस्करे होते; तसेंच कुबेर, यम, इंद्रप्रभृति देव नजराणे घेऊन तेथें आलेले होते. या राजाधिराजाची सेवा करण्याला आम्हाला अवसर केव्हां मिळतो, म्हणून वाट पहाणारे यक्ष, विद्याधर आणि नाग, तसेंच हातांत चवऱ्या धारण करणाऱ्या रंभातिलोत्तमादि सुंदर अप्सरा त्या ठिकाणीं आल्या होत्या. याशिवाय सागर, नद्या, पर्वत, दिशा व उपदिशा ह्यांच्या देवता, तसेंच त्रैलोक्यांतरवासी अनेक सिद्ध त्या दानवेंद्राची सेवा करण्यासाठीं त्या ठिकाणीं जमले होते. परंतु बलीनें त्यांच्याकडे पाहिलें सुद्धां नाहीं. एखाद्या चित्रांतील पर्वताप्रमाणें तो मौन धारण करून ध्यानस्थ बसला होता. बलीच्या जवळ आलेले देवदानव त्याला दुरूनच वंदन करीत असतां त्यानीं त्याच्याकडे मोठ्या आदरानें अवलोकन केलें. त्या वेळीं बलीनें मौन धारण केलेलें आहे, असें पाहून दानव खिन्न आणि विस्मित झाले, त्याच्या आप्तांना भीति वाटली आणि देवांना मोठा आनंद झाला. बलीची ती अपूर्व स्थिति पाहून त्याला झालें आहे तरी काय, यासंबंधानें त्याच्या मन्त्र्यांनी आणि दानवांनीं पुष्कळ विचार करून पाहिला, पण कोणाचा कांहींच तर्क चालेना. तेव्हां त्या दानवांनी सर्वज्ञ शुक्राचार्यांचें स्मरण केलें त्याबरोबर एखाद्या कल्पित गंधर्वनगराप्रमाणें शुक्राचार्यांचें भास्वर शरीर त्या दैत्यांना समोर दिसूं लागलें. गुरुवर्य भार्गवाला पहातांच दानवांनीं त्याची पूजा केली आणि त्याला उच्च आसनावर नेऊन बसविलें. तदनंतर त्या भृगुपुत्र शुक्रानें मौन धारण करून ध्यानामध्यें निमग्न असलेल्या दानवेंद्राकडे प्रेमानें अवलोकन केलें आणि क्षणभर स्वस्थ बसल्यासारखें करून भवभ्रम नष्ट झालेल्या बलीच्या निर्वेदतेचा चांगला विचार केला. नंतर आपल्या अंगकांतीनें क्षीरसागराला हि मागें टाकणाऱ्या त्या भार्गवानें दानवांच्या अज्ञानाबद्दल हंसून भाषण करण्याला सुरुवात केली. तो म्हणाला:—

" दैत्यांनो! हा तुमचा स्वामी भगवान् बलि स्वतःच्या विचारानेंच सिद्ध झाला असून सर्वांला अधिष्ठानभूत असलेल्या शुद्ध ब्रह्मपदाप्रत जाऊन पोहोंचला आहे. सांप्रत हा स्वरूपानुभवाचें अनिर्वचनीय सुख आणि विश्रांति घेत स्वस्थ बसला आहे. तरी याला आनंदस्वरूपी आत्म्यामध्यें स्थित असूं द्या; याला अनामय ब्रह्मपदामध्यें असाच विश्रांति घेत बसूं द्या. आजपर्यंत जगांतील भोग्य वस्तूंची प्राप्ति करून घेण्यांत दंग झाल्यामुळें ह्याला फार कष्ट झाले होते व सध्यां तो विश्रांति घेत आहे; तरी त्याला तशीच विश्रांति घेऊं द्या. ह्याच्या चित्तांतील भवभ्रम आतां शांत झालेला आहे आणि संसारांतील धुकें अस्तंगत झालें आहे. तरी ह्या ठिकाणीं गडबड करून याच्या समाधीचा भंग करूं नका. ज्याप्रमाणें रात्रीचा अंधःकार आणि निद्रादि भ्रम नाहींसा करून सूर्याचें किरण दिवस सुरू करतात, त्याप्रमाणें या बलीनें चित्तांतील अज्ञानरूपी अंधःकार नष्ट केला असून सांप्रत तो आत्मलोकाप्रत जाऊन पोहोंचला आहे. ज्याप्रमाणें बीजकोशामध्यें सुप्त स्थितींत असलेला अंकुर कांहीं कालानें प्रगट होतो, त्याप्रमाणे एक हजार वर्षें उलटून गेल्यानंतर आपल्या समाधीचा त्याग करून भगवान् बलि देहभानावर येईल. तरी त्या वेळेपर्यंत तुम्ही राजकारभाराचीं आपलीं कार्यें यथायोग्य रीतीनें करीत जा.

गुरुवर्य भार्गवाचें हें भाषण ऐकतांच ज्याप्रमाणें वृक्ष आपल्या ठिकाणच्या शुष्क मंजरी टाकून देतात, त्याप्रमाणें त्या दानवांनीं रागद्वे-

षापासून उत्पन्न झालेली उद्विग्नता आणि चिंता टाकून दिली.त्यानंतर पूर्वापार चालत आलेल्या पद्धतीला अनुसरून त्यांनीं पूर्वीप्रमाणें आपा पलीं राज्यकारभाराचीं कामें करण्यास सुरवात केली. इतकें झाल्यानंतर त्या ठिकाणीं आलेले मानव, नाग, देव आपापल्या स्थानीं निघून गेले, पर्वतांच्या देवता पर्वतांमध्यें आणि दिशांच्या देवता, अर्थात् दिक्पाल निरनिराळ्या दिशांमध्यें निघून गेले; वानरादिक पशू अरण्यांत गेले आणि गरुडादि पक्षी आकाशमार्गानें निघून गेले.

## सर्ग २९

—:०:—

१. जीवनमुक्त बलीचें राज्यैश्वर्य. २. बलीप्रमाणें जीवनमुक्त होण्याविषयीं रामाला उपदेश.

**श्रीवसिष्ठः**—रामभद्रा! अशा रीतीनें देवांचीं सहस्रवर्षें उलटून गेल्यानंतर तो असुरश्रेष्ठ बलि देवांनीं वाजविलेल्या दुंदुभींचा ध्वनि ऐकून समाधींतून उठला. बलिनें समाधि विसर्जन केल्याची बातमी बलिच्या नगरांत पसरतांच सर्वत्र आनंदीआनंद झाला, आणि सूर्योदय होतांच कमलें प्रफुल्लित होतात त्याप्रमाणें सर्व नागरिकांचीं मुखें टवटवीत दिसूं लागलीं. बलीच्या समाधीचें व्युत्थान झाल्यामुळें त्याचे मंत्री मेरुपर्वताच्या शिखरावरील त्याच्या समाधिस्थानीं यावयास निघाले. परंतु ते येऊन पोहोंचण्यापूर्वी बलि आपल्या समाधिकालांतील अनुभवासंबंधानें विचार करूं लागला. तो म्हणाला:—"अहाहा! या समाधीचें सुख खरोखरच अनिर्वचनीय आहे! मी या समाधिसुखाचा अनुभव क्षणभरच घेतला खरा; परंतु एवढ्याशा अल्पकाळांतहि माझ्या चित्ताला केवढी विश्रांति मिळाली आहे! यास्तव मी आतां ह्याच परमार्थिक स्थितीचा अनुभव घेत रहाणार. कारण ह्या बाह्य ऐश्वर्याचा आणि विषयांचा कितीहि उपभोग घेतला, तरी त्यांत काय अर्थ आहे? त्यापासून असलें विश्रांतिसुख थोडेंच मिळणार आहे? समाधिस्थितीच्या परिपाकापासून जो निरतिशयानंद प्राप्त होणार आहे, तितका आनंद चंद्रबिंबामध्यें वास केल्यानेंहि प्राप्त होण्यासारखा नाहीं." अशा रीतीनें आपल्याशींच भाषण करून तो पुन्हां समाधि लावून बसण्याला तयार झाला. परंतु इतक्यांत चंद्रबिंबाच्या आड मेघ येतात त्याप्रमाणें, बलीचें अनुचर त्याच्या भोंवतीं येऊन उभे राहिले. बलीला पहातांच दैत्यांनीं त्याला मोठ्या आदरानें प्रणाम केला. परंतु त्यांच्या आगमनामुळें व्याकुलचित्त झालेल्या बलीनें त्या पर्वतप्राय धिप्पाडशरिरांनीं युक्त असलेल्या दानवांकडे पहात पहात पुन्हां स्वगत भाषण करण्याला प्रारंभ केला. तो म्हणाला:—"ज्यांतील सर्व संकल्प क्षीण झालेले आहेत, अशी चित् हेंच माझें वास्तवीक स्वरूप आहे. अशा चित्स्वरूपाला या जगांत उपादेय—ग्राह्य असें काय आहे? अर्थात्, कांहींच नाहीं, व मनाला सुद्धां जी विषयांची आसक्ति उत्पन्न होते, ती विषयांच्या केवळ दर्शनानें उत्पन्न होत नसून विषयांकडे ग्राह्य बुद्धीनें पाहिल्यामुळेंच उत्पन्न होते. तर्व्हां मी आतां समाधि लावून बसूं कीं व्यवहार करूं? मोक्षाच्या इच्छेनें समाधी लावून बसावें असें म्हटलें तर मला बद्ध कोणी केलें आहे म्हणून मी मोक्षाची इच्छा करावी! मी वस्तुतः बद्ध नसतांना मोक्षाची इच्छा करावी, हा निव्वळ बालिशपणा होय! मला आतां बंध नाहीं आणि मोक्षहि नाहीं. माझें पूर्वीचें अज्ञान, माझा पूर्वीचा मूर्खपणा आतां नाहींसा झाला आहे. मला आतां ध्यान कशाला पाहिजे आणि समाधि लावून तरी काय

करावयाचें आहे ! ध्यानाध्यानभ्रम टाकून देऊन आपलें प्रत्यगात्मरूप अवलोकन करीत असतां माझ्यापुढें जें जें यावयाचें असेल तें तें येईना बापडें ! तें आले म्हणून माझ्या आत्मस्वरूपांत कांहीं वाढत नाहीं किंवा केलें म्हणून कांहीं कमीहि होत नाहीं.[1] मला आतां ध्यानाची इच्छा नाहीं कीं ध्यानरहित स्थितीची इच्छा नाहीं, भोगांची गरज नाहीं कीं भोगरहित राहण्याची आवश्यकता नाहीं. मी आतां शांतचित्तानें सर्व अवस्थांमध्यें सारखा राहणार. मला आतां परतत्त्वाची इच्छा नाहीं. जगत्स्थितीची जरूरी नाहीं, ध्यानस्थितींत राहून मला कांहीं प्राप्तव्य नाहीं आणि या वैभवाशींहि कांहीं करावयाचें नाहीं. देहाशीं संबंध नसल्यामुळें मी मृत नाहीं, प्राणाशीं संबंध नसल्यामुळें जिवंत नाहीं; मी सत् नाहीं कीं असत् नाहीं; तसेंच हें शरीर माझें नव्हे आणि माझ्या व्यतिरिक्त असणारीं हीं भुवनेंहि माझीं नव्हत. अशा माझ्या बृहत्-व्यापक आत्मस्वरूपाला मी नमस्कार करतों. हें जगद्राज्य असो किंवा नसो, त्याच्याशीं मला काय करावयाचें आहे ? मी आपल्या आत्मस्वरूपांत शांत होऊन राहाणार. मला ध्यान करून काय करावयाचें आहे किंवा हें राज्यवैभव घेऊन तरी काय करावयाचें आहे ? मला जर कांहींच कर्तव्य नाहीं किंवा कशाचीच अपेक्षा उरलेली नाहीं, तर माझ्याकडे येणारे हे राज्यादि विषय येईनात का बापडे ! मीं त्यांना प्रतिबंध तरी काय म्हणून करावा ? माझें शरीर प्राप्तकर्मांत व्यवहार करीत राहिलें तरी त्यांत काय बिघडलें ! त्यामध्यें माझें मन जोंपर्यंत आसक्त होत नाहीं, तोंपर्यंत या व्यवहारापासून माझें नफानुकसान कांहींच नाहीं." याप्रमाणें विचार करून ज्ञानवंतांमध्यें श्रेष्ठ असलेल्या त्या बलीनें, सूर्यानें कमलांकडे पहावें त्याप्रमाणें, आपल्या सभोंवार असलेल्या दैत्यांकडे पाहिलें; व ज्याप्रमाणें वायु पुष्पांतील सुगंध ग्रहण करतो, त्याप्रमाणें दैत्यांनीं केलेले प्रणाम त्यानें दृष्टिपातानेंच ग्रहण केले. तदनंतर तो विरोचनपुत्र बलि ध्येयवासनात्यागानें सर्व राज्यकारभार पूर्ववत् करूं लागला. त्यानें देव, ब्राह्मण आणि गुरू यांची पूजा केली; सुहृत्, बांधव, सामंत आणि इतर सज्जन यांचा सत्कार केला, नोकरांना देणग्या देऊन संतुष्ट केलें, याचकांना दान दिलें व विचित्र वैभव अर्पण करून स्त्रियांचीं मनें सुप्रसन्न केलीं. पुढें कालमानानें राज्य भरभराटीस चढल्यानंतर बलीला एके दिवशीं अश्वमेध यज्ञ करण्याची इच्छा झाली व त्याप्रमाणें त्यानें शुक्राचार्यांसारख्याच्या साहाय्यानें तो यज्ञ समाप्त केला. त्याच्या यज्ञामुळें सर्व भुवन तृप्त झाले व देव आणि ऋषि यांनीं सुद्धां त्या यज्ञाची वाहवा केली. बलि हा भोगांची इच्छा करणारा नाहीं, तर मोक्षार्थी आहे, असें जाणून स्वतः श्रीविष्णु बलीचें आत्यंतिक कल्याण करण्याकरितां त्याठिकाणीं आले. त्या कार्यकुशल श्रीविष्णूनीं, भोगाकरितां हापापलेल्या आणि म्हणूनच कींव करण्याला योग्य असलेल्या आपल्या ज्येष्ठ बंधूला, इंद्राला जगद्रूपी अरण्याचा तुकडा देण्याच्या मिषानें बलीला युक्तीनें फसवून त्याच्यापासून तिन्हीं भुवनें मायाबलानें हिरावून घेतला व एखाद्या वानराला तळघरांत कोंडून ठेवावें, त्याप्रमाणें त्याला पाताळांत बांधून ठेवलें. रामा ! तो महात्मा बलि अद्याप त्या ठिकाणीं जीवन्मुक्तस्थितीचा उपभोग घेत ध्यानस्थ बसला आहे. त्याला पुढें इंद्रपद प्राप्त होणार असून

---

१ 'एष नित्यो महिमा ब्राह्मणस्य न वर्धते कर्मणा नो कनीयान्'
(बृहदारण्यकोपनिषद्. ४।४।२३)

तो प्रारब्धानें देह धारण करून निर्विकल्प समाधींत स्थित झालेला आहे. पातालकुहरांत जीवन्मुक्तांच्या स्थितीचा अनुभव घेत असलेला तो बलि आपत्ति आणि संपत्ति यांना सारखेच लेखतो. त्याची बुद्धि सुखामध्यें फुगून जात नाहीं व दुःखामध्यें खिन्न होत नाहीं; तर सर्व प्रसंगीं चित्रांत काढलेल्या कधीं न उगवणाऱ्या व मावळणाऱ्या सूर्याप्रमाणें तीसम आणि स्थिर असते. रामा जीवनाविषयीं आस्था बाळगणाऱ्या भोगलंपट जीवांचे उत्कर्ष आणि अपकर्ष हजारों वर्षें पाहून पाहून त्याचें मन दुःखपर्यवसायी भोगांविषयीं विरक्त झालें होतें. अनेकविध सुखदुःखें भोगून आणि दहा कोटी वर्षें त्रैलोक्याचें राज्यसुख अनुभवून शेवटीं बलीला वैराग्य प्राप्त झालें आणि त्याचें मन अत्यंत शांत झालें. सुखदुःखांचे आणि संपत्तिविपत्तीचे हजारों आघात सोसल्यानंतर त्यानें मनानें भोगाभिलाषाचा त्याग केला आणि पूर्णात्मा होऊन त्यानें पातालकुहरांत आत्मारामाचें ठिकाणीं निरंतर वास्तव्य केलें. पुन्हां ह्याच बलीला अखिल जगाचें इंद्रपद प्राप्त होणार असून तें पद तो अनेक वर्षें भोगणार आहे. परंतु त्या इंद्रपदाच्या प्राप्तीनें बलीला हर्ष होणार नाहीं व आपलें वैभव नाहींसें झाल्यानें त्याला खेदहि होणार नाहीं; तर सर्व भावांमध्यें समचित्त आणि संतुष्ट राहून जें जें प्राप्तकर्म असेल, तें तें आकाशाप्रमाणें निर्लेप वृत्तीनें करीत तो आपला काळ कंठील.

राघवा! बलीला विज्ञानाची प्राप्ति कशी झाली, यासंबंधाचा वृत्तान्त मीं तुला येथपर्यंत सांगितला. तरी तूं सुद्धां बलीच्याच दृष्टीचा अवलंब करून जीवन्मुक्तीचें सुख भोगीत रहा. बलीप्रमाणें सतत विचार करून 'मी नित्य आहें' असा स्वानुभवपूर्वक निश्चय कर आणि धीरपणानें तें अद्वयपद प्राप्त करून घे. असुरश्रेष्ठ बलीसुद्धां दहा कोटी वर्षें जगत्रयाचें राज्य करून अखेरीस विरक्त झाला. तस्मात् महावीर! हा भोगभार अवश्य दुःखपर्यवसायी आहे, असें समज आणि त्याचा त्याग करून दुःखरहित व आनंदरूप अशा सत्याप्रत जाऊन पोहोंच. रामा! ह्या दृश्यदृष्टी नानाविध विकार उत्पन्न करणाऱ्या आहेत. पर्वत दुरून कितीहि रम्य दिसले तरी त्यांवर चढण्याचा यत्न करणारास कष्टच व्हावयाचे, त्याप्रमाणें दृश्य विषयांच्या बाह्यतः रम्य भासणाऱ्या स्वरूपाला भुलून त्यांच्यावर आसक्त होणारांना अखेरीस दुःखच व्हावयाचें. तस्मात् लोकवृत्तीमध्यें इकडे तिकडे धांवणाऱ्या चित्ताला आपल्या हृदयाच्या कोठडीमध्यें कोंडून ठेव. तूंच चिदादित्य असून जगामध्यें तूंच सर्वत्र स्थित आहेस. मग शत्रुमित्र हा भेद कोठें राहिला! अशा स्थितींत तूं असा वेड्यासारखा घोटाळ्यात कां पडतोस? हे महाबाहो! तूंच अनंत असा आद्यपुरुष आणि पुरुषोत्तम आहेस. तूं चिद्रूप असून विश्वांतील हजारों पदार्थांच्या रूपानें तूंच स्फुरण पावत आहेस. हें स्थावरजंगमात्मक जगत् नित्योदित आणि शुद्ध अशा तुझ्या आत्मस्वरूपामध्यें सूत्रांत ओंवलेल्या मण्याप्रमाणें स्थित आहे. तुला जन्म नाहीं, मृत्यु नाहीं, तर तूं अज असा विराट्पुरुष आहेस. राघवा! तूं चिद्रूप असल्यामुळें जन्ममरणाची भ्रांति तुला न होवो. तृष्णेची वृद्धि झाली म्हणजे जन्मादि रोगांचें प्राबल्य होतें आणि तृष्णेचा क्षय झाला म्हणजे त्यांचाहि क्षय होतो, असें अन्वयव्यतिरेकानें जाणून तृष्णेचा त्याग कर आणि केवल भोक्ता अर्थात् भोगसाक्षिरूप चिन्मात्र हो. सदासर्वदा उदय पावलेला तूं चित्सूर्य अस्तित्वांत असल्यामुळेंच हें संसारस्वप्न भासमान होत आहे. तूं जगन्नाथ आहेस; अर्थात् तुला खेद करण्याचें यत्किंचितहि कारण नाहीं

तरी सुखदुःखादि इच्छाशून्य हो. तूं शुद्धचित्त सर्वात्मा आणि सर्व वस्तूंचा प्रकाशक आहेस. जरी कदाचित् तूं अशुद्धचित्त असलास, तरी शुद्धचित्त होण्याचा तुला उपाय सांगतों. प्रथमतः तुला जें जें इष्ट वाटेल तें तें अनिष्ट आहे, असें समजत जा आणि जें जे अनिष्ट वाटत असेल ते तें इष्ट आहे, असं समजत जा व अशा रीतीनें ज्ञानाच्या सातव्या भूमिकेचा परिपाक होईपर्यंत अभ्यास चालू ठेव व एकदां तुझा मनोजय पूर्ण झाला, म्हणजे मग इष्टानिष्ट दृष्टीचाहि त्याग कर. इष्टानिष्टदृष्टी टाकून दिली म्हणजे समता उदय पावते व ही शाश्वत समता अंतःकरणांत बाणून गेली कीं प्राण्याला पुनर्जन्म प्राप्त होत नाहीं. ज्या ज्या ठिकाणीं मन एखाद्या मुलाप्रमाणें आसक्त होईल, तेथून तेथून त्याला परतवून परमात्मतत्त्वामध्यें स्थिर करावें. अशा रीतीनें मदोन्मत्त हत्तीप्रमाणें उन्मार्गगामी झालेलें मन अभ्यासानें एकदां आपल्या आटोक्यांत आलें, म्हणजे मोठा प्रयत्न करून त्याला सर्वात्मभावानें बांधून टाकावें. कारण, त्यापासूनच परमकल्याण होतें. यास्तव भोगसंकल्पांना बळी पडलेल्या आणि शरीरसुख हाच पुरुषार्थ असें मानणाऱ्या मूढांप्रमाणें रामा! तूं वागूं नकोस. विवेकवैराग्यादि साधनांच्या अभावीं आत्मज्ञान प्राप्त करून घेण्याला असमर्थ असलेल्या आणि दुसऱ्यांच्या उक्तींवर विसंबून रहाणाऱ्या मूर्खांच्या पराधीन स्थितीपेक्षां ज्यास्त दुःखकारक असें या जगांत कांहीं नाहीं. हें मौर्ख्य नाहींसें होण्याला विवेक हाच एक उपाय आहे. यास्तव महाबुद्धिवान् रामा! तूं आपल्या हृदयाशांत उदय पावलेल्या अविवेकरूपी मेघाला विवेकरूपी वायूच्या योगानें उडवून लाव. परंतु जोपर्यंत श्रवण, वैराग्य वगैरे पुरुषप्रयत्नांच्या योगानें आत्मानुग्रह झाला नाहीं, तोंपर्यंत विचाराचा उदय होत नाहीं. यास्तव या साधनांचा अवलंब करून आत्मप्रसाद होईल असें करावें. आतां वेद, वेदान्त, शास्त्रार्थ, तर्कदृष्टि इत्यादिकांनीं युक्त असलेला मनुष्यहि जर बहिर्दृष्टि असेल तर त्यालाहि आत्मज्ञान होणार नाहीं. यासाठीं अतर्मुख होऊन आत्मप्रसाद प्राप्त करून घेतला पाहिजे. आतां या ठिकाणीं तूं कदाचित् अशी शंका घेशील कीं, 'आत्मज्ञान जर प्रत्यक्दृष्टीनेच होण्यासारखें आहे तर गुरूपदेशाची आवश्यकता ती काय?' परंतु ही शंका बरोबर नाहीं. कारण, आपला अनुभव गुरु आणि शास्त्र यांच्यांशीं जमला, म्हणजेच प्राज्ञपुरुषाला आपल्या ज्ञानाबद्दल पुरा विश्वास उत्पन्न होतो, एरवीं होत नाहीं. म्हणून निभ्रांत ज्ञान होण्याला शास्त्र पाहिजे आणि गुरुपदेशहि पाहिजे. रामा! माझ्या उपदेशानें तुला चांगला बोध झाला आहे आणि तूं स्वतः विचार करून आत्मप्रसाद संपादन केला आहेस. या परमात्मस्वरूपी चित्सूर्याची विस्तृत व्याप्ति माझ्या उपदेशानें तुला कळली आहे, तुझे सर्व संकल्प अस्तंगत झाले आहेत आणि सर्व संदेहविभ्रम निरास पावले आहेत. तसेंच बाह्यार्थचमत्कारांचें कौतुक आणि आत्मतत्त्वजिज्ञासाकौतुक यांचें धुकें अजिबात नष्ट होऊन तूं आतां विगतज्वर झाला आहेस. बा मननशीला रामा! तूं जेव्हां बोधैकरस आत्म्याच्या आवरण आणि विक्षेप यांच्या पलीकडे जाऊन पोहोंचशील, तेव्हां तुला अप्राप्तज्ञान आणि त्याचीं साधनें यांची खरी प्राप्ति होईल. मग तुला विवेकवैराग्यादि साधनांचें यत्नानें रक्षण करणें, आलस्यप्रमादादि दोषांचें दूरीकरण करणें, समाधिसुखामृताचें पान करणें, व सप्तभूमिकांचें क्रमाक्रमानें आक्रमण करून आत्मसुख वृद्धिंगत करणें, यांपैकीं कशाचीहि यातायात करण्याचें कारण उरणार नाहीं

कारण ब्रह्मज्ञानाचा परिपाक झाला म्हणजे या सर्व गोष्टी आपोआप प्राप्त होऊन तूं ब्रह्मपदाप्रत जाऊन पोहोंचशील.

---

# सर्ग ३०

—:*:—

१. प्रल्हादाचें आख्यान. २. हिरण्यकश्यपूचा पराक्रम, प्रल्हादादि पुत्रांची उत्पत्ति, नृसिंहाकडून हिरण्यकश्यपु आणि इतर दैत्य यांचा वध आणि त्यांचें स्वबांधवांनीं केलेले और्ध्वदेहिक.

**श्रीवसिष्ठः**—रामा! काकतालीय न्यायानें विचारपूर्वक ज्ञानोदय कसा होतो, हें जनकाच्या आख्यानावरून तुला सांगितलें. तसेंच शास्त्र आणि गुरु यांचा अनुग्रह होऊन आत्मविचारानें ज्ञानोदय कसा होतो, हें बलीच्या आख्यानावरून तुला स्पष्ट करून सांगितलें. आतां उपासनेच्या योगानें ईश्वरानुग्रह होऊन प्रथम आत्मविचार आणि त्यानंतर क्रमानें ज्ञानोत्पत्ति कशी होते, याचें स्पष्टीकरण प्रल्हादाचें चरित्र सांगून मी करणार आहें, तरी तें लक्षपूर्वक ऐक.

ज्यानें आपल्या अद्वितीय पराक्रमानें सर्व सुरासुरांना पळावयास लावलें, असा भगवान् विष्णूसारखा हिरण्यकशिपु नांवाचा एक मोठा दैत्य पातालकुहरांत राज्य करीत होता. ज्याप्रमाणें भ्रमराला आश्रयभूत असलेल्या एखाद्या कमलाचें राजहंस लीलेनें आक्रमण करतो, त्याप्रमाणें त्या दैत्येश्वरानें संपूर्ण त्रिभुवनाचें आक्रमण केलें होतें व इंद्रालाहि जिंकलें होतें. ज्याप्रमाणें एखादा मदोन्मत्त हत्ती सरोवरांत शिरून हंसाचा विध्वंस करतो आणि भ्रमरांना वश करतो, त्याप्रमाणें त्या दैत्यराजानें सुरासुरांतील सर्व राजे नाहींसे करून त्यांचीं राज्यें हरण केलीं आणि त्रैलोक्याचें राज्य केलें. अशा रीतीनें राज्यसुख अनुभवीत असतां वसंत ऋतुमध्यें वृक्षांना अंकुर फुटावे त्याप्रमाणें, त्या असुराधिपतीला कालेंकरून पुत्र होऊन ते लवकरच लहानाचे मोठे झाले. ते जसजसे वाढूं लागले तसतसें त्यांचें तेज सूर्याच्या किरणांप्रमाणें चोहोंकडे पसरूं लागलें. त्या राजपुत्रांमध्यें प्रल्हाद नांवाचा युवराज होता. ज्याप्रमाणें मूल्यवान् रत्नांमध्यें कौस्तुभ श्रेष्ठ असतो, त्याप्रमाणें सर्व राजपुत्रांत तो श्रेष्ठ होता. अशा त्या पुत्राच्या योगानें, सर्व सौंदर्ययुक्त वसंतामुळें संवत्सर शोभतो त्याप्रमाणें, तो दानवेश्वर शोभत होता. पुत्रांचें साहाय्य, सैन्याची कडेकोट तयारी आणि खजिन्यांत अलोट संपत्तीचा संग्रह, इतकीं साधनें अनुकूल असल्यामुळें गंडस्थळांतील छिद्रांतून मद गळणाऱ्या हत्तीप्रमाणें तो उन्मत्त झाला आणि त्यानें त्रिभुवनाला 'त्राहि त्राहि' करून सोडलें. कल्पान्तकाळचे कर (किरण) ज्याप्रमाणें जगत्त्रयाला दुःसह होतात, त्याप्रमाणें त्यानें बसविलेले नवे नवे कर लोकांना दुःसह होऊं लागले. एखादा मुलगा दुर्वर्तनी निघाला असतां त्याच्या आप्तेष्टांना वाईट वाटतें, त्याप्रमाणें हिरण्यकशिपूच्या कृत्यामुळें सूर्यचंद्रादि देवांना अत्यंत खेद झाला. इतरांचे अपराध पोटांत घालणें हें महात्म्यांचें लक्षण असतें, ही गोष्ट खरी; परंतु **वारंवार अपराध करणाऱ्या दुर्जनांचें पारिपत्य करणें महात्म्यानांहि अखेरीस भाग पडतें.** यास्तव हिरण्यकशिपूचा वध करण्याविषयीं सर्व देवांनीं भगवान् नारायणाची प्रार्थना केली. तेव्हां भगवान् नारायणानें त्या दैत्येन्द्ररूपी मदोन्मत्त हत्तीचें पारिपत्य करण्यासाठीं नारसिंहाचें उग्र रूप धारण केलें. नारायणाचें तें रूप इतकें भयंकर होतें कीं, त्याची जांभई म्हणजेच प्रलयकाळीं उध्वस्त होणाऱ्या विश्वाच्या घर्घर ध्वनीप्रमाणें त्याचा शब्द होत असे. त्याचीं नखें

दिग्गजांच्या दांताप्रमाणें लांब आणि वज्राप्रमाणें कठोर होती. त्याचे दांत स्थिर विद्युल्लताप्रमाणें चमकत होते. त्याच्या कुंडलांची प्रभा दशदिशांना व्यापणारी होती. त्याचें उदर इतकें विशाल होतें कीं, त्यामध्यें समस्त कुलपर्वत सहज सांठवले गेले असते व त्यानें आपले ताडाप्रमाणें विस्तीर्ण असलेले बाहू वर उचलतांच ब्रह्माण्डाची कवची फुटून गेली असती. त्याच्या श्वासोच्छ्वासाबरोबर निघणाऱ्या वायूनें मोठमोठाले पर्वत उडूं लागत व त्याचा क्रोधाग्नि प्रलयकालच्या अग्नीप्रमाणे त्रिभुवनाचें भस्म करण्याला उद्युक्त झाला आहे कीं काय असें वाटे. त्याचा केशकलाप त्याच्या पुष्ट खांद्यावर अस्ताव्यस्त पसरलेला असून त्याच्या खांद्याच्या हालचालीमुळेंच सूर्याला जणूं प्रेरणा मिळाली आहे, असा भास होई. त्याच्या रोमकूपामध्यें विलसणाऱ्या अग्नीमुळें सर्व पर्वत तांबूस रंगाचे दिसत होते. सर्व कुल पर्वत खणून काढून त्याच्या विशाल शरीरावर एखादी मोठी भिंत उभारण्यासाठींच जणूं काय सर्व दिशा उद्युक्त झालेल्या दिसत होत्या. त्यानें आपल्या सर्व अवयवांच्या ठिकाणीं पट्टिश, प्रास, तोमर वगैरे आयुधें धारण केलीं होतीं. अशा तऱ्हेचे उग्र नारसिंह रूप धारण करून हर्त्तानें अश्वाला विदीर्ण करावें त्याप्रमाणें, माधवानें मोठ्यानें गर्जना करून हिरण्यकश्यपूला विदीर्ण केलें. त्या वेळीं त्याच्या नेत्रांतून बाहेर पडणाऱ्या अग्नीच्या ठिणग्या कल्पांतकाळच्या अग्नीप्रमाणें असुरांना दग्ध करूं लागल्या; व त्यानें दंड थोपटतांच सोसाट्याचा वारा सुटून तो अग्नि अधिकच भडकला व त्यामुळें प्रलयकाळचा भयंकर देखावा दिसूं लागला. त्याबरोबर सर्व दानव अगदी घाबरून गेले आणि अग्नीनें दग्ध होणाऱ्या मशकांप्रमाणें दशदिशांमध्यें सैरावैरा धांवत सुटले व अखेरीस निस्तेज दीपांप्रमाणें त्याचा कोठें मागमूसही लागेनासा झाला. अशा रीतीनें त्यांतील सर्व दैत्य पळून गेलेले आहेत आणि हिरण्यकश्यपूच्या अंतःपुराची राखरांगोळी झालेली आहे, अशाप्रकारचें तें पातालतल प्रलयकाळीं चक्काचूर झालेल्या जगाप्रमाणें उध्वस्त होऊन गेलें. याप्रमाणें त्या नारसिंहानें अकालींच कल्पान्तकाळची क्रिया केली आणि त्या दानवाधिपति हिरण्यकश्यपूचा वध केला, तेव्हां सर्व देवांना मोठा धीर आला आणि त्यांनीं नारसिंहाची मोठ्या आदरानें पूजा केली. नंतर नारसिंहरूप धारण करणारा भगवान् नारायण आपल्या अनिर्वचनीय स्थानाप्रत जाऊन पोहोंचला. इकडे मरतां मरतां वांचलेल्या दैत्यांचें पालन करण्याचें काम प्रल्हादानें सुरूं केल्यामुळें एखाद्या शुष्क झालेल्या सरोवराचा पक्ष्यांनीं आश्रय करावा त्याप्रमाणें, पळून गेलेले दैत्य जळून खाक झालेल्या आपल्या देशामध्यें परत आले, त्यांनीं आपल्या मृत बांधवाबद्दल विलाप केला आणि अखेरीस मृतांचें और्ध्वदेहिक केलें. नंतर ज्यांचे बांधव मृत किंवा दग्ध झाले होते, अशा दैत्यांना बोध करून प्रल्हादानें त्यांचें हळुहळु सान्त्वन केलें. त्या वेळीं सर्व दानव मोठ्या कमलांच्या चित्राप्रमाणें निश्चल झाले असून शोकभरानें अगदीं दीन झाल्यामुळें ज्यांचीं पानें आणि शाखा जळून खाक झाल्या आहेत, अशा वृक्षाप्रमाणें निस्तेज आणि निश्चेष्ट दिसत होते.

— -

# सर्ग ३१

—:❀:—

१ श्री[illegible]णूचा [illegible]क्रम आणि स्वजनक्षेम [illegible] प्रल्हाद त्याची भक्ति करतो आणि भक्त [illegible] तद्रूप होतो

श्रीवसिष्ठ—रामा ! नंतर दुःखानें पोळलेला प्रल्हाद त्यांतील मोठमोठे दानव मारून

टाकण्यांत आले होते, अशा पातालांत मौन धारण करून आपल्याशीं विचार करूं लागला. तो म्हणाला:—" याला आतां उपाय तरी काय करावा ? जेथें म्हणून वृक्षाचा जोरदार कोंब उगवेल तेथें वानरानें जाऊन तो खाऊन टाकावा, त्याप्रमाणें आमच्या वंशामध्यें जो जो तेजस्वी पुरुष उत्पन्न होतो त्याची त्यांची हा हरि वाट लावतो आणि कोणाला वर डोकें म्हणून काढूं देत नाहीं. हिमालयावर उगवणारीं कमलें कायम टिकूं शकत नाहींत, त्याप्रमाणें या आमच्या पातालामध्यें उत्पन्न होणारे पराक्रमी दैत्य टिकत नाहींत. समुद्रावरील लाटांप्रमाणें भयंकर आकार धारण करणारे आणि गर्जना करणारे दैत्य उत्पन्न होतात न होतात तों क्षणांत नाश पावतात. हाय हाय ! आमची राज्यादि बाह्य संपत्ति आणि उत्साहहर्षादि आंतरसंपत्ति नष्ट झाल्यामुळें आमचे शत्रू जे देव ते काळोखांतील काजव्याप्रमाणें कसे चमकत आहेत पहा ! रात्रीच्या वेळीं ज्यांचीं हृदयें अंधकारानें व्याप्त झालेलीं आहेत आणि ज्यांची पत्ररूपी संपत्ति संकुचित झाली आहे, अशीं सूर्यविकासी कमलें म्लान होऊन जातात त्याप्रमाणें, माझे बांधव ऐश्वर्यहीन होऊन सांप्रत शोक करीत आहेत. मृगराज सिंह नाहींसा होतांच त्याचें अरण्य सहस्रावधि क्षुद्र हरिणांकडून खुशाल तुडविलें जातें, त्याप्रमाणें माझे बाबा मृत्युवश झाल्याबरोबर ह्या दुष्ट देवांनीं त्यांचें राज्य कसें व्यापून टाकलें आहे पहा ! जे देव पूर्वीं माझ्या बाबांच्या सिंहासनापुढें नम्रभावानें प्रणाम करीत असत, तेच आज त्या सिंहासनाचा उपमर्द करीत आहेत. माझे हे बांधव निरुद्योगी, निस्तेज, दीन आणि दुःखीकष्टी झाले असून ज्यांचीं पानें जळून गेलीं आहेत अशा कमलांप्रमाणें सांप्रत शोभत नाहींसे झाले आहेत प्रचंड वावटळीमुळें घरांतून राख उडून धूपानें किंवा धुरानें या असुरवीरांचीं घरें व्यापून टाकलीं आहेत. दैत्यांच्या घरांचीं दारें नाहींशीं करण्यांत आलीं असून त्यांच्या अंतःपुरांतील भिंतींवरील पाचेच्या मण्यांची शोभा पार नष्ट झाली असून सांप्रत त्या भिंतींवरून लहान लहान यवांकुर वाढले आहेत. प्रत्यक्ष त्रैलोक्याच्या मध्यावर असलेल्या मेरुपर्वताचाहि चक्काचूर करण्याला समर्थ असलेले मत्त हत्तींसारखे दानव, पूर्वीं माझ्या बाबांच्या वेळेला देव दिसत असत ते सध्यां दीनदुबळे झालेले दिसत आहेत. यावरून असेंच म्हणावें लागतें कीं, दैवाला असाध्य असें या जगांत काय आहे ? या दानवांच्या स्त्रिया गांवांत शिरलेल्या हरिणींप्रमाणें कोठें झाडाचें पान हाललें तरी सुद्धां शत्रु आला असें समजून थरकांप भिऊं लागतात. येथील दिव्यवृक्षांवरील जे रत्नांचे घोंस असुरस्त्रिया कर्णभूषणें म्हणून वापरीत असत, ते या नारसिंहानें आपल्या हातानें उपटून टाकले असून त्या वृक्षांचीं खोडें तेवढीं शिल्लक राहिलीं आहेत. परंतु तिकडे नंदनवनामध्यें दिव्य लता, पत्रें, शाखा आणि रत्नगुच्छ यांच्या योगानें शोभणाऱ्या कल्पवृक्षाची पुन्हां लागवण करण्यांत येत आहे. पूर्वीं बंदिवान् करून आणलेल्या देवांगनांचीं मुखें असुर प्रशंसापूर्वक अवलोकन करीत असत, पण आज आमच्याच बंदिवान् केलेल्या स्त्रियांचीं मुखें देव मोठ्या आनंदानें पहात असतील. तसेंच मला वाटतें पर्वतांच्या कड्यांवरून वहाणाऱ्या नद्यांप्रमाणें देवांच्या हत्तींच्या गंडस्थळांवरून दानोदकांचे प्रवाह वहात असतील. परंतु इकडे आमच्या हत्तींकडे पहा, त्यांचीं गंडस्थळें शुष्क होऊन त्यांवरून शुष्क मरुभूमीप्रमाणें धूळ उडालेली दिसत आहे. परागयुक्त वायुलहरींच्या संचारामुळें ज्यांच्या अंगाला मंदारपुष्पांचा सुवास येत

आहे, असे मेरुशिखरांप्रमाणें दिसणारे भव्य दैत्य अलीकडे दुर्लभ झाले आहेत. दानवांच्या अंतःपुरामध्यें रहाण्याला योग्य असलेल्या देव आणि गंधर्व यांच्या सुंदर स्त्रिया वृक्षांवरील मंजरींप्रमाणें आज मेरुपर्वतावर वास्तव्य करीत आहेत. हाय हाय ! देवांगना नृत्य करते वेळीं आमची विटंबना करण्याकरितांच वाळलेल्या कमिलिनीसारख्या निस्तेज झालेल्या आमच्या विलासिनी स्त्रियांचे हावभाव मुद्दाम करून दाखवीत असतील. पूर्वी माझ्या बाबांवर ज्या चवऱ्या वारीत असत, त्याच चवऱ्या आज इंद्रावर वारीत असतील. ज्याच्या पराक्रमाचें नुसतें स्मरण झालें तरी आम्हांला भय वाटतें, अशा त्या हरीच्या कृपाप्रसादामुळें देव आज वैभवाच्या शिखरास चढले आहेत आणि त्याच्या अवकृपेमुळे आम्हांला ही दुःखकारक आपत्ति प्राप्त झाली आहे. त्या हरीच्या बाहुरूपी छायेमध्यें देव खुशाल विश्रांति घेत बसले आहेत व हिमाचलाच्या शिखराप्रमाणें त्यांना यत्किंचितहि ताप होत नाहीं. ज्याप्रमाणें पर्वत आणि वृक्ष यांच्या शिखरांच्या आश्रयानें राहणारे वानर शिकारी कुत्र्यांची त्रेधा उडवितात, त्याप्रमाणें हरीच्या पराक्रमाचा आश्रय करून रहाणारे हे देव आम्हां बलवान् दानवांनाही त्रास देतात आणि आमचा पाताळांत कोंडमारा करतात. व त्यामुळें अलंकारांनाहि शोभा देणारीं असुरस्त्रियांचीं रमणीय मुखकमलें दुःखाश्रुरूपी दंवबिंदूंनीं मलिन आणि कलंकित झालीं आहेत. असुरांच्या पराक्रमानें विदीर्ण होऊन जीर्ण झालेला हा भुवनमंडप नीलमण्यांच्या स्तंभाप्रमाणें शोभणाऱ्या आपल्या भुजांनीं तो श्रीहरीच सांवरून धरीत आहे. ज्याप्रमाणें क्षीरसमुद्रांत बुडणाऱ्या मंदराला त्यानें पूर्वीं कच्छावतारामध्यें तारलें, त्याचप्रमाणें विपत्सागरामध्यें बुडणाऱ्या देवसेनेला तो सांप्रत तारीत आहे. प्रलयकाळचा प्रचंड वायु कुलपर्वतांना उलथून टाकतो, त्याप्रमाणें माझे बाबा आणि दुसरे मोठमोठे असुर यांना त्यानें धुळीस मिळविलें आहे. त्याचे पराक्रमी बाहू म्हणजे जगताचा संहार करण्यास समर्थ असलेला जणुं प्रखर अग्नि असून तो मधुदैत्याला ठार मारणारा महापराक्रमी आणि ऐश्वर्यसंपन्न श्रीहरि देवांचा गुरु आहे व त्याचें आक्रमण करणें आम्हां दानवांना अशक्य आहे. दानवांच्या पराक्रमी बाहूंना छिन्नभिन्न करून टाकणारी जणुं कुऱ्हाडच, अशा त्या श्रीहरीच्या वीर्यानें चढून गेलेला इंद्र एकाद्या मर्कटानें पोरांना वांकुल्या दाखवाव्या त्याप्रमाणें आम्हां दानवांची चेष्टा करतो आणि आम्हांला त्रास देतो. या पुंडरीकाक्षाजवळ शस्त्रास्त्रें नसलीं तरीसुद्धां तो दुर्जयच आहे. कारण, वज्रापेक्षां दृढ असलेल्या त्याला कोणतें शस्त्र व अस्त्र तोडणार? ज्यामध्यें एकमेक पर्वतास्त्र सोडीत असत अशा तऱ्हेचे आमच्या आजापणजांचे आणि त्याचे अनेक घनघोर रणसंग्राम झालेले आहेत व त्यामुळें युद्धकलेमध्यें त्याचा अभ्यासहि चांगलाच झाला आहे. त्या घनघोर युद्धप्रसंगींहि जो डगमगला नाहीं, तो आमच्यासारख्याशीं युद्ध करतांना भिऊन जाईल, अशी कल्पनासुद्धां करण्याचें कारण नाहीं एवंच, त्याच्यापुढें आमच्या सारख्यांचा पाड काय ?

आतां त्याला वश करण्याचा मला एकच उपाय दिसतो; व त्यावांचून आम्हांला होणारी पीडा दूर होण्यासारखी नाहीं, असें माझें मत आहे. तो उपाय म्हटला म्हणजे अंतःकरणपूर्वक त्याला शरण जाणें हाच होय. या जगांत आपले बुद्धिसर्वस्व आणि क्रियासर्वस्व खर्ची घालून अंतःकरणपूर्वक शरण जाण्याचें जर कोणतें स्थान असेल तर तेंच एक आहे,

त्याशिवाय दुसरें कोणतेंहि नाहीं. त्या श्रीहरी-हून अधिक पराक्रमी असा त्रैलोक्यांत कोणी नाहीं व उत्पत्ति, स्थिति आणि प्रलय यांचें कारणहि तोच आहे. यास्तव मी आतां याच क्षणापासून त्या अज नारायणाला शरण जातों व तो नारायण म्हणजे दुसरा तिसरा कोणी नसून मीच तो नारायण आहें. 'नमो नारायणाय' हा मंत्र सर्वार्थसाधक असून ज्याप्रमाणें आकाशांतून वायु नष्ट होत नाहीं, त्याप्रमाणें हा मंत्र माझ्या हृदयांतून कधींहि नाहींसा होणार नाहीं. मला आतां सर्व दिशा हरि, आकाश हरि, पृथ्वी हरि व सर्व जगत् आतां भावनेमुळें सर्वव्यापी हरि झालें आहे. मीच हरि असून मीच विष्णुमय झालों आहे. स्वतः **अविष्णु असून विष्णूची पूजा करणाराला विष्णूपूजेचें फल मिळत नाहीं. विष्णुपूजेचें फल मिळण्याला तद्रूप झालें पाहिजे; अर्थात् मनुष्यानें विष्णु होऊनच विष्णूचें पूजन केलें पाहिजे.** यास्तव हा मी आतां स्वतःच विष्णु झालों आहे. त्याचेंच नांव प्रल्हाद हें आहे, तो हरि आहे; माझ्याहून हरि निराळा नाहीं, असा अंतर्निश्चय झाल्यामुळें हा पहा मी सर्वव्यापक बनलों आहें. हा कनकवर्ण विनतासुत ( गरुड ) अनंत आकाश व्यापून माझें आसन झाला आहे. माझ्या हातांमध्यें चक्रगदादि आयुधें फांद्यांवरील पक्ष्याप्रमाणें विराजमान झालीं आहेत. मंजऱ्यांनीं युक्त असलेल्या वृक्षाप्रमाणें शोभणारे व मंदारमाला आणि भूषणें यांच्यामुळें मनोहर दिसणारे असे हे माझे चार बाहू नखकांतीच्या योगानें शोभणारे आहेत. क्षीरसमुद्रातून निघालेली ही लक्ष्मी चंद्राच्या चंचल कलेप्रमाणें सुंदर चवरी घेऊन माझ्या एका बाजूला उभी आहे. जिनें सर्व जगाला लीलेनें लुब्ध केलें आहे. आणि जी त्रैलोक्यरूपी वृक्षाची जणुं मंजरीच आहे, अशी ही कीर्ति माझ्या दुसऱ्या बाजूला मूर्तिमंत उभी आहे. इंद्रजालाप्रमाणें सतत नवें नवें जगज्जाल निर्माण करणारी ही माया माझ्या एका बाजूला उभी आहे आणि कल्पवृक्षावरील लतेप्रमाणें सर्व त्रैलोक्यरूपी वृक्षांना जिंकणारी ही लक्ष्मीची सखी जया माझ्या दुसऱ्या बाजूला उभी आहे. शीतोष्णकिरणांनीं युक्त असलेले हे चंद्रसूर्य माझ्या मुखाच्या मध्यभागीं असलेले नेत्र असून ते सर्व संसार प्रकट करीत असतात. ही पहा माझी नीलोत्पलाप्रमाणें श्यामवर्ण आणि पुष्ट मेघाप्रमाणें सुंदर दिसणारी शरीरकांति दशदिशांमध्यें पसरली असून त्यामुळें सर्व दिशा नीलवर्ण झालेल्या दिसत आहेत. हा पहा माझ्या हातांतील पांचजन्य नांवाचा गंभीर ध्वनि करणारा शंख. हा क्षीरसमुद्राप्रमाणें शुभ्रवर्णाचा असून शब्द हाच ज्याचा आत्मा आहे, अशा आकाशाप्रमाणें माझ्या हातामध्यें मूर्तिमंत स्थित आहे. ज्याच्या गाभ्यामध्यें ब्रह्मदेवरूपी भ्रमर निजलेला आहे, आणि जें माझ्या नाभीपासून उत्पन्न झालें आहे, असें हें कमल माझ्या हातांत आहे, दैत्य आणि दानव यांचें मर्दन करणारी आणि सुमेरूच्या शिखराप्रमाणें रत्नजडित सुवर्णानें युक्त असलेली ही प्रचंड गदा माझ्या हातांत शोभत आहे. हें पहा माझ्या हातांतील सुदर्शन चक्र. याची प्रभा नुकत्याच उगवणाऱ्या सूर्याप्रमाणें दशदिशांमध्यें फांकलेली असून त्यामुळें दिक्तटांवरून तांबुस रंगाची छटा पसरलेली दिसत आहे. दैत्यरूपी वृक्षांना तोडणारा जणुं कुठारच असें धूमरेखायुक्त, अग्नीप्रमाणें सुंदर आणि तेजस्वी दिसणारें हें नंदक नामक खड्ग माझ्या हातांत शोभत आहे. कल्पांतकाळच्या पुष्करावर्त मेघाप्रमाणें शरधारांचा वर्षाव करणारें आणि इंद्रधनुष्या-

प्रमाणें सुंदर व विशाल दिसणारें हें माझें रत्नजडित शार्ङ्ग धनुष्य आहे. भूतकालीं होऊन गेलेलीं, वर्तमानकाळीं अस्तित्वांत असणारीं आणि भविष्यकालीं अस्तित्वांत येणारीं सहस्रावधि जगें मीं आपल्या उदरांत सांठवून ठेविलीं आहेत. पृथ्वी हे माझे पाय आहेत, आकाश हें मस्तक आहे, त्रिभुवन हें शरीर आहे आणि दिशा ह्या कुशी आहेत. गरुडावर आरूढ झालेला आणि शंख, चक्र, गदा धारण करणारा मी साक्षात् मेघश्याम विष्णुच आहें. हे सर्व दुरात्मे पुरूष वायूनें गवताच्या राशी उडवून लावाव्या त्याप्रमाणें, मला पाहून पळून जातात. नीलकमलाप्रमाणें श्यामसुंदर, पीतांबरधारी गदायुक्त लक्ष्मीवान् आणि गरुडारूढ असा मी स्वयमेव अच्युत आहें. त्रैलोक्य जाळण्याला समर्थ असलेला जो मी, त्या माझ्यापुढें कोणता प्रतिस्पर्धी वीर उभा रहाणार आहे? व राहिलाच तर अग्नीमध्यें शलभ नाश पावतात त्याप्रमाणें कालाग्निस्वरूपी जो मी त्या माझ्यापुढें उभे राहणारांचा नाश हा ठेवलेलाच आहे. ज्यांच्या डोळ्यांना विकार असतो ते ज्याप्रमाणें प्रकाश सहन करूं शकत नाहींत, त्याचप्रमाणें माझ्यापुढें उभे असलेले हे सुरासुर माझ्या कांतीचें तेज सहन करूं शकणार नाहींत. मी विष्णु—ईश्वर असून ब्रह्मा, इंद्र, अग्नि, शंकर वगैरे देव माझी अनेक मुखांनीं वेदवचनानीं स्तुति करतात. हा मी विष्णूच्या आकाराचा आणि सकल ऐश्वर्यसंपन्न झालों आहें. मी सर्व द्वंद्वाच्या पलीकडे असून परममहिम्यानें युक्त आहे. सारांश, ज्याच्या उदरामध्यें त्रिभुवन सांठविलें गेलें आहे, ज्यानें सर्व दुष्ट प्राण्यांचा संहार केला आहे आणि मेघ, पर्वत, अरण्यें वगैरे वस्तूंचें जें अधिष्ठानभूत आहे, अशा या माझ्या सकलभयनाशक विराट् शरीराला मीच वंदन करतों."



# सर्ग ३२

—:•:—

१. प्रल्हाद श्रीविष्णूची मानसपूजा आणि बाह्य पूजा करतो. २. दानव विष्णुभक्त झाल्याचें ऐकून विस्मित झालेले देव भगवंताला त्याचें कारण विचारतात.

श्रीवसिष्ठः—रामा! अशा रीतीनें मनानें चिंतन केल्यानंतर प्रल्हादानें आपली तनु नारायणात्मक केली. नंतर त्या असुरशत्रूची पूजा करण्याच्या हेतूनें त्याचें पुनः चिंतन करण्याला त्याने सुरुवात केली. तो म्हणालाः— "(स्थूल, सूक्ष्म आणि पर अशा) ज्या वैष्णवी स्वरूपाची मी आतां भावना केली, त्याहून निराळी अशी कोणतीहि समष्टिरूप किंवा व्यष्टिरूप देवतामूर्ति नाहीं, ही गोष्ट खरी. परंतु हाच मद्रूप विष्णु माझ्याहून निराळा आहे, अशी मी आतां पूजेसाठीं भावना करतों. हा पहा गरुडावर आरूढ झालेला, (क्रिया, ज्ञान, इच्छा व अनुग्रह ह्या) चार शक्तींनीं युक्त असलेला, शंखचक्रगदाधारी, श्यामवर्ण, चतुर्भुज, चंद्रसूर्य हेच ज्याचे नेत्र आहेत असा, श्रीमान्, नंदननामक रमणीय खड्गाच्या योगानें शोभायमान् होणारा, पद्मपाणि, विशालाक्ष, शार्ङ्गधन्वा आणि महातेजस्वी असा श्रीविष्णु माझ्यापुढें उभा आहे. तर आतां मी याची सर्व देवगणासह प्रथम मनोमय पूजासामग्रीनें मानसपूजा करतों आणि नंतर या महादेवाची पुन्हां रत्नादि बाह्यपूजासमारंभानें पूजा करीन." येणेंप्रमाणें विचार करून प्रल्हादानें मनानें पूजासाहित्य गोळा करून त्या लक्ष्मीपति माधवाची मानसपूजा केली. त्यानें मनानें रत्नखचित पात्रें निर्माण करून श्रीविष्णूला अभिषेक केला, चंदनादि सुगंधी द्रव्यांचे लेप लावले, नानाविध अलंकार धूपदीप समर्पण केले; अनेक-

विध अलंकार घातलें, मंदारमाले, सुवर्णकमल, कल्पवल्लींचे रत्नस्तबक असलेले पुष्पगुच्छ, निरनिराळ्या दिव्य वृक्षांचे पल्लव, अनेक प्रकारच्या पुष्पमाला, किंकिरात, बक, कुंद, चंपक, नीलकमलें, कल्हार, कुमुद, काश, खर्जूर, आम्र, किंशुक, अशोक, मदन, बिल्व, कर्णिकार, किरातक, कदंब, बकुल, निंब, सिंदुवार, पारिभद्र, गुग्गुल, प्रियंगु, पाट, पाटल, धातुपाटल, आम्र, अम्रातक, गव्य, हरीतक, बिभीतक, शाल, ताल, तमाल यांचीं पुष्पें व पत्रें, कोंवळ्या काळ्या, केशराच्या सुगंधानें युक्त असलेल्या आम्रमंजरी, केतकी, शतपत्रकमलें, एलामंजरी इत्यादि अनेकविध साहित्यानें पुष्पांजलि अर्पण करून, तसेंच धूप, दीप, नैवेद्य, तांबूल, प्रदक्षिणा वगैरे सर्व यथोचित उपचार करून शेवटीं प्रल्हादानें आत्मार्पण केलें. अशा रीतीनें त्यानें आपल्या अंतःपुरांतील देवगृहांत हरीची मूर्ति स्थापन करून जगातील सर्व ऐश्वर्य मनानें गोळा केलें आणि मोठ्या भक्तियुक्त अंतःकरणानें त्या दानवाधीशानें जनार्दनाचें बाह्यतः मोठ्या थाटानें पूजन केलें. सर्व लौकिकद्रव्यें जमवून मानसपूजेच्या क्रमानेंच त्यानें बाह्यपूजा केली. श्रीविष्णूचें वारंवार पूजन केल्यामुळें प्रल्हादाच्या अंतःकरणाला मोठा संतोष वाटला व तेव्हांपासून दररोज श्रीविष्णूची पूजाअर्चा करण्याचा क्रम त्यानें सुरू ठेवला. याप्रमाणें प्रल्हादानें स्वतः प्रतिदिवशीं पूजाक्रम सुरू केल्यामुळें त्याच्या नगरांतील सर्व दानवांनीं त्याचें अनुकरण करून विष्णुभक्ति करण्याला प्रारंभ केला. राजा हा प्रजेच्या आचाराला कारणीभूत असल्यामुळें जसा राजा तशी प्रजा, हा आचाराच्या बाबतींत ठरलेला नियम आहे. पुढें श्रीविष्णूचा द्वेष करण्याचें टाकून सर्व दैत्य त्याचे भक्त बनले आहेत, ही वार्ता जेव्हां देवलोकापर्यंत गेली, तेव्हां इंद्रप्रभृति देवांना मोठें आश्चर्य वाटलें. इंद्रादि देव आणि मरुद्गण यांनीं आपसांत पुष्कळ विचार केला, परंतु दानवांनीं विष्णूचा द्वेष टाकून त्याची भक्ति कां आरंभिली, याबद्दल कोणाचा कांहींच तर्क चालेना. राघवा ! अशा रीतीनें आश्चर्यचकित झालेले इंद्रादि देव अमरावतीहून निघाले व क्षीरसमुद्रामध्यें वास करणाऱ्या शेषशायी भगवानाजवळ जाऊन त्यांनीं दैत्यासंबंधाचा सर्व वृत्तान्त त्याला निवेदन केला आणि त्या अपूर्व आश्चर्याचें कारण काय, असें विचारलें. देव म्हणाले:—"भगवन् ! हें केवढें आश्चर्य आहे कीं, जे दैत्य आपल्याला नेहमीं पाण्यांत पाहणारे म्हणून प्रसिद्ध आहेत, ते आतां आपल्या भजनीं लागले असून आपल्याशीं तादात्म्य पावले आहेत. यात त्याचें काहीं तरी गुप्त कारस्थान असावें, असें आम्हांस वाटतें. कारण, देव, मुनी वगैरेंचा द्वेष करून त्यांचें निवासस्थान ज्या ठिकाणीं आहे, अशा पर्वताचेंहि चूर्ण करणारे दुर्वृत्त दानव कोणिकडे आणि अखेरच्या जन्मीं मोठ्या पुण्याईनेंच प्राप्त होणारी भगवद्भक्ति कोणिकडे ! भगवन् ! एखादा हीन कुळांत उत्पन्न झालेला पुरुष गुणसंपन्न झाला, तर ती गोष्ट अकालीं विकास पावलेल्या पुष्पांच्या मालेप्रमाणें एका दृष्टीनें आनंददायक असते, त्याचप्रमाणें दुसऱ्या दृष्टीनें उत्पातसूचक, अर्थात् उद्वेगजनक असते. **जें ज्या ठिकाणीं युक्त नसतें, तें त्या ठिकाणीं शोभतहि नाहीं.** कांचेच्या ढिगांत महामूल्यवान् रत्न कसें शोभणार ? जो प्राणी ज्या सात्त्विक, राजस किंवा तामस प्रकृतींत उत्पन्न झाला असेल, किंवा जो ज्याचा नैसर्गिक गुण असेल, त्यानें त्या गुणांत रहावें हेंच योग्य आहे. रंगरूपानें एकादा कुत्रा बकऱ्यासारखा असला तरी तो त्यांच्या कळपात कधीं रहात नाहीं. अयोग्य वस्तूंचा योग्य वस्तूंशीं संबंध

जडलेला पाहिला, म्हणजे त्या अनौचित्यदोषामुळें सुज्ञांना जितकें दुःख होतें, तितकें दुःख अंगांत वज्राच्या सुया टोंचल्यानेंहि होत नाहीं. कमल हें जसें जलामध्यें शोभतें तसें स्थलावर शोभत नाहीं; कारण, तें त्याचें उचित स्थान नव्हे. ज्याची ज्या ठिकाणीं बसण्याची योग्यता असेल त्यानें त्या ठिकाणींच बसावें व त्यांतच त्याची शोभा आहे. हे अत्यंत अधम नीचकर्मरत, तामसी आणि दुष्ट दानव कोणीकडे आणि वैष्णवी भक्ति कोणीकडे! यास्तव हे माधवा! एखादी कमलिनी तापलेल्या माळजमिनीवर उगवल्याचें ऐकून जसा ऐकणारांच्या मनाला आनंद होत नाहीं, तसें दितिपुत्र-दैत्य माधवभक्त झाल्याचें वर्तमान ऐकून आम्हांला बरें वाटत नाहीं."

# सर्ग ३३

—:०:—

१. हरिभक्तीमुळें प्रल्हादाच्या ठिकाणीं विवेकादि गुणांचा उदय होतो. २. प्रल्हादानें केलेली श्रीविष्णूची स्तुति.

**श्रीवसिष्ठः**—रामा! याप्रमाणें दैत्यांच्या अनुचित वर्तनामुळें क्षुब्ध झालेल्या आणि रागानें गर्जना करणाऱ्या देवांना, मेघानें मयूरवृंदाशीं भाषण करावें त्याप्रमाणें, भगवान् म्हणाले:—"देवांनो! प्रल्हाद भक्तिवान् झाला याबद्दल तुम्हीं खेद करण्याचें कांहीं कारण नाहीं. स्वभावतःच बलाढ्य असलेले दैत्य माझ्या भक्तीमुळें अधिक बलाढ्य आणि उच्छृंखल होतात हें जरी खरें आहे, तरी प्रल्हादासंबंधानें तशी भीति बाळगण्याचें कारण नाहीं. प्रल्हादाचा हा अखेरचा जन्म असून तो आतां मोक्षप्राप्तीला योग्य झालेला आहे. तो मोक्षार्थी असल्यामुळें त्याला राज्यसुख हें कस्पटाप्रमाणें वाटत आहे. यास्तव तो प्रबळ होऊन तुमचें राज्य घेईल, ही आपल्या मनांतली भीति तुम्ही काढून टाका. ज्याप्रमाणें भाजलेलें बीं अंकुर धारण करीत नाहीं, त्याप्रमाणें इतउत्तर प्रल्हादाला मातेच्या उदरांत वास्तव्य करावें लागणार नाहीं. **एखादा मनुष्य प्रथम गुणवान् असून मागून गुणहीन झाला तर त्याचा तो क्रम अनर्थकारक आणि पुरुषार्थविघातक आहे, असें विद्वान् समजतात. परंतु एखादा पुरुष प्रथम गुणरहित असून मागून गुणवान् झाला, तर त्याचा तो क्रम सिद्धि प्राप्त करून देणारा आहे, असेंच सर्व मानतात.** यास्तव देवांनो! तुम्ही आपापल्या स्थानीं जाऊन स्वस्थ रहा. प्रल्हादाची भक्ति तुमच्या दुःखाला कारणीभूत होणार नाहीं."

राघवा! याप्रमाणें देवांना उपदेश केल्यानंतर एखाद्या नदीच्या तटावरील तमालपत्राचा पुष्पगुच्छ लाटेबरोबर आंत जाऊन दिसेनासा होतो, तद्वत् भगवान् विष्णु क्षीरसमुद्राच्या लाटांमध्यें एकदम अंतर्धान पावले व ज्याप्रमाणें आकाशांतून क्षीरसमुद्रांत पडलेले जलबिंदू मंदर पर्वताच्या आघातामुळें पुन्हां वर उडून आकाशांत जावे, त्याप्रमाणें देवहि भगवान् विष्णूची पूजा करून स्वस्थानीं निघून गेले. परंतु त्या वेळेपासून प्रल्हादावर देवांचें प्रेम बसत चाललें. कारण, उघडच आहे कीं, **ज्या वस्तूवर किंवा मनुष्यावर महात्मे प्रेम करतात, त्यावर सर्वांचा विश्वास बसावा हें अगदीं स्वाभाविक आहे.** इकडे भक्तिवान् प्रल्हादाचें कायावाचामनेंकरून दररोज देवाधिदेव जनार्दनाचें पूजन करण्याचें काम अव्याहत चालूच होतें. अशा रीतीनें त्याचा पूजेचा क्रम चालला असतां त्या पूजापरायण प्रल्हादाच्या मनांत विवेक, आनंद, वैराग्य वगैरे गुणांचा विकास होऊं लागला. वाळलेल्या वृक्षाप्रमाणें

नीरस असलेल्या भोगांबद्दल त्याला प्रेम वाटेनासें झालें आणि ज्याप्रमाणें हरिण हा जनसमुदायानें युक्त असलेल्या भूमीमध्यें रममाण होत नाहीं, त्याप्रमाणे तो स्त्रियांच्या ठिकाणीं रममाण होईनासा झाला. शास्त्रार्थकथनावांचून दुसऱ्या कोणत्याहि ( अशास्त्रीय ) लोकप्रवृत्तीमध्यें त्याचें मन आसक्त होत नसे. ज्याप्रमाणें भूमीवर कमलिनी उत्पन्न होत नाहीं, त्याप्रमाणें समाजोत्सवादि दृश्य वस्तूंसंबंधानें त्याच्या मनांत केव्हांहि प्रीति उत्पन्न होत नसे. ज्याप्रमाणें एका भोंक न पाडलेल्या मोत्यावर दुसरें तसेंच मोतीं ठेवलें तरी तें माळेंत टिकत नाहीं, त्याप्रमाणें त्याचें चित्त भोगरूपीरोगांमध्यें केव्हांहि अनुरक्त झालें नाहीं. परंतु भोगादि कल्पना सोडून तें अद्याप पूर्ण शांत झालें नव्हतें, तर पाळण्यांत ठेवल्याप्रमाणें मधल्यामधेंच झोंके खात होतें, प्रल्हादाच्या मनाची ती आंदोलन पावणारी स्थिति भगवान् श्रीविष्णूंनीं क्षीरसमुद्रांतून अंतर्ज्ञानानें पाहिली आणि भक्तांना आल्हाद देणारे भगवान् श्रीविष्णु पातालमार्गानें प्रल्हादाच्या देवघरांत त्याच्या पुढें येऊन उभे राहिले. त्याबरोबर प्रल्हादानें मोठ्या आनंदानें आणि भक्तीनें भगवंताची पूजा केली; व नंतर त्यानें आपल्या समोर प्रत्यक्ष उभे राहिलेल्या भगवंताची भक्तियुक्त अंतःकरणानें प्रार्थना करण्यास सुरवात केली.

प्रल्हादः—त्रिभुवनाला सुरक्षित ठेवणारा सुंदर कोश, बाह्य व आभ्यंतर कलंक हरण करणारा, स्वयंप्रकाश, अनाथांचें रक्षण करणारा, शरण जाण्याला योग्य, सर्वशक्तिसंपन्न, रजोगुणामुळें अज, सत्त्वगुणामुळें अच्युत आणि तमोगुणामुळें ईश्वर अशीं त्रिगुणात्मक रूपें धारण करणारा जो तूं श्रीहरि, त्या तुला मी शरण आलों आहें. नीलकमलाप्रमाणें आणि नीलमण्याप्रमाणें कांति असलेला, शरत्कालांतील निर्मल आकाशाची उपमा देण्याला योग्य असलेला भ्रमर, अंधकार किंवा काजळ यांच्याप्रमाणें ज्याचा वर्ण आहे, तसेंच पद्म, चक्र, आणि गदा धारण करणारा जो तूं, त्या तुला मी शरण आलों आहें. ज्याचें अंग भ्रमरकलापाप्रमाणें सुंदर आहे, ज्याच्या हतांत शुभ्र कमलाप्रमाणें स्वच्छ शंख शोभत आहे, श्रुतिरूपी गुंजारव करणारा जणुं भ्रमरच असा ब्रह्मदेव ज्याच्या नाभिकमलामध्यें वसत आहे आणि स्वभक्तांचें हृदयकमल हेंच ज्याचा आधार आहे, अशा निर्मलाला तुला मी शरण आलों आहें. ज्याचीं शुभ्र नखें ह्याच तारका आहेत, स्मितहास्य हेंच पूर्ण चंद्रबिंब आहे, हृदयावरील कौस्तुभमण्याची प्रभा हीच आकाशगंगा आहे, अशा शरत्कालीन आकाशाप्रमाणें भासणाऱ्या तुला हरीला मी शरण आलों आहें. ज्याच्यापासून सर्व सृष्टि उत्पन्न होते आणि ज्याच्या ठिकाणीं ती फिरून लीन होते असा, तसेंच जीं स्वतः उत्पन्न होत नाहींत व पावत नाहींत, अशीं विकारशून्य आणि सत्त्वादि गुणांनीं युक्त असलेलीं अनंत कल्याणकारक शरीरें धारण करणारा, आणि प्रलयकाळीं शिशुरूपानें वटपत्रावर शयन करणारा जो तूं, त्या तुला मी शरण आलों आहें. ज्याचा उदरप्रांत नाभिकमलाच्या परागांमुळें पीतवर्ण दिसत आहे, ज्याच्या वामांकावर लक्ष्मी विराजमान झाली आहे आणि ज्यानें सायंकाळच्या अरुणप्रभेप्रमाणें दिसणारा अंगराग धारण केला आहे, असा सुवर्णवर्णाचा पीतांबर परिधान करणारा जो तूं, त्या तुला मी शरण आलों आहें. दैत्यरूपी कमलिनीला छिन्नभिन्न करणारा जणुं हिमकणसमूह, देवरूपी कमलिनीला प्रफुल्लित करणारा सूर्य, ब्रह्मदेवाच्या निवासस्थानभूत कमलिनीला आश्रय देणारा जलाशय आणि ज्याच्या हृदयामध्यें कमल विराजत आहे असा जो तूं विभु, त्या

तुला मी शरण आलों आहें. त्रिभुवनरूपी कमलिनीला प्रफुल्लित करणारा जणुं सूर्य व तिमिरसदृश मोह नष्ट करणारा जणुं श्रेष्ठ दीप, तसेंच स्वयंप्रकाश, अजड आणि साक्षात्कारमात्रानें सर्व जीवांचीं दुःखें हरण करणारा जो तूं, त्या तुला मी शरण आलों आहें.

**श्रीवसिष्ठः**—याप्रमाणें अनेकगुणवर्णनानें युक्त असलेली प्रार्थना ऐकल्यानंतर असुरमर्दन करणारा आणि लक्ष्मीनें आलिंगन दिलेला हरि प्रल्हादाच्या स्तुतीनें संतुष्ट झाला आणि मेघ ज्याप्रमाणें मयूराला आनंद देणारें भाषण करतो, त्याप्रमाणें मेघश्याम श्रीविष्णु प्रल्हादाला म्हणाला.

# सर्ग ३४

१. भगवान् श्रीविष्णूच्या वरामुळें प्रल्हादाला सद्विचार सुचतो. २. आत्मविचारणेमुळें अनात्मवर्गाचा निरास होऊन त्याला सच्चिदानंदरूपी आत्म्याचें दर्शन होतें.

**श्रीभगवान्ः**—हे दैत्यकुलचूडामणे ! ज्याच्या योगानें जन्मदुःखाची कायमची शांति होईल, अशा तऱ्हेचा तुला पाहिजे असेल तो वर माझ्यापासून मागून घे. कारण, तुझ्या ठिकाणचे श्रेष्ठ गुण पाहून मी तुझ्यावर संतुष्ट झालों आहें.

**प्रल्हादः**—भगवन् ! आपण सर्व प्राण्यांच्या हृदयांत वास करतां आणि सर्व संकल्पांचें फल देणारे आपणच आहां. यास्तव विभो ! आपल्याला सर्वांत श्रेष्ठ असें जें फल वाटत असेल, त्याची मी आपणांपाशीं याचना करीत आहें.

**श्रीभगवान्ः**—बा निष्पापा ! तुझ्या सर्व संकल्पांची शांति होऊन निरतिशयानंदरूपी परमश्रेष्ठ फलाची प्राप्ति करून देणारा ब्रह्मविश्रांतिदायक विचार तुला सुचो, हाच माझा तुला आशीर्वाद आहे.

**श्रीवसिष्ठः**—याप्रमाणें त्या दैत्यश्रेष्ठ प्रल्हादाला वर दिल्यानंतर समुद्रावरील प्रचंड लाट गर्जना करून समुद्रांत लीन होते, त्याप्रमाणें गंभीर ध्वनि करून भगवान् श्रीविष्णु अंतर्धान पावले. नंतर प्रल्हादानें मूल्यवान् रत्नांनीं युक्त असलेली शेवटची पुष्पांजलि भगवंतांना समर्पण केली आणि उत्तम आसनावर पद्मासन घालून त्यानें स्तोत्रपाठ करण्याला प्रारंभ केला. स्तोत्रपाठ चालला असतां तो मनांतल्या मनांत विचार करूं लागला. तो म्हणालाः—" तूं विचारसंपन्न हो, असें मला त्या भवनाशक देवानें सांगितलें आहे ना ? तर मग मी आतां आत्मविचारणा करतों. जो मी या भुवनामध्यें बोलतों, चालतों, उभा रहातों आणि प्रयत्नानें विषयग्रहण करतों, असा मी आहें तरी कोण ? वृक्ष, तृण, इत्यादिकांनीं युक्त असलेलें हें जगत् मी खात्रीनें नव्हे. कारण, माझ्याहून अत्यंत भिन्न असलेलें हें जग मी कसा असूं शकेन ? बरें, देहच मी आहें असें म्हणावें तर तेंहि जुळत नाहीं. कारण, पूर्वी नसून मातेच्या उदरातून उत्पन्न झालेला, ज्ञानाच्या अभावीं बोलण्याला असमर्थ असलेला, प्राणवायूकडून चलन दिला गेलेला आणि अल्पकालांत नाश पावणारा असा हा जड देह मी असेन, हें शक्यच दिसत नाहीं. आतां ज्याचें ग्रहण जड कर्णरंध्रांच्या योगानें केलें जातें, आणि ज्याची मंद्र, तार इत्यादि प्रकारांनीं कल्पना केली जाते, तसेंच जो शून्याकार व शून्योद्भव (आकाशापासून उत्पन्न झालेला) आहे, असा क्षणभंगुर आणि अचेतन शब्द मी असेन, ही गोष्ट संभवत नाहीं. त्वचेचा विषय जो स्पर्श तोहि मी नव्हे. कारण, तोहि क्षणविनाशी, त्वचेनेंच ग्रहण केला जाणारा आणि

अनित्य आहे. जिव्हेचा विषय रस, पण तोहि मी नव्हे. कारण, तो चंचल आणि जड जिव्हेच्या अधीन असून त्याची मर्यादा मुद्धां जिभेच्या टोंकापासून फार तर कंठापर्यंतच आहे. नेत्रांचा विषय जें रूप तेंहि मी नव्हे. कारण, दृश्य डोळ्यांआड झालें म्हणजे रूपविषय संपला, व डोळे नसले किंवा बिघडले, म्हणजे दृश्य असून नसून सारखेंच. अर्थात, रूप हा विषय दृश्य आणि त्याला पहाणारे नेत्र यांच्या सर्वस्वी अधीन आहे; तसेंच उपभोगानंतर त्याचें स्वरूपहि भोक्त्याच्या दृष्टीनें क्षीण होतें. अशा रीतीनें जड आणि अनित्य असलेलें रूप मी कसा असेन ? घ्राणेंद्रियाचा विषय जो गंध तोहि मी नव्हे. कारण, आंधळ्यासारख्या जड, दुबळ, कालमानानें स्वभाव पालटणाऱ्या, अर्थात् अनिश्चित स्वरूपाच्या या इंद्रियाचा विषय मी कसा असूं शकेन? सारांश, शब्दादि विषय नष्ट झाल्यानंतरहि मी असतोंच, तेव्हां मी इंद्रियांचे विषय खास नव्हे. तसेंच मन, बुद्धि, चित्त, अहंकार हीं सर्व क्षणिक असल्यामुळें तींहि मी नव्हे; तर मी ममत्वरहित, मननाच्या पलीकडचा, शांत, इंद्रियभ्रमशून्य आणि कलनारहित असें शुद्धचैतन्य आहें. मी चेत्य ( जड विषय ) वर्जित, शुद्धचिन्मात्र, सर्वांचा प्रकाशक, सबाह्याभ्यंतरव्यापी, पूर्ण, निर्मल आणि सन्मय आहें. घटपटादिकांपासन सूर्यापर्यंत असलेले सर्व पदार्थ या चेतनामुळें प्रकाशित केले जात असल्यामुळें सर्व पदार्थांचें ज्ञान करून देणारा सर्वोत्कृष्ट दीप तोच एक आहे. हां आत्तां आठवण झाली ! मीच तो सर्वव्यापी, निर्विकल्पचैतन्यस्वरूपी आत्मा आहें. ह्या आत्म्याच्या अंतःप्रकाशामुळेंच, अग्नीमधून ठिणग्या उडाव्या त्याप्रमाणें, ह्या विचित्र इंद्रियवृत्ती स्फुरण पावतात. ज्याप्रमाणें सूर्यकिरणांच्या अस्तित्वामुळें मृगजळाच्या लाटा उदित होतात, त्याप्रमाणें ह्या सर्वव्यापी आत्म्याच्या सत्तेनें सर्व इंद्रियवृत्ती स्फुरण पावतात. ह्या आत्म्याच्या योगानेंच सृष्टींतील सर्व पदार्थांचें वस्तुत्व प्रतिपादिलें जातें; व ज्याप्रमाणें वस्त्रावरील पांढरा, तांबडा वगैरे रंग दिवा दाखवितो, त्याप्रमाणें सर्व पदार्थांचें स्फुरण करणारा हा आत्माच होय. ज्याप्रमाणें आरसा हा सर्व प्रतिबिंबांचें आधारस्थान असतो, त्याप्रमाणें आत्मा हा सर्व सचेतन प्राण्यांच्या अनुभवांना आधारभूत आहे. अशा रीतीनें जगांतील सर्व वस्तूंना सत्ता आणि स्फुरण देणारा आत्मा आहे. सत्ता आणि स्फूर्ति यांच्याप्रमाणें जगांतील सर्व पदार्थांचें स्वभाववैचित्र्यहि आत्म्यामुळेंच उत्पन्न झालें आहे. त्या निर्विकल्प चैतन्यदीपाच्या प्रसादानेंच सूर्य उष्ण झाला आहे, चंद्र शीतल झाला आहे, पर्वत कठीण झाले आहेत आणि पाणी पातळ झालें आहे. श्रुतींत सांगितल्याप्रमाणें आकाशापासून वायु वगैरे क्रमानें उत्पन्न होणाऱ्या सृष्टींतील सर्व पदार्थांचें आद्य कारण आत्माच आहे; त्याचें कारण दुसरें कोणतेंच नाहीं. ज्याप्रमाणें ग्रीष्मऋतूंतील सूर्याच्या प्रखर तापामुळें पृथ्वी आदिकरून पदार्थ तप्त होतात, त्याचप्रमाणें आत्म्याच्या सत्तेमुळें जगामध्यें सतत अनुभवास येणाऱ्या सर्व पदार्थांना पदार्थत्व येतें. वस्तुतः आत्मा हा निराकार असून कोणचेंहि कारण नसतां मायेमुळें सर्व कारणांचें कारण होतो व बर्फापासून थंडी उत्पन्न होतें म्हणावें त्याप्रमाणें, त्याच्यापासून हें सर्व जग उत्पन्न होतें, असें म्हणावें. ब्रह्मा, विष्णु, इंद्र, रुद्र इत्यादि जगस्थितीच्या कारणांचाहि हा चिदात्मा जनक आहे, परंतु याचा जनक मात्र कोणी नाहीं. चित्, चेत्य, द्रव, दृश्य इत्यादि नांवांनीं रहित असलेला माझ्या ठिकाणीं नित्य स्वयंप्रकाश जो आत्मा, त्याला

नमस्कार असो. याच निर्विकल्प चिदात्म्याचे ठिकाणीं हीं त्रिगुणात्मक भूतें उत्पन्न होतात, स्थिति पावतात आणि त्याच्यामध्यें लीन होतात. जगांतील सर्व पदार्थांचें आत्मा हा कारण असल्यामुळें त्या कारण.मध्यें कार्यरूपी असंख्य पदार्थ असतात व त्यांतील अमुक एक पदार्थ उत्तरक्षणीं प्रकट व्हावा, असा ह्या आत्म्यानें—ईश्वरानें संकल्प करतांच तो पदार्थ तत्क्षणीं प्रकट होतो, पण बाकीचे पदार्थ तसेच स्थिर असतात. सारांश, या जगांतील पदार्थमात्राची उत्पत्ति, स्थिति आणि लय चिदात्म्याच्या संकल्पाधीन आहे. चित् ज्याला आपली सत्ता आणि स्फूर्ति देतें, तो पदार्थ व्यक्त दशेला येतो आणि ज्याला सत्ता आणि स्फूर्ति देत नाहीं, तो पदार्थ नष्ट होतो. हे घटपटादि शेंकडों पदार्थ या विस्तीर्ण चिदाकाशरूपी आरशांत प्रतिबिंबित झालेले आहेत. मोठ्या पदार्थांत हें चैतन्य मोठें आहेसें दिसतें व लहान पदार्थांत तें सूक्ष्म असल्याप्रमाणें भासतें. सारांश ज्याप्रमाणें आरशांतील सूर्यप्रतिबिंबाच्या क्षयवृद्धीचा आरोप सूर्यबिंबावर केला जातो, त्याप्रमाणें जगांतील पदार्थांच्या क्षयवृद्धीचा आरोप चिदात्म्याचे ठिकाणीं केला जातो.

हें आत्मतत्त्व अज्ञजनांना अदृश्य असतें. परंतु ज्यांचें चित्त क्षीण झालें आहे, अशा ज्ञान्यांना आकाशाहूनही निर्मल असलेलें आत्म्याचें स्वरूप दृश्य आहे. या जगांतील ज्या नानाविध वस्तुरूपी दृश्यमंजरी आचाररूपी भ्रमरांनीं युक्त असलेल्या दिसत आहेत, त्यांना उत्पन्न करणारा वृक्ष हा चिदात्माच होय. ज्याप्रमाणें एखाद्या पर्वतावर अनेकविध वृक्ष वाढतात, त्याप्रमाणें ह्या आत्म्यापासूनच ही चंचल संसाररचना उद्भवते. कारण, ब्रम्हदेवापासून तों गवताच्या काडीपर्यंत सर्व पदार्थांचा प्रकाशक चिदात्मा आहे. अशा तऱ्हेचा तो चिदात्मा एक, आद्यंतरहित, सर्वव्यापी आणि चराचरभूतांच्या अंतर्यामी असून तो स्वानुभवानें स्थित आहे. ह्याचें, त्याचें, माझें हीं सर्व स्थिरचरात्मक अनंत शरीरें आत्म्याचीं असलीं, तरी तो स्वतःएक आणि अनुभवरूप आहे. तो आपल्या अनुभवरूपानेंच द्रष्टा, दृश्य, दर्शन इत्यादि त्रिपुटी निर्माण करतो. हा पहा मी सहस्रकर सूर्याच्या सुंदर देहानें आकाशांत विहार करीत आहें. तसेंच वायुदेहानें मीच सर्वत्र संचार करीत आहें. सर्व सौभाग्याच्या पराकाष्ठेनें युक्त असलेलें हें माझें नीलवर्ण, शंखचक्र गदाधारी शरीर या जगांत वावरत आहे. निर्विकल्प समाधीमध्यें निरतिशयानंद भोगणारा या जगांतील पद्मासनस्थ ब्रम्हदेव मीच आहें. तसेंच गौरीच्या मुखकमलावरील जणुं भ्रमरच असा त्रिनेत्र शंकरहि मीच असून कांसव आपल्या पायांचें आकर्षण करतें त्याप्रमाणें, मी प्रलयकाळीं सर्व जगाचें आकर्षण करून त्याचा संहार करतों. ज्याप्रमाणें एखादा तापसी आपल्या मठीचें रक्षण करतो, त्याप्रमाणें इंद्ररूपानें मी मन्वंतरक्रमानें सर्व त्रैलोक्याचें रक्षण करतों. स्त्री, पुरूष, कुमार, जरठ इत्यादि सर्व मीच आहे. कारण, माझीं शरीरें अनंत आहेत. तृण, लता, गुल्म इत्यादिकांचा जीवनरस मीच असून ज्याप्रमाणें एखादा कूप आंतील लतेचें पोषण करून तिला बाहेर आणतो, त्याप्रमाणें मीच त्यांना चिद्भूमींतून वर आणतें. एखादें चाणाक्ष मूल मातीचीं खेळणीं करून त्याच्या बरोबर खेळत बसतें, त्याप्रमाणें मी आपल्या चित्तविनोदार्थ हें जगताचें अवडंबर उत्पन्न केलें आहे. कारणभावानें मी सर्व कार्यांना व्यापून राहिलों

आहें व शेवटीं सर्व कार्यें माझ्याच ठिकाणीं लय पावणारीं आहेत. माझ्यावांचून यातील कशालाही सत्ता नाहीं. माझ्या विस्तीर्ण चिदादर्शात जें प्रतिबिंबित होईल त्यालाच सत्ता आहे, इतराला नाहीं. कारण, माझ्या व्यतिरिक्त या जगांत कशालाच सत्ता नाहीं. पुष्पांतील सुगंध मी, पुष्पपत्रांतील शोभा मी, शोभेंतील रूपकला मी आणि रूपांतील अनुभवहि मीच. या स्थावरजंगमात्मक जगांत जें जें गुणविशिष्ट, उत्कृष्ट, रमणीय आणि दर्शनार्ह आहे, तें तें सर्वसंकल्पशून्य चित्तत्त्व मीच आहें. ज्याप्रमाणें रसमयी आद्यशक्ति कूप, तडाग, नदी, समुद्र इत्यादिकांमध्यें जलरूपानें विस्तार पावते व पुढें तीच रसशक्ति वृक्षांमध्यें शाखा, पल्लव वगैरे रूपानें आणि भिंतींमध्यें तृण, यवांकुर वगैरे रूपानें पसरते, त्याप्रमाणें मी सुद्धां सर्व कार्यांच्या उत्पत्तीचे कारण बनून सर्व वस्तूमध्यें पसरलों आहें. मी आपल्या इच्छेनेंच सर्व कार्यांमध्यें प्रवेश करून जीववैचित्र्य निर्माण करतों. ज्याप्रमाणें दुधामध्यें तूप व जलामध्यें समशक्ति असते, त्याप्रमाणें मी सर्व भावांतील चिच्छक्ति होऊन राहिलों आहें. जसें तृणकाष्ठादि वस्तुजात पृथ्वीवर रहातें, तसें हें जगत् त्रिकालीं चैतन्यामध्यें तद्रूपत्वानेंच स्थित असतें. मी सर्व दिशामध्यें व्यापून राहिलेला, संकुचितपणाचा सर्व भ्रम टाकून दिलेला, सर्वांतर्यामी व सर्वकर्ता असून व्यष्टिसमष्टिमार्गानें मीच सर्वत्र स्थित आहें. सर्व राजांचा मुकुटमणि आणि सर्वांवर सत्ता चालविणारा मीच आहें. इंद्राला बद्ध केल्यावांचून आणि देवांवर शस्त्र चालविल्यावांचून न मागतांच हें अपूर्व जगद्राज्य मला प्राप्त झालें आहे. अहाहा? हें केवढें आश्चर्य आहे कीं, कल्पांतवायूमुळें खवळलेला एकार्णव पूर्वीच्या समुद्रामध्यें मावत नाहींसा होतो, त्याप्रमाणें माझें व्यापक स्वरूप माझ्या अंतरात्म्यामध्यें आतां मावेनासें झालें आहे. क्षीरसमुद्रामध्यें संचार करणाऱ्या सर्पाला जसा त्याचा अंत लागत नाहीं, तसा या निरतिशयानंदाचा मला अंत लागत नाहीं. ज्याप्रमाणें एकाद्या लहानशा बेलफळांत हत्तीचें विस्तीर्ण शरीर मावत नाहीं, त्याप्रमाणें ह्या चिमुकल्या ब्रह्मांडोदरांत माझें अत्यंत व्यापक स्वरूप मावत नाहीं. विरिंचिभवनाच्याहि ( सत्यलोकाच्या ) पलीकडे माझें स्वरूप विस्तारलें गेलें असल्यामुळें तें संकुचित होऊं शकत नाहीं. हा देह म्हणजे मी, पाताळ हेंच माझें भुवन आहे, इत्यादि संकुचित भावना मी आजपर्यंत उराशीं बाळगून बसलों होतों, हें केवढें आश्चर्य ? ' हा मी.' ' हा तूं ' इत्यादि सर्व निवळ भ्रम आहे. देह कोण, अदेह कोण? तसेंच मृत कोण आणि जिवंत कोण ? सर्व मिथ्या भ्रम आहे. माझे आजेपणजे कीं ज्यांनीं असल्या स्वानंदसाम्राज्याचा त्याग करून संसाराला कवटाळलें आणि त्यातच धन्यता मानली, ते खरोखरच दुर्दैवी म्हटले पाहिजेत! कारण ही ब्रह्मरूपी स्वानंदाची महावृष्टी कोणीकडे आणि दुष्ट आशारूपी सर्पांच्या योगानें भयंकर बनलेली राज्यलक्ष्मी कोणीकडे ! अनंत आनंदाचा आस्वाद करून देणारी आणि उत्कृष्ट शांतीनें युक्त असलेली ही शुद्ध चिन्मयी दृष्टि सर्व सृष्टींतून श्रेष्ठ आहे. सारांश सर्व भावांच्या अंतर्यामीं वास करणारा, निर्विषय आणि प्रत्यक्चेतनरूप असा जो मी, त्या मला नमस्कार असो. माझी संसारासंबंधाची ऊर्मि आतां आजिबात जिरली असून मी आतां अज झालों. मला सर्व प्राप्तव्य प्राप्त झालें आहे आणि माझ्या जन्माचें साफल्य झालें. हें उत्तमबोधरूपी शाश्वत साम्राज्य टाकून माझें मन या

अनर्थकारक राज्यवैभवामध्यें आतां रममाण होत नाहीं. लांकूड, उदक, दगड वगैरे जड द्रव्यांचा आश्रय करून आपला बचाव करून घेणाऱ्या आणि फिरून मी राजा म्हणून शेखी मिरवणाऱ्या दानवाधमाची योग्यता क्षुद्र किड्या-इतकीच आहे. अशा त्या अनात्मज्ञाला धिःकार असो!

फार लांब कशाला? माझ्या बाबांचीच गोष्ट घ्या. अज्ञानांत राहून केवळ अन्नपानादिकांनीं आपल्या अविद्यामय शरिराची जोपासना करीत जाऊन त्यांनीं अखेरीस काय मिळविलें? हिरण्य-कशिपूला--माझ्या बाबाना ह्या जगद्राज्याचें वैभव अनेक वर्षें उपभोगावयास मिळालें होतें; परंतु तवढ्या अवधींत त्यांनीं पुरुषार्थ-प्राप्तीचें कोणतें साधन केलें? खरोखर या स्वानंदसाम्राज्याचा उपभोग न घेतां शेंकडों जगद्राज्यें उपभोगिलीं, तरी तीं व्यर्थच आहेत, ज्यानें हें परमामृत प्राप्त करून घेतलें, त्याला या जगांतील दुसरें कांहीं प्राप्त झालें नाहीं, तरी त्याला सर्व साम्राज्यसुख निरंतर लाधलें, असेंच म्हणण्यास हरकत नाहीं. असल्या या अखंडित आणि पूर्ण पदाचा अव्हेर करून मूर्ख मनुष्यच क्षुद्र वस्तूंच्या नादीं लागतो, पंडित लागत नाहीं. कारण, उघडच आहे कीं, फलभारानें वांकलेल्या द्राक्षादि वेली सोडून कांटे खाणारा उंटावांचून दुसरा कोणता प्राणी सांपडेल? या श्रेष्ठ दृष्टीचा त्याग करून क्षुद्र राज्यामध्यें कोणता शहाणा मनुष्य निर्माण होईल? उंसाचा रस टाकून कडुनिंबाचें रस-पान कोण बरें करील? माझे पूर्वज निःसंशय मूर्ख होते, असें मी स्पष्ट म्हणतों! कारण, ह्या परमोच्च दृष्टीचा त्याग करून ते राज्यरूपी संकटांत दंग झाले होते. प्रफुल्लित वेलींनीं सुशोभित झालेल्या नंदनवनांतील भूमी कोणी-कडे आणि उन्हानें दग्ध झालेलीं रखरखीत वाळवंटें कोणीकडे! त्याचप्रमाणें ही शांत बोधदृष्टि कोणीकडे आणि ती उद्वेगजनक भोगसाधन देहात्मदृष्टि कोणीकडे! राज्यप्राप्ती-सुद्धां ज्या सुखाकरितां हवीशी वाटते, तें नित्य-सुख त्रैलोक्यामध्येंहि मिळणें शक्य नाहीं. कारण, सर्व खऱ्या सुखाचें आगर चिदात्माच आहे. मग त्या सुखाचा स्वीकार कां करूं नये? त्या सर्वव्यापी, एकरूप आणि निर्विकार चिदात्म्याचा आश्रय केला, म्हणजे मनुष्याला सर्व सुख प्राप्त होतें आणि त्याचें सर्व बाजूंनीं सर्वदां कल्याण होतें. त्या चिच्छक्तीपासूनच जगांतील सर्व तऱ्हेच्या शक्ती निर्माण होतात. तेजाची प्रकाशनशक्ति, चंद्राची अमृतशक्ति, हिरण्यगर्भाची मान्यता, इंद्राची त्रैलोक्यराजता, शंकराची पूर्णता, विष्णूची जयलक्ष्मी, मनाची शीघ्रगति, वायूची बलवत्ता, अग्नीची दाहक-शक्ति, जलाची रसशक्ति, मुनींची तपःसिद्धि, बृहस्पतीची विद्याशक्ति, विमानाची आकाश-गति, पर्वताची स्थिरता, समुद्राची गंभीरता, मेरुची उंची, सुगतांची ( बौद्धांची ) शून्यता-रूपी शांति, किंवा ब्रह्मसाक्षात्काराची सौम्य-शांति, मदिरेची चंचलता, वसंताची पुष्पमयता, वर्षाऋतूंतील मेघांची गर्जना, यक्षांची माया, आकाशाची निष्कलंकता, तुषाराची शीतता व उन्हाळ्याची तप्तता; या व दुसऱ्या अनेक शक्ती चिच्छक्तीमध्येंच आहेत. वस्तुतः निर्वि-कार आणि एकरूप अशी चिच्छक्तीच भूत, भविष्य आणि वर्तमान ह्या तिन्ही काळीं नानाविध आकारविकार धारण करणाऱ्या शक्ती उत्पन्न करण्याला उद्युक्त होते. चित् ही वस्तुतः विकल्परहित असून ती शेंकडों पदार्थां-मध्यें केव्हांहि सारखीच पडते. ज्याप्रमाणें सूर्याची प्रभा सर्व दिशामध्यें असलेल्या पदा-र्थांवर सर्व काळीं सारखीच पडते व तिच्यामध्यें दिशा, काळ इत्यादि वैषम्य असत नाहीं, तर

ती सर्वत्र सम असते, त्याचप्रमाणें शुद्ध चित् ही संसारांतील सर्व दृश्य आणि सर्व अवस्था यांना प्रकाशित करते. त्या शुद्ध चित्मध्यें कालकृत भेद नसतात; परंतु कालाचे शेंकडों भेद तिच्यामध्यें दिसतात. ती वस्तुतः परिपूर्ण असून तिच्यामध्यें देशकृत भेदांना मुळींच अवकाश नाहीं; परंतु तिच्यामध्यें शेंकडों देशकृत भेद भासमान होतात. ती चित् कालभेद आणि वृत्तिभेद यांची साक्षी आहे, व तिनें सर्व पाहिलेलें आहे. परंतु तिच्या ठिकाणीं समता असल्यामुळें ती स्वतः परिपूर्ण आहे. एकाच वेळीं एक गोड आणि एक कडू असे पदार्थ तोंडांत घातले असतां त्यांतील भेद आपल्या अनुभवास येतो, त्याचप्रमाणें दोन गोड किंवा दोन तिखट पदार्थ तोंडांत घातले असतां त्यांमधील सूक्ष्म भेदहि अनुभवास येतो. यावरून विषयभेद झाला तरी त्यामुळें चैतन्यांत भेद मानण्याचें कारण नाहीं, ही गोष्ट सिद्ध होते. त्याचप्रमाणें घटपटादि भिन्न भिन्न पदार्थ आपणांपुढें ठेवले, तरी त्या सर्वांचें आपल्याला एकदम ज्ञान होतें. कारण, चित्च्या ठिकाणीं सूक्ष्म अशी भेदकल्पना असते. परंतु पदार्थांमधील या भेदकल्पनेचा मनानें त्याग केला असतां सर्व पदार्थांमधील अभेदतत्त्व अनुभवास आल्याशिवाय रहाणार नाहीं.

आतां या भेदकल्पनेचा त्याग कसा करावा, यासंबंधाचा उपाय सांगतों. प्रथम श्रुति, गुरुपदेश आणि विचार यांच्या योगानें दृश्य-समुदायाचा अभाव आहे अशी चित्तांत दृढ भावना करावी, म्हणजे चित्त शोकमोहादि दुःखरूप परिणाम तत्काळ टाकतें. परंतु इतकें झालें तरी पूर्वसंस्कारांच्या प्राबल्यामुळें वास-नांचा उद्भव होण्याचा संभव असतो. यास्तव सर्व दृश्याभावाचा आश्रय करून अद्वैतानंद-स्वभाव आत्म्याला सर्वत्र पहावें, म्हणजे चित्तां-तील वासना समूळ नष्ट होतात. अशा रीतीनें वासनारूपी बीजाचा अभाव झाला असतां भेदकल्पनेला अवसरच रहात नाहीं व वर्तमान चेत्याची (विषयांची) मिथ्यात्वभावनेमुळें उपेक्षा केली, म्हणजे समताच अवशिष्ट रहाते. चित् ही वाणीला अगोचर असल्यामुळें निरंतर जणुं असद्रूप बनते आणि जणुं अनात्मदशेप्रत जाऊन पोहोंचते. परंतु ती सर्वांच्या अंतर्यामीं असल्यामुळें तिलाच आत्मा म्हणतात व सर्व व्यापकत्वामुळें तिलाच ब्रह्म म्हणतात. पर-मार्थदृष्ट्या चित्च्या संबंधानें वाणीची प्रवृत्ति होत नसल्यामुळें ती नाहींच असें भासतें; परंतु सर्व तिच्यापासूनच होत असल्यामुळें जें जें आहे तें तें सर्व तीच आहे, असे म्हणावें लागतें. सारांश, सर्व दृश्याचा उपशम झाला असतां जी परा समता अवशिष्ट रहाते, तिलाच मोक्ष हें नांव दिलें जातें. ही चित्दृष्टि संकल्प-कलंकित झाली म्हणजे तिची शक्ति मंद होऊन डोळ्यांवर सारा आलेल्या मनुष्याप्रमाणें तिला हें जग परमार्थदृष्ट्या दिसेनासें होतें. इष्टानिष्टसंकल्परूपी मलांनीं आच्छादित केली गेलेली चित् जाळ्यांत अडकलेल्या पक्षिणी-प्रमाणें यथेच्छ संसार करण्याला असमर्थ होते. हे सर्व लोक जे आंधळ्या पक्ष्यांप्रमाणें मोह-जालामध्यें गुरफटून गेले आहेत, तो चित्च्या संकल्पकलनेचाच परिणाम होय. संकल्परूपी जाळ्यांत गुरफटून विषयकूपांत पडलेल्या माझ्या पूर्वजांना ही अपरिच्छिन्न आत्मपदवी दिसलीच नाहीं; व यामुळेंच ते दुर्दैवी प्राणी या पृथ्वी-वर कांहीं दिवस राहून एखाद्या खळग्यांतील मशकाप्रमाणें फुकट मरून गेले! भोगदुःखासाठीं तळमळणाऱ्या माझ्या पूर्वजांना जर हें आत्म-तत्त्व कळलें असतें, तरी ते दुर्बुद्धी जन्ममृत्यूच्या अंधकूपांत खचित पडले नसते. रागद्वेषा-पासून उत्पन्न होणाऱ्या द्वद्वमोहांच्या योगानें हे

प्राणी पृथ्वीच्या पोटांतील खळग्यांत रहाणाऱ्या कीटांच्या किंमतीचे झाले आहेत. ज्याच्या ठिकाणचें इच्छा व अनिच्छारूपी कल्पनामृगजळ सत्यज्ञानरूपी मेघामुळें शांत झालें, त्याच मनुष्याच्या जीविताचें साफल्य झालें, असें म्हणण्यास हरकत नाहीं. सत्यज्ञानमात्रानेंच कल्पनामृगजळ शांत होतें; व याचें कारण उघडच आहे कीं, ह्या शुद्ध व अविच्छिन्न निर्मल आकारानें युक्त असलेल्या चिच्चंद्रामध्यें कलनाकलंक कोठून असणार आणि त्याच्या चंद्रिकेचे किरण यत्किंचित् तरी उष्ण कसे असणार ? अशा या माझ्या अविच्छिन्न चिदात्म्याला नमस्कार असो. हे आत्मदेवा ! त्रैलोक्याला ज्ञानप्रकाश देणारा सूर्य तूंच असतां तुझी ओळख होण्याला मला इतके दिवस लागावे, हे केवढें आश्चर्य आहे! परंतु एवढ्या उशीरानें कां होईना, तूं मला ज्ञात झाला आहेस, माझ्या हातीं आला आहेस, आपल्या परमार्थरूपानें अभिव्यक्त झाला आहेस आणि मी तुला विकल्पजालांतून वर काढलें आहे. असा जो तूं त्या तुला माझा नमस्कार असो. मद्रूप असा जो तूं अनंत, शिव आणि देवाधिदेव परमात्मा त्या तुला माझा नमस्कार असो. सारांश, मेघरहित आकाशांतील पूर्ण चंद्रबिंबाप्रमाणें विलसणारें आणि संकल्परूपी आवरणरहित असलेलें असें जें माझें स्वयंप्रकाश, स्वयंसिद्ध, स्वहृदयवासी व स्वतःच उदित झालेलें स्ववश आत्मस्वरूप त्याला मी अनन्यशरण आहें."

## सर्ग ३५

१. आत्मसाक्षात्कारामुळें सर्व बंधांचा निरास करून प्रल्हाद आनंद पावतो.

प्रल्हादः—ॐ हा एकाक्षरी शब्द ब्रह्माचा वाचक आणि बोधक आहे. तो चिदाकार आहे, विकारशून्य आहे. या जगांतील प्रत्येक पदार्थ वस्तुतः आत्माच आहे. हा चेतन आत्मा मेद, अस्थि, मांस, मज्जा, रुधिर यांच्याहून अगदीं भिन्न आहे. प्रत्येकाच्या हृदयांत असूनहि हा आत्मदीप सूर्यादिकांना प्रकाशित करतो. तो अग्नीला उष्णता देतो, जलाला रसत्व देतो व अशा रीतीनें सर्व विषयांना स्वसत्तेनें निरनिराळे धर्म देऊन एखाद्या राजाप्रमाणें त्यांचा स्वतः उपभोग घेतो. तो निष्क्रिय असूनहि स्थिर रहात नाहीं, चालत असूनहि निश्चल असतो, शांत असूनहि सर्व व्यवहार करीत असतो आणि सर्व क्रिया करीत असतां कोणत्याच क्रियेनें लिप्त होत नाहीं. हा आत्मा पूर्वी, आज, आतां, या लोकीं, परलोकीं व दोन्ही लोकीं, तसेंच विहित किंवा अविहित कर्मांचीं फलें भोगीत असतां, वगैरे सर्व वृत्तींमध्यें नेहेमीं सम असतो. तो वस्तुतः अभय असतांहि कर्मानुरूप स्वतःच उद्भवतो, आपल्या केवळ सान्निध्यानें चतुर्दश भुवनें व त्यांतील ब्रह्मादिस्तंबपर्यंत भोक्तृभोग्यभाव निर्माण करून स्थित असतो व हेंच त्याचें कर्मफल होय. जगांतील सर्व पदार्थांना सत्ता देणारा तोच असल्यामुळें तो वायूपेक्षांहि अधिक स्पंदवान् आहे, स्थाणूहूनहि अधिक स्थिर आहे आणि आकाशापेक्षांहि अधिक निर्लेप आहे. ज्याप्रमाणें वायु वृक्षाचीं पानें हालवितो, त्याप्रमाणें हा आत्मा जीवांच्या मनांना हालवून सोडतो. ज्याप्रमाणें एखादा चतुर सारथि घोड्यांना हांकलतो, त्याप्रमाणें हा इंद्रियांना चाळवितो. एखाद्या दुर्दशेच्या फेऱ्यांत सांपडलेल्या मनुष्याप्रमाणें हा आत्मा देहरूपी घरांत जणुं राबत असतो; तसेंच एखाद्या राजाप्रमाणें हा विभु जणुं नानाप्रकारचे भोग भोगीत देहप्रासादामध्यें स्वस्थहि असतो. असा हा

आत्म्याचा शोध केला पाहिजे, त्याचीच स्तुति केली पाहिजे आणि त्याचेंच निरंतर ध्यान केलें पाहिजे. कारण, त्याचा शोध लागला म्हणजे जरामरणरूपी मोहाचें उल्लंघन करून परमपद गांठतां येतें. ज्ञानमात्रानेंच याची प्राप्ति होत असल्यामुळें हा अत्यंत सुलभ आहे आणि स्मरणमात्रेंकरून वश होणारा असल्यामुळें आप्तबंधुप्रमाणें याला जिंकतां येणें शक्य आहे. हा सर्वांच्या हृदयकमलामध्यें वास करणारा भ्रमर आहे. आपल्यापासून बऱ्याच दूर अंतरावर असलेल्या मित्रांना मोठ्यानें हांक मारावी तेव्हां ते जवळ येतात व जे जवळ असतात, त्यांचा नामोच्चार केला म्हणजेच ते ओ देतात. परंतु आत्मा हा आपल्या हृदयांतच असून प्रणवोच्चारानें त्याचें नुसतें स्मरण केलें, म्हणजे तो तत्क्षणीं सन्मुख होत असल्यामुळें त्याच्या नांवानें मोठ्यानें किंवा हळू हांक मारण्याचें कारणच पडत नाहीं. एखाद्या धनिकाची कितीहि कसून सेवा केली तरी ती त्याच्या मनास येत नाहीं, व त्याच्याकडून सेवकाचा पदोपदीं पाणउतारा होण्याचाच संभव असतो. परंतु आत्म्याची गोष्ट अशी नाहीं. आत्मा हा सकल ऐश्वर्यसंपन्न असूनहि त्याची सेवा करतांना सेवक कितीहि चुकला तरी तो त्याचा अपमान करीत नाहीं, पुष्पांतील सुगंध, तिळांतील तेल आणि द्रव पदार्थांतील माधुर्य यांच्याप्रमाणें हा आत्मदेव सर्वांच्या देहामध्यें स्थित असतो. फारा दिवसांत न पाहिलेला सख्खा बंधु एकदम येऊन समोर उभा राहिला असताहि त्याची ज्याप्रमाणें ताबडतोब ओळख पटत नाहीं, त्याप्रमाणें आत्मा हा जरी आपल्या हृदयांतच असतो, तरी अविचारामुळें त्याची ओळख पटत नाहीं. परंतु विचाराच्या योगानें या परमेश्वराचें एकदां ज्ञान झालें, म्हणजे प्रिय जनांच्या भेटीपासून अत्यानंद होतो त्याप्रमाणें, ह्याच्या भेटीमुळें परमानंद होतो. ह्या परमश्रेष्ठ आप्ताचें दर्शन झालें म्हणजे अतिशय आनंद होतो; इतकेंच नव्हे तर मरणादिकांची भीति नष्ट होते, ममत्वादि सर्व आशापाश तुटून जातात, कामादि रिपूंचा नायनाट होतो आणि घरांत बिळें पाडणाऱ्या दुष्ट उंदरांप्रमाणें तृष्णा मनाला पोखरीत नाहींशा होतात. या आत्मदेवाचें दर्शन झालें म्हणजे सर्व जग पाहिल्यासारखें होतें; याचें श्रवण झालें म्हणजे सर्व श्रवण केल्यासारखें होतें; याला स्पर्श केला म्हणजे सर्व जगाला स्पर्श केल्यासारखें होतें व याच्या अस्तित्वामुळें सर्व जगाचें अस्तित्व सिद्ध होतें. सर्व प्राणी गाढ निजलेले असतां हा त्यांच्यामध्यें जागा असतो, हा अविवेकी पुरुषांना शासन करतो, आर्तांचें दुःख हरण करतो. आणि आपापल्या भावनेप्रमाणें त्याची उपासना करणाऱ्या जीवांचें वांछित पुरवितो. तो जगताच्या स्थितीकाळीं स्वतः जीव बनून निरनिराळ्या लोकांमध्यें संचार करतो, विषयविलास भोगतो, तसेंच वस्त्र, अलंकार, उत्सव, समाज इत्यादि वस्तूंमध्यें शोभत असतो. हा आतल्याआंत आपल्या शांत स्वरूपाचा सामान्यतः अनुभव घेतो आणि मिऱ्यांतील तिखटपणाप्रमाणें सर्व देहांत व्यापून असतो. मागच्या आणि पुढच्या गोष्टींचें अनुसंधान असणें याला चेतना असें म्हणतात व वर्तमानकालीं पुढें दिसणाऱ्या वस्तूचें ज्ञान होणें याला कलना असें म्हणतात. चेतना व कलना ह्या दोन रूपांनीं आत्मा हा जगांतील सर्व पदार्थसमुदायांत अंतर्बाह्य व्यापून अधिष्ठानसत्तेनें सर्वत्र स्थित असतो. आकाशाचें शून्यत्व, वायूचें स्पंदत्व, तेजाचें प्रकाशकत्व, जलाचें रसत्व, पृथ्वीचें कठिनत्व, अग्नीचें उष्णत्व, चंद्राचें शैत्य आणि जगद्गुणाची सत्ता हे धर्म आत्म्याचेच आहेत. शाल्मलीच

काळेपणा, बर्फामधील थंडी व पुष्पामधील सुगंध यांच्याप्रमाणें देहामधील आत्मा हा देहाचा प्रकाशक आहे. ज्याप्रमाणें सत्ता, काल आणि राजाची प्रभुत्वशक्ति सर्वव्यापी असते, त्याप्रमाणें इंद्रियें आणि मन यांच्या व्यापारासह अंतर्बाह्य प्रकाशन करण्याचें सामर्थ्य आत्म्याचें आहे. कारण, प्रकाश हाच त्याचा नित्य स्वभाव आहे. सूर्यचंद्रादि देवांनाहि सत्ता देणारा तोच महादेव आहे. असा तो महादेव मीच आहें; यापेक्षां दुसरी कल्पनाच संभवत नाहीं. ज्याप्रमाणें आकाशाला धुळीचा कण आणि कमलपत्राला पाण्याचा थेंब चिकटत नाहीं, त्याचप्रमाणें मला अनात्मवस्तूंचा संसर्ग होत नाहीं. ज्याप्रमाणें पाषाण भीतीनें कधींहि कांपत नाहीं, त्याप्रमाणें कोणत्याहि अनात्मकल्पना माझें वास्तविक स्वरूप बदलूं शकत नाहींत. वाळलेल्या भोंपळ्यावर कितीहि पाणी ओतलें तरी तो आंतून भिजत नाहीं, त्याचप्रमाणें माझ्या देहावर सुखदुःखांचे डोंगर कोसळून पडोत किंवा न पडोत, त्यामुळें माझी कोणती हानि होणार आहे? वात, तेल आणि पात्र मिळून झालेल्या दिव्याचा प्रकाश दोरीनें बांधला जाणें कधींहि शक्य नसतें, त्याचप्रमाणे सर्वभावातीत असलेलें माझें स्वरूप बद्ध होणें शक्य नाहीं. भाव, अभाव, काम आणि इंद्रियें यांच्यांशीं माझा वास्तविक संबंध काय? आकाशाला कोणी कशाचा लेप दिला आहे का? तसेंच निराकार मनाला कधीं कोणाला पीडा देतां येईल काय? शरीराचे शेंकडों तुकडे झाले तरी त्यामुळें आत्म्याचें, शरीराचें काय वांकडें होणार? मातीची घागर फुटली, तुटली किंवा अजिबात नष्ट झाली, तरी त्यामुळें आंतील आकाशाला कोणती इजा होणार? मन हें एक अदृश्य पिशाच असून तें कांहीं कारण नसतांहि मिथ्याच उत्पन्न झालें आहे, व आत्मबोधामुळें हें जड मन नष्ट झालें तर त्यांत आमचें काय नुकसान आहे!

पूर्वी माझ्या मनांत सुखदुःखमयी वासना होती, पण सध्यां ती स्थिति राहिलेली नाहीं. आतां माझ्या मनांत अपरिच्छिन्न शांतीचें सुख पसरलेलें आहे. वास्तविक भोक्ता निराळा, विषयग्रहण करणारा निराळा, अनर्थसंकटांत पडणारा निराळा आणि सर्वांचें साक्षित्व करणारा निराळा, अशी स्थिति असताहि त्या सर्वांचें ऐक्य मानून त्यांचा आत्म्यावर आरोप करणें हा केवढा मूर्खपणा! कोणत्या इंद्रजालिकाचें हे चातुर्य असावें बरें? वस्तुतः प्रकृति भोग भोगते, मन विषयग्रहण करतें आणि देह संकटामध्यें पडतो. अर्थात्, प्रकृत्यादिकांनीं ह्या सर्व गोष्टींचा आरोप आत्म्यावर केला असून हा त्यांचा मूर्खपणा आहे. परंतु त्यात आमचें काय गेलें? माझ्या स्वतःसंबंधानें पाहिलें तर मला भोग भोगण्याची इच्छा नाहीं, त्याचप्रमाणें त्यांचा त्याग करण्याचीहि इच्छा नाहीं. जें ज्यावेळीं येणार असेल तें येवो व जाणार असेल तें खुशाल जावो! मी सुखाची अपेक्षा करीत नाहीं आणि दुःखाची उपेक्षाहि करीत नाहीं. सुखदुःखें खुशाल येवोत किंवा खुशाल जावोत, त्यांच्याशीं मला काय करावयाचें आहे! देहामध्यें अनेक प्रकारच्या वासना उदय पावोत किंवा त्यांचा अस्त होवो. वास्तविक मी त्यांच्यामध्यें नाहीं आणि त्याहि माझ्यामध्यें नाहींत. एवढा वेळपर्यंत अज्ञानशत्रूनें माझें विवेकसर्वस्व लुटून मला सर्वस्वीं नागविलें आणि मृतप्राय करून टाकलें होतें परंतु भगवान् श्रीविष्णूच्या अचानक प्रसादामुळें 'मी कोण आहें' याचें मला आतां चांगलें ज्ञान झालें असून अज्ञानशत्रूच्या तडाक्यांतून मी एकदांचा सुटलों आहें. मी आतां शरीररूपी वृक्षाच्या ढोलींतून अहंकाररूपी पिशाचाला आत्म-

ज्ञानाच्या मंत्रानें हांकून लावला आहे. यामुळें माझा शरीररूपी महावृक्ष अहंकाररूपी यक्षरहित आणि म्हणूनच अत्यंत पुण्यकारक झाला असून प्रफुल्लित झाल्यासारखा दिसत आहे. माझें मोहदारिद्य नष्ट झालें, दुराशारूपी दोष क्षीण झाला आणि विवेकरूपी विपुल धनाची प्राप्ति झाल्यामुळें मी आतां परमेश्वर बनलों आहें. मी सर्व ज्ञातव्य जाणलें, द्रष्टव्य पाहिलें आणि जें प्राप्त झालें असतां या जगांत कांहीं अप्राप्त उरत नाहीं, तें मला सांप्रत प्राप्त झाले आहें. पूर्वभाग्योदयामुळें मी सध्यां अशा अत्यंत विस्तृत आणि उन्नत पारमार्थिक भूमीप्रत जाऊन पोहोंचलों आहें कीं, ज्या ठिकाणीं सर्व अनर्थ दूर झुगारले गेले आहेत, विषयरूपी सर्प बाजूला राहिले आहेत, मोहरूपी धुकें नष्ट झालें आहे, आशारूपी मृगजळ शांत झालें आहे, सर्व दिशा स्वच्छ झालेल्या आहेत आणि उपशमवृक्षाची शीतल छाया सर्वत्र पसरली आहे. श्रीविष्णूची स्तुति, प्रणति, विज्ञप्ति, तसेंच शम व नियम यांच्या योगानें या भगवान् आत्म्याची मला प्राप्ति झाली, त्याचें साक्षात् दर्शन झालें आणि पूर्ण ज्ञान झालें. अहंकारपदाच्या अतीत असलेल्या सनातनब्रह्माचें—भगवान् आत्म्याचें श्रीविष्णूच्या कृपेनें इतक्या दीर्घकालानंतर मला स्मरण झालें. मी मूळचा भगवान् विष्णूचा आत्मा, सनातन ब्रह्म असून, या अहंकाररूपी शत्रूनें मला आजपर्यंत फसवून उत्कर्षापकर्ष, आविर्भावतिरोभाव इत्यादि लक्षावधि दशांमध्यें आणि आशापाशामध्यें अडकवून, तसेंच इंद्रियरूपी सर्पांच्या बिळांमध्यें, मरणरूपी खड्ड्यांमध्यें, तृष्णारूपी कांटेरी जंगलामध्यें, कामरूपी कोलाहलामध्यें, वासनारूपीं निबिड वनजालांमध्यें, जन्मरूपी कूपांमध्यें व दुःखरूपी दावाग्नीमध्यें ढकलून नानाप्रकारें दुःख दिलें. सारांश, ज्याप्रमाणें एखादा भित्रा मनुष्य रात्रीच्या वेळीं रानांत पिशाचाच्या तावडींत सांपडला म्हणजे घाबरून जातो, त्याप्रमाणें माझी स्थिति झाली होती. परंतु माझ्या स्वतःच्याच क्रियाशक्तीमुळें श्रीविष्णूच्या मिषानें माझी विवेकदृष्टि जागृत झाली, त्या विवेकाच्या प्रभावानें अंतःकरणांतील ईश्वर प्रगट झाला आणि त्यामुळें सूर्योदयाबरोबर अंधकार अस्तंगत होतो त्याप्रमाणें, तो अहंकाररूपी राक्षस मला आतां दिसेनासा झाला आहे. दिवा मालवला म्हणजे त्याची पुढील गति समजत नाहीं, त्याप्रमाणें मनोविवरामध्यें वास करणारा अहंकार कोठे गेला, त्याचा आतां मागमूसही लागेनासा झाला आहे. सूर्योदय होतांच चोरानें पळ काढावा, त्याप्रमाणें ईश्वराचा उदय होऊन त्याचें दर्शन होतांच माझ्या अहंकारानें पलायन केलें. वृक्षाच्या ढोलीतून अजगर निघून जावा, त्याप्रमाणें अज्ञानामुळें उत्पन्न झालेला अहंकार पिशाचाप्रमाणें अस्तंगत झाल्यामुळें मी आतां स्वस्थ झालों आहें, शांत झालों आहें, सुखी झालों आहें आणि प्रबोधसंपन्न झालों आहें. माझें आत्मधन चोरणारा अहंकारतस्कर नष्ट झाल्यामुळें माझ्या आनंदाला आतां पारावार नाहींसा झाला आहे. एखाद्या पर्वतावर वणवा पेटलेला असतां त्यावर पाऊस पडला म्हणजे त्या पर्वताला थंडपणा येतो, त्याप्रमाणें माझ्या मनांतील आशारूपी मृगजळ शांत होऊन अंतःकरणांत शीतलता उत्पन्न झाली आहे. आत्मविचारामुळें चित्तांतील सर्व वासना गलित झाल्या आहेत. मोह, दुःखें, निराशा, मनोव्यथा, स्वर्ग, नरक, मोक्ष इत्यादि सर्व भ्रम अहंकार असेल तरच संभवतात, कारण, चित्रें काढण्याची कल्पना भिंतीवरच संभवते, आकाशांत संभवत नाहीं. ज्याप्रमाणें मलिन वस्त्रावर तांबडा रंग खुलत नाहीं, त्याप्रमाणें अहंकाररूपी

पित्तामुळें उन्माद झालेल्या चित्तावर ज्ञानचमत्कृति परिणामकारक होत नाहीं. चित्तरूपी शरदृतूमधील आकाशांतून एकदां अहंकारमेघ नाहींसा झाला आणि तृष्णेचा वर्षाव बंद पडला, म्हणजे त्या ठिकाणीं आत्मचंद्राच्या प्रकाशानें युक्त असलेली स्वच्छता विलसूं लागते. ज्यांतील अहंकाररूपी चिखल नाहींसा झाला असून आंतील पाणी अत्यंत प्रसन्न झालें आहे, अशा माझ्या आत्मानंदसरोवराला आणि हे ब्रह्मन्! तुला माझे नमस्कार असोत! ज्यांतील इंद्रियरूपी नक्र नष्ट झाले आहेत आणि ज्यांतील चित्तरूपी वडवानल क्षीण झाला आहे, अशा माझ्या आनंदसागराला आणि हे ब्रह्मन्! तुला माझे नमस्कार असोत. ज्यावरील अहंकार मेघ निघून गेला आहे आणि ज्यांतील आशारूपी दावानल शांत झाला आहे, अशा माझ्या आनंदरूपी पर्वताला माझे नमस्कार असोत. ज्यांतील आनंदकमल प्रफुल्लित झालें आहे आणि चिंतारूपी उर्मि शांत झालेली आहे, अशा ब्रह्मस्वरूपी मानससरोवराला आणि हे आत्मन्! तुला माझे पुनःपुन्हां नमस्कार असोत. बुद्धि आणि तिच्या वृत्ति यांच्यांतील प्रतिबिंबचैतन्य हेच ज्याचे दोन पंख आहेत व जो हृत्कमलकोटरामध्यें वास करतो, अशा सर्वांच्या मानसहंसाला आणि हे आत्मन्! तुला माझे अनेक प्रणाम असोत. ज्याचें स्वरूप षोडशकलांनीं युक्त आहे, तसेंच जो निष्कल, अमृतस्वरूपी आणि नित्य उदित आहे, अशा पूर्ण आत्मचंद्राला माझे वारंवार नमस्कार असोत. जो अंतःकरणांतील अंधकार नाहींसा करतो, तसेंच जो सर्वव्यापी असून अदृश्य असतो, अशा सर्वदा उदित असणाऱ्या शांत चित्सूर्याला माझे शतशः नमस्कार असोत. जो स्वतः निस्तैल असूनहि परमप्रेमरूपी दीपाला प्रकाशित करतो, वृत्तिरहितता हीच ज्याची वात आहे, तसेंच जो जगांतील सर्व वस्तूंच्या स्वभावाला आधारभूत असून बुद्धीचाहि प्रकाशक आहे, अशा चिद्दीपाला माझे वारंवार नमस्कार असोत. मी आतां खरोखरच धन्य आहें! ज्याप्रमाणें घणाच्या योगानें तापलेलें लोखंड तोडतां येतें, त्याप्रमाणें शमदमादियुक्त मनाच्या योगानें मदनानलानें संतप्त झालेलें मन मी तोडलें आहे, बहिर्दृष्टि इंद्रियांना अंतर्मुख केलेल्या इंद्रियांनीं छेदून टाकलें आहे, मनाचा मनानें शिरच्छेद केला आहे, मलिन अहंकाराचें नाक शुद्ध अहंकारानें ठेंचलें आहे व अशा रीतीनें मी आतां सर्वत्र विजयी झालों आहें. केवल चिन्मात्रता हेंच माझें स्वरूप आतां अवशिष्ट राहिलें आहे. श्रद्धेनें अश्रद्धेला, वैराग्यानें तृष्णेला आणि विवेककुशल प्रज्ञेनें अविचाररूपी अप्रज्ञेला मी नष्ट करून टाकलें आहे. अशा रीतीनें ज्ञातृत्वाभिमानशून्य असल्यामुळें अज्ञ आणि ज्ञप्तिमात्रस्वभाव असल्यामुळें ज्ञ असे जें माझें सत्स्वरूप राहिलें आहे, त्याला माझे नमस्कार असोत. मनानें मनाचा छेद केल्यामुळें व ब्रह्मभावानें देहादिकावरील अहंकार नष्ट केल्यामुळें मी आतां निरहंकार, स्वच्छ आणि केवल स्वरूप होऊन राहिलों आहें. मी आतां बुद्धि, अहंकार, मन व चित्त यांनीं रहित झालों असून केवळ श्वासोच्छ्वास करीत असल्यामुळें मी जीवन्मुक्तांच्या अवस्थेमध्यें स्थित आहें. माझें हें सध्यांचें परमोच्च शांतिसुख आपल्या अनंत भक्तांवर भोगैश्वर्यादिक देऊन अनुग्रह करणारे ब्रह्मा, विष्णु व रुद्रप्रभृति देव यांच्या सुखाहूनहि श्रेष्ठ आहें! माझा मोहरूपी वेताळ गाडला गेला, अहंकारराक्षस पार नाहींसा झाला, व दुराशारूपी जखिणीच्या कचाटींतून सुटून मीं आतां दुःखरहित झालों आहें. माझ्या शरीररूपी पिंजऱ्यांतून अहंकातिरूपी पक्षीण तृष्णा-

रज्जूचे पाश तोडून कोठें उडून गेली कोण जाणे! देहवृक्षावरील अज्ञानरूपी घरट्याचा ज्ञानानें नाश होतांच माझा अहंभावरूपी पक्षी कोठें उडून गेला, याचा मागमूसहि लागत नाहीं! दुराशा, देहाभिमान इत्यादि भावनांच्या योगानें मलिन झालेल्या आणि भयरूपी सर्पांना हितकर असलेल्या अशा दुर्वासना भोगांचें भस्म करणाऱ्या समाधीच्या अभ्यासानें मीं नाहींशा करून टाकल्या आहेत. एवढा वेळपर्यंत मी कोण होतों कोणास ठाऊक! मी या अहंकाराला आजपावेतों उराशीं बाळगला, हें केवढें आश्चर्य! परंतु अहंकाररूपी काळ्याकुट्ट महामेघानें आजवर सोडल्यामुळें मी आतां ब्रह्मसाक्षात्कारसंपन्न झालों आहें. मी हा भगवन् आत्मा महावाक्य प्रमाणावरून पाहिला, तसेंच तो मला मननानें प्राप्त झाला, समाधिस्थितीमध्यें मी त्याला आलिंगन दिलें आणि व्युत्थानदशेमध्यें आपल्या देहाप्रमाणें मी त्याची स्वानुभव घेण्याची योजना केली. सांप्रत निर्विषय, मननशून्य, तसेंच इच्छा, अहंकार, चेष्टा, भोगोत्कंठा यांनीं रहित झालेलें माझें मन, इंधनें संपतांच अग्नि आपोआप विझतो त्याचप्रमाणें, शांत आणि स्थिर झालें आहे. एवंच, निरनिराळ्या योनींमध्यें जन्मपरंपरा भोगावयास लावणाऱ्या आणि कामलोभमोहादि शेंकडों दोष उत्पन्न करणाऱ्या, अत्यंत दुःखप्रद आणि दुःसह अशा माझ्या महान् आपत्ती नाहींशा झाल्या व ज्ञानानें अज्ञान बाधित होऊन मला आतां महेश्वराची प्राप्ति झाली आहे.

---

# सर्ग ३६

—:*:—

१. दुर्लभ आत्मज्ञान प्राप्त झाल्यामुळें आपल्या आत्मस्वरूपाला वारंवार प्रणाम करीत प्रल्हाद त्यामध्यें रममाण होतो.

प्रल्हादः—मानुषादि आनंदापासून तों हिरण्यगर्भाच्या आनंदापर्यंत जीं जीं आनंदाचीं स्थानें आहेत, त्या सर्वांच्या अतीत असलेला, निरतिशयानंदरूपी आत्मा मला आज इतक्या दीर्घकालानें आठवला, व त्याचें मला पूर्वभाग्यानें दर्शनहि घडलें. भगवन्! अशा त्या तुज महात्म्याला नमस्कार असो. मी तुला पुनः पुन्हां वंदन करतों, तुझें दर्शन घेतों आणि समाधीमध्यें दूध आणि पाणी यांच्याप्रमाणें तुझ्याशीं समरस होतों. भगवन्! तुझ्यावांचून या त्रैलोक्यांत मला दुसरा कोण बरें बंधु आहे? जोंपर्यंत तुझें दर्शन झालें नाहीं आणि तूं प्राप्त झाला नाहींस, तोंपर्यंत तूं मृत्यु होऊन अभक्तांना मारतोस, भक्तांचें रक्षण करतोस, उपासकांना अभीष्ट फल देतोस, स्तवकांच्या रूपानें स्तुति करतोस, गमन करणाऱ्यांच्या रूपानें चालतोस आणि जगांत सर्व रूपांनीं व्यवहार करतोस. परंतु नित्य अपरोक्षस्वभाव अशा तुला मी पाहिलें आहे आणि तूं मला प्राप्त झाला आहेस. इतःपर तूं माझें काय करणार आणि कोठें जाणार? विश्वाच्या हितकर्त्या देवा! तूं आपल्या सत्तेनें सर्व विश्व व्यापून राहिला आहेस. मला आतां तुझें सर्वत्र दर्शन घडत आहे, अशा स्थितींत तूं पळून जाणार तरी कोठें? तुझ्यामाझ्यामध्यें अनेकजन्मार्जित अज्ञानामुळें जें अंतर पडलें होतें, तें आज दूर होऊन तुझें माझें पूर्वपुण्याईनें ऐक्य झालें आहे; आणि हे बंधो! तूं मला आज दिसला आहेस. नेहमीं कृतकृत्य, कर्ताभर्ता, संसाररूपी पानाचा जणुं देंठ, नित्य आणि विमलात्मा असा जो तूं त्या तुला माझा नमस्कार असो. हातामध्यें चक्र व कमल धारण करणारा ( विष्णु ), मस्तकावर अर्धचंद्र धारण करणारा ( शिव ), देवांचा नाथ ( इंद्र ) आणि कमलसंभव (ब्रह्मदेव ) असा जो तूं, त्या तुला माझा नमस्कार असो. तुझ्यामाझ्यामधील भेद केवळ

व्यवहारदृष्टीनें आहे. परंतु ही भेदकल्पना सुद्धां जलतरंगाप्रमाणें मिथ्याच आहे. आपल्या विचित्र कल्पनेच्या योगानें भावाभाव आणि वस्तु-वैचित्र्य यांच्या रूपानें तूं नित्य विलसत असतोस. सूज्य पदार्थांचा स्रष्टा, दृश्य पदार्थांचा द्रष्टा आणि सृष्टिस्थितिकाळीं अनंत रूपांनीं विकास पावणारा असा जो सर्वस्वभाव आणि सर्वव्यापी तूं, त्या तुला माझा नमस्कार असो! इतके दिवसपर्यंत तूंच आपला ईश्वरभाव छपवून माझ्या रूपानें प्रत्येक जन्मांत अनेक दुःखें भोगलींस, व आतां तूंच आपल्या स्वरूपाला ओळखून विश्रांति घेत आहेस. माझ्या दोषानुछंदानें वागून माझ्या दुर्दैवामुळें हीनतेज होऊन, तूं ऊर्ध्वलोक, अधोलोक आणि मध्यलोक यांच्यामध्यें संचार केलास, तसेंच विवेकाला अनुकूल असलेले सर्व दर्शनार्ह देखावेहि पाहिलेस. परंतु ह्या बाह्यसृष्टीच्या दर्शनापासून तुला अल्पहि पुरुषार्थ प्राप्त झाला नाहीं. कारण, हें जगत् म्हणजे काष्ठ, पाषाण व जल यांवांचून दुसरें कांहीं नाहीं; व या जगांत जर कांहीं प्राप्तव्य असेल, ज्याची प्राप्ति झाली असतां कांहीं प्राप्त होण्याचें शिल्लक रहात नाहीं अशा प्रकारचें जर कोणतें प्राप्तव्य असेल, तर तें तूंच आहेस. अशा तऱ्हेचा जो तूं तो देवा! मला आज लाधला आहेस, मी तुला पाहिलें आहे, तुला प्राप्त करून घेतला आहे, मी तुला आपल्या हातांत पकडला आहे व आतां तूं माझ्या हातांतून निसटून जाशील ही गोष्ट सुद्धां बोलावयास नको! देवा! असा जो तूं त्या तुला मी वंदन करतों. देवा! डोळ्यांतील बुबुळांत सूक्ष्म प्रकाशकिरणाच्या रूपानें स्थित असून जर तूं सर्व रूपविषयांचें ग्रहण करतोस, तर तूं मला कसा दिसणार नाहींस? ज्याप्रमाणें तीळ आणि फुलें एकत्र असलीं म्हणजे तिळांतील तेल सान्निध्यानें फुलांतील सुगंध ग्रहण करतें, त्याप्रमाणें जर तूं त्वचेच्या योगानें शीतोष्णादि पदार्थ ग्रहण करतोस, तर हें माझ्या अनुभवास कसा येणार नाहींस? गीतकाव्यादि गुणचमत्काराचा प्रकाश करणारा जो तूं, शब्दश्रवणाच्या योगानें अंगावर रोमांच उत्पन्न करतोस, तो तूं माझ्यापासून दूर कोठें असणार? गोड, आंबट वगैरे पदार्थ जिव्हेच्या टोंकाला लागले असतां ज्या रसिकाच्या ठिकाणीं तत्क्षणीं रसोत्पत्ति निर्माण करतात, तो स्वतः कोणाला प्रिय होणार नाहीं? जो आपल्या घ्राणेंद्रियानें कंठांतील पुष्पमालेचा सुगंध ग्रहण करतो आणि पुष्पमालेनें आपला देह अलंकृत झाला आहे असें प्रत्यक्ष पहातो, त्याचा साक्षात्कार कोणाला होणार नाहीं? ज्या आत्म्याचें वेद, शास्त्रें आणि पुराणें सतत गायन करीत आहेत, त्याचें एकदां ज्ञान झालें म्हणजे पुन्हां विसरण कसें होईल? हे आत्मदेवा! तुझ्या परावर आणि निर्मल स्वरूपाचें दर्शन झालें, म्हणजे ज्या विषयोपभोगांमध्यें पूर्वी मन रममाण होत असतें, तेच भोग मग त्यांना गोड वाटतनासे होतात. देवा! तूं आपल्या निर्मल प्रकाशानें सूर्याला तेजस्वी आणि चंद्राला शीतल केलें आहेस. ह्या पर्वतांना गुरुत्व तूंच दिलेंस, ह्या वायूला आकाशसंचारित्व तूंच दिलेंस. ह्या पृथ्वीला तूंच निश्चल केलेंस आणि ह्या आकाशामधील पोकळीहि तूंच निर्माण केली आहेस. माझ्या महद्भाग्यानें तूं मद्रूप झाला आहेस आणि मी त्वद्रूप झालों आहें. मी तूं झालों आहें व तूं मी झाला आहेस. अर्थात् तुझ्यामाझ्यामध्यें आतां यत्किंचितहि भेद राहिलेला नाहीं. 'मी' आणि 'तूं' हे दोन्ही शब्द लक्ष्य जो परमात्मा त्याचे बोधक असून ते आतां एकमेकांच्या ऐवजीं योजिले जाणारे पर्याय शब्द झाले आहेत. एकाच वृक्षाच्या दोन शाखा

बाह्यतः भिन्न दिसल्या तरी त्यांच्यांत वस्तुतः भेद नसतो, त्याप्रमाणें उपाधिभेदामुळें तुझ्या-माझ्यांत भेद दिसला तरी तत्त्वतः तूं आणि मी एकरूप झालों आहों. ज्या 'तूं' आणि 'मी' या शब्दांत आतां अभेद उत्पन्न झाला आहे, अशा त्या दोन्ही शब्दांनाहि माझा नमस्कार असो. तसेंच माझ्या अनंत, अहंकाररहित, अरूप आणि सम अशा ब्रह्मस्वरूपाला नमस्कार असो. हे ब्रह्मन्! तूं माझ्या सम, स्वच्छ, साक्षिभूत, निराकार आणि दिशा, काल इत्यादिकांनीं अमर्यादित अशा आत्मस्वरूपामध्यें रहातोस. हें मीं कशावरून जाणलें? असें म्हणशील तर मला हें पक्कें माहीत आहे कीं, लोहचुंबकाच्या सान्निध्यानें लोखंड चलन पावतें, त्याप्रमाणें तुझ्या विचित्र शक्तीमुळें मन क्षुब्ध होतें, इंद्रियवृत्ती स्फुरण पावतात, प्राणापानवायू वाहूं लागतात, तसेंच चर्म, मांस, अस्थि वगैरेंनीं लिंपलेलीं, आशारूपी चामड्याच्या वाद्यांनीं जखडलेलीं आणि मनोरूपी सारथ्यानें युक्त असलेलीं देहयंत्रें चालूं लागतात. परंतु हें देहरूपी घर व त्यांतील अहंकार म्हणजे मी नव्हे, तर मी केवळ चिद्रूप आहें. मला या हाडामांसाच्या देहाशीं काय करावयाचें आहे! हा देह पाहिजे तर राहो किंवा पडो मला त्याच्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं. ज्याप्रमाणें कल्पांतकाळीं जगाचा उपशम व्हावा, त्याप्रमाणें इतक्या दीर्घकालानें माझ्या भ्रमाचा उपशम झाला आणि मला आत्मलाभ झाला, आणि माझा मी खरा झालों. ज्याप्रमाणें कल्पान्त झाल्यानंतर अग्नि शांत होतो; त्याप्रमाणें या दीर्घ संसारमार्गांत भ्रमण करून करून थकलेला मी आतां विश्रांति पावलों आहें. यास्तव सर्वातीत आणि सर्व असा जो मद्रूप तूं, त्या तुला माझा नमस्कार असो. तसेंच जे गुरू आणि जो वेदान्त तुझें मद्रूपत्वानें वर्णन करतात, त्यांनाहि माझा नमस्कार असो. तसेंच जी परमात्म्याची साक्षित्ववृत्ति संपूर्ण भोग्य पदार्थांना प्रकाशित करते, परंतु जिला उदासीनतेमुळें दोषाचा स्पर्शहि होत नाहीं, तिचा सर्वदां जयजयकार असो! हे आत्मन्! पुष्पांतील आमोद, भात्यांतील वायु अथवा तिळांतील तेल यांच्याप्रमाणें तूं सर्वत्र व्यापून राहिला आहेस. तूं स्वतः निरहंकार असूनहि ज्याअर्थी ठार मारतोस, रक्षण करतोस, देतोस, स्फुरण पावतोस आणि हालचाल करतोस, त्याअर्थी तुझी ही माया खरोखरीच विचित्र आहे! तूं मद्रूप चिदात्मा सर्गकालीं नामरूपात्मक जग निर्माण करून त्यांत जीवभावानें प्रवेश करतोस, त्याचें प्रतिपालन करतोस आणि प्रलयकालीं त्याचा संहार करून आत्मरूपानें स्थित असतोस. ज्याप्रमाणें वटवृक्षाच्या बीजामध्यें वटवृक्ष असतो, त्याप्रमाणें परमाणूप्रमाणें अत्यंत सूक्ष्म असलेल्या तुझ्या स्वरूपामध्यें हें संसारमंडल पूर्वीं स्थित होतें, सध्यां आहे, आणि पुढेंहि असेल. ज्याप्रमाणें आकाशांतील मेघ, घोडे, हत्ती, रथ इत्यादि आकारांचे दिसतात, त्याप्रमाणें देवा! तूंहि जगांतील शेंकडों पदार्थांच्या भ्रामक रूपांनीं भासमान होतोस.

माझ्याहून ज्याचें स्वरूप अभिन्न आहे अशा ब्रह्मात्म्या! जगांतील सर्व अनित्य आणि नानाविध विकारशील वस्तूंचा निरास होऊन निरतिशयानंदाची प्राप्ति व्हावी असें तुला वाटत असेल, तर असंग आत्म्याचें दर्शन करून घेऊन भावाभावरहित होऊन मुक्त हो. तसेंच अभिमान, कोप, अंतःकरणाची मलिनता आणि क्रूरता यांचा त्याग कर. कारण, जे महात्मे असतात ते प्राकृतगुणसंकटांत केव्हांहि निमग्न होत नाहींत. पूर्वी आत्म्याविषयींच्या अज्ञानामुळें आपण किती दीर्घ दुर्दशा आणि

केवढाल्या विपत्ती भोगल्या आहेत, याचें वारंवार स्मरण करून 'मी कोण आहें?' आणि 'हें काय झालें आहे?' याबद्दल चांगला विचार करून अज्ञानाचा त्याग कर, व मोत्याप्रमाणें शुभ्र दिसेल, अशा रीतीनें मनापासून हंसत रहा. बा आत्म्या! ज्यांमध्यें तूं चिंताग्नीच्या ज्वालांनीं वेढला गेला होतास, असे तुझे दुर्दिन आणि आयास निघून गेले आणि तुझें नष्टचर्य संपलें. आज तुझे मनोरथ पूर्ण झाले असून तूं देहनगरीचा राजा झाला आहेस. ज्याप्रमाणें आकाश हें मुठींत धरून ठेवतां येणें शक्य नसतें, त्याप्रमाणें तुला सुखें किंवा दुःखें बद्ध करूं शकणार नाहींत. इंद्रियरूपी द्वाड अश्वांना आणि मनोरूपी हत्तीला जिंकून, तसेंच भोगरूपी शत्रूंचा नायनाट करून तूं साम्राज्यपदावर आरूढ झाला आहेस. अपार आकाशांत प्रवास करणारा, निरंतर जगताचे उदयास्त करणारा आणि अंतर्बाह्य सर्वांना प्रकाशित करणारा असा सूर्य तूंच आहेस. विभो! तूं अनादिकालापासून नेहमीं गाढ निजलेला असून एखाद्या कामुक पति आपल्या कामिनीकडून भोगविलासाकरितां जागृत केला जातो. त्याप्रमाणें तूं आपल्या चिच्छक्तीकडून भोगालोकनरूपी लीलेसाठीं तेवढ्यापुरता जागा केला जातोस; परंतु तूं पूर्णत्वानें जागृत होत नाहींस. इंद्रियवृत्तिरूपी मधमाशांनीं लांबून आणलेला रूपादिविषयरूपी मध तूं नेत्रादि खिडक्यांमध्यें बसलेल्या आपल्या चिच्छक्तिरूपानें प्राशन करतोस. तसेंच योग्यांच्या उत्क्रमणकालीं सुषुम्नादि मार्गांचा प्रकाशक तूंच आहेस; अर्थात्, शरीरांतील प्राणापानवायूंच्या निरोधाचा अभ्यास करणारे योगी ब्रह्मरंध्रांतून प्राण बाहेर नेऊन परकायाप्रवेश, लोकांतरसंचार, अर्चिरादि मार्गानें सूर्यमंडलप्रवेश वगैरे गोष्टी करतात, तेव्हां तूंच स्वयंज्योति त्यांना आपल्या किरणांनीं मार्ग दाखवतोस. तूं देहरूपी पुष्पांतील आमोद (सुगंध) आहेस, चंद्रातील परमार्थसत्य अमृत आहेस, वृक्षांतील जीवनरस आहेस आणि देहरूपी बर्फांतील थंडीहि तूंच आहेस शरीररूपी दुधांतील घृत असा जो तूं त्या तुझ्या ठिकाणीं सर्व प्राण्यांच्या देहाभिमानाला कारणीभूत होणारा आश्चर्यकारक स्नेह असून काष्ठांतील अग्नीप्रमाणें तूं देहाच्या आंत स्थित आहेस. एकच अमृतस्वरूप असा तूंच आहेस, सूर्यादि तेजांचा प्रकाशक तूंच आहेस, विषयांचा ज्ञाता तूंच आहेस आणि चक्षु आदिकरून इंद्रियांचा अवभासक—प्रकाशकहि तूंच आहेस. प्राणादि वायूंची हालचाल करविणारा तूं, मनोरूपी हत्तीचा मद तूं आणि प्रज्ञारूपी अग्निशिखेचा प्रकाश आणि उष्णताहि तूंच आहेस. तुझ्या स्वाधीन असलेली वाणी तूं आवरल्याबरोबर मरण, मूर्च्छा आणि गाढ निद्रा या तिन्ही अवस्थांमध्यें शांत होते आणि तुझ्याच कृपेनें ती मरणोत्तर पुन्हां अन्य देहांमध्यें दिव्याप्रमाणें कशी प्रकट होते, याचा पत्ता लागत नाहीं. सोन्यामध्यें कटककेयूरादि अलंकार असतात, त्याप्रमाणें तुझ्यामध्यें या जगांतील यच्चयावत् पदार्थपंक्ती स्थित असतात. 'मी' 'तूं' 'हा' वगैरे शब्दहि तुझ्यामध्येंच असून तूंच लीलेनें आपली आपण स्तुति करतोस व दुसऱ्याशीं बोलतोस. ज्याप्रमाणें मंदवायूनें फिरणारा आकाशांतील मेघ हत्ती, घोडा वगैरे आकारांचा वरचेवर पालटून दिसतो, त्याचप्रमाणें तूं भूतमात्राच्या आकाराचा दिसतोस. कित्येक जळणाऱ्या काष्ठांतून निघणाऱ्या अग्नीच्या ज्वाळा घोडे, हत्ती वगैरे आकारांच्या दिसतात, त्याप्रमाणें तूं पृथ्वीवरील सृष्ट पदार्थांमध्यें आपणाहून व्यतिरिक्त नसलेल्या विविध आकारांचा भासतोस, तूं ब्रह्मांडरूपी मुक्ताफळांना ओंवणारा अविच्छिन्न तंतु आहेस. चैतन्यरूपी पाण्यानें

असलेलें प्राणिरूपी धान्याचें तूं शेत आहेस. ज्याप्रमाणें शिजविण्यानें मांसांतील माधुर्य प्रकट होतें, त्याप्रमाणें अविद्यारूपी बीजामध्यें अव्यक्त रूपानें असलेलें सृज्यपदार्थांचें स्वरूप तूं सर्व-रूपांनीं अभिव्यक्त करतोस. ज्याप्रमाणें अंध मनुष्याच्या दृष्टीला एखाद्या वनितेचें रूपलावण्य असून नसल्यासारखें होतें, त्याप्रमाणें तूं नसशील तर जगांतील वस्तूंची शोभा असून नसल्यासारखीच आहे. जसें आरशामध्यें प्रतिबिंबित झालेलें आपलें लावण्य प्रेमी जनाच्या आलिंगनचुंबनादि विलासांच्या उपयोगी पडत नाहीं, तसें तुझ्या सत्तेवाचून जगांतील वस्तू सद्रूप भासल्या तरी अर्थक्रियाकारी होत नाहींत. सूर्य नसला म्हणजे काळोखांत पर्वताची उंची असून नसून खारखीच होते, तद्वत् तुझ्या सत्तेवांचून हा देह लांकडाचा ओंडका किंवा मातीचें ढेंकूळ यांच्याप्रमाणें जमिनीवर लोळत पडतो. ज्याप्रमाणें सूर्याचा प्रकाश पडतांच अंधकार, दीप, नक्षत्रें इत्यादिकांची प्रभा अथवा बर्फ वितळून जातें, त्याप्रमाणें तुझा साक्षात्कार होतांच सुखदुःखक्रमाला अजिबात खळ पडतो. सूर्याच्या प्रकाशानें प्रातःकाळीं पांढरा वगैरे रंग नाहींसे होतात, त्याप्रमाणें तुझ्या ज्ञानानें जगांतील सुखदुःखें नाहींशीं होतात. दिव्याचें दर्शन होतांच अंधकार नष्ट होतो, तद्वत ज्यांना तुझ्या सत्तेमुळें स्थितिप्रत प्राप्त झालेलीं सुखदुःखें तुझ्या दर्शनाबरोबर अस्तंगत होतात. दीपाच्या अभावीं व्यक्त झालेली अंधकाराची सत्ता दीपाच्या प्रकाशाबरोबर नाश पावते, त्याप्रमाणें जगांतील सुखदुःखश्री तुज अनामयाला पाहून उत्पन्न होते आणि उत्पन्न होतांच बीजासहवर्तमान नष्ट होते. निमेषाच्या लक्षांशाइतकी अल्प असलेली कालाची कला क्षणभंगुर असल्यामुळें आपोआप नाहींशी होते, त्याप्रमाणें तुझें दर्शन होतांच सुखदुःखश्री क्षणभरहि रहात नाहीं. एखाद्या गंधर्वनगरीप्रमाणें मिथ्या व क्षणभंगुर असलेली सुखदुःखादि भावना तुझ्या अज्ञानरूपी कृपाप्रसादानें स्फुरण पावते आणि तुझें ज्ञान होतांच लीन होते. अशा रीतीनें तुझ्या सत्तेमध्यें उत्पन्न क्षणभर होणारी आणि क्षणांत नष्ट होणारी ही सुखदुःखश्री स्वप्नांत उत्पन्न होऊन जागृतींत मरण पावणारी असल्यामुळें कोणाच्या डोळ्यांना दिसणार? समुद्रांतील तरंग हीं कमलें आहेत अशी एखाद्यानें कल्पना केली तरी त्यांची माळ तयार करतां येणें शक्य नाहीं, त्याचप्रमाणें सुखदुःखादि भावना ही मिथ्या असल्यामुळें कार्यकारी कशी होणार? उत्पन्न होतांच नष्ट होणारी मिथ्या वस्तु जर सत्य कार्य करण्याला समर्थ असेल, तर विजेच्या लहरींची माळ तयार करून ती गळ्यांत घालण्याला तरी काय हरकत आहे? हे आत्मन्! तूं विवेकी जनांच्या हृदयांत राहून सुखदुःखादि लक्ष्मी गृहण करतोस पण आपली समस्थिति सोडीत नाहींस. आतां अविवेकी जनांच्या हृदयांत तूं कसा असतोस, याचें वर्णन करण्याला माझी वाणी असमर्थ आहे. कारण, अविवेकी मनुष्याच्या कल्पना अनंत असल्यामुळें तुला तितकीं रूपें धारण करावीं लागणार. हे आत्मन्! तूं जरी वस्तुतः निरिच्छ, निरंश आणि निरहंकार असलास, तसेंच तूं सद्रूप असलास किंवा असद्रूप असलास, तरी तूं कर्तृत्वाचा अंगिकार केला आहेस. परंतु तें कसेंहि असलें तरी हे ब्रह्माण्डाचा विस्तृत आकार धारण करणाऱ्या, तसेंच हे शान्तिपरायण देवा! तुझा जयजयकार असो. सर्व प्रमाणांच्या अतीत असलेल्या आणि सर्व प्रमाणांनीं जाणला जाणाऱ्या देवा! तुझा जयजयकार असो. तसेंच हे जात व अजात, क्षत व अक्षत भावरूपी व अभावरूपी, जेय व अजेय देवा! तुझा जयजयकार असो, मी आतां आनंदित झालों

आहें, शांत झालों आहें, स्थिर झालों आहें व माझें मला पूर्ण ज्ञान झालें आहे मी आतां अविद्येला जिंकल्यामुळें विजयी झालों आहें व इत:पर मी प्रारब्धशेष जिंकण्यासाठींच जगत आहें. अशा तुला आणि मला माझा नमस्कार असो. हे भगवन्! हे आत्मन्! तुझा साक्षात्कार होऊन तूं व मी आतां एकरूप झाल्यामुळें माझें सर्व अनर्थ नाहींसे झाले आहेत. अर्थात्, आतां मला बंधन कोठचें, विपत्ति कोणची, संपत्ति कोणची आणि जन्ममरण तरी कोठचें! सारांश, मी आतां शाश्वत विश्रांतिसुख अनुभवीत रहाणार!

———

## सर्ग ३७

—:०:—

१. प्रह्लाद समाधिसुखामध्यें गढून गेला असतां त्याच्या नगरांत बेबंदशाही सुरू होते.

**श्रीवासिष्ठ:**—अशा रीतीनें विचार करीत असतां तो शत्रुनाशक प्रल्हाद निर्विकल्पसमाधीचा परमानंद भोगण्यांत गढून गेला होता. निर्विकल्पसमाधीमध्यें राहून आपलें स्वरूपसाम्राज्य भोगीत असतां तो चित्रांत रेखल्याप्रमाणें किंवा एखाद्या पर्वतांतील कोरलेल्या मूर्तीप्रमाणें निश्चल दिसत होता. याप्रमाणें भुवनाच्या मध्यमार्गी असलेल्या मेरूप्रमाणें तो दानवेंद्र आपल्या मंदिरांत समाधिसुख भोगण्यांत गढून गेला आहे, अशा स्थितींत पुष्कळ काल लोटला. तितक्या अवधींत मोठमोठ्या दानवांनीं त्याला जागृत करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, परंतु एखाद्या बीजाला अकालीं कितीहि पाणी घातलें तरी त्या बीजकोशापासून अंकुराची उत्पत्ति होत नाहीं, त्याप्रमाणें तो महाबुद्धिवान् प्रल्हाद दानवांच्या प्रयत्नांनीं जागृतीवर आला नाहीं. अशा रीतीनें ब्रह्मस्वरूपाशीं तादात्म्य पावलेला तो दानवेंद्र आपल्या नगरामध्यें हजारों वर्षेंपर्यंत एकाग्रचित्तानें शांत बसला असून त्या स्थितींत एखाद्या पाषाणामध्यें सूर्याची मूर्ति कोरलेली असावी, त्याप्रमाणें तो दिसत होता. परब्रह्माशीं समरसता पावल्यामुळें तो निजानंदामध्यें इतका गढून गेला होता कीं, ज्याप्रमाणें मृत मनुष्याचा देह कांहीं एक हालचाल न करतां स्वस्थ असतो, त्याप्रमाणें त्याचा देह आभासमात्र दिसत होता. यावेळीं त्या रसातलमंडलामध्यें अराजकता माजली व बलवान् असला म्हणजे मग तो सजातीय असो कीं विजातीय असो, त्यानें दुर्बळांना निष्कारण पीडा द्यावी आणि त्यांचा वध करावा, अशा तऱ्हेचा भयंकर मात्स्यन्याय सुरू झाला. हिरण्यकश्यपूचा वध झाला आणि त्याचा पुत्र प्रल्हाद तर समाधि लावून बसला, अशा स्थितींत दानवांच्या राज्यांत कोणी शास्ता राहिला नाहीं. दानवांनीं आपल्या प्रयत्नांची शिकस्त केली, तरी प्रल्हादाची समाधि म्हणून उतरेना. ज्याप्रमाणें रात्रीच्या वेळीं भ्रमरांना विकास पावलेलें कमल आढळून येत नाहीं, त्याप्रमाणें त्या दानवांना आपला राजा समाधींतून जागा झाल्याचें दिसून आलें नाहीं. ज्याप्रमाणें सूर्यास्तानंतर मनुष्याची हालचाल अजिबात बंद पडते, त्याप्रमाणें गलितचित्त झालेल्या प्रल्हादाची प्रबोधवार्ताहि ऐकूं येईनाशी झाली. यामुळें सर्व दानव उद्विग्न होऊन गेले. त्यांमध्यें जे दुर्बल होते ते जिकडे वाट फुटली तिकडे निघून गेले, परंतु जे बलवान् होते त्यांनीं 'बळी तो कान पिळी' या न्यायानें जिकडे तिकडे अंदाधुंदी माजविली. पाताळांत अराजकस्थिति उत्पन्न झाल्यामुळें मात्स्यन्याय सुरू झाला आणि सर्वत्र अनवस्थाप्रसंग ओढवला. जे बलवान् होते त्यांनीं स्त्रियांच्या अंत:पुरांत शिरून त्यांची लज्जा हरण करावी, त्यांना त्रास द्यावा, परस्परांचीं वस्त्रें हरण करावीं, अशा तऱ्हेचे अनन्वित प्रकार सुरू

झाले. दिवसाढवळ्या दरकडे पडूं लागले, सर्वत्र रडण्याचे भयंकर आक्रोश ऐकूं येऊं लागले, राजधानीच्या आसपासच्या बागा उध्वस्त करण्यांत आल्या, नगरांतील घरांतून पाहिजे त्यानें शिरावें, तेथील चीजवस्त लुटावी आणि घरांतील मालकाचा छळ करून निघून जावें, अशी बेबंदशाही माजली. सर्व दानवांना मोठी चिंता उत्पन्न झाली. कोणाला पोटभर अन्न मिळेना किंवा खाण्याला फळ मिळेना, असा घोर प्रसंग ओढवला. अकालीं उत्पन्न झालेल्या उत्पाताप्रमाणें सर्व दिशा धुळीनें व्याप्त झाल्या. देवांचीं पोरेंसुद्धां दैत्यांना जर्जर करूं लागलीं व राक्षसपिशाचादि तामस भूतांनीं जिकडे तिकडे धांगडधिंगा सुरू केला. अशा रीतीनें तें सर्व पाताल उध्वस्त झालें, तेथील संपत्ति लुटली गेली आणि सर्व प्रदेश प्राणिरहित होऊन भयाण दिसूं लागला. सारांश, त्या प्रल्हादाच्या नगरांत सर्वत्र अंदाधुंदी माजली. स्त्रिया-धन, मित्रस्नेह आणि कलह यांच्यासंबंधानें कांहींच नियम राहिला नाहीं; धन, स्त्रिया यांचें हरण होऊं लागल्यामुळें जिकडे तिकडे रडण्याचे आक्रोश सुरू झाले; कलियुगांतील प्रजेप्रमाणें सर्व पाताल दुःखाचें माहेरघर बनलें व सर्वत्र भीतीचें आणि उद्विग्नतेचें साम्राज्य पसरलें !

---

## सर्ग ३८

—:*:—

१. जगाची व्यवस्था आणि दैत्यकुळाचें रक्षण यांसंबंधानें श्रीहरीचें चिंतन.

श्रीवसिष्ठः—रामा ! नंतर सर्व जगज्जालांतील नियतीचें पालन करणें हीच ज्याची क्रीडा आहे, असा क्षीरसमुद्रांतील शेषशय्येवर चातुर्मास स्वस्थ निजलेला हरि कार्तिक महिन्याच्या अखेरीस देवकार्य साधून देण्याकरितां जागा झाला व त्यानें त्या वेळची जगत्स्थिति लीलेनें अवलोकन केली. त्यानें प्रथम मनानें देवांची स्थिति पाहिली, नंतर भूलोकांतील जनांचें शुभाशुभ आचरण अवलोकनांत आणलें आणि शेवटीं दैत्यांचे स्वाधीन केलेल्या पाताळांतील स्थितीचे मनानें पर्यालोचन केलें. तेव्हां पाताळांतील प्रल्हाद समाधीमध्यें स्थिर झाला असून इंद्राच्या राजधानींत संपत्तीचा पूर आला आहे, असें त्याला आढळून आलें. त्या वेळीं क्षीरसमुद्रामध्यें शेषशय्येवर पद्मासन घालून बसलेल्या आणि सर्वांच्या अंतःकरणांत संचार करणाऱ्या शंखचक्रगदाधारी भगवान् हरीच्या त्रैलोक्यकमलावरील अति मोठ्या भ्रमराप्रमाणें असलेल्या मनःशरीरांत येणेंप्रमाणें विचार उत्पन्न झालेः—"अरेरे ! प्रल्हाद समाधिसाम्राज्याचें अनुपमसुख भोगण्यांत गढून गेला असतां निर्नायक झालेली ही पातालसृष्टि बहुतेक दैत्यहीन झाली आहे. दैत्यांचा अभाव झाल्यामुळें देवांचें राज्य निष्कंटक झालें असून अनावृष्टिकालीं नद्या निःशब्द होतात, त्याप्रमाणें सांप्रत देव शांत झाले आहेत. ज्याप्रमाणें पाणी न शिंपलेली लता रसहीन होऊन शुष्क होते, त्याप्रमाणें शमाच्या योगानें देव द्वंद्वरहित होतील आणि त्यांच्या ठिकाणचा अभिमान नाहींसा होऊन त्यांना आतां स्वर्गाचीहि पर्वा रहाणार नाहीं व ते मोक्षपदाप्रत जाऊन पोहोंचतील. सारांश, अशा रीतीनें देव शांत झाले, त्यांनीं दैत्यांचा आणि मनुष्यांचा द्वेषभाव करण्याचें आपलें व्रत सोडून दिलें, म्हणजे स्वर्गाचीहि किंमत नाहींशी होऊन यज्ञतपश्चर्यादि क्रिया बंद पडतील, त्यामुळें कर्मभूमि ओस पडेल, व अशा रीतीनें भूलोकच नष्ट झाला म्हणजे मग संसार तो काय राहिला? परंतु असा प्रसंग ओढवणें मला इष्ट नाहीं. कारण, हें त्रिभुवन कल्पापर्यंत रहावें असा मीं

जो संकल्प केला आहे, त्याला त्यामुळें बाध येईल; व उष्णतेनें बर्फाचा तुकडा वितळून जावा त्याप्रमाणें त्या संकल्पाचा अकालींच नाश होईल; जगताचा क्षय झाला म्हणजे त्याबरोबर माझ्या लीलेचाहि क्षय होणारच. परंतु त्यापासून कोणता लाभ होणार आहे ? या आकाशांतील चंद्र, सूर्य, तारका वगैरे माझीं खेळणीं एकदां नाहींशीं झालीं, म्हणजे मीहि आपल्या लीलाशरीराचा उपसंहार करून पूर्णात्मपदीं कायमचा लीन होईन. परंतु अशा रीतीनें जगताचा आणि माझ्या लीलाशरीराचा अकालीं लय होण्यापासून कोणतेंच कल्याण होणार नाहीं. यास्तव दानव जगावे अशी माझी इच्छा आहे. दानव जगले म्हणजे देवहि सावध रहातील, देव असले म्हणजे मनुष्य यज्ञादि श्रुतिस्मृतिप्रतिपादित क्रिया करूं लागतील व कर्मे सुरू झालीं म्हणजे हा संसाराचा गाडा अव्याहत चालू राहील. यास्तव मी अगोदर रसातळांत जाऊन प्रल्हादाला सावध करतों आणि वसंतादि ऋतू वृक्षाला नवीन जन्म देतात, त्याप्रमाणें मी त्याची पुन्हां राज्यपदावर स्थापना करतों. प्रल्हादाशिवाय दुसऱ्या कोणाला दानवाधिपति केल्यास तो देवांचा घात केल्याशिवाय रहाणार नाहीं. परंतु प्रल्हादापासून देवांना भीति बाळगण्याचें कांहींच कारण नाहीं, प्रल्हादाचा हा अखेरचा जन्म असल्यामुळें त्याचा देह अत्यंत पावन आहे व तो कल्पपर्यंत टिकणारा आहे. कारण, प्रल्हादानें कल्प पर्यंत रहावें अशी परमेश्वरानें पूर्वीं करून ठेवलेली निश्चित योजना आहे. यासाठीं त्या दैत्येंद्राकडे जाऊन, एखादा मेघ आपल्या गर्जनेनें पर्वतामध्यें किंवा नदीच्या कांठी निजलेल्या मयूराला जागृत करतो त्याप्रमाणें, मी त्याला समाधींतून जागृत करतों. जीवन्मुक्ताच्या असंसक्तिलक्षण समाधीमध्यें आणि चेष्टारहित मनःस्थितीमध्यें असलेला प्रल्हाद केवळ सानिध्यामुळें एखादें रत्न शेजारच्या पदार्थांचें प्रतिबिंब धारण करतें त्याप्रमाणें, असुरांचें आधिपत्य करो. कारण, असें झालें म्हणजे या सर्गाचा संहार होणार नाहीं, देव आणि असुर यांचे कलह आणि अर्थात् युद्धें कायम राहतील, व त्यामुळें माझी लीला अव्याहत चालेल. वास्तविक जगताचे उदय आणि अस्त हे जरी माझ्या दृष्टीनें सारखेच आहेत, तरी जी स्थिति आहे ती तशीच चालू रहाणें हेंच इष्ट आहे. असलेली स्थिति बदलण्यापासून काय फायदा आहे ? यावर कोणी म्हणेल कीं, योगनिद्रेचे अनिर्वचनीय सुख टाकून प्रल्हादाच्या नगरांत जाण्याचा एवढा खटाटोप तरी मीं काय म्हणून करावा ? परंतु ही शंका बरोबर नाहीं. जगताची उत्पत्ति, अनुत्पत्ति, नाश किंवा स्थिति यांच्याप्रमाणें योगनिद्रेचें सुख आणि गमनाचे श्रम हींसुद्धां माझ्या दृष्टीनें सारखींच आहेत. कारण, जो प्रयत्न अबुद्धिपूर्वक, अर्थात् अभिनिवेशरहित होत असतो, तो योगस्थितीमध्येंच होतो असें म्हणण्यास हरकत नाहीं. यास्तव मी आतां पाताळांत जाऊन त्या असुरेश्वराला जागृत करतों, परंतु मी पाताळांत गेलों तरी अज्ञजनांप्रमाणें संसारलीला न करतां आपल्या स्वरूपामध्यें अचलच राहीन. एवंच सूर्य कमलाला जागृत करतो, त्याप्रमाणें दैत्यांच्या स्वैर आचारांमुळें भयानक दिसणाऱ्या दैत्यपुरांत जाऊन मी प्रल्हादाची समाधि उतरून त्याला देहभानावर आणतों आणि वर्षाऋतु चंचल मेघजालाला हिमालयासारख्या पर्वतावर नेऊन स्थिर करतो, त्याप्रमाणें प्रल्हादाला दानवाधिपति करून मी अखिल जगाला स्थैर्य आणतों.”

# सर्ग ३९

—:*:—

१. प्रल्हादाच्या नगरांत जाऊन श्रीहरी त्याला आपल्या शंखनादानें जागृत करतो. २. कल्पपर्यंत राज्य करण्याविषयीं श्रीहरीचा प्रल्हादाला उपदेश.

श्रीवसिष्ठः—राघवा! याप्रमाणें विचार करून तो सर्वात्मा श्रीहरि, मंदरपर्वतानें जणुं आपल्या शिखरासह निघावें त्याप्रमाणें, आपल्या परिवारासह क्षीरसमुद्रांतील नगरांतून, निघाला व क्षीरसमुद्राखालील रंध्रातून पाणी शिरूं नये, यासाठीं पाण्याचें स्तंभन करून त्या रंध्रानें खालीं जाऊन इंद्राच्या राजधानीप्रमाणें रम्य अशा प्रल्हादाच्या नगरींत जाऊन पोहोंचला. त्या ठिकाणीं मेरूच्या गुहेंत समाधिस्थ असलेल्या ब्रह्मदेवाप्रमाणें आपल्या सुवर्णमंदिरामध्यें समाधि लावून बसलेला प्रल्हाद त्याच्या दृष्टीस पडला. भगवान् श्रीहरि दैत्यनगरांत जाऊन पोहोंचतांच सूर्यप्रकाशाला भिऊन घुबडें पळून जातात त्याप्रमाणें, त्याच्या तेजानें दिपून गेलेल्या दैत्यांनीं पलायन केलें. तेव्हां तारकावेष्टित चंद्रानें आकाशांत प्रवेश करावा, त्याप्रमाणें श्रीहरीनें दोन तीन प्रमुख असुरांना बरोबर घेऊन आपल्या परिवारासह प्रल्हादाच्या मंदिरांत प्रवेश केला. त्यावेळीं भगवान् श्रीहरि गरुडावर बसलेले होते, त्यांच्यावर लक्ष्मी चवरी वारीत होती, त्यांच्या हातांत शंखचक्रादि आयुधें होतीं आणि सर्व देव, ऋषी आणि मुनी त्यांना वंदन करीत होते.

भगवान् श्रीहरि प्रल्हादाजवळ गेले व 'हे महात्मन्! ऊठ, जागा हो' असें म्हणून त्यांनीं आपला पांचजन्य नांवाचा शंख वाजविला. त्याबरोबर दशदिशा दणाणून गेल्या; त्या शंखनादाच्या प्रचंड ध्वनीमुळें प्रलयकालच समीप आला आहे अशा भ्रांतीनें सर्व असुरमंडळी भीतिग्रस्त आणि मूर्च्छित होऊन जमिनीवर पडली व मेघांच्या गडगडाटामुळें राजहंसाची गाळण उडते, त्याप्रमाणें त्या दैत्यांची स्थिति झाली. विष्णुभक्तांना मात्र मोठा आनंद झाला व मेघनादामुळें कुड्याचीं झाडें प्रफुल्लित होतात, त्याप्रमाणें ते हर्षित झाले. इतक्यांत मेघदर्शनाबरोबर अरण्यांतील कदंबवृक्ष प्रफुल्लित होतो, त्याप्रमाणें प्रल्हादहि हळुहळु समाधि उतरून देहभानावर येऊं लागला. ब्रह्मरंध्रापासून उत्थान पावलेली प्राणशक्ति, गंगा समुद्रांत जाऊन पसरते त्याप्रमाणें, क्षणांत त्याच्या सर्व शरीरांत पसरली व सूर्याचा उदय होतांच त्याच्या प्रभेनें अखिल भुवनाचें आक्रमण करावें, त्याप्रमाणें त्याच्या प्राणश्रीनें त्याच्या सर्व अवयवाचें आक्रमण केलें. त्याची चित् लिंगदेहरूपी दर्पणामध्यें प्रतिबिंबित झाली आणि तिचा इंद्रियांमध्यें प्रवेश होऊन ती चैत्योन्मुख झाली. राघवा! अशा रीतीनें विषयोन्मुख झालेली त्याची चित्, आरशामुळें मुखश्री दोन रूपें धारण करते त्याप्रमाणें, विषय आणि मन या दोन रूपांनीं भासमान होऊं लागली. प्रातःकाळीं नीलकमलें हळुहळू विकास पावतात, त्याप्रमाणें चित्ताचा अंकुर उत्पन्न झाल्यामुळें त्याचे नेत्रहि विकासोन्मुख झाले, प्राणापान वायूंची गति सुरू झाली व त्यानीं शरीरांतील सर्व नाड्या जागृत करून त्यामध्यें ज्ञानशक्ति उत्पन्न करतांच मंद वायूनें कमल हालवावें, त्याप्रमाणें त्याच्या देहांत किंचित् हालचाल सुरू झाली. प्राणशक्तीनें शरीर भरून गेल्यानंतर निमेषमात्रांत पाण्यातील तरंगाप्रमाणें त्याच्या मनाची खळबळ सुरू झाली. नंतर अर्धवट उगवलेल्या सूर्याच्या प्रभावामुळें एखादें सरोवर प्रफुल्लित कमलांच्या योगानें शोभूं लागतें, त्याप्रमाणें त्याच्या शरीरांतील नेत्र, मन, प्राण पूर्णपणानें विकास पावून प्रल्हाद शोभूं लागला. इतक्यांत 'प्रल्हाद! सावध हो,

ऊठ ' असें भगवान् पुन्हां म्हणाले. त्याबरोबर मेघाच्या नादानें मयूर जागृत व्हावा, त्याप्रमाणें प्रल्हाद चांगला जागा झाला, त्याचे नेत्र प्रसन्न झाले, ' मी प्रल्हाद आहें ' असें त्याला स्मरण झालें आणि आपल्या पूर्वावस्थेची त्याला बरोबर आठवण झाली, असें पहातांच पूर्वी ब्रह्मदेवाला उपदेश केला होता, त्याप्रमाणें भगवंतांनीं त्याला उपदेश करण्याला प्रारंभ केला. भगवान् म्हणाले:—" बा साधो ! तूं आपली राज्यलक्ष्मी आणि आकृति यांचें स्मरण कर. आपल्या देहाचा तूं अकालीं नाश काय म्हणून करतोस ? हेयोपादेयरहित आणि संकल्पशून्य असा जो तूं, त्या तुझी शरीरांतील इष्टानिष्टभावाभावामुळें कोणती लाभहानि होणार आहे ? यासाठीं लौकर ऊठ. तुला या देहानें कल्पपर्यंत रहावयाचें आहे. आम्हीं तुझी आयुर्मर्यादा जाणतों व त्यांत बदल होणार नाहीं, हेंहि आम्हांला माहीत आहे. तूं जीवन्मुक्त आहेस, तथापि उद्वेगरहित राहून तुला कल्पान्तापर्यंत हें राज्य आणि त्यांतील व्यवहार केले पाहिजेत; व कल्पान्ताच्या वेळीं तुझी ही तनु क्षीण झाली म्हणजे घट फुटतांच आंतील घटाकाश व्यापक महदाकाशांत लीन होतें, त्याप्रमाणें हे निष्पापा ! तूं आत्म्याच्या निरतिशय महिम्यामध्यें राहूं लागशील. ही तुझी तनु ज्ञानसंपन्न आणि अत्यंत शुद्ध असून कल्पपर्यंत राहून जीवन्मुक्तांचे विलास भोगणारी आहे. तरी कल्पान्तीं नाश होणाऱ्या या तनूचा तूं आजच नाश करूं पहातोस, तर काय सध्यांच कल्पान्तसमय आला आहे कीं काय ? पण बाबा अद्याप कल्पान्तकाळ फार दूर आहे. अजून द्वादशादित्य उगवले नाहींत, पर्वतांचें चूर्ण झालें नाहीं आणि जगताचीहि राखरांगोळी झाली नाहीं. अशा स्थितींत तूं आपल्या तनूचा त्याग करण्याला वेड्यासारखा काय म्हणून प्रवृत्त होतोस ? त्रैलोक्याच्या भस्मानें मलिन झालेला आणि देवांच्या चंचल शिरःकपालांनीं चिन्हित झालेला कल्पांतकाळचा उन्मत्त वायु अद्याप वाहूं लागला नाहीं, असें असतां आपल्या देहाचा त्याग करण्याला तूं वेड्यासारखा कां उद्युक्त झाला आहेस ? अजून पुष्करावर्तसंज्ञक प्रलयकालीन मेघांतून निघालेला विद्युत्प्रकाश जगत्कोशामध्यें अशोक वृक्षावरील मोहोराप्रमाणें चमकूं लागला नाहीं; मग तूं व्यर्थ शरीराचा त्याग कां करतोस ? पृथ्वी दग्ध होऊन आणि तिचा कंप होऊं लागून अद्याप पर्वत कडाडा कोसळूं लागले नाहींत आणि दिगंबरांतील ब्रह्माण्डभित्ती अग्नीच्या योगानें तांबड्यालाल होऊन विदीर्ण होऊं लागल्या नाहींत. हें जग प्रलयकाळच्या प्रचंड मेघांच्या तावडींत सांपडून नष्ट झालें आहे व ब्रह्मा, विष्णु, रुद्र हे तिघे देवच तेवढे अवशिष्ट राहिले आहेत अशी स्थिति आलेली नाहीं, मग तूं आपल्या देहाचा त्याग कां करतोस ? ब्रह्माण्डाच्या सर्व भिंती कोसळून पडल्यामुळें आणि सूर्योदय होण्याचें बंद पडल्यामुळें लोकालोक पर्वताच्या शिखरांवरूनच दिशांमधील अंतर मोजण्याची वेळ अद्याप आलेली नाहीं, मग तूं आपल्या शरीराचा त्याग कशाला करतोस ? विदीर्ण होणाऱ्या मेरुपर्वताप्रमाणें भयंकर शब्द करीत द्वादशादित्यांचे प्रचंड किरण अजून आकाशांत संचार करूं लागले नाहींत, व कल्पांतकाळचे मेघ भीषण गर्जना करूं लागले नाहींत, अशा स्थितींत वेडेपणानें तूं आपल्या शरीराचा त्याग काय म्हणून करतोस ? बा प्रल्हादा ! चतुर्विध योनींतील प्राण्यांनीं भरलेल्या दशदिशांमध्यें मी गरुडवाहन विष्णु विहार करीत असतां तूं आपल्या देहाचा त्याग करणें उचित नाहीं. हे आम्ही, हे पर्वत, हीं भुतें, हा तूं, हें जग,

हें आकाश वगैरे सर्व जसेंच्या तसें आहे, अशा स्थितींत तुझ्या ठिकाणींच तेवढी मरणाची इच्छा शोभत नाहीं.

प्रल्हादा! आतां मरण हें कोणाला योग्य आहे असें विचारशील तर सांगतों. ज्याच्या ठिकाणीं अज्ञान वृद्धिंगत झाल्यामुळें मन व्याकुल झालें असून त्या मनाला दुःखें तोडून टाकीत असतील, अशा मनुष्यानें मरण्याची इच्छा धरावी हें योग्य होय. 'मी कृश आहें' 'मी अत्यंत दुःखी आहें' 'मी मूढ आहें' इत्यादि अनेक प्रकारच्या भावना ज्याच्या बुद्धीला व्याकुल करून सोडीत असतील, त्यालाच मरण इच्छिणें शोभतें. जो मनुष्य शेंकडों आशापाशांनीं बद्ध झालेला असून चंचलवृत्तीकडून पाहिजे तिकडे ओढून नेला जातो, अशा मनुष्यानें मरण मागणें उचित आहे. ज्याप्रमाणें मूढ पशू साळी आदिकरून धान्यांचे अंकुर फस्त करून टाकतात, त्याप्रमाणें ज्याच्या हृदयांतील तृष्णा विवेकरूपी अंकुर खाऊन हृदय विदीर्ण करून सोडीत असतील, अशा मनुष्यानें मरण बोलाविलें तर शोभतें. ताडाच्या वृक्षाप्रमाणें मजबूत असलेल्या ज्याच्या मनोरूपी वनांतील चित्तवृत्तिरूपी लता सुखदुःखरूपी फलें देत असतील, अशा मनुष्यानें मरतों म्हणावें हें योग्य आहे. रोमावलिरूपी लताजालानें युक्त असलेला ज्याचा देहरूपी विषवृक्ष कामादि अनर्थरूपी प्रचंड वायूकडून हालविला जातो, अशाला मरणच योग्य आहे. आधिव्याधिरूपी दावाग्नीनें ज्याचें चंचल अवयवरूपी लतांनीं युक्त असलेलें देहरूपी अरण्य दग्ध करून टाकलें आहे, त्याला मरण उचित आहे. ज्याच्या शरीररूपी वृक्षाच्या शुष्क ढोलींत कामक्रोधरूपी अजगर वास करीत आहेत, त्याला मरणाशिवाय दुसरी गति नाहीं. मरणाच्या स्वरूपाचा विचार केला तरीहि तत्त्ववेत्त्याला मरण असणें संभवत नाहीं. कारण, देहत्यागालाच 'मरण' असें लोक म्हणत असतात. परंतु आत्मा तत्त्वतः सद्रूप आणि अक्रिय असल्यामुळें त्याच्याकडून देहाचा त्याग होण्याची शक्यता नाहीं व देह हा स्वतः जड असल्यामुळें त्यानें आपला आपण त्याग करणें ही गोष्ट सर्वथा असंभवनीय आहे. अतएव सत् व असत् या दोन्ही गोष्टींनीं विचार केला तरी तत्त्ववेत्त्याला देहत्याग करणें शक्य नाहीं, असेंच सिद्ध होतें, व तत्त्वज्ञाला स्वात्मज्ञान झालेलें असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं देहादिकाचें मिथ्यात्व बाणलेलें असतें.

आतां कोणाचें जीवित शोभादायक होतें तें सांगतों. ज्याची बुद्धि स्वात्मतत्त्वदर्शनापासून परावृत्त होत नाहीं, अशा यथार्थदर्शी ज्ञान्याचें जीवित शोभायमान होतें. ज्याच्या ठिकाणीं अहंभाव नाहीं आणि ज्याची बुद्धि प्रिय आणि अप्रिय भावनांच्या योगानें लिप्त होत नाहीं[1], तसेंच जो सर्व विषयांच्या ठिकाणीं समदृष्टि असतो, त्याचें जीवित निरंतर शोभादायक होतें. जो आपल्या अंतःशीतल आणि रागद्वेषरहित बुद्धीमुळें हें सर्व जग साक्षिरूपानें पहातो, त्याचें जीवित नेहेमीं शोभत असतें. जगांतील सर्व विषय तत्त्वतः असार आहेत असें जाणून ज्यानें आपल्या चित्तांतून त्याज्य आणि ग्राह्य ह्या भावना काढून तें अंतर्मुख करून सर्वसाक्षिभूत आत्म्याच्या अनुसंधानाकडे लावलें, त्याचें जीवित निःसंशय शोभूं लागतें. वस्तुतः मिथ्या असून सत्य भासणाऱ्या बाह्यविषयांच्या कलनामलानें लिप्त न होतां ज्यानें आपलें चित्त ब्रह्मचिंतनांत लीन केलें आहे, त्याचें जीवित शोभायमान होतें. ब्रह्मदृष्टीचा

१. 'यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते।' ही ओळ अक्षरशः गीता. अ. १८ श्लो. १७ मध्यें आली आहे.

आश्रय करून जो वासनारहित बुद्धीनें आपले जगांतील व्यवहार करतो, त्याचें जीवित अपूर्व शोभा देतें. जो आपल्या व्यवहारांतील सर्व क्रिया करीत असतां इष्ट विषयांच्या प्राप्तीनें हर्षित होत नाहीं, आणि अनिष्ट विषयांच्या प्राप्तीनें कष्टी होत नाहीं, त्याचें जीवित विलक्षण शोभा देतें. ज्याप्रमाणें एखाद्या निर्मल सरोवरांत ज्यांचे पंख अतिशय स्वच्छ आणि शुभ्र आहेत अशा हंसादि पक्षाप्रमाणें ज्या तत्त्वज्ञाच्या हृदयांत शांति, दया वगैरे शुद्ध गुणांचा ओघ वहात असतो, त्याचें जीवित खरोखरच स्पृहणीय होय. ज्याचें नांव ऐकतांच, तसेंच ज्याचें दर्शन किंवा स्मरण होतांच सर्व भूतांना आनंद होतो, त्याचें जीवित धन्य नाहीं असें कोण म्हणेल? सारांश, बा दानवेंद्रा! ज्याचा उदय होतांच जनांचीं हृत्कमलें विकास पावून त्यांवर जीवरूपी भ्रमर घिरट्या घालूं लागतात, अशा पूर्णचंद्राप्रमाणें आल्हादजनक तत्त्ववेत्त्याचेंच जीवित शोभायमान होतें, इतरांचें होत नाहीं.

## सर्ग ४०

—:•:—

१. ज्ञानी पुरुषानें सदेह असूनहि विदेहाप्रमाणें व कूटस्थ असूनहि क्रियापर असल्याप्रमाणें कसा व्यवहार करावा याचे वर्णन.

**श्रीभगवान्**:—प्रल्हादा! लोकदृष्ट देहाच्या स्थैर्याला जगणें असें म्हणतात आणि देहांतराकरितां एका देहाचा त्याग करणें याला मरण असें नांव दिलें जातें. परंतु बा महामते! देहस्थैर्य आणि प्राणोत्क्रमण या दोन्ही अवस्थांपासून तूं मुक्त असल्यामुळें तुझ्या ठिकाणीं जगणें कसलें आणि मरण तरी कसलें? आतां तूं जगणें हेंच उचित आहे, देहत्याग करणें तुला योग्य नाहीं, तसेंच अमक्याचें मरण शोभतें आणि अमक्याचें जीवित शोभतें, असें जें मीं तुला पूर्वीं सांगितलें, तें ज्ञानी मनुष्याच्या ठिकाणीं कोणते गुण असतात व अज्ञानी मनुष्याच्या ठिकाणीं कोणते दोष असतात, यांचें वर्णन करण्याच्या दृष्टीनें सांगितलें. परंतु बा सर्वज्ञा! तुझ्या ठिकाणीं जगणें आणि मरणें या दोन्ही कल्पना संभवत नाहींत. ज्याप्रमाणें वायु हा आकाशांत असला तरी त्याला चिकटलेला नसल्यामुळें तो आकाश आहे असें म्हणतां येत नाहीं, त्याप्रमाणें देहामध्यें असूनहि 'मी देह आहें' ही भावना तुझ्या ठिकाणीं नसल्यामुळें तूं वस्तुतः विदेहीच आहेस. आतां 'मी देहस्थ आहें याला प्रमाण काय?' असें कदाचित् तूं विचारशील, तर त्याचें उत्तर असें कीं, तुला शीतोष्णादि स्पर्शज्ञान होत असल्यामुळें तें ज्ञान करून देणारा आत्मा तुझ्या देहामध्यें असलाच पाहिजे. यावरहि कदाचित् तूं असा प्रश्न करशील कीं, 'आत्मा हा असंग असल्यामुळें तो स्पर्शसंवेदनेचें कारण कसा होतो?' तर याचें उत्तर इतकेंच कीं, वृक्षादिकांच्या वाढीला आकाश हें प्रतिबंधक नसल्यामुळें तें त्यांच्या वाढीला कारणीभूत होतें, हा सिद्धान्त ज्या दृष्टीनें आणि जितका सत्य आहे, त्याच दृष्टीनें आणि तितकेंच आत्मा हा स्पर्शसंवेदनेचें निमित्त होतो, हें म्हणणें खरें आहे. प्रल्हादा! तत्त्वज्ञान झाल्यामुळें तूं आतां प्रबुद्ध झाला आहेस; व आत्मबोधामुळें सर्व द्वैताचा एकदां निरास झाला म्हणजे मग देह कोठचा आणि अदेह तरी कोठचा? मनुष्य जागृत झाला म्हणजे त्याचा स्वप्नदेह नष्ट होतो, त्याचप्रमाणें ज्ञात्याची स्थिति असते. केवळ अज्ञजनांना मात्र स्वप्नदेहाप्रमाणें मिथ्या असलेला हा देह सत्य वाटतो. परंतु तूं देहामध्यें स्थित असलास तरी अज्ञमनुष्यांप्रमाणें देहमात्र नाहींस;

तर तूं चित्प्रकाश असून तुझी बुद्धि परमात्मैकपरायण झाली आहे. अर्थात्, जें जें आहे तें तें सर्व तूंच आहेस. अशी वस्तुस्थिति असल्यामुळें देहाबद्दल ग्राह्यबुद्धि व अदेहाबद्दल त्याज्यबुद्धि तुझ्या ठिकाणीं असणार कोठून? बरें, ज्याच्यापासून हर्ष होतो तो देह, व ज्याच्यापासून विषाद उत्पन्न होतो तो अदेह, अशा तऱ्हेचा देह आणि अदेह यांच्यामध्यें कांहीं भेद करूं लागावें, तर तेंहि जुळत नाहीं. कारण, वसंताचा उदय होवो किंवा प्रलयकालचा भयंकर वायु वाहूं लागो, प्रिय आणि अप्रिय ही भावना ज्याच्या ठिकाणीं राहिलेली नाहीं, अशा तत्त्ववेत्त्याला त्यांची किंमत ती काय वाटणार? पृथ्वीवरील पर्वत कोसळून पडोत, कल्पांतीमुळें सर्व जगाचा संहार होवो किंवा प्रलयकाळचे वारे भयंकर उत्पात करोत, तत्त्वज्ञ आपल्या आत्मस्वरूपामध्यें खुशाल स्थित असतो. सर्व भूतें राहोत कीं जावोत, सर्वांचा क्षय होवो कीं सर्व वृद्धि पावोत, तत्वज्ञानी आपल्या आत्मस्वरूपामध्यें अचल असतो. या देहामध्यें स्थित असणारा परमेश्वर अनात्मवस्तूंच्या क्षयानें क्षीण होत नाहीं, त्यांच्या वृद्धीनें वृद्धिंगत होत नाहीं व देहाच्या हालचालीमुळें याच्यांत हालचालहि होत नाहीं. ' मी देहाचा संबंधीं आहें, ' ' मी देहाचा मालक आहें ' अशा तऱ्हेचा चित्तांत असलेला भ्रम नष्ट झाला म्हणजे ' मी याचा त्याग करतों ' किंवा ' मीं याचें ग्रहण करतों ' ही मूर्खपणाची कल्पना कालत्रयीं उत्पन्न होणें शक्य नाहीं. बाबारे! ' हें करून हें करीन ', ' हें टाकून हें घेईन' इत्यादि मिथ्या संकल्प तत्त्ववेत्त्यांच्या ठिकाणीं नष्ट झालेले असतात, ज्ञानी पुरुष जरी सर्व क्रिया करीत असतात, तरी ते तत्त्वतः कांहींच करीत नाहींत. कारण, ते नित्य अकर्तृपदाप्रत जाऊन पोहोंचलेले असतात. ज्ञान्यांच्या अकर्तृत्वामुळें त्यांचें अभोक्तृत्वहि अर्थातच सिद्ध होतें. कारण, धान्यच जर मुळीं पेरलें नाहीं तर पिकाचा संग्रह तरी कोण करणार? सारांश, अशा रीतीनें कर्तृत्व आणि भोक्तृत्व संपलें, म्हणजे फक्त शांति अवशिष्ट रहाते व ती शांति वृद्धिंगत झाली म्हणजे तिलाच ज्ञाते पुरुष ' मुक्ति ' हें नांव देतात. ज्ञानी हे चिद्रूप आणि अत्यंत निर्मल असून आपलें परमार्थस्वरूप व्यक्त करीत असल्यामुळें सर्वश्रेष्ठ बनलेले असतात. अर्थात् ते कोणत्या ऐहिक टाकलेल्या फळाचें ग्रहण करणार आणि कोणत्या ग्रहण केलेल्या फळाचा त्याग करणार? तसेंच ग्राह्यग्राहकसंबंधशून्य असा कूटस्थ आत्मा क्रियासाध्य अशा स्वर्गादि फलांपैकीं कशाचा त्याग आणि कशाचें ग्रहण करील? सारांश, ग्राह्य आणि ग्राहक यांचा संबंध एकदां क्षीण झाला म्हणजे पूर्णशांतीचा उदय होतो व ती शांति दृढ झाली म्हणजे तिलाच मोक्ष हें नांव दिलें जातें. अशा शांत स्थितीमध्यें रहाणारे तुझ्यासारखे जीवन्मुक्त महात्मे झोपेंत होणाऱ्या अवयवांच्या हालचालीप्रमाणें आपले सर्व व्यवहार करीत असतात. यास्तव बा प्रल्हादा! तूंहि सर्व प्रारब्धाचा क्षय होईपर्यंत वासनारहित बुद्धीनें झोपेंतून अर्धवट जागा झालेल्या मनुष्याप्रमाणें व्यवहार कर आणि राज्य करून प्रजापालन कर. आत्मसुखामध्यें निमग्न झालेले पुरुष अनात्मविषय बाह्यतः कितीहि रमणीय दिसले, तरी कधीं त्यांत रममाण होत नाहींत; व ज्यांना आत्म्याचें नित्यसुख लाधलें, आणि जे त्यामध्येंच गढून गेले, त्यांना व्यावहारिक दुःखें केव्हांहि उद्विग्न करूं शकत नाहींत. ज्याप्रमाणें एखाद्या सुंदर स्त्रीचें आपल्या ठिकाणीं प्रतिबिंबित झालेलें मुख ग्रहण करावें व कुरूप पुरुषाचें ग्रहण करूं नये, असा भेद आरशाचे ठिकाणीं नसतो, त्याप्रमाणें तत्त्वज्ञांच्या चित्तांत प्राप्तव्यवहारां-

विषयीं वैषम्यभाव नसतो; तर ते आपल्या सर्व क्रिया अनासक्तबुद्धीनें करीत असतात. परंतु यावरून आत्म्याच्या ठिकाणीं सुद्धां त्यांची अनास्थाच असते असें म्हणशील, तर तसें मात्र नाहीं. ते संसारस्थितीसंबंधानें निजलेले असतात, पण आत्मस्वरूपासंबंधानें नेहेमीं जागरूक असतात; व ते आपले सर्व व्यवहार सुषुप्तींत असल्याप्रमाणें राहून लहान-मुलांप्रमाणें करतात. यास्तव हे महात्मन्! तूं आंतून विष्णूच्या परमपदाच्या स्थितींत रहा व बाह्यतः ब्रह्मदेवाचा एक दिवस समाप्त होई-पर्यंत गुणगणांनीं युक्त असलेल्या राज्यलक्ष्मीचा उपभोग घेत राहून अखेरीस अच्युत पदामध्यें स्थिर हो.

---

# सर्ग ४१

—:०:—

१. प्रल्हादानें केलेल्या पूजेचा स्वीकार केल्या-नंतर श्रीविष्णूनीं त्याला राज्याभिषेक करून आणि वर देऊन संतुष्ट केलें.

**श्रीवासिष्ठः**—राघवा! जो प्रलयकाळीं आपल्या हृदयसंपुटामध्यें जगद्रूपी रत्नें सांठवून ठेवतो आणि सृष्टिकाळीं त्या रत्नांचें अद्भुत प्रदर्शन करतो, अशा पद्मनाभ हरीनें चंद्रिकेप्रमाणें शीतल असें भाषण केल्यानंतर प्रल्हाद नांवाचा देह आनंदित होऊन त्याचीं नेत्रकमलें विक-सित झालीं; व मोठ्या हर्षानें तो आपल्या मनांतील अभिप्राय बोलून दाखवूं लागला.

**प्रल्हादः**—भगवन्! मी आजपर्यंत शेंकडों राजकार्यें करण्यांत, तसेंच असुरांचें हित व देवांचें अहित कशानें होईल, यासंबंधाच्या चिंतनांत गढून गेल्यामुळें अतिशय थकून गेलों व त्या श्रमांचा परिहार करण्यासाठीं क्षणभर विश्रांति घेत बसलों होतों. देवा! आपल्या प्रसादानें मला आतां उत्तम स्थिति प्राप्त झाली आहे व तत्त्वबोध झाल्यामुळें मी आतां निर-तिशयानंदाचा अनुभव घेत आहें. समाधिस्थि-तींत असतांना किंवा समाधीच्या व्युत्थानदशेंत असलों तरी माझ्या स्वरूपस्थितीचा यत्किंचि-तहि भंग होत नाहीं. महादेवा! मी तुला फार दिवसांपासून वृत्ति अंतर्मुख करून हृदयामध्यें पहात होतों. परंतु माझें पूर्वपुण्य उदय पाव-ल्यामुळें आज माझ्या चर्मचक्षूंनाहि तुझें दर्शन घडलें आहे. महेश्वरा! एक आकाश हें निर्मल अनंत आकाशाच्या ठायीं रहावें, त्याप्रमाणें सर्वसंकल्परहित अशा या अखंड साक्षात्कार-स्थितीमध्यें अंतर्मुखत्वानें मी राहिलों, अर्थात् समाधीचा आश्रय केला, तो शोक, मोह, वैराग्यचिंता, देहत्यागाची इच्छा अथवा संसा-राची भीति यांच्या निमित्तानें नव्हे. आतां या ठिकाणीं कदाचित् आपण म्हणाल कीं, पि-त्याच्या राज्यादिकांचा नाश हें जें तुझ्या शोकाचें कारण, तें लपविण्यांत काय अर्थ आहे?' परंतु यावर माझें उत्तर असें कीं, त्या वेळीं मी अप्रबुद्ध होतों, व मला परमतत्त्वाचा साक्षा-त्कार झालेला नव्हता. परंतु आतां मला आत्मसा-क्षात्कार झालेला असल्यामुळें आणि सर्व एकच दिसत असल्यामुळें शोक कसला, नाश कसला देह कसला आणि संसार तरी कसला? स्वभाव-तःच उत्पन्न झालेल्या विश्रांतीच्या निर्मल इच्छेमु-ळेंच मी आत्मचिंतन करूं लागलों व त्या विचा-राच्या योगानें मी परम पवित्र आणि अपरि-च्छिन्न अशा परमात्मपदाच्या ठायीं स्थित झालों. 'ईश्वरा! हाय हाय! मी विरक्त झालों,' मी आतां संसाराचा त्याग करतों' इत्यादि विचार हर्षशोकादि विकार उत्पन्न करणारे असून त्यामुळें अप्रबुद्ध लोक व्याकुल होतात. परंतु

---

१ या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी। यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः॥ (गीता. अ. २।६९)

माझी विरक्ति असल्या अविचारामुळें उत्पन्न झालेली नाहीं. तसेंच देहामुळें दुःखें आहेत व देहाचा अभाव झाला म्हणजे दुःखांचाहि अभाव होईल, ही दुष्ट चिंतारूपी नागीण मूर्खांना दंश करीत असते. परंतु ती माझ्या मनाला स्पर्शसुद्धां करीत नाहीं. 'हें सुख,' 'हें दुःख,' 'हें माझें नाहीं,' 'हें माझें आहे' इत्यादि आशयाचे विचार मूढ मनुष्याला ग्रस्त करून सोडतात, परंतु ते आत्मवेत्त्याच्या चित्ताला चंचल करूं शकत नाहींत. अर्थात्, दुःखाची निवृत्ति व्हावी व सुखाची प्राप्ति व्हावी, म्हणून मीं समाधि लावली असेंहि नाहीं. 'मी निराळा' व 'हा निराळा' ही अज्ञजनांची वासना असून ती अज्ञानी मनुष्यांच्या मनावर आपला पगडा बसविते, परंतु तत्त्वज्ञाच्या मनावर तिचा लेशमात्रही परिणाम होत नाहीं. तसेंच 'हें त्याज्य' आणि 'हें ग्राह्य' हा मिथ्या मनोभ्रम मूर्खांप्रमाणें तत्त्ववेत्याला उन्मत्त करीत नाहीं. कमलनयना! ज्या अर्थी तूं सर्वांच्या अंतर्यामीं वास करीत आहेस; त्या अर्थी अमुक हेय ( त्याज्य ) आणि अमुक उपादेय ( ग्राह्य ) ही कल्पना संभवेल तरी कशी? हें अखिल जग सत्—ब्रह्म आणि असत्—माया यांच्या अन्योन्य तादात्म्यामुळें आभासरूपानें दिसत असतां त्यांत ग्राह्याग्राह्य किंवा त्याज्यात्याज्य असें वस्तुतः काय आहे? सारांश, द्रष्टा आणि दृश्य यांचें वास्तविक स्वरूप काय आहे, यासंबंधाचा विचार करीत असतां मी स्वभावतःच क्षणभर समाधिस्थ झालों. भावाभावशून्य आणि ग्राह्याग्राह्यविवर्जित होऊन मी इतका वेळ समाधिस्थितीमध्यें होतों व आतां तुझ्या कृपेनें व्युत्थानदशा पावलों आहें. समाधिकाळीं सर्व आत्मरूप आहे या अनुभवामध्यें मी होतों व आतां योग्य वेळीं मी आपल्या पूर्वस्थितीवर आलों आहें. तरी आतां हे महादेवा! तूं आज्ञा करशील त्याप्रमाणें वागण्याला मी सिद्ध आहें. पण पुंडरीकाक्षा! माझें आतां एवढेंच म्हणणें आहे कीं, ज्या अर्थी तूं आज्ञा करशील तसें वागण्याला मी तयार आहें, त्या अर्थी आणि शास्त्र आणि लोकव्यवहार यांना अनुसरून मीही तुझी आतां पूजा करीत आहें, ती कृपा करून ग्रहण कर. कारण, तूं जगत्त्रयाला पूज्य आहेस.

अशा रीतीनें भाषण केल्यानंतर उदयाचलानें पूर्णचंद्राला धारण करावें त्याप्रमाणें, त्या दानवेश्वरानें आपल्या हातांत अर्घ्यपात्र घेतलें; व क्षीरसमुद्रामध्यें वास करणाऱ्या, आणि शंखचक्रादि आयुधें धारण करणाऱ्या, अप्सरागणांनीं व देवांनीं वेष्टिलेल्या, गरुडावर विराजमान झालेल्या व आपल्या विशाल उदरामध्यें त्रैलोक्यें धारण करणाऱ्या श्रीविष्णूची यथाविधी पूजा केली, ज्याच्या रोमरंध्रामध्यें आणि हृदयामध्यें अनंत भुवनें भ्रमण करीत आहेत, अशा त्या भुवनेश्वराची याप्रमाणें पूजा केल्यानंतर प्रल्हाद भगवंतापुढें हात जोडून उभा राहिला, त्या वेळीं कमलापति श्रीविष्णूंनीं भाषण करण्याला सुरवात केली.

श्रीभगवानः—दानवेश्वरा! ऊठ आणि सिंहासनावर बस म्हणजे मी स्वतः तुला राज्याभिषेक करीन. तसेंच माझ्या पांचजन्याचा शब्द ऐकून या ठिकाणीं जमलेले सिद्ध, साध्य आणि देवगण तुझें मंगल करतील.

असें म्हणून त्या पुंडरीकाक्षानें प्रल्हादाला सिंहासनावर बसविलें. त्यावेळीं मेरुपर्वताच्या शिखरावर मेघ शोभावा, त्याप्रमाणें तो सिंहासनावर शोभूं लागला. नंतर श्रीविष्णूंनीं आज्ञा केल्यावरून त्या ठिकाणीं क्षीरसागरादि सर्व सागर, गंगा आदिकरून सर्व नद्या आणि सर्व तीर्थें आलीं व त्यांतील उदक घेऊन संपूर्ण

ब्राह्मण, ऋषी, देव, सिद्ध, विद्याधर व लोकपाल यांसहवर्तमान श्रीविष्णूंनीं त्याला पुन्हां अभिषेक केला; व इंद्राच्या अभिषेकाच्या वेळीं ज्याप्रमाणें मरुद्गणांनीं स्वर्गामध्यें गायन केलें होतें, त्याप्रमाणें यावेळींहि त्यांनीं गायन केलें. त्यानंतर सर्व सुरासुरांकडून ज्याचें स्तवन केलें जातें असा भगवान् मधुसूदन, देवासुरांकडून ज्याचीं स्तुतिस्तोत्रें गाइलीं जात आहेत अशा प्रल्हादाला म्हणला.

श्रीभगवान्ः—बा निष्पाप प्रल्हादा! जोंपर्यंत ही पृथ्वी आणि हा मेरुपर्वत हीं कायम आहेत आणि जोंपर्यंत हीं चंद्रसूर्यांचीं मंडलें उदय पावत आहेत, तोंपर्यंत सर्व गुणांनीं संपन्न असलेला तूं या राज्याचा अखंड उपभोग घे. इष्टानिष्टफलांचा त्याग करून आणि विषयानुराग, भय व क्रोध यांनीं रहित होऊन सम्यग्दर्शनबुद्धीनें या राज्याचें पालन कर. आत्मसाक्षात्कारसंपन्नतेमुळें तुला निरतिशयानंदाची भूमिका प्राप्त झाली आहे. परंतु अशा स्थितींतहि या भोगसंपूर्ण राज्यामध्यें, स्वर्गामध्यें किंवा भूलोकामध्यें तूं आपल्या मनाला उद्वेग वाटूं देऊं नकोस; तर देशकालानुरूप निग्रह, अनुग्रह वगैरे ज्या ज्या क्रिया अवश्य केल्या पाहिजेत, त्या त्या यथायोग्य करीत जा. मात्र त्या करीत असतां रागादि वैषम्याला आपल्या चित्तांत अवकाश देत जाऊं नकोस. अशा रीतीनें देहाच्या अतीत असलेल्या आत्मभावामध्यें स्थित होऊन, अहंममत्वाला फांटा देऊन आणि लाभालाभांविषयीं समबुद्धि राखून तूं प्राप्त कार्यें केलींस, तरी त्यांमुळें तुझ्या आत्मस्थितीला केव्हांहि बाध येणार नाहीं. संसाराची वास्तविक स्थिति कशी आहे, तसेंच परमात्मस्थिति म्हणजे काय, याचें संपूर्ण ज्ञान तुला आतां झालेलें आहे. यास्तव तुला जास्त उपदेश कोणता करावयाचा राहिला आहे? रागद्वेषादि विकारांनीं रहित असलेला तुझ्यासारखा राजा राज्य करीत असल्यामुळें दानवांना दुःख होण्याचें कारण उरलें नाहीं व मजकडून त्यांचा नाश करविण्याचा देवांनाहि प्रसंग येणार नाहीं. तसेंच वर्षाऋतूमधील पाण्यानें बेसुमार फुगलेली नदी मोठमोठ्या वृक्षराजींना आपल्या प्रचंड प्रवाहाबरोबर वाहून नेते, त्याप्रमाणें दानवस्त्रियांच्या नेत्रांतून निघालेले अश्रूंचे पूर त्यांच्या कानांतील पुष्पमंजरींना वाहून नेत आहेत, अशा तऱ्हेचे प्रसंगहि यापुढें ओढवणार नाहींत. पूर्वीं क्षीरसमुद्राचें मंथन होत असतां मंदराचल थांबतांच तो शांत झाला, तद्वत् आजपासून देवदानवांचें युद्ध थांबल्यामुळें सर्व पृथ्वीवर शांतता पसरणार आहे. इतःपर देवासुरांनीं परस्परांच्या स्त्रियांना बंदींत टाकण्याचा क्रम बंद करून सर्व स्त्रियांना आपापल्या भर्त्यांच्या मंदिरांत सुखानें कालक्रमणा करूं द्यावी. दनुसुता! संसाररूपी कृष्णपक्षांतील रात्रीमध्यें वास करणाऱ्या निद्रारूपी निबिड अंधकाराचा तूं निरास केला असून तुझ्या ठिकाणीं ब्रह्मात्मज्ञानाची स्वयंप्रकाश आणि नित्य स्फूर्ति उदित झाली आहे. यास्तव शांत्यादि विलासांनीं युक्त असलेल्या राज्यलक्ष्मीचा कामादि षड्रिपूंचा आपल्यावर पगडा बसणार नाहीं, अशा रीतीनें वागून तूं चिरकाल उपभोग घेत रहा.

---

## सर्ग ४२

—:०:—

१. श्रीविष्णूचें क्षीरसागरीं गमन २. आख्यानाचें फल. ३. प्रल्हादाच्या समाधिव्युत्थानाचें कारण.

श्रीवसिष्ठः—रामा! याप्रमाणें बोलून देव, मानव आणि किन्नर यांनीं युक्त असल्यामुळें जो जणुं दुसरा विस्तृत संसारच आहे कीं काय

असा भास होत होता, असा पुंडरीकाक्ष प्रल्हादाच्या मंदिरांतून निघाला. त्यावेळीं प्रल्हादादिकांनीं भगवंतांच्या पाठीमागून जो पुष्पांजलीचा वर्षाव केला, त्यामुळें गरुडाच्या मागील बाजूच्या पिसांवर मोठा ढीग बनून त्यानें तो भाग अगदीं आच्छादून टाकला. नंतर भगवान् श्रीविष्णु हळुहळु क्षीरसागरांत गेला, त्यांनीं आपल्याबरोबर आलेल्या देवसेनेला निरोप दिला व भ्रमर शुभ्र कमलावर बसावा, त्याप्रमाणें ते आपल्या शेषासनावर आरूढ झाले, याप्रमाणें इकडे श्रीविष्णु शेषासनावर स्वस्थ बसले, इंद्र आपल्या स्वर्गांत देवासहवर्तमान निर्भय राहिला, प्रल्हाद पाताळांत शांतपणानें राज्य करूं लागला व सर्व त्रिभुवनांत स्वस्थता उत्पन्न झाली. राघवा ! याप्रमाणें चंद्रबिंबांतून प्रसृत होणाऱ्या अमृताप्रमाणें शीतलता उत्पन्न करणारी आणि संपूर्ण पातकाचा नाश करणारी ही प्रल्हादाच्या बोधप्राप्तीची कथा मीं तुला सांगितली आहे. ही कथा जे मनुष्य ऐकतील आणि तिचें विचारपूर्वक मनन करतील, ते केवढेहि पातकी असले तरी थोडक्याच काळांत परमपदाप्रत जाऊन पोंहोंचतील. या कथेचा सामान्यतः विचार केल्यानेंहि जर दुष्कृताचा व दुष्कृताला कारणीभूत होणारें जें अज्ञान त्याचा नाश होईल, तर योगयुक्त चित्तानें तिचा विचार केल्यास परमपदाला कोण जाणार नाहीं ? अज्ञानालाच पाप म्हणतात व तें विचारानें नष्ट होतें. यास्तव पापाचें मूळ छेदन करणारा जो विचार त्याला केव्हांहि सोडूं नये. प्रल्हादाच्या ह्या ज्ञानसंसिद्धीचा विचार करणाऱ्या मनुष्यांचें सात जन्मांचें पातक निःसंशय नष्ट होतें.

श्रीराम:—भगवन् ! महात्मा प्रल्हादाचें मन परमपदाच्या ठिकाणीं परिणत झालें होतें, तर मग पांचजन्याच्या नादानें तें जागृत कसें झालें ?

श्रीवसिष्ठ:—निष्पापा रामा ! या जगांत मुक्तीचे दोन प्रकार संभवतात. त्यापैकीं एका प्रकाराला सदेहमुक्ति व दुसऱ्याला विदेहमुक्ति असें म्हणतात. आतां या दोन मुक्तींमधील भेद ऐक. ज्याची बुद्धि कोणत्याहि विषयांमध्यें आसक्त होत नाहीं व ज्याच्या ठिकाणची इष्टानिष्ट कर्मासंबंधाची स्वीकार किंवा त्याग यांची इच्छा अजिबात नष्ट झालेली असते, अशा पुरुषाची ती स्थिति जीवन्मुक्ति अशी जाणावी. तीच जीवन्मुक्ति जेव्हां सर्व प्रारब्धाचा आणि त्याबरोबरच देहाचा क्षय होऊन पुनर्जन्मरहित स्थितीप्रत जाऊन पोंहोंचते, तेव्हां त्या स्थितीला विदेहमुक्ति म्हणतात व ती स्थिति प्राप्त झालेले प्रत्यक्ष दिसण्यासारखे नसतात. जीवन्मुक्ताच्या हृदयामध्यें जी वासना असते ती अत्यंत शुद्ध असते; अर्थात् ती आसक्ति, मालिन्य इत्यादि विकारांनीं दूषित झालेली नसते व त्यामुळें भर्जित बीजाप्रमाणें तिच्यापासून पुनर्जन्मरूपी अंकुर [illegible] उद्भवत नाहीं. जीवन्मुक्तांच्या ठिकाणच्या वासना पवित्र, अति उदार, शुद्धसत्वाबरोबर उदय पावणारी आणि आत्मध्यानमय असून ती त्यांच्या ठायीं सुषुप्त पुरुषाच्या वासनेप्रमाणें रहाते. रघुवरा ! हृदयांत असणाऱ्या त्या शुद्धवासनेमुळेंच प्रारब्धसंस्कार अवशिष्ट असल्यास समाधिस्थ जीवन्मुक्त हजारों वर्षांनंतरहि समाधीचें व्युत्थान होऊन देहावर येऊन जागृत होतात. बा महावीरा ! प्रल्हादसुद्धां याच अंतस्थ शुद्धसत्त्वमय वासनेमुळें भगवान् श्रीविष्णूंनीं शंखनाद करतांच जागा झाला. आतां 'समाधिकाळीं श्रोत्रेन्द्रिय लीन झालेलें असतां प्रल्हादाला शंखनाद तरी कसा ऐकूं गेला ?' असें विचारशील, तर याचें समाधान असें कीं, हरि हा सर्व भूतांचा आत्मा असून सत्यसंकल्पयुक्त असल्यामुळें त्याच्या मनांत जसजसा

प्रतिभास उत्पन्न होतो, तसतसें लगेच घडून येतें. सर्वांचें कारण तोच आत्मा आहे. यामुळें 'प्रल्हाद देहभानावर येवो,' असा त्या वासुदेवाचा संकल्प होतांच तत्काळ तसे घडून आलें. स्वतः कारणशून्य असून अखिल भूतांचें निमित्तकारण होणाऱ्या त्या आत्मदेवानें सृष्टि उत्पन्न करण्याकरितां वासुदेवमय शरीर धारण केलें आहे. अतएव आत्मदर्शनानें त्या माधवाचें दर्शन होतें, व त्या माधवाची आराधना केल्यानें आत्म्याचें दर्शन सुलभ होतें, राघवा! यास्तव तूं सुद्धां याच दृष्टीचा अवलंब करून नेहेमीं आत्मचिंतन करीत जा, म्हणजे तुला तें शाश्वत पद प्राप्त होईल. रामा! हा संसार-रूपी वर्षाऋतु दुःखरूपी पर्जन्याचाच नेहेमीं वर्षाव करीत असतो; व ज्यांनीं विचाररूपी सूर्याचें दर्शन करून घेतलें नाहीं, अशा मनुष्यांच्या ठिकाणीं तो जाड्य (मौर्ख्य किंवा थंडी) उत्पन्न करतो. ही अत्यंत भयंकर माया विष्णूच्या संकल्पामुळें निर्माण झालेली आहे. परंतु ज्याच्याजवळ मंत्रसिद्धि आहे त्याला पिशाचांची पीडा होत नाहीं, त्याप्रमाणें विष्णूच्या कृपनें ज्ञानी पुरुषांना ती मुळींच बाधा करीत नाहीं. राघवा! ज्याप्रमाणें अग्नीची ज्वाला वायूमुळें वृद्धिंगत होते आणि अखेरीस वायूमुळेंच क्षीण होते, त्याप्रमाणें संसारजाल निर्माण करणारी विष्णूची माया आत्म्याच्या इच्छेनें देहादिकांच्या रूपानें घन बनते व निर्व्याज भक्तीनें त्या आत्म्याची आराधना केली असतां ती कालेंकरून क्षीण होते, हें लक्षांत ठेवून ईश्वरप्रसादानें[1] प्राप्त होणाऱ्या विचाराच्या योगानें तूं ज्ञानलाभ करून घे.

---

[1] 'पराभिध्यानात्तिरोहितं ततो ह्यस्य बंधविपर्ययौ॥' (ब्र. सू. ३।२।५.) 'मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च।' (गीता. १५।१५.)



# सर्ग ४३

—:*:—

१. ज्ञान हें जरी ईश्वरप्रसादानेंच प्राप्त होतें; तरी त्याच्यावर भर देणें इष्ट नाहीं. २ पौरुषप्रयत्न आणि इंद्रियजय हेच ज्ञानसिद्धीचे उपाय.

**श्रीराम:**—भगवन्! आपण सर्व धर्म जाणणारे आहां. ज्याप्रमाणें चंद्राच्या किरणांनीं वनस्पती टवटवीत होतात, त्याप्रमाणें आपल्या निर्मल वचनांनीं मी आल्हादित झालों आहें. सुवासिक फुलें कानांना अलंकृत करण्यासाठीं म्हणून जरी धारण केलीं, तरी तीं आपल्या सुगंधानें मनुष्याला सुख देतात, त्याप्रमाणें आपलीं पवित्र आणि मृदु वचनें जरी सहज गत्या कानावरून गेलीं, तरी तीं मनुष्याच्या चित्ताला आनंद देतात. गुरुवर्य! पौरुषप्रयत्नानेंच सर्व साध्य होतें असें ज्या अर्थी आपण पूर्वी सांगितलें आहे, त्याअर्थी मी विचारतों कीं, माधवाच्या वरावांचून आत्मप्रयत्नानेंच प्रल्हाद जागृत कां झाला नाहीं?

**श्रीवसिष्ठ:**—बा राघवा! महात्म्या प्रल्हादानें जें जें प्राप्त करून घेतलें तें तें सर्व स्वतःच्या प्रयत्नानेंच प्राप्त करून घेतलें, दुसऱ्या कशानेंहि नव्हे. आत्मा आणि नारायण हे शब्द एकरूप आहेत. त्यांचा संबंध तीळ आणि त्यांतील तेल यांच्याप्रमाणें भिन्नतेचा नसून अभिन्नतेचा आहे. ज्याप्रमाणें वस्त्राला सोडून त्याचें शुभ्रत्व नसतें आणि पुष्पाला सोडून त्याचा सुगंध नसतो, त्याचप्रमाणें आत्म्याव्यतिरिक्त नारायण म्हणून कोणी निराळा नाहीं. कारण, जो विष्णु तोच आत्मा व जो आत्मा तोच विष्णु होय. विष्णु आणि आत्मा हे शब्द विटपी आणि पादप या वृक्षवाची शब्दांप्रमाणें पर्यायशब्द आहेत. प्रल्हादनामक आत्म्यानें आपल्या श्रेष्ठ शक्तीनें आपणाला

विष्णुभक्तीमध्यें नियुक्त केलें. किंबहुना आत्मभूत विष्णूनें स्वतः आपलें मन विचाराविषयीं प्रवृत्त करून आपलें आपल्यालाच जाणलें, असेंहि म्हटलें तरी चालेल. केव्हां केव्हां स्वतःच्या प्रयत्नानें केलेल्या विचारामुळें मनुष्याला आत्मबोध होतो, तर केव्हां केव्हां भक्तिरूपी प्रयत्नानें प्रसन्न झालेल्या विष्णूच्या देहद्वारा मनुष्याला आत्मज्ञानाची प्राप्ति होते. परंतु तें कसेंहि असलें तरी आत्मज्ञान होण्याला स्वतःच्या प्रयत्नाची आणि विचाराची आवश्यकता आहे, यांत शंका नाहीं. कारण, ईश्वराची पुष्कळ दिवस आराधना केली आणि तेणेंकरून तो अत्यंत संतुष्ट झाला, तरी सुद्धां तो अविचारी पुरुषाला ज्ञानदान करीत नाहीं. सारांश, स्वतःच्या प्रयत्नापासून उत्पन्न झालेला विचार हाच आत्मदर्शनाचा मुख्य उपाय आहे, वरप्राप्ति आदिकरून गोष्टी हे गौण उपाय होत. यास्तव राघवा! तूंहि गौण उपायांचा अवलंब न करतां मुख्य उपायाचाच अवलंब कर. तूं प्रथम आपलीं पांचहि इंद्रियें बाह्य विषयांपासून परावृत्त कर व स्वस्वरूपाचा दृढ अभ्यास करीत जाऊन आपली बुद्धि नेहमी विचारप्रवण राखीत जा. कोणाहि मनुष्याला या जगांत जें जें कांहीं प्राप्त होतें, तें तें त्याच्या शुभ आचारांचें फल असतें, दुसऱ्या कशाचेंहि नसतें. यास्तव पौरुष प्रयत्नाचा आश्रय करून इंद्रियरूप पर्वत ओलांडून आणि संसारसमुद्र तरून परमपदाप्रत जाऊन पोहोंच. मनुष्यानें स्वतः उद्योग केल्यावांचून जर त्याला ईश्वराचें दर्शन होऊं शकतें, तर पशु, पक्षी इत्यादिकांचा सुद्धां त्यानें उद्धार कां केला नसता? तसेंच शिष्यानें प्रयत्न केल्यावांचूनहि जर गुरु त्याचा अज्ञानांतून उद्धार करूं शकता, तर उंट, बैल वगैरे जनावरांना सुद्धां त्यानें आत्मज्ञानी केलें असतें व मुक्तीला नेलें असतें. तात्पर्य, हरि प्रसन्न झाला, गुरूची प्राप्ति झाली किंवा मनुष्याजवळ पुष्कळसें धन असलें, तरी त्यापासून खरा लाभ होणें शक्य नाहीं. जो लाभ व्हावयाचा तो स्वतःच्या प्रयत्नानेंच होतो. ज्ञानाच्या दृढीकरणानें मनाचा निरास झाला, म्हणजे परमपुरुषार्थाची प्राप्ति होते. अभ्यास आणि वैराग्य[1] यांच्या योगानें इंद्रियरूपी सर्पांना कह्यांत आणल्यानें जर परमपुरुषार्थाची प्राप्ति होत नसेल, तर ती त्रिभुवनांत कशानेंहि प्राप्त होणार नाहीं. यास्तव रामा! तूंहि आत्म्याची आराधना कर. आत्म्याची अर्चना कर. आणि आत्म्याचेंच दर्शन करून घे. राघवा! अध्यात्मशास्त्राचा अभ्यास, इंद्रियांचा जय करण्याविषयीं यत्न आणि विचार यांच्यापासून दूर पळणाऱ्या म्हणजे हे कष्ट करण्यास नको अशा मूर्खांना कांहीं तरी सन्मार्गे लावून देण्याकरितांच विष्णुभक्तीची योजना करण्यांत आलेली आहे. शास्त्राभ्यास आणि पौरुषप्रयत्न हेच आत्मज्ञानाचे मुख्य उपाय असून ते ज्यांना साधत नसतील, अशांकरितां पूजाअर्चनादिकांचा गौण क्रम लावून देण्यांत आला आहे. कारण, इंद्रियजय असेल तर पूजनाचें निराळें फल तें कोणतें मिळावयाचें राहिलें? बरें, इंद्रियांना जिंकण्याचें काम होत नसेल तर पूजनापासून तरी कोणतें फल प्राप्त होणार आहे? सारांश, विचार आणि उपशम यांच्या वांचून हरीची प्राप्ति होणें केव्हांहि शक्य नाहीं; व विचार आणि उपशम यांनीं युक्त असलेल्या ज्ञानी पुरुषाला ईश्वराच्या मूर्तिपूजनानें दुसरें कोणतें फल प्राप्त करून घ्यावयाचें असतें? यासाठीं रामा! तूं आपल्या चित्ताला विचार आणि उपशम यांनीं संपन्न

---

[1] अभ्यासवैराग्याभ्यां तन्निरोधः। (पातंजलयोगसूत्रें १।१२) अभ्यासेन तु कौन्तेय वैराग्येण च गृह्यते। गी. ६।३५

कर व तें कार्य एकदा सिद्ध झालें म्हणजे तूं सिद्ध झालास म्हणून समज. परंतु ही गोष्ट तुला करतां येत नसेल, तर तुझी योग्यता एखाद्या अरण्यांतील गर्दभाइतकीच आहे असें ठरेल. राघवा ! तूं माधवादिकांची जशी आराधना करतोस तशी आपल्या स्वतःच्या चित्ताची कां करीत नाहींस? सर्वांच्या हृदयांत विष्णु स्थित असतां त्याची आराधना करण्याचें टाकून जे बाहेरच्या विष्णूची पूजा करतात, अशांना नराधम हें नांव देऊं नये तर दुसरें कोणतें नांव द्यावें? हृदयरूपी गुहेमध्यें वास करणारें चित्तत्त्व हेंच आत्म्याचें मुख्य आणि सनातन शरीर आहे, शंखचक्रगदा धारण करणारी आकृति गौण होय. अर्थात्, जो मनुष्य मुख्य गोष्ट सोडून गौण गोष्टीच्या नादीं लागतो, तो सिद्ध अमृताचा त्याग करून धान्य पिकवून सिद्ध करण्याची व्यर्थ उठाठेव करतो, असेंच म्हणण्यास हरकत नाहीं. बा रघुनंदना ! ज्याला आत्मतत्वज्ञानचमत्काराची स्थिति प्राप्त करून घेतां येत नाहीं, तो वेडा म्हणावा. ज्याला आत्मानात्मविवेक म्हणजे काय हें समजत नाहीं, अशा अज्ञानानें मोहित झालेल्या मनुष्यानें शंखचक्रगदाधारी विष्णुमूर्तीची पूजाअर्चा करावी हें युक्त आहे. अशा पूजनानें आणि वैराग्यकारक तपाच्या योगानें मनुष्याचें चित्त मोठ्या कष्टानें आणि दीर्घ कालानें निर्मल होतें. परंतु विवेक आणि अभ्यास यांची स्थिति अशी नाहीं. या साधनाचा निरंतर अभ्यास करीत गेल्यास एखादा आम्रवृक्ष क्रमाक्रमानें पुष्पफलांनीं शोभायमान व्हावा, त्याप्रमाणें मनुष्याचें चित्त हळुहळु परंतु निश्चयानें प्रसन्न होत जातें. शत्रुमर्दना रामा ! शास्त्रामध्यें सुद्धां हरिपूजादि भक्तीच्या निमित्तानें जें फल मिळत असल्याचें वर्णन करण्यांत येतें, तेंहि आत्मा स्वसंकल्पानेंच प्राप्त करून घेतो. तसेंच विष्णूचा वर मिळणें हें सुद्धां स्वतःच्या अभ्यासवृक्षाचेंच फल होय. कारण, वरप्राप्तीसुद्धां आकस्मिक आणि अकारण होते असें मुळींच नाहीं. ज्याप्रमाणें उत्तम धान्याचें उत्पत्तिस्थान उत्तम भूमि हेंच असतें, त्याप्रमाणें सर्वश्रेष्ठ दशांचें आणि चिरकाळ टिकणाऱ्या संपत्तीचें उद्भवस्थान स्वतःचा मनोनिग्रह हेंच होय. सगरपुत्रांनीं पृथ्वी खणली व देवासुरांनीं मंदारपर्वताची रवी करून समुद्रमंथन केलें; परंतु हे सर्व मनोनिग्रहाच्या जोरावरच केलें. कारण, महत्कार्यें साध्य करून घेण्याला मनोनिग्रहाशिवाय दुसरा कोणताहि उपाय नाहीं. जोपर्यंत मनोरूपी खवळलेला महासागर शांत झालेला नाहीं, तोंपर्यंत मनुष्यांना हजारों जन्ममरणपरंपरांच्या फेऱ्यांत अडकून भ्रमण करण्याशिवाय गत्यंतर नाहीं. ब्रह्मा, विष्णु, इंद्र, रुद्र वगैरे देवांची दीर्घकाळ आराधना केली आणि ते प्रसन्न झाले, तरी त्या दयाळु देवांनासुद्धां मनुष्याला मनोव्याधीपासून मुक्त करतां येत नाहीं. तस्मात् रामा ! तूंहि अंतर्बाह्य विषयांचा मनानें त्याग करून जन्मक्षय होण्याकरितां विलंब न लावतां आज अशा संविद्रूपाचें एकाग्रतेनें चिंतन कर; व अशा रीतीनें तूं अंतर्बाह्य विषयनिर्मुक्त झालास आणि आपल्या सच्चिद्रूपाशीं तदाकार होण्याचा अभ्यास करीत गेलास, म्हणजे तुला नित्य निरतिशयानंद आपोआप प्राप्त होईल; व त्या आनंदाचा तूं निरंतर उपभोग घेत राहिलास, म्हणजे तूं जन्मनदीच्या पैलतीराला निःसंशय जाऊन पोहोंचशील.

---

# सर्ग ४४

—:०:—

१. गाधीचें आख्यान. २. मायेच्या दर्शनासंबंधानें श्रीविष्णूचा वर. ३. आपण मेलों असून आपले प्रेत स्मशानांत दहन करण्यांत आलें असा गाधीला पाण्यांत देखावा दिसतो.

**श्रीवसिष्ठ**:—रामा ! ही संसारमाया अपरिमित भ्रांति उत्पन्न करणारी असून ती चित्तजयानेंच क्षीण होते दुसऱ्या कोणत्याहि उपायानें क्षीण होत नाहीं. या जगन्मायाप्रपंचाचें वैचित्र्य तुझ्या बुद्धीवर चांगलें आरूढ व्हावें, यासाठीं मी तुला पुढील इतिहास सांगत आहें; तरी तो लक्षपूर्वक ऐक.

या भूपृष्ठावर **कोसल** नांवाचा एक देश आहे. ज्याप्रमाणें मेरुपर्वतावर कल्पवृक्षाची समृद्धि असते, त्याप्रमाणें त्या देशांत रत्नांची समृद्धि आहे. अशा त्या देशांत **गाधि** या नांवाचा एक प्रख्यात ब्राह्मण रहात असे. तो मोठा श्रोत्रिय आणि बुद्धिमान् असून मूर्तिमंत धर्मच होता. लहानपणापासूनच अतिशय विरक्त असल्यामुळें तो निष्कलंक आकाशाप्रमाणें शोभत असे. एकदां कांहीं इष्टकार्याच्या निमित्तानें आपले बांधव सोडून देऊन तपाचरण करण्याकरितां तो अरण्यांत निघून गेला. अरण्यांतून जातां जातां तारकाखचित निर्मल आकाशामध्यें चंद्रानें प्रवेश करावा, त्याप्रमाणें कमलांच्या योगानें रमणीय दिसणाऱ्या एका सरोवराजवळ तो जाऊन पोहोंचला; व श्रीविष्णूचें दर्शन होईपर्यंत त्या सरोवराच्या जलांत तप करण्याचा निश्चय करून पर्जन्यकालीं कमलानें पाण्यांत बुडून रहावें त्याप्रमाणें, त्या सरोवरांतील पाण्यांत आकंठ बुडून राहिला. अशा स्थितींत आठ महिने लोटले तरी शौरीचें ( विष्णूचें ) दर्शन न झाल्यामुळें सूर्याच्या वियोगामुळें घरांतील कमलें म्लान होतात, तद्वत् गाधीची स्थिति झाली. परंतु त्यानें आपला निश्चय म्हणून सोडला नाहीं. अशा रीतीनें कांहीं दिवस लोटल्यानंतर उन्हानें संतप्त झालेल्या भूतलाला शांत करण्याकरितां कृष्णवर्ण मेघानें यावें, त्याप्रमाणें उग्र तपश्चर्येच्या योगानें तापलेल्या त्या ब्राह्मणाकडे हरि आपण होऊन आला.

**श्रीभगवान्**:—बा ! श्रेष्ठ विप्रा ! उदकांतून बाहेर ये. तुझा तपोवृक्ष आतां सफल झाला आहे. यास्तव तुला इष्ट असेल तो वर माझ्यापासून मागून घे.

**गाधी**:—भगवन् ! जगांतील असंख्य प्राण्यांच्या हृत्कमलामधील जणुं भ्रमर आणि त्रिभुवनरूपी कमलिनीचें जणुं सरोवर अशा आपणांला माझा नमस्कार असो. भगवंता ! आपल्या आत्मस्वरूपामध्यें भासमान होणारी आणि सर्व जगाला भ्रम उत्पन्न करणारी संसारनामक माया पाहावी, अशी माझी इच्छा आहे. तरी ती माया मला कृपा करून दाखवावी, हीच माझी आपल्याला प्रार्थना आहे.

**श्रीवसिष्ठ**:—राघवा ! ब्राह्मणानें अशा रीतीनें प्रार्थना केल्यानंतर ' गाधे ! माझी माया तुला दिसेल व ती पाहिल्यानंतर तूं तिचा त्यागहि करशील, ' असें म्हणून भगवान् आकाशांतील गंधर्वनगराप्रमाणें अंतर्धान पावले. भगवान् श्रीविष्णु अदृश्य झाल्यानंतर तो विप्रश्रेष्ठ पाण्यांतून वर आला व इच्छित वर प्राप्त झाल्यामुळें क्षीरसमुद्रांतून निघालेला तो शीतल आणि निर्मल चंद्रच आहे कीं काय, असा भास झाला. ज्याप्रमाणें चंद्राच्या दर्शनस्पर्शनानें कमल प्रफुल्लित होतें, त्याप्रमाणें श्रीहरीच्या दर्शनानें त्याला अतिशय आल्हाद झाला. अशा रीतीनें हरीच्या दर्शनसुखानें आनंदित झालेल्या त्या गाधिब्राह्मणाचे कांहीं दिवस त्या अरण्यांत आपलीं ब्रह्मकर्मे यथोचित करण्यांत निघून

गेले. पुढें एकदां प्रफुल्लित कमलांनीं भरलेल्या त्या सरोवरामध्यें गाधिब्राह्मण स्नान करण्यासाठीं उतरला असतां भगवान् श्रीविष्णूंनीं 'तूं माझी माया पहाशील' असा जो वर दिला होता, त्याचें त्याला स्मरण झालें; व एखादा महर्षि योगबलानें भूतभविष्याचें ज्ञान करून घेण्यासाठीं त्याचे मनानें चिंतन करतो, त्याप्रमाणें तो त्या भगवद्वाक्याचा विचार करूं लागला. नंतर स्नान करतांना त्यानें हातांत दर्भ घेऊन सकलदुरितपरिहारार्थ अघमर्षण मंत्राचा जप करीत दर्भानें पाणी ढवळण्यास सुरवात केली. इतक्यांत त्याच्या बुद्धीला भ्रंश झाला व प्रणवादि मंत्रांचें विस्मरण होऊन त्याला पाण्यामध्यें पुढील विलक्षण प्रकार दिसूं लागला. सोंसाट्याच्या वाऱ्यामुळें एखादा वृक्ष उपटून दरींत जाऊन पडावा, त्याप्रमाणें आपला देह आपल्या घरांत मरून पडला असून भोंवतालीं आप्तेष्टांची रडारड सुरू झाली आहे, असें त्याला दिसलें. त्याच्या शरीरांतील प्राणापानादि वायूंची हालचाल बंद झाली, त्याच्या अवयवांचें चलनवलन निर्वात प्रदेशांतील केळीच्या झाडाप्रमाणें अजिबात थांबलें, वृक्षाच्या रसहीन पानाप्रमाणें मुख म्लान झालें, देंठ कापलेल्या कमलाप्रमाणें शरीर शुष्क झालें, प्रातःकाळच्या आकाशांतील तारकांप्रमाणें डोळ्यांतील बुबुळें दिसेनाशीं झालीं आणि अवर्षणाच्या योगानें एखादा गांव उध्वस्त होऊन धुळीनें भरून जावा, त्याप्रमाणें त्या शरीराचे सर्व अवयव मलिन झाले होते. ज्याप्रमाणें कुरर पक्षी एखाद्या वृक्षावर बसून किलबिल शब्द करतात, त्याप्रमाणें आपले आप्तबांधव शवाभोंवतीं जमून खिन्न होऊन दुःखाश्रू ढाळीत आणि मोठ्यानें आक्रोश करीत बसले होते. एखाद्या सरोवराचा बंधारा फुटून त्यांतील जलौघांत सांपडलेल्या कमलिनीप्रमाणें जिचें मुखकमल नेत्रांतून गळणाऱ्या अश्रुप्रवाहामुळें जर्जर झालें आहे, अशी आपली पत्नी पायांपाशीं बसलेली होती. मोठमोठ्यानें गुंजारव करणाऱ्या भ्रमरीप्रमाणें दीर्घ स्वरानें रुदन करणारी आपली माता, थोडी हजामत वाढलेलें मुख कुरवाळीत जवळ बसली होती. तसेंच आपले इतर आप्तजन दीनमुद्रेनें अश्रू ढाळीत प्रेताच्या सभोंवार बसले असून ज्यांवरून दंवाचे बिंदु गळत आहेत, अशीं वाळलेलीं पानें वृक्षाभोंवतीं असावीं त्याप्रमाणें ते शवाच्या भोंवतीं दिसत होते. 'संयोगा विप्रयोगान्ताः' म्हणजे 'संयोगांचें पर्यवसान वियोगांत होतें' असा न्याय असल्यामुळें वियोगाच्या भीतीनें संयोग टाळण्याकरितांच जणुं काय, त्याचे हस्तपादादि अवयव अस्ताव्यस्त पडले असल्यामुळें ते कोणी परकी मनुष्य शवाच्या भोंवतीं आहेत की काय, असा भास होत होता. शवाचे ओंठ साफ उघडलेले असून त्यांमधून किंचित् मळकट झालेली पांढऱ्या दातांची कवळी स्पष्टपणें दिसत होती; व यामुळें तें शव एखाद्या विरक्त झालेल्या पुरुषाप्रमाणें 'एवढावेळपर्यंतचें आपलें जीवित व्यर्थ गेलें!' असें म्हणत उपहासपूर्वक हंसतच आहे कीं काय, असा भास होत होता. तें शव एखाद्या मातीच्या पुतळ्याप्रमाणें मुनिवृत्तीचा अंगिकार करून जणुं मौनधरून ध्यान करीत आहे, कीं कायमचें झोंपी गेलें आहे, कीं पूर्ण विश्रांतिसुख अनुभवीत आहे; किंवा निद्रेचें मिष करून आपणावर कोणाचें प्रेम अधिक आहे आणि कोणाचें कमी आहे, हें त्यांच्या दुःखोद्गारांवरून अजमावून पाहण्याकरितांच जणुं काय बांधवाचे विलाप एकाग्रमनानें श्रवण करीत आहे असें वाटत होतें!

नंतर दुःखानें आक्रोश करणारे, ऊर बडवून घेऊन शोक करतां करतां मूर्च्छित होऊन पडलेले आणि अश्रूंच्या प्रवाहांत लोळणारे,

तसेंच दीर्घ स्वरानें रुदन करणारे त्याचे बांधव हलुहलु उठले आणि त्या अमंगल प्रेताचें पुन्हां दर्शन घ्यावयाचें नाहीं, अशा उद्देशानेंच जणुं काय त्यांनीं त्याचें प्रेत स्मशानांत नेलें. तें स्मशान ठिकठिकाणीं रक्त, मांस, वसा यांच्या चिखलानें माखलें होतें. त्यामध्यें जागोजाग शुष्क झालेले शेंकडों हाडांचे पिंजरे पडलेले दिसत होते. तेथील आकाशांत गिधाडांच्या झुंडीच्या झुंडी मेघांप्रमाणें घिरट्या घालीत असून त्यामुळें सूर्याचे किरण झांकले गेले होते. त्या स्मशानांत जिकडे तिकडे चिता पेटलेल्या असून त्यांच्या ज्वालांनीं तेथील अंधकाराला पळवून लावलें होतें. कोल्ह्यांच्या अभद्र मुखांतून निघणाऱ्या ज्वालांच्या योगानें तेथील भूमि धुरकट दिसत होती. तेथें वहाणाऱ्या रक्ताच्या नदीमध्यें कंक, कावळे वगैरे पक्ष्यांपैकीं कित्येक पक्षी स्नान करीत होते, तर कित्येक त्यामध्यें डुंबत होते. कित्येक ठिकाणीं रक्तानें माखलेलीं आंतडीं पसरलीं असून त्यांच्या जाळ्यामध्यें मांसभक्षक वृद्ध पक्षी अडकून पडले होते. अशा तऱ्हेच्या त्या स्मशानामध्यें जाऊन त्याच्या बांधवांनीं तें प्रेत चितेवर ठेवलें, त्याला अग्नि लावला व पूर्वीं ज्याप्रमाणें समुद्रांनीं आपलें उदक वडवाग्नीमध्यें जाळून टाकलें होतें, त्याप्रमाणें त्यांनीं आपल्या बांधवाचें तें शव अग्नीमध्यें भस्मसात् करून टाकलें. त्या चितेंतील लांकडें चांगलीं वाळलेलीं असल्यामुळें त्यांनीं हां हां म्हणतां पेट घेतला व ज्वाला भडकूं लागून त्या चितेंतून चट्चट् असे शब्द होऊं लागले. क्षणांत तें प्रेत धडाडूं लागलें, त्यांतून कट्कट् असे आवाज होऊं लागले व प्रेतांतून निघणारी दुर्गंधि आकाशांतील मेघांपर्यंत जाऊन पोहोंचली. सारांश, ज्याप्रमाणें एखादा हत्ती वेळूंच्या वनाचा क्षणांत विध्वंस करतो, त्याप्रमाणें भगवान् अग्निनारायणानें ज्यांतून एकसारखा रस गळत आहे अशा त्याच्या प्रेतांतील हाडांचें चूर्ण करून टाकलें.

# सर्ग ४५.

— :*: —

१. गाधीचा चांडाळीच्या उदरांत जन्म. २. त्याची जंगलांतील स्थिति आणि कीर देशाची राज्यप्राप्ति.

**श्रीवसिष्ठः**—रामा ! सरोवरांतील उदकामध्यें अघमर्षण करीत असलेल्या गाधीची बुद्धी संकल्पानें कलंकित झाल्यामुळें त्याला आपला मृत्यु आणि पुढील जन्म त्या उदकामध्यें दिसला. त्याच्या निर्मल आत्म्यामध्येंच त्याला पुढील सर्व अमंगल गोष्टी दिसूं लागल्या. भूतमंडळ देशाच्या सीमेवरील एका गांवाच्या बाहेरील म्हारवड्यांत आपण एका चांडालस्त्रीच्या उदरांत प्रवेश केला आहे, गर्भवासामध्यें आपलें कोमल शरीर पीडित झालें असून आपण त्या चांडालीच्या गर्भाशयांत साक्षात् नरकवास भोगीत आहों व विष्टेमध्यें खुशाल लोळत आहों, पुढें नऊ महिने भरल्यानंतर वर्षाऋतूमधील रात्र कृष्णवर्ण मेघाला प्रसवते त्याप्रमाणें, त्या चांडालस्त्रीच्या उदरांतून आपला काळाकुट्ट परंतु कोमल पिंड मोठ्या कष्टानें बाहेर पडला आहे, पुढें क्रमाक्रमानें वाढत जाऊन त्या चांडालाच्या घरांत आपण रांगत असून त्याच्या प्रेमाचा विषय झालों आहों, आणि यमुनेच्या प्रवाहांत पडलेल्या कमलाप्रमाणें घरामध्यें इतस्ततः संचार करीत आहों, असें त्याला दिसून आलें. अशा रीतीनें बारा वर्षें लोटलीं. पुढें त्याला सोळावें वर्ष लागताच त्याचें अंग काळ्याकुट्ट मेघाप्रमाणें धष्टपुष्ट झालें. तो कुत्र्यांचा परिवार बरोबर घेऊन मृगयेकरितां रानोरान फिरूं लागला व लक्षावधि मृग मारून त्यानें किरातवृत्तीचा आश्रय केला. नंतर तमाल वृक्षाचा आश्रय करणाऱ्या लतेप्रमाणें दिसणारी एक चांडालकन्या त्यानें वरली. तिचे स्तन पुष्पगुच्छांप्रमाणें आणि हात नूतन पल्लवांप्रमाणें दिसत

होते. ती चांडालकन्या काळीकुट्ट असून तिची स्वभावतः शुभ्र असलेली दंतपंक्ति कधींहि न घांसली गेल्यामुळें मलिन झालेली दिसत होती व तिचे विलासशाली अवयव नवपल्लवांचें अनुकरण करीत होते. अशा त्या नव्या स्त्रीला बरोबर घेऊन कृष्णवर्ण भ्रमर एकाद्या काळ्या भ्रमरीवर आसक्त होऊन तिच्याबरोबर पुष्पांनीं भरलेल्या वनांत संचार करतो, त्याप्रमाणें नित्य नवे विलास करीत त्यानें अरण्यांतून संचार केला. आपल्या नूतन कान्तेबरोबर अरण्यांतील वृक्षावरील पर्णे आणि लता यांमधून विलाससुख अनुभवीत असता प्रत्यक्ष विंध्याटवीनें त्याच्या रूपानें पुरुषाचा आकार धारण केला आहे कीं काय, असा भास होऊं लागला. त्यानें आपल्या स्त्रीसह लताकुंजांमधून विश्रांति घेतली, पर्वतांच्या दरींतून निद्रासुख अनुभवीत रात्रीच्या रात्री घालविल्या, आणि वृक्षांवरील पानांच्या ढिगामध्यें झोंप घेतली व वृक्षांच्या गर्द झाडीमध्यें घराप्रमाणें वस्ती केली. त्या जोडप्यानें किंकिरात वृक्षाच्या मंजरी अंगावर धारण केल्या, यूथिका पुष्पांच्या माळा गळ्यांत घातल्या, डोकीमध्यें केवडा घातला, आम्रमंजरीच्या माळांनीं आपलीं शरीरें विभूषित केलीं, पुष्पशय्यांवरून लोळण घेतली व पर्वतांच्या उतरणींवरून हवा खात यथेच्छ भ्रमण केलें. अरण्यांतील सर्व रस्त्यांच्या माहितीच्या बाबतींत तो मोठा तज्ञ झाला होता आणि पशूंची शिकार करण्याच्या शास्त्रांत तो जाडा पंडित बनला होता. नंतर खदिराला कांटे उत्पन्न व्हावे त्याप्रमाणें, जे स्वभावानें अत्यंत क्रूर आहेत आणि ज्यांचीं चरित्रें ऐकतांना अंगावर शहारे उभे रहातात, अशा प्रकारचे आपल्या कुलरूपी वृक्षाचे जणुं अंकुरच असे अनेक पुत्र त्याला त्या अरण्यांत झाले. याप्रमाणें पुत्रकलत्रसंपन्न असलेला तो चांडाल तारुण्य संपून हळुहळु म्हातारा झाला, आणि एखाद्या वृष्टिहीन भूभागाप्रमाणें जर्जर होऊन गेला. नंतर आपल्या भूतमंडलनामक जन्मभूमीमध्यें परत येऊन आणि गांवापासून दूर अंतरावर एक पर्णकुटी तयार करून तो त्या ठिकाणीं एखाद्या मुनीप्रमाणें राहूं लागला. तो जरेने जरठ झाला होता. त्याचे पुत्रहि त्याच्याप्रमाणें धिप्पाड शरीराचे झाले व तो वृद्ध चांडाल ज्यांतील रस शुष्क झालेले आहेत अशा एखाद्या खड्ड्यांतून उत्पन्न झालेल्या तमालवृक्षाप्रमाणे दिसूं लागला. अशा रीतीन तो चांडाल आपला गृहस्थाश्रम चालवीत असतां त्याचें कुटुंब मोठ्या भरभराटीस चढलें. त्या कुटुंबांतील मंडळींचीं नांवें, त्यांचीं भाषणें आणि त्यांच्या क्रिया क्रूरत्वदर्शक होत्या. अशा रीतीनें त्या गाधिब्राह्मणानें भ्रमामध्यें आपली स्थिति पाहिली. सर्व चांडाळांपेक्षां आपण वृद्ध झालों असून आपल्या कुटुंबाचा विस्तार अतिशय वाढलेला आहे, असें त्याला दिसून आलें. पुढें रानांतील वृक्षाखालीं पडलेलीं पानें पावसाच्या सरीनें वाहून नेलीं जातात, त्याप्रमाणें त्याच्या कुटुंबांतील माणसें एकामागून एक मृत्यूनें ओढून नेलीं, यामुळें शोकग्रस्त होऊन कळपांतून दूर झालेला हरीण दीन मुद्रेनें अश्रू गाळीत भटकूं लागतो, त्याप्रमाणें तो अरण्यामध्यें उदास वृत्तीनें भ्रमण करूं लागला. अशा शोकमग्न स्थितींत कांहीं दिवस गेल्यानंतर एखाद्या शुष्क झालेल्या सरोवराचा हंसादि पक्षी त्याग करतात त्याप्रमाणें त्यानें स्वदेशाचा त्याग केला, आणि वायूनें प्रेरणा केल्यामुळें मेघ आकाशांत इतस्ततः संचार करूं लागतो, याप्रमाणें तो पराधीनपणानें देशोदेशीं भ्रमण करूं लागला. अशा रीतीनें फिरतां फिरतां शून्य आकाशांत संचार करणाऱ्या नभश्चराला एखादें उत्तम विमान दिसावे, त्याप्रमाणें त्याला एकदां कीर लोकांची ऐश्वर्यसंपन्न राजधानी दिसली. त्या राजधानींतून

जात असतां ज्यामधून वृक्ष, लता व स्त्रिया नृत्य करीत असून त्यांवर रत्नांचे किरण पसरले आहेत, पुष्पांचा गुडघाभर खच पडलेला आहे, चंदन, अगुरु यांचा सर्वत्र घमघमाट सुटला आहे, सामंत, स्त्रिया, नागरिक, वगैरे जनसमूहाची ज्या ठिकाणीं गर्दी उसळली आहे, अशा तऱ्हेच्या स्वर्गांतील रस्त्यालाहि लाज-विणाऱ्या राजमार्गाच्या मध्यभागीं तो जाऊन पोहोंचला. त्या ठिकाणीं रत्नखचित अलंकार घालून शृंगारलेला आणि मेरुप्रमाणें दिसणारा एक हत्ती आपल्या समोरून येत आहे, असें त्याला दिसून आलें. ज्याप्रमाणें एखादा रत्न-परीक्षक रत्नांच्या राशीमध्यें चिंतामणीचा शोध करीत असतो, त्याप्रमाणें त्या देशाचा राजा मरण पावल्यामुळें दुसऱ्या राजाची निवड करण्याकरितां तो मंगलकारक हत्ती राजमार्गां-तून इतस्ततः संचार करीत होता. तो चांडाळ त्या हत्तीकडे पाहूं लागला व एखाद्या हालचाल करणाऱ्या प्रचंड पर्वताप्रमाणें दिसणाऱ्या त्या हत्तीचें त्यानें मोठ्या कौतुकानें बराच वेळ निरीक्षण केलें. इतक्यांत मेरुपर्वताच्या तटानें सूर्यबिंबाला मोठ्या आदरानें आपल्या मस्तकावर धारण करावें, त्याप्रमाणें त्या हत्तीनें त्या चांडा-ळाला सोंडेनें उचलून आपल्या गंडस्थळावर नेऊन बसविलें. त्याबरोबर कल्पांतकाळचा मेघ आकाशांत आरूढ होताच समुद्र गर्जना करूं लागतो, त्याप्रमाणें जिकडे तिकडे मंगलवाद्यांचे जयघोष सुरू झाले व ‘ आमच्या राजाचा जयज-यकार असो ! असा प्रभातकाळीं जागृत झालेल्या पक्ष्यांच्या किलबिलाटाप्रमाणें भासणारा एकच प्रचंड ध्वनि उत्पन्न होऊन तो सर्व दिशांमध्यें दुमदुमून गेला, आणि सर्व नागरिकांचे इच्छित मनोरथ परिपूर्ण झाले. तदनंतर समुद्राच्या कांठावर आदळणाऱ्या लाटांची गंभीर गर्जना ऐकूं यावी, त्याप्रमाणें राजवाड्यांतील बंदि-जनाचा कोलाहल सुरू झाला. इतक्यांत क्षीर-समुद्राचें मंथन चाललें असतां मंदरपर्वताच्या सभोंवार त्या समुद्रांतून उसळणाऱ्या लाटांचा गराडा पडला होता, त्याप्रमाणें त्याच्या भोंवतीं सुंदर स्त्रियांचा गराडा पडला आणि त्या त्याला शृंगारूं लागल्या. ज्याप्रमाणें समु-द्राच्या वेला ( किनारे ) लाटांच्या रांगांनीं आपल्या तटावरील पर्वताला व्यापून टाकतात त्याप्रमाणें त्या तरुणींनीं त्याला निरनिराळ्या रत्नहारांनीं भरून टाकलें व त्या नानाविध रत्नांची प्रभा चोहोंकडे फाकून सूर्योदय झाल्याचा भास होऊं लागला. ज्याप्रमाणें वर्षाकालांतील पर्जन्यवृष्टी अरण्यांतील पर्वताच्या शिखराला पाण्याच्या पुरानें भरून टाकतात, त्याप्रमाणें सुंद-रीनीं हिमबिंदूंच्या कणामुळें शीतल भासणाऱ्या पुष्पांच्या माळांनीं त्याचें आंग भरून टाकलें. ज्याप्रमाणें वसंतऋतूंतील विकसित पुष्पश्री चंचलपल्लवरूपी हस्तांनीं वनाला अलंकृत करते, त्याप्रमाणें त्या स्त्रियांनीं विचित्र वर्ण आणि सुगंध यांनीं युक्त असलेल्या फुलांनीं त्याला अलंकृत केलें. तसेंच एखादा पर्वत आपणामधील निरनिराळ्या धातूंच्या प्रभा-जालानें आकाशाला लिप्त करतो, तद्वत् त्याच्या अंगाला नानाविध सुवासिक उटणीं लावलीं. अशा रीतीनें सुवर्ण आणि रत्नें यांच्या अलंकारांनीं युक्त असलेल्या चांडालानें, मेरुपर्वतानें संध्याकाळचे मेघ, तारका, चंद्र आणि आकाशगंगा यांनीं युक्त असलेल्या आकाशाचें ( प्रतिबिंबरूपानें ) ग्रहण करावें त्याप्रमाणें, त्या सुंदर स्त्रियांचें चित्त आकर्षित करून घेतलें. त्या वेळीं अंगावर मूल्यवान् रत्नें, पुष्पें आणि वस्त्रें धारण करणारा आणि विलासशील तरुणींनीं वेष्टिलेला तो चांडाल कल्पवृक्षाप्रमाणें शोभूं लागला. पुढें तो चांडाल राजसभेजवळ येतांच रस्त्यावरील प्रफुल्लित

वृक्षाजवळ पांथस्थ येतात त्याप्रमाणें अष्टप्रधानादि अधिकारी आपापल्या लव्याजम्यानिशीं त्याला सामोरे आले; त्यांनीं त्या चांडालाला सिंहासनावर बसविलें, त्याला ब्राह्मणांकडून राज्याभिषेक करविला आणि देवांनीं इंद्राला ऐरावतावर बसवून त्याची मिरवणूक काढावी, त्याप्रमाणें त्या चांडालाला त्याच मंगल हत्तीवर बसवून त्यांनीं त्याची मोठ्या थाटानें राजधानींतून मिरवणूक काढली. सारांश, एखाद्या अरण्यांतील मेलेलें पुष्ट हरिण अचानक सांपडावें, त्याप्रमाणें त्या चांडालाला कीर देशाचें राज्य अनायासानें प्राप्त झालें. ज्याचें सर्व अंग सुवासिक उट्यांमुळें संध्याकाळच्या मेघांप्रमाणें रमणीय दिसत आहे आणि त्या नगरांतील सुंदर स्त्रिया आपल्या कोमल हातांनीं ज्याचे पाय चुरण्यांत गढून गेल्या आहेत, अशा प्रकारचा तो चांडाल राजा त्या स्त्रीसमुदायामुळें, सिंहिणींच्या कळपांत असलेला सिंह एखाद्या प्रफुल्लित वनामध्यें शोभावा त्याप्रमाणें, त्या कीर नगरांत शोभूं लागला. सिंहानें विदारण केलेल्या हत्तीच्या गंडस्थळांतून गळलेल्या मोत्यांनीं ज्याचें सर्वांग विभूषित झालें आहे, असा तो चांडाल आपलें पूर्वींचें सारें दुःख आणि चिंता विसरून गेला आणि सूर्याच्या किरणांनीं संतप्त झालेला हत्ती सरोवर दिसतांच त्यांतील पाण्यांत यथेच्छ विहार करूं लागतो, तद्वत् राजपदावर आरूढ झालेला आणि अष्टप्रधान, नागरिक यांनीं युक्त असलेला तो चांडाल त्या नगरांत विषयोपभोग भोगण्यांत दंग होऊन गेला. लवकरच त्याचें राजतेज चोहोंकडे पसरूं लागलें, सर्व मांडलिक राजे त्याची आज्ञा शिरसावंद्य मानूं लागले, थोडक्याच दिवसांत त्याच्या राज्यांत सर्वत्र शांतता आणि सुराज्य नांदूं लागलें व त्याच्या अष्टप्रधानांनीं सर्व राज्यभार आपल्या माथीं घेऊन आपापलीं कामें पूर्वींप्रमाणें सुव्यवस्थित रीतीनें करण्याला सुरुवात केली. सारांश, अशा रीतीनें गवल या नांवानें त्या चांडालानें कीर देशाचें राज्य करण्याला प्रारंभ केला.



---

## सर्ग ४६

—:०:—

१. आपला राजा चांडाळ आहे असें समजतांच तेथील नागरिक अग्निमध्यें प्रवेश करतात. २. त्यांच्या दुःखानें दुःखित झालेला गवलराजाहि स्वतः अग्निप्रवेश करीत आहे, इतक्यांत गाधिब्राह्मण देहभानावर येतो.

श्रीवासिष्ठः—राघवा ! अशा रीतीनें विलासिनी स्त्रियांनीं वेष्टिलेला, मंत्रिमंडळाकडून सन्मान दिला गेलेला, सर्व मांडलिक राजांना वंद्य झालेला, छत्रचामरादि राजचिन्हांवर आसक्त झालेला; तसेंच ज्याची आज्ञा सर्वांकडून शिरसावंद्य मानली जात आहे, ज्यानें संपूर्ण राज्यकारभाराचें ज्ञान प्राप्त करून घेतलें आहे, ज्याची प्रजा शोक, भय, क्लेश इत्यादि संकटांतून मुक्त झाली आहे आणि ज्याच्या ठिकाणीं राज्यैश्वर्य विलसूं लागलें आहे, अशा त्या गवल राजाचीं बंदिजनांकडून नित्य स्तुतिस्तोत्रें गाइलीं जाऊं लागून त्यांत दंग झाल्यामुळें मद्यपानानें धुंद झालेल्या मनुष्याला स्वतःचें विस्मरण व्हावें, त्याप्रमाणें त्याला आपल्या पूर्वस्थितीचें अजिबात विस्मरण झालें. अशा स्थितींत दयादाक्षिण्यादि गुणांनीं युक्त असलेल्या त्या गवल राजानें त्या कीरलोकांच्या नगरांत मोठ्या आनंदानें आठ वर्षें राज्य केलें. पुढें एके दिवशीं आपल्या अंगावरील वस्त्रालंकारादि सर्व भूषणें सहज काढून ठेवून तो स्वस्थ बसला होता व त्यावेळीं त्याची अंगकांति अंधकार, तारका, चंद्र, सूर्य व मेघ यांनीं रहित असलेल्या नीलवर्ण आकाशाप्रमाणें

शोभायमान होत होती. त्याला हार, केयूर, वलय वगैरे अलंकारांचें मुळींच महत्त्व वाटत नसे. कारण, उघडच आहे कीं, ज्याच्या ठिकाणीं प्रभुत्व आलें आणि अधिकाराचें नैसर्गिक सामर्थ्य उत्पन्न झालें, त्याला कृत्रिम अलंकारांची पर्वा ती काय वाटणार! असो. याप्रमाणें तो वस्त्रहीन आणि अलंकारहीन झालेला गवल राजा, संध्याकाळच्या वेळीं मुख्य नभोभागाचा त्याग करून सूर्यानें पश्चिमेच्या भागाचा आश्रय करावा त्याप्रमाणें, राजमंदिराच्या बाहेरच्या अंगणांत एकटाच जाऊन बसला. त्या ठिकाणीं जाऊन पाहतो तों वसंतऋतूमध्यें कोकिलांनीं एकत्र जमून गाऊं लागावें, त्याप्रमाणें कित्येक काळेकुट्ट परंतु धष्टपुष्ट चांडाळ रांगेनें उभे राहून मधुर गायन करीत आहेत आणि एखाद्या गुंजारव करणाऱ्या भ्रमरपंक्तीप्रमाणें आपल्या हातांतील तुणतुण्यांच्या तारा छेडीत आहेत, असें त्याच्या दृष्टीस पडलें. त्यावेळीं ज्याचे डोळे तांबडे लाल आहेत आणि धुक्यानें भरलेल्या कांचमय पर्वताच्या शिखराप्रमाणें सर्वांग धुळीनें मलिन झालें आहे, अशा तऱ्हेचा त्या चांडाळसमुदायांतील एक वृद्ध चांडाळ राजाजवळ येऊन एकदम बोलूं लागला 'अरे कटंजा! ज्याप्रमाणें एखादा गायनशास्त्रांत निष्णात असलेला मनुष्य मधुर कंठानें युक्त असलेल्या कोकिळाला मान देतो, त्याप्रमाणें येथील राजा तुला किंवा गायनकलेमध्यें निपुण असून गोड अवाज असलेल्या दुसऱ्या एखाद्या मनुष्याला मान देतो का? तसेंच ज्याप्रमाणें वसंतऋतु आम्रवृक्षाला फलपुष्पभारानें अलंकृत करतो, त्याप्रमाणें तो गुणी मनुष्याला घर, वस्त्रें वगैरे कांहीं अर्पण करतो का? सूर्योदयामुळें कमलांना आणि चंद्रोदयामुळें ओषधींना आनंद व्हावा, त्याप्रमाणें फार दिवसांनीं तुझें दर्शन झाल्यानें मला अतिशय आनंद झाला आहे. कारण, बंधुदर्शनामुळें उत्पन्न होणारा आनंद म्हणजे सर्व प्रकारचे आनंद, सर्व मोठमोठे लाभ आणि सर्व श्रेष्ठ दर्जाच्या विश्रांती यांची परम सीमाच होय.' याप्रमाणें तो वृद्ध चांडाळ भाषण करीत आहे, इतक्यांत गवल राजानें त्याचा तिरस्कार करून त्याला दाबलें, तेव्हां त्यानें आपलें भाषण बंद केलें. परंतु इकडे राजवाड्याच्या माडीवरील खिडक्यांतून पाहणाऱ्या राजस्त्रिया आणि प्रधान यांच्या दृष्टीस तो सर्व प्रकार पडला; व आपला राजा कटंज नांवाचा चांडाळ आहे, असें समजतांच त्या सर्वांचीं तोंडें खरकन् उतरलीं. पुढें ती बातमी नगरांत हां हां म्हणता पसरली, तेव्हां हिमकणांच्या वर्षावानें कमलें संकुचित व्हावीं, अवर्षणामुळें गांवच्या गांव उध्वस्त व्हावे किंवा दावाग्नीमुळें पर्वत ओसाड पडावे, त्याप्रमाणें तेथील नागरिकांच्या चेहऱ्यांवरील तेज नाहींसें झालें. एखाद्या सिंहानें वृक्षाग्रावर बसलेल्या मांजराच्या गुरगुरण्याचा धिक्कार करावा, त्याप्रमाणें राजानें त्या चांडाळाच्या प्रत्येक शब्दाचा आपल्याकडून धिक्कार केला. अखेरीस पाऊस न पडल्यामुळें ज्यांतील कमलें म्लान झालेलीं आहेत अशा त्या सरोवरामध्यें राजहंसानें प्रवेश करावा, त्याप्रमाणें ज्यांतील सर्व लोकांचीं मुखें म्लान झालेलीं आहेत, अशा अंतःपुरामध्यें त्यानें प्रवेश केला. एखाद्या सांवरीसारख्या वृक्षाच्या ढोलींतील अग्नीनें सर्व वृक्षाला व्यापून टाकावें, त्याप्रमाणें त्यांच्या अंतःकरणांतील म्लानतेनें त्यांच्या सर्व अवयवांना व्यापून टाकलें. एखाद्या उंदरानें आरक्त पुष्पांनीं युक्त असलेल्या लतेचीं मुळें कुरतडून टाकलीं असतां त्या लतेवरील फुलें कोमेजून जातात, तद्वत् आपल्या अंतःपुरांतील सर्व लोकांचीं मुखें उदासीन आणि म्लान झालीं आहेत, असें त्याच्या दृष्टीस पडलें. आपला राजा

चांडाळ आहे हें समजल्यामुळें, एखाद्या घरांतील मंडळी शवाला स्पर्श करीत नाहींत त्याप्रमाणें, त्या राजाच्या राजवाड्यांत येणारे मंत्री, पौरजन आणि अंतःपुरांतील स्त्रिया त्याला स्पर्श करीनाशा झाल्या! इतकेंच नव्हे, तर आपल्या बापावर अतिशय प्रेम करणारीं मुलें त्याच्या मृत्यूबद्दल कितीहि शोक करीत असलीं, तरी त्याच्या शवाचा त्यागच करतात, त्याप्रमाणें त्या राजाचे नोकरचाकरसुद्धां त्याचा सत्कार न करतां त्याच्यापासून दूर दूर राहूं लागले; व ज्याप्रमाणें स्मशानाला सर्व लोक अशुभ समजतात, त्याप्रमाणें राजाचें म्लान वदन, त्याचें काळेंकुट्ट आणि भेसुर शरीर यांच्याकडे पाहून त्याकुल झालेले नोकर त्याला अमंगल समजूं लागले. सारांश, एखाद्या पर्वताच्या शिलातटाला अग्नि स्पर्श करीत नाहीं, त्याप्रमाणें पश्चात्तापानें खिन्न झालेली जनता त्याच्या धुरकट शरीराच्या वाऱ्यालाहि उभी राहीनाशी झाली. त्याच्या अंगांमधील पूर्वीचें तेज नाहीसें होऊन राजसभेंतील लोक त्याच्या आज्ञा जुमानीत नाहींसे झाले, व त्यामुळें भस्मामध्यें टाकलेल्या पाण्याच्या थेंबाप्रमाणें त्याचें शासन निष्फळ होऊं लागलें. एखाद्या भयंकर आणि क्रूर राक्षसाची गाठ पडतांच प्राणावर बेतेल या भीतीमुळें मनुष्यें त्याच्यापासून दूर पळून जातात, त्याप्रमाणें त्या दुष्ट चांडाळाचा स्पर्श झाल्यास पातक लागेल, अशी भीति वाटून सर्व लोक त्याच्यापासून विशेषच दूर राहूं लागले. यामुळें एखादा मनुष्य परदेशांत गेला असून त्याच्या जवळ द्रव्य, स्वजन व मित्र नसल्यामुळें तो लोकांमध्यें रहात असला तरी वस्तुतः एकटाच असतो, त्याप्रमाणें लोकसमुदायांत रहात असूनहि लोकांनीं टाकल्यामुळें तो एकाकी असल्यासारखा झाला. ज्याप्रमाणें मोत्यांनीं युक्त असणारे वेळू वायूच्या योगानें मोठ्यानें ध्वनि करूं लागले तरी कोणीहि प्रवासी त्यांच्याकडे मुळींच लक्ष देत नाहींत, त्याप्रमाणें त्यानें कितीहि कंठशोष केला तरी त्याला कोणीहि नागरिक ओ देत नाहींसे झाले! असो.

अशा रीतीनें त्या राजाची स्थिति अत्यंत केविलवाणी झाली. इकडे पौरजनांची स्थितीहि मोठी चमत्कारिक झाली. 'या चांडाळाच्या सहवासांत आमचीं पुष्कळ वर्षे गेलीं असल्यामुळें सामान्य प्रायश्चित्तानें आमची शुद्धि होणार नाहीं; याकरितां अग्निकाष्ठ भक्षण करणें हा शुद्ध होण्याचा एकच मार्ग आहे' असा मनानें निश्चय करून त्या नगरांतील प्रधान, नागरिक वगैरे सर्वांनीं ठिकठिकाणीं शुष्क काष्ठें आणून चिता केल्या आणि त्यांवर आरोहण करून आपणांस जाळून घेतलें. त्यावेळीं आकाशांतील तारकांप्रमाणें त्या चिता पेटूं लागल्या, त्यावेळीं त्या नगरांत सर्वत्र हाहाकार उडाला. मोठ्यानें आक्रोश करून दुःखाश्रु ढाळणाऱ्या स्त्रियांनीं सर्व शहर व्याप्त करून टाकलें. कित्येक जणांनीं पेटलेल्या अग्निकुंडांभोंवतीं गराडा देऊन स्फुदस्फुंदून रडण्याला प्रारंभ केला. त्या नगरांतील मंत्रिजनांनीं अग्निकुंडांत प्रवेश केल्यामुळें त्यांच्या नोकरांनीं रुदन करण्यास सुरवात केली. अशा रीतीनें त्या नगरांत जिकडे तिकडे दुःखाश्रु गळत होते आणि शोकामुळें हंबरडे फोडले जात होते; व त्यामुळें तें नगर हिमकणमिश्रित झंझावातानें युक्त असलेल्या अरण्याप्रमाणें भयाण दिसूं लागलें. चोहोंकडे पेटलेल्या चितांमध्यें उड्या मारून आपणांस जाळून घेणाऱ्या भ्रष्ट विप्रांच्या मांसाच्या दुर्गंधीनें पुष्ट झालेला सोंसाट्याचा वारा वाहूं लागला व त्याच्या योगानें उडालेल्या धुळीमुळें त्या नगरावर अंधुक दाट धुक्याचा थरच पसरला. वायूच्या योगानें

चितांमधून जळणाऱ्या मनुष्यांच्या शरीरांतील मज्जेची दुर्गंधि दूरवर पसरली असून तेणेंकरून पक्ष्यांच्या झुंडीच्या झुंडी त्या शहराभोंवतीं घिरट्या घालूं लागल्या. ज्यांतील सूर्यबिंब मेघांच्या योगानें झांकलें गेलें आहे, अशा आकाशाप्रमाणें तें नगर दिसूं लागलें. त्या नगरांत सोसाट्याचा वारा सुटूं लागला व त्यामुळें सर्वत्र पेटलेल्या चितांमधील अग्नीच्या ठिणग्या उसळूं लागून त्यांनीं आकाशमंडळाहि व्यापून टाकलें; व त्या अग्निकणांच्या समुदायाचा सर्व दिशांमध्यें तारकांप्रमाणें वर्षाव होऊं लागला. नगरांत जिकडे तिकडे चोरांचा सुळसुळाट झाला व त्यांनीं मुलांच्या अंगावरील अलंकार लांबविण्याचें काम चालविल्यामुळें नगरांतील भीतिग्रस्त झालेल्या मुलांचे सर्वत्र आक्रोश चालले होते. नगरांत बेबंदशाही माजल्यामुळें नागरिकांनीं आपल्या नांवाचा आणि जीविताचा त्याग करण्याला सुरुवात केली. दरवडेखोरांनीं वाटेल त्या घरांत शिरावें आणि हातीं लागेल तें द्रव्य लुटून न्यावें, असा क्रम आरंभिला व नागरिकांनीं आपल्या बायकापोरांचा त्याग करून मरणाची वाट धरली. सारांश, कल्पांतकालाप्रमाणें त्या नगरांतील जनतेची स्थिति होऊन त्यांच्यावर विपरीत प्रसंग ओढवला व सर्वांनीं आपण होऊन मृत्यूचा अंगिकार केला. इकडे कांहीं काळ सज्जनांचा सहवास घडल्यामुळें शुद्धचित्त झालेला गवल राजा शोकाकुल होऊन आपल्या मनांत विचार करूं लागला. तो म्हणालाः—'या देशावर हा जो अकालीं कल्पांतसमय ओढवला आहे आणि या नगरांतील सर्व श्रेष्ठ पुरुषांचा नाश झाला आहे, त्या सर्व अनर्थाला कारण मी. माझ्यामुळेंच येथील नागरिक मृत्यूच्या उदरांत गडप झाले आहेत, अशा स्थितींत माझें जगणें हें परमावधीचें दुःख असून मरण हा माझ्या दृष्टीनें महोत्सव आहे. कारण, या जगांत लोकांच्या निंदेला पात्र झालेल्या पुरुषानें जगण्यापेक्षां मरून जावें, हेंच श्रेयस्कर आहे.' असा निश्चय करून त्या गवल राजानें अग्निकुंडांत उद्वेगरहित मनानें आपल्या शरीराची आहुति अर्पण केली. याप्रमाणें ज्यावेळीं इकडे गवल राजाचा देह अग्निराशीवर पडला आणि त्याच्या हस्तपादादि अवयवांनीं पेट घेतला, त्याच वेळीं तिकडे सरोवराच्या पाण्यामध्यें अघमर्षण करीत असलेला गाधि ब्राह्मण त्या दीर्घस्वप्नांतून एकाएकीं जागा झाला.

श्रीवाल्मीकिः—याप्रमाणें वसिष्ठमुनि भाषण करीत आहेत तोंच सूर्यास्ताचा समय झाला, सभेंतील सर्व लोक वसिष्ठमुनींना नमस्कार करून आपापल्या आन्हिक क्रिया करण्यासाठीं निघून गेले व दुसऱ्या दिवशीं सकाळीं सूर्यकिरणांबरोबर पुन्हां सभास्थानीं येऊन आपापल्या स्थानीं विराजमान झाले.

बारावा दिवस समाप्त.

---

## सर्ग ४७

—:०:—

१. अतिथीच्या मुखानें आपल्या चांडाळस्थितीचा वृत्तान्त ऐकून ती स्थिति पाहण्यासाठीं गाधि निघून जातो व त्या स्थितीचा प्रत्यक्ष अनुभव आल्यामुळें विस्मित होतो.

श्रीवसिष्ठः—रामा ! नंतर चार घटकांनीं गाधीचा भवभ्रम नष्ट झाला व समुद्राच्या तीराजवळील पाण्याचा भोंवरा आपोआप शांत होतो, त्याप्रमाणें त्याच्या मनांतील खळबळ शांत झाली. ज्याप्रमाणें कल्पांतकाळीं ब्रह्मदेव जगद्रचनेपासून विराम पावतो, त्याप्रमाणें त्याचें मायेनें निर्माण केलेलें दीर्घस्वप्न विराम पावलें. झोंपेंतून नुकताच उठलेला मनुष्य हळुहळु देहभानावर येतो, किंवा मद्यप्याची निशा उतरली

म्हणजे आपण कोण आहों याची त्याला शुद्धि येते, त्याप्रमाणें त्याची स्थिति झाली; व रात्र सरतांच अंधकाराचें पटल दूर होऊन मनुष्यांना भोंवतालच्या वस्तू स्पष्टपणें दिसूं लागतात, त्याप्रमाणें 'स्नानाकरितां या सरोवरांत उतरलेला मी गाधि ब्राह्मण आहें, मला आतां तर्पणादि कार्ये केलीं पाहिजेत. स्वप्नांत पाहिलेलें तें राज्य माझें नव्हे,' इत्यादि गोष्टी मनांत येऊन त्याला आपल्या वास्तविक स्वरूपाची आठवण झाली. नंतर शिशिरऋतूच्या अखेरीस वसंत कमलाला विकसित करून त्याचा उद्धार करतो, त्याप्रमाणे त्यानें आपला पाय जलांतून बाहेर काढला. 'मी एवढा वेळ राज्यादिकांचा उपभोग घेतला आणि आतां हें पहात आहें हें काय ? हें उदक, ह्या दिशा, ही पृथ्वी हें सर्व आतां निराळेंच दिसत आहे. तेव्हां हें आहे तरी काय ?' असा विचार मनांत येऊन त्याला मोठा विस्मय वाटला आणि क्षणमात्र त्यानें आपल्या भुंवया वर चढविल्या. 'मी कोण आहें ? मी हें काय पहात आहें ? मीं राज्यादिकांचा उपभोग घेतला तें काय ?' असा विचार करतां करतां आपल्याला भ्रम झाला होता, ही गोष्ट त्याच्या लक्षांत आली. त्यानंतर सूर्य उदयाचलावर आरूढ होतो त्याप्रमाणें, पाण्यांतून बाहेर येऊन सरोवराच्या कांठीं बसून तो आपल्याशीं विचार करूं लागला. तो म्हणाला:—'मीं नुकतीच पाहिलेली माता आणि प्रिया कोठली ? तसेंच मी त्यांच्या मध्यें मरून पडलों आहें असें पाहिलें तें तरी काय ? ज्याचीं पानें वायूनें उडवून लावलीं आहेत, अशा एखाद्या वृक्षाचा आणि त्यावरील लतेचा तलवारीनें छेद करावा, त्याप्रमाणें माझे आईबाप तर लहानपणींच मृत्यूनें नष्ट करून टाकले व मी स्वतः अविवाहित असून ज्याप्रमाणें एखादा ब्राह्मण दुष्ट आणि अनर्थकारक मदिरेचें दर्शनहि घेत नाहीं, त्याप्रमाणें मीं अधापपावेतों स्त्रीचें मुखावलोकनहि केलेलें नाहीं. माझ्या जन्मभूमीमध्यें रहाणारे माझे बांधव येथून कितीतरी दूर आहेत. मग मीं त्यांच्यामध्यें मरून पडल्याचें पाहिलें तें काय ? नानाविध चमत्कारांनीं भरलेल्या गंधर्वनगराप्रमाणें मीं जे जे पदार्थ आणि जन्मादिकांचे देखावे पाहिले, यांचा अर्थ तरी काय ? मीं आपल्या मृत्यूची जी स्थिति पाहिली. ती केवळ मायेनें निर्माण केलेली भ्रांति असून त्यांत सत्याचा लवलेशहि नाहीं. ज्याप्रमाणें एखादा मदोन्मत्त सिंह अरण्यांतून भ्रमण करीत असतो. त्याप्रमाणें प्राण्यांचें चित्त निरंतर अनंत भ्रमामध्यें भटकत असतें. यास्तव असल्या भ्रमासंबंधानें विचार करीत बसण्यांत कांहीं अर्थ नाहीं.' अशा रीतीनें मनाचा निश्चय करून त्यानें आपल्या मनांतील मोहाला पार झुगारून दिलें व त्यानंतर कित्येक दिवसपर्यंत तो आपल्या आश्रमांतच राहिला.

पुढें एके दिवशीं ब्रह्मदेवाकडे दुर्वास ऋषि यावा, त्याप्रमाणें त्या गाधि ब्राह्मणाकडे एक प्रिय अतिथी आला. तो अतिथी अतिशय थकून गेलेला असल्यामुळें गाधीच्या आश्रमांत संध्याकाळीं मुक्कामाला राहिला. त्याप्रमाणें वसंतऋतु वृक्षाला फलपुष्पादिकांच्या योगानें संतुष्ट करतो, त्याप्रमाणे गाधि ब्राह्मणानें त्या अतिथीला फळें, पुष्पें व पेय अर्पण करून अतिशय संतुष्ट केलें. पुढें सायंकाळ होतांच त्या दोघांनीं आपलें संध्यावंदन आणि जपजाप्य समाप्त केलें व मृदुपल्लवांच्या शय्या करून त्यावर ते निजण्यासाठीं गेले. त्यावेळीं ऋतूंना ऋतुत्व देणारा जो सूर्य त्याचा उत्तर दिशेशीं योग होतांच वसंतऋतु उत्पन्न होऊन त्यामुळें पुष्पश्री उदित व्हावी, त्याप्रमाणें ते दोघे तापसी एकत्र जमतांच त्यामधिकप्रमाणें

तपश्चर्येसंबंधानें त्यांच्या गोष्टी सुरू झाल्या. प्रसंगवशात् गाधीनें त्या अतिथीला प्रश्न केला, 'महाराज! आपण इतके कृश कां दिसतां? व आपल्याला एवढे श्रम कशानें झाले?' गाधीचा तो प्रश्न ऐकतांच अतिथीनें उत्तर देण्याला प्रारंभ केला.

अतिथीः—भगवन्! मीं इतका कृश कां झालों आणि मला इतके श्रम कशानें झाले, यासंबंधाचा वृत्तान्त जसा घडला तसा मी आपल्यापुढें मांडीत आहें. कारण, असत्य भाषण करणें आम्हांला कधीहि ठाऊक नाहीं. या भूतलावर उत्तर दिशेस कीरनामक एक अतिविख्यात आणि धनाढ्य देश आहे. त्या देशाच्या राजधानींतील लोकांनीं अतिशय आग्रह केल्यामुळें मी त्या ठिकाणीं महिनाभर राहिलों होतों. माझ्या चित्तवेताळानें मोहित केल्यामुळें मी त्या राजधानीमध्यें निरनिराळीं पक्वान्नें खाण्यांत आणि मेजवान्या झोडण्यांत चूर होऊन गेलों होतो. त्या ठिकाणीं रहात असतां एकदां एका मनुष्यानें संभाषणाच्या ओघांत मला एक विचित्र कथा सांगितली. तो म्हणालाः—"ब्राह्मणा! येथें कांहीं दिवसापूर्वी एक चांडाळ राजा होऊन गेला व त्यानें या राजधानींत आठ वर्षे राज्य केलें!' हें त्याचें भाषण ऐकून ती गोष्ट खरी कीं खोटी, यासंबंधाचा निर्णय करण्याकरितां त्या राजधानींतील आबालवृद्धांना मीं त्यासंबंधानें प्रश्न केला. तेव्हां सर्वजण सांगूं लागले कीं, 'ही गोष्ट खरी आहे. आमच्या देशांत एका चांडाळ राजानें आठ वर्षे राज्य केलें. इतकेंच नव्हे, तर पुढें ती गोष्ट उघडकीस आल्यामुळें त्यानें अग्निकुंडांत उडी टाकून आत्महत्त्या केली. त्याप्रमाणें त्या चांडाळ राजाचा आपल्याला सहवास घडल्यामुळें या नगरांतील शेंकडो ब्राह्मणांनीं अग्निप्रवेश केला.' याप्रमाणें सर्वांच्या मुखानें खरी हकीकत कळतांच मीहि त्या देशांतून निघालों आणि प्रयागावर जाऊन चांद्रायण प्रायश्चित केलें. याप्रमाणें तीन चांद्रायणें करून आणि आजच पारणें करून मी या ठिकाणीं आलों, यामुळें मी इतका कृश आणि श्रांत झालों आहे.

श्रीवसिष्ठः—याप्रमाणें गाधीनें ब्राह्मणाच्या तोंडून ती हकीकत ऐकल्यानंतर त्यासंबंधानें त्याला पुनःपुन्हां प्रश्न केले. परंतु त्यानें प्रत्येक वेळीं तीच हकीकत सांगितली, तेव्हां गाधीच्या मनाची खात्री झाली; व ती सर्व रात्र त्यानें आश्चर्यचकित होऊन त्याच विचारांत घालविली. नंतर रात्र संपून जगद्गृहांतील जणुं महादीपच असा सूर्यनारायण उगवला असतां त्यांनीं प्रातःस्नानें केलीं व त्या अतिथीनें गाधीचा निरोप घेऊन प्रयाण केलें. नंतर गाधीनें विस्मययुक्त मनानें आपल्याशीं विचार करण्याला सुरुवात केली. तो म्हणालाः- 'मीं जें भ्रमांत पाहिलें तेंच या ब्राह्मणानें साक्षात् पाहिल्याचें मला आतांच सांगितलें. मग काय ही शंबरासुराची माया म्हणावी कीं काय म्हणावें? आपल्या आप्तामध्यें मरून पडलों आहें असें जें मीं पाहिलें, ती निवळ माया होती, यांत मुळींच शंका नाहीं. आतां या अतिथीच्या चांद्रायणाला निमित्तभूत असलेला चांडालवृत्तान्त खरा कीं खोटा, एवढाच कायतो प्रश्न आहे. परंतु त्यासंबंधाचा शोध केल्यास त्याचा खरेखोटेपणा ताडतां येणें शक्य आहे. तर आतां त्या भूतमंडलनामक गांवाच्या बाहेर असलेल्या म्हारवड्यांत जाऊन मी आतां या गोष्टीची शहानिशा करतों म्हणजे झालें.' अशा रीतीनें विचार करीत असतां मेरुपर्वताचा पार्श्वभाग पहाण्यासाठीं सूर्य उद्युक्त होतो. त्याप्रमाणें भूतमंडलांत जाण्यासाठीं गाधि ब्राह्मण उद्युक्त झाला. उद्योगी ब्राह्मांना मनोराज्यांत

दिसलेल्या गोष्टीहि प्राप्त करून घेतां येतात, मग गाधीला स्वप्नांतील गोष्टीचा अनुभव आल्यास त्यांत विशेष तें काय? गाधीनें स्वप्नांत पाहिलेला सर्व प्रकार जशाचा तसा तेथें जाऊन पाहिला. दृढनिश्चयानें उद्योग केला म्हणजे दुष्प्राप्य वस्तुसुद्धां साध्य होते, याचें हें प्रत्यक्ष उदाहरण आहे. असो. गाधि ब्राह्मण त्या ठिकाणाहून भगवंताची माया प्रत्यक्ष पहाण्यासाठीं वर्षाकालांतील जलाच्या प्रवाहाप्रमाणें त्वरेनें निघाला व वायूच्या अश्वावर आरूढ झालेल्या मेघाप्रमाणें हा हां म्हणतां अनेक देश उल्लंघन करून अखेरीस एखादा उंट कांटेच्या झाडाचा शोध करीत जात असतां करंजाच्या रानाजवळ जाऊन पोहोंचावा त्याप्रमाणें पूर्वी वर्णन केलेल्या भूतमंडळ देशात तो जाऊन पोहोंचला आतां वास्तविक विचार केला तर त्या भूतमंडलाचा देखावा गंधर्वनगराप्रमाणें त्याला त्या ठिकाणीं स्मरण करतांच दिसला. भुवनाच्या खालीं पाताळांतल्या नरकाप्रमाणें त्या ब्राह्मणाला भूतमंडल देशाच्या टोंकाला तो म्हारवडा दिसला व स्वप्नांत पाहिल्याप्रमाणें त्याला त्या ठिकाणीं आपण महार झाल्याच्या सर्व खाणाखुणा जशाच्या तशा दिसल्या. त्या वेळीं 'हाच तो म्हारवडा,' 'हेंच माझें घर' अशा रीतीनें त्याला सर्व वस्तूंची ओळख पटली. चित्तामध्यें गंधर्वनगराप्रमाणें दिसलेला तो गलिच्छ देखावा पाहून त्याच्या मनात अत्यंत वैराग्य उत्पन्न झालें. त्याच्या घरावरील छप्पर पावसाच्या माऱ्यानें उडून जाऊन पलीकडे लोळत पडलें होतें व भिंतींवरून गवत वाढलें होतें. त्या घराच्या भिंती जागोजाग ढासळून पडल्या होत्या व त्याची आंतील निजण्याची खाट बाहेरून दिसत होती. सारांश, तें घर म्हणजे मूर्तिमंत दारिद्र्य, अवशिष्ट राहिलेल्या भिंतींच्या रूपानें दिसणारें जणों दुर्भाग्य, ज्याचे अवयव विस्कळीत झाले आहेत असा जणु दुष्टपणा, किंबहुना छिन्नभिन्न झालेली मूर्तिमंत दुःस्थितीच होती! गाई, म्हशी, घोडे इत्यादि कांच्या हाडांचे कुत्र्यांनीं चघळलेलें पांढरें तुकडे त्याच्या घराभोंवतीं पडले होते व ते तुकडे 'हेंच तुझें घर आहे' अशी जणं साक्ष पटवीत आहेत असें त्याला वाटलें. तो पूर्वी ज्या मातीच्या थाळ्यांतून अन्नपानादि व्यवहार करीत असे, त्याचे घरांभोंवतीं तुकडे पडलेले असून ते जणु काय दैवानें प्राप्त होणाऱ्या मेघजलाचें पानच करून भरून गेले आहेत असें दिसत होतें. त्या घराच्या भिंतीवरून शुष्क झालेली गुरांचीं आंतडीं पसरलीं होतीं व त्यामुळें तें घर मोठमोठ्या तृष्णारज्जूंनींच वेढलें गेलें आहे कीं, असा भास होत होता. ज्याप्रमाणें एखादा तत्त्ववेत्ता आपल्या शवरूपी शुष्क देहाचें निरीक्षण करतो, त्याप्रमाणें गाधीनें आपल्या पूर्वीच्या घराचें बराच वेळ सूक्ष्मदृष्टीनें निरीक्षण केलें. अशा रीतीनें त्या घराकडे पुष्कळ वेळ टक लावून विस्मयपूर्वक पाहिल्यानंतर एखादा प्रवासी म्लेंच्छ नगराचें उल्लंघन करून आर्य देशांत जातो, त्याप्रमाणें गाधि ब्राह्मण तेथून उठला आणि शेजारच्या भूतमंडल नांवाच्या खेड्यांत जाऊन तेथील एका गृहस्थाला म्हणाला, 'भल्या गृहस्था! तुला या गांवाची पूर्वपीठिका कांहीं माहीत आहे का! शहाणे पुरुष मागील इतिहास प्रत्यक्ष पाहिलेल्या गोष्टीप्रमाणें जाणत असतात, असें मीं पंडिताच्या मुखांतून ऐकलें आहे; व तूं शहाणा असल्यामुळें तुला येथील पूर्वेतिहास अवगत असण्याचा संभव आहे. तरी तेथल्या एका वृद्ध चांडाळाची दुर्दैवाची कहाणी तुला आठवत असल्यास ती मला कृपा करून सांग. कारण, पांथस्थाचा संशय घालविल्यानें मोठें पुण्य लागतें.' एखादा रोगग्रस्त मनुष्य जो जो वैद्य भेटेल त्याला आपला

योगासंबंधानें प्रश्न विचारीत सुटतो, त्याप्रमाणें तो गाधि ब्राह्मण गांवांतलि प्रत्येक मनुष्याला विस्मयपूर्वक तोच तोच प्रश्न अत्यंत आश्चर्यानें विचारूं लागला. तेव्हां ग्रामस्थ लोक सांगूं लागले.

ग्रामस्थः—ब्राह्मणा ! तूं म्हणतोस त्याप्रमाणें येथें कटंज नांवाचा एक मोठा क्रूर आणि भीषणाकृति चांडाल होता खरा. एखाद्या वृक्षाला पालवी फुटून तो पल्लवांनीं भरून जावा, तद्वत् पुत्र, पौत्र, सुहृद, भृत्य, बांधव इत्यादिकांच्या समुदायामुळें त्याचें कुटुंब एका काळीं भरलेलें होतें. परंतु ज्याप्रमाणें फलपुष्पादिकांच्या योगानें भरून गेलेल्या पर्वतावरील अरण्याची दावानलानें क्षणांत वाट लावावी, त्याप्रमाणें त्याच्या अत्यंत विस्तार पावलेल्या कुटुंबाची तो वृद्ध झाल्यावर मृत्यूनें वाट लावली. नंतर तो कटंज कीर देशांत गेला व तेथें त्यानें मोठ्या आनंदानें आठ वर्षें राज्य केलें. पुढें लोकांना त्याची खरी जात कळतांच एखाद्या अनर्थाला भिऊन लोक पळून जातात, किंवा एखाद्या गावांतील विषवृक्षाचा सर्वजण त्याग करतात, त्याप्रमाणें त्या नगरांतील लोकांनीं त्याचा त्याग केला. त्याच्या संसर्गाचें पाप नष्ट करण्याकरितां तेथील नागरिकांनीं अग्निकाष्टें भक्षण केलीं व त्यानेंहि स्वतः आपल्या देहाची अग्नींत आहुति दिली. कारण, तो जरी चांडाल होता तरी सज्जनांच्या सहवासामुळें त्याच्या ठिकाणीं श्रेष्ठ गुण आले होते. ब्राह्मणा ! तूं त्या चांडाळाविषयीं इतक्या बारकाईनें तपास करीत आहेस, त्याअर्थीं तो तुझा बंधु आहे किंवा तूं स्वतःच तो कटंज होतास ?'

याप्रमाणें लोक गाधीला थट्टेनें बोलत तरी तो ज्याला त्याला त्या कटंजाची हकीकत विचारीत असे; व अशा रीतीनें तो त्या गांवामध्यें एक महिना राहिला. गाधीनें स्वप्नामध्यें जें पाहिलें होतें तें जसेंच्या तसें ग्रामस्थांनीं त्याला सांगितलें. याप्रमाणें सर्व लोकांच्या तोंडून इत्थंभूत हकीकत ऐकून आणि पाहिलेल्या सर्व खाणाखुणा पटून गाधीला मोठा विस्मय वाटला व चंद्रावरील कलंकाप्रमाणें अंतःकरणावर आरूढ झालेला स्वप्नदोष त्याच्या मनांत डाचूं लागला. परंतु ती गोष्ट कोणाला कळूं न देतां त्यानें तशीच दाबून ठेवली.

## सर्ग ४८

१. कीर नगरांत जाऊन गाधि तेथील स्थिति प्रत्यक्ष पहातो व त्यामुळें आश्चर्यचकित होतो. २. गाधीला दिसलेली सर्व माया आहे असें भगवान् सांगतात.

श्रीवसिष्ठः—राघवा ! त्या चांडाळाच्या घरांत गढून गेलेलें गाधीचें मन अत्यंत विस्मित झालें व तेथील आश्चर्य पहात असतां त्याची तृप्ति म्हणून होईना. ज्याप्रमाणें कल्पांतकाळीं उध्वस्त झालेल्या जगाकडे ब्रह्मदेव पहातो, त्याप्रमाणें त्या महारवड्यांतील निरनिराळीं स्थानें आणि घरें यांच्याकडे गाधि आश्चर्यानें पाहूं लागला. ज्याप्रमाणें शुष्क झालेल्या अस्थींच्या माळा ज्यावरून लोंबत आहेत अशा एखाद्या वृक्षावर बसून पिशाच्चानें बोलावें, त्याप्रमाणें ज्यांतील घरें छिन्नभिन्न झालेलीं आहेत अशा त्या अरण्यांत बसून तो स्वगत भाषण करूं लागला. तो म्हणाला:—'हा पहा येथील पडक्या भिंताडावर लोंबकळत ठेवलेल्या मृत हत्तींच्या दंतमाला ! मेरूची शिखरें कल्पांतापर्यंत अवशिष्ट रहातात, त्याप्रमाणें ह्या अद्याप काळाच्या तडाक्यांतून शिल्लक राहिल्या असून त्या मला या ठिकाणीं प्रत्यक्ष दिसत आहेत. याच ठिकाणीं मीं पूर्वी मद्यप्राशन करून उन्मत्त झालेल्या बांधवासहवर्त-

मान वेळूंच्या कोंबांचें वंजन घालून शिजविलेलें वानरीचें मांस भक्षण करीत असें. अहो! ज्यांत हत्तींच्या गंडस्थळांतून वहाणाऱ्या मदाचें मिश्रण केलेलें आहे असें मैरेय नांवाचें मद्य प्राशन करून घोड्याच्या चामड्यावर आपल्या काळ्या कुट्ट भार्येला आलिंगन देत मी ह्याच ठिकाणीं खुशाल झोंप घेत असें. याच ठिकाणीं आमच्या घरांतील कुत्र्यांना रक्ताची पेंड आणि मांस खावयास घालून मी त्यांना चामड्याच्या वाद्यांनीं मलेल्या हत्तींच्या दंतस्तंभांना बांधून ठेवीत असें. एखाद्या ढगाप्रमाणें दिसणाऱ्या रेड्याच्या चामड्यानें मढवलेलें गजमौक्तिक सांठवून ठेवण्याचें हस्तिदंती पात्र मी ह्या ठिकाणीं ठेवीत असें. ज्याप्रमाणें आम्रवृक्षाच्या पल्लवावर कोकिळांचीं पिलें क्रीडा करतात, त्याप्रमाणें चांडाळांच्या पोरांबरोबर या ठिकाणीं धुळीमध्यें दिवसभर खेळत लोळत होतों. या ठिकाणीं चांडाळांच्या लहान लहान मुलांबरोबर आपल्या हातांतील पांवे वाजवून त्या तालसुरावर गायन करीत होतों. कुत्र्याचें रक्त यथेच्छ पिऊन स्मशानांतील शवाच्या अंगावरील फुलांच्या माळा आपल्या गळ्यांत घालीत असे, व सर्व अंगाला चंदन फांसीत असे. या ठिकाणीं आम्ही लग्नसमारंभांत आपल्या कुटुंबाबरोबर गायन आणि नृत्य करीत असतां समुद्रांतील प्रचंड लाटांच्या गर्जनेप्रमाणें दशदिशा दणाणून सोडीत असूं. तसेंच काक, भास वगैरे गगनसंचार करण्यांत पटाईत असलेल्या पक्ष्यांना धरून आम्हीं त्यांना वेळूच्या पिंजऱ्यांत कोंडून ठेवीत असूं व त्यांना दुसऱ्या दिवशीं मारून खात असूं!'

**श्रीवासिष्ठः**---रामा! याप्रमाणें तो गाधि ब्राह्मण आपल्या चांडाळयोनींतील क्रिया आठवून आश्चर्यचकित झाला, व दैवाच्या विचित्र लीलेबद्दल मनांत अनेक तर्कवितर्क करूं लागला. तो तेथें बराच काळ राहिला. नंतर तो त्या भूतमंडल देशांतून निघाला. कारण, त्याला दुसरें कार्य करावयाचें होतें. पुढें भूतमंडल सोडल्यानंतर क्रमानें नद्या, पर्वत व अरण्यें यांचें उल्लंघन करून हिमालयांतील रत्नाप्रमाणें असलेल्या कीर देशांत तो जाऊन पोहोंचला. ज्याप्रमाणें सर्व जगांमध्यें भ्रमण करून थकलेल्या नारदानें स्वर्गलोकांत जावें, त्याप्रमाणें मोठमोठ्या वाड्यांनीं सुशोभित झालेल्या त्या देशाच्या संपन्न राजधानीमध्यें तो अखेरीस जाऊन पोहोंचला. त्या ठिकाणीं गेल्यावर तेथील पदार्थ आणि स्थानें आपण पूर्वी पाहिल्याचें त्याला आढळून आलें, व तथील सर्व खाणाखुणा त्याला बरोबर पटल्या. पुढें एका गृहस्थाला त्यानें प्रश्न कला, 'भल्या गृहस्था! या देशांत पूर्वी एक चांडाळ राजा राज्य करीत होता असें ऐकतों; तर ती गोष्ट खरी आहे कीं काय? तुला त्यासंबंधानें कांहीं माहिती असेल तर ती मला इत्थंभूत निवेदन कर.' यावर तो गृहस्थ म्हणाला:---'ब्राह्मणा! तूं म्हणतोस ती गोष्ट मला चांगली माहीत आहे. येथें आठ वर्षेपर्यंत एक चांडाळ राजा राज्य करीत होता. त्याला मंगल हत्तीनें राज्यपद दिलें असल्यामुळें त्यासंबंधानें सकृद्दर्शनीं कोणालाहि शंका आली नाहीं. परंतु पुढें कांहीं कारणानें त्याची जात उघडकीस आल्यामुळे त्या राजानें अग्निप्रवेश केला. बा द्विजा! या गोष्टीला आज बारा वर्षे होऊन गेलीं आहेत.' पुढें आश्चर्यचकित झालेल्या गाधीनें ज्याला ज्याला म्हणून ती हकीकत विचारली, त्यानें त्यानें हुबेहुब तशीच हकीकत सांगितली. यामुळें गाधीच्या आश्चर्याला पारावार नाहींसा झाला. पुढें जिच्या आगमनामुळें धुळीचे लोट उसळून आकाश मेघांनीं व्यास झाल्यासारखें दिसत आहे, अशा

मोठ्या सेनेसहवर्तमान राजवाड्यांतून येणारा त्या देशाचा राजा त्याच्या दृष्टीस पडला. परंतु भगवंताच्या अनुग्रहामुळें त्याला तो राजा श्रीविष्णूप्रमाणें दिसला. त्या वेळीं आपल्या पूर्वीच्या राजत्वाचें गाधीला स्मरण झालें व अत्यंत विस्मित होऊन तो आपल्याशीं म्हणाला " पूर्वी मी कीर देशाचा अधिपति असतां ज्यांचा उपभोग घेतला, त्याच ह्या कीर देशांतील सुंदर वेश्या ! ह्यांच्या शरीराचा वर्ण सुवर्णरसाप्रमाणें आहे, अंगकांति कमलांच्या आंतील गाभ्याप्रमाणें मृदु आहे आणि यांचे नेत्र नीलकमलांप्रमाणे मोहक दिसत आहेत. तसेंच मूर्तिमान् चंद्रकिरणांप्रमाणें स्वच्छ दिसणाऱ्या किंवा पर्वतांवरून वहाणारे ओढे स्थिर झाल्यावर दिसतात त्याप्रमाणें दिसणाऱ्या ह्या सुंदर चवऱ्या वारल्या जात असतां या तरुणींच्या हातांतून पुष्पाच्या गुच्छांप्रमाणें कशा शोभत आहेत ! ह्या सुंदरी हातांत पंखे घेऊन या राजाला वारा घालीत आहेत, ते पंखे रानवेलीवरील पुष्पगुच्छाप्रमाणें दिसत आहेत. ज्यांच्यामुळें दिशांचे तट व्यापून गेलेले आहेत असे हे मदोन्मत्त हत्तींचे समुदाय प्रत्यक्ष कल्पवृक्षांनीं पूर्ण मेरुपर्वताचीं शिखरेंच आहेत कीं काय असें वाटते. ज्याप्रमाणें इंद्राच्या भोंवतीं यम, वरुण, कुबेर वगैरे लोकपाल शोभत असतात, त्याप्रमाणें ह्या राजाच्या भोंवतीं हे मांडलिक राजे कसे शोभत आहेत. हे पहा सर्व भोग्यवस्तूंनीं भरलेले आणि सर्वांना इच्छित पदार्थ प्राप्त करून देणारे मोठमोठे वाडे कल्पवृक्षांवरील लतांच्या कुंजांप्रमाणें कसे मनोहर दिसत आहेत ! ह्या संपूर्ण कीर देशाचें पूर्वी भोगलेलें राज्यवैभव मी आज पूर्व जन्मींच्या चरित्राप्रमाणें प्रत्यक्ष अवलोकन करीत आहें. पूर्वी स्वप्नाप्रमाणें पाहिलेला हा सर्व देखावा सध्यां जागृतीमध्यें माझ्या डोळ्यांसमोर दिसत आहे. हें सर्व मायेचें दीर्घ स्वप्न कोणी आणि कां निर्माण केलें आहे कोण जाणे ! हा केवढा चमत्कार आहे कीं, या दीर्घ मनोमोहानें जाळ्यांत अडकवलेल्या पक्ष्याप्रमाणें मला अगदीं वेढावून सोडलें आहे. माझें हें अप्रबुद्ध मन वासनेमुळें नष्टप्राय झालें आहे. अशा ह्या माझ्या मनाला धिक्कार असो ! माझें मन एखाद्या वेडगळ पोराप्रमाणें भ्रमांतील गोष्टींना सत्य मानून चाललें आहे ! हा ! आत्तां आठवण झाली! मजवर प्रसाद करणाऱ्या श्रीविष्णूनें पूर्वी वचन दिल्याप्रमाणें ही आपली भयंकर माया मला दाखविली असावी. हो; मागें झालेला सर्व प्रकार मला आतां चांगला आठवत आहे. तरी आतां अगोदर एखाद्या गिरिकंदरांत जाऊन या भ्रमरूपी मायेची उत्पत्ति आणि स्थिति समजावून घेतों म्हणजे झालें," असा विचार करून गाधि ब्राह्मण त्या कीर नगरांतून निघाला, तो थेट एका गिरिकंदरांत जाऊन एकाद्या सिंहाप्रमाणें विश्रांति घेत बसला. त्या ठिकाणीं रोज चुळकाभर पाणी पिऊन त्या महातेजस्वी ब्राह्मणानें भगवान् श्रीविष्णूच्या प्रसन्नतेकरितां दीड वर्षपर्यंत घोर तपश्चर्या केली, अखेरीस नीलकमलांनीं युक्त असल्यामुळें श्यामवर्ण दिसणारा आणि उदक हेंच ज्याचें स्वरूप आहे असा पाण्याचा डोह शरदृतूंमध्यें प्रसन्न दिसावा, त्याप्रमाणें प्रसाद हाच ज्याचा स्वभाव आहे, असे भगवान् श्रीविष्णु त्याच्यावर प्रसन्न झाले; व आकाशांतील नीलवर्ण मेघापेक्षांहि ज्यांची अंगकांति रमणीय आहे, असे भगवान् गाधि ब्राह्मणाच्या त्या गिरिकंदरावरील आकाशांत येऊन उभे राहिले.

**श्रीभगवान्:**—गाधे ! माझी महाभयंकर माया तूं पाहिलीस का ? तसेंच हें जगज्जालचेष्टित कसें मिथ्या आहे, हें आतां तरी तुझ्या अनुभवास आलें का ? माझी माया प्रत्यक्ष

पहावी असा जो तुझा हेतु होता तो पूर्ण झाला आहे; मग तूं परमशुद्ध असूनहि हें तप कशाकरितां करीत आहेस ? तुझी आणखी कांहीं इच्छा आहे कीं काय ?

**श्रीवसिष्ठः**—रामा ! याप्रमाणें भाषण करणाऱ्या श्रीविष्णूला अवलोकन करतांच त्या द्विजश्रेष्ठ गाधीनें त्याचें उत्तम प्रकारच्या पुष्पांनीं पूजन केलें आणि त्याला अर्घ्य देऊन प्रदक्षिणा घातल्या आणि मेघाला पाहून आनंदानें चातक शब्द करतो त्याप्रमाणें, त्यानें हरीशीं भाषण करण्याला सुरवात केली.

**गाधिः**—भगवन् ! ही घोर माया आपण मला दाखविली, परंतु तिचें खरें तत्त्व मला समजलें नाहीं. तरी ज्याप्रमाणें प्रभातकाळचा सूर्य पृथ्वीला प्रकाशित करतो, त्याप्रमाणें भगवान् ! आपल्या मायेचें स्वरूप मला समजावून सांगा. देवा ! वासनारूपी अनेक मलांनीं भरलेलें माझें मन स्वप्नामध्यें जें जें पहात गेलें, तें तें सर्व जागृतावस्थेंतहि खरं कसे झालें ? जलामध्यें अघमर्षण करीत असतां मला जो स्वप्नभ्रम मुहुर्तमात्र झाला, तो आज जागृतींतहि प्रत्यक्ष कसा झाला ? मला भ्रम झालेला काळ घटका दोन घटकांचा होता, पण तो भूतमंडलादि देशांत अनेक वर्षेपर्यंत कसा टिकला ? तसेंच चांडाळ जन्म, त्याचा नाश वगैरे गोष्टी केवळ माझ्या मनांतील भ्रम असतां त्या त्या गोष्टी बाहेर सत्य कशा दिसल्या ?

**श्रीभगवानः**—गाधे ! हा सर्व आपल्या वासनांचा खेळ आहे. तुला जो जगाचा विस्तीर्ण भ्रम दिसला, तो तुझ्या चित्तांतच दिसला. पर्वत, नद्या, समुद्र, वृक्ष इत्यादि जे जे पदार्थ आपल्या प्रत्यक्ष बाहेर दिसतात, ते ते सर्व वृक्षाच्या अंकुरांत अव्यक्तरूपानें असणाऱ्या पानांच्या समुदायाप्रमाणें आपल्या चित्तांतच असतात; व ज्याप्रमाणें एखाद्या अंकुरामध्यें अव्यक्त स्थितींत असलेलीं पत्रें, पुष्पें वगैरे काळें करून आंतून प्रकट होतात, त्याप्रमाणें पृथ्वी आदिकरून वस्तू चित्तामध्यें असून त्यांतूनच बाहेर प्रकट होतात. ज्या अर्थी फलादिकांची संपत्ति अंकुरांतून प्रकट होते त्या अर्थी ती अंकुरामध्यें असते असें मानल्याशिवाय गत्यंतर नाहीं. त्याचप्रमाणें हें सर्व जग बाहेर कोठें नसून आपल्या चित्तांतच असतें. ज्याप्रमाणें कुंभार आपल्या कल्पनेनें घट निर्माण करतो आणि तो फोडूनहि टाकतो, त्याप्रमाणें चित्त हें भूत, भविष्य व वर्तमानकाळीं भासमान होणाऱ्या क्रिया कल्पनेनें निर्माण करतें आणि पुन्हा त्यांचा उपसंहार करतें. स्वप्न, भ्रम, उन्मत्त स्थिति, राग, रोग वगैरे दशांमध्यें वासनामय चित्त निरनिराळे आकार कसे धारण करतें, याचा लहानापासून थोरापर्यंत सर्वांना अनुभव आहे. ज्याचीं मुळें भूमीमध्यें लांबवर पसरलेलीं आहेत अशा वृक्षावर पुष्पें आणि फळें येतात, त्याप्रमाणें वासनायुक्त चित्तामध्यें लक्षावधि गोष्टी घोळत असतात. परंतु वृक्षाचीं मुळेंच छेदून टाकलीं म्हणजे त्याच्यावर पानें येण्याची शक्यता नसते, त्याप्रमाणें ज्याचें चित्त निर्वासन झालें आहे, अशा जीवाला पुनर्जन्मादि अवस्था प्राप्त होणें केव्हांहि शक्य नाहीं. बा गाधे ! ज्याच्यामध्यें अनंत जगज्जाल भरलेलें आहे, अशा चित्तानें आपल्या प्रभावानें चांडालत्व प्रकट केलें, तर त्यांत आश्चर्य तें काय ? परंतु तो केवळ तुझ्या चित्तानें उत्पन्न केलेला भ्रम होता, तुझें दुःखकारक चांडालत्व हा जसा भ्रम आहे, तसेंच तुझ्याकडे अतिथि येणें, त्याच्यासहवर्तमान तूं भोजन करणें, निजणें, गोष्टी बोलणें वगैरे प्रकारहि भ्रमांतलाच आहे. त्याप्रमाणें स्वप्नांतील गोष्टी कितपत खऱ्या आहेत हें पहाण्यासाठीं तुझें जाणें, भूतमंडलांत जाऊन पोहोंचणें व

तेथील स्थिति प्रत्यक्ष पहाणें हा सुद्धां निवळ भ्रम होय. भूतमंडलाबाहेरच्या म्हारवड्यांत तूं पाहिलेलें पडकें घर, तेथील लोकांनीं सांगितलेली कटंजाची हकीकत, तुझें कीर देशांत गमन, कीर देशांतील लोकांनीं चांडाळ राजा झाल्याबद्दल सांगितलेला वृत्तान्त, यांत तरी खरें काय आहे? बा द्विजश्रेष्ठा! अशा रीतीनें तूं जें जें आपल्या डोळ्यांनीं पाहिलें म्हणून म्हणतोस व जें जें सत्य किंवा असत्य म्हणून मानतोस, तें तें सर्व मोहजाल आहे. कारण, वासनायुक्त चित्त काय काय चमत्कार घडवून आणणार नाहीं? ज्या गोष्टी घडण्याला वर्ष लागावयाचें त्या गोष्टी वासनाजालामध्यें गुरफटून गेलेलें स्वप्नांतील चित्त एका क्षणांत घडवून आणतें. सारांश, महाबुद्धिमान् गाधे! तो अतिथि, ते लोक, तो कीर देश, ती त्या देशाची राजधानी वगैरे सर्व तुझ्या व्यामोहामुळें तुला दिसलें व तें तुला खरें वाटलें. ज्याप्रमाण एखादें हरिण उड्या मारमारून थकलें म्हणजे अरण्यांत एखाद्या ठिकाणीं जाऊन स्वस्थ पडतें, त्याप्रमाणें त्या अतिथीनें सांगितलेला वृत्तान्त ऐकून त्याच्या खरेखोटेपणाची शहानिशा करण्यासाठीं जात असतां वाटेंत थकून जाऊन तू एका गिरिकंदरांत जाऊन बसलास; व तुझ्या मनांत घोळत असलेल्या गोष्टींमुळें आणि श्रमामुळें चित्त परवश होऊन त्या भूतमंडळाचा आणि त्यांतील चांडालगृहाचा भ्रामक देखावा तुला त्या ठिकाणींच दिसला. त्याचप्रमाणें त्या वेळीं आणि अघमर्षणकालीं कीर देशांतील मायिक स्थिति तुझ्या प्रत्ययास आली. तात्पर्य, ज्याप्रमाणें एखाद्या उन्मत्त मनुष्याला त्याच्या मनांतील भ्रमामुळें निरनिराळे देखाव मिथ्याच दिसतात, त्याप्रमाणें तुला ते निरनिराळे देखावे दिसले. परंतु बा मुने! तो केवळ तुझ्या मनाचा भ्रम होता. याकरितां ऊठ, शांत हो आणि आपलें स्वकर्म करण्याला लाग. कारण, **स्वकर्माचें अनुष्ठान केल्याशिवाय मनुष्यांना या जगांत श्रेयःप्राप्ति होत नाहीं.**

**श्रीवसिष्ठः**—रामा! याप्रमाणें भाषण केल्यानंतर भगवच्चरणांचा स्पर्श आणि सेवा यांच्या योगानें ज्यांचे हात पवित्र झाले आहेत, असे देव आणि मुनी यांनीं वेष्टिलेले त्रिभुवनांतील तापसांना पूज्य असलेले भगवान् श्रीविष्णु स्वस्थानीं निघून गेले.

# सर्ग ४९

— :०: —

१. भगवंताच्या उपदेशाचा प्रत्यय घेण्यासाठीं गाधि पुन्हां कीर देशांत जाऊन आपली खात्री करून घेतो. २. सर्व माया आहे असा निश्चय झाल्यामुळें गाधीची जीवन्मुक्तस्थिति.

**श्रीवसिष्ठः**—राघवा! भगवान् श्रीविष्णु निघून गेल्यानंतर भगवंतांच्या उपदेशाचा प्रत्यय घेऊन आपल्या मोहाचा निरास करण्यासाठीं आकाशांतील मेघाप्रमाणें गाधि ब्राह्मण भूतमंडल व कीर देशांत हिंडला व तेथील लोकांच्या तोंडून तोच वृत्तान्त ऐकून त्यानें आपल्या मनाची खात्री करून घेतली आणि शेवटीं आपल्या गिरिकंदरांत जाऊन श्रीहरीची पुन्हां आराधना केली. पुढें थोड्याच वेळानें भगवान् गाधीसमोर येऊन उभे राहिले. कारण उघडच आहे कीं, हरीची एकदां आराधना करून तो प्रसन्न झाला, म्हणजे त्यानें आपल्या भक्ताला पुन्हां पाहिजे त्या वेळीं दर्शन दिलें तर काय आश्चर्य? असो. नंतर ज्याप्रमाणें मेघ मोराशीं भाषण करतो त्याप्रमाणें गाधीवर प्रसन्न होऊन भगवान् त्याला म्हणाले, 'गाधे! तुझी आणखी काय इच्छा आहे? तू पुन्हां तपश्चर्या करीत आहेस याचें कारण काय?'

गाधिः—देवा ! मी भूतमंडल व कीर देश यांमध्यें सहा महिने प्रवास केला व तेथील लोकांना पुनःपुन्हां अनेक प्रकारचे प्रश्न करून पाहिले. पण त्या सर्वांनीं एकच उत्तर दिलें. कोणाच्याहि सांगण्यात मला यत्किंचितहि फरक आढळून आला नाहीं. परंतु प्रभो ! आपण तर म्हणतां कीं, मी हा सर्व देखावा मायेमुळें पाहिला. तरी यासंबंधानें मला कांहींच उलगडा करतां येत नाही. तेव्हां या दोहोंतील मीं कोणतें खरें मानावें, हें मला आपण कृपा करून सांगा. कारण, महात्म्यांची वाणी मोहाची निवृत्ति करते, तो केव्हांहि वृद्धिंगत करीत नाहीं.

श्रीभगवान्‌ः—बा गाधे ! ज्याप्रमाणें तुझ्या चित्तांत चांडालस्थिति काकतालीय योगानें प्रतिबिंबित झाली, त्याचप्रमाणें ती भूतमंडल आणि कीर या देशांतील लोकांच्याहि मनांत प्रतिबिंबित झाली व यामुळेंच त्या ठिकाणचे लोक तुला तो वृत्तान्त जसाचा तसा सांगतात. कारण, एकदा झालेला प्रतिभास बाधित न झाल्यास अंतःकरणांतून कधींहि नाहींसा होत नाहीं, असा नियम आहे. कोणा तरी चांडाळानें भूतग्रामाबाहेर बांधलेलें घर तुला दिसलें व तेंच पूर्वीं आपण बांधलें होतें, अशी तुला भ्रांति झाली. आतां कदाचित तू असा प्रश्न करशील कीं, ‘ मी घर बांधलें अशी मला भ्रांति झाली असेल. पण त्या म्हारवड्यांतील लोकांनीहि हें कटंजाचें घर आहे असें सांगितलें, याची वाट काय ? ’ परंतु याचें समाधान असें आहे कीं, एकच प्रतिभास केव्हां केव्हां अनेकांना होतो असा अनुभव आहे. कारण, एखाद्या ताडाच्या झाडावर कावळा बसतांच त्या झाडाची फांदी अकस्मात्‌ मोडली असतां ती फांदी मोडण्याचें कारण तो कावळा आहे, असा पाहणारांना भास होतो, त्याप्रमाणें सर्वांच्या मनाला पुष्कळ वेळां एकच भास होतो. ज्याप्रमाणें स्वप्न, भ्रम, दारूची धुंदी वगैरे स्थितींमध्यें असलेल्या मनुष्यांना पृथ्वी गरगर फिरत आहे असा भास होतो, त्याचप्रमाणें पुष्कळ मनुष्यांना क्वचित्‌ एकच स्वप्न पडतें. हिरव्या गार गवतानें आच्छादिलेल्या एखाद्या कुरणांत अनेक हरिणांचीं पारें बागडत असतात, किंवा एकाच खेळांत अनेक मुलें रममाण होतात; एखाद्या सैन्यांतील निरनिराळ्या सैनिकांना प्रारब्धानुसार वध, बंध, पराजय, पलायन इत्यादि फळें एकाच वेळीं प्राप्त होतात व तदनुसार ते एकाच वेळीं युद्धादि क्रिया करीत असतात, ही गोष्ट प्रसिद्धच आहे. एकच काळ एखाद्या ऋतूंतील कित्येक धान्यांना प्रतिबंधक आहे आणि कित्येक धान्यांचा पोषक आहे, असें लोक म्हणत असतात. परंतु काल हा सुद्धां कल्पनामात्रच आहे. कारण, सूर्याच्या काल्पनिक गतीवरून मास, ऋतू वगैरे कल्पना मनुष्यांनी केलेल्या आहेत. अर्थात्‌, दिवस, महिना, ऋतु वगैरे कालाचे विभाग मनःकल्पित आहेत. असेंच ठरतें. परंतु तो काल अखंडित आहे, तो अमर्त असून आहे. तो ब्रह्मस्वरूपी भगवान्‌ काल निरंतर स्वस्वरूपांत स्थित असतो व तो कधीं कोणाला कांहीं देत नाहीं व कोणापासून कांहीं घेत नाहीं. आतां या महाकालाचा जो अंशात्मक लौकिक काल आहे, तो वर्ष, कल्प, युग वगैरे विभागांनीं कल्पिला जातो. ही कालाची गणना सूर्य, चंद्र यांच्या गतीवरून केली जाते व त्यावरून अमुक काल अमक्या पदार्थांच्या उत्पत्तीला अनुकूल किंवा प्रतिकूल आहे, असें मानण्याचा प्रघात पडला आहे. बा गाधे ! भ्रांतचित्त पुरुषांना समान प्रतिभासामुळें उत्पन्न होणारा भ्रम एकसारखाच वाटतो, त्याप्रमाणें भूतमंडल व कीर या देशां-

तील सर्व लोकांनीं कटंजाला पाहिलें, यांत वास्तविक कांहींच आश्चर्य नाहीं. यासाठीं या भ्रमासंबंधाच्या कल्पनेला अजिबात फांटा दे आणि आपल्या वर्णाश्रमोचित कर्मामध्यें तत्पर होऊन सूक्ष्मबुद्धीनें आत्म्याचाच विचार कर, व आत्मज्ञान प्राप्त करून घेऊन आणि या मनोमोहाचा त्याग करून याच ठिकाणीं सुखानें रहा. आम्हींहि आतां आपल्या स्वस्थानीं जातों.

राघवा! याप्रमाणें भाषण करून भगवान् श्रीविष्णु अंतर्धान पावले व व्याकुलचित्त झालेला गाधि त्या गिरिकंदरांतच राहिला. पुढें कांहीं महिने उलटून गेल्यानंतर त्यानें पुन्हां श्रीविष्णूची आराधना केली. तेव्हां पूर्वीप्रमाणें भगवान् श्रीविष्णु एके दिवशीं प्रगट झाले. भगवंतांना पहातांच गाधीनें त्यांना प्रणाम केला आणि कायेनें, वाचेनें आणि मनानें त्यांची पूजा केली. त्यानंतर गाधि भगवंतांना म्हणाला.

**गाधिः**—भगवन्! त्या चांडालस्थितीचें स्मरण माझ्या मनांतून अद्याप जात नाहीं व यामुळें मला पुनःपुन्हां मोह पडतो. याकरितां या महामोहाची निवृत्ति व्हावी यासाठीं मला आत्मवस्तूचें यथार्थ ज्ञान करून देऊन त्याच्याच अनसंधानामध्यें माझें मन गढून जाईल असं करा. दर वेळेला उपाय सांगून निघून जातां तसें करूं नका. मोह निवृत्त होईपर्यंत थांबा.

**श्रीभगवान**—ब्रह्मन्! हें जग म्हणजे महामायेनें उत्पन्न केलेलें विचित्र अवडंबर असून आत्मतत्त्वाचें विस्मरण झाल्याबरोबर या जगांत पाहिजे त्या विचित्र कल्पना संभवतात. सामान्यतः मनुष्यांना स्वप्नस्थितीमध्यें पाहिजे त्या गोष्टी दिसतात, त्याचप्रमाणें भूतमंडलांतील आणि कीरदेशांतील लोक तुझ्या भ्रमामुळें तुला दिसले व त्या असंभवनीय गोष्टी खऱ्याखुऱ्या आहेत असें तुला वाटलें. तसेंच त्या देशांतील लोकांच्या संकल्पामुळें त्यानाहि त्या तुला दिसल्या तशा गोष्टी त्याच वेळीं दिसल्या व त्या त्यांना सुद्धा खऱ्या वाटल्या. असो. आतां त्या चांडाळाच्या हकीकतीमुळें तुझ्या मनाला लागून राहिलेली चिंता मार्गशीर्ष महिन्यांतील लतेप्रमाणें क्षीण होण्याचा उपाय मी तुला सांगतो तो ऐक. भूतमंडलामध्यें कटंज या नांवाचा एक चांडाळ पूर्वीं खरोखरच होऊन गेला. त्याचें घरदार, पुत्र, भार्या वगैरे तूं जसें पाहिलें होतेंस तसेंच होतें. पुढें कांहीं दिवसांनीं त्याची बायको मेली व कुटुंब उध्वस्त झालें, तेव्हां तो भूतमंडल देशांतून निघून भ्रमण करूं लागला; व तोच कीर देशांत राजा झाला व अखेरीस त्याचें चांडालत्व उघडकीला आल्यामुळें त्यानें अग्निप्रवेश केला. या सर्व गोष्टी पूर्वीं खरोखरी घडल्या होत्या व त्याच कालांतरानें तुझ्या चित्तांतील संकल्पदोषामुळें तुला अघमर्षणकालीं दिसल्या, एवढेंच काय तें. मात्र तो कटंज आपण पूर्वीं पाहिला होता याचें तुला विस्मरण झालें व हे सर्व मी स्वतः अनुभवीत आहें, असा तुला भ्रम झाला. ज्याप्रमाणें पूर्वीं पाहिलेल्या अनेक गोष्टी मनुष्य विसरतो, त्याचप्रमाणें कित्येक वेळां पूर्वीं न पाहिलेल्या गोष्टी पूर्वीं अनुभूत असल्याप्रमाणेंहि मनुष्य पहातो. ज्याप्रमाणें स्वप्न, मनोराज्य, पित्तवाय इत्यादि अवस्थामध्यें मनुष्याला अनेक भ्रम दिसतात, त्याप्रमाणें जागृतीमध्यें सुद्धां मनाला कित्येक वेळां अकल्पित भ्रम प्रत्यक्ष दिसतात. त्रिकालज्ञ योग्यांना जर भविष्यकाळीं घडणाऱ्या गोष्टी भूतकाळांत घडल्याप्रमाणें दिसूं शकतात, तर बा गाधे! भूतकाळांत घडलेल्या कटंज कथेच्या गोष्टी वर्तमानकाळीं घडत असल्याप्रमाणें तुला दिसल्या, तर त्यांत विशेष काय? आतां या ठिकाणीं तूं कदाचित् असं मिचारशील कीं, 'कटंज नांवाचा चांडाल पूर्वीं होऊन गेला असेल,

पण तोच मी असा भ्रम मला कसा झाला? परंतु यांतहि विशेष आश्चर्य वाटण्यारारखें कांहीं नाहीं. कारण, आत्मज्ञान नसलेले पुरुष आत्म्याहून भिन्न असलेल्या देह, पुत्र, मित्र, स्त्री इत्यादिकाच्या संबंधानें 'हा मी' आणि 'हें माझें' अशा तऱ्हेचा मिथ्या अभिमान धारण करतांना दिसतात, मग तुला सुद्धां 'मी कटंज आहें' व 'हें माझें कुटुंब आहे' असा भ्रम उत्पन्न झाला, याबद्दल आश्चर्य वाटण्याचें काय कारण आहे? 'मी' आणि 'माझें' हा अभिनिवेश आत्मज्ञानरहित पुरुषांच्या ठिकाणीं उत्पन्न होतो, आत्मवेत्त्याच्या ठिकाणीं असला भ्रम केव्हांच उदय पावत नाहीं. या जगांत जें जें दिसतें तें तें सर्व मी आहें, या अनुभवपदावर आरूढ झालेल्या तत्त्वज्ञाच्या मनात जगातील पदार्थांच्या विभागाची म्हणजे आपल्याहून निराळे कांहीं पदार्थ आहत अशी अनर्थकारक भावना कधींहि उपत्न होत नाहीं. यामुळ कडू भोंपळा पाण्यांत टाकला तरी बुडत नाहीं, तद्वत् तत्त्वज्ञाला सुखदुःखांच्या भ्रमामध्यें बुडण्याचा प्रसंग यत नाहीं. परंतु गाधे एखाद्याला महाव्याधि जडलेली असली व तिचा थोडासा अंश जरी शिल्लक राहिलेला असला तरी ती त्याला मनःस्वास्थ्य लाभूं देत नाहीं, त्याप्रमाणें तुझें चित्त वासनाग्रस्त असल्यामुळें तुला स्वस्थता प्राप्त झाली नाहीं. एखादा मनुष्य स्वतः घर बांधण्याचा किंवा दुसऱ्याच्या घरांत जाऊन रहाण्याचा वगैरे प्रयत्न करीत नसला तरी त्याला पर्जन्यवृष्टी थांबवितां येणें शक्य नसतें त्याप्रमाणें तुझ्या ज्ञानाची परिपक्वता झालेली नसल्यामुळें तुला आपल्या मनमोहाचा प्रवाह बंद करतां आला नाहीं. व ज्याप्रमाणें एखादा उंच मनुष्य वृक्षाचें लीलेनें आक्रमण करतो, त्याप्रमाणें तुझ्या चित्तांत उत्पन्न झालेल्या भ्रमानें तुझ्यावर आपला पगडा बसविला. गाधे! सर्वत्र भ्रमण करणाऱ्या या मायाचक्राचा चित्त हा तुंबा किंवा मध्य आहे. अर्थात्, त्याचें आक्रमण करून तें स्थिर केल्यास मायाचक्राची गति कुंठित झाल्याशिवाय रहात नाहीं. एकदा चित्ताला स्वाधीन करून घतलें म्हणजे या मायेची बाधा होण्याचें कारणच उरत नाहीं. याकरितां ऊठ आणि या पर्वतावरील कुंजात जाऊन दृढ निश्चयानें दहा वर्षेपर्यंत चित्त निरोधाचें तप कर म्हणजे तुला अनंत ज्ञानाची प्राप्ति होईल.

अशा रीतीनें गाधीला उपदेश केल्यानंतर वायुनें मेघ, दीप किंवा यमुना नदींतील तरंग लीन व्हावे, त्याप्रमाणे भगवान् श्रीविष्णु त्याच ठिकाणीं क्षणांत अंतर्धान पावले. नंतर गाधीसुद्धां शरत्कालच्या अखेरीस रसहीन होणाऱ्या वृक्षाप्रमाणें विवेकजन्य वैराग्यानें युक्त झाला. त्याच्या मनातील भ्रम नष्ट झाला, व आपल्या प्राक्तनकर्मामुळें भासमान झालेल्या चांडालत्वादि विचित्र चेष्टांची त्यानें निंदा केली. नंतर पाण्यानें भरलेल्या मेघानें पर्वताचा आश्रय करावा, त्याप्रमाणें आपल्या कर्माबद्दल पश्चात्ताप उत्पन्न होऊन चित्तनियमनाचा अभ्यास करण्याकरितां त्यानें ऋष्यमूक पर्वताचा आश्रय केला. त्याठिकाणीं गेल्यानंतर त्यानें आपल्या मनांतील सर्व संकल्पाचा त्याग करून दहा वर्षेपर्यंत उत्कृष्ट तप केलें व तेणेंकरून त्याला आत्मज्ञान प्राप्त झालें. अशा रीतीनें तो महात्मा गाधि आपल्या पारमार्थिक स्थितीप्रत जाऊन भयशोकरहित होत्साता आत्मस्वरूपांत रममाण झाला आणि प्रशांत चित्तानें जीवन्मुक्त बनून व पूर्णचंद्राप्रमाणें परिपूर्ण होऊन अपरिच्छिन्न ब्रह्माकाशामध्यें कायमची विश्रांति पावला.

# सर्ग ५०

—:०:—

१. चित्ताला जिंकण्याचे उपाय २. ज्ञानमाहात्म्य. ३. चित्तरूपी सर्प पुष्ट होण्याचीं कारणे.

**श्रीवसिष्ठः**—रामा! याप्रमाणें ही परमात्म्याची माया अति विस्तृत, अचिंत्य, विषम आणि महाभयंकर आहे, पण तिला आश्रय परमात्माच आहे. त्या गाधि ब्राह्मणाला चार घटका झालेला स्वप्नभ्रम कोणीकडे आणि त्यानें अनेक वर्षें भोगलेली चांडालता कोणीकडे! त्यानें पाहिलेली भ्रमात्मक स्थिति कोणीकडे आणि त्याला प्रत्यक्ष दिसलेली चांडालस्थिति कोणीकडे! त्या स्थितींतील असत्यत्व आणि असंदिग्धत्व कोठें आणि तिचा अखेरचा सत्य परिणाम कोठें! म्हणून म्हणतों कीं, बा राघवा! ही माया मोठी कठिण असून ज्याचें चित्त बेसावध असतें, त्याला ती संकटांत ढकलल्याशिवाय रहात नाहीं.

**श्रीरामः**—ब्रह्मन्! आपण म्हणतां तशी स्थिति आहे यांत मुळींच शंका नाहीं. परंतु यावर मी असें विचारतों कीं, सर्वांगाचा छेद करणाऱ्या आणि वेगानें भ्रमण करणाऱ्या या मायाचक्राची गति कुंठित तरी कशी होणार?

**श्रीवसिष्ठः**—राघवा! स्वतः भ्रमण करणाऱ्या आणि इतरांना भ्रांतींत पाडणाऱ्या ह्या संसाररूपी मायाचक्राचा चित्त हा मध्यवर्ति तुंबा असून मनुष्यानें दीर्घ प्रयत्नानें आणि बुद्धिसर्वस्व खर्च करून त्या तुंब्याची गति बंद पाडली, म्हणजे या मायाचक्राची गति आपोआप बंद पडते. लहान मुलें क्रीडाचक्र म्हणून एक खेळ करीत असतात. त्यांत धातूच्या चाकाला एक मोठा दोरा बांधून त्याला चांगला पीळ दिलेला असतो व त्यामुळें तें चाक गरगर फिरत रहातें. परंतु तो दाराच घट्ट दाबून धरला म्हणजे त्या चाकाच्या गतीचा निरोध होतो. याच न्यायानें मनोरूपी मध्यबिंदुचा निरोध केला म्हणजे हें मायाचक्र फिरत नाहींसें होतें. शिवाय बा निष्पाप रामा! तूं तर चक्रयुद्धांत चांगला प्रवीण आहेस; तेव्हां तुला मायाचक्राच्या गतीसंबंधानें जास्त सांगण्याचें कारणच नाहीं. जोपर्यंत मायाचक्राचें नाभिस्थान थांबविलें गेलें नाहीं, तोंपर्यंत त्याची गति कुंठित होणें शक्य नाहीं. ही गोष्ट तुला माहीत आहे. यास्तव या संसारचक्राच्या नाभिस्थानभूत असलेल्या चित्ताचा निरोध करून त्याच्या जन्ममरणपरंपरारूप गतीचा निरोध कर. या चित्तनिरोधरूपी युक्तीचा अवलंब न केल्यास अनंत दुःखें प्राप्त होतात. परंतु या युक्तीचा अवलंब केला असतां सर्व दुःखांचा अंत झाल्याशिवाय रहात नाहीं. राघवा! हा संसाररूपी महारोग चित्ताक्रमणरूपी परम औषधावांचून दुसऱ्या कोणत्याहि उपायानें नाहींसा होणें शक्य नाहीं. यास्तव तीर्थ, दान, तपःक्रिया वगैरे साधनांचा त्याग करून आपल्या परम कल्याणाकरितां चित्ताला वश करून घे. कारण, घटांत आकाश असतें त्याप्रमाणें चित्तामध्यें संसार असतो. अर्थात, घट फुटतांच घटाकाश नष्ट होतें, त्याप्रमाणें चित्तनाश होतांच संसारहि नष्ट होतो. ज्याप्रमाणें घटाकाशामध्यें दुःख भोगीत असलेली माशी घट फुटतांच महदाकाशांत विहार करण्यास मिळतांच बंधमुक्त होऊन सुखी होते, त्याप्रमाणें तूं चित्ताकाशरूपी बंधाचा त्याग करून ब्रह्माकाशामध्यें विहार करूं लाग. आतां चित्तनाश कसा करावा, यासंबंधाचा उपाय सांगतों तो एक. भूत आणि भविष्य विषयांचा त्याग करावा आणि वर्तमान विषयासंबंधानें अनासक्ति ठेवीत जावें, म्हणजे चित्त हळुहळु क्षीण होत जातें. रामा! तूं प्रतिक्षणीं सावध राहून भावी विषयाच्या संकल्पाच्या अंशाचें सुद्धां अनुसंधान

करीत नाहींसा झालास, तर परम पावन अशा अचित्ततेच्या स्थितीप्रत तूं जाऊन पोहोंचलास म्हणून समज. कारण, जोंपर्यंत वर्षाऋतूंत आकाशामध्यें मेघ दाट आलेले असतात तोंपर्यंतच पर्जन्याचा संभव असतो, त्याप्रमाणें चित्तामध्यें संकल्पविकल्पाचें जाळें पसरलेलें आहे, तोंपर्यंतच चित्ताची गडबड चालते; व जोंपर्यंत पृथ्वीवर चंद्रकिरण पसरलेले असतात तोंपर्यंत थंडी ही असावयाचीच, त्याप्रमाणें जोंपर्यंत चिदात्मरूप सचित्त आहे, तोंपर्यंत चित्तामधील संकल्पसुद्धां कायमच असणार. परंतु चित्ताच चिदात्म्यापासून विवेकानें पृथक्करण करून त्या चिदात्म्याचेंच निरंतर अनुसंधान करीत गेलें, म्हणजे मूळ जें अज्ञान त्यासह कामकर्मवासनादि अखिल संसारबीजें दग्ध होतात, कारण, चित्तरहित झालेला चिदात्मा हाच प्रत्यगात्मा असें ज्ञाते पुरूष म्हणतात, व हा चिदात्मा एकदां मनरहित झाला म्हणजे त्याच्या ठिकाणीं पुनःपुन्हां संकल्परूपी मल उत्पन्न होत नाहीं. चित्तरहित चेतनस्वरूप हीच परमार्थसत्य स्थिति, हीच निरतिशयानंदरूप अवस्था, हीच परमात्मस्थिति, हीच सर्वज्ञता आणि हीच परमार्थदृष्टि होय; ज्या अवस्थेमध्यें दुष्ट मन शिल्लक रहातें ती अवस्था खात्रीनें परमार्थसत्य नव्हे. कारण, स्मशान म्हटलें कीं तेथें कावळे हटकून असावयाचेच, त्याप्रमाणें ज्या ठिकाणीं मन आहे त्या ठिकाणीं दुष्ट आशा आणि सुखदुःखें हीं ठेवलेलींच असावयाचीं. आतां या ठिकाणीं तुझ्या मनांत कदाचित् अशी शंका उत्पन्न होईल कीं, 'ज्यांना आत्मसाक्षात्कार झालेला आहे, अशा पुरुषांच्या ठिकाणीं मन असतेंच. मग त्यांना तरी सुखदुःखाची बाधा कां होत नाहीं?' परंतु ही शंका बरोबर नाहीं. ज्यांना परमात्मज्ञान झालेलें आहे अशा विद्वान् पुरुषांच्या ठिकाणीं मन असतें; परंतु त्यांच्या मनांतील "वासनाबीज वस्तुतत्त्वावबोधानें बाधित झालेलें असल्यामुळें त्यांच्या मनामध्यें संसाररूपी वेल उत्पन्नच होत नाहीं. आतां ही स्थिति कशी उत्पन्न होते? असें विचारशील तर त्याचें उत्तर हेंच आहे कीं, शास्त्र, सज्जनांची संगति आणि सतत अभ्यास याच्या योगानें जगांतील सर्व भावांचें अवस्तुत्व—मिथ्यात्व अनुभवास येतें. यास्तव प्रत्येकानें 'मीं या जन्मामध्यें आत्मज्ञान संपादन केल्याशिवाय रहाणार नाहीं,' असा दृढनिश्चय करावा; आणि पौरुषप्रयत्नांच्या योगानें चित्ताला अविवेकापासून परावृत्त करून त्याला बलात्कारानें शास्त्र आणि सत्संग यांच्याकडे प्रवृत्त करावें. ज्याप्रमाणें एखादें रत्न खोल पाण्यांत पडलें असलें तरी ते स्वयंप्रकाश असल्यामुळें आपल्या स्वतःच्या प्रकाशामुळेंच प्राप्त होतें, त्याप्रमाणें परमात्मदर्शन होण्याला आत्माच मुख्य कारण आहे. ज्याअर्थीं जगामध्यें अनुभवास येणारें हें दृश्यजात दुःखरूप आहे असें जाणून विवेकाच्या योगानें आत्मा त्याचा त्याग करण्याची इच्छा करतो, त्याअर्थीं आत्मा हाच आत्मविज्ञान प्राप्त करून घेण्याचें मुख्य साधन आहे, असा ज्ञात्या पुरुषांचा सिद्धान्त आहे. यास्तव राघवा! भाषण करणें, हातानें देणेंघेणें, डोळ्याच्या पापण्यांची उघडझांप करणें वगैरे क्रिया करील असतांहि ज्याच्या ठिकाणीं सर्व तऱ्हेचे मनोव्यापार अस्तंगत होतात, अशा अनंत चिद्रूप आत्म्याशीं तूं तादात्म्य करून घे. जन्माला येणें, मरणें, जिवंत रहाणें किंवा शरीरानें क्रिया करीत जाणें इत्यादि व्यापार सुरू असतांहि तूं आपल्या निर्मल चैतन्यरूप आत्मस्थितीमध्यें स्थिर रहा[1].

१. प्रलपन्विसृजन्गृह्णन्नुन्मिषन्निमिषन्नपि । ही ओळ शब्दशः भगवद्गीता अ. ५ श्लोक ९ येथें आहे.

ज्याचा अभ्यास करीत जा. 'हा मी,' 'तें माझें' आणि 'हें माझें,' या वासनांचा सर्वथा त्याग कर आणि एकनिष्ठ राहून हृदयामध्यें संवित्परायण हो. वर्तमानकाळची यौवराज्यादि स्थिति यांच्यामध्यें समत्वभावना धारण करून आणि आत्म्याचें निरंतर अनुसंधान करीत जाऊन तूं समाधिस्थितिमध्यें तत्पर रहात जा. सारांश, बाल्यादि दशा, सुखें आणि दुःखें, तसेंच जागृतादि अवस्था, यांच्यामध्यें निरंतर आत्मानुसंधानपर रहा. बाह्यविषयरूपी मलांचें निरसन करीत जाऊन मनाला आत्मरूपामध्यें अस्तंगत करून टाक व सर्व आशापाश तोडून स्वसंवित्पर हो. शुभाशुभरूपी संकल्पांमधील आशारूपी पटकीचा उपद्रव नष्ट कर व नंतर इष्टानिष्ट दृष्टीला अजिबात फाटा देऊन आपल्या संविद्रूपाचें तत्परतेनें अनुसंधान कर. कर्ता, कर्म, करण ( इंद्रियें ) इत्यादिकांचा आपल्या आत्मस्वरूपाला स्पर्श होऊं न देता सर्व त्रिपुटीमय कल्पना ही आत्मस्वरूपाचीं प्रतिबिंबें आहेत, अर्थात् मिथ्या आहेत असे जाण व अशा रीतीनें निर्विकल्प आणि निरालेब बनून केवळ स्वात्मपरायण हो. रामा! तूं जागा असतां आपणापुढें दिसणारे विषय मिथ्या आहेत अशी भावना करीत जाऊन गाढ झोंपेंतील स्थितीप्रमाणें निर्विकल्प हो; तसेंच सर्व चराचर मीच आहें असें चिंतन करीत जाऊन केवल सत्तैकरूप हो. तुझ्या ठिकाणीं जागृत्स्वप्नरूपी नानादशा, सुषुप्तिरूपी अनानादशा अथवा सृष्टिप्रलयादि दशा भासमान होत असल्या, तरी आत्मस्वरूपाच्या दृष्टीनें यांपैकीं कोणत्याहि दशा सत्य नाहींत, अशी दृढ भावना करीत जाऊन सर्व बुद्धिवृत्तींचा प्रकाश करणाऱ्या चिदात्म्याशीं तूं तद्रूप होऊन रहा. 'हा माझा' आणि 'हा दुसऱ्याचा' ह्या मिथ्या कल्पनांचा त्याग कर आणि जगत्स्थितीमध्यें अभिन्नता पहात जाऊन वज्रस्तंभाप्रमाणें दृढ असलेल्या आत्म्याचा आश्रय करून स्थिर हो. सारांश राघवा! आपल्या उदार आणि धैर्यशाली बुद्धीच्या योगानें आशारूपी मानसपाश समूळ तोडून टाकून धर्माधर्मरहित हो. कारण, ज्याला आत्मस्वरूपाचा साक्षात्कार होऊन तो दिव्यानंद सर्वत्र अनुभवता येऊं लागला, अशा मनुष्याला मग हालाहल विषसुद्धां अमृतरूप भासतें. मनुष्याला जेव्हां आपल्या निर्मल आणि निरंश आत्मस्वरूपाचें विस्मरण होतें, तेव्हांच संसारभ्रमाला कारणीभूत होणारा अज्ञानरूपी माहामोह त्याच्या ठिकाणीं उदित होत असतो. परंतु याच्या उलट आशारूपी महासमुद्राचें उलंघन करून तुला निर्मल आणि निरंश अशा ब्रह्माची प्राप्ति झाली, म्हणजे रामा! तुझी संवित् सूर्यकिरणांप्रमाणें सर्वत्र पसरल्याशिवाय रहाणार नाहीं. रामा! आत्म्याच्या अद्वितीय आनंदामध्यें स्थित झालेल्या आणि सर्वत्र आत्मभाव अनुभवणाऱ्या पुण्यात्म्या गाढ न्याय-नमुद्धां विषसागर त्याज्य वाटेना. रामा! ज्यांनीं आमच्याप्रमाणें आत्म्याची स्वभावस्थिति प्राप्त करून घेतली आहे, अर्थात् जीवन्मुक्तस्थिति प्राप्त करून घेऊन आपल्या नरजन्माचें सार्थक केलें आहे, अशा श्रेष्ठ पुरुषाबरोबर मैत्री करण्याची आम्हीं इच्छा करतों; पण या व्यतिरिक्त जे पुरुष आहेत ते केवळ नांवाचे मानव असल्यामुळें त्यांना लांब हाताचे गर्दभ समजून आम्हीं त्याची उपेक्षाच करतो! आता या ठिकाणीं तुझ्या मनांत कदाचित् असा प्रश्न उत्पन्न होईल कीं, 'या जगांत मोठमोठे योगी आणि उपासक असतां त्यांच्यापेक्षां तत्त्ववेत्त्यामध्यें असा कोणता विशिष्ट गुण असतो कीं, ज्यामुळें तो त्यांच्याहून श्रेष्ठ ठरतो?' तर या प्रश्नाचें उत्तर हेंच आहे कीं, आपल्या ठिका-

णच्या ज्ञानामुळें तत्त्ववेत्ता इतर सर्व योगी आणि उपासक यांच्यापेक्षां इतक्या श्रेष्ठ दर्जाच्या स्थितीप्रत जाऊन पोहोंचलेला असतो कीं, मेरुपर्वतामोंवतालच्या पर्वतांतून संचार करणारे हत्ती ह्या पर्वतापेक्षां पुढचा मोठा असें मानून हिंडत असतात त्याप्रमाणें इतर योगी व उपासक होत. ज्याला आदि आणि अंत या सीमा नाहीत अशा आत्मप्रकाशाचा ज्ञानचक्षु ज्याचा उघडला, त्याला सूर्यादि इतर तेजस्वी वस्तूंचा कांहींच उपयोग नसतो. इतकेंच नव्हे, तर मग दुपारीं लावलेल्या दिव्यांप्रमाणें सूर्यादिकांचीं महातेजें अशा आत्मप्राप्ति झालेल्या तत्त्ववेत्त्यापुढें फिकीं पडतात. योगशास्त्रामध्यें वर्णन केलेल्या अणिमादि योगसिद्धी ज्यांना वश झाल्या आहेत, ज्याच्या अंगांत लोकोत्तर शरीरबल वास करीत आहे, तपश्चर्येनें वाचासिद्धी आणि ऐश्वर्य आणि आयुष्य यांमध्यें जे मोठे आहेत, त्यांच्यासारखें सामर्थ्य ज्यांनीं प्राप्त करून घेतलें आहे, अशा सर्व योगनिपुण पुरुषांपेक्षां तत्त्ववेत्त्याचा दर्जा फारच मोठा आहे. जगांतील सर्व उन्नत पदार्थांपेक्षां तत्त्वज्ञ हा निःसंशय श्रेष्ठ आहे. ज्याच्या दिव्य तेजामुळें सूर्य,* चंद्र, अग्नि, तारका इत्यादि तेजोगुणविशिष्ट पदार्थ भासमान होतात, अशा जगदीश्वराशीं जर या जगांत कोणाची तुलना करतां येण्यासारखी असेल, तर ती अशा तत्त्वज्ञ नरश्रेष्ठांचीच करतां येण्यासारखी असून असे पुरुष निःसंशय पृथ्वीचे अलंकार होत. परंतु रामा ! अतत्त्वज्ञांची स्थिति याच्या अगदीं उलट असते. ज्यांना तत्त्वज्ञान झालेलें नाहीं, असे मूढ मानव पृथ्वीच्या विवरांतील कीटक, गर्दभ किंवा पक्षी यांच्यापेक्षांहि तुच्छ, मूर्ख होत. जोंपर्यंत एखादा प्राणी आत्मज्ञानसंपन्न झाला नाहीं, तोंपर्यंतच त्याच्या हृदयांत संमोहरूपी वेताळ नृत्य करीत असतो. ज्याला ज्ञान नाहीं असा मनुष्य अचेतन असून जो आत्मज्ञ झाला तोच खरोखर चेतनयुक्त होय, असें तत्त्ववेत्ते म्हणतात. ज्याला आत्मज्ञान झालेलें नाहीं असा प्राणी भूतलावर हालचाल करीत असला, तरी त्याचें जीवित आणि त्याच्या क्रिया दुःखपर्यवसायीच होत असल्यामुळें तो शवरूप समजावा, व जो पुरुष आत्मज्ञ आहे तो सचेतन आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. ज्याप्रमाणें आकाशांत एखादा मोठा मेघ उत्पन्न झाला: म्हणजे त्यामुळें सूर्यबिंब झांकलें जाऊन त्याच्या प्रकाशाला प्रतिबंध होतो, त्याप्रमाणें वासनांच्या योगानें चित्त पुष्ट झालें म्हणजे मनुष्यानें आत्मज्ञान अंशतः संपादन केलें असलें तरी तें अस्तंगत होतें. यास्तव ज्याप्रमाणें वृक्षांतील रसाचें आकर्षण काल करतो आणि मग त्यांचीं पानें सुकून जीर्ण होतात, त्याप्रमाणें ज्ञानी पुरुषानें प्राप्त झालेल्या विषयांच्या भोगांचा तिरस्कार करावा, आणि अप्राप्तभोगांविषयींच्या रसाचा म्हणजे वासनांचा त्याग करण्याचा अभ्यास करून मन कृश किंवा क्षीण करूं लागावें.

आतां मन कशामुळें पुष्ट होत जातें असें म्हणशील, तर अनात्म पदार्थांच्या ठिकाणीं आत्मभाव ठेवणें, देहालाच आत्मा समजणें आणि पुत्र, दारा, कुटुंब यांच्यावर ममत्वभावनेनें आसक्त होणें ह्याच गोष्टी चित्ताला पुष्ट बनविण्याला कारणीभूत होतात. अहंकाराचा विकास, ममतारूपी मल आणि हें शरीर म्हणजेच आत्मा ही भावना यांच्यामुळें चित्त स्थूल बनत जातें. जरामरणादि दुःखें, आत्मोन्नतीसंबंधाची विपरीत भावना आणि नानाविध दोषरूपी सर्पांच्या कातीं यांच्या योगानें चित्त

* 'न तत्र सूर्यो भाति न चंद्रतारकं नेमा विद्युतो कुतोऽयमग्निः । तमेव भान्तमनुभाति सर्वं तस्य भासा सर्वमिदं विभाति ॥ ( कठ. २।५।१५ मुण्डक. २।२।१० श्वेताश्व. ६।१४ )

दिवसेंदिवस पुष्ट होत जातें. आधिव्याधींचा विलास, संसाराची रम्यता आणि चिरस्थायिता यांच्यासंबंधानें मनाची असलेली भिस्त आणि हे त्याज्य आणि हे ग्राह्य अशा भावनेनें केले जाणारे प्रयत्न यांच्या योगानें चित्त पुष्ट बनत जातें. स्नेह, धनलोभ, सुंदर स्त्रियांची आणि रत्नांची प्राप्ति वगैरे आपातरमणीय विषयांच्या योगानें चित्त पुष्ट बनत जातें. चित्तरूपी सर्प दुराशारूपी दुग्ध प्राशन करतो, विषयोपभोगरूपी वायु भक्षण करतो आणि निरनिराळ्या विषयासंबधाने आस्था धारण करून त्यांमध्यें संचार करीत सुटतो व त्यामुळें दिवसेंदिवस पुष्ट बनत जातो. उत्पत्ति आणि नाश हाच ज्यांचा स्वभाव आहे, अशा शरीराचा आश्रय करून चित्त हें दाहमूर्च्छादिकांमध्येंच पर्यवसान घडवून आणणाऱ्या विषासारख्या भयंकर विषयसेवनांत दंग होऊन जातें व त्यामुळें तें दिवसेंदिवस पुष्ट बनत जातें. यास्तव रामा! जो चित्तरूपी विषवृक्ष शरीररूपी घाणेरड्या खड्डयामध्यें पुष्कळ दिवसपर्यंत वाढलेला आहे, ज्यावर आशारूपी मोठमोठ्या फांद्या, विकल्परूपी पानें चिंतासमूहरूपी मंजरी आणि कामोपभोगरूपी अनेक विकसित पुष्पें उत्पन्न झालीं आहेत, तसेंच जो जरामरणव्याधिरूपी असंख्य फळांच्या भारानें वांकलेला आहे, अशा पर्वतप्राय अद्भूत वृक्षाला तू विचाररूपी तीक्ष्ण करवतीनें एकदम कापून टाक. राघवा! हा चित्तरूपी हत्ती शरीररूपी गलिच्छ अरण्यांत रहात असतो, याचे आगमानुमानरूपी नेत्र अविवेकरूपी मदानें फिरून गेलेले असतात व हा हत्ती बहिर्मुखसंसाररूपी पर्वताच्या तटावर संचार करीत असल्यामुळें ह्याला अंतर्मुखतेपासून मिळणारें विश्रांतिसुख केव्हांच प्राप्त होत नाहीं. द्वेष, असूया इत्यादि विकाररूपी दांतांच्या योगानें हा चित्तरूपी हत्ती अतिशय उग्र दिसत असून सज्जनांनीं आचरण्याला योग्य अशा शमदमतितिक्षादि साधनक्रमरूपी कमलवन अवलोकन करण्याविषयीं तो अतिशय उत्सुक असतो, परंतु त्या वनाचें रक्षण करण्याला मात्र तो असमर्थ असतो. याला सुखदुःखरूपी गंडस्थळें असून त्यांतून शीतोष्णमदाचा एकसारखा स्राव होत असतो–कामादि विकार हेच याचे मोठाले दांत होत, अशा तऱ्हेच्या या हत्तीला राघवा! तू राजसिंह असल्यामुळें आपल्या बुद्धिरूपी पंजाच्या तीक्ष्ण नखाग्राच्या योगानें विदीर्ण कर. हा चित्तरूपी कावळा स्त्रीरूपी स्मशानामध्यें रहाण्यांत मोठा आनंद मानीत असून शरीररूपी मांस भक्षण करून तो पुष्ट झालेला आहे. हा चित्तकाक दुसऱ्यांचें मर्म छेदन करण्यासाठीं नेहमीं टपून बसलेला असतो. याची दृष्टि सदोदित स्वार्थावरच असल्यामुळें हा एकाक्ष आहे. याच्या ठिकाणच्या तामस वृत्तीमळें याचें शरीर कृष्णवर्णाचें बनलेलें आहे. हा चित्तकाक शरीररूपी घरट्यांत वास करतो, याची क्रिया केव्हांहि दुष्टच असते, हा नेहमीं कर्कश आवाज करीत असतो आणि याची गति निरंतर दुर्वासनारूपी गंधाकडे असते. यासाठीं रामा! आपल्या ठिकाणचे सर्व दोष नाहींसे व्हावे असें तुला खरोखरच वाटत असेल, तर ह्या दुष्ट आणि भारभूत चित्तरूपी कावळ्याला आपल्या शरीररूपी घरट्यांतून हुसकावून दूर पळवून लाव. राघवा! चित्त हें एक पिशाच आहे, असेंहि म्हटलें तरी चालेल. हें पिशाच अज्ञानरूपी विस्तीर्ण खळग्यामध्यें किंवा वडाच्या झाडावर विश्रांति घेत असून तृष्णारूपी पिशाची त्याची सेवा करीत असते व हें पिशाच लक्षावधि अचेतन देहरूपी अरण्यांत अहोरात्र भटक्या मारीत असतें. अशा तऱ्हेच्या या चित्तरूपी पिशाचाला विवेक, वैराग्य, गुरूपदेश, स्वतःचे प्रयत्न इत्यादि मंत्र-

तंत्रांच्या योगानें आपल्या चिदात्मरूपी घरांतून बाहेर काढून त्याला पुरा गाडून टाकणार नाहींस, तोंपर्यंत तुला जीवन्मुक्तीरूपी सिद्धि प्राप्त होण्याची गोष्टसुद्धां बोलावयास नको ! हा चित्तरूपी सर्प हृत्कमलरूपी सांवरीच्या झाडाच्या ढोलींत रहात असून शुभाशुभवृत्ति हेंच त्याचे मुख आहे, शरीर हीच त्याची गलिच्छ मेंग आहे, चिंता हेंच विष आहे, त्यानें अनेक मानवांचे प्राण घेतले आहेत व अहोरात्र चाललेला प्राणवायु हेंच त्याचें अन्न असून तो नानाविध भयें उत्पन्न करून सर्वांचे प्राण हरण करतो. यास्तव रामा ! अशा तऱ्हेच्या या महाभयंकर सर्पाला चिदेकरस गरुडदेवात्मक अशा महावाक्यरूपी अमोघ मंत्रांनीं मारून टाक आणि मूल अज्ञानासहित त्याचा उच्छेद कर, म्हणजे तुझी सर्व भीति नाहींशी होऊन तूं निर्भय होशील. चित्त हे एक मोठें गिधाड असून त्याची आकृति अमंगल आहे, ते नेहमीं शरीररूपी शवें भक्षण करतें, निरनिराळ्या दिशांमध्यें भ्रमण करीत असतें व अखेरीस तें थकून गेलें आणि अपमान, शोक, भय इत्यादि विकाररूपी काककंकादि पक्ष्यांच्या चंचुप्रहारामुळें बेजार झालें, म्हणजे सुषुप्तीमध्यें असलेल्या देहरूपी स्मशानवृक्षाचा आश्रय करतें. विषयोपभोगरूपी आमिषाच्या नादानें तें मान वर करून स्वैर संचार करीत असून मांसाच्या प्राप्तीसाठीं तें नेहमीं टपून बसलेलें असतें. अशा तऱ्हेच्या या चित्तगृध्राला तूं आपल्या देहवृक्षावरून उडवून लावशील, तरच तूं अजिंक्य झालास असें मी समजेन. बा रामचंद्रा ! चित्त हें एक मोठें चंचल माकड असून तें फलाच्या आशेनें निरनिराळीं बनें आणि दिशा यांच्यामध्यें भ्रमण करीत असतां नानाविध चेष्टा करून त्यांच्यायोगानें एका जन्मभूमींतून दुसऱ्या जन्मभूमींत अशा रीतीनें संसारबंधामध्यें गुरफटून गेलेल्या जनतेच्या कृतीचें विडंबन करतें. हें चित्तरूपी माकड देहरूपी वृक्षावर बसलेलें आहे; देहाचे हात हे त्या वृक्षाच्या शाखा, हातांचीं चंचल बोटें हीं त्या वृक्षाचीं पानें आणि नाक, डोळे हीं त्या वृक्षाचीं फुलें होत. अशा तऱ्हेच्या देहरूपी वृक्षावर क्रीडा करणाऱ्या ह्या मनोरूपी माकडाला तूं मारून टाक, म्हणजे तुला ज्ञानसिद्धि प्राप्त होईल. रामा ! चित्त हा एक अकालीं उत्पन्न झालेला मेघ असून बहिर्मुख वृत्तीमध्यें प्रतिबिंबित झालेल्या चिदाभासामुळें त्याच्यामध्यें विद्युल्लतेसारखें तेज चमकत असतें. अशा तऱ्हेचा हा मेघ वासनारूपी वावटळीच्या योगानें आंदोलन पावतो व त्यामुळें तो परमार्थ सुखरूपी पक्व धान्याचा नाश करतो आणि सर्व प्रकारच्या अनर्थरूपी पर्जन्याचा सतत वर्षाव करतो. यास्तव सर्व संकल्पाचा त्यागरूपी उग्र मंत्राचा उत्साहपूर्वक जप करून त्याच्या भावनेनें ह्या चित्तमेघाला हृदयाकाशांतून घालवून लाव आणि जीवनमुक्तीरूपी नित्यसिद्ध श्रेष्ठ फलाचा लाभ करून घे, राघवा ! चित्त ही एक भली मोठी दोरी असून तिनें सृष्टीच्या आरंभापासून आजमितीपावेतों उत्पन्न झालेल्या सर्व प्राण्यांना त्यांच्या पुण्यपापात्मक कर्मांच्या योगानें जखडून टाकलें असून त्यांचीं शरीरें नानायोनींमधील जन्मांच्या रूपानें आपणामध्यें ओंवून टाकलीं आहेत. यास्तव विषयांचा संकल्पत्याग, ह्या शस्त्रानें हा चित्तपाश एकदम तोडून आणि सर्व शंकांच्या अतीत होऊन तूं या जगांत खुशाल विहार कर. चित्तसंकल्परूपी भयंकर अजगर देहरूपी गुहेमध्यें निजलेला असून तो मनुष्याला परब्रह्माचा साक्षात्कार होऊं देत नाहीं. परंतु तो इतकेंच करून थांबत नाहीं; तर आपल्या विषमय फूत्कारांनीं तो सर्व पांथस्थ लोकांना दग्ध करून टाकतो, सर्व भुवनांना संतप्त करतो आणि आपलें तृष्णारूपी

मुख पसरून चतुर्विध भूतांना गट्ट करून टाकण्याला तो सदोदित टपून बसलेला असतो. यास्तव उत्कृष्ट वैराग्यरूपी प्रचंड अग्नि प्रदीप्त करून त्यामध्यें या चित्तरूपी अजगराला एक-दम जाळून टाक आणि निजानंदवैभव अखंड भोगीत रहा. बा साधो ! ज्याप्रमाणें एका घोर अस्त्रावर त्याहून घोर दुसऱ्या अस्त्राचा प्रयोग केला जावा, त्याप्रमाणें तूं आपल्या अशुद्ध चित्ताला शुद्ध चित्ताच्या योगानें जिंकून टाक, व ज्याप्रमाणें एखादा मर्कटरहित झालेला वृक्ष आपल्या सौंदर्यानें शोभायमान होतो, त्याप्रमाणें आपल्या वृत्तीचें चचलत्व टाकून देऊन निरंतर स्वरूपाचा अभ्यास चालू ठेव, म्हणजे तुला जीवन्मुक्तीचें अनुपम सुख प्राप्त होईल. सारांश राघवा ! देहादिकां-संबंधाच्या अहंममत्वभावना टाकून दे आणि सर्व संशयांच्या अतीत होऊन आपल्या प्रत्यगात्मस्वरूपाचें नेहमीं अनुसंधान करीत जा, तसेंच हें सर्व दृश्य तृणाप्रमाणें तुच्छ आहे असें जाणून त्याचा मनानें त्याग कर; व अशा रीतीनें ब्रह्मज्ञानाच्या योगानें संसाराच्या पलीकडे जाऊन पोहोंचल्यावर तूं आपले प्रारब्धप्राप्त व्यवहार खुशाल करीत जा, कारण, आत्मस्वरूपामध्यें अखंड रममाण होत असल्या-मुळें ते व्यवहार तुला केव्हांहि बंधनकारक होऊं शकणार नाहींत.

---

## सर्ग ५१.

— :*: —

**उद्दालकाचें आख्यान.** १. परमपदाच्या ठि-काणीं विश्रांति घेण्यासाठीं चित्त स्थिर करण्याचा प्रयत्न करणाऱ्या उद्दालकाच्या विक्षेपांचें वर्णन २. गंधमादन पर्वतावरील एका गुहेचें वर्णन.

**श्रीवसिष्ठः**—बा रामचंद्रा ! चित्तवृत्ती ह्या अतिशय दूर अंतरावर असणाऱ्या विषयांवरहि आसक्त होत असल्यामुळें अत्यंत दीर्घ, वासना-प्रचुरत्वामुळें अत्यंत सूक्ष्म, तसेंच समाधिसु-खाचा विच्छेद करण्याला कारणीभूत होत असल्यामुळें अतिशय तीक्ष्ण व आत्मप्रतिबिंब ग्रहण करण्याची योग्यता असल्यामुळें अति स्वच्छ, आणि वस्तऱ्यांच्या धारांप्रमाणें अस-तात, यास्तव तूं त्यांच्यावर बेसावधपणानें विसं-बून राहूं नकोस. बा नीतिशास्त्रामध्यें निपुण असलेल्या रामा ! परमात्मज्ञान करून देणारी बुद्धिरूपी मंजरी तुझ्या ठिकाणीं फारा दिव-सांनीं उत्पन्न झाली आहे; तरी विवेकामृताचें सिंचन करून तूं तिला वृद्धिंगत कर. राघवा ! जोंपर्यंत तुझी ही शरीररूपी लता कालरूपी सूर्याच्या प्रखर तापामुळें कोमेजून जाऊन जमिनीवर पडली नाहीं, तोंपर्यंत गुरुशुश्रूषा, श्रवण इत्यादिकांच्या द्वारें तिचा उद्धार कर आणि आपल्या बुद्धिरूपी मंजरीचें यथायोग्य संवर्धन कर. मी तुला आतां जें आख्यान सांगणार आहें त्याचा चांगला विचार करून त्यांत सांगितल्याप्रमाणें निरंतर भावना करीत जा, म्हणजे मेघगर्जना होतांच मयूराला मोठी आनंद होतो, त्याप्रमाणें तुला जीवन्मुक्तीचें अनिर्वचनीय सुख प्राप्त होईल. या आख्यायि-केंतील उद्दालक मुनीनें देहादि दृश्य भूतपंच-काचें आत्मनिष्ठ बुद्धीच्या योगानें यथास्थित अंतःशोधन केलें. त्याप्रमाणें तूंहि कर म्हणजे त्याच्याप्रमाणें तुलाहि जीवन्मुक्तीचें अत्यंत श्रेष्ठ फल प्राप्त झाल्याशिवाय राहणार नाहीं.

**श्रीरामः**—भगवन् ! उद्दालक मुनीनें पंचभूतांसंबंधानें कसकसा विचार केला आणि त्यांचा निरास कोणत्या क्रमानें केला, हें कृपा करून मला समजावून सांगा.

**श्रीवसिष्ठः**—रामा ! भूतवृंदासंबंधानें सूक्ष्म विचार करून उद्दालकानें परमोच्च तत्त्वज्ञान-दृष्टि आपल्या अंगीं कशी बाणवून घेतली, या

संबंधाचा जो प्राचीन वृत्तान्त मी तुला आतां सांगत आहें, तो एकाग्र चित्तानें श्रवण कर.

या जगद्रूपी जीर्णगृहाच्या आग्नेय दिशेंतील एका कोंपऱ्यामध्यें अनेक पर्वतरूपी मांड्यांनीं वेष्टिलेल्या गंधमादन नामक पर्वतावर एक विस्तीर्ण भूमि होती. त्याठिकाणीं निरनिराळ्या रंगाचीं फुलें आणि त्यांतील कापरासारखे पराग सर्वत्र पसरले होते, चित्रविचित्र वर्णांचे पक्षी जिकडे तिकडे घिरट्या घालीत होते आणि नानाविध लतामुळें तें स्थान अतिशय रमणीय दिसत होतें. त्या पर्वताच्या तटांवरून वन्यपशू संचार करीत असत आणि त्या तटावरून पुष्पकेसराचा खच पडलेला असल्यामुळें त्या पर्वताला अलौकिक शोभा प्राप्त झाली होती. त्या पर्वतावर कांहीं ठिकाणीं मूल्यवान् रत्नें आढळून येत, कांहीं ठिकाणीं निरनिराळ्या रंगाचीं कमलें वाऱ्यामुळें हालत होतीं, कांहीं ठिकाणीं धुकें पसरलें असून तें केशकलापाप्रमाणें दिसत होतें व कांहीं ठिकाणीं मोठमोठीं सरोवरें असून तें जणूं आरसेच आहेत कीं काय, असा पहाणाराला भास होई. त्या ठिकाणच्या एका उंचवट्यावर एक सरल नांवाचा वृक्ष असून त्या महावृक्षाची छाया गर्द पसरली होती आणि त्याच्याखालीं फुलांचा गुडघाभर खच पडला होता. अशा त्या वृक्षाखालीं उद्दालक नांवाचा एक मुनि तपश्चर्येकरितां बसला होता. तो बालतपस्वी महाबुद्धिवान् असून पौरुष प्रयत्नाच्या योगानें परमपदाची प्राप्ति करून घ्यावी, अशा दृढनिश्चयानें तपस्या करीत बसला होता. त्यानें कित्येक दिवसपर्यंत मोठ्या नेटानें तपश्चर्या चालविली होती; परंतु त्याच्या ठिकाणच्या अभिमानवृत्तीमुळें त्याला प्रथम परमपदाच्या ठायीं विश्रांति प्राप्त झाली नाहीं. परंतु परमात्मज्ञानाला अनुकूल अशा संस्कारांनीं त्याचें अंतःकरण भरून गेलेलें असल्यामुळें त्यानें आपला तपस्येचा क्रम सशास्त्र नियमानें अव्याहत चालविला होता. पुढें कांहीं कालानें त्याच्या तपश्चर्येचा परिपाक झाला; तेव्हां भूतलावर वसंतऋतूचा उदय व्हावा, त्याप्रमाणें त्याच्या चित्तांत विवेकाचा उदय झाला. एके दिवशीं एकान्तांत बसून चिंतन करीत असतां संसाररूपी रोगाबद्दल मनांत धास्ती उत्पन्न होऊन त्याच्या शुभ चित्तामध्यें अनेकविध विचार घोळूं लागले. तो म्हणाला:—

"या जगाला अधिष्ठानभूत असें कोणतें तत्त्व आहे कीं, ज्याच्यामध्यें विश्रांति प्राप्त झाली असतां पुन्हां शोक करण्याचा प्रसंग येणार नाहीं आणि पुनःपुनः जन्ममृत्यूंच्या फेऱ्यांत भ्रमण करीत रहाण्याचें कारण उरणार नाहीं? माझ्या ठिकाणचे मनोव्यापार अस्तंगत होऊन मी परमपावन अशा पदाच्या ठायीं मेरुपर्वताच्या शिखरावरील मेघाप्रमाणें केव्हां एकदां कायमची विश्रांति घेऊं लागेन? माझ्या मनांत समुद्रांतील तरंगाप्रमाणें एकसारख्या उसळणाऱ्या भोगतृष्णा केव्हां एकदाच्या शांत होतील? परमपावन अशा ब्रह्मपदाच्या ठिकाणीं विश्रांति घेऊं लागून 'प्रथम हें कार्य करीन आणि नंतर हें कार्य करीन' अशा तऱ्हेच्या भ्रामक कल्पनांकडे अवलोकन करीत मी आंतल्याआंत केव्हां बरें हसूं लागेन? ज्याप्रमाणें कमलदलावर पाण्याचा बिंदु पडला तरी तो त्याला चिकटत नाहीं, त्याप्रमाणें चित्तावर मिथ्या विकल्पजालाचा यत्किंचितहि परिणाम होत नाहीं, अशी स्पृहणीय स्थिति मला केव्हां बरें प्राप्त होईल? स्वरूपानुसंधान करण्यात गढून गेलेली बुद्धि हीच नौका असून तिचा आश्रय केल्यामुळें, जिच्या पृष्ठभागावर एकावर एक लाटा जोरानें उसळत आहेत, अशा प्रचंड

तृष्णारूपी नदीच्या पैलतीराप्रत मी केव्हां बरें जाऊन पोहोंचेन? क्रीडा करण्यांत दंग झालेल्या मुलाकडे पहाणाऱ्या मनुष्याला हंसूं कोसळतें, त्याप्रमाणें या जगांतील भूतमात्रांची असन्मय बाह्यप्रवृत्ति पाहून मला केव्हां बरें हंसूं येईल? उन्मादवायूच्या लहरींत पाहिजे तिकडे धांवणाऱ्या मनुष्याचें भ्रमण वायु उतरतांच बंद पडावें, त्याप्रमाणें विकल्पजालामध्यें गुरफटून जाऊन आंदोलन पावणारें माझें मन केव्हां बरें शांत होईल? चित्तामध्यें आत्मस्वरूपाचा उदय होऊन त्याच्या स्फुरणामुळें जगताच्या गतीकडे उपहासपूर्वक अवलोकन करीत असतां ब्रह्माण्ड हेंच ज्याचें शरीर आहे, अशा भगवंताप्रमाणें मी पूर्णात्म्यामध्यें केव्हां बरें रममाण होऊं लागेन? परमात्म्याशीं समरस होऊन, त्याच्या ऐश्वर्यानें युक्त होऊन आणि सर्व विषयासंबंधानें निस्पृह बनून मंथन थांबतांच शांत झालेल्या क्षीरसागराप्रमाणें मी केव्हा बरें शांत स्थितीप्रत जाऊन पोहोंचेन? शेंकडों आशापाशांनीं युक्त असलेल्या ह्या दृश्यरूपी वैभवाकडे गाढ निद्रावस्थेंतल्याप्रमाणें निश्चल दृष्टीनें पहात मी आपल्या अंतरात्म्याच्या निरुपाधिक स्थितीमध्यें केव्हा एकदांचा स्थिर होईन? माझ्या मनांतील सर्व तऱ्हेचे संकल्प निरास पावल्यामुळें ह्या सबाह्याभ्यंतर विश्वाकडे मी चिन्मात्रभावनेनें केव्हां एकदां पाहूं लागेन, असें मला झालें आहे. माझें चित्त सर्वस्वी शांत होऊन आणि जन्मांधतेप्रमाणें असलेलें अनादि अज्ञान निर्मूल होऊन परमचित्स्वरूपाप्रत जाऊन पोहोंचल्यावर मला भगवद्रूपाचें सर्वत्र दर्शन केव्हां होऊं लागेल? वैराग्य आणि योग यांचा अभ्यास करून आनंदपूर्ण चित्प्रकाशाची प्राप्ति करून घेऊन हें माझें राहिलेलें आयुष्याचें कालमान दुरून तटस्थाप्रमाणें केव्हां अनुभवाला येईल? इष्ट, अनिष्ट, त्याज्य, ग्राह्य इत्यादि मिथ्या भावनांचा सर्वस्वी त्याग करून मी आपल्या स्वयंप्रकाश आत्मपदाच्या ठिकाणीं केव्हां एकदांचा आनंदानें स्थित होईन? जिच्यामध्यें कुत्सित आशारूपी घुबडीण स्वैर संचार करीत आहे आणि जी जाड्याच्या (मौर्ख्य किंवा बर्फ यांच्या) योगानें हृत्कमलाला जर्जर करून सोडते, अशी दोष (अविद्या) रूपी कृष्णरात्र केव्हां एकदांची क्षय पावेल? एखाद्या पर्वताच्या गुहेत जाऊन माझी मननक्रिया केव्हा बंद पडेल आणि माझें मन निर्विकल्पसमाधीमध्यें पाषाणाप्रमाणें स्थिर केव्हा होईल? ज्याच्यामधून अभिमानवृत्तिरूपी मदप्रवाह सतत गळत आहे असा माझा अहंकाररूपी उन्मत्त हत्ती परमार्थज्ञानरूपी सिंहाकडून केव्हां बरें ठार मारला जाईल? माझें चित्त संकल्परहित होऊन पूर्णात्म्याचें ध्यान करण्यांत गढून गेल्यामुळें मी मुकाट्यानें स्तब्ध राहिलों असतां अरण्यांतील चूर्णिका पक्षी माझ्या मस्तकावर गवताचीं घरटीं केव्हां करूं लागतील! तसेंच परमात्मचिंतन करण्यांत निमग्न झाल्यामुळें पर्वतावरील पाषाणाप्रमाणें अचल झालेल्या माझ्या वक्षःस्थलावर वनांतील पक्षी निःशंकपणें केव्हां विश्रांति घेऊं लागतील? सारांश, तृष्णारूपी करंजवृक्षाच्या योगानें निबिड झालेल्या आणि ज्यांतील जन्मरूपी वेलीच्या जाळ्या कामादि मृगांच्या संचारामुळें जर्जर झालेल्या आहेत, अशा त्या संसाररूपी अरण्यांतील नदीचा त्याग करून मी त्यांतून केव्हां एकदांचा पार पडेन, असें मला झालें आहे.

अशा रीतीनें चिंतन करण्यांत गुंतलेला तो उद्दालक ब्राह्मण त्या अरण्यांत बसून पुनःपुन्हां ध्यानाभ्यास करण्याला सुरवात करी. परंतु माकडाप्रमाणें चंचल असलेलें त्याचें

चित्त पुनःपुन्हां विषयोन्मुख होऊं लागे, त्यामुळें त्यानें आपल्याकडून मनाला ध्यानामध्यें निमग्न करण्यासाठीं शिकस्त करून पाहिली, तरी त्याचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं; यामुळें त्याला समाधिस्थितींतील दिव्यानंद प्राप्त होईना. एखादे वेळीं प्रत्याहारानें बाह्य विषयांचा त्याग करून त्यानें आपलें चित्त सत्त्वस्थितीमध्यें स्थिर करण्याचा प्रयत्न करूं लागावें, तों चित्तांत रजोगुणी आणि तमोगुणी वृत्तींचा उदय होऊन तें समाधिस्थितींतून मागें फिरे; किंवा देवादिकांना उपभोगण्यास योग्य अशा सात्त्विक सुखांत निमग्न होई. कित्येक वेळा समाधिसुखाचा त्याग करून त्याचें मनोरूपी माकड विषाच्या योगानें लाही होऊन मनुष्य मरून अन्य लोकांत जातो त्याप्रमाणें, विषयांवर अचानक उडी मारी, असेंहि होई. बा कमलवदना रामा! कित्येक वेळीं योगाभ्यास करीत असतां त्याच्या हृदयांत नुकत्याच उगवलेल्या सूर्याच्या* तेजासारखें तेज दिसतें न दिसतें तों त्याचें चित्त विषयोन्मुख होई. कित्येक प्रसंगीं ब्रह्मस्वरूप किंचित् अभिव्यक्त झाल्यामुळें त्याचें मन अज्ञानांधकाराचा अंशतः निरास करी, परंतु तितक्यांत त्याचें मन विषयलंपट बनून, एखाद्या त्रस्त झालेल्या पक्ष्याप्रमाणें लगेच उड्डाण करून, विषयांवर जाऊन पडे. केव्हां केव्हां त्याचें मन बाह्य आणि आंतर विषयाचा त्याग करून अज्ञानांधकार आणि आत्मज्योति यांच्या संधीमध्यें बराच वेळ स्थिर रहात असे; म्हणजे स्वरूपानुसंधान करतां करतां त्याला अखेर गाढ निद्रा येई. सारांश, अशा रीतीनें तो ध्यानाचा नित्य अभ्यास करीत असतां एखादा वृक्ष वायूनें हालविला गेल्यामुळें शेजारच्या पाण्यांत कोसळून पडावा, त्याप्रमाणें त्याचें चित्त विक्षेपांच्या योगानें पर्याकुल होऊन व ध्यानापासून च्युत होऊन विषयवृत्तिरूपी दरींमध्यें कोसळून पडे व क्वचित् तें ध्यानामध्यें स्थिर होतें न होतें. तों तृष्णारूपी तरंगाच्या आघातामुळें एकसारखें हेलकावे खाऊं लागे. याप्रमाणें आपलें मन निरंतर व्यग्र होत आहे असें पाहून उद्दालक मुनीला अत्यंत खेद झाला व ज्याप्रमाणें सूर्य हा दररोज मेरुपर्वताभोंवतीं फिरत रहातो, त्याप्रमाणें तो मुनि त्या गंधमादन पर्वतावर भ्रमिष्टाप्रमाणें एकटाच भटकूं लागला. अशा रीतीनें इतस्ततः संचार करीत असतां एके दिवशीं त्याला एक गुहा आढळली. ती गुहा सर्व भूतांना अगम्य असल्यामुळें आणि तिच्यामध्यें कोणाहि प्राण्याचा संचार झालेला नसल्यामुळें ती गुहा म्हणजे प्रत्यक्ष मोक्षदशाच आहे की काय, असें त्याला वाटलें. त्या गुहेमध्ये सिंहादि हिंस्र श्वापदें आणि पक्षी यांचा कधीं प्रवेश झालेला नव्हता व त्या ठिकाणीं वायूची सुद्धा गति चालत नसे. ती परमाकाशाप्रमाणें (ब्रह्मप्रमाणें) शोभणारी गुहा देव आणि गंधर्व यांच्याहि कधीं नजरेस पडलेली नव्हती. त्या गुहेमध्यें कोंवळें मऊ गवत उगवलें होतें व सर्वत्र फुलांचा खच पडलेला होता. यामुळें ती गुहा चंद्रकांत मण्यांच्या आणि पाचेच्या योगानेच बनविली आहे कीं काय, असा पहाणाराला भास होई. त्या गुहेच्या दारापाशीं वृक्षाची शीतल छाया होती आणि आंतील रत्नदीपांचा प्रकाश होता; म्हणून तें वनदेवीचें गुप्त असें अंतःपुरच आहे कीं काय, असें प्रेक्षकाला वाटे. त्या गुहेच्या बाहेरच्या बाजूला

* श्रुतिः—'नीहारधूमार्कानलानिलानां खद्योतविद्युत्स्फाटिकशशिनाम्। एतानि रूपाणि पुरःसराणि ब्रह्मण्यभिव्यक्तिकराणि योगे॥' योगाभ्यास करीत असतां धुकें, धूर, सूर्य, अग्नि, वायु काजवा, वीज, स्फटिक, चंद्र इत्यादि रूपें दिसतात.

रवीचे किरण फक्त थंडी घालविण्या पुरते पसरलेले असून शरदृतूमधील सूर्यप्रकाशाप्रमाणें त्यांची पीतवर्ण प्रभा चोहोंकडे फांकलेली होती; यामुळें तेथें अतिशय उष्णताहि नव्हती आणि अतिशय थंडीहि नव्हती. ती गुहा पूर्वाभिमुख असून तिच्या आंतील भूमि कोमल सूर्यकिरणांच्या योगानें कोरडी झालेली होती व तिच्या पश्चिम भागीं असलेल्या गवाक्षामधून मंद आणि सुगंधित वायु वहात असे. त्या गुहेच्या दारावरून लोंबणाऱ्या वृक्षांच्या पुष्पमंजरी पाहून हातांत पुष्पमाला धारण करून स्वयंवराला उद्युक्त झालेली ती उपवर राजकन्याच आहे कीं काय, असें पहाणाराला वाटल्याशिवाय रहात नसे. सारांश रामा ! जिचा अंतर्भाग कमलाच्या गाभ्याप्रमाणें आहे आणि जिच्यामध्यें फुलाचा थर पडलेला असल्यामुळें जी अत्यंत कोमल आणि रमणीय दिसत आहे, तसेंच जी उपशमस्थिति प्राप्त करून घेण्याला अनुरूप असून ब्रह्मदेवालासुद्धां विश्रांति घेण्याला अगदीं योग्य आहे, अशा तऱ्हेची ती गुहा उद्दालकाच्या दृष्टीस पडली.

---

## सर्ग ५२

—:०:—

१. गुहेमध्यें आसनावर बसून समाधीचा अभ्यास करणाऱ्या उद्दालक मुनीने चित्तप्रबोधनाच्या उपायांसंबंधानें केलेलें चिंतन.

**श्रीवसिष्ठः**—राघवा ! पुष्कळ वेळ भ्रमण करतां करतां एखाद्या भ्रमराला कमल दिसावें आणि त्यानें त्याच्यामध्यें प्रवेश करावा, त्याप्रमाणें गंधमादन पर्वतावर इतस्ततः संचार करणाऱ्या उद्दालक मुनीला पूर्वीं वर्णन केलेली गुहा आढळून येतांच त्या तपस्वी उद्दालकानें गुहेमध्यें प्रवेश केला. त्यावेळीं आपला सृष्टीच्या उत्पत्तीचा व्यापार बंद करून भगवन्नाभिकमलरूपी किंवा सत्यलोकांतील अपराजिता नामक नगरीमध्यें विश्रांतीकरितां प्रवेश करणारा ब्रह्मदेव शोभूं लागावा, त्याप्रमाणें समाधीचा अभ्यास करण्याविषयीं उत्सुक झालेला तो मुनि त्या गुहेमध्यें शोभूं लागला. ज्याप्रमाणें मेघांच्या अधिपतीनें, अर्थात् इंद्रानें मेघांचे समुदाय निर्माण करावे, त्याप्रमाणें त्या मुनीनें गुहेबाहेरच्या वृक्षांवरील ताजीं पानें तोडून त्यांचें एक मृदु आसन तयार केलें, त्यांत पुष्पांचे गुच्छही ठेवले; व त्याच्यावर एक सुंदर मृगाजिन घातलें, त्यावेळीं मेरुपर्वताच्या नीलरत्नांनीं युक्त असलेल्या तटावर तारकायुक्त आकाश पसरलेलें वाटून रमणीय दिसावें, त्याप्रमाणें तें आसन शोभूं लागलें. पुढें उदकाचा वर्षाव केल्यानतर आकाशातील शुभ्र मेघ यत्किंचित् गर्जना न करतां मूकव्रत धारण करून एखाद्या पर्वताच्या शिखरावर जाऊन बसतो, त्याप्रमाणें तो मुनि आपलें अंतःकरण शुद्ध करून आणि चित्तवृत्ती क्षीण करून त्या आसनावर जाऊन बसला. त्या ठिकाणीं उत्तरेकडे तोंड करून त्यानें बुद्धा-(कपिल महामुनी) प्रमाणें दोन्ही पायांच्या टांचामध्यें वृषण ( वृषणासह उपस्थ ) दाबून धरून सिद्धासन घातलें; व ब्रह्मांजलि करून निर्विकल्पसमाधीचा अभ्यास करण्याचा दृढ निश्चय केला. त्यावेळीं विषयांमध्यें इतस्ततः संचार करणाऱ्या आपल्या मनोरूपी मृगाला वासनांमधून परावृत्त करून त्यानें पुढें दिल्याप्रमाणें चिंतन करण्याला सुरुवात केली. तो म्हणालाः--
" बा मूढ मना ! तूं विनाकारण संसारवृत्तींमध्यें भटक्या मारीत कशाला रहातोस ? तुला त्यापासून कोणतें फल प्राप्त होणार आहे ? कारण, जे बुद्धिवान् महात्मे असतात ते

१. ज्ञानेश्वरी अ. ६ ओव्या १९२-१९९ मध्यें या आसनाचें वर्णन आहे.

ज्यांचा परिणाम निःसंशय दुःखपर्यवसायी होणार, अशा क्रिया करण्याला केव्हांच प्रवृत्त होत नाहींत. शमरूपी अमृताचा त्याग करून जो मनुष्य भोगांच्या पाठीमागें धांवत सुटतो, तो कल्पतरूंनीं भरलेलें नंदनवन सोडून विषवृक्षांनीं युक्त असलेल्या अरण्याचा आश्रय करीत आहे, असेंच म्हणण्यास हरकत नाहीं. वेड्या मना ! तूं पाताळांत जा कीं ब्रह्मलोकांत जा, उपशमरूपी अमृतावांचून तुला निर्वाणाची प्राप्ति केव्हांहि होणार नाहीं, हें पूर्णपणें लक्षांत ठेव. तुला विषयांचे शेंकडों उपभोग देऊन संतुष्ट करण्याचा कितीहि प्रयत्न केला, तरी तूं केव्हांच तृप्त होत नाहींस; इतकेंच नव्हे, तर त्यापासून सर्व तऱ्हेच्या दुःखांची उत्पत्ति होत असते. यास्तव संपूर्ण भोगाशांचा त्याग करून निरतिशयानंदामुळें अत्यंत शोभायमान होणाऱ्या अशा निर्वाणाप्रत तूं जाऊन पोहोच. या जगांतील इष्टानिष्टरूपी विचित्र विषयसंकल्प तुझ्या तीव्र दुःखालाच कारणीभूत होतात, सुखाला केव्हांहि कारणीभूत होत नाहींत. आकाशांत मेघ संचार करून गर्जना करूं लागतांच पृथ्वीवरील एखादी बेडकी विनाकारण शब्द करीत इकडे तिकडे फिरूं लागते, त्याप्रमाणें शब्दादि कुत्सित विषयांच्या नादीं लागून तूं व्यर्थ भ्रमण कां करतोस? बा मनोरूपी क्षुद्र बेडका ! तूं इतके दिवसपर्यंत त्रिभुवनामध्यें अंध बनून संचार केलास, परंतु त्यापासून तुला काय बरें प्राप्त झालें ? ज्याच्यापासून विदेहकैवल्यसुख किंवा जीवन्मुक्तीचें श्रेष्ठ सुख प्राप्त होतें, अशा समाधीच्या अभ्यासाकडे तुझी प्रवृत्ति कां बरें होत नाहीं ? ज्याप्रमाणें एखादें हरिण पारध्याच्या मधुर गीताला भुलून त्यानें पसरलेल्या जाळ्यामध्यें अडकून पडतें, त्याप्रमाणें आपली वृत्ति बहिर्मुख करून आणि श्रोत्रेंद्रियाशीं तादात्म्य करून तूं विनाकारण आपला नाश करून घेऊं नकोस. ज्याप्रमाणें एखादा रानटी हत्ती पाळून शिकवलेल्या हत्तिणीच्या स्पर्शसुखानेंहि मोहित होत्साता तिच्या मागोमाग धांवूं लागतो आणि अखेरीस हत्ती पकडणाऱ्या लोकांनीं तयार करून ठेवलेल्या खाड्यांत पडून त्यांच्या हातीं सांपडतो, त्याप्रमाणें त्वगिंद्रियाचें सुख प्राप्त करून घेण्याच्या भरीस पडून तूं आपणावर आपत्ति ओढवून घेऊं नकोस. ज्याप्रमाणें एखादा मासा गळाला लावलेल्या मांसाच्या लोभांत गुंतून आपली मान गळांत अडकवून घेतो, त्याप्रमाणें दुष्ट अन्नाच्या लालचीनें अंध बनून रसनेच्यामुळें तूं आपला नाश करून घेऊं नकोस. बा मूढा ! एखादा पतंग दिव्याच्या ज्योतीवर लुब्ध होऊन त्यावर एकदम झडप घालून स्वतःला दग्ध करून घेतो, तद्वत् जगांतील सौंदर्यावर लोलुप होऊन नेत्रेंद्रियाच्या स्वाधीन होऊन तूं आपल्याला भस्मसात् करून घेऊं नकोस. तसेंच एखादा भ्रमर सुगंधाच्या नादानें कमलामध्यें प्रवेश करून आपल्याला बद्ध करून घेतो, त्याप्रमाणें जगांतील सुगंधी पदार्थांचा उपभोग घेण्यांत गुंग होऊन घ्राणेंद्रियामुळें तूं आपल्या स्वतःला या शरीररूपी कमलामध्यें बद्ध करून घेऊं नकोस. सारांश शब्दस्पर्शादि विषय इतके अनर्थकारक आहेत कीं, त्यांच्यापैकीं एकेक विषयामध्यें आसक्त होणारे हरिण, भ्रमर, पतंग, हत्ती, मासा हे जीव जर आत्मघात करून घेतल्याशिवाय राहत नाहींत, तर या पांची विषयामध्यें रत झालेल्या मनुष्यावर सर्व तऱ्हेच्या अनर्थपरंपरा कोसळतील आणि त्याला अधोगतीला नेतील, यांत काय नवल? ज्याप्रमाणें रेशमाचा किडा आपल्या लाळेच्या योगानें रेशमी कोशेटा तयार करतो आणि त्यांत स्वतःला बद्ध करून घेऊन दुःख भोगतो, त्याप्रमाणें बा चित्ता ! तूं

आपल्या बंधाकरितांच वासनाजाल निर्माण केलें असून त्यापासून तुला दुःख मात्र भोगावें लागतें. आतां 'हा प्रमादापासून उत्पन्न झालेला बंध निवारण करण्याला उपाय काय?' असें विचारशील तर सांगतों कीं, प्रथम कर्मोपासनादिकांच्या योगानें शरत्कालीन मेघाप्रमाणें शुद्ध होऊन नंतर श्रवणादिकांच्या परिपाकानें ज्ञानोदय करून घेऊन आणि या भवरोगाचें निर्मूलन करून तूं शांत स्थितीप्रत जाऊन पोहोंचशील, तर तूं या वासनाजालांतून कायमचा मुक्त होशील. परंतु जन्म, मरण, बाल्य, दारिद्र्य वगैरे दशा धारण करणारी आणि मरणोत्तर नरकस्थावरादि योनी वगैरे दुःखप्रद गती भोगावयास लावणारी दुष्ट संसारप्रवृत्ति जाणत असतांहि तूं त्यांचा सर्वथा त्याग करणार नाहींस, तर तूं आपला व्यर्थ नाश मात्र करून घेशील. अथवा तुला हितोपदेश करण्याच्या भानगडींत मीं काय म्हणून पडावें? तुला जबरदस्तीनें कह्यांत आणून विचारानें तुझा कायमचा क्षय करून टाकणें हेंच युक्त आहे. कारण, विचार करणाऱ्या पुरुषाचेंच चित्त क्षीण होत असतें, मूल अज्ञान आणि चित्त यांचा अन्वयव्यतिरेकसंबंध असल्यामुळें अज्ञान नाहींसें करीत जाणें हाच चित्तक्षयाचा वास्तविक उपाय आहे, चित्तक्षयाकरितां निराळा प्रयत्न करण्याचें मुळींच कारण नाहीं. कारण, वर्षाकालीन मेघ आकाशांत जितके जितके वाढूं लागतात तितकें तितकें पृथ्वीवर धुकेंहि वाढूं लागतें, त्याचप्रमाणें जसजसें अज्ञान वृद्धिंगत होत जातें, तसतसें चित्त पुष्ट होत जातें. तसेंच वर्षाकालांतील मेघ जितके जितके नाहींसे होत जातात तितकें तितकें पृथ्वीवरील धुकें अस्तंगत होत जातें, त्याप्रमाणें जसजसा अज्ञानाचा क्षय होत जातो, तसतसें चित्तहि क्षीण होत जातें. सारांश, आत्मविचारणेच्या योगानें जसजसें चित्त शुद्ध होत जातें, तसतसा चित्तांतील वासनांचा क्षय होत जाऊन शरत्कालांतील मेघाप्रमाणें तें क्रमाक्रमानें सूक्ष्म म्हणजे क्षीण होत जातें, असें माझें मत आहे. अविवेकी मनुष्याचें चित्त वासनांच्या योगानें पुष्ट झालेलें असल्यामुळें त्याला उपदेश करण्यापासून कांहींच फायदा होत नाहीं. तसेंच विवेकी पुरुषाचें चित्त मिथ्या असल्यामुळें किंवा तें क्षीण होऊं लागल्यामुळें त्याला उपदेश करणें म्हणजे आकाश, पाणी किंवा वायु यांच्यावर ताडण करण्याइतकेंच व्यर्थ आहे! यास्तव बा चित्ता! तूं आतां क्षीण होऊं लागल्यामुळें तुझ्या मिथ्या स्वरूपाचा मी आतां त्यागच करतों म्हणजे झालें कारण, **ज्याचा सर्वथा त्याग करणेंच उचित आहे, त्याला विनाकारण उपदेश करीत बसणें याच्यासारखा मूर्खपणा दुसरा कोणताच नाहीं, असें ज्ञाते पुरुष म्हणतात**. तरी बा असन्मय चित्ता! मी निर्विकल्प व स्वयंप्रकाश असून माझी अहंकारवासना आतां निमालेली असल्यामुळें अहंकार हेंच ज्याचें बीज आहे अशा तुझा आणि माझा वस्तुतः मुळींच संबंध नाहीं. अरे मूढा! 'हा देह म्हणजेच मी' या कुदृष्टीचा तूं आजपर्यंत अवलंब केला होतास, या अपराधाबद्दल तुझा त्याग करणेंच युक्त आहे. आतां ही दुर्दृष्टि जरी मिथ्याच उत्पन्न झालेली असली, तरी ती संशयरूपी विषानें युक्त असल्यामुळें महामारीप्रमाणें मूढांचा घात करण्यालाच कारणीभूत होते. यास्तव तुझा त्याग करणें अवश्य आहे. तुझें असन्मयत्व जाणणें म्हणजेच तुझा त्याग करणें होय. आतां तुझें स्वरूप असन्मय कसें आहे तें सांगतों. आत्मतत्त्व हें अनंत असल्यामुळें आणि मनाचें स्वरूप अत्यंत संकुचित असल्यामुळें, एखाद्या बेलफळामध्यें

हरीच्या जोडप्यानें रहाणें संभवत नाहीं त्याप्रमाणें, या देहाच्या परिच्छिन्न मनःस्थितिमध्यें आत्मभाव वास करणें मुळींच संभवनीय नाहीं. बा चित्ता ! एखाद्या खळग्याप्रमाणें अतिशय खोल असलेल्या आणि कामक्रोध सर्प, विंचू, पिशाच वगैरे भयंकर प्राण्यांच्या अस्तित्वामुळें दुःख देण्याऱ्या अशा ह्या दुर्वासनेचा तूं आश्रय केला आहेस, ही केवढी शोचनीय गोष्ट आहे ! परंतु कांहीं झालें तरी मी या चांडाळणीच्या मागें धांवणार नाहीं, व तुझा त्याग केल्याशिवाय रहाणार नाहीं. एखाद्या अविचारी पोरावर भ्रांतीचा अंमल बसतो व तें मोहवश बनतें; परंतु मी विचारसंपन्न झालेला असल्यामुळें 'मी देह' या अहंकाराच्या योगानें कल्पिलेल्या भ्रांतीचा पगडा माझ्यावर केव्हांहि बसणार नाहीं, हें पक्कें लक्षांत ठेव.

आतां पायाच्या आंगठ्यापासून तों मस्तकापर्यंतच्या सर्व शरीराचे राईएवढे तुकडे करून त्यांत 'अहं' म्हणून कोणी आहे कीं काय असें पाहूं लागलें, तर तो मुळींच सांपडत नाहीं तर मग तूं आहेस तरी कोण ? असें विचारशील, तर याचें उत्तर हेंच आहे कीं, मी दिक्कालादिकांनीं अपरिच्छिन्न असलेला आणि सर्व जगत्रयाला व्यापून राहिलेला असा एकमेवाद्वितीय संविद्रूप आत्मा आहें. कालादि परिच्छेद मला मर्यादित करूं शकत नाहींत. तसेंच एकता, अन्यता, महत्ता, अणुता इत्यादि कल्पना माझ्या आत्मस्वरूपामध्यें वस्तुतः मुळींच संभवत नाहींत. अशा रीतीनें मी संवेदनात्मा असल्यामुळें मी तुला साक्षिरूपानें जाणतों व ज्याअर्थी तूं दुःख देण्यालाच कारणीभूत होतोस, त्याअर्थी विवेकजन्य बोधानें मी तुला आतां ठार करतों. देहाकडे पाहिलें तर त्यांत मांस, रक्त, अस्थी, प्राणवायु इत्यादिकांवाचून दुसरें कांहींच दिसत नाहीं. मग हा अहंकार आहे तरी कोठें ? स्पंद ही प्राणाची शक्ति आहे, ज्ञान ही महाचैतन्याची शक्ति आहे आणि जरामरण हे तर शरीराचे धर्म आहेत. मग हा 'अहं' आहे तरी कोण ? सारांश, मांस, रक्त, अस्थी, ज्ञानशक्ति व प्राणशक्ति हे सर्व पदार्थ 'अहं' पदार्थाव्यतिरिक्त आहेत; तर मग हा 'अहं' आला तरी कोठून ? शरीराकडे पाहूं लागावें तों त्यांत नाक, डोळे, जीभ, त्वचा, कान हे अवयव दिसतात, परंतु त्यांमध्यें 'अहं' म्हणून एखादा अवयव आहे असें आढळून येत नाहीं. परमार्थदृष्टीनें पाहिलें तर मन किंवा चित्त म्हणजे 'अहं' नव्हे व आत्मा हा तर शुद्ध चित्स्वरूप असल्यामुळें त्याला अहंकाराचा स्पर्श होणें केव्हांहि शक्य नाहीं. आतां अध्यारोपदृष्टीनें विचार करूं लागलें असतां जें जें इंद्रियगोचर दिसत आहे, तें तें सर्वच तो 'अहं' आहे. परंतु अपवाददृष्टीनें विचार करतां खऱ्या 'अहं' चा कोठेंच पत्ता लागत नाहीं. खरी सन्मय दृष्टी ती हीच असून प्रत्येक देहामध्यें परिच्छिन्नरूपानें असणारा जो 'अहं' त्याला वास्तविक अस्तित्वच नाहीं. परंतु अरण्यांत एकीकडे सांपडलेल्या हरिणबालकाला एखाद्या उन्मत्त लांडग्यानें घाबरवून सोडावें, त्याप्रमाणें मला आजपर्यंत अज्ञानरूपी धूर्त अहंकारानें फसवून अतिशय छळलें होतें. ह्या अज्ञानरूपी चोरानें माझ्या पारमार्थिक स्वरूपाच्या धनाचा इतके दिवस अपहार केला होता व माझें महद्भाग्य म्हणूनच या चोराचें स्वरूप मी आतां बरोबर ओळखलें असून इतःपर मी त्याच्या तावडींत केव्हांहि सांपडणार नाहीं. त्याची संगति आतापर्यंत झाली तेवढी पुरे झाली ! ज्याप्रमाणें एखाद्या मेघानें पर्वताचा आश्रय केला असला, तरी पर्वताचें आणि मेघाचें स्वरूप हीं अगदीं भिन्न असल्यामुळें त्यांचा संबंध वस्तुतः संभवत नाहीं

त्याप्रमाणें माझें आणि अहंकाराचें स्वरूप परस्परविरोधी असल्यामुळें अहंकाराचा आणि माझा संबंध कुठ्ठाच संभवत नाहीं. कारण, माझें स्वरूप दुःखरहित आहे. आणि अहंकार हा तर दुःखरूप आहे. अशा स्थितींत अहंकाराचा आणि माझा संबंध होणार कसा ? आतां या ठिकाणीं कोणीं असें म्हणेल कीं, 'तुझ्या ठिकाणीं जर अहंकाराचा अभाव आहे, तर तूं बोलणें, चालणें वगैरे क्रिया कशा करतोस ?' तर यावर माझें उत्तर हेंच आहे कीं, मी एखाद्या नटाप्रमाणें व्यवहारापुरता तात्कालिक अहंकार धारण करतों व अशा रीतीनें बोलणें, चालणें, पाहणें वगैरे क्रिया करतों. परंतु मी निरंतर आपल्या आत्मस्वरूपाचें अवलोकन करीत असल्यामुळें माझ्या त्या स्वरूपामध्यें अहंकाराला अवकाशच उरलेला नाहीं. चक्षुरादि इंद्रियें म्हणजे तत्त्वतः मीच आहें. परंतु तीं माझ्या व्यतिरिक्त आहेत असें मानलें, तर तीं जडच ठरत असल्यामुळें देहांत राहोत किंवा दुसऱ्या कोठें निघून जावोत, त्यामुळें माझ्या वास्तविक स्वरूपाची हानि होणें शक्य नाहीं. शिव ! शिव ! हा 'अहं' कोण आणि याची कल्पना कोणीं व कशी केली कोण जाणे ! हा 'अहं' रूपी वेताळ ताडापेक्षांहि धिप्पाड आणि भयंकर असून तो जगद्रूपी बालकाला भेवडावून सोडतो. ज्याप्रमाणें एखाद्या हरिणानें एखाद्या तृणरहित आणि म्हणूनच भेसूर दिसणाऱ्या पर्वतावर विनाकारण हिंडावें, त्याप्रमाणें मी इतके दिवस या अहंकाररूपी खड्ड्यामध्यें व्यर्थ लोळत पडलों होतों ! जर नेत्र हा आपल्या रूपविषयाचें ग्रहण करतांना मी प्रत्यक्ष पाहतों, तर हा 'अहं' नांवाचा दुःखदायक चोर मध्यें कोठून आला ? स्पर्शेन्द्रिय हें जर स्पर्शाचें ग्रहण करतें असा माझा अनुभव आहे, तर एखाद्या दुष्ट पिशाचाप्रमाणें उत्पन्न होणारा हा 'अहं' मध्येंच आला कोठून ! रसनेंद्रिय हें रस ग्रहण करण्याविषयीं उत्सुक होऊन आपला विषय ग्रहण करतांना जर मी प्रत्यक्ष पाहतों, तर हा 'अहं' मध्येंच उत्पन्न होऊन मीच त्या रसाचा भोक्ता आहें, असा भ्रम कां बरें उत्पन्न व्हावा ? श्रवणोन्मुख झालेले बिचारे कान आपला शब्दविषय ग्रहण करीत असतां या अहंकारानें निष्कारण उत्पन्न होऊन त्याचा अभिमान धारण करावा, हें मोठें चमत्कारिक नाहीं काय ? त्याचप्रमाणें घ्राणेन्द्रियानें गंधविषयाच्या लालसेनें सुवास घ्यावा आणि या 'अहं' नामक आप्पलपोट्या चोरानें तो वास मीं घेतला असें म्हणावें, हें मोठें विलक्षण आहे ! अशा रीतीनें सर्व इंद्रियांच्या बाबतींत लुडबुड करणारा हा चोर आहे तरी कोण ? या चोराचा कितीहि तपास केला तरी त्याचा पत्ता लागत नाहीं. कारण उघडच आहे कीं, ही अहंकाराची कल्पना मृगजळाप्रमाणें मिथ्याच उत्पन्न होते व तिच्यामुळें 'मी देह' ही जी भावना उत्पन्न होते, तोहि भ्रमच आहे. यास्तव ही देहाहंभावरूपी वासना अजिबात टाकून दिली पाहिजे. आतां या ठिकाणीं कदाचित् कोणी अशी शंका येईल कीं, वासनेचा सर्वस्वी त्याग केला, तर बाह्य प्रवृत्तीचा अभाव होईल आणि बाह्य प्रवृत्तीच्या अभावीं मनुष्याचें जीवितच अशक्य होऊन जाईल. परंतु ही शंका बरोबर नाहीं; कारण, हें शरीर चक्षुरादि इंद्रियांच्या द्वारें जीवनाला आवश्यक असलेलीं सर्व कर्में वासनेच्या साहाय्यावांचूनच करीत असतें; व ज्या क्रिया वासनारहित बुद्धीनें केल्या जातात, त्यांच्यापासून सुखदुःखादि भयंकर दशा केव्हांहि भोगाव्या लागत नाहींत. यास्तव बा चित्ता ! मूर्ख इंद्रियें आणि वासना यांचा अजिबात त्याग करून स्वभावतः प्राप्त होणारीं कर्में तं

करीत जा, म्हणजे तुला केव्हांहि दुःख भोगावें लागणार नाहीं. अरे मूढा! ज्याप्रमाणें लहान मुलें मातीचीं खेळणीं करून तीं स्वतःच मोडून टाकतात व नंतर त्याकरितां विनाकारण शोक करूं लागतात, त्याप्रमाणें तूं ज्या वासना अज्ञानानें धारण केल्या आहेस, त्या अखेर विषयांच्या प्राप्तीनें व त्यांच्या लयानें तुझ्या दुःखालाच कारणीभूत होतील. बा निष्पापा! ज्याप्रमाणें तरंगादि देखावे पाण्याहून भिन्न नसतात. त्याप्रमाणें वासनादि अखिल दृष्टी वस्तुतः आत्म्याहून वेगळ्या नाहींत असें ज्ञानी पाहतो. परंतु अज्ञ मनुष्याची दृष्टि याच्या उलट असते. इंद्रियरूपी बालकांनो! ज्याप्रमाणें रेशमाचे किडे स्वतःपासून उत्पन्न झालेल्या तंतूंच्या योगानें आपणा स्वतःला बद्ध करून घेतात, त्याप्रमाणें तृष्णेच्या योगानें तुम्हीं आपला विनाकारण घात करून घेत आहां. तसेंच एखाद्या पर्वताच्या शिखरावरून जाणाऱ्या वाटसरूंची दृष्टि खालच्या तुटलेल्या कड्याकडे गेल्यामुळें त्यांना घेरी येऊन ते खोल दरींत पडतात, त्याप्रमाणें तृष्णेला वश झाल्यामुळें तुम्हीं जरामरणादिकांनीं युक्त असलेल्या संसारामध्यें लोळत पडतां. ज्याप्रमाणें मोत्यांच्या भोंकातून ओंवलेला तंतु त्याना बद्ध करून टाकतो त्याप्रमाणें तुम्हाला वासनेनें बद्ध करून टाकलें आहे. आतां वास्तविक पाहूं गेलें तर वासना ही कल्पनेच्या योगानें उत्पन्न झालेली केवळ भ्रांति असून संकल्पत्यागरूपी कातरीच्या योगानें तिला कापून टाकतां येतें. ज्याप्रमाणें वायूची झुळुक ही प्रकाशमान होणाऱ्या दीपांच्या नाशाला कारणीभूत होते, त्याप्रमाणें इंद्रियांनो! ही वासना तुमच्या मोहाला आणि नाशाला कारण झाली आहे. यास्तव बा चित्ता! तूं सर्व इंद्रियांचा कोशच असल्यामुळें सर्व इंद्रियांचें ऐक्य करून आपल्या असल्रूपाला जाणून त्याचा त्याग कर आणि शुद्ध बोधरूपी निर्वाणस्थिति प्राप्त करून घेऊन तिच्यामध्यें निरंतर स्थिर हो. सारांश बा चित्ता! अनंत विषयरूपी विषूचिका (पटकी) आणि अहंकाररूपी वासना यांचा त्याग कर. मनाला जें जें इष्ट वाटत असतें तें तें परिणामीं अनर्थकारक असतें हें लक्षांत ठेवून तूं इष्ट विषयाच्या त्यागरूपी युक्तीचा अवलंब कर, अज्ञाननिरास कर आणि मरणादि सर्व भयांच्या पलीकडील पूर्णानंदस्वरूपी भगवत्स्थितीप्रत जाऊन पोहोंच."

# सर्ग ५३

१. वासना आणि अहंकार यांच्यापासून आत्म्याची अलिप्तता, शरीर आणि मन यांचे वैर.

उद्दालकः—चित् ही अपार आणि अनंत असून अव्याकृत आकाशाहूनहि सूक्ष्म असल्यामुळें तिचें आक्रमण करण्याला वासनादिक केव्हांहि समर्थ होऊं शकत नाहींत. वासना म्हणजे बुद्धि आणि अहंकार ह्यांच्यामधील चित्प्रतिबिंबाच्या योगानें जड इंद्रियांनीं ग्रहण केलेल्या विषयाचे सूक्ष्म संस्कार असून त्या वस्तुतः असद्रूप असल्या, तरी मिथ्याच उत्पन्न झालेल्या वेताळाप्रमाणें जीवांना दुःख देण्याला कारणीभूत होणाऱ्या ह्या वासनांचा मन जागृत आणि स्वप्न ह्या स्थितीमध्यें पुनःपुन्हां अनुभव घेतें. परंतु मी चिद्रूप असल्यामुळें ह्या वासना मला केव्हांच स्पर्श करूं शकत नाहींत. मनाच्या दुष्ट स्वभावामुळें उत्पन्न झालेल्या संसारस्थितीचें हा देह ग्रहण करो किंवा तिचा त्याग करो, मी चिद्रूप असल्यामुळें ही संसारस्थिति मला लिप्त करूं शकत नाहीं. चैतन्य हें सर्वव्यापी असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं जन्ममरणाच्या कल्पना वास्तविक केव्हांहि

संभवत नाहींत. अशा स्थितींत प्राणी मरतो असें जें म्हणतात, त्याचा अर्थ तरी काय? तसेंच तो कोणाकडून आणि कसा मारला जाणार? चित् ही सर्वात्मक असून सर्व वस्तूंचें जीवितसर्वस्व असल्यामुळें तिच्या ठिकाणीं जगणें ही निराळी कल्पना उत्पन्न होणार कोठून? सारांश, सर्व देश, सर्व काल आणि सर्व वस्तू ह्यांना व्यापून राहणाऱ्या चित्स्वरूपामध्यें जगणें ही संकुचित कल्पना उत्पन्न होण्याचें कारणच नाहीं. अर्थात्, त्यासंबंधाची इच्छाहि उत्पन्न होण्याचा संभव नाहीं. जगणें आणि मरणें ह्या कुकल्पनांची परंपरा केवळ मनानेंच उत्पन्न केलेली असून विमल आत्म्याशीं ह्या दुष्ट कल्पनांचा संबंध केव्हांच पोहोंचूं शकत नाहीं. ज्याच्या ठिकाणीं मी देह आहें' अशी भावना उत्पन्न झाली असेल, त्याच्यावर, देहाचा भाव आणि अभाव, अर्थात् जन्म आणि मरण, ह्या कल्पनांचा पगडा बसावा, हें अगदीं स्वाभाविक आहे. परंतु शुद्ध आत्म्यामध्यें 'मी देह' या अहंभावाला अवकाशच नसल्यामुळें त्याच्यासंबंधाने जन्म आणि मरण ह्या कल्पना संभवणार तरी कशा? असा 'देह मी' या भावनेसंबंधानें विचार करूं लागलें तर ती भावना अहंकार, मन किंवा जगांतील पदार्थवर्ग ह्यांपैकीं कोणापासूनहि उत्पन्न झालेली आहे, असें म्हणतां येत नाहीं. कारण, अहंकार हा चित्प्रतिबिंबामुळें उत्पन्न झालेला आहे. परंतु प्रतिबिंब हें मिथ्या असल्यामुळें त्याच्या योगानें उत्पन्न झालेला अहंकार निःसंशय मिथ्या आहे, असेंच म्हणावें लागतें. त्याचप्रमाणें मनसुद्धां मृगजळाप्रमाणें मिथ्याच भासमान होणारें आहे. अशा रीतीनें अहंकार आणि मन असद्रूप असल्यामुळें त्यांच्यापासून 'मी देह' ही अहंभावना उत्पन्न होणार तरी कशी? आतां जगांतील पदार्थसमुदायाकडे पाहूं लागावें, तों ते जड आहेत असेंच दिसून येत असल्यामुळें त्यांच्यापासून देहासंबंधाची अहंभावना उत्पन्न होण्याचा संभव मुळींच दिसत नाहीं. सारांश, देह रक्तमांसमय आहे, मन हें विचारानें नष्ट होणारें आहे आणि चित्तादि सर्व भाव निःसंशय जड आहेत. अशा स्थितींत 'मी देह' ही भावना उत्पन्न होणार कुठून? इंद्रियें हीं नेहमीं आपापल्या विषयांमध्यें जागृत व्यापृत झालेलीं असतात आणि सर्व पदार्थ पदार्थरूपानें स्थित असतात. तर मग ही अहंभावना उत्पन्न होणार कुठून? सत्वगुणादि आपल्या प्रकाश, प्रवृत्ति आणि मोह असल्या व्यापारांत गढून गेलेले असतात, आणि प्रधानरूपी प्रकृति ही नेहमीं आपल्या मूल स्वरूपामध्यें, अर्थात् गुणसाम्यावस्थेमध्यें स्थित असते आणि सत् जें ब्रह्म हें तर आत्मभावामध्यें निरंतर विश्रांति घेत असतें; अशा स्थितींत अहंभावरूपी भावनेला अवसर मिळणार कोठून? ह्या देहामध्यें जो चिदात्मा आहे तो सर्वग, सर्वदेहस्थ व सर्व कालमय अशा महान् आणि केवळ परमात्म्याचें मीच तो या भावानें अनुसंधान करीत असतो. अशी स्थिति असता हा देहमात्राचा अभिमान धारण करणारा 'अहं' कोणत्या आकाराचा आहे, कोणत्या जातीचा आहे, कोणत्या ठिकाणीं आहे? तसेंच त्याचें सात्त्विक स्वरूप काय, त्याचा निर्देश कोणत्या शब्दांनीं करावयाचा, तो कोणत्या वर्णाचा आहे, तो कोणत्या कारणानें उत्पन्न झाला आहे आणि तो कशाचा विकार आहे? असा हा 'अहं' पदार्थ भावरूप समजून मी त्याचें ग्रहण करूं कीं अभावरूप समजून त्याचा त्याग करूं? या अहंकाराचें वर्णन करतां येत नसल्यामुळें, तसेंच तो भावरूप आहे कीं अभावरूप आहे यासंबंधाची उपपत्ति लागत नसल्यामुळें तो

असद्रूप ठरून त्याचा मी जो आत्मा त्याच्याशीं वस्तुतः कांहीं संबंध नाहीं, असेंच म्हणणें भाग पडतें. सारांश, अशा रीतीनें अहंकार असत्य आहे आणि त्याचा कोणाशीं कोणचाच संबंध नाहीं असें म्हणावें लागतें व अशी वास्तविक स्थिति असल्यामुळें मिथ्या अहंकाराच्या कल्पनेमुळें उत्पन्न होणारी 'मी' 'तूं' ही द्वैत कल्पना आपोआपच लीन होऊन जाते. एवंच, जगांमध्ये जें जें स्थित आहे, तें तें सर्व ब्रह्मरूप आहे. तसेंच मी सद्रूप आणि तद्रूप आहें. अशा स्थितींत मी व्यर्थ शोक कां करावा? जें शुद्धस्वरूप आहे तेंच जर जगद्रूपाने सर्वत्रस्थित आहे, तर त्या अद्वैत स्वरूपामध्यें परिच्छिन्न अहंकाराला अवकाश कोठून मिळणार? या जगात वस्तुतः पदार्थश्री नसून तिच्या रूपानें सर्वव्यापी आत्माच आहे. आतां जगांतील पदार्थ सत्य आहेत असें क्षणभर मानलें तर त्यांचा आणि आत्म्याचा संबंध कसा जडतो, हें सांगतां येणें शक्य नाहीं, अर्थात्, ही गोष्ट प्रमाणानें सिद्ध करता येत नसल्यामुळें ही पदार्थश्री मिथ्या आहे, असेंच म्हणावें लागतें. मन हें आपल्या कल्पित अवयवरूपी इंद्रियाच्या योगानें स्वप्नांतील स्थितीप्रमाणें आंतल्या आंत व्यापार करीत असतें, व तें बाहेर जाऊन जगातील पदार्थांना स्पर्श करूं शकत नाहीं. तसेंच इंद्रियें आणि बाह्य विषय चित्तत्त्वाला केव्हांहि लिप्त करूं शकत नाहींत. अशा स्थितींत कोणाचा, कोणाशीं व कसा संबंध आहे असें म्हणतां येईल? वाळूचे कण आणि सुया यांचा ज्याप्रमाणें परस्परसंबंध घडूं शकत नाहीं, त्याचप्रमाणें देह, इंद्रियें, मन आणि चित्तत्त्व हीं जरीं एकत्र दिसून आलीं, तरी त्यांचा वास्तविक संबंध होणें केव्हांहि शक्य नाहीं. सारांश, हा अहंकाररूपी महाभ्रम हा मिथ्याच उत्पन्न झालेला असून त्याच्यामध्यें गुरफटून गेलेले लोक 'हें माझें' आणि 'हें ह्याचें' अशा भ्रमांत विनाकारण पडतात. हा अहंकाराचा चमत्कार तत्त्वज्ञानाच्या अभावीं उत्पन्न झाला असून सूर्यकिरणांच्या योगानें बर्फ वितळून जावें, त्याप्रमाणें तत्त्वज्ञान होतांच हा अहंकार क्षीण होतो. वस्तुतः आत्म्याव्यतिरिक्त या जगांत दुसरें कांहींहि नाहीं. वास्तव सर्व ब्रह्म आहे अशी भावना करीत मी आतां अनुभवसिद्ध प्रत्यक्तत्वाचें अनुसंधान करतों. आकाशाच्या वर्णाप्रमाणें मिथ्याच उत्पन्न झालेल्या ह्या अहंकारभ्रमाचें पुनःपुन्हां स्मरण न होणें हेंच त्याचें श्रेष्ठ विस्मरण होय. यासाठीं या अहंकारभ्रमाचा समूल त्याग करून शरदृतूमधील आकाश स्वस्वभावानें स्थित असतें, त्याप्रमाणें शांतचित्त होऊन मी आपल्या आत्मस्वरूपामध्यें कायमचा स्थिर होतों. कारण, या अहंकाररूपी भ्रमाचें अनुसंधान मनुष्याला अनर्थपरंपरेमध्यें पाडतें, त्याचीं पातकें वृद्धिंगत करतें आणि त्याला संताप उत्पन्न करतें. दुर्वासनारूपी जलानें युक्त असलेल्या हृदयरूपी आकाशामध्यें अहंकाररूपी मेघ स्फुरण पावूं लागला, म्हणजे देहरूपी कदंबवृक्ष दोषरूपी मंजरींच्या योगानें फुलून जातो. मरणाचा शेवट पुनर्जन्मांत होतो आणि जीविताचा शेवट मरणादि दुःखपरंपरेंत होतो व जगांतील सर्व भोग्य वस्तूंचें अस्तित्व अभावानें खंडित होतें. हर हर! ही स्थिति किती कष्टप्रद आणि शोचनीय आहे! 'मला हें प्राप्त झालें आणि आतां यापुढें मी हें प्राप्त करून घेईन,' अशा तऱ्हेची संतापजनक पीडा मूर्ख मनुष्यांना भोगावी लागते व ग्रीष्मऋतूमधील सूर्यकांतमण्यांतील अग्निप्रमाणें ही त्याची पिडा केव्हांच शांत होत नाहीं, वरचेवर वाढते. ज्याप्रमाणें

एखादी जलानें ओथंबलेली मेघमाला प्रचंड पर्वत-शिखराकडे धांवत जाते, त्याप्रमाणें या जगांतील विषयाच्या संबंधाची भावाभावरूपी चिंता नेहेमीं अहंकाराच्या मागोमाग धांवत सुटते. परंतु हा अहंकार एकदां अजिबात नाहींसा झाला, म्हणजे संसारवृक्ष शुष्क आणि रसहीन होऊन जातो व त्यामुळें एखाद्या पाषाणाला अंकुर फुटणें शक्य नसतें, त्याप्रमाणें या संसारवृक्षाला पुन्हां केव्हांहि अंकुर उत्पन्न होत नाहीं. तृष्णारूपी नागिणी ह्या देहरूपी वृक्षामधील बिळांचा आश्रय करून राहिलेल्या असतात; परंतु विचाररूपी गरुडाचा एकदां उदय झाला, म्हणजे ह्या तृष्णारूपी नागिणी कोठें निघून जातात, त्याचा पत्ताहि लागत नाहीं! हें विश्व मिथ्या अज्ञानापासून उत्पन्न झालें असल्यामुळें त्याची जी सत्यता प्रतीत होते, ती केवळ भ्रमामुळेंच प्रतीत होते, हें उघड आहे. अशा स्थितींत 'मीं' 'तूं' इत्यादि भेद-व्यवहार तरी सत्य कसा असणार? उत्पत्तीचें कारण होण्याला योग्य नसलेल्या अज्ञानापासून हें जग निष्कारणच उद्भवलें आहे. अर्थात्, जें अकारणच उत्पन्न होतें, त्याला सत्य तरी कसें म्हणावें! एवंच, घट बनण्यापूर्वीं मृत्तिके-मध्यें घट होता त्याप्रमाणें असलेल्या ह्या देहाची उत्पत्तीपूर्वीं जी स्थिति होती, तीच सध्यां आहे व पुढेंहि तीच कायम राहील. ज्याप्रमाणें पाण्यावरील तरंग उत्पन्न होण्यापूर्वीं व ते नाहींसे झाल्यानंतर पाण्याची शांत स्थिति असते व मधल्या स्थितीमध्यें आपली सौम्यता टाकून पाणी किंचित् कालपर्यंत लाटांच्या रूपानें चंचल झालेलें दिसलें, तरी तें पाणीच असते, त्याप्रमाणें देहादि वस्तू जरी ब्रह्माहून कांहीं काल भिन्न दिसल्या, तरी त्या तत्वतः ब्रह्मस्वरूपच आहेत. हा क्षणभंगुर देह एखाद्या तरंगाप्रमाणें स्वरूपापासूनच वास्तविक च्युत झालेला असतां तो देह म्हणजेच आत्मा अशा दृढ भावनेमुळें जे मनुष्य त्याच्यावर विसंबून राहतात, ते दुर्दैवी असून अशा प्राण्यांना अखेरीस दुःख भोगावें लागणें अपरिहार्य आहे. हे देहादि-पदार्थ आरंभीं आणि अखेरीस अस्तित्वांत नसतात आणि मधल्या स्थितीमध्यें आत्म-स्वरूपाच्या अज्ञानामुळें भासमान होतात. यास्तव ह्या परिच्छिन्न वस्तूसंबंधानें मनानें आस्था बाळगणें सर्वथा अनुचित आहे. हें लिंगशरीर आपल्या उत्पत्तीच्यापूर्वीं आणि नाशानंतर चिद्रूप आणि शांत असतें. अर्थात्, मधल्या स्थितीमध्यें तें भासमान होत असलें, तरी तें वस्तुतः चिद्रूपच आहे. आतां या ठिकाणीं असा प्रश्न उत्पन्न होतो कीं, स्थूल-सूक्ष्मादि देह असद्रूप असतां त्यांचा भास तरी कां उत्पन्न होतो?' तर ह्याचें उत्तर असे आहे कीं, स्वप्नस्थिति, भ्रम झालेल्या मनुष्याची स्थिति, एखादा अमली पदार्थ सेवन केल्यामुळें उत्पन्न झालेली उन्मत्तदशा, नावेंतून जात असतां नदीतीराची दिसणारी उलटी गति, वातपित्तादिकांच्या योगानें झालेला विकार, दृष्टिविकारामुळें आकाशांत दिसणारा दोन चंद्रांचा भ्रम, एखाद्या प्रियतम वस्तूच्या लाभामुळें उत्पन्न होणारा विलक्षण आनंद, तसेंच कामादि विकारांमुळें होणारी दशा इत्यादि स्थितींमध्यें ज्या गोष्टी अस्ति-त्वांत नसतात, त्या भ्रमामुळें किंचित्काल भासमान होतात. परंतु ती स्थिति नाहींशी झाली, म्हणजे पूर्वीं भासमान होणाऱ्या वस्तू आपोआपच क्षीण होतात. याच न्यायानें स्थूलसूक्ष्मादि देहांचा भ्रम आत्मस्वरूपाच्या ज्ञानामुळें निःसंशय बाधित होतो. बा चित्ता! या जगांतील सर्व वस्तू सत्य आहेत, असा तूं आपला विनाकारण भ्रम करून घेतलेला असल्यामुळें त्यांच्या संयोगवियोगापासून सुख-

दुःखांचा उदय होऊन तुला नेहमीं पीडा होत असते. आतां स्वप्न आणि जगद्भ्रम यांच्यामध्यें जर कांहीं फरक असेल तर तो इतकाच आहे कीं, स्वप्नस्थितींतील भ्रम अल्प कालपर्यंत टिकतो आणि हा जगताचा भ्रम जीवन्मुक्तस्थिति प्राप्त होईपर्यंत टिकतो. ही कालाची न्यूनाधिकताहि तूं आपल्या कल्पनेनेंच निर्माण केली आहेस. परंतु स्त्रीपुत्र इत्यादिकांचें मरण हें जरी काल्पनिक असलें, तरी त्यांना सत्य समजून त्यांच्या ठिकाणीं आसक्ति ठेवणाऱ्या मनुष्याला दुःख भोगावें लागतें, त्याप्रमाणें बा चित्ता! या जगांतील सर्व वस्तू आणि त्यांचे संयोगवियोग परमार्थसत्य आहेत, अशी तुझी भावना झालेली असल्यामुळें तुला या संसारांत दुःखमिश्रित सुख भोगावें लागतें. परंतु हा तुझा अपराध नसून तुझ्या ठिकाणीं अहंभाव धारण करणारा जो मी त्या माझाच तो अपराध असून, त्यामुळें मृगजळाप्रमाणें मिथ्या असतांहि तूं मला सत्य भासतोस; व जें जें तूं करतोस तें तें मींच केल्यासारखें होतें. यासाठीं भोगाच्या योगानें परिपूर्ण असें हें दृश्य जग मिथ्या आहे असा बुद्धीचा दृढनिश्चय झाला, म्हणजे मन उन्मन होतें आणि हेमंत ऋतूंतील मंजरींप्रमाणें सर्व भोगवासना आपोआप अस्तंगत होतात, अथवा मी चिद्रूप आहें व माझा चित्ताशीं कोणत्याहि तऱ्हेचा संबंध नाहीं, अशा साक्षात्कारवृत्तीचा आश्रय करून मनाचें विषयचिंतनरूपी व्यसन अजिबात टाकून दिलें, म्हणजे चित्ताला आत्मस्वरूपाची विश्रांति स्वभावतःच प्राप्त होऊं लागते. विषयोन्मुख होणें हें चित्ताचें व्यसन बनलेलें आहे. परंतु त्याला विषयांपासून पराङ्मुख करून स्वरूपोन्मुख करावें; व अशा रीतीनें परमात्मस्वरूपी भूमीमध्यें त्याला भस्मसात् करून टाकलें, म्हणजे तें आपल्या शाश्वत आणि निर्मळ स्थितीप्रत जाऊन पोहोंचतें.

ज्याप्रमाणें एखादा वीर पुरुष रणांगणांत शत्रूशीं लढतां लढतां आपल्याला मरण आल्यास आपण स्वर्गलोकाप्रत जाऊन पोहोंचणार आहों, असा बुद्धीचा निश्चय करून टाकतो व अशा रीतीनें मनाचा निश्चय करून आपल्या देहावरील आसक्तीचा निरास करतो आणि स्त्रीपुत्र, धन इत्यादि ऐहिक विषयांवरील आसक्तीचें आपल्या मनांतून उच्चाटन करून निधडया छातीनें शत्रूबरोबर लढतो आणि आपल्या संकल्पाप्रमाणें धारातीर्थी पतन पावून स्वर्गलोकाला जिंकतो, त्याप्रमाणें मी देहापासून भिन्न आहें असा साक्षात्कार करून घेऊन आणि विषयवासनांचा सर्वस्वी त्याग करून मन हें आपल्या स्वतःचा नाश करून घेतें आणि अशा रीतीनें अखेरीस परमपदाप्रत जाऊन पोहोंचतें. मन हा मनाचा शत्रु आहे आणि मन यांचा संबंध आधार आणि आधेय यांच्या संबंधासारखा आहे; म्हणजे शरीर हें एखाद्या घटाप्रमाणें आधार असून मन हें घटांतील पाण्याप्रमाणें आधेय आहे. अर्थात्, एखादा घट फुटला किंवा त्यांतील पाणी ओतून टाकलें म्हणजे त्यांचा आधाराधेयभाव नाहींसा होतो, त्याप्रमाणें शरीर आणि मन ह्यांपैकीं एकाचा अभाव झाल्यानें त्या दोहोंचा संयोग नाहींसा होतो. परंतु शरीर नाहींसें झालें तरी मन कायमचें नाहींसें झालें, असें म्हणतां येत नाहीं. शरीर आणि मन हीं रागद्वेषयुक्त असून तीं एकमेकांच्या अत्यंत विरुद्ध आणि परस्परोपजीवी आहेत. अर्थात्, मूलअज्ञानासह त्यांचा नाश झाल्याशिवाय जीवाला खरें सुख प्राप्त होणें केव्हांच शक्य नाहीं. विषयोपभोगाकरितां उत्पन्न झालेलें शरीर नाहीसें झालें, तरी जोंपर्यंत मन कायम आहे

तोंपर्यंत नवे नवे देह उत्पन्न होणें अनिवार्य आहे. देह नाहींसा होतांच मनहि नाहींसें झालें असें म्हणणें, म्हणजे आकाशांतून संचार करणाऱ्या स्त्रीनें भूमीला व्यापून टाकलें, असें म्हणण्याइतकें हास्यास्पद आहे. सारांश, जोंपर्यंत शरीर आणि मन या दोन परस्परविरोधी वस्तू एकत्र आहेत, तोंपर्यंत दोन सैन्यांच्या मध्यमार्गी उभा असणाऱ्या मनुष्यावर तरवारीचे घाव आणि बाणांचे वर्षाव होऊन त्याला अपरिमित दुःख भोगावें लागतें, त्याचप्रमाणें जीवाला हजारों अनर्थपरंपरा भोगाव्या लागतात. परस्परविरूद्ध असलेल्या देहमनांचा ज्यांमध्यें संसर्ग होतो, अशा विषयोपभोगांत रममाण होणाऱ्या मनुष्याला वडवानलांत टाकल्यास तो तेथेंहि रममाण होऊं शकेल, असेंहि म्हणण्यास हरकत नाहीं. एखाद्या लहान मुलानें यक्षाची कल्पना करावी, त्याप्रमाणें या मनानें आपल्या संकल्पानें देहाची कल्पना केलेली असून तें मन त्याला यावज्जीव अन्न देऊन पुष्ट करतें आणि त्याला आपल्या अभिनिवेशापासून—आसक्तीपासून उत्पन्न होणारीं सर्व तऱ्हेचीं दुःखें देतें. त्याचप्रमाणें मनानें दिलेल्या पीडेच्या योगानें संतप्त झालेला देह मनाला ठार मारण्याची इच्छा करतो. अर्थात्, दुर्विषयांच्या सेवनानें तो मनामध्यें राग, द्वेष, शोक, मोह, पाप इत्यादि विकार उत्पन्न करून त्याला दुःख देण्याचा प्रयत्न करतो. आतां यावर अशी शंका उत्पन्न होण्याचा संभव आहे कीं, 'देह हा मनापासून उत्पन्न झालेला असून तो त्याच्या पुत्राप्रमाणें आहे. अशा स्थितींत तो आपल्या पितृस्थानीय मनाला ठार कां मारतो? तर याचें उत्तर असें आहे कीं, बाप आततायी बनून मुलाला ठार मारण्याचा प्रयत्न करूं लागला, तर मुलगासुद्धां बापाला ठार मारण्याचा प्रयत्न करतो; व यांत अन्याय्य असें कांहींच नाहीं. परंतु वास्तविक पाहूं गेलें तर या जगांत कोणी कोणाचा शत्रु नाहीं आणि कोणी कोणाचा मित्रहि नाहीं. जे प्राणी आपल्याला सुख देतात, त्यांना आपण मित्र समजतों आणि जे प्राणी आपल्याला दुःख देण्याला कारणीभूत होतात, ते आपले शत्रु आहेत असें आपण मानीत असतों. अशी वस्तुस्थिती असल्यामुळें मनाकडून पिडित झालेला देह आपल्या मनाला मारण्याची इच्छा करतो व त्याचप्रमाणें मनसुद्धां आपल्यास होणारीं सर्व दुःखें क्षणांत शरीरावर लादण्याची इच्छा करतें. एवंच, देह आणि मन हीं स्वभावतःच परस्परविरूद्ध असल्यामुळें आणि एकमेकांना दुःखप्रद होत असल्यामुळें त्यांचा परस्परसंबंध जुळल्यावर मनुष्याला सुख होणें शक्य आहे काय? आतां मनच क्षीण झालें असतां देह हा दुःखाचें माहेरघर बनूं शकत नाहीं व यामुळें मनाचा क्षय करून टाकण्यासाठीं उत्कंठित झालेला देह, ज्ञान आणि त्याचीं साधनें प्राप्त करून घेण्याकरितां, धडपड करीत असतो. आतां यावर कोणी असे विचारील कीं 'मनाला क्षीण करून टाकण्यसाठीं देह प्रयत्न करीत असतो, तर मनानें तरी देहनाशासाठीं प्रयत्न कां करूं नये?' परंतु हा आक्षेप बरोबर नाहीं. कारण, ज्याच्या ठिकाणीं विवेक उत्पन्न झालेला नाहीं, अशा मनानें शरीर नष्ट करून टाकलें, किंवा न टाकलें, तरी तें नेहमीं अनर्थालाच कारणीभूत होत असल्यामुळें देहाच्या नाशामुळें मनाची इष्टसिद्धी होणें केव्हांहि शक्य नाहीं, व यामुळेंच तें देहाचा नाश करण्याचा प्रयत्न करीत नाहीं. मन आणि शरीर हीं जडरूप असलीं, तरी परस्परांशीं संबद्ध झालेलीं असल्यामुळें मेघ आणि सरोवर यांच्याप्रमाणें तीं एकमेकांना पोषक होतात. तीं परस्परविरूद्ध असतांहि अन्योन्य तादात्म्याध्यासामुळें एकरूप

बनतात व जल आणि अग्नि यांचा संयोग स्वयंपाक वगैरे व्यवहाराला जसा उपयोगी पडतो तशी त्यांची एकरूपता ज्याप्रमाणें दुःखाला कारणीभूत होते, त्याचप्रमाणें मोक्षसाधनाच्या बाबतींतही त्या दोघांचा मोठा उपयोग होतो. आतां देह हा चित्ताच्या अधीन असल्यामुळें, चित्तक्षय झाला म्हणजे देहाचाहि समूल क्षय होतो आणि चित्त वृद्धिंगत होऊं लागलें म्हणजे वृक्ष जसा शेंकडों शाखांच्या योगानें विस्तार पावतो तसा देहसुद्धां वाढीस लागतो. मन क्षीण झालें म्हणजे देह स्वाभाविकपणेंच वासनारहित होतो, परंतु केवळ देह क्षीण झाल्यानें मन क्षिण होऊं शकत नाहीं; यास्तव मनुष्यानें मन क्षिण करण्याचा प्रयत्न करावा. मनोरूपी अरण्यामध्यें संकल्परूपी वृक्ष वृद्धिंगत झालेले असून त्यांवर तृष्णारूपी लता वाढलेल्या आहेत. यास्तव संकल्पवृक्ष आणि त्यांवरील तृष्णारूपी लता तोडून टाकून हें मनोरूपी अरण्य मी आतां साफ करून टाकतों आणि अशा रीतीनें त्या विस्तृत भूमीमध्यें सुखानें विहार करतों. मनांतील संकल्पांचा नाश करून टाकला म्हणजे त्यांचा मनपणा शिल्लक राहणार नाहीं; तर वर्षाऋतु संपतांच आकाशांतील मेघ शांत होतो, त्याप्रमाणें वासनाजाल शांत झाल्यामुळें माझें मन शांत होईल. सप्तधातूंच्या योगानें बनलेला हा देह माझा शत्रु असून, मन क्षीण झाल्यानंतर तो नाहींसा होवो किंवा तसा राहो, मला त्याच्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं. विषयोपभोगांच्या योगानें मनाला संतुष्ट करण्यासाठीं ज्या शरीराची आवश्यकता उत्पन्न होते, त्या शरीराशीं माझा यत्किंचितहि संबंध नाहीं व मी त्या शरीराचा कोणी नाहीं. तसेंच विषयोपभोगांपासून ज्या क्षणिक सुखाची प्राप्ति होते, त्या सुखाशीं तरी मला काय करावयाचें आहे! मी देह नव्हे असें मानण्याला मोठें सबळ कारण आहे तें हें कीं, शवाच्या ठिकाणीं सर्व अवयव शाबूत असतां पाहणें, ऐकणें इत्यादि व्यवहार करण्याला तें शव समर्थ होत नाहीं. यास्तव माझें वास्तविक स्वरूप देहातीत आहे; तसेंच मी नित्य आणि स्वयंप्रकाश आहें, मी आकाशांतील सूर्याचाहि प्रकाशक आहें, यांत तिळमात्र शंका नाहीं, मी अज्ञ नाहीं व मला दुःख माहीत नाहीं. अनर्थ आणि यातना यांचा माझ्या आत्मस्वरूपाला स्पर्शहि होऊं शकत नाहीं. हें शरीर नाहींसें होवो, किंवा आहे या स्थितींत कायम टिको, मी आपल्या अनामय आणि दुःखरहित अशा आत्मस्वरूपामध्यें स्थित आहें. ज्याप्रमाणें एखाद्या राजापुढें क्षुद्र मनुष्य उभे राहूं शकत नाहींत, त्याचप्रमाणें माझ्या सर्वव्यापी आत्मस्वरूपापुढें वासना, मन इंद्रियें इत्यादि क्षुद्र विषय येऊं शकत नाहींत. मी आतां त्या परमपदाप्रत जाऊन पोहोंचलों आहें, मी केवळ आत्मस्वरूप बनलों आहें, मी विजयी झालों आहें, मी शांत, निरंश, निरीच्छ आणि निर्वासन झालों आहें, ज्याप्रमाणें तिळांतून तेल काढलें म्हणजे त्या तेलाचा आणि तिळांचा कांहीं संबंध उरत नाहीं, त्याप्रमाणें मन, इंद्रियें व देह यांचा आणि माझा आतां मुळींच संबंध राहिलेला नाहीं. आतां प्रारब्धशेष भोगण्याकरितां मी आपल्या श्रेष्ठ स्वरूपापासून जरी किंचित् चलित झालेला दिसलों, तरी पूर्ववासनेशीं माझा वस्तुतः कांहीं संबंध नाहीं असें अनुसंधान करीत असल्यामुळें, हा माझा देहेंद्रियादि परिवार आतां माझ्या करमणुकीचा विषय होऊन बसला असून तो माझ्या भोंवतीं शोभत आहे. तसेंच स्वच्छता, पूर्णकामता, सत्ता, हृद्यता, सत्यता, विदितात्मता, आनंदिता, उपशमिता, मृदुभाषिता, पूर्णता, निर्लोभता, अबाधितस्वभावता, कांतिप्रज्ञा,

एकतानता, सर्वैकता, निर्भयता, अद्वैतता इत्यादि माझ्या कांता अभ्युदयशाली, सम, शांत आणि सौभाग्ययुक्त असून त्या सुंदरी माझी निरंतर सेवा करीत असतात. माझें आत्मस्वरूप नित्य आणि सर्वव्यापी असून त्याच्यामध्यें सर्व तऱ्हेच्या कल्पना संभवतात. सारांश, सर्व विषयासंबंधाचे रागद्वेष आणि त्याच्यापासून उद्भवणारीं सुखदुःखें हीं माझ्या मनांतून आतां अजिबात नाहींशीं झालीं आहेत. यास्तव मोहरहित, निर्मनस्क आणि विकल्परहित झालेला मी, शरदृतूमधील आकाशांत एकाद्या मेघानें लीन व्हावें त्याप्रमाणें, सर्व दृश्यभावाचा त्याग करून आपल्या निर्मल आत्मस्वरूपामध्यें मी आतां कायमची विश्रांति घेतों.

---

## सर्ग ५४

—:०:—

१. सर्व विकल्पजालाचा निरास करून वैष्णवी तनुची भावना करीत उद्दालक मुनि समाधीमध्यें विश्रांति घेतो.

**श्रीवसिष्ठः**—राघवा! अशा रीतीनें आपल्या विशुद्ध आणि उदार बुद्धीच्या योगानें निर्णय केल्यानंतर तो उद्दालकमुनि आपले नेत्र अर्धोन्मीलित करून पद्मासन[1] घालून बसला. ॐ हें एक अक्षर परब्रह्माचें प्रतीक असून, ज्यानें ॐकाराचा उच्चार केला त्याला परमपदाची प्राप्ति झाल्याशिवाय रहात नाहीं, असा बुद्धीचा पूर्ण निश्चय करून त्या मुनीनें एकाद्या घाटेंतील लोळा हलविल्यामुळें घुमणाऱ्या नादाप्रमाणें उच्चस्वरानें ॐकाराचा उच्चार करण्याला सुरुवात केली, व मूलाधारापासून ब्रह्मरंध्रापर्यंत असलेल्या ॐकारस्वरूपी ब्रह्मचैतन्याशीं एकरूप होण्याला शरीरांतील कूटस्थजीवचैतन्य उन्मुख होईपर्यंत त्यानें ॐकाराचा उच्चार चालविला. अशा रीतीनें ॐकाराचा उच्चार करीत असतां ॐमधील साडेतीन मात्रांपैकीं पहिल्या मात्रेचा, म्हणजे अकाररूपी उदात्त मात्रेचा उच्चार करतांच त्याचा प्राणवायु मूलाधारांतून निघून ओंठापर्यंत येई, व त्यामुळें अगस्तिमुनीनें प्राशन केलेला सागर ओकून टाकावा त्याप्रमाणें त्याच्या शरीरांतील प्राणवायूचा रेचक होई. याप्रमाणें त्याच्या शरीरांतून बाहेर निघणारा प्राणवायु, घरट्याचा त्याग करून निघालेला पक्षी आकाशांत जाऊन उडत रहातो त्याप्रमाणें, ब्रह्मभावनेनें भरून टाकलेल्या बाह्य आकाशांत जाऊन राही; व प्राणवायु बाहेर पडतांना त्याच्या संघर्षणामुळें हृदयांत भावनेमुळें उत्पन्न होणारा अग्नि, सोसाट्याच्या वाऱ्यामुळें पसरणारा अरण्यांतील दावानल एखाद्या शुष्क वृक्षाला जाळून टाकतो त्याप्रमाणें त्याच्या सर्व शरीराला जाळून टाकी. ॐकारामधील प्रथम अंशाचा—अकाराचा उच्चार करीत असतां त्या मुनीची स्थिति भावनेमुळें अशा प्रकारची होऊन जाई. त्याकरितां उद्दालक मुनीनें हठयोगांतील प्राणायामाचा अभ्यास केला होता असें नाहीं. कारण, **हठयोग हा दुःखप्रद आहे.** ॐकारामधील दुसऱ्या मात्रेचा, म्हणजे उकाररूपी अनुदात्त मात्रेचा मंद्र उच्चार करीत असतां एखाद्या घटांतील उदकाप्रमाणें त्याच्या प्राणवायूची आपोआप समस्थिती होऊन कुंभक होई, त्यावेळीं त्याचा प्राणवायु बाहेर किंवा आंत, खालीं किंवा वर, अथवा दिशामध्यें जात नसे; तर स्तंभित केलेल्या पाण्याप्रमाणें तो क्षुब्ध होऊन तेणेंकरून उत्पन्न होणारा अग्नि आकाशांतील विद्युल्लतेच्या चमकेप्रमाणें क्षणांत शांत होई; परंतु त्यामुळें शरीराचें बर्फाप्रमाणें शुभ्र भस्म झालें आहे, असें आढळून येई. सुखदायक

---

१. हें सिद्धासनाचें उपलक्षण घ्यावें. सर्ग ५१ पहा.

पूरकशय्येवर आरूढ झाल्यानंतर देहांतील अस्थी स्पंदरहित आणि पांढऱ्या शुभ्र झाल्या आहेत, असा प्रकार त्याच्या अंतर्मुख दृष्टीला गोचर होई. त्यानंतर तें स्थूल शरीराचें आणि त्यांतील अस्थींचें भस्म प्रचंड प्राणवायूच्या प्रवाहानें वरील आकाशांत उडवून लावलें आहे, व त्या अस्थिभस्माचा रुद्राच्या नेहमींच्या व्रताप्रमाणें तपाच्या योगानें अत्यंत कृश झालेल्या आपल्या सूक्ष्म शरीरावर लेप लावला गेला आहे, असें त्याला आढळून येई. तदनंतर तें अस्थिभस्म सर्व गगनाला व्यापून टाकी व शरदृतूमधील ढगांप्रमाणें क्षणांत कोठें निघून जाई, त्याचा पत्तासुद्धां लागत नसे! परंतु उद्दालकाची ही दुसऱ्या मात्रेच्या अभ्यासांतील कुंभकस्थितिहि केवळ भावनेमुळें होऊन जाई, त्याकरितां त्यानें हठयोगाचा आश्रय केला होता असें नाहीं; कारण, हठयोग हा दुःखदायक आहे. ॐकारामधील तिसऱ्या भागाचा म्हणजे म् या शांतिप्रद अक्षराचा उच्चार करतांच त्याच्या शरीरांत प्राणवायू भरू लागून पूरक होई. यावेळीं त्याचे प्राण भावनेनें चैतन्यातील अमृतस्वरूपाच्या मध्यभागीं स्थित होत व तेणेंकरून बर्फाचा स्पर्श होतांच अंगाला शीतलता येते त्याप्रमाणें, त्याचे प्राण शांत होऊन जात. पुढें क्रमाक्रमानें आकाशांतील धुराचे लोट शीतल मेघ बनतात, त्याप्रमाणें गगनकोशांत संचार करणारे त्याचे प्राण चंद्रमंडलरूप बनत. अशा रीतीनें चंद्रमंडलांत प्रविष्ट झालेले त्याचे प्राणवायू 'धर्ममेघ' नांवाच्या समाधींतल्याप्रमाणें[1] आल्हादानें परिपूर्ण होऊन जाळींतून येणाऱ्या चंद्राच्या किरणांच्या बनणाऱ्या स्फटिकदंडाप्रमाणें अमृतमय झाले. त्या प्राणवायूंची ती अमृतधारा, शंकराच्या मस्तकावरून पडणाऱ्या आकाशगंगेप्रमाणें आकाशांतून खालीं उतरून त्याच्या शरीराच्या अवशिष्ट असलेल्या भस्मावर येऊन पडली. त्यामुळें ज्यामध्यें मंदरपर्वताचें मंथन चाललेलें आहे अशा क्षीरसमुद्रांतून पारिजातवृक्ष उत्पन्न व्हावा, त्याप्रमाणें शरीर चतुर्भुज झालें आणि त्याची कांति चंद्रबिंबाप्रमाणें शोभायमान होऊं लागली. अशा रीतीनें त्या उद्दालक मुनीचें शरीर नारायणाच्या देहाप्रमाणें बनलें व त्याचे नेत्र आणि मुखकमल विकसित होऊन रमणीय आणि तेजस्वी दिसूं लागले. ज्याप्रमाणें पाण्याच्या प्रवाहांनीं एखादें सरोवर तुडुंब भरून टाकावें किंवा वसंत ऋतूमध्यें रसानीं वृक्षाचा अंतर्भाग परिपूर्ण करावा, त्याप्रमाणें त्याच्या अमृतमय प्राणांनीं त्याचें शरीर ओतप्रोत भरून टाकलें. चक्राकार भोंवऱ्यांनीं पसरत जाणाऱ्या पाण्यानें गंगानदी भरून जावी त्याप्रमाणें षड्चक्राच्या मार्गानें पसरत उभ्या रहाणाऱ्या कुंडलिनीला त्याच्या प्राणवायूनें भरून टाकली. सारांश, वर्षाकाल निघून जातांच ज्याप्रमाणें पृथ्वीचा पृष्ठभाग अतिशय स्वच्छ आणि प्रसन्न दिसूं लागतो, त्याप्रमाणें त्या उद्दालक मुनीचें शरीर ॐकाराचा उच्चार करीत असतां केल्या जाणाऱ्या भावनांमुळें अतिशय निर्मल होऊन समाधीचा अभ्यास करण्याविषयीं उन्मुख झालें.

तदनंतर त्या उद्दालक मुनीनें पद्मासनावर स्थित होऊन एखाद्या उन्मत्त हत्तीला बंधनस्थानीं बांधून ठेवतात, त्याप्रमाणें त्यानें आपल्या पांचही ज्ञानेन्द्रियांना आंवरून निर्विकल्पसमाधीमध्यें स्थिर होण्याकरितां प्रयत्न चालविले. प्रथम त्यानें आपलें मन शरत्कालांतील आकाशाप्रमाणें निर्मल करण्याला सुरुवात केली. आशा, तृष्णा, लोभ इत्यादि विकारांचा प्रादुर्भाव होऊन त्याच्या योगानें बहिर्मुख होणाऱ्या मनाला शांत करण्यासाठीं त्यानें

---

१. 'प्रसंख्यानेऽप्यकुसीदस्य सर्वथा विवेकख्यातेर्धर्ममेघः समाधिः ॥' पातं. योग ४।२९

प्राणायामाचा अभ्यास केला व त्यामुळें त्याचें प्राणवायुरूपी चंचल हरिण स्थिर झालें. परंतु एखादा अर्धवट रोंवलेला खुंटा त्याला बांधलेल्या दोरीनें ओढला असतां उपटला जाऊन दूर नेला जावा, त्याप्रमाणें त्याचें मन संसारचिंतनामुळें निर्विकल्पसमाधीच्या स्थितीपासून ओढून नेलें जाऊं लागलें. अशा रीतीनें अधोभागीं धांवणाऱ्या आपल्या चित्ताला त्यानें विवेकबलानें मार्गे परतवलें आणि एखाद्या सेतूनें पाण्याला क्षणांत अडकवून टाकावें, त्याप्रमाणें त्यानें आपल्या मनाला समाधिमध्ये निरुद्ध करण्याचा प्रयत्न केला. त्यानंतर संध्याकाळच्या वेळीं एखादें कमल अर्धवट मिटलें जावें व त्यामुळें त्यांतील मध प्राशन करणारे दोन भ्रमर स्तब्ध व्हावे, त्याप्रमाणें त्यानें आपले नेत्र अर्धोन्मीलित केले; व त्यामुळें त्याच्या डोळ्यांतील बुबुळें स्पंदरहित होऊन शोभूं लागलीं. ज्याप्रमाणें एखाद्या चक्रवर्तीराजाच्या जन्मकाळीं शुभसूचनार्थ वायूच्या शीतल आणि मंद मंद लहरी वाहूं लागतात, त्याप्रमाणें त्या मुनीच्या प्राणापानवायूंचा प्रवाह सौम्य अशा रीतीनें वाहूं लागला. तिळांतील तेल ज्याप्रमाणें प्रयत्नानें निराळें करतात, त्याप्रमाणें त्या मुनीनें दृढ प्रयत्नानें आपलीं इंद्रियें विषयांपासून परावृत्त केलीं आणि एखादें कांसव आपले अवयव आंत ओढून घेतें, त्याप्रमाणें त्यानें आपल्या इंद्रियांना अंतर्मुख करून झांकून ठेवलें. ज्याप्रमाणें एखाद्या लहानशा भांड्यांत एकाएकीं झांकून ठेवलेला मणि आपले दूर पसरलेले किरण बाहेरच्या बाहेर टाकून देतो, त्याप्रमाणें त्या प्रबुद्ध मुनीनें सर्व बाह्य विषयांचा त्याग केला व एखादा वृक्ष मार्गशीर्ष महिन्यांत आपणांमधील रसांना लीन करतो, त्याप्रमाणें आपल्या मनांतील वासनांना त्यानें अधिष्ठानतत्त्वामध्यें लीन करून टाकलें. ज्याप्रमाणें एखाद्या पाण्यानें भरलेल्या भांड्याचें तोंड फडक्यानें बांधून तो उलटा टांगून ठेवला असतां पाणी बाहेर पडण्याला वाव नसल्यामुळें आंतील पाण्याचा दाब त्या घटाच्या सर्व रंध्रकोशांवर पडतो, त्याप्रमाणें त्यानें आपल्या पाठीचा कणा ताठ करून मूलाधाराचा अवष्टंभ करून गुदाकुंचन केलें; व अशा रीतीनें आपल्या शरीरांतील नऊ द्वारांमधील वायूचें आकर्षण करून त्यांना आपल्या हृदयांत स्थिर केलें. ज्याप्रमाणें मेरुपर्वतानें रत्नांच्या योगानें प्रकाशमान होणाऱ्या आणि कल्पवृक्षावरील पुष्पांच्या योगानें रमणीय दिसणाऱ्या शिखराला धारण करावें त्याप्रमाणें आत्मरत्नाच्या प्रकाशानें युक्त असलेल्या आणि रजतमरहित म्हणून स्पष्ट प्रसन्नमुखरूपी कमलाच्या योगानें मनोरम दिसणाऱ्या आपल्या मानेला त्यानें समरेषेंत स्थिर धारण केलें आणि एखाद्या उन्मत्त हत्तीला विंध्य पर्वतांमधील खळग्यांत युक्तीनें अडकवून ठेवावें, त्याप्रमाणें प्रत्याहारादि उपायांच्या योगानें त्यानें आपल्या मनाला वश करून हृदयांत स्थिर केलें. यामुळें त्याचें चित्त शरदृतूंतील आकाशाप्रमाणें अतिशयनिर्मळ आणि सौम्य दिसूं लागून एखाद्या शांत आणि परिपूर्ण अशा सागराप्रमाणें शोभूं लागलें. अशा रीतीनें चित्तप्रसादामुळें ब्रह्माकार स्थितीपर्यंत जाऊन पोहोंचल्यानंतरहि त्याच्या चित्तांत मधून मधून विपरीत भावना उदय पावत; परंतु वरचेवर स्फुरण पावून उडणाऱ्या मशकांना वायु उडवून लावतो, त्याप्रमाणें आपल्या ब्रह्माकारवृत्तिप्रवाहाचा विच्छेद करणाऱ्या त्या विकल्पाचा तो तत्काल निरास करी. इतकें झालें तरी ते विकल्प पुनः पुन्हां डोकें वर काढीत आणि त्याच्या समाधीचा भंग करूं लागत; परंतु ज्याप्रमाणें एखादा शूर योद्धा रणांगणामध्यें आपणांसमोर येणाऱ्या शत्रूंवर

तलवार चालवून त्यांचीं डोकीं सपासप कापून काढतो, त्याप्रमाणें आपल्या शुद्ध मनाच्या योगानें तो असल्या विकल्पांना कोठच्या कोठें उडवून टाकी. अशा रीतीनें सर्व विक्षेपांना छिन्नभिन्न करून टाकल्यानंतर तमोगुणरूपी अंधकारानें आच्छादित झालेला आणि चंचल-वृत्तिरूपी काजळाच्या योगानें कलंकित झालेला विवेकरूपी सूर्य त्याला आपल्या हृदयरूपी आकाशामध्यें दिसूं लागला. परंतु लगेच अंतःकरणांत सत्त्वगुणाच्या भावना करून, वायूनें काजळाला उडवून लावावें त्याप्रमाणें, सम्यक्ज्ञानाच्या योगानें त्यानें त्या तमोगुणाचा निरास केला. अशा रीतीनें तमोगुण अस्तंगत होतांच, रात्रीचा अंधकार नष्ट झाल्यानंतर एखाद्या कमलानें उदय पावणाऱ्या सूर्यानें युक्त असलेल्या प्रातःसमयाकडे पहावें त्याप्रमाणें, त्यानें आपल्या हृदयांत तेजाचा विशाल पुंज पाहिला. परंतु ज्याप्रमाणें एखाद्या हत्तीच्या छाव्यानें स्थलकमलांनीं युक्त असलेल्या वनाचा विध्वंस करावा, त्याप्रमाणें, त्यानें त्याहि भ्रमाचा निरास केला; व एखाद्या वेतालानें रक्ताचा प्रवाह पाहतांच त्याला पिऊन टाकावें, त्याप्रमाणें अधिष्ठानतत्वांच्या दर्शनानें त्या तेजोभ्रमालाही त्या मुनीनें बाधित करून टाकलें. सारांश, रजोगुणाच्या योगानें समाधिस्थितींतून वारंवार चाळवलें गेलेलें त्याचें मन अखेरीस रात्रीच्या वेळच्या कमलाप्रमाणें किंवा मदिरा प्राशन करून धुंद झालेल्या मनुष्याप्रमाणें गाढ निद्रासुख अनभवूं लागलें. परंतु ज्याप्रमाणें वायूनें मेघमालेला, हत्तीनें नीलकमलिनीला किंवा सूर्यानें रात्रीला क्षीण करावें, त्याप्रमाणें विवेकप्रबोधाच्या योगानें त्यानें त्या निद्रेलाहि नाहींसें करून टाकलें. अशा रीतीनें झांपेचा पगडा उडाल्यानंतर सूर्याकडे पहाणाऱ्या मनुष्याला आकाशांत माराच्या पिसांप्रमाणें निरनिराळ्या रंगाचें काल्पनिक आकार दृग्गोचर होतात, त्याप्रमाणें त्याच्या मनाला अनेकविध वासनांच्या योगानें चिदाकाशात निरनिराळे आभास दिसूं लागले. परंतु एखाद्या मेघानें तमालपुष्पाला विशीर्ण करून टाकावें, वायूनें धुवयाला नष्ट करावें किंवा दीपानें अंधकाराला खाऊन टाकावें, त्याप्रमाणें त्यानें त्या आकाशभावनेचाहि निरास केला. त्यानंतर मैरेय नामक मद्य प्राशन करणारा मनुष्य निद्रेनंतरहि मूढच रहातो, तद्वत्‌च त्याचें मन मूढ बनलें. परंतु, रात्रीच्या योगानें पृथ्वीवर उत्पन्न झालेल्या जाड्याचा सूर्यानें निरास करावा, तद्वत्, या मोहाचाहि त्या महाबुद्धिमान उद्दालकानें निरास केला. एवंच, अशा क्रमानें तेज, तम, निद्रा, मोह इत्यादि वृत्तींचें परिमार्जन केल्यानंतर त्याचें मन क्षणभर निर्विकल्प-समाधीच्या अनिर्वचनीय स्थितीमध्यें विश्रांति पावलें. परंतु ती दिव्य स्थिति त्याला प्राप्त होते न होते, तोंच बा रामभद्रा! ज्याप्रमाणें एखाद्या सरोवराचें पाणी पाटांतून वहात वहात शेतांत जातें व त्या पाण्यानें शेत तुडुंब भरलें म्हणजे तें पुन्हां उलट आपल्या मूळ स्थानाकडे वळतें, त्याप्रमाणें त्याची वृत्ति पुनः बाह्यप्रपंचाकार झाली. लगेच त्यानें आपल्या संविल्कलेला स्वस्वरूपामध्यें पुनः स्थिर करण्याचा प्रयत्न केला; व त्यानें बहुतकाळ ध्यानाचा अभ्यास केलेला असल्यामुळें आणि निर्विकल्पसमाधीमधील आनंद त्याला अनुभूत असल्यामुळें त्या संस्काराच्या साहाय्यानें तो जेव्हां आपल्या मनाला आंवरून स्वरूपोन्मुख करूं लागला, तेव्हां सुवर्णाचा अलंकार बनावा, त्याप्रमाणें त्याची वृत्ति सविकल्पसमाधीमध्यें स्थिरता पावूं लागली. एखाद्या घटांतील चिखल शुष्क होऊन तो घटाला चिकटून घट रूप

बनावा तद्वत्, सविकल्पसमाधीच्या अभ्यासक्रमानें त्याचें चित्त इंधनरहित अग्निप्रमाणें क्षीण होत होत अखेर दूध आणि पाणी एकजीव व्हावें त्याप्रमाणें चिदेकरस बनलें. अशा रीतीनें त्याच्या चित्ताचा चित्तभाव नाहींसा होतांच तरंगादि भेदांचा नायनाट करून समुद्रानें जलाचें सामान्यरूप धारण करावें, त्याप्रमाणें त्याच्या चित्तांतील चित्प्रतिबिंब चिद्बिंबस्थितीप्रत जाऊन पोहोंचलें. सारांश, निर्विकल्पसमाधीचा परिपाक झाल्यामुळें ज्यामधील सर्व द्वैताभास अस्तंगत झाला आहे, अशा सर्वाधिष्ठानभूत शुद्ध चिदाकाशाच्या अत्युच्च स्थितीप्रत तो जाऊन पोहोंचला; व त्या स्थितीमध्यें ब्रह्मादि देवांना प्राप्त होणाऱ्या नित्य निरतिशयानंदाचा तो जणुं अनंत सागरच बनला. अशा रीतीनें आपल्या शरीराचें शोधन करून आणि त्याच्या अतीत होऊन तो सत्तासामान्यरूप बनला व त्याचा चित्तवृत्तिरूपी हंस आत्मानंदसरोवरामध्यें पोहूं लागला आणि त्यामुळें शरदृतूमधील निर्मल आकाशांतील पूर्ण चंद्राप्रमाणें शोभूं लागला. अखेरीस आत्मानुभवाच्या अद्वितीय आणि अनिर्वचनीय स्थितीप्रत जाऊन पोहोंचलेला तो उद्दालकमुनि निर्वातप्रदेशांतील दीप, चित्रांतील मूर्ति, निस्तरंग समुद्र किंवा पर्जन्यवृष्टीनंतर जलशून्यतेमुळें मूकवृत्ति धारण करणारा मेघ यांच्याप्रमाणें शांत आणि स्थिर दिसूं लागला. अशा त्या दिव्य स्थितीमध्यें पुष्कळ काल लोटल्यानंतर आकाशांत संचार करणारे सिद्ध, विद्याधर व देव यांचे संघच्या संघ त्याच्या दृष्टीस पडले. ते सिद्धसमूह, तसेंच अप्सरांचे गण त्याच्या भोंवतीं जमा झाले, व इंद्र, सूर्य इत्यादि श्रेष्ठ लोक प्राप्त करून देणाऱ्या सिद्धी त्याच्यापुढें हात जोडून उभ्या राहिल्या. परंतु ज्याप्रमाणें एखादा गंभीर आणि शांत वृत्तीचा पुरुष बाल्यावस्थेंतील विलासांचा आदर करीत नाहीं, त्याप्रमाणें त्या ब्रह्मज्ञानसंपन्न उद्दालकानें त्या सिद्धिजालांकडे ढुंकूनसुद्धां पाहिलें नाहीं. सारांश, उत्तरायणांत सूर्य जसा उत्तरतटावर सहा महिने रहातो, त्याप्रमाणें सर्व सिद्धींना दूर झुगारून देणाऱ्या त्या मुनीनें त्या गुहेमध्यें समाधिस्थितींत सहा महिने घालविले. त्या आनंदमंदिरामध्यें रहात असतां ज्ञानाच्या सातव्या भूमिकेपर्यंत अभ्यास केल्यानंतर सिद्ध, देव, साध्य, तसेंच ब्रह्मादि देव ज्या पदामध्यें रहातात, अशा जीवन्मुक्त पदाप्रत तो जाऊन पोहोंचला. इकडे आत्मस्वरूपाच्या नित्यनिरतिशयानंदाचा आस्वाद घेतां घेतां तो उद्दालकमुनि सुखदुःखादि क्षुद्र वृत्तींच्या पलीकडे जाऊन स्वयंप्रकाश आणि पूर्ण अशा आत्म्याशीं समरस झाला. ज्याप्रमाणें एखाद्या स्वर्गसुख भोगलेल्या मनुष्याला भूलोकसुखाची किंमत वाटेनाशी होते, त्याप्रमाणें आत्मानुभवाचा दिव्य आनंद मनुष्यानें हजारों वर्षें भोगला किंवा क्षणभर भोगला, तरी त्याचें मन क्षुद्र विषयामध्यें आसक्त होणें केव्हांहि शक्य नसतें. तें पद प्राप्त होणें हीच परमोच्च गति, तीच खरी खरी शांति आणि तेंच शाश्वत कल्याणकारक श्रेय होय. अशा त्या सर्वश्रेष्ठ पदाच्या ठिकाणीं ज्याला विश्रांति प्राप्त झाली, त्याला या जगद्भ्रमाची पुन्हां बाधा होणें अशक्य आहे. तें परमपद ज्या साधूंना एकदां प्राप्त झालें त्यांना, नंदनवनाची प्राप्ति झालेल्या मनुष्याना खदिरवृक्षांनीं युक्त असलेल्या अरण्यांत जाऊन रहण्याची कालत्रयीं इच्छा होत नाहीं त्याप्रमाणें, ह्या दृश्य जगाच्या स्थितीमध्यें रहाण्याची पुन्हां इच्छा उत्पन्न होणें शक्य नाहीं. ज्या मनुष्यांनीं श्रवण, मनन, समाधि ह्या साधनांच्या योगानें अपरोक्षसाक्षात्कार करून घेऊन त्या महदानंदाची पदवी प्राप्त करून घेतली त्यांच्या मनाला, राजे लोकांना दीनता स्पर्श करीत

नाहीं तद्वत्, दृश्य जगाची यत्किंचित्‌हि किंमत वाटत नाहीं. ज्या मनुष्याचें चित्त एकदां त्या परमपदाच्या ठायीं विश्रांति घेऊं लागलें, त्याला समाधिव्युत्थानदशेमध्यें क्वचित् (ज्ञानाच्या सहाव्या भूमिकेंत) इतरांनीं पुष्कळ प्रयत्न केला असतां जगताचें भान होतें, व क्वचित् (ज्ञानाच्या सातव्या भूमिकेंत) जगताचें भान मुळींच असत नाहीं. असो. पूर्वी वर्णन केल्याप्रमाणें सर्व सिद्धींना दूर झुगारून देऊन त्या उद्दालक मुनीनें समाधिस्थितीमध्यें सहा महिने घालविल्यानंतर चैत्र महिन्यांत सूर्यानें धुक्याचें पटल बाजूला सारून बाहेर पडावें त्याप्रमाणें त्यानें आपल्या समाधीचें विसर्जन केलें. देहभानावर येतांच त्या तेजस्वी मुनीनें चोहोंकडे दृष्टि फेंकली, तों ज्याची अंगकांति चंद्रबिंबाप्रमाणे स्निग्ध आणि मधुर आहे, ज्या नमस्कार करण्याकरितां अत्यंत उत्सुक झालेल्या आहेत, ज्यांच्या हातांतील चवऱ्यांवरून मंदारपर्वतावर शुभ्र वर्णाचे धुळीचे कण उडालेले आहेत आणि ज्यांच्या सुंदर हातांमध्यें पताका शोभत आहेत अशा रमणीय अप्सरा, ज्यांवरून मंदारपर्वतावरील धुळीनें आच्छादित झालेले भ्रमर उडत आहेत आणि ज्यावर उत्तमोत्तम पताका स्फुरण पावत आहेत अशा विमानांचे समुदाय, त्याचप्रमाणे ज्यांच्या करकमलांमधून पवित्र दर्भ शोभत आहेत असे आमच्यासारखे मुनि आणि विद्याधरींच्या संघानें वेष्टित झालेले विद्याधर त्याच्या दृष्टीस पडले. ते सर्वजण त्या महात्म्या उद्दालकमुनीला म्हणाले:—‘भगवन्! आमच्याकडे कृपादृष्टीनें अवलोकन करा. हें विमान आम्हीं आपल्याकरितां आणलें आहे. तरी ह्यांत बसून आपण स्वर्गलोकाला चला. कारण, या जगामध्यें जे जे श्रेष्ठ भोग प्राप्त होण्यासारखे आहेत त्याच्या परमसीमेची भूमि जर कोणती असेल, तर ती स्वर्ग हीच होय. यास्तव विभो! आपण आमच्याबरोबर स्वर्गांत चला व त्याठिकाणीं आपल्याला अभिमत आणि उचित असतील असे भोग कल्पपर्यंत खुशाल भोगीत रहा. या जगांत जे जे महान् महान् पुरुष सर्व तऱ्हेच्या तपश्चर्या करण्यांत आपल्या आयुष्याचा व्यय करतात, त्यांचें त्यांचें अखेरचें ध्येय स्वर्गातील भोग भोगणें हेंच असतें. ज्याप्रमाणें एखाद्या हत्तीला खुष करण्याकरितां त्याच्या भोंवतीं हत्तिणींनीं जमावें, त्याप्रमाणें भगवन्! आपली सेवा करण्याकरितां ह्या पहा विद्याधरांच्या सुंदर स्त्रिया या ठिकाणीं कल्पवृक्षांवरील फुलांचे हार तयार करून आणि हातांत चवऱ्या धारण करून आपल्या सभोंवतीं उभ्या राहिल्या आहेत. या जगांत धर्म आणि अर्थ त्यांचें जर कोणतें सार असेल, तर ते काम हेंच असून कामाचें सार कोणतें असेल, तर तें उत्तमोत्तम स्त्रिया हेंच होय. ज्याप्रमाणें सुवासिक मंजरी वसंतऋतूमध्येंच उत्पन्न होतात, त्याप्रमाणें उत्तमोत्तम तरुणी स्वर्गामध्येंच पैदा होतात.’ अशा रीतीनें भाषण करणारे ते देव आपले अथिती आहेत असें समजून उद्दालक मुनीनें त्यांची यथासांग पूजा केली; परंतु त्यांनीं केलेलें स्वर्गाचें वर्णन ऐकून त्याच्या मनावर मोहाचा यत्किंचित्सुद्धां पगडा बसला नाहीं. तो मुनि आतां आत्मनिष्ठ झालेला असल्यामुळें स्वर्गाच्या ऐश्वर्यवर्णनानें त्याला हर्ष झाला नाहीं किंवा त्या ऐश्वर्यासंबंधानें त्याच्या मनांत तिरस्कारबुद्धिहि उत्पन्न झाली नाहीं. त्या सिद्धगणाला उद्देशून तो फक्त इतकेंच म्हणाला कीं, ‘अहो सिद्धांनो! आपण आतां येथून गमन करावें;’ व असें शब्द उच्चारून तो मुनि लगेच निर्विकल्पसमाधीमध्यें स्थिर झाला. अशा रीतीनें विषयोपभोगासंबंधानें पूर्णपणें विरक्त झालेल्या त्या उद्दालक मुनीची कांहीं दिवस सेवा केल्यानंतर ते सिद्धहि तेथून

निघून गेले. पुढें जीवन्मुक्तस्थितीप्रत जाऊन पोहोंचलेल्या त्या मुनीनें अरण्यें, ऋषींचे आश्रम, मेरु, मंदर, कैलास, हिमालय, विंध्य वगैरे पर्वत, तसेंच निरनिराळीं द्वीपें, उपवनें, दिशा, जंगलें, अरण्यभूमी यांच्यामध्यें यथेच्छ आणि यथासुख संचार केला. तेव्हांपासून त्या उद्दालक मुनीनें पर्वतांवरील गुहांमधून ध्यानलीला करण्यांत आपला काळ कंठला. अशा रीतीनें ध्यानाभ्यास करीत असतां तो कित्येक वेळां एखाद्या दिवसानंतर देहभानावर येई, तर कित्येकवेळां एखाद्या महिन्यानंतर, वर्षानंतर किंवा क्वचित् कांहीं वर्षांचा काळ लोटल्यानंतर समाधींतून जागा होई. पुढें पुढें त्याचें चित्त समाधीमध्यें इतकें सुस्थिर झालें कीं, बाह्यत: व्यवहार करीत असतांहि त्याच्या समाधीचा भंग होत नसे. वृत्ति चिदाकार करण्याचा अभ्यास करतां करतां अखेरीस त्याच्या ठिकाणीं अपरिच्छिन्न चिद्भाव बिंबला व त्यामुळें सूर्याचा प्रकाश भूमीवर सारखा पसरावा. त्याप्रमाणें सर्व भूतांसंबंधाचा समत्वभाव त्याच्या वृत्तीमध्यें आरूढ झाला. पुढें पुढें चित्सामान्याच्या चिराभ्यासामुळें तो सत्तासामान्याच्या स्थितीप्रत जाऊन पोहोंचला; व तेणेंकरून चित्रांतील सूर्याप्रमाणें त्याच्या ठिकाणीं या दृश्य जगासंबंधानें वृत्तींचे उदयास्त होत नाहींसे झाले, सारांश, चित्तवृत्तीमधील सर्व विक्षेप गलित होऊन ज्याला नित्यनिरतिशयानंदरूपी परमपदाची प्राप्ति झाली आहे, अखिल कर्मबीजाचा क्षय होऊन आणि जन्मपाश नष्ट झाला असून सर्व संदेह अस्तंगत झाले आहेत, अशा तऱ्हेचा तो उद्दालक मुनि शरदृतूमधील आकाशाप्रमाणें शांत, अपरिच्छिन्न, निरतिशयसुखस्वरूप आणि आवरणशून्य अशा ब्रह्मभावाच्या स्थितीप्रत जाऊन पोहोंचला.

———

# सर्ग ५५

—:*:—

१. सत्तासामान्याचें लक्षण. २. उद्दालकानें योगयुक्त होऊन देहत्याग केल्यानंतर खिंखिनी नामक देवी त्याचें शव भूषण म्हणून धारण करते.

**श्रीराम:**—भगवान्! आपण आत्मज्ञानरूपी दिवस उत्पन्न करणारे सूर्य, संशयरूपी तृणाला दग्ध करून टाकणारे अग्नि आणि अज्ञानापासून उत्पन्न होणारा तापत्रयरूपी दाह शांत करणारे जणुं चंद्रच आहां. यास्तव मी आपल्याला असें विचारतों कीं, सत्तासामान्य याचा अर्थ काय?

**श्रीवसिष्ठ:**—राघवा! या जगांत विषयांचा अत्यंत अभाव आहे अशी निरंतर भावना करीत गेल्यानें चित्त क्षीण होऊन जी स्वत:सिद्ध आणि चित् व अचित् अशा दोहोंमध्यें अनुस्यूत असणारी सत्ता अवशिष्ट रहाते, तिलाच सत्तासामान्य हें नांव दिलें जातें. सर्व वृत्तीमध्यें प्रतिबिंबित होणारी चित् अखिल दृश्याचा सम्यक्ज्ञानानें बाध होऊन जेव्हां चेत्यांशरहित बनते आणि बिंबचैतन्यामध्यें लीन होते, तेव्हां आकाशाप्रमाणें अति स्वच्छ अशी जी सत्ता शिल्लक राहते, तिला सत्तासामान्य ही संज्ञा प्राप्त होते. जेव्हां चित्तवृत्तीमध्यें अभिव्यक्त होणारें चैतन्य, बाह्य आणि आंतर अशा सर्व दृश्याला बाधित करून आपल्या पारमार्थिक स्वरूपानें वास करूं लागतें, तेव्हां त्या चित्ताच्या स्थितीला सत्तासामान्य ही संज्ञा प्राप्त होते. ज्या वेळीं सर्व भूतें आपल्या वास्तविक स्वरूपानें प्रकाशित होतात, अर्थात् चिन्मात्र बनतात, त्यावेळीं त्या स्थितीला सत्तासामान्य हें नांव दिलें जातें. ज्याप्रमाणें एखादें कांसव आपले पाय आंत आकर्षण करून घेतें, त्याप्रमाणें द्रष्ट्याकडे दृश्य या दृष्टीनें न पाहिल्यामुळें जेव्हां

तें आपल्या मूळच्या आत्मस्वरूपामध्यें लीन होतें, तेव्हां त्या स्थितीला सत्तासामान्य हें नांव दिलें जातें. सर्व भूतांमध्यें आत्म्याचा भगवद्भाव पाहणें ही ज्ञानाच्या सप्तम भूमिकेवर आरूढ झालेल्या पुरुषाची परमोच्च दृष्टि असून सदेह व अदेह मुक्तीमधील स्वरूपस्थिती जरी सारखीच असली, तरी ती परमदृष्टि हाच त्या दोन्ही स्थितींमधील विशेष आहे. निष्पापा रामा! ही दृष्टि पांचव्या भूमिकेवर आरूढ झालेल्या ज्ञानी पुरूषाच्या समाधिमध्यें असते ही गोष्ट खरी; तथापि ज्ञानाच्या सातव्या भूमिकेवर आरूढ झालेल्या पुरूषांच्या व्युत्थानदशेंतहि ही स्थिति कायम असते. परंतु केवल अज्ञ पुरुषाला ही सम्यक ज्ञानापासून उदित होणारी परमोच्च ज्ञानदृष्टि केव्हांहि प्राप्त होत नाहीं. ही दृष्टि जीवन्मुक्तांच्या ठिकाणीं बाणलेली असून असल तत्त्ववेत्ते-जीवन्मुक्त पारदादि सिद्धरसांप्रमाणे किंवा आकाशमार्गांतील वायुप्रमाणें अनासक्त राहून भूतलावर संचार करीत असतात. राघवा! ह्या ज्ञानदृष्टीमध्यें परिणत झालेले आमच्यासारखे पुरुष पृथ्वीवर खुशाल संचार करीत फिरतात; व नारदादि मुनी आणि ब्रह्मा, विष्णु, शंकर इत्यादि ईश्वर ऊर्ध्व लोकांमध्यें यथेच्छ विहार करीत असतात. **उद्दालक** मुनीच्या ठिकाणीं हीच दिव्य ज्ञानदृष्टि बाणलेली होती व ह्या सकलभयनाशक दृष्टीचा अवलंब करून तो जगद्गृहामध्यें प्रारब्धक्षय होईपर्यंत वास करीत होता. अशा रीतीनें पुष्कळ काळ लोटल्यानंतर देहाचा त्याग करून आपण विदेहमुक्तस्थितीमध्यें रहावें, असा त्याच्या बुद्धीचा ठाम निश्चय झाला. अशा तऱ्हेचा निश्चय करून त्या गुहेमध्यें पल्लवासनावर बसून आणि पद्मासन घालून त्यानें आपले नेत्र अर्धोन्मीलित केले, गुदद्वाराचा निरोध करून शरीरांतील नव द्वारांमधील वायूचा संयम केला आणि शब्दस्पर्शादि वृत्तींना हृदयांत आणून त्यांना भावनेनें परमार्थरूप बनविलें. त्यानें प्राणवायूचा निरोध केला, आपली मान सरळ रेषेंत धारण केली व जिव्हेचें टोक टाळ्यांतील छिद्रामध्यें घालून आणि अशा रीतीनें तें द्वार बंद करून खेचरी मुद्रा केल्यामुळे त्याचें मुख तेजस्वी दिसूं लागलें. खेचरी मुद्रेमुळे त्याच्या दांताच्या कवळ्या एकमेकांना चिकटलेल्या नव्हत्या व त्याचें मन आणि दृष्टि बाहेर नव्हती किंवा आंत नव्हती, अधोभागीं नव्हती किंवा ऊर्ध्वभागीं नव्हती; तसेंच विषयामध्यें आसक्त झालेली नव्हती, किंवा शून्यही बनलेली नव्हती. प्राणादि वायूंचा निरोध केला गेल्यामुळें त्याच्या मनाचें चांचल्य नाहींसें झालें होतें व त्याचें मुख प्रसन्न दिसत होतें. तसेंच बा राघवा! चिद्रूप अशा ब्रह्मानन्दाचा अनुभव घेत असल्यामुळें त्याच्या सर्वांगावर रोमांच उभे राहिले होते. त्याच्या अंतःकरणांतील चित्प्रतिबिंबानें चिद्बिंबामध्यें प्रवेश केला आणि चिन्मात्राच्या अनुसंधानाभ्यासामुळें त्याच्या अंतःकरणांत सर्वोत्कृष्ट आनंद स्फुरण पावूं लागला. नंतर त्या निरतिशयानन्दाचा आस्वाद घेतां घेतां त्याच्या चित्तांतील चित्सामान्यदशेचाही लय होऊन तें अनंत आणि विश्वव्यापी अशा सत्तासामान्यदशेप्रत जाऊन पोहोंचलें. सारांश, अशा रीतीनें विक्षेप आणि वैषम्य यांनीं रहित असलेला तो **उद्दालक** मुनि स्वरूपानुभवजन्य विश्रांति घेण्यांत गढून गेलेला असून त्या वेळीं त्याच्या चेहऱ्यावर दिव्य आनंदाचें तेज झळकत होतें. पुढें परमात्मपदीं आरूढ झाल्यामुळें त्याच्या अंगावरील आनंदाचे रोमांच नाहींसे झाले, प्रारब्धक्षयामुळें तो पापरहित निर्मल झाला, आणि त्याचा भवभ्रम दीर्घकाल मननामुळे कायमचा शांत झाला. त्यासमयीं तो

महासत्त्वसंपन्न मुनि एखाद्या चित्रांतील मूर्ती-प्रमाणें निश्चल आणि शरदृऋतूमधील निर्मल आकाशामध्यें शोभायमान होणाऱ्या पूर्ण चंद्रा-प्रमाणें तेजस्वी दिसूं लागला. शरदृतु समाप्त होऊन हेमंत ऋतूचा प्रारंभ होतांच ज्याप्रमाणें वृक्षांतील रस सूर्यकिरणांमध्यें लीन व्हावा, त्याप्रमाणें थोडे दिवस उलटून जातांच त्या उद्दालक मुनीचे प्राण विमल अशा परमात्म-पदाचे ठिकाणीं लीन झाले आणि तो जन्म-मृत्यूच्या अतीत स्थितीप्रत जाऊन पोहोंचला. त्याचे सर्व विकल्प नाहींसे झाले, सर्व प्रारब्धाचा क्षय होऊन संपूर्ण उपाधीचा निरास झाल्या-मुळें तो निर्विकार आणि रमणीय बनला; इतकेंच नव्हे, तर ज्या स्थितीमध्यें इंद्राची संप-त्तीसुद्धां समुद्राच्या पृष्ठभागावर तरंगणाऱ्या गवताच्या काडीइतकी क्षुद्र लेखिली जाते, अशा निरतिशयानंदाच्या स्थितीप्रत जाऊन पोहोंचला. सारांश, तो उद्दालक ब्राह्मण दिक्का-लादिकांनीं अपरिच्छिन्न आणि वाणीला अगो-चर अशा सच्चिदानंद स्वरूपाप्रत गेला. अशा रीतीनें त्या उद्दालक ब्राह्मणाचें चित्त अत्यंत निर्मल आणि आद्य अशा स्वरूपाप्रत जाऊन पोहोंचल्यानंतर सहा महिन्यांनीं त्याचें शरीर सूर्यकिरणांमुळें अगदीं शुष्क होऊन गेलें व वायूच्या प्रवाहामुळें त्या शरीरांतून सूं सूं असा आवाज होत असल्यामुळें, लहान लहान वृक्षरूपी हातांच्या योगानें त्यांतील शिरारूपी तारांवर आघात करून वाजविण्याला योग्य अशी त्या पर्वताची ती वीणाच आहे कीं काय, असा भास होऊं लागला. पुढें बराच काळ लोटल्यानंतर ज्याप्रमाणें पिंगट रंगाच्या केसांनीं युक्त असलेल्या ज्वालांच्या पंक्तींनीं अग्नीकडे यावें, त्याप्रमाणें पर्वतकन्यांनीं युक्त असलेल्या ब्राह्मी आदिकरून मातृदेवता त्याच्या इष्टफलसिद्धीसाठीं त्या ठिकाणीं आल्या. त्या देवतांमध्यें चामुंडा नांवाची सर्व देवांना पूज्य अशी जी देवता होती, तिनें आपल्या केसा-मधील खड्ग आणि खट्वांग ह्या शस्त्रांच्या मध्य-भागीं तें उद्दालकाचें शुष्क शव भूषण म्हणून धारण केलें. सारांश, जिनें आपल्या केशकला-पामध्यें मोराच्या पिसाप्रमाणें शोभायमान होणारे चंचल मेघखंड धारण केले होते आणि ज्याव-रून नूतन मंदारपुष्पांच्या माळा लोंबत होत्या, अशा त्या खिंखिनी नामक भगवती देवीच्या पाठीवर लोंबणारी वेणी हेंच कोणी लताजाल असून त्यामध्यें तें उद्दालकाचें शव एकाद्या भ्रमराप्रमाणें सुखानें विश्रांति घेत राहिलें होतें. अशा रीतीनें त्याच्या शवालासुद्धां एवढें सर्वो-त्कृष्ट स्थान प्राप्त झालें, तर त्याला स्वतःला भगवंताचें परमपद प्राप्त झालें असेल, यांत काय नवल ! असो. सर्व दृश्याचा विवेक झाल्यामुळें स्फुरण पावणारा स्वानंद हींच जिचीं विकसित झालेलीं पुष्पें आहेत, अशी उद्दाल-काच्या चरित्राची कलनारूपी कल्पवल्ली ज्याच्या हृदयरूपी अरण्यांत विस्तार पावली असेल, असा पुरुष संसाररूपी अरण्यांत संचार करीत असला, तरी त्याचा सत्य, शांति वगैरे गुणांमुळें शीतल भासणाऱ्या सहजसंतोषरूपी छायेपासून केव्हांहि वियोग होत नाहीं; इतकेंच नव्हे, तर सर्वोत्कृष्ट असें जें मोक्षरूपी फल तें त्याला प्राप्त होतें.

## सर्ग ५६

—:०:—

१. ज्याच्या ठिकाणचा अज्ञानांधकार नष्ट झाला असून ज्याचें चित्त निर्वासन झालें आहे, असा ज्ञानी व्यवहार करीत असला तरी समाधि-स्थच असतो.

**श्रीवसिष्ठः**—बा कमलेक्षणा ! अशा रीतीनें विचार, वैराग्य आणि समाधीचा अभ्यास या

साधनांचा अवलंब करून आपल्या अंतरात्म्याचा विचार कर आणि तूं अनंत पद जें ब्रह्म त्याच्या ठिकाणीं विश्रांति घे. जोंपर्यंत सर्व दृश्याचा सम्यक् ज्ञानानें बाध होऊन परमपदाच्या ठिकाणीं विश्रांति प्राप्त झाली नाहीं, तोंपर्यंत शास्त्रश्रवण, तत्त्वपरीक्षण, गुरुवचनावर श्रद्धा आणि चित्ताचें शोधन इत्यादिकांच्या योगानें निरंतर विचार करीत रहावें. वैराग्य, अभ्यास, शास्त्रार्थ, प्रज्ञा, गुरुमुखानें श्रवण, मनोनिग्रह वगैरे साधनक्रमाच्या योगानें तें परमपद प्राप्त करून घेतां येतें; अथवा केवळ प्रज्ञेमुळेंच तें पद प्राप्त होऊं शकतें, मनुष्याची बुद्धि तीक्ष्ण आणि कलंकरहित असून प्रबोधयुक्त असली, म्हणजे इतर कोणतींहि साधनें नसलीं तरी ती त्याला शाश्वत पदाची प्राप्ति करून देते.

**श्रीराम:**—भगवन्! एखादा मनुष्य ज्ञानी असून व्यवहार करीत असताहि समाधिस्थितीमध्यें असल्याप्रमाणें आत्मविश्रांतीचा अनुभव घेत आहे व दुसरा एखादा मनुष्य एकान्तस्थानीं जाऊन नेहमीं समाधीमध्यें गढून गेलेला आहे; तर ह्या दोन मनुष्यांमध्यें श्रेष्ठ कोणता, हें मला कृपा करून सांगा.

**श्रीवसिष्ठ:**—राघवा ! हा गुणसमाहार अनात्मा आहे असें ज्ञानाच्या दृढीकरणामुळें पहाणाऱ्याच्या ठिकाणी जी तृप्ति आणि शांति उत्पन्न होते, तिलाच समाधि हें श्रेष्ठ नांव दिलें जातें. जोंपर्यंत मनाचें अस्तित्व आहे तोंपर्यंतच दृश्य विषयांपासून विक्षेप उत्पन्न होतो; परंतु माझ्या आत्मस्वरूपामध्यें मनच नसल्यामुळें दृश्य विषयांचा माझ्या आत्मस्वरूपाशीं यत्किंचित्‌हि संबंध पोहोंचूं शकत नाहीं, अशा तऱ्हेचा स्वानुभवजन्य निश्चय झाल्यामुळें ज्याच्या अंतःकरणांत परा शांतीचा उदय झालेला आहे, अशा ज्ञान्यांपैकीं एकादा ज्ञानी व्यवहार करीत असतो व एखादा ज्ञानी नेहेमीं ध्यान करीत रहातो. ह्या दोन्ही तऱ्हेच्या ज्ञान्यांच्या अंतःकरणांत शीतलता नांदत असेल, तर ते दोघेहि पूर्ण सुखी होत. कारण, अंतःशीतलता हेंच अनंत तपाचें फल होय. एखादा मनुष्य एकांतामध्यें बसून समाधीमध्यें गढून गेलेला असतांहि त्याचें चित्त चंचल होत असेल, तर त्याच्या त्या समाधीची किंमत एखाद्या उन्मत्त मनुष्याच्या नाचण्याइतकीच आहे. तसेंच एखादा मनुष्य उन्मत्त मनुष्याप्रमाणें नाचत असतांहि त्याच्या चित्तांतील वासना क्षीण झालेल्या असतील, तर त्याचें तें नाचणें एकाद्या ज्ञानी मनुष्याच्या समाधीइतकेंच श्रेष्ठ होय. जो मनुष्य व्यवहार करीत असूनहि प्रबुद्ध असेल, तसेंच जो मनुष्य ज्ञानी असूनहि अरण्यांत रहात असेल, असे दोघेहि मनुष्य सर्व संदेहाचा उच्छेद करणाऱ्या परमपदामध्यें स्थित झालेले असल्यामुळें दोघेहि निःसंशय सारख्याच योग्यतेचे होत. ज्याप्रमाणें एकाद्या मनुष्याचें मन दुसऱ्या विषयामध्यें आसक्त झालें असेल, तो जरि आपल्या स्त्रियांविषयीं वगैरे गोष्टी ऐकत असला तरी त्या भाषणापासून रागादि विकार उत्पन्न होत नाहींत आणि त्यामुळें तो बद्ध होत नाहीं, त्याप्रमाणें ज्या ज्ञान्याच्या चित्तांतील सर्व वासना क्षीण झालेल्या असतात, तो व्यवहार करीत असला तरी त्यामुळें बद्ध होऊं शकत नाहीं. परंतु ज्याच्या अवयवांची बाह्यतः यत्किंचित्‌हि हालचाल होत नाहीं अशा मनुष्याचें मन स्वप्नामध्यें आपण खड्यांत पडत आहों असा अनुभव घेतें, त्याप्रमाणें ज्या चित्तामध्यें वासना घनदाट भरलेल्या आहेत तें कांहीं करीत नसलें, तरी कर्तृत्वाभिमानानें बद्ध होतें. चित्ताचें जें अकर्तृत्व त्यालाच समाधि, केवलाभाव किंवा परा विश्रांति असें म्हणतात. चित्ताची चंचलता आणि निश्चलता हेंच असमाधि आणि समाधि यांचें परम-

कारण आहे, असें मानण्यांत येतें. यास्तव रामा ! तूं आपल्या चित्ताला वासनारहित कर. जें चित्त निर्वासन आहे त्यालाच स्थिर म्हणतात, तेंच मनाचें ध्यान, तोच केवलीभाव आणि तीच नित्य शांतता होय. चित्तातील वासना क्षीण होऊं लागल्या म्हणजे तें परमपदामध्यें स्थिर होण्याला पात्र होऊं लागतें. वासनारहित मनच अकर्तृत्वपदाप्रत जाऊन पोहोंचतें, व वासनायुक्त मन कर्तृत्वयुक्त होऊन सर्व तऱ्हेचीं दुःखें प्रसवतें. यास्तव मनुष्यानें वासना क्षीण करण्याचा अभ्यास करावा. ज्याच्या योगानें देहादि दृश्य वस्तूसंबंधाचा अहंममत्वभाव नष्ट होतो, आणि शोक, भय, एषणा वगैरे विकार अस्तंगत होऊन मनुष्य स्वस्वरूपामध्यें स्थिर होतो, त्यालाच समाधि हें श्रेष्ठ नाव देण्यात येतें. यासाठीं आपल्या चित्तामधून सर्व विषयासंबंधाची अहंभावना सर्वथैव टाकून देऊन नंतर तूं जसा असशील तसा एखाद्या पर्वतावर जाऊन रहा किंवा आपल्या घरामध्ये रहा. रामा ! ज्याचें चित्त नेहमीं आत्मस्वरूपामध्यें रममाण झालेलें असतें आणि ज्यांच्या वृत्तींतील अहंकाररूपी दोष अस्तंगत झालेला असतो, असे गृहस्थ घरामध्ये रहात असले तरी निर्जन अरण्यामध्यें रहात आहेत, असेंच म्हणण्यास हरकत नाहीं. ज्याप्रमाणें आकाशादि महद्भूतांना अरण्य आणि गृह हीं दोन्हीं सारखींच असतात, त्याप्रमाणें आत्मज्ञानामुळें ज्याच्या ठिकाणीं समत्वबुद्धि बाणलेली आहे, अशा ज्ञान्यांच्या दृष्टीनें अरण्य आणि गृह हीं दोन्हीं सारखींच हात. बा राजपुत्रा ! ज्याचें चित्त शरत्कालातील आकाशाप्रमाणे निर्मल झालें आहे, त्याच्या दृष्टीला जनसंमर्दामुळें गजबजून गेलेलीं नगरें अरण्याप्रमाणें शून्य भासतात. याच्या-उलट रागादिकांच्या योगानें उन्मत्त झालेल्या चित्ताला बा शत्रुमर्दना रामा ! निर्जन अरण्यें सुद्धां हजारो लोकांच्या अस्तित्वामुळें गजबजून गेलेलीं नगरें आहेत, असा भास होतो. ज्याचें चित्त रागादि विकारांच्या योगानें विक्षिप्त झालेलें आहे, त्याच्या चित्तांतील विकार कांहीं कारणानें लीन झाले तरी, ती स्थिति सुषुप्तीप्रमाणें असते. अर्थात् गाढ झोंपेमध्यें चित्तांतील संस्कार जरी त्या वेळेपुरते लीन झाले तरी ते पुनः उदय पावतात, त्याप्रमाणें विक्षिप्त चित्ताची स्थिति असते. परंतु ज्याच्या चित्तांतील रागादि वासना शांत झालेल्या आहेत, असा मनुष्य निर्वाण स्थितीप्रत जाऊन पोहोंचतो. ह्या दोन स्थितींमधील अंतर लक्षांत ठेवून राघवा तुला योग्य वाटेल त्याप्रमाणें तूं वाग. रामा ! जो तत्ववेत्ता समाधिस्थितीमध्यें सर्व भावांच्या अतीत असलेल्या आणि व्यवहारसमयीं सर्व भावरूप अशा आत्म्याला पहातो, त्यालाच खरी समाधि साधली असें म्हणण्यास हरकत नाहीं. ज्याच्या अनंत आत्मस्वरूपामध्यें जगातील सर्व भाव सम झाले असून त्यामुळें ज्याच्या ठिकाणचे रागद्वेष क्षीण झाले आहेत, असा ज्ञानी नेहमी समाधिसुखच भोगीत आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. हे जनेश्वरा ! तत्ववेत्याचें मन स्वप्नामध्यें आणि जागृतीमध्यें हें दृश्य जग सारखेंच आत्मरूपानें पहातें, आणि सद्रूपाव्यतिरिक्त जग म्हणून कांहीं निराळें आहे असें पहात नाहीं. ज्याप्रमाणें एखादा मनुष्य शहराच्या व्यापारीपेठेंतून चालला असला, म्हणजे त्याला शेंकडो लोक आपापल्या व्यवहारांत गुंतलेले दिसतात; परंतु त्याचा त्या लोकांच्या व्यवहाराशीं कांहीं संबंध नसल्यामुळें तो त्यांच्याकडे केवळ प्रेक्षक या नात्यानें पहात असतो, यामुळें या लोकांचे व्यवहार त्याला दिसूनहि ते त्याच्या दृष्टीनें नसल्यासारखेच असतात,

त्याचप्रमाणें ज्ञानी मनुष्याची स्थिति असते. अर्थात्, त्याच्या उदासीन दृष्टीला एखादें मोठें नगरसुद्धां अरण्याप्रमाणें दिसतें. ज्याची वृत्ति अंतर्मुख बनलेली आहे असा ज्ञानी पुरुष जागृतीमध्यें असला तरी स्वरूपदृष्टया नेहमीं गाढ निद्रासुख अनुभवीत असतो; तसेंच तो एखाद्या खेड्यांतून किंवा गजबजलेल्या शहरांतून जात असला, तरी आपण एखाद्या अरण्यांतून जात आहों, अशी त्याच्या मनाची स्थिति असते. सारांश, ज्ञान्याचें मन कोणत्याहि बाह्य परिस्थितीमध्यें विकार पावत नाहीं. हें अखिल जग विविध प्राणी आणि पृथ्वी आदिकरून पंचमहाभूतें यांनीं व्यापलेलें असतांहि ज्ञानी पुरुषाच्या तत्त्वज्ञानदृष्टीनें तें बाधित झालेलें असल्यामुळें तें त्याला आकाशाप्रमाणें शून्य भासते. ज्याप्रमाणें ज्वररहित झालेल्या पुरुषांना भोंवतालचें विश्व शीतल भासूं लागतें, त्याप्रमाणें ज्या ज्ञानी पुरुषांच्या चित्तामध्यें सम्यक्ज्ञानामुळें शीतलता उत्पन्न झाली, त्यांना हें जग यावज्जीव शांत भासत असतें. परंतु याच्या उलट ज्यांचीं अंतःकरणें तृष्णेमुळें संतप्त झालेलीं असतात, अशा प्राण्यांना हेंच जग दावाग्नीनें दग्ध झाल्याप्रमाणें दिसतें. एवंच, जें मनुष्याच्या आंत असतें, तेंच त्याच्या दृष्टीला बाह्य जगांत दिसतें, असा नियम आहे. अंतरिक्ष, पृथ्वी, वायु, आकाश, पर्वत, नद्या, दिशा वगैरे सर्व पदार्थ अंतःकरणतत्त्वाचे भाग असून ते जणुं बाहेर असल्याप्रमाणें दिसतात. वटबीजांतील वटवृक्षाप्रमाणें जें तत्त्व आंत असतें त्याचा विकास होऊन पुष्पांतील सुगंधाप्रमाणें त्याचें बाहेर आविष्करण होतें. परंतु वास्तविक विचार केला तर बाहेर कांहीं नाहीं व आंतहि कांहीं नाहीं; तर जी जी वस्तु वासनाबलानें कल्पित केली जाते, तिच्या तिच्या रूपानें परमार्थतत्त्वच भासमान होत असतें. ज्याप्रमाणें एखादी कापराची वडी लहानशा करंड्यांत ठेवलेली असली तरी गंधरूपानें तिचें स्वरूप दूरवर गोचर होतें, त्याप्रमाणें ज्या जगाची कल्पना आत्म्यामध्यें केली जाते, तेंच जगद्रूपानें बाहेर विस्तारलेलें दिसतें. सारांश, आत्माच जगत् आणि अहं या बाह्य आणि आंतर रूपांनीं स्फुरण पावतो. परंतु वस्तुतः तो चक्षुरादि इंद्रियांना अगोचर असा सूक्ष्म अहंरूप नाहीं व इंद्रियगम्य असा स्थूल दृश्यरूपहि नाहीं; तर तो विभु असल्यामुळें स्थूल आणि सूक्ष्म अशा दोन्ही रूपांमध्यें सन्मात्ररूपानें अनुस्यूत असतो. हा आत्मा पूर्वसंस्कारांनुरूप चित्तालाच बहिर्मुख इंद्रियांच्या योगानें बाह्य जगदाकारानें पहातो व जागृतीमधील वासनादिकांच्या योगानें हृदयामधील स्वप्न, मनोराज्य वगैरे रूपांनीं पहातो. आतां बाह्य आणि आंतर हीं जीं दोन रूपें आत्म्यामध्यें भासमान होतात, तीं आत्मदृष्टीनें विचार केल्यास असद्रूपच ठरतात. परंतु जोंपर्यंत चित्तामध्यें अहंममत्वादि भेद कायम आहेत, तोंपर्यंत हें द्विविध जग विनाशत्रयानें युक्त आहे, असाच अनुभव येतो. अंतरिक्ष, पृथ्वी, वायु, आकाश, पर्वत, नद्या, दिशा वगैरे यच्चयावत् पदार्थ तापत्रयज्वालांनीं दग्ध झालेले असून निरंतर नाश पावत असतें. परंतु जो तत्त्वज्ञानी पुरुष नेहेमीं आत्म्यामध्येंच रत असतो, तो कर्मेंद्रियांच्या योगानें बाह्यतः व्यवहार करीत असला, तरी हर्ष व शोक यांच्या अधीन होत नाहीं; व अशा पुरुषालाच ‘ समाहित ’ म्हणजे समाधिस्थितीमध्यें असलेला हें नांव देण्यांत येतें. ज्याची बुद्धि आत्मनिष्ठ झाली असून जो आपल्या आत्म्याला सर्वत्र पहातो आणि म्हणूनच जो कोणत्याहि विषयाचें चिंतन करीत नाहीं आणि कशाबद्दलहि शोक करीत नाहीं, असा पुरुष

समाधीच्या स्थितीमध्यें आहे, असें खुशाल समजावें जो मनुष्य जगताची गति, उत्पत्ति आणि नाश यांनीं युक्त असल्याचें जाणतो आणि जो मूढ पुरुषांच्या ठिकाणीं बद्धमूल झालेल्या अहंममतादि भावनांकडे पाहून हंसतो, तो नेहमीं समाधिस्थितीमध्यें गढून गेलेला आहे, असें म्हणण्याला मुळींच हरकत नाहीं. आतां ज्ञानी हा जगद्वृत्तीकडे पाहून कां हंसतो ? असें विचारशील तर त्याचें उत्तर हेंच आहे कीं, मृगजळाच्या लाटांमध्यें उष्णता भासमान होत असली, तरी जवळ जातांच तिचा प्रत्यक्ष अनुभव केव्हांच येत नाहीं, किंवा आकाशामध्यें कोणतीच क्रिया सफल होत नाहीं, त्याचप्रमाणें सर्वत्र सम अशा आपल्या ब्रह्मस्वरूपामध्यें अहंता, जगत्, जन्म इत्यादि वैषम्य उत्पन्न होणें केव्हांहि शक्य नाहीं, अशा अनुभवाप्रत ज्ञानी जाऊन पोहोंचलेला असतो. सारांश, ज्ञान्याच्या प्रत्यगात्मस्वरूपामध्यें मी, तूं, जगत्, मन इत्यादि विभागकल्पना नसतात; तसेंच चेतन आणि अचेतन असा भेदहि नसतो. एवंच, एक सर्वात्माच काय तो आहे, तद्व्यतिरिक्त दुसरा कोणताहि चेतनपदार्थ नाहीं. जो पुरुष आंतून आकाशाप्रमाणें निर्विकार असतो व बाह्यतः शास्त्र आणि शिष्टाचार यांना अनुसरून व्यवहार करीत असतो, जो शांत असून हर्षामर्षविकारांमध्यें लांकूड आणि मातीचें ढेंकूळ यांच्याप्रमाणें स्थिर असतो, जो सर्व भूतांना आत्मवत् आणि परद्रव्याकडे मातीच्या ढेंकळाप्रमाणें पहातो, तसेंच जो भयामुळें नव्हे तर स्वभावतःच सर्वत्र समदृष्टीनें पहातो, तोच खरा तत्त्ववेत्ता होय. अज्ञ मनुष्याला एखाद्या क्षुद्र पदार्थापासून तों तहत् हिरण्यगर्भाच्या ऐश्वर्यापर्यंतचे यच्चयावत् विषय मिथ्या आहेत, असें केव्हांच वाटत नाहीं. कारण, त्याला सत्स्वरूपाचा अनुभव नसतो. परंतु ज्ञानी पुरुषाला आत्मस्वरूपाचा अनुभव असल्यामुळें त्याच्या दृष्टीला जगांतील सर्व विषय असद्रूप भासतात. अशा रीतीनें ज्याच्या वृत्तीमध्यें समदृष्टि बाणली आणि जो महातत्त्वाच्या स्थितीप्रत जाऊन पोहोंचला, असा आत्मदर्शी पुरुष दरिद्री असो किंवा त्याला ऐश्वर्य प्राप्त होवो, त्याचे पुत्र अथवा बांधव मरण पावोत, किंवा त्याला विपत्तीमध्यें दिवस कंठावे लागोत, तो उत्तम भोगांनीं युक्त अशा स्वतःच्या घरामध्यें राहो, जनसंमर्दामध्यें वास करो, किंवा ज्या ठिकाणीं कोणत्याहि तऱ्हेचे विषय प्राप्त होण्याची शक्यता नाहीं अशा एखाद्या निबिड अरण्यामध्यें रहात असो, तो मद्य प्राशन करून आणि कामविकाराच्या अंकित होऊन खुशाल नाचूं लागो, सर्वसंगपरित्याग करून तो एखाद्या पर्वतावर स्वच्छंद संचार करीत असो, चंदन, अगुरु, कापूर वगैरे सुगंधी द्रव्यांनीं तो आपलें शरीर लिप्त करो किंवा त्याचा देह अग्नीच्या भयंकर ज्वालांमध्यें पडो, तो एखादें घोर पातक करो किंवा मोठें पुण्य करो, तो आज मृत्युमुखीं पडो की शेंकडों कल्पान्त होईपर्यंत वांचो, ज्याला सम्यक् ज्ञान झालेलें आहे असा महात्मा कालत्रयी विकार पावत नाहीं; व तो तत्त्वतः कोणत्याच तऱ्हेच्या क्रिया करीत नसून ज्याप्रमाणें सुवर्ण चिखलामध्यें पडलें तरी तें मलिन होत नाहीं, त्याप्रमाणें असला ज्ञानी पुरुष कोणत्याहि कारणानें कलंकित होत नाहीं. आतां वास्तविक पाहूं गेलें, तर अज्ञ पुरुषामधील अहंकारप्रधान असा जो लिंगात्मा तो शिंपीवरील रुप्याप्रमाणें भासणाऱ्या वासनांमुळें आणि शास्त्रविरुद्ध विषयांच्या सेवनामुळें कलंकित होतो. आतां हा आंतील कलंक नष्ट होण्याचा उपाय काय? असा प्रश्न उत्पन्न होतो; तर याचें समाधान असें कीं, मनुष्याच्या ठिकाणीं

सम्यक् ज्ञानाचा उदय होऊन सर्व विश्व आत्मरूप आहे असा मनुष्याला एकदां अनुभव आला, म्हणजे चित्तांतील कलंक आत्मज्ञानानें बाधित होऊन आपोआप शांत होतो. कारण, आत्म्यावर अहंभावनेचा अध्यास होऊन त्यामुळें अनर्थकारक वासना उत्पन्न होतात व ह्या वासनाच प्राण्याला विचित्र सुखदुःखांच्या आणि जन्ममृत्यूंच्या फेर्‍यांत अडकविण्यास कारणीभूत होतात. परंतु रज्जूवरील सर्पभ्रमाचा निरास होतांच सर्पभ्रमापासून उत्पन्न होणारी भीति अस्तंगत होऊन मनुष्याच्या मनाला स्वस्थता येते, त्याप्रमाणें आत्मज्ञानानें अहंभावनेला अजिबात फांटा मिळाला, म्हणजे मनुष्याच्या ठिकाणचें सर्व दुःख नाहींसें होऊन त्याच्या वृत्तीमध्यें समता बाणून जाते. ज्ञानी पुरुष जी क्रिया करतो, जें खातो, जें देतो व जें अग्नीमध्यें हवन करतो, तें सर्व मी करीत आहें असा त्याचा प्रत्यय नसतो. आपला आत्मा हा अकर्ता आहे असा ज्ञान्याचा अनुभव असल्यामुळें तो कांहींहि करो, त्याचा ज्ञान्यावर कांहींच परिणाम होत नाहीं. त्याला कर्म करून कांहीं प्राप्त करून घ्यावयाचें असतें असें नाहीं; तसेंच प्रत्यक्ष कर्माचा त्याग करूनहि त्याला कांहीं प्राप्त करून घ्यावयाचें असतें असें नाहीं. कर्मे हीं यथास्वभाव-प्रारब्धानुसार चाललेलीं आहेत, असें जाणून तो निरंतर आत्मस्वरूपामध्यें रममाण होतो. ज्ञानी पुरुषाचें चित्त निर्वासन झालेलें असल्यामुळें, पाषाणापासून पुष्पमंजरी उत्पन्न होत नाहींत, त्याप्रमाणें त्याच्या ठिकाणीं कोणत्याहि इच्छा उत्पन्न होत नाहींत; व पूर्वसंस्कारामुळें ज्या इच्छा त्याच्या ठिकाणीं उदय पावतात त्या सर्व कोणत्याहि समुद्रांतील तरंग वस्तुतः जलरूपच असतात त्याप्रमाणें, आत्मरूपच आहेत असें ज्ञानी पहात असतो. ज्ञानी हा नित्य, निर्विकार आणि पूर्ण अशा परमात्म्याशीं तादात्म्य पावलेला असल्यामुळें सर्व जगामध्यें आत्मा पहातो आणि आत्म्यामध्यें सर्व जग पहातो. तसेंच सर्व विश्व अखंडित असून त्याच्यामध्यें देश, काल आणि वस्तु यांच्यायोगानें उत्पन्न होणारे विभाग तत्त्वतः नाहींतच असें जाणतो व अखेरीस तो सर्व द्वैतबंधापासून मुक्त अशा परमात्मस्वरूपाशीं तद्रूप होऊन रहातो.

---

## सर्ग ५७

—:०:—

१. जिला आपला स्वभाव कळलेला नाहीं अशी चित् विश्वरूप बनते. परंतु विश्व चिद्रूपच आहे, त्याहून निराळें नाहीं.

**श्रीवसिष्ठः**—सारांश राघवा! हें सर्व जग चिद्रूप आहे. आत्मरूपी मिर्‍यांमधील जी तिखटपणाची संवेदना, अर्थात् तत्स्थानीं असलेलें ब्रह्मस्वभावाचें अज्ञान म्हणजेच मी, तूं इत्यादि स्वरूपाच्या, तसेंच घट, भिंत इत्यादि भेदरूपांच्या व त्यांना आधारभूत असलेल्या देशकालादि रूपांच्या योगानें बनलेलें जगत् होय. आत्मरूपी मिठामध्यें जें खारटपणाचें संवेदन असतें, तेंच मी, तूं घट भिंत इत्यादि भेदांनीं आणि त्यांना आधारभूत असलेल्या देशकालादि रूपांनीं युक्त असलेलें जगत होय. आत्मरूपी ऊंसामध्यें जी माधुर्याची संवेदना असते, तीच अहंतादि भेद आणि जगदाकारभेद यांच्या रूपांनीं अभिव्यक्त होते. आत्मरूपी पाषाणामध्यें जी काठिन्यशक्ति असते तीच अहंतादि भेद आणि देशकाल यांच्या रूपानें व्यक्त होते. आत्मरूपी पर्वतामध्यें जी गुरुत्वशक्ति असते, तीच अहंतादि भेद आणि अनंत भुवनें यांच्या रूपानें स्थित असते. आत्मरूपी

जलामध्यें जी द्रवत्वशक्ति स्वतःसिद्ध असते, तिच्या योगानेंच अहंतादि भेद आणि जगतांतील अनेकविध आकाररूपी भोंवरे भासमान होतात. आत्मरूपी वृक्षामध्यें ज्या शाखादिक असतात, त्यांचें संवेदन हेंच अहंतादि भेद आणि हजारों भुवनें यांच्या रूपानें स्फुरण पावतें. आत्मरूपी गगनामधील शून्यत्वाच्या संवेदनेलाच अहंता आदि करून भेद आणि अनंत भुवनें यांची कल्पना असें म्हणतात. आत्मरूपी गगनामधील छिद्रतेच्या संवेदनेलाच अहंतादि भेद व शारीरादि कल्पना असें म्हणतात. आत्मरूपी भिंतीमध्यें जी निबिडता असते, तीच अहंतादि भेदरूपाने चिद्व्यतिरिक्त असल्याप्रमाणें भासमान होते. आत्मसत्तेमध्यें जें सत्तेचें संवेदन असतें, तेंच अहंतादि भेद आणि चिदाभास यांच्या रूपानें जगामध्यें व्यक्तदशेस येतें. आत्मप्रकाशाच्या आंत जें स्वतःसिद्ध प्रकाशकत्व असतें, तेंच अहंता व वृत्तिभेद यांच्या रूपानें भासमान होतें; व सर्व वृत्तिभेदांमध्यें जी सामान्य वृत्ति अनुस्यूत असते, तिलाच जीव ही संज्ञा दिली जाते. आत्मरूपी चंद्रामध्यें जें चिद्रूपी अमृत असतें व जें स्वप्रकाशरूपानें अनुभवास येतें, तेंच अहंतादि रूपांनीं जगामध्यें आविर्भूत होतें. परमात्मरूपी गुळामध्यें जी गोडी असते व जी आपली गोडी आपणच घेते, तीच आत्म्यामध्यें अहंतादि रूपांनीं अभिव्यक्त होते. परमात्मस्वरूपी मण्यामध्यें जो आंतल्या आंत स्वाभाविकपणेंच प्रकाश उत्पन्न होतो, तोच आत्मपदामध्यें अहंकारादिकांच्या रूपांनीं भासमान होतो. सारांश, आत्म्यामध्यें मायिक जगदाकाराचा जो अनुभव येतो, तो वस्तुतः आत्म्याचाच प्रकाश होय. कारण, आत्म्यामध्यें आत्मव्यतिरिक्त दुसरी कोणतीहि वेद्य वस्तु असणें केव्हांहि शक्य नाहीं. आत्मा हा आपला स्वतःचाच आस्वाद घेतो, कारण, आत्म्यामध्यें तद्व्यतिरिक्त दुसरी कोणतीहि आस्वाद घेण्यासारखी वस्तु नाहीं. त्याचप्रमाणें आत्मा हा आपला स्वतःचा अनुभव घेतो व आपलें स्वतःचेंच ज्ञान करून घेतो. कारण, आत्म्यामध्यें दुसरा कोणताहि विषय व दुसरी कोणतीहि जाणण्याची वस्तु नाहीं. एवंच, जगताचा जो अनंत आकार आपल्याला भासमान होतो, तो मिथ्याच भासमान होत असून तो एखाद्या प्रचंड पर्वताप्रमाणें सदोदित आत्म्यामध्येंच स्थित असतो.

बा रघुनंदना! येथपर्यंत मीं जें विवेचन केलें त्यांतील हेतु, आत्म्यामध्यें अहंता, जग इत्यादि भेद वस्तुतः नाहींत हें तुझ्या लक्षात यावें, हाच आहे. तत्त्वदृष्टीनें विचार केला असतां आत्म्यामध्यें चित्त नाहीं, चित्ताचें प्रकाशकत्व करणारें चैतन्य नाहीं व जगद्रूपादि भ्रमहि नाहीं. ज्या मनुष्याला सम्यक्ज्ञान झालेलें आहे, अशा मनुष्याच्या मनांतील जगताचा भ्रम वर्षाकालांतील वृष्टीनंतर शरत्कालीं स्वच्छ झालेल्या आणि न गरजणाऱ्या मेघाप्रमाणें शांत होतो. ज्याप्रमाणें पाण्यामधील द्रवत्वधर्मामुळें त्यामध्यें भोंवरे वगैरे उत्पन्न होतात, त्याचप्रमाणें सर्वज्ञ ईश्वर आपल्या मायेमुळें आपणामध्यें जीव आणि जगत् हीं रूपें स्वतःच कल्पनेनें धारण करतो. ज्याप्रमाणें पाण्यामध्यें द्रवत्वधर्म असतो आणि वायूच्या ठिकाणीं स्पंद असतो, त्याचप्रमाणें सर्वज्ञ ईश्वराच्या ठिकाणीं अहंता, देश, काल, इत्यादि नानाविध रूपें भासमान होतात. आतां या ठिकाणीं असा प्रश्न उत्पन्न होतो कीं, 'जीव आणि जगत् हीं जीं सर्वज्ञ ईश्वराचीं दोन रूपें तीं जर ईश्वराहून भिन्न नाहींत, तर जीव आणि ईश्वर यांच्यामध्यें भेद तो कोठें उरला?' तर याचें समाधान असें आहे कीं, ईश्वराच्या

ठिकाणीं अखंड ज्ञानशक्ति असल्यामुळें त्याला आपल्या नित्य निरतिशयानंदस्वरूपाचें केव्हांहि विस्मरण होत नाहीं. परंतु जीव हा चेतनयुक्त असला तरी प्राण, इंद्रियें, विषय इत्यादिकांच्या अभ्यासामुळें जीवदशा हेंच आपलें वास्तविक स्वरूप आहे, असा विलक्षण भ्रम त्याच्या ठिकाणीं उत्पन्न होतो. अशी वस्तुस्थिति असल्यामुळें अज्ञ जीवाच्या ठिकाणीं ज्या ज्या विषयज्ञानाच्या योगाने तृप्ति उत्पन्न होते किंवा अनन्य अशा स्वरूपाच्या ठिकाणीं भोक्ता, भोग्य आणि भोग इत्यादि ज्या ज्या त्रिपुटीमय भावना उदय पावतात, त्या त्या भावनांना अनुसरून ईश्वर भिन्न भिन्न विषयाच्या विचित्र रूपांनीं भासमान होतो. परंतु याच जीवाच्या ठिकाणीं सच्छास्त्राचा अभ्यास आणि सद्गुरूपदेश यांच्या निमित्तानें सम्यक् ज्ञानाचा उदय झाला व भोग्य वस्तूंनीं भरलेलें जग हें अधिष्ठानसन्मात्ररूप आहे असें पारमार्थिक ज्ञान झालें आणि जीवांना विषयांच्या रूपानें ज्या आनंदाचा अनुभव घडतो तोहि वास्तविक आत्मानंदाचाच अंश आहे असें त्याला तत्त्वतः ज्ञान झालें, म्हणजे मग जीव आणि ईश्वर यांच्यामधील भेदाचा निरास होतो. जीव आणि ईश्वर यांच्यामध्यें भिन्नता उत्पन्न करणारें अज्ञान एकदा नष्ट झालें, म्हणजे जीवेश्वरांच्या स्थितीप्रमाणें सुषुप्ति आणि समाधि या अवस्थांमधील भेदहि नाहींसा होऊन अखंड आणि पूर्ण अशा आनंदाचें सर्वत्र साम्राज्य पसरतें. सारांश, बा राघवा ! हें सर्व जग सर्वस्वी पूर्णप्रकाशरूप, आनंदैकरस, अज, आदिमध्यरहित, चेत्य म्हणजे विषय आणि त्यांतील परस्परविरोधी धर्म यांनीं रहित आणि ब्रह्मरूप आहे, परंतु हें सर्व शांत ब्रह्मरूप आहे असें म्हणणें हें सुद्धां शाब्दिक, अतएव व्यर्थ आहे. कारण, हें सर्व जगत् व ब्रह्म या पदामध्यें वाच्यार्थदृष्टीनें भेद दिसतो. परंतु बोधाकरितां असे शब्द वापरावे लागतात व लक्ष्यार्थ दृष्टीनें त्यावरून ॐकारानें वाच्य होणारें जगत् व ब्रह्म यांचें ऐक्य होऊन अखंडानंदरूपी आत्मस्वरूपाचा बोध होतो.

---

## सर्ग ५८

—:०:—

१. सुरघूचें आख्यान २. सुरघूची उद्विग्नता व मांडव्य ऋषींनीं त्याला सर्वत्यागादि उपायांच्या योगाने केलेला बोध.

श्रीवसिष्ठः—राघवा ! ही शब्दमयी दृष्टी बोधाकरितांच आहे असें जें मीं तुला सांगितलें त्यासंबंधानें एक पुरातन इतिहास सांगत असतात; हा किरातेश सुरघूचा वृत्तांत अत्यंत आश्चर्यकारक आहे. या भूगोलाच्या उत्तरेकडे उत्तर दिशेचें सारभूत, पृथ्वीवरील कापराची जणूं राशि, शिवाचें जणुं मूर्तिमंत हास्य किंवा चंद्राचा जणुं धवल प्रकाशच, असें कैलास नामक हिमालयाचें एक शिखर आहे. तो कैलास म्हणजे पर्वतश्रेष्ठ हिमालयानें धारण केलेल्या शृंगपरंपरारूपी मौक्तिकांमधील मुख्य असून, ज्याप्रमाणें क्षीरसागर हें विष्णूचें, स्वर्ग हें इंद्राचें आणि विष्णूचें नाभिकमल हें ब्रह्मदेवाचें निवासस्थान असतें, त्याप्रमाणें तो कैलासपर्वत हें शंकराचें निवासस्थान आहे. ज्याप्रमाणें चंचल अशा रत्नमालिकांनीं युक्त असलेल्या लाटांमुळें एखादा समुद्र विशेषच शोभावा त्याप्रमाणें रुद्राक्षवृक्षांवरून कोंवळ्या शाखांवरून बसलेल्या आणि चंचल अशा रत्नमालांनीं युक्त असलेल्या अप्सरागणामुळें तो पर्वत शोभायमान होत होता. शिवगणांच्या उन्मत्त तरुणींच्या चरणांनीं नेहमीं तुडविले गेलेले अशोकवृक्षांप्रमाणें विकासीमय त्या ठिकाणीं शोभत होते. त्या पर्वतावरील ज्या

पिता संतुष्ट झाल्यानें मुलाला पृथ्वीवरील सर्व लोक तुच्छ वाटूं लागतात, तद्वत् ब्रह्मदेवासारख्या भाग्यवानांचेंहि ऐश्वर्य तुझ्या दृष्टीनें कनिष्ठ दर्जाचें ठरेल. विवेकापासून उत्पन्न होणाऱ्या ज्ञानदीपाच्या योगानें तुला आपल्या स्वस्वरूपाचें दर्शन झालें, म्हणजे मेरु, समुद्र, आकाश इत्यादिकांच्या सत्तेलाहि तूं जुमानीत नाहींसा होशील. अशारीतीनें तुझें चित्त त्या महत्पदामध्यें स्थिर झालें, म्हणजे बा साधो! एखादा हत्ती गाईच्या पावलाएवढ्या चिखलामध्यें केव्हांहि रुतत नाहीं, त्याप्रमाणे तूं संसारवृत्तींमध्यें केव्हांच बुडून जाणार नाहींस. राजन्! एखादें दुबळें चिलट गाईच्या पावलाइतक्या पाण्यामध्येंहि बुडून जातें, तद्वत् वासनेच्या योगानें दूषित झालेलें मन एखाद्या क्षुद्र कार्यामध्येंसुद्धां मूढ बनतें. दृश्य विषयांवर अवलंबून राहून वासनेमुळें तुझें चित्त दुर्बळ बनलें, म्हणजे एखाद्या क्षुद्र कीटाप्रमाणें तूं विषयांच्या चिखलामध्यें ठार बुडाल्याशिवाय रहाणार नाहींस. यास्तव हे महापराक्रमी राजा! जोंपर्यंत स्वयंप्रकाश परमात्म्याचा अनुभव होऊन तुला त्याचें सर्वत्र दर्शन होऊं लागलें नाहीं, तोंपर्यंत अखिल विषयांचा अंतःकरणानें त्याग करणें अत्यंत आवश्यक आहे. ज्याप्रमाणें सुवर्ण हातीं लागेपर्यंत सोन्याच्या धातूचें पुनःपुन्हां शोधन करावें लागतें, त्याप्रमाणें आत्म्याचा लाभ होईपर्यंत अध्यात्मशास्त्राचें अवलोकन करणें जरूर आहे. मनांतून सर्व विषयांना अजिबात फांटा देऊन मनुष्य जेव्हां सर्वात्मबुद्धीचा आश्रय करून सर्व ठिकाणीं आणि सर्व काळीं त्या परमात्म्याचें स्वात्मरूपानें दर्शन करून घेऊं लागेल, तेव्हांच त्याला पूर्णात्म्याची प्राप्ति झाली असें म्हणतां येईल. जोंपर्यंत झाडून साऱ्या विषयांचा मनानें त्याग झाला नाहीं, तोंपर्यंत मनुष्याला आत्मलाभ झाला असें केव्हांहि म्हणतां येत नाहीं. कारण, मनाच्या सर्व अवस्थांचा त्याग झाल्यानंतर अवशिष्ट रहाणारा तोच आत्मा, असा ज्ञात्या पुरुषांचा सिद्धान्त आहे. सामान्य व्यवहारामध्येंसुद्धां एखादी क्षुद्र वस्तु तिच्या विरोधी वस्तूंचा त्याग केल्याशिवाय हातीं लागत नाहीं असा नियम आहे, तर आत्मलाभाच्या बाबतींत हा नियम विशेषच लागू पडावा, यांत काय आश्चर्य आहे? राजा! इतर सर्व विषयांचा त्याग करून जेव्हां मनुष्य एखाद्या विषयाच्या प्राप्तीकरितां मनापासून झटतो, तेव्हांच तो विषय त्याच्या हस्तगत होतो. तस्मात्, आत्मदर्शनाकरितां सर्व दृश्य विषयांचा त्याग कर व असें केल्यानंतर जें अवशिष्ट रहातें आणि ज्याचा केव्हांहि त्याग करतां येणें अशक्य असतें, तेंच परमपद होय. सारांश बा सुरघो! कार्यकारणपरंपरेनें संबद्ध असलेल्या ह्या जगामध्यें जी जी वस्तु भासमान होते, ती ती मनानें केवळ आपल्या कल्पनेनें निर्माण केलेली आहे, हें जाणून सर्व दृश्य विषयांचा त्याग कर; व नंतर मूल अज्ञानासह त्या शुद्ध मनाचाहि निरास कर, म्हणजे जें शिल्लक राहील तेंच ब्रह्मस्वरूप होय.

---

## सर्ग ५९

१. बाह्य आणि आंतर दृश्याचा त्याग केल्यानंतर विचारानें सुरघूला आत्मलाभ होतो.

श्रीवसिष्ठः—बा रघुनंदना! अशा रीतीनें मांडव्य ऋषींनीं त्या सुरघू राजाला उपदेश केल्यानंतर ते आपल्या रमणीय मुनिमंडलाप्रत जाऊन पोहोंचले. मुनिश्रेष्ठ मांडव्य निघून गेल्यानंतर तो राजाहि एकांतस्थानीं जाऊन बसला व आपल्या आत्मस्वरूपासंबंधानें चिंतन करूं लागला. तो म्हणालाः—'मी मेरुपर्वत

गेल्यानंतर सर्व दिशामध्यें भ्रमण करून आलले नारदमुनि इंद्राकडे यावे, त्याप्रमाणें त्याच्याकडे मांडव्यनामक मुनि आले. त्या महामुनींना पाहतांच सुरघु राजानें त्यांची यथाविधि पूजा-अर्चा केली आणि सर्वसंदेहरूपी वृक्षगणांना छिन्नभिन्न करणारी जणूं कुऱ्हाडच, अशा त्या सर्वज्ञ मुनींना त्यानें प्रश्न करण्याला सुरुवात केली.

सुरघुः—मुनिश्रेष्ठा ! वसंतऋतु अवतीर्ण होतांच भूतलाला परम आल्हाद होतो, तद्वत् आपल्या आगमनामुळें मला आज अतिशय आनंद झाला आहे. ज्याप्रमाणें एखाद्या विकास पावणाऱ्या कमळाकडे सूर्यानें अवलोकन करावें, त्याप्रमाणें आपण माझ्याकडे कृपादृष्टीनें अवलोकन करीत असल्यामुळें मी आज धर्मद्रष्ट्या सर्व धन्य पुरुषाच्या अग्रभागीं उभा आहे, असेंच माझें मन मला साक्ष देत आहे. भगवन् ! आपण सर्व धर्म जाणणारे असून आपलें परमात्मस्वरूपाशीं अखंड तादात्म्य झालेलें आहे. यास्तव सूर्यानें अंधकाराचा नायनाट करावा, त्याप्रमाणें माझ्या मनांत आलेला संशय कृपा करून नाहींसा करावा, अशी माझी आपणांस सविनय प्रार्थना आहे. कारण, महात्म्यांचा सहवास घडला असतां कोणत्या पुरुषाचें दुःख नाहींसें होत नाहीं? आतां माझ्यावर असें कोणतें संकट कोसळलें आहे ? असें कदाचित् आपल्या मनांत येईल; परंतु मनांत संशयकल्लोळ उत्पन्न होणें याच्यासारखें भयंकर संकट या जगांत दुसरें कोणतेंच नाहीं, असें ज्ञात्या पुरुषांचें म्हणणें असतें. माझ्या निग्रहानुग्रहामुळें शत्रु-मित्रादिकांना होणारी पीडा, सिंहाच्या नखांनीं हत्तीला विदीर्ण करून टाकावें त्याप्रमाणें, माझ्या अंतःकरणाला त्रास देत आहे. म्हणून म्हणतों कीं, सूर्यकिरणांप्रमाणें माझ्या चित्तांत समतेचा उदय होऊन त्या ठिकाणीं विषमता केव्हांच नांदणार नाहीं, अशा तऱ्हेचा एखादा उपाय आपण मला कृपा करून सांगा.

मांडव्यः—राजा ! वैराग्यत्यागादि यत्न व श्रवणमननादि उपाय यांचें पर्यवसान आत्मबोधामध्यें झाले म्हणजे मनाचा हळवारपणा बर्फाप्रमाणें पार वितळून जातो. ज्याप्रमाणें शरदृतूच्या आगमनाबरोबर हवेंतील दाट धुकें अस्तंगत होतें, त्याचप्रमाणें आत्मविचारणेच्या योगानें आंतील मनोज्वर लवकरच शांत होतो. यास्तव तूं आपल्याच मनानें पुत्रमित्रादि स्वजन, आपलीं शरीरांतर्गत इंद्रियें वगैरे सर्व तत्त्वतः कोण आहेत आणि त्यांचें वास्तविक स्वरूप काय, ह्यासंबंधानें विचार करीत जा. तसेंच मी कोण आहें ? हें सर्व जगत् कसें उत्पन्न झालें आहे ? मरण आणि जन्म यांची उत्पत्ति कशी होते ? या प्रश्नांचा तूं आपल्याशीं नीट विचार कर, म्हणजे तूं निःसंशय महत्पदाप्रत जाऊन पोहोंचशील. आत्मविचारणेच्या योगानें तुला एकदां आपल्या पारमार्थिक स्वरूपाचें यथार्थज्ञान झालें, म्हणजे हर्षामर्षदशा तुझ्या अचल चित्ताला उच्चनीच स्थितीप्रत नेऊं शकणार नाहींत. व अशा रीतीनें तुझें चित्त सम आणि शांत झालें, म्हणजे तरंगानें आपलें भिन्न रूप टाकून देऊन जलरूपत्व पावावें, त्याप्रमाणें तुझें मन निर्विकार बनून आपल्या नित्यसिद्ध अशा ब्रह्मस्वरूपाशीं तूं समरस होशील. परंतु यावरून तुझ्या मनाची सत्ताच अजिबात नष्ट होईल, असें मात्र समजूं नकोस. तर पातकाच्या अस्तित्वामुळे कलंकित झालेलें भुवन पुढील मन्वंतरामध्यें आपलें पूर्वीचें कलंकित रूप टाकून देते, त्याप्रमाणें बा निष्पापा ! तुझें मन जीवन्मुक्तदशेमध्यें आपलें पूर्वीचें मलिन रूप तेवढें टाकून देईल. अर्थात्, भाग्यवशात् तुला ही सर्वोत्कृष्ट स्थिति प्राप्त झाली असतां

पिता संतुष्ट झाल्यानें मुलाला पृथ्वीवरील सर्व लोक तुच्छ वाटूं लागतात, तद्वत् ब्रह्मदेवासारख्या भाग्यवानांचेंहि ऐश्वर्य तुझ्या दृष्टीनें कनिष्ठ दर्जाचें ठरेल. विवेकापासून उत्पन्न होणाऱ्या ज्ञानदीपाच्या योगानें तुला आपल्या स्वस्वरूपाचें दर्शन झालें, म्हणजे मेरु, समुद्र, आकाश इत्यादिकांच्या सत्तेलाहि तूं जुमानीत नाहींसा होशील. अशारीतीनें तुझें चित्त त्या महत्पदामध्यें स्थिर झालें, म्हणजे बा साधो! एखादा हत्ती गाईच्या पावलाएवढ्या चिखलामध्यें केव्हांहि रुतत नाहीं, त्याप्रमाणे तूं संसारवृत्तींमध्यें केव्हांच बुडून जाणार नाहींस. राजन्! एखादें दुबळें चिलट गाईच्या पावलाइतक्या पाण्यामध्येंहि बुडून जातें, तद्वत् वासनेच्या योगानें दूषित झालेलें मन एखाद्या क्षुद्र कार्यामध्येंसुद्धां मूढ बनतें. दृश्य विषयांवर अवलंबून राहून वासनेमुळें तुझें चित्त दुर्बळ बनलें, म्हणजे एखाद्या क्षुद्र कीटाप्रमाणें तूं विषयांच्या चिखलामध्यें ठार बुडाल्याशिवाय रहाणार नाहींस. यास्तव हे महापराक्रमी राजा! जोंपर्यंत स्वयंप्रकाश परमात्म्याचा अनुभव होऊन तुला त्याचें सर्वत्र दर्शन होऊं लागलें नाहीं, तोंपर्यंत अखिल विषयांचा अंतःकरणानें त्याग करणें अत्यंत आवश्यक आहे. ज्याप्रमाणें सुवर्ण हातीं लागेपर्यंत सोन्याच्या धातूचें पुनःपुन्हां शोधन करावें लागतें, त्याप्रमाणें आत्म्याचा लाभ होईपर्यंत अध्यात्मशास्त्राचें अवलोकन करणें जरूर आहे. मनांतून सर्व विषयांना अजिबात फांटा देऊन मनुष्य जेव्हां सर्वात्मबुद्धीचा आश्रय करून सर्व ठिकाणीं आणि सर्व काळीं त्या परमात्म्याचें स्वात्मरूपानें दर्शन करून घेऊं लागेल, तेव्हांच त्याला पूर्णात्म्याची प्राप्ति झाली असें म्हणतां येईल. जोंपर्यंत झाडून साऱ्या विषयांचा मनानें त्याग झाला नाहीं, तोंपर्यंत मनुष्याला आत्मलाभ झाला असें केव्हांहि म्हणतां येत नाहीं. कारण, मनाच्या सर्व अवस्थांचा त्याग झाल्यानंतर अवशिष्ट रहाणारा तोच आत्मा, असा ज्ञात्या पुरुषांचा सिद्धान्त आहे. सामान्य व्यवहारामध्येंसुद्धां एखादी क्षुद्र वस्तु तिच्या विरोधी वस्तूंचा त्याग केल्याशिवाय हातीं लागत नाहीं असा नियम आहे, तर आत्मलाभाच्या बाबतींत हा नियम विशेषच लागू पडावा, यांत काय आश्चर्य आहे? राजा! इतर सर्व विषयांचा त्याग करून जेव्हां मनुष्य एखाद्या विषयाच्या प्राप्तीकरितां मनापासून झटतो, तेव्हांच तो विषय त्याच्या हस्तगत होतो. तस्मात्, आत्मदर्शनाकरितां सर्व दृश्य विषयांचा त्याग कर व असें केल्यानंतर जें अवशिष्ट रहातें आणि ज्याचा केव्हांहि त्याग करतां येणें अशक्य असतें, तेंच परमपद होय. सारांश बा सुरघो! कार्यकारणपरंपरेनें संबद्ध असलेल्या ह्या जगामध्यें जी जी वस्तु भासमान होते, ती ती मनानें केवळ आपल्या कल्पनेनें निर्माण केलेली आहे, हें जाणून सर्व दृश्य विषयांचा त्याग कर; व नंतर मूल अज्ञानासह त्या शुद्ध मनाचाहि निरास कर, म्हणजे जें शिल्लक राहील तेंच ब्रह्मस्वरूप होय.

## सर्ग ५९

१. बाह्य आणि आंतर दृश्याचा त्याग केल्यानंतर विचारानें सुरघूला आत्मलाभ होतो.

श्रीवसिष्ठः—बा रघुनंदना! अशा रीतीनें मांडव्य ऋषींनीं त्या सुरघू राजाला उपदेश केल्यानंतर ते आपल्या रमणीय मुनिमंडलाप्रत जाऊन पोहोंचले. मुनिश्रेष्ठ मांडव्य निघून गेल्यानंतर तो राजाहि एकांतस्थानीं जाऊन बसला व आपल्या आत्मस्वरूपासंबंधानें चिंतन करूं लागला. तो म्हणाला:—'मी मेरुपर्वत

नव्हे व तो माझा नव्हे. हें जग मी नव्हे व हें जग माझें नव्हे. हे पर्वत मी नव्हे व ते माझे नव्हत. ही पृथ्वी मी नव्हे व ती माझी नव्हे. हें किरातमंडल मी नव्हे व तें माझें नव्हे. मी या देशाचा राजा आहें अशी जी माझी समजूत आहे, ती केवळ माझी कल्पना असून सर्व जनांची संमति आणि पट्टाभिषेक यांच्या योगानें ती कल्पना माझ्या ठिकाणीं उद्भवली आहे. परंतु ही कल्पना मी आतां अजिबात सोडून देतों. हा देश मी नव्हे व तो माझा नव्हे. आतां फक्त हें नगर राहिलें. परंतु त्यासंबंधानेंहि माझा हाच निश्चय आहे. पताका, वृक्षपंक्ती, सेवकजन, उपवनें, हत्ती, घोडे, सामंत इत्यादिकांच्या योगानें शोभायमान होणारी ही राजधानी मी नव्हे आणि ती माझी नव्हे. हे भोगवृंद व ही स्त्री यांच्याशीं माझा संबंध आहे, ही भ्रामक समजूत मिथ्या संकेतामुळें माझ्या डोक्यांत खिळून गेली आहे. परंतु या समजुतीला फांटा दिला म्हणजे यांपैकीं कोणीहि माझीं नव्हत. एवंच, भृत्यवर्ग, चतुरंग सैन्य, वाहनें, पुरें इत्यादिकांनीं युक्त असलेलें हें राज्य मी नव्हे व त्यांचा माझा अर्थाअर्थी यत्किंचित्‌हि संबंध नाहीं. ह्या मिथ्या कल्पनेमुळें मी आजपर्यंत विनाकारण व्याकुल झालों होतों. आतां हस्तपादादि अवयवांनीं युक्त असलेला हा देह म्हणजेच मी, असें मी अद्यापपावेतों समजत आलों. परंतु यासंबंधानें सुद्धां मी आतां बारकाईनें विचार करून पहातों म्हणजे झालें. हा अस्थिमांसानें भरलेला देह अचेतन असल्यामुळें तो मी असणें शक्य नाहीं. तसेंच पाण्यांतील कमलाचा ज्याप्रमाणें पाण्याशीं मुळींच संबंध नसतो, त्याप्रमाणें ह्या जड देहाशीं माझा यत्किंचित्‌हि संबंध असणें शक्य नाहीं. मांस काय, रक्त काय किंवा अस्थी काय, हीं सर्व जड असल्यामुळें तीं मी नव्हे व तीं माझीं नव्हत. हात, पाय, वगैरे कर्मेंद्रियें मी नव्हे व तीं माझीं नव्हत. त्याचप्रमाणें या देहामध्यें जीं जीं जड द्रव्यें आहेत, तीं तीं मी नव्हे व तीं माझीं नव्हत, कारण, मी चैतन्ययुक्त आहें. हे भोग मी नाहीं आणि तेहि माझे नव्हत. तसेंच हीं ज्ञानेंद्रियेंसुद्धां जड आणि असद्रूप असल्यामुळें तीं मी नव्हे व तीं माझीं नव्हत. या संसृतिदोषाचें मूळ जें मन तेंहि जड असल्यामुळें मन म्हणजेहि मी नव्हे व ते माझें नव्हे. तसेंच बुद्धि आणि अहंकार हींसुद्धां मनाचींच भिन्न रूपें असल्यामुळें बुद्धि आणि अहंकार म्हणजे मी नव्हे व तींहि माझीं नव्हत. सारांश, या शरीरापासून तों तहत मन व ज्ञानेंद्रियें इत्यादिकांपर्यंत जो स्थूल व सूक्ष्म भूतांचा संघात आहे, तोहि अनित्य स्वरूपाचा असल्यामुळें तें सर्व म्हणजे मी नव्हे. आतां या सर्वांहून जें अवशिष्ट राहिलें, त्यासंबंधानें सूक्ष्मदृष्टीनें विचार करणें अवश्य आहे. ज्ञानेंद्रियें आणि मन यांच्या पलीकडे जें जीवतत्त्व आहे तें तर चेतन आहे. ह्या जीवाला जें ज्ञान होतें तें त्रिपुटीमय असतें व तेंहि त्रिपुटीच्या पलीकडील तत्त्वाच्या प्रेरणेमुळेंच होतें. अर्थात्, जीव हा अशा रीतीनें परावलंबी असल्यामुळें जीव हें आत्म्याचें तात्त्विक रूप असणें संभवनीय दिसत नाहीं. तसेंच चेत्य म्हणजे विषय हेंहि माझें स्वरूप असणें शक्य नाहीं. यासाठीं मी या सर्वांचा आतां त्याग करतों. अशा रीतीनें सर्व अनात्मविषयांचा निरास केल्यानंतर जें अवशिष्ट रहातें, तें विकल्परहित आणि शुद्ध असें साक्षितत्त्व हेंच आत्मस्वरूप असा माझा आतां निश्चय झाला आहे. अहो! हें केवढें आश्चर्य आहे कीं, मी अनादिकालापासून प्रयत्न करीत असतांहि आज मला परमपुरुषार्थाची प्राप्ति झाली आहे. ह्या माझ्या अनंत परमात्मस्वरूपाचा केव्हांहि

नाश होणें शक्य नाहीं. ब्रह्मा, इंद्र, यम, वायु, तसेंच सर्व भूतगण यांच्यामध्यें मोत्यांच्या माळेमधील तंतूप्रमाणें हा भगवान् आत्मा स्थित आहे. ही शुद्ध चिच्छक्ति वस्तुतः विषयरहित असून तिनें सर्व दिशा व्यापून टाकल्या आहेत व तीच मूढ जनांना भयप्रद असा भयंकर आकार धारण करते. ही सूक्ष्म चिच्छक्ति भावाभावरहित असून तीच सर्व भावांमध्यें स्थित असते. या भुवनापासून तों तहत सत्यलोकापर्यंत जे जे लोक आहेत, त्या सर्वांच्या अंतर्यामीं तीच स्थित असून ती सर्व शक्तीचें निवासस्थान आहे. ती नित्य निरतिशयानंदानें परिपूर्ण असून अखिल वस्तूंना प्रकाशित करणारी जणूं दीपिकाच आहे. ती चिच्छक्ति म्हणजे सर्वसंसाररूपी मोत्यांना ओंवणारा जणुं तंतुच होय. ती चिच्छक्ति सर्व आकारांनीं युक्त दिसूनहि सर्व आकारांनीं रहित असते. परंतु तीच सर्व भूतांचीं रूपें धारण करून सर्वदां सर्व वस्तूंमध्यें स्थित असते. ही सर्वव्यापी चिच्छक्ति चतुर्दश भुवनांतील सर्व प्राण्यांना धारण करते व ह्या चिच्छक्तीलाच जगांतील सर्व वस्तूंचें संवेदन म्हणजे ज्ञान होत असतें. या जगांत जीवाला ज्या ज्या सुखदुःखदशा भोगाव्या लागतात, तो तो जीवाच्या अज्ञानामुळे त्याला होणारा मिथ्या आभास असून, हे सर्व आभास आत्म्याच्या चिच्छक्तीमुळें उत्पन्न होत असले, तरी परमार्थदृष्टीनें विचार करतां या विश्वामध्यें जें जें भासमान होतें तें तें आत्माच आहे. सारांश माझा आत्मा सर्वव्यापी असून तो माझ्या बुद्धीचा साक्षी आहे व त्यालाच चित् म्हणतात. ही चित् द्रष्टा आणि दृश्य या रूपांनीं माझ्या ठिकाणीं आविर्भूत झाली व तिनेंच 'मी राजा आहें' हा भ्रम माझ्या ठिकाणीं उत्पन्न केला. ह्या चित्च्या प्रभावामुळेंच मन हें देहरूपी रथामध्यें बसून संसारजालामध्यें लीलेनें एकसारखें भ्रमण करीत रहातें. परंतु वास्तविक मन, शरीर इत्यादिक हा केवळ भ्रम असून ह्या चंचल मनाचा नाश झाला तरी तत्त्वदृष्ट्या कांहींच नष्ट होत नाहीं. हें जगज्जालरूपी नृत्य चित्तरूपी नटांनीं विस्तारलें असून दीपज्योतीप्रमाणें बुद्धीचें प्रकाशकत्व करणाऱ्या आत्म्यामुळें चित्तरूपी नटांचे हे चाळे चांगलेच अनुभवास येतात. हाय हाय ! प्रजांच्या निग्रहानुग्रहाच्या बाबतींत मी आजपर्यंत व्यर्थ चिंता करीत बसलों होतों ! हा सर्व देहात्मबुद्धीचा परिणाम आहे. परंतु वास्तविकपणें पाहूं गेलें तर हा क्षुद्र देह म्हणजे मृगजळ होय. अहो ! मी आतां अज्ञाननिद्रेतून जागा झालों असून माझें संसाररूपी दुःस्वप्न अजिबात नष्ट झालें आहे. ज्या आत्मस्वरूपाचें दर्शन करून घेणें हें मनुष्याचें इतिकर्तव्य आहे, त्याचें मला दर्शन झालें आहे व या जगांत जें प्राप्तव्य आहे, तें संपूर्ण आत्मज्ञान मला आतां प्राप्त झालें आहे. या जगांत जें जें दृश्य म्हणून दिसत आहे, त्या त्यामध्यें मायिक चिदंशानें अज्ञानानें निर्माण केलेल्या जागृतस्वप्नादि भ्रमांशिवाय दुसरें त्रिकालाबाधित तत्त्व नाहीं. सारांश, आत्मदृष्टीनें हें सर्व जग जर मिथ्या ठरतें, तर प्रजांचे निग्रहानुग्रह आणि तज्जन्य हर्षशोक यांना तरी सत्यत्व कोठून असणार ? अर्थात्, या सर्व कल्पना निराधार आहेत यांत तिळमात्र शंका नाहीं. सांप्रत माझा मोह नाहींसा झाला असून हें सर्व ब्रह्म आहे, अशा अनुभवाप्रत मी जाऊन पोहोंचलों आहें, ह्यामुळें मला आतां सुख कसलें आणि दुःख तरी कसलें ? मी पूर्वी मोहानें ग्रस्त झालों होतों; परंतु आतां सुदैवानें माझा तो मोह अस्तंगत झाला आहे. आत्मस्वरूपाच्या निरतिशयानंदाचा अनुभव घेत असल्यामुळें मला आतां शोक किंवा मोह कोठून उत्पन्न होणार? तसेंच मी आतां काय पहाणार ! कोणत्या क्रिया

करणार ? कोठें रहाणार ? आणि कोठें जाणार? हें चिदाकाश खरोखर किती अलौकिक आहे ! हे सर्व तत्त्वांच्या अतीत असलेल्या तत्त्वा ! तुला माझे नमस्कार असोत ! हे सुंदरा ! माझ्या महद्भाग्यामुळें मला तुझें दर्शन झालें आहे. अहाहा! मी आतां चांगला जागा झालों असून मला सम्यक्ज्ञान झालें आहे. तरी ज्याच्या उदयामुळें माझ्या ठिकाणीं सम्यक्ज्ञान बाणलें, अशा माझ्या अनंत आत्मस्वरूपाला, अर्थात् मला नमस्कार असो ! सारांश, माझी चित्तशुद्धि होऊन मी अवस्थात्रयाच्या पलीकडे जाऊन पोहोंचल्यामुळें आणि माझ्या ठिकाणच्या भवभ्रमाचा संपूर्ण निरास झाल्यामुळें मला अखंड ज्ञानसमाधि प्राप्त झाली आहे; व अशा रीतीनें परब्रह्माशीं आपलें ऐक्य अनुभवीत मी तद्रूप झालों आहें.'

## सर्ग ६०

—:०:—

१. आत्मज्ञान प्राप्त झाल्यामुळें देहपातापर्यंत सुरघु अनासक्त बुद्धीनें सर्व व्यवहार करतो.

**श्रीवासिष्ठः**—राघवा ! अशा रीतीनें 'हेमजट' नामक किरातांच्या त्या राजाला, अर्थात् सुरघूला सर्वोत्कृष्ट अशा ब्रह्मपदाची प्राप्ति झाली. ज्याप्रमाणें विश्वामित्रानें आपल्या पराक्रमाच्या योगानें ब्राह्मण्याची पदवी संपादन केली, त्याप्रमाणें सुरघूनें केवळ विवेकाच्या बळावर ती श्रेष्ठ स्थिति प्राप्त करून घेतली. यामुळें, दिवसांची मालिका निर्माण करीत असतां सूर्य केव्हांहि खिन्न होत नाहीं, त्याप्रमाणें आपलीं राजकार्यें करीत असतां कितीहि अनर्थकारक प्रसंग ओढवले तरी तो राजा खिन्न होईनासा झाला. त्या दिवसापासून तो निग्रहानुग्रहादि सर्व व्यवहार करीत असतां शांत, आणि पाण्याच्या प्रचंड ओघामधील पर्वताप्रमाणें स्थिर, राहूं लागला. हर्षामर्षादि विकारांपासून मुक्त होऊन आपलीं सर्व कार्यें प्रत्यहीं करीत असल्यामुळें तो उदार आणि गंभीर राजा समुद्राप्रमाणें शोभायमान होऊं लागला. त्याची चित्तवृत्ति गाढ निद्रेंतील स्थितीप्रमाणें निश्चल राहूं लागली व एखादा दीप आपल्या प्रकाश देणाऱ्या न हालणाऱ्या शिखेमुळें शोभिवंत दिसावा, त्याप्रमाणें तो आपल्या स्थिर चित्तवृत्तीमुळें शोभूं लागला. तेव्हांपासून तो राजा निर्दय नाहीं व दयावान् नाहीं, द्वंद्वयुक्त नाहीं व मत्सरी नाहीं, बुद्धिवान् नाहीं व निर्बुद्ध नाहीं, सकाम नाहीं व निष्कामहि नाहीं, अशा रीतीनें वागूं लागला. आत्मज्ञान प्राप्त झाल्यामुळें तो नित्य समदर्शी झाला; व त्याची चित्तवृत्ति शांत, स्थिर आणि अंतःसमाधानी बनल्यामुळें तो सुरघु राजा पाण्यानें ओतप्रोत भरलेला समुद्र आणि पूर्णचंद्र यांच्याप्रमाणें विलसूं लागला. हें सर्व जगत् हा केवळ चित्तत्त्वाचा विलास आहे, अशा अनुभवाप्रत जाऊन पोहोंचल्यामुळें त्याच्या ठिकाणची सर्व सुखदुःखें अस्तंगत झालीं आणि त्याची बुद्धि परिपूर्ण बनली. त्याच्या शरीराची हालचाल होत असतां, तो गाढ निजला असतां किंवा त्याच्या मनांत विचार घोळत असतां तो नेहमीं ज्ञानसमाधीमध्यें गढून गेलेला असे; अर्थात्, तत्त्वतः कोणतेच व्यवहार होत नाहींत, हा ज्ञानानुभव त्याच्या वृत्तीमध्यें बाणून गेलेला होता. अशा रीतीनें त्या राजानें शेंकडों वर्षें राज्याचा गाडा अनासक्त बुद्धीनें हाकला. त्यानंतर एखाद्या दंवाच्या बिंदूनें तेजाच्या योगानें शुष्क होऊन आपलें रूप टाकून द्यावें, त्याप्रमाणें त्यानें आपल्या देहनामक मूर्त आकाराचा त्याग केला. नदींतील पाण्यानें आपली तटमर्यादा उल्लंघन करून समुद्रजलाशीं एकरूप व्हावें, तद्वत् त्यानें आपल्या साक्षात्कारवृत्तीच्या

योगानें हिरण्यगर्भादिकांचेंहि नियंतृत्व करणाऱ्या व सृष्टीची उत्पत्ति आणि लय यांना हेतुभूत असलेल्या परमेश्वराच्या स्वरूपामध्यें प्रवेश केला. सारांश, अशा रीतीनें आपल्या स्वयंप्रकाश स्वरूपाप्रत जाऊन पोहोंचल्यानंतर तो जन्मादि विकारांच्या पलीकडे गेला, त्याचा सर्व शोक नाहींसा झाला व एखादा घट फुटतांच त्यांतील आकाश मदहाकाशाशीं एकरूप व्हावें, तद्वत् त्या महात्म्याची स्थिति झाली.

---

# सर्ग ६१

—:*:—

१. सुरघु आणि परिघ यांचा संवाद.

**श्रीवसिष्ठः**—कमलपत्राक्षा रामा ! अशा रीतीनें त्या सुरघु राजानें तत्त्वबोधाच्या योगानें हर्षशोकादिकांना निमित्तभूत असलेल्या पातकाचा समूल उच्छेद करून टाकून ब्रह्मपदप्राप्ति करून घेतली, त्याचप्रमाणें तूंहि आपल्या आत्मकल्याणासाठीं त्या निर्द्वंद्वपदाची प्राप्ति करून घेऊन शोकरहित हो. ह्या श्रेष्ठ ज्ञानदृष्टीचा तूं अवलंब केलास, म्हणजे दिवा दृष्टीस पडलेल्या एखाद्या लहान मुलाप्रमाणें घोर अंधकारामध्यें बुडून गेलेल्या तुझ्या मनाला शोक करण्याचा केव्हांहि प्रसंग येणार नाहीं. तसेंच त्या सुरघूच्या वृत्तान्तामध्यें वर्णन केल्याप्रमाणें तूं विवेकाचा आश्रय केलास, म्हणजे एखाद्या खोल खळग्यांत पडलेल्या मनुष्याला त्या खळग्यावरील दाट वाढलेल्या गवताच्या मुळीचा आधार मिळाला असतां जसा आनंद होतो, तसा आनंद होऊन तुझ्या चित्ताला शाश्वत विश्रांतिसुख मिळेल. याकरितां तूं स्वतः या ज्ञानदृष्टीचा पुनःपुन्हां अभ्यास करून व दुसऱ्यांना उपदेश करून ती दृष्टी आपल्या ठिकाणीं बाणवून घे व अशा रीतीनें सहजसमाधीचें निरतिशय सुख अनुभवून या भूतलाला अलंकृत कर.

**श्रीरामः**—मुनिवर्या ! मन हें स्वभावतः मोराच्या अंगावरील वायूनें हलणाऱ्या लहान लहान पिसांप्रमाणें चंचल असल्यामुळें त्याला अखंड एकतानतेची स्थिति कशी बरें प्राप्त होईल ? व प्राप्त होत असेल तर ती समाधीची स्थिति कशी असते, याचें मला वर्णन करून सांगा.

**श्रीवसिष्ठः**—राघवा ! ज्या सुरघूची आख्यायिका मीं तुला आतांच सांगितली, तो जीवन्मुक्त स्थितीमध्यें असतां त्याचा आणि पर्णाद नामक राजर्षीचा जो अद्भूत संवाद झाला, तो मी तुला आतां सांगत आहें तो लक्षपूर्वक ऐक, म्हणजे सहजसमाधीचें स्वरूप कसें असतें याची यथार्थ कल्पना तुझ्या मनांत प्रतिबिंबित होईल. रामा ! सुरघु आणि पर्णाद अशा दोघांनाहि ही सहजसमाधीची स्थिति प्राप्त झालेली असल्यामुळे त्यांचा हा संवाद अत्यंत महत्त्वाचा आहे. परिघ हा पारसीक नांवाच्या देशाचा एक मोठा पराक्रमी राजा असून रथाला ज्याप्रमाणें परिघ म्हणजे आंस आधारभूत असतो, त्याप्रमाणें आपल्या देशांचा आधारस्तंभ असल्यामुळें तो परिघ या नांवानें लोकांमध्यें विख्यात झाला होता. नंदनवनामध्यें वास करणाऱ्या मदनाचा वसंतऋतु हा परममित्र असतो, त्याप्रमाणें परिघ राजा सुरघुचा परममित्र होता. ज्याप्रमाणें कल्पान्त हा संसारामध्यें प्रवेश करून त्याचा नाश करून टाकतो, त्याप्रमाणें परिघाच्या राज्यांतील प्रजेच्या दुष्कृतरूपी दोषामुळें त्याच्या राज्यांत एकदां अवर्षण पडून त्यामुळें मोठा अनर्थ ओढवला. ज्याप्रमाणें एखाद्या अरण्यांत वणवा पेटून त्यामध्यें शेंकडों प्राण्यांची आहुति पडते, त्याप्रमाणें त्याच्या राज्यांतील लोक क्षुधेनें व्याकुल होऊन पटापट प्राण सोडूं लागले. आपल्या प्रजेची ती हीन

दीन स्थिति अवलोकन करून कांहीं उपाय सुचेना तेव्हां त्या राजाला परम विषाद वाटला व एखाद्या पांथस्थाने दग्ध झालेल्या गांवाचा त्याग करावा, तद्वत् त्या राजानें आपल्या राज्याचा तावडतोब त्याग केला, आणि उद्वेगानें अजिन वगैरे मुनींद्रांप्रमाणें तो अरण्यांत तपश्चर्या करण्याकरितां निघून गेला. आपल्या प्रजाजनांना माहीत नाहीं अशा एका अत्यंत दूर अंतरावर असलेल्या अरण्यांत जणूं काय हा लोक सोडून गेल्याप्रमाणें तो जाऊन राहिला, व त्या अरण्यांतील एका गुहेंत जाऊन त्याने विरक्त चित्तानें इंद्रियें आणि मन यांचा निग्रह करून तपश्चर्या करण्याला सुरुवात केली. त्याठिकाणीं वृक्षांवरील वाळून गळलेलीं पानें भक्षण करून तो आपले दिवस कंठूं लागला व अशा रीतीनें कित्येक दिवसपर्यंत अग्नीप्रमाणें वाळलेल्या पानावर आपली उपजीविका करण्याचें व्रत त्यानें चालविल्यामुळें तपस्व्यांमध्यें त्याचें 'पर्णाद' ( पर्ण + अद्=पानें खाणारा ) हें अन्वर्थक नांव पडलें; व तेव्हापासून जंबुद्वीपांतील मुनिमंडलामध्यें तो श्रेष्ठ राजर्षि **पर्णाद** या नांवानें विख्यात झाला. अशा रीतीनें एक हजार वर्षें दारुण तपश्चर्या केल्यानंतर दृढ अभ्यासाच्या योगानें त्याची चित्तशुद्धि होऊन त्याच्यांवर ईश्वराचा अनुग्रह झाला व त्यामुळें त्याला तत्वज्ञानाची प्राप्ति झाली. तत्त्वज्ञान झाल्यामुळें स्वाभाविकपणेंच तो जीवन्मुक्त होऊन द्वंद्वरहित, शोकरहित, निर्वासन आणि शांतचित्त झाला. तदनंतर ज्याप्रमाणें एखाद्या भ्रमरानें हंसांबरोबर कमलिनीमध्यें संचार करावा, त्याप्रमाणें त्यानें क्वचित् सिद्धांसहवर्तमान, तर क्वचित् साध्य म्हणजे साधकांसहवर्तमान ह्या त्रैलोक्यरूपी मठीमध्यें स्वेच्छेनें संचार केला. अशा रीतीनें संचार करीत असतां एकदां मेरुपर्वतावरील रत्नांची जणुं खाणच अशा एखाद्या शिखराप्रमाणें दिसणाऱ्या सुरघूच्या राजमंदिरांत तो जाऊन पोहोंचला. हेमजट नामक किरातांचा राजा सुरघु व पर्णाद हे फार दिवसांचे स्नेही होते व ते दोघेहि ब्रह्मज्ञानसंपन्न होऊन संसारांतून मुक्त झालेले असल्यामुळें एकमेकांना भेटतांच त्यांनीं एकमेकांची यथाविधि पूजा केली, व ' आज फार दिवसांनीं आपली अकस्मात् भेट झाल्यामुळें माझें पुण्यच फळाला आलें असें मी समजतों!' अशा शब्दांनीं त्यांनीं परस्परांचा गौरव केला. नंतर त्यांनीं एकमेकांना मोठ्या प्रेमानें आलिंगन दिलें. आलिंगन दिल्यानंतर ते दोघे ब्रह्मनिष्ठ जेव्हां एका आसनावर विराजमान झाले, तेव्हां ती चंद्रसूर्यांची जोडी एकाच वेळीं भूतलावर अवतीर्ण झाली आहे कीं काय, असा भास झाला.

परिघः—मित्रा! आज फार दिवसांनीं तुझें दर्शन झाल्यामुळें माझ्या चित्ताला परम आल्हाद झाला असून माझें मन चंद्रबिंबांत बुडून बाहेर निघाल्याप्रमाणें अत्यंत शीतल झालें आहे. या जगांत अकृत्रिम सुख जर कोठें असेल तर तें प्रेमाशिवाय दुसऱ्या कोठेंहि नाहीं; व या प्रेमाची मौज अशी विलक्षण आहे कीं, एखाद्या डबक्याच्या कांठावर असलेल्या वृक्षाच्या शाखा तोडून टाकल्या तरी जोंपर्यंत त्याचीं मुळें शाबूत आहेत तोंपर्यंत त्याच्यावर शेंकडों शाखा उत्पन्न झाल्याशिवाय रहात नाहींत, तद्वत वियोगामध्यें प्रेमाची स्थिति होते; अर्थात्, प्रेमाचा वृक्ष वियोगामध्यें जोरानें फोंफावतो, असा नियम आहे. मित्रा! ते आपले पूर्वींचे निर्भय प्रेमसंलाप, त्या लीला, त्या विनोदयुक्त चेष्टा यांचें पुनःपुन्हां स्मरण होऊन खरोखर मन कसें आनंदांत पोहूं लागतें! ज्याप्रमाणें तुला मांडव्याच्या कृपेनें हें ज्ञान प्राप्त झालें, त्याचप्रमाणें मीं तपश्चर्येच्या योगानें ईश्वराची आराधना केल्यामुळें त्याच्या प्रसादानें मलाहि

आत्मज्ञानाची प्राप्ति झाली आहे. आतां तुझें सर्व दुःख नाहींसें झालें आहेना?* ज्याप्रमाणें एखाद्या भूमंडलाधिपतीनें मेरुपर्वतावर वास्तव्य करावें, त्याप्रमाणें ज्ञानभूमिकांच्या परिपाकानें जगताच्या परमकारणामध्यें तुला कायमची विश्रांति मिळूं लागली आहेना? ज्याप्रमाणें शरदृतूमध्यें सरोवरांतील पाणी स्वच्छ होतें, त्याप्रमाणें बा सुरघो! तुझें चित्त आत्मारामाशीं तादात्म्य पावल्यामुळें प्रसन्न झालें आहेना? तूं राजा असल्यामुळें प्रजेसंबंधाचीं आपलीं अवश्य कर्तव्यें सम, प्रसन्न आणि गंभीर अशा ज्ञानदृष्टीनें करतोसना! तसेंच तुझ्या राज्यांतील जनता अधिव्याधिरहित आणि कुशल आहेना! त्यांच्या धान्यादिकांचें यथायोग्य रक्षण होत आहेना? तुझ्या राज्यांतील भूमि उत्कृष्ट धान्य प्रसवून आणि कल्पलतेप्रमाणें फलभारानें नम्र होऊन तुझ्या प्रजांचें धारणपोषण करण्याला समर्थ आहेना? ज्याप्रमाणें चंद्राचे शुभ्र किरण पृथ्वीवर पडून ते सर्व दिशांमध्यें पसरतात, त्याप्रमाणें तुझें धवल आणि पवित्र यश सर्वत्र पसरलें आहेना? ज्याप्रमाणें एखाद्या सरोवरांतील पाणी कमलगर्भांतील मृणाल तंतूमध्यें गच्च भरून जातें, त्याप्रमाणें तुझ्या ठिकाणच्या उत्कृष्ट गुणांनीं ह्या दिशा व्यापून टाकल्या आहेतना? तुझ्या राज्यांतील प्रत्येक गांवाभोंवतालच्या शेतांतील धान्याचें रक्षण करण्यासाठीं शेतांच्या बांधावरून बसलेल्या कुमारिका तुझ्या पवित्र यशानें भरलेलीं गाणीं प्रसन्न चित्तानें गातातना? तुझ्या राज्यांतील धान्य, संपत्ति, नोकरचाकर, स्त्रिया, पुत्र, नगरें वगैरे सर्वांचें कुशल आहेना? तुझी शरीरयष्टि आधिव्याधिरहित असून ती ऐहिक आणि पारलौकिक सुखाला कारणीभूत होणारें पुण्य नांवाचें फल प्रसवतेना? सकृद्दर्शनीं रमणीय भासणाऱ्या, परंतु परिणामीं घात करणाऱ्या विषयसर्पासंबंधानें तुझें मन विरक्त आहेना? अरेरे! आपला वियोग झाल्याला किती तरी दिवस होऊन गेले! परंतु इतक्या दीर्घ कालानंतर कां होईना, वसंतऋतु आणि पर्वताचा तट यांच्या संयोगाप्रमाणें सुदैवानें आपला समागम झाला आहे. मित्रा! या जगांतील जीवांना इष्टानिष्टजनांच्या संयोगवियोगांपासून विविध सुखदुःखदशा भोगाव्या लागणें अगदीं अपरिहार्य आहे. या जगांतील नियतीचा विलास खरोखरच मोठा विचित्र आहे! कारण, एवढा दीर्घ कालपर्यंत वियोग पावून निरनिराळ्या दशा भोगणारे आपण दोघेजण आज एकत्र भेटत आहों! ही नियतीची घटना विलक्षण नव्हे काय?

सुरघुः—भगवन्! आपण सांगतां त्याचप्रमाणें हुबेहुब स्थिति आहे, यांत शंका नाहीं. ह्या ईश्वरनिर्मित नियतीची गति सर्पांच्या गतीप्रमाणें वक्र, विस्मयकारक आणि गहन असून ती जाणण्याला कोण समर्थ आहे? नियतीच्या ह्या विचित्र गतीमुळेंच जे आपण इतके दिवस एकमेकांपासून विभक्त झालों असून निरनिराळ्या दशा भोगीत होतों, ते आज एका ठिकाणीं प्राप्त झालों आहों. तस्मात्, नियतीला घडवून आणण्याला अशक्य अशी गोष्ट या जगांत एकहि नाहीं, असेंच म्हणणें भाग पडतें. मित्रा! तुझ्या आगमनानें मला आज मोठा आनंद झाला असून माझें प्राक्तन पुण्य फळाला आलें, असेंच माझें मन सांगत आहे. माझें सर्व पातक आज क्षीण झालें; व तुझ्या दर्शनापासून मला जें परमावधीचें समाधान वाटत आहे, तें तुझ्या पुण्यवृक्षाचेंच फल होय. मी आज

---

*महाभारत सभा. ५ व वाल्मीकिरामायण अयोध्या १०० या दोन ठिकाणीं 'कच्चित्' या पदानें आरंभ करून प्रश्नपरंपरारूपानें जसा नीतिबोध करण्यांत आला आहे, तसाच येथेंहि करण्यांत आला आहे.

खरोखरच धन्य झालों आहें. राजर्षे! आजपर्यंत माझ्याजवळ सर्व तऱ्हेच्या संपत्ति होत्या; परंतु तुझ्या आगमनामुळें त्या आज शेंकडों पटीनें वृद्धिंगत झाल्या आहेत. महानुभावा! तुझें पवित्र भाषण, किंबहुना तुझी दृष्टि सर्वत्र अमृताचाच वर्षाव करीत आहे कीं काय, असे मला वाटते व असें होतें यांत कांहींच आश्चर्य नाहीं. कारण, सत्पुरुषांच्या सहवासापासून जें सुख प्राप्त होतें, त्याची किंमत प्रत्यक्ष मोक्षसुख प्राप्त होण्याइतकी श्रेष्ठ आहे!

## सर्ग ६२

—:०:—

१. अज्ञानाचे आवरण नाहींसे होऊन नित्यचित्स्फुरणामुळे प्राप्त होणाऱ्या विज्ञानाच्या सहजसमाधीचें वर्णन.

श्रीवसिष्ठः—राघवा! येणेंप्रमाणें आपल्या पूर्वस्नेहासंबंधानें प्रेमसंलाप करीत परिघ त्याठिकाणीं बराच वेळ राहिला. तदनंतर तो सुरघूला म्हणाला.

परिघः—मित्रा! या संसारजालामध्यें जें जें कर्म केलें जातें, तें तें ज्ञानसमाधीच्या योगानें ज्याचें चित्त शांत झालें आहे अशा पुरुषालाच सुख देण्याला कारणीभूत होतें, अज्ञ मनुष्यांना सुख देण्याला कारणीभूत होत नाहीं. यास्तव मी विचारतों कीं, संसारांतील सर्व विक्षेपदुःखाचा निरास करणाऱ्या आणि व्यवहारांतील सर्व सुखांहून श्रेष्ठ असलेल्या निर्विकल्प समाधीचा तूं अभ्यास करतोसना?

सुरघूः—भगवन्! सर्वसंकल्पवर्जित आणि परम शांति प्राप्त करून देणारा असा समाधि म्हणजे काय हें मला प्रथम सांगा, म्हणजे मग आपल्या प्रश्नाचें योग्य उत्तर देण्याला ठीक पडेल. महात्मन्! जो तत्त्ववेत्ता आहे तो व्यवहार करीत असला किंवा स्वस्थ बसला तरीहि तो समाधिस्थितीमध्यें नसतो, असें कसें बरें म्हणतां येईल? जे पुरुष प्रबुद्ध म्हणजे ज्ञानी झाले व जे आत्मनिष्ठ बनले ते जगांतील व्यवहार करीत असले तरीहि सदा समाधिस्थितीमध्येंच असतात. अर्थात्, अशा पुरुषांनीं समाधीचें निराळें अनुष्ठान तें काय करावयाचें? याच्या उलट एखादा मनुष्य पद्मासन घालून बसलेला असला व त्यानें ब्रह्मांजलि केलेली असली, तथापि त्याचें चित्त शांत आणि स्थिर नसेल, तर त्याची ती स्थिति समाधीची आहे, असें तरी कसें म्हणावयाचें? कारण भगवन्! तत्त्वावबोध हा सर्व आशारूपी तृणाला दग्ध करून टाकणारा अग्नि असून समाधिशब्दाचा अर्थहि असाच आहे; नुसतें स्वस्थ बसणें म्हणजे समाधि असा अर्थ कोणीहि करीत नाहींत. समाधि (सम+आ+धा) म्हणजे परमात्मस्वरूपीं स्थिर असणें असाच अर्थ ज्ञाते पुरुष करतात. बा साधो! जी बुद्धि नित्य तृप्त असून जिला आत्मस्वरूपाचें अखंड अनुसंधान असतें तिलात्या परा प्रज्ञेलाच समाधि हें श्रेष्ठ नांव ज्ञानी पुरुषांकडून दिलें जातें. जी बुद्धि निरहंकार असते, जी केव्हांहि क्षुब्ध होत नाहीं, तसेंच जी जगांतील द्वंद्वांपासून सर्वथा अलिप्त असते, अशा मेरूपेक्षांहि स्थिर स्थितीला समाधि ही संज्ञा दिली जाते. जी मनाची स्थिति नेहमीं चिंतारहित असते, जिच्या सकल कामना परिपूर्ण झालेल्या असतात व जिच्या ठिकाणीं 'हें ग्राह्य' व 'हें त्याज्य' ही भावना मुळींच शिल्लक राहिलेली नसते, अशा पूर्ण स्थितीलाच समाधि हें नांव देण्यांत येतें. ज्या क्षणापासून ज्ञानी पुरुषाचें मन उन्मन होऊन पूर्ण बोधानें युक्त होतें, त्या क्षणापासूनच त्याच्या मनाला अखंड समाधीचें अत्युत्तम सुख लाभतें असें होऊन मग त्याला समाधीचा निराळा अभ्यास करण्याचें

प्रयोजनच उरत नाहीं. एकदां मनुष्य प्रबुद्ध झाला म्हणजे मग त्याच्या समाधीचा भंग केव्हांच होऊं शकत नाहीं. एखादें लहान मूल खेळत असतां कमलांतील तंतु ओढूं लागलें असतां त्याचा धागा तुटून जातो; परंतु ज्ञान्याला पूर्णबोधाची स्थिति प्राप्त झाल्यानंतर त्याची ज्ञानसमाधि केव्हांहि खंडित होऊं शकत नाहीं. ज्याप्रमाणें सूर्य हा सर्व दिवसभर प्रकाश देण्याच्या आपल्या कार्यापासून केव्हांहि विराम पावत नाहीं, त्याप्रमाणें ज्ञानाच्या योगानें ब्रह्माकार झालेली प्रज्ञा जीवित असेपर्यंत व विदेहकैवल्यस्थिति प्राप्त होईपर्यंत तत्त्वावलोकनापासून केव्हांहि विरामें पावत नाहीं. ज्याप्रमाणें एखादी प्रचंड नदी वाटेंतील कोणत्याहि अडथळ्याला न जुमानतां आपला प्रवाह अस्खलितरीतीनें चालू ठेवते, त्याचप्रमाणें मनुष्याच्या ठिकाणीं एकदां विज्ञानदृष्टि बाणली, म्हणजे त्याच्या त्या पूर्ण ज्ञानदृष्टीमध्यें केव्हांहि अंतर पडत नाहीं. ज्याप्रमाणें कालाला किंवा सदागति—अखंडपणें वहाणाऱ्या—वायूला आपल्या गतीचें केव्हांहि विस्मरण होत नाहीं, त्याचप्रमाणें ज्ञान्याच्या बुद्धीला आपल्या स्वानुभूत आत्मस्वरूपाचें विस्मरण होणें केव्हांहि शक्य नसतें. कालाला आपल्या कलांचें म्हणजे सूर्यादिकाचें निरंतर अनुसंधान असल्यामुळें त्याची परंपरा अबाधितपणें कायम असते, तद्वत् आत्मस्वरूपावरील अज्ञानाचें आवरण नाहींसें होऊन चित्त एकदां पूर्ण निर्विषय झालें, म्हणजे चित्तांतील चैतन्यस्फूर्ति केव्हांच नष्ट होत नाहीं. ज्याप्रमाणें कोणताहि पदार्थ सत्ताविरहित असूं शकत नाहीं, त्याचप्रमाणें ज्ञान्याला आत्मज्ञानरहित असा एकहि क्षण ठाऊक नसतो. संसारामध्यें जसा कोणचाहि पदार्थ त्याच्या गुणविरहित (उदाहरणार्थ उष्णतेवाचून अग्नि) सांपडणें संभवनीय नसतें, तशी आत्मस्वरूपाची जाणीव केव्हां नाहीं, असा ज्ञानी या जगांत केव्हांहि असणें शक्य नाहीं. कारण, ज्ञानवस्वरूपता हा ज्ञानी पुरुषाचा स्वभावच बनून गेलेला असतो. आतां खुद्द माझ्या स्वतःसंबंधानें विचारशील, तर मी सर्वदा प्रबुद्ध, निर्मल आणि शांतचित्त असून माझ्या सहजसमाधीमध्यें केव्हांच व्यत्यय येत नाहीं. माझ्या अखंड ज्ञानसमाधीचा विच्छेद कोण आणि कसा करणार? (आत्मस्वरूपाव्यतिरिक्त) या जगांत दुसरी कोणतीच वस्तु नाहीं, असा माझा अखंड अनुभव असल्यामुळें माझ्या समाधीचें व्युत्थान कोणत्याहि काळीं होऊं शकत नाहीं, म्हणून म्हणतों कीं, माझें मन केव्हांहि समाधिरहित स्थितीमध्यें नसतें. आतां वास्तविकपणें पाहूं गेलें, तर आत्मतत्त्वाशिवाय अन्य वस्तुच अस्तित्वांत नसल्यामुळें माझ्या ठिकाणीं मन आहे असेंहि म्हणतां येणार नाहीं. अर्थात्, जर मनच नाहीं तर त्याचा समाधि तरी कसली? तत्त्वदृष्टीनें विचार करतां एकटा आत्माच कायतो असून तो सर्वव्यापी आत्माच सर्वथा सर्व कांहीं आहे. व अशी वस्तुस्थिति असल्यामुळें समाधि कशाला म्हणावयाचें आणि असमाधि म्हणजे तरी काय? सारांश मित्रा! महात्मे हे नेहमीं एकमेवाद्वितीय अशा आत्मस्वरूपामध्यें स्थित असून त्यांच्या त्या परमात्मस्थितीमध्यें काया, परिणाम वगैरे भेदभावांना यत्किंचितहि अवकाश नसतो. यास्तव समाधि आणि असमाधि हा भेदभाव कल्पित करून तूं आतां जें भाषण केलेंस, त्याला वास्तविक कांहींच आधार नाहीं, असेंच म्हणणें रास्त ठरत नाहीं का?

१. 'आप्रयाणात्तत्रापि हि दृष्टम्।' ब्रह्म. सू. ४।१।१२

# सर्ग ६३

—:*:—

१. प्रश्नमिषानें सुरघूची परीक्षा केल्यानंतर परिघ त्याची स्तुति करतो. सहजसमाधीचें वर्णन पुढें चालू.

परिघः—राजा! तूं खरोखरच ज्ञानी असून तुला त्या ब्रह्मपदाची प्राप्ति झाली आहे; यामुळें तुझें अंतःकरण शीतल झालें असून आकाशांतील पूर्णचंद्राप्रमाणें तूं या भूतलावर विराजमान होत आहेस. स्वरूपानुभवाच्या निरतिशयानंदरूपी मकरंदानें तुझें अंतःकरण भरून गेलेलें असून त्याच्यायोगानें तूं शीतल, रमणीय आणि मोहक दिसत असून एखाद्या कमलाप्रमाणें शोभायमान होत आहेस. तुझें अंतःकरण अत्यंत उदार, पूर्ण आणि गंभीर असून आंतील निर्मलत्वामुळें तुझ्या मनाचें खरें स्वरूप स्वाभाविकपणेंच प्रकट होत आहे. यामुळें वेलातटावरील वायूच्या प्रवाहानें रहित झालेला शांत समुद्र शोभादायक होतो, त्याप्रमाणें तुझी स्थिति झालेली आहे. तुझें चित्त स्वच्छ, स्वानंदानें परिपूर्ण, निर्मल, विस्तीर्ण आणि गंभीर झालें असून त्यांतील अहंकाररूपी मेघ नष्ट झालेला असल्यामुळें तें शरदृतूमधील आकाशाप्रमाणें अपूर्व शोभा देत आहे. राजा! तूं कोणत्याही इष्टानिष्टविषयांसंबंधानें उदासीनासारखा असतोस, कोणत्याही बाह्य परिस्थितीमध्यें संतुष्ट असतोस आणि सर्व विषयांसंबंधानें सर्वदां विरक्त असतोस; यामुळें कोणत्याहि स्थितीमध्यें असलास तरी तूं शोभादायकच होतोस. तूं महाबुद्धिमान् असून सारासारविचारांत परिणत झालेला असल्यामुळें हें अखिल विश्व ब्रह्मरूप आहे, अशा अनुभवाप्रत तूं जाऊन पोहोंचला आहेस. भावाभावांचा निर्णय करण्यांत निष्णात असलेल्या तत्त्वज्ञा! तूं उच्चनीच दशांच्या फेऱ्यांत भ्रमण करावयास लावणाऱ्या भोगासक्तीपासून सर्वथा मुक्त झालेला असून आत्मस्वरूपाचा निरतिशयानंद भोगीत आहेस. हे सुंदरा! ज्याप्रमाणें क्षीरसागर हा आपल्या ठिकाणच्या अमृतामुळें तृप्त असतो, त्याप्रमाणें तूं आपल्या परमात्मस्वरूपाच्या नित्य महिम्यामध्यें स्थित असल्यामुळें पुनर्जन्माच्या अतीत होऊन तृप्त झाला आहेस.

सुरघुः—मुने! जोंपर्यंत हें जग दृश्यरूपानें दिसत आहे, तोंपर्यंत तें सर्व खोटेंच आहे. आम्हांला उपादेय म्हणजे ग्राह्य वाटेल अशी वस्तु या जगांत एकहि नाहीं. अर्थात्, उपादेय म्हणजे ग्राह्य वस्तूचाच अभाव ठरत असल्यामुळें हेय म्हणजे त्याज्य अशी वस्तुहि या जगांत नाहीं, असाच निष्कर्ष निघतो. हेय म्हणजे त्याज्य ही कल्पना उपादेय म्हणजे ग्राह्य ह्या कल्पनेच्या प्रतियोगित्वानें आणि तिच्यापासून भेद दाखविण्यासाठीं उत्पन्न होत असल्याकारणानें जेथें उपादेय ही कल्पनाच संभवत नाहीं, तेथें हेय ही कल्पना तरी कशी संभवणार? आतां हेयत्व म्हणजे तुच्छत्व व उपादेयत्व म्हणजे अतुच्छत्व असें मानून ज्ञान्याला जगांतील कांहीं वस्तू उपादेय म्हणजे ग्राह्य व कांहीं वस्तु हेय म्हणजे त्याज्य वाटत असतील असें म्हणावें, तर तेंहि जुळत नाहीं. कारण, कालदृष्ट्या जगांतील सर्व वस्तू कधीं तुच्छ तर कधीं अतुच्छ वाटत असतात आणि ज्ञान्याच्या ठिकाणीं तर तुच्छ व अतुच्छ ह्या कल्पना केव्हांच नाहींशा झालेल्या असतात; व माझीहि स्थिति अशीच झालेली आहे. या जगांतील प्रत्येक क्षुद्र वस्तु देशकालवशात् सामान्य मनुष्यांच्या दृष्टीला महत्त्वाची वाटते व प्रत्येक महत्त्वाची वस्तु तुच्छ वाटते. परंतु ज्ञानी पुरुष जगांतील कोणत्याहि वस्तूकडे तुच्छातुच्छ दृष्टीनें पहात नसल्यामुळें तिची निंदास्तुती करीत नाहींत. कारण निंदा

स्तुति ह्या भावना केव्हांहि आसक्तीमुळें उत्पन्न होतात, व आसक्ति ही नेहमीं मनानें इष्ट मानलेल्या वस्तुसंबंधानेंच उत्पन्न होते, असा नियम आहे. परंतु शोभनबुद्धीचे पुरुष परमोच्च वस्तु प्राप्त करून घेण्याची इच्छा करतात; व तत्त्वदृष्टीनें पाहिलें तर त्रिभुवनांतील स्त्रिया, पर्वत, समुद्र, वनराजी वगैरे पदार्थांमध्यें काडीचीहि सत्यता नाहीं, असेंच दिसून येतें. हें जीर्ण जगत् देहदृष्टया मांस, अस्थि यांनीं व भौतिकदृष्टया लांकूड, मृत्तिका, पाषाण वगैरेंनीं भरलेलें आहे. अर्थात्, अशा रीतीनें ह्या शून्य आणि इच्छा करण्याला सर्वथा अयोग्य अशा जगांतील कोणत्या वस्तूची इच्छा करावयाची? असा विचार केला आणि तो चित्तात बाणला, म्हणजे दिनलक्ष्मी अस्तंगत होतांच जगांतील वस्तूंचें दर्शन आणि प्रकाश हीं नाहींशीं होतात, तद्वत् चित्तांतील विषयेच्छा निवृत्त होतांच विषयांसंबंधाचे रागद्वेष आपोआप नष्ट होतात. मित्रा! उगीच पाल्हाळ करीत बसण्यांत काय अर्थ आहे? माझ्या एकंदर भाषणाचें सार हें आहे कीं, मन निर्विषय, शांत आणि विक्षेप व वैषम्य यांनीं रहित होऊन तें आत्म्यामध्यें रममाण होऊं लागलें, तरच ती निवांत विश्रांतीची सर्वोत्कृष्ट स्थिति असून तीच या जगांतील परमोच्च सुखाची खरीखुरी दृष्टि होय.

---

# सर्ग ६४

१. उपायांचा अवलंब केला असतां ज्ञानी पुरुषाला मनादोषाची बाधा होत नाहीं. अशा उपायाचें वर्णन.

**श्रीवसिष्ठः**—राघवा! अशा रीतीनें सुरघु आणि परिघ यांनीं जगद्भ्रमासंबंधानें चर्चा केल्यानंतर एकमेकांची मोठ्या आदरानें पूजा केली व त्यानंतर ते दोघेजण आपापलीं पुढील कार्यें करण्याकरितां निघून गेले. म्हणून म्हणतों कीं, बा रामभद्रा! सुरघु आणि परिघ यांच्या संवादांत वर्णन केल्याप्रमाणें विज्ञानाची स्थिति जाणून त्याची प्राप्ति करून घे आणि ब्रह्मानुभवामध्यें स्थिर हो. रामा! ज्ञानानुभवसंपन्न पुरुषांच्या सहवासानें मनुष्याची बुद्धि सूक्ष्म होऊन त्याच्या हृदयाकाशांतील अहंकाररूपी कालमेघ निःशेष गलित झाला, तसेंच त्याचें चित्त सर्व लोकांना प्रिय, फलसंपन्न आणि सर्व मनुष्यांना आल्हाद देणाऱ्या शरत्कालाप्रमाणें एकदां निर्मल आणि विस्तीर्ण झालें, म्हणजे तें सर्व अनर्थांचें निवर्तक असल्यामुळें शरण जाण्याला योग्य होऊन आनंदरूपी संपत्तीनें ओतप्रोत भरलेल्या, सुगम व सुप्रसन्न अशा ध्येयरूप चिदाकाशाच्या, अर्थात् परमात्म्याच्या ठिकाणीं तो मनुष्य स्थिर झाला, असें म्हणण्याला मुळींच हरकत नाहीं. जो मनुष्य नेहमीं अध्यात्मविचारांत निमग्न झालेला असतो, ज्याची वृत्ति नित्य अंतर्मुख असते, जो निरंतर आत्मसुखानें तृप्त झालेला असतो, तसेंच ज्याचें चिदात्म्याचें अनुसंधान केव्हांहि खंडित होत नाहीं, असा मनुष्य मनःशोकाच्या बाधेपासून नेहमीं मुक्तच असतो. असा मनुष्य व्यवहार करण्यांत गढून गेलेला असला व बाह्यतः रागद्वेषांच्या कह्यांत गला आहे असें दिसलें, तरी पाण्यांतील कमलाप्रमाणें त्याचें चित्त केव्हांहि कलंकित होत नाहीं. ज्याप्रमाणें एखाद्या सिंहाला त्रास देण्याला हत्ती समर्थ नसतो, त्याप्रमाणें जो मुनि सम्यक्ज्ञानानें संपन्न असून शुद्ध आणि शांत असतो, त्याला मनाकडून बाधा होण्याचा संभवच रहात नाहीं. नंदनवनामध्यें ज्याप्रमाणें एखादा विषारी कांट्यांनीं युक्त असा वृक्ष असणें शक्य नाहीं, त्याप्रमाणें ज्ञानी मनुष्याचें चित्त भोगासक्तीमुळें दीन बनलें जाण्याची शक्यताच

नसतें. कारण, त्याचें चित्त आत्मज्ञानाच्या निरतिशय आनंदामुळें क्षुद्र विषयसुखासंबंधानें निस्पृह झालेलें असतें. एखादा मनुष्य विरक्त असला म्हणजे आपल्या आप्तांच्या जन्ममृत्यूंच्या योगानेंहि तो दुःखी होत नाहीं, तद्वत् विषय, इंद्रियें, शरीर वगैरे रूपांनीं भासमान होणारें हें दृश्य ही केवळ भ्रांति आहे असें ज्ञान ज्याला झालें, अशा ज्ञानी पुरुषाचें चित्त कव्हांहि दुःखित होत नाहीं. ज्याप्रमाणें आकाशाला धुळीचा कधीं स्पर्शहि होत नाहीं, त्याचप्रमाणें ज्याला मनोमोहाचें परिपूर्ण ज्ञान झालेलें आहे, अशा ज्ञानी पुरुषाला व्यवहारांत वागत असतां कर्तृत्वाभिमानापासून उत्पन्न होणाऱ्या पातकाचा स्पर्शसुद्धा होत नाहीं. ज्याप्रमाणें दिवा हेंच अंधकाराचें औषध, त्याप्रमाणें हें विस्तीर्ण जग अविद्यामय आहे हें ज्ञान म्हणजेच अविद्यारूपी रोगावरील रामबाण औषध होय. ज्याप्रमाणें हें स्वप्न आहे असें ज्ञान झालें म्हणजे स्वप्नस्थिति अजिबात नष्ट होते, त्याप्रमाणें अविद्येचें यथास्थित ज्ञान झालें म्हणजे तिचा अवतार तत्काल आणि कायमचाच समाप्त होतो. ज्याची बुद्धि परमात्मस्वरूपामध्यें स्थिर झाल्यामुळें विषयांसंबंधानें अनासक्त झाली, असा ज्ञानी पुरुष मग व्यवहार करीत असला तरी पाण्यामध्यें रहाणाऱ्या माशाच्या डोळ्यांना पाण्याचा स्पर्श होत नाहीं, तद्वत् त्या ज्ञान्याला पातकाचा स्पर्शहि होत नाहीं. चैतन्यरूपी सूर्याचा उदय होतांच अज्ञानरूपी रात्र क्षीण होते व असें झालें म्हणजे ज्ञात्याची बुद्धि परमानंदस्थितीप्रत जाऊन आपल्या संपूर्ण तेजानें विलसूं लागते. ज्या मनुष्याची अज्ञानरूपी निद्रा समाप्त झाली, असा मनुष्य अध्यात्मशास्त्ररूपी सूर्याच्या प्रकाशामुळें जागा होऊन अशा प्रबोधाच्या स्थितीप्रत जाऊन पोहोंचतो कीं, ज्या स्थितीपासून तो पुन्हां केव्हांहि च्युत होत नाहीं. ज्या दिवसामध्यें आणि ज्या क्रियांमध्यें आत्मचंद्राच्या उदयामुळें हृदयरूपी आकाशांत पूर्णात्म्याचें रमणीय चांदणें पडतें, त्याच दिवसांमध्यें मनुष्य खरोखर जगला आणि त्याच्या त्याच क्रिया आनंदयुक्त झाल्या, असें म्हणण्यास हरकत नाहीं. मनुष्य एकदां मोहसागरांतून उत्तीर्ण झाला, म्हणजे आपणामधील अमृताच्या योगानें चंद्रमा शीतल झालेला असतो, तद्वत् निरंतर आत्मविचारणा करीत गेल्यानें त्याचें अंतःकरण अत्यंत शीतल बनतें. ज्यांच्या योगानें मनुष्याची वृत्ति आत्माकार बनत जाते, तेच स्नेही मनुष्याचे खरे मित्र, तींच शास्त्रें मनुष्याची खरीखुरी आत्मोन्नति करणारीं शास्त्रें आणि तेच दिवस खरेखुरे दिवस होत.

परंतु ज्यांच्या ठिकाणचें पातक क्षीण झालेलें नाहीं व जे आत्मज्ञानाची उपेक्षा करतात, असे पुरुष जन्मरूपी जंगलांतील लताप्रमाणें दीन बनून दीर्घकालपर्यंत शोक करीत बसतात. रामा ! हा जीवरूपी बैल शेंकडों आशापाशांच्या जाळ्यामध्यें गुरफटून गेलेला आहे; विषयोपभोगरूपी गवताला चटावलेला आहे; जरेनें त्याचा देह जर्जरित झाला आहे; शोकरूपी दीर्घ उच्छ्वासानें तो कष्टी झाला आहे; जन्मरूपी जंगलामध्यें दिवस कंठीत असून शेंकडों दुःखांच्या प्रचंड ओझ्याखालीं जरीस आला आहे; कुकर्मरूपी चिखलानें माखला गेला आहे; मोहरूपी डबक्यामध्यें पडून राहिला आहे; विषयासक्तिरूपी दंश करणाऱ्या कीटकांनीं त्याच्या शरीरावर ठिकठिकाणीं चावे घेतले आहेत; तृष्णारूपी चामडयाच्या वाद्यांकडून पक्का आंवळला गेला आहे; तो मनोरूपी वाण्याच्या ताब्यांत राहून त्याच्या हुकमतींत वागत आहे; बांधवाच्या बंधनांत अडकून पडल्यामुळें त्याच्या अंगांत हलण्याचेंहि त्राण राहिलेलें नाहीं; स्त्री, पुत्र,

जरा यांच्या त्रासामुळें तो अगदीं टेंकीस आला आहे; तो सदासर्वकाळ शेणखळ्यांत आणि चिखलांत बुडयांवर बुडया मारीत आहे; पुष्कळ मार्ग आक्रमण केल्यामुळें आणि कोठें विसाव्याची जागा न मिळाल्यामुळें तो अगदीं उठवणीस आला आहे; संसाररूपी अरण्यांत बहुतकाळ स्वैर संचार करीत असल्यामुळें तो अतिशय हलख झाला आहे; तो तीव्रतापामुळें संतप्त झाला असून त्याला आजपावेतों शीतल छायेचें स्थान प्राप्त झालेलें नाहीं; तो जरी आकारानें प्रचंड दिसत आहे तरी इंद्रियांच्या छापेंत सांपडल्यामुळें तो अगदीं दीन बनलेला आहे; काम्यकर्मरूपी घंटांच्या ध्वनीमुळें तो भ्रांत झाला आहे व दुष्कृतकर्माबद्दल बेसुमार मार मिळाल्यामुळें तो हताश झाला आहे; अज्ञानरूपी भेसुर अरण्यामध्यें जन्ममरणरूपी गाडयाचें ओझें वहाण्याचें काम नशिबीं आल्यामुळें तो जागजागीं ठेंचाळत असून त्यामुळें त्याचीं गात्रें अगदीं गलित झालीं आहेत; निरंतर अनर्थरूपी चिखलामध्यें डुबलेला असून त्यांतून बाहेर पडण्याचा मार्ग माहीत नसल्यामुळें तो त्यांत लोळत पडलेला आहे व कर्मभाराखालीं वांकून जाऊन तो दीनमुद्रेनें हंबरडा फोडीत आहे. तरी अशा ह्या जीवरूपी बैलाला मोठे शिकस्तीचे आणि दीर्घ प्रयत्न करून संसाररूपी डबक्यांतून बाहेर काढ. आतां अशा रीतीनें जीवाला संसाररूपी डबक्यांतून बाहेर काढल्यानंतर तो पुन्हां त्या चिखलांत पडेल कीं काय? अशी तुझ्या मनांत कदाचित् शंका येईल. परंतु ही शंका व्यर्थ आहे. कारण, तत्त्वावलोकनामुळें क्षीण झालेल्या चित्ताचा पुन्हां उदय होणार नाहीं, तरच जीव हा भवसमुद्राचें उल्लंघन करून निःसंशय पलीकडे जाऊन पोहोंचला, असें म्हणण्यास हरकत नाहीं. ज्याप्रमाणें एखाद्या नाविकापासून नौकेची प्राप्ति होते, त्याप्रमाणें संसारसमुद्राच्या पैलतीराला जाऊन पोहोंचण्याची युक्ति महात्म्यांच्या सहवासापासून प्राप्त होते. **ज्या देशरूपी उखिर भूमीमध्यें तत्त्वज्ञानी पुरुष नसतो आणि जेथील सज्जनरूपी वृक्ष शीतल छाया आणि फळें यांच्या योगानें समृद्ध झालेला नसतो, तेथें शहाण्या मनुष्यानें क्षणभरसुद्धां वास्तव्य करूं नये!** ज्या ठिकाणच्या सुजनरूपी चंपक वृक्षावर स्नेहयुक्त आणि शीतल अशीं वचनरूपी पानें असतात, ज्याच्याखालीं स्वरूपानुभवरूपी उत्तम छाया असते आणि ज्याच्यावर स्मितहास्यरूपी पुष्पें शोभत असतात, अशा वृक्षाखालीं क्षणांत विश्रांति प्राप्त होते. परंतु अशा विश्रांतीच्या अभावीं ज्याच्या ठिकाणीं थोडीशी विवेकशक्ति जागृत झालेली आहे, अशा बुद्धिमान् पुरुषानें महामोह आणि संताप उत्पन्न करणाऱ्या संसारामध्यें खुशाल झोंप घेत बसूं नये. कारण, या जगांत आत्मा हाच आपला खरा बंधु आहे. यास्तव विवेकाचा आश्रय करून अज्ञान स्थितींतून त्याचा उद्धार करावा, व देहाभिमानाच्या अंकित होऊन त्याला जन्मपंकामध्यें ढकलूं नये. बुद्धिमान् मनुष्यानें 'हा संसार काय आहे? तो कसा उत्पन्न झाला? त्याचें मूल काय? व तो कशानें क्षीण होईल?' या प्रश्नांची शास्त्र व सज्जन यांच्या साहाय्यानें विचारणा करावी आणि दृढ प्रयत्नानें सर्व दुःखांचें निर्मूलन करावें. **संसारदुःखामध्यें बुडून गेलेल्या आत्म्याचा उद्धार करण्याच्या बाबतींत धन, मित्र, शास्त्रें आणि बांधव यांचा कांहीं उपयोग होत नाहीं. या जगांत मन हाच प्रत्येकाचा नित्याचा सोबती असून विवेकाच्या योगानें त्याला चांगलें शुद्ध करावें. म्हणजे त्याच्या योगानें आत्म्याचा उद्धार होऊं शकतो.**

सारांश, विवेकापासून उत्पन्न होणारें वैराग्य आणि स्वरूपाभ्यास यांच्या योगानें, तसेंच तत्त्वज्ञानरूपी नौकेचा आश्रय केल्यानें भव-सागर तरून जातां येतो. ज्याच्याबद्दल जनांकडून नेहमीं शोक केला जातो आणि जो दुष्ट आशांच्या योगानें सदोदित जाळला जात असतो, अशा आत्म्याची यत्किंचितहि उपेक्षा न करतां मोठ्या आस्थेनें त्याचा उद्धार करावा. अहंकार हेंच ज्याचें बंधनस्थान आहे, तृष्णा हीच ज्याला बांधून ठेवणारी शृंखला आहे, मन हाच ज्याच्या गंडस्थळांतून गळणारा मद आहे, तसेंच जो जन्म परंपरारूपी चिखलामध्यें बुडून गेलेला आहे, अशा जीवरूपी हत्तीचा उद्धार करावा. राघवा ! आत्मविषयक अज्ञानाचा निरास करून अहंकाराचा अजिबात नायनाट करणें हाच आत्मोद्धाराचा एकच एक उपाय आहे. मनोजालाला झुगारून देऊन देहाभिमानाचा उच्छेद करणें हाच खराखरा सन्मार्ग आक्रमण करण्याचा उपाय होय. देह हा काष्ठ व पाषाण यांच्यासारखा जड आहे, ही गोष्ट मनांत निरंतर वागवीत जाणें हाच देवदेवेश जो परमात्मा त्याच्या ज्ञानाचा उपाय होय. चित्तांतील अहंकाररूपी मेघ गलित झाला, म्हणजे चैतन्यरूपी सूर्याचें दर्शन होतें व त्या ज्ञानाचें पर्यवसान अखेरीस ब्रह्मपदप्राप्तीमध्यें होतें. ज्याप्रमाणें अंधकार नष्ट होतांच सर्वत्र लख्ख दिसूं लागतें, तसेंच अहंकाराचा निरास होतांच स्वयंसिद्ध आत्म्याचा साक्षात्कार होतो. एकदां अहंकार अजिबात क्षीण झाला म्हणजे जी निरतिशयानंदाची स्थिति प्राप्त होते, तिचाच दृढ अभ्यास करून ती आपल्या वृत्तीमध्यें बाणवून घ्यावी. ती स्थिति एखाद्या सागराप्रमाणें परिपूर्णतेची असून ती केव्हांहि इंद्रियगोचर होऊं शकत नाहीं व जगांतील दुसऱ्या कोणत्याहि विषयाशीं तिची तुलना करतां येत नाहीं. ती परमोच्च स्थिति प्राप्त झाली असतां मनुष्याच्या ठिकाणीं कोणत्याही दृश्य विषयासंबंधानें आसक्ति उत्पन्न होण्याची शक्यता उरत नाहीं. चित्प्रकाशरूपी आत्म्याचा अंश आपल्या केवळ स्वरूपाच्या ठिकाणीं स्थिर होऊन तो तुर्यावस्थेप्रत जाऊन पोहोंचला म्हणजे जी स्थिति होते, तिच्याशींच फक्त तिची तुलना[२] करतां येईल. अर्थात् ती स्थिति अनुपमेय आहे. परतु त्या स्थितीच्या जवळ म्हणून जर कोणती स्थिति असेल, तर ती सुषुप्तीची आहे. कारण, तुर्यावस्थेप्रमाणेंच सुषुप्तीमध्येंहि विक्षेपराहित्य असते व या दृष्टीनें तुर्या व सुषुप्ति या दोन्ही अवस्थांमध्यें सादृश्याचा थोडा अंश आहे. परंतु बाकीच्या बाबतींत या दोन्ही अवस्थांमध्यें महदंतर आहे. कारण, तुर्यावस्था ही पूर्णानंदाची स्थिति असून ती गगनश्रीप्रमाणें विस्तीर्ण आहे. मन, अहंकार इत्यादि उपाधींचा विलय झाल्यानंतर सर्व भावांच्या अंतर्यामीं असलेली जी आनंदाची स्थिति उदय पावते, तेंच परमेश्वराचें स्वरूप होय ! योगाभ्यासानें सिद्ध होणारी ती स्थिति सुषुप्तीप्रमाणें असून ती जीवाच्या अज्ञानजन्य भावनेमुळें दूर झाल्यासारखी झाली आहे. परंतु ती श्रेष्ठ स्थिति वर्णन करून समजण्यासारखी नाहीं; तर रामा ! ती स्वसंवेद्य असल्याकारणानें अनुभवानेंच समजण्यासारखी आहे. ज्याप्रमाणें गाईच्या खंडादि जातीचें ज्ञान प्रत्यक्ष अनुभवावांचून होऊं शकत नाहीं, त्याप्रमाणें आत्म्याच्या परमार्थस्वरूपाचें ज्ञान स्वानुभवावांचून होणें शक्य नाहीं. राघवा ! चित्तांतील बाह्य विषयांसंबंधाची आसक्ति काढून तें प्रत्यगात्मस्वरूपामध्यें स्थिर

१. 'ऋतंभरा तत्र प्रज्ञा' पातं. सू. १।४८ या पूर्ण स्थितीलाच 'धर्ममेघ समाधि' हे नांव पुढें ४।२९ मध्यें देण्यांत आलें आहे.

२. 'रामरावणयोर्युद्धं रामरावणयोरिव' याप्रमाणें हें 'अनन्वय' अलंकाराचें उदाहरण आहे.

झालें, म्हणजे आपणच सर्व चराचराचा आत्मा आहों व सर्व देवांचेहि देव आहों, तसेंच आपलें अनंत आत्मतत्त्वच हें अखिल विश्व आहे, असा मनुष्याला अनुभव येतो; व तदनंतर सर्व विषयवासनांचा नाश होतो, आत्म्याचा प्रकाश स्फुट होतो व पूर्ण समता अंगीं बाणून ब्रह्मानुभवाची सिद्धि होते. सारांश त्या परमोच्चज्ञानस्थितीचें महत्त्व ब्रह्मदेवादिकांनाहि अचिंत्य असतें.

## सर्ग ६५

—:*:—

१. भास आणि विलास यांचें आख्यान. २. सह्याद्रीवरील अत्रीच्या आश्रमाचें वर्णन ३. भास आणि विलास यांचा जन्म व पितृनिधनजन्य शोक.

श्रीवसिष्ठः—कमललोचना रामा! मनानेंच मनाचा छेद करून आणि अहंममत्वाच्या भावनेचा निरास करून आत्मदर्शन करून घेण्याचा मनुष्यानें प्रयत्न केला नाहीं, तर चित्रांतील सूर्य कधीं अस्तंगत होत नाहीं. त्याप्रमाणें जगद्रूपी दुःख नाहीसें होत नाहीं; इतकेंच नव्हे, तर महासागराप्रमाणें विस्तीर्ण अशा अनंत आपत्ती त्याच्यावर येऊन कोसळतात, व मेघ आणि नीलवर्ण अंधकार यांच्यायोगानें काळाकुट्ट दिसणारा आणि मेघजलाचा बेसुमार वर्षाव करून व्याकुल करणारा असा संसाररूपी वर्षाकाल पुनःपुन्हां उत्पन्न होतो. हा सिद्धांत स्पष्ट करून दाखविण्यासाठीं सह्याद्रीवर भास आणि विलास ह्या नांवाच्या दोन मित्रांचा पूर्वी झालेला संवाद मी तुला आतां सांगत आहें, तरी सावधानचित्तानें श्रवण कर.

सह्य नांवाचा ह्या भूतलावर एक पर्वत आहे. त्यानें आपल्या उंचीनें आकाशाला जिंकलें आहे, पायथ्याजवळच्या सपाट आणि विस्तीर्ण भूभागानें भूतलाला मागें टाकलें आहे व भूगर्भामध्यें प्रविष्ट झालेल्या मूलभागानें पाताळालाहि खालीं पहावयास लावलें आहे. त्या पर्वतावरील प्रत्येक भाग असंख्य पुष्पांच्या समूहामुळें ओतप्रोत भरलेला आहे, त्याच्यावर ठिकठिकाणीं निर्मल जलाचे निर्झर म्हणजे ओढे वहात आहेत व त्यामधील असंख्य रत्नांच्या खजिन्याचें रक्षण करण्याचें काम कुबेर करीत असतो. त्या पर्वताचें नांव जरी सह्य आहे, तरी त्यामधील अनंत रत्नांची दीप्ति त्याच्याकडे पहाणाराच्या नेत्रांना दिपवून टाकीत असल्यामुळें तो पर्वत असह्य आहे, असेंच म्हणावें लागतें. ज्याप्रमाणें देवांचे हत्ती आपल्या विस्तीर्ण गंडस्थळांच्या योगानें भयकर दिसतात, त्याचप्रमाणें तो पर्वत मोत्यांच्या समूहांनीं भरलेल्या, आणि रत्नें, सूर्य यांच्या तेजामुळें चकाकणाऱ्या, प्रचंड कड्यांनीं युक्त असलेल्या सुवर्णतटांच्या योगानें अतिशय भयंकर दिसतो. त्या पर्वतावर क्वचित् पुष्पांचा खच पडलेला दिसतो, क्वचित् निरनिराळ्या तऱ्हेच्या धातूंनीं तो युक्त दिसतो, क्वचित् प्रसन्न सरोवरांनीं युक्त दिसतो, तर क्वचित् रत्नांनीं भरलेल्या शिलांनीं युक्त दिसतो. त्याच्यावर कांहीं ठिकाणीं खळखळ आवाज करणारे ओढे दिसतात, कांहीं ठिकाणीं वायूच्या प्रवाहामुळें गंभीर ध्वनि उत्पन्न करणारीं वेळूचीं बेटें दृष्टोत्पत्तीस येतात. कित्येक ठिकाणीं वाऱ्याच्या सोसाट्यामुळें सों सों आवाज करणाऱ्या गुहा नजरेस पडतात, तर कित्येक ठिकाणीं गुं गुं आवाज करणाऱ्या भ्रमरांचे थवेच्या थवे आढळून येतात. त्या पर्वताच्या पठारावर अप्सरागण गायन करतात, अरण्यामध्यें पशुपक्ष्यांचे आवाज चाललेले असतात, उंच भागांवर जणुं उन्मत्त झालेले मेघ गर्जना करीत असतात व वरील आकाशामध्यें अनेकविध पक्ष्यांचे किलबिल शब्द चाललेले असतात, त्या पर्वतावरील गुहांमधून विद्याधरांचे समुदाय

रहातात, कमलसमूहामध्यें भ्रमरांचें गायन चालू असतें, आसपासच्या प्रदेशांतून किरातांचें गायन चाललेलें असतें व अरण्यांतील वृक्षांवरून पक्ष्यांचे मंजुळ ध्वनी सुरु असतात. त्याच्या खांद्याचा भाग देवांनीं, पायाचा भाग मनुष्यांनीं आणि पातालांतील भाग नागांनीं वेष्टिलेला असल्यामुळें तो पर्वत म्हणजे दुसरें त्रिभुवनच आहे कीं काय असें वाटे. त्या पर्वताच्या खिंडारांमधून सिद्ध रहात असून त्यांमधूनच पुरलेलं धन होतें; तसेंच चंदनवृक्षांवरून सर्प रहात होते व त्याच्या शिखरांवरून सिंहांनीं वास्तव्य केलें होतें. त्या पर्वतावर सर्वत्र पुष्पांचा खच पडलेला असून त्या जणुं मेघांनीं तो वेष्टिलेला दिसत होता, वृक्षांवरून नुकत्याच गळलेल्या फुलांतील रजःकण आकाशांत उडून जणुं मेघाप्रमाणें दिसत होते, वृक्षांवरून गळणाऱ्या फुलांचे वावटळी मेघ बनून त्या पर्वताचें हृदय हालवून सोडीत होते व वृक्षावरील पुष्परूपी मेघांमुळें तो पर्वत पांढुरका दिसत होता. निरनिराळ्या धातूंच्या धूलिरूपी अभ्रांमुळें तो पर्वत कपिल वर्णाचा दिसत होता. त्या पर्वतावरील रत्नांनीं युक्त असलेल्या शिलातलांवरून अप्सरागण बसलेला असे व तो देखावा पाहून त्या अप्सरा कल्पवृक्षांवरच जणूं आरूढ झाल्या आहेत, असा भास होई. त्या पर्वतावरील मेघरूपी नील वस्त्रें परिधान केलेल्या, रत्नांचे निःशब्द अलंकार धारण करणाऱ्या आणि सुवर्णाप्रमाणें रमणीय कांतीनें युक्त असलेल्या पाषाणाच्या शिलांना तेथील शिखरांनीं आलिंगन दिलेलें असल्यामुळें त्या शिला नसून अभिसारिकाच आहेत कीं काय, असाहि क्षणभर भास पडे. त्या पर्वताच्या उत्तरतटावर एक मोठें शिखर होतें. त्यावरील वृक्ष फलभारामुळें अगदीं वांकून गेले होते, रत्नांच्या पुष्करिणींतून सुंदर निर्झरोदक वहात होते, आम्रवृक्षांच्या शाखांवरून पसरलेले पुष्पगुच्छ हे त्या शिखरांच्या दंतपंक्तीप्रमाणें शोभायमान होत होते, प्रफुल्लित झालेले अंकोल, पुन्नाग वगैरे वृक्ष व नील कमलें यांच्यायोगानें तेथील दिशांचे तट रमणीय दिसत होते, तेथील लतामंडपाच्या योगानें सूर्यसुद्धां झांकला जात असे व तेथील रत्नांच्या किरणांचें जिकडे तिकडे विलक्षण तेज फांकलेलें असे. अशा त्या स्वर्गलोकाप्रमाणें आल्हादजनक आणि जंबूरसानें ओतप्रोत भरलेल्या शिखरावर ब्रह्मलोकाप्रमाणें भव्य, स्वर्गाप्रमाणें मोहक आणि शिवलोकाप्रमाणें शांत, तसेंच सिद्धांच्याहि श्रमाचा परिहार करण्यास समर्थ असलेला असा अत्रि ऋषीचा एक विस्तीर्ण आणि सुखसमृद्धीनें ओतप्रोत भरलेला आश्रम असून त्या आश्रमामध्यें अंतरिक्षांतील शुक्र व बृहस्पति यांच्याप्रमाणें तेजस्वी आणि विद्वान् असे दोन तापसी रहात होते. पुढें त्या आश्रमामध्यें रहात असतां सरोवरांतील दोन कमलांपासून दोन कमलांचे कळे निघावे, तद्वत् त्यांना शुद्ध शरीरांनीं संपन्न असे दोन पुत्र झाले. विलास आणि भास हीं त्यांचीं नांवें होतीं. पुढें क्रमाक्रमानें लता आणि वृक्ष यांजवरील पल्लवांप्रमाणें ते दोघे मुलगे लहानाचे मोठे झाले. ते दोघेजण एकत्र वाढल्यामुळें एकमेकांवर अतिशय प्रेम करूं लागले व पुढें पुढें तर त्यांचा स्नेह वर्द्धिंगत होऊन तिळ आणि त्यांतील तेल किंवा पुष्प आणि त्यांतील सुगंध यांच्याप्रमाणें त्यांच्या प्रेमाचें एकीकरण झालें. त्या दोघांचा कधीं वियोग झाला नाहीं. ज्याप्रमाणें विवाहानें बद्ध झालेल्या पतिपत्नींचें परस्परांवरील प्रेम दुणावतें, त्याप्रमाणें त्यांचें प्रेम एकसारखें वाढत गेलें. निरंतर साहचर्यामुळें त्यांच्या विचारांमध्यें इतकें विलक्षण साम्य दिसून येऊं लागलें कीं, त्यांचीं मनें

बाह्यतः भिन्न असलीं तरी तीं एकच आहेत कीं काय, असेंच कोणालाहि वाटल्याशिवाय रहात नसे. ज्याप्रमाणें एखाद्या कमलाच्या गाभ्यामध्यें दोघां भ्रमरांनीं रहावें, त्याप्रमाणें मनोहर शरीरांनीं संपन्न असलेले आणि एकमेकांवर प्रेम करणारे ते दोघे बालमुनी त्या शांत आश्रमामध्यें रहात होते. पुढें थोडक्याच काळानंतर. त्या रमणीय बालकांनीं नुकत्याच उगवलेल्या चंद्रसूर्याप्रमाणें आपली बाल्यदशा संपवून यौवनदशेमध्ये प्रवेश केला. त्यानंतर कांहीं दिवस लोटतात न लोटतात तो पक्ष्यांनीं आपल्या घरटयांतून उड्डाण करून आकाशांत स्वैर संचार करावा, तद्वत् वार्धक्यांतील दुःखानें पीडित झालेल्या त्यांच्या मातापित्यांनीं आपल्या क्षुद्र देहांचा त्याग करून स्वर्गलोकांत प्रवेश केला. आपलीं मातापितरें निधन पावलीं आहेत असें पहातांच जलांतून बाहेर काढलेलीं कमलें सूर्याच्या प्रखर किरणांमुळे सतप्त आणि म्लान होतात, त्याप्रमाणें मातृपितृशोकामुळें त्याचीं अंगे तप्त झालीं आणि त्यांचीं मुखें उत्साहहीन आणि दीन होऊन गेलीं. तदनंतर त्यांनी आपल्या मातापित्यांची और्ध्वदैहिक क्रिया केली व नंतर त्या दोघांनीं रडून रडून आकांत केला. कारण, हे मानद रामा! **महात्मे झाले तरी त्यांना सुद्धां लोकस्थितीचें, अर्थात् नियतीचें उल्लंघन करतां येत नाहीं.** असो. अशा रीतीनें मातापित्यांची मरणोत्तर क्रिया केल्यानंतर शोकसागरांत बुडून गेलेले आणि करुण स्वराने दीर्घ विलाप करणारे ते दोघे मुनिपुत्र चित्रांतील मूर्तीप्रमाणें यत्किंचितहि हालचाल करीतनासे होऊन अखेरीस मूर्छित होऊन पडले!

---

# सर्ग ६६

—:०:—

१, अज्ञ मनुष्याला या संसाररूपी दुःखसागरामध्ये एकसारखे हेलकावे खावे लागतात.

**श्रीवसिष्ठ**:---राघवा! अशा रीतीनें अतिशोकामध्यें निमग्न झालेल्या त्या दोघां तरुण मुनींनीं त्या ठिकाणीं उग्र तपश्चर्या करण्याला सुरवात केली; व त्या दीर्घतपाच्या योगानें ग्रीष्मऋतूंतील प्रखर तापामुळें ज्यांचीं सर्वांगे शुष्क झालीं आहेत, अशा अरण्यातील दोन वृक्षांप्रमाणें त्यांची स्थिति झाली. ज्याप्रमाणें कळपांतून बाहेर पडलेले हरिण वाटेल तिकडे भटकूं लागतात, त्याप्रमाणें मातृपितृवियोगामुळें उदासीन आणि संसारासंबंधानें विरक्त बनलेल्या त्या तपस्व्यांनीं त्या अरण्यांत पुष्कळ काळ कंठला. अशा रीतीनें कित्येक दिवस महिने, किंबहुना वर्षें लोटलीं व एखाद्या खळग्यात वाढणाऱ्या वृक्षाप्रमाणें त्या अरण्यामध्यें रहात असतां त्यांच्यावर जरेची छाया दिसूं लागली. परंतु इतक्या दीर्घकाल केलेल्या तपश्चर्येमुळें त्यांना विमल ज्ञानाची प्राप्ति झाली नाहीं. पुढें एके वेळीं ते दोघेजण एकत्र जमले असतां त्यांनीं आपसांत येणेंप्रमाणें भाषण करण्यास सुरवात केली.

**विलासः**---मित्रा भासा! त्या जगांतील माझ्या जीवितरूपी वृक्षाचें तूं श्रेष्ठ फल असून तुझें हृदय हें अमृतसमुद्राचें निवासस्थान आहे. यास्तव मी तुझें अंतःकरणपूर्वक स्वागत करतों. तुझा माझा वियोग झाल्याला आज किती तरी दिवस होऊन गेले. हे दिवस तूं कोठें घालविलेस? हे साधो! तुझी तपश्चर्या फलद्रूप झाली आहेना? तुझी बुद्धि आतां शोकरहित आणि संतापरहित झाली आहे ना? तुला एवढ्या अवधींत आत्मज्ञानाची

प्राप्ति झाली आहेना? तुझी विद्या सफल झाली आहेना? व तुझें कुशल आहेना?

श्रीवसिष्ठः----रामा! येणेंप्रमाणें संसाराविषयीं अत्यंत उद्विग्न झालेल्या, परंतु आत्मज्ञानाची प्राप्ति न झालेल्या मित्राचें भाषण ऐकून त्याचा मित्र भास मोठ्या आदरानें बोलूं लागला.

भासः----मित्रा! आज तुझें दर्शन झाल्यामुळें मला हर्ष झाला आहे. आतां तूं माझें कुशल विचारलेंस, पण संसारामध्यें निमग्न झालेले जे आम्हीं त्यांचें कुशल कसलें आलें आहे? जेथपर्यंत मला ज्ञेय वस्तूची प्राप्ति झाली नाहीं व चित्तांतील कामसंकल्पादिकांचा अजिबात क्षय होऊन मी संसारसागर तरून गेलों नाहीं, तेथपर्यंत माझें कुशल कसें असणार? कातरीनें लता छाटाव्या, त्याप्रमाणें चित्तांत उदित होणाऱ्या आशांचा जापर्यंत समूळ उच्छेद करण्यांत आला नाहीं, तोंपर्यंत आमचें कुशल असण्याची गोष्टसुद्धां बोलावयास नको! जोंपर्यंत 'त्वं' पदार्थाचें शोधन करून आत्म्याची ओळख पटली नाहीं, जोंपर्यंत चित्तामध्यें ब्रह्मज्ञानजन्य समतेचा उदय झाला नाहीं व महावाक्यांचा पूर्ण बोध झाला नाहीं, तोंपर्यंत आमचें कुशल असणें शक्य तरी आहे का? बा साधो! अज्ञानरूपी रोगावरील रामबाण औषध असें जें आत्मज्ञान त्याची जेथपर्यंत प्राप्ति झाली नाहीं, तेथपर्यंत ही संसृतिरूपी दुःखजनक महामारी पुनःपुन्हां उदय पावल्याशिवाय रहात नाहीं. जोंपर्यंत आत्मलाभ झालेला नाहीं, तोंपर्यंत संसाररूपी कुवृक्ष पुनःपुन्हां वाढीस लागून त्यावर बाल्यरूपी अंकुर, नवयौवनरूपी पल्लव आणि जरारूपी पुष्पें उत्पन्न झाल्याशिवाय कधींहि रहाणार नाहींत. तसेंच ह्या शरीररूपी जुनाट वृक्षावर, ज्यामध्यें बांधवरूपी भ्रमरांचा आक्रोशरूपी गुंजारव चाललेला आहे आणि ज्यावर वार्धक्यरूपी पुष्पें विकसित झालेलीं आहेत, अशी मरणरूपी मंजरी पुनःपुन्हां उत्पन्न झाल्याशिवाय रहाणें शक्य नाहीं. मरणोत्तर जीवाला वृक्षपाषाणादि स्थावर किंवा पशुपक्ष्यादि तिर्यक् योनींमध्यें जन्म घ्यावा लागला, म्हणजे त्याला आपल्या पूर्व दुष्कर्मानुसार निरनिराळ्या ऋतूंमध्यें शीतोष्णादि दुःखें किंवा मशकादि कीटक यांच्यापासून त्रास भोगावा लागतो. बरें, पुण्यकर्मानुसार स्वर्गादि लोकांची प्राप्ति झाली, तर असूयादि विकारांनीं युक्त असे तेच तेच भोग पुनःपुन्हां भोगून कंटाळा येतो. पुढें सुदैवानें मनुष्यजन्म प्राप्त झाला, तरी देहरूपी पर्वताच्या तृष्णारूपी कांटवांनीं व विषयभोगरूपी सर्पांनीं युक्त असलेल्या भयंकर दरीमध्यें पुनःपुन्हां लोळण्याचा आणि बाह्यतः सुखाचा आभास उत्पन्न होऊन मोठीं दुःखें भोगण्याचा पुनःपुन्हां दुर्धर प्रसंग ओढवतो. सारांश, अशा रीतीनें दुष्ट आशांच्या कचाटींत सांपडून तुच्छ कर्मांचीं मिथ्या फलें भोगण्यांत गढून गेलेल्या प्राण्यांच्या आयुष्याचा व्यर्थ नाश मात्र होत असतो. मनोरूपी उन्मत्त हत्ती विवेकरूपी बंधनस्तंभ उपटून टाकून बाहेर पडला, म्हणजे तृष्णारूपी हत्तिणीच्या मागें अहोरात्र स्वैर संचार करूं लागतो. ज्यावरील विवेकरूपी चिंतामणि नष्ट झालेला आहे, अशा देहरूपी वृक्षावरील हृदयरूपी घरट्यामध्यें रहाणारें मिष्टान्नसेवनाला चटावलेलें अभिलाषरूपी वृद्ध गिधाड एकसारखें वृद्धिंगत होत जातें. श्रम, दौर्बल्य, रोग वगैरेंच्या योगानें दिवसेंदिवस शरीराचीं गात्रें शिथिल होत जाऊन देहयष्टि झाडाच्या पिकलेल्या पानांप्रमाणें शुष्क आणि पांढुरकी होऊं लागते, म्हातारपणीं मुलगे नोकर इत्यादिकांच्या अपमानरूपी धुळीमुळें शरीर काळें

ठिकर होतें, शरीरावरील तेज अस्तंगत होतें व दंवाचे थेंब पडून एखादें कमल निस्तेज व्हावें, तद्वत् मनुष्याची मुखकांति मलिन होते. शरीररूपी सरोवरांतील यौवनरूपी जल गळून जाऊन तें शुष्क झाल्याकारणानें आयुष्यरूपी राजहंस क्षणांत कोठें पळून जातो, त्याचा पत्तासुद्धां लागत नाहीं! जीवितरूपी जर्जर वृक्ष कालरूपी प्रचंड वायूनें हलविला गेल्यामुळें त्यावरील दिवसरूपी पानें आणि भोगरूपी फुलें खालीं गळून पडतात. जरें मनुष्य भोगांपासून निवृत्त होण्याचा प्रयत्न करूं लागला, तरी त्याचें मन भोगाशारूपी सर्प व त्यांपासून उत्पन्न होणारीं दुःखें हेच कोणी बेडूक यांनीं युक्त असलेल्या मोहरूपी अंधकूपाच्या चिखलामध्यें बुडून जातें. तृष्णा ही जरी अत्यंत चंचल आणि नाजूक आहे, तरी ती एखाद्या मंदिराच्या उच्च शिखरावर फडकणाऱ्या पताकेप्रमाणें निरनिराळ्या विषयांवर आरूढ होते. सर्वव्यापी काल हेंच ज्याचें बीळ आहे, अशा तऱ्हेचा मृत्युरूपी उंदीर ह्या संसाररूपी वीण्यावरील जीविताशारूपी तंतू कुरतडून टाकतो. जिच्यामध्यें तारुण्यांतील विकाररूपी लाटांचे कल्लोळ उसळत आहेत आणि परजलेल्या तरवारीप्रमाणें जिच्यामध्यें क्रोधद्वेषादिकांचा फेंस उडत आहे, अशी जीवितरूपी भयंकर नदी लोभतृष्णादिकांचे मोठमोठे भोंवरे उत्पन्न करीत अखंड वहात असते. तसेंच जगाच्या व्यवहारामध्यें उपयोगी पडणाऱ्या निरनिराळ्या शास्त्रांतील कौशल्यानें युक्त असणारी क्रियाप्रवृत्तिरूपी सरिता जन्मोजन्मीं अस्खलित गतीनें वहात असते. ह्या जगांतील बांधवजनतादि नद्या अत्यंत विस्तीर्ण आणि गहन अशा कालस्वरूपी सागरांत जाऊन गडप होतात. बाळ! ही देहरूपी परमपुरुषार्थ प्राप्त करून देणारी रत्नशलाका नाशरूपी चिखलाच्या समुद्रामध्यें जन्मोजन्मीं कोठल्या कोठें बुडून जाते, याचा पत्तासुद्धां लागत नाहीं! ज्याप्रमाणें समुद्रांतील भोंवऱ्यांमध्यें पडलेलें गवत गिरक्या खात असतें, त्याचप्रमाणें कुकर्मांमध्यें रत झालेलें चित्त चितारूपी चक्रामध्यें गुरफटलें जाऊन एकसारखें भ्रमण करीत रहातें. अनंतकार्यरूपी प्रचंड लाटांवर हेलकावे खाणारें चित्त चिंतेमुळें जर्जर होतें व त्याला एका क्षणाचीहि विश्रांति मिळत नाहीं. 'मीं काल हें केलें,' 'आज हें करतों' आणि 'उद्यां हें करीन' अशा आशयाच्या कल्पनाजालांत गुरफटून गेलेली बुद्धिरूपी पक्षीण मोह पावते. 'हा माझा शत्रु' आणि 'हा माझा मित्र' इत्यादि द्वंद्वयुद्धरूपी महाबलाढ्य हत्ती माझीं मर्मस्थानें क्षुद्र नीलकमलांप्रमाणें उपटून टाकतो. चितारूपी नदीच्या लाटांच्या कल्लोळांमध्येंच वास करणारा मनोरूपी चंचल मासा क्षणांत वृद्धि पावतो. साराश, अशा रीतीनें देहात्मबुद्धीमुळें उत्पन्न झालेल्या दुःखांच्या विचारांत चूर होऊन गेलेली ही जनता पराकाष्ठेची दीन झाली आहे; व अनेकविध सुखदुःखांत पडलेली आणि जगद्रूपी उदयगिरीवर जरामरणरूपी प्रचंड वायूच्या आघातांनीं पीडित झालेली ही जनता रसहीन झालेल्या वृक्षावरील पर्णांप्रमाणें जर्जर झाली आहे.

---

## सर्ग ६७

—:०:—

१. बंध आसक्तीमुळें उत्पन्न होतो. अर्थात् आसक्तीचा त्याग हाच मोक्षाचा उपाय.

श्रीवसिष्ठः—राघवा! अशा रीतीनें संसाराच्या असारतेसंबंधानें त्या दोघांनीं पुष्कळ चर्चा केली. पुढें कालांतरानें त्यांना विमलज्ञानाची प्राप्ति होऊन अखेरीस ते दोघेजण मुक्त

झालें. म्हणून म्हणतों कीं, हे महाबाहो ! संसारपाशांत अडकून गेलेल्या चित्ताला संसारांतून तरून जाण्याला ज्ञानावांचून दुसरी गति नाहीं. या संसारांतील दुःख जरी अनंत आहे, तरी विवेकी मनुष्याला त्याचा लीलेनें उच्छेद करतां येतो. सागराचें उल्लंघन करण्याचें काम एखाद्या सामान्य पक्ष्याला अशक्य असलें, तरी गरुडाला त्याची मुळींच पर्वा वाटत नाहीं. जे महात्मे स्थूलसूक्ष्म देहांच्या अतीत होऊन चिन्मात्र आत्म्यामध्यें स्थित झालेले असतात, ते जनतेकडे दुरून अवलोकन करणा या एखाद्या प्रेक्षकाप्रमाणें देहाचें साक्षित्व करतात, अर्थात्, देह हा असह्य दुःखानें जर्जर झाला, तरी तेवढ्यानें आमचें काय बिघडलें ? रथाचें जोखड मोडलें किंवा रथ अजिबात भंग पावला, तरी यामुळें सारथ्याचें काय बिनसलें ? मन क्षुब्ध झालें तरी त्यामुळें चिदात्म्यामध्यें काय फरक झाला ? समुद्रामध्यें लाटांचें कितीहि पाणी आलें तरी त्यामुळें समुद्राच्या स्वरूपांत फरक तो काय पडणार ? जलाचें हंस कोण ? पाण्याचे पाषाण कोण ? पाषाण व काष्ठ यांचा संबंध काय? अर्थात् कांहींच नाहीं, असें म्हणतात. त्याचप्रमाणें भोग आणि परमात्मस्वरूप यांचा अर्थाअर्थी कांहींच संबंध नाहीं. समुद्र हा जरी पर्वतांनीं वेष्टिलेला असतो तरी समुद्र व पर्वत यांचा कांहीं संबंध नसतो, त्याप्रमाणें चित्तत्त्व परमात्मा आणि संसार यांचा यत्किंचित्हि संबंध नसतो. नदीचें पाणी जरी कमलांना आपल्या मांडीवर घेऊन खेळवितें, तरी त्या पाण्याचा व कमलांचा वस्तुतः कांहींच संबंध नसतो, तद्वत् आत्मा जरी अनेक शरीरांना धारण करतो, तरी त्याचा व शरीरांचा तत्त्वतः मुळींच संबंध नसतो. ज्याप्रमाणें लांकडावर पाण्याचे एकसारखे आघात होऊं लागले म्हणजे पाण्याचे तुषार आकाशांत उंच उडूं लागतात, त्याप्रमाणें आत्मा आणि देह यांचा अन्योन्य तादात्म्याध्यास झाला, म्हणजे सुखदुःखादि चित्तवृत्ती उदित होत असतात. पाणी आणि लांकूड यांचा संबंध होतांच लांकडाचीं प्रतिबिंबें पाण्यांत दिसूं लागतात, तद्वत् आत्म्यामध्यें शरीरांचीं प्रतिबिंबें भासमान होतात. त्याप्रमाणें आरसा किंवा पाण्याच्या लाटा यांच्यामध्यें पडलेलीं प्रतिबिंबें वस्तुतः सत्य नसताहि सत्य भासतात, त्याचप्रमाणें आत्म्यामध्यें नानाविध शरीरें भासमान होतात. परंतु काष्ठ, जल किंवा पाषाण हीं फुटलीं तरी त्यामुळें कोणालाहि दुःख म्हणून होत नाहीं, तद्वत् पंचमहाभूतांच्या संयोगवियोगामुळें आत्म्याला सुखदुःखादि विकार होत नाहींत. पाण्यावर काष्ठ हापटतांच कंप, शब्द वगैरे उत्पन्न होतात, तद्वत् आत्म्याच्या संनिधिमात्रानें देहापासून विकारांची उत्पत्ति होते. परंतु हे विकारसुद्धां शुद्ध चैतन्याला किंवा जड देहाला नाहींत, तर अज्ञानालाच आहेत व हें अज्ञान ज्यांच्या ठिकाणीं नष्ट झालेलें आहे, अशा आम्हांला हे विकार नसून सर्वत्र नित्यच अनुभूत होतें. ज्याप्रमाणें काष्ठ आणि जल यांच्या संयोगापासून कोणालाहि सुखदुःखांचे अनुभव येत नाहींत, त्याप्रमाणे देह आणि देही यांच्या संगामुळें कोणालाहि सुखदुःखें होत नाहींत. ज्याप्रमाणें हा संसार अज्ञ मनुष्याला दिसतो आणि त्याला सत्य वाटतो, त्याप्रमाणें तो ज्ञानी मनुष्याला कालत्रयीं दिसत नाहीं आणि सत्यहि भासत नाहीं. पाषाण आणि जल यांचा संबंध झाला, तरी त्यामुळें त्यांच्यामध्यें कधीं आसक्ति उत्पन्न होत नाहीं, तद्वत प्रारब्धानुसार सुखदुःखांचे भोग होऊनहि ज्ञान्याची मनोवृत्ति नेहमीं अनासक्त असते. जल व काष्ठ यांच्यामध्यें आसक्ति उत्पन्न न होतां जसा त्यांचा संबंध होतो, तसाच ज्ञान्याच्या ठिकाणीं देह

व देही यांचा आसक्तिरहित संबंध असतो. काष्ठ व जल यांचें तादात्म्य न होतां जो संबंध असतो, तोच देह व देही यांचा संबंध असतो. काष्ठाचें जलांतील प्रतिबिंब व जल यांचा वस्तुतः संबंध नसतो, त्याचप्रमाणें आत्म्याचें प्रतिबिंब आणि देह यांचाहि अर्थाअर्थी संबंध नाहीं. सारांश सर्वत्र शुद्ध, विषयविवर्जित आणि द्वैतशून्य अशी एकच संवित् आहे, तद्व्यतिरिक्त दुसरी कोणतीहि संवित् नाहीं. ही संवित् तत्त्वतः दुःखरहित असतांहि मनांतील वेताळाच्या कल्पनेप्रमाणें स्वतःच्याच भावनेमुळें दुःखरूप बनते. अर्थात्, हा सर्व अज्ञानभ्रांतीचा प्रकार आहे. स्वप्नांतील स्त्री वस्तुतः मिथ्या असली तरी दृढ भावनेमुळें तिच्याशीं होणारा सुरतप्रसंग सत्य भासावा, किंवा एखाद्या ठिकाणीं असणारा पाषाण वेताळ आहे असा भास व्हावा, तद्वत् देह आणि देही यांचा तत्त्वतः कांहीं संबंध नसतांहि तो भासमान होतो. जल आणि काष्ठ यांचा संबंध मिथ्या असतांहि सत्य भासतो, तद्वत् शरीर आणि परमात्मा यांचा मुळींच संबंध नसतांहि तो सत्य भासतो, ज्याप्रमाणें अंतःसंगाच्या अभावीं पाण्यावर लांकडाचा आघात झाला तरी त्यापासून पाण्याला पीडा होत नाहीं, त्याप्रमाणें तत्त्वतः देहाध्यासरहित असल्यामुळें आत्म्याला देहदुःखांपासून यत्किंचित्हि त्रास होत नाहीं. देहात्मभावनेमुळेंच आत्मा देहदुःखाच्या अधीन होतो. अर्थात्, देहभावनेच्या त्यागामुळें तो देहदुःखांतून मुक्त होतो, असा ज्ञात्यांचा सिद्धान्त आहे. ज्याप्रमाणें एखाद्या डबक्यांतील पाणी, झाडांचीं पानें, पाण्यांतील मळ, काष्ठें एकमेकांना चिकटलेलीं असलीं, तरी अंतःसंगरहित असल्यामुळें तीं दुःखी होत नाहींत, त्याचप्रमाणें देह, इंद्रियें, मन इत्यादि परस्परांशीं संलग्न असलीं तरी आसक्तिरहित असल्यामुळें तीं कधींहि दुःखीकष्टी होत नाहींत. रामा! संसारामध्यें प्राण्यांच्या ठिकाणीं जी आसक्ति असते तेच जरा, मरण, मोह इत्यादि वृक्षांच्या वाढीचें बीज होय. अर्थात्, अंतःसंगयुक्त प्राणी संसारसागरांत बुडून जातो, परंतु अंतःसंगरहित प्राणी संसारसागराचें उल्लंघन करतो. जें चित्त आसक्तियुक्त असतें त्याच्या शाखा एकसारख्या वाढत जातात; परंतु जें चित्त अनासक्त असतें तें क्षीण झालेलें आहे, असें ज्ञाते पुरुष म्हणतात. जें मन विषयासक्त अतएव अशुद्ध असतें, तें भग्न झालेल्या स्फटिकाप्रमाणें अपूज्य असतें, हें लक्षांत ठेव. परंतु माझें मन अनासक्त असल्यामुळें तें चिरा न गेलेल्या स्फटिकाप्रमाणें आहे. अनासक्त आणि निर्मल असलेलें चित्त संसार करीत असलें तरी मुक्तच असतें. परंतु जें चित्त याच्या उलट असतें, तें दीर्घ तपानें युक्त असलें तरी संसारांत बद्धच आहे, असें म्हणण्याला मुळींच हरकत नाहीं. अंतःसक्त मन बद्ध होय व अंतःसंगवर्जित मन मुक्त होय. कारण, अंतःसंग हाच जीवांच्या बंधमोक्षांना कारणीभूत होतो. ज्याप्रमाणें एखादी काष्ठें वाहून नेणारी पाण्यांतील नौका स्वतः लांकडाची असली तरी आंतील काष्ठें फोडलीं जाणें, जाळलीं जाणें, तसेंच ज्या पाण्यांतून ती जात असते त्याचें हालणें, त्यांतील पाण्याची निर्मलता किंवा अशुद्धता वगैरे गुणदोषांनीं ती बद्ध होत नाहीं, तद्वत् ज्ञानी हा मनानें अनासक्त असल्यामुळें देहप्रारब्धानुसार क्रिया करीत असला, तरी तो कर्तृत्वभावनेनें लिप्त होत नाहीं. परंतु अज्ञानी मनुष्याची स्थिति याच्या अगदीं उलट असते. सुखदुःखांनीं युक्त असलेल्या स्वप्नामध्यें ज्याप्रमाणें व्याघ्रादिकांचें भय उत्पन्न होऊन

आपण पळत आहों व भीतीनें व्याकुल झालों आहों असा मनुष्याला भास होतो, त्याप्रमाणें चित्त विषयासक्त असल्यामुळें प्राणी वस्तुतः कांहीं करीत नसताहि मी कर्मकर्ता आहें, हा भ्रम त्याच्या ठिकाणीं कायमच असतो. स्वप्नादि अवस्थांमध्यें मन क्षुब्ध होऊन मनुष्याला सुखदुःखदशा प्राप्त होतात, तद्वत् मनुष्याचा देह जरी चेष्टाशून्य असला तरी जर त्याच्या चित्तामध्यें कर्तृत्वभावना असेल तर तो कर्मकर्ताच ठरतो. अर्थात्, त्याला कर्तृत्वभावनाजन्य भोक्तृत्व भोगावें लागणें अपरिहार्य आहे. मनुष्याच्या मनामध्यें अकर्तृत्वभावना असेल, तर ती त्याच्या आचरणांत व्यक्त झाल्याशिवाय कधींहि राहणार नाहीं. कारण ज्याचें चित्त शून्य—कर्तृत्वभावनारहित झालेलें आहे, असा मनुष्य जरी क्रिया करीत असला तरी त्या क्रियांचा अभिमान धारण करीत नाहीं. जें चित्तानें केलें तेंच मनुष्यानें केलें असें म्हणतात, जें चित्तानें केलें नाहीं तें कर्म केलें असें म्हणतां येत नाहीं. जर चित्तामध्यें कर्तृत्वशक्ति नसती तर देहानें कर्म केलें असें म्हणतां आलें असतें, परंतु चित्तामध्यें कर्तृत्वशक्ति असल्यामुळें क्रियेचें कर्तृत्व देहाकडे येऊं शकत नाहीं. मन असंसक्त असून क्रिया होत असेल तर तें मन अकर्तें आहे, असेंच ज्ञाते पुरुष समजतात; व अनासक्त मनाकडे कर्मफलाचें भोक्तृत्व येऊं शकत नाहीं. ज्याप्रमाणें एखाद्या मनुष्याचें मन दूर देशीं असलेल्या आपल्या कांतेचें चिंतन करण्यांत गढून गेलें असतां त्याला प्रत्यक्ष होणाऱ्या शीतोष्णादि अनुभवांची किंमत वाटत नाहीं व त्यांचा त्याच्या मनावर परिणाम होत नाहीं, त्याचप्रमाणें ज्याचें मन असंसक्त आहे अशा पुरुषाला ब्रह्महत्येचें घोर पातक किंवा अश्वमेधाचें असामान्य पुण्य यांचा लेप लागत नाहीं. ज्.ाचें मन संसक्तिरहित असून सदासर्वदा आत्मानुभवाच्या दिव्य आनंदांत तल्लीन झालेलें असतें, असा मनुष्य बाह्यतः क्रिया करीत असो वा नसो, तो कव्हांहि क्रियांचा कर्ता व कर्मफलांचा भोक्ता असत नाहीं. जें मन संसक्तिरहित असतें तेच अकर्तें, मुक्त, शांत, योगयुक्त आणि अलिप्त असें म्हणण्यास हरकत नाहीं. वास्तव आत्म्याशीं बाह्यतः संलग्न झालेल्या पंचकोशादि सर्व पदार्थांचा निरास करावयाचा असेल, तर सर्व तऱ्हेच्या दुःखांना प्रसवणाऱ्या भयंकर अंतःसक्तीचा त्याग हाच कायतो उपाय आहे, असें निश्चित ठरतें. साराश, स्फटिकमण्याप्रमाणे स्वच्छ असलेलें पाणी उत्तम धार दिलेल्या खड्गाप्रमाणें नीलवर्णानें युक्त अशा यमुनादिकांच्या पाण्यामध्यें मिसळलें असतां एकरूप होतें, तद्वत् संसक्तिरहित होऊन शांत व आकाशाप्रमाणें निर्मल झालेलें चित्त परमात्म्याशीं तादात्म्य पावतें.

---

# सर्ग ६८

—:०:—

१. आसक्ति आणि अनासक्ति यांचीं लक्षणें.

**श्रीरामः**—भगवन् ! संगाचें स्वरूप काय ? तो मनुष्यांच्या बंधाला कसा कारणीभूत होतो ? तसेंच जी स्थिति मोक्षाला कारण होते तिचें स्वरूप तरी काय ? व ती कोणत्या उपायांचा अवलंब केला असतां साध्य होते ? हें मला सांगा.

**श्रीवसिष्ठः**—राघवा ! देह आणि देही यांचा स्वभाव परस्परविरुद्ध आहे. अर्थात्, देह हा जड व देही हा चैतन्यरूप आहे. परंतु त्यांतील चैतन्यभागाचें पर्यालोचन न केल्यामुळें अन्योन्यतादात्म्यामुळें देहाच्या ठिकाणीं आत्मत्वाची जी भावना उत्पन्न होते, त्या

स्थितीला संग असें म्हणतात व हा संगच बंधाला कारणीभूत होतो, असें ज्ञात्यांचें म्हणणें आहे. अनंत अशा आत्मतत्त्वाचा अपरिछिन्न सुखस्वभाव विसरून त्याच्या परिच्छिन्न स्वरूपापासून, अर्थात् विषयांपासून सुखप्राप्तीची इच्छा करणें हाच संग असून तोच मनुष्यांच्या बंधाला कारणीभूत होतो, असा ज्ञात्या पुरुषांचा सिद्धान्त आहे. परंतु याच्या उलट हें सर्व विश्व आत्मरूप आहे, अर्थात् मी यापैकीं कशाचा त्याग करूं आणि कशाची इच्छा करूं ? अशी जी मनाची स्थिति तिलाच असंगस्थिति असें म्हणतात व ती जीवन्मुक्त देहाची नेहेमींची स्थिति असते. ' मी ' ' तूं ' वगैरे कोणी नाहीं, मला मिथ्याभूत देहासंबंधाचीं विषयसुखें प्राप्त होवोत किंवा न होवोत, अशा तऱ्हेच्या विचारसरणीमुळें ज्याच्या मनाची अनासक्त स्थिति बनते, असा मनुष्य मोक्षाचा वांटेकरी होतो. जो मनुष्य कधीं कर्मत्यागाची इच्छा करीत नाहीं आणि कर्मफलांच्या आशेनें कर्मामध्यें आसक्त होत नाहीं, तर कर्माची सिद्धि किंवा असिद्धि यांसंबंधाने मनानें समता धारण करून कर्मफलांचा त्याग करतो, ( अर्थात् तीं ईश्वरार्पण करतो, ) तोच असंसक्त आहे असें समजलें जातें. ज्याचें मन आत्मतत्त्वाच्या अनुसंधानामध्यें गढून गेलेलें असून तें केव्हांहि हर्ष किंवा क्रोध यांच्या अधीन होत नाहीं, अशा अनासक्त पुरुषाला जीवन्मुक्त ही संज्ञा दिली जाते. जो कर्माचा प्रत्यक्ष त्याग न करतां मनानें सर्व कर्मांच्या फलांचा त्याग करतो, त्याला असंसक्त हें श्रेष्ठ नांव दिलें जातें. फलेच्छेनें युक्त असलेल्या नानाविध कर्मांची चिकित्सा असंसक्तीनें करतां येते व त्याच्या योगानेंच श्रवणादि क्रिया मनुष्याला श्रेयस्कर होतात. मनाच्या संसक्तिमुळें सर्व तऱ्हेच्या दुःखराशी उत्पन्न होतात; व एखाद्या खड्ड्यांत उगवलेल्या कंटकवृक्षाप्रमाणें त्यांना शेंकडों फांद्या फुटतात. राघवा ! ह्या विषयासक्तीनें नाकांत वेंसण टोंचली जाऊन गर्दभांना रस्त्यांतून मुकाट्यानें ओझीं वहाण्याचें काम करावें लागतें, यावरून विषयासक्तीचें कार्य केवढें विलक्षण असतें, याची कल्पना कर. वृक्षांना एकाच स्थानीं खिळलें जाऊन थंडी, वारा, ऊन यांचा असह्य ताप सहन करावा लागतो, यावरून विषयासक्तीचा परिणाम किती विलक्षण आहे, याची कल्पना कर. पृथ्वीच्या उदरांत कोंबले जाऊन भयंकर दुःखें भोगणारे किडे त्या ठिकाणीं कसेबसे काळ कंठीत असतात, हें आसक्तीचेंच फळ होय. पक्ष्यांना वृक्षांच्या शाखावर रहावें लागून भुकेनें त्यांच्या पोटाची दामटी वळते, व आपल्याला कोणी दगड, बाण वगैरे मारील कीं काय, अशा भीतीमध्यें त्यांना आपल्या आयुष्याचे दिवस कंठावे लागतात, हा त्यांच्या आसक्तीचाच परिणाम होय. दूर्वांचे अंकुर व तृण यांचें भक्षण करणाऱ्या हरिणांनाहि भिल्लांच्या बाणांनीं घायाळ होऊन प्राण सोडण्याची पाळी येते, याचें मूळ विषयासक्तिच आहे. या जगांतील लोकांना आपापल्या पुण्यपापानुसार पुनःपुन्हां जन्म घ्यावे लागून कृमिकीटांच्या क्षुद्र योनींमध्येंहि रहावें लागतें, या सर्वांला कारण त्यांच्या ठिकाणची आसक्तिच होय. या विश्वांतील अनंत भूतें एखाद्या सरोवरांतील तरंगांप्रमाणें पुनःपुन्हां उत्पन्न होऊन पाण्यामध्यें लीन होतात, यांतील बीज विषयासक्ति हेंच आहे. मनुष्यासारखीं मनुष्यें पुनःपुन्हां मृत्यु पावून तृण, लता इत्यादिकांच्या हीन दशेप्रत जाऊन पोहोंचतात, व त्या स्थितींत त्यांचें पृथ्वीवर संचार करण्याचें सामर्थ्यहि नष्ट होतें, यांतील इंगित त्यांच्या ठिकाणीं खिळून गेलेली विषयासक्ति हेंच

होय. रामा ! ही विषयासक्ति किती अनर्थकारक आहे पहा ! या विषयासक्तीच्या प्रभावामुळें तृण," वृक्ष, लता इत्यादिक पदार्थ पृथ्वीवर पडलेल्या पाण्याचा उपयोग करून घेऊन वृद्धिंगत होतात व ही संसारनदीसुद्धां शेंकडों अनर्थकारक पदार्थांच्या योगानें फुगून गेलेली आहे.

राघवा ! ही संसक्ति दोन प्रकारची आहे. त्यांपैकीं एक वंध्या आहे व दुसरी वंद्या आहे. वंध्या-पुरुषार्थशून्या संसक्ति मूढ पुरुषांच्या ठिकाणीं असते व वंद्या संसक्ति तत्त्ववेत्याच्या ठिकाणीं आत्मप्रेमाच्या रूपानें असते. जी संसारासंबंधाची आसक्ति आत्मज्ञानरहित असून देहादिकांपासून उत्पन्न झालेली असते, ती वंध्या--पुरुषार्थशून्य आहे असें ज्ञाते पुरूष म्हणतात; व जी आसक्ति आत्मतत्त्वाचें ज्ञान व सद्वस्तूचा विवेक यांच्यापासुन निर्माण झालेली असते व जी पुनःपुन्हां संसारस्थितीला कारण होत नाहीं, तिला वंद्या हें नाव ज्ञात्याकडुन दिलें जातें. या वंद्या-श्रेष्ठ संसक्तीच्या योगानेंच शंख, चक्र, गदा इत्यादि आयुधांनीं युक्त असलेला देव ( विष्णु ) विविध इच्छांना वश होऊन जगत्त्रयाचें परिपालन करतो. या वंद्य संसक्तीच्या अधीन होऊनच सूर्य हा रोजच्या रोज सर्वथा निरालंब, अर्थात् आधाररहित अशा आकाशमार्गामध्यें संचार करीत असतो. या श्रेष्ठ संसक्तीला वश होऊनच सृष्ट्युत्पत्ति व प्रलय, तसेंच महाकल्पान्तीं विश्रांति घेणें इत्यादि कल्पना करणारें हिरण्यगर्भाचें म्हणजे ब्रह्मदेवाचें शरीर स्फुरण पावत आहे. या वंद्य संसक्तीच्या अंकित होऊनच आपल्या पत्नीच्या म्हणजे गौरीच्या प्रेमबंधानें स्वतःला लीलेनें बद्ध करून घेणारें आणि भस्मानें अलंकृत झालेलें शंकराचें शरीर स्थित झालेलें आहे. जे नेहमीं विज्ञानामध्यें स्थिर झालेले आहेत असे सिद्ध, त्याचप्रमाणें इतर लोकपाल हे या वंद्य संसक्तीमुळेंच जगद्रूपी अंगणामध्यें स्थित झालेले आहेत. तसेंच त्रिभुवनाव्यतिरिक्त जे महर्जनस्तपसत्यादि लोक आहेत, त्यांतील तत्त्ववेत्ते या संसक्तीमुळेंच जन्ममृत्यूंनीं रहित अशा तऱ्हेचीं शरीरयंत्रें धारण करून असतात. वंद्य संसक्तीची जी स्थिति तीच वंध्य संसक्तीची स्थिति होय. या वंध्य संसक्तीला बळी पडल्यामुळें गिधाडानें मांसाच्या तुकड्यांवर झडप घालावी, त्याप्रमाणें मन हें अरम्य विषयोपभोगांना रमणीय समजून यांच्यावर झडप घालतें. या संसक्तीच्या योगानें वायु भुवनोदरांत वहात असतो, पंचमहाभूतें स्थिर रहातात व या जगताची स्थिति कायम असते. या संसक्तीच्या योगानेंच द्युलोकांत देव, पृथ्वीवर मानव आणि पाताळामध्यें असुर हे सर्व उंबरांतील कीटांप्रमाणें या ब्रह्माण्डोदरामध्यें रहातात. या जगांतील अनंत भूतें नदीतील तरंगाप्रमाणें पुनःपुन्हां उत्पन्न होतात व मरतात, उन्नतीला जातात व अधोगतीला जातात. सारांश, एखाद्या ओढ्यांतून वर उसळणाऱ्या जलकणांप्रमाणें भूतें पुनःपुन्हां उत्पन्न होऊन लीन होतात, यावरून संसक्तीचा प्रभाव किती विलक्षण आहे पहा ! या संसक्तीमुळें जनता मात्स्यन्यायानें एकमेकांना खाऊन टाकते व वाळलेलीं पानें आकाशांत भ्रमण करीत रहातात, त्याप्रमाणें वा रामभद्रा ! ही जनता अज्ञानानें जर्जर होऊन या संसारामध्यें एकसारखी भ्रमण करीत सुटते. याच संसक्तीला वश होऊन चिलटें वृक्षांवर स्फुरण पावतात तद्वत्, नक्षत्रचक्र आकाशामध्यें भ्रमण करीत रहातें व तेंहि पाताळांतील जलौघाप्रमाणें भोंवऱ्यासारखें भ्रमण करीत असतें. काळरूपी बालकाच्या हातांतील जणुं चेंडूच असा हा चंद्र वृद्धिक्षयरूपी दशांच्या योगानें जीर्ण झालेल्या,

तसेच जड आणि कलंकित अशा आपल्या शरीराचा अद्यापि त्याग करीत नाहीं, यावरून संसक्तीचा परिणाम किती विलक्षण आहे पहा! निरनिराळ्या युगामध्यें अनंत दुःखें भोगावी लागत असल्यामुळें ज्यांचा मनोरूपी दुर्धर व्रण एकसारखा बळावत चालला आहे, अशा तऱ्हेचा हा दुःखी इंद्रादि देवसमूह त्या व्रणाला कापून टाकीत नाहीं, याला काय म्हणावें! राघवा! केवळ वासनेच्या योगानें परमाकाशांत कोणी तरी रंगविलेलें हें जें जगद्रूपी विचित्र चित्र आहे, त्याचें सूक्ष्मदृष्टीनें अवलोकन कर. हें चित्र मनाच्या संसक्तिरूपी रंगानें शून्य आकाशामध्यें रंगविलेलें आहे; अर्थात, हे जगद्रूपी चित्र सत्य असणें कव्हांहि शक्य नाहीं. ज्याप्रमाणें अग्नीची ज्योति तृणांचें भस्म करून टाकते, त्याप्रमाणें ह्या संसारामध्यें जे आसक्तमनानें व्यवहार करतात, त्यांचीं शरीरें तृष्णा नष्ट करून टाकते. एखाद्या समुद्राच्या वाळवंटावरील वाळूचे कण किंवा सूर्यकिरणांतील त्रसरेणू मोजतां येणें शक्य नसतें, तद्वत् विषयामध्यें गढून गेलेल्या जीवाला किती शरीरें धारण करावीं लागतात, याची गणती करतां येणें शक्य नाहीं. मेरुपर्वताच्या पायापासून नरकापर्यंत लोंबणाऱ्या गंगेच्या हारांतील तरंगरूपी मोत्यांची एक वेळ मोजदाद करतां येईल, परंतु विषयासक्त जीवांना धारण कराव्या लागणाऱ्या देहाची मोजदाद करतां येणें शक्य नाहीं. ज्यांचीं मनें सदासर्वदा विषयोपभोगामध्येंच रत झालेलीं असतात, अशा प्राण्यांकरितां रौरव, वीचि, कालसूत्र इत्यादि नरकरूपी रम्य अंतःपुरें निर्माण करण्यात आलेलीं आहेत! विषयासक्त लोक ही सतत जळणाऱ्या नरकाग्नीचीं दुःखाच्या योगानें शुष्क झालेलीं इंधनेंच असून त्यामुळें तीं इंधनें भराभर पेट घेतात. जगतामध्यें जें जें भयंकर दुःखजाल आहे, तें तें सर्व विषयासक्त जीवांकरितांच निर्माण करण्यांत आलेलें आहे. ज्याप्रमाणें पाण्याच्या लाटांनी युक्त असलेल्या महानद्या समुद्राला जाऊन मिळतात, त्याप्रमाणें सर्वतऱ्हेच्या दुःखपरंपरा संसक्तचित्त मनुष्याप्रत जाऊन पोहोंचतात. जीवाला जन्ममृत्युरूपी दुर्दशा प्राप्त करून देणाऱ्या आणि भारभूत शरीरें धारण करावयास लावणाऱ्या या मनाच्या आसक्तिरूपी अविद्येनेंच जगांतील सर्व दुःखजाल निर्माण केलें आहे. परंतु रामा! भोगासंबंधाच्या असंसर्गामुळें सर्व तऱ्हेच्या संपत्ती प्राप्त होतात, इतकेंच नव्हे, तर वर्षाकालांतील नद्यांप्रमाणें त्या एकसारख्या वृद्धिंगत होत जातात. राघवा! अनःसंग हा अंगाचा दाह करणारा निखारा आहे व अंतःसंगाचा अभाव हे सर्वांग शीतल करणारें रसायन आहे, हे लक्षांत ठेव. ज्याप्रमाणें वनस्पतीमध्यें असलेल्या गवतापासून उत्पन्न झालेल्या अग्नीच्या योगानें वनस्पति दग्ध होते, त्याप्रमाणें देहादिकांच्या आसक्तीमुळें जीव दग्ध होतो. परंतु जें मन आकाशाप्रमाणें असंसक्त असतें, तें मनुष्याच्या सुखालाच कारणीभूत होतें. सारांश, ज्या मनुष्याचें चित्त सर्वत्र आसक्तिरहित असून विद्यादृष्टीनें सूर्यादिकांसारखें प्रकाशमान असतें, व अविद्यादृष्टीनें क्षीण झालेलें असतें, तो मनुष्य केव्हांहि मुक्तच आहे असें म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं.

## सर्ग ६९

१. सर्व आसक्तीचा त्याग होऊन ज्याच्या योगानें मन विदूर बनतें अशा अभ्यासक्रमाचें वर्णन.

श्रीवसिष्ठः—राघवा! विचारी पुरुषानें निरनिराळ्या काळीं उचित असलेले सर्व व्यवहार करीत असतां, पुत्रमित्रादिकांबरोबर वागत असतां

किंवा शास्त्रीय, लौकिक वगैरे कर्मे करीत असतां आपलें मन विषयामध्यें आसक्त होऊं देऊं नये. भूत, भविष्य आणि वर्तमान विषय, आकाश, पाताल व त्यांच्या दरम्यानचा भाग, दिशा व अंतर्दिशा, आधिभौतिक विषय, स्त्री, नोकर, इत्यादि विषय, इंद्रियवृत्ती, आंतर विषय; प्राण, मस्तक, तालु वगैरे योगशास्त्रांतील धारणास्थानें, भ्रूमध्य, नासाग्र, मुख, उजळ्या डोळ्याचें बुबुळ, तसेंच अंधकार, प्रकाश, हृदयाकाश, जागृत, स्वप्न, सुषुप्ति, शुद्धसत्त्वगुण, तमोगुण, रजोगुण, गुणसमुच्चय, चंचल कार्ये, स्थिर अव्यक्त स्थिति, सृष्टीचे आदिमध्यादि-काल, दूरचे किंवा जवळचे विषय, नामरूपात्मक पदार्थ, जीव, शब्दस्पर्शादि विषय, मोह, आनंद वगैरे वृत्ती, आकाशगमनादि सिद्धी, भूतभविष्यादिकाचें ज्ञान वगैरे विषयांमध्यें आपलें चित्त आसक्त होऊं देतां कामा नये; तर बुद्धीचें साक्षित्व करणाऱ्या आत्म्यामध्यें स्थिर करून मन आत्मपरायण बनल्यामुळें सर्व विषयांच्या ठिकाणीं तें नीरस होऊं द्यावें. अशा रीतीनें मनुष्याचें मन निरासक्त होऊन त्याला एकदां ब्रह्मस्थिति प्राप्त झाली, म्हणजे मग तो सर्व व्यवहार करो किंवा न करो. जो जीव आत्म्यामध्येंच रममाण होऊं लागला, तो वस्तुतः क्रिया करीत नसतांहि क्रिया करतांना दिसला, तरी आकाश मेघांच्या योगानें केव्हांहि लिप्त होत नाहीं, त्याप्रमाणें कर्मफलांचा त्याला कधींहि लेश लागत नाहीं. अथवा बुद्धीचें साक्षित्व करण्याचेंहि टाकून देऊन प्रकाश देणाऱ्या रत्नाप्रमाणें जीव हा चिदात्म्याच्या शांत स्थितीमध्यें स्थिर राहिला तरीहि हरकत नाहीं. सारांश, बा रामभद्रा! जो मनुष्य अपरोक्षज्ञानसंपन्न झाला आणि ज्याला पराशांति प्राप्त झाली, तो जरी व्यवहार करीत असला तरी मनानें अनासक्त आणि वासनारहित असल्यामुळें त्याला कर्मफलासंबंधानें केव्हांहि आसक्ति उत्पन्न होत नाहीं; तर प्रारब्धक्षय होईपर्यंतच तो देहभार धारण करतो व तदनंतर कायमचा मुक्त होतो.

---

## सर्ग ७०

—:*:—

१. परमात्मस्थितीमध्ये स्थिर झालेला ज्ञानी व्यवहार करीत असला तरीहि अनासक्त असतो.

**श्रीवसिष्ठः**—राघवा! जे महात्मे तत्त्ववेत्ते असून नेहेमीं असंसक्तीपासून प्राप्त होणाऱ्या निरतिशयानंदाचा आस्वाद घेत असतात, ते व्यवहार करीत असले तरी शोकभयादि विकारांपासून सर्वथा मुक्त असतात. अशा पुरुषांची चित्तवृत्ति पुत्रधनादिकांच्या नाशामुळें बाह्यतः क्षुब्ध झालेली दिसली, तरी ती वस्तुतः क्षुब्ध होत नाहीं व त्यांची चित्तवृत्ति निरंतर परमार्थसुख भोगीत असल्यामुळें त्यांच्या चेहऱ्यावर चंद्रबिंबाप्रमाणें रमणीय कांति विलसत असते. ज्याप्रमाणें निवळीची बी उगाळून घातल्याने पाणी शुद्ध होतें, त्याप्रमाणें ज्याचें मन चिदात्म्यामध्यें स्थिर होऊन निर्विकार आणि निर्वासन झालें, त्याच्या सहवासानें जनता प्रसन्न होते. ज्ञानी मनुष्याचें मन बाह्यतः चंचल दिसलें तरी आत्मदृष्ट्या तें नित्य स्वस्थ असतें, व त्याची जी चंचलता दृष्टिगोचर होते, ती सुद्धां सूर्याच्या, पाण्यांत पडलेल्या प्रतिबिंबाप्रमाणें मिथ्याच भासमान होते. ते महात्मे तत्त्वज्ञानसंपन्न असून आत्म्यामध्येंच रममाण झालेले असतात, ते बाह्यतः मोराच्या पिसांच्या अग्रभागांप्रमाणें तरल असतात, परंतु आंतून मेरूप्रमाणें अचल असतात. मनुष्याचें चित्त एकदां चिद्रूप झालें, म्हणजे स्फटिकाच्या शेजारीं असलेल्या निरनिराळ्या रंगाच्या फुलांचा

रंग त्याच्यावर भासला, तरी वस्तुतः त्यांचा स्फटिकावर कांहींच परिणाम घडत नाहीं, तद्वत् ज्ञान्याच्या चिद्रूप झालेल्या चित्तावर बाह्यतः सुखदुःखाचा विकार घडलेला दिसला, तरी तत्त्वतः त्याच्यावर मुळींच परिणाम घडत नाहीं. ज्याला परावराचें ( पर म्हणजे ईश्वरतत्त्व व अवर म्हणजे जीवतत्त्व यांचें ) सम्यक्ज्ञान झालें आहे आणि ज्याच्या ठिकाणीं संसाराचें खरें ज्ञान प्राप्त होऊन निरतिशयानंदाचा उदय झाला आहे, अशा तत्त्ववेत्त्याच्या सद्रूप चित्तावर, पाण्यातल्या रेषांचा कमलावर कांहींच परिणाम होत नाहीं, तद्वत् यत्किंचितहि परिणाम होत नाहीं. ज्या मनुष्याला परमात्मतत्त्वाचा बोध झाला व जो संकल्पजन्य पातकापासून मुक्त होऊन परमात्म्याचें प्रत्यक्ष ध्यान करीत नसताहि निर्विकल्पसमाधीच्या स्थितीप्रमाणें आनंदमग्न राहूं लागला, असा मनुष्य स्वसक्त( आत्मरत ) आहे, असें ज्ञाते पुरूष समजतात. ज्ञानपरिपाक होत जाऊन जीव एकदां आत्म्यामध्येंच रममाण होऊं लागला, म्हणजे त्याच्या ठिकाणीं असंसक्ति बाणूं लागते. कारण, विषयासक्ति क्षीण होत जाण्याला आत्मज्ञान हाच एक उपाय आहे, दुसरा कोणताहि उपाय नाही. राघवा ! ही असंसक्तिरूपी ज्ञानदृष्टि मनुष्याच्या वृत्तीमध्यें बाणली व त्याची वृत्ति द्वंद्वातीत होऊन उदयास्तरहित झाली, म्हणजे तो जागृतींतील व्यवहार करीत असला तरीहि सुषुप्तावस्थेप्रमाणें स्वस्थच असतो. ही ज्ञानदृष्टि स्वरूपाच्या अभ्यासामुळें त्याच्या वृत्तीमध्यें आरूढ झाली, म्हणजे सूर्याच्या प्रतिबिंबभूत असलेल्या चंद्राचें बिंब कृष्णपक्षामध्यें कलेकलेनें क्षीण होतां होतां अखेरीस अमावास्येच्या दिवशीं सूर्यबिंबाशीं एकरूप होतें, तद्वत् विषयवृत्ति क्षीण होऊन ज्ञानी पुरुष अखेर सूर्यासारखा प्रकाशमान होतो, ज्ञानी पुरुषांचें चित्त क्षीण झाल्यानंतर जी शांत आणि निर्वासन स्थिति शिल्लक रहाते, तिलाच 'जागृतींतील सुषुप्ति' असें नांव दिलें जातें. अशा तऱ्हेच्या साक्षात्कारजन्य सुषुप्तदशेप्रत जाऊन पोहोंचल्यानंतर मनुष्य व्यवहार करीत असला, तरी तो सुखदुःखरूपी चामडयाच्या वाद्यांकडून केव्हांहि बद्ध केला जात नाहीं. जो मनुष्य जागृतीमध्यें राहून जगत्क्रिया करीत असला तरी सुषुप्तावस्थेंत असल्यामुळें तत्त्वतः अक्रिय असतो, तो कळसूत्री बाहुल्यांप्रमाणें सुखदुःखदशांच्या योगानें बद्ध होत नाहीं. अहंकाररूपी शक्ति हीच चित्ताला बाधक होते व तीच इष्टानिष्ट कल्पनांच्या योगानें त्याला पीडा करते. परंतु तेंच चित्त एकदां आत्मरूप झालें म्हणजे त्याला बाधा कोण आणि कशी करणार? जो मनुष्य साधनदशेपासूनच अनासक्त बुद्धीनें कर्मे करीत असतो, तो जीवन्मुक्तावस्थेमध्येंहि कर्मे करीत असला तरी त्यांच्या योगानें बद्ध होत नाहीं. यास्तव बा निष्पापा ! तूंहि ह्या सौषुप्तिवृत्तीचा आश्रय कर व तदनंतर पाहिजे तर कर्मे कर किंवा करूं नकोस.* कारण, वर्णाश्रमधर्माप्रमाणें कर्मे करण्याचा स्वभाव हा प्रारब्धवशात् प्राप्त होत असतो. ( अर्थात्, ज्ञानाच्या कर्मासंबंधानें कोणताहि नियम घालून देतां येत नाहीं ) ज्ञानी मनुष्याला कर्माचें ग्रहण किंवा त्याग यांपैकीं कशाचीहि इच्छा नसते व अशी स्थिति असल्यामुळें ज्ञानी पुरुष प्रारब्धानुसार वर्तत असतात. राघवा ! तूं तत्त्वज्ञानसंपन्न होऊन सुषुप्तावस्थेंतल्याप्रमाणें व्यवहार करीत राहिलास, म्हणजे तूं कर्मे करूनहि अकर्ता होशील. परंतु अतत्त्वज्ञ राहिलास तर वस्तुतः अकर्ता असतांहि तूं कर्तृत्वाच्या बंधांत पडशील, हें लक्षांत ठेवून तुला जें इष्ट असेल त्याचें

* 'एष नित्यो महिमा ब्राह्मणस्य न वर्धते कर्मणा नो कनीयान्' ( बृहदा. ४।४।२३ )

ग्रहण कर. राघवा! एखादें लहान मूल मनानें कोणत्याहि तऱ्हेचा संकल्प न करतां सहजानंदस्थितीमध्यें पलंगावर लोळत असतें, त्याप्रमाणें कर्मफलाचा यत्किंचितहि विचार न करतां तूं आपलीं प्राप्त कर्मे लीलेनें करीत जा. जागृतीमध्यें राहूनहि जो मनुष्य सुषुप्तावस्थेप्रमाणें निर्विषय अशा ब्रह्मपदाचे ठायीं स्थिर असतो, तो जीं जीं कर्में करतो त्या त्या कर्मांमध्यें त्याला कर्तृत्वभावनेची बाधा होत नाहीं. ज्ञानी पुरूष हा स्वस्वरूपानुभवामुळें सुषुप्तीसारख्या स्थितींत रहात असतो व त्याचें चित्त वासनारहित झालेलें असल्यामुळें त्याच्या वृत्तीमध्यें, अमृतामुळें चंद्रबिंबामध्यें शीतलता उत्पन्न होते तद्वत्, शांतता उदित झालेली असते. ज्याप्रमाणें पर्वत हा सर्व ऋतूंमध्यें सम असतो, त्याचप्रमाणें सम्यक् ज्ञानानें संपन्न आणि पौर्णिमेच्या चंद्रबिंबाप्रमाणें पूर्ण असलेला सुषुप्तिमध्यें असल्याप्रमाणें रहाणारा महात्मा संपत्ति, विपत्ति वगैरे सर्व अवस्थांमध्यें सारखाच निर्विकार असतो. ज्याप्रमाणें एखादा पर्वत वायुमुळें बाह्यतः हलल्यासारखा दिसला, अर्थात् त्यावरील गवत किंवा वृक्ष हालं लागले, तरी तो अचलच असतो, त्याचप्रमाणें ज्ञानी पुरुष लौकिक किंवा वैदिक क्रिया करीत असला, तरी त्याच्या वृत्तीची आंतील भूमिका कव्हांहि भंग पावत नाहीं. यास्तव रामा! तूं ज्ञानस्थितीमुळें गाढ झोपेंत असल्याप्रमाणें निर्विकार रहाण्याचा अभ्यास कर, मग तुझा देह क्षणांत पडो किंवा पर्वताप्रमाणें दीर्घकालपर्यंत टिको. ही गाढ झोपेप्रमाणें निर्विकार स्थिति अभ्यासामुळें दृढ बाणली, म्हणजे तिलाच तत्त्ववेत्त्यांकडून 'तुर्यावस्था' ही संज्ञा दिली जाते. ज्ञानी पुरुषाच्या सर्व वासना निमालेल्या असून त्याचें मन पूर्णपणें अस्तंगत झालेलें असल्यामुळें त्याला निरतिशयानंदाची प्राप्ति होते. अशा तऱ्हेचा निर्विकल्प आणि निरतिशयानंदस्वरूप भोगण्यांत निमग्न झालेला ज्ञानी ही जगद्रचना केवळ आपली लीला आहे, असें नेहेमीं पहात असतो. ज्याच्या ठिकाणचे शोक भयादि विकार नाहींसे झाले आहेत आणि ज्याच्या वृत्तीमधील अखिल संसारभ्रम नष्ट झालेला आहे, असा तुर्यावस्थेप्रत जाऊन पोहोंचलेला आत्मज्ञानी त्या श्रेष्ठ स्थितीपासून पुन्हां केव्हांहि च्युत होत नाहीं. आत्मस्वरूपाच्या पावन पदवीवर आरूढ झालेला तत्त्ववेत्ता, पर्वतावर उभे रहाणाऱ्या मनुष्यानें खालच्या लोकांकडे पाहून हंसावें त्याप्रमाणें, ह्या भ्रमरूप जगाकडे पाहून हंसत असतो. पुढें जीवन्मुक्तावस्थेची ती महानंदाची स्थिति सरल्यानंतर ज्ञानी देहाचा त्याग करून विदेहमुक्तस्थितीप्रत जाऊन पोहोंचतो. येथें केवळ आनंदांत लय असल्यामुळें त्याला अनानन्दपद असें म्हणतात; त्यालाच कलातीतही म्हणतात. परंतु याच्याही पलीकडे योगी जातो म्हणून या स्थितीलाच 'तुर्यातीतपद' असेंहि म्हणतात. साराश, अशा रीतीनें जन्ममृत्यूला कारणीभूत होणाऱ्या काम्यकर्मादिकांचे पाश आणि देहाभिमान विगलित होऊन ज्ञानी पुरुष पाण्यात टाकलेल्या मिठाच्या खड्याप्रमाणें परमानंदमय अशा परमार्थस्थितीमध्यें कायमचा स्थिर होतो.

## सर्ग ७१

—:०:—

१. तुर्यातीतपदाचें वर्णन करतां येणें अशक्य असल्यामुळें तुर्यावस्थेचें वर्णन. २. अज्ञानजन्य मोहामुळेंच जन्मपरंपरा प्राप्त होतात.

श्रीवसिष्ठः—रघुकुलोद्धारा रामा! जोंपर्यंत जीवन्मुक्त हा चिन्मात्रपरिशेषरूपी तुर्यावस्थेचा अनुभव घेत असतो, तोंपर्यंत तो विदेहकैवल्यस्थितीमध्येंच आहे, असें म्हणण्यास हरकत

नाहीं. ही तुर्यावस्था जीवन्मुक्ताच्या अनुभवाचा आणि श्रुत्यादि वचनांच्या वर्णनाचा विषय होऊं शकते. परंतु वायुगम्य आकाश हें मनुष्यांच्या संचाराचा विषय होऊं शकत नाहीं, त्याचप्रमाणें तुर्यातीतपद हें अदेहमुक्तांना देहपातानंतर प्राप्त होतें ही गोष्ट जरी खरी, तरी त्या स्थितीमध्यें मनाचा सर्वथा क्षय होत असल्यामुळें ती स्थिति त्यांच्या साक्षात् अनुभवाचा आणि श्रुत्यादि वचनांच्या वर्णनाचा विषय होऊं शकत नाहीं. आकाशमार्ग हा वाऱ्यांना गम्य—संचार करण्याला योग्य—असतो, तद्वत् अत्यंत दूर पदार्थांहूनहि दूर असलेलें तें तुर्यातीतपद नामक विश्रांतिस्थल विदेहमुक्तांना प्राप्त होतें. जीवन्मुक्तावस्थेमध्यें कांहीं काल सुषुप्तावस्थेप्रमाणें जगत्स्थितीचा अनुभव घेऊन नंतर योगी तुर्यावस्थेप्रत प्राप्त होऊन परमानंदानें परिपूर्ण होतो. तज्ज्ञ आणि आत्मज्ञानचतुर पुरुष ज्या क्रमानें तूर्यातीतदशेप्रत जाऊन पोहोंचतात, त्याच क्रमानें बा रघुकुलभूषणा रामा! तूंहि निर्द्वंद्व अशा ब्रह्मपदाप्रत जाऊन पोहोंच. रामा! नुकतेंच सांगितल्याप्रमाणें तूं सौपुप्तिवृत्तीचा आश्रय करून आपले सर्व व्यवहार यथास्थित करीत जा. म्हणजे चित्रांतील चंद्राला कलाक्षय आणि राहु यांच्यापासून यत्किंचितही भय नसतें, तद्वत् हे अरिसूदना रामा! तुला मृत्यु आणि उद्वेग यांच्यापासून मुळींच भय उरणार नाहीं. परंतु या शरीररूपी संघाताचा नाश झाला म्हणजे त्याबरोबर चिदात्म्याचाहि नाश होतो आणि हा शरीररूपी संघात स्थिर असेल तरच चिदात्म्याचें अस्तित्व असतें, असें मात्र कव्हांहि मानूं नकोस. कारण ज्याला शरीर असें म्हणतात तो निव्वळ भ्रम आहे. अर्थात् हा देह नष्ट होवो किंवा तो चिरकाल राहो, त्यामुळें तुला कोणताच लाभ नाहीं. यास्तव हें शरीर राहो किंवा नष्ट होवो, तूं आपला स्वात्मबोध स्थिर करण्यासंबंधानें सतत उद्योग चालू ठेव. जगताला अधिष्ठानभूत असलेलें सत्तत्त्व तूं जाणलें आहेस, अवस्थात्रयाला अधिष्ठानभूत असलेलें पद तूं ओळखलें आहेस व तूं स्वस्वरूपाप्रत जाऊन पोहोंचला आहेस. यास्तव शोकरहित हो व इष्टानिष्टरूपी भावनांचा त्याग करून अंधकार आणि मेघ यांनीं रहित असलेलें शरदृतूंतील पौर्णिमेच्या रात्रीचें आकाश शीतल व रमणीय प्रकाशामुळें शोभतें, त्याचप्रमाणें तूं शोभायमान हो. ज्याप्रमाणें योग, मंत्र आणि तप यांच्या योगानें आकाशांत संचार करण्याची सिद्धि प्राप्त झालेला योगी आकाश सोडून भूमीवर कधींहि येत नाहीं, त्याचप्रमाणें आत्मज्ञानसंपन्न झालेलें तुझें मन विषयसुखरूपी अधोमार्गाकडे कव्हांहि धाव घेणार नाहीं. या जगांत उच्च व नीच या कल्पनांनीं रहित आणि शुद्ध अशी चित्‌च आहे, यासाठीं हा, तो, मी, हें, तें, माझें इत्यादि प्रकारचा भ्रम तुझ्या ठिकाणीं कव्हांहि न होवो. चिद्रूप अशा त्या विभूला केवळ व्यवहाराकरितां आत्मा हें नांव कल्पिलेलें आहे; वस्तुतः नाम, रूप इत्यादि भेद ह्या चित्पासून कायमचे दूर निघून गेलेले आहेत. ज्याप्रमाणें समुद्र म्हणजे जलच असून तरंगादिक पाण्याहून भिन्न नसतात, तद्वत हें सर्व जग तत्त्वतः आत्माच असून पृथ्वी, जल वगैरे मूर्तें आत्म्याहून भिन्न नाहींत. ज्याप्रमाणें सर्व समुद्र हुडकला तरी त्यांत पाण्यावांचून दुसरें कांहींहि सांपडणार नाहीं, त्याचप्रमाणें अफाट रीतीनें विस्तारलेलें हें जग धुंडाळलें असतां त्यांत आत्म्यावांचून दुसरें कांहींच उपलब्ध व्हावयाचें नाहीं. अशा स्थितींत बा प्राज्ञ रामा! तो, मी इत्यादि भेद तूं करणार तरी कसा? तसेंच हा मी, हें माझें, हें मी नव्हे

आणि हें माझें नव्हे, ह्या भेदभावनेला तरी अवकाश कोठून मिळणार? ज्याप्रमाणें अंधकाराच्या योगानें सूर्याच्या ठिकाणीं कालिमा उत्पन्न होत नाहीं, त्याप्रमाणें आत्म्याचे ठिकाणीं द्वैत नाहीं, देह नाहींत व त्या देहांच्या योगानें आत्मा कलंकितही होत नाहीं. आतां आत्म्याचे ठिकाणीं द्वैत आहे असें मानलें किंवा देहादि भेद सत्य आहेत असें जरी धरून चाललें, तरीसुद्धां बा शत्रुमर्दना रामा! विभु अशा चिदात्म्याचा देहाशीं यत्किंचितही संबंध नाहीं. छाया आणि ऊन्ह किंवा प्रकाश आणि अंधःकार यांचा परस्परसंबंध किंवा तादात्म्य केव्हांहि होऊं शकत नाहीं, त्याचप्रमाणें देह आणि देही-आत्मा यांचा संयोग होणें केव्हाही शक्य नाहीं. रामा! ज्याप्रमाणें नित्य परस्परविरोधी म्हणून ठरलेल्या थंड व कढत यांचा कधीं संबंध होत नाहीं, त्याप्रमाणें देह आणि आत्मा यांचा तादात्म्यसंबंध घडणें कालत्रयीं शक्य नाहीं. तसेंच देह हा जड व देही—आत्मा हा चेतन असल्यामुळें गुण व गुणी यांच्याप्रमाणें त्यांचा समवायसंबंध तरी कसा असूं शकणार? वणव्याच्या ठिकाणीं समुद्राचा संबंध झाला ही गोष्ट जितकी असंभवनीय आहे, तितकीच चिदात्म्याचा देहाशीं संबंध असल्याची गोष्ट असंभवनीय आहे. ज्याप्रमाणे प्रखर उन्हांत भासमान होणारा मृगजळाचा समुद्र जवळ जाऊन पहातांच नाहींसा होतो, त्याप्रमाणें सम्यक् दृष्टीनें अवलोकन केल्यानंतर आत्म्याचे ठिकाणीं भासमान होणारी खोटी समजूत नाहींशी होते. कारण, चिदात्मा हा निर्मल, नित्य, स्वयंप्रकाश आणि निरुपाधिक आहे आणि देह हा तर मलिन आणि अनित्य पडला; तेव्हां आत्म्याचा आणि देहाचा संबंध कसा बरें होऊं शकेल? देह हा प्राणवायूच्या योगानें हालचाल करतो आणि अन्नादिकांच्या योगानें पुष्ट होतो. यास्तव अशा देहाचा आणि आत्म्याचा यत्किंचितही संबंध असणें शक्य नाहीं. सुबुद्धा रामा! द्वैत आहे असें गृहीत धरलें तरीसुद्धां देहाचा आत्म्याशीं कोणत्याहि प्रकारचा संबंध असूं शकत नाहीं असेंच ठरतें. मग जेथें द्वैतच नाहीं, तेथें देह आणि आत्मा यांचा संबंध होण्याची कल्पना तरी कोठून उत्पन्न होणार? यास्तव द्वैतकल्पनेचा सर्वथा त्याग करून तूं एकमेवाद्वितीय अशा आत्म्याचे ठिकाणीं स्थित होऊन रहा.

वास्तविक रीत्या पाहूं गेलें तर कोणाला कधीं बंध होत नाहीं अगर कोणाला कधीं मोक्षहि होत नाहीं; तर भासमान होणारें हें सर्व दृश्य जग आत्ममय आणि शांत आहे, ही गोष्ट ज्ञानदृष्टीला अगदीं स्पष्ट दिसत असते. एवंच, सर्वत्र सबाह्याभ्यंतर आत्माच ओतप्रोत भरलेला आहे, ही भावना तूं आपल्या वृत्तीमध्यें बाणवून घे. 'मी सुखी आहें,' 'मी दुःखी आहें,' 'मी मूढ आहें' या सर्व विकृतदृष्टी असून त्यांच्या ठिकाणीं तुझी सत्यत्वबुद्धि असेल, तर तुला चिरकाल दुःख भोगण्याची इच्छा झाली आहे, असेंच म्हटल्याशिवाय गत्यन्तर नाहीं! पर्वत आणि गवत किंवा रेशीम आणि पाषाण यांच्यामध्यें जो विशेष आहे, अर्थात् दुरून पहाणाराला पर्वत हा विशाल आणि स्थिर दिसतो व त्यावरील गवत हें चंचल आणि मृदु दिसतें, व त्यामुळें मनुष्याची दृष्टि गवतापेक्षां पर्वतावर स्थिर होणें स्वाभाविक असतें. तसेंच रेशीम हें मृदु आणि सुखस्पर्श असल्यामुळें ग्राह्य वाटतें व पाषाण हा कठोर आणि दुःखस्पर्श असल्यामुळें त्याज्य वाटतो, तद्वत् परमात्मा हा अपरिच्छिन्न, नित्य, प्रकाशरूप आणि आनंदस्वरूप असल्यामुळें परमात्मदृष्टि सुलभ असून ग्राह्य आहे व देहादिकांची अनात्मबुद्धि

अनित्य, अस्थिर आणि सापेक्ष असल्यामुळें दुष्कर असून त्याज्य आहे. सारांश अशा-रीतीनें आत्मदृष्टि आणि अनात्मदृष्टि यांच्या-मध्यें महदंतर आहे. ज्याप्रमाणें प्रकाश आणि अंधकार यांच्यामध्यें साम्य नसतें व त्यांचा कोणत्याहि प्रकारचा संबंध असत नाहीं, त्याचप्रमाणें अत्यंत भिन्न अशा देहाचा आणि आत्म्याचा कोणत्याहि प्रकारचा संबंध असूं शकत नाहीं. शीत आणि उष्ण अथवा जड आणि चैतन्य यांचें ऐक्य अस-ल्याचें कोणी चुकूनसुद्धां कधीं बोलत नाहीं, तद्वत् देह आणि आत्मा यांच्या ऐक्याची गोष्ट-सुद्धां बोलावयास नको! देह प्राणगत वायूच्या आश्रयानें स्थित असतो व हालचाल करतो; तसेंच नाडीगत वायूच्या योगानें शब्द कर-ण्याला समर्थ होतो. कळकाच्या भोंकांतून वाहणाऱ्या वायूच्या योगानें नानाविध ध्वनी निघतात, तद्वत् कंठगत वायूच्या योगानें या देहरूपी रंध्रांतून क, च, ट, त इत्यादि शब्द स्फुरण पावतात. ज्याप्रमाणें नेत्रस्पंदाला कारणी-भूत हणारी डोळ्यांच्या बुबुळांची हालचाल वायूपासून उत्पन्न होते, त्याप्रमाणें इंद्रियस्फुरणा-पासून उत्पन्न होणारी स्फूर्तिरूपी संवित् आत्म्यापासूनच निर्माण होते. जरी आत्मा हा आकाश, पाषाण, भिंत इत्यादिकांचे ठिकाणीं सारखाच व्यापून राहिलेला आहे, तरी कोण-त्याहि वस्तूचें प्रतिबिंब आरशामध्येंच पडतें, तद्वत् आत्मसंवित् ही चित्तामध्येंच अभिव्यक्त होते. शरीररूपी घरट्याला सोडून चित्तरूपी पक्षी स्वतःच्या वासनेला वश होऊन ज्या ज्या ठिकाणीं जातो, त्या त्या ठिकाणीं आत्माहि जात असल्याचा भास होतो. जेथें पुष्प असतें तेथेंच गंधसंवित् स्थित असतात, तद्वत् जेथें चित्त असतें तेथेंच आत्मसंवित् स्थित असतात. ज्याप्रमाणें सर्वत्र स्थित असलेलें आकाश आर-शामध्यें प्रतिबिंबित होतें, त्याचप्रमाणें सर्वव्यापी आत्मा चित्तामध्येंच प्रतिबिंबित होतो. ज्याप्र-माणें पृथ्वीवरील खोलगट जागा हे पाण्याचें निवासस्थल असतें, त्याप्रमाणें अंतःकरण हेंच चित्प्रतिबिंबाचें निवासस्थल असतें. ज्याप्रमाणें सूर्याची कांति प्रकाशाचा विस्तार करते, त्याच-प्रमाणें अंतःकरणांतील चिदात्म्याचें प्रतिबिंब हें सर्व व्यावहारिक आणि प्रातिभासिक जगद्रूपाला विस्तारीत असतें. यासाठीं अंतःकरण हेंच भूतांच्या संसाराला कारणीभूत आहे. आत्मा हा सर्वांच्या अतीत असल्यामुळें तो प्रतिबिंबद्वारा भूतसृष्टीला कारणीभूत आहेसा भासला, तथापि तो स्वतः कारण होत नाहीं. भ्रमदृष्टीनें संसार उत्पत्तीला कारण मुख्य अंतःकरणहोय, त्यालाच अविचार, अज्ञान, मूर्खपणा, असे शहाणे म्हण-तात. अवलोकन करणाराला सूर्यापासून अंधकार उत्पन्न झाल्याचा भास व्हावा, तद्वत् अयथार्थ-दृष्टीनें किंवा मोहबुद्धीनें अवलोकन केलें असतां चिदात्म्यापासून जन्ममरणादि परंपरा उत्पन्न होत असल्याचा आभास होतो. परंतु दीपाच्या योगानें एका क्षणांत अंधकाराचा नायनाट होतो, तद्वत् एका आत्मतत्त्वाचें यथार्थ ज्ञान झाल्यानें चित्तसत्ता अजिबात नष्ट होते. यास्तव जीव, अंतःकरण, मन इत्यादि नांवांनीं प्रसिद्ध असलेलें चित्तच संसाराला कारणीभूत होतें, असा अधिकारी पुरुषानें नित्य विचार करावा.

श्रीरामः—प्रभो! चित्ताला या जीवादि संज्ञा कशा रूढ झाल्या, हें माझ्या विचाराची सिद्धी होण्यासाठीं मला कृपा करून सांगावें.

श्रीवसिष्ठः—राघवा! ज्याप्रमाणें एकाच जलापासून तरंगादि भेद उत्पन्न होतात, त्या-प्रमाणें आत्मतत्त्वैकरूप अशा समष्टिचित्तापासून —हिरण्यगर्भापासून हे सर्व पदार्थ उत्पन्न होतात. ज्याप्रमाणें समुद्राचें पाणी लाटामध्यें क्वचित् स्थिर रूपानें वाटत असतें, त्याप्रमाणें स्फुरणे-

करूप आत्मा जगांतील स्थावर पदार्थांच्या ठिकाणीं स्थिररूपानें स्थित वाटतो. तरंगत्वाला न पोहोंचलेल्या जलाचे ठिकाणीं जलभाव असतो, तद्वत् भूतपदार्थांचे ठिकाणीं पाषाणादि जड भाव स्थित झालेले असतात व दारूवर फेंस उत्पन्न होतो, त्याप्रमाणें आत्म्याचे ठिकाणीं चंचल असे पुरुषादि भाव उत्पन्न झाले आहेत. तो आत्मा निरनिराळ्या शरीरांमध्यें अज्ञानकल्पना करून मलय व सुषुप्ति ह्या अवस्थांमध्यें स्थित असतो. अनंत अशा प्रतिबिंबभावाला प्राप्त झालेल्या आत्म्याच्यायोगानें स्फुरित असें जें अज्ञान त्यालाच जीव असें म्हणतात. एखादा भ्रमिष्ट झालेला हत्ती आपोआप पिंजऱ्यांत अडकला जातो, त्याप्रमाणें महामोहरूपी भ्रमानें भ्रमलेला हा जीव संसारांत अडकून पडतो. ह्या आत्म्यालाच प्राणधारणेमुळें जीव, अहंतेमुळें अहंकार, निश्चय करण्यामुळें बुद्धि आणि संकल्प करीत असल्यामुळें मन अशीं नांवें मिळालीं आहेत. कार्यकारणभावामुळें आत्म्याला प्रकृति हें नांव प्राप्त झालें असून पुष्टतेमुळें त्याला देह ही संज्ञा मिळाली आहे. अज्ञानांशप्राधान्यामुळें जड व चित्प्राधान्यामुळें त्याला चेतन हें नामाभिधान प्राप्त झालें आहे. जड आणि चेतन या दोन दृष्टींच्यामध्यें जें प्रतिबिंबयुक्त मन आहे, तें नानात्वाला प्राप्त होतें व तेंच बुद्धि, चित्त, अहंकार इत्यादि नानाविध संज्ञांनीं संबोधिलें जातें. निष्पापा रामा ! याप्रमाणें बृहदारण्यकादि उपनिषदांमधून जीवाच्या स्वरूपाचें अनेक प्रकारांनीं वर्णन करण्यांत आलें आहे. परंतु आत्म्याच्या ह्या चित्त, जीव इत्यादि संज्ञांच्या बाबतींत कुविकल्प आणि कुतर्क लढविणारे मूढ लोक व्यर्थ अभिनिवेश धारण करतात !

महापराक्रमी रामा ! याप्रमाणें हा जीव संसाराला कारण होत असतो. पण वास्तविकपणें पाहूं गेलें तर मुक्या आणि जड अशा या गरीबबिचाऱ्या देहानें काय केलें आहे ? आधार व आधेय यांपैकीं आधेयाचा नाश झाला असतां आधाराचा नाश होत नाहीं, त्याचप्रमाणें देहादिकांचा नाश झाल्यानें आत्म्याचा नाश होत नाहीं. वृक्षावरील एका पानांतील रस सुकला, तरी त्यांतील रस नष्ट होत नाहीं, तर तो सूर्यकिरणामध्यें मिळून जातो तद्वत् देह नष्ट झाला तरी आंतील जीवाचा नाश होत नाहीं; जर तो जीव वासनायुक्त असेल तर तो वासनारूप बनतो व निर्वासन असेल तर आत्मपदाचे ठिकाणीं कायमचा स्थिर होतो. एखाद्या बालकाला मातेच्या स्तनापासून वेताळ उत्पन्न झाल्याचा भ्रम व्हावा, तद्वत् अप्रबुद्ध मनुष्याला देहनाश झाला असतां 'मीच मेलों' असा भ्रम उत्पन्न होतो. ज्याच्या ठिकाणच्या सकल उपाधींचा आत्यंतिक नाश झाला आहे, त्याचा उदय झाला, म्हणजे, त्याला निरतिशयानंदाचा लाभ झाला असेंच ज्ञाते पुरुष समजतात. कारण, चित्तनाशालाच खरा नाश असें म्हणतात, व त्यालाच परमपुरुषार्थरूपी मोक्ष ही संज्ञा दिली जाते. एवंच, देह नष्ट झाला म्हणजे जीवहि नष्ट झाला अशी जी अज्ञानामुळें भावना होते, ती निःसंशय भ्रामक आहे. तो जीव देशकालांतरानें पुनःपुन्हां कोणत्या ना कोणत्या तरी देहाचा आश्रय करून उत्पन्न होतो. मरणरूपी नदीमधील तरंगांमध्यें तृणाप्रमाणें फिरत राहणाऱ्या लोकांनीं संसारांत देशकालादि कारणांनीं अंतर्धान पावणारा जीव उत्पन्न झाला, वृद्धि पावला, मृत झाला, नष्ट झाला इत्यादि अनेक तर्कवितर्क केलेले आहेत. ज्याप्रमाणें वानर एका वृक्षाचा त्याग करून दुसऱ्या वृक्षावर

जाऊन बसतें, त्याचप्रमाणें वासनाबद्ध जीव एक शरीर सोडून दुसरें शरीर धारण करतो, व पुन्हां त्याहि शरीराचा त्याग करून राघवा! क्षणांत दुसऱ्या एखाद्या देशांत आणि कालांत जाऊन तेथें दुसऱ्या एखाद्या शरीराचें ग्रहण करतो. सारांश, ज्याप्रमाणें लहान मुलें दाई-कडून हिंडविलीं जातात, त्याचप्रमाणें या जगांतील जीव अत्यंत धूर्त अशा वासनेकडून इतस्ततः फिरविले जातात. वासनारूपी रज्जूंनी बद्ध झालेले जीव अगोदरच पर्वतांच्या दऱ्यांतून जीर्ण झालेले असून सांप्रतहि एकमेकावर उपजीविका करणारे ते जीव अतिशय दुःखांनी जर्जर होऊन आपलें जीवित व्यर्थ जीर्ण करून घेत आहेत! सारांश, आपल्या हृदयामध्य उत्पन्न झालेल्या वासनाच्या योगानें जरठापेक्षाहि जरठ झालेली आणि दारिद्र्यरोगादि दुःखभारामुळें जीविताला कंटाळलेली अशी जनता चिरकाल नरककूपामध्यें जाऊन पडते.

श्रीवाल्मीकिः—याप्रमाणें वसिष्ठ मुनींचें भाषण होत आहे तों संध्याकाळची वेळ झाली व आपला सायंकाळचा नित्यविधि जणुं आटोपण्याकरितांच कीं काय, सूर्य अस्तास गेला. त्याबरोबर सभेंतील सर्व श्रोते वसिष्ठ मुनींना नमस्कार करून आपापलीं स्नानसंध्यादि विहितकर्मे करण्यासाठीं निघून गेले व रात्र सरल्यानंतर पुन्हां दुसऱ्या दिवशीं सकाळीं सूर्यकिरणांबरोबर सभास्थानीं येऊन दाखल झाले.[1]

**तेरावा दिवस समाप्त.**

---

१. हा ७२ वा श्लोक आणि ४६ सर्गाचा शेवटचा ४६ वा श्लोक अगदीं एकसारखे आहेत.

# सर्ग ७२

१. शरीर भौतिक असल्यामुळें त्याबद्दल शोक करणें अयुक्त आहे. २. दृश्य व दर्शन यांचा संबंध व आत्म्याचें शुद्ध साक्षिस्वरूप.

श्रीवसिष्ठः—रामा! तूं निष्कलंक आत्मा असून देह हा तुझा कोणी नसल्यामुळें देह उत्पन्न झाला असतां तूं उत्पन्न होत नाहींस व नष्ट झाला असतां तूं नष्ट होत नाहींस. ज्याप्रमाणें भांडें नाहींसें झालें असतां त्यांतील बोर नाहींसें होत नाहीं, किंवा घट फुटला असतां त्यांतील आकाश नष्ट होत नाहीं, त्याचप्रमाणें देह नष्ट झाल्याबरोबर आत्माहि नष्ट होतो, अशी कल्पना करणें व्यर्थ आहे. स्वभावतःच नाशिवंत असा हा देह नष्ट होऊन आंतील जीव स्वस्थितीला प्राप्त झाला असतां 'मी मेलों' असें समजून खेद करणाऱ्या विचारांध मनुष्याला धिक्कार असो! ज्याप्रमाणें घोड्यांचे लगाम आणि रथ यांचा संबंध स्नेहरहित आणि उद्वेगरहित असतो, त्याचप्रमाणें देहेंद्रियें आणि मन यांचा चिदात्म्याशीं संबंध असतो. राघवा! ज्याप्रमाणें सरोवरांतील चिखल आणि त्यांतील स्वच्छ पाणी यांचा परस्परनिरपेक्ष संबंध असतो, त्याचप्रमाणें देहेंद्रियें आणि आत्मा यांचा संबंध असतो. एखादा मार्ग आणि त्यावरून प्रवास करणारे पांथस्थ लोक यांचा संयोग अहंममताभिमानरहित असतो व त्यांचा वियोग खेद करण्याला अयोग्य असतो, तद्वत् देह आणि आत्मा यांच्या संयोगवियोगांची गोष्ट आहे. अर्थात्, कल्पित अशा वेताळाच्या योगानें बालकाच्या मनाला होणाऱ्या भय, कंप इत्यादि विकारांप्रमाणें स्नेह, सुख इत्यादि विकार मिथ्या कल्पित आहेत. ज्याप्रमाणें एकाच झाडाच्या लांकडापासून अनेक प्रका-

रच्या चित्रविचित्र बाहुल्या तयार होतात, त्याचप्रमाणें एका भूतपंचकापासूनच निरनिराळे देह निर्माण करण्यांत आले आहेत. एखाद्या लांकडाच्या ओझ्यांत लांकडांवांचून दुसरें कांहींहि दृष्टीस पडत नाहीं, तद्वत् या देहामध्यें पंचमहाभूतांवांचून दुसरें कांहीं आढळून येत नाहीं. अशी वस्तुस्थिति असतां अहो लोकहो! पंचमहाभूतांचा क्षोभ, नाश किंवा उद्भव झाला असतां क्रोध, हर्ष, खेद इत्यादि विकारांना तुम्हीं कां बरें वश होतां? ज्याप्रमाणें एखादा पतंग दीपाच्या ज्योतीवर झडप घालतो, त्याप्रमाणें स्त्रीनामक किंवा इतर अनित्य भूतसमुदायाचे ठिकाणीं अज्ञ लोक मोहित होतात, हे केवढें आश्चर्य आहे! सुकुमार आणि सुंदर अशा अवयवांच्या योगानें बनलेल्या भूतसमुदायावर आसक्त होणें हें अज्ञ लोकांना मात्र सुख देण्याला कारणीभूत होतें. परंतु जे ज्ञानी पुरूष असतात, ते देह कितीहि सुंदर असला तरी तो भूतपंचकाचाच संघात आहे असें जाणतात. दगडाच्या दोन मूर्ती एकमेकांना चिकटून ठेवल्या किंवा एकाच पाषाणामध्यें दोन मूर्ती खोदल्या, तथापि त्यांच्यामध्यें प्रेम उत्पन्न होणें शक्य नसतें, तद्वत् चित्त आणि शरीर हीं जरी एकमेकांना चिकटलेलीं असलीं तरी त्यांच्यामध्यें प्रेम उत्पन्न होणें शक्य नाहीं. मातीचे बनविलेले पुतळे एकमेकांशेजारीं ठेवले तरी त्यांच्यामध्यें स्नेहभाव उत्पन्न होणें कधींहि संभवनीय नसतें, त्याचप्रमाणें ज्ञानेंद्रियें, मन, बुद्धि, चित्त यांचा तुझ्या ठिकाणीं संगम झाला असला, तरी तुझ्या ठिकाणीं त्यांच्याबद्दल स्नेहभाव उत्पन्न न होवो. ज्याप्रमाणें पाषाणाचे बनविलेले पुतळे एकमेकांशेजारीं असले तरी ते एकमेकांच्या स्नेहसंबंधाला पात्र होत नाहींत, त्याचप्रमाणें देह, इंद्रियें, प्राण आणि मन हीं एकमेकांशीं संबद्ध असलीं तरी तीं स्नेहसंबंध होण्याला पात्र नाहींत; मग त्याबद्दल विनाकारण दुःख करण्यांत काय अर्थ आहे? ज्याप्रमाणें जलप्रवाहामध्यें उत्पन्न झालेले तरंग इकडून तिकडून वहात आलेल्या गवताच्या काड्यांना एकत्र करतात, त्याचप्रमाणें देहाचें साक्षित्व करणारा चिदात्मा भूतांना एकत्र करतो. समुद्रांतील पाण्यामध्यें गवताच्या काड्या एकत्र होतात आणि पुनःपुन्हां वेगळ्या होतात, त्याचप्रमाणें विषयाभिनिवेशरहित देहाच्या ठिकाणीं आणि तदधिष्ठानभूत आत्म्याचे ठिकाणीं पंचमहाभूतें एकत्र होतात आणि पुनः पुन्हां दूर होतात. ज्याप्रमाणें समुद्र हा भोंवऱ्याच्या रूपानें इतस्ततः वहात येणाऱ्या तृणांचें आकर्षण करतो, त्याचप्रमाणें आत्मा हा चित्ताचा वेष धारण करून देह आणि पंचमहाभूतें यांना आकर्षित करून स्थित असतो. पाण्यावरील लाटांमुळें उत्पन्न होणारी खळबळ शांत झाली, म्हणजे आपणामधील मलाचा त्याग करून पाणी आपोआप निर्मळ होतें, तद्वत ज्ञान उत्पन्न होतांच विषयतादात्म्याचा त्याग करून आत्मा स्वभावतःच स्वस्वरूपाला प्राप्त होतो. ज्याप्रमाणें वायुमंडलावर आरूढ झालेला योगी आपणापासून अतिशय दूर असलेल्या देव वगैरे भूमंडलाला अवलोकन करतो, त्याचप्रमाणें ज्ञानोदयकालीं भूतसमुदायाशीं मनाच्यायोगें झालेला संबंध अजिबात तोडून टाकून आत्मा देहाला आपल्यापासून अतिशय दूर असलेला पाहतो व अशा रीतीनें भूतगणाहून अगदीं निराळा झालेला, देहातीत आणि जन्मादि विकाररहित असा आत्मा मध्यान्ह काळच्या सूर्याप्रमाणें अत्यंत प्रकाशमान होतो. ज्याप्रमाणें एखादा मद्यपी मदिरेची धुंदी उतरली म्हणजे भानावर येऊन आपल्या पूर्वस्थितीला ओळखतो, त्याचप्रमाणें ज्या ज्या ठिकाणची देहात्मभावाची धुंदी उतरली काहे,

अशा तऱ्हेचा आत्मा प्रमाणप्रमेयशून्य अशा आत्मस्वरूपाला आपोआप ओळखतो. समुद्राच्या ठिकाणीं तरंग, बिंदू, लाटा इत्यादि अनंतरूपानें समुद्राचें जल विलास करीत असतें, तद्वत् विश्वांतील अनंत वस्तूंच्या रूपानें आत्माच विलसत असतो.

अशा रीतीनें विचार करणार महाज्ञानी, वैराग्यशील, निष्पाप आणि जीवन्मुक्त असे महात्मे महासत्त्वपदावर आरूढ होऊन या जगांत खुशाल संचार करीत असतात. ज्याप्रमाणें नानाविध मणिरत्नादिकांनीं गच्च भरलेल्या समुद्रांतील मोठमोठ्या लाटा त्यापासून सर्वथा अलिप्त असतात, त्याप्रमाणें वासनायुक्त झालेले श्रेष्ठ पुरूष जगामध्यें व्यवहार करीत असले, तरी त्यापासून कव्हांहि अलिप्तच असतात. तीरावरील लाकडामुळें समुद्र किंवा धुळीमुळें आकाशतल मलिन होत नाहीं, त्याचप्रमाणें प्रवाहपतित अशा लोकव्यवहारामुळें आत्मज्ञानसंपन्न पुरुष कव्हांहि मलिन होत नाहीं. ज्याप्रमाणें स्वच्छ व चंचल किंवा मलिन आणि जड पदार्थ आपणामध्यें आल्यागेल्यानें त्याबद्दल समुद्राला प्रेम किंवा द्वेष वाटत नाहीं, त्याचप्रमाणें तत्त्ववेत्त्या पुरुषाला बरे वाईट विषयोपभोग प्राप्त झाले किंवा न झाले, तरी त्यापासून त्याच्या ठिकाणीं हर्ष किंवा विषाद उत्पन्न होत नाहींत. कारण, जगांतील सर्व वस्तूंसंबंधानें मनाचें जे मनन चाललेलें असतें, तो विषयोन्मुख झालेल्या चित्तत्त्वाचा विलास आहे, असेंच महात्मे समजत असतात. या जगांत पूर्वी, आज व पुढें उत्पन्न होणारा 'मी' व इतर वस्तुजात हें दृश्यदर्शनसंबंधाच्या विस्तारामुळें भासमान होत असून तो सर्व मनाचाच विलास आहे. दर्शन आणि दृश्य यांच्यामध्यें जें दृश्य आहे, तें जशी दृष्टि असेल त्याप्रमाणें स्फुरत असल्यामुळें तें सत्य आहे कीं असत्य आहे याचा निर्णय करतां येत नाहीं, म्हणून त्याच्याबद्दल हर्षशोक करणें योग्य नाहीं; व त्रिपुटीरहित असें जें केवळ दर्शन आहे, तें स्वसंवेद्य असून निर्लेप आणि असंग आहे; अर्थात्, त्याच्याबद्दल हर्षशोक करण्याचें तर मुळींच कारण नाहीं. जगांतील सर्व विषय हे सद्रूप आहेत, असद्रूप आहेत किंवा सदसद्रूप आहेत, यांपैकीं कोणताहि पक्ष स्वीकारला तरी त्यांच्याबद्दल हर्षशोक करण्याचें कारण नाहीं, असेंच सिद्ध होतें. जें सत्य आहे तें त्रिकालाबाधित असतें व जें असत्य असतें तें विनाशी असतें. यामुळें विषय हे सत्य आहेत किंवा असत्य आहेत असें मानलें, तरी त्याच्याबद्दल हर्षशोक करण्याचें कारण उरत नाहीं. आतां विषय हे अंशतः सत्य आणि अंशतः असत्य आहेत असें मानलें, तरी सुद्धां सत्यासत्याच्या मिश्रणानें बनलेले हे विषय असद्रूपच ठरतात. अशा स्थितींत तूं या विषयांकरितां इतका शोक कां करतोस? सुलोचना रामा! तू असम्यग्दृष्टीचा त्याग करून सम्यग्दृष्टीनें पहात जा. सम्यक्ज्ञानदृष्टीनें संपन्न असलेला पुरुष या जगांतील विषयांकडे पाहून केव्हांहि मोहित होत नाहीं. दृश्य आणि दर्शन यांच्या संबंधविस्ताराच्या योगानें ब्रह्मच विलास करीत असतें. परंतु दृश्य आणि दर्शन यांच्या संबंधामध्यें जें स्वानुभववेद्य सुख असतें, तेंच पारमार्थिक सुख असून त्यालाच ब्रह्म असें म्हणतात. दृश्य आणि दर्शन यांच्या संयोगामध्यें जी अत्युत्कृष्ट सुखकारक अशी संवेदना असते, तीच अज्ञ पुरुषाला प्रेमादिदोष उत्पन्न करून संसार प्राप्त करून देते, परंतु तीच ज्ञानी पुरुषाला विवेकाच्या योगानें आत्म्याशीं अखंड तादात्म्य करून मोक्ष प्राप्त करून देते. दृश्य आणि दर्शन यांच्या संयोगाचे ठिकाणीं जें पारमार्थिक सुख असतें, तेंच आत्म्याचें वास्त-

विक स्वरूप असा तत्त्ववेत्त्यांचा सिद्धान्त आहे. दृश्याला वश होणें म्हणजेच बंधन असून त्यांतून मुक्त होण्याच्या स्थितीला मुक्ति असें म्हणतात. दृश्य आणि दर्शन यांच्या संबंधामुळें उत्पन्न होणाऱ्या सुखसंवेदनेचा स्वानुभवानें पूर्ण क्षय झाला, म्हणजे त्याच स्थितीला पंडितांनीं मुक्ति हें नांव दिलेलें आहे. यास्तव रामा ! दृश्यदर्शनसंबंधामध्यें जो नित्य, त्रिपुटीरहित, स्वसंवेद्य आणि पूर्णानंदात्मक असा अनुभव येत असतो, त्याचाच आश्रय करून तूं भवबंधांतून मुक्त हो. राघवा ! दृश्यदर्शनसंबंधातील त्रिपुटीचें भान नाहीसें होऊन जें स्वसंवेद्य सुख अवशिष्ट राहतें, त्यालाच ‘ सौषुप्तिदृष्टि ’ असें म्हणतात. ही सौषुप्तिदृष्टि—निर्विकल्पज्ञानस्थिति नेहमीं स्वयंप्रकाशमान असते. दृश्यदर्शनभावरहित अशा योगसिद्ध आणि परमश्रेष्ठ बुद्धीचा आश्रय केल्यामुळें आत्मज्ञानी पुरुष तुर्यावस्थेप्रत किंवा मुक्तस्थितीप्रत जाऊन पोहोंचतो. बा राघवा ! दृश्यदर्शनभावरहित अशा तुर्यावस्थेमध्यें तत्त्ववेत्त्याला आत्मा हा स्थूल नाहीं, अणुरूप नाहीं, प्रत्यक्ष नाहीं, अप्रत्यक्ष नाहीं, चेतन नाहीं, जड नाहीं, असद्रूप नाहीं, सद्रूप नाहीं, मी नाहीं, इतर कोणी नाहीं, एक नाहीं, अनेक नाहीं, किंवा अनेकांनीं युक्त नाहीं, समीप नाहीं, दूर नाहीं, आहे असें नाहीं, नाहीं असें नाहीं, तो प्राप्य आहे असें नाहीं, अप्राप्य आहे असेंहि नाहीं, सर्व नाहीं, सर्वव्यापी नाहीं, पदार्थरूप नाहीं, अपदार्थरूप नाहीं, पंचमहाभूतांचा नाहीं, तसेंच पंचमहाभूतस्वभाव नाहीं, अशा तऱ्हेचा अनुभव येतो. ज्ञानेंद्रियें आणि मन यांच्यायोगानें जें दृश्य जग अनुभवाला येतें, त्याच्या पलीकडे आत्मा असून त्याचें स्वरूप अमुक एक प्रकारचें आहे, अशा तऱ्हेचें निश्चित वर्णन करतां येणेंच शक्य नाहीं. ज्या पुरुषाला आत्मबोध झाला आहे, ज्याच्या ठिकाणीं सम्यक् ज्ञानाचा उदय झाला आहे, त्याला हें जग आत्मरूपच दिसतें. हें सर्व विश्व आत्ममय आहे; अनात्ममय असें या जगांत कांहींच नाहीं. पृथ्वी, जल, अग्नि, वायु, आकाश ह्या पंचमहाभूतांमध्यें कठिणपणा, पातळपणा, प्रवाहीपणा, स्पंदरूपता, आकाशरूपी महान् छिद्रांतील पोकळी, प्रकाशरूपता इत्यादि रूपांनीं या जगामध्यें आत्माच नटलेला आहे. रामा ! या जगांत चिच्छक्तीवांचून दुसऱ्या कोणत्याहि शक्तीला अस्तित्व नाहीं. या चित्च्या सत्तेहून ‘मी निराळा आहे’ असें जो म्हणतो, त्याच्या भाषणाची किंमत एखाद्या उन्मत्त माणसाच्या बरळण्याइतकीच आहे ! यास्तव महात्म्या रामा ! अनंत कल्पांमध्यें उत्पन्न होणाऱ्या आणि नष्ट होणाऱ्या अखिल विश्वांमध्यें आत्माच परिपूर्ण भरलेला आहे, आत्म्यावांचून दुसरी कोणत्याहि प्रकारची कल्पना संभवत नाहीं, अशा रीतीनें आपल्या बुद्धीचा ठाम निश्चय कर आणि त्या निश्चयाच्या बळावर हा संसारसागर लीलेनें तरून जा.

---

## सर्ग ७३

—:०:—

१. ग्रहण करण्याला योग्य अशा दोन अहंभावना. २. तिसरी त्याज्य अहंभावना. ३. तिन्ही अहंभावनांचा त्याग झाल्यावर इच्छा नसली तरी मुक्तीची प्राप्ति.

श्रीवसिष्ठः—राघवा ! याप्रमाणें विवेकदृष्टीचा आश्रय करून द्वैतभावनेचा सर्वथा त्याग झाला, म्हणजे चिंतामणीचें ज्ञान असलेल्यांना चिंतामणीची प्राप्ति व्हावी, त्याचप्रमाणें अतत्त्वज्ञ पुरुषांना स्वस्वरूपस्थितिरूपी मुक्ति प्राप्त होते. रामा ! आतां ज्या श्रेष्ठ दृष्टीचा आश्रय केल्यानें तूं दिव्य ज्ञानानें संपन्न होऊन अचल सुखा

आत्मपदाप्रत जाऊन पोहोंचशील, अशी ही दुसरी दृष्टि ऐक. मी आकाश आहें, मी सूर्य आहें, मी दशदिशा आहें, मी पाताल आहें, दैत्य मी आहें, देवही मीच आहें, स्वर्गादि लोक मी आहें, चंद्रादिकांची प्रभा मी आहें, दिवस मीच असून रात्रही मीच आहें, अभ्रें मी आहें, मी पृथ्वी आहें व समुद्रादिक मीच आहें, रजःकण, वायु, अग्नि व हें अखिल दृश्य मीच आहें, जगत्त्रयामध्यें मी आत्माच सर्वत्र आहे. मी कोण आहें? हे देहादिक कोण आहेत? सर्व भूतांच्या अंतर्यामीं असणारा जो मी त्या मजमध्यें देहादिकांचें द्वैत कोठून असणार? अशा रीतीनें अंतर्यामीं निश्चय करून तूं आत्म्याच्या दृष्टीनें हें सर्व जग अवलोकन कर, म्हणजे हर्षविषादांना वश होण्याचें तुला या जगांत पुन्हां केव्हांहि कारण उरणार नाहीं. बा कमलनेत्रा रामा! सर्व जग आत्ममय झाल्यानंतर आपलें आणि दुसऱ्याचें असें या जगांत काय उरणार आहे सांग बरें? मग प्रारब्धानुरूप हर्ष प्राप्त होवो किंवा विषाद प्राप्त होवो, त्यांतसुद्धां आत्म्यावांचून दुसरें काय असणार? ज्याला जगासंबंधानें विषाद उत्पन्न होतो, तो पूर्ण चिन्मय झाला नाहीं असेंच निःसंशय ठरतें. रामा! मीं आतां ज्या दोन प्रकारच्या अहंभावना तुला सांगितल्या, त्या अत्यंत सात्त्विक, निर्मल, तत्त्वज्ञानापासून उत्पन्न झालेल्या, पारमार्थिक आणि मोक्षप्रद अशा आहेत. सर्व नामरूपात्मक जगताच्या पलीकडे असलेला जो अणुरूप आत्मा तेंच माझें वास्तविक स्वरूप आहे, ही पहिल्या प्रकारची अहंभावना असून जें जें आहें तें तें मीच आहें, ही दुसऱ्या प्रकारची अहंभावना होय. रघुकुलोद्धारा निष्पापा रामा! देह हेंच माझें वास्तविक स्वरूप आहे, ही तिसरी अहंभावना असून ती शांतिप्रद नाहीं व जीवाला निरंतर दुःख देण्याला कारणीभूत होते, हें लक्षांत ठेव. आतां आपल्याला पूर्ण स्थिति प्राप्त व्हावी असें जर तुला वाटत असेल, तर या तिन्ही अहंभावनांचा सर्वस्वी त्याग करून पूर्ण चिन्मात्र असें जें स्वरूप अवशिष्ट रहातें, त्याचा अवलंब कर आणि त्याच स्थितिमध्यें अखंड राहण्याचा अभ्यास कर. रामा! तुझें स्वरूप सर्वांच्या पलीकडे असून तें सर्व सत्तांच्या अतीत आहे, तथापि हें सर्व जग असद्रूप असून आत्मा हा त्याला प्रकाशित करतो. तत्त्ववेत्त्यांमध्यें श्रेष्ठ असणाऱ्या रामा! सकल वासनांसहवर्तमान अहंकाररूपी हृदयग्रंथि तोडून टाकून स्वानुभवाच्या योगानें तूं आपलें स्वरूप पाहूं लाग, म्हणजे नित्य आणि स्वयंप्रकाश आत्मा हेंच आपलें स्वरूप आहे, असें तुझ्या अनुभवास येईल. आप्तवाक्यांच्या योगानें किंवा आत्म्यासंबंधानें केवळ अनुमान करण्यानें तो प्राप्त होत नाहीं, तर तो स्वानुभवानें प्राप्त करून घ्यावयाचा आहे. या जगांत जर कांहीं प्रत्यक्ष असेल, तर तो फक्त आत्माच असून अनुभवाच्या योगानें तो सर्वदां, सर्वत्र, सर्व दृश्य जगद्रूपानें प्रतीतीला येतो. विषयादिकांचा जो जो म्हणून प्रत्यय येतो, आपल्या अंतःकरणाचें वृत्तिरूपानें जें जें म्हणून स्पंदन होतें, अनुमान, अनुमेय इत्यादिकांच्या योगानें जी जी म्हणून संवेदना होते, तो तो सर्व दृश्यदर्शनभानरहित असा भगवान् आत्माच आहे. हा आत्मदेव सद्रूप नाहीं व असद्रूप नाहीं, अणूप्रमाणें सूक्ष्म नाहीं व आकाशाप्रमाणें स्थूल नाहीं; तो सदसदात्मकदृष्टींच्या मध्यावरही नाहीं; तर हें नामरूपात्मक जग तोच स्वतः बनलेला आहे. वाणी आदिकरून सर्व कर्मेंद्रियांची प्रवृत्ति त्याच्यामुळें होते, परंतु तो आत्मा मात्र वाणी आदिकरून इंद्रियांचा विषय होऊं शकत नाहीं. बाळा! रामा! त्या आत्म्याहून हें जग वस्तुतः भिन्न नाहीं,

वास्तव हें जग निरुपाधिक आणि आत्ममय आहे, असेंच पहात जा. ‘ हा आत्मा ’ आणि ‘ हा अनात्मा ’ अशा तऱ्हेच्या निरनिराळ्या संज्ञा त्या आत्म्यानें आपल्या सर्वव्यापी मायाशक्तीच्या योगानें आपणामध्यें कल्पिलेल्या आहेत. हा स्वयंप्रकाश आत्मा तिन्ही काळांमध्यें व सर्व ठिकाणीं व्यापून राहिलेला आहे, परंतु तो सूक्ष्माहून सूक्ष्म आणि स्थूलाहूनहि स्थूल असा असल्यामुळें स्थूलबुद्धि मनुष्यांना आकलन करण्याला अशक्य झाला आहे. या जगांत उत्पन्न झालेल्या अनंत पदार्थांच्या ठिकाणीं आत्मा स्थित असला, तरी आपल्या स्वभावाला वश होऊन तो पुर्यष्टक म्हणजे लिंगदेहरूपी आरशांत स्वतः जीवरूपानें प्रतिबिंबित होतो; व यामुळें स्थूल विषयांच्या ठिकाणीं त्याची आसक्ति उत्पन्न होते. ज्याप्रमाणें पंखा हालविला म्हणजे आकाशांतील वायु चलित होऊन स्पर्शरूपानें अनुभवास येतो, त्याचप्रमाणें सर्व कालीं आणि सर्व ठिकाणीं स्थिर असणारा हा आत्मा पुर्यष्टकाचा उदय होतांच ‘ अहं ’ या भावनेनें व्यक्त दशेला येतो. सर्वगत आणि सर्वव्यापी असा चिदात्मा अमुकच ठिकाणीं आहे, असें केव्हांहि म्हणतां येणार नाहीं; तर जोंपर्यंत सर्व पदार्थांची सत्ता आहे, तोंपर्यंत तो महेश्वर आत्मा आहेच; परंतु त्या आत्म्याचें पुर्यष्टकामध्येंच जीवरूपानें प्रतिबिंब पडतें, पाषाणामध्यें पडत नाहीं. कारण, वायु असला तरच त्याच्यामध्यें रजःकण स्फुरण पावतो किंवा दिवा असला तरच नेत्राला दिसूं शकतें, तद्वत् सूक्ष्म देह असेल तरच त्याच्यामध्यें आत्म्याचें जीवरूपानें प्रतिबिंब पडतें. सूर्य उदित झाला असतां जनता आपल्या इच्छेनुरूप व्यवहार करूं लागते, तद्वत् चिदात्म्याच्या सत्तेमध्यें जीवाच्या ठिकाणीं सर्व तऱ्हेच्या विषयभोगेच्छा स्फुरण पावतात. आकाशांत सूर्य उगवला नसेल तर सर्व लोकांचे व्यवहार बंद पडतात ही गोष्ट खरी; परंतु सूर्याचे ठिकाणीं त्यामुळें यत्किंचित्हि विकार उत्पन्न होत नाहीं, तद्वत् बुद्धीच्या ठिकाणीं आत्मदेव स्थित झाला असतां त्याच्या सत्तेमुळें भासमान होणारा देह नष्ट झाला, तरी त्यामुळें आत्म्याची काय हानि होणार? कारण, आत्मा हा कधीं उत्पन्न होत नाहीं आणि मरत नाहीं, आत्मा हा कोणापासून कांहीं घेत नाहीं किंवा घेण्याची कधीं इच्छाहि करीत नाहीं; तसेंच आत्मा हा कधीं बद्ध होत नाहीं आणि मुक्तहि होत नाहीं, तर आत्मा हा सर्वदां सर्व जगाच्या अंतर्बाह्य स्थित असतो. ज्याप्रमाणें दोरीच्या ठिकाणीं सर्पाची भ्रांति व्हावी, त्याचप्रमाणें अबोधामुळें अनात्मवस्तूंच्या ठिकाणीं आत्मभ्रांति उत्पन्न होत असून ती केवळ दुःखालाच कारणीभूत होते. परंतु आत्मा हा अनादि आणि अनंत असल्यामुळें तो केव्हांहि उत्पन्न होत नाहीं आणि उत्पन्न झालेला नसल्यामुळें केव्हांहि मरत नाहीं; तसेंच आत्म्याव्यतिरिक्त या जगांत कोणतीच वस्तु नसल्यामुळें तो कोणत्याहि वस्तूची कधीं इच्छा करीत नाहीं. आत्मा हा देशकालादिकांनीं परिच्छिन्न होत नसल्यामुळें तो केव्हांहि बद्ध होत नाहीं; व अशा रीतीनें बंधाचाच अभाव असल्यामुळें आत्म्याला मुक्ति तरी कसली प्राप्त व्हावयाची? अर्थात्, आत्म्याची स्थिति केव्हांहि बंधमोक्षांच्या अतीत असते. बा राघवा! आत्म्याची वास्तविक स्थिति अशी असतां केवळ अविचारामुळें हे मूढ लोक विनाकारण शोक करीत सुटतात. परंतु बुद्धिवंता रामा! तूं पूर्वापरजगत्क्रमाचें सम्यक्दृष्टीनें अवलोकन केलेलें असल्यामुळें मोहानें ग्रस्त झालेल्या प्राकृत लोकांप्रमाणें व्यर्थ शोक करीत बसूं नकोस. बंध आणि मोक्ष ह्या दोन्ही कल्पना मनानें टाकून देऊन आत्मज्ञानाच्या योगानें प्राप्त

होणारी मुनिवृत्ति धारण करणाऱ्या विद्वान् पुरुषानें देहादिकांचे सर्व व्यवहार यंत्राप्रमाणें करीत जावे. अर्थात्, ज्याप्रमाणें एखाद्या पर्वतावरील पवनचक्कीच्या योगानें दळण्याचीं वगैरे कामें आपोआप होत असतात, त्याचप्रमाणें तत्त्ववेत्त्यानें आपली बुद्धि अनासक्त ठेवून सर्व व्यवहार करावे. रामा ! मोक्ष हा कांहीं कोठें आकाशांत, पाताळांत, किंवा पृथ्वीवर आहे असें नाहीं; तर सम्यक्ज्ञानाच्या योगानें आत्मस्वरूपाप्रत जाऊन पोहोंचलेल्या मनाची निर्मल स्थिति म्हणजेच मोक्ष होय. सर्व तऱ्हेच्या आशांच्या ठिकाणीं अनासक्त बुद्धि उत्पन्न होणाऱ्या चित्ताच्या नाशालाच तत्त्वज्ञ आणि आत्मदर्शी पुरुषांनीं मोक्ष ही संज्ञा दिलेली आहे. रामा ! जोंपर्यंत विमल अशा आत्मज्ञानाचा उदय झाला नाहीं, तोंपर्यंतच अज्ञ मनुष्य दीन मनानें भक्तिपुरःसर मोक्षाची इच्छा करीत असतो. परंतु उत्कृष्ट असें आत्मज्ञान प्राप्त होऊन ज्याचें चित्त चिद्रूप बनलें आहे, असा ज्ञानी पुरुष आत्म्याव्यतिरिक्त दहा मोक्ष प्राप्त झाले तरीसुद्धां त्यांची इच्छा करीत नाहीं मग त्याला एका मोक्षाची पर्वा ती काय वाट-णार! यास्तव राघवा! 'हा मोक्ष' आणि 'हा बंध' अशा प्रकारची क्षुद्र कल्पना टाकून देऊन तूं महात्यागी आणि महासत्त्वरूप हो; आणि अशा तऱ्हेनें ह्या संसारसागराच्या पलीकडे जाऊन पोहोंच. सारांश, बंधमोक्षादि कल्पनांच्या पलीकडे जाऊन तूं अंतर्यामी निःसंग हो; आणि तदनंतर ज्याच्या ठिकाणीं अखिल संपत्ति उदित झालेली आहे असा तूं सगरपुत्रांनीं खणलेल्या समुद्ररूपी मेखलेनें चिन्हित झालेल्या विस्तीर्ण भूमंडलाचें चिरकाल पालन कर.

---

# सर्ग ७४

—:०:—

१. प्रमादामुळें संसाराची भ्रांति व शमामुळें पूर्णता. २. जीवन्मुक्ताच्या अंगच्या गुणांचें विस्तारानें वर्णन.

श्रीवसिष्ठः—रामा! स्त्रीपुत्रादिकांचे रम्य असें मुख दृष्टीस न पडल्यामुळें विरही पुरुषांच्या मनांत स्वाभाविकपणेंच उदासीनता उत्पन्न होते तद्वत् प्रलय आणि सुषुप्ति ह्या अवस्थांमध्यें अज्ञानानें आवृत असलेलें निरतिशयानंदात्मक आणि परमप्रेमास्पद असें स्वस्वरूप अनुभवास येत नसल्यामुळें सृष्ट्युत्पत्ति व जागृति या कालामध्यें आत्म्याच्या ठिकाणीं चिद्विलासरूपी लीलेनें सूक्ष्म व स्थूल असें समष्टिव्यष्टिशरीर उत्पन्न होतें. ज्याप्रमाणें थोडीशी मदिरा प्राशन करताच मनुष्य धुंद होऊन जातो, त्याप्रमाणें समष्टिव्यष्टयात्मक देहद्वयाचे ठिकाणीं अहंभावनेचा अभ्यास झाल्यामुळें स्वतः मिथ्या असूनहि रागलोभमोहादि शेंकडों अनर्थ उत्पन्न करणारी मायारूपी महाशक्ति उदय पावत, व [illegible] भूमीमध्यें पडणाऱ्या नय करणाऱ्या योगानें [illegible] उत्पन्न [illegible] परमात्म्याच्या अन्यथाभावापासून उदित झालेल्या या विकारी मायेच्या योगानेंच हें अखिल विश्व निर्माण झालें आहे. ज्याप्रमाणें समुद्र हा तरंगादि भिन्न भिन्न रूपें धारण करणाऱ्या उदकाच्या योगानें स्फुरण पावतो, त्याचप्रमाणें मन, बुद्धि, अहंकार, वासना, इंद्रियें इत्यादि नामरूपें धारण करणाऱ्या स्वस्वरूपाच्या योगानें आत्माच स्फुरण पावत असतो. चित्त आणि अहंकार या दोहोंमधील द्वैत केवळ शब्दांत आहे, वास्तविक तीं दोन्हीं एकरूपच आहेत, अतएव जें चित्त तोच अहंकार आणि जो अहंकार तेंच मन होय. ज्याप्रमाणें बर्फापासून त्याचा पांढरेपणा निराळा आहे, अशी कल्पना करणें चुकीचें

ठरतें, त्याचप्रमाणें चित्त आणि अहंकार हीं परस्परांहून भिन्न आहेत अशी कल्पना करणें व्यर्थ होय. ज्याप्रमाणें वस्त्राचा नाश होतांच वस्त्राबरोबर त्याचा पांढरपणाहि नाहींसा होतो, त्याचप्रमाणें मन आणि अहंकार या दोहोंतून एकाचा क्षय झाला असतां त्याच्याबरोबर दुसऱ्याचाहि क्षय होतो. यास्तव तुच्छ अशी मोक्षबुद्धि, बंधबुद्धि आणि सर्व एषणा—इच्छा यांचा त्याग, व विवेक आणि वैराग्य यांचा आश्रय करून फक्त मनाचा लय करावा. कारण, 'मला मोक्ष प्राप्त व्हावा' असें चिंतन सुरू झालें, म्हणजे मनाचा उदय झालाच; व मनाची मननक्रिया सुरू झाली. म्हणजे तेंच शरीराकार बनून बहिर्मुख होत असल्यामुळें परिणामीं दुःखाला कारण होतें. आत्मा हा सर्वांच्या पलीकडे असल्यामुळें किंवा सर्वभूतामध्यें वास करीत असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं बंध कसला आणि मोक्ष तरी कसला? रामा! असा विचार करून मनाचें मनन अजिबात बंद करून टाक. ज्यावेळीं आपल्या ठिकाणीं असलेल्या स्पंदनधर्मामुळें वायु हा देहरूपी वृक्षामध्यें चलित होतो, त्याचवेळीं हात, पाय, जीभ इत्यादि अवयवरूपी पल्लव हालूं लागतात. ज्याप्रमाणें वृक्षावरील पल्लवपंक्तिला वायु चलित करतो, त्याचप्रमाणें देहाच्या ठिकाणीं असलेल्या इंद्रियसमूहाला प्राणादि वायु चलित करतात. परंतु चित् ही सर्वव्यापी आणि अत्यंत सूक्ष्म असून ती स्वतः चलित होत नाहीं व दुसऱ्याकडूनहि चलित केली जात नाहीं. ज्याप्रमाणें मोठमोठ्या झंझावातांच्या योगानें मेरुपर्वत चलित होत नाहीं, त्याप्रमाणें चित् स्वतः कधींहि चलित होत नाहीं. आतां या ठिकाणीं कदाचित् अशी शंका उत्पन्न होण्याचा संभव आहे कीं, 'शुद्ध आत्मभावाच्या दृष्टीनें चित् चलित होत नसेल, परंतु वृक्षावरील शाखा हालूं लागल्या म्हणजे वृक्षहि हालूं लागतो, तद्वत सर्वात्मभावाच्या दृष्टीनें चित्त चलित होणें अपरिहार्य आहे.' परंतु ही शंका बरोबर नाहीं. कारण, ज्याप्रमाणें चंचल अशा अनेक प्रतिबिंबांमुळें स्फटिकाची शिला चंचल झालेली दिसली तरी ती वस्तुतः चंचल होत नसते, तद्वत् चितीमध्यें जरी सर्व पदार्थांचीं प्रतिबिंबें पडलेलीं दिसतात, तरी ती आपल्या स्वस्वरूपापासून केव्हांहि च्युत होत नाहीं. इतकेंच नव्हे, तर आपल्या ठिकाणच्या ज्ञानशक्तीमुळें ती या सर्व विश्वांना दीपाप्रमाणें सर्वदा प्रकाशित करते. अशा स्थितींत लोकहो! 'हा देह म्हणजेच मी' 'हीं माझी अंगें' 'हे स्त्री पुत्रादि जन माझे' अशा प्रकारचा मिथ्या परंतु अतिदुःखप्रद असा भ्रम तुमच्या ठिकाणीं कसा उत्पन्न होतो कोण जाणे! यावरून तुमच्या बुद्धी विकृत झालेल्या आहेत असेंच म्हणणें भाग पडतें. अविद्येनें पछाडलेल्या त्या तुमच्या नेहेमींच्या अनित्य दृष्टीमुळें आत्म्याच्या ठिकाणीं कर्तृत्वभोक्तृत्वादि धर्म आहेत असें तुम्हांला वाटतें, व उखर भूमीमध्यें सूर्याच्या किरणांमुळें मृगजळाचा भास उत्पन्न होऊन तहान लागावी, त्याप्रमाणें उत्तरोत्तर भ्रांतीला कारणीभूत होणारी वासना तुमच्या ठिकाणीं उत्पन्न होते. ज्याप्रमाणें तहानेनें व्याकुल झालेल्या हरिणांना वस्तुतः असत्य असणारें मृगजळ खऱ्या जलाप्रमाणें आकर्षित करतें, त्याचप्रमाणें विषयतृष्णेनें व्याकुल झालेल्या अज्ञ पुरुषांना हें कर्तृत्वभोक्तृत्वरूपी मृगजळ आकर्षित करतें. परंतु बा रामा! ज्याप्रमाणें एखादी चांडाळाची मुलगी ब्राम्हणांच्या मुलींत मिसळलेली असतां तिला कोणी ओळखतांच ती तेथून पळ काढते त्याप्रमाणें या वासनेचें खरें स्वरूप समजतांच ती अजिबात नष्ट होते. 'हें मृगजळ आहे' अशा तऱ्हेचें ज्ञान होतांच तें तृषिताला आकर्षित करीनासें होतें, तद्वत् 'ही अविद्या आहे' असें

ज्ञान झाल्याबरोबर ती मनोरूपी मृगाला आकर्षित करीत नाहींशी होते. रामा! दीपाच्या योगानें अंधकार गलित होऊन जिकडे तिकडे प्रकाश पडतो, त्याचप्रमाणें परमार्थवस्तूच्या ज्ञानानें वासना समूळ नष्ट होऊन स्वयंप्रकाश आत्मा प्रगट होऊं लागतो. ज्याप्रमाणें सूर्यकिरणांमुळें दंवाचे बिंदू नाहींसे होतात, त्याप्रमाणें शास्त्र आणि अनुभव यांच्या योगानें अविद्या तत्त्वतः नाहींच असा बुद्धीचा निश्चय झाला, म्हणजे ती आपोआप नाहींशी होते. 'या जडदेहाला विषयोपभोगानें पुष्ट करण्यात काय अर्थ आहे?' असा बुद्धीचा पूर्ण निश्चय झाला, म्हणजे सिंहानें त्याला बद्ध करून टाकणारा पिंजरा फोडून टाकावा, त्याप्रमाणें ज्ञाता पुरुष निरनिराळ्या विषयांच्या बंधनकारक इच्छा उत्पन्न करणारें अज्ञान नाहींसें करून टाकतो; व अशा रीतीनें आशेचा देहाभिमानादिक परिवार मनानें एकदां अजिबात नाहींसा करून टाकला, म्हणजे तत्त्वज्ञ पुरुष अत्यंत सौंदर्यसंपन्न होऊन चंद्राप्रमाणें आल्हादयुक्त बनतो. इतकेंच नव्हे, तर देहाभिमानासह सर्व आशापाश झुगारून दिलेला तत्त्ववेत्ता पर्जन्यानें धुवून स्वच्छ केलेल्या पर्वताप्रमाणें अत्यंत शीतल बनून, अकस्मात् राज्य प्राप्त झालेल्या दरिद्री मनुष्याप्रमाणें परम संतुष्ट होतो; आणि शरदृतूंतील चांदण्यामुळें आकाशतल शोभायमान होतें, त्याचप्रमाणें ज्ञानलक्ष्मीच्या तेजामुळें तो ज्ञानी सर्व जगतांत शोभूं लागतो, व कल्पांताच्या वेळीं समुद्र आपल्या पूर्वीच्या मर्यादेंत मावेनासा होतो, त्याप्रमाणें ज्ञानी पुरुष पूर्वीच्या आत्म्याशीं अभिन्न मानलेल्या देहांत मावेनासा होतो. ज्याप्रमाणें पर्जन्य पडून गेल्यानंतर शरदृतूंत मेघ शांत होतो, त्याचप्रमाणें देहाभिमानाचा त्याग केल्यानंतर ज्ञानसंपन्न पुरुष समुद्राप्रमाणें गंभीर आणि शांत होतो, अभिनिवेशरहित पुरुष उत्कृष्ट धैर्यानें संपन्न होऊन मेरुपर्वताप्रमाणें अत्यंत स्थिर होतो, आणि ज्यांतील इंधन जळून गेलें आहे अशा अग्नीप्रमाणें ज्ञानसंपत्तीच्या अनुपम आणि स्वच्छ तेजामुळें तत्त्ववेत्ता पुरुष शोभायमान होऊं लागतो. ज्याप्रमाणें निर्वात प्रदेशांत असलेला दिवा शांत होतो, त्याचप्रमाणें ज्ञानी पुरुष आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं स्थिर होतो व अमृत प्यायलेला मनुष्य तृप्त होतो, तद्वत् ज्यानें ज्ञानामृत प्राशन केलें आहे असा ज्ञानी पुरुष अत्यंत तृप्त होतो. आंत दिवा लावलेल्या घटाप्रमाणें, मध्यभागीं ज्वाला निघत असलेल्या अग्नीप्रमाणें किंवा आपल्या तेजानें प्रकाशमान होणाऱ्या रत्नाप्रमाणें ज्ञानी पुरुष अंतर्यामीं अत्यंत प्रकाशमान असतो. ज्ञानी पुरुषाच्या ठिकाणीं असलेल्या सम्यक्ज्ञानदृष्टीमुळें आपला आत्मा सर्वात्मक आणि सर्वव्यापी, सर्वेश आणि सर्वनायक, तसेंच सर्वाकार असून वस्तुतः निराकार आहे, असें तो नेहमीं अवलोकन करीत असतो. ज्यामध्यें मदनाच्या बाणामुळें आपलें चित्त बद्ध होऊन चंचल होत असे, अशा त्या मागच्या क्षुद्र दिवसाचें स्मरण होऊन ज्ञान्याला हसूं कोसळतें. विषयी जनांची संगति व विषयानुरंजन यांच्यापासून अत्यंत दूर सरलेला ज्ञानी पुरुष मनांतील देहाभिनिवेशरूपी ज्वर शांत झाल्यामुळें समाधान पावतो आणि पवित्रमानस होत्साता अध्यात्माच्या ठिकाणीं परमप्रीति धारण करून असतो. ज्ञानी पुरुषानें आपल्या वृत्तीला लागलेला वासनारूपी चिखल साफ धुवून टाकलेला असून 'मी बद्ध आहें' अशा प्रकारच्या भ्रमाला त्यानें अजिबात झुगारून दिलेलें असतें. सुखदुःखादि द्वंद्वदोषामुळें उत्पन्न होणाऱ्या भयापासून ज्ञानी पुरुष मुक्त असून तो संसारसागर तरून गेलेला असतो. त्याला ब्रह्मपदाचे ठायीं

अनुत्तम अशी विश्रांति प्राप्त झालेली असून ज्या ठिकाणीं गेलें असतां मनानें, वाणीनें किंवा कर्मानें परत फिरण्याची भीति उरत नाहीं, अशा दुर्लभ परमपदाप्रत तो जाऊन पोहोंचलेला असतो. ज्ञानी पुरुषाचें चारित्र्य आपल्याला प्राप्त व्हावें अशी जगांतील सर्व लोक इच्छा धरतात, परंतु तो स्वतः मात्र कशाचीच इच्छा करीत नाहीं. ज्ञानी पुरुषाच्या आनंदस्थितीची जगातील सर्व लोक स्तुति करतात, परंतु ज्ञानी स्वतः कशाचीहि स्तुति करीत नाहीं. तत्त्वज्ञानसंपन्न पुरुष कोणाला कांहीं देत नाहीं व कोणाचें कांहीं घेत नाहीं, तो कोणाची स्तुति करीत नाहीं, व कोणाची निंदाहि करीत नाहीं, त्याच्या ठिकाणीं विषयवृत्तीचा उदय होत नाहीं, व अस्तहि होत नाहीं, तो केव्हांहि हर्षानें फुगून जात नाहीं व दुःखानें गडबडून जात नाहीं. ज्यानें सर्व कार्यांच्या आरंभांचा, सर्व उपाधींचा आणि सर्व आशांचा मनानें निःशेष त्याग केलेला असतो, अशा पुरुषाला जीवन्मुक्त हें श्रेष्ठ नांव देण्यांत येतें. यास्तव राघवा! ज्याप्रमाणें सर्व पर्जन्यधारांचा त्याग केल्यानंतर आकाशांतील मेघ गर्जत नाहीं, त्याचप्रमाणें सर्व एषणांचा त्याग करून तूं मनानें मुनिवृत्ति धारण कर. बाळा रामा! जिचें सर्व तत्त्ववेत्त्यांनीं श्रेष्ठत्वानें वर्णन केलेलें आहे, अशा तऱ्हेची नैराश्यता मनुष्याच्या अंगीं बाणली असतां त्याला जें अप्रतिम सुख प्राप्त होतें, तें शीतल चंद्रप्रकाशामुळें संपन्न असलेली रात्रहि प्राप्त करून देणार नाहीं. जगातील अत्यंत शीतल पदार्थांपेक्षांहि शीतल असलेलें वैराग्य अंतर्यामीं बाणलें असतां मनुष्याला जें समाधान प्राप्त होतें, तें समाधान शीतल असा चंद्र कंठामध्यें धारण केला असतांहि प्राप्त होणार नाहीं. आशारहित आणि सर्वत्र सम अंतःकरणाचा, उदारबुद्धि आणि मुनिवृत्तीनें राहणारा, ज्ञानी पुरुष जसा शोभतो, तसा विकसित पुष्पांनीं युक्त असलेल्या नवलतांनीं संपन्न असा वसंत ऋतुहि शोभत नाहीं. नैराश्यवृत्तीपासून जें अनिर्वचनीय सुख प्राप्त होतें, तें हिमालयावर वास केल्यानें, मोत्यांचे कंठे गळ्यांत घातल्यानें, रंभादि देवांगनांबरोबर नानाविध विलास भोगल्यानें, अंगाला चंदनाची शीतल उटी लावल्यानें किंवा प्रत्यक्ष चंद्रमंडलामध्यें निवास केल्यानेंहि प्राप्त होणें शक्य नाहीं. राज्य, स्वर्ग किंवा चंद्रमंडल, तसेंच मधुमासापासून किंवा सुंदर कांतांच्या समागमापासून जें सुख कालत्रयीं प्राप्त होणार नाहीं, अशा तऱ्हेचें परमसुख नैराश्यापासून प्राप्त होतें. ज्या ठिकाणीं त्रिभुवनांतील सर्व संपत्ति तृणाप्रमाणें तुच्छ वाटते, अशा प्रकारचें पराकाष्ठेचें शांतिसुख नैराश्यवृत्तीचा अवलंब केल्यानेंच प्राप्त होत असतें. यास्तव रामा! आपत्तिरूपी करंजवृक्षांना तोडून टाकणारी जणुं कुऱ्हाडच असून जी अत्यंत श्रेष्ठ सुखाचें आश्रयस्थान आहे, अशी शमरूपी वृक्षावरील पुष्पगुच्छाच्या ठिकाणीं असलेली नैराश्यता तूं आपल्या ठिकाणीं बाणवून घे. ज्यानें आपला देह नैराश्यरूपी अलंकारानें अलंकृत केलेला आहे, अशा ज्ञानी पुरुषाला पृथ्वी ही गाईच्या पावलाप्रमाणें, मेरुपर्वत हा एखाद्या तोडलेल्या वृक्षाच्या बुंध्याप्रमाणें, दिशा ह्या लहानशा पेट्यांप्रमाणें आणि त्रिभुवन हें तृणाप्रमाणें तुच्छ वाटूं लागतें! लौकिक आणि शास्त्रीय दान, धनादिकांचा स्वीकार, द्रव्यादिकांचा संग्रह करून ठेवणें, पैशाचा व्यय करून आपल्या कुटुंबांतील मंडळींच्या हौशी पुरविणें, वस्त्रालंकारादि वस्तूंचा संचय करून ठेवणें इत्यादि जगांत चालणाऱ्या क्रिया पाहून, नैराश्यसंपन्न अशा श्रेष्ठ तत्त्ववेत्त्यांना हंसूं येतें. ज्याच्या मनांत कोणत्याहि तऱ्हेच्या संकल्पाला अवकाश मिळत नाहीं, व

त्याच्या दृष्टीनें त्रिभुवन तृणप्राय झालेलें असतें, अशा ज्ञानी पुरुषाचें वर्णन करतांना कशाची उपमा देतां येईल? 'मला हें असावें', 'तें नसावें' अशा प्रकारचें चिंतन ज्याच्या मनाला केव्हांहि स्पर्श करीत नाहीं, अशा स्वाधीनचित्त आणि सर्वेश्वर पुरुषाची वास्तविक किंमत काय आहे, याची प्राकृत मनुष्यांना कल्पना तरी होणें शक्य आहे का? यास्तव वा साधो! सर्व संकटांच्या पलीकडे असलेलें, अत्यंत सुलभ व सुखमय आणि बुद्धीचें परम सौभाग्य असें जें नैराश्य त्याचा अवलंब कर. रामा! तुझ्या ठिकाणीं कोणत्याहि तऱ्हेच्या आशा नाहींत व आशांचा आणि तुझा कोणत्याहि तऱ्हेचा संबंध नाहीं; तर चालत्या रथांत बसलेल्या पुरुषाला दिशांचें चक्र भ्रमण करीत असल्याचा भास होतो, त्याचप्रमाणें हें जग मिथ्याच भासमान होतें. महापराक्रमी रामा! मी तुला बोध करीत असतांहि 'हें माझें,' 'तो हा,' 'तो मी,' अशा प्रकारच्या मोहांत तूं भ्रमानें कां बरें पडतोस? हें सर्व जग आत्मरूपच असून या जगांत वस्तुतः दुसरें कांहीं नाहीं. यास्तव हें जग आत्मरूप आहे असें जाणून तत्त्ववेत्ते पुरूष या जगांतील कोणत्याहि गोष्टीबद्दल खेद करीत नाहींत. राघवा! या विश्वांतील यच्चयावत् पदार्थसमुदायाला तूं आत्मरूपानें अवलोकन करशील, तरच बुद्धीला पराकाष्ठेचें समाधान करून देणारी नैराश्यस्थिति तुझ्या ठिकाणीं बाणेल. जगांतील पदार्थांना उत्पत्ति आणि नाश आहे, अशा तऱ्हेचा विकल्प टाकून सर्व पदार्थांच्या आरंभीं आणि शेवटीं अवशिष्ट राहणाऱ्या आत्मस्वरूपाचा अवलंब करून तूं त्या स्थितीमध्यें निश्चल रहा. ज्याप्रमाणें सिंहापासून हरिणी दूर पळून जाते, त्याप्रमाणें सर्व विकल्पांचा त्याग करण्यापासून प्राप्त होणाऱ्या महावैराग्यसंपन्न आणि वीर्यशाली अशा मनापासून स्वतः मिथ्यारूप असलेली परंतु अत्यंत मोहक अशी संसाररूपी माया दूर पळून जाते अर्थात्, नामशेष होते. वनलतेप्रमाणें चंचल आणि तारुण्यमदानें उन्मत्त झालेली तरुणी ही एखाद्या जीर्ण झालेल्या दगडाच्या पुतळीप्रमाणें आहे असें तत्त्ववेत्ता पुरुष समजतो. तत्त्वज्ञ पुरुषाच्या अंतःकरणाला विषयोपभोग आनंद देत नाहींत व आपत्ती दुःख देऊं शकत नाहींत. ज्याप्रमाणें एखाद्या पर्वताला वायूच्या झुळुका चलित करूं शकत नाहींत, त्याचप्रमाणें तत्त्वज्ञ पुरुषाला दृश्यपदार्थश्री आत्मस्वरूपासून च्युत करूं शकत नाहीं. ज्ञानी पुरुषावर अनुरक्त झालेल्या एखाद्या तरुण स्त्रीनें फेंकलेले नेत्रकटाक्षरूपी मदनाचे बाण त्याच्या उदार मनापासून परावृत्त होऊन धुळीचे कण बनून खालीं पडतात! ज्याला स्वस्वरूपाचें ज्ञान झालें आहे, असा ज्ञानी पुरुष विषयांबद्दल प्रेम आणि द्वेष यांच्याकडून आकर्षित केला जात नाहीं. विषयांचे प्रेमद्वेष त्याच्या मनांत यत्किंचित्हि चलबिचल करूं शकत नाहींत; मग त्याच्या मनावर त्यांचा पगडा बसण्याची गोष्ट कशाला! एखादी लता, चंचल तरुणी, पर्वत आणि दगडाची पुतळी यांच्याकडे स्वरूपज्ञ पुरुष सारख्याच दृष्टीनें पहात असतो, व एखाद्या ओसाड प्रदेशामध्यें पांथस्थ रमत रहात नाहीं, त्याप्रमाणें विषयोपभोगामध्यें ज्ञानी पुरुष केव्हांहि रममाण होत नाहीं; तर ज्याप्रमाणें नेत्र लीलेनें प्रकाशाचा उपभोग घेतो, त्याप्रमाणें प्राज्ञ पुरुष यत्न न करतां देहरक्षणापुरतें जें मिळेल त्यांत संतोष मानून अनासक्त बुद्धीनें अन्नपानादिकांचा उपभोग घेतो. रामा! काकतालीयन्यायानें स्त्री आदिकरून विषयोपभोग गृहस्थाश्रमी तत्त्ववेत्त्याला प्राप्त झाले असतां त्यांचा उपभोग घेतल्यानें त्याच्या ठिका-

णींहि रागक्रोधादि विकार किंवा दुःखें उत्पन्न होत नाहींत. ज्याप्रमाणें समुद्राच्या लाटा मंदर-पर्वताला क्षुब्ध करूं शकत नाहींत, त्याचप्रमाणें प्रत्यगात्म्याचाच मार्ग उत्कृष्ट रीतीनें चोखाळलेल्या तत्त्वज्ञ पुरुषाला सुखदुःखादि द्वंद्वें यत्किंचितूहि क्षुब्ध करूं शकत नाहींत. सत्त्वशील, इंद्रियदमन करणारा आणि अहंभावरूपी ज्वर नष्ट झालेला प्राज्ञ पुरुष विषयांकडे मिथ्यात्वदृष्टीनें अवलोकन करून सर्व भूतांच्या अंतर्यामीं स्थित असलेल्या स्वात्मपदाचा आश्रय करून रहातो. ज्याप्रमाणें जगताच्या उत्पत्तीचा कारभार करीत असतांहि ब्रह्मदेव अव्यग्रचित्तानें राहतो, त्याचप्रमाणें देहेंद्रियद्वारा, सर्व प्राप्तव्यवहार करीत असतांहि प्राज्ञ पुरुष विक्षेपरहित चित्तानें असतो. ज्याप्रमाणें वसंतादि सर्व ऋतू प्राप्त झाले असतां पर्वत क्षुब्ध होऊन जात नाहीं, त्याचप्रमाणें ज्या ज्या वेळीं, ज्या ज्या ठिकाणीं आणि ज्या ज्या क्रमानें जीं जीं सुखदुःखें प्राप्त होतील, तीं तीं भोगीत असतां तत्त्ववेत्ता केव्हांहि क्षुब्ध होत नाहीं. रामा! कर्मेंद्रियांकडून केल्या जाणाऱ्या व्यवहारामध्यें अगदीं गढून गेला असतांहि अनासक्त बुद्धीनें संपन्न असलेला तत्त्वज्ञ कशांतहि गढून जात नाहीं. ज्याप्रमाणें सुवर्णामध्यें इतर धातूंचें मिश्रण असेल तरच तें हिणकस सोनें म्हणून समजलें जातें; एरव्हीं उत्तम सुवर्णाला बाहेरून कितीहि चिखल लागलेला असला, तरी तें कमी दर्जाचें सुवर्ण आहे असें समजलें जात नाहीं, त्याचप्रमाणें केवळ विषयोपभोग भोगण्यानें जीव कलंकित होत नाहीं; तर ज्याची बुद्धि विषयांमध्यें आसक्त झालेली असते, तोच जीव विषयासक्त आहे असें समजलें जातें. बा रामा! आपल्या शरीराहून निराळा असलेल्या आत्म्याला पाहणाऱ्या विवेकी पुरुषाचें शरीर करवतीनें कापलें, तरीसुद्धां त्या दुःखाची त्याला किंमत वाटत नाहीं. मनुष्याच्या ठिकाणीं एकदां विमलज्ञानाचा उदय झाला, म्हणजे तें ज्ञान कायमचेंच झालें. मग त्याचें पुन्हां विस्मरण होईल ही शंका सुद्धां नको! 'हा आपला बंधु आहे' असें मनुष्याला एकदां ज्ञान झालें म्हणजे त्या गोष्टीचें पुन्हां विस्मरण होऊं शकत नाहीं, त्याचप्रमाणें आत्मज्ञानाची स्थिति आहे. ज्याप्रमाणें पर्वताच्या तटावरून कोसळणारी वर्षाकालांतील नदी पुन्हां माघारी परतत नाहीं, दोरीवरील सर्पभ्रांति एकदां निवृत्त झाली, म्हणजे त्या ठिकाणीं पुन्हां सर्पाची भावन उत्पन्न होत नाहीं, सुवर्ण अग्नींत घालून चांगलें तापविलें व शुद्ध केलें, म्हणजे मग तें चिखलांत बुडालें तरी पुन्हां मलिन होत नाहीं, त्याचप्रमाणें ज्ञान्याची अहंभावरूपी हृदयग्रंथि एकदां तुटली म्हणजे गुणत्रयाच्या योगानें त्याला पुन्हां बंध उत्पन्न होत नाहीं. कारण उघडच आहे कीं झाडाचें फळ एकदां तुटून खालीं पडलें, म्हणजे वाटेल तितका प्रयत्न केला [illegible] तें पुन्हां खांदीवर चिकटवणें कोणाला [illegible] शक्य आहे कां? एकदां पाषाण फोडून त्यांतून रत्न निराळें काढलें, म्हणजे मग पुन्हां तो पाषाण आणि रत्न यांचा सांधा पूर्ववत् जुळविण्याची शक्ति कोणाच्या अंगांत आहे? [illegible] एकदां अविद्या ओळखिली गेली म्हणजे [illegible]मध्यें कोणता ज्ञानी पुरुष पुन्हां गटंगळ्या खात बसेल? 'हा चांडाळांचा उत्सव आहे' असें ज्ञान झाल्यानंतर कोणता द्विज तो उत्सव पहाण्यास तयार होईल? शुद्ध जलाचे ठिकाणीं उत्पन्न झालेली दुधाची भ्रांति विवेकबुद्धीच्या योगानें निवृत्त होते, तद्वत् संसारविषयक वासना आत्मज्ञानाच्या योगानें निवृत्त होते. जोंपर्यंत 'हें मद्य आहे' असें ज्ञान झालें नाहीं, तोंपर्यंत श्रेष्ठ ब्राह्मणसुद्धां पाणी म्हणून मद्य प्राशन करतील; परंतु

'हें मद्य आहे' असें समजताच ते त्याचा तत्काळ त्याग करतील. एखादी रूपलावण्यसंपन्न स्त्री आणि चित्रांतील स्त्री अशा दोन्हीहि तत्त्ववेत्यांच्या दृष्टीला सर्वतोपरी सारख्याच दिसतात. ज्याप्रमाणें चित्रांतील स्त्रीच्या ठिकाणीं काळा, तांबडा वगैरे पंचभूतात्मक रंग दिसतात, त्याचप्रमाणें जिवंत स्त्रीच्या ठिकाणचे केंस, ओंठ वगैरे अवयव पंचभूतात्मकच असतात; मग ज्ञात्यांच्या दृष्टीनें त्यांच्यांत ग्रहणीय असें काय आहे? जिव्हेनें बाळपणानंतर गुळाची गोडी एकदां अनुभवास आली, म्हणजे मग तो गूळ पुन्हां भाजला किंवा कापला तरी त्याच्या अंगचा माधुर्यगुण नाहींसा करून त्याच्या ऐवजीं दुसरा एखादा गुण कोणी आणूं शकत नाहीं, तद्वत् एकदां आत्म्याचें सम्यक्ज्ञान झालें, म्हणजे आत्म्याच्या निरतिशयानंदामध्यें कोणीहि बदल करूं शकत नाहीं. ज्याप्रमाणें परपुरुषाशीं रममाण होण्याचें व्यसन लागलेली स्त्री गृहकृत्यामध्यें गढून गेलेली असली, तरी त्यावेळींहि ती त्याच्या समागमसुखाचा आस्वाद मनांतल्या मनांत घेत असते[1], त्याचप्रमाणें अत्यंत श्रेष्ठ आणि शुद्ध अशा परमात्मतत्त्वामध्यें अखंड विश्रांति घेत असलेल्या ज्ञानी पुरुषाला स्वस्वरूपापासून चलित करण्याला इंद्रादि देवसुद्धां समर्थ होत नाहीं. उघडच आहे कीं, व्यभिचार करण्याला सवकलेल्या आपल्या स्त्रीला मनांतल्या मनांत जारसमागमरूपी महोत्सवाचें सुख भोगण्यापासून परावृत्त करण्याला कोणता पति समर्थ आहे? जगांतील सर्व विषयानंद ज्याच्यामध्यें एकवट झाले आहेत, अशा चिदात्म्याच्या आनंदरसाची अविरत धारा सेवन करण्याचें ज्या महात्म्याला व्यसन जडलेलें आहे, त्याच्या बुद्धीला कोणें विस्मरण पाडूं शकणार![2] सर्व प्रकारच्या सुखदुःखांनीं भरलेला प्रपंचव्यवहार एकसारखा करीत असतां जारिणी तरुण स्त्रिया आपल्या संकल्पित जारांबरोबर मनांतल्या मनांत समागमसुख भोगून जागींच बेहोष होऊन जातात; मग त्यापायीं त्यांना नवऱ्याचा किंवा सासऱ्याचा जाच सहन करावा लागला, तरी त्याबद्दल त्यांना कांहींच वाटत नाहीं, याच न्यायानें ज्यांच्या ठिकाणच्या अविवेकाचा नाश होऊन सम्यग्दृष्टी आणि सदाचार यांचा उदय झाला आहे, असे प्राज्ञ पुरुष सर्व प्रपंचव्यवहार यथाप्राप्त करीत असले, तरी अंतर्यामीं सर्वदां स्वात्मानंदांत निमग्न असतात; व अशा पूर्णज्ञानी पुरुषाचें शरीर तुटलेलें दिसलें तरी ते त्याच्या ज्ञानदृष्टीनें तुटलें नाहीं, त्याच्या डोळ्यांतून अश्रू गळलेले वाटले तरी तो शोक करीत नाहीं, त्याचें शरीर जळलें तरी त्याचं कांहींच जळलें नाहीं व त्याचा देह नष्ट झाला तरी त्याचें वास्तविक कांहींच नष्ट झालें नाहीं! जो मनोनाशापर्यंतच्या ज्ञानभूमिकेमध्यें प्रतिष्ठित झाला आहे, असा ज्ञानी पुरुष प्रारब्धानें प्राप्त होणाऱ्या सुखामध्यें असो किंवा दारिद्र्यादि संकटांमध्यें असो; तो आपल्या घरांत राहो, किंवा एखाद्या उत्कृष्ट नगरांत वास करो, अरण्यांत असो, एखाद्या तपोवनांत किंवा एखाद्या मोठ्या पर्वतावर रहात असो, त्याला कोणत्याहि तऱ्हेचीं सांसारिक सुखदुःखें स्पर्श करूं शकत नाहींत.

## सर्ग ७५

१. मोठमोठीं अधिकाराचीं कार्यें करीत असतांहि हर्षविषादादि विकारांपासून अलिप्त राहणारे देव, मनुष्य, राक्षस इत्यादि जीवन्मुक्त.

श्रीवासिष्ठः—बा रामभद्रा! विदेह देशाचा राजा जनक राज्य करीत असतां राजव्यवहारसंबंधीं सर्व कार्यें करीत असूनहि अंतर्यामीं

१. पंचदशीमध्यें हाच श्लोक आहे.

२. ज्ञानामृतं रसो येन सकृदास्वादितो भवेत्। विहाय सर्वकार्याणि मनस्तत्रैव धावति ॥शिवधर्मोत्तर.

सुखदुःखादि ज्वरांपासून मुक्त असून विषयोपभोगांविषयीं पूर्ण निरिच्छ होता. तुझा पूर्वज दिलीप राजा सर्व व्यवहारोचित कार्य करीत असूनहि वैराग्यवृत्ति धारण करून बहुतकालपर्यंत समुद्रवलयांकित पृथ्वीचा उपभोग घेत होता. विषयोपभोगांच्या ठिकाणीं अनासक्त राहून महाबुद्धिमान् मनूनें प्रजाजनांचें उत्कृष्ट रीतीनें पालन करीत राहून आपल्या राज्याचें रक्षण केलें. ज्यामध्यें विविध प्रकारचीं सैन्यें एकत्र झालीं आहेत, अशा अनेक युद्धांमध्यें आणि राज्यकार्यांमध्यें तत्परतेनें वागत असतां मांधाता हा परमपदाप्रत जाऊन पोहोंचला. पातालतलामध्यें राज्य करणारा बलि आपले सर्व प्रापंचिक व्यवहार दक्षतेनें करीत असूनहि सर्व काळ त्यागी आणि अनासक्त असा जीवन्मुक्तस्थितीमध्यें रहात होता. दानवांचा अधिपति नमुचि देवांच्याबरोबर नेहमीं भांडत असून आणि देवासुरांच्या हितानहितासंबंधानें नानाप्रकारच्या विचारांत गर्क राहूनहि अंतर्यामीं संसारतापामुळें केव्हांहि संतप्त होत नसे. इंद्राबरोबर लढत असतां मृत्यु पावणारा, थोर अंतःकरणाचा आणि मानी वृत्रासुर देवांच्या बरोबर युद्ध करीत असतांहि अंतर्यामीं अतिशय शांत स्थितीमध्यें रहात होता. पाताळतलाचें पालन करणारा आणि दानवोचित अशीं सर्व कार्यें करणारा प्रल्हाद निरुपाधिक आणि अनिर्वचनीय अशा आत्मसुखाच्या स्थितीप्रत जाऊन पोहोंचला होता. रामा ! मनाच्याच ठिकाणीं रममाण होणाऱ्या आणि हृदयांतील चिदाकाशापासून उत्पन्न झालेल्या शंबरासुरानें या संसारमायेच्या सुखाचा त्याग केला. कुशल नांवाच्या दानवानें इतर दानवांसह श्रीविष्णूशीं युद्ध करीत असतां अनासक्त बुद्धीच्या योगानें पराकाष्ठेच्या प्रशमावस्थेप्रत जाऊन आपल्या शरीराचा त्याग केला. अग्नि हा सर्व देवांचें मुख असून निरंतर कर्मजालांत तत्पर राहून यज्ञरूपी लक्ष्मीचा चिरकाल उपभोग घेत असतांहि नित्यमुक्त स्थितीमध्यें रहातो. सर्व देवांनीं ज्याच्या ठिकाणच्या अमृतरसाचें प्राशन केलें आहे असा चन्द्र, कोणी आकाशावें आक्रमण केलें असतांहि तें सुखदुःखाच्या संसर्गानें केव्हांहि मलिन होत नाहीं, त्याप्रमाणें निरंतर समबुद्धी धारण केल्यामुळें सुखदुःखाच्या योगानें लिप्त होत नाहीं. आपल्या पत्नीकरितां चंद्राबरोबर युद्ध करणारा देवगुरु बृहस्पति* देवांचें पौरोहित्य करीत असतांहि नेहमीं मुक्तस्थितीमध्यें रहात असतो. आका-

---

* बृहस्पतिः—(१) स्वायंभुव मन्वंतरांतील अंगिरा ऋषीच्या तीन पुत्रांपैकीं दुसरा देवांचा गुरु. हा स्वारोचिष मन्वंतरांत सप्तर्षींमध्यें होता (२) चालू वैवस्वत मन्वंतरांतील जो ब्रह्मपुत्र अंगिरा ऋषि त्याच्या आठ पुत्रांतील ज्येष्ठ. हा अग्निवंशाच्या संबंधानें तिसऱ्या पदवीच्या अग्नींत गणिलेला आहे. स्वायंभूव मन्वंतरांतील जो बृहस्पति तोच पुन्हां जन्मलेला असल्यामुळें प्रस्तुतच्या पुरंदर नामक इंद्रानें त्याला गुरुत्वानें वरलें. याला शुभा आणि तारा अशा दोन स्त्रिया. शुभेला भानुमती आदि सात कन्या झाल्या आणि तारेला शंयु आदि करून सहा पुत्र व स्वाहा नामक सातवी कन्या अशीं अपत्यें झालीं. तारेच्या सहा पुत्रांत कचाचें नांव आढळत नाहीं. ( महाभा वन. अ. २१७–२२२ ) हा बृहस्पति चालू मन्वंतरांतील चौथा व्यास होय. 'तृतीये चांगिरा व्यासश्चतुर्थे तु बृहस्पतिः' । प्रस्तुतचा कृष्णद्वैपायन-पराशरपुत्र व्यास हा २८ वा असून द्रोणाचार्यांचा पुत्र अश्वत्थामा हा पुढील म्ह. २९ वा व्यास होईल. (देवीभा. स्क. १ अ. ४) बृहस्पतिनें वेदविरुद्ध शास्त्र प्रचलित केल्यामुळें त्याला बोध करण्यासाठीं सोमानें म्ह. चंद्रानें बृहस्पतीची स्त्री तारा हिचें हरण केलें व तीपासून चंद्राला बुध नामक पुत्र झाला. ( देवीभा. स्कं. अ. ११ )

ग्रतत्वाला प्रकाशित करणारा आणि असुरांचें गुरुत्व करणारा विद्वान् शुक्राचार्य नितिशास्त्रोक्त सकल आचारांचें पालन करीत असतां निर्विकार बुद्धीनें आपला काळ सारीत असतो. आकाशांतील उर्ध्व लोक आणि प्राण्यांच्या शरीरांतील अवयव यांच्या ठिकाणीं निरंतर संचार करीत असूनहि सर्वसंचारी वायु सर्वदा मुक्तच असतो. उच्चनीच गतींच्या योगानें जगातील सर्व प्राण्यांचें होणारें परिवर्तन आणि त्यामुळें प्राण्यांना होणारें दुःख यांचें नित्य अवलोकन करणारा ब्रह्मदेव यत्किंचित्हि खिन्न न होतां समाचित्तानें राहून आपल्या आयुष्याच्या दोन परार्ध वर्षांचा दीर्घ काल आक्रमण करतो. जरा, मरण, युद्ध, द्वंद्वयुद्ध इत्यादि गोष्टी लीलेनें करीत राहून नित्यमुक्त असा भगवान् हरि जगतामध्यें चिरकाल संचार करीत असतो. ज्याप्रमाणें एखादा कामुक मनुष्य आपल्या स्त्रीला नेहमीं कवळ घेऊन बसतो, त्याचप्रमाणें नित्यमुक्त असलेला त्रिनेत्रधारी शंकर सौंदर्यवृक्षाची जणुं मंजरीच अशा पार्वतीला आपल्या वामांकाचे ठिकाणीं निरंतर धारण करतो. नित्यमुक्त असलेल्या गौरीला चंद्रकलेप्रमाणें स्वच्छ आणि शुद्ध असा मोत्यांचा कंठा धारण करावा त्याप्रमाणें गौरवर्ण आणि त्रिनेत्रधारी असा शंकर आपल्या कंठांत धारण करतो. ज्ञानरूपी रत्नांचा जणुं सागरच, आणि बुद्धिवान् आणि पराक्रमी, अशा कार्तिकेयानें स्वतः मुक्त असताहि तारकादि दैत्यांबरोबर घोर रणसंग्राम केला. भृंगीश नांवाचा शिवगण मुक्त असूनहि त्यानें ध्यानधारणेच्या योगानें शुद्ध व दृढ झालेल्या आत्मबुद्धीनें स्वतःचें रक्त आणि मांस आपल्या मातेला दिलें. नारद मुनि हे नित्यमुक्त असताहि कलहकौतुकशील बुद्धीनें या जगद्रूपी अरण्यांतील निर-

---

१. कार्तिकेयः—प्रथम महादेवाचें रेत शरवण नामक वनांत स्कन्न हू. पतन पावलें, ते पुढें कांहीं कालानें गंगेनें व अग्नीनें धारण केलें. त्या पुढें तें कृत्तिकांनीं सहा महिने धारण केलें असतां कार्तिकेय मुनीचा जन्म झाल्यामुळें त्याला स्कंद, गांगेय, अग्निभू, षाण्मातुर, षण्मुख वगैरे नांवें पडलीं. हा पुढें देवांच्या सेनेचा अधिपति झाल्यामुळें त्याला सेनानी हें नांव मिळालें व गुहेंत वास करण्यामुळें त्याला गुह हें नांव प्राप्त झालें. (महाभा. वन. अ. २२३--२२६ व अनुशा. अ. ८५.).

२. नारदः--(१)स्वायंभुव मन्वंतरांत ब्रह्मदेवानीं दहा मानसपुत्र निर्माण केले, त्यांतील दहावा. 'दशमस्तत्र नारदः' (श्रीभागवत. स्कं. ३ अ. १२) या मानवपुत्रांचा देहपात शापानें झाला. हा पूर्वकल्पीं दासीपुत्र असून प्रस्तुत कल्पींत ब्रह्मपुत्रत्व पावला व यानें स्त्रीपरिग्रह मुळींच केला नव्हता. (२) शापेंकरून दग्ध झालेला नारद पुन्हां ऋषिकुलांत जन्मास आला. पित्याचें नांव उपलब्ध नाहीं, परंतु हा पर्वत ऋषीचा मातुल. (महाभा. शां. अ. ३०) (३) एक ब्रह्मर्षि. पित्याचें नांव आढळत नाहीं, पण यांस अरुंधती नामक भगिनी असून ती मैत्रावरुणी वसिष्ठास दिली होती. (लिंग. अ. ६३) सत्यवती ही याचीच स्त्री असावी. (महाभा. उद्योग. अ. ११७) (४)कश्यपऋषीच्या चालू मन्वंतरांत मुनी नामक भार्येपासून झालेल्या सोळा देवगंधर्वांतील एक कलिनामक देवगंधर्वाचा कनिष्ठ भ्राता. 'गंधर्वो कलिनारदो' हा वैशाखमासींच्या सूर्याबरोबर प्रतिवर्षी संचार करण्यास असतो. (श्रीभागवत. स्कं. १२ अ. ११) 'कळीचा नारद' हाच असावा. (५ कुबेरसभेंत वास करणारा ऋषि. (महाभा. सभा. १०) याची नारदनीति प्रसिद्ध आहे. (महाभा. सभा. अ. ५-११) (६) दाशरथी रामाच्या सभेंत जे आठ धर्मशास्त्री होते त्यांतील एक. (वाल्मिकि रामा. उत्तर. स. ७४) (७) विश्वामित्राच्या पुत्रांतील एक, हा जनमेजयाच्या सर्पसत्रांत सदस्य होता.

निराळ्या प्रदेशामध्यें विहार करीत असतात. अंतर्यामी जीवन्मुक्त स्थितींत असून सर्वांना मान्य असलेले विश्वामित्र[1] ऋषि वेदोक्त यज्ञ करण्यामध्यें निरंतर गढून गेलेले असतात. स्वतः जीवन्मुक्तस्थितीमध्यें रहात असून शेष पृथ्वीचा भार सहन करतो, सूर्य दिवसपंक्ति निर्माण करतो; आणि यम पाप्यांना शासन करतो. याशिवाय या त्रिभुवनांत रहाणारे शेंकडों यक्ष, असुर, देव आणि मानव संसारांत वागत असतांहि मुक्त झालेले आहेत. कित्येक ज्ञानी पुरुष सुखदुःखानें भरलेल्या या संसारांतील अनेकविध व्यवहारांत गर्क झालेले असूनहि अंतर्यामी परमसमाधान पावलेले असतात, तर कित्येक ज्ञानी पाषाणाप्रमाणें जडमूढ स्थितीमध्यें रहात असतात, ज्ञानाच्या परम सीमेप्रत जाऊन पोहोंचलेले भृगु, भारद्वाज, विश्वामित्र, शुक इत्यादि ज्ञानी महर्षी सर्व संसाराचा त्याग करून चित्ताला होणाऱ्या विक्षेपाच्या निवृत्तीकरितां अरण्यांत जाऊन रहातात, तर जनक शर्याति, मांधाता, सगर इत्यादि परमज्ञानाच्या स्थितीप्रत जाऊन पोहोंचलेले तत्त्ववेत्ते छत्रचामरादि वैभवानें संपन्न असून आपआपल्या राज्यांचें यथार्थ पालन करीत असतात. बृहस्पति, शुक्र, चंद्र, सूर्य, सप्तर्षि इत्यादि नित्यसिद्ध महात्मे ग्रहनक्षत्रादिकांना आधारभूत असलेल्या ज्योतिश्चक्रामध्यें स्थित झालेले अग्नि, वायु, वरुण, तुंबर, नारदप्रभृति जीवन्मुक्त ज्ञानी देवपदाप्रत जाऊन पोहोंचलेले असून विमानामध्यें संचार करीत असतात, बलि, सुहोत्र, अंध, प्रल्हाद वगैरे जीवन्मुक्त पाताळरूपी गुहेमध्यें मोठ्या आनंदानें वास्तव्य करतात. तिर्यक योनीमध्यें देखील गरुड, हनुमान, जांबुवंत यांच्यासारखे कांहीं कृतकृत्य झालेले जीवन्मुक्त असतात, तर याच्या उलट देवयोनीमध्येंहि असणारे कांहीं मूढ पुरुष नेहमीं विषयासक्त बुद्धीनें राहतात. सारांश, सर्वात्मभूत अशा चिदात्म्याचे ठिकाणीं सर्व कांहीं सर्वरूपानें, सर्वत्र व सर्वकाल संभवतें. अनंत कार्यांच्या योगानें परिपूर्ण असलेली ही ब्रह्मदेवाची नियति मोठी विचित्र असल्यामुळें तिच्यामध्यें सर्व तऱ्हेच्या कल्पना सर्व ठिकाणीं उत्पन्न होतांना दिसतात. विधि म्हणजेच दैव, विधि म्हणजे विष्णु व विधि ह्मणजेच सर्वेश्वर शिव किंवा ईश्वर होय. ब्रह्मा, विष्णु आणि महेश इत्यादि नांवांनींहि सर्वांच्या ठिकाणीं असलेल्या चिद्रूप प्रत्यगात्म्याचाच बोध होतो.

राघवा! ज्याप्रमाणें वाळूच्या कणांमध्यें सुवर्ण असतें, त्याप्रमाणें असद्वस्तूंच्या ठिकाणीं सद्वस्तु असते आणि सुवर्णाच्या कणामध्यें ज्याप्रमाणें मलिनता असते त्याप्रमाणें सद्वस्तूंच्या ठिकाणीं असद्वस्तु स्थित असते. यावरून या जगांत असंभाव्य असें कांहींच नाहीं, ही गोष्ट सिद्ध होते. या जगांतील स्थितीचा सूक्ष्म

---

[1] विश्वामित्रः—पुरुरव्याचा पुत्र जो विजय तत्कुलोत्पन्न कुश अथवा कुशिक राजाचा प्रपौत्र, कुशांबु राजाचा पौत्र आणि गाधि राजाचा पुत्र. गाधीनें आपली कन्या सत्यवती ऋचीक ऋषीस दिल्यावर भृगुऋषींच्या प्रसादेंकरून हा पुत्र आपल्या स्त्रीच्या ठायीं संपादन करविला होता. याचा जन्म ब्राह्मणकुलांत सत्यवतीच्या उदरांत व्हावयाचा असून सत्यवतीनें आपला भक्षणीय अभिमंत्रित चरु मातेस दिल्यामुळें विश्वामित्राचा जन्म क्षत्रियकुलांत झाला. ( महाभा. अनुशासन. अ. ५०-५१ ) वसिष्ठाशीं वैर व ब्राम्हण्यसंपादनार्थ तपश्चर्या ( वाल्मिकि रामा. बाल. स. ५५-५७ ) विश्वामित्रवंश (महाभा. अनुशासन. अ. ४ ) याच्या वंशांत तेरा मंत्रद्रष्टे ऋषी झाले (मत्स्य अ. १४४) हा विश्वामित्र चालू मन्वंतरांत कार्तिकमासींच्या सूर्याबरोबर असून प्रस्तुतच्या सप्तर्षींपैकीं एक आहे.

बुद्धीनें विचार केल्यास पातकाच्या कल्पनेम-ध्येंहि मोठा गुण आहे, असेंच दिसून येतें. कारण रामा! पापाच्या भयानेंच सामान्य लोकांची धर्माकडे प्रवृत्ति होत असते. बा साधो! या जगांत जें जें म्हणून असत्य दिसतें, त्याच्यामध्यें फलदृष्ट्या शाश्वत अशी सत्यता भरलेली असते व शून्याचें ध्यान कर-ण्यानेंच शाश्वत असें ब्रम्हपद प्राप्त होतें. या जगांत देशकालादिकांच्या परिवर्तनानें ज्या नाहीं नाहीं त्या वस्तू उत्पन्न होतात. गारूड्याच्या खेळांत शिंग असलेले ससे पहावयास सांपड-तात! त्याप्रमाणें. कल्पाच्या अखेरीस सूर्य, चंद्र, पृथ्वी, समुद्र, देव इत्यादि सर्व नाहींसे होतात, त्याचप्रमाणें देशकालपरिस्थितीच्या विलासामुळें वज्राप्रमाणें सुदृढ दिसणारे पदार्थ लय पावतांना दिसतात. महापराक्रमी रामा! अशा रीतीनें जगांतील सर्व वस्तूंचा उत्पत्ति-विनाशक्रम अवलोकन करून तूं आपल्या मनांतील हर्ष, क्रोध, विषाद व सर्व आशा यांचा त्याग कर आणि ब्रह्मानुभवाची समता प्राप्त करून घे. या जगांत जें असत् आहे तें सद्रूप भासतें आणि जें सत् आहे तें असद्रूप दिसतें. वास्तव आस्था आणि अनास्था या दोन्ही भावनांचा त्याग करून तूं आपल्याला समतेची स्थिति प्राप्त करून घे. राघवा! मुक्त-स्थितीमध्यें कोणत्याहि प्रकारचे अनर्थ उत्पन्न होण्याचा संभव नाहीं; अज्ञ जनांच्या ठिकाणीं विवेकाची प्रवृत्ति नसल्यामुळेंच यांना या संसा-रांत अनेक प्रकारचे अनर्थ भोगावे लागतात. राघवा! मुक्तस्थितीमध्यें आत्मस्वरूपाची सदैव प्राप्ति असल्यामुळें ती स्थिति नाहींशी होण्याची केव्हांच भीति नसते. विवेकाकडे प्रवृत्ति ठेव-ल्यामुळें या जगांतील अनेक भूतकोटी मुक्त झालेल्या आहेत. अविवेकामुळें दुर्लभ अस-लेली मुक्ति विवेकामुळें अत्यंत सुलभरीतीनें प्राप्त होते. विवेकाच्या योगानें मनोनाश होऊन मनुष्याला मुक्तस्थिति प्राप्त होत असते. यासाठीं तूं आपल्या ठिकाणीं नेहमीं विवेक जागृत ठेव. ज्याला मुक्ति प्राप्त करून घेण्याची इच्छा आहे, अशा मनुष्यानें आत्म्याच्या अवलोकनाविषयीं नेहमीं यत्न करीत गेलें पाहिजे; व अशा रीतीनें एकदां आत्मदर्शन झालें म्हणजे सर्व दुःखाचा शिरच्छेद होतो. जनक, सुहोत्र इत्यादिकां-प्रमाणें विषयप्रीतिचा सर्वथा त्याग केलेले आणि देहाभिनिवेशरहित असे जीवन्मुक्त महात्मे सध्यांच्या काळींहि या जगांत संचार करीत आहेत. यास्तव बा राघवा! विवेक आणि वैराग्य यांच्या योगानें जीवन्मुक्तस्थिति प्राप्त करून घेऊन मातीचें ढेंकूळ, पाषाण आणि सुवर्ण यांच्याकडे समदृष्टीनें पहात जाऊन तूं या जगांत खुशाल संचार करीत रहा. देहधारी मनुष्याना प्राप्त होणाऱ्या मुक्तीचे दोन प्रकार असतात. एक सदेहमुक्ति आणि दुसरी विदेहमुक्ति. या दोन मुक्तीमधील जो फरक मी आतां सांगत आहे, त्याच्याकडे नीट लक्ष दे. निष्पापा रामा! जगांतील सर्व पदार्थांसंबंधानें अनासक्त बुद्धि झाल्यामुळें मनाला जी शांत स्थिति प्राप्त होते, तिलाच मुक्ति असें म्हणतात; व ही मुक्त-स्थिति देह असतांना किंवा नसतांना प्राप्त होते. बाळा! रामा! मनांतील विषयप्रीतीचा क्षय होण्याच्या स्थितीला उत्कृष्ट कैवल्यस्थिति हें नांव ज्ञाते पुरुष देतात व ही कैवल्यस्थिति देहाचें अस्तित्व असतां किंवा नसताहि प्राप्त होऊं शकते. जिवंत असतांना ज्याच्या मनां-तील संपूर्ण विषयप्रीति अस्तंगत झालेली असते, अशा मनुष्याला जीवन्मुक्त ही श्रेष्ठ पदवी प्राप्त होते. ज्याच्या मनांत विषयांसंबं-धाचें प्रेम वास करीत असतें, असा मनुष्य बद्ध होय. जो देहपातानंतर मुक्त होतो त्याला

मुक्त किंवा विदेहमुक्त ही संज्ञा प्राप्त होते. एवंच त्याला मोक्ष प्राप्त करून घ्यावा अशी इच्छा असेल, त्यानें मोक्षसाधनांचा म्हणजे साधन-चतुष्टयाचा क्रमाक्रमानें आणि युक्तीनें अभ्यास करीत गेलें पाहिजे. आत्मज्ञानासंबंधाचे यत्न नेहमीं युक्तिपूर्वक केले पाहिजेत. कारण, यत्न आणि युक्ति यांच्या अभावीं गाईच्या पावला-इतकें क्षेत्रसुद्धां मनुष्याला आक्रमण करण्याला दुस्तर होऊन बसतें. तसेंच मोक्षस्थिति प्राप्त होण्यापूर्वींच साधनाभ्यास सुटला, तरीहि तो अनंत दुःखांना आणि जन्ममरणपरंपरेला कारणीभूत होतो. यास्तव मोहाचा आश्रय करून आत्म्याला संसारामध्यें पुनः पुन्हां मग्न होऊं देऊं नये; तर ज्ञानसिद्धि प्राप्त होण्यासाठीं महान् धैर्याचा अवलंब करून विवेकबुद्धीच्या योगानें आत्म्याचा निरंतर विचार करीत असावें. आत्म्याचा निरंतर अभ्यास करणाऱ्याला हें जग गाईच्या पावलासारखें आक्रमण करण्याला तुच्छ वाटतें ! सारांश राघवा ! सुगताला म्हणजे बुद्धाला जें स्वयंप्रकाश असें आत्मपद प्राप्त झालें, कपिल मुनींना जें गुण-त्रयसाम्यावस्थारूपी प्रधानपद लाधलें व अर्हत् नांवाचा एका क्षत्रिय राजाला जें अनुत्तम स्थान प्राप्त झालें; तसेंच वेदरहस्यामध्यें [illegible]गात असलेल्या अनेक महात्म्यांना जें [illegible] पद प्राप्त झालें, तें सर्व प्रयत्नरूपी कल्प-वृक्षाचेंच महाफल होय.

---

# सर्ग ७६.

—:०:—

१. संसारसमुद्राची स्त्रीरूपी लाट. २. संसार-सागर तरून जाण्याचा सुलभ उपाय व जीवन्मुक्त-स्थितीमध्यें लोकेनें होणारा व्यवहार.

श्रीवसिष्ठः—राघवा ! अविज्ञात अशा पर-ब्रह्मापासून हीं जगें उत्पन्न होतात, तीं अवि-वेकामुळें स्थिर होतात आणि विवेकाच्या योगानें तीं नाश पावतात. ब्रह्मरूपी समुद्रामध्यें जे जगज्जालरूपी असंख्य भोंवरे फिरत असतात, त्यांची आणि सूर्याच्या किरणामध्यें भ्रमण करीत असलेल्या त्रसरेणूंची गणना करतां येत नाहीं, तशी या भोंवऱ्याची गणना कोण करूं शकणार ? वा सुंदरा ! या जगताच्या स्थितीला असम्यकदृष्टि हेंच कारण असून सम्यकज्ञान-दृष्टीच्या योगानें हा संसार अस्तंगत होतो. रामा ! हा संसारसागर महाभयंकर असून तरून जाण्याला अत्यंत बिकट आहे; युक्ति आणि प्रयत्न या दोन साधनावाचून तर या संसारसागराच्या पैलतीराला जाता येणें अशक्यच आहे. हा संसाररूपी सागर मोहरूपी जलानें भरलेला, मरणरूपी भयंकर भोंवरें आणि पर्वत-प्राय लाटा यानीं व्यापलेला, भ्रमण करणाऱ्या पुण्यरूपी फेंसानें युक्त नरकरूपी वडवाग्नीच्या योगानें जळत असलेला, तृष्णारूपी चंचल लहरींनीं व्याप्त, मनोरूपी पाणवृत्ती युक्त, जीवितरूपी असंख्य नद्या ज्यामध्यें मिसळलेल्या आहेत असा, भोगरूपी रत्नाची जणु पेटीच, क्षुब्ध झालेल्या रोगरूपी सर्पांनीं व्यापला गेलेला आणि इंद्रियरूपी नक्रांच्या घर्घर आवाजामुळें क्षुब्ध झालेला असा आहे. रामा ! सुंदर आणि चंचल अशा तरुणी ह्या संसारसागराच्या लाटा असून पर्वतशिखरांप्रमाणें ज्याचे धैर्य अचल आहे, अशा पुरुषांना त्या आकर्षित करतात. या मुग्धांगनारूपी लाटा ओष्ठाच्या पद्मरागानें सुशो-भित झालेल्या, नेत्ररूपी नीलकमलानीं व्याप्त, दंतरूपी पुष्पफलांच्या कळ्यानीं डवरलेल्या, स्मितरूपी फेंसामुळें सुशोभित झालेल्या, केश-रूपी इंद्रनीलमण्यांनीं वेष्टिलेल्या, भ्रूविलासरूपी तरंगांनीं युक्त, नितंबरूपी वाळवंटाच्या योगानें विस्तार पावलेल्या, कंठरूपी शंखांनीं विभूषित झालेल्या, ललाटरूपी रत्नफलकांनीं शोभायमान

असलेल्या, विलासरूपी मगरांनीं वेढलेल्या, नेत्र-कटाक्षरूपी चंचल लहरींच्या योगानें आंत प्रवेश करण्याला अतिशय कठीण आणि देहकांतिरूपी सुवर्णमय वाळूच्या कणांनीं युक्त अशा असतात. परंतु अशा या चंचल लहरींनीं व्याप्त असलेल्या भयंकर संसारसागरामध्यें बुडालेला मनुष्य त्यांतून तरून जाईल, तरच त्याचा तो पराक्रम अत्यंत श्रेष्ठ समजला जाईल. या संसारसागरामध्यें प्रज्ञारूपी मोठी नौका असून त्यावर विवेकरूपी नावाडी असता जो पुरुष या संसारसागराच्या पैलतीराला जाऊन पोहोंचणार नाहीं, त्याला खरोखर धिक्कार असो!

या अगाध आणि विस्तीर्ण संसारसागरामध्यें ब्रह्मतत्त्वाचा सर्वथा आश्रय करून जो त्यांत प्रवेश करतो आणि तत्त्वदर्शनाच्या योगानें त्याला मृगजलप्राय करून टाकतो, अशालाच पुरुष ही संज्ञा दिली जाते. रामा! श्रेष्ठ सत्पुरुषांच्या समागमामध्यें विचार करून तत्त्वबुद्धीनें संसारसागराचें अवलोकन केल्यानंतरच तत्त्वदर्शनामुळें ब्रह्मरूप बनलेल्या या जगांत क्रीडा करणें शोभतें, एरव्हीं शोभत नाहीं. वा साधो! ज्याअर्थी विचारारूढ झालेल्या बुद्धीच्या योगानें तूं या संसाराचें रहस्य जाणण्याचा या बालवयांत प्रयत्न करीत आहेस, त्याअर्थी खरोखर धन्य आहेस असें म्हणणें ओघानेंच प्राप्त होतें. तुझ्याप्रमाणें निर्मल बुद्धीचा आश्रय करून जो अधिकारी पुरुष या संसारासंबंधानें आरंभीं चांगला विचार करून नंतर त्यामध्यें प्रवेश करतो, तो या सागरामध्यें केव्हांहि बुडत नाहीं. अमृतहरणापूर्वी गरूडानें सर्पांची उपेक्षा केली, तद्वत् सर्पांप्रमाणें भयप्रद असलेल्या या जगांतील विषयांची प्रथम उपेक्षा करावी, अर्थात् त्यासंबंधानें उदासीन असावें, आणि मातेला शापांतून मुक्त केल्यानंतर ज्याप्रमाणें गरूडानें सर्पांना मारून खाल्लें, त्याचप्रमाणें तत्त्वज्ञान अंगीं बाणल्यानंतर विषयांचा खुशाल उपभोग घ्यावा. कारण, योगयुक्त बुद्धीनें तत्त्वदर्शन करून घेतल्यानंतर ज्या पदार्थसंपत्ती उपभोगिल्या जातात, त्याच कल्याणप्रद होतात; बाकीच्या सर्व पदार्थसंपत्ती प्राण्याला केवळ दुःख देण्यालाच कारणीभूत होतात. परंतु ज्याप्रमाणें वसंतऋतूच्या योगानें वृक्षाचे सौंदर्यादि गुण वृद्धिंगत होतात, त्याचप्रमाणें तत्त्वदृष्टीच्या योगानें पुरुषाचें बल, बुद्धि, आणि तेज हीं वृद्धिंगत होतात; व बा रघुनंदना! तूंहि ब्रह्मानंदरूपी घनदाट अमृतरसानें परिपूर्ण, त्रिविध तापांचें निरसन झाल्यामुळें शीतल आणि सम अशा ऐश्वर्यामुळें शिशिर ऋतूंतील चंद्राप्रमाणें अत्यंत शोभायमान होत आहेस.

---

# सर्ग ७७

—:०:—

देवानींहि गळ्यामध्यें आणि मस्तकावर धारण करावयाच्या मंदारपुष्पमालेप्रमाणें जीवन्मुक्ताच्या गुणांची वसिष्ठांनीं गुंफलेली माळ.

श्रीरामः—मुने! ज्यांना तत्त्वदर्शन झालेलें आहे, अशा जीवन्मुक्तांच्या श्रवणीय आणि चमत्कृतिजनक गुणांचें एकत्र वर्णन करून आपण सांगावें, अशी माझी आपल्याला प्रार्थना आहे. कारण, आपलें भाषण अत्यंत मधुर आणि उदार असल्यामुळें तें पुनः पुन्हां श्रवण करावें असें कोणाला वाटणार नाहीं?

श्रीवसिष्ठः—महापराक्रमी रामा! जीवन्मुक्तांचीं लक्षणें मीं तुला अनेक वेळा सांगितलेलीं आहेत, तथापि त्या सर्वांचा एकत्र संग्रह करून मी आतां जीवन्मुक्तांचें वर्णन करीत आहें, तें एकाग्र चित्तानें श्रवण कर. जीवन्मुक्त पुरुषाच्या चित्तांतील सर्व प्रकारच्या विषयेच्छा नष्ट झालेल्या असल्यामुळें

गाढ निद्रेमध्यें असलेल्या मनुष्याच्या दृष्टीनें हें जग वस्तुतः नसतें, त्याप्रमाणें व्यवहार-दृष्ट्या तो या जगाकडे पहात असतो. परंतु परमार्थदृष्टीनें त्याला सर्व आत्ममय दिसत असल्यामुळें हें जग मिथ्या आहे, असें जाणून जगांतील कोणत्याहि विषयासंबंधानें त्याचें चित्त अनासक्त असतें. आत्मदृष्टि प्राप्त झालेली असल्यामुळें ज्ञानी पुरुष जणुं कैवल्य-पदाप्रत जाऊन पोहोंचलेला असतो. अंतःकरणानें तो निद्रित मनुष्याप्रमाणें असतो व स्वस्वरू-पाचा निरतिशय आनंद प्राप्त झाल्यामुळें त्याच्या योगानें जणुं धुंद होऊन तो या जगांत संचार करीत असतो. जीवन्मुक्त पुरुषाची बुद्धि अंतर्मुख, उदात्त आणि सम झालेली असल्यामुळें या जगांतील धनवस्त्रादि वस्तू त्यानें डोळ्यानें पाहिल्या किंवा हातांत घेतल्या-तरी तो त्यांच्याकडे बाह्य दृष्टीनें केव्हांच अवलो-कन करीत नाहीं. जीवन्मुक्ताची वृत्ति अंतरा-त्म्याचे ठिकाणीं संलग्न झालेली असून स्वरूपीं-शांत झालेली असल्यामुळें या जगांतील जनतेचा व्यवहार कळसूत्री बाहुल्यांप्रमाणें चाललेला आहे, असें पाहून त्याला हंसूं येतें. भविष्यकाळीं प्राप्त होणाऱ्या वस्तूंची जीवन्मुक्ताला अपेक्षा नसते, वर्तमानकाळीं प्राप्त झालेल्या वस्तू-विषयीं त्याच्या मनांत आस्था असत नाहीं, किंवा भूतकालीं उपभोगिलेल्या वस्तूंचें त्याला कधीं स्मरणहि होत नाहीं; परंतु असें असूनहि तो सर्व व्यवहार यथाप्राप्त करीत असतो. जीवन्मुक्त पुरुष व्यवहारदृष्ट्या गाढ निद्रेंत असल्याप्रमाणें राहून अंतर्यामीं पूर्णपणें जागा असतो, व सर्व व्यवहारांत कुशलतेनें वागूनहि कर्मफलाच्या इच्छेनें केव्हांहि बद्ध होत नाहीं. तो बाह्यतः सर्व व्यवहार करतो, परंतु अंत-र्यामीं कांहींच करीत नाहीं. त्याच्या मनांत कोणत्याहि विषयाची इच्छा उत्पन्न होत नस-ल्यामुळें त्यानें सर्व विषयाचा त्याग केलेला असतो, व बाह्यतः सर्व व्यवहार करीत अस-तांहि तो या जगामध्यें समदृष्टीनें रहात असतो. जीवन्मुक्त पुरुष सर्व यथाप्राप्त अशी वर्णाश्रमविहित कर्में, परंपराप्राप्त झालेल्या राज्यादिकांचें पालन किंवा दानमानादि कार्यें बाह्यतः करीत असतो. जगांतील सर्व प्रकारची सुखें आत्मरूपानें पहाणारा, परंतु सर्व प्रकारच्या आशांमध्यें सामान्य मनुष्याप्रमाणें गढून गेलेला दिसणारा जीवनन्मुक्त कर्तृत्वभावनेचा सर्वस्वी त्याग करून सर्व प्राप्त कर्में करीत असतो. प्रारब्धकर्मानें प्राप्त झालेल्या सर्व कर्मांमध्यें जीवन्मुक्त उदासीनाप्रमाणें वागत असतो. तो कशाचीं इच्छा करीत नाहीं व कशाचा द्वेषहि करीत नाहीं, इष्ट फलाबद्दल हर्ष मानीत नाहीं व अनिष्ट फलाबद्दल शोक करीत नाहीं; तर अनुकूल किंवा प्रतिकूल वागणाऱ्या लोकांबरोबर जीवन्मुक्त आसक्तिरहित चित्तानें वागत असतो. जे त्याच्याबरोबर प्रेमानें वाग-तात, त्यांच्याबरोबर तो प्रेमानें वागतांना दिसतो व जे त्याच्याजवळ लबाडीनें वागतात, त्यांच्याबरोबर तोहि लबाडीनें वागत आहे, असें दिसतें. तो मुलांमध्यें मुलाप्रमाणें वर्तन करतो, वृद्धांमध्यें वृद्धाप्रमाणें वागतो, धैर्य-वंतांबरोबर धैर्यवानाप्रमाणें वागतो, तरुणाबरोबर तरुणाप्रमाणें वागतो व दुःखितामध्यें असतांना तो स्वतः दुःखिताप्रमाणें वागतो केव्हां कधीं बोलावयाचेंच झालें तर तो परमपवित्र अशा महात्म्यांचीं चरित्रें वर्णन करून सांगतो. त्या-च्या मनाला दीनपणा कसा तो माहीत नसतो; तो स्वतः धैर्यशील, आनंदी आणि प्रसन्न असून, याच्या पुण्यप्रद चरित्राचे लोक मोठ्या प्रमाणें वर्णन करितात. प्राज्ञ, सुप्रसन्न, मधुर भाषण करणारा आणि स्वानंदानें परिपूर्ण अस-लेला जीवन्मुक्त पुरुष खेद किंवा दुर्विचार

यांचा सर्वस्वी त्याग करून सर्व जनतेशीं मोठ्या प्रेमळपणानें त्यांचा बंधु या नात्यानें वागत असतो. उदार अशीं कृत्यें करणारा, उदार मुद्रेनें युक्त असलेला, सर्वांशीं समबुद्धीनें वागणारा, शीतल अशा सुखाचा जणुं समुद्रच, स्नेहपूर्ण आणि मृदु भाषण करणारा, जीवन्मुक्त पुरुष पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणें सर्वांना आनंदित करतो. सत्कृत्यांच्या योगानें त्याला वास्तविक कांहीं पुरुषार्थ संपादन करावयाचा नसतो, विषयोपभोगाच्या योगानें त्याला कोणतेंच श्रेष्ठ सुख प्राप्त करून घ्यावयाचें नसतें, विहित कर्म करून त्याला कोणतीहि श्रेष्ठ गति मिळवावयाची नसते, निषिद्ध कर्मांचें आचरण करूनहि त्याला कांहीं प्राप्त व्हावयाचें नसतें, विषयोपभोगाचा प्रत्यक्ष त्याग करूनहि त्याला कांहीं प्राप्तव्य नसतें, किंवा आप्तबांधवांच्या संयोगवियोगामुळें त्याला कोणत्याहि सुखदुःखाची प्राप्ति व्हावयाची नसतें. या जगांत किंवा दुसऱ्या जगांत एखादें श्रेष्ठ फळ प्राप्त करून घेण्यासाठीं कांहीं क्रिया कराव्या अशी त्याच्या ठिकाणीं इच्छा नसतें, किंवा अक्रिय राहूनहि त्याला कांहीं प्राप्त करून घ्यावयाचें नसतें तसेंच बंध, मोक्ष, पाताल किंवा स्वर्ग याच्याशीं त्याला कांहीं कर्तव्य नसतें. हें अखिल जग आत्मरूप आहे, अशा तऱ्हेची यथार्थदृष्टि त्याच्या ठिकाणीं उत्पन्न झालेली असल्यामुळें त्याच्या मनाला बंध किंवा मोक्ष याच्याबद्दल यत्किंचितहि तळमळ वाटत नाहीं. उत्कृष्ट अशा ज्ञानाग्नीच्या योगानें ज्याच्या हृदयातील सर्व संदेहरूपी पिंजर जळून गेलेले आहेत, त्याचा चित्तरूपी पक्षी उडून जाऊन आकाशांत स्वैर संचार करूं लागतो. ज्याचें मन भ्रांतिरहित होऊन ब्रह्मस्थितीशीं तद्रूप होऊन राहिलें आहे, त्याच्या ठिकाणीं विस्तीर्ण आकाशाप्रमाणें कल्पनासृष्टीचे उदय किंवा अस्त होईनासे होतात. आतां या ठिकाणीं तुझ्या मनांत कदाचित् अशी शंका उत्पन्न होईल कीं, 'जर जीवन्मुक्ताच्या ठिकाणीं मनाचा अभाव झालेला असतो, तर त्याच्या हातून शरीराचे व्यवहार तरी कसे होऊं शकतात?' तर याचें उत्तर असें आहे कीं, ज्याप्रमाणें पाळण्यांत निजलेल्या बालकाच्या अवयवांची हालचाल सहज होत असते, त्याप्रमाणें या जगांत जीवन्मुक्त पुरुषाची सर्व शारीरिक हालचाल होत असते; त्याच्या ठिकाणीं व्यवहाराचें केव्हांहि अनुसंधान असत नाहीं. दारू पिऊन धुंद झालेल्या मनुष्याप्रमाणें ब्रह्मानंदानें धुंद होऊन गेलेल्या आणि पुन्हां जन्मास न येणाऱ्या, जीवन्मुक्ताच्या ठिकाणीं कोणत्याहि विषयाची ग्राह्याग्राह्य बुद्धि असत नाहीं; तसेंच कोणतेंहि कार्य केल्याची किंवा न केल्याची स्मृति त्याच्या ठिकाणीं शिल्लक रहात नाहीं. सर्व पदार्थांविषयींची ग्राह्याग्राह्यवृत्ति अस्तंगत झालेला जीवन्मुक्त, सर्व पदार्थांचें सर्व प्रकारें ग्रहण करतो, व त्यागहि करतो. सारांश, त्याचें वर्तन एखाद्या बालकाप्रमाणें निर्विकार असतें, देश, काल आणि कर्मपरंपरा यांच्या अनुरोधानें तो सर्व कार्यें करीत असतो, परंतु त्या कार्यापासून होणाऱ्या सुखदुःखाचा त्याच्या मनावर यत्किंचितहि परिणाम होत नाहीं. अंतर्यामीं कोणत्याहि प्रकारची इच्छा नसतां बाह्यतः सर्व प्रापंचिक व्यवहार करणाऱ्या जीवन्मुक्ताचे ठिकाणीं बाह्य पदार्थसंबंधाच्या सत्यत्वबुद्धीमुळें उत्पन्न होणारी आस्था शिल्लक रहात नाहीं, व त्याचें मन कसल्याहि प्रकारच्या कर्मफलांकडे धांव घेत नाहीं. जीवन्मुक्त पुरुष दुःखदशेची उपेक्षा करीत नाहीं व सौख्यदशेचा अपेक्षा करीत नाहीं. एखादें कार्य सफल झालें म्हणून तो आनंदित

होत नाहीं किंवा तें विफल झालें नाहीं म्हणून खिन्नहि होत नाहीं. सूर्याचें प्रखर तेज शीतल झालें, चंद्रमंडल प्रखर तेजाच्या योगानें अत्यंत तप्त झालें, किंवा अग्नीच्या ज्वाळा अधोगतीनें भडकूं लागल्या, तरी त्या-बद्दल जीवनमुक्त पुरुषाला मूळींच विस्मय वाटत नाहीं. या निरनिराळ्या रूपांनीं चिदात्म्याच्या मायाशक्ती स्फुरण पावत आहेत असें तो समजत असल्यामूळें असल्या आश्चर्यकारक गोष्टींविषयीं त्याला मुळींच कौतुक वाटत नाहीं. दया आणि दैन्य याचें तो ग्रहण करीत नाहीं किंवा क्रौर्याकडे त्याचें मन वळत नाहीं. अपमान किंवा भिक्षाचार यांच्याबद्दल त्याला लज्जा वाटत नाहीं; परंतु कोणत्याहि अकार्यासंबंधानें तो निर्लज्ज बनतो असेंही नाहीं. त्याला ज्याप्रमाणें कधीं दैन्य माहीत नसते, त्याचप्रमाणें उद्धटपणाहि माहीत नसतो तो कधीं गर्वानें फुगून जात नाहीं किंवा दीन बनून खिन्नहि होत नाहीं; तसाच तो कधीं उद्विग्नहि होत नाहीं व कधीं हर्षितहि होत नाहीं. ज्याप्रमाणें आकाशामध्यें वृक्षाचे अंकुर उत्पन्न होत नाहींत, त्याचप्रमाणें शरत्कालीन आकाशाप्रमाणें अतिशय निर्मळ आणि सुप्रसन्न झालेल्या जीवन्मुक्ताच्या मनांत क्रोधद्वेषादि विकार उत्पन्न होत नाहींत. भूतांची उत्पत्ति आणि नाश हा कारभार या जगांत निरंतर चाललेला असल्यामुळें जीवन्मुक्त पुरुषानें सुख कशाबद्दल मानावयाचें आणि दुःख तरी कशाबद्दल करावयाचें? ज्याप्रमाणें समुद्रांतील तरंगामध्यें एकसारखें फेंसाचें भ्रमण चाललेलें असतें, त्याप्रमाणें या संसारसागरामध्यें भूतसमूदायाचें निरंतर भ्रमण चाललेलें असल्यामुळें जीवन्मुक्त पुरुषाला सुख किंवा दुःख वाटण्याचा प्रसंग तरी कोठून उत्पन्न होणार? मीच आपल्या आत्ममायेमुळें भावाभाव आणि प्राण्यांची उत्पत्ति याच्या योगानें भरलेलें जग उत्पन्न करतों, असा जीवन्मुक्तांचा अनुभव असल्यामुळें त्यांच्या दृष्टीनें जगांत कांहीं उत्पन्न होत नाहीं व नष्टहि होत नाहीं. त्यामुळें त्यांच्या ठिकाणीं हर्षविषादाला अवकाशच रहात नाहीं. ज्याप्रमाणें रात्रीमधील प्रत्येक निमिषांत निरनिराळ्या स्वप्नसृष्टि उत्पन्न होतात, त्याचप्रमाणें क्षणांत उत्पन्न होऊन क्षणांत विनाश पावणाऱ्या या लौकिकसृष्टी उत्पन्न झाल्यासारख्या दिसतात. अविरत उत्पन्न होणाऱ्या आणि अविरत नाश पावणाऱ्या अशा या संसारामध्यें जीवन्मुक्ताला करुणा किंवा आनंद उत्पन्न होण्याचें वास्तविक काय कारण आहे? ज्याला शुभ कर्माच्या फळापासून सुख होतें, त्याला अशुभ कर्मापासून दुःख होणें स्वाभाविकच आहे. परंतु जीवन्मुक्ताच्या ठिकाणी शुभाशुभ आणि सुखासुख या कल्पनाच नसल्यामुळें त्याला दुःखदशा प्राप्त होणें केव्हां तरी शक्य आहे काय? सुखानुभवाच्या अखेरीस उत्पन्न होणारी दुःखदशा शोकमोहादिकांचा विस्तार करते. परंतु जीवन्मुक्ताच्या ठिकाणीं शोकमोहादिकांचें बीजच नाहींसें झाल्यामुळें सुखाच्या अंतीं त्याला दुःख प्राप्त होण्याचा संभव नसतो; व अशा रीतीनें सुख, दुःख, ग्राह्य, त्याज्य या कल्पनाचा क्षय झाल्यामुळें इष्टानिष्ट आणि शुभाशुभ या कल्पनांना तरी त्याच्या ठिकाणीं अवकाश कोठून मिळणार? ज्या मनुष्याच्या ठिकाणच्या रम्यारम्य दृष्टी नाहींशा होऊन भोगविषयक इच्छा अजिबात नष्ट झाला आहे, व ज्याच्या ठिकाणीं नैराश्यवृत्ति बाणून गेली आहे, त्याचें मन बर्फाप्रमाणें वितळून जातें. ज्याप्रमाणें तीळ जळून गेले म्हणजे तेलाची गोष्टसुद्धां बोलावयास नको, त्याचप्रमाणें मूल अज्ञानासह मन क्षीण झालें म्हणजे मनुष्याच्या मनांत

संकल्प उत्पन्न होण्याची गोष्टसुद्धां बोलावयास नको ! सारांश, आत्म्याव्यतिरिक्त या जगांत कांहींच नाहीं, अशा निश्चयामुळें सर्व दृश्य पदार्थसंबंधाचे संकल्पविकल्प नाहींसे होऊन ज्याच्या ठिकाणीं आकाशाप्रमाणें सन्मात्र आत्म्याची भावना दृढ झाली आहे, असा महात्मा जीवन्मुक्त आपल्या चितामध्यें उदित झालेल्या निरतिशयानंदामुळें नित्य तृप्त राहून सर्व प्रारब्धांचा क्षय होईपर्यंत सर्व व्यवहार लीलेनें करीत असतो.

---

# सर्ग ७८

—:※:—

१. चित्तस्पंदामुळें जगताचा भ्रम उत्पन्न होतो व चित्ताचा विरोध केल्यामुळें हा भ्रम नष्ट होतो. २. चित्तनिरोधाचा उपाय योग.

**श्रीवसिष्ठः**—राघवा ! ज्याप्रमाणें रात्रीच्या वेळीं जळकें लांकूड गरगर फिरविलें असतां त्यापासून चक्राकार अग्नीचा भ्रम उत्पन्न होतो, त्याचप्रमाणें हें जग असत् असतांहि चित्तस्पंदामुळें सद्रूप भासतें. ज्याप्रमाणें पाण्याचें वर्तुलाकार भ्रमण होऊन पाण्यामध्यें भोंवऱ्याचा भास उत्पन्न होतो, त्याचप्रमाणें चित्तस्पंदाच्या योगानें या दृश्य जगाची भ्रांति उत्पन्न होते. ज्याप्रमाणें नेत्राच्या स्पंदामुळें आकाशांत मोराच्या पिसासारख्या किंवा क्वचित मोत्यांच्या मंडलासारख्या आकृती भासमान होतात, त्याचप्रमाणें चित्तस्पंदाच्या योगानें हें असद्रूपी जग सद्रूप भासतें.

**श्रीरामः**—ब्रह्मन्! चित्त ज्या कारणानें चलित होतें आणि ज्या उपायाचें अवलंबन केलें असतां त्याचें स्पंदन बंद होतें, त्यासंबंधानें सविस्तर विवेचन करून सांगा, म्हणजे त्यामुळें मला या चित्ताची चांगली चिकित्सा करतां येईल.

**श्रीवसिष्ठः**—रामा ! ज्याप्रमाणें बर्फ आणि त्याचा शुभ्र वर्ण, तीळ आणि त्यांतील तेल पुष्प आणि त्यांतील सुगंध, तसेंच अग्नि आणि त्यांतील उष्णता हीं एकमेकाला चिकटलेलीं असतात, त्याचप्रमाणें चित्त आणि त्याचें स्पंदन हीं एकमेकांना अगदीं चिकटून असतात. वेगवेगळीं करून सांगता येत नाहींत. राघवा ! वास्तविक चित्त आणि त्याचा स्पंद यांचीं स्वरूपें एकमेकांहून भिन्न नसतां केवळ मिथ्या भ्रमामुळें त्यांत भेद कल्पिला जातो. आतां चित्त आणि त्याचा स्पंद यांचीं स्वरूपें एकमेकांहून भिन्न आहेत असें मानलें,तरी सुद्धां चित्त आणि त्याचा स्पंद यांचा संबंध गुणी मनुष्य आणि त्याच्या ठिकाणचे गुण यांच्या संबंधाप्रमाणें असल्यामुळें त्या दोहोंपैकीं एक नष्ट झालें, म्हणजे दोघांचाहि आपोआप क्षय होतो. राघवा ! चित्तनाशाचे योग आणि ज्ञान असे दोन मार्ग आहेत. चित्तवृत्तीच्या निरोधाला योग हें नांव असून सम्यक् अवलोकन करणें –हें दृश्य जग ब्रह्मरूपानें अवलोकन करणें यालाच ज्ञान असें म्हणतात.

**श्रीरामः**—भगवान् ! प्राणापानवायूंचें नियमन करण्याच्या योग नामक युक्तीनें हें मन केव्हां आणि कशा रीतीनें अत्यंत सुखप्रद आणि शांत अशा स्थितिप्रत जाऊन पोहोंचतें ?

**श्रीवशिष्ठः**—रामा ! ज्याप्रमाणें पृथ्वीच्या स्पंदमार्ग अशा विवरामध्यें सर्व बाजूंनीं पाणी व्यापून असतें, त्याचप्रमाणें या देहामधील सर्व नाड्यामधून सर्वत्र जो वायू स्फुरण पावत असतो, त्याला प्राण ही संज्ञा दिली जाते. या प्राणवायूच्या स्पंदामळें शरीरामध्यें क्रियावैचित्र्य उत्पन्न होतें व त्या वैचित्र्याच्या अनुरोधानें या प्राणवायूलाच आत्मवेत्यांनीं प्राण, अपान वगैरे भिन्न भिन्न नांवें कल्पिलेलीं आहेत. अर्थात् अपानादि वायू हे प्राणवायूचेच वृत्तिभेद आहेत. ज्याप्रमाणें पुष्प

हें सुगंधाचा आधार असतें, किंवा बर्फ हें शुभ्र वर्णाचा आधार असतें, त्याचप्रमाणें हा प्राणरूपी रस चित्ताचा आधार असून तो चित्ताहून भिन्न नसतो. राघवा! अंतर्गत असलेल्या प्राणवायूच्या स्पंदामुळें संकल्प करण्यास उत्सुक झालेली जी संविकला असते, तिलाच चित्त असें म्हणतात. ज्याप्रमाणें पाण्याच्या हालचालीमुळें लाटा उत्पन्न होतात व त्यामुळें पुढें पाण्यामध्यें भोंवरे वगैरे उत्पन्न होतात, त्याचप्रमाणें प्राणस्पंदापासून चित्तस्पंद उत्पन्न होतो व चित्तस्पंदापासून पुढें विषयाकार वृत्ती उत्पन्न होतात. म्हणून चित्त म्हणजे प्राणाचा परिस्पंद आहे. असें श्रुतिरहस्यवेत्ते म्हणत असतात. तेव्हां प्राणवायूचें चलन बंद झालें म्हणजे त्याबरोबर मनहि आपोआप शांत होतें; व सूर्यप्रकाश बंद होतांच सर्व लोकांचे व्यवहार बंद होतात, त्याचप्रमाणें मनाचा स्पंद शांत झाला, म्हणजे हा संसार निश्चयानें विलीन होतो.

श्रीरामः---ब्रह्मन्! देहरूपी घरामध्यें अहर्निश संचार करणाऱ्या आणि मुखनासिका वगैरे छिद्रावाटे बाह्य आकाशांच्या ठिकाणीं गमन करणाऱ्या प्राणादि वायूंच्या स्पंदाचा निरोध कसा करतात?

श्रीवसिष्ठः---राघवा! शास्त्रें आणि सज्जन यांचा सहवास, तसेंच वैराग्य आणि स्वरूपाचा अभ्यास किंवा यमनियमादिकांचा अभ्यास यांच्या योगानें चित्तामध्यें पूर्वाभ्यासामुळें रूढ झालेल्या संसारवृत्तींच्या ठिकाणीं पूर्ण अनास्था धारण केली आणि ध्यानाच्या अभ्यासानें चित्ताची एकाग्रता संपादन करून नंतर एका सर्वव्यापी परमात्मतत्त्वाचा दृढ अभ्यास केला, म्हणजे प्राणस्पंदाचा निरोध होतो. पूरकरेचकादिक्रमसाध्य अशा स्वेदरहित प्राणनिरोधाच्या योगानें व एकांतात ध्यानाभ्यासाच्या योगानें ध्येयांच्या-परमात्म्याच्या ठिकाणीं पूर्ण एकाग्रता बाणली असतां प्राणस्पंदाचा निरोध होतो. प्रणवाचा--ॐकाराचा दीर्घ उच्चार, किंवा ॐमधील अखेरच्या अर्धमात्रात्मक ध्वनीनें दर्शित केल्या जाणाऱ्या तुर्यावस्थेचा अनुभव, यांच्या योगानें अखिल बाह्य विषयाची कल्पना गाढ झोपेंच्या स्थितीप्रमाणें पूर्णपणें निमाली असतांहि प्राणस्पंदाचा निरोध होतो. नुसत्या रेचकाचा दृढ अभ्यास करून प्राणवायु पुष्कळ वेळपर्यंत आकाशामध्यें ध्यानासहित स्थिर करतां येऊं लागला, रेचकाढ्य कुंभक किंवा बहिर्कुंभक पुष्कळ वेळ स्थिर झाला, व तो मुख नासिका द्वारानें आंत घेण्याचा बंद केला, म्हणजेहि प्राणस्पंदाचा निरोध होतो. तसेंच पूरकाचा पूर्ण अभ्यास झाल्यामुळें पर्वतावर स्थिर होणाऱ्या मेघाप्रमाणें आंत खेंचलेला प्राणवायु---कुंभक---स्थिर होऊन त्याचा संचार बंद झाला, म्हणजेहि प्राणस्पंदाचा निरोध होतो. कुंभकावस्थेमध्येंहि अभ्यासाच्या योगानें प्राणवायु पाण्यानें भरलेल्या घटाप्रमाणें पुष्कळ वेळपर्यंत स्तंभित करतां येऊं लागला, सहज कुंभक साधला म्हणजेहि प्राणस्पंदाचा निरोध होतो. टाळूच्या बुडाशीं असलेल्या स्तनाकार अशा 'इंद्रयोनि' नामक घंटेचें जिव्हेनें मोठ्या प्रयत्नानें आकलन करून खेचरी * मुद्रेमध्यें ऊर्ध्वगत अशा ब्रह्मरंध्राच्या ठिकाणीं प्राणवायु स्थिर झाला, म्हणजेहि प्राणस्पंदाचा निरोध होतो. मनातील सर्व कल्पनांचा निरास होऊन सूक्ष्म अशा हृदयाकाशांत ध्यानाच्या योगानें मनोवृत्तीचा निर्विकल्पसमाधीमध्यें लय झाला असतांहि प्राणस्पंदाचा निरोध होतो. नासिकाग्राच्या पासून

* 'कपालकुहरे जिह्वा प्रविष्टा विपरीतगा । भ्रुवोरन्तर्गता दृष्टिर्मुद्रा भवति खेचरी ॥ न पीड्यते रोगेण न च लिप्येत कर्मणा । बाध्यते न च कालेन यो मुद्रां वेत्ति खेचरीम् ॥'

बाहेर बारा अंगुलाच्या मर्यादेपर्यंत बाह्य आकाशाचे ठिकाणीं दृष्टीचा किंवा मनोवृत्तीचा लय झाला असताहि प्राणस्पंदाचा निरोध होतो. अभ्यासाच्या योगानें ऊर्ध्वरंध्रमार्गानें टाळूच्याहि वर बारा अंगुलें अंतरावर ब्रह्मरंध्राचे ठायीं प्राणवायु स्थिर झाला किंवा मनोवृत्ति लीन झाली, म्हणजेहि प्राणस्पंदाचा निरोध होतो. खेचरी मुद्रेमध्यें दृष्टि भुंवयाच्या मध्यभागीं स्थिर होऊन डोळ्यांतील बुबुळांचे तेज दिसत नाहींसें झालें आणि ब्रह्मरंध्राच्या ठिकाणीं जिव्हाग्र आणि प्राण स्थित झाले, व अशा क्रमानें परमेश्वराचें आत्मरूपानें दर्शन झालें, म्हणजेहि प्राणस्पंदाचा निरोध होतो. तसेंच गुरुकृपेनें किंवा ईश्वरप्रसादानें चटकन् झालेलें ज्ञान दृढ होऊन चित्तातील सर्व विकल्प नष्ट झाले, म्हणजेहि प्राणस्पंदाचा निरोध होतो. बा मननशीला रामा! निर्मल अशा हृदयाकाशाचे ठिकाणीं चित्त चिरकाल स्थिर होऊन आत्म्याचा अपरोक्षसाक्षात्कार झाला आणि तो अनुभव निर्वासन मनानें केलेल्या ध्यानाच्या योगानें दृढ झाला, म्हणजेहि प्राणस्पंदाचा निरोध होतो.

**श्रीराम**—ब्रह्मन्! ज्या हृदयरूपी मोठ्या आरशामध्यें हें सर्व जग प्रतिबिंबित होतें, असे तें या जगांत स्थित असलेल्या प्राण्यांचें हृदय कोणतें?

**श्रीवसिष्ठ:**—बा साधो! या जगामध्यें वास करणाऱ्या प्राणांचें हृदय दोन प्रकारचें असतें. त्यापैकीं एक हृदय ग्रहणीय असतें व दुसरे त्याज्य असतें. या दोन हृदयांमध्यें जो भेद आहे, तो मी आतां तुला सांगत आहें. साडेतीन हातांच्या मर्यादेनें युक्त असलेल्या या देहाच्या दोन बरगड्यांमध्यें एका बाजूला तें मासमय हृदय असतें, तें त्याज्य असून देहाच्या ठिकाणीं 'मी आहें' अशा प्रकारच्या जाणिवेच्या रूपानें स्थित असलेलें जे हृदय तें ग्राह्य होय. हें संविद्रूपी हृदय देहाच्या आंत असतें आणि बाहेर असतें, पण तें वस्तुत: देहाच्या आंतहि नसतें, आणि बाहेरहि नसतें. हें हृदय मुख्य असून त्यांतच हें चराचर जग भरून राहिलेलें आहे. सर्व पदार्थांना प्रतिबिंबित करणारा आरसा आणि सर्व संपत्तीचें भांडार, हेच होय. सर्व प्राण्यांच्या ठिकाणीं 'अहं' प्रत्ययाच्या रूपानें स्थित असलेली जाणीव म्हणजेच त्यांचें हृदय होय; देहामध्यें जीर्ण दगडासारखा व जड असलेला मांसमय अवयव हें प्राण्यांचें खरें हृदय नव्हे. यासाठीं, शुद्ध संविन्मय अशा हृदयाचे ठिकाणीं वासनारहित होऊन अभ्यासाच्या योगानें चित्ताची योजना केली असतां प्राणस्पंदाचा आपोआप निरोध होतो. अथवा गुरुमुखानें श्रवण केलेल्या दुसऱ्या अनेक कल्पित उपयांनीं प्राणस्पंदाचा निरोध करतां येतो. प्राणायामादि सर्व योगयुक्ती स्वरूपाचा दृढ अभ्यास करणाऱ्या मुमुक्षूला रोगादिकांची निवृत्ति व पर्यायानें मोक्ष प्राप्त करून देण्याला कारणीभूत होतात. अभ्यासाच्या योगानें दृढतेला पोहोंचलेला व वैराग्यानें युक्त असलेला प्राणायाम ज्याला जशी इच्छा असेल तशा रीतीनें फलद्रूप होतो; ज्याला मोक्षाची इच्छा असेल त्याला तो मोक्ष प्राप्त करून देतो व ज्याला भोगासिद्धी पाहिजे असतील, त्याला तो सिद्धी प्राप्त करून देत असल्याचें प्रसिद्ध आहे. ज्याप्रमाणें पर्वतावरून कोसळत येणारी नदी खालीं जमिनीवर उतरून बऱ्याच दूर अंतरावर जाऊन नंतर शांतपणानें वाहूं लागते, त्याप्रमाणें भ्रूमध्य नासिकारंध्र व कंठाग्रापासून बारा अंगुलांवर असलेलें तालुस्थान या ठिकाणीं दृढ अभ्यासानें प्राणाचा निरोध केला असताहि तो स्थिर होतो. वारंवार आणि पुष्कळ दिवस अभ्यास करून तालुमूलाच्या ठिकाणी असलेल्या 'इंद्रियोनि' नामक घंटेला जिव्हेच्या

टोंकानें स्पर्श करण्याचा प्रयत्न करीत गेलें, म्हणजेहि प्राणवायु ब्रह्मरंध्राच्या ठिकाणीं स्थिर होऊं लागतो. अशा तऱ्हेच्या निरनिराळ्या अभ्यासामुळें समाधीच्या निरनिराळ्या अवस्था उत्पन्न होऊन त्यापासून योग्याला जरी निरनिराळ्या सिद्धी मिळूं शकतात, तरी जो योगी पूर्ण निष्काम असतो, त्यालाच या भिन्नभिन्न अभ्यासापासून ज्ञानाचें परम श्रेष्ठ असें शांतिरूप फल प्राप्त होतें. पुरुषाला अंतर्यामीं सुख प्राप्त होऊन तो आत्म्यामध्येंच रममाण होऊन शोकरहित होत असेल, तर तो अभ्यासानेंच होतो, दुसऱ्या कोणत्याहि उपायानें होत नाहीं. यास्तव रामा! तूं नेहमीं अभ्यास करीत जा. स्वरूपाच्या अभ्यासामुळें प्राणस्पंद शांत झाला असतां मनाचा नाश होतो व तदनंतर केवळ निर्वाणस्थितिच शिल्लक रहाते. सारांश, रामा! वासनेनें बद्ध झालेलें मन जन्मास येत असून तें वासनारहित झालें म्हणजे मुक्त होतें, हें लक्षांत ठेवन तुला जें योग्य दिसेल तें कर. प्राणस्पंद हेंच मनाचें रूप असून या मनाच्या योगानेंच संसाराचा भ्रम उत्पन्न होतो; परंतु अभ्यासाच्या योगानें तें मन एकदां आत्म्याच्या ठिकाणीं लीन झालें, म्हणजे या संसाराचा ज्वर आपोआप नष्ट होतो. मनांतील सर्व विकल्पांश क्षीण झाले, म्हणजे सर्व कल्पनांनीं युक्त असलेल्या वाणी ज्याच्यापासून परावृत्त होतात, अशा तऱ्हेचें तें परमपदच तेवढें अवशिष्ट रहातें. ज्याच्या ठिकाणीं हें सर्व आहे, ज्याच्यापासून हें सर्व आहे, ज्याचें हे सर्व बाजूंनीं आहे, अशा त्या पदाला ब्रह्मपद असें म्हणतात. परंतु वास्तविक रीतीनें विचार केला, तर ब्रह्म आणि जग यांच्यामध्यें आधाराधेयभाव किंवा सादृश्यभाव मुळींच नाहीं. हें दृश्य जग विनाशी, विकल्पमय आणि गुणधर्मांनीं युक्त असल्यामुळें हें जग आणि निर्गुण आत्मा यांच्यामध्यें कोणत्याहि प्रकारचें सादृश्य नाहीं. अर्थात्, ब्रह्माशीं तुलना करण्याला या जगांत कोणताहि दृष्टांत आढळून येत नाहीं. अंतर्यामीं प्रकाशित असलेली चित्कला सर्व रसरूपी पदार्थांचा आस्वाद घेणारी, सर्व तेजांना प्रकाशित करणारी आणि सर्व संकल्पाची कल्पना करणारी आहे. या ब्रह्मरूपी कल्पतरूपासून विचित्र रसांनीं युक्त असलेल्या कर्मफलांच्या पक्तीं एकसारख्या उत्पन्न होतात आणि गळून पडतात. सारांश, अशा रीतीनें सर्व त्रिपुटीच्या अतीत असलेल्या ब्रह्मपदाचें भासमान होणाऱ्या सर्व त्रिपुटीच्या अपेक्षेनेंच वर्णन करून त्याचा परिचय करून द्यावा लागतो. या ब्रह्मपदाचें जो स्थिरबुद्धि आणि ज्ञाता पुरुष मनानें निरंतर अनुसंधान करीत रहातो, त्यालाच जीवन्मुक्त असें म्हणतात. ज्याच्या कामभोगादिकांच्या सर्व उत्कंठा नष्ट झाल्या आहेत, ज्याच्या ठिकाणच्या सर्व इष्टानिष्ट कल्पनांचा निरास झालेला आहे आणि व्यवहार करीत असतांहि ज्याची बुद्धि सम आणि हर्षविषादशून्य झालेली आहे, अशा अमनस्क महात्म्यालाच पुरुषोत्तम ही श्रेष्ठ पदवी प्राप्त होते.

---

# सर्ग ८९

—:*:—

१. योग आणि ज्ञान, यांपैकीं दुसऱ्या म्हणजे ज्ञानमार्गाचें विवेचन.

श्रीरामः—प्रभो! योगमार्गानें चित्ताचा नाश कसा होतो हें आपण सांगितलें. आतां, सम्यक्ज्ञान म्हणजे काय याचा मला [illegible] करून सांगावा.

श्रीवसिष्ठः—राघवा! आदि [illegible] यांनीं रहित व स्वयंप्रकाश असा [illegible] या जगांत आहे, अशा प्रकारचा [illegible]

अ.गे अन.यास ।निश्चय लाच ज्ञात पुरुष सम्यक्ज्ञान असें म्हणतात. घटपटादिकांचे आकार यांनी कललेले हे शेंकडों पदार्थसमुदाय म्हणजे आत्माच आहे, तद्व्यतिरिक्त दुसरें कांहीं नाहीं, असा निश्चय होणें यालाच सम्यक् ईक्षण म्हणजे उत्कृष्ट अवलोकन असें म्हणतात. असम्यक्ज्ञानापासून जन्म आणि सम्यक्ज्ञानापासून मोक्ष प्राप्त होतो. दोरीचें यथार्थज्ञान न झाल्यामुळें सर्पाचा भ्रम उत्पन्न होतो; परंतु दोरीचें ज्ञान झाल्याबरोबर सर्पाचा भ्रम नाहींसा होतो. जीवन्मुक्त स्थितीमध्यें संकल्परहित, निर्विषय आणि स्वयंप्रकाशभावानें प्रकाशित होणारी अशी संवित् शिल्लक रहाते, दुसरें कांहींही शिल्लक रहात नाहीं. त्या शुद्ध संवित् तीच आत्मा असें म्हटलें जातें. शुद्ध संवित् ही विद्या असून अशुद्ध संवित् म्हणजे अविद्या असें ज्ञाते पुरुष म्हणतात. ही शुद्ध संवित् म्हणजेच संवेद्य सम्यक्ज्ञान करून घ्यावयाचें योग्य—असें ब्रह्म होय. संवित् आणि संवेद्य याच्यांत वास्तविक भेद नाहीं. रामा ! आत्मा हाच आपल्या स्वतःच्या संकल्पाच्या योगानें जगद्रूपानें वृद्धिंगत होतो, दुसरें कांहींहि नाहीं. यास्तव त्रिभुवनाच्या ठिकाणीं असणारीं अखिल भूतें आत्मरूपच आहेत, असा ज्ञानानें मनुष्याच्या बुद्धीचा पूर्ण निश्चय झाला, म्हणजे त्याच्या ठिकाणीं परिपूर्णत्व बाणतें. सर्व जग आत्मरूप आहे असें म्हटल्यानंतर मग जन्ममरणादि अवस्था कोठें उरल्या ? तसेंच बंधमोक्षादि कल्पना तरी कोणीकडे गेल्या ? रामा ! या जगांत आत्म्याशिवाय दुसरी कोणतीच वस्तु नसल्यामुळें मूढ मनुष्य शोक तरी कशाबद्दल करतात ? या जगांत विषय नाहींत व त्यांचें चिंतन करणारें चित्तहि नाहीं. विषय आणि चित्त यांच्या रूपानें ब्रह्मच विकास करीत असतें. अशा रीतीनें सर्व परमाकाशरूप ब्रह्मच असल्यामुळें बंध कसला आणि मोक्ष तरी कसला ! जगांतील सर्व मोठ्या वस्तूंहूनहि मोठें असलेलें ब्रह्म एखाद्या नटाप्रमाणें आपल्या मायेच्या योगानें विस्तृत जगदाकार धारण करून भासमान होत असतें. यास्तव राघवा ! ज्ञानाच्या योगानें तूं द्वैताचा त्याग करून आत्मस्वरूपानें रहा. आत्म्याचें स्वरूप यथार्थरीत्या अवलोकन केलें असतां काष्ठ, पाषाण, वस्त्र वगैरे पदार्थांमध्यें यत्किंचित्हि भेद दिसत नाहीं; तसेंच संकल्प करण्याला उत्सुक झालेला तूंहि मग कोठें असणार ! राघवा ! सर्व जगाच्या आदिअंतीं शिल्लक रहाणारें शांत आणि अविनाशी असें जें रूप तीच आत्मवस्तु होय. यास्तव राघवा ! तूं या आत्मस्वरूपाशीं तन्मय होऊन रहा. स्थावरजंगमात्मक असें हें सर्व जगत् परमाकाशरूपी ब्रह्मच आहे. अशा स्थितींत त्या निरतिशयानंदरूपी ब्रह्मामध्यें सुखदुःखांचा उद्भव वास्तविक कोठून असणार ! यास्तव राघवा ! तूं शोकरहित हो. ज्याप्रमाणें चित्रविचित्र लाटांच्या रूपानें पाणी स्फुरण पावत असतें, त्याप्रमाणेंच द्वैताद्वैतकल्पनेपासून उत्पन्न झालेल्या जन्ममरणरूपी भ्रमांच्या रूपानें आत्माच स्फुरण पावत असतो. निरंतर आत्मानुसंधानकुशल बनलेल्या बुद्धीच्या योगानें जो पुरुष शुद्ध आत्मस्वरूपाला आलिंगन देऊन सर्व जगाला आत्मबुद्धीनें अवलोकन करतो अशा तत्त्वज्ञाला बंधन करण्याला जगांतील कोणते विषयोपभोग समर्थ आहेत ? ज्याप्रमाणें मंद मंद वहाणाच्या वायूच्या झुळका पर्वताचा भेद करू शकत नाहींत, त्याचप्रमाणें जगदाकारानें स्फुरण पावणाच्या आत्मस्वरूपासंबंधानें निरंतर विचार करणाऱ्या मनाचा कामक्रोधादि षड्रिपू यत्किंचित्हि भेद करूं शकत नाहींत. ज्या-

प्रमाणें जलांतून बाहेर पडलेल्या किंवा उथळ पाण्यात रहाणाऱ्या माशाला बगळे खाऊन टाकतात, त्याचप्रमाणें आशेच्या मागें लागलेल्या अविचारी, मूढ आणि अज्ञ अशा पुरुषाला सर्व प्रकारचीं दुःखें खाऊन टाकतात. वास्तव सर्व जग आत्मरूप असून वस्तुतः अविद्या कोठेंच नाहीं, अशा ज्ञानदृष्टीचा अवलंब करून तूं सम्यग्रूप आणि स्थिर होऊन रहा. नानाविध सरोवरामध्यें दृष्टीस पडणारे तरंग, बुडबुडे, फेंस इत्यादि विकार जलाहून भिन्न नसतात, त्याचप्रमाणें चराचराच्या रूपानें दिसणारें हें विश्व आत्म्याहून भिन्न नाहीं. सारांश, या जगांत जें नानात्व भासमान होतें तो सर्व कल्पनेचा विलास आहे असा यथार्थज्ञानानें निश्चय करून जो परमात्मस्वरूपाचें सर्वत्र अवलोकन करतो, त्यालाच मुक्त ही संज्ञा दिली जाते.

---

## सर्ग ८०

—:•:—

१. जो विचार दृढ झाला असतां समीप असणाऱ्या दिव्य भोगांविषयींहि ज्ञान्याच्या मनात इच्छा उत्पन्न होत नाहीं, अशा विचाराचें वर्णन.

**श्रीवसिष्ठः**—बा रामा! मी आतां जो विचार सांगणार आहें, तो ज्या विवेकी मनुष्याच्या मनांत नेहमीं घोळत असेल त्याची आपल्या समोर असलेल्या विषयोपभोगांवर केव्हांहि इच्छा जात नाहीं. मनुष्याचे डोळे केवळ बाह्य पदार्थांचें अवलोकन करतात, परंतु त्याविषयांच्या उपभोगापासून उत्पन्न होणारें सुखदुःख जीव भोगीत असतो. बैल साखरेच्या गोण्यांचा भार वहातो, पण त्या साखरेचा उपभोग त्या बैलाचा मालक घेत असतो! अशी वस्तुस्थिति असल्यामुळे सैन्यांतील परटाचें गाढव एखाद्या हवक्यांत पडलें म्हणून सेनापतीचें काय नुकसान होतें? त्याचप्रमाणें पदार्थाच्या बाह्यस्वरूपाच्या ठिकाणीं नेत्र आसक्त झाले तरी त्यामुळें आत्म्यानें क्षुब्ध होण्याचें कारण काय? हे अधम नेत्रांनो! तुम्ही तरी भोग्यवस्तूंच्या बाह्यस्वरूपरूपी चिखलाचा आस्वाद कां घेतां? अरेरे! ते भोग्यविषय निमिषमात्रांत नाहींसे होतील आणि ते आपल्याबरोबर तुमचाहि घात करतील. ज्या अंतर्गत चिदात्म्याच्या योगानें या बाह्य विषयांचें ज्ञान होतें आणि ज्या चिद्रूप प्रकाशाच्या योगानें सर्व विषय अनात्मभूत असतात, ते दिसून येतें, त्या चिदात्म्याचें उद्बोधन करणाऱ्या कर्मामुळें निर्मळ बुद्धीचा प्राज्ञ पुरुष केव्हांही बद्ध होत नाहीं. यास्तव अहो नेत्रांनो! अनिवार्य अशा मृत्यूकडे खेचणाऱ्या, उत्पन्न होतांच नष्ट होणाऱ्या, सकृद्दर्शनीं अत्यंत रमणीय दिसणाऱ्या आणि असत्मय अशा भोग्य वस्तूंच्या रूपांचा तुम्हीं केव्हांहि आश्रय करूं नका. सर्व विषयांना प्रकाशित करणारा आत्मा जर भोग्य वस्तूंच्या बाबतींत उदासीन असतो, तर दीपादिकांच्या साहाय्यानें अवलोकन करणाऱ्या आणि कमलाच्या अर्धांना असलेल्या, नेत्रांनो! तुम्हीं तरी भोग्य वस्तूंकरितां अधीर होऊन इतकी धडपड कां करतां! मण्यादिकांच्या पाण्यामध्ये चित्रविचित्र तरंग दिसतात, किंवा आकाशांतील सूर्यबिंबावर पाहिलें असतां मोराच्या पिसाप्रमाणें अनेक मिथ्या आकार भासमान होतात, त्याप्रमाणें ब्रह्माच्या ठिकाणीं भासमान होणारी व 'हा पुरुष,' 'ही स्त्री' इत्यादि विकल्पांनीं भरलेली ही विविध, विचित्र आणि मिथ्या सृष्टि नेत्र अवलोकन करीत असले, तरी बा चित्ता! त्याबद्दल आनंद अगर संतोष वा तृष्णा मानण्यासारखें असें काय आहे? ज्याप्रमाणें मरुजलामध्ये स्फुरण पावतें, त्याप्रमाणें स्फुरणधर्मानें युक्त अशा चित्तामध्यें बाह्य विषयांची वृत्ति स्फुरण पावत असली, तर तुझाक स्फुरण

प.वा. परंतु त्या ठिकाणीं हा अंकुर कठून उत्पन्न होतो ? बा चित्ता ! प्रकाश आणि रूप यांची जोडी, आधार आणि आधेय यांच्या रुपानें नित्य स्फुरण पावत असते म्हणजे स्त्रीदेहावर प्रकाश पडला तर त्या सौंदर्यावरून त्या जड भावाबद्दल तूं विनाकारण का व्याकुळ होतोस ? वास्तविक रूपदर्शन आणि मनःसंकल्प यांचीं स्वरूपें परस्परांहून भिन्न असतां मुख आणि त्याचें आरशांत पडलेलें प्रतिबिंब यांच्याप्रमाणें तीं परस्परांशीं संलग्न असल्याप्रमाणें दिसतात. अज्ञानी मनुष्याच्या दृष्टीनें रूपदर्शन आणि मनःसंकल्प निरंतर संलग्न झालेले आहेत. परंतु ज्ञानाच्या योगानें ज्याच्या ठिकाणचें अज्ञान गलित झालें आहे, अशा तत्त्ववेत्यांच्या दृष्टीने ते भाव असन्मय आणि पथक् आहेत. ज्याप्रमाणें काळ मनाच्या कल्पनेमुळें ( रंगातली ) लाख आणि लाकड हीं परस्परांशीं संलग्न झालेलीं आहेत असें दिसतें, त्याचप्रमाणें रूपदर्शन आणि मनःसंकल्प हीं कल्पनेमुळें परस्परांशीं सुसंबद्ध आहेत असा भास होतो. परंतु स्वरूपाचा अभ्यास आणि विचार यांच्या योगानें मनाचा मननरूपी तंतु एकदां तुटला, म्हणजे त्याबरोबरच अज्ञानाची भावना नष्ट होते. अज्ञानक्षयामुळें मनाचा नाश झाल्यावर रूप, दर्शन आणि मनःसंकल्प इत्यादि भाव पुन्हां केव्हांहि एकमेकांशीं संलग्न होत नाहींत. रामा ! अशा रीतीनें चित्त हेंच सर्व ज्ञानेंद्रियांना जागृत करणारें आहे. यास्तव घरांतून पिशाचाला हाकलून लावतात, तद्वत् आपल्या देहांतून या चित्ताला हाकलून लावावें. चित्ता ! तूं विनाकारण बडबड कशाला करतोस ? तुझ्या नाशाचा उपाय मला चांगला माहीत आहे. तूं ज्याप्रमाणें आधीं आतां [illegible] तुच्छ असतोस, त्याप्रमाणे वर्तमानकाळींहि तूं असद्रूपच आहेस. शब्दस्पर्शादि पंचगुणांचा अभिमान धारण करून तू उगाच धडपड करीत आहेस ! जो प्राणी तुझ्याकडे आत्मीय भावनेनें पहातो त्याच्याच ठिकाणीं तुझी धडपड चाललेली असते. परंतु दुष्टा ! तुझ्या धडपडीकडे मी मुळींच लक्ष देत नाहीं. तुझ्याबद्दल मला आनंद वाटत नाहीं व खेदहि वाटत नाहीं. एखाद्या इंद्रजालिकाच्या मायेप्रमाणें मिथ्या असलेल्या विषयाकार वृत्तींच्या ठिकाणीं तूं विनाकारण कां आसक्त होतोस ? चित्ता ! तूं माझ्यामध्यें रहा किंवा येथून चालता हो, माझ्या दृष्टीनें तुला अस्तित्व नाहीं व असलेंच तर तत्त्वदृष्ट्या तूं मेल्यासारखाच आहेस. तूं स्वभावतः नेहमींच मेलेला असतोस आणि विवेकाच्या योगानें तर कायमचाच मरतोस. नेहमीं मृतवत् असणाऱ्या मना ! तूं निस्तत्त्व, जड, भ्रमिष्ट आणि शठ आहेस. तूं निरंतर मूढ मनुष्यालाच त्रास द्यावास; ज्ञान्याला त्रास देण्याची तुझी छाती नाहीं. तूं मूळचाच मृत आहेस, ही गोष्ट आजपर्यंत अज्ञानामुळें आम्हांला समजली नव्हती. परंतु दिव्यांना अंधकार नसल्यासारखाच असतो, तद्वत् आत्मदर्शन झाल्यामुळें आमच्या दृष्टीनें तूं मेल्यासारखाच आहेस. अरे लबाडा ! तूं इतके दिवसपर्यंत आमच्या देहरूपी घराला वेढा दिला होतास, यामुळें शम, दम, विचार, आत्मबोध इत्यादि साधूंचें पाऊलहि त्यात कधीं फिरकलें नव्हतें. परंतु जड आणि प्रेतरूप अशा तुझी त्यांतून हकालपट्टी झाल्याबरोबर तें शमदमरूपी साधूंच्या वस्तीला आतां लायक झालें आहे. हे जगद्रूपी चित्तवेताळा ! तूं पूर्वीं नव्हतास, आज नाहींस आणि भविष्यकाळींहि तुझें अस्तित्व असणार नाहीं, अशा स्थितींत 'मी आहे' असें म्हणून डौलानें पुढें यावयाला तुला लाज कशी वाटत नाहीं ? अरे चांडाळा ! विषयतृष्णारूपी

हृदळी आणि कामक्रोधादि क्षुद्र भूतें यांच्या-सहवर्तमान माझ्या या शरीररूपी गृहांतून तूं आतांच्या आतां चालता हो! ज्याप्रमाणें एखादा दुष्ट लांडगा डोंगराच्या दरींतून पळून जातो, त्याप्रमाणें माझ्या देहरूपी मंदिरांत विवेकाचा प्रवेश होतांच हा माजलेला चित्तरूपी वेताळ तेथून चालता झाला, ही महद्भाग्याची गोष्ट झाली. अत्यंत जड, क्षणभंगुर आणि दुष्ट अशा या मनानें या सर्व अज्ञ जनांना मारून आपल्या कक्षांत ठविलें आहे, हें केवढें आश्चर्य आहे! परंतु अरे मरतुकड्या मना! या मूढ जनांना तूं छळतोस यांत तुझा पराक्रम तो काय आहे? त्यांत तुझी मोठी शक्ति ती कसली? किंवा त्यांत तुझा बडेजाव तो काय आहे? छाती असेल तर ये आणि मला कसा छळतोस तें पाहूं! तूं आपला अंमल माझ्यावर गाजविलास तरच तूं पराक्रमी आहेस, असें मी म्हणेन. बा मूढ मना! मी तुला मारींत नाहीं, कारण तूं यापूर्वीच सर्वथैव मेला आहेस हें मी जाणतों. तूं मृत म्हणजे असद्रूप आहेस, हें जाणणें म्हणजेच तुझा वध करणें होय. आजपर्यंत तूं जिवंत आहेस असें समजून तुझ्याबरोबर अनेक भूतांचा सहवास घडणाऱ्या संसाररूपी अनेक रात्रींमध्यें मी अगदीं गढून गेलों होतो. परंतु हें चित्त मेलेलें आहे, तें जिवंत नाहीं, याचें मला आतां ज्ञान झाल्यामुळें बा चित्ता! तुझी आशा अजिबात झुगारून देऊन मी केवळ आत्म्याच्याच ठिकाणीं स्थित होऊन राहीन. माझें खरोखर महद्भाग्य म्हणूनच हें चित्त मेलेलें आहे, असें ज्ञान मला आज झालें आहे. या मूर्ख चित्ताच्या नादीं लागून कोणी भल्या मनुष्यानें आपलें जीवित फुकट घालवूं नये. या माझ्या देहरूपी घरांतून त्या शठ मनाला हांकलून लावल्यामुळें मी आतां स्वस्थचित्त झालों आहे. या चित्तवेताळाच्या नादीं लागून मी किती तरी दिवसपर्यंत या संसारांतील नानाविध खेळ खेळलों; परंतु आतां त्या सर्वांचें स्मरण झालें, म्हणजे माझें मलाच हसूं येतें. एखाद्या ताडाच्या वृक्षाप्रमाणें धिप्पाड अशा त्या चित्तरूपी वेताळाला विचाररूपी तरवारीच्या योगानें ठार मारून त्याचें प्रेत मीं आपल्या हृदयरूपी घरांतून बाहेर फेंकून दिलें, ही खरोखरच सुदैवाची गोष्ट होय. चित्तरूपी वेताळ ठार झाल्यामुळें पवित्र अशा परमपदवीप्रत जाऊन पोहों-चलेल्या या माझ्या शरीररूपी गेहांत मी आतां सुखानें नांदेन. विचाररूपी मंत्राच्या प्रभावानें माझें मन मेलें, चिंता मेली आणि अहंकाररूपी राक्षसहि ठार झाला. आतां सर्व वैषम्यभावाचा निरास झाल्यामुळें मी आत्मस्वरूपामध्यें स्थिर होईन. हें मन माझें कोण? आशा तरी माझी कोण? त्याचप्रमाणें अहंकार तरी माझा कोण लागत होता? आणि स्त्रीपुत्रादि परिवाराचें तरी मी काय लागत होतों? बरें झालें, माझें भाग्य उदयाला आलें आणि या सर्वांची कटकट कायमचीच मिटली. यास्तव सर्वत्र एकरूपानें असलेल्या, कृतकृत्य, नित्य, निर्मल, निर्विकल्प आणि चिद्रूप अशा माझ्या मलाच माझे नमस्कार असोत! मला आतां शोक नाहीं, 'अहं' या रूपानें भासमान होणारा जडांश हें माझें स्वरूप नव्हे, 'अहं' प्रत्ययानें गोचर होणारा चिदात्मा हें माझें स्वरूप नाहीं असेंहि नाहीं; तसेंच मी अनात्मा नव्हे. सारांश, सर्वरूपानें स्थित असणाऱ्या मला माझे नमस्कार असोत! मला आशा नाहीं, कर्में नाहींत, संसार नाहीं, कर्तृत्व नाहीं, भोक्तृत्व नाहीं, व देहहि नाहीं, अशा माझ्या प्रत्यगात्म्याला माझे नमस्कार असोत. 'अहं' प्रत्ययानें गोचर होणारा विषय मी नव्हे, तसेंच मी अनात्मा नव्हे, 'अहं' शब्दानें प्रत्ययास येणारा 'मी' मी नव्हे व त्याच्याहून भिन्न असा दुसरा

कोणी नव्हे; तर सर्वच मी आहें. अशा माझ्या सर्वात्मकस्वरूपाला नमस्कार असोत. चतुर्दश-भुवनांना कारण मी आहें, त्यांना धारण करणारा मी आहें व तीं भुवनेंहि मीच आहें, परंतु माझें स्वरूप देशकालादिकांच्या योगानें मर्यादित होऊं शकत नाहीं, अशा माझ्या अपरिच्छिन्न ब्रह्मस्वरूपाला नमस्कार असोत. नित्य, निर्विकार, निरंश, सर्वव्यापी, सर्व आणि सनातन अशा माझ्या आत्मस्वरूपाला नमस्कार असोत. रूपरहित, नामरहित, स्वयंप्रकाश, सर्वव्यापी आणि आत्मरूपानें असणाऱ्या माझ्या आत्मस्वरूपाला नमस्कार असोत. सर्व, सर्वगत, सूक्ष्म आणि जगताला प्रकाशित करणाऱ्या अशा ज्या सत्तेप्रत मी जाऊन पोहोंचलों आहें, त्या माझ्या सत्तेला म्हणजे मलाच माझे नमस्कार असोत! समुद्र, पृथ्वी आणि नद्या यांच्यासहवर्तमान असलेली दृश्यसंपत्ति मी नव्हे; त्याचप्रमाणें सर्व पदार्थांच्या योगानें सुशोभित झालेलें, असलेलें आणि पुढें होणारें असें जग मी नव्हे; किंवा त्रिकालीं असणारें सर्वच मी आहें, अशा माझ्या सर्वव्यापी स्वरूपाला नमस्कार असोत. सारांश, ज्याच्यापासून सर्व मनोविकल्प दूर आहेत, आणि म्हणूनच जो सम आहे, तसेंच जें अखिल विश्वांत आणि विश्वाच्याबाहेर प्रकट झालें आहे, अशा माझ्या स्वयंप्रकाश, अज, जरामरणरहित, त्रिगुणातीत आणि अनंत अशा ईश्वरी स्वरूपाला मी नमस्कार करतों.

---

# सर्ग ८१

१. अनुभव आणि युक्ति यांच्या योगानें चित्ताच्या असत्तेची उपपत्ति.

श्रीवसिष्ठः—महापराक्रमी रामा! आत्मा हाच ज्ञेय म्हणजे ज्ञान करून घेण्यास योग्य आहे, असा विचार करून आणि आत्मस्वरूपाचें ज्ञान करून घेऊन तत्त्ववेत्ते पुरुष चित्तासंबंधानें येणेंप्रमाणें विचार करतात, ते म्हणतात:—"अहो हें केवढें आश्चर्य आहे कीं, ज्या चित्ताच्या योगानें सत्य भासणाऱ्या जगाचा निरास होऊन सर्व आत्माच आहे असा अनुभव येतो, तें जगांतच अंतर्भूत झालेलें असतांहि पुनःपुन्हां कोठून तरी उत्पन्न होतें. चित्त हें जड, अचेतन आणि नाशवंत असल्यामुळें निःसंशय मिथ्या आहे, अथवा तें वास्तविक आत्मरूप असतांहि आकाशामध्यें वृक्ष उत्पन्न झाल्याचा भास व्हावा, त्याचप्रमाणें तें भ्रांतीमुळें भासमान होतें. ज्याप्रमाणें नावेमध्यें बसून चाललेल्या लहान मुलाला नदीतीरावरील अचल वृक्षहि चालल्यासारखा दिसतो, त्याचप्रमाणें अज्ञानी मनुष्याला असन्मय चित्त सत्य भासतें; परंतु ज्ञात्या पुरुषाला तें आत्मरूपच दिसत असतें. चक्राप्रमाणें फिरणाऱ्या पाळण्यांतून खालीं उतरल्यानंतर पाळण्यांत असतांना वाटले तसे भोंवतालचे पर्वत फिरत नसून स्थिर आहेत असा प्रत्यय येतो, त्याप्रमाणें आत्मस्वरूपाच्या अज्ञानामुळें उत्पन्न झालला मोहभ्रम नष्ट झाला, म्हणजे चित्त चित्तपणानें न दिसतां आत्मरूप दिसतें. सारांश, चित्त हें नाहींच, तर ब्रह्मच चित्तरूपानें भासमान होत असतें. ज्याअर्थी बाह्य व आंतर विषयांच्या भावना मिथ्या चित्तापासून उत्पन्न होतात, त्याअर्थी त्यांना असम्भव समजून मीं त्यांचा कधींच त्याग केला आहे.

मी आतां संदेहरहित आणि त्रिविधतापशून्य झालों आहे, वास्तव मी यापुढें असाच विषयतृष्णारहित होऊन आत्मानुभवाच्या स्थितीमध्यें राहणार. ज्याप्रमाणें सूर्यप्रकाश नाहींसा होतांच चित्रांतील निरनिराळे वर्ण डोळ्यांना दिसत नाहींसे होतात. त्याचप्रमाणें चित्ताचा नाश झाला म्हणजे विषयतृष्णादि सर्व पोरखेळ आपोआप नाहींसे होतात. माझें चित्त मेलें, विषयतृष्णा अस्तंगत झाली, मोहरूपी पिंजरा मोडून गेला आणि माझ्या वृत्तीमध्यें निरंहकारतेचा उदय होऊन माझें आत्मस्वरूप मला चांगलें स्पष्ट दिसूं लागलें व अज्ञाननिद्रेंतून उठून जागा झाल्यामुळें मला आतां ". जग शांत असें ब्रह्मरूप झालें आहे. जगतामध्यें नानात्व असूनहि तें मला आतां ब्रह्मरूप दिसूं लागलें आहे. मी आतां ब्रह्मावांचून दुसऱ्या कशाचा विचार करणार ? आतां मिथ्या विषयाचा विचार बस्स झाला ! मी सांप्रत निराभास, अनाद्यनंत आणि पावन अशा ब्रह्मपदाप्रत जाऊन पोहोंचलों आहें. मी आतां सौम्य, सर्वगत, सूक्ष्म आणि शाश्वत असा आत्माराम बनलों आहें. व्यवहारदृष्टीनें चित्तादिक आणि शास्त्रदृष्टीनें आत्मा, ब्रह्म, चैतन्य इत्यादि जें जें कांहीं आहे, तसेंच रज्जूवरील सर्प, वंध्येचा पुत्र इत्यादिकांप्रमाणें जें जें कांहीं नाहीं, त्यांच्या त्यांच्या रूपानें आकाशाहून स्वच्छ, शांत, अनंत आणि स्वयंप्रकाश असें ब्रह्मच विस्तारलें गेलें आहे. माझ्या ठिकाणीं आत्म्याची समता उदय पावलेली असल्यामुळें चित्त आहे, का गेलें, का मेलें, यासंबंधानें विचार करीत बसण्यांत काय अर्थ आहे ! मीं आजपर्यंत आत्मस्वरूपासंबंधानें विचारणा केलेली नसल्यामुळें 'देह म्हणजेच मी' असें मला वाटत होतें. परंतु आतां *विचार करतांच माझें स्वरूप अपरिच्छिन्न आहे असा अनुभव आल्यामुळें पूर्वींची ती परिच्छिन्न अहंभावना आतां कोठेंच्या कोठें नाहींशी झाली. माझें मन मरून गेल्यानंतरहि अनर्थकारक अशी ही विकल्पसंपत्ति माझ्या ठिकाणीं कां बरें उत्पन्न होत आहे ? मी गाडलेला मनोरूपी वेताळ जिवंत करण्याचा तर हिचा विचार नसेलना ? असो, कांहीं चिंता नाहीं. हा सारा संकल्पाचा खेळ आहे, हें जाणून या विकल्पसंपत्तीला मी आंतल्या आंत मारून टाकतों आणि ॐकारानें लक्षित केल्या जाणाऱ्या तुरीय आत्म्याचे ठिकाणीं मी शांत आणि स्वस्थ मनानें स्थिर होऊन रहातों." राघवा ! आत्मज्ञ पुरुषानें आपल्या मनानें आणि बुद्धीनें नेहेमीं खातां पितांना, निजतां बसतांना आणि हिंडतां फिरतांना, किंबहुना शरीराचा प्रत्येक व्यापार चालला असतांना याप्रमाणें विचार करीत जावें. महात्मे आणि साधुसंत शांत व स्वाधीन झालेल्या आपल्या मनानें याप्रमाणें विचार करून उद्वेगरहित चित्तानें सहजप्राप्त अशा वर्णाश्रमविहित कर्मामध्यें निमग्न होऊन राहतात. सारांश, ज्यांचा अहंकारमद गलित झाला आहे, ज्यांचीं अंतःकरणें सदा सुप्रसन्न असतात आणि ज्यांची कांति शरत्कालच्या चंद्राप्रमाणें रमणीय आणि तेजःपुंज असते, असे महात्मे प्राप्त झालेल्या वर्णाश्रमविहित कर्मामध्यें तत्पर राहून या जगांत सुखानें विहार करीत असतात.

---

## सर्ग ८२.

—:*:—

१ वीतहव्याचें आख्यान. वीतहव्यानें स्वमनःच्या चित्ताला केलेला बोध.

श्रीवासिष्ठः—राघवा ! बृहस्पतीच्या संवर्त*

---

*चालू मन्वंतरांतील अंगिरा ऋषीच्या आठ पुत्रांतील स तवा मरुत्त राजानें याग नारदाच्या सांग. ण्यावरून पौरोहित्यार्थ वरलें व मोठा यज्ञ केला होता.

नामक विद्वान् आणि आत्मवेत्त्या बंधूनें याचप्रमाणें केलेला विचार विंध्य पर्वतावर मला सांगितला. रामा ! तूंहि याच दृष्टीचा अवलंब करून ज्ञानभूमिकांचें उत्तरोत्तर आक्रमण करून या संसारसागरांतून तरून जा. रामा ! इंद्रियें आणि मन यांचें प्रबोधन करणाऱ्या ज्या ज्ञानदृष्टीच्या योगानें वीतहव्य मुनीनें ब्रह्मपदावर निःशंक आरोहण केलें, त्या ज्ञानदृष्टीचें मी आतां वर्णन करीत आहें, तरी तें तूं एकाग्र चित्तानें श्रवण कर.

ज्याप्रमाणें भगवान् सूर्यप्रकाश विश्रांति घेण्याकरितां मेरुपर्वताच्या दऱ्या शोधूं लागतो, त्याचप्रमाणें फार दिवसांपूर्वीं वीतहव्य नांवाचा महातेजस्वी मुनि समाधि लावून बसण्याकरितां एखादी योग्य गुहा मिळावी याकरितां विंध्य पर्वतावरील दऱ्यांमधून हिंडत होता. संसारभ्रम उत्पन्न करणाऱ्या आणि आधिव्याधींनीं भरलेल्या अनेकविध क्रियाकलापांचा त्याला कंटाळा आल्यामुळें एकांतवास पत्करून समाधीचा अभ्यास करावा, अशी इच्छा त्याच्या मनांत उत्पन्न झाली होती. निर्विकल्प समाधीच्या अल्पस्वल्प अंशानें प्राप्त होणाऱ्या आनंदाच्या श्रेष्ठ इच्छेमुळें पुष्कळ दिवस भोगलेल्या जीर्ण जगद्व्यापारांचा त्यानें त्याग केला होता. विंध्य पर्वतावरील दऱ्यांमधून हिंडतां हिंडतां त्याला हवी होती तशी गुहा न मिळाल्यामुळें अखेरीस त्या पर्वतावरील अरण्यामध्ये आपल्याला राहण्याकरितां त्यानें केळीच्या पानांची एक पर्णकुटिका तयार केली; व एखाद्या भ्रमरानें कमलामध्यें प्रवेश करावा, त्याप्रमाणें वीतहव्य मुनीनें निरनिराळ्या रंगाच्या फुलांमुळें सुगंधित झालेल्या त्या पर्णकुटिकेमध्यें प्रवेश केला. त्या ठिकाणीं सपाट, सारख्या व शुद्ध केलेल्या भूमीवर कृष्णाजिन पसरून, पर्जन्यवृष्टि करून शांत झालेला मेघ पर्वतावर जाऊन बसतो, त्याप्रमाणें वीतहव्य मुनि आसनावर जाऊन बसला. त्यानें पद्मासन घातलें, हाताचीं बोटें पायाच्या टांचावर ठेवलीं व पर्वताच्या शिखराप्रमाणें त्यानें आपलें शरीर अचल आणि सरळ ठेवलें असून मान किंचित् वर उचलून धरली. ज्याप्रमाणें संध्याकाळच्या वेळीं मेरुपर्वतावरील दरीमध्यें विश्रांतीकरितां जाणाऱ्या सूर्यानें आपलें प्रकाशकिरण आंवरून धरावे, त्याप्रमाणें नेत्रेंद्रियांच्या द्वारें दशदिशांना फांकलेलें आपलें मन वीतहव्यानें हळूं हळूं हृदयाचे ठिकाणीं आंवरून घेतलें. नंतर विषयभोगासंबंधाचे सर्व विचार क्रमाक्रमानें आंवरून निष्पाप मनानें वीतहव्य मुनि विचार करूं लागला. तो म्हणालाः—अत्यंत चंचल असलेलें हें मन कितीहि आंवरून धरलें तरी पाण्यामधील तरंगामध्यें फिरणाऱ्या झाडाच्या पानांप्रमाणें क्षणभर सुद्धां स्थिर होत नाहीं, हे केवढें आश्चर्य आहे ? चक्षुरादि इंद्रियांच्या नादीं लागून भोग्यविषयांच्या मागें धांवणारें हें मन पायानें उडविलेल्या चेंडूप्रमाणें एकसारखें भ्रमण करीत असतें. एका विषयवृत्तीला टाकून दुसऱ्या विषयवृत्तीचें ग्रहण करावयाचें, अशा रीतीनें या मनाचा अव्याहत क्रम चाललेला असून ज्या विषयांपासून त्याला परावृत्त करावें, त्याच्याकडे तें एखाद्या उन्मत्त मनुष्याप्रमाणें पुनःपुन्हा धांवत असतें. ज्याप्रमाणें एखादें माकड ह्या झाडावरून त्या झाडावर अशा रीतीनें उड्या मारतें, त्याचप्रमाणें हें चित्त घटावरून पटावर आणि पटावरून एखाद्या गाड्यावर अशा क्रमानें निरनिराळ्या विषयांवर एकसारखें उड्या मारीत सुटतें. वाणी, नेत्र, कर्ण, जिव्हा आणि घ्राणेंद्रिय हीं मनाचीं पांच द्वारें आहेत. परंतु हीं पंचेंद्रियरूपी द्वारें अत्यंत निंद्य असून मी त्याच्याकडे तिरस्कारबुद्धीनेंच अवलोकन करतों. समुद्रांतील लाटाप्रमाणें चंचल

असणाऱ्या हतभागी इंद्रियांनों! समाधीच्या योगानें आत्मदर्शन करून देण्याचे कामीं मला मदत करण्याला तुम्हाला मुळीच वेळ मिळत नाहीं का? अहो चंचल इंद्रियानों! नको नका, अनर्थाला कारणीभूत होणारी चंचलता धारण करूं नका. पूर्वी भोगलेल्या असंख्य दुःखजालाचें स्मरण करा. हे इंद्रियानों! तुम्हीं मनाचीं जड आणि अधम अशीं रूपें आहां; यास्तव तुमच्या ठिकाणची हालचाल मृगजळाप्रमाणें भ्रामकच असावयाची. असार आणि अनृतस्वरूप अशा तुमच्या दुर्मार्गप्रवृत्तीला आडमार्गांत शिरून कूपामध्यें पडणाऱ्या आंधळ्याचीच उपमा लागू पडते. मी भगवान् चिदात्मा दर्शनादि सर्व व्यवहार साक्षित्वानें करतों. मग हे हतभागी इंद्रियानों! तुम्हीं व्यर्थ व्याकुल कां होतां? पेटलेलें लांकूड गरगर फिरविलें असतां दिसणाऱ्या चक्राकृतीप्रमाणें अथवा रज्जूवर भासणाऱ्या सर्पाप्रमाणें सत्स्वरूपशून्य अशा माझ्या नेत्रादि इंद्रियांचे होणारे सर्व व्यवहार निःसंशय भ्रामक आहेत. ज्याप्रमाणें अंतरिक्ष आणि पातालांतील पर्वत यांचा यत्किंचितहि संबंध नसतो, त्याचप्रमाणें ज्याला आपल्या साक्षिरूप आणि सर्वप्रकाशक अशा आत्मस्वरूपाचें ज्ञान झालें, त्याच्या दृष्टीनें आत्मस्वरूप आणि नेत्रादि इंद्रियें याचा एकमेकांशीं बिलकूल संबंध असत नाहीं. ज्याप्रमाणें सर्पांना पाहून एखादा वाटसरू पळून जातो किंवा चांडालापासून ब्राह्मण दूर रहातो, त्याचप्रमाणें नेत्रादि इंद्रियापासून चिदेकरस आणि निरुपाधिक असा आत्मा फार दूर असतो. ज्याप्रमाणें सूर्यप्रकाशाच्या आश्रयानें लोकांचीं सर्व सांसारिक कर्मे चालू असतात, त्याचप्रमाणें हे इंद्रियांनों! चिदात्म्याच्याच सत्तेनें तुमचे सर्व कारभार स्वैरगतीनें चाललेले असतात. अरे इंद्रियप्रवर्तका! अरे चार्वाका (देहाभिमान्या)! अरे पोटासाठीं चारी दिशांना भटकणाऱ्या भिक्षुका चित्ता! परिणामीं अनर्थालाच कारणीभूत होणारें असें हें कुत्र्यासारखें जगभर भटकणें आतां सोडून दे! मी चेतनरूप आहें अशी तुला भ्रांति झाली असेल, तर तिला रजा दे; कारण, ती तुझी भ्रांति निखालस खोटी आहे. अरे शठा! चैतन्य आणि तूं याचीं स्वरूपें परस्पराहून अत्यंत भिन्न असल्यामुळें तुमचें ऐक्य होणें कालत्रयीहि शक्य नाहीं. अरे दुष्टा! माझ्यामुळें देह जिवंत आहे असा तुला अहंकार झाला असेल, तर त्याचा त्याग कर. कारण, तो निःसंशय असत्य असून तो तुझ्या दुःखालाच कारण होईल. गाढ झोंपेच्या स्थितीमध्यें अहंकाराचें अस्तित्व नसतां जर देह जिवंत असतो, तर तुझा अभिमान व्यर्थच ठरत नाहीं का? अरे चित्ता! अहंभावनेचा उदय होतांच कार्यकारणसमुदायाचा अधिष्ठाता मीच आहें असा तुला गर्व झाला असेल, तर तोहि अजिबात सोडून दे. कारण मूर्खा! खरें पाहूं गेलें तर तुला अस्तित्वच नाहीं. मग तूं विनाकारण धडपडतोस कां? संविद्रूपी चित् अनाद्यनंत असून तिच्या व्यतिरिक्त या जगांत कशालाहि सत्ता नाहीं. अशा स्थितींत अरे महामूर्खा! या देहामध्यें चित्त हे नांव धारण करणारा असा तूं आहेस तरी कोण? हे चित्ता! विषय भोगतांना 'मी भोक्ता आहें' व कार्य करतांना 'मी कर्ता आहें' अशा प्रकारची भावना तुला अमृताप्रमाणें गोड वाटत असेल; परंतु परिणामीं ती तुला विषाप्रमाणें दुःखदायकच होईल. असे असता अरे हतभाग्या चित्ता! तूं कर्तृत्वभोक्तृत्वाचा अभिमान व्यर्थ धारण कां करतोस? मूर्खा! इंद्रियगणांच्या जोरावर कर्तृत्वाच्या घमेंडींत राहून तूं विनाकारण आपला उपहास करून घेऊं नकोस. तूं कर्ता नाहींस व भोक्ताहि

नाहींस; तर तूं जड आहेस. अर्थात्, चिदात्म्याच्या ओंजळीनें पाणी पिणारा आहेस. विषयभोगांचा तूं कोण? आणि विषयभोग तरी तुझे कोण लागतात? जड आणि मिथ्याभूत अशा तुला जर सत्ताच नाहीं, तर तुला आप्त, बंधु किंवा मित्र तरी कोठून असणार? जें जड असतें त्याला वस्तुतः अस्तित्वच नसतें, व तें जरी सद्रूप भासलें तरी स्फटिकावर भासणाऱ्या तांबडया फुलांच्या प्रतिबिंबाप्रमाणें वस्तुतः असद्रूपच असतें. ज्ञातृत्व, कर्तृत्व, भोक्तृत्व आणि पूर्वापरविषयांचें अनुसंधान हे धर्म चैतन्यावांचून इतर कोणाच्याहि ठिकाणीं संभवत नाहींत. आता 'मी प्रत्यगात्मा आहें,' अशीच जर तुझी प्रामाणिक समजूत असेल, तर तूं आत्मरूप आहेस असेंच ठरत असल्यामुळें कर्तृत्व, भोक्तृत्व, सत, असत् इत्यादि दुःखदायक विकल्प तुझ्या ठिकाणीं असणें कालत्रयींहि संभवत नाहीं. अर्थात् तूं जडच आहेस. कर्तृत्वभोक्तृत्वादि धर्मांचा तूं आपल्या ठिकाणीं व्यर्थ आरोप करून घेतलेला असल्यामुळें मी आतां त्या धर्मांचें युक्तीनें हळू हळू कसें निवारण करतों तें पहा. बा चित्ता! तूं स्वतः जड आहेस याबद्दल मुळींच शंका नाहीं, मग तुझ्या ठिकाणीं कर्तृत्व कसें असणार? दगडाच्या पुतळ्या नृत्य करतांना कधीं कोणीं पाहिल्या आहेत कां? आतां काष्ठाच्या प्रतिमा मनुष्यानें हालविल्यामुळें नृत्य करतांना दिसत नाहींत का? असें कदाचित् तूं विचारशील, परंतु यावर मी असें सांगतों कीं, तूं म्हणतोस तें खरें आहे, व त्याप्रमाणें तूंहि जीवचैतन्याच्या बळावरच जिवंत राहतोस, इच्छा करतोस, मारतोस व इतर व्यवहार करतोस, परंतु या तुझ्या जीवनादि क्रियांचा फलभोक्ता चिदात्माच ठरतो. अशा स्थितींत तूं जीवनाकरितां विनाकारण धांवाधांव कां करतोस? तूं चिदात्म्याच्या जोरावर खुशाल चिरकाल जिवंत रहा; परंतु कर्तृत्वभोक्तृत्वाचा मालक मात्र तूं नव्हेस. कारण, जें ज्याच्या शक्तीनें केलें जातें, तें त्यानेंच केल्यासारखें होतें. कुऱ्हाड लांकूड तोडतांना दिसते, परंतु कुऱ्हाडीनें लांकूड तोडलें असें कोणीहि समजत नाहीं; तर ज्या मनुष्याच्या शक्तीनें लांकूड तोडलें जातें, तोच खरा लांकूड तोडणारा ठरतो. जें ज्याच्या शक्तीनें मारलें जातें तें त्यानेंच मारलें असें होतें. पुरुषाच्या शक्तीनें तरवार प्रल्हादाचा वध करीत असल्यामुळें तरवार धारण करणाऱ्या पुरुषानें वध केला असें लोक म्हणतात; खुद्द तरवारीनें वध केला असें कोणीहि म्हणत नाहींत. जें ज्याच्या शक्तीमुळें प्यायलें जातें, तें त्यानेंच प्यायल्याप्रमाणें होतें. मनुष्य भांड्यानें पाणी पितो, परंतु मनुष्य पाणी प्यायला असेंच समजलें जातें, भांडें पाणी प्यायलें असें कोणी केव्हांच समजत नाहीं. याच न्यायानें बा चित्ता! तूं स्वभावतः अत्यंत जड असल्यामुळें तुझ्याकडे कोणत्याहि गोष्टीचें कर्तृत्व येऊं शकत नाहीं, कारण, चिदात्मा आपल्या संकल्पानें भोक्ता, भोग्य इत्यादि रूपें स्वप्नांतील स्थितीप्रमाणें धारण करीत असतो. तो चिच्छक्तिसंपन्न आत्मा तुला निरंतर बोध करीत असतो, कारण, उपदेश करण्याला योग्य असे जे अज्ञानी असतात त्यांना ज्ञात्यांनीं शेंकडों वेळां उपदेश करावा, हें सर्वथैव युक्तच आहे. बा चित्ता! बोधैकरूप अशी आत्मसत्ताच या लोकांत सर्वत्र स्फुरत असते. त्या आत्मसत्तेनें तुझ्या नामाचा आणि रूपाचा अंगिकार केला असल्यामुळेंच तुला अस्तित्व प्राप्त झालें आहे. सारांश चित्ता! आत्मशक्तीपासून स्वतःच्या अज्ञानामुळें तुला चित्तरूप प्राप्त झालेलें आहे. परंतु सूर्यप्रकाशामध्यें असलेलें बर्फ वितळून जातें, तद्वत् आत्मस्वरूपाच्या

ज्ञानामध्यें तूं विरून जातोस. यास्तव बा चित्ता! तूं मृत आहेस, मूढ आहेस व परमार्थ दृष्टीनें तुझें आस्तित्वच नाहीं. अशी वस्तुस्थिति असल्यामुळें जन्मादि दुःखांना कारणीभूत होणारा असा चिदात्माचा अध्यास तूं आपणावर व्यर्थ करून घेऊं नकोस. एकाद्या गारोड्यानें उत्पन्न केलेल्या मायिक लतेप्रमाणें ही चित्ताची कल्पना मिथ्या असून विज्ञानमात्र असें ब्रह्मस्वरूपच या जगांत सर्वत्र विलास करीत आहे ज्याप्रमाणें लाटा, तरंग इत्यादि रूपानें समुद्रच विस्तारलेला असतो, त्याप्रमाणें मनुष्य देव व जगांतील इतर वस्तू यांच्या रूपानें चिच्छक्तीनें संपन्न असलेली ब्राह्मी मायाच विस्तार पावलेली आहे. बा मूढा चित्ता! तूं जर खरोखर चिन्मय असशील, तर परमात्म पदाहून तुझें स्वरूप भिन्न नाहीं, मग तूं विनाकारण शोक कां करतोस? तें परमात्मपद सर्वव्यापी, सर्वगत आणि सर्वरूप असें आहे. बा चित्ता! तें परमपद प्राप्त झालें असतां सर्वदा सर्व कांहीं प्राप्त झाल्यासारखेंच आहे बा चित्ता! तूं नाहींस, व ज्याला तूं आपला देह म्हणून म्हणतोस तोहि नाहीं, तर महत् ब्रह्मच सर्वत्र स्फुरत असून त्या स्पंदराहत ब्रह्माच्या ठिकाणींच 'मी', 'तूं' इत्यादियन्वयावत् आभास उत्पन्न होत असतात. अशा स्थितींत कोणी कोणाबद्दल दुःख करावयाचें! बा चित्ता! जर तूं आत्मा असशील, तर आत्मा सर्वगत असून आत्म्याव्यतिरिक्त या जगांत कांहींच नाहीं. बरें जर तूं आत्म्याहून भिन्न आणि जड असशील, तर तुला वस्तुतः अस्तित्वच नाहीं. हें सारें त्रैलोक्य आत्माच आहे, त्याव्यतिरिक्त दुसरें कांहींच नाहीं. तूं आत्मा असशील तर तुझें नित्य अस्तित्व आहे, व तूं आत्म्याहून भिन्न असशील, तर तुला परमार्थ दृष्टीनें अस्तित्वच नाहीं. अशी वस्तुस्थिति असल्यामुळें 'हा मी' 'हें माझें बाल शरीर', हें माझें वृद्ध शरीर', 'हा माझा संसार', अशा कल्पना तूं विनाकारण कां करतोस? अनात्मवस्तूला कधीं तरी वास्तविक सत्ता असते का? सशाचें शिंग लागून आजपर्यंत कोणी मेला आहे का? अरे शठा! छाया आणि प्रकाश यांच्याहून तिसरा एखादा प्रकार नसतो, त्याप्रमाणें चेतन आणि जड यावांचून या जगांत तिसरी कल्पनाच संभवत नाहीं. सम्यक्ज्ञानदृष्टीच्या योगानें चित्तांतील चिदाभास आणि बाह्य जगांतील जडत्व ह्या दोन्ही दृष्टी अविद्येसह अस्तंगत झाल्या असतां स्वसंवेद्य असें जें कांहीं अवशिष्ट राहतें, तें परब्रह्मच तुझें वास्तविक स्वरूप आहे. अरे मूढा! अशा स्थितींत तुझ्या ठिकाणीं कर्तृत्व आणि भोक्तृत्व यांची वार्ताहि नाहीं. यास्तव आपल्या ठिकाणचा मूर्खपणा सोडून दे आणि आत्मज्ञानसंपन्न हो. आतां या ठिकाणीं तुझ्या मनांत कदाचित् शंका येईल कीं, 'मनानेंच आत्म्याचें वारंवार दर्शन करून घ्यावें, (मनसैवानुद्रष्टव्यं) 'मनानेंच आत्म्याची प्राप्ति करून घ्यावी'(मनसैवेदमाप्तव्यं) 'या जगांत नानात्व मुळींच नाहीं' (नेह नानास्ति किंचन) इत्यादि श्रुतींमध्यें मन हें आत्मज्ञानाचें उपकरण म्हणजे साधन आहे असें वर्णन करण्यांत आलें असता आत्मा' हेंच माझें स्वरूप आहे असें तूं कसें म्हणतोस? तर या शंकेचें समाधान असें आहे कीं, अज्ञदशेमध्यें मुमुक्षूंना उपदेश करण्याकरितां चित्ताच्या किंवा मनाच्या योगानें आत्मा स्वात्मसाक्षात्काररूपी कार्य करून घेतो, असा अध्यात्मशास्त्र आणि सद्गुरू सिद्धान्त सांगत असतात, परंतु ज्ञानोपदेशाकरितां योजलेली ही युक्ति खरोखर कल्पितच आहे. चित्त हें असत्स्वरूप, जड, कर्तृत्वरहित आणि स्पंदशक्तिरहित असून चैतन्यानें जागृत केल्यावांचून कांहीं एक करूं शकत नाहीं. कर्त्याच्या अधि-

षु.नाव्यतिरिक्त नुसत्या उपकरणामध्यें कोणत्याहि प्रकारची शक्ति असत नाहीं. तोडणाऱ्या पुरुषावांचून नुसत्या कुऱ्हाडीच्या अंगीं कोठली शक्ति आली आहे? खड्गप्रहार करून एखादी वस्तु छिन्नभिन्न करण्याची शक्ति पुरुषाच्या ठिकाणीं असते, जड अशा खड्गाच्या ठिकाणीं नसते. यास्तव बा चित्ता! तूं उपकरण आहेस असें मानलें, तरी सुद्धां तुझ्या ठिकाणीं कर्तृत्व नाहीं. मग विनाकारण कर्तृत्वाभिमानाच्या भरीं भरून दुःखाचा वांटेकरी कां होतोस? मूर्खा! दुसऱ्याकरितां व्यर्थ दुःख करणें तुझ्यासारख्या प्रकृतिपासून उत्पन्न झालेल्याला मुळींच शोभत नाहीं. आतां ईश्वर हा स्वतः मोहाला वश होऊन जीवस्वरूप बनत असल्यामुळें जीवांना होणारीं दुःखें वास्तविक ईश्वरालाच होतात; यास्तव मी ईश्वराकरितां शोक करतों, असें कदाचित् तूं म्हणशील, परंतु हें म्हणणें अगदीं व्यर्थ आहे. तूं ईश्वराकरितां शोक करावास, हें सर्वथा अनुचित आहे. जो तुझ्या स्वभावाचा असेल त्याच्याकरितां तूं शोक केलास, तर तो कदाचित् शोभेल, परंतु ईश्वर हा कांहीं तुझ्यासारखा नाहीं; ईश्वराच्या स्वरूपाहून तुझें स्वरूप अगदीं भिन्न आहे. या जगांत कोणतेंहि कर्म करून ईश्वराला कांहीं प्राप्त करून घ्यावयाचें नाहीं, व कोणतेंहि कर्म न केल्यानेंहि त्याला कांहीं कार्य साधावयाचें आहे, असें नाहीं. अशा स्थितींत ईश्वराबद्दल शोक करण्याचें तुला काय कारण आहे? या शरीरसंघाताचा अभिमान धारण करून मी आत्म्यावर उपकार करीत आहें अशा गर्वानें तूं फुगून गेला असशील, तर तो तुझा गर्व अगदीं निरर्थक असून व तें तुझ्या मंदबुद्धीचें निदर्शक असून या मंदबुद्धीच्या योगानें तूं आपल्याला विनाकारण त्रास मात्र करून घेत आहेस. कारण शरीरसंघाताच्या ठिकाणीं वास करणारे पंचप्राण, इंद्रियें, मन व बुद्धि हीं अचेतन असल्यामुळें त्यांना विषयभोगांपासून यत्किंचित्हि फायदा होत नाहीं. आतां सकल भोग-भोगणाऱ्या ईश्वरासाठीं मी ही सारी खटपट करीत आहें असें जर तुझें म्हणणें असेल, तर तें अगदींच व्यर्थ आहे. कारण, ईश्वर हा नित्यतृप्त असल्यामुळें जगांतील कोणत्याहि विषयांचा उपभोग घेण्यासंबंधानें त्याच्या ठिकाणीं इच्छा उत्पन्न होणेंच शक्य नाहीं.

सारांश, स्वयंप्रकाश, सर्वगत व एकमेवाद्वितीय अशा चिदात्म्यानें हें त्रिभुवन व्यापलें गेलें असून या त्रैलोक्यांत त्या चिदात्म्यावांचून दुसरी कल्पनाच संभवत नाहीं. अनेक रूपांनीं नटणाऱ्या एका परिपूर्ण परमात्म्यानें आपल्या उदरामध्यें अखिल ब्रह्मांडें कल्पनेनें निर्माण केलेलीं असल्यामुळें त्या पूर्णाच्या ठिकाणीं कोणत्या विषयासंबंधाची इच्छा उत्पन्न होणार! तारुण्यमदानें उन्मत्त झालेल्या राणीला पाहतांच एखाद्या तरुणाचें मन क्षुब्ध होऊन जातें, तद्वत् तुझ्यासारख्या मूर्खाच्या ठिकाणींच या जगांतील विषय अवलोकन करण्यामुळें निरर्थक क्षुब्धता उत्पन्न होते. बा सुंदरा! तूं जेव्हां आत्म्याशीं तादात्म्य पावतोस, तेव्हां तुझ्या ठिकाणीं सर्व कर्तृत्व संभवतें; परंतु ज्याप्रमाणें फळ हें फुलापासून उत्पन्न झालेलें असलें, तरी तें फुलापासून बहिर्मुख झालेलें असल्यामुळें तें फुलाच्या सुगंधाचा उपभोग घेण्याला समर्थ होत नाहीं, त्याचप्रमाणें तूं आत्म्यापासून उत्पन्न झाला असलास, तरी आपल्या बहिर्मुखवृत्तीमुळें तूं आत्मसुखाचा उपभोग घेण्याला समर्थ होत नाहींस. एका वस्तूची किंवा क्रियेची दुसऱ्या वस्तूशीं अगर क्रियेशीं एकरूपता होणें, किंवा एकीचा दुसरीमध्यें अंतर्भाव होणें हेंच त्यांच्या संबंधाचें खरें पर्यवमान असून

हीच स्थिति तुझ्यामाझ्यामध्यें झाली आहे. तूं पूर्वी माझ्याहून म्हणजे आत्म्याहून भिन्न असल्यामुळें तूं आतां माझ्याशीं एकरूप झाला आहेस, असें मी म्हणतों. या तुझ्यामाझ्या एकरूपतेचें श्रेय तुझ्यामाझ्याकडे येऊं शकत नाहीं, कारण, तूं अनेक विहित आणि निषिद्ध क्रिया करून सुखदुःखदशा उत्पन्न करण्यालाच कारणीभूत होतोस, ही गोष्ट प्रसिद्ध आहे. शिवाय दुधासारख्या पूर्ण समानधर्मी पदार्थांची अथवा दूध आणि पाणी यांच्यासारख्या अर्धवट समानधर्मी पदार्थांची एकरूपता होऊं शकते; परस्परांहून अत्यंत भिन्न धर्मांनीं युक्त असलेल्या पदार्थांची एकरूपता होत असल्याचें त्रिभुवनांत कोठेंच दिसून येत नाहीं. आतां यावर कदाचित् तूं असें म्हणशील कीं, 'शब्दस्पर्शादि विरुद्ध धर्मांनीं युक्त असलेल्या सूक्ष्म पंचमहाभूतांचें पंचीकरणाच्या योगानें एकत्र मेळन होतें, त्याचप्रमाणें आत्म्याचें आणि माझें एकीकरण होण्याला काय हरकत आहे ?' तर याचें उत्तर असें आहे कीं, जगांतील प्रत्येक द्रव्य जरी पंचीकरणाच्या योगानें बनलेलें असतें, तरी द्रव्यामधील गुण हे केव्हांहि द्रव्याचाच आश्रय करून राहतात. परंतु द्रव्य आणि गुण हे परस्परविरुद्ध नसल्यामुळें त्यांचा संयोग होऊन दोहोंचेंहि अस्तित्व कायम राहूं शकतें. संवित् आणि तूं यांच्या एकरूपतेची स्थिति मात्र अशी होऊं शकत नाहीं, कारण, संवित् व तूं यांचे चेतनत्व व जडत्व हे धर्म अत्यंत विरोधी आहेत; तुझ्यापासून संवित् निराळी झाल्यास तुझ्या अस्तित्वावरच घाला पडणार, कारण, संवित्‌शिवाय जडाची उत्पत्तिच संभवत नाहीं. बरें, तूं संवित्‌हून निराळा झालास, तर आत्म्याशीं तुझा संबंध येतांच तुझ्यावर नाशाचा प्रसंग आपोआपच ओढवणार. यास्तव बा चित्ता ! तूं संवित्‌हून निराळा होऊं नकोस, अथवा संवित्‌चा म्हणजे अंतर्ज्ञानदृष्टीचा उदय होऊन तुझ्यासारख्या दुःखप्रद दृश्याचा नाश झाला असतां निरतिशयानंदस्वरूपी चिदात्माच अवशिष्ट रहात असल्यामुळें तुझा नाश होणें हेच सर्वथा श्रेयस्कर आहे. यास्तव आत्म्याचें एकाग्रपणानें ध्यान करून तूं नित्य समाधिस्थितीमध्यें राहून आत्मदर्शी हो. संविद्रूपाहून च्युत होऊन पाषाणाप्रमाणें जड असणारें मन, देह व इंद्रियें यांच्या ठिकाणीं संकल्पोन्मुख होणें हेंच दुःखप्रद आहे. आतां यावरहि कदाचित् तूं असें म्हणशील कीं, 'मी स्वतः संकल्प करीत नाहीं; तर संकल्प करणें हा आत्म्याचा स्वभाव असल्यामुळें संकल्पाचें कर्तृत्व आत्म्याकडे आहे, माझ्याकडे नाहीं.' परंतु या तुझ्या म्हणण्यांत कांहींच अर्थ नाहीं. कारण बा चित्ता ! आत्म्याच्या ठिकाणीं वास्तविक कर्तृत्वभावना कोठून उत्पन्न होणार ! आकाशाचे ठिकाणीं कधीं पुष्प उत्पन्न झालें आहे का ! ज्याप्रमाणें आकाशाला शरीर असणें संभवत नाहीं, त्याचप्रमाणें ज्याच्या ठिकाणचा कल्पनारूपी चिखल नष्ट झाला आहे आणि मनोनाश हेंच ज्याचें स्वरूप आहे, अशा आत्म्याचे ठिकाणीं कर्तृत्वभावाचा उदय होणें केव्हांहि संभवत नाहीं; तर ज्याप्रमाणें फेस, बुडबुडे यांच्या रूपानें समुद्रच स्फुरत असतो, त्याचप्रमाणें भासमान होणाऱ्या जगांतील सर्व वस्तूंच्या रूपानें केवळ चिदात्माच स्फुरण पावत असतो. ज्याप्रमाणें समुद्रामध्यें जळजळीत निखारा असण्याचा कालत्रयीं संभव नाहीं, त्याचप्रमाणें बा चित्ता ! तुझ्या कल्पनेमुळें या जगामध्यें नानाविधत्व भासमान होत असलें, तरी एकमेवाद्वितीय अशा चिदात्म्यामध्यें द्वैताची कल्पनाच मुळीं संभवत नाहीं. एवंच, आत्मदेव हा कल्पनारहित असून देह आणि मन हीं, जड आहेत,

यामुळें विवेकदृष्ट्या विचार केला असतां, 'हें निराळें', 'तें निराळें', 'हें शुभ' 'तें अशुभ,' इत्यादि कल्पना आकाशांतील सुवर्णकल्पनेप्रमाणेंच मिथ्या होत. सारांश, संवेद्य-कल्पनेरहित असलेली संवित् हीच या जगाच्या रूपानें विस्तारली गेली आहे. अशा स्थितींत त्या संवित्मध्यें 'मी', 'तूं', 'तो' इत्यादि कल्पनांना खरा अवकाश कोठून मिळणार ? अनाद्यनंत, रूपरहित, सर्वगत आणि अपार अशा चिदात्म्याचे ठिकाणीं कल्पनेचा आरोप कोण करणार ! आकाशामध्यें ऋग्वेदासारखा एखादा प्रचंड ग्रंथ कोणी कधीं लिहूं शकेल का ! अखेरीस बा चित्ता ! मी तुला एवढेंच सांगतों कीं, नित्यस्वयंप्रकाश, सकल वस्तूंच्या आणि शब्दांच्या सारभूत, अत्यंत निर्मल व दशदिशांमध्यें भरून राहिलेल्या अशा चिदात्म्याचे ठिकाणीं तूं स्वानुभवानें एकरूप होऊन गेलास, म्हणजे तुझ्या ठिकाणच्या सुखदुःखादि असत्कल्पना क्षीण होऊन जातील व मीं पूर्वी अनेक सुखदुःखें भोगलीं आहेत, अशा तऱ्हेचा जो प्रत्यय तुला येतो, तो सत्य नसून केवळ मोह आहे, अशीच तुझी निःसंशय खात्री पटेल.

---

## सर्ग ८३

—:●:—

१. जोंपर्यंत चित्त आणि इंद्रियें यांचें अस्तित्व आहे, तोंपर्यंत अनेक दोष व अनेक अनर्थ उत्पन्न होतात; व त्यांचा नाश झाला म्हणजे सर्व गुण आणि सौख्य यांची प्राप्ति होते.

श्रीवसिष्ठ:—राघवा ! नंतर त्या पर्णकुटिकेमध्यें एकांतांत राहिलेल्या धैर्यवान् मुनिश्रेष्ठ वीतहव्यानें आपल्या शुद्धबुद्धीच्यायोगानें इंद्रियगणांना पुढें वर्णन केल्याप्रमाणें सुंदर उपदेश केला. रामा ! वीतहव्यानें आपल्या इंद्रियगणांच्या हितासाठीं त्यांना केलेला उपदेश मी तुला आतां सांगत आहें, तरी तो उपदेश ऐकून वीतहव्याप्रमाणें तूंहि ब्रह्मभावना करून परमश्रेष्ठ आणि दुःखरहित अशा स्थितीप्रत जाऊन पोहोंच. वीतहव्य म्हणाला:—"हे इंद्रियगणहो ! अविवेकामुळें आत्म्याहून भिन्नपणानें भासणारी तुमची सत्ता जिवंतपणीं अनेक अनर्थांना व दुःखांना आणि पुनःपुन्हां मृत्युनरकांच्या परंपरेलाच कारणीभूत होते; यास्तव तुम्हीं आपल्या मिथ्या सत्तेची कल्पना अजिबात सोडून द्या. मीं नुकत्याच केलेल्या आत्मतत्त्वोपदेशाच्या योगानें तुमची सत्ता निःसंशय अस्तंगत झाली आहे, असेंच मी मानतों.: कारण, तुमची उत्पत्ति अज्ञानापासून होत असते, व आत्मोपदेशाच्या योगानें एकदां अज्ञान नष्ट झालें, म्हणजे तुम्हांला सत्ता प्राप्त होणें शक्यच नाहीं. अरे क्षुद्र चित्ता ! . तप्त झालेल्या सुवर्णाप्रमाणें आवाज करणाऱ्या अग्नीमध्यें लहान मुलें क्रीडा करूं लागलीं असतां त्यांचें अंग होरपळून गेल्याशिवाय रहात नाहीं, त्याचप्रमाणें तुझी स्वतंत्रपणानें असणारी सत्ता दुःखप्रद झाल्याशिवाय रहात नाहीं. चित्ता ! आत्म्याहून भिन्नपणानें तुझें अस्तित्व असल्यामुळें केवढाल्या अनर्थपरंपरा ओढवतात, याच्याकडे नीट लक्ष दे. जोंपर्यंत तुझें अस्तित्व आहे तोंपर्यंत भ्रांतजनरूपी जलांच्या लाटांनीं व्याप्त झालेल्या संसाररूपी नद्यांचे समुदाय कालरूपी समुद्रामध्यें एकसारखे प्रविष्ट होत असतात. परस्परांच्या अहंकारामुळें एकमेकांच्या नाशाविषयीं केल्या जाणाऱ्या चिंतनाच्या योगानें उत्पन्न होणाऱ्या दुःखपंक्तिरूपी जलधारा कोठल्यातरी ठिकाणाहून एकसारख्या कोसळत असतात. तसेंच हृदयाचा उच्छेद करण्याविषयीं उत्सुक असलेला, एकसारखा आक्रोश कराव-

यास लावणारी, क्रूर आणि अनंत अशी संपत्तिविपत्तिरूपी महामारी पुनःपुन्हां निर्माण होत असते; व जिच्यावर कास (खोकला) व श्वास (दमा) रूपी भुंगे गुंजारव करीत आहेत, अशी शरीररूपी जीर्ण वृक्षावरील जरामरणरूपी मंजरी नेहेमीं विकास पावते. मनोरथतरंगरूपी सर्पांनीं वेष्टिलेल्या हृदयरूपी खांचेमधील इंद्रियरूपी छिद्रांच्या द्वारामध्यें चिंतारूपी कोळीण आपलें जाळें पसरून त्याच्यामध्यें संचार करीत असते. लोभरूपी विलासांमध्यें दंग होऊन चिंव्‌चिंव् असा शब्द करणारा कामरूपी पक्षी आपल्या सुखदुःखादिद्वंद्वरूपी तीक्ष्ण चोंचीचे प्रहार करून शरीररूपी जीर्ण वृक्षावरील शांति, दांति, धर्म इत्यादि गुणसमूहरूपी फुलें आणि फळें एकसारखीं तोडून टाकीत असतो. तसेंच अपवित्र, दुराचारी आणि कर्कश असा कामरूपी कोंबडा आपल्या पायांनीं निरंतर उकरीत राहून मनामध्यें रागादिवासनांचे उकीर तयार करतो. ज्याप्रमाणें स्मशानामध्यें वेताळ अकाळविकाळ शब्द करीत असतो, त्याप्रमाणें मोहरूपी महाभयंकर रात्रीमध्यें हृदयरूपी वृक्षावर बसलेलें अज्ञानरूपी घुबड एकसारखें घूत्कार करीत असतें. हे इंद्रियगणहो! तुम्ही जिवंत असतां रात्रीच्या वेळीं हडळी भयंकर शब्द करतात त्याप्रमाणें, या व आणखी किती तरी अशुभ संपत्ती आपला प्रताप गाजवितात. याच्या उलट प्रभातकाळीं प्रकाशासह कमलिनी विकास पावतात, त्याप्रमाणें बा साधु चित्ता! तूं जिवंत नसलास म्हणजे सर्व शुभ संपत्ती विवेकासहित विलास करूं लागतात. मोहरूपी अभ्रें नाहींशीं झाल्यामुळें आणि रजोगुणरूपी धुराळा दूर उडून गेल्यामुळें हृदयरूपी आकाश स्वच्छ प्रकाशाच्या योगानें शोभायमान होऊं लागतें. आकाशामध्यें एकत्र झालेले मेघ ज्याप्रमाणें वाऱ्याच्या प्रवाहामुळें विभागले जाऊन पर्जन्यधारा पडण्याचें बंद होतें, त्याचप्रमाणें चिताच्या विक्षेपाला कारणीभूत होणारे हृदयाकाशांतील विकल्पांचे ओघ निःशंकपणानें वहात नाहींसे होतात. ज्याप्रमाणें एकाद्या उत्कृष्ट अशा पुष्पवृक्षाला मंजरी उत्पन्न होते, त्याचप्रमाणें सर्वांना आल्हाद देणारी शांत आणि पवित्र अशी सर्वभूतांसंबंधाची मैत्री हृदयाचे ठिकाणीं उत्पन्न होते. दंवाऱ्या योगानें करपून जाणाऱ्या कमलिनीप्रमाणें मूढांच्या ठिकाणीं विद्या, कौशल्य वगैरे गुणांची योजना करणारी चिंता नष्ट होते; व शरदृतूमध्यें आकाशांतील मेघ शांत होऊन सूर्यमंडलाचा उत्कृष्ट प्रकाश पडावा, त्याप्रमाणें हृदयांतील अज्ञानाचा क्षय झाला असतां त्या ठिकाणीं ज्ञानाचा स्वच्छ प्रकाश पडतो. ज्याप्रमाणें वायु शांत झाला असतां समुद्र शांत होतो, त्याप्रमाणें अज्ञान नष्ट झालें असतां मनुष्याचें हृदय प्रसन्न, उदार, गंभीर, क्षोभरहित आणि वैषम्यहेतुरहित होऊन समतेच्या स्थितीप्रत जाऊन पोहोंचतें. ज्याप्रमाणें आकाशामध्यें शीतल असा चंद्र शोभायमान होतो, त्याप्रमाणें ब्रह्मरसानें परिपूर्ण आणि नित्य आनंदमय असा पुरुष (आत्मा) हृदयाकाशामध्यें शोभायमान होऊं लागतो. मनुष्याच्या ठिकाणीं असलेल्या अज्ञानाचा पूर्ण क्षय झाला असतां त्याच्या आत्माकार वृत्ती पूर्ण विकास पावतात, व त्यामुळें अखिल चराचर आपल्या परमात्मास्वरूपाच्या एका अंशामध्यें स्थित झालेलें आहे, असा अनुभव येऊन त्याचें शरीर ब्रह्मस्वरूपाच्या निरतिशयानंदामुळें ओतप्रोत भरून जातें. अर्थात्, तदनंतर आशापाश उत्पन्न करणाऱ्या प्राणांच्या योगानें तो केव्हांहि बद्ध होत नाहीं. ज्याप्रमाणें दावाग्नीमध्यें पानें दग्ध झालेल्या वृक्षांना वर्षाऋतु प्राप्त होतांच पुन्हां पालवी फुटते, त्याप्रमाणें

ज्यांचे संसार, जन्म आणि जरारूपी विस्तृत मार्ग ज्ञानरूपी अग्नीनें नष्ट झालेले आहेत, अशा पुरुषांच्या ठिकाणीं आरोग्य, पुष्टि, तुष्टि, उत्तम कांति वगैरे गुणसंपत्ती उदय पावतात; व असे आत्मवेत्ते पुरूष पुन्हा जन्ममरणाच्या फेऱ्यांत न पडतां आत्मरूपी वृक्षाखालीं कायमची विश्रांति पावतात. सारांश हे सर्वभक्षक चित्ता! तुझ्या ठिकाणच्या सर्व आशा क्षीण होऊन तुझा स्वतःचा नाश झाला असता आत्मभावानें तुझें अस्तित्व व अनात्मभावानें तुझें नास्तित्व या दोन पक्षांपैकीं ज्या पक्षाचा अंगिकार केला असतां आपलें शाश्वत कल्याण होईल असें तुला वाटेल, त्या पक्षाचा तूं तत्काल अंगिकार कर. बा मान्यश्रेष्ठा चित्ता! आत्मभावानें स्थित होणें हेंच तुला श्रेयस्कर आहे असें माझें मत आहे. यास्तव आत्मभावाव्यतिरिक्त आपलें अस्तित्व नाहीं, अशीच तूं आपल्या ठिकाणीं निरंतर भावना कर व सुखी हो. कारण, आत्मरूप झाल्यामुळें प्राप्त होणाऱ्या आत्यंतिक सुखाचा त्याग करणें हा केवळ मूर्खपणा आहे. बा चित्ता! सचेतन मन हेंच जर तुझें वास्तविक स्वरूप असतें, तर तुझा अत्यंत अभाव होण्याची इच्छा कोणीं केली असती? परंतु हे सुंदरा चित्ता! आत्मभावाव्यतिरिक्त तुझें स्वतंत्रपणानें अस्तित्व नाहीं, ही गोष्ट केवळ मी आपल्या अनुभवावरून सांगतों असें नाहीं, तर श्रुतिशास्त्रांचाहि अनुभव असाच आहे असें मी तुला स्पष्टपणें बजावतों. यासाठीं, आपल्या मिथ्या स्वरूपानेंच मी जिवंत राहीन, अशा भावनेनें तूं आपल्या भ्रामक स्वरूपामध्यें सुख मानून राहूं नकोस. आरंभापासूनच तुझें स्वरूप मिथ्या आहे, व मधल्या स्थितीमध्येंहि तुझें जें भ्रामक अस्तित्व भासतें, तें विचाराच्या योगानें आतां अजिबात नष्ट झालें आहे. बा साधो! जोंपर्यंत मनुष्याच्या ठिकाणीं अविचार आहे, तोंपर्यंतच तुझें रूप सत्य भासतें. परंतु सम्यक्रीत्या विचार केला असतां तुझें स्वरूप चिन्मात्र आणि विक्षेपवैषम्यरहित असेंच निरंतर स्थित आहे. ज्याप्रमाणें प्रकाशाच्या अभावामुळें अंधकार उत्पन्न होतो, त्याचप्रमाणें अविचारामुळें आत्मव्यतिरिक्त असें तुझें रूप भासमान होतें. परंतु प्रकाशाच्या योगानें अंधकार नाहींसा होतो, त्याप्रमाणें विचाराच्या योगानें तुझें तें मिथ्या स्वरूप आतां शांत झालें आहे. एवढा वेळपर्यंत तुझ्यासंबंधानें मीं योग्य विचार केलेला नसल्यामुळें मित्रा तुझें स्वरूप सत्य आहे असा मला भ्रम झाला होता. ज्याप्रमाणें लहान मुलाच्या दुःखालाच कारणीभूत होणारा वेताळ त्याच्या भ्रमामुळें उत्पन्न होतो, त्याचप्रमाणें मोहामुळें पुष्ट झालेलें तुझें स्वरूप सत्य आहे, असा भ्रम माझे ठिकाणीं उत्पन्न झाला होता. वास्तविक चित्ताचा भाव आणि अभाव, तसेंच सुख आणि दुःख या द्वंद्वकल्पना सृष्टिनिर्माणकर्त्या ईश्वराच्या संकल्पामुळें उत्पन्न होतात; परंतु माझ्या ठिकाणीं नित्य आत्मस्वरूपाचा उदय झाल्यामुळें ह्या विनाशी द्वंद्वकल्पना आतां अजिबात अस्तंगत झालेल्या आहेत. ज्या विवेकामुळें अविद्येच्या योगानें भासमान होणारें चित्ताचें स्वरूप क्षीण होऊन माझ्या हृदयांत नित्य आणि अनाद्यनंत अशा आत्मस्वरूपाचा उदय झाला आहे, अशा त्या विवेकाला माझे शतशः नमस्कार असोत. हे क्षुद्र चित्ता! विवेक आणि शास्त्रोपदेश यांच्या योगानें तुला अनेक वेळां बोध केल्यामुळें तूं आतां प्रबुद्ध झाला आहेस. पूर्वी तू परमेश्वरच होतास व आतां तुझ्या ठिकाणची चित्तता नाहींशी झाल्यामुळें तूं पूर्वीप्रमाणेंच परमेश्वर होऊन राहिला आहेस. सारांश, संपूर्ण वासनांपासून मुक्त होऊन ते

निःश्रेयसस्थितीप्रत जाऊन पोहोंचल्यामुळें महेश्वरच बनला आहेस. ज्याची उत्पत्ति अविवेकापासून होते, तोच विचारानें नाहींसा होतो. प्रकाशाच्या अभावामुळें उत्पन्न झालेला अंधकार प्रकाशामुळें नष्ट होतो, त्याप्रमाणें बा चित्ता! अविचारामुळें उत्पन्न झालेला तूं विचारामुळें आतां नष्ट झालास, हें अगदीं स्वाभाविक आहे. बा साधो! तुझी इच्छा नसताहि तूं आतां विवेकारूढ झाला आहेस. आत्मभिन्न अशा तुझ्या स्वरूपाचा सर्व बाजूंनीं झालेला हा नाश तुझ्या सुखालाच कारणीभूत झालेला आहे. यास्तव सिद्धान्त आणि युक्ती यांच्या योगानें तुझें स्वरूप आत्म्याहून वेगळें नाहीं असा मीं निर्णय केला आहे. हे इंद्रियेश्वरा चित्ता! ज्याअर्थीं तुझा अंत झाला आहे व तूं आत्मस्वरूपाप्रत जाऊन पोहोंचला आहेस, त्याअर्थीं तुझें निरंतर कल्याण असो! तूं पूर्वीं कधीं उत्पन्नच झालेला नव्हतास, साम्प्रतहि तूं विद्यमान नाहींस व पुढेंहि तूं उत्पन्न होणार नाहींस. यास्तव बा मना! तुझें सर्वदां कल्याण असो. मी सर्वतोपरी निर्वाणस्थितीप्रत जाऊन पोहोंचलों आहें, शांत झालों आहें व संतापशून्य झालों आहें, हें माझें मोठें भाग्यच म्हटलें पाहिजे. मी आतां तुर्यरूपी स्वात्मपदाच्या ठिकाणीं स्थित झालों आहें. या संसारामध्यें असद्रूप अशा चित्ताची केव्हांच स्थिति नाहीं; तर आत्म्यावाचून दुसरें कांहींहि विद्यमान नसल्यामुळें तो आत्माच मी आहें. ज्याअर्थीं आत्म्यावांचून या जगांत दुसरें कांहींहि नाहीं, त्याअर्थीं शुद्ध चिदेकरस असा बोधरूप आत्मा, अर्थात् मी सर्वदां सर्वत्र स्थित आहें. त्या निर्मल चिदात्म्यामध्यें 'मी आत्मा आहें', ही कल्पनासुद्धां संकुचित असल्यामुळें तिला तरी अवकाश कोठून मिळणार? यास्तव 'मी आत्मा आहें' या द्वैतकल्पनेचाहि उच्चार न करतां ज्याप्रमाणें तरंग जलाशीं तद्रूप होतो, त्याप्रमाणें मी मौन धारण करून आपल्या चिदात्मस्वरूपाच्या ठिकाणीं स्थित [illegible], सारांश, सर्व तऱ्हेच्या वासना [illegible], जडांशवर्जित, चेतनांशाच्या आश्रय [illegible], प्राणसंचारणशून्य व भेदभावरहित [illegible] आत्म्याशीं समरस होऊन मनोरथ [illegible], निरिच्छ, मुनिवृत्ति धारण करणारा [illegible] शांतवृत्ति होऊन राहिलों आहें."

---

## सर्ग ८४.

—:*:—

१. वीतहव्याचा समाधि व त्याचा [illegible] विवरामध्यें रहाणें. २. विद्याधरत्व, [illegible], शिवगणत्व इत्यादि मानसभोगांचें वर्णन.

**श्रीवसिष्ठः—राघवा!** याप्रमाणें [illegible] करून वासनारहित झालेला तो [illegible] विंध्यपर्वतावरील आपल्या पर्णकुटी [illegible] मनानें समाधि लावून बसला. [illegible] वृत्तीचा स्पंद अजिबात बंद [illegible] स्वात्मप्रकाशरूपी आनंदाच्या योगानें [illegible] दिमत होता; तसेंच त्याचें [illegible] अस्तंगत झाल्यामुळें एखाद्या [illegible] समुद्राप्रमाणें तो शोभायमान [illegible] ज्याप्रमाणें एखादें लाकूड [illegible] त्यांतील अग्नीच्या ज्वाळांचा कल्लोळ [illegible] क्रमानें शांत होतो, त्याचप्रमाणें [illegible] प्राण आंतल्याआंत शांत [illegible] न्मीलित झाले होते आणि [illegible] पणानें अंतर्मुख झालें होतें. [illegible] ठिकाणीं एकाग्रतेनें अवलोकन [illegible] नेत्रांना अर्धवट उमललेल्या [illegible] शोभा प्राप्त झाली होती. [illegible] मस्तक आणि मान अगदीं सरळ [illegible] बसलेला तो महाबुद्धिमान् वीतहव्य मुनि

एखाद्या पर्वतांतील पाषाणामधून कोरून काढलेल्या प्रतिमेप्रमाणें किंवा चित्रांतील मूर्तीप्रमाणें अगदीं निश्चल दिसत होता. अशा रीतीने विंध्यपर्वतावरील एका पाण्याच्या झऱ्याशेजारीं असलेल्या त्या पर्णकुटीमध्यें तो **वीतहव्य** मुनि तीनशें वर्षें समाधि लावून बसला होता; परंतु इतका मोठा काल त्याला एका घटकेप्रमाणें गेला. त्या आत्मवेत्त्या मुनीला हा तीनशें वर्षांचा काल केव्हां उलटून गेला, त समजलेंसुद्धां नाहीं. जीवन्मुक्तस्थितीमध्यें ध्यान धरून बसलेल्या त्या मुनीनें तेवढ्या अवधीमध्यें आपल्या शरीराचा त्याग केला नाहीं, किंवा तो समाधीमध्ये स्थित झाला असतां मेघांचा गडगडाट होऊन पर्जन्यधारांचा धो धो असा आवाज जरी होत असे, तरी तीनशें वर्षांच्या त्या दीर्घ कालामध्यें त्याच्या समाधीचें व्युत्थानहि कधीं झालें नाहीं. त्या प्रदेशाच्या आसपास राहणारे सामंतराजे मृगयेकरितां विंध्य पर्वतावर संचार करीत असता सैरावैरा पळत सुटणाऱ्या त्याच्या हत्तींचा मोठमोठ्यानें चित्काराध्वनि चाललेला असून अरण्यांतील पक्षी आणि वानर याच्या ओरडण्याचा गोंगाट चाललेला असे. तसेंच त्या अरण्यांतील सिंह, व्याघ्र वगैरे हिंस्र पशूंच्या क्रोधयुक्त गर्जना, समीप वाहणाऱ्या ओढ्यांचा खळखळाट, विजाचा प्रचंड कडकडाट, मृगयेकरितां आलेल्या लोकांचा कोलाहल, उन्मत्त झालेल्या शरभाचे भीषण ध्वनी, भूकंपामुळें कोसळून पडलेले पर्वताचे कडे एकमेकांवर आपटून त्यामुळें होणारा भयंकर शब्द, अरण्यांतील वणव्यामध्यें जळणाऱ्या वृक्षांचे चट्चट् आवाज, पर्वतांच्या शिखरांवरून वाहणाऱ्या पाण्याचे प्रवाह एकमेकांवर आपटून त्यामुळें होणारा प्रचंड ध्वनि, पर्वतांच्या कड्यांवरून तुटून खालीं पडणाऱ्या मोठमोठ्या पाषाणांच्या आदळण्यामुळें होणारे भीषण आवाज, जमिनीवरून वाहणाऱ्या गढूळ पाण्याच्या ओघांचा खळखळाट, इत्यादिकामुळें तसेंच अग्नीच्या प्रखर तापाप्रमाणें अत्यंत उग्र अशा ग्रीष्मऋतुमधील सूर्यकिरणांच्या तापामुळें त्या महात्म्या **वीतहव्य** मुनीच्या समाधिस्थितीचा केव्हांहि भंग झाला नाहीं. ज्याप्रमाणें पाण्याच्या पृष्ठभागावर लहरी संचार करतात, त्याप्रमाणें कित्येक वर्षाकाल निघून गेल्यानंतर कांहीं दिवसांनीं पावसाळ्यामध्यें वाहणाऱ्या जलप्रवाहामुळें त्या गिरिकंदरामध्यें चिखलाचे थरांवर थर सांचत जाऊन त्यामध्यें तो **वीतहव्य** मुनि गाडला गेला. संकटांनीं परिपूर्ण अशा त्या गुहेमध्यें तो **वीतहव्य** मुनि समाधि लावून बसला असतां ज्याप्रमाणें पर्वतामध्यें एखादी शिला रुतून बसावी, त्याप्रमाणें त्या मुनीचे खादे चिखलामध्यें रुतून गेले. अशा स्थितींत तीनशें वर्षें उलटून गेल्यानंतर पृथ्वीच्या उदरामध्यें रुतून गेलेला तो धैर्यशाली **वीतहव्य** मुनि अखेरीस समाधि व्युत्थान पावून देहभानावर आला. ज्याचा प्राणवृत्तिरूपी स्पंद अत्यंत सूक्ष्म झालेला होता, व ज्याच्या प्राणवायूचें अभिसरण बंद पडलें होतें अशा त्या मुनीचा पृथ्वीच्या उदरामध्यें अडकलेला देह लिंगदेहामध्ये प्रतिबिंबित झालेल्या संवितमुळें रक्षण केला गेला. पुढें देहभानावर आल्यानंतर मनोरूपाने असलेली त्याची जीवसंवित् हृदयामध्येंच स्थूलरूप धारण करून विचित्र अनुभव घेऊं लागली. कैलासपर्वतावरील सुंदर अरण्यांमध्ये कदंबवृक्षाच्या तळाखालीं त्यानें शंभर वर्षें जीवन्मुक्तस्थितीमध्यें घालविलीं. पुढें आणखी शंभर वर्षें त्यानें विद्याधर या नात्यानें आनंदानें कंठलीं व देव आणि चारण यांना वंद्य असलेल्या इंद्रपदाचा त्यानें पांच युगेंपर्यंत उपभोग घेतला.

श्रीरामः—वीतहव्य मुनीनें इंद्रत्वादि पदांचा प्रातिभासिक स्थितीमध्यें जो अनुभव घेतला, त्यामध्यें देश, काल इत्यादि नियतिक्रमाचा नियम आणि अनियम अशा दोन्ही गोष्टी कशा उत्पन्न झाल्या ? देशकालादिकांचा क्रम बदलणें कोणालाहि शक्य नसतां त्या वीतहव्य मुनीला आपल्या हृदयामध्यें अल्पकालांत दीर्घ कालाचा, तसेंच हृदयाच्या लहानशा जागेमध्यें स्वर्ग, कैलास इत्यादि विस्तीर्ण प्रदेशांचा अनुभव कसा आला ?

श्रीवसिष्ठः—रामा ! सर्वात्मिक अशी ही चिच्छक्ति ज्या ज्या ठिकाणीं उदित होते, त्या त्या ठिकाणीं ती आपल्या परिच्छिन्न भावनेनें अल्पकालामध्यें तसतसा अनुभव घेते. ज्यावेळीं ज्या ठिकाणीं बुद्धीमध्यें जसा जसा नियम स्थित झालेला असतो, त्यावेळीं त्याठिकाणीं बुद्धि आत्म्याशीं तन्मय झालेली असल्यामुळें तिला देशकालादि नियमांचा तसतसा अनुभव येतो. यामुळें निर्वासन अशा वीतहव्यमुनीनें आपल्या हृदयाकाशामध्यें स्वप्नस्थितीप्रमाणें आपल्या संकल्पानुसार भिन्न भिन्न स्थिति अवलोकन केली. परंतु ज्ञानरूपी अग्नीमध्यें ज्यांची वासना दग्ध झालेली आहे, अशा सम्यक्ज्ञानसंपन्न पुरुषांची वासना ही खरी वासनाच नव्हे. कारण उघडच आहे कीं, भाजलेल्या बीजामध्यें खरें बीजत्व कधीं तरी असूं शकतें का ? त्या वीतहव्यमुनीनें एक कल्पपर्यंत भगवान् चंद्रमौली शंकराच्या गणांचें अधिपत्य केलें व तेवढ्या वेळामध्यें तो सर्व विद्यांमध्यें निपुण आणि त्रिकालज्ञ झाला. सारांश, ज्याच्या ठिकाणीं जो संस्कार दृढ झालेला असतो, त्या प्रारब्धसंस्कारानुरूप तो तसातसा अनुभव घेत असतो, व त्या वीतहव्यमुनीनेंहि जें विचित्र भोग भोगले, तेहि जीवन्मुक्तस्थितीमध्यें राहूनच भोगले.

श्रीरामः—मुनिश्रेष्ठा ! असें असेल तर जीवन्मुक्तस्थितीमध्यें रहाणाऱ्या त्या वीतहव्यमुनीसारख्या तत्त्ववेत्या पुरुषाच्या ठिकाणींसुद्धां बंधमोक्षादि दृष्टी असतात, असेंच म्हणण्याला काय हरकत आहे ?

श्रीवसिष्ठः—राघवा ! निरभ्र आकाशाप्रमाणें निर्मल आणि शांत असणारें हें विश्व जीवन्मुक्तांना सगळेंच ब्रह्मस्वरूप व दिसत असतें; मग त्यांच्या ठिकाणीं बंधमोक्षादि दृष्टी कोठून असणार ? या चिदाकाशामध्यें ज्या ज्या ठिकाणीं जशी जशी भावना केली जाते, त्या त्या ठिकाणीं तें तसतशा रूपानें विस्तार पावून अनुभवास येतें. परंतु राघवा ! ईश्वराच्या संकल्पामुळें जरी हीं जगें उत्पन्न झालेलीं आहेत व होणारीं आहेत, तरी तो सर्वात्मक असल्यामुळें हीं जगें त्याला ब्रह्मरूपच दिसतात. पृथ्वीच्या उदरामध्यें राहणाऱ्या ज्या वीतहव्यमुनीनें आपल्या हृदयाकाशांतील मिथ्या व अत्यंत विस्तीर्ण अशा असंख्य जगतांपैकीं एका जगामध्यें इंद्रपदाचा अनुभव घेतला, तोच सांप्रतकाळीं 'दीन' देशांत राजा झाला असून तो ह्याक्षणीं या अरण्यामध्यें मृगया करण्याकरितां आला आहे. तो वीतहव्यमुनि ब्रह्मदेवाच्या पद्मकल्पामध्यें शिवगणांचा अधिपति झाला होता. त्या स्थितीमध्यें असतां कैलासवनांतील कुंजामध्यें त्याचा जो क्रीडाहंस होता, तोच क्रीडाहंस सांप्रत दाशेंद्रनामक निषादांचा राजा झाला, व हाच राजा सौराष्ट्र मंडळांतील बहुलपादप नांवाच्या गांवामध्यें सध्यां आंध्राचा राजा होऊन राहिला आहे.

श्रीरामः—भगवन् ! वीतहव्याची ती सृष्टि मानसिक होती, मग तिच्यांतील इंद्र, हंस वगैरे देहांचे भ्रांतिमात्र आकार सचेतन कसे झाले ?

वसिष्ठः—राघवा ! वीतहव्याची ती मानसिक सृष्टि जर भ्रांतिमात्र होती, तर आप-

त्याला तरी भासमान होणारें हें जग व त्यांतील पदार्थांचे आकार सत्य आहेत, असें कसें बरें म्हणतां येईल? बा रामा! आपल्याला भासमान होणारें हें जग वस्तुतः चिन्मात्र असून तें सत्य आहे असें जें आपल्याला वाटतें, तो केवळ आपल्या मनाचा भ्रम आहे. याच न्यायानें वीतहव्याचें जगसुद्धां वास्तविक चिन्मात्र असून, त्याचें सत्यत्वहि मनोमात्र आणि भ्रामक होतें. वास्तविक वीतहव्याचें जग काय किंवा आपल्याला भासमान होणारें दृश्य जग काय, मुळींच सत्य नसून खरें [illegible] आहे. या जगाच्या रूपानें ब्रह्मच भासमान होणारें आहे. आज विद्यमान असलेलें, पूर्वी होऊन गेलेलें व पुढें होणारें हें दृश्य किंवा [illegible] जग आत्मरूपच आहे. रामा! अशा रीतीनें हें सारें दृश्य जग ब्रह्मरूपच आहे असें जोंपर्यंत पक्कें ज्ञान झालें नाहीं, तोंपर्यंत सत्य आणि परम अशा चिदाकाशाचें ज्ञान झालें नाहीं, असेंच म्हणावें लागतें. ज्याप्रमाणें समुद्राच्या ठिकाणचें पाणी (तरंगरूपी) उत्पत्ति आणि वृद्धि यांच्या रूपानें विलास करीत असतें, त्याप्रमाणें अज्ञानामुळें हें मनच या दृश्य जगाच्या रूपानें विलास करीत असतें, ब्रह्माच्या ठिकाणीं स्थित असलेल्या चिदाकाशानें आपल्या स्वभावानुरूप चित्त आणि मन हीं नावें धारण केलीं आहेत. मनाच्या [illegible] स्फुरणामुळेंच हें दृश्य जग विस्तारलें गेलें आहे, परंतु परमार्थानें हें दृश्य जग मुळींच विस्तार पावलें नाहीं.

---

# सर्ग ८५.

—:०:—

१. पिंगळगणाच्या शरीरामध्यें प्रवेश करून वीतहव्यानें केलेला आपल्या शरीराचा उद्धार.

**श्रीरामः**—भगवन्! पृथ्वीच्या विवरामध्यें स्थित असलेल्या आपल्या देहाचा वीतहव्य-मुनीनें त्या विवरांतून उद्धार केला किंवा नाहीं? केला असल्यास कसा केला? तसेंच तो मुनि ब्राह्मस्थितीप्रत जाऊन पोहोंचला कीं नाहीं? व पोहोंचला असल्यास त्या ब्राह्मी स्थितीप्रत तो जाऊन कसा पोहोंचला?

**श्रीवसिष्ठः**—राघवा! पूर्वी वर्णन केल्या प्रमाणें तीनशें वर्षे उलटून गेल्यानंतर वीतहव्य-संज्ञक मन समाधिस्थितीमध्यें अपरिच्छिन्न ब्रह्मा-कार बनून शिवगणाचें आधिपत्य करीत असतां एकदां चिदात्म्याच्या ध्यानस्थितीमध्यें आपले पूर्वीचे सर्व जन्म अवलोकन करावे, अशी इच्छा स्वाभाविकपणेंच त्याच्या मनांत उत्पन्न झाली; व त्याबरोबर त्यानें आपले पूर्वीचे कित्येक नष्ट झालेले व कित्येक अस्तित्वांत असलेले असे सर्व देह अवलोकन केले. विद्यमान अस-लेल्या देहांपैकीं पृथ्वीच्या उदरामध्यें अडकून पडलेल्या आपल्या देहाची स्थिति अवलोकन करतांच त्या देहाचा पृथ्वीच्या विवरांतून उद्धार करावा, अशी इच्छा यदृच्छेनें त्याच्या ठिकाणीं उत्पन्न झाली. नंतर त्यानें आपल्या त्या देहाकडे सूक्ष्मदृष्टीनें पाहिलें, त्या वेळीं एखाद्या चिखलांतील किड्याप्रमाणें आपला वीतहव्यनामक देह पृथ्वीच्या उदरामध्यें जखडून गेला आहे, पावसाळ्यांतील पाण्याच्या ओघा-बरोबर वाहून आलेल्या चिखलाचा त्या शरीरा-भोंवतीं वेढा पडलेला असून त्या चिखलामध्यें आपलें शरीर अधोमुख होऊन पडलें आहे आणि त्याच्यावर यथेच्छ गवत वाढलेलें आहे, असें त्याच्या दृष्टीस पडलें. अशा रीतीनें

पृथ्वीच्या उदरामध्यें अडकून गेलेल्या आपल्या देहाची ती विपन्न अवस्था पाहून महातेजस्वी वीतहव्यमुनि परमज्ञानानें युक्त असलेल्या विवेकबुद्धीच्या योगानें पुन्हां विचार करूं लागला. तो म्हणालाः—'हें माझें शरीर पृथ्वीच्या उदरामध्यें सर्व बाजूंनी अडकून गेलें असून त्यांतील प्राणवायूचा संचार अजिबात थांबला आहे; यामुळें हें शरीर पृथ्वीच्या बाहेर काढण्याची माझ्या अंगांत यत्किंचित्‌हि शक्ति राहिलेली नाहीं. यास्तव मी आतां ताबडतोब सूर्याच्या देहांत प्रवेश करतों, म्हणजे त्याचा पिंगलनामक गण त्याच्या आज्ञेवरून माझ्या या पूर्वदेहाचा पृथ्वीच्या उदरांतून उद्धार करील. अथवा मला या देहाला घेऊन तरी काय करावयाचें आहे ? मी सध्यांच्या या देहामध्येंच सुखानें विदेहमुक्त स्थितीप्रत जाऊन पोहोंचेन. विवरामध्यें रुतलेल्या या देहाचा उद्धार करून त्याच्यामध्यें लीला करण्यापासून मला आतां कोणता पुरुषार्थ साधावयाचा आहे ? ' महामते रामा ! अशा रीतीनें विचार करून तो क्षणभर स्वस्थ बसला, परंतु लगेच तो पुन्हां विचार करूं लागला. तो म्हणाला:— या भूतलावर प्रारब्धानें प्राप्त झालेल्या देहाचा बुद्धिपुरःसर त्याग करणें किंवा त्याचा आश्रय करणें या दोहोंपैकीं माझ्या दृष्टीनें कोणतीच गोष्ट ग्राह्य किंवा उपेक्षणीय नाहीं. देहाचा त्याग करणें किंवा त्याचा आश्रय करणें या दोहोंची किंमत माझ्या मतें सारखीच आहे. यास्तव जोंपर्यंत हा देह धुळीस मिळाला नाहीं, तोंपर्यंत याच देहांत राहून मी कांहीं काल या जगांत विहार करीन. पिंगलानें माझ्या देहाचा उद्धार करावा म्हणून, प्रतिबिंबानें आरशामध्यें प्रवेश करावा त्याप्रमाणें, मी आतां आकाशस्थ सूर्याच्या देहामध्यें प्रवेश करतों म्हणजे झालें !' असा विचार करून वायूनें भात्यांतील पोकळीमध्यें प्रवेश करावा, त्याप्रमाणें त्या मुनीनें वायूरूप धारण करून भगवान् सूर्यनारायणाच्या हृदयामध्यें प्रवेश केला, त्यावेळीं आपल्या हृदयामध्यें प्रविष्ट झालेल्या त्या मुनिनायकाला अवलोकन करून भगवान् सूर्यानेंहि आपल्या उदार बुद्धीच्या योगानें त्या मुनीच्या पूर्वापर-संबंधाचा आणि त्याच्या हातून व्हावयाच्या कार्याचा विचार केला. नंतर भगवान् सूर्यानें विंध्यपर्वतावरील भूगर्भामध्यें रुतलेला, पाषाण व गवत यांनीं आच्छादित झालेला आणि अगदीं मलल झालेला त्या मुनीचा देह अवलोकन केला. पुढें त्याचा स्वदेहोद्धाराविषयींचा हेतु लक्षांत आणून पृथ्वीच्या विवरामध्यें गतप्राण होऊन अडकलेलें त्याचें कलेवर बाहेर काढण्याविषयीं त्यानें आपल्या अग्रभागीं चालणाऱ्या पिंगलनामक गणाला आज्ञा केली. त्यावेळीं वीतहव्यमुनीच्या त्या लिंगदेह धारण करणाऱ्या वायुरूप संवित्कलेनें लगेंच भगवान् सूर्यनारायणाला भक्तियुक्त अंतःकरणानें प्रणाम केला. नंतर सूर्याची संमति घेऊन वीतहव्यमुनीच्या इच्छेप्रमाणें विंध्यपर्वतावरील विवराकडे जाणाऱ्या पिंगलनामक गणाच्या शरीरामध्यें वीतहव्यानें मोठ्या सन्मानानें प्रवेश केला. पुढें सूर्याच्या आज्ञेनें निघालेला तो पिंगल गण आकाशांतून निघाला, तो तत्काळ लताकुंज व हत्तींचा संचार यांच्यामुळें शोभायमान होणाऱ्या व वर्षाकालांतील उन्मत्त अभ्रांनीं युक्त अशा आकाशाप्रमाणें भासणाऱ्या त्या विंध्यपर्वतावरील अरण्यांत जाऊन पोहोंचला. नंतर ज्याप्रमाणें एखादा सारस पक्षी आपल्या नखांनीं एखाद्या कमलाचा देंठ चिखलांतून उकरून काढतो, त्याप्रमाणें पिंगलानें आपल्या नखांच्या योगानें तें पृथ्वीचें विवर उकरून त्यांतून वीतहव्याचें कलेवर बाहेर काढलें. तदनंतर आकाशांत संचार करणाऱ्या पक्ष्यानें आपल्या घरट्यामध्यें

प्रवेश करावा, त्याप्रमाणें पिंगलाच्या शरीरामध्यें असलेलें वीतहव्यमुनीचें लिंगशरीर आपल्या पूर्वीच्या स्थूलदेहामध्यें प्रविष्ट झालें. नंतर आकाशसंचारी पिंगल आणि पृथ्वीच्या उदरांतून नुकताच बाहेर आलेला वीतहव्यमुनी अशा दोघांनीं परस्परांना प्रेमपुरःसर वंदन केलें आणि तेजाचे जणुं निधीच असे ते दोघेजण आपआपल्या कार्याविषयीं तत्पर झाले. पिंगलगण आकाशांत निघून गेला आणि वीतहव्यमुनि स्नान करण्याकरितां स्वच्छ अशा सरोवराकडे निघून गेला. तें सरोवर नक्षत्राप्रमाणें चमकणाऱ्या कुमुदांच्या योगानें आणि निरनिराळ्या रंगांच्या सूर्यकिरणांमुळें शोभणाऱ्या आकाशाप्रमाणें फारच रमणीय दिसत होतें. ज्याप्रमाणें एखादा हत्तीच्या छाव्यानें चिखल असलेल्या पाण्याच्या डोहांत यथेच्छ लीला करून नंतर सरोवरांत प्रवेश करावा, त्याप्रमाणें त्या मुनीनें विकसित कमलांच्या योगानें शोभणाऱ्या त्या सरोवरामध्यें स्नान केलें. स्नानानंतर त्या मुनीनें जप करून भगवान् सूर्यनारायणाची मोठ्या भक्तीनें पूजा केली. नंतर पूर्वीप्रमाणें मननादि व्यवहार करण्यास समर्थ असलेलें तें आपलें पूर्वीचें शरीर प्राप्त झाल्यामुळें वीतहव्यमुनीला अतिशय आनंद झाला. सारांश, अशा रीतीनें बुद्धीची समता, पराशांति, सर्वभूतांसंबधानें मित्रभाव, सत्प्रज्ञा, आनंदवृत्ति, ईश्वरी कृपा व त्यामुळें प्राप्त होणारें ऐश्वर्य, इत्यादि गुणांनीं युक्त असलेला तो मुनि विषयासक्तिरहित अशा अंतःकरणानें विंध्यपर्वतावरील सरोवराच्या कांठीं फक्त एकच दिवस समाधिविरहित स्थितीमध्यें सुखानें राहिला.

---

## सर्ग ८६

—:०:—

१. वीतहव्याचा पुन्हां सहा दिवस समाधि. २. वीतह[illegible] जीवन्मुक्तस्थिति व आत्यंतिक समाधि

श्रीवसिष्ठः—राघवा ! अशा रीतीनें तो दिवस संपल्यानंतर वीतहव्यमुनीनें पुन्हां समाधीचा अभ्यास करण्यासाठीं विंध्यपर्वतावरील पूर्वपरिचित अशा एका विस्तृत गुहेमध्यें प्रवेश केला. या जगासंबंधानें सारासारविचार करणारा तो मुनि त्या गुहेंत बसून आत्म्याचें अनुसंधान न सोडतां मनानें विचार करूं लागला. तो म्हणालाः—मीं आपल्या इंद्रियगणांना विचारानें बाधित करून टाकलेंच आहे; तरी आतां त्यासंबंधानें पुन्हां विचार करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. एखादी सुकुमार लता तोडून टाकावी, त्याचप्रमाणें या जगाच्या सत्यासत्यतेसंबंधाची कल्पना मीं अजिबात तोडून टाकली असून आपलें शरीर, मस्तक आणि मान एका रेषेंत धारण करून व आसनबद्ध होत्साता सर्व जगाचा मनानें त्याग केल्यानंतर अवशिष्ट राहणाऱ्या साक्षिभूत चिन्मात्रस्वरूपाचा दृढ अवलंब करून मी आतां एखाद्या पर्वतशिखराप्रमाणें स्थिर होतो. जिवंत असूनहि अज्ञदृष्टच्या मेल्याप्रमाणें असणारा व मेलेला असून तत्त्वदृष्टच्या जिवंत असणारा, तसेंच अंतःकरणानें शुद्ध बनून समभावाला प्राप्त झालेला मी आतां चिन्मात्राच्या ठिकाणीं समरस होऊन राहतों. स्वरूपदृष्टच्या जागा असून निद्रित मनुष्याप्रमाणें द्वैताचें अवलोकन न करणारा व निद्रित असूनहि स्वरूपानुभवामुळें जागा असलेला मी सर्व हालचाल बंद करून या शरीराचा अंत होईपर्यंत स्थूल, सूक्ष्म आणि कारण यांच्या पलीकडे असलेल्या तुर्यपदाचा अवलंब करून राहणार. मी या एकांतस्थळीं

लौकिकदृष्टचा एखाद्या पाषाणासारखा अचल होऊन राहिलों आहें; परंतु अंतर्यामीं सर्वत्र स्थित असणाऱ्या शुद्धसत्त्वप्रधान अशा सत्तासामान्यरूपी ब्रह्मामध्यें निर्वेधपणानें गढून राहणार.' याप्रमाणें विचार करून तो वीतहव्यमुनि पुन्हां सहा दिवसपर्यंत ध्यानस्थ होऊन बसला; व एखादा वाटसरू प्रवास करता करतां वाटेंत क्षणभर विश्रांति घेतल्यानंतर जागा होतो, त्याप्रमाणें सातव्या दिवशीं तो मुनि ध्यान विसर्जन करून पुन्हां सावध झाला. पुढें तो महातपस्वी वीतहव्यमुनि व्युत्थानानंतरहि समाधिस्थितीमध्यें अखंड राहूं लागला, व अशा रीतीनें त्यानें जीवन्मुक्तस्थितीमध्यें या जगांत चिरकाल विहार केला. जीवन्मुक्तस्थितीमध्यें असतां जगांतील कोणत्याहि वस्तूचें तो गुणदृष्टीनें अभिनंदन करीत नसे, किंवा दोषदृष्टीनें निंदा करीत नसे. तसेंच त्याला कधीं हर्ष होत नसे व उद्वेगहि होत नसे. या जगांत कोठेंहि संचार करीत असता किंवा एखाद्या ठिकाणीं रहात असतां त्याच्या हृदयामध्यें सत्तासामान्यस्थिति सदैव जागृत असे. या वेळीं त्याचें मन निर्विषयस्थितीप्रत जाऊन पोहोंचलें होतें. मात्र केवळ विनोदासाठीं तो आपल्या मनात येणेंप्रमाणें विचार करीः—' विषयभोगांचें सामर्थ्य क्षीण झालेल्या मना ! हे इंद्रियांच्या राजा ! तूं शांत झाल्यामुळें तुला आता कशा तऱ्हेचें सुख आणि आनंद हो. आहे ते पाहिलेंसना ? हे चंचलांमध्यें श्रेष्ठ असलेल्या मना ! तूं आपल्या ठिकाणच्या चंचलतेचा परित्याग करून यापुढें या वैराग्यदशेचा निरंतर अवलंब करून राहणेंच योग्य आहे. अरे हताश आणि नामशेष झालेल्या इंद्रियरूपी चोरांनो ! हा आत्मा इतःपर तुमचा नव्हे आणि तुम्हींहि आत्म्याचे कोणी नाहीं. आत्म्याचा आणि तुमचा आतां कांहीं एक संबंध उरलेला नसल्यामुळें तुम्हीं आतां कायमचे नष्ट व्हा. तुमच्या सर्व आशा मीं निष्फल करून टाकल्या आहेत. आश्रयरहित झालेले तुम्हीं आतां माझ्यावर सत्ता गाजविण्याला असमर्थ आहां. रज्जूची विस्मृति झाल्यामुळें सर्पाचा भ्रम उत्पन्न व्हावा, त्याचप्रमाणें आत्मतत्त्वाची विस्मृति झाल्यामुळें आम्हींच आत्मा होऊं, अशी तुमच्या ठिकाणीं नसतीच भावना उत्पन्न झाली होती, परंतु आत्म्याच्या ठिकाणीं उत्पन्न झालेली अनात्मतेची भावना व अनात्मवस्तूच्या ठिकाणीं उत्पन्न झालेली आत्मभावना केवळ अविचारामुळें उत्पन्न झाली होती, पण ती आता विचारानें नष्ट झाली आहे. खरें पहातां तुम्ही निराळे, आणि तुमचा अभिमान बाळगणार आम्ही निराळे, अद्वितीय असें ब्रह्म निराळें आणि प्राणवायूच्या आश्रयामुळें उत्पन्न होणारी कर्तृत्वभावना निराळी; तसेंच विषयाचें ग्रहण करणारें मन निराळें आणि त्याचा उपभोग घेणारा चिदाभास निराळा. अशी वस्तुस्थिति असता यात वास्तविक दोष कोणाचा आणि कसला ? अर्थात् कोणाचाच नाहीं. अरण्यापासून लाकडें उत्पन्न होतात, लाकडांना बांधणाऱ्या दोऱ्या कळकाच्या सालीपासून उत्पन्न होतात, लाकडें तोडण्याची कुऱ्हाड, वाकस वगैरे हत्यारें लोखंडापासून उत्पन्न होतात, ती घडविण्यावर लोहार आपलें पोट भरतो, व लाकडें तासणारा सुतार आपल्या पोटासाठीं लाकडें तासतो. सारांश, आत्म्याच्या मायाशक्तीपासून उत्पन्न झालेली भिन्न भिन्न पदार्थांची सामुग्री, आणि त्याप्रमाणेंच निरनिराळ्या क्रिया व उपकरणें यांच्या योगानें बनणारा घराचा उत्तम आकार केवळ काकतालीय न्यायानें बनत असतो. त्याचप्रमाणें आत्म्याच्या ठिकाणीं स्थित असलेल्या अनिर्वचनीय मायाशक्तीमुळें दर्शनश्रवणादि क्रिया करण्यास समर्थ

असलेलीं चंचल ज्ञानेंद्रियें उदित होतात, परंतु यांपासून कोणाची व कोणती हानि होणार? अर्थात् कोणाचीच नाहीं. माझ्या हृदयांतील अविद्यारूपी विस्मृति अजिबात नष्ट झालेली असून त्या ठिकाणीं आतां आत्मबोधाचा स्वच्छ प्रकाश पडलेला आहे. यामुळें जें मुळचेंच सत् होतें तें सद्रूप बनलें आहे व जें असत् होतें तें असद्रूप ठरलें आहे. सारांश, जें क्षत म्हणजे विकृत होतें, तें क्षीण झालें व जें त्रिकालीं अबाधित होतें, तें अखेरीस कायम राहिलें आहे.'

येणेंप्रमाणें विचार करून तो महातपस्वी भगवान् वीतहव्यमुनि या जगांत पुष्कळ वर्षेंपर्यंत राहिला. ज्यामध्यें स्थित झालें असता सकल चिंतेचा नायनाट होतो आणि मनुष्य पुनर्जन्माच्या संकटांतून कायमचा मुक्त होतो व जेथें मूढतेला यत्किंचित्हि अवकाश उरत नाहीं, अशा पूर्णानंदमय आणि स्वप्रकाशरूप आत्मपदामध्यें तो सदासर्वदा स्थिर होऊन राहिला होता. ज्या ज्या वेळीं त्याच्या मनांत जगांतील विचित्र पदार्थांच्या दर्शनामुळें मिथ्या भ्रांति उत्पन्न होई, त्या त्या वेळीं तिच्या निवारणासाठीं तो ध्यानाभ्यासाचा अवलंब करी, व अशा क्रमामुळें त्याचें चित्त नेहमीं आत्मानंदामध्यें निमग्न होऊन राहिलें. ज्या ज्या वेळीं प्रारब्धभोगांच्या योगानें त्याच्या मनांत विषयासंबंधाची त्याज्यबुद्धि उत्पन्न होई, त्या त्या वेळीं त्या भावनांचा निरास करून टाकीत असल्यामुळें वीतहव्यमुनीचें मन विषयांची इच्छा व अनिच्छा यांच्या अतीत होऊन जाई. अखेरीस त्याच्या जन्मकर्मांचा क्षय होऊन जेव्हां त्याला विदेहकैवल्याची स्थिति प्राप्त होण्याची वेळ येऊन ठेपली, तेव्हां देहादि प्रातिभासिक संसाराचा कायमचा त्याग करून अवशिष्ट रहाणाऱ्या ब्रह्मरसाचा अखंड उपभोग घेण्याची त्याच्या ठिकाणीं तीव्र उत्कंठा उत्पन्न झाली व तीमुळें या मिथ्या जगज्जालाचा कायमचा त्याग करून त्याचा पुन्हां संसर्ग होऊं नये, म्हणून त्यानें सह्याद्रीवरील एका सुंदर गुहेमध्यें प्रवेश केला. त्या ठिकाणीं जाऊन त्याने पद्मासन घातलें व मनांतल्या मनांत विचार करण्याला सुरवात केली. तो म्हणाला:—'हे विषयप्रीते! तूं प्रेमरहित हो. बा विषयद्वेषा! तूंहि द्वेषरहित हो. तुम्ही दोघांनीं आजपर्यंत मला किती दिवस खेळवलेंत? हे भोगानों! ज्याप्रमाणें एखाद्या लहान मुलाच्या पुढें खेळणीं टाकून त्याचें मनोरंजन करण्यांत येतें, त्याप्रमाणें तुम्हीं माझें कोट्यवधि जन्मामध्यें मनोरंजन केलेंत तुम्हांला आतां माझे नमस्कार असोत! मला आतां प्राप्त झालेल्या या श्रेष्ठ आणि परमपवित्र अशा निर्वाणपदवीचें ज्या विषयसुखानें विसरण पाडलें होतें, त्या विषसुखालाहि माझे शतशः नमस्कार असोत. हे दुःखा! तूं मला अत्यंत संताप दिल्यामुळेंच मीं आत्म्याचा मोठ्या आदरानें शोध केला. यास्तव या आत्ममार्गाचा तूंच मला उपदेश केलास, असें समजून मी तुला वारंवार नमस्कार करतों. तुझ्या प्रसादानेंच मला ही शीतल अशी ब्रह्मपदवी प्राप्त झाली. यासाठीं तुझें नांव जरी दुःख आहे, तरी तूं सुखप्रद आहेस हें जाणून मी तुला नमस्कार करतों. हे देहा! तूं या संसारातील अत्यंत असारभूत असें तत्त्व आहेस, तरी तुला मित्र समजून मी तुझ्या कल्याणाची इच्छा करतों. तुझा माझा कायमचा वियोग होणार असून मी आतां आपल्या स्वस्थानाप्रत जातों. तुझा माझा वियोग व्हावा हें अगदीं स्वाभाविकच आहे. या जगांतील प्राणी स्वार्थलोलुप बनून आपल्या आप्तेष्टांचा आणि मित्रांचा अशाच रीतीनें त्याग करीत असतात.

हे देहरूपी मित्रा! तुझा माझा शेंकडों जन्मांचा ऋणानुबंध असताहि मी तुला आतां सोडून जात आहें, परंतु यांत मी कोणताच अपराध करीत नाहीं; कारण आत्मज्ञानाच्या योगानें तूंच आपला क्षय करून घेतला आहेस. आत्मज्ञानामुळें आपला नाश होणार ही गोष्ट तुला माहीत असल्यामुळें तूं आपण होऊन आपला नाश करून घेतलास, असेंच म्हणावें लागतें. अर्थात् बा देहा! आत्मनाशाचा हा प्रसंग तूं आपणावर स्वतःच ओढवून घेतलास; तुझा दुसऱ्या कोणी नाश केला असें म्हणतां येणार नाहीं. माते तृष्णे! मी आतां निर्वाणस्थितीप्रत जाऊन पोहोंचलों, म्हणजे तूं एकाकी, दीन आणि शुष्क होऊन जाशील. परंतु मी तुला सोडून जातों याबद्दल तूं दुःख करीत बसूं नकोस. भगवन् कामा! तुझ्यावर विजय संपादन करण्यासाठीं मीं जे वैराग्यादि उपाय योजिले, त्या अपराधापासून झालेल्या माझ्या दोषाबद्दल मला क्षमा कर; व मी आतां परमात्मस्वरूपाशीं कायमचा तद्रूप होत आहें, तरी मला चांगला शुभशकून दाखव. हे तृष्णारूपी माते! तुझा फारा दिवसांनीं परंतु कायमचा वियोग होत आहे व तोहि तुझ्या सहवासरूपी दोषामुळेंच होत आहे, यास्तव तुला माझा अखेरचा नमस्कार असो. हे पुण्यरूपी देवा! तुलाहि माझा नमस्कार असो, कारण, पूर्वी तूंच मला नरकांतून बाहेर काढून स्वर्गामध्यें पाठविलेंस. निषिद्धाचरणरूपी जमिनीमध्यें उत्पन्न झालेल्या नरकरूपी मोठाल्या शाखा धारण करणाऱ्या आणि यातनारूपी पुष्पभारानें ओथंबलेल्या पापरूपी वृक्षा! तुलाहि माझा नमस्कार असो. ज्याच्या सहवासामुळें मीं पुष्कळ काळपावेतों नानाविध नीच योनी भोगल्या व जो आजपासून अदृश्य व्हावयाचा आहे, अशा त्या मोहरूपी आम्याला माझा नमस्कार असो. करकर आवाज करणाऱ्या कळकांच्या मिषानें मधुर भाषण करणाऱ्या, गलितपर्णरूपी वस्त्र परिधान करणाऱ्या आणि समाधीच्या स्थितीमध्यें माझी मैत्रिण होऊन राहिलेल्या गुहारूपी तापसीलाहि माझा नमस्कार असो. हे तपस्विनी गुहे! या संसाराचा मार्ग आक्रमण करतां करतां खिन्न झालेल्या मला धीर देण्याला तूंच कारणीभूत झालीस. या संसारांतील सर्व संकटाच्या योगानें खिन्न होऊन समाधीला विघ्न करणाऱ्या सर्व दोषांपासून मी दूर पळून जात असतां माझ्या मनाला पूर्ण विश्रांतिसुख देणारी तूं माझ्या खऱ्या कळकळीची व माझ्यावर अत्यंत प्रेम करणारी मैत्रिण झाली होतीस, व यामुळें सर्व शोकाचा परिहार करण्यासाठीं मीं फक्त तुझाच आश्रय केला. हे दंडकाष्ठा! अरण्यांतील हिंस्र पशू, सर्प वगैरे घातुक प्राण्याकडून आणल्या जाणाऱ्या संकटांमध्यें, मार्गांतील खांचखळग्यांमध्यें आणि लताकुंजांनीं युक्त असलेल्या प्रदेशामध्यें संचार करीत असतां माझ्या हाताला आश्रय देऊन संभाळून नेणाऱ्या व वृद्धावस्थेमधील एकुलत्या एक मित्रा! तुला माझा नमस्कार असो. हे तुच्छ देहा! हाडांचा पिंजरा, रक्त, मांस, आंतडीं वगैरे सामग्रीसह तूं आतां आपला रस्ता धर. तुझ्यावरील मळ, घाम वगैरेंच्या योगानें उत्पन्न होणाऱ्या दुर्गंधीला व तन्निवारणार्थ कराव्या लागणाऱ्या स्नानादि उपायांनाहि माझे नमस्कार असोत. तसेंच भोजनशयनादि सर्व व्यवहारांना आणि त्यासाठीं कराव्या लागणाऱ्या व्यापारांनाहि माझे नमस्कार असोत. हे पंचप्राणहो! तुम्हीं तर माझ्याबरोबर नेहेमीं असणारे व माझे फारा दिवसांचे जिवलग स्नेही आहां, तेव्हां इतर मित्रांबरोबर तुम्हांलाहि माझे नमस्कार असोत. मी आतां तुम्हांला सोडून जात आहें; तरी

तुमचें कल्याण असो. मीं तुमच्या बरोबर विचित्र अशा अनेक जन्मांमध्यें पर्वतावरील लताकुंजांत विश्रांति घेतली, निरनिराळ्या लोकांत संचार केला, अनेकविध सिद्धक्षेत्रांत क्रीडा केली, अनेक पर्वतांवर यथेच्छ विहार केला, नानाविध कार्यविलासांत गढून गेलों व नानाविध मार्गांतून प्रवास केला. हे पंचप्राणरूपी मित्रांनों! या जगद्रूपी कोशामध्यें मी तुमच्यासहवर्तमान जें केलें नाहीं, हरण केलें नाहीं, जें दिलें नाहीं, ज्याचा मनानें अवलंब केला नाहीं अशी एकहि गोष्ट नाहीं किंवा ज्या ठिकाणीं गेलों नाहीं असें एकहि स्थळ नाहीं. आतां तुम्हांला जिकडे जावेंसें वाटेल तिकडे जा; व प्रिय मित्रांनों! मीहि आतां आपल्या इष्टस्थळीं जातों. या संसारांतील सर्व पदार्थांच्या संग्रहाचें पर्यवसान नाशामध्यें होतें, सर्व प्रकारच्या उन्नतीचें पर्यवसान अधोगतीमध्यें होतें व सर्व संयोग अखेरीस वियोगपरिणामीच होतात! अर्थात् तुमचा व माझा आतां वियोग व्हावा, यांत कांहींच आश्चर्य नाहीं. माझ्या नेत्रांतील हा प्रकाश आतां सूर्यमंडळांत प्रविष्ट होवो, सुगंधापासून प्राप्त होणाऱ्या आनंदाचें ग्रहण करणारें हे घ्राणेंद्रिय वन्यपुष्पांना उत्पन्न करणाऱ्या गंधवती पृथ्वींत लीन होवो, माझा हा प्राणवायु त्याच्या स्पंदासहवर्तमान वायूंत मिळून जावो, माझ्या कर्णेंद्रियांतील शब्दश्रवणशक्ति आकाशाच्या उदरांत प्रविष्ट होवोत व माझ्या जिव्हेच्या ठिकाणीं असलेली रसग्रहण शक्ति चंद्रमंडळांत समाविष्ट होवो. सारांश, मंदरपर्वत काढून घेतल्यानंतर क्षीरसमुद्र शांत व्हावा, सूर्य अस्तास गेल्यानंतर दिवस समाप्त व्हावा, शरदृतु संपतांच आकाशांतील मेघ लीन व्हावा किंवा कल्पांतकाळीं सर्व सृष्टि आपल्या उपादानकारणाशीं एकरूप व्हावी, इंधन संपतांच अग्नि विझून जावा किंवा तेल संपतांच दिव्याचा प्रकाश शांत व्हावा, त्याप्रमाणें दीर्घस्वरानें प्रणवाचा उच्चार केल्यानंतर मी आपलें मनन बंद करून आपल्या परमात्मस्वरूपीं कायमचा रममाण होईन. ज्याच्या अखिल कार्यपरंपरा नष्ट झाल्या आहेत, जो सर्व दृश्याच्या अती[त] जाऊन पोहोंचला आहे, व ज्याच्या प्रणवो[च्चा]राची ब्रह्मरंध्रामध्यें शांति झाली आ[हे] असा मी सकल मोहरूपी मळाचा निरा[स] झाल्यामुळें अत्यंत स्वच्छ अशा ब्रह्मस्वरूपाम[ध्यें] स्थित झालों आहें.

---

# सर्ग ८७.

—:*:—

१. वीतहव्य ज्या क्रमानें प्रणवाचा आश्र[य] करून विदेहमुक्तीस प्राप्त झाला तो क्रम.

श्रीवसिष्ठः—रामा! वीतहव्य पुढें सां[गि]तल्याप्रमाणें दीर्घ व उच्च स्वरानें प्रणवाचा उच्[चार] करीत मननाची शांति होणें, एषणेची शांति हो[णें] या क्रमानें सहाव्या व सातव्या भूमिकेस प्राप्त झा[ला] आणि अंतःकरणांत ब्रह्माला पोहोंचला. अक[ा]रादि[1] मात्रा व विश्वादि पाद यांच्या भेदानें प्र[ण]वाचें स्मरण करणारा मुनि वीतहव्य अध्यार[ोप] व अपवाद या उपायानें शुद्ध व अन्यय स्व[रू]पास प्राप्त झाला. या जगांतील संकल्पानें कल्पिलेल्या सर्व बाह्य स्थूल व अत्यंत सूक्ष्म भागांचा त्याग करून तो चिंतामणीप्रमा[णें] अगदीं अक्षुब्धचित्त स्वरूपांतच स्थित होऊ[न] राहिला. पौर्णिमेचा पूर्णचंद्र जसा असत[ो]

---

१. मांडूक्योपनिषदांत अ, उ व म् या प्र[ण]वाच्या मात्रा व विश्व, तैजस, प्राज्ञ हे आत्म्या[चे] पाद आहेत, त्यांचें क्रमानें ऐक्य मानून प्रणवा[ची] उपासना केली असतां मात्रा व पाद शून्य तुर[ीय] ब्रह्माची प्राप्ति होते, असें सांगितलें आहे.

देव-दैत्यांनीं मंथन बंद केल्यावर मंदर पर्वत जसा स्थिर राहतो, कुंभाराच्या घरांतील फिरणारें चाक बंद केलें असतां तें जसें निश्चल राहतें, सर्व लाटा थांबल्यावर सागर जसा शांत होतो, तसा तो स्थिर झाला. ज्याच्यांतील तेज:पुंज व तमःपुंज शांत झाले आहेत, सूर्य, चंद्र, नक्षत्रें लोपलीं आहेत, धुकें, अभ्र व धूळही निघून गेली आहे, असें सर्वगामी आकाश जसें शरदृतूंत स्वच्छ असतें तसा जो अत्यंत स्वच्छ झाला आहे असा तो वीतहव्य, वायु जसा गंधाचा त्याग करतो त्याप्रमाणें, प्रणवाचा शेवटचा भाग दीर्घ स्वराच्या बारीक तंतूनें उच्चार करता करता इंद्रियें व तन्मात्रा यांच्या समूहाला सोडता झाला. त्यानंतर उजाडलें असतां सर्व दिशांमध्यें पसरलेलें तम-अंधकार जसा लोपतो किंवा ज्ञानी कोपाचा लेशही चित्तांत राहूं देत नाहीं त्याप्रमाणें सर्व प्रकारच्या अज्ञानाचा त्यानें त्याग केला. पण तमाला घालवितांच त्याच्या चित्तांत तेज प्रकट झालें, पण तेंही अनात्मरूप असल्यामुळें एक अर्धा निमिषभरच विचार करून वीतहव्यानें त्याचाहि त्याग केला. त्यामुळें तो स्वतः तमही नाहीं व प्रकाशही नाहीं, असा कांहीं विलक्षण स्वरूपाचा झाला. पण त्याला तीच तमःप्रकाशरहित अवस्था प्राप्त झाली असतां-तो तन्मय झाला असतां हाही एक बंध आहे, हें माझें स्वरूप नव्हे, असा विचार करून त्याच्या कल्पनेला कारण होणारें जें थोडेंसेंही मनोरूपी तृण तें त्यानें तत्काल खुडून टाकलें. त्यानंतर हे राघवा! वायु जसा आपली स्पंदशक्ति टाकतो त्याप्रमाणें प्राप्त झालेल्या त्या शांत प्रकाशस्वरूपाचाही फारच थोड्या कालांत तो प्रभु वीतहव्य त्याग करता झाला. तें प्रकाशरूप निवाऱ्याच्या जागीं ठेवलेल्या प्रदीपाच्या ज्योतीप्रमाणें जरी निश्चल होतें व नुकत्याच जन्मास आलेल्या बालकाच्या ज्ञानाप्रमाणें निर्विषय होतें तरी 'माझें हें स्वरूप आहे' अशी कल्पना होणें, हेंही विषयज्ञान आहे, असें जाणून त्यानें त्या कल्पनेचाही तत्काल त्याग केला. वायु जसा आपली चलनशक्ति सोडतो त्याप्रमाणें तो चित्तची चेत्यदशा सोडून स्वस्थ झाला. नंतर सत्तामात्रस्वरूप पश्यन्तीपदास[1] प्राप्त होऊन व कारणात्मक प्रसुप्तपदाचा आश्रय करून तो निश्चल पर्वताप्रमाणें राहिला. पुढें तो समर्थ वीतहव्य त्याच कारणतत्त्वरूप सुषुप्ताकारानें पुनः पुनः स्थित होऊन, अभ्यासानें त्या अवस्थेंतही स्थैर्य प्राप्त झालें असतां तुर्यस्वरूपास प्राप्त झाला. त्या अवस्थेंत तो निरानन्द असूनही सानन्द होता, म्ह० विषयानन्दरहित असला तरी स्वरूपानंदानें युक्त होता. तो स्वरूपानें सत्‌ही होता व स्वातिरिक्त सत्ताशून्य असल्यामुळें असत्‌ही होता. तो 'कांहीं आहे' असेंही म्हणतां येत नव्हतें व 'कांहीं नाहीं' असेंही म्हणणें शक्य नव्हतें. तर उलूकादिकांना अंधकारच जसा प्रकाश भासतो त्याप्रमाणें त्याला कांहीं नसणें-सर्व विषयांचा अभाव हाच प्रकाश होता. तें त्याचें स्वरूप विषयाच्या अभावीं अचिन्मय, पण स्वतः चिन्मयच होतें. बृहदारण्यकादि उपनिषदांतून 'नेति नेति' असें म्हणून सर्व विषयांच्या बाधाच्या अवधित्वानें ज्याचा उपदेश केला आहे, तेंच तें त्याचें स्वरूप होतें. वीतहव्य अशा स्वरूपाचा झाल्यामुळें तो वाणीचाही अविषय झाला, म्हणजे, शब्दांनीं ज्याचें वर्णन करतां येणें शक्य नाहीं, असा तो झाला. वीतहव्य अत्यंत सम,

१. केवल साक्षिस्वरूपानें राहणें, हेंच पश्यन्तीपद असून तेंच आकाशादि सर्व द्वैताचा बाध झाल्यावर अवशिष्ट राहणारें कारणतत्त्व आहे. वास्तव सद्रूपानें अवस्थित होणें, हेंच सुषुप्त किंवा प्रसुप्त पद आहे.

व्यापक, परम पवित्र, सर्व पदार्थांच्या आंत रहाणारें, पण असंगत्वामुळें सर्व पदार्थांहून अगदीं विलक्षण असें पद झाला. ज्या निर्मल पदाला शून्यवादी माध्यमिक बौद्ध शून्य म्हणतात, ब्रह्मवेत्ते श्रेष्ठ ब्रह्म म्हणतात, विज्ञानवादी बौद्ध विज्ञानमात्र म्हणतात, सांख्यशास्त्रज्ञ पुरुष म्हणतात, योगवादी ईश्वर म्हणतात, शैवांचा जो शिव, कालज्ञ ज्योतिर्वेत्त्यांचा जो काल, आत्म्याला जाणणाऱ्या अनुभवी विद्वानांचा जो आत्मा, स्थिर आत्माच नाहीं तर क्षणिक विज्ञानाचा प्रवाह हाच आत्मा आहे, असें म्हणणाऱ्या निरात्मवादी बौद्धांचें जें नैरात्म्य, चित्‌ही तत्त्व नव्हे व अचित्‌ही तत्त्व नव्हे, तर चित् व अचित् यांच्यामधील एक अशून्यरूप असें अनिर्वचनीय तत्त्व आहे, असें मानणाऱ्या माध्यमिकांचें जें मध्य आणि जें जीवन्मुक्तांचें सर्व परिपूर्ण तें तो झाला. जें सर्व शास्त्रांचा सिद्धान्त, जें सर्वांच्या हृदयामध्यें अनुगत असलेलें, जें सर्व, सर्वगत, सर्व पदार्थांचें तत्त्वस्वरूप जें सत् तेंच हा वीतहव्य होऊन राहिला. जें अत्यंत निष्क्रिय—क्रियारहित, जें सूर्य-चंद्रादि तेजांचेंही प्रकाशक या रूपानें अनुभवाला येतें व जें केवळ स्वानुभवरूप तेंच सर्वांना प्रसिद्ध असलेलें सत् वीतहव्य झाला. जें स्वरूपतः एक असूनही उपाधिभेदामुळें अनेक झालेलें, जें स्वतः निरंजन, निर्लेप असूनही चित्ताच्या कर्तृत्व-भोक्तृत्व-सुखित्व-दुःखित्वादि धर्मांमुळें सांजन—सलेपसें झालेलें; जें पूर्ण अपरिच्छिन्न असूनही उपाधींमुळें अपूर्ण—परिच्छिन्नसें झालेलें सत्, तेंच हा मुनि होऊन राहिला. सारांश हे राघवा ! तो वीतहव्य वर सांगितलेल्या क्रमानें मुक्तांच्या दृष्टीनें आकाशस्वरूपाहूनही ज्याची स्थिति निर्मल आहे, असा होत्साता अज, अजर, अनादि, एक, अमल, व निष्कल सद्ब्रह्मरूप होऊन राहिला आणि बद्ध जीवांच्या दृष्टीनें क्षणांत ईश्वर होत्साता आपल्या कार्यांच्या योगानें अनेक व सकळ होऊन राहिला.

---

## सर्ग ८८

—:*:—

१. वीतहव्य मुक्त झाला असतां त्याच्या प्राणांचा हृदयांत उपसंहार, देह अगदीं सुकून जाणें व इंद्रियांचा त्यांच्या कारणांत लय.

श्रीवसिष्ठः—राघवा ! वर सांगितल्याप्रमाणें वीतहव्याच्या मनाचा अत्यंत नाश झाला, तेव्हां तो संसाराच्या सीमेला पोहोंचला, दुःखसागरांतून पार झाला व स्वस्वरूपांतच शम पावला. तो तसा शांत झाला असतां, अत्यंत निर्वाण पावला असतां, पाण्याचा थेंब जसा सागरांत एकरूप होऊन जातो त्याप्रमाणें तो स्वस्वरूपांत तद्रूप झाला असतां त्याचा देह स्पंदरहित होऊन तसाच निश्चल राहिला. त्यामुळें हेमंत ऋतूंत कमल जसें म्लान होतें त्याप्रमाणें त्याचा देह आंतून विरस—रसरहित होऊन म्लान झाला. तेव्हां पक्ष्याप्रमाणें आचरण करणारे त्याचे प्राण गोफणींतून सुटलेल्या दगडांप्रमाणें, देहरूपी वृक्षांतील आपापलें नाडीस्थान सोडून हृदयरूप घरट्यामध्यें आले. नंतर देहांतील प्राणादि सर्व भूतकार्यें पृथिव्यादि महाभूतांतच एकरूप होऊन राहिलीं. आईबापांच्या वीर्यापासून झालेला हाडा-मांसाचा सांपळा असा हा देह मात्र वनांतील भूमीवर राहिला. त्याच्या शरीरांतील चित्कला—चिदाभास चित्सागरांत—आपल्या व्यापक ब्रह्मस्वरूपांत मिळून गेली. शरीरांतील त्वचा, रक्त, मांस इत्यादि धातु आपल्या कारणांत मिळून गेले. सारांश मुनि उपशम पावला असतां सर्व आपआपल्या स्वरूपांत लीन झालें. हे

राघवा ! ही मीं तुला वीतहव्याची अनेक विचारांनीं शोभणारी विश्रांति—निर्वाणस्थिति सांगितली. तूं या स्थितीचें आपल्या बुद्धीनें विवेचन कर. अशा प्रकारच्या रम्य व आत्मविचारानें दीप्त झालेल्या बुद्धीनें तत्त्वाला जाणून त्याचें सार घे; व त्याप्रमाणें वाग. राघवा! ऊठ. हे रामा ! मीं हें जें तुला सर्व वर्णन करून सांगितलें, आतां जें सांगत आहें व यापुढेंही जें सांगेन तें सर्व त्रिकालदर्शी व चिरकाल जिवंत राहणाऱ्या मीं स्वतः पाहिलें आहे, त्याचा विचार केला आहे व अनुभवही घेतला आहे. यास्तव हे महाबुद्धिमाना, या शुद्धदृष्टीचा आश्रय करून श्रेष्ठ ज्ञान संपादन कर. आत्मसाक्षात्काररूप श्रेष्ठ ज्ञानानेंच मुक्ति मिळते. मनुष्य ज्ञानानेंच दुःखराहित्यास प्राप्त होतो, ज्ञानानेंच अज्ञानाचा सर्वथा क्षय होतो व ज्ञानानेंच परा सिद्धि मिळते. हे रामा ! दुसऱ्या कोणत्याही उपायानें मनुष्य खरा कृतार्थ होत नाहीं. वीतहव्यमुनीनें ज्ञानानेंच सर्व आशांना सर्व बाजूंनीं तोडून सर्व संस्कारांसह चित्तरूपी पर्वताला फोडून टाकलें. ती वीतहव्यरूप संविद् आपल्या हृदयांत हृदयोपलक्षित ब्रह्मांत या आमच्या जगालाच आपल्या संकल्पित जगाच्या रूपानें पाहती झाली. आमच्या इंद्रियांचा विषय होणारा वीतहव्य आमचें मनोमात्र आहे. कारण आमचें मनच 'मी' असें, 'तूं' असें व 'हें सर्व जगत' असें भासतें. तेव्हां हें त्या मनाहून अन्य आहे व हें अनन्य आहे, असें कसें म्हणतां येईल ? असो. त्या विवेकी वीतहव्याला परमार्थाचा बोध झाला, त्याचे राग-द्वेषादि दोष क्षीण झाले. अविद्या, काम, कर्म इत्यादि सर्व मल व इंद्रियांचे विकार यांच्या संसर्गापासून तो अगदीं दूर झाला; आणि श्रवणादि उपायांनीं दीर्घ काल चिंतन करून संपादन केलेलें स्वस्वरूपभूत अमल व अखंड मोक्षपद त्याला प्राप्त झालें आणि त्यामुळें तो शोकरहित झाला.

## सर्ग ८९

१. मोहरहित विद्वानांना आकाशगमनादि सिद्धींची इच्छा नसते. २. वीतहव्याच्या शरीराला श्वापदादिकांना स्पर्शही करवला नाहीं.

श्रीवसिष्ठ:—हे राघवा ! वीतहव्याप्रमाणें तूं आत्मज्ञ हो, आणि सर्वदा राग, भय व उद्वेग यांनीं रहित होऊन रहा. वीतहव्यमुनि शोकरहित होत्साता मोठ्या आनंदानें तीस सहस्र वर्षें जसा विहार करीत राहिला तसा तूंहि विहार कर. हे राजपुत्रा ! दुसरेही महा बुद्धिमान् मुनि ज्ञेय ब्रह्माला जाणून आपल्या स्थळीं जसे राहिले तसा तूंहि ज्ञानी होऊन आपल्या राष्ट्रांत रहा. हे पराक्रमी रामा ! आत्मा सर्वव्यापी असूनही सुख व दुःख यांच्या संबंधानें केव्हांही सुखी व दुःखी होत नाहीं, मग तूं वृथा शोक कां करतोस ? या भूमीवर पुष्कळ ज्ञानी विहार करीत असतात; पण त्यांतील कोणीहि तुझ्याप्रमाणें दुःखाच्या आधीन होत नाहींत. रामा, तूं स्वरूपीं स्थित हो. मनापासून सर्वांचा त्याग कर. सम हो. सुखी हो. कारण तूं सर्वव्यापी आहेस; तूं आत्मा आहेस. तुला पुनर्जन्म नाहीं. सिंह जसे मोरांच्या अधीन होऊन रहात नाहींत त्याप्रमाणें कोणतेही जीवन्मुक्त हर्ष व शोक या विकारांच्या अधीन तुझ्यासारखे होत नाहींत.

श्रीराम:—भगवन्, शरत्कालीं जसा एकाएकीं मेघ उठावा तसा या प्रसंगानें माझ्या मनांत असा संशय उत्पन्न झाला आहे. अहो आत्मज्ञानी पुरुषांतील श्रेष्ठा ! जीवन्मुक्तांच्या शरीरामध्यें आकाशांतून गमन करणें इत्यादि शक्ति येथें कशा दिसत नाहींत ?

श्रीवसिष्ठ:—हे रघुकुलश्रेष्ठा! आकाशातून गमन करणें, इत्यादि ज्या सिद्धि आहेत त्या पदार्थांच्या सहजशक्ति आहेत, असें प्रमाणांनीं ज्ञात होत नाहीं, तर हे रामा! आकाशगमनादि जें हें सर्व क्रियाजाल दिसत आहे, तो वस्तु-स्वभाव आहे—म्हणजे निरनिराळ्या योनींत उत्पन्न झालेल्या देहाचा स्वभाव आहे. त्यामुळेंच मशकादि क्षुद्र देहांमध्येंही आकाशगमनादि दिसतें, पण आत्मवेत्त्यांना त्यांची आकांक्षाच नसते. रामा! आत्म्याला न जाणणारा बद्ध जीवही मणि-औषधि इत्यादि द्रव्यांच्या शक्तीनें, मंत्रशक्तीनें, योगाभ्यासादि क्रियाशक्तीनें व कालशक्तीनें केव्हां केव्हां आकाशातून गमन करणें इत्यादि सिद्धींस प्राप्त होतो, पण आत्म-ज्ञाचा हा विषय नव्हे. कारण आत्मज्ञ स्वतः आत्मा झालेला असतो, व आत्म्यानेंच स्वतः आत्मा होऊन अत्यंत तृप्त झालेला ज्ञानी अवि-द्येच्या मागोमाग धांवत नाहीं. जेवढे म्हणून जगांतील भाव आहेत ते सर्व अविद्यामय आहेत, असें ज्ञानी समजतात. तेव्हां ज्यानें अविद्येचा त्याग केला आहे असा ज्ञानी त्या पदार्थांमध्यें आसक्त कसा होईल? जे योगाभ्यासादि हजारों श्रम करून अविद्येलाही सुखाचें साधन बनवितात ते खरोखर अविद्वानच होत, पण आत्मज्ञ तसे—अविद्येसाठीं श्रम करणारे नस-तात. तत्त्वज्ञ व अतत्त्वज्ञ यांतील जो कोणी दीर्घकाल अभ्यास करून द्रव्य, कर्म इत्यादि-कांच्या योगानें यथाविधि यत्न करतो त्याला आकाशगमनादि सिद्धि प्राप्त होतात. पण आत्मज्ञ या लोकांतील सर्व पदार्थांहून निराळा व निष्काम असतो, तो आत्म्यामध्येंच संतुष्ट असतो, त्यामुळें तो कांहीं करीत नाहीं व कांहीं इच्छीत नाहीं. त्याला आकाशगमनाचा कांहीं उपयोग नाहीं, सिद्धींचें कांहीं प्रयोजन नाहीं व क्षुद्र भोगांचेंही कांहीं काम नाहीं, त्याला सर्वांचें आधिपत्य, निग्रहानुग्रहसामर्थ्य या प्रभावाची इच्छा नसते, आपण सर्वांपेक्षां उत्तम आहों, असा गर्व लोकांमध्यें व्यक्त कर-ण्याचें त्याला कांहीं कारण नसतें, आशा, मरण व जीवित यांच्या योगानेंही त्याला कांहीं साधावयाचें नसतें. विद्वान् नित्यतृप्त असतो, त्याचें चित्त अगदीं शांत असतें. त्याच्या अंतःकरणांत अनुराग नसतो. तो वासनारहित असतो. सारांश, तत्त्वज्ञ आकाशाप्रमाणें निर्विकाररूपानें स्वरूपांत प्रतिष्ठित होतो. अकस्मात् प्राप्त झालेल्या सुखानें किंवा दुःखानेंही तो आपली स्वाभाविक तृप्ति ढळूं देत नाहीं. जीवन व मरण यांतील कशां-तही आसक्ति ठेवीत नाहीं. नदीच्या पाण्याच्या संयोगानें जसा समुद्र क्षुब्ध होत नाहीं, तसा तो तत्त्वज्ञ प्रारब्धाच्या क्रमानें प्राप्त झालेल्या अनुकूल किंवा प्रतिकूल वस्तूनें क्षुब्ध होत नाहीं तर आत्म्याचें अखंड अनुसंधानरूप अर्चन करीत शांत रहातो. त्यानें कर्म वगैरे कांहीं केलें तरी त्याचा त्याला उपयोग नाहीं, व न केलें तरी त्याची कांहीं हानि नाहीं; आब्रह्मस्तंभपर्यंत भूतांमध्यें एकही भूत त्याच्या आसक्तीचा विषय होत नाहीं. जो अतत्त्वज्ञ अनेक सिद्धींची इच्छा करतो तोही त्यांना अनेक उपायांनीं संपादन करतो. मणि-मंत्र-औषधि इत्यादि उपायांनींच आकाशगमनादि सिद्धि प्राप्त व्हाव्या, अशी जी नियति आहे, ती बदलणें शंकर, विष्णु इत्यादि श्रेष्ठ देवांच्या हातींहि नाहीं. कारण आकाशातून गमन करणें, इत्यादि हा देवादि शरीरांचा स्वभाव आहे.

---

१. द्रव्य, मंत्र, योगाभ्यास यांचा कालामुळें परिपाक होणें, या शक्तीनें किंवा मुंगीला ग्रीष्मक-ऋतूच्या शेवटीं उत्पन्न होणाऱ्या शक्तीनें पंख फुटतात व ती उडूं लागते त्याप्रमाणें.

१. हा २२ वा श्लोक भगवद्गीतेंत (३-१८) आहे.

स्वभाव स्वतःसिद्ध असतो. त्यामुळें चंद्र आपलें शीतलत्व असें सृष्टीच्या अंतापर्यंत सोडीत नाहीं त्याप्रमाणें स्वभाव बदलत नाहीं. तर तो पदार्थाच्या उत्पत्तीपासून नाशापर्यंत त्यांत स्थिर रहातो. कोणी एखादा सर्वज्ञ असो, बहुज्ञ असो, स्वतः भगवान् विष्णु असो कीं शंकर असो, नियतीला बदलण्यास कोणी समर्थ नाहीं. हे रामा ! द्रव्य, काल, क्रिया व मंत्र यांच्या योगानें स्वभावतः उत्पन्न होणाऱ्या आकाशगमनादिक ह्या शक्ति आहेत. जसें विष स्वभावतःच मारतें, मद्य मत्त करतें, नासलेलें दहीं वगैरे किंवा कवंडळादि फळें खाल्लीं असतां तीं उलटी करवितात, त्याप्रमाणें योगाभ्यासादि करण्यांत कुशल असलेल्या पुरुषांनीं योजलेलें द्रव्य, काल, क्रिया इत्यादि स्वभावतःच फळ साधून देतात. पण या अविद्याविषयांपासून जो अगदीं दूर झालेला असतो व ज्यानें अविद्येचा त्याग केलेला असतो तो आत्मज्ञ या सिद्धींची इच्छा करीत नाहीं किंवा विरोधही करीत नाहीं. कारण, हे राघवा ! द्रव्य, देश, काल, क्रिया इत्यादि उपाय तत्त्वज्ञानाच्या उपयोगीं पडत नाहींत, त्यामुळें परमात्मपदप्राप्तीला त्यांचें कांहीं साह्य होत नाहीं. ज्याला कांहीं इच्छा असते तोच यत्न करून सिद्धि मिळवितो, पण आत्मज्ञ पूर्ण नित्यतृप्त असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं इच्छा केव्हांहि संभवत नाहीं. कारण, हे निष्पापा ! सर्व इच्छा अगदीं शांत झाल्यावर आत्मज्ञानाचा उदय होत असतो. तेव्हां आत्मलाभ झाल्यावर त्याच्या विरुद्ध असलेली इच्छा कशी उत्पन्न होणार ? ज्ञानी असो, किंवा अज्ञानी असो, ज्याला जी इच्छा होते तिनें तो यत्न करतो व यत्नानें त्याला योग्य वेळीं फळ मिळतें. अर्थात् ज्ञानी वस्तुतः निरिच्छ असूनहि कौतुकानें जर सिद्धिकरितां यत्न करील तर त्याला सिद्धि प्राप्त होतीलच. वीतहव्याला ज्ञानाची इच्छा होती, त्यामुळें त्यानें सिद्धींकरितां यत्नच केला नाहीं. पण ज्ञानासाठीं त्यानें कसा यत्न केला, व वनांत ज्ञानसंपादन करण्यासाठीं तो कसा उद्युक्त झाला तें मीं सांगितलेंच आहे. तात्पर्य पुरुषाच्या इच्छेप्रमाणें काल, क्रिया, कर्म, [illegible], इत्यादिकांच्या स्वभावाच्या योगानें सिद्धि प्राप्त होतात. रामा ! जें जें सिद्धिरूपक फळ आहे, तें तें सर्व पुरुषाच्या प्रयत्नानें मिळतें. सतत प्रयत्न केला असतां त्याचें फळ अवश्य मिळालें पाहिजे. पण जे नित्यतृप्त आत्मज्ञ आहेत, जे सर्वांना इष्ट असलेल्या निरातिशय आत्मसुखाला प्राप्त झाले आहेत त्यांना सिद्धि कांहीं सुख देत नाहींत.

श्रीरामः—हे ब्रह्मन् ! मला एक संशय आला आहे. वीतहव्याच्या त्या शरीराला लांडगे, कोल्हे इत्यादि श्वापदांनीं खाल्लें कसें नाहीं ? भूमीवरील चिखल, ओल इत्यादिकांमुळें तें कुजलें कसें नाहीं ? त्याचप्रमाणें तो वनांत असलेला वीतहव्य तेथेंच तत्काल विदेहमुक्त कसा झाला ? तें मला सर्व सांगा.

श्रीवसिष्ठः—हे साधो ! अज्ञ पुरुषाची जी संविद् रागादि मळानें दूषित झालेल्या 'देहच मी' या अहंभाववासनारूप तंतूनें दृढ वेष्टित झालेली असते तीच देहाचा छेद, भेद इत्यादिकांमुळें होणाऱ्या सुखदुःखदशारूप संतापाचा अनुभव घेते. पण वीतहव्याचें शरीर वासना रहित झाले होतें, त्यामुळें तें जीवन्मुक्त शरीर शुद्ध संविन्मात्र होतें. म्हणून त्या शुद्ध चिन्मात्र शरीराला तोडण्यास देखील कोणीही प्राणी समर्थ झाला नाहीं. हे पराक्रमी रामा ! योगी अशी कोणची युक्ति करतात, कीं तिच्या योगानें शेंकडों वर्षें झालीं तरी त्यांच्या देहाला तोडफोड वगैरे विकार होत

नाहींत, तें ऐक. जेव्हां जेव्हां ज्या ज्या पदार्थावर चित्त पडते त्याच्यासारखें तें तत्काल होतें. मनानें शत्रूला पाहिलें कीं, त्याच्यामध्यें द्वेषरूपी विकार होतो व मित्राला पाहिलें कीं तें प्रसन्न होतें. ज्याच्या विषयीं मनांत प्रेम किंवा द्वेष नसतो अशा एखाद्या वाटसराला, वृक्षाला किंवा पर्वताला पाहून तें प्रेम-द्वेषयुक्त होत नाहीं. त्यावरून प्रेम-द्वेषरहित आहे, असाच त्याचा अनुभव येतो. म्हणूनच सुंदर पदार्थ पाहिला कीं तें चंचल होतें, नीरस पदार्थ पाहून त्याविषयीं निरिच्छ बनतें, व कडू पदार्थ पाहून त्याविषयीं तें विरस होतें, असा प्रत्येकाला अनुभव येतो. सर्वत्र सारखी जी संवित् तिच्या विलासानें संपन्न असलेल्या योग्याच्या शरीराकडे जेव्हां हिंस्र पश्वादिकांचें चित्त जातें तेव्हां तें तत्काल त्या संवित्सारखें सम होतें, त्यामुळें तीं श्वापदें त्याची हिंसा, करीत नाहींत. जसा वाटसरू गांवचीं कामं करूं लागत नाहीं, म्हणजे गांवाजवळच्या वेलीं वगैरे तोडूं लागत नाहीं तसा हिंस्र प्राणीहि समदर्शी योग्याच्या संगतीनें द्वेषादि दोषरहित होत्साता कोणाच्याहि शरीराला तोडण्यास प्रवृत्त होत नाहीं. पण ते हिंस्रादि प्राणी योग्याच्या शरीरापासून दूर गेले म्हणजे आपल्या स्वाभाविक दोषांनीं युक्त होतात, अशी नियति असल्यामुळें व्याघ्र–सिंहादि हिंस्र पशूंनीं किडे, मुंग्यादि इतर कीटकांनीं वनांतील भूमीवर विराजमान होणाऱ्या वीतहव्याच्या शरीराला तोडलें नाहीं. लांकूड, मातीचें ढेकूळ, दगड इत्यादि सर्व पदार्थांमध्य संवित असते, ती सत्तासामान्यरूपानें मुख्या मुलाप्रमाणें सर्वत्र स्थित आहे. पण ज्यांचं चित्त शांत नसतें त्यांना पाण्यांतील प्रतिबिंबाप्रमाणें तीच संवित् पुर्यष्टकांत अत्यंत चंचल व सूक्ष्म दिसते. भूमि, जल, तेज व वायु यांच्या संविदेशीं वीतहव्याची तनु एकरूप झाली, त्यामुळें तिच्या ठिकाणीं कांहीं विकार झाला नाहीं. रामा! याचें आणखीहि एक कारण ऐक. स्पंद हें नाशाचें कारण आहे. चित्तात उत्पन्न झालेला किंवा वायूचा तो विकार आहे, असें लोकव्यवहारांत प्रसिद्ध आहे. प्राणांचें प्राणन-चलन हाच स्पंद आहे. तो शांत झाला असता वीतहव्याच्या देहांतील प्राण ज्याअर्थीं धारणेमुळें दगडासारखे दृढ होऊन राहिले होते त्याअर्थीं त्याची तनु जलादिकांच्या संसर्गानें कुजली नाहीं. हात--पाय वगैरे बाह्य अवयवांच व आंतील प्राणांचा वातजन्य किंवा चित्तजन्य स्पंद ज्या शरीरांत नसतो त्याची वाढ किंवा क्षय होऊं शकत नाहीं. हे तत्त्वज्ञांतील श्रेष्ठा, बाहेरील व आंतील स्पंद शांत झाला असतां शरीरांतील त्वचा, रक्त, मांस, इत्यादि धातु आपली पूर्वावस्था सोडीत नाहींत. शरीरांतील चित्ताचा व वाताचा स्पंद अगदीं शांत झाला असतां त्वचा वगैर धातूंचें स्तंभन होतें व त्यामुळें ते मेरूसारख स्थिर होतात. म्हणूनच प्राणाचा पूर्णपणें निरोध केला असतां योग्यांच्या शरीरांची दगडासारखी दृढ स्थिति होते; आणि शवरूप झालेल्या त्यांच्या शरीरांत थोडासाही विकार होत नाहीं. अशी वस्तुस्थिति असल्यामुळें योग्यांचे देह या भूलोकीं हजारों वर्षें जरी राहिले तरी मेघ जसे कुजत नाहींत व भूमींतील दगड जसे फुटत नाहींत, त्याप्रमाणेंच ते कुजत नाहींत, आणि फुटत नाहींत, आतां हे रामा! तत्त्वज्ञ वीतहव्य ज्ञान होतांच शरीराचा त्याग करून तत्काल विदेहमुक्त कां झाला नाहीं, तें ऐक. जे तत्त्वाला जाणणारे विरक्त व कामादि ग्रंथिरहित महाज्ञानी असतात ते सर्व शरीराचा त्याग वाटेल तेव्हां करण्यास स्वतंत्र असतात. अव-

शिष्ट राहिलेल्या प्रारब्धाचा भोग घेण्यास प्रवृत्त झालेल्या त्यांच्या चित्ताचें नियमन दैव, ऐहिक किंवा पारलौकिक संचित कर्में किंवा वासना करूं शकत नाहींत. त्यामुळें हे रामा ! तत्त्ववेत्त्यांचें मन काकतालीय न्यायानें ज्याची ज्याची भावना करतें तें तें तत्काल करतें. वीतहव्याच्या संविदेनें काकतालीय न्यायानेंच सांप्रत जीवित जाणलें व तेंच तत्काल स्थिर केलें. पण प्रारब्ध संपताच जेव्हां त्याच्या संविदेनें विदेहमुक्तीची भावना केली तेव्हां लागलाच तो विदेहमुक्त झाला. सर्व वासनांनीं रहित झालेलें व त्यामुळेंच सर्व पाशांपासून मुक्त झालेलें मन यथार्थ आत्मस्वरूपानें उदय पावतें नंतर तें मन जें जें इच्छितें तें तें क्षणांत होतें. कारण तसलें मन ही ज्याची उपाधि आहे असा जीवच सकलशक्तिमय महेश्वर आहे.

---

# सर्ग ९०

**१. चित्तशून्य वीतहव्य मैत्र्यादि गुणांनीं युक्त व निष्कळ झाला, २. दोन प्रकारचा चित्तनाश.**

**श्रीवासिष्ठः**—रामा ! जेव्हां वीतहव्याचें चित्त भाजलेल्या बीजाप्रमाणें अंकुरशक्तिहीन झालें तेव्हां मैत्र्यादि गुण उत्पन्न झाले.

**श्रीरामः**—प्रभो ! विचाराचा उदय होऊन चित्ताचें स्वरूप अस्त पावलें असतां मुनीच्या ठिकाणीं मैत्र्यादि गुण उत्पन्न झाले, हें आपण कोणत्या आशयानें सांगत आहां ! चित्त ब्रह्मामध्यें अस्त पावलें असतां मैत्र्यादि गुण कोणाचे व कोठें परिस्फुरण पावतात ? तें मला सांगा.

**श्रीवसिष्ठः**—रामा ! चित्ताचा नाश दोन प्रकारचा आहे. एक स्वरूप व दुसरा अरूप. जीवन्मुक्ताचा हा सरूप चित्तनाश आहे व विदेहमुक्ताचा हा अरूप चित्तनाश आहे. या लोकीं चित्ताची सत्ता दुःखाला कारण होते व चित्ताचा नाश सुखाला कारण होतो. यास्तव चित्ताची सत्ता क्षीण करून चित्ताला वासनाबीजरहित करावें. तामस वासनासमूहानें व्याप्त झालेलें जें मन तेंच जन्माचें कारण आहे. यास्तव तेंच मन विद्यमान आहे, असें तूं समज. तें केवल दुःखालाच कारण होतें. अनादि अभ्यासानें सिद्ध झालेल्या शरीर, इंद्रियें व विषय यांच्या गुणसमूहास 'हा माझा' असें जें चित्त जाणतें तेंच अतत्त्वज्ञ व दुःखित चित्त असून त्यालाच जीव म्हणतात. असलें अज्ञ मन जोंवर विद्यमान आहे तोंवर दुःखाचा क्षय कसा होणार ! मन अस्त पावलें म्हणजे प्राण्याचा संसार अस्त पावतो. या अज्ञ जन्तूमध्यें वासनारज्जूंनीं दृढ केलेलें जें विद्यमान मन तेच दुःखरूपी वृक्षाचें मूळ आहे, तोच दुःखवृक्षांच्या वनाचा अंकुर आहे, असें तुं जाण.

**श्रीरामः**—हे ब्रह्मन् ! कोणाचें मन नष्ट झालेलें असतें ? नष्ट झालेलें मन कशा प्रकारचें असतें ? त्याचा नाश कसा होतो व नाश पावलेल्या मनाचीही सत्ता कशी असते ?

**श्रीवसिष्ठः**—हे रघुकुलश्रेष्ठा ! मी तुला चित्ताची सत्ता सांगितली. आतां त्याचा नाश ऐक. आपले श्वासोच्छ्वास मोठ्या पर्वताला जसे हालवूं शकत नाहींत त्याप्रमाणें ज्या धीर पुरुषाला सुख-दुःखदशा साम्यावस्थेपासून ढळवूं शकत नाहींत त्याचें चित्त मेलेलें आहे, असें तत्त्ववेत्ते समजतात. 'हा सात विती लांब देहच मी' व 'हा देहाहून निराळा मी नव्हे' अशी भावना ज्या पुरुषाला अंतःकरणाच्या पुरता परिच्छिन्न करीत नाहीं त्याचें मन नष्ट झालें आहे असें म्हणतात. कोणतीही आपत्ति, कृपणता, उत्साह, मद, मंदता व महोत्सव ज्याच्या अंतःकरणांत व मुखचर्येवरही कांहीं विकार

उत्पन्न करूं शकत नाहींत त्याचें मन नष्ट आहे असें म्हणतात. हे साधो! हा मनोनाश आहे. कारण या अवस्थेंत मन वासनाबीजरहित असतें. हीच चित्तनाशदशा होय, ही जीवन्मुक्ताच्या ठिकाणीं असते. दृश्य खरें आहे, या भ्रांतीनें त्याचें मनन करण्याची योग्यता मानणें हीच मूढता आहे, असें तूं जाण. हे निष्पापा! ती मूढता जेव्हां नाश पावते तेव्हां चित्तनाश या नांवाचें सत्त्व उदय पावतें. हे राघवा! त्या चित्तनाशरूप सत्त्वसंज्ञक जीवन्मुक्ताच्या स्वभावाला कित्येकांनीं चित्त असें नांव दिलें आहे. तेंच सत्त्व या नांवाचें जीवन्मुक्ताचें मन मैत्र्यादि गुणांनीं युक्त होतें तेव्हां त्याच्यामध्यें उत्तम वासनेचा उदय होतो. हे निष्पापा! जीवन्मुक्ताचें मन पुनर्जन्मापासून मुक्त होतें. तें मन ब्रह्माकार वासनेनें युक्त असतें. तें पुनः जन्म पावत नाहीं. जीवन्मुक्ताच्या असल्या मनाची जी सत्ता तेंच सत्त्व होय. त्या मनाचा फक्त व्युत्थानकालींच आभासरूपानें अनुभव येत असल्यामुळें जीवन्मुक्ताचा हा मनोनाश सरूप म्ह० साकार आहे. कारण, त्याला सन्मात्रस्वरूपाची प्राप्ति झालेली असते व त्याला देहादि परिच्छेदाचा स्पर्श होत नाहीं. चंद्राच्या ठिकाणीं जशा आल्हादकारक दीप्ति असतात त्याप्रमाणें जीवन्मुक्ताच्या त्या मनोनाशामध्यें प्रसन्न मैत्र्यादि गुण सर्वदां सर्व प्रकारें स्थित असतात, वसंतऋतूंत हिमालयामध्यें जशा पुष्पमंजिऱ्या स्फुरण पावतात त्याप्रमाणें 'सत्त्व' या नांवाच्या जीवन्मुक्ताच्या मनोनाशामध्यें गुणसंपत्ति स्फुरतात. हे रघुकुलश्रेष्ठा! मीं दुसरा जो कलारहित अरूप मनोनाश सांगितला तो केवल विदेहमुक्तामध्येंच राहतो. विदेहमुक्तामध्यें म्ह० परमपावन निर्मल पदामध्यें सर्व श्रेष्ठ गुणांचा आधार असेंही सत्त्व अगदीं लीन होऊन जातें. त्या सत्त्वक्षयरूप विदेहमुक्ताच्या विरूप चित्तनाशांत कांहीं दृश्य अवशिष्ट रहात नाहीं. त्यांत गुण नाहींत, अगुण नाहींत, श्री नाहीं, अश्री नाहीं, चांचल्य नाहीं, हर्ष व क्रोध या वृत्तींचा उदय नाहीं व अस्त नाहीं. तेज नाहीं, तम नाहीं, दृश्य पदार्थ नाहींत, संध्या नाहीं, दिनरात्र नाहीं, दिशा नाहींत, आकाश नाहीं, खालीं नाहीं, वर नाहीं, अनर्थरूपता नाहीं, वासना नाहीं, रचना नाहीं, क्रिया नाहीं, अक्रियाही नाहीं, भाव नाहीं, अभाव नाहीं, व तें पदच सिद्ध असल्यामुळें कोणत्याही साधनानें साध्य होणारें नाहीं. ज्यांत तम नाहीं व तेजही नाहीं, नक्षत्रें, चंद्र, सूर्य व वायूही नाहीं, संध्याकाळचा रागही नाहीं व निर्मळ सूर्यही नाहीं, अशा शरदृतूंतील स्वच्छ आकाशासारखें तें पद आहे. आकाश ही जशी वायूची प्रतिष्ठा आहे त्याप्रमाणें जे बुद्धीच्या पार गेले आहेत, व संसारांतील व्यवहाराच्याही पलीकडे गेलेले आहेत त्यांची तें सर्वव्यापक पद प्रतिष्ठा आहे. जे सर्व दुःखरहित, चिद्रूप, क्रियारहित, आनंदपूर्ण, रजोगुण व तमोगुण यांनीं रहित असलेलें पद त्यांत आकाशासारखे निर्लेप झालेले व पारिभाषिक चित्तानेंही विरहित असलेले श्रेष्ठ विदेहमुक्त स्थिर राहतात. त्यांना पुनः जन्म घ्यावा लागत नाहीं.

---

## सर्ग ९१

१. संसाररूपी वृक्षाचें बीज शरीर, शरीराचें बीज मन व मनाचीं बीजें प्राणस्पंद व वासना आहे.

श्रीराम:—भगवन्, जगत् हें एक वन आहे. निर्विशेष ब्रह्म हाच त्या वनाचा मोठा आधारभूत पर्वत असून त्यावर निरनिराळे लोक

हेच वृक्ष आहेत. ते नक्षत्ररूपी पुष्पांनी सुशोभित झालेले आहेत. देव व असुर हे त्या वृक्षांवरील पक्षी आहेत. निळे मेघ हेच त्यांचे पल्लव असून विजा याच त्यांच्या मांजिऱ्या आहेत. सर्व ऋतूंमध्यें रम्य वाटणारे चंद्र, सूर्य व इतर ग्रहसमूह हेच रम्य व विस्तृत दांत काढून तें वन जणु काय हंसत आहे. सात समुद्र हीच त्यांतील बावी आहे. शेंकडों नद्यांनीं तें वन मनोहर झालेलें आहे. चवदा भुवनांतील अनंत जातींचीं भूतें त्यावर उपजीविका करीत आहेत. भगवन्, संसाररूपी द्राक्षेची वेल अशा त्या जगद्रूप अरण्याला व्यापून राहिली आहे. वासनारूपी वेलांनी तिला सभोंवार वेढून जाळीं केलीं आहेत. जरा व मरण हीं त्या वेलीचीं पेरें आहेत. सुख व दुःख हीं तिला लागलेलीं अनेक फळें आहेत. तिचीं मुळें फार खोल जाऊन त्यांची परंपराच लागली आहे व तिच्या अळ्यांत मोहरूपी जलाच्या ओंझळी वारंवार ओतल्या जात आहेत. महाराज! त्या वेलीचें बीज काय? त्या बीजाचें बीज काय! त्या बीजाच्या बीजाचेंही बीज काय आहे व त्याचें पुनः बीज काय आहे तें सर्व मला पुनरपि माझा बोध वृद्धिंगत व्हावा व मला ज्ञानाचें सार प्राप्त व्हावें म्हणून सांगा.

श्रीवसिष्ठः—हे राघवा! या संसाररूपी वेलीचें बीज शरीर आहे, त्यांतील लिंगदेहांत विचित्र असंख्य कार्यांचा आरंभ करणारीं शुभ व अशुभ कर्में हेच मोठे अंकुर लीन होऊन राहिलेले आहेत. शरदृतूंत पृथ्वी जशी धान्य-संपत्तीनें—परिपक्व शेतांनीं पुष्ट होते त्याप्रमाणें ही संसाररूप वेल त्या तसल्या शरीरानें संपन्न होते. तिला अनेक शाखा फुटतात व त्या शाखांना असंख्य प्रतान असतात. ती फळें व पल्लव यांनीं शोभूं लागते. ती वृद्धि व क्षय या दशांचा कोठा आहे व दुःखरूपी रत्नांचा करंडा आहे. आणि शरीराच्या अधीन झालेलें चित्त हें या शरीराचें बीज आहे. वर्तमान, भूत व भविष्यत्कालातील सर्व शरीरें त्या चित्तापासून उत्पन्न होतात; आणि ही गोष्ट स्वप्नांतील संभ्रमामध्यें आमच्या चांगल्याप्रकारें अनुभवाला येते. गंधर्वांच्या संकल्पापासून जसें गंधर्वनगर उत्पन्न होतें त्याप्रमाणें चित्तापासून खिडक्या वगैरे असलेलें शरीर उद्भवतें. मातीपासून जसे घटादि पदार्थ उत्पन्न होतात तसें आपल्याला दिसणारें हें सर्व विस्तृत जगत् चित्तापासून झालें आहे. वृत्तींची परंपरा हीच वेल धारण करणाऱ्या चित्तवृक्षाचीं दोन बीजें आहेत. एक प्राणाचा परिस्पंद व दुसरें दृढ वासना. जेव्हां सर्व नाड्यांना स्पर्श करण्यास तयार झालेला प्राण परिस्पंद पावतो तेव्हां लागलेंच संवेदनमय चित्त उत्पन्न होतें. जेव्हां नाडीच्छिद्रांतून प्राण परिस्पंद पावत नाहीं तेव्हां असंवेदनामुळें चित्त उत्पन्न होत नाहीं. आकाशांतील नीलत्वादिकांप्रमाणें समष्टि हिरण्यगर्भाच्या प्राणांचें जें स्पंदन तेंच हें चित्ताच्या द्वारा दिसणारें जगत् आहे. समष्टिप्राणाच्या स्पंदाचा त्याग करून उपरत झालेल्या चिद्रूपाची जी शांति तीच प्रलय किंवा मोक्ष होय. हातानें फेकलेला चेंडू जसा जातो त्याप्रमाणें प्राणस्पंदानें प्रेरणा केलेली संविद् चंचल होते. हातानें फिरविलेला चेंडू किंवा भोंवरा जसा आपल्या अंगण्यांत चक्राकार फिरतो त्याप्रमाणें प्राणस्पंदानें जागृत झालेली संविद् देहामध्यें स्फुरण पावते. सुवासाच्या पंक्तीला जसा वायु चालन देतो त्याप्रमाणें प्राणस्पंद अत्यंत सूक्ष्माकार, सत्, सर्वगत संविदेला चंचल करतो. हे राघवा! संविदेचा संरोध केला असतां, म्हणजे तिला विक्षिप्त होऊं दिलें नाहीं, तर परम श्रेय-मोक्ष प्राप्त होतो, असें तूं जाण. संविदेच्या क्षोभाचें कारण प्राणस्पंद आहे. त्याला[१] प्राणाया-

१. ज्यांत चिदाभास भरलेला आहे असें चित्त.

माच्या अभ्यासानें नाहींसें केलें असतां संविद्मध्यें क्षोभ होत नाहीं. संविद् चित्ताच्या आकारानें उदय पावली म्हणजे ती लागलीच मोठ्या आदरानें बाह्य विषयांकडे जाते; आणि त्या विषयाचा उपभोग घेतला असतां अनंत दुःखें होतात. पण तीच संविद् बाह्य विषयांविषयीं निजलेलीशी होऊन सर्वान्तर आत्म्याच्या बोधविषयीं जेव्हां उद्युक्त होते तेव्हां प्राप्त करून घेण्यास योग्य असलेलें जें शुद्ध पद तें प्राप्त होतें. यास्तव हे रामा! वासनांनीं प्रेरित झालेल्या प्राणपरिस्पंदांनीं तूं आपल्या संविदला अत्यंत परिपुष्ट केलें नाहींस तर मग अजच आहेस, म्हणजे (मनाच्या अभावीं) तूं मुक्तच आहेस. संविदेची वृद्धि हेंच चित्त आहे, असें तूं समज. त्या चित्तानेंच हा सर्व अनर्थसमूह पसरला आहे; व त्या चित्तानेंच या सर्व जीवांना व्याकुल केलें आहे. सद्गुरूचा उपदेश, संप्रदाय यांनीं सिद्ध झालेल्या, प्राणायाम, ध्यान इत्यादि, उपायांच्या अभ्यासानें योगी त्या चित्ताच्या शांतीकरितां प्राणांचा निरोध करितात. कारण प्राणांचा निरोध चित्ताची शांति हें फळ देणारा आहे, तो परम साम्यावस्थेचें कारण आहे व प्राणनिरोधच संविदेचें सुंदर स्वास्थ्य आहे.

रामा! ज्ञानी लोकांनीं जिला प्रकट केलें आहे अशी वासनेच्या बळावर जिवंत राहाणारी चित्ताची दुसरी उत्पत्ति ऐक. अनेक जन्मांतील दृढ भावनेमुळें देहादिपदार्थांचें हा मी व हें माझें इत्यादि संस्काररूपानें जें ग्रहण करणें तें जर पूर्वापर विचार न करितां केलेलें असेल तर तीच वासना होय. मनानें तीव्र संवेगानें ज्याची ज्याची भावना केलेली असते तसा तसा पुरुष तत्काल बनतो, आणि तो प्रसंगीं बाकीच्या सर्व गोष्टी विसरून जातो. वासनेनें पराधीन झालेला पुरुष त्या स्वरूपाचा बनतो आणि तो जें पाहतो तें सर्व सत्य आहे, असें मानून मोहित होतो. जसा मदानें मत्त झालेला पुरुष भलभलतेंच पाहतो, त्याप्रमाणें वासनेच्या वेगानें परवश होऊन संविद् स्वरूपाचा जेव्हां त्याग करते म्हणजे चित्तरूप बनते तेव्हां तीच दुर्दृष्टि हें सर्व जगत् पाहते. आंतून विषानें व्यापलेला पुरुष जसा दुःख भोगतो, त्याप्रमाणें अयथार्थ ज्ञानी पुरुषच अंतस्थ वासनेमुळें मानसिक व्यथेनें युक्त होतो. अनात्म्याला आत्मा जाणणें हें अयथार्थ ज्ञान आहे, आणि तें अवस्तूच्या ठिकाणीं वस्तुत्व तेंच चित्त आहे, असें समज. ज्याचा दृढ अभ्यास झाला आहे, अशाच पदार्थाच्या वासनेमुळें चित्त अतिचंचल होतें; व तेंच जन्म, जरा व मरण यांचें कारण होतें. जेव्हां तें चित्त ग्राह्य व त्याज्य यांतील कशाविषयींही भावना न करितां हेयोपादेयरहित होऊन, सर्वांचा त्याग करून, स्थिर राहतें तेव्हां चित्त उत्पन्न होत नाहीं. सतत वासनारहित झाल्यामुळें जेव्हां मन कांहीं मनन करीनासें होतें, तेव्हां अत्यंत शांति देणारी अमनस्ता उदय पावते. आकाशांत जसें अभ्र तसें संविद्रश्मिमध्यें जेव्हां कांहीं स्फुरत नाहीं तेव्हां आकाशांत जसें कमल उत्पन्न होत नाहीं, तसें हृदयांत चित्त उत्पन्न होत नाहीं. जेव्हां जगांतील कोणत्याही वस्तूविषयीं ही वस्तु सत् आहे अशी भावना केली जात नाहीं, तेव्हां शून्य हृदयाकाशांत चित्त कसें उत्पन्न होणार! हे राघवा! मनांत पदार्थांचें सत्यत्वानें व आसक्तीनें चिंतन करणें हें एवढेंच चित्ताचें रूप आहे, असें मी समजतों. हें दुसरें कल्पना करण्यास योग्यच नाहीं, अशी

१. चित्ताचें दुसरें बीज मी सांगतों तें ऐक. प्राणस्पंद हें एक बीज सांगितलें.

भावना करणाऱ्या पुरुषाच्या अ.क.शासा.ख्या स्वच्छ हृदयांत चित्ताचा उदय कोठून होणार? सर्व भावना सोडून जगद् अभावरूप आहे, अशी भावना करणें व जशी वस्तु असल तशी ती पाहणें याला अचितत्व म्हणतात. आपल्यांतील सर्व वासनांचा त्याग करून शीतल स्वरूपांत रहाणारें जें चित्त तें वृत्त्याभासानें जरी स्फुरलें तरी त्याला असद्रूपच म्हटलेलें आहे. वासनेच्या आसक्तीचें ध्यान करून हा ज्याच्या मनांत विषयासक्ति उत्पन्न होत नाहीं, त्याचें चित्त अचित्ततेस प्राप्त होतें व तसल्या-अचित्ततेला प्राप्त झालेल्या चित्तालाच सत्त्व असें म्हणतात. ज्याची वासना घन व त्यामुळेच पुनर्जन्माला कारण होणारी नसते तो सत्त्वस्थ जीवन्मुक्त कुंभाराच्या चक्राच्या भ्रमणाप्रमाणें व्यवहार करीत राहतो. ज्याची वासना भाजलेल्या बीजाप्रमाणें पुनर्जन्मरहित व रसहीन असते, तेच जीवन्मुक्त होऊन राहिलेले असतात. ज्यांचें चित्त सत्त्वरूपास प्राप्त झालेलें असतें त्यांनाच ज्ञानपारंगत व अचित्त असें म्हणतात. ते देहान्त झाला असतां आकाशरूपी होतात. रामा! चित्ताची प्राणस्पदन व वासना अशीं दोन बीजें आहेत. त्यांतील एक क्षीण झालें असता लागलेंच दुसरेंही नष्ट होतें. ज्याप्रमाणें घटाकाशांत जल सांठविण्यास जलाशय व घट हे दोन्ही कारण होतात त्याप्रमाणें चित्ताच्या जन्माला हीं दोन्हीं मिळून कारण होतात. एकटी घन वासनाच बलात्कारानेंच पुनर्जन्माला कारण होत नाहीं. आतां प्राणस्पद व वासना या चित्ताच्या बीजाचें बीज काय म्हणून जें तूं विचारलें आहेस त्याचें उत्तर ऐक. प्राणस्पंद व वासना हीं दोन्ही बीजांकुराप्रमाणें निरनिराळ्या काळीं एकमेकांचीं कारणें होतात, आणि तिळामध्यें जसें तेल तशीं तीं दोन्ही एकमेकांच्या आंत स्थित आहेत. तसेंच चित्तहि त्या दोघांचें व इंद्रियें, सुख-दुःख इत्यादिकांचें कारण आहे. कारण तें प्रथम प्राणाला, नंतर इंद्रियांना, त्यानंतर आनंदाला इत्यादि क्रमानें त्या सर्वांस उत्पन्न करतें. त्याचप्रमाणें आनंद व प्राणस्पंद हे दोन्ही जेव्हां वासनारूप होतात तेव्हां ते दोन्ही मिळून चित्ताचे उत्पादक होतात. वासना व प्राणस्पंद हीं दोन्ही वास व पुष्प किंवा तेल व तिळ यांप्रमाणें एकमेकांच्या आश्रयानें रहतात. वासनेमुळें प्राणस्पंद व प्राणस्पंदामुळें वासना होते. त्यामुळें चित्ताच्या बीजाचा बीजांकुरासारखा कार्यकारणक्रम आहे. वासना बाह्य आकार धरूं लागली की संवित् प्रक्षोभ पावते व प्राणस्पंदाला उत्पन्न करते. प्राणस्पंदामुळें चित्त होतें. स्पंदन पावणें हा प्राणाचा धर्म आहे. तो हृदयाच्या गुणांना—रागादि वासनांना स्पर्श करून संविदेला जागृत करीतच स्पंद पावतो. त्यामुळें चित्तबालक उत्पन्न होतें. याप्रमाणें वासना व प्राणस्पंद हीं चित्ताचीं दोन बीजें आहेत. राघवा! त्यांतील एकाचा क्षय केला असतां दोघांचाही क्षय होतो; व त्यामुळें चित्ताचाही क्षय होतो. चित्त हा एक वृक्ष आहे. सुख व दुःख यांनीं व्याकुळ झालेलें मन हे त्याचें स्पंदन—हालणें आहे. शरीर हेंच त्या वृक्षाचें मोठें फळ आहे. कर्तव्य याच पालवीनें तो वृक्ष सभोंवार पसरला आहे. कृति याच वेलीनें तो वृक्ष वेष्टिला आहे. तृष्णा याच कृष्ण सर्पानें त्याला विळखा घातला आहे. प्रेम व रोग ह्या बकांचें तो वसतिस्थान आहे. अज्ञान हेंच त्याच आंत दृढ मूळ आहे. त्या वृक्षावर इंद्रियरूप पक्षी लीन होऊन राहिले आहेत. पण वासनेचा क्षय केला असतां सोसाट्याचा वारा पिकलेल्या फळांना जसा पाडवितो त्याप्रमाणें चित्तवृक्ष क्षणांत उन्मूलत पडतो. रामा! चित्त

हा वावटळींतील धुळीचा लोळ आहे. लौकिक धुळीचा लोळ जसा सर्व दिशांना पांढऱ्या करून सोडतो, तसें या चित्तानें सर्व आशावासांना पंडुरोगी बनविलें आहे. लौकिक धूळ लोकांच्या डोळ्यांना जशी झांकून टाकते त्याप्रमाणें या चित्तधुळीनें पूर्ण चिद्रूपाला आच्छादित केलें आहे. ही चित्तधूळ अज्ञानापासून उठली आहे. ती मेघाप्रमाणें चंचल आहे. ती तृष्णारूपी गवताच्या काड्यांनीं व्याप्त आहे, तिचा शरीर हा आकार स्तंभासारखा आहे. ती अत्यंत चंचल असून त्यांत अल्प अल्प वृत्ति आहेत. ती चित्तधूळ सर्व दिशांकडे अनायासानें जाण्यास मोठी दक्ष आहे. त्या चित्तरूपी वावटळींत असलला महालोक दृष्टी पडत नाहीं. रामा ! अशा प्रकारें हें चित्तरत्न प्राणस्पंदाच्या निरोधानें एका क्षणांत शांत होतें. वासना व प्राणस्पंद याचें बीज शब्दादि विषयजात आहे. हृदयांत शब्दादि विषयांस आठवूनच प्राणस्पंद व वासना उदय पावते. म्हणून विषय जात हें त्या दोघांचें बीज आहे, असें सांगितलें. मूळ तोडलें असतां वृक्ष जसा एका क्षणांत समूळ उपटून पडतो त्याप्रमाणें विषयजाताचा त्याग केला असतां प्राणस्पंदन व वासना समूळ नाश पावतात. संविद्च आपली गंभीरता सोडून संवेद्यासारखी झाली म्हणजे तेंच चित्ताचें बीज होतें. कारण तेलावांचून तिळ जसा संभवत नाहीं तसें संविदेवांचून संवेद्य संभवत नाहीं. संविदेहून संवेद्य आंत किंवा बाहेर कोठेंही नाहीं. सकल्पानें स्फुरण पावणारी संविद् संवेद्यास पाहते. स्वप्नांत जसें आपलें मरण स्फुरतें, आपण देशांतरीं आहों असें भासतें, तसें जागरावस्थेंतही स्वचमत्कारानेंच संवेद्य संविदहून पृथक् भासतें. ज्या विवेकदशेंत स्वतत्त्वज्ञान असतें त्या दशेंतील तें ज्ञानही स्वसंकल्पानेंच होतें. यास्तव हे रघुनन्दना ! ज्याप्रमाणे अज्ञ मनुष्याला त्याच्या संकल्पामुळेंच वेताळ भासतो त्याप्रमाणे हें जगज्जाल सकल्पामुळें भासते. जसा भ्रमानें स्थाणूच्या ठिकाणीं पुरुष दिसतो तसें संविदेच्या ठिकाणीं संवेद्य दिसतें. ज्याप्रकारें गवाक्षादिकांतून घरांत पडलेल्या चंद्रसूर्याच्या किरणांचा काठीसारखा आकार दिसतो व त्यांत पुनः त्रसरेणूंचा आकार भासतो किंवा नौकेंत बसलेल्या पुरुषाला तीरावरील वृक्ष चालत आहेत असा भास होतो तसें संविदेला संवेद्य दिसतें. हें मिथ्या दुर्ज्ञान यथार्थ ज्ञानानें नाश पावतें. प्रमाण ज्ञानानें पाहिले असतां रज्जूंतील सर्पत्व व चंद्रांतील द्वित्व जसें अधिष्ठानाहून पृथक् भासत नाहीं त्याप्रमाणें शुद्ध संविदच त्रैलोक्य असल्यामुळें यथार्थ ज्ञान झाल्यावर ते निराळें भासत नाहीं; आणि मनांत असा दृढ निश्चय होणें यालाच ज्ञानी ‘सम्यक्ज्ञान’ असें म्हणतात. या संविदेला पूर्वीं दिसलेलें असें जें काहीं भासतें त्याचें सुज्ञानें मोठ्या यत्नानें परिमार्जन करावें. त्याचें मार्जन न करणें हाच महासंसाराचा संबंध असून त्याचें परिमार्जन करणें हाच मोक्ष आहे, असा अनुभव येतो. विषयज्ञान हें जन्मरूप अनन्त दुःखाला कारण होतें; आणि चिदेकरसस्वभावामध्ये प्रतिष्ठित झालेली असंवित्ति--विषयांचें अदर्शन मोक्षसुखाला कारण होतें. यास्तव रामा ! सर्व विषयदर्शनाचा त्याग करून पूर्णानन्दरूप हो. जो स्वतः विषय नसून नित्य विज्ञानरूप आत्मा तो तूं आहेस.

**श्रीरामः**—प्रभो ! जाड्याचा त्याग केल्यावर संवेदन अवश्य होणारच तेव्हां पुरुष अजड व असंवित्ति (असा एकमेकाविरुद्ध स्वभावाचा) कसा होतो ?

**श्रीवसिष्ठः**—रामा ! ज्याची आस्था वर्त-

मानविषयांत कोठेंही नसते, व जो भूत व भविष्यत् विषयांतही आस्था ठेवीत नाहीं तर वासनाशून्य असतो तो दगड किंवा लांकूड याप्रमाणें कोणताही विषय जाणत नाहीं. म्हणून तेवढ्यापुरता तो जड, पण स्वरूपानें अजड असतो. वस्तुदृष्टीचा आश्रय करणें हीच संविद् आहे. पण जीवन्मुक्ताची संविद् सर्व जगाला असत्य मानीत असल्यामुळें बाह्य वस्तु सत्य आहे, अशी भावनाच करीत नाहीं. यास्तव तो शरीरानें शेंकडों कार्यें जरी करीत असला तरी 'असंविति' व 'अजड' असें म्हटला ... याची बुद्धि भूतकालीन विषयज्ञानानें ... लिप्त होत नाहीं त्याला जीवन्मुक्त ... बुद्धीला अजडा संविद् म्हणतात. सर्व वासना सोडल्यामुळें भविष्यकालच्या विषयाचेंही थोडें सुद्धां चिंतन जेव्हां केलें जात नाहीं तर बालक व मूक यांच्या विज्ञानाप्रमाणें स्थिर अवस्थान होतें तेव्हा ज्ञानी जाड्यरहित, शुद्ध व अखंड ज्ञानाचा आश्रय करतो व त्यामुळें पुनः लिप्त होत नाहीं. आकाशापासून नीलत्व जसें प्रवृत्त होत त्याप्रमाणें निर्विकल्प समाधीनें सर्व ...चा त्याग करणारा आनंद प्रवृत्त होतो. यती त्या आनंदांत राहतात. पण त्या असंविति जीवन्मुक्ताचें तें आनंदसंवेदनही संविन्मय असल्यामुळें आदि-अन्तरहित असतें. त्यामुळें तें त्या आनंदस्वरूपांतच मिळून जातें. त्यामुळें जीवन्मुक्त जरी शरीरानें चालत असला, उभा असला, स्पर्श करीत असला किंवा घ्राणानें वास घेत असला तरी त्याला अजड, आनंदाच्या पलीकडे गेलेला, संवेदनाचा त्याग केलेला, व सुखी म्हणतात. हे रामा ! हे अपार गुणसागरा ! प्राणायामादि श्रमांनीं साध्य होणाऱ्या या दृष्टीचा आश्रय करून या दुःखसागरांतून पार पड. ज्याप्रमाणें अति सूक्ष्म बीजापासून उत्पन्न झालेला महावृक्ष काहीं कालानें सर्व आकाशाला व्यापतो त्याप्रमाणेंच हें संवेद्य स्वसंकल्पापासून खोटेंच उत्पन्न झालें आहे. जेव्हां पुनः पुनः संकल्प करून मंत्रवत् आपलें सांकल्पिक स्वरूप निर्माण करते तेव्हां तीच या जन्मपरंपरेच्या बीजत्वास प्राप्त होते. ती स्वतःच आपल्याला उत्पन्न करून व पुनः पुनः मोहित करून शेवटीं जेव्हां हृदयस्थ आत्मतत्त्वाला जाणते तेव्हा ती ज्ञानी संवितच स्वतःला मुक्त करून घेते. ती ज्याची भावना करते तेंच एका क्षणांत होतें. परंतु रागादि दोषांच्या भूमिकेपासून मुक्त झालेली नसली तर ती दीर्घकालानेंही स्वरूपास प्राप्त होत नाहीं. ती वस्तुतः देव नव्हे, राक्षस, गंधर्व, यक्ष, किन्नर यांतील एकही नव्हे. तर अनादिसिद्ध मायेच्या योगानें आत्माच जगद्रूपी नाट्य करतो. जसा मायावी नट आपल्याला बद्धसा दाखवून मुक्त करीत असल्यासारखें दाखवितो त्याप्रमाणें किंवा कोशकार कृमीप्रमाणें आत्मा आपल्यालाच बद्ध करून व दुःख भोगून दीर्घकालानें स्वतः ज्ञानप्रभावानें कैवल्यास प्राप्त होतो. जगद्रूपी सागरसमूहाचें जल ही संविद् आहे. पर्वतादि रूपास प्राप्त झालेली हीच अपूर्व दिशादिकांच्या आकारानें स्फुरण पावते. आकाश, पृथ्वी, वायु, अंतरिक्ष, पर्वत, नद्या, दिशा इत्यादि या सर्व त्या संविद्रूप जलसमूहाच्या लाटा म्हटलेल्या आहेत. सर्व जग संविन्मात्र आहे; त्यांत दुसरी कांहीं कल्पना नाहीं, याच यथार्थज्ञानानें संविद् अद्वयतेस प्राप्त होते. जेव्हां ती कांहीं जाणत नाहीं, स्पंदन पावत नाहीं, चलन पावत नाहीं. स्वात्मस्वरूपांतच अवस्थित होते तेव्हां ती लिप्त होत नाहीं. हे रामा ! या संविदेचें बीज सन्मात्र आहे. तेजापासून जसा प्रकाश उदय पावतो त्याप्रमाणें त्या सन्मात्रापासून ही संविद् उत्पन्न होते. सत्तेचीं दोन रूपें आहेत.

एक नाना आकारांनीं विलास पावतें व दुसरें एकरूप आहे. त्यांचा हा विभाग एक. घटता, पटता, त्वत्ता, मत्ता, ममता इत्यादि जें व्यवहारांत म्हटलें जातें, तें सत्ता रूप, विभाग पावून नानाकार होऊन राहिलें आहे. पण हा विभाग सोडून तीच सत्ता जेव्हां एकाकार व सामान्यरूपानें स्थित होते तेव्हा तेंच तिचें एकरूप म्हटलेलें आहे. विशेष सोडून जें निर्लेप सन्मात्र राहतें तेंच सत्तेचें एकरूप महारूप आहे. तेंच वस्ततत्त्व आहे, आणि सत्तेचें जें नानारूप प्रतीत होतें तें खरें नव्हे. कारण घटत्वादि रूप घटाच्या कपालादि कारणांमध्यें अनुवृत्त झालेलें दिसत नाहीं. म्हणून तें मिथ्या आहे. सत्तेचें जें एक अतिशुद्ध रूप आहे तें केव्हांही नाश पावत नाहीं व त्याची केव्हांही विस्मृति होत नाहीं. यास्तव रामा ! कालसत्ता, कलासत्ता, वस्तुसत्ता इत्यादि विभागकलना सोडून केवल सन्मात्रपरायण हो. कालसत्ता, स्वसत्ता इत्यादि सत्तेंतील काल, स्वत्व इत्यादि विषय टाकले असतां अवशिष्ट राहिलेली सत्ता उत्तम एकरूप सत्ताच आहे, तथापि ती जेव्हां विशेषयुक्त असते तेव्हां खरी नसते. भिन्न भिन्न पदार्थांची कल्पना करणारी विभागकल्पना जेथें असते, तेथें नानात्वाचें कारण असतें, तेव्हां तें रूप अतिशय पावन कसें असेल ? यास्तव हे रामा ! तूं सत्तासामान्याचेंच सदा चिंतन करीत सर्व जगत् तदाकार आहे, असें जाणून परिपूर्ण परानन्दी हो. तूं स्वरूपानें सर्व दिशांना व्यापून रहा. हे ज्ञानी रामा ! सत्तासामान्याची जी पराकाष्ठा तेंच [illegible] चित चिद्रूनें [illegible] सत्ता प्रवृत्त होते. संवेदनरूप [illegible] सामान्यसत्तेची पराकाष्ठा तेंच [illegible] व अनंत पद आहे. त्याचें बीज कांहीं नाहीं. जेथें सर्व सत्ता लय पावते व निर्विकार रहाते त्या स्थानीं पोंहोंचलेला पुरुष पुनः दुःखांत पडत नाहीं. तें पद सर्व हेतूंचा हेतु आहे, त्याचा हेतु कोणी नाहीं. तें सर्वांचें सार आहे, त्याचें सार दुसरें कांहीं नाहीं. तटावरील वृक्ष जसे सरोवरांत प्रतिबिंबित होतात त्याप्रमाणें त्या विस्तीर्ण चिद्दर्पणांत या सर्व वस्तुदृष्टि स्फुरतात. जिव्हे-पासून षड्रस जसे प्रगट होतात त्याप्रमाणें त्या आनंदसागरापासून सर्वभाव प्रकट होतात; व इंद्रियांची प्रीति उत्पन्न करितात. तें अति स्वच्छ चिदाकाशाचेंही पद आहे. जगांत जेवढे आनंद-दायी पदार्थ आहेत त्या सर्वांचें तें आस्वादन आहे. हे राघवा ! त्या पदामध्यें जगाचे समूह उत्पन्न होतात, राहतात, वाढतात, परिणाम पावतात, अपक्षय पावतात व विनष्ट होतात. जगांत जेवढे भारी पदार्थ आहेत त्या सर्वांत तें अधिक भारी आहे. जगांतील सर्व हलक्या पदार्थांहून तें हलकें आहे. सर्व स्थूल पदार्थांहून तें स्थूल आहे व सूक्ष्माहून अति सूक्ष्म आहे. तें सर्वांपेक्षां अधिक दूर आहे; तें स्वतः आत्माच असल्यामुळें सर्वांहून अतिशय समीप आहे. तें सर्व कनिष्ठ पदार्थांत कनिष्ठ व ज्येष्ठांत ज्येष्ठ आहे. तें तेजांचेंही तेज व तमाचेंही तम आहे. तें सर्व व्यवहारिक सत्यांचें सत्य व दिशांची परा दिशा आहे. तें कांहीं नाहीं व कांहीं आहे. तें जणुं काय आहे व जणुं काय नाहींही. तें सूक्ष्मदृष्टीला दृश्य असून शास्त्र सर्व प्रयत्नानें तूं त्या परम पावन पदामध्यें स्थित स्थितीस प्राप्त होशील असें कर. तें अमल व अजर आहे. तेंच आत्मतत्त्व आहे. [illegible] जें [illegible] अमल [illegible] उपशम पावतें. [illegible] स्थूलदृष्टीला अदृश्य आहे. प्रत्यगात्मरूपानें तें मी आहे व अहंकाररूपानें तें मी नाहीं. यास्तव हे निष्पाप रामा !

१ तें लोकप्रसिद्ध नाहीं, पण जगांत असलेली अति सूक्ष्म वस्तुही तेंच आहे.

सर्व प्रयत्नानें तूं त्या परम पावन पदामध्यें स्थिर स्थितीस प्राप्त होशील असें कर. तें अमल व अजर आहे. तेंच आत्मतत्त्व आहे. त्याचें ज्ञान झालें असतां चित्त उपशम पावतें. ज्याला त्याचें अखंड एकरूप अवगत झालें आहे, असा. तूं नित्य संसारभयरहित पदरूप आहेस.

---

## सर्ग १२

—:*:—

१. वासनाक्षयादिकांचा व ज्ञानाचा एकच वेळीं अभ्यास करावा.

**श्रीराम**:—भगवन् ! आपण जीं मोक्षबीजें सांगितलीं त त्यांतील कोणत्या उपायानें तें शीघ्र प्राप्त होतें !

**श्रीवासिष्ठ**:—या दुःखबीजांतील जें जें बीज मीं पुढें पुढें सांगितलें आहे त्याच्या त्याच्या प्रयोगानें तें पद शीघ्र प्राप्त होतें. सत्तासामान्याच्या पराकाष्ठेंत असलेल्या त्या पदामध्यें वासना बलात्कारानें सोडून दृढ प्रयत्नानें हें तत्त्वज्ञा ! तूं जर एक क्षणभरहि अक्षयरूप स्थितीला प्राप्त झालास तर त्याचक्षणीं तूं त्या स्थानाला पोहोंचला आहेस असें समज. किंवा तूं सत्तासामान्यरूपांतच जरी आपली स्थिति केलीस तरी थोड्या अधिक यत्नानें त्या पदास प्राप्त होशील. हे निष्पापा ! तूं संवित्तत्त्वाचें जर ध्यान करीत बसशील तर पुष्कळ यत्नानेंच तुला तें पद प्राप्त होईल. संवित्तत्त्वाला सोडून केवळ संवेद्याचें ध्यान करताच येत नाहीं. कारण संवित्तीचाच सर्वत्र संभव आहे. तू जें चिंतन करतोस, जें गमन करतोस, जो उभा राहतोस, व जें कांहीं करतोस त्या सर्व ठिकाणीं ती संविद् स्थित आहे, कारण संविद्च तें सर्व आहे. रामा ! तूं वासनांचा त्याग करण्याविषयीं जर दीर्घ प्रयत्न करशील तर एका क्षणांत तुझ्या सर्व आधिव्याधि शिथिल होतील. पूर्वी सांगितलेल्या सर्व प्रयत्नांहून हा वासनात्याग फार कठिण म्हणून म्हटलेला आहे. सुमेरु पर्वताला उपटून टाकणेंही सुसाध्य होईल, पण वासनात्याग त्याहूनही दुःसाध्य आहे. जोंवर मन विलीन होत नाहीं तोंवर वासनेचा क्षयही होत नाहीं व जोंवर वासनाक्षय होत नाहीं तोंवर चित्त शांत होत नाहीं. पण जोंवर तत्त्वज्ञान झालेलें नाहीं तोंवर चित्ताची शांति कोठची ? आणि जोंवर चित्ताचा उपशम नाहीं तोंवर तत्त्वज्ञान कसें होणार ? वासनक्षयावांचून तत्त्वज्ञान कोठचें ? तत्त्वाची प्राप्ति झाल्यावांचून वासनाक्षयही होत नाहीं. याप्रमाणें तत्त्वज्ञान, वासनाक्षय व मनोलय हीं तिन्हीं एकमेकांचीं कारणें होऊन दुःसाध्य झालेलीं आहेत. यास्तव हे राघवा ! विवेकासह पुरुषप्रयत्नानें भोगेच्छा दूर सारून या तिन्ही उपायांचा एकाचवेळीं आश्रय करावा. जोंवर त्या तिन्ही साधनांचा वारंवार चांगला अभ्यास केला नाहीं तोंवर शेंकडों वर्षांनींही त्या परमपावन पदाची प्राप्ति होत नाहीं. हे महामते ! वासनाक्षय तत्त्वज्ञान व मनोनाश यांचा एकाच वेळीं चिरकाल अभ्यास केला असतां तें फल देण्यास समर्थ होतात. पण दोषांनीं प्रतिबद्ध झालेले मंत्र जसे सिद्ध होत नाहींत त्याप्रमाणें वरील उपायांतील एकेका उपायाचें अनुष्ठान दीर्घकाल जरी केलें तरी ते सिद्धी देत नाहींत. बुद्धिमान् पुरुषानाही या तीन उपायांतील एकेकाचें सेवन चिरकाल जरी केलें तरी एकेक योद्धा शत्रूवर चालून जाण्यास जसा समर्थ होत नाहीं त्याप्रमाणें एकेक उपाय पुरुषाला परमात्माभिमुख करण्यास समर्थ नाहीं, पूर आलेल्या जलाचा ओघ पर्वताच्या तटाचाही जसा भेद करतो, त्याप्रमाणें बुद्धिमान् पुरुषानें एकाच वेळीं अनुष्ठिलेले हे तीन उपाय संसारसागराचा भेद करतात. यास्तव

झंझावात व विजा यांनीं अत्यंत असह्य झालेले पुष्करावर्तादि प्रलयमेघ बालकांच्या मुष्टींनीं कोठें तरी धरले जातात का? चांगली फुलल्यामुळें रम्य दिसणारीं कमलें आपल्या नेत्रांच्या शोभेचा पराभव करतील कीं काय अशा शंकेनें आकाशांत मध्यभागीं असलेला व कमळांच्या विकासास कारण होणारा जो चंद्र त्याला एकादी सुंदर स्त्री रत्नजडित करंड्यांत कोठें झांकून ठेवते का? ज्यांच्या मस्तकावर मदाच्या लोभानें गंडस्थळीं गुंजारव करीत फिरणारे भ्रमर हींच कमलें आहेत, अशा मत्त गजांस कोमल स्त्रीच्या श्वासानेंही मरणारे निर्बल मशक केव्हां तरी मारूं शकतात का! ज्यांचा नखसमूह स्वतः फाडलेल्या गजांच्या गंडस्थलांतील मोत्यांच्या कांतींनीं चमकत आहे अशा युद्ध करणाऱ्या सिंहांना हरिणांनीं केव्हां तरी मारिलें आहे का? ज्यांनीं आपल्या विषाच्या बिंदूंनीं मोठमोठ्या वृक्षांना जाळलें आहे अशा भुकेलेल्या अजगरांना क्षुब्ध झालेल्या लहान बेडक्यांनीं कोठें गिळलें आहे का! ज्याला चवथी, पांचवी वगैरे भूमिका प्राप्त झाली आहे, ज्यानें ज्ञेय ब्रह्माला जाणलें आहे, व जो पुढील भूमिकेचा विजय करण्यास उद्युक्त झाला आहे अशा विवेकी ज्ञान्याला विषय व इंद्रियें या चोरांनीं कधीं तरी आपल्या वश केलें आहे का? जिचा प्रतानादि विस्तार कापून टाकला आहे अशा मृदु लतेला जसे झंझावात छिन्न--भिन्न करून टाकितात त्याप्रमाणें विषयरूपी शत्रु, ज्यांची विचारबुद्धि पूर्वभूमिकांमध्येंच अपरिपक्व आहे त्यांच्या त्या अप्रौढ बुद्धीचेंच हरण करितात. कल्पाच्या अंतीं होणारे जे मोठे क्षोभ त्यांतही महाधीर असलेल्या मेर्वादि पर्वताला मोडण्यास मंद वायु जसे समर्थ नसतात त्याप्रमाणें प्रौढ विवेकाला नष्ट करण्यास राग--द्वेषादि दुष्ट वृत्ति समर्थ नाहींत. ज्याचें मूळबंधन घट्ट झालेलें नाहीं, अशा विचाररूपी फुलझाडालाच चिन्तारूपी वावटळ जोरानें हालवूं शकते. पण पाळें-मुळें खोल गेल्यामुळें ज्याची स्थिति स्थिर झाली आहे अशा वृक्षाला ती हालवूं शकत नाहीं. चालतांना, उभें असतांना, जागतांना व निजतांनाही ज्यांचें चित्त विचारमय नसतें तो मृतच होय, असें म्हटलें जातें. हें जगत् काय आहे व देह काय आहे, याचा एकांतांत बसून हळू हळू आपल्यापाशींच अध्यात्मदृष्टीनें विचार कर, किंवा सज्जनांसह विचार कर. तेजस्वी प्रदीपाच्या योगानें सूक्ष्म वस्तूही जशी दिसते त्याप्रमाणें प्रमादरूप अंधकाराला घालविणाऱ्या विचाराच्या साह्यानें तें परम शुद्ध पद दिसतें. प्रकाशरूपी विलास ज्यानें केला आहे अशा सूर्याच्या योगानें गाढ अंधकाराचा जसा नाश होतो त्याप्रमाणें ज्ञानानें सर्व दुःखांचा नाश होतो. रवीचा उदय झाला असतां भूमीवर निर्मल प्रकाश जसा पसरतो त्याप्रमाणें ज्ञान प्रकट झालें असतां ज्ञेय ब्रह्म आपोआप उदय पावतें. ज्या शास्त्रविचारानें ब्रह्मतत्त्व जाणलें जातें त्याला भान- ज्ञान असें म्हटलें आहे, तेंच ज्ञेय ब्रह्मरूप असल्यामुळें अभिन्नरूपानें प्रतिष्ठित आहे. विचारापासून उत्पन्न झालेलें जें आत्मविज्ञान त्यालाच बा रामा! ज्ञानी जन 'ज्ञान' असें समजतात. मधुरपणा जसा दुधांतच असतो त्याप्रमाणें ज्ञेय ब्रह्म त्या ज्ञानांतच आहे. यास्तव ज्यानें विपुल मद्य प्राशन केलें आहे तो मद्यपी जसा सदा मदमत्त असतो, त्याप्रमाणें ज्याला उत्तम ज्ञानाचा प्रकाश प्राप्त झाला आहे तो ज्ञानी स्वतः सदा ज्ञेय ब्रह्मानन्द पूर्ण असतो. स्वतःचें सम, व निर्मळ स्वरूप हेंच ज्ञेय परब्रह्म आहे, असें विद्वान् समजतात. केवळ ज्ञानप्रार्थनेनेंच तें स्वतः अत्यंत प्रसन्न

—अविद्या व तिचें कार्य या चिखलानें विरहित असें होतें. ज्याचा आनंद उदय पावला आहे असा निःसंग ज्ञानी जीवन्मुक्त कोठेंही आसक्त होत नाहीं, तो पूर्ण मनोरथ राजाधिराजाप्रमाणें शोभत असतो. हे रामा ! सूर्यविकासी कमलाविषयीं चंद्र रति ठेवीत नाहीं त्याचप्रमाणें ज्ञानवान् कोणत्याही रूक्ष किंवा मधुर ध्वनींमध्यें आपली चित्तरति ठेवीत नाहीं. वीणा, मुरली इत्यादिकांच्या हृदयंगम शब्दांमध्यें, संभोगानें मलीन अशा कामिनींच्या सुंदर गीतांमध्यें, वसंत ऋतूच्या मदानें मत्त झालेल्या भ्रमरांच्या गुंजारव शब्दांमध्यें, पावसाळा लागतांच फुलणाऱ्या पुष्पांमध्यें, मेघध्वनींमध्यें, सुंदर केकावाणीमध्यें व मोराच्या ताण्डवनृत्यामध्यें, शब्द करणाऱ्या मेघसमूहामध्यें, सारस पक्ष्यांच्या मनोहर ध्वनींमध्यें, करतालादि वादनामध्यें, गंभीर मृदंगध्वनीमध्यें, कोणत्याही वीणादि ततुवाद्यांच्या, मृदंगादि मढविलेल्या वाद्यांच्या, मुरलीसारख्या सुषिरवाद्यांच्या व झांज, टाळ इत्यादि दुसऱ्याही विचित्र वाद्यांच्या ध्वनीमध्यें ज्ञानी आसक्त होत नाहीं. ज्यांत लहान केळींच्या पानांच्या पंक्ति लागल्या आहेत व देवगंधर्वकन्यांच्या अंगांप्रमाणें ज्यांचे कोमल अवयव आहेत अशा लतांनीं जें शोभत आहे त्या नंदनवनांतील क्रीडामध्येंही ज्ञानवान् पुरुष आसक्त होत नाहीं. रामा ! माळजमिनीवर जसा हंस आसक्त होत नाहीं त्याचप्रमाणें सर्वत्र आसक्तचित्त असलेला जीवन्मुक्त, स्वतःच्या स्वाधीन झालेल्याही कोणत्याच पदार्थाच्या भोगाची इच्छा करीत नाहीं. खजूर, कदंब, फणस, वाळूक, अक्रोड, तोंडलें, अंबीर इत्यादि फलांमध्यें, मदिरा, मद्य, मैरेय, माध्वीक इत्यादि मद्यांमध्यें, दहीं, दूध, घृत, (तापलेल्या दुधांत दहीं टाकून नासविलेलें दूध) आमिक्षा, लोणी, भात इत्यादि भक्ष्य-भोज्यादि विचित्र षड्रसांमध्यें व त्याचप्रमाणें दुसरीं फळें, मुळें, शाक-भाज्या, मांसें यांतील कोणत्याही पदार्थांत बुद्धि आसक्त नसलेला तृप्तमूर्ति ज्ञानी, अतिशय भुकेलेला ब्राह्मण आपल्याच शरीरांतील मांसाच्या तुकड्यावर जशी रति ठेवीत नाहीं, त्याप्रमाणें आपली वासना ठेवीत नाहीं. यम, चंद्र, इंद्र, रुद्र, सूर्य, व वायु यांच्या दिव्य गृहांमध्यें, ज्यावर रेशमासारखा मृदु व स्निग्ध पल्लवसमूह आहे अशा मेरु, मंदर, कैलास, सह्य, दुर्दर इत्यादि पर्वतांवर, चंद्रमंडलाच्या कलांमध्यें, कल्पवृक्षाच्या दाट झाडींत, दिव्य देहशोभेनें विलास करणारांमध्यें, रत्नजडित सुवर्णाच्या आणि मोतीं व रत्नें बसविलेल्या भिंतींच्या गृहांमध्यें, तिलोत्तमा, उर्वशी, रंभा, मेनका इत्यादि सुंदर अप्सरांच्या कोमल देहांच्या ठिकाणीं आसक्त होत नाहीं. कारण, ज्याची बुद्धि कोठेंच आसक्त होत नाहीं असा तो श्रीमान् त्यांतील एकाच्याही दर्शनाची आकांक्षा करीत नाहीं. कारण तो परिपूर्णचित्त, मानी, मौनी व रागद्वेषादि शत्रूंकडून चंचल न केला जाणारा असा असतो. कुंद, मंदार, कल्हार, कमल, कुमुद, उत्पल, पुंनाग, केतकी, अनेक जातींचे अगरू वगैरे पुष्पांत, कदंब, चूत, जंबु, आम्र, किंशुक, अशोक इत्यादि वृक्षांमध्यें, जासवंद, जाई, चाफा, दुपारी, इत्यादि फुलझाडें व वेली यामध्यें, चंदन, अगरु, कापुर, मेंदी, कस्तुरी इत्यादि अंगरागाच्या ठिकाणीं, केशर, लवंग, वेलदोडे, कंकोल इत्यादि मुखवासन पदार्थ इत्यादिकांतील कशांतही, द्विज जसा मद्याच्या उग्रवासामध्यें प्रीति ठेवीत नाहीं त्याप्रमाणें आत्मैक्य बुद्धि ज्ञानी सुगंधासाठीं प्रीति ठेवीत नाहीं; कारण तो सर्वत्र समबुद्धि असतो व त्याच्या मनांत विक्षोभ नसतो. समुद्राची गुडगुड, आकाशांतील प्रतिध्वनि, व पर्वताच्या गुहांतून घुमणारा सिंहाचा ध्वनि, हे ऐकून ज्ञानी पुरुष मनांत

यत्किंचित्‌ही क्षुब्ध होत नाहीं. शत्रूंच्या दुदुंभींच्या आवाजानें, ढाल, भेरी इत्यादिकांच्या ध्वनीनें किंवा धनुष्यांच्या कर्णकटु टणत्कारानें, तो थोडाही भयभीत होत नाहीं. मत्त गजांच्या गर्जना, वेताळांचे कलहाचे शब्द व पिशाच, राक्षस यांच्या आरोळ्या ऐकून तो मनागू मुळींच डगमगत नाहीं. उत्तम प्रकारें ध्यान करणारा योगी, विजेचा कडकडाट, पर्वताचा स्फोट, व ऐरावताचें बृंहित यांनीं कंप पावत नाहीं. त्याचें शरीर मोठाले करवत कापूं लागले, तरवारीच्या चकचकीत धारा अंगावर पडूं लागल्या किंवा बाणरूपी अशनि अंगावर आदळूं लागले तरी स्वरूपापासून तो ढळत नाहीं. तो उपवनांत आनंदित होत नाहीं व खिन्नही होत नाहीं. ओसाड माळभूमीवरही खिन्न होत नाहीं किंवा आनंदित होत नाहीं. जळजळीत निखाऱ्यासारखीं असह्य वाळवंटें ज्यांत आहेत अशा मरुभूमीत पुष्पांच्या थरांनीं आच्छादित झालेल्या मृदु शाद्वल[1] भूमीवर, व तरवारीच्या तीक्ष्ण धारेवर, ताज्या कमलांच्या शय्येवर, उच्च पर्वताच्या कड्यांवर, खोल विहिरींच्या तळीं, सूर्याच्या किरणांनीं तप्त झालेल्या शिळांवर, कामलोलुप स्त्रियांच्या समुदायांत, संपत्तीच्या वेळीं व उग्र विपत्तीच्या वेळीं, क्रीडेमध्यें किंवा उत्सवामध्यें तो विहार करीत असला तरी उद्वेगयुक्त होत नाहीं किंवा आनंदयुक्त होत नाहीं. तर भार वाहणें, इत्यादि श्रमाचीं कामें केल्यावर थकलेला मनुष्य डोक्यावरील भार उतरून ठेवून जसा विश्रांति घेतो त्याप्रमाणें ज्ञानी त्या सर्व दशांमध्यें अन्तर्मुख होऊन सुखानें रहातो. प्रारब्ध अवशिष्ट राहिल्यामुळें त्याचा भोग देण्यासाठीं यमदूतानें लोखंडी यंत्रांत घालून उंसाप्रमाणें त्याचें सर्व शरीर जरी चिरडून व पिळून काढलें, नरकारण्यभूमीत डोक्यावर घण, भाले, तोमर इत्यादिकांच्या आघातांची जरी वृष्टि होत असली तरी तो योगी भीत नाहीं, व्याकुल होत नाहीं, किंवा दीनपणाही स्वीकारीत नाहीं; तर एखाद्या पर्वताप्रमाणें सम, स्वस्थचित्त मौनी व धीर होऊन राहतो. फार काय पण अपवित्र, अपथ्य, विषयुक्त, आंबलेलें, वाळलेलें अन्न किंवा गोमयादिकही तो मिष्टान्नाप्रमाणें भक्षण करतो, व तत्काल त्याला जिरवूं शकतो. तत्काल मूर्च्छित करणारें विषफल, विषारी रस, द्रव, उग्र तिखट रस, पाणी व भात यापैकीं कोणतेंहि भक्षण करीत असतांना तो समचित्त असतो. निरनिराळ्या जातींचीं मद्यें, दूध, रक्त, मध, रस, आसव, वाळलेली लांकडें, तृण, केश इत्यादिकांनीं जीवन्मुक्त हृष्ट होत नाहीं व कष्टी होत नाहीं. जीवित देणारा व त्याचें हरण करणारा या दोघांकडेही तो प्रसाद व माधुर्य यांनीं शोभणाऱ्या समदृष्टीनें पाहतो. उत्कृष्ट समतेमुळें तो चिरकाल राहणाऱ्या देवादिकांच्या शरीरांत किंवा अस्थिर मर्त्य शरीरांत किंवा त्या शरीरांनीं भोग घेण्यास योग्य असलेल्या रम्य व अरम्य पदार्थांत तो कधींच हृष्ट होत नाहीं व खिन्न होत नाहीं. त्याचें चित्त रागरहित झालेलें असल्यामुळें व त्याला सर्व ज्ञेय ज्ञात झालेलें असल्यामुळें जगाच्या स्थितीवर त्याची आस्था नसते. कारण सर्व जगत् मिथ्या असल्यामुळें त्यांतील कोणत्याही पदार्थावर आस्था ठेवण्यास योग्य नाहीं, असें तो समजतो; व इंद्रियांला कोणत्याही विषयस्थितीला परत्वास अवकाशच उरत नाहीं. कारण

---

१. अतिशय कोमल हिरवें गवत उगवलेलें असतें ती शाद्वल भूमि होय.

२. राक्षस, पिशाच्च या योनींतील प्राण्यांना जीवन्मुक्ती संभवत असल्यामुळें असें म्हटलें आहे.

संगच सर्व आशांचा हेतु आहे व संगच सर्व आपत्तींचें बीज आहे. संगत्यागच मोक्ष आहे, असें ज्ञानी समजतात. संगाच्या त्यागानें अज न्मत्व प्राप्त होतें. रामा! तूं पदार्थाविषयींची आसक्ति सोड व जीवन्मुक्त हो.

श्रीरामः—हे मुने! आपण सर्व संशयरूपी धुक्याला घालविणारे शरत्कालीन वायु आहां. यास्तव हे प्रभो! संग कशाला म्हणतात तें भला संक्षेपतः सांगा.

श्रीवासिष्ठः—इष्ट पदार्थाचा लाभ व अनिष्टाचा वियोग झाला असतां हर्ष व अनिष्ट पदार्थाचा लाभ व इष्टाचा वियोग झाला असतां विषाद हे विकार उत्पन्न करणारी जी मलिन वासना तीच ' संग ' आहे असें म्हटलें जातें. जीवन्मुक्त पुरुषांची जी पुनर्जन्म न देणारी हर्षविषादरहित वासना ती शुद्ध वासना असते, तिलाच ' असंग ' हें नांव आहे, असें जाण; ती शुद्ध वासना देह असेपर्यंत म्ह० प्रारब्धशेष क्षीण होईपर्यंत असते, त्या शुद्ध वासनेनें जें कर्म केलें जातें तें पुनर्बंधाला कारण होत नाहीं. जे जीवन्मुक्त नसतात त्या मूढबुद्धि दीनांची वासना हर्षविषादांनीं युक्त असते व ती बंध उत्पन्न करते. तिचाच संगशब्दानें उल्लेख करितात. ती पुनर्जन्म करणारी आहे. त्या वासनेनें जें कर्म केलें जातें तें केवल बंधालाच कारण होतें. रामा! अशा स्वरूपाच्या, आपल्या चित्तात विकार उत्पन्न करणाऱ्या, संगाला सोडून जर तूं स्वस्थ राहशील तर कर्म करीत असूनही लिप्त होणार नाहींस. हर्ष, क्रोध व विषाद याच्या योगानें जर तूं मनांत विकार पावला नाहींस व राग भय-क्रोधरहित झालास तर हे राघवा! तूं असंग आहेस. तूं आशची पराधीनता सोडून दुःखांनीं जर म्लान झाला नाहींस व सुखांनीं हृष्ट झाला नाहींस तर हे राघवा! तूं असंग आहेस. जर तुला चित्ताला स्वभाव चांगला कळला व प्रत्येक ज्ञानामध्यें सम आत्म्याला जाणलेंस आणि जसा प्रसंग येईल तसें अनुवर्तन केलेंस तर तूं असंग आहेस. असंगता व अनायासानें स्थित जीवन्मुक्तस्थिति यांचा[1] आश्रय करून तूं सम, स्वस्थ व निष्काम हो.[2] ज्याची मति जीवन्मुक्त आहे असा आर्य मौनी, इंद्रियरूपी सुसरींचा निग्रह केलेला, मान-मद-मात्सर्यरहित व शोकशून्य होऊन. राहतो. भोग, विक्षेप इत्यादिकांना कारण. होणारें पदार्थजात सदा वाटेल तितकें तयार असूनही जो समबुद्धि असतो, मनांत दीन होत नाहीं, व सहज क्रमानें प्राप्त होणाऱ्या व्यवहारावांचून दुसरें कांहीं करीत नाहीं, तर जेवढें प्रकृत व क्रमप्राप्त असें आपलें कर्तव्य असेल तेवढेंच कर्तृत्वाभिमान व फलाभिलाष यांनीं रहित अशा बुद्धीनें करतो व मनांत खिन्न होत नाहीं; व तें करीत असतांनाही आनंदाचा अनुभव घेतो. मंदराकडून घुसळला जाणाराही क्षीरसागर आपलें शुक्लत्व जसें सोडीत नाहीं त्याप्रमाणें आपत्ती किंवा उत्तम संपत्ती प्राप्त झाली तर तो महामति आपला प्रकृत स्वभाव सोडीत नाहीं. अस्त व उदय या दोन्ही दशांमध्यें चंद्र जसा एकरूप असतो त्याप्रमाणें ज्ञानी साम्राज्यास किंवा दारिद्र्यास प्राप्त होऊन, सर्पत्वास किंवा इंद्रत्वास प्राप्त होऊन हर्ष-विषादरहित राहतो रामा! क्रोधाचे निरसन करून, सर्व भेदबुद्धि टाकून, नानाप्रकारच्या फलाविषयींची रमणीय [illegible] शांत करून आपल्या चित्ताला द[illegible]न न होऊं देतां तूं आत्म्याचा विचार कर. म्हणजे त्या विचारानें तूं परमपुरुषार्थरूप [illegible]मध्यें स्थिर निष्ठा

---

१. वर्तमान देहादि संबंधराहित्य.

२. भाविदेहादिबंधनिवारण.

ठेवण्यास समर्थ होशील. त्या विचारानें तुझ्या समाधीचा उदय होईल. सर्व वासनारहित असलेल्या त्या शुद्ध समाधीचा आत्मरूप वस्तूचा लाभ होईल. यास्तव रामा! तसल्या शुद्ध आत्मदृष्टीनें तूं शोकशून्य आत्म्याचा आश्रय कर, म्हणजे पुनरपि या संसारांतील जन्मबंधनांनीं बद्ध होणार नाहींस.

उपशमप्रकरण समाप्त.

त्या माळांमध्ये जणु काय ध्यान करीत स्वस्थ असलेले मासे, म्रमर व ग्रामांतील वापी-च्या मध्यभागीं जल जणु काय श्रवण करावयास चित्राप्रमाणें निश्चल झालें असतां, आकाशांत फार दूर व फार वेळ प्रवास केल्यामुळें थकलेले सूर्यकिरण गवाक्षांतून अत्यंत शीतल भवन-श्रेणीत जणु काय विश्रांति घेण्यासाठीं प्रविष्ट झाले असता, शांत होणारा दिवसाचा देह मोत्यांच्या प्रभारूपी भस्माच्या लेपानें व त्यांत पडलेल्या सूर्यप्रभेनें जणु काय आपला शमच व्यक्त करीत असतां, राजांच्या हातांतील व मस्तकावरील कमलें सुरस वसिष्ठोपदेश ऐकून आनंदानें जणु काय राजांच्या मनाप्रमाणेंच मिटू लागलीं असतां, लहान मुलें, मुक्लेक, व पिंज-ऱ्यांत पाळलेले पक्षी स्वजनांना एकसारखे भोजनासाठीं त्वरा करूं लागले असतां, फुलू-लागलेल्या चंद्रविकासी कमलांवर भ्रमण करणाऱ्या भ्रमरांच्या पंखांनीं उडविलेलें त्यांतील रज चवऱ्या व डोळ्यांच्या पापण्या यांवर सर्व बाजूंनीं येऊन बसू लागलें असतां, सकाळीं सूर्योदय होतांच पर्वतांच्या गुहांत जाऊन लप-लेलें रात्रीचें तम पर्वतांच्या छायेला भिऊन बाहेर आलें आणि गवाक्षादिकांतून उड्या मारून घरांत शिरलें असतां, आतां फक्त दिव-साचा चवथा भाग अवशिष्ट राहिला आहे, असें सुचविण्यास तत्पर असलेला, दुंदुभी, नगारे, शंख यांचा सर्व दिशांची मुखें भरून सोडणारा ध्वनि झाला. मेघांच्या गडगडाटा-मध्यें मयूराचा टाहो जसा अन्तर्धान पावतो त्याप्रमाणें त्या ध्वनीनें मुनीचें उच्च स्वरानें चाललेलें भाषणही कोणालाही ऐकू येईनासें झालें. भूकंप झाला असतां वनपंक्तींतील ताल-वृक्षांचीं पानेंही थोडीशीं हालतात त्याप्रमाणें तो मोठा ध्वनि झाला असतां पिंजऱ्यांतील पक्ष्यांचा समुदाय आपले पंख फडफडावून थोडासा चंचल झाला. तो गंभीर ध्वनि ऐकून लहान बालक भयभीत होऊन रडत आपा-पल्या दायांच्या हृदयाशीं येऊन चिकटलीं, तीं जणू काय पावसाळ्यांत पर्वताच्या दोन शिखरांमध्यें मेघ शिरावे तशीं वाटलीं. ज्याचा प्रवाह थोडासा क्षुब्ध आहे अशा नद्यांपासून जसे अडकत—घार उठतात, त्याप्रमाणें राजांच्या कानांवर अडकविलेल्या कम-लांपासून भ्रमरपंक्ति उठल्या. याप्रमाणें त्यावेळीं तें दशरथाचें सर्व सभागृह प्रक्षुब्ध झालें असतां, दिवस मावळायला आला असतां व तो शंखादिकांचा ध्वनि हळू हळू शांत झाला असतां आपलें मधुरवृत्तियुक्त चाललेलें भाषण संपविणारा मुनिश्रेष्ठ सभेमध्यें रघुकुलश्रेष्ठाला म्हणाला—"हे निष्पाप रामा! मीं जें हें एवढें वाग्जाल पसरलें आहे त्यानें तूं आपल्या चित्तरूपी पक्ष्याला हृदयांत अडकवून आत्म-त्वास प्राप्त कर—त्याला आत्मरूप कर, हंस जसा पाणी टाकून त्यांतील दूध तेवढेंच घेतो त्याप्रमाणें तूं सर्व दुर्बोध सोडून माझ्या वाणीं-तील अक्षय अर्थ घेतलास का? माझ्या उप-देशाचा पूर्णपणें आपल्याच बुद्धीनें पुनः पुनः विचार करून हे रामा! तूं आता याच मार्गानें गमन करावेंस. हे रामा! तूं याच बुद्धीनें जर विहार केलास तर कधींही बद्ध होणार नाहींस. पण अशा रीतीनें व्यवहार जर न केलास तर विंध्यपर्वताच्या दरींत हत्ती जसा पडतो तसा तूं अधोलोकांत पडशील. हे रामा! आपल्या बुद्धीनें माझें वचन उत्तम प्रकारें ग्रहण जर न करशील, त्याप्रमाणें जर न वागशील, तर एखादा आंधळा किंवा रात्रीं दिवा न घेता चालणारा जसा खड्ड्यांत पडतो

१. याच म॰ याचनांचें, मनोमोह, लाम, मोह नेमेच व आमानांचा यांमानांविषयीं [illegible]

तसा पडशील. मी सांगितलेल्या या गोष्टीची सिद्धि होण्यासाठीं 'प्राप्त झालेला व्यवहार आसक्ति सोडून करावा,' असा जो सर्वशास्त्रांचा परम तात्पर्यरूप सिद्धान्त तो आपल्या मनांत दृढ करून अखंड आत्मज्ञानी हो. अहो सभ्यहो! हे महाराजा दशरथा! आणि हे राम-लक्ष्मणादि भूपालांनो! आतां तुम्ही सर्व आपापला आन्हिक व्यवहार करा. कारण हा दिवस आतां बहुतेक संपलाच आहे; आणखी जो कांहीं विचार करावयाचा राहिला आहे तो तुम्ही सर्व उद्यां सकाळीं सभेंत आलांत म्हणजे करूं."

श्रीवाल्मीकि:—वसिष्ठमुनीनें असें सांगितलें असतां ती सर्वच सभा, कमल हेंच जिचें मुख आहे अशा विकासयुक्त पद्मिनीप्रमाणें एकदम उठली. सभेंतील सर्व राजे यांनीं दशरथराजाची स्तुति केल्यावर राघवाला वंदन करून, वसिष्ठाचीही प्रमाणपूर्वक प्रशंसा केली व ते आपापल्या घरीं गेले. ज्याला देव नमस्कार करतात असा श्रीमान् वसिष्ठ विश्वामित्रासह आश्रमास जाण्यासाठीं उठला. उपदेश करणाऱ्या मुनींच्या मागोमाग दशरथप्रभृति राजे, व मुनि आपापल्या योग्यतेप्रमाणें त्यांच्या आश्रमापर्यंत जाऊन व त्यांचा निरोप घेऊन कमलावरून उठलेल्या भ्रमरांप्रमाणे कांहीं आकाशांत गेले, कांहीं वनांत गेले व कांहीं राजगृहास गेले. वसिष्ठमुनींच्या चरणांवर निर्मळ पुष्पांजली अर्पण करून स्त्रियांसह राजा दशरथही आपल्या अन्तःपुरांत गेला. गुरु आपल्या आश्रमास पोहोचल्यावर राम, लक्ष्मण व शत्रुघ्न त्यांच्या चरणांचें मोठ्या भक्तीनें पूजन करून राजवाड्यांत परत आले. बाकीचे सर्व श्रोते आपापल्या घरीं जाऊन स्नान करते झाले. त्यांनीं देव व पितर यांचें पूजन केलें, व आविधि ब्राह्मणांच्या समुदा- जाऊन त्यांना पूजनासाठीं आपल्या घरांत आदरानें आणलें. नंतर अतिथिपूजनादि करून ब्राह्मणांपासून भृत्यांपर्यंत आपल्या सर्व परिवारासह त्यांनीं वर्णधर्माला अनुसरून विहित असलेलें भोज्य अन्न खाल्लें. नंतर दिवसां करावयाच्या सर्व कर्मांसह सूर्य अस्त पावला असतां व रात्रीं करण्यास उचित असलेल्या सर्व कर्मांसह चंद्र उदय पावला असतां सुंदर मुनि, राजे, राजपुत्र व महर्षि, यथासंभव शय्या, दर्भशयन व दर्भासन यांवर बसून वसिष्ठांच्या मुखकमलांतून बाहेर पडलेल्या संसारतरणोपायाचा मोठ्या आदरानें व एकाग्रबुद्धीनें संपूर्णपणें विचार करूं लागले. याप्रमाणें एक प्रहर चिंतन करितांच त्यांना झोपेनें गांठलें. तेव्हां सूर्योदयाची अपेक्षा करणारी पद्में जशीं रात्र होतांच निजतात त्याप्रमाणें ते सर्व लोक उत्कृष्ट स्वप्नांनीं रमणीय झालेल्या निद्रावस्थेंत प्राप्त झाले. पण राम, लक्ष्मण व शत्रुघ्न हे तिघे तीन प्रहर सतत वसिष्ठांच्या उपदेशाचें चिंतन करीत बसले. नंतर त्यांचेही डोळे मिटूं लागले. जेव्हां भावि कल्याण सुचविणारीं उत्कृष्ट स्वप्नें ज्यांत दिसत आहेत अशी निद्रा अर्धा प्रहरच त्यांनीं भोगिली, तेव्हा एका क्षणांत त्यांच्या सर्व श्रमांचा परिहार झाला. अशा रीतीनें ज्यांचे मन अत्यंत शुद्ध आहे, जे विवेक करण्यास समर्थ आहेत, व आत्मतत्त्वज्ञानानें ज्यांचें चित्त विकसित झालें आहे अशा त्या रामादिकांची रात्र संपली. अरुणाच्या किरणांनीं व्याप्त असल्यामुळें मलिन झालेला चंद्र हेंच जिचें मुख आहे अशी ती झाली.

अज्ञान शांत झालं असतां व परमार्थाविषयींचेंच ज्ञान हा श्रेष्ठ सूर्य उगवला असतां जळलेल्या शुष्क पानाप्रमाणें पुनरपि दर्शन न होण्यासाठींच अग्नींत टाकलेल्या घृताच्या फेनाप्रमाणें चित्त सर्वथा गळून जातें, असें तूं समज. जे पर व अपर ब्रह्म जाणणारे महात्मे जीवन्मुक्त त्यांच्या चित्ताला 'सत्त्व' असें म्हणतात. जीवन्मुक्तांच्या शरीरामध्यें व्यवहार करणारी जी वासना तिला चित्त असे म्हणत नाहींत. कारण ती 'सत्त्व' या पदवीस पोंचलेली असते. चित्तरहित तत्त्वज्ञ नेहमीं समपदीं स्थित असतात. सत्त्वाच्या अस्तित्वामुळें ते अनास्थेनें केवळ लीलामात्र व्यवहार करितात. शांत व सत्त्वस्थ जितेंद्रिय व्यवहार करीत असतांनाहि सतत त्या ज्योतीला पाहतात. त्यामुळें त्यांच्या ठिकाणीं द्वैत व ऐक्य आणि वासना नसते. अंतर्मुखतेमुळें चिद्रूप अग्नींत जगद्रूपी तृष्णाचा होम करणाऱ्या मुनीच्या हृदयापासून चित्तादि भ्रम निवृत्त होतात. विवेकानें विशद झालेल्या चित्ताला सत्त्व असें म्हणतात. भाजलेल्या बीजापासून जसा अंकुर उत्पन्न होत नाहीं त्याप्रमाणें त्या सत्त्वापासून मोह उद्भवत नाहीं. तें सत्त्व मूढजनांच्या हृदयांत जोंवर चित्त या नांवाचें असतें तोंवर तें पुनर्जन्म देतें. पण ज्ञानानें त्याचें चित्तत्व नाहींसें होऊन तें सत्त्व होतें आणि जन्माची निवृत्ति हें कार्य करतें. रामा! तुला सर्व प्राप्तव्य प्राप्त झालें आहे. तूं सत्त्वभावास प्राप्त झाला आहेस. तुझें चित्त ज्ञानाग्नीनें जळलें आहे. तें आतां फिरून उदय पावणार नाहीं. ज्याप्रमाणें कोयतीनें कापलेलें व अग्नीनें जाळलेलेंही गवत त्याची बीजशक्ति जमिनींत असल्यामुळें पाऊस पडला कीं लागलेंच उगवतें त्याप्रमाणें पुत्रवित्तादि एषणांनीं व्यापलेलें चित्त पुनः उदय पावतें. पण ज्ञानाग्नीनें दग्ध झालेलें व बोधानें शुद्ध झालेलें मन पुनः उगवत नाहीं. कारण जगत् ही भ्रमाचीच मोहामुळें झालेली बुद्धि आहे व ज्ञानाला जगत् ब्रह्मस्वभावानेंच व्यापलेलं आहे. त्यामुळें चिद्घन व ब्रह्म यांचा जसा भेद नाहीं तसें जगत् व ब्रह्म यांचा भेद नाहीं. केवळ तीक्ष्णतारूप किरणामध्यें जशी तीक्ष्णता तसें त्रैलोक्य चित्-मध्यें चिद्रूपच आहे. त्यामुळें चित् व जगत् हीं भिन्न नाहींत. अर्थात् पदार्थांची उत्पत्ति व नाश ही शुद्ध भ्रांति आहे. 'तर मग पूर्वी हें सर्व असत् होतें, त्यापासून सत् झालें,' 'घट आहे आहे, घट नाहीं' हे श्रौत लौकिक सत्-असत् शब्द कसं रूढ झाले आहेत" म्हणून विचारशील तर सांगतों. या व्यवहारांत सत् असत् इत्यादि परस्परविलक्षण शब्द परस्परविरुद्ध अर्थीं योजावेत, असा भाषाभिज्ञांनीं संकेत केला आहे. त्यामुळें श्रोता व वक्ता यांची वासनाच त्या त्या आकारानें भासते. वास्तव ती खरी नव्हे. सत् व असत् यांचा भासही चिदाकाशामुळेंच होतो. म्हणून तूं सत् व असत् या दोन्ही वासना टाक. रामा! तुझें 'राम' या नांवाचें शरीरही अचिन्मय असल्यामुळें तुझा आत्मा नव्हे. मग वृथा रडतोस कशाला? सर्व जगत् अचिन्मय आहे व अभावरूप आहे. असें कळल्यावर तुझी देहादिकल्पनाच कोठून होणार! बरें विचारानें—म्ह० चिद्रहित आड्य तेवढें टाकून हें सर्व सदा चिन्मय आहे असें जर तुला वाटत असेल तर चित्त्वाचा चित्स्वभावाचा विचार कर. त्यांचा चांगला विचार केला असतां त्रिविध परिच्छेदशून्य, आदि-अंतरहित, एकरस सत्त्वच राहतें. मग तेथें देहादि अनर्थांची कल्पना कोठची! हे रामा! तूं चिदात्मा आहेस. निरंश आहेस, पाराबाशून्य आहेस, तूं आपलें व्यापक स्वरूप आठव. विस्मरणानें असा परिच्छिन्न होऊं नकोस. तूं त्या पूर्ण

चित्स्वभावस्थितीला प्राप्त होऊन, निरतिशय आनंदलाभादिकांनीं युक्त होऊन हें परिच्छिन्न स्वभावाचें जग परिच्छिन्न-पूर्ण आहे, अशी भावना कर. रामा ! तूं तशा पूर्ण स्वभावाचा आहेस. शांत आहेस, चिद् आहेस, व ब्रम्हरूपी आहेस. तुझें अंतःस्वरूप अतिशय स्वच्छ आहे. तूं नानाभावानें राहणारा नाहींस. तथापि त्या नानाभावाच्या अवधिरूपानें, त्याची पराकाष्ठा या रूपानें तूं आहेस. त्या तुझ्या स्वरूपाच्या ठिकाणीं वाक्, मन इत्यादिकांच्या प्रवृत्तीचें निमित्त नसल्यामुळें तूं जो आहेस तो आहेस. त्याचें वर्णन करतां येत नाहीं. तूं परोक्ष नाहींस. कारण स्वप्रकाश आहेस. सद् आहेस व असद्ही आहेस. सर्व पदार्थांना परस्पर भिन्न करणारा जो विशेष तोच मिथ्या असल्यामुळें असद् आहे, तो तूं नव्हेस व तो तुझा नव्हे. तूं सत्तारूप आहेस, व वस्तुतः सत्तारूपही नाहींस. तर केवल स्वस्थ-स्वरूपनिष्ठ आहेस. हे चिद्घन आत्मन् ! तुला नमस्कार असो. रामा तूं आदि-अन्तरहित, मोठ्या स्फटिकशिलेच्या अन्तरालभागाप्रमाणें-मध्यभागाप्रमाणें निबिड असलेलें जें चिद्रूप त्या स्वरूपाचा तूं आहेस. तूं आकाशाप्रमाणें स्वच्छ आहेस. त्यामुळें तूं दुःखादि विकारांना पात्र नाहीं, असें समजून स्वस्थ हो. तुझ्या अतिविस्तीर्ण चिच्छिलाजठरांत मायावासना असून त्यांत मनाच्या लीलेनेंच सर्व जगत् राहिलें आहे. हे रामा ! अशा त्या तुझ्या स्वरूपास नमस्कार असो. तुझा जयजयकार असो.

---

# सर्ग ३

—:*:—

१. ब्रह्म, जीव, मन, देह, जगत् यांचें ऐक्य जाणल्यानें सर्व द्वैतभ्रमाची शांति होते व पूर्ण ऐक्यस्थिती बाणते.

**श्रीवसिष्ठः**—समुद्रांत पुढें उत्पन्न होणाऱ्या अनेक तरंगाचा आधार जसें त्यांतील सामान्य जल आहे त्याप्रमाणें जी चित् अनंत जगांना आपल्यामध्यें वाहते तो तूं आहेस, तोच आत्मा आहे, असें तूं जाण. तूं द्वैतभावना सोडून भावाभावशून्य-वासनारहित हो. हे चिदात्मन् ! द्वैतभावना सोडल्यावर तुझ्या त्या वासना कोठेंशा स्थित आहेत, तें सांग बरें. हा जीव, ही वासना इत्यादि हें सर्व ती चित्-च स्फुरते. तव्हां अचित् हा शब्द व त्याचा अर्थ यांचा चिद्वस्तूंत प्रसंगच कोठें आहे, तें सांग पाहूं. राम या नांवाचा महातरंगांनीं गंभीर व भासुर असा हा आत्मचित्सागरच आहे. हे रामा ! तूं तोच आकाशाप्रमाणें गंभीर, सम व सौम्य समुद्र आहेस. जशी उष्णता अग्नीहून भिन्न दाखवितां येत नाहीं सुगंध कमलाहून पृथक नाहीं, काळेपणा काजळाहून निराळा नाहीं शुभ्रपणा बर्फाहून वेगळा नाहीं, उसाहून माधुर्य भिन्न नाहीं व सुर्याहून प्रकाशक निराळा नाहीं त्याप्रमाणें चित्-हून अनुभव पृथक् नाहीं. जलाहून तरंग जसा भिन्न नाहीं, त्याप्रमाणें चित्-हून जगत् भिन्न नाहीं. चितहून अनुभव भिन्न नाहीं, अनुभवाहून मी भिन्न नाहीं. माझ्याहून जीव भिन्न नाहीं, जीवाहून मन भिन्न नाहीं. मनाहून

येथे चित् म्ह० मूळब्रह्म, अनुभव म्ह० मायावृत्तीवर आरूढ झालेला चिदाभास, 'मी' म्ह० व्यष्टिसमष्टि—अहंकार, जीव, मन, इंद्रिये व शरीर यांचाही अर्थ अज्ञान म्ह० व्यष्टिसमष्ट्यात्मक समजावा.

इंद्रियें भिन्न नाहींत, इंद्रियाहून देह भिन्न नाहीं. शरीराहून जगत् भिन्न नाहीं व जगाहून निराळें तर कांहींच नाहीं. रामा ! अशा रीतीनें हें सर्व दृश्यचक्र फार दिवसांपासून स्वतः चित्–नेंच स्वरूपमोहामुळें अभ्यासपरंपरेनें प्रवृत्त केलें आहे. पण परमार्थदृष्टीनें कांहीं प्रवृत केलेले नाहीं, कांहीं शीघ्र नाहीं व चिरकाल नाहीं. तर एक अनन्त स्वंवेदनच आहे. अशा रीतीनें सर्व अखंडित आहे. तें आकाशांत आकाश आहे व कशांत कांहीं नाहीं. शून्यात शून्य, ब्रह्मांत ब्रह्म, सत्यांत सत्य व पूर्णांत पूर्ण होऊन राहिलें आहे. ज्ञानी रूपदर्शन, संकल्प–विकल्प इत्यादि करीत असूनही कांहीं करीत नाहीं. कारण त्याला त्यातील ग्राह्य असें कांहीं वाटत नाहीं. ज्ञानी पुरुषाला कर्तृता नाहीं. जें विषयजात ग्राह्य-बुद्धीनें ग्रहण केलें जातें तेंच तुझ्या सुखाला व दुःखाला कारण होतें. पण एकदा ग्राह्य-बुद्धीचा त्याग केल्यावर कांहीं ग्राह्यच उरत नाहीं, आणि ज्याचें ग्रहण केलेलें नाहीं तें सुखदुःखाचें निमित्तही होत नाहीं. आकाश वस्तुतः एक आहे तथापि एक आकाश, दोन आकाशें, अनक आकाश असा शब्दव्यवहार होतो. त्याला अर्थही आहे, पण आकाश हीं वस्तु मात्र तशी अनेकाकार नाहीं. त्याचप्रमाणें आत्मा व जगत् यांचा व्यवहार जाणावा. रामा ! तूं आत आकाशासारखा निर्मल व बाहर उत्तम आचारामध्यें तत्पर हो; आणि हर्ष, क्रोध इत्यादि विकारांमध्यें काष्ठ किंवा ढेकूळ यांसारखा हो. जो त्वरेनें मारावयास धावून येणारा अत्यंत शत्रु त्याला जो अकृत्रिम मित्र समजतो तोच ज्ञानी होय. नदी आपल्या कांठावर उगवलल्या वृक्षाला जशी समूळ उलथून पाडते त्याप्रमाणें जो प्रेम व मत्सर यांना समूळ नाहींसें करतो त्याला हर्ष व क्रोध हा दोष सर्वथा बाधत नाहींत. राग, द्वेष, व त्यांचे कार्यरूप विकार यांच्या तत्त्वाचा जर विचार न केला तर सन्त म्हणून प्रसिद्ध असलेलेही असन्त ठरतात. त्यामुळें त्यांची सेवा जरी केली तरी ती वृथा होत्ये. तर मग त्यांचें तत्त्व काय म्हणून म्हणशील तर अहंकार हेंच त्यांचें तत्त्व आहे. म्हणूनच ज्याला अहंकारभाव नाहीं व ज्याची बुद्धि कर्तृत्वादिकांनीं लिप्त होत नाहीं, त्यानें या सर्व लोकांना जरी मारलें तरी त्या हननक्रियेचा कर्ता तो होत नाहीं व त्यामुळें बद्ध होत नाहीं. जें नाहीं, तें आहे असें समजणें हीच माया होय. आत्म्याच्या साक्षात्कारानें ती निवृत्त होते. तेल संपलें म्हणजे दीप जसा बुझतो त्याप्रमाणें ज्याच्या चित्तांतील वासनाभर शांत झाला आहे त्या निर्विकार ज्ञानी पुरुषानें चित्रांतील राजानें चित्रांतील शत्रूंचा शिरच्छेद करून जसा जय मिळवावा त्याचप्रमाणें जय मिळविला आहे. ज्याला हें सर्व पदार्थजात सत्र सत् व असत् दशांमध्यें अग्राह्य झालेलें असतें त्याला तें दुःखरूपी दाह देण्यास किंवा सुख देण्यास समर्थ होत नाहीं, तर तो जिवंत असतांनाच मुक्त होय.

१. समष्टिशरीरांत जगाचा अन्तर्भाव होत असल्यामुळें त्याहून जगत् पृथक् नाहीं.

---

## सर्ग ४

—:*:—

१. वसिष्ठांनीं सर्व बाह्यदृष्टींचें निरसन करून व राघवाला अन्तर्दृष्टींत स्थिर करून संशय घालविण्यासाठीं प्रश्न केला.

**श्रीवसिष्ठः**—हे निष्पाप रामा ! मन, बुद्धि, अहंकार, व इंद्रियादिक हें सर्व निर्वि-

षय चिन्मात्र आहे तेव्हां आतां ते जिवादिक कोठें स्थित आहेत? नेत्ररोग, जलपात्र व आरसा यांच्या योगानें एका चंद्रानेंच स्वतःलाच जशी अनेकता दिलेली असते त्याप्रमाणें एका महात्म्या आत्म्यानेंच स्वसत्तासंसर्गाध्यासानें हें सर्व नानात्व उत्पन्न केलें आहे. अंधकाराचा क्षय झाला असतां नेत्रांचें अंधत्व जसें जातें त्याप्रमाणें प्रत्यगात्मदर्शनानें भोगतृष्णारूप विषाचा वेग जेव्हां शांत होतो तेव्हां लागलेंच अज्ञान नष्ट होतें. शरत्कालाच्या प्रभावानें धुकें जसें नाहींसें होतें त्याप्रमाणें अध्यात्मशास्त्र याच मंत्राचा मनांत चांगला विचार केला असतां तृष्णाविषरूपी महामारी क्षय पावते, आणि हे रामा! अज्ञान क्षीण झालें कीं चित्त आपल्या बांधवांसह क्षीण झालें आहे असें समज. कारण आकाशांतील मेघ वितळून गेले म्हणजे गारठा आपोआप शांत होतो. तंतु तुटला असतां हारांतील मोत्याची रचना जशी विसकटते त्याप्रमाणें चित्त अचित्त्वास प्राप्त झालें कीं वासनाभ्रम शांत होतो. हे रघुनाथा! आम्हीं दाखविलेल्या या शास्त्रार्थाची—शास्त्ररहस्याची उपेक्षा करून जे त्याचा विघात करण्यासाठीं विपरीतभावना करितात ते, कृमिकीट इत्यादि भावास प्राप्त करणाऱ्या पापासाठीं दुर्बुद्धीशीं मिळतात, म्हणजे त्यांना पापाची दुर्बुद्धि होते. वारा थांबला असतां सरोवराची चंचलता जशी शांत होते त्याप्रमाणें अज्ञान नष्ट झालें असतां नूतन रक्तकमलाकार सुंदर नेत्रांच्या स्त्रियाविषयींची लोलुपता क्षय पावते. रामा! आकाशांत जसा वायु त्याप्रमाणें तूं अत्यंत व्यापक पदीं स्थिरतेस प्राप्त झाला आहेस. तूं भाव व अभाव यांनीं रहित झाला आहेस. हे रघुकुलतिलका! स्तुतिपाठकांच्या पाहाटे राजाला जागे करण्यासाठीं वाजविलेल्या वाद्यांनीं राजा जसा जागा होतो त्याप्रमाणें तूं माझ्या उपदेशानें बोधाला प्राप्त झाला आहेस, तुझ्या मनांतून अज्ञानाचा द्रवपार नाहींशी झाली आहे, असें मी समजतों. कारण हे रामा! कुलगुरूचे उपदेश सामान्य लोकांच्या मनांवरही जर ठसतात तर ज्याची बुद्धि फारच उत्तम आहे अशा तुझ्या मनावर कसे ठसणार नाहींत? तापलेल्या शेतांत पाणी जसें एकदम मुरतें त्याप्रमाणें माझें वाक्य तुझ्या मनांत एकदम प्रवेश करीत आहे. कारण तूं मला आप्त मानलेलें आहेस, व त्यामुळें माझें वचन अतिशय ग्राह्य आहे, असें तूं समजत आहेस. हे महाप्रभावशाली रामा! आम्ही तुम्हा रघुकुलतिलकांचे नित्य कुलगुरु आहों. यास्तव हे श्रेष्ठा! मीं सांगितलेलें हें शुभवचन तूं हाराप्रमाणें आपल्या हृदयांत सत्वर धारण कर.

## सर्ग ५

१. ज्ञानी होऊन परमसुखांत विश्रांति पावलेला राम गुरूच्या पुढें आपला अनुभव सविस्तर सांगतो.

**श्रीरामः**—अहहा! काय आश्चर्य आहे, आपल्या वाक्याच्या अर्थाची भावना केल्यामुळें मी चिदेकरसपूर्णात्मभावास प्राप्त झालों आहे. हे नाथ! माझ्या अग्रभागीं उपस्थित असलेलेंही हें जगज्जाल शांत झालें आहे. दीर्घकाल अनावृष्टि झाल्यामुळें अतिशय संतप्त झालेलें भूतळ जसें वृष्टीनें शांत होतें, त्याप्रमाणें मी आपल्या चित्तांत परमात्म्यामध्यें परमशांतीस प्राप्त झालों आहें मी शीतलाकार झालों आहें. केवळ सुखानें राहिलों आहें व ज्यांतील हत्ती उठून गेला आहे असें सरोवर ज्याप्रमाणें स्थिर होतें त्याप्रमाणें प्रसन्न झालों आहें. हे मुने! हें सर्व दिङ्मंडल चांगलें प्रसन्न झालें आहे. धुकें

नाहींसें झाल्यावर जसे पदार्थ स्पष्ट दिसतात त्याप्रमाणें मी यथार्थतत्त्व साक्षात् पहात आहें. मी आतां संवेदरहित झालो आहें. माझें आशामृगजळ शांत झालें आहे. विषयासक्ति व तिच्याशीं विरोध करणारें वैराग्य ह्या दोन्हीपासून मी सर्वथा मुक्त झालों आहें. धुकें, धूळ यांनीं रहित असलेलें शरत्कालचें जंगल जसें शीतळ असतें तसा मी मनांत रागादिमलरहित व शीतळ झालों आहें. हे नाथ! जेथें अमृताचा स्वादही तृणासारखा तुच्छ व नीरस होतो त्या अनन्त अन्तरानंदास मी स्वरूपानें प्राप्त झालों आहें. आज मी माझ्या सत्यस्वरूपांत स्थित झालों आहें, मी स्वस्थ आहें, मी आनंदित आहें. मी आज सर्व लोकांचा आराम आहें. 'ज्याच्यामध्यें ध्यान करणारे योगी रममाण होतात तो राम' या व्युत्पत्तीप्रमाणें आज माझें नांव सार्थ झालें आहे. अशा या मला नमस्कार असो व त्याचा बोध करून देणाऱ्या तुला नमस्कार असो. सूर्योदय झाला असतां सकाळीं मूर्खांनीं कल्पिलेला रात्रीचा वेताळाचा संसार–संचार जसा अस्त पावतो त्याप्रमाणें माझ्या त्या सर्व कल्पना व ते सर्व भ्रम अस्त पावले आहेत. शरत्कालीं महासरोवर जसें शांत होतें त्याप्रमाणें हृदय निर्मल, विस्तीर्ण, बर्फासारखें शीतळ झालें असतां मन शांत झालें आहें. चिदेकरस आत्म्याच्या ठिकाणीं अज्ञानादि कलंक कोणत्या कारणानें आला आहे? तो स्वप्रकाश आत्म्याच्या ठिकाणीं कसा राहतो? तो असंग व अपरिच्छिन्न आत्म्याला आच्छादित कसा करतो? निर्विकार आत्म्याला सांसारिक विकारांचा अनुभव कसा येतो! इत्यादि सर्व संशय, चंद्राच्या समोर अंधकार जसा निर्मूल होतो त्याप्रमाणें निर्मूल होतात. सर्व आत्माच आहे. तो सर्व ठिकाणीं सर्वदा स्फुरद्रूप आहे. मग 'हें निराळें व हें निराळें' या असत्कल्पना कोठून आल्या? मी आतां विकास पावलों आहें. त्यामुळें सर्व संसारधर्मरहित आत्म्याचा अनुभव घेत आहें व यापूर्वी केवल तृष्णापाशानेंच मी बद्ध होतों, त्यावांचून मला कोणीं बद्ध केलेलें नव्हतें, असें जाणून मी आतां आपण आपल्यालाच हंसत आहें. हां आतां मला आठवलें. तुमच्या वाग्रूपी अमृतानें स्नान केल्यामुळें हा मी आपल्या परमार्थस्वरूपानें संपूर्ण कसा आहें, तें मला आतां चांगलें आठवलें. मी हा येथें असतांनाच अशा कांहीं विस्तृत अपरिच्छिन्न ब्रह्मलोकभूमीवर आरूढ झालों आहें कीं त्या भूमीच्या अपेक्षेनें सूर्य पातालांतच जसा स्थित आहे. कारण ब्रह्माच्या अपेक्षेने सूर्यलोक अत्यंत तुच्छ आहे. भावाभावरूप संसार सागराला तरून जाऊन त्याचें परतीरच अशा त्याच्या अधिष्ठानसन्मात्रास प्राप्त झालेल्या मला नमस्कार असो. कारण मी स्वरूपाने स्वतःच्या महिम्यामध्यें सर्वोत्कर्षानें राहतों. यास्तव मी सर्वदा सर्वांकडून नित्य नमस्कार करून घेण्यास योग्य आहे. हे नाथ! मी हृदयकमलांत भ्रमराप्रमाणें स्थिर झालेल्या आपल्या श्रेष्ठ वचनानें या प्रदेशीं व या वेळीं अनुभवबलानें शोकरहित व नित्य आनंदरूप अशा जीवन्मुक्तदशेस प्राप्त झालों आहें.

---

## सर्ग ६

—:*:—

१. देह व आत्मा यांचा विवेक, २. देहच आत्मा असें जाणल्यानेंच दुःख, ३. क्रियांच्या आसक्तीमुळें मूढांच्या मोहाची वृद्धि.

श्रीवसिष्ठः—हे महापराक्रमी रामा! पुनः माझें परम वचन ऐक. माझें भाषण ऐकून संतुष्ट होणाऱ्या तुला मी तें हितबुद्धीनें सांगतों. 'अहो पण श्रोता, उपदेशक, श्रोतव्य उपदेश

हा भेद आतां राहिलेलाच नाहीं, तेव्हां श्रवणामध्यें माझी प्रवृत्ति कशी होणार' म्हणून विचारशील तर हे रामा! कल्पितभेदाचा अंगीकार करूनही तूं श्रवण कर. कारण त्यामुळें ज्ञानाची अभिवृद्धि होईल; व थोडेसें असलेल्या ज्ञानी पुरुषांनाही दुःख होणार नाहीं. ज्या मूढ अज्ञ मनुष्यची देहाचे ठिकाणींच आत्मभावना असते, त्याच्यावर त्या अपराधामुळेंच रागावलेलीं इंद्रियें त्याचे शत्रु बनून त्याचा पराभव करितात. पण ज्या ज्ञानस्वरूप ज्ञानी पुरुषाची सत्य आत्म्यामध्येंच स्थिर स्थिति होते त्या अनिंद्य पुरुषाचीं इंद्रियें सत्य आत्म्याला पाहणें या उपकारामुळें झालेल्या संतोषानें मित्र बनतात व त्यामुळेंच त्याला मारीत नाहींत; तर ज्ञानाच्या अभिवृद्धीकरितां त्याचें रक्षण करितात. व्यवहार करीत असलेल्याही ज्या पुरुषाची बुद्धि भोग्य पदार्थांतील दोष पाहून विषयाची निंदाच करते, त्यांना प्रशस्त मानीत नाहीं, तो देहसंबंधीं दुःखासाठींच देहाचें आत्मत्वानें ग्रहण कां करील? आत्मा शरीराचे संबंधी नाहीं. व शरीरही आत्म्याचे संबंधी नाहीं. तर दोन्ही प्रकाश व अंधकार यांप्रमाणें एकमेकांहून अगदीं विलक्षण आहेत. पदार्थाला होणाऱ्या सर्व विकारांपासून आत्मा नित्य मुक्त आहे. सदा उदय पावलेला भगवान् आत्मा कधीं व अस्त पावत नाहीं व उदय पावत नाहीं. जड, अज्ञ, तुच्छ, आत्म्यामुळें प्रसिद्ध होऊन त्यालाच दुःख देत असल्यामुळें कृतघ्न व विनाशी अशा या दगडाखालच्या निंद्य शरीराचें जें होणार असेल तें होवो. चिन्मयत्व हा देहाचाच धर्म आहे, म्हणून म्हणशील तर जडव्यतिरिक्त चित्स्वरूपाचा परिचय झाल्यावांचून देहाचें चिन्मयत्वही जाणतां येणें शक्य नाहीं आणि चिन्मयाचा परिचय झाला कीं देह अचिद्रूप ठरलाच. तेव्हा अशा रीतीनें एकमेकांहून अगदीं विलक्षण असलेल्या त्यांची समानसुखदुःखिता खरी कशी संभवते? अर्थात् मानसदुःखानें शरीर कृश होणें व शरीराला ताडन वगैरे केलें असतां आत्म्याला दुःख होणें ही समानसुखदुःखिता सत्य नव्हे. परस्परांचा भेद न कळल्यामुळें भासणारी ती काल्पनिक आहे. आत्मा व देह हे दोघे अग्नि व लोखंडाचा गोळा यांप्रमाणें एकमेकासारखे भासतात. लोखंड लाल आहे व अग्नि वर्तुळ आहे, असा भ्रम तापवून लाल केलेल्या लोखंडाच्या गोळ्याकडे पाहिलें असतां होतो. त्याचप्रमाणें देह चेतन आहे व आत्मा सुखी व दुःखी आहे असा भास होतो. त्यामुळें ते दोघे समसुखी-दुःखी जरी भासले तरी ते समानधर्मवान् कधींही नव्हेत. जे दोघे एकमेकांशीं अगदीं संबद्ध न झालेले त्यांचा परस्पर संबंध कसा होणार? स्थूल देह अत्यंत सूक्ष्म जो आत्मा तद्रूप कसा होईल? किंवा अतिसूक्ष्म आत्मा स्थूल शरीर कसा होईल? दिवस व रात्र यांतील एकाचा उदय झाला असतां दुसऱ्याची सत्ता संभवत नाहीं. ज्ञान अज्ञानत्वास प्राप्त होत नाहीं. कारण छाया प्रकाशरूप होत नसते. त्यामुळें अत्यंत विचित्र दृष्टीमध्येंही सद्ब्रह्म असत् देह होणें शक्य नाहीं. कमळाचा पाण्याशीं जसा संबंध होत नाहीं त्याप्रमाणें देहांत असलेल्या सर्वगामी आत्म्याचा देहाशीं थोडासुद्धां संबंध नाहीं. ब्रह्माचा देहाच्या सत्तेशीं थोडासाही संबंध नाहीं. शरीरांत असलेलाही आत्मा निर्लेप असल्यामुळें वायूचे शोष; कंप, इत्यादि परिणाम आकाशावर जसे होत नाहींत त्याप्रमाणें जरा, मरण-आपत्ति इत्यादि विकार आत्म्याला नाहींत. वास्तव तूं सुखी हो. जलामध्यें जसा तरंगांचा समूह जलमय दिसतो त्याप्रमाणें ब्रह्मामध्यें देहात्मबुद्धीमुळें प्रतीत होणाराही जन्ममरणादिभ्रम ब्रह्मात्मदृष्टीनें ब्रह्ममात्र दिसतो. कारण जो

भ्रम आल्याच्या सरोवर उपजीविका करतो. जसें जल आपल्या सत्तेनेंच स्थित असून तरंगांचा अनुभव घेतें त्याप्रमाणें आत्मा येथें देहधर्माचा अनुभव घेतो. प्रतिबिंबाचा आधार असें जें जल तें हालूं लागलें असतां प्रतिबिंब जरी क्षुब्ध झालेलें दिसलें तरी बिंबभूत सूर्यामध्यें क्षोभ जसा होत नाहीं त्याप्रमाणें देहाच्या चांचल्यादिकांमुळें चिदाभासामध्यें जरी क्षोभ झाला तरी देहाचा साक्षी जो आत्मा त्याच्यामध्यें क्षोभ होत नाहीं; आल्याचें यथार्थ ज्ञान झालें असतां त्या यथार्थ वस्तूमध्येंच स्थिति होते; आणि देहमय अज्ञानविभ्रम लय पावतो. देह व त्याचा साक्षी यांच्या यथार्थ ज्ञानानें, त्याचें वास्तविक स्वरूप काय आहे याचा विचार केला असतां तम व प्रदीप यांच्याप्रमाणें देहाची असत्तारूप स्थिति व साक्षीची सत्तारूप स्थिति उदय पावते. अयथार्थदर्शी अज्ञाच्या चित्तांत देहाची आवृत्ति व परिवर्तन म्ह० जन्म व मरण यांच्या योगानें निःसार मोहरूपी अर्जुनवृक्ष उत्पन्न होतात. त्यांत आल्याचें पर्यालोचन मुळी नसतें व ते मोह संविदेचा थोडासाही परामर्श घेत नाहींत. चेतनतेनें रहित असलेले ते मूढबुद्धि तृणाप्रमाणें हालचाल करितात. त्यांना चित्तत्वाचा अनुभव आलेला नसल्यामुळें ते सर्व जड आहेत. कारण ते 'जड देहच मी' असें समजतात. पण ते तसे आत्मानुभवशून्य व जड जरी असले तरी मुख, नासिका इत्यादि छिद्रांतून संचार करणाऱ्या वायूंनीं जेथें तेथें, वेळूच्या छिद्रांतून निघणाऱ्या वायूप्रमाणें, शब्द करितात व हालचाल करितात. तृण, काष्ठ, इत्यादि सर्व आणतात व टाकतात. शब्द, स्पर्श, रूप इत्यादि विषयांच्या लाभानेंच आपल्याला कृतार्थ मानणारे ते पाण्यांतील तरंगांप्रमाणें चंचल होतात; आणि भोगविषयींच अतिशय अभिनिवेश याच आसवानें उन्मादयुक्त झालेले ते जड असूनही अत्यंत चंचलरूप होतात. नदी, समुद्र इत्यादिकांच्या मोठ्या ओघाप्रमाणें ते दुर्बुद्धि—अचेतन असूनही विहार, उत्पत्ति, नाश इत्यादि चेष्टा करतात. पण त्या सर्व दुर्बुद्धि जडांना आत्मचित् नसते असें नाहीं. पण ती अव्यय चित् जरी असली तरी त्यांना तिचें ज्ञान नसल्यामुळें ते अत्यंत कृपण झाले आहेत. लोहाराच्या भात्यापासून जसा वारा निघतो त्याप्रमाणें या मूढांच्या नासिकेंतून श्वासांची परंपरा निघते. पण त्यांचा उपभोग केवळ जठराग्नीची हालचाल होणें, याच्या पलीकडे कांहीं दिसत नाहीं. ज्याप्रमाणें धनुष्याच्या काठीला लावलेली दोरी टणत्कारादि करते त्याप्रमाणें या मूढाचें दुसऱ्याला भिवविणें, गर्जना करणें इत्यादि सर्व आत्मज्ञानरहित असल्यामुळें केवळ अनर्थालाच कारण होणारें आहे. तो चेतन आहे, हें सुचविणारें नाहीं. त्यांनीं चिद्बोधाचा जो त्याग केला तो केवळ मरणासाठींच होय. मूढापासून जो फललाभ होतो तोही अरण्यांतील झाडांपासून होणाऱ्या फललाभासारखा असतो. विश्रांतीसाठीं त्याचा आश्रय करणें म्हणजे ग्रीष्मकालीं उन्हानें तापलेल्या शिळेचा आश्रय करण्यासारखेंच आहे. त्याच्याशीं जो समागम करावयाचा तो जंगलांतील भूमीवरील तोडलेल्या झाडाच्या बुडख्याशीं समागम करण्यासारखाच आहे. त्याच्यासाठीं जें कांहीं केलें तें आकाशाला काठीनें ताडन केल्यासारखेंच होय. त्या अधमाला जें दिलें तें त्यापेक्षां चिखलांत कां नाहीं टाकलें ? त्याच्याशीं भाषण करणें म्हणजे आकाशांत कुत्र्याला बोलावणेंच आहे. रामा ! आम्ही ही जी अज्ञ पुरुषाची निंदा करीत आहों ती द्वेषानें करीत नसून अज्ञान त्याज्य आहे, हें सुचविण्यासाठीं इथें केलेली आहे.

कारण अज्ञान ही सर्व आपत्तींची निष्ठा आहे. अज्ञ पुरुषाला कोणती आपत्ति भोगावी लागत नाहीं. अज्ञानी पुरुषाच्या प्रमादामुळेंच ही संसारपद्धति एकसारखी चालली आहे. शरीर, स्त्री, धन इत्यादिकांमध्यें आस्था ठेवणाऱ्या अज्ञाला उग्र दुःखें व दृढ सुखेंही पुनः पुनः प्राप्त होतात व रथाला किंवा नांगराला पर्वतांचें जसें उल्लंघन करतां येत नाहीं त्याप्रमाणें त्यांचें त्याला उल्लंघन करवत नाहीं. अनात्मा व शठ अशा देहाला आत्मा समजणाऱ्याचें हें भयंकर दुःख कधीं शांत होत नाहीं ज्याची बुद्धि दुष्ट भावांनीं व्यापलेली आहे व जो आत्मवस्तूविषयीं अंध झाला आहे, जो मिथ्यावस्तूला पहात आहे व त्यामुळें जो पदोपदीं ठेंचा खात आहे त्या मूढाची मिथ्याज्ञानमय माया कशी बरें नाश पावणार ? पुष्पापासून जसा ( सुगंध ? ) कीटक उत्पन्न होतो, चंद्रापासून विष उत्पन्न होतें, स्थलापासून जसा दूर्वांकुर उत्पन्न होतो, दुधापासून कांटा उत्पन्न होतो, तशाच देहरूपी शाल्मलीवृक्षाच्या ढोलींत राहणाऱ्या आशारूपी सर्पिणी रागलोभ-दैन्यादि सर्पांना प्रसवतात, किंवा चांगल्या प्रकारें नांगरलेल्या भूमींतून जसें ( साळीचें शेत ? ) तण उगवतें त्याप्रमाणें मनोरूपी गजाच्या शृंखलेप्रमाणें असलेल्या आशा दुःखें प्रसवतात; मयूरी संतुष्ट होऊन मेघाची जशी प्रतीक्षा करिते त्याप्रमाणें पापरूपी सर्पानें वेढलेल्या ज्ञानरहित पुरुषाची नरकश्री—दुःखलक्ष्मी प्रतीक्षा करीत रहाते. जिचे नेत्र चंचल भ्रमरीप्रमाणें अस्थिर आहेत व जिचा अधरपल्लव स्फुरण पावत आहे अशी स्त्रीरूपी कोमलांगी विषवल्ली मूर्खासाठींच अज्ञाच्या मनोरूपी उत्कृष्ट भूमींत विकास पावते. त्यांत रागरूपी पोवळयाचा पक्षिछायायुक्त दुष्ट वृक्ष आहे. अज्ञाच्या हृदयरूपी माळभूमीवर शरीराला ताप देणारा द्वेषरूपी दावाग्नि जळत असतो. प्रज्वाप्रमाणें स्फुरण पावणाऱ्या ओंठावर चमकणारा निःश्वास हा त्याचा धूम असून, खलसमूहाप्रमाणें कटकट आवाज करणारे दांत हींच त्याचीं शिखाळें आहेत. अज्ञाच्या मत्सरयुक्त हृदयांतील त्या वृक्षानीं परनिंदारूपी पानें, ईर्ष्यारूपी कमलिनी. व चिन्तारूपी भ्रमर चांगलें चमकत असतात, प्रत्येक जन्मामध्यें उग्रदुःखरूपी कल्लोळभ्रम ज्यानें उपायानें शांत केले आहेत अशा अज्ञालाच भयंकर सागराप्रमाणें पुनर्मरणरूप वडवाग्नि प्राप्त होतो. मूढाचाच जन्म बाळपणास प्राप्त होतो. बालपण तारुण्यास पोंचतें, तारुण्यापासून जरा येते, व जरेनंतर पुनः पुनः मरण येते. जगद्रूपी जुन्या रहाटगाडग्यावरील संसाररूपी रज्जूनें बांधलेला हा अज्ञरूपी घट पुनः पुनः पाण्यांत बुडून पुनः पुनः वर येत आहे. हें जगत् ज्ञानी पुरुषाच्या बुद्धीला गायीच्या पावलासारखें सुलभ वाटतें, तेंच अज्ञाला अपरंपार वाटतें. पिंजऱ्यांतून पक्षांना जसें निघून जातां येत नाहीं त्याप्रमाणें आंधळ्यासारख्या अज्ञाच्या बुद्धींना या पोटामुळें—उदरभरणाच्या आसक्तीमुळें, त्या महासागराच्या दूर असलेल्या परतीरास जातां येत नाहीं. कारण विषयांकडे परत फिरलेल्या ज्या वासना त्यांच्या भारानें जड झालेली त्यांची बुद्धि, विषयरूपी चिखलांत रुतलेल्या जन्मचक्राच्या धांवांना म० इंद्रियसमूहांना वर काढून शुद्ध करूं शकत नाहींत. अज्ञरूपी शिकारी पुरुषानें मृगयेच्या आसक्तीमुळें आपलें शरीर इंद्रियरूपी गृध्रांसाठीं मांसाच्या गोळ्याप्रमाणें संसारारण्यांत सर्वदा व सर्व ठिकाणीं पसरून ठेवलें आहे. मनुष्य, पशु, पक्षी, इत्यादि भूतमयी व हिमालय, विंध्य इत्यादि पर्वतमयी दृष्टि वस्तुतः मांसलरूप व मृत्तिकारूप आहे तथापि तत्त्वांचें पर्यालोचन न केल्यामुळेंच थोडा

वेल, पुरुष, स्त्री, माता भ्राता, हिमालय, मलय इत्यादि रूपानें ती प्रतीत होते. म्हणूनच विचित्र शब्द व अर्थ यांनीं ज्याचे अनन्त मोहक आकार झाले आहेत असा हा असंख्य संकल्प व कल्पना यांचा कल्पवृक्ष सर्वोत्कर्षानें रहातो. कारण तो अत्यंत असत् पदार्थांनीं सर्वांच्या कामना पूर्ण करण्यास समर्थ आहे. त्या कल्पवृक्षापासून अज्ञानामुळें जगद्रूपी पानांची परंपरा पसरली आहे. त्यांत विचित्र शरीररचनेनें युक्त असे असंख्य भोक्ते हेच पक्षी राहतात, चमकतात, प्रवेश करितात व विलास करितात त्या वृक्षाचीं जन्म हींच पानें, कर्मसमूह ह्याच कळ्या, पुण्य व पाप हींच फळें, वैभवश्री ह्याच मंजऱ्या आहेत. या संसारवनसमूहांत अज्ञानरूपी चंद्राच्या उदयानें या स्त्रीरूपी वेली अत्यंत शोभेला प्राप्त झाल्या आहेत. सर्वोत्कर्षानें राहणारा अज्ञानरूपी चंद्र जन्माचे समूह याच कालांनीं पूर्ण आहे, विवेकसूर्याचा अस्त झाला म्हणजे तो उदय पावतो. तो प्रपंचरहित ब्रह्मामध्यें प्रकाशमान होतो व दोषांचा ईश आहे. या अज्ञानचंद्राचा वासनारूपी अमृतानें शोभणाऱ्या, आकाशरूपी चकोरांचें पोषण करणाऱ्या व चित्तरूपी रत्नाच्या विषयास्वादरूप रसाची इच्छा करणाऱ्या प्रसादानें स्त्रिया याच कुमुद्वती शोभा पावतात. त्यांचे चंचल नेत्र हेच त्यांवरील भ्रमर आहेत. त्यांचा केशपाश हाच चमकणारा अंधकार आहे व चमकणारे शुभ्र पयोधर हेच मेघ आहेत. पण हे रामा! अशा प्रकारच्या स्त्रिया याच रात्री ज्या भासतात तें जिवांच्या अज्ञानानेंच विलसित आहे. हे रामचंद्रा! विषयांमध्यें जें आपातरमणीयत्व, अनर्थरूपत्व, उत्पत्ति-विनाशयुक्तत्व व सर्व स्थितींमध्यें भंगुरत्व आहे तें सर्व या अज्ञानरूपवृक्षाचें आहे. त्याच्यापासून हीं नानाप्रकारांचीं फळें बीजांकुरपरंपरेनें जगदाकारानें पसरलेला आहेत.

# सर्ग ७

—:❋:—

१. कामादिकांमुळें अनर्थादिकांमध्यें वाटणाऱ्या अर्थता, रम्यता इत्यादि अज्ञानाच्या विभूतीं.

श्रीवसिष्ठः—रामा! मद्रूपी चंद्राचा उदय झाला असतां मोत्यांचा हार घातलेल्या व रत्नांनीं भूषित झालेल्या स्त्रिया क्षुब्ध कामरूपी क्षीरसागराच्या लाटांप्रमाणें ज्या भासतात तें अज्ञानाचें विलसित आहे. स्त्रियांच्या कपोलतलावर झोंके घेणाऱ्या दृष्टि, सुवर्णकमलाच्या उदरांतील चंचल भ्रमरसमूहाच्या शोभेला, ज्या धारण करितात तें अज्ञानविलसित आहे. वसंत ऋतूंत उद्यानांतील वृक्षावर व भूमीवर मदनाच्या चाकरांप्रमाणें कामी पुरुषाच्या मनांत उन्माद उत्पन्न करणारीं व त्यांना हृदयंगम वाटणारीं जीं पुष्पें भासतात, व्याघ्रादिक, गिधाडें, कोल्हीं, कुत्रीं इत्यादिकांचे ग्रास होणारीं अशी ज्यांचीं अंगें आहेत अशा स्त्रियांची चंद्र, चंदन, कमल इत्यादिकांशीं जी तुलना करितात, रक्ताचा दुर्गंध हाच जिचा वास आहे अशी स्त्रियांच्या स्तनांची पंक्ति, सुवर्णकलश, कमलाची कळी, व महाळुंग यांप्रमाणें जी दिसते, लाळेनें भरलेला 'ओष्ठ' या नांवाचा मांसाचा तुकडा रसायन, अमृत, मध, पिकलेलें तोंडलें व मद्य यांच्याशीं जो तुलना केला जातो, लहान लहान पेरांनीं व कठिण हाडांनीं बनलेल्या भुजांचें 'महाबाहुलता' इत्यादि शब्दांनीं शुभ कवींकडून जें वर्णन केलें जातें, केळीच्या खांबाप्रमाणें ज्यांच्या मांड्या आहेत अशा सुंदर स्त्रियांकडून धारण केलेली व कुचकलशशोभेला उचित असा पाहाणारांच्या नेत्रांना आनंद देणारीं जी कांची[1] मदनाच्या तोरणाला लावले-

१. कमरपट्टा

त्या पुष्पमाळेप्रमाणें शोभते, तें सर्व अज्ञान-विलसित आहे. आरंभीं मूर्खांना मधुर वाटणारी, मध्यें म्ह० व्ययसमयीं रागद्वेषादि द्वंद्वांनीं युक्त होणारी, व लवकरच संपून विरल होणारी जी लक्ष्मी तिचीही जी इच्छा केली जाते, मति जी दुःखाला प्राप्त होते, व सुखाच्या शतशाखांनीं विस्तार पावते, दुःख ह्याच ज्यांच्या शाखा आहेत अशीं नाना कर्मांचीं फळें ज्यापासून अगणीत प्राप्त होतात तें सर्व अज्ञानाचें विलसित आहे. काम्यकर्मांच्या विरताराच्या गहन वनांत लतासारख्या असलेल्या, त्यावर बांधलेल्या नानाफलांच्या कामजलांनीं निबिड झालेल्या व त्यामुळेंच कर्मठांच्या कारागृहाच्या रक्षणार्थ रज्जूप्रमाणें असलेल्या आणि ओठांप्रमाणें सुंदर व चपल दिसणाऱ्या ज्या कर्मकांडासंबंधीं वाक्यें तेंही अज्ञानाचें विलसितें आहे; अनेक कर्तव्यांनीं विस्तार पावणारें मोहरूपी धुकें स्वतः काळें असतें, पण रजोगुणानें कलुषित होतें व रात्रीं तर अंधकारानें फारच काळें होणाऱ्या पावसाळ्यांतील यमुनेच्या उदकाप्रमाणें विचित्र होऊन प्रवाहरूपानें एकसारखें पसरलेलें असतें. आरंभीं नानासुखांनीं सुंदर पण परिणामीं दुःखद होत असल्यामुळें अंतःकरणाला कडू व स्नेहरहित करणारा जन्मरूपी विषवल्लीचा रागें विस्तार नित्य वाढतो; भोगामध्यें आसक्त झालेल्या लोकांची पुत्रपौत्रादि विषयांमध्यें नित्य प्रीति वाढते; पण पुढें तेच पुत्रादि मेले असतां त्यांच्या वियोगदुःखाची परंपरा सुरू होते. रोगादिकांनीं जर्जर झालेली पुत्रादि जनता हींच पानें ज्यांनीं खालीं पाडविलीं आहेत व नानाप्रकारचे विक्षेप हेच ज्यांतील विवेकदृष्टीचें हरण करणारे धुळीचे कण आहेत असे त्यांच्या पापकर्माचे परिणामरूप वायु वाहतात. अनन्त जगें हींच पिकलेलीं फळें ज्यानें गिळून टाकलीं आहेत व ज्याचें जठर सर्वभक्षक आहे असा काल अनेक कल्पांनींही तृप्त होत नाहीं. शीतल व अचल ब्रह्माच्या प्रकाशाप्रमाणें असलेलं हे जीव हेच या संसारांतील विचित्र सर्प आहेत; ते, मोहरूपी वायूचें पान करून, पुनः पुनः देहरूप त्वचा जुनी टाकून नवीनें युक्त होऊन कुटिल गतीनें गमन करितात. त्यांची तारुण्यरूपी रात्र चिंतारूपी पिशाचांनीं भयकर होत्सातीं विवेक–चंद्राचा उदय झाल्यावांचून व अंधकारामुळें प्रकाशरहित, अशीच जाते म्ह० त्यांचें प्रत्येक जन्मांतील तारुण्यही विवेक वैराग्यादि मोक्षसाधनानुष्ठानाच्या उपयोगी न केल्यामुळें व्यर्थ जातें. बर्फाच्या योगानें कमलाच्या छिद्रांतील एका कोपऱ्यात असलेलेंही सूत्र जसें म्लान होतें त्याप्रमाणें स्त्रीपुत्रादि प्राकृत जनांचा भाषणरूपी क्रोध घालवितांना होणारे जे ज्वर त्यांनीं जिव्हा जर्जर होते. दुःख व शोक ह्याच ज्यांच्या मोठमोठ्या ग्रंथी आहेत व कष्ट याच कांड्यांची ज्याच्यावर दाटी झाली आहे असा दारिद्र्यरूपी दृढ शाल्मली वृक्ष सहस्रशाखांनीं विस्तार पावतो. सत्य वस्तूचा आश्रय न केल्यामुळें अन्तःशून्य–निःसार, व स्वतःच्या उन्नतीच्या भारानें मध्यें मोडलेला जो चित्तरूप चव्हाट्यावरील वृक्ष त्यावर ज्यानें आपलें घर केलें आहे असा लोभरूपी घुबड मायारूपी काळोख्या रात्रीं घूं घूं अशी वल्गना करीत असतो. प्रथम कानापाशीं उत्पन्न होऊन पुढें हळू हळू निश्चयानें सर्व शरीरावर पसरणारी जरारूपी वृद्ध मांजरी यौवनसंज्ञक उंदराला फाडून टाकते. वस्तुतः निःसार पण क्रमानें रचली जाणारी व पर्वतापेक्षांही उंच

१. स्वतः लक्ष्मी हें जर अज्ञानविलसितच आहे तर लक्ष्मी–ऐश्वर्य हें फल देणाऱ्या कर्मकांडांत प्रवृत्त करणारीं कर्मकांडवाक्यें हेंहीं अज्ञानविलसित आहे, हें काय सांगावें. २. शोभा, प्रीति.

वाढणारी अशी ही सृष्टि फेंसाच्या गोळ्याप्रमाणें पुष्ट होते. चिदाभासाचा प्रकाश याच पुष्पांनीं शुभ्र झालेली, जगत् याच पल्लवानें शोभणारी आणि धर्म व अर्थ हीं फळें धारण करणारी ससालता विकास पावली आहे. मेरुप्रभृति पर्वत हेच ज्यांचे खांब आहेत, सूर्य व चंद्र याच ज्याच्या खिडक्या आहेत, व आकाश हेंच ज्याचें सुंदर छत आहे, असें त्रिजगद्रूपी गृह उभें आहे. संसाररूपी विस्तीर्ण सरोवरां तील शरीररूपी कमलांवर चिद्रूपरसाचें पान करणारे प्राणरूपी भ्रमर संचार करीत असतात आकाशमार्गरूपी मोठ्या नीलमण्याच्या ओट्या- वर नित्य शोभणारी व भुवनाच्या अन्तर्भागांत अतिशय रम्य दिसणारी आदित्यदीपिका तेवत असते. आशातंतूंनें जिचें अंग जखडून टाकलें आहे अशी अनेक प्राणिरूप जीर्ण पर्णाण स्ववासना ह्याच ज्यांतील सळ्या आहेत अशा इंद्रियरूप पिंजऱ्यांत अडकविलेली आहे आणि वायूनें कांपविलेली व त्यामुळें एकसारखी पड- णारी जी भू ची परंपरा तींच जिचीं पानें आहेत अशी संसारवेल दीर्घकालापासून स्फुरण पावत आहे. शरीराशीं आत्म्याचें तादात्म्य मानून जीवांनीं शरीरांतील रक्त मांसादि उग्र नरकरूपी चिखलाचें ज्यांना कांहींच वाटत नाहींसें झालें आहे, व त्यांची कांहीं भीति न बाळगितां आम्ही मोठें कुलीन आहों असें मानून ते सृष्टींतील कांहीं काल आनंदित होत आहेत; चंद्राच्या कोरींतील शीतल अमृतबिंदु खाऊन संतुष्ट होणारे देवरूपी सारसपक्षी स्वर्ग- रूप नीलमेघांच्या मार्गांतील सरोवरांत चमकत आहेत. नानाप्रकारचीं कर्मफलें याच भ्रमरांनीं पूर्ण असल्यामुळें काळी दिसणारी वासना- समूहाच्या मालेनें युक्त व स्पंदाच्या आमो- दानें संपन्न अशी क्रियारूप फुललेली कमलिनी पुष्ट झाली आहे. या संसाररूपी डबक्यांत फडफडणारी जी विचारी सृष्टिरूप शफरी तिला कृतान्त या नांवाचा शठ वृद्ध गृध्र पकडून खाऊन टाकतो. तरंगांची किंवा फेंसाची पंक्ति जशी क्षणोक्षणीं भंग पावत त्याप्रमाणें ही सृष्टि क्षणभंगुर आहे. चंद्राची कोर प्रतिदिवशीं जशी वाढते त्याप्रमाणें सृष्टीची विचित्रता प्रत्यही उदय पावते. प्राणिरूप असंख्य क्षणिक मडकीं घडणाऱ्या या कालरूपी कुंभाराकडून हें सृष्टि- चक्र फिरविलें जातें. ब्रह्माच्या अचल पदावर झालेल्या, असंख्य व सर्वव्यवहारसमर्थ जशा जगद्रूपी जंगलांच्या समूहास युगांतीचा अग्नि जाळून टाकतो. ही जगाची स्थिति अनंत उत्पत्तिनाशादि विकारांनीं व शेंकडों सुखदुःख- दर्शनांनीं सतत परिणाम पावत असते. अशा क्षुब्ध झालेल्या युगपरिवर्तनांनीं व त्याच महा अशनींच्या प्रहारांनींही वासनाशृंखलांनीं दृढ झालेलें अज्ञाचें धैर्य खचत नाहीं. दानवां- कडून शतशः पराभव पावलेलाही इंद्र त्याचा अधिकार संपेपर्यंत वासनेनें शरीराला धारण करतो. भूतांची सृष्टि हीच जिच्यांतील धुळीची परंपरा आहे. अशी नियतिरूपी वावटळ कालरूपी सर्पाच्या घशांत सतत प्रवेश करीत आहे. अभावरूप वडवाग्नीच्या मुखांत पदार्थरूप जल व फलरूप फेंस एक- सारखा पडत आहे. जलापासून अशा स्पंदशक्ति त्याप्रमाणें केवल स्वभावसिद्ध व अकस्मात् उत्पन्न होणाऱ्या विचित्र द्रव्यशक्ति स्फुरण पाव- तात; कृतान्त हा बलाढ्य केसरी, सृष्टपदार्थरूपी मौक्तिकांनीं परिपूर्ण, फार मोठे, असंख्य जगद्रूपी मत्त हत्ती, खातो, कुलपर्वत हींच ज्यांचीं फळें आहेत व मेघ हे पंखसमूह आहेत, असे फळांना हुडकणारे जगद्रूपी, पक्षी उत्पन्न होतात, जिवंत राहतात व मरतात; विधि हा चित्रकार स्पंदानें शुभ्र झालेल्या चिद्रूपी भिंती- वर पांच इंद्रियें त्याच पांच रंगांनीं संसारचित्रें

काढतो, सतत गमन करणाऱ्या, सर्व परिवर्तनें करणाऱ्या, निमेषाचाही शंभरावा भाग हें जिचं प्रमाण आहे व जिचा अंकुर असत् व दुःसाध्य आहे अशा, आणि आत्म्याचें जगद्रूपानें उत्थान करविण्याऱ्या सूक्ष्म कालकल्पनेला अन्तःकरणानेंच स्थावर जातीची सृष्ट पहात राहते, म्हणजे त्या स्थावर जीवांना स्पष्ट इंद्रियादिकांच्या अभावीं बाहेरचा व्यक्त व्यवहार करितां येत नाहीं. पण जंगम जाति राग-द्वेषामुळें उत्पन्न होणाऱ्या भावाभावमय जरामरणरोगानें जीर्ण होतात. त्यांत कृमिकीटादिकांना आपल्या अत्यंत पापाच्या फलाचें ध्यान करण्याचेंच काम असल्यामुळें त्या पापयोनी नियतीकडून ठरलेल्या कालापर्यंत भूतलावर पीडिल्या जातात. ज्याचें बिळ अगदीं गुप्त आहे, त्यामुळेंच जो अदृश्य व सुखी आहे, असा कालरूपी मोठ्या देहाचा सर्प त्या सर्व स्थावर-जंगम जीवांना गिळतो. ज्यांचीं मुळे भूमींत शिरलीं आहेत असे वृक्षलतादि स्थावर जीव, आपलें किंवा दुसऱ्याचें कांहीं फल देणारे अदृष्ट पाहून म्ह० त्या अदृष्टाच्या निमित्तानें, मनुष्य, पक्षी, सर्प इत्यादिकांकडून होणारी शरीरपीडा सोसून वसंतादि कालांत पुष्प विकास पावतात व इतर जीवांना फळें देणारे असे होत्साते, जणुंकाय तप-शम-दम-तितिक्षा-औदार्य इत्यादि शीलानें युक्त होऊनच, काल घालवितात. जलसमूहावर तरंगत असलेल्या त्रैलोक्यरूपी तीन कमलांच्या कोशांत प्राणिरूप भ्रमरसमूह 'घुंघुंघु' असा ध्वनि करीत असतात; ब्रह्मांड हेंच जिचें भिक्षापात्र आहे, अशी कालाची स्त्री काली भगवती हीच प्राण्याची क्रिया आहे. ती पूर्वीं मिळालेली प्राणरूपी भिक्षा कालाला म्ह० आपल्या पतीला पुनः पुनः देऊन पुनःपुनः नवी भिक्षा मिळविण्याची इच्छा करते. अज्ञानरूप अंधकार हीच जिची नकली वेणी आहे, चंद्र व सूर्य हेच जिचे चपल नेत्र आहेत ब्रह्मा, विष्णु, महेशादिक देव हेच जिच्या अन्तःकरणाच्या स्थानीं आहेत, पृथ्वी, अष्ट पर्वत इत्यादि जड पदार्थ हेच जिच्या स्थूल शरीराच्या स्थानीं आहेत, हृदयावरील फडक्याप्रमाणें एक ब्रह्मसत्त्वच जिनें आच्छादनानीं झांकून ठेवलें आहे. भूमीवर ओथंबलेले मेघ हेच जिचे पयोधर आहेत, चिच्छक्ति म्हणजे चिदाभास हीच जिची पोषण करणारी माता आहे, म्हणूनच जी स्थूल, अस्थिर, मेघांप्रमाणें चपल आहे, नक्षत्रांचा समूह हेच जिचे दंत आहेत, संध्यासमयींचा अतिशय अरुणवर्ण हेच जिचे ओष्ठ आहेत, सर्व कामिनी हेच जिचे हात आहेत, इंद्राची अमरावती हेंच जिचें मुख आहे, सप्तसागर हीच जिच्या गळ्यांतील मोत्यांची माळ आहे, निळ्या आकाशरूपी वस्त्रानें जिनें आपलें शरीर झांकून घेतलें आहे, जंबूद्वीप हीच जिची मोठी नाभि आहे, वनश्री हीच जिची रोमपंक्ति आहे, अशी ही त्रिलोकरूपी वृद्ध कामिनी पुनः पुनः उत्पन्न होऊन विनाश पावते. ती वारंवार उत्पन्न होऊन नष्ट होते; व अनेक विभ्रम उत्पन्न करते, काल हा भयंकर महासागर आहे. त्यांत प्रत्येक कल्प हेच क्षणोक्षणीं क्षीण होणारे ब्रह्मांडरूपी मोठमोठे बुडबुडे लीन होऊन पुनः दुसरे उत्पन्न होतात. प्रसंगीं हजारों भ्रांति व तृष्णा याच जलाचा स्राव करणाऱ्या त्या कालरूदात पुनः पुनः स्थित होऊन कल्पापर्यंत ज्यांचा निमेष, तो होतांच उडून जाणारे कारणरूपी हिरण्यगर्भादिक हे सारस पक्षी आहेत. पुनः पुनः उत्पन्न होऊन नाश पावणाऱ्या व त्यामुळें संतप्त झालेल्या, चित्प्रकाशाच्या संबंधानें ज्यांच्यामध्यें प्रकाशशक्ति आली आहे अशा सृष्टिरूपी विजा कालरूपी मेघामध्यें चमकत असतात. कालसंज्ञक अतिशय उंच ताडवृक्षावरून प्राणिरूप काकपक्षी

एकसारखें भ्रमण करीता करता पडत आहेत. तशाच त्यावरून ब्रह्मांडरूप फलांच्या राशीही खालीं पडतात. त्या चिद्रूप परम कारणामध्यें नेत्राच्या उन्मेषानेंच ब्रह्मदेवाच्या सृष्टि करणारे देव श्रेष्ठ आहेत; कोठें तर नेत्राच्या निमेषानें संहार करणारेही कांहीं देवश्रेष्ठ आहेत. ज्यांच्या नेत्रांच्या उघड-झांपीनें हजारों कल्पांचे समूह अत्यंत क्षीण झाले आहेत असे कांहीं रुद्रही त्यांत आहेत. पण ते तसले रुद्रही ज्याच्या नेत्रकटाक्षानें उत्पन्न होतात व नाश पावतात असाही देवांचा देव आहे. कर्म व उपासना यांची ही फलरूप स्थिति अनंत—अपार आहे. ब्रह्माच्या आधारावर अनंतसंकल्पमय शून्य मायेमध्यें हें सर्व संभवतें. त्यामुळें हें असें कसें संभवतें ! अशी शंका घेऊं नये. त्या शून्य ब्रह्मरूदात मायेच्या योगानें हजारों आश्चर्यांना दाखविणाऱ्या कोणत्या शक्ति संभवत नाहींत ? सर्व संभवतात. तात्पर्य वर सविस्तर वर्णन केल्याप्रमाणे अक्षय संकल्पामुळें उत्पन्न झालेल्या असंख्य पदार्थांनीं भासुर झालेली जी ही जगाची कल्पना तो सर्व अज्ञानलक्षण तीव्र अंधकाराचा विकास आहे. तें सर्व अज्ञानाचें विलसित आहे. ज्या संपत्ति व ज्या संतत आपत्ति, जें बाल्य, तारुण्य, जरा, मरण, व दुसरे ताप, जें सुख दुःखपरंपरांनीं मज्जनोन्मज्जन त्या सर्व अज्ञानरूप तीव्र अंधकाराच्या विभूति आहेत.

## सर्ग ८

—:※:—

१. कार्यविद्या संसाररूप अरण्यांतील एक वेल आहे.

श्रीवसिष्ठ:—या संसाररूप वनांत चिद्रूप पर्वताच्या तटावर ही सृष्टिरूप अविद्यालता कशाप्रकारें स्थित आहे व ती कशी विकास पावलेला आहे, तें सांगतों. ही लता मेरुप्रभृति मोठमोठ्या पर्वतरूपी पेरांनीं संपन्न आहे. ब्रह्मांडाच्या आवरणरूपी त्वचेनें ती परिवेष्टित आहे. लोक याच पत्रपुष्पादिकांनीं विकास पावणारी ही त्रिलोकी हाच त्या वेलीची अंगरचना आहे. सुख, दुःख, जन्म, स्थिति, ज्ञान व अज्ञान हींच तिचीं प्रतिदिवशीं वृद्धि पावणारीं मुळें व फळें आहेत. कारण सुखापासून अविद्या उंच वाढते व शेवटीं तेंच फळ देते. तशीच दुःखापासूनही अविद्या अतिशय वाढते व शेवटीं तेंच फळ देते. जन्मापासून अविद्या वाढते व अखेर दुसरा जन्मच देते. भावापासून सत्तेला प्राप्त होते व पुनः तीच क्षणिक सत्तारूप फळ देते. अज्ञानानें ती वृद्धि पावते व तच तीचें स्पष्ट फळ आहे. ज्ञानानें म्ह० प्रत्यक्तत्त्वाच्या विचारानें उत्तरोत्तर भूमिकेवर आरूढ होणें,एतद्रूप ज्ञानवृद्धि होते व शेवटीं सप्तम भूमिकेंत तें ज्ञानच फळतें. असो; नानाप्रकारच्या उल्लासांनीं युक्त, वासनारूप सुगंधानें शोभणारी व दाट पालवीनें हालणारी अशी त्या सृष्टिलतेची तनू शोभते. दिवसांचा समूह हींच जिचीं पुष्पें, रात्री हेच चंचल भ्रमर, व क्षणोक्षणीं विषयासक्तीनें धांवणारीं प्राणी हींच जिचीं पानें आहेत, अशी ती वेल सतत स्कंद पावत. कर्मरूपी वायूमुळें पुनः पुनः भ्रमण करून एकादेवेळीं एकाद्या अधिकारी जीवरूप पल्लवाच्या अंशानें ती विवेकरूप हत्तिणीच्या गळयात पडते. ती विवेककरिणी तिला आपल्या सोंडेनें तिच्या आश्रयभूत विषयवृक्षापासून दूर करून हालविते. त्यामुळें तिच्यावरील सर्व वासनामळ उडून जातो, तथापि पुनरपि दैववशात् ती तिच्या

१. आपलें हें संपत्त्यादिकापासून होणारें सुख वाहूनही अधिक वाढो अशी 'राग'संज्ञक अविद्या उत्पन्न होते व ती यज्ञदानादि धर्मांच्या द्वारा सुख देते. दुःखादिकाविषयींही असेंच जाणावें.

सोंडेतून निसटून पुनः विषयवृक्षाशीं आसक्त होते. ती उत्पन्न होणाऱ्या मित्र-पश्वादि प्रवालांनीं संपन्न असते, उत्पन्न झालेल्या पुत्रपौत्रादि अंकुरांनीं स्मितमुखी होते, सर्व ऋतूंनाल पुष्पांनीं संपन्न असते, व समग्र रसांनीं शोभते. ती जन्मलक्षण सर्व पेरांमध्यें दुःखरोगादि सर्पांनीं भरलेली असते. मरणरूप शाखाछिद्रांत जोरानें विदारण केल्याप्रमाणें व्याकुळ होते. ती भोगानुभवरूप रसानें पूर्ण असते. विचार हेंच एक तिला लागलेल्या किड्याचें घर आहे. प्रतिदिवशीं तिच्या सभोंवार विकास पावणाऱ्या चंद्रसूर्यादि नवग्रहरूप ज्योतिष्पंक्ति हींच तिची वाऱ्यानें हालणारीं पुष्पें आहेत, इतर चकचकित नक्षत्रें ह्याच तिच्या कळ्या आहेत. हे राघवा! त्या नक्षत्ररूपी कळ्यांनीं सर्व आकाशोदर भरून टाकलें आहे. चंद्र, सूर्य व अग्नि यांचा प्रकाश हेच तिच्या पुष्पांतील पराग आहेत. त्या परागांनीं ती लता एखाद्या गौरांगी स्त्रीप्रमाणें चित्ताचें हरण करते. तिला मनोरूपी हत्ती हालवून सोडतो, संकल्प हेच तिच्यावरील मधुर ध्वनि करणारे कोकिल आहेत. इंद्रियरूप सर्पांनीं तिला पीडलें आहे. ती तृष्णारूपी त्वचेनें सुशोभित झाली आहे. ती नीलाकाशरूप तमालवृक्षाच्या अंगसंश्रयानें विस्तार पावली आहे. द्यावापृथिवी हेच संकुचित जानूप्रमाणें तिचे आधारभूत सुस्तंभ आहेत, ती अनुभवरूप उद्यानांनीं भूषित झाली आहे.सप्तसागर याच सुंदर अळ्यानें जिनें सर्वत्र जलक्षीराचें धारण केलें आहे. जशी ती सृष्टिरूप वेल खालच्या ब्रह्मांडखंडांत मुळांच्या योगानें दृढ झाली आहे. काम्यकर्मकांडरूप वेदत्रयीनें विलोल झालेले रागी जन हेच तिच्यावरील भ्रमर असून त्यांना उपभोग्य ...लेल्या स्त्रिया हेच तिचे पुष्पगुच्छ आहेत. प्रवृत्तिपर जन ह्याच त्या वेलीच्या पत्र–पुष्पकांडादिकांचे ठिकाणीं भ्रमण करणाऱ्या मुंग्या आहेत. चित्स्पंद या वायूनें ती हालत आहे व अशास्त्र कर्म याच अजगरानें ती व्याप्त आहे. स्वर्गाची शोभा हाच तिचा पुष्पमंडप आहे. ती जीवांच्या जीवनोपायांनीं भरलेली आहे. ती मूढांना नानाप्रकारच्या विषयवासनागंधांनीं मद देणारी आहे. पण विवेक्यांच्या अनेक प्रकारची उपशमांचें वैचित्र्य हींच नाना पुष्पें प्रकट करणारी आहे. ती नानाप्रकारच्या फलांनीं व्याप्त आहे. ती पुष्प–फलपराग यांच्या वृष्टीनें विकास पावणारी आहे. नानाप्रकारचीं आळीं रांगांनीं लागून ती व्याप्त झालेली आहे. अनेक पर्वत हींच तिच्यावरील जाळीं आहेत. तिच्यावर अनेक जातीचे पक्षी आहेत. नाना कला हींच तिला आलेलीं फळें आहेत. ती नानावनांतून उत्थान पावलेली आहे. नाना पर्वतांच्या तटांवर आरूढ झालेली आहे. नानाप्रकारच्या पानांनीं अगदीं झांकून गेली आहे. ती उत्पन्न झाली आहे, उत्पन्न होत आहे, मरत आहे, मेली आहे, अर्धी तुटलेली आहे, कोठेंही तुटलेली नाहीं व प्रवाहरूपानें छेद न पावणारीही आहे. ती भूतकालीं असलेली, वर्तमानसमयीं असणारी, सत्य असल्यासारखी पण सर्वदा असत्यशीच आहे, ती वारंवार अतिशय तरुणी म्ह० पल्लवयुक्त होणारी व वारंवार सुकून जाणारी आहे. ही महाविषलता वेगानें कवटाळिल्यास संसाररूप विषारी मूर्च्छा देणारी आहे, पण विचार करतांच ती नाश पावते. ती विचार करणाऱ्या पुरुषाच्या पूर्णात्म्यामध्यें बाधित होते. पण अज्ञ पुरुषांच्या अंतःकरणात सर्वतः अनुवर्तन करीतच राहते. ती एकीकडे जल झाली आहे, कोठें पर्वत झाली आहे, कोठें नाग झाली आहे, तिकडे देव झाली आहे. येथें पृथिवीत्वास प्राप्त झाली आहे तर तेथें लोक बनली आहे.

इकडे चंद्रसूर्य झाली आहे तर तिकडे नक्षत्रें होऊन राहिली आहे. इकडे अंधकार, इकडे प्रकाश; इकडे आकाश, इकडे सस्यपूर्ण भूमि, इकडे शास्त्र, इकडे वेद व इकडे वेदशास्त्ररहित कोठें पक्षीरूपानें उड्डाण करणारी तर कोठें देवरूपानें उत्पन्न झालेली, कोठें स्थाणुरूपानें स्थिर झालेली तर क्वचित् वायुत्वास प्राप्त झालेली, कोठें नरकांत अत्यंत लीन झालेली तर कोठें स्वर्गांत विलास करणारी, कोठें सुरपदास प्राप्त झालेली तर कोठें कृमिरूपानें स्थित असलेली. ती कोठें विष्णु, कोठें ब्रह्मा, कोठें रुद्र, कोठें रवि, कोठें अग्नि, कोठें वायु, कोठें चंद्र, व कोठें यम झाली आहे. हे रामा! या भुवनांमध्यें जें कांहीं प्रभावोत्कर्षानें व्याप्त असलले हरि-हरादि किंवा जीर्ण तृणरूपास प्राप्त झालले दुसरें सर्व दृश्य स्फुरत आहे ती सर्व अविद्या आहे, तत्त्वबोधानें तिचा क्षय करावा, असें तूं जाण व तिच्या नाशानेंच आत्मकाम होतो.

---

## सर्ग ९

—:*:—

१. त्रिगुणांचा विभाग. २. हरादिकांची शुद्ध सत्त्वता. ३. विद्या व अविद्या यांचे स्वरूप. ४. त्या सर्वांहून निराळें असलेलें तत्त्व.

**श्रीरामः**—हे ब्रह्मन्! हरिहरादि शुद्ध आकारजातही अविद्याच आहे, असें तुम्हीं सांगितलेलें ऐकून मी जणुं काय संशयांत पडलों आहें.

**श्रीवसिष्ठः**—रामा! सृष्टीच्या पूर्वी जगदाकारानें हीन, शांत सर्व जगत्संस्कारानें बनलेली जी माया तिनें मलिन झाल्यामुळें सर्वात्मक त्यामुळें सच्चित्प्रकाशप्रचुर असें एक सत् असतें. त्या सन्मात्रापासून सृष्टिसमयीं जगत्संस्काराची जागृति, अशी कला उत्पन्न होते. मेघाची तरंगपंक्ति हालूं लागली म्हणजे तीच जशी जलाच्या आकारानें उदय पावते त्याप्रमाणें स्वरूपानें स्थित असलेलीच चिति किंचित् पृथक्शी होऊन गुण-गुणिभेदाच्या व्यवहाराला योग्य होण्यासाठी प्रकट होते. कडकडांत ऊन, कावळें ऊन व छाया यांमध्यें सूर्याच्या तेजाचा उत्तरोत्तर कमी जोर जसा कल्पिलात त्याप्रमाणें ती कला सूक्ष्म, मध्यम व स्थूल अशी तीन प्रकारची कल्पिली जाते. सूक्ष्म कलेच्या कल्पनेनंतर त्या कल्पकाकडून मध्यम कला मनोरूपानें म्ह० हिरण्यगर्भरूपानें जाणली जाते, त्यानंतर त्याच्याकडून तीच स्थूल विराटाच्या आकारानें जाणली जाऊन तशीच स्थित होते. या सूक्ष्मादि तीन अवस्थांमध्यें ती सत्त्व, रज व तम अशी जी तीन प्रकारें कल्पिली जाते, हीच प्रकृति होय. अविद्याच प्रकृति आहे, असें जाण. तीन गुण हे तिचे धर्म आहेत; ही अविद्याख्य प्रकृतिच जीवाचा संसार आहे; तिचें परतीर हेंच परमपद आहे. येथें जे तीन गुण सांगितले आहेत तेही तीन प्रकारचे म्हटलेले आहेत. सत्त्व, रज व तम असा त्यांतील प्रत्येकाचा गुणभेद होतो; याप्रमाणें ही अविद्या गुणभेदानें नऊ प्रकारें विभक्त झाली आहे. हें जेवढें म्हणून दृश्य आहे त्याचा हिनेंच आश्रय केलेला आहे. ऋषि, मुनि, सिद्ध, नाग, विद्याधर व देव हा अविद्येचा सात्त्विक भाग आहे, असें तूं जाण. या सात्त्विक भागांतील नाग व विद्याधर हे तम आहे. मुनि व सिद्ध हे रज आहे व हरादिक देव हें सत्त्व आहे. देवांची योनि ही सत्त्वजाति आहे. त्यांत अविद्या प्राकृत गुणांनीं निर्मल-अविद्या—आवरणशून्य सत्त्वपदास प्राप्त झालेली आहे, हरि—हरादिक हा तिचा सात्त्विक भाग आहे, हे रामा! त्या भागाची जो उपासना करतो तो पुनरपि या संसारांत उत्पन्न होत नाहीं. त्यामुळें तो मुक्तच म्हटला जातो. हे

महाभागा ! त्यामुळेंच रुद्रादिक हे सत्त्वभाग आहेत. मुक्त झालेले देह आहे तोंपर्यंत जगांत रहातात, देह आहे तोंपर्यंत जीवन्मुक्त म्हणतात आणि देहपात झाल्यानंतर ते विदेहमुक्त होत्साते परमेश्वरस्वरूपांत मिळून जातात. याप्रमाणें हा अविद्येचा भाग विद्यात्वास प्राप्त फळ झाला आहे. या मायिक सृष्टींत बीजेच फळ बीज बनतें. पाण्यापासून जसे बुडबुडे त्याप्रमाणें विद्येपासून अविद्या उत्पन्न होते व पाण्यांत जसे बुडबुडे लीन होतात त्याचप्रमाणें विद्येंत अविद्या लीन होते. जल हे दोन मानले तरच त्यांना भिन्नता आहे, त्याप्रमाणें विद्या व अविद्या या दृष्टींच्या भेदाची भावना केल्यामुळेंच त्यांना भिन्नता आहे. वास्तविक भिन्नता नाहीं. जल व तरंग हे वस्तुतः जसे एकच त्याप्रमाणें येथें अविद्यात्व नाहीं व विद्यात्वही नाहीं. हे राघवा ! अविद्येच्या अपेक्षेनें विद्या व विद्येच्या अपेक्षेनें अविद्या प्रसिद्ध आहे. वास्तव अविद्यादृष्टि व विद्यादृष्टि सोडल्यावर जें येथें आहे तें नित्य तत्त्व आहे. विद्याविद्यादृष्टी नाहींत, वास्तव त्यांचा त्याग केल्यावर राहिलेलें जें परमात्मतत्त्व त्यांत तूं स्थिर हो. अविद्या नाहीं व विद्या नाहीं, ही कल्पना पुरे झाली. जें काही आहे व जें काहीं व्यतिरिक्त नाहीं, तें चित्-संविदच आहे. त्याचाच अवभास होत नाहीं. असे झालें म्हणजे त्या सतलाच अविद्या म्हणतात, आणि तेंच विदित झालें म्हणजे अविद्याक्षय या नांवाची विद्या होते. विद्येच्या अभावीं अविद्या या नांवाची कल्पना खोटीच उद्भवते. प्रकाश व अंधकार यांप्रमाणें मनांत परस्परविरुद्ध असलेल्या त्या विद्याविद्यांतील एक—अविद्या विलीन झाली असतां त्या दोन्ही कल्पना क्षीण होतात. हे राघवा ! या दोन कल्पनांचा क्षय झाला असतां पूर्णानंदरूप प्राप्य वस्तु अवशिष्ट राहते. अविद्येचा क्षय झाला असतां विद्यापक्षही क्षीण होतो. त्यानंतर जें अवशिष्ट राहिलेलें तें सर्वबाधारूप असल्यामुळें कांहीं नाहीं, किंवा तें परमार्थ सद्रूप असल्यामुळें सर्व कांहीं या रूपानें तेंच पसरलेलें आहे. त्याचें दर्शन हेंच तत्त्वतः सर्वदर्शन आहे व सर्वांचे दर्शनचा आहे. बाध वटबीजामध्यें जसा पुष्प-फलादिकांनीं युक्त असा वटवृक्ष असतो त्याप्रमाणें तें सर्वशक्ति सर्व शक्तींचें संपुष्ट आहे. ते किंचित्त्व आकाशाहूनही अधिक शून्य आहे, पण चिदात्मक असल्यामुळें तें शून्यही नव्हे. सूर्यकांतामध्यें जसा अग्नि किंवा दुधामध्यें जसें तूप त्याप्रमाणें हें सर्व त्या चिदात्मामध्यें आहे. जसा अग्नीपासून स्फुलिंग सूर्यापासून, प्रकाश, त्याप्रमाणें देश, काल, क्रिया याचा उदय झाला असतां त्या स्फुरण पावणाऱ्या संविदपासून हे जीव उत्पन्न होतात. म्हणूनच तरंगांचा समुद्र जसा सांठा आहे, व तेजांचा निर्मल मणि हा सांठा आहे त्याप्रमाणें ते या अनंत जीवसंविदांचा नित्य आश्रय आहे. प्रत्येक वस्तूमध्यें सबाह्य अभ्यंतर तें सत् आहे, कारण प्रत्येक वस्तूची सत्ता त्याच्या अधीन आहे व तें सर्वदाच त्रिविधपरिच्छेदरहित आहे त्यामुळें जीवाचें नाहींसें होणें हें घटाकाशाच्या निघून जाण्याप्रमाणें औपचारिक आहे, घट निघाला असतां घटाकाश निघालें असें वाटतें, तसेंच चित्त निघालें असतां जीव निघाला आहे असें भासतें. लोखंड हालण्यास लोहचुबक जसें कारण त्याप्रमाणें कर्ता नसलेल्याही सत्ला कर्ता म्हटलें जातें. लोहचुंबक जवळ असला म्हणजे जड लोखंडही जसें हलूं लागतें त्याप्रमाणें त्या-चितच्या सत्तेनें हा जडाकार देह कार्य करूं लागतो. त्या अज्ञात ब्रह्मामध्यें—'चित्' या नांवाचें जगाचें एकच बीज त्यामध्यें पूर्व पूर्व जग-

१. कार्यावस्था हें फळ आहे. पण ते प्रलयात बीजत्वास—कारण विद्यारूपास प्राप्त होते.

दनुभवजन्य संस्कारामुळें उत्तर उत्तर कल्पना होऊन जलांत जशा लाटा त्याप्रमाणें. चित्तामध्यें स्थित आहे. जाणलें असतां आकाशाहून हि रूपरहित अशा विचित्र चित्तांत दुसरें कांहीं एक असत नाहीं.

# सर्ग १०

१, अविद्येमुळें बंधाचा भ्रम. २. स्थावरामध्ये मनाची स्थिति. ३. बुद्धिपूर्वक विचारानें बंधाची निवृत्ति.

श्रीवसिष्ठः—हे रामा! सर्व एक चित्‌च असल्यामुळें आणि हें सर्व जगत् अज्ञात ब्रह्मच असल्यामुळें ब्रह्माला जाणलें असतां हें स्थावर-जंगमात्मक जगत् कांहीं नाहीं व कांहीं भूतत्वास प्राप्त झालेलें नाहीं, असें जाण. हें सर्व जीवादिक, जेथें भावाभावात्मक कल्पनाच नाहीं असें ब्रह्म आहे. मग वृथा इच्छा कशाला करतोस? रज्जूच्या ठिकाणीं भासलेल्या सर्पापासून सर्प जसा प्राप्त होत नाहीं त्याप्रमाणें देह व बाह्य विषय यांच्याशीं ‘ हा मी व हा माझा ’ असा जो संबंध मनांत स्फुरतो तो विचार केला असतां सांपडत नाहीं, अज्ञात आत्माच भ्रमत्वास प्राप्त झाला आहे, त्याला जाणलें कीं तोच आत्मत्वास प्राप्त होतो. तो सर्व ज्ञानाची सीमा आहे. विषयरूपी मलाचा आश्रय केलेल्या चित्-लाच लोकांत अविद्या असें म्हटसें जातें. पण तीच विषयरहित झाली, कीं सर्व उपाधिशून्य होत्साती आत्मत्वास प्राप्त होते. पुरुष चित्ताशीं तादात्म्य पावून चित्तमय होतो. त्यामुळें चित्त नष्ट झालें कीं तोही नष्ट होतो; आणि घट असला कीं घटाकाशही जसें असतें त्याप्रमाणें चित्त स्थित असलें कीं तोही स्थित असतो. लहान मुलाप्रमाणें चित्त जाऊं लागलें असतां तोही जात आहे, असें मानतो, चित्त स्थित झालें कीं ताही स्थित हातो. याप्रमाणें भ्रान्त झालेलें चित्तच आकुल झालेला मी आहें असें हा आत्मा पाहतो. स्वतःच निर्माण केलेल्या जाळयांत कोळी आपल्याला जसा बांधून घेतो त्याप्रमाणें चित्त वासनातंतूंनीं आंतल्या आंत आपल्यालाच बांधून घेतें व मूर्खपणामुळें-विवेकशून्य आपणच आपल्याला बांधीत आहों, हें त्याला कळतही नाहीं.

श्रीरामः—हें प्रभो! स्थावरादि शरीरांचा आश्रय केलेला व अत्यंत घनरूप झालेला अविवेक कसा राहतो? अविवेकाच्या परमावधीस प्राप्त झालेल्या स्थावरांत चित्ताची स्थिति कशी होते?

श्रीवसिष्ठः—‘ मन ’ या स्वरूपापासून च्युत झालेलें लीनही न झालेलें असें तें चित्त तटस्थ रूपाचा आश्रय करून स्थावरांत राहतें. ज्ञानिश्रेष्ठा! त्या चित्ताची मुक्ति फार दूर आहे. असें मी समजतों. स्थावरांतील जीवचित् दुःख देणारी होऊन रहाते. कारण तिचीं बाह्य व आंतर इंद्रियें लीन झालेलीं असतात. मूक[१] अंध व जड याप्रमाणें ती तेथें केवळ सत्तारूपानें रहाते.

श्रीरामः—हे ज्ञानिश्रेष्ठ गुरो! ज्या स्थावरांमध्यें जीवचित् कर्म-ज्ञानेंद्रियव्यापारशून्य होऊन केवल सत्तारूपानें स्थित आहे तेथें मुक्ति दूर आहे, असें म्हणण्यांत आपला आशय काय आहे! कारण त्या स्थितींत मनोनाशवासनाक्षयादि शीघ्र संपादन करतां येणें शक्य असल्यामुळें मुक्ति अगदीं जवळ आहे, असें मला वाटतें.

श्रीवसिष्ठः—रामा! शास्त्रविहित कर्मानुष्ठानानें चित्तशुद्धि झाल्यावर साधनचतुष्टय-

---

१. या तीन विशेषणांनीं कर्मेंद्रियशून्यता, ज्ञानेंद्रियप्रचारशून्यता व मानसप्रचारशून्यता विवक्षित आहे.

संपत्तिसहवर्तमान श्रवण--मनन---निदिध्यासन केल्यानें तत्त्वसाक्षात्कार होऊन समूल वासनाक्षय व मनोनाश झाल्यामुळें सत्तासामान्यस्थिति --सामान्यसत्तारूपानें अवस्थान होणें, हा मोक्ष आहे. तो अनन्त पाप व दुर्वासना या बीजापासून उद्भवलेल्या स्थावर जीवांच्या ठिकाणीं अत्यंत दुर्लभ आहे. कारण त्यांना शास्त्राधिकारी जन्म दुर्लभ असतो. यास्तव बुद्धिपूर्वक विचार करून या नित्यसिद्ध वस्तूला साक्षात् जाणणें व त्या ज्ञानमाहात्म्यानें सत्तासामान्यरूपानें अवस्थित होणें हा अनंत मोक्ष आहे. आत्मतत्त्वाला जाणून वासनांचा परित्याग करणें उत्तम होय. तसा त्याग केल्यावर जें सत्तासामान्यरूपानें अवस्थान तेंच कैवल्यपद होय, असें ज्ञाते म्हणतात. गुरु व सहाध्यायी यांसहवर्तमान शास्त्राचा विचार करून व मननपूर्वक निदिध्यासनानें तत्त्वाचं अवलोकन करून **सत्तासामान्यनिष्ठ होणें हें परब्रह्म आहे,** असें ज्ञानी समजतात. बीजांत जसा अंकुर त्याप्रमाणें स्थावरांत वासना लीन होऊन रहाते. त्यामुळें ती वासनेची मंदावस्था जणुंकाय सुषुप्तिच आहे, रामा ! ती स्थिति जन्म देणारी आहे. आंतील मनन ज्यांत झालें आहे व वासना सर्व बाजूंनीं निजली आहे, असें तें सुषुप्त पाषाणादिकांप्रमाणें जड -वृत्तिशून्य जरी असलें तरी शेंकडों दुःखें देणारास जन्म देणारें आहे. हे सर्व स्थावरादिक जडधर्मी, सुषुप्तपदावर आरूढ झालेले व त्यामुळेंच पुनः पुनः जन्म घेण्यास योग्य आहेत. हे साधो ! ज्याप्रमाणें बीजामध्यें पुष्पादिक[१] व मातीच्या ढिगांत घट त्याप्रमाणें स्थावरांमध्यें स्ववासना स्थित आहे. ज्यांत वासनाबीज आहे तें सुषुप्त पण मोक्षरूपसिद्धीला कारण होत नाहीं. तर ज्यांत निर्बीज वासना असते तें तुर्यसिद्धि देणारें, म्हणून म्हटलें आहे. वासना, अग्नि, ऋण, व्याधि, शत्रु, स्नेह, वैर, व विष यांचा स्वल्प अवशेषही फार पीडा देतो. यास्तव वासनाबीजाला निःशेष जाळून सत्तासामान्यरूपानें अवस्थित होणारा पुरुष संदेह असो कीं देहरहित असो, तो पुनरपि दुःखभाक् होत नाहीं. स्थावरादिवस्तूमध्यें चिच्छक्ति वासनाबीजरूपी व स्वापधर्मिणी होऊन बीजांतील रसाप्रमाणें नित्य स्थित आहे. बीजांत अंकुरोत्पादनरूपानें, जड पदार्थांत जडरूपानें, द्रव्यात द्रव्यरूपानें, शिलादिकांत काठिण्यरूपानें भस्मात अनित्यरूपानें, धुळींत अणुरूपानें, मलिन पदार्थांत मालिन्यरूपानें, तरवारीत तरवारीच्या धारेच्या रूपानें आत्म्याची शक्ति असते. तो घटपटादि इतर पदार्थांतही त्याच्या त्याच्या शक्तिरूपानें स्थित आहे. आत्मशक्ति सर्व ठिकाणीं सत्तासामान्यरूपाचा आश्रय करून राहते. मेघाचा समुदाय हेंच ज्याचें आच्छादन—वस्त्र आहे अशा आकाशाचा आश्रय करून राहणाऱ्या वर्षर्तूप्रमाणें रामा ! ही आत्मशक्ति सर्व दृश्यदशेला व्यापून याप्रमाणें राहिली आहे. अज्ञानानें आच्छादित झालेल्या या चिच्छक्तीचें हें रूप मीं सांगितले. त्याचा विचार केला असतां तें असर्व ठरतें, पण विचार करीपर्यंत तें सर्वतः व्यापी आहे, असे वाटतें. असत्यमायाविकाराशीं तादात्म्य पावल्यामुळें तें असन्मय असूनही सन्मयसें वाटतें. **ही आत्मदृष्टि जोंवर अदृष्ट—अज्ञात असते तोंवर ती संसार वा भ्रम देते. पण तीच ( दृष्ट ) ज्ञात झाली म्हणजे सर्व दुखांःचा क्षय करते.** हिचें जें अदर्शन त्यालाच विद्वान् अविद्या असें म्हणतात. अविद्याच जगाचें कारण आहे. तिच्यापासून सर्व प्रवृत्त होतें. ही अविद्या

१ येथें 'पुष्पादि' या शब्दानें अंकुरापासून बीजापर्यंत सर्व कार्यसमूह घ्यावा.

स्वरूपशून्य आहे, परतु जों पहावें तोंच ती, उन्हांतल्या बर्फाच्या कणाप्रमाणें तत्काल वितळून जाते. जसा झोंपेंतून जागा होणारा मनुष्य मनांत जो थोडासाही कांहीं विचार करीत आहे तोंच त्याची निद्रा नाहींशी होते, प्रकाशाचा उदय होतांच अंधकार जसा नष्ट होतो त्याप्रमाणें ( असत् वस्तूचा आपण जों विचार करूं लागतों, ) ही वस्तु कशाप्रकारची आहे, असें जों आपण पाहूं लागतों तों ती नष्ट होते. अविद्या क्षीण होते. हातांत दिवा घेऊन जर कोणी अंधकाराला पाहावयास गेला तर उष्णतेनें तूप जसें वितळतें तसें सर्व तम नाहींसें होतें. ज्ञानानें अविद्येसह सर्व जगतही तसेंच क्षीण होतें. दीप लावल्यावर अंधकाराच्या स्वरूपाचा जसा लवलेश रहात नाहीं तर केवल शुद्धस्वरूप अंधकाराचा ध्वंस(अभाव)उत्पन्न होतो त्याप्रमाणें विचार करूं लागलें असता ही अविद्या कोठेंतरी पळून जाते. ही अवस्तु असल्यामुळें विचार न केल्यास असद्रूपच दिसते. प्रकाश आला असतां तें तम जसें असद्रूपच दिसतें त्याप्रमाणें अविद्याही असद्रूपच दिसते. अविद्येच्या अवस्तुत्वाचा त्रैकालिक बाध आहे, असें या अनुभवावरूनच ठरतें. जोंवर आपण विचारपूर्वक पहात नाहीं तोंवर कांहीं समजत नाहीं. पण विचार करून पाहिलें कीं जी अविद्या ती अविद्या व जें वस्तुतत्त्व तें वस्तुतत्त्वच ठरतें. रक्त, मांस, अस्थि यांच्या या सागाळ्यांत 'मी' हा कोण आहे ? असा जों विचार करूं लागावें तों तें सर्व तत्काल विलीन होतें. उत्पत्तीच्या पूर्वी व नाशानंतर जगद्रूप असलेल्या सर्व दृश्याचा विचारयुक्त मनानें परिहार केला असतां जो बाकी राहतो त्याला अविद्याक्षय म्हणतात. सर्व दृश्याचा बाध झाल्यावर राहणारें जें चिदात्मरूप तें 'कांहीं आहे किंवा कांहीं नाहीं' असें म्हणता येत नाहीं. तें शाश्वत सद्ब्रह्मच आहे. ज्याचें ज्ञानानें अज्ञान निवृत्त होतें तेंच तत्त्व व हेंच उपादेय आहे. ज्ञानानें ज्याचा बाध होतो तें बाध्य दृश्य तत्त्वशून्य आहे व त्याचा बाध आत्ममात्र आहे ही गोष्ट माया, अविद्या इत्यादि नांवांवरूनच सिद्ध होते. त्यामुळें त्यासाठीं निराळें प्रमाण हुडकावें लागत नाहीं. जिव्हेच्या योगानें येणारा जो खाद्य पदार्थाचा स्वाद त्याला अन्यप्रमाणाची गरज लागत नाहीं. अविद्या कोठेंही नाहीं. हें अखंडित ब्रह्मच आहे. त्यानेंच असत्, सत् इत्यादि कल्पनांनीं विस्तार पावलेलें हें सर्व दृश्य भूषित झालेलें आहे. हें ब्रह्म नव्हे, असा निश्चय, हें एवढेंच अविद्येचें स्वरूप आहे आणि हें ब्रह्म आहे, असा निश्चय हाच तिचा क्षय आहे. घट, पट, गाडी इत्यादि जगज्जाल हा अपरिच्छिन्न सच्चिदानंद आत्मा नव्हे तर तें त्याहून निराळें आहे, अशी आरोपित दृष्टि हीच अविद्या आहे व घट-पट-शकटादि सर्व दृश्यजात हा विभु आत्माच आहे, असें जाणणें हाच अविद्येचा नाश आहे. सर्व आत्मा आहे, असें जाणतांच अविद्या गळून गेली असें जाणावें.

---

## सर्ग ११

१. हरिहरादि जीवन्मुक्त ज्या दृष्टीनें स्थित आहेत ती 'सर्व ब्रह्म' ही दृष्टि येथे रामाला सांगतात.

श्रीवसिष्ठः—हे रामा ! मी तुला पुनः पुनः दृढबोधासाठीं सांगत आहें. कारण हे साधो ! अभ्यासावांचून आत्मभावना उत्पन्न होत नाहीं. अविद्या या नांवाचें हें अज्ञान अतिशय बलाढ्य आहे. हजारों जन्मांतील अभ्यासानें द्वैतवासना स्थिर झालेली असल्यामुळें ती एकदा उपदेश केल्यानेंच उच्छिन्न होत नाहीं. चक्षुरादि अति प्रबल बाह्य व

अभ्यंतर प्रमाणांनीं देहाच्या जीवन-जागरादि-भाववस्थेंत व मरण-प्रलयादि अभावावस्थेत द्वैताचा अनुभव येतो. त्यामुळें तें द्वैतानुभवरूप-अज्ञान अतिशय प्रबळ झालें आहे. पण आत्म-ज्ञान सर्व इंद्रियांचा अविषय आहे, त्यामुळें मन-व पांच ज्ञानेंद्रियें यांचा क्षय झाला असतांच तें होतें. इंद्रिय जन्यवृत्तीचें उल्लंघन करून राह-णारें जें आत्मज्ञान तें जीवाला प्रत्यक्ष कसें होणार ? कारण त्याची स्थिति प्रत्यक्षाच्या पलीकडे आहे. हे रामा ! हृदयवृक्षावर वाढ लेल्या या अविद्यालतेला ज्ञानाभ्यासविलासरूप तरवारीच्या आघातांनीं तूं स्वसिद्धीकरितां तोड. ज्यानें सर्व ज्ञेय जाणलं आहे असा जनक राजा आत्मज्ञानाभ्यासांत तत्पर होऊन जसा विहार करतो त्याप्रमाणेंच तूं विहार कर. माझा असा अनुभव आहे, तसाच त्याचा बाह्य व्यवहार करीत असतांना व समाधि--दशेंत असतांना, जातांना किंवा स्थिर-स्थित असतांना त्याचा निश्चय होता. तेंच ज्ञान अभ्यासाचें फळ आहे. आणि त्या ज्ञानानेच अभिव्यक्त झालेल्या स्वरू पाला सत्यता आहे. आचार करविणाऱ्या हरी ज्या निश्चयानें विविध गर्भवासादि संकटें सोसून भूमीवर अवतार घेतो, परंतु त्यामुळें होणाऱ्या दुःखांनीं लिप्त होत नाहीं, तेंच त्याचें ज्ञानित्व होय. पत्नीसह असणाऱ्या त्रिनेत्राचा जो निश्चय अथवा विरक्त ब्रह्मदेवाचा जो निश्चय तोच तुझा होऊं दे. देवगुरु बृहस्पतीचा दैत्यगुरु शुक्राचा, सूर्याचा, चंद्राचा, वायूचा, अग्नीचा, नारदाचा, पुलस्त्याचा, माझा, अंगि-रसाचा, प्रचेत्याचा, भृगूचा, क्रतूचा, अत्रीचा, शुक्राचा आणि दुसऱ्याही सर्व जीवन्मुक्त ब्रह्मर्षींचा व राजर्षींचा जो निश्चय आहे तोच तुझा होवो.

श्रीरामः—भगवन् ! ते महाबुद्धिमान् धीर पुरुष ज्या निश्चयानें शोकरहित होऊन राहिले तो निश्चय मला तत्त्वतः सांग.

श्रीवसिष्ठः—हे राजपुत्रा, हे पराक्रमी व सर्वज्ञ राजा ! तूं जें विचारलें आहेस त्याचें स्पष्ट उत्तर ऐक. त्यांचा निश्चय हा असा होता. हें जें कांहीं विस्तीर्ण जगज्जाल दिसत आहे तें सर्व निर्मल ब्रह्मच मायिकरूप टाकून परमार्थ-स्वरूपानें अवस्थित आहे. ब्रह्मच चिदाभास आहे. ब्रह्म भुवन आहे. ब्रह्म प्राण्यांची परपरा आहे. मी ब्रह्म आहें, माझा शत्रु ब्रह्म आहे. सन्मित्र व बांधव ब्रह्म आहेत. कालत्रयही ब्रह्म आहे. तें सर्व ब्रह्मांतच व्यवस्थित आहे. मोठ-मोठ्या लाटांच्या योगानें समुद्र जसा स्वरूपां-तच वाढतो त्याप्रमाणें पदार्थांच्या शोभेनें हें ब्रह्मच असें वृद्धि पावतें. ब्रह्माकडून ब्रह्मच जाणलें जातें. ब्रह्माकडून ब्रह्माचाच भोग घेतला जातो. ब्रह्म ब्रह्मामध्ये मायेनें विवर्त पावून विप-रीत भावास प्राप्त होऊन जणुं काय वृद्धि पावतें. जर ब्रह्म मज ब्रह्माचें अप्रिय करणारें असेल तर तें ब्रह्म माझा शत्रु होईल. पण तें तसें नाहींच, त्यामुळ या ब्रह्मदृष्टानें माझ्या रागद्वेषाची प्राप्तीच नाहीं, आकाशवृक्ष जसा संभवत नाहीं त्याप्रमाणे ब्रह्मामध्यें कल्पित राग-द्वेषाचें अवस्थान संभवत नाहीं, कारण सर्वच जर ब्रह्म आहे तर रागद्वेष कोणामुळें होणार ! संकल्प सोडल्यामुळेंच नष्ट झालेल्या त्यांचा ब्रह्ममध्य प्रसंगच नाहीं. गमनादि क्रिया पूर्ण ब्रह्मामध्येंच होते. सर्व सुखैकरस ब्रह्मच स्फुरण पावत आहे. त्यांत सुखित्व व दुःखित्व कोठचें ? ब्रह्मच ब्रह्मामध्ये उत्तम प्रकारें तृप्त आहे व ब्रह्मच ब्रह्मामध्य उत्तम प्रकारें स्थित आहे. ब्रह्मच ब्रह्मामध्यें स्फुरत आहे. मी अब्रह्मरूप नाहीं. घट ब्रह्म आहे, पट ब्रह्म आहे. हें विस्तीर्ण जगत मीच ब्रह्म आहें. तव्हां त्यांत रागद्वेषाची मिथ्याच कल्पना कोठची ? मरण ब्रह्मामध्यें देह ब्रह्म यदृच्छेनें सुसंगत झालें असतां रज्जुसर्पाच्या भ्रमाप्रमाणें

दुःखित्व कशाचें ? देह ब्रह्म मुख्य ब्रह्मामध्यें उत्तम प्रकारें स्थित झालें असतां संभोगादि निमित्तानें होणारें जें सुख तें मलाच मिळालें अशी व्यर्थ कल्पना कशी होणार ? हालणारा तरंग व जल यांत जलावांचून दुसरें जसें कांहीं नसतें त्याप्रमाणें राग-द्वेषामुळें जलन पावणाऱ्या ब्रह्मामध्यें तूंपणा व मीपणा नाहीं. तरंगाचा नाश जरी झाला तरी पाण्यांतील जसा एकही बिंदु नाश पावत नाहीं त्याप्रमाणें देहब्रह्म मरण-ब्रह्माला प्राप्त झाले असतां वस्तुतः ब्रह्माची कांहीं हानि नाहीं. ज्याप्रमाणें चल किंवा अचल पाण्यांत तूंपणा व मीपणा रहात नाहीं त्याप्रमाणें परमात्म्यामध्यें जड व अजडरूप रहात नाहीं. जसें सोन्याचें कटकत्व व जलाचें तरंगत्व त्याप्रमाणें आत्म्याची ही प्रकृति अधिष्ठानदृष्टीनें आत्मरूप आहे व आरोपितदृष्टीनें आत्मरूप नाहीं. या मायिक स्वभावामुळेंच हे जीवस्वरूप व हे जडस्वरूप अशी अनात्मज्ञान-भेदकल्पना होते. असा मोह अज्ञाला होतो, पण ज्ञानात्म्याला असा मोह केव्हांही होते नाहीं. अज्ञाला जगत् दुःखौघमय व ज्ञान्याला आनंदमय भासतें. आंधळ्याला सर्व जगत् अंध वाटतें व चक्षुष्मानाला प्रकाशकमय वाटतें. ज्ञान्याला जगत् एकरूप भासते व अज्ञाला अतिशय दुःखद वाटतें. बालकाला रात्रीं यक्ष भासतो व मोठ्या मनुष्याला भासत नाहीं. ह्या सर्वतः एकरूपानें स्थित असलेल्या ब्रह्मामृतपूर्णघटांत, जसे तरंगपरंपरेत वस्तुतः कांहीं उत्पन्न होत नाहीं व मरत नाहीं त्याप्रमाणें कांहीं मरत नाहीं व कांहीं जिवंत होत नाहीं. महदासागरांत जसे तरंगादिक त्याप्रमाणें आत्म्यांत भूतसमुदाय. स्फुटिकाची स्वच्छताच जशी अनेक प्रतिबिंबें, त्यांचे गुण, क्रिया इत्यादि विचित्ररूपानें आंतल्या आंत भासते त्याप्रमाणें मायाशक्ति हे आहे, हें नाहीं इत्यादि जगद्भ्रांतिरूपानें स्वतःच कांहीं कारणावांचून आत्म्यामध्यें स्फुरण पावतें पण तें जगत्स्फुरण आत्माच आहे व ज्याप्रमाणें तरंगांच्या समुहानें जल जलांत रहातें त्याप्रमाणें तें आत्माख्य ब्रह्म आपल्या अद्वयस्वरूपांतच स्थित आहे. शरीराच्या नाशानें ब्रह्माच्या नाशाची कल्पना कशी होणार ? समुद्रांत तरंग जलाहून पृथक् जसे नसतात त्याप्रमाणें शरीरादिक ब्रह्माहून भिन्न नसतें. जो जलाचा थेंब, जो तुषार, जी लाट, जो मोठा तरंग, जो फेंस व जी लहानशी लहर तें सर्व जसें पाण्यांतील पाणीच आहे त्याप्रमाणें जो देह, जो इंद्रियांचा व्यापार, जे भोग्य विषय, जी संपत्ति व विपत्ति, हर्षविषादादि भावांची रचना व जो पुरुषार्थ-भोग त सर्व ब्रह्मामध्यें ब्रह्मच आहे. सोन्याहून अलंकाराची विचित्र रचना जशी पृथक् नाहीं त्याप्रमाणें मूर्खांची मिथ्याच द्वैत कल्पना ब्रह्माहून पृथक् नाहीं. मन, बुद्धि, अहंकार, तन्मात्रें, इंद्रियें इत्यादि सर्व द्वैत ब्रह्मच आहे· त्याच्याशिवाय नानाप्रकार किंवा सुख व दुःख कांहीं नाहीं. पर्वताजवळ उच्चारिलेल्या शब्दाचा प्रतिध्वनीप्रमाणें ' तो हा मी व हें चित्त ' इत्यादि अर्थ केवल शब्दमात्र आहेत. आत्माच देह. चित्त, ग्राह्य विषय इत्यादि शब्दभेदानें विकास पावतो. अज्ञात ब्रह्मच जीवभावास व जगद्भावास प्राप्त झाल्यासारखें भासत आहे. स्वप्नांत चित्तच स्वतःच्या कल्पनेनें आत्मामध्यें सर्व पाहतें, हें प्रसिद्ध आहे. सोनें या रूपानें ज्याची भावना केलली नाहीं तें सोनेही जशी माती होते त्याप्रमाणें ब्रह्मरूपानें ज्याची भावना केली नाहीं तें ब्रह्मही अज्ञान होतें. ब्रह्मवेत्ते ब्रह्म स्वयंप्रभु व माहात्मा आहे, असे जाणतात. पण अज्ञांना ज्ञात न झालेलें ते अज्ञानच होतें. जसें सुवर्ण या रूपानें जाणलेलें सोनें क्षणांत सोनें होतें त्याप्रमाणें ब्रह्मत्वानें जाणलेलें ब्रह्म क्षणांत स्वतः ब्रह्म होतें. ब्रह्मात्मा सर्वशक्तिमान्

आहे, त्यामुळें तो स्वशक्तीनें कोणत्याही हेतूवांचून ज्याची भावना करतो तें तत्काल तसें पाहतो. ब्रह्मज्ञानी ब्रह्म कर्म-कर्तृ-करणरहित, कारणशून्य, सर्व पीडारहित, स्वयंप्रभु व माहात्मा आहे, असें जाणतात. अज्ञ लोकांनीं साक्षात् न जाणलेलें ब्रह्मच अज्ञान होतें व त्याला चांगलें जाणलें कीं तेंच अज्ञानाचा सर्वथा नाश करणारें ज्ञान होतें. न जाणलेला बंधुच अबंधु होतो, पण पुढें त्याला ओळखलें असतां 'हा आपला बंधु नव्हे' असा पूर्वीचा भ्रम घालवून तोच बंधु होतो. 'असें जर आहे तर जीव व जगत् ब्रह्ममात्र आहेत, अशी भावना सर्वांनाच का होत नाहीं?' म्हणून विचारशील तर वैराग्याचा अभाव हें त्याचें कारण आहे. 'तर मग वैराग्य कोणत्या कारणांनीं उत्पन्न होतें' तें सांगा, म्हणून म्हणशील तर ऐक–हें जीवरूप व जगद्रूप अयुक्त आहे. त्याला विचार सहन होत नाहीं, असें कळलें म्हणजे ती भावना उत्पन्न होते. कारण रज्जुसर्पादि अयुक्त पदार्थांपासून पुरुष विरस होऊन परत फिरतो, असें आपण पाहतों. त्याचप्रमाणें जगत् अयुक्त आहे अशा विचारानें पुरुष त्याविषयीं विरस होतो. द्वैत मिथ्या आहे, असें आंत ज्ञात झालें असतां ती भावना उदय पावते. त्यामुळें पुरुष द्वैताविषयीं विरस होतो; म्हणजे त्या भावनेनें तो विरक्त होतो. हा शरीरेंद्रियसमुदाय मी नव्हें, असें स्पष्ट ज्ञात झालें असतां ती भावना उदय पावते. त्यामुळें अहंकारता मिथ्या ठरते आणि त्या कारणानें तो खचित विरक्त होतो. मी ब्रह्म आहें, असें यथार्थ ज्ञान झालें असतां ती भावना उदय पावते; आणि त्या निज सत्य रूपांत पुरुष सर्वथा लीन होतो. अखंडवाक्यार्थ अपरिच्छिन्नस्वभावानें आविर्भूत झाला असतां, तूं, मी, हें, तें, सत् इत्यादि जगांतील सर्व ब्रह्मच होतें. हें सर्वप्रकारांनीं संपन्न असलेलें जगत् मी ब्रह्मच

जाणतों, मला दुःखें नाहींत, मोह नाहीं, क[illegible] नाहींत, व वांच्छित नाहीं. मी सम, स्व[illegible] शोकरहित आहें. मी ब्रह्म आहें. म्हणून म[illegible] सत्यता आहे. प्राणादिकलारूप कलंकापासू[illegible] मी मुक्त झालों आहें, मी सर्व आहें, मी निरु[illegible] द्रव आहें, मी त्याग करीत नाह[illegible] मला कशाची इच्छा नाहीं, मी [illegible] आहें, म्हणून मला सत्यता आहे, मी र[illegible] आहें, मी मांस आहें, मी अस्थि आहें, [illegible] शरीर आहें, मी चित्त आहें, मी चेतन आ[illegible] मी ब्रह्म आहें, ही सत्यता आहे. मी सूर्यास[illegible] आकाश आहें, स्वर्ग आहें, मी दिशा आहें, [illegible] भूमि आहें, मी घटपटाकार आहें, मी ब[illegible] आहें, म्हणून मला सत्यता आहे, मी तृ[illegible] आहें, मी पृथ्वी आहें, मी वेलींचा झुब[illegible] आहें, मी अरण्यादिक आहें, मी पर्वत, समु[illegible] इत्यादिकांचा समूह आहें, माझें ब्रह्मैक[illegible] याप्रमाणें स्थिर-स्थित झालें आहें, येणें, दे[illegible] संकोच पावणें, इत्यादि सर्व प्राणिधर्म मी आ[illegible] ब्रह्मामध्यें विस्तीर्णरूप धारण करणारा [illegible] चिदात्माच सर्व आहें, अधिक विस्तार पावण्या[illegible] इच्छा करणाऱ्या लता, गुल्म, अंकुर इत्यादिकां[illegible] मी चिदात्मा आहें. त्यांतील रसात्मक परब्र[illegible] आहे. ज्यात सर्व आहे, ज्यापासून सर्व आ[illegible] जें सर्व आहे व जें सर्व बाजूला आहे व [illegible] सर्व एकात्मा मानलेला आहे तें परब्रह्म आ[illegible] असा माझा निश्चय आहे. चिदात्मा, ब्र[illegible] सत्, सत्य, ऋत, ज्ञ इत्यादि नांवांनीं तें स[illegible] व्यापी, विषयरहित चिन्मात्र तत्त्व सांगितलें जा[illegible] ते प्रकाशमात्र, निर्मल, सर्व भूतांच्या स्वरूपा[illegible] बोध करविणारें, सर्वत्र अवस्थित असलेलें, शां[illegible] चिद्ब्रह्म आहे, असा अनुभव घेतला जातो. म[illegible] बुद्धि, इंद्रियसमूह इत्यादि सर्व वृत्तींमध्यें [illegible] अनुगत आहे. भेदाचा त्याग करून स्वप्रका[illegible] निरुपद्रव चिद्ब्रह्म मी आहें. मी सर्व [illegible]

कांचें, त्यांच्या कारणरूप आकाशादिभूतांचें, सर्व जगत्स्थितीचें, तत्त्वप्रकाशक-सत्तास्वरूप स्वच्छ चिद्ब्रह्म आहें. माझा क्षय होत नाहीं. अग्नीच्या किटाळांप्रमाणें वृत्तींच्या धारांनीं सतत बाहेर निघणाऱ्या ज्या चिद्द्वारा त्यांच्या खाणी-सारखें तें प्रत्यगात्मस्वरूप आहे. तें योग्यांच्या अनुभवाचा विषय जरी होत असलें तरी शब्दांनीं ज्यांचें वर्णन करितां येत नाहीं, असें जें निरतिशयानंदरूप परब्रह्म तें मी आहें. अहंकार-रूप सर्व भोक्तृसमूहांस निरनिराळ्या भोगवृत्ति-धारांनीं मधाच्या धारांप्रमाणें सतत अनुभवामृत देणारें तें निर्लेप ब्रह्म मी आहें. सुषुप्तासारखें शांत, प्रकाशासारखें स्वच्छ स्वरूप, मनुष्या-नंदापासून हिरण्यगर्भाच्या आनंदापर्यंत जितके उत्तरोत्तर अधिक आनंद आहेत त्या सर्वांहून उत्तम, वासनारहित, सर्वतः प्रकाशरूप मी ब्रह्म आहें, साखर, गूळ इत्यादि मधुर पदार्थांचा जो अनुभव येतो तो फार थोडा वेळ टिकतो. गोड पदार्थ घशांत उतरेपर्यंतच गोड लागतो. पण चित्त, चित्ताचे विषय व जीव हें सर्व आनंदैकरसरूप आहे, असें जाणल्यावर ज्या अखंड आनंदाचा अनुभव येतो तेंच ब्रह्म मी आहें. ज्याचें चित्त कांतेच्या ठिकाणीं अत्यंत आसक्त आहे तोच चंद्राचा उदय झाला असतां कांता व चंद्र या दोघांना पाहतो. पण कांतेला पाहून चंद्राला पाहीपर्यंत जो मध्यें थोडासा काल व अवकाश असतो त्यांत निर्विषय ब्रह्म आहे. तेंच निरुपद्रव ब्रह्म मी आहें म्हणजे भूमीवरील मनुष्यांची दृष्टि आकाशांतील चंद्रा-मध्यें आसक्त झाली असतां भूमीपासून चंद्रा-पर्यंत जें आकाश असतें त्यांतील चिच्छक्तिच मी निर्मल ब्रह्म आहें. सुख-दुःखादि दुसऱ्या वृत्तींनीं रहित अशी जी उदासीनांची निर्विशय दशा त्या दशेंत अनुभवास येणारा निर्मल चिदात्माच मी आहें त्याचप्रमाणें येथें असलेल्या पुरुषाचें मन दूरप्रदेशीं असलेल्या विषयाशीं संलग्न होऊन मार्गांतील इतर पदार्थांचें भान त्याला नाहीं, असें झालें असतां त्या अन्तराल प्रदेशीं विषयसंपर्करहित अशी जी प्रतीति तीच मी शाश्वत चिदात्मा आहे. भूमि, जल, वायु व बीज हीं एकत्र मिळालीं असतां अंकुररूप कार्य बाहेर पडण्यास अनुकूल अशी जी चिच्छक्ति तेंच मी ब्रह्म आहें, खजूर, लिंबू, तोंडलें इत्यादि फळांच्या आंत आपल्या जड-भावानें राहणाऱ्या. रसांची लीन असलेली व रसनेंद्रियादि वृत्तींच्या द्वारा व्यक्त होणारी जी प्रकाशरूप स्वादसत्ता तेंच मी सम चिद्ब्रह्म आहें. जी इष्टानिष्टलाभादिकांमुळें हर्षविषादयुक्त होणारी संवित्तिच शास्त्रानुसारी मननाचा उदय झाला असतां शुद्ध म्ह० हर्ष-विषादरहित होत्साती इष्टप्राप्तीनें हर्षयुक्त व अनिष्टप्राप्तीनें खेदयुक्त होत नाहीं, तर दोन्ही दशेंत एक-सारखीच असते, तें मी निरामय चिद्ब्रह्म आहें. भूमीवरून सूर्याला पाहणाऱ्यानें पुरुषाचें भूमी-पासून सूर्यापर्यंत जें चक्षुरिंद्रियरूप सूत्र पसर-लेलें असतें त्याचा जो मधला भाग त्यासारखें -विषयाला प्रकाशित करण्यास समर्थ असूनही प्रकाशित न करणारें जें शांत निर्मल चैतन्य तेंच मी व्यापक आत्मतत्त्व आहें. जागृति, स्वप्न व सुषुप्ति या तीन अवस्थांचें जें साक्षिरूप तेंच त्या अवस्थांचा त्याग केला असतां आदि-अंतरहित तुर्य ब्रह्म आहे; व तेंच मी आहें निरनिराळ्या शेंकडों शेतांत उत्पन्न झालेल्या उसांच्या एकरूप माधुर्याप्रमाणें सर्व जीवांचें जें एक चिद्रूप तें मी सम ब्रह्म आहें. सूर्याच्या प्रभेप्रमाणें जी सर्वव्यापिनी, स्वच्छा, सर्वांना प्रकाशित करणारी रम्य चिता तेच मी सर्वत्र पसरलेलें ब्रह्म आहें. संभोगाचा जो अल्प आनंद तो ज्याच्यापासून आहे, अमृतांचा स्वाद घेण्याची जी शक्ति ती ज्याची आहे व

जें केवल स्वानुभवरूप आहे, तें मी अव्यय चिद्रूप ब्रह्म आहें, कमलनालांतील तंतूप्रमाणें जें सर्वशरीरभर व्यापून असलें तरी शरीराला तोडल्यानें व फोडल्यानें तुटत वगैरे नाहीं तर प्रकाशरूपानें स्फुरण पावत राहतें तें मी चिद्रूप ब्रह्म आहें, जिनें सर्व भुवनांना व्यापलें आहे तथापि मेघांच्या रांगेप्रमाणें जी स्पंद पावते व जिचा जीवरूप आकार अत्यंत सूक्ष्म व त्यामुळेंच दुर्लक्ष आहे, ती व्यापक चिच्छक्तिच मी आहें. दुधांतील घृताची सत्ता जशी तशीच जी अक्षय चित् केवल अनुभवमय अन्तःसारांत आहे म्ह० जिच्यातील सार केवळ अनुभवगम्य आहे व जी परमप्रेमावरून उपलक्षित होते तीच मी आहें. कडें, बाहुभूषण, मुकुट इत्यादिकांची रचना जशी कारणदृष्ट्या सुवर्णरूप व कार्यदृष्ट्या तद्रूप नाहीं, अशी भासते पण सोन्यांत सोन्यांची सत्ता जशी नित्यसिद्ध असते त्याप्रमाणें देहांत मी सर्वव्यापक राहिलों आहें. पर्वतादि सर्व पदार्थसमुहाच्या आंत व बाहेर जी चित् सर्वदा सत्तासामान्यरूपानें स्थित आहे तीच मी निर्लेप आत्मा आहें. सर्व अनुभववृत्तींचा जो अकृत्रिम आरसा, ज्याच्याशीं मळाचा संसर्गच होत नाहीं तें मोठें चित्तत्त्व मी आहें. सर्व संकल्पांचें फळ देणारें, सर्व तेजांना प्रकाशमान करणारें, सर्व ग्राह्य पदार्थ आत्म्यासाठींच ग्राह्य होत असल्यामुळें सर्व ग्राह्यांची सीमा, अशा चिदात्म्याची मी अभेदानें उपासना करतों. सर्व अवयवांमध्यें शक्तिरूपानें विश्रांति पावलेल्या, व समस्त अवयवांहून अगदीं विलक्षण असणाऱ्या नित्य प्रकाशरूप चिदात्म्याची मी उपासना करतों, घट, पट, तट, कूप यामध्यें सद्रूपानें राहिलेलें, चार प्रकारच्या शरीरांत अनुभवरूपानें स्फुरण पावणारें, जाग्रदवस्थेंतही सुषुप्तीप्रमाणें निर्विशेष रूपानें असणारें, जें चिद्रूप त्याची आम्ही उपासना करतों. अग्नींत उष्ण, बर्फात शीत, अन्नांत मिष्ट, वस्तऱ्यांत तीक्ष्ण, अंधारांत काळा व चंद्रांत शुभ्र असलेला जो चिदात्मा त्याची आम्ही उपासना करतों. आंत व बाहेर प्रकाशरूप असून आत्मवस्तूंत स्थित असलेला व प्रत्यगात्मरूप असल्यामुळें वस्तुतः अदूर असूनही अज्ञाला फार दूर भासणारा जो चिदात्मा त्याची आम्ही उपासना करतों. माधुर्यादिकांमध्यें माधुर्य, तीक्ष्णादिकामध्यें तीक्ष्णता, इत्यादि आकारांनीं सर्व पदार्थांमध्यें असलेल्या चिदात्म्याची आम्ही उपासना करतों. जाग्रत्स्वप्न-सुषुप्त-तुर्य व तुर्यातीत पदांत सर्वत्र सदा सम असलेल्या चिदात्म्याची आम्ही उपसना करतों. ज्यांत सर्व संकल्प शांत झालेले आहेत, सर्व कौतुक पार निघून गेलें आहे, सर्व वग क्षीण झाले आहेत. अशा चिदात्म्याची आम्ही उपासना करतो भोगाविषयींच्या उत्कंठेनें रहित क्रोधरहित यत्नरहित, चेष्टारहित, निःशेष, निरंश, निरहंकार अशा चिदात्म्याची मी उपासना करतों. सर्वांच्या आंत असलेलें, सर्वही अनन्त एकरूप व असंख्य प्रतिबिंबचेतनांचा आरंभ ज्याच्यापासून होतो अशा चिदात्म्याची आम्ही उपासना करतों. त्रैलोक्यांत राहणाऱ्या देहलक्षण मोत्यांतील उन्नत व विस्तीर्ण तंतु, जाग्रत्स्वप्नरूप प्रचार व सुषुप्तिरूप संकोच करणारा अशा चिदात्म्यास मी प्राप्त झालों आहें. स्वतः स्वरूपानें आंतून व बाहेरून व्यापलेल्या जगद्रूप पक्ष्यांस आपल्यामध्यें अन्तर्भूत करून लपून राहिलेल्या विचित्र जाळ्यासारख्या चिदात्म्याची आम्ही उपासना करतों. जेथें हें सर्व आहे व जेथें यांतील कांहीं थोडेंसेंही नाहीं त्या सदसद्रूप एक चिदात्म्यास आम्ही प्राप्त झालो आहों. अत्यंत विश्वासार्ह, पूर्ण, सर्व सुखलेशरूपी संपत्तीचें स्थान, सर्वाकार विहारांत

स्थित, अशा चिदात्म्यास मी प्राप्त झालों आहे. सर्व निरुपाधि प्रेमाचा आधार, देहाहि व प्राणादि यांच्या अध्यासोंन विनष्ट न झालेलें, भ्रांत पुरुषाच्या दृष्टीनें देहप्राणादिकांनीं युक्त व तत्त्वज्ञाच्या दृष्टीनें मुक्त अशा त्या बाहेरील व आंतील चैतन्य दीपाची आम्ही उपासना करतों. हृदयरूपी सरोवरांत पद्मिनीच्या कंदाप्रमाणें प्रमाणें अत्यंत गुप्त असलेला, हास्तपादादि सर्व दृढ आधार देणारा तंतु व जलसमुहाच्या जीवनाचा उपाय अशा चिदात्म्यास मी प्राप्त झाला आहें. प्रसिद्ध अमृताप्रमाणें परंतु क्षीरार्णवापासून उत्पन्न न झालेलें, चंद्राशिवाय न उपस्थित झालेलें, व गरुडादिकांना हरण न करतां येण्यासारखें असें जें सत्य अमृत त्या चिदात्म्याची आम्ही उपसना करतों. शब्द-स्पर्श-रूप-रस-गंध यांच्या योगानें अभिव्यक्त झालेलें, पण त्यांनींच रहित, अशा शांत चिदात्म्यास मी प्राप्त झालों आहें. आकाशाच्या कोशाप्रमाणें स्वच्छ, सर्व लोकांना आपल्या व्याप्तीनें अभिव्यक्त करणारें, पण वस्तुतः आकाशही नाहीं व अभिव्यक्तही नाहीं अशा चिदात्म्यास मी प्राप्त झालों आहें. महा महिम्यानें युक्त असलेलें पण सर्व.ऐश्वर्यांनीं रहित, खरें कर्तृत्व त्यालाच असतांना स्वरूपानें जें अकर्तृ त्या चिद्रूप आत्म्यास मी प्राप्त झालों आहें. तादात्म्यारोपाच्या दृष्टीनें सर्व मीच, पण संसर्गाध्यासदृष्टीनें सर्व माझेंच; अपवाददृष्टीनें अहंत्वारोपाचें निमित्त अहंकार ही मी नव्हे व त्याहून दुसरें तर मी नव्हेच. याप्रमाणें अध्यारोप व अपवाद यांच्या योगानें तत्त्व जाणणाऱ्या मला जगत् कृत्रिम मायामय असो कीं आत्माच असो; तें कसेंही जरी असलें तरी मी सर्व क्लेशरहित आहें.

------

# सर्ग १२

—:❁:—

बाहेर निःसंग व नीराग आणि आंत स्वच्छ आत्म्याने भास्वर अशी जनकादिकांची गुरूने सांगितलेलीं स्थिति रामानें जाणली.

श्रीवसिष्ठः—रामा! असा ज्यांचा निश्चय आहे असे ते निष्पाप, सत्य महात्मे सत्य, शांत व समपदामध्यें सुखानें अवस्थित आहेत. अशा रीतीनें बाहेर ज्यांची बुद्धि पूर्ण आहे व त्यामुळें मनांत जे सम, रागरहित आहेत ते मरणाची निंदा करीत नाहींत व जीविताचें अभिनंदन करीत नाहींत. नारायणाच्या भुजांप्रमाणें ज्यांच्यामध्यें अलक्ष्याचे ठिकाणीं—अतिशय सूक्ष्म पदार्थालाही—वेध करण्याचा चमत्कार आहे, असे ते सरळ व नम्रस्वभावाचें होऊन जणुंकाय दुसऱ्या मेरूप्रमाणें स्थित होऊन राहिले आहेत. ते वनामध्यें, दीपांमध्यें. नगरांमध्यें देवांच्या अनेक उपवनामध्यें व स्वर्गांमध्यें देवाप्रमाणें रममाण झाले. मेरूच्या शिखरावरील पुष्पांनीं भरलेल्या व झोंपाळ्याच्या झोक्यानीं चंचल अशा विचित्र वनपंक्तीमध्यें भ्रमण करते झाले. ज्यांतील सर्व शत्रूना जिंकलें आहे, जीं छत्र व चामरें यानीं युक्त आहेत ज्यांत धर्म, अर्थ व काम हे विचित्र पुरुषार्थ आहेत व जीं विचित्र आचारमय आहेत अशी राज्यें त्यांनीं केलीं. त्यांनीं अनेकप्रकारच्या शिष्टाचारांनीं अनुष्ठिलेल्या धर्माचें अनुकरण केलें. जिचे प्रयत्न श्रुति व स्मृति यांनीं सांगितले आहेत अशा इतिकर्तव्यतेचें म्ह० सांग योगांचे अनुष्ठान त्यांनी केलें. अशा प्रकारच्या दृष्टादृष्टसाधनसंपत्तींनीं रमणीय, स्त्रियांच्या हास्याचें हरण करणाऱ्या, विहार व आहार यांनीं रम्य अशा भोगांच्या समुहांत भूषित झालेले ते जेथें सुंदर आम्रवृक्ष आहेत, मंदार-

वृक्ष ज्यांत सभोंवार आहेत, व ज्या सरांच्या गीतांनीं भरून गेल्या आहेत, अशा नंदवनांतील भूमींत विषयसेवन करते झाले. चराचर प्राण्यांनीं युक्त अशा सर्व भुवनांत व ज्यांच्या योगानें सर्व प्राणी सुखी झाले आहेत असे यज्ञक्रियांचे कलाप ज्यांत आहेत अशा गृहस्थाश्रमांत ते क्रमाक्रमानें आनंदानें राहिले. ते जीवन्मुक्त. ज्यांत, मोठमोठे हत्ती मारले गेले आहेत, पुष्कळ माल अतिशय भ्रान्त झाल्या आहेत. व जे दुंदुभींच्या 'भा मां' अशा ध्वनींनीं भयंकर झाले आहेत अशा संग्रामरूप सागरांतील मार्गांतून निर्भयपणानें पार तरून गेले. ज्यामुळें क्लेश सहन करण्याचें सामर्थ्य चित्ताला येतें अशा, ज्यांनीं वित्ताचें हरण केलें आहे अशा, ज्यांत शत्रूंच्या हातून पराभव प्राप्त झालेला असतो अशा, आणि क्रोध व क्षोभ यांनीं उग्र बनलेल्या, सर्व विपत्तींत त्यांचें मन रागरहित, उपाधिरहित, भ्रमरहित, असक्त, मुक्त, होऊन सर्वप्रकारें शांत, अशा परम सत्वपदास प्राप्त झालेलें असतें. सरोवरांत जसे हिमालयादि कुलपर्वत बुडून जात नाहींत त्याप्रमाणें ते मोठमोठीं संकटें कोसळलीं तरी दुःखांत बुडून गेले नाहींत व मोठें ऐश्वर्य प्राप्त झालें तरी हर्षांत निमग्न झाले नाहींत. हे रघुकुलश्रेष्ठा! परिपूर्ण चंद्राच्या प्रकाशानें महासागर उल्लसित होतो त्याप्रमाणें ते ज्ञानी परमसुंदर व विलासिनी अशा श्रीनेंही उल्लसित झाले नाहींत. उन्हाळ्यानें वनस्थळ जसें करपून जातें त्याप्रमाणें दुःखशोकानें ते म्लान झाले नाहींत, दवांनीं ज्याप्रमाणें औषधि हृष्ट होत नाहींत त्याप्रमाणें ते विषयसमूहांनीं हृष्ट झाले नाहींत. तर ते भोगरूप मंजरीचा अनुभव घेत असूनही केवल अव्यग्र–कर्तृत्वाभिनिवेशरहित राहिले. रामा! त्यांनीं इष्टानिष्ट फलाची इच्छा केली नाहीं व त्यागही केला नाहीं. शत्रूला जिंकणें इत्यादि कार्यांची सिद्धि झाली असतां ते उत्कर्ष पावले नाहींत व शत्रूंनीं त्यांच्यावर आक्रमण केलें असतां ते अपकर्षास प्राप्त झाले नाहींत. सुख मिळालें असतां हर्ष पावले नाहींत व संकट आलें असतां खिन्न झाले नाहींत. भयंकर मोह पाडणारीं संकटें कोसळलीं तरी ते मोहित झाले नाहींत व विपत्तींनीं आक्रमण केलें तरी त्यांत बुडून गेले नाहींत. तुझ्याप्रमाणें ते शुभप्राप्तीनें आनंदित होत नसत व शोकांनीं रडत नसत. आपापल्या वर्णाश्रमाप्रमाणें प्राप्त झालेल्या विषयामध्यें ते केवल कर्म करीत जणुंकाय दुसऱ्या मेरूप्रमाणेंच सर्व क्षोभ सोडून राहिले, हे राघवा, तूं त्या पापाचा नाश करणाऱ्या दृष्टीचा आश्रय करून अहंकाररहित शुद्ध चैतन्याचे ठिकाणींच आत्मबुद्धि ठेवून यथाप्राप्त व्यवहार कर. याच सृष्टिपरंपरेला यथार्थस्वरूपानें ती जशी आहे तशीच–पाहत तूं सर्व भ्रम टाक व मेरूप्रमाणें स्थिर व सागरासारखा गंभीर होऊन सर्वत्र सम रहा. चिन्मात्रच हें असें सर्व सृष्टीच्या आकारानें भासत आहे, त्यांत सत्य किंवा असत्य कोठें कांहींच नाहीं. हे उदारा! प्राज्ञतेचा पूर्णपणें अवलंब करून व या दृश्याचा अवहेलनेनें त्याग करून सर्वत्र असक्तबुद्धि हो; आणि उत्तर जन्माचा क्षय कर. तूं मोठ्या उद्वेगानें रडतोस कां? मूढासारखा शोक कां करतोस? पाण्याच्या सौम्य भोंवऱ्यामध्येंही जसें तृण भ्रमण करतें तसा तूं उद्भ्रांत चित्तांत स्थित होऊन भ्रमण कां करतोस?

श्रीरामः—भगवन्! काय चमत्कार आहे, सूर्याच्या संगानें कमल जसें उमलतें त्याप्रमाणें आपल्या प्रसादानें मी प्रबुद्ध–ज्ञानी झालों आहें. माझ्या चित्तावरील मळाचा क्षय पूर्णपणें झाला आहे. शरदृतूंत जसें धुकें क्षीण होतें त्याप्रमाणें माझी सर्व भ्रांति अस्त पावली आहे. ज्याचे सर्व संदेह नाहींसे झाले आहेत असा मी

तुमचें वचन ऐकेन--त्याप्रमाणें आचरण करीन. माझा मद व मोह पार निघून गेला आहे. मी मान व मात्सर्य यांपासून मुक्त झालों आहें. माझें चित्त दीर्घ कालानें आनंदित झालें आहे. माझा शोक फार दिवसांनीं शांत झाला आहे. स्वच्छ निश्चितबुद्धीनें 'मी बद्ध आहें' या भ्रमाला पुनः प्राप्त न होतां हे साधो! परमार्थाच्या दृढतेचें जें साधन सांगत आहेस किंवा राज्यपरिपालनादि करावयास जें सांगत आहेस तें सर्व निःशंकपणें मी करीन.

## सर्ग १३

—:❀:—

१. पूर्वी तत्त्वबोधाने वासनाक्षय होतो असें सांगितले होतें. आता प्राणनिरोधानेही तो होतो, असें सागण्यासाठीं भूमिका तयार करतात.

**श्रीरामः**—ब्रह्मन्! सम्यग्ज्ञानाच्या विलासानें वासनाक्षयाचा उदय झाला असतां मी आतां खरोखर जीवन्मुक्तपदीं आरूढ झालों आहें. पण आतां हे गुरो! प्राणस्पंदाच्या निरोधानें वासनाक्षयाचा उदय झाला असतां योगी जीवन्मुक्तपदीं कसा आरूढ होतो, तें मला सांगा.

**श्रीवसिष्ठः**—संसारांतून तरून पार जाण्याविषयीं जी युक्ति तीच योगशब्दानें सांगितली जाते. चित्ताचा उपशम हाच जिचा धर्म आहे अशी ती युक्ति दोन प्रकारची आहे. आत्मज्ञान हा हिचा एक प्रकार मीं उपशमप्रकरणांत भूलोकीं प्रकट केला. आतां मी जो हा प्राणसंरोध या नांवाचा तिचा दुसरा प्रकार सांगत आहें तो ऐक.

**श्रीरामः**—भगवन्! या दोन प्रकारांतील सुलभत्वामुळें व दुःख अधिक सुलभ व दुःखदायक नसले आणि म्हणून चांगला प्रकार कोणता? कीं जो नुस्ता अवगत झाल्यानेंच पुनः क्षोभ (चित्त विक्षेप) पीडा देत नाहीं?

**श्रीवसिष्ठः**—रामा! 'योग' या एकाच (ज्ञान व संरोध) शब्दानें दोन्ही प्रकार जरी सांगितले आहेत तरी तो शब्द 'प्राणाचा निरोध' या अर्थींच अतिशय रूढ झालेला आहे. एक योग व दुसरें ज्ञान असे दोन्हीं तेंच एक फळ देणारे उपाय संसारांतून तरून पार जाण्यास अधिकारानें एकसारखेच सांगितलेले आहेत. पण ज्याचें चित्त सुकुमार असल्यामुळें प्राणनिरोधाचें दुःख सहन करवत नाहीं त्याला योग असाध्य आहे; आणि ज्याचें चित्त कठोर असून विचार करण्यास समर्थ नाहीं त्याला ज्ञाननिश्चय असाध्य आहे. पण (शुद्धचित्त व विचारकुशल अशा) मला ज्ञाननिश्चय सुसाध्य वाटतो. ज्ञान व अज्ञान यांच्या स्वरूपांचा विवेक करण्याचें सामर्थ्य नसलें म्हणजे विचाराची अकुशलता असते. अज्ञान तर अज्ञातच आहे, कारण तें स्वभातही नसतें. पण ज्ञान सर्व अवस्थांमध्यें स्वतःच स्फुरतें. अर्थात् अज्ञान सर्वदाच साक्षीकडून प्रसिद्ध होत असल्यामुळें व ज्ञान स्वप्रकाश असल्यामुळें स्वतःच प्रसिद्ध असल्य कारणानें आणि अज्ञान व ज्ञान यांचें हें परस्पर वैलक्षण्य अनुभवानेंच सिद्ध असल्यामुळें विवेक संभवतो. त्यामुळें ज्ञान सुकर आहे. पण योग तसा सुकर नाहीं. तर तो दुष्करच आहे, असा भावार्थ. त्याचप्रमाणें पर्वतशिखर, चंद्र, नक्षत्र, हृदय, कंठ, तालुमूल, भ्रूमध्य इत्यादि धारणेचे देश, सम, शुचि, वाळू, दगड, कांटे इत्यादिकांनीं रहित असे आसनाचे प्रदेश, इत्यादि बाह्य साधनांनीं योग करावा लागत असल्यामुळें तो सहज साध्य होत नाहीं. किंवा मंदमति, निरुत्साह मूर्ख लोक कल्पना करतात त्याप्रमाणें धीर, समर्थ व यत्नशील अधिकारी पुरुषाला शास्त्रीय साधनांविषयीं सुसाध्य, कष्टसाध्य इत्यादि विकल्प करणें उचित नाहीं. हे रघुश्रेष्ठा!

ज्ञान व योग हे दोनच उपाय शास्त्रांत आहेत, त्यांतील ज्याचें ज्ञेय निर्मल ब्रह्म आहे असें अन्तःस्थ ज्ञान मीं तुला सांगितलें. आतां हे साधो! प्राण व अपान यांचें समत्व संपादन करणें, या रूपानें रूढ झालेला, त्यासाठीं दृढ देहाच्या गुहेंत रहाणें जरूर लागते असा योग ज्यांना आकाशगमनादि सिद्धि हव्या असतील त्यांना त्या देणारा व ज्यांना ज्ञानाची इच्छा असेल त्यांना ज्ञान देणारा हा योग तूं ऐक. हे राजपुत्रा! तूं उक्त चित्तानें, प्राणसच राचा निरोध करून मुळें प्राप्त होणाऱ्या प्रतिष्ठेस पोंचून या प्रत्यगात्मस्वरूप अक्षय पर पदीं अभ्यासाच्या चित्तवृत्तिनिरोधरूप योगयुक्तीनें समाहितस्थिति व वाणीचा विषय होणें गान जो निरतिशयानन्द तद्रूप होसाता रहशील.

## सर्ग १४

—:*:—

१. देवसभेंत यश ऐकलेल्या भुशुंडाला पाहण्याच्या इच्छेने वसिष्ठाचें गमन, २. मेरु व मेरुशिखर यांचें वर्णन.

**श्रीवसिष्ठः**—योग्यांच्या विश्रांतीचें स्थान म्हणून वर वर्णिलेल्या त्या अनंत परम पदाच्या एका अविद्याच्छादित प्रदेशामध्यें मेरुभूमीवर जसें मृगजळ त्याप्रमाणें, जगद्रूप परिस्पंद आहे. त्यांत मनु कश्यप-प्रभृति प्रजापतीच्या कारणत्वास प्राप्त झालेला कमलोद्भव ब्रह्मा असंख्य भूतांनीं भरलेला हा जगद्भ्रम उत्पन्न करून पितामह होऊन राहिला आहे. त्याचा मी वसिष्ठ मानसपुत्र आहें. मी श्रेष्ठ आचरण करतों; मी ध्रुवानें धारण केलेल्या सप्तर्षिचक्रांत वैवस्वत मन्वंतरांत राहतों. त्या मी एकदां स्वर्गांत इंद्राच्या सभेंत असतांना नारदादिकांच्या तोंडून अतिशय दीर्घकाल जिवंत राहणाऱ्या पुरुषाची कथा केली. एक कथा चालली असतां त्या प्रसंगानें शातातपनांवाचा अल्प भाषण करणारा, मानार्ह महामति मुनि असें सांगूं लागला.—"मेरूच्या ईशान्य कोनांतील पद्मरागरत्नमय शृंगावरील नभोभागांत 'चूत' या नांवाचा प्रसिद्ध कल्पतरु आहे. त्या कल्पवृक्षाच्या शिखरावरें दक्षिणेकडील शाखेच्या सुवर्णरौप्यमय वेलींनीं झाकलेल्या ढोलींत एक पक्ष्याचें घरटें आहे. जसा आपल्या कमलांच्या मोठ्या कोशांत ब्रह्मदेव राहतो त्याप्रमाणें त्या घरट्यांत विरक्त भुशुंड या नांवाचा एक श्रीमान् वायस राहतो. जसे या स्वर्गलोकीं देव चिरकाल जिवंत राहतात त्याप्रमाण तो चिरंजीवी तेथें राहतो. तो कधीं भूतकालाचा विषय झाला नाहीं व भविष्यत्कालाचा विषय होणार नाहीं. तो दीर्घायु आहे. तो विरक्त आहे, तो श्रीमान् आहे, तो महाबुद्धिमान् आहे. त्याची मति विश्रांति पावलेली असल्यामुळें तो शांत, रम्य व कालज्ञ आहे. तो पक्षी जसा राहतो तसें जर या संसारांत आयुष्य घालविलें तर तेंच पुण्य, दीर्घ व उत्कर्षयुक्त जीवित होय." असें पुनः विचारलेल्या त्या मुनीनें भुशुंडाचें वर्णन केलें. त्यानें देवांच्या सभेंत तें खरेंच सांगितलें. जसें होतें तसेंच वर्णन केलें. पुढें कथेचा काल सपून देवसमुदाय सभेंतून उठून गेला असतां मी कौतुकानें त्या भुशुंड पक्ष्याला पहाण्यासाठीं मेरूच्या ज्या उत्तम पद्मरागमय मोठ्या शृंगावर तो रहात होता तेथें एका क्षणांत आलों. तें शृंग रत्न व गेरु यांनीं रमणीय झालेल्या अग्नीसारख्या दीप्त तेजानें जणुंकाय मधुर मदिरेच्या रसानेंच दिशांच्या समूहास लाल करीत होतें. कल्पान्तीं उठलेल्या भयंकर ज्वालांचा गोळाच जणुंकाय तो पर्वत झाला आहे, असा शोभत होता. इंद्रनील मण्याच्या शिखेप्रमाणे वर पसरलेल्या प्रभा हेच जणुंकाय त्याचे धूम होते. त्या शृंगावर जणुंकाय सर्व लालपणा व सर्व

प्राण्यांच्या दर्शनेच्छा यांची किंवा सर्वांच्या ( आरक्त ) प्रेमाची रासच केली होती. संध्याकाळच्या सर्व मेघसमूहांची ती एक निबिड खाणच होती. मेरूच्या जठरांतून सुषुम्ना नाडीनें ब्रह्मरंध्राचा भेद करून बाहेर निघालेला व शिरःप्रदेशीं आलेला जो वडवाग्नीसारखा जठराग्नि त्याप्रमाणें तें शृंग दिसत होतें. सुमेरु पर्वतावरील वनदेवतेनें कौतुकानें चंद्राला धरण्यासाठीं आकाशांत पसरलेल्या व ताज्या मेंदीच्या रसानें रंगविलेल्या हाताच्या जुळलेल्या बोटांप्रमाणेंच जणुंकाय तें शिखर दिसत होतें. माळेप्रमाणें गुंफलेल्या ज्वालांनीं आकाशांत जाण्यासाठींच जणुंकाय निघालेल्या आणि त्यासाठींच पर्वतावर आरूढ झालेल्या, हव्याला वाहून नेणारा असल्यामुळें ज्याच्या मुखांत अग्निहोत्राहुतिरूप पय आहे अशा ब्राह्मणाच्या अध्वराग्नीसारखेंच तें शिखर त्याच्यावरील स्वच्छ पाण्याच्या झऱ्यामुळें दिसत होतें. ज्याचीं नखाग्रें रत्नकिरणांनीं चमकत आहेत अशा तीन शृंगाग्ररूप अंगुलींनीं अश्विनीप्रभृति नक्षत्रांना स्पर्श करून मोजण्यासाठींच जणुंकाय आकाशास व्यापणारें तें शिखर उंच झालें होतें. गर्जना करणारे मेघ हेच ज्यांतील मृदंग आहेत, असा तो भूमीनें धारण केलेल्या वनलक्ष्मींचा जणुंकाय नृत्यमंडपच होता. जें हंसणाऱ्या पुष्पगुच्छांनीं संपन्न आहे, ज्याच्यावर गुंजारव करणाऱ्या भ्रमरांचा समूह आहे, जें शृंग दंतपंक्तीप्रमाणें विकास पावणाऱ्या ताडपत्रांच्या समूहानें हंसत असल्याप्रमाणेंच दिसत होतें, ज्या शृंगावरील झोंपाळ्यांवर झोंके घेणारा अप्सरांचा समूह आहे, ज्यावरील सर्व प्राण्यांचा मद व मन्मथ उत्कट आहे, ज्याच्या गुहेंतील शिळांवर विश्रांति घेणारीं देवांचीं जोडपीं बसलेलीं आहेत, असें तें शृंग आकाश हेंच ज्याचें उत्तम अजिन आहे, शुभ्र-गंगा हेंच यज्ञोपवीत आहे, अशा वेळु ह्याच दंडांना धारण करणाऱ्या पिंगटवर्ण तापसाप्रमाणेंच शोभत होतें. गंगेच्या प्रवाहानें सुंदर झालेलें, ज्याच्या लतागृहांत देव आहेत असें, गंधर्वांच्या गीतानें सुभग झालेलें, सुगंधामुळें ज्यावरील वारा अतिशय मधुर वहात आहे, फुललेलीं सुवर्णकमलें हींच ज्याचीं कर्णभूषणें आहेत, नक्षत्रें याच रत्नांनीं जें अतिशय भूषित झालेलें आहे असें तें मेरूचें पिंगटवर्णाचें शिखर आकाशाच्या जणुंकाय पार गेलें होतें. पांढरा, हिरवा, पिवळा, लाल, धवल इत्यादि वनांतील पुष्पांच्या राशींच्या नव्या नव्या रंगांनीं ज्यानें अंतरिक्षांत रोजच्या रोज सुंदर चित्रें काढलीं आहेत अशा त्या देवस्त्रीसमूहाच्या क्रीडापर्वतासारख्या मेरूच्या शिखरास मी प्राप्त झालों.

---

## सर्ग १५

१. त्या शृंगावरील 'चूत' कल्पवृक्ष, पुष्प-पल्लवादिकांची संपत्ति, त्याच्या डाळीवरील कावळ्यांचें कुळ व त्यांतील भुशुंड याचें वर्णन.

श्रीवासिष्ठः—पुष्पांनीं भरलेले कल्पमेघ हेच ज्याचे केंस आहेत अशा त्या पर्वतशिखरावर, ज्यांचे अवयव प्राण्यांच्या इच्छा पूर्ण करण्यास समर्थ आहेत अशा शाखा सभोंवार पसरल्यामुळें शाखाचक्राप्रमाणेंच स्थित असलेल्या त्या वृक्षास मी पाहिलें. पुष्पांचा पराग याच अन्नानें तो वृक्ष व्याप्त होता, रत्नगुच्छ ह्याच पुढें आलेल्या दांतांनीं तो शोभत होता. त्या वृक्षानें आपल्या उंचीनें आकाशाला जिंकलें होतें; तो वृक्ष पूर्वी वर्णिलेल्या पर्वताच्या शिखरावर जणुंकाय दुसरें शिखरच होतें; नक्षत्रांमुळें ज्याच्या पुष्पांची शोभा दुप्पट वाढली आहे, मेघांमुळें ज्याचे

पल्लव दुप्पट झाले आहेत, किरणांमुळें ज्याचें परागपटल दुप्पट झालें आहे, विजेमुळें ज्याच्या मंजऱ्यांची शोभा दुप्पट झाली आहे, किन्नरींच्या गायनामुळें ज्या वृक्षावरील भ्रमरांचा गुंजारव दुप्पट वाढला आहे, झोंपळ्यावर बसून झोंके घेणाऱ्या अप्सराजनांच्या ओंठ, हात, पाय इत्यादिकांमुळें ज्याचा पल्लवसमुदाय दुप्पट झाला आहे, वाटेल तें रूप घेतां येत असल्याकारणानें स्वैर विहार करण्यासाठीं पक्ष्यांचा वेष घेतलेल्या सिद्ध व गंधर्व यांच्या समूहामुळें ज्यावरील उडणारे पक्षी जणूकाय दुप्पट भासत आहेत, रत्नकांतिरूप स्वच्छ देवाच्या योगानें दुप्पट झालेल्या त्वचेनें जणूकाय वस्त्राच्छादित झाल्याप्रमाणेंच जो दिसत आहे, चंद्रबिंबाच्या स्पर्शामुळें ज्याचीं फळें फार मोठमोठीं व दुप्पट झालीं आहेत, शाखांच्या मूळाशीं चिकटलेल्या कल्पमेघांनीं ज्याचीं पेरें दुप्पट झालीं आहेत, ज्याच्या खांद्या [illegible] युक्त आहेत, ज्याच्या पानांवर किन्नर [illegible] घेत आहेत, निकुंज व कुंज हे ज्या[illegible] मेघ आहेत, ज्याच्या पृष्ठभागीं देव[illegible] क[illegible]जले आहेत, अप्सरा याच भ्रमरींनीं आपल्या बांगड्यांच्या ध्वनीनें भ्रमरांना उडवून ज्याच्या उत्तम आकारानें विपुल अशा निरनिराळ्या पुष्पांतील मध घेतला आहे, जो देवश्रेष्ठ, किन्नरश्रेष्ठ, गंधर्वश्रेष्ठ व विद्याधरश्रेष्ठ यांनीं युक्त आहे, जो वृक्ष ब्रह्मांडाप्रमाणें स्थित आहे, ज्यांना मर्यादाच नाहीं अशा दाही दिशांना भरून टाकणारा, ज्यावर दाट कळ्यांचा समूह आहे, दाट मृदु पल्लव आहे, ज्याच्यावर विकास पावणारी पुष्पें दाट आहेत, ज्याच्या आसपास दाट वनमाला पसरली आहे, ज्याच्यावर अगदीं गर्द मंजऱ्यांचा समूह हेच दाट रत्नगुच्छ आहेत, जो कल्पवृक्ष कामना करणाऱ्यांची इच्छा परिपूर्ण करण्यासाठीं उत्तम वस्त्रें व रत्नें यांनीं युक्त आहे, जो लतांच्या विलासानें—नृत्यानें आकुल झाला आहे, सर्व ठिकाणीं पुष्पांच्या पुरांनीं भरलेला, सर्वत्र फल व पल्लव यांनीं युक्त असलेला आणि सर्व प्रकारच्या सुगंधयुक्त रजःपुंजांनीं अत्यंत वैचित्र्यास प्राप्त झालेला असा तो वृक्ष होता.

त्याच्या प्रत्येक खांदीच्या शाखामूलांत, लतांनीं झांकलेल्या शाखाग्रांत, लतापत्रांवर, प्रत्येक पेरावर व पुष्पांत असलेल्या घरट्यांतून लपून बसलेल्या पक्ष्यांस मीं पाहिलें. चंद्राच्या कलांचे तुकडे हींच मृणालशकलें त्यांवर पुष्ट झालेल्या, त्याचप्रमाणें शुभ्र कमलिनीचे कंद हेच ज्याचे ग्रास आहेत अशा ब्रह्मदेवाच्या वाहनरूप हंसांस, त्याचप्रमाणें ब्रह्मदेवाच्या हंसाच्या सामगायन करणाऱ्या पिल्लांस मीं त्या वृक्षावर पाहिलें. ते हंस व त्यांचीं पोरें हे ॐकार व वेद यांच्या रहस्यार्थाचें आलोचन करण्यास सहाय्य होणारे, म्हणूनच मित्र होते. त्याचप्रमाणें त्याचें अध्ययन यथाशास्त्र गुरुमुखानें झालें होतें. जे मंत्रसमूह उच्चारीत आहेत, ज्यांचे आवाज स्वाहाकारासारखे वारंवार कानावर येत आहेत, शंख, विजेचे पुंज, व नीलवर्ण मेघ ह्यांच्या रंगांची ज्यांना उपमा आहे असे, देवांनीं यज्ञांत ज्यांना नित्य पाहिलें आहे, यज्ञवेदीवर पसरलेल्या हिरव्या दर्भांच्या पानाप्रमाणें ज्यांचा हिरवा रंग आहे अशा अग्नीच्या वाहनरूप शुकांस मीं पाहिलें. तसेंच अग्नीच्या ज्वालेप्रमाणें ज्यांची शिखा चमकत आहे, गौरीनें ज्यांच्या पिसाऱ्याचा समूह रक्षण केला आहे, स्कंदानें उपदेश केल्यामुळें ज्यांना शैवागमाचें संपूर्ण ज्ञान झालें आहे अशा कुमारस्वामीच्या श्रेष्ठ मोरांना मीं पाहिलें. आकाशांतच जन्मून, तेथेंच राहून म० भूमीवर न उतरतांच तथल्या तेथेंच कांहीं काल राहून आकाशांतच नाश पावणाऱ्या फार मोठ्या बलाढ्य आकाशपक्ष्यांना मीं पाहिलें. ते नेहमीं तेथल्या

इतर पक्ष्यांशीं खेळत असल्यामुळें त्यांचे बधुच होऊन त्या शिखरावर घरटीं बांधून राहिले होते व त्यांची आकृति शरदृतूंतील अभ्रासारखी शुभ्र होती. ब्रह्मदेवाच्या हंसांपासून झालेल्या, अग्नीच्या पोपटांपासून उद्‌भवलेल्या, कुमारस्वामीच्या मोरांपासून उत्पन्न झालेल्या, आकाशपक्ष्यांपासून झालेल्या दुसऱ्या पक्ष्यांना, ज्यांना दोन तोंडें आहेत अशा भारद्वाज पक्ष्यांस, ज्यांना सोन्याची चूडा आहे अशा पक्ष्यांस, कलविंकांच्या समूहास, गृध्र पक्ष्यास, कोकिलपक्ष्यास, कुक्कुटांस, भास, चाष, बलाका इत्यादिकास व हे राघवा! जगांत जसे नानाप्रकारचे असंख्य प्राणी दिसतात त्याप्रमाणें अशाच दुसऱ्याही पुष्कळ पक्ष्यांना, त्या वृक्षावर मीं पाहिलें.

त्यानंतर हे रामा! मीं आकाशांत स्थित होऊन दूर त्या वृक्षाच्या दक्षिणेकडील खांदीच्या दाट पानांनीं भरलेल्या ढाळीला पाहिलें, त्या शाखेला पाहिल्यावर लोकलोक पर्वताच्या अरण्यांतील कल्पान्तींच्या मेघांच्या समूहाप्रमाणें असलेल्या द्रोणकाक या जातीच्या कावळ्यांच्या मंडळास पाहिलें. त्याच्या समोंवार त्या वृक्षाच्या मंजऱ्यांची जणुंकाय माळच होती. त्यांत जों मी पाहत आहें तों एकान्तांतील शाखाच्छिद्रांत कावळे बसलेले होते. त्या कोटरांत विचित्र पुष्पें हांतरलेलीं होतीं. विविध सुवासांनीं तें कोटर शोभत होतें. पुण्यवान् लोकांच्या अप्सरांच्या उपभोगास योग्य असें तें स्थान होतें. त्या सभेंत प्रिय स्तबकावर बसलेले, शांत्यादिकांनीं युक्त असल्यामुळें अक्षुब्ध आकाराचे कावळे बसले होते. तेथें वायु मेघांना समभागांनीं विभागूनच जणुंकाय त्या कोटारांत पाठवीत होता. त्या सर्व कावळ्यांच्या मध्यभागीं श्रीमान् भुशुण्ड बसला होता. त्याची आकृति उंच होती. कावांच्या समूहांत मध्येंच उंच इंद्रनील मणी जसा असावा तसा तो त्या सभेंत शोभत होता. तो प्रसन्नचित्त, मान्य, सम, सर्वांगांनीं सुंदर, प्राणस्पंदाच्या निरोधामुळें नित्य अन्तर्मुख, सुखी, दीर्घकाल जिवंत राहिल्यामुळें चिरंजीवी म्हणून विख्यात असलेला, ज्याचें दीर्घ आयुष्य सर्व जगाला विदित आहे. असा तो पक्षी भुशुण्ड या नांवानेंच प्रसिद्ध होता. युगांची उत्पत्ति व नाश या दशा राहिल्यामुळें ज्याचें मन प्रौढ झालें आहे असा, प्रत्येक कल्पांत लोकपालांच्या, व ईशान, इंद्र, अग्नि यांच्या जन्मांची चक्रपरंपरा मोजतां मोजतां खिन्न झालेला, मागें होऊन गेलेल्या देवांना, असुरांना व राजांना आठवणारा, ज्याचें मन प्रसन्न व गंभीर आहे असा चतुर, स्निग्ध व मुग्ध शब्द बोलणारा, अत्यंत सूक्ष्म पदार्थांचेंव स्पष्ट प्रतिपादन करणारा, विज्ञाता, ममतारहित, अहंकारशून्य, सगळ्यांचा सुहृद्, बंधु, मित्र, मृत्यूला पुत्रासारखा प्रिय, बुद्धीनें बृहस्पतीहूनही समर्थ होता. ज्याअर्थीं तो सर्व प्राणिसमूहाच्या सर्व आरोपांचें अधिष्ठान होता त्याअर्थीं सर्व प्रकारांनींही सर्वदा सत्य, आणि सर्वांचें वर्णन करतांना सर्वसंमत होणारा असा तो होता. सारांश तो सरोवराप्रमाणें सौम्य, प्रसन्न, मधुर, रसवान्, महात्मा, हृदयंगम व आंत अखंड शैत्ययुक्त, हृदयकमलाचें छिद्र म्हणजे दहराकाशरूप, व्यवहारज्ञ, आपलें स्वच्छ गांभीर्य न सोडणारा व ज्याचा आशयश्री प्रकट आहे, असा होता.

## सर्ग १६

१. वसिष्ठ त्याच्या समोर आला. २. त्याची त्यानें आसनादि उपचारांनीं पूजा केली. ३. वसिष्ठानें त्याला जन्मकर्मादिकांविषयीं प्रश्न केला.

श्रीवसिष्ठः-त्यानंतर मी त्या भुशुंडाच्या पुढें आकाशांतून पर्वतावर नक्षत्र जसें पडतें

तसा देदीप्यमान शरीरानें पडलों. त्यामुळें भूकंप झाला असतां सागर जसा क्षुब्ध होतो त्याप्रमाणें त्यांची सभा क्षुब्ध झाली. माझ्या पडण्यामुळें उत्पन्न झालेला जो मंद वायु त्यानें तें वायसांचें सभागृह नीलकमलांनीं भरलेल्या सरोवराप्रमाणें क्षुब्ध झालें. एकाएकीं तेथें गेलेल्याही मला पाहिल्याबरोबर भुशुंडानें हा वसिष्ठ आला आहे, असें जाणलें; आणि पर्वतावरून लहानसा ढग जसा उठावा त्याप्रमाणें तो पानांच्या झुबक्यांतून उठला; आणि मधुर अक्षरांनीं ' हे मुने, तुझें स्वागत असो ' असें त्यानें म्हटलें. जसा मेघ थंड पाणी देतो त्याप्रमाणें लागलीच त्यानें केवल संकल्पानेंच उत्पन्न झालेल्या हातांनीं मला पुष्पांजलि अर्पण केली, आणि हे आसन असे म्हणून भृत्यांकडून आसन न आणवितां स्वतःच त्या काकराजानें कल्पतरूचें नवें पान आणून दिलें. त्यावर मुनि बसला आहे, असें पाहून आपणही बसावें, अशा आशयानें भुशुंड उठतांच, आपल्या कांति हेच ज्यांचे पसरणारे पंख आहेत असे उठून उभे राहिलेले पक्षी आपापल्या आसनांकड पाहूं लागले असता त्यानतर ज्याच्या सभोंवार पक्षिसमूह आहे, अशा भुशुंडासहवर्तमान मी त्या कल्पलतासमूहावरील आसनावर बसलों. मला अर्घ्य-पाद्यादि देऊन भुशुंड संतुष्टचित्त झाला; आणि तो महातेजस्वी पक्षी प्रेमानें मला असें मधुर वचन बोलला.

भुशुंडः—खरोखर ! फार दिवसांनीं आपण आम्हावर ही कृपा केलीत. आपण आम्हां जणुंकाय भाग्यवान् वृक्षांवर दर्शनामृताचा वर्षाव केला. मुने फार दिवसांनीं, माझ्या संचित पुण्यानेंच प्रेरणा केल्यावरून सर्व मान्यांतील मान्य अशा तूं आज कोठून आगमन केलेंस ? या महामोहामध्यें चिरकाल विहार करणाऱ्या तुझ्या पवित्र चित्तांत समता अखंडितच राहिली आहेना ! आज येथें येण्यासाठीं जो क्लेश झाला त्यानें शरीराला क्लिष्ट कां केलेंस ? आपलें आज्ञावचन श्रवण करण्याविषयीं उत्कंठित झालेल्या आम्हांला आज्ञा करण्यास तूं समर्थ आहेस. तुझ्या या आगमनपुण्यानेंच तूं आम्हांला नियुक्त केलें आहेस. हे मुने ! तुझ्या चरणदर्शनानेंच मीं सर्व जाणलें आहे. इंद्रसभेंत झालेल्या चिरंजीविलोकाच्या चर्चेच्यामुळें आमची तुम्हांला आठवण झाली, आणि त्यामुळें तूं आपल्या पायांनीं हें स्थान व हा जन यांस पावन केलें आहेस. याप्रमाणें मीं तुझ्या आगमनाचें कारण जरी जाणलें आहे तरी मी तें तुला विचारतों. कारण आपल्या वाक्यामृताचा स्वाद घेण्याची इच्छा मनांत विकास पावत आहे. याप्रमाणें तो चिरंजीवी शुद्ध त्रिकालज्ञानी पक्षी भुशुंड मला म्हणाला. तेव्हां मी त्याला असें बोललों.

श्रीवसिष्ठः—हे महाराज पक्षिश्रेष्ठा ! तूं हें अगदीं खरें सांगितलेंस. मी आज तुज चिरंजीवीलाच पाहण्यासाठीं आलों आहें. मोठी आनंदाची गोष्ट आहे कीं तूं अन्तःकरणांत अतिशय शीतल आहेस. तुझें कुशल आहे. तूं ज्ञानस्वरूप आहेस. त्यामुळें या भयंकर संसारजालांत पडला नाहींस. तेव्हां मला शंका आली ती आपण निवारावी. आपण कोणत्या कुलांत उत्पन्न झालां ? आपणाला ज्ञेय ब्रह्म कसें ज्ञात झालें ? हे साधो ! तुझें आयुष्य—वय किती आहे ! मागील कांहीं वृत्तान्त तुला आठवतो का ? तुज दीर्घदर्शी महात्म्याला राहण्यासाठीं हें स्थान कोणीं दिलें ?

भुशुंडः—हे मुने ! तूं जें विचारीत आहेस, त्या सर्वांचें मी वर्णन करतों. आपणासारख्या महात्म्यानें मोठ्या यत्नानें चित्ताला उद्विग्न न होऊं देतां कथा ऐकावी. त्रिभुवनाच्या ईश्वरांनाहीं पूज्य असलेले तुमच्या सारखे उत्तम बुद्धीचे पुरुष ज्या वृत्तान्ताला ऐकतात तो

वृत्तान्त सांगितल्यानें, वृष्टि, छाया, वन इत्यादि मेघजन्य वैभवानें सूर्याचा ताप जसा दूर होतो, त्याप्रमाणें वक्ते व श्रोते यांचें पाप विनाश पावतें.

## सर्ग १७

—:*:—

१. जीवन्मुक्ताला उचित असलेल्या गुणाचें वर्णन. विचारलेला वृत्तान्त कथा भुशुंडे. सांगता झाला.

**श्रीवसिष्ठः**—नंतर रामा! तो भुशुंड इष्ट लाभानें फार हृष्ट झाला नाहीं; त्याची बुद्धि वक्र नव्हती. तो सर्वांगांनीं सुंदर होता. पावसाळ्यांतल्या मेघाप्रमाणें श्यामवर्ण होता. त्याचें वचन स्निग्ध व गंभीर होतें. तो गालांतल्या गालांत हंसून बोलत असे. तळहातावरील बिल्वफळाप्रमाणें त्यानें त्रिभुवनाची इयत्ता निश्चित केली होती. त्यानें सर्व विषयसमूहाला तृणासारखें तुच्छ लेखिलें होतें. लोक मोठ्या वेगानें कामाच्या मागोमाग धांवत असलेले पाहून त्यांना जन्ममरणरूप संसार हेंच फळ मिळणार आहे, असा त्यानें निश्चय केला होता. त्यानें ज्ञानानें पर व अवर ब्रह्माला साक्षात् जाणलें होतें. अमृतोत्पादनानंतर ज्यांतून मंदर पर्वत काढून घेतला आहे अशा क्षीरसागराप्रमाणें तो धीर, स्थिर व महाकार पक्षी विश्रांतीस प्राप्त झाला होता. तो संतुष्ट चित्त व शुद्ध होता. त्याची बुद्धि बाहेर सर्व प्रकारें विश्रांति पावलेली असून तो आंतून परमानंदानें पूर्ण व त्यामुळेंच शांत होता. या संसारांत ज्यांचा जन्म झाला आहे अशा सर्व वस्तूंचा आविर्भाव, तिरोभाव, त्याचें निमित्त माया आणि आत्मतत्त्व यांना तो जाणत होता. ज्याचें वचन प्रिय, मधुर, व श्रवण करण्यास उचित अशा वीणागानाप्रमाणें हृद्य आहे, साक्षात्कारामुळें सर्व भयाचा अपहार करणारें स्वयं ब्रह्मच जो झाला आहे, पण जगाच्या उद्धारासाठीं ज्यानें नव्या शरीराचा आश्रय केला आहे व त्यामुळेंच जो सहजानन्दपूर्ण आहे, असा तो भुशुंड माझ्या प्रश्नाचें उत्तर देण्यासाठीं तयार झाल्यामुळें सुंदरस्वरूप दिसूं लागला. विनयादि उपचारक्रम न सोडतां तो भुशुंड मला शुद्ध स्वरूप—समग्र आत्मस्वरूप सांगण्यासाठीं निर्मल वाणीनें असें बोलला. सुंदर मेघ आपल्या गर्जनेनें मधुपान करणाऱ्या मधुकराला जसें तेंच तेंच सांगतो त्याप्रमाणें भुशुंडानें ब्रह्मानंदाविषयीं पूर्वींच रसज्ञ असलेल्या मला उद्देशून त्याचाच (मला ज्ञात असलेल्या या ज्ञानाचाच) अनुवाद केला.

## सर्ग १८

—:*:—

१. हर, त्याचे गण, मातृका, त्यांचा पानोत्सव व उन्माद यांचें भुशुंड वर्णन करतो.

**भुशुंडः**—या जगांत हर या नांवाचा देवाधिदेव आहे. तो सर्व स्वर्गवासी देवांमध्यें श्रेष्ठ आहे. सर्व देवांचे देव त्याचें अभिवादन करीत असतात. भ्रमरांच्या पंक्तीप्रमाणें जिचे नेत्र आहेत व गुच्छाप्रमाणें उन्नत जिचे स्तन आहेत अशी त्याची विलासिनी पत्नी आम्रवृक्षावरील लतेप्रमाणें त्याच्या शरीराच्या अर्धभागीं राहते. बर्फ व मोत्यांचा हार यांप्रमाणें शुभ्र, लहरी—लाटा यांचीं स्तबकांनीं गुंफलेली व जटासमूहाला वेष्टिणारी अशी गंगा हीच ज्याची पुष्पमाळा आहे, क्षीरसमुद्रापासून उत्पन्न झालेला, ज्याच्यापासून अमृताचे पाझर सुटले आहेत असा, दर्पणासारखा स्वच्छ व कांतिमान् चंद्र ज्याचा चूडामणि आहे, ललाटावरील चंद्राच्या अमृताचा पाझर एकसारखा सुटल्यामुळें अमृतासारखा अनुकूल झालेला व

इंद्रनील रत्नाप्रमाणें दिसणारा कंठांतील कालकूट ज्याचें विभूषण आहे, त्याचप्रमाणें स्वच्छ नेत्राग्नीपासून उत्पन्न झालेले, प्रलयकालाच्या वावटळींचे कल्लोळ ज्याच्यापासून होतात असें, स्थूल भूतें क्रमानें सूक्ष्म-सूक्ष्म होत जाऊन शेवटीं परम सूक्ष्म अव्यक्तरूप होऊन रहात असल्यामुळें परमाणुमय, शुभ्र, साक्षिरूप चिन्मात्रजलानें भिजविलेलें मायारूप ज्ञानजल हेंच भस्म ज्याचें भूषण आहे, निर्मलपणानें ज्यांनीं चंद्रालाही जिंकलें आहे, अशी सहाणेवर घासलेल्या रत्नाप्रमाणें शुद्ध केलेलीं, माळेच्या वगैरे आकारांनीं रचलेलीं, सर्व शरीरांत मनोरम जीं ब्रह्मादिशरीरें तन्मय--तद्विकारभूत अस्थि ज्याचीं रत्नें आहेत, चंद्र व अमृत ह्यामध्यें धुतलेलें, निळे मेघ ह्याच ज्याच्या दशा आहेत, नक्षत्ररूपी बुंदक्यांनीं ज्याला चित्रविचित्र केलें आहे असें आकाश म्ह० दिशा हेंच ज्याचें वस्त्र आहे, भटकणाऱ्या भालू याच सुंदर दासींनीं भाजलेलें नरमास, व बळी, पिंड इत्यादिकांचा भात यांनीं भरलेलें, बर्फासारखें पांढरें, गांवाच्या बाहेर असणारें श्मशान हेंच ज्याचें गृह आहे, नररुंडाच्या माळा ज्यांचीं भूषणें आहेत, रक्त व वसा हेंच आसव ज्यांनीं प्यालें आहे, आंतडीं याच पुष्पांच्या माळांनीं ज्या युक्त आहेत अशा मातृगण ज्याचे क्रीडेंतील गडी-सोबती आहेत, ज्यांच्या मस्तकांतील मणि चमकत आहेत, जे निरनिराळीं भूषणें होण्यासाठीं अंगांवरून फिरत आहेत, ज्यांचीं सर्व अंगें मऊ व तुळतुळीत आहेत, व ज्यांची अंगकांति सोन्यासारखी चमकत आहे असे सर्प हींच ज्याचीं वलयें--कडीं आहेत, ज्यानें केवल दृष्टिपाताने मोठमोठ्या पर्वतांना जाळीलें, जगाचा एक ग्रास करण्याची ज्याला शक्ति आहे, व लीलेनेंच सर्व असुरांना भयभीत करतो, असें ज्याचें भयंकर चरित्र आहे, सत्यसंकल्पत्वामुळें त्यानें कल्याणचिंतताच सर्व जग स्वस्थ केलें व त्यामुळेंच ज्याचें चित्त समाधींत स्थित असतें अशा त्याच्या कराचा यदृच्छेनें झालेला स्पंद असुरांच्या नगरांचा सर्व असुरांचा क्षय करतो, तो ध्यानस्थ असल्याचें चिन्हच म्हणून स्नेह, राग, द्वेष यांनीं अगदीं रहित, भूमि व जल यांनीं युक्त असल्यामुळें सरस असले तरी चांगल्या भोजनानें तृप्त झाल्याप्रमाणें 'नीरस' म्ह० खाणें, पिणें इत्यादि इच्छांनीं रहित असे हिमालय, मेरु इत्यादि पर्वत ज्याच्या ध्यानाच्या अणुकाय साक्षात् मूर्तिच आहेत, ज्यांचीं मस्तकेंही धांवणें, फोडणें इत्यादि खुरांचीं कामें करण्यास समर्थ आहेत, तसेच ज्याचें खुर --पायही हाताचीं विचित्र शिल्पादि कामें करण्यास समर्थ आहेत, तसेच ज्याचे हात, दांत, तोंड व उदर यांचीं चावणें, खाणें पचविणें इत्यादि काम करण्यास समर्थ आहेत, भालू, उंट, बकर, व सर्प यांच्या तोंडांप्रमाणें ज्यांचीं तोंडें आहेत असे पारिषदगण हेच ज्याचे खेळगडी आहेत, आणि जसे गण त्याचप्रमाणें ज्याच्या सर्व अंगांमध्यें सर्व शक्ति आहेत अशा निर्मल कांतियुक्त माता--हाच तीन नेत्रांनीं शोभणारें ज्याचे मुख आहे अशा ज्या हराचा-परिवार आहे, ज्यांनीं सर्व भूतसमूहाला नम्र केलें आहे.--वांकविलें आहे, अशा [१] मातृदेवता त्या हराच्या पुढे नाचतात. चवदा भुवनांतील असंख्य भूतांचे वर्ग हेंच ज्याचें मुख्य भोजन आहे, गाढव व उंट यांच्या आकारांचीं ज्यांचीं तोंडें आहेत, रक्त, मेद व वसा हेंच ज्याचें पिण्याचे आसव आहे, त्या मातृदेवता दिगंतरीं विहार करीत असतात, प्राण्यांच्या शरीराच्या हात पाय

१. रसा हे पृथ्वीचे नाव आहे, व रस म्हणजे जल, त्यांनीं युक्त म्हणून सरस आणि नीरस म्हणजे विषय रागयुक्त--विषयेच्छेनें युक्त.

इत्यादि अवयवांच्या माळा त्या गळ्यांत घालतात, त्या पर्वतशिखरांवर, आकाशांत, लोकान्तरीं भूछिद्रांत, स्मशानांत व प्राण्यांच्या शरीरांमध्यें राहतात. जया, विजया, जयन्ती, अपराजिता, सिद्धा, रक्ता, अलंबुसा, व उत्पला ह्या त्या देवता आहेत. सर्व मातृदेवतांमध्यें या आठ जणी नायिका आहेत, दुसऱ्या माता यांच्या अनुचरी आहेत व आणखी कांहीं त्या अनुचरींच्याही अनुचारिणी आहेत. हे मानद मुनिनायका! त्या महाई मातांच्यामध्यें सातवी अलंबुसा म्हणून जी माता प्रसिद्ध आहे तिचें, विष्णूचें जसें गरुड हें वाहन आहे तसें, चंड या नांवाचा काक [illegible] आहे. त्याची चोंच वज्रासारख्या कठिण [illegible]वी आहे. व त्याला इंद्रनीलमण्यांच्या [illegible]च उपमा आहे. असो; अशा त्या वर सांगितलेल्या प्रकारच्या माता अणिमादि अष्ट [illegible]युक्त असून त्यांचें आचरण फार भयंकर होतें. विहाराच्या हेतूनें एकदां त्या सर्वजणी आकाशांत जमल्या. चित्तैकाम्याच्या द्वारा समाधींत परमार्थभूत स्वात्मतत्त्वाचा प्रकाशक असा मोठा पानोत्सव त्यांनीं केला. वाममार्गानें परशक्तीची आराधना करण्याचा जो प्रकार त्यांत अमलेल्या त्यांनीं तुंबुरु नांवाच्या रुद्रमूर्तीचा आराध्यरूपानें आश्रय केला होता. असो; सर्व जगाला पूज्य असलेले जे तुम्बुरु व भैरव या नांवाचे देव त्यांची पूजा करून मदिरेच्या मदानें अतिशय संतुष्ट झालेल्या त्या विचित्र अर्थाच्या कथा सांगू लागल्या. इतक्यांत त्यांच्या त्या कथाप्रसंगानें ही कथा आली. उमापति देव आम्हाकडे अवहेलनेनें कां पाहतो? आपण त्याला आपला प्रभाव दाखवू या, म्हणजे आमची महाशक्ति पाहतांच तो पुनः आमची अशी अवधीरणा--तिरस्कार करणार नाहीं. असा निश्चय करून त्या सर्व देवींनीं उमेला आपल्या वेश करून घेऊन तिच्या तोंडाचा व अवयवांचा वर्ण निराळाच केला, आणि यज्ञांत ज्याप्रमाणें पशूचें प्रोक्षण करितात त्याप्रमाणें समंत्र जलानें त्यांनीं तिचें प्रोक्षण केलें. त्यांनीं उमेचें भर्त्यापासून कपटानें हरण केलें; आणि मातृमंडलांत आलेल्या चंचल केसांच्या तिला देवींनीं भक्ष्य-भोज्यादि अन्न होण्यासाठीं अणुकाय शाप दिला. पार्वतीचें प्रोक्षण करण्याच्या दिवशीं त्या सर्व मातृदेवतांचा नृत्य व गान यांनीं मनोहर असा महोत्सव झाला. त्यावेळीं सर्व आकाश अत्यानंदानें व अत्यंत गंभीर ध्वनीनें भरून गेलें. त्या आपल्या लांब लांब अवयवांचा इतस्ततः विक्षेप करीत होत्या, त्यामुळें त्यांचे जघन व उदरप्रदेश विकास पावूं लागले. दुसऱ्या कित्येक जणी मोठमोठ्या टाळ्या वाजवून व सिंहनाद करून मेघाच्या ध्वनीसारख्या हंसल्या. त्या सुंदर अंगविक्षेप करून पर्वत व अरण्यें यांना आपल्या ध्वनीनें ध्वनियुक्त करत्या झाल्या. मद्याच्या यथेच्छ पानानें संतुष्ट झालेल्या दुसऱ्या कांहीं देवी पर्वत व गृहें यांना ध्वनियुक्त करीत गाऊं लागल्या. कांहींजणी चंद्रोदयाच्या रागानें रंगयुक्त होऊन आवाज करणाऱ्या समुद्राच्या पाण्याप्रमाणें गर्जना करूं लागल्या. कित्येकींनीं डोक्यापासून पायांच्या खुरांपर्यंत सर्व अंग भरून जाईपर्यंत रक्त-वसादिकांचें पान केलें. त्यावेळीं त्यांनीं लीलेनें केलेला जो घुरघुर शब्द त्यानें आकाश दुमदुमून गेलें. सारांश ज्यांचें आचरण उन्मत्त आहे अशा त्या देवींनीं पेयें प्यालीं, मोठ्यानें गान केलें, सत्वर गमन

१. अशा त्या सर्वजणी मिळून शतकोटी चामुंडा आहेत.

१. त्यांच्या मूर्तींतच उमा अन्तर्भूत होणारी असल्यामुळें तिला स्वाधीन करून घेतलें. त्यामुळें [illegible]

केलें, भाषण केलें, त्या हंसल्या, त्यांनीं एकमेकींचें रक्षण केलें, त्यांनीं एकमेकींच्या तोंडांत होम केला, त्या एकमेकींच्या मागें पळाल्या, त्यांनीं मोठयानें वल्गना केल्या, त्या नाचल्या, त्यांनीं सतत गोड मांस खाल्लें आणि याप्रमाणें सर्व त्रिभुवनाला उलटून टाकलें.

---

## सर्ग १९

—:•:—

**१. ब्राह्मी देवीच्या हंसींशीं चंडकाकाचा समागम झाल्यामुळें भ्रात्यांसह माझा जन्म झाला. २. ब्राह्मीदेवीच्या प्रसादानें मला ज्ञान झालें. ३. पित्याला उत्तम स्थानाची प्राप्ति झाली.**

**भुशुंडः**—त्या देवीचा असा मोठा महोत्सव चालला असतां त्यांचीं तीं उत्तम वाहनें म्हणजे पक्षी तसेच उन्मत्त झाले. ते हंसले, नाचले व त्यांनीं रक्त प्राशन केलें. त्या महोत्सवामध्यें आसवानें उन्मत्त झालेल्या ब्राह्मीदेवीच्या रथाच्या हंसी व अलंबुदेवीच्या रथाचा चंडकाक आकाशांत एकत्र नाचूं लागलीं. नाचणाऱ्या व आसव पिणाऱ्या त्या हंसींचें समुद्राच्या वेलातटीं उत्तम प्रेम जडलें. त्याच्या कामाचें उद्दीपन होऊन त्या अनुरागसंपन्न झाल्या. ज्यांच्या चित्तांत अनुराग उत्पन्न झाला आहे अशा त्या सर्व मत्त हंसी क्रमानें चंडकाकाशीं रत झाल्या, कारण त्यावेळीं त्या सर्वजणी मत्त झाल्या होत्या. त्या सात कुलहंसींना प्रिय झालेला हा काक क्रमानें एकेका हंसीशीं एकेकीची इच्छा तृप्त होईपर्यंत रत झाला, तेव्हां त्या सर्व हंसी अतिशय संतुष्ट होत्सात्या गर्भवती झाल्या. नंतर नृत्य करून भागलेल्या त्या देवी अतिशय शांतचित्त होऊन परत आल्या. अमरूपत्वास प्राप्त झालेल्या प्रिय उमेला त्या महा मायावी देवींनीं शूलपाणि ईश्वराला भोजनार्थ अर्पण केलें. परंतु 'यांनीं माझी प्रियाच मला भक्षण करण्यासाठीं दिली आहे' असें जाणून चंद्रशेखर जेव्हां त्यांच्यावर रागावला तव्हां त्यांनीं तिला आपल्या अंगापासून उत्पन्न करून पुनः विवाहविधीनें पार्वती शंकराला दिली. [illegible] त्या सर्व देवी, हर व पार्वती आणि त्या[illegible] परिवार इत्यादि सर्व अतिशय संतुष्टचित्त होऊन आपापल्या दिशेस गेले. हे मुनीश्वरा ! त्या ब्राह्मीच्या हंसी जेव्हां गर्भवती झाल्या तेव्हां त्यांनीं घडलेला सर्व वृत्तान्त जसाचा तसाच ब्राह्मी देवीला निवेदन केला.

**ब्राह्मीः**—बालांनो, तुम्ही आतां गर्भवती झालां आहां, त्यामुळें तुम्ही आतां माझा रथ ओढण्यास समर्थ नाहीं. यास्तव तुम्ही [illegible] पासून यथेच्छ संचार करा. गर्भाच्या [illegible] मंद झालेल्या त्या सर्व हंसींना [illegible] दयाळु देवी ब्राह्मी मोठ्या आनं[illegible] समाधींत स्थित झाली. नंतर गर्भा[illegible] मंद झालेल्या त्या राजहंसी विष्णूच्या नाभिकमलांत ब्रह्मदेवाच्या उत्पत्तिस्थानीं संचार करीत राहिल्या. नंतर त्यांचे गर्भ परिपक्व झाले असतां नाभिकमलाच्या पाकळीवर, वेली जशा अंकुरांना प्रसवतात त्याप्रमाणें, त्या कोमल अंड्यांना प्रसवल्या. त्यानंतर तीं सारयुक्त एकवीस अंडीं योग्य काल प्राप्त झाला असतां—आंतील गर्भ पूर्ण होऊन ते पायांनीं हालचाल करूं लागले असतां ब्रह्मांडाप्रमाणें द्विधा भिन्न झालीं—तीं फुटलीं. हे मुने ! त्या अंड्यांपासून हे आम्ही सर्व उत्पन्न झालों. आम्ही असे हे एकवीस चंडपुत्र भ्राते आहों. त्या कमलपल्लवावरच आम्ही सर्व उत्पन्न होऊन वाढलों, योग्यसमयीं आम्हांला पंख फुटले व आम्ही आकाशांत उड्डाण करण्यास समर्थ झालों. त्या नंतर आम्हीं आमच्या हंसी आयांसह पूज्य ब्राह्मीची फार दिवस उत्तम आराधना केली.

पुढें योग्य समयीं समाधि सोडून व्युत्थान पावलेल्या व अनुग्रह करण्यास तत्पर झालेल्या त्या पूज्य देवीनें हे मुने, आम्हांवर असा अनुग्रह केला कीं, ज्यामुळें आम्ही मुक्त होऊन राहिलों आहों. नंतर अत्यंत शांतचित्त होऊन एकांतांत ध्यानस्थितीमध्यें शांतपणें आऊन राहूं या, असा निश्चय करून आम्ही आपल्या पित्यापाशीं गेलों. तेव्हां पित्यानें आम्हांला आलिंगन दिलें. आम्हीं अलंबुसा देवीची पूजा केली. तिनें कृपादृष्टीनें आम्हांकडे पाहिलें व आम्हीं विनयादि गुणांनीं संपन्न होऊन तेथें राहिलों.

चंड:—पुत्रांनो ! तुम्ही या अनन्त वासनातंतूनीं गुंफलेल्या संसारजाळ्यांतून खरोखर बाहेर पडलां आहां काय ? जर पार पडला नसाल तर आपण या भृत्यवत्सल भगवतीची प्रार्थना करूं या, म्हणजे तुम्ही ज्ञानामध्यें पारंगत व्हाल.

कावळे:—बाबा ! आम्हीं ब्राह्मीं देवीच्या प्रसादानें ज्ञेय ब्रह्म उत्तम प्रकारें जाणलें आहे. पण आम्हांला एकान्तवास करता येईल अशा एका उत्तम स्थानाची आकांक्षा आहे.

चंड:—सर्व रत्नसमूहांचा आधार, सर्व देवाचा आश्रय, व अतिशय उंच असा मेरु या नांवाचा एक प्रसिद्ध पर्वत आहे. चंद्र व सूर्य हे दोन ज्यांत मोठे दिवे लाविले आहेत, व जो प्राण्यांच्या समूहांनीं कुटुंबी झाला आहे अशा ब्रह्मांडमंडपाच्या आंत तो मेरु सोन्याचा खांबच होऊन राहिला आहे. सुवर्णाच्या चंद्राकार मूळपीठानें संपन्न, रत्नयुक्त शिखरें हींच ज्यांचीं बोटें आहेत व द्वीपामध्यें ध्वनि करणारे समुद्र हींच ज्यांतील कंकणें आहेत असा तो आपला हातच पृथ्वीनें वर उंच केला आहे कीं काय, असा भास होतो. तो मेरु हा एक राजाच आहे. तो जम्बूद्वीप या आसनावर स्थित आहे. कुलपर्वत याच मांडलिक राजांकडून परिवेष्टित आहे, व तो आपले चंद्र व सूर्य हेच नेत्र पर्वतांच्या समेवरून वारंवार फिरवीत असतो, नक्षत्रांचा समूह हीच त्याच्या गळ्यांत मालतीपुष्पांची माळ आहे. दिशा ह्याच ज्याच्या दशा आहेत असें आकाश हेंच एक त्याचें वस्त्र आहे. तो हत्ती व सर्प या दोन नाग शब्दाच्या अर्थ वाचक प्राण्यांचा आधार आहे. इंद्रादिक हींच त्याचीं भूषणें आहेत. नगरें हींच ज्यांचीं भूषणें आहेत, अशा दिशारूपी रम्य स्त्रिया त्याच्या सभोंवार आहेत, पाण्याचा स्राव करणारीं शीतळ मेघरूपी चामरें ज्याच्यावर वारलीं जात आहेत, भूमीच्या पोटांत असलेले त्याचे सोळा सहस्र पाद नाग, असुर व महासर्प यांच्याकडून पूजले जातात. नागादिक त्याच्या पादांचे सेवन करितात सूर्य व चंद्र हेच ज्याचे डोळे आहेत,असा त्या मेरूचा देह ऐंशीं सहस्र योजनें विस्तीर्ण आहे, स्वर्गगृहांत त्या देहाची देव, गंधर्व व किन्नर यांजकडून पूजा केली जाते. ब्रह्मर्षि, राजर्षि, देवर्षि, देव, पितर, गंधर्व, किन्नर, अप्सरा, विद्याधर, यक्ष, राक्षस, प्रमथ, गुह्यक, व नाग हीं चवदा प्रकारचीं भूतें एकाद्या संपन्न गृहस्थाच्या जीवावर त्याचे बांधव जसे उपजीविका करितात त्याप्रमाणें त्या पर्वताच्या आधारावर उपजीविका करितात. पण तो पर्वत फारच विस्तीर्ण असल्यामुळें त्या भूतांना परस्परांचीं स्थानें दिसत नाहींत. त्या पर्वताच्या ईशान्य कोनांत एक मोठें पद्मरागमणिमय शृंग आहे. तो दुसरा सूर्यच उगवला आहे कीं काय, असा भास होतो, त्याच्या पृष्ठभागीं भूतसमूहानें आच्छादित झालेला मोठा कल्पवृक्ष आहे. तो जणुंकाय त्या शिखररूप आरशांत जगाचें प्रतिबिंबचसा होऊन राहिला आहे. त्याच्या दक्षिणेकडील खांदीवर एक शाखा आहे. तिचीं पानें सोन्यासारखीं पिवळीं आहेत, रत्नासारख्या गुच्छांनीं ती अगदीं दाट भरून

गेली आहे. तिच्या वरील फळें चंद्रबिंबासारखीं चमकत आहेत. मीं पूर्वी तेथें एक घर केलें होतें. त्यांत रत्नें चमकत असत. पुत्रांनो ! देवी अलंबुसा ध्यान करीत बसली म्हणजे मी त्या घरट्यांत जाऊन रममाण होत असें. तें रत्नरूपी पुष्पांनीं व पानांनीं आच्छादित झालेलें होतें. अमृतासारख्या मधुर फळांनीं युक्त होतें. चिन्तामण्याच्या काड्यांनीं त्याच्या पुढील ओटा केलेला आहे. विचारपूर्वक व्यवहार करण्याचें ज्यांचें शील आहे अशा काकपुत्रांनीं तें घरटें भरलेलें असतें, त्याच्या आंतील प्रदेश अतिशय शीतळ असतो. तें अत्यंत मनोहर व पुष्पांच्या थरांनीं भरलेलें असतें. यास्तव पुत्रांनो ! देवांना दुर्गम असलेल्या त्या घरट्यांत तुम्ही जा, आणि तेथें राहून निर्विघ्नपणें भोग व मोक्ष यांस प्राप्त व्हा. असें सांगून पित्यानें आमचें चुंबन घेतलें व आम्हांला कवटाळलें. देवीनें आणून दिलेलें मांस जेव्हां त्यानें आम्हांला दिलें तेव्हां तें खाऊन पित्याच्या व देवीच्या चरणांस आम्हीं अभिवादन केलें; आणि त्या विंध्यादि पर्वतावरील अलंबुसेच्या स्थानापासून उडालों. क्रमानें आकाशाचें उलंघन करून मेघांच्या छिद्रांतून आम्हीं वातस्कंधांत उतरलों, देवांना वंदन केलें. सूर्याचा परिहार करून, स्वर्गलोकांतील अमरावतीस जाऊन पोंचलों. हे मुनीश्वरा ! स्वर्गाचें उलंघन करून ब्रह्मलोकास गेलों. तेथें आईला व भगवती ब्राह्मीला नमस्कार करून त्या दोघींना लागलेंच पित्याचें वचन सांगितलें. त्या दोघींनींही आम्हांला मोठ्या प्रेमानें आलिंगन देऊन 'जा' अशा आज्ञेनें आमचा उत्साह वाढविला. तेव्हां त्यांना वंदन करून आम्ही ब्रह्मलोकाहून निघालों. सूर्याप्रमाणें देदीप्यमान होणाऱ्या लोकपालांच्या नगरांचें उलंघन करून आम्ही आकाशांतून गमन करूं लागलों. पर्वतूनंस्यधान संचार करीत असतांना आम्ही त्या घरट्यासाठीं फारच आसक्त झालों होतों. शेवटीं या कल्पवृक्षास प्राप्त होऊन व आपल्या घरट्यांत प्रवेश करून हे मुने ! आम्ही मौन स्वीकारून राहिलों. आम्हांपासून सर्व बाधा दूर राहिल्या. हे महानुभावा ! आम्हीं उत्पन्न कसें झालों, आम्हांला परमात्मबोध कसा झाला, व शांतचित्त होऊन या स्थानीं कसे येऊन राहिलों. तें सर्व मीं तुला शुद्धमनानें व मध्यें खंड पडूं न देतां सांगितलें आहे. हे महानुभावा ! आतां आणखी मी काय सांगूं त्याची मला आज्ञा कर.

---

## सर्ग २०

१. प्रत्येक कल्पांत जगाचें साम्य. २. आत्यांचा नाश, व ३. प्रलयातही आपल्या चित्ताचें स्थैर्य भुशुंड सांगतो.

**भुशुंडः**—आम्ही ज्या कल्पांत उत्पन्न झालों त्या कल्पांत हें जगत् जशा आकारानें व अवयवरचनेनें दीर्घकाल स्थित होतें तसेंच आतांही स्थित आहे. त्यामुळे तें या जगाहून अत्यंत भिन्न नाहीं. म्हणूनच त्यावेळचा कल्पवृक्ष या वृक्षाहून जरी निराळा होता तरी हाही तसाच असल्यामुळें या वृक्षावरील घरट्यांत आम्हीं येऊन प्रवेश केला, असें मीं वर म्हटलें आहे. हे मुनींद्रा ! हें प्रस्तुत जगत् पूर्व जगासारखेंच आहे, असें प्रत्यक्ष पाहणाऱ्या मीं केवळ दृढ परिचयामुळें भूतकाळच्या वृत्तान्ताचाही वर्तमानकाळच्या वृत्तान्तासारखा निर्देश केला आहे. दीर्घकालापासून सांचलेलें माझें पुण्य आज फळास आलें त्यामुळें हे मुने ! मी आज आपल्याला निर्विघ्नपणेंच पहात आहें. तुझ्या दर्शनानें आज हें घरटें, ही शाखा, हा मी व हा वृक्ष हीं सर्व पवित्रतेस प्राप्त झालीं आहेत. ज्यां पक्ष्यानें अर्पण केलेलें हें अर्घ्य, हें

पाद्य घेऊन व मला पावन करून आणखी मी कोणती सेवा करूं त्याची आज्ञा कर.

श्रीवसिष्ठः—रामा ! हें अर्घ्य व हें पाद्य असें म्हणून पुनः दुसऱ्यांदां स्वतः ते देणाऱ्या भुशुंड पक्ष्याला मीं असें म्हटलें—"हे पक्षिश्रेष्ठा! तुझे ते तशा सामर्थ्यानें युक्त असलेले व महाबुद्धिमान् भ्राते येथें कां दिसत नाहींत ? तूं एकटाच आम्हांला दिसत आहेस ! "

भुशुंडः—हे मुने ! आम्ही येथें राहूं लागल्यापासून फार दीर्घकाल निघून गेला. हे निष्पापा ! दिवसाच्या मागून दिवस जसे भराभर निघून जातात त्याप्रमाणें युगांच्या परंपराच क्षीण झाल्या आहेत. तेवढ्या कालांत माझे सर्वच धाकटे बंधु तृणाप्रमाणें आपआपलीं शरीरें टाकून कल्याणरूप पदांत मिळून गेले आहेत. ज्याचें स्वरूप कोणालाही दिसत नाहीं अशा कालाकडून मोठमोठेही, संतही व बलाढ्यही असलेले सर्वच दीर्घायुषी प्राणी भक्षण केले जातात.

श्रीवसिष्ठः—हे साधो ! ज्यांनीं आपल्या खांद्यांवर बारा आदित्य व चंद्र यांना माळेप्रमाणें धारण केलें आहे, व जे प्रवहादि वातस्कंधाहून अधिक वेगवान आहेत असे प्रलयवायु वाहूं लागले असतां तुला खेद होत नाहीं का ? बाबारे ! उदयाचल, अस्ताचल इत्यादि पर्वत व मोठमोठीं अरण्यें याच्या समूहांस ज्यांनीं जाळून टाकलें आहे अशा दीर्घकाल अगदीं समीप असलेल्या सूर्याच्या किरणांनीं तुला ताप होत नाहीं का ! पाण्याला ज्यांनीं दगडाप्रमाणें घट्ट केलें आहे अशा चंद्राच्या शीत किरणांनीं, व प्रलयकाल समीप आला असतां त्यावेळच्या मेघांनीं केलेल्या गारांच्या वृष्टीनीं तुला दुःख होत नाहीं का ? सतत येथें विश्रांति घेत राहिलेल्या व कुऱ्हाडींनाही बोथट करण्यासारख्या दवाच्या शिला करणाऱ्या कल्पांतींच्या मेघमंडलाकडून तुला त्रास होत नाहीं का ? अतिशय उच्च स्थानीं असलेला हा अतिशय उंच कल्पवृक्ष जगाच्या भयंकर क्षोभांनीं क्षुब्ध कसा होत नाहीं ?

भुशुंडः—हे ब्रह्मन्! सर्व भूतांमध्यें काकपक्ष्याची ही जीविका अतिशय तुच्छ आहे. आकाश हेंच तिचें आधारस्थान आहे; काकाच्या जीविकेची सर्वांकडून अवहेलना केली जाते. विधात्यानें असल्या अतिक्षुद्र योनींमध्येंही मोठ्या प्रीतीनें निर्जन वनांत किंवा शून्य आकाशमार्गांत जीविका कल्पिली आहे, हें मोठें आश्चर्य होय. हे प्रभो ! या असल्या जातींत उत्पन्न झालेल्या व आशापाशांनीं बद्ध असलेल्या चिरंजीव पक्ष्यालाही शोकराहित्य कोठचें ? तथापि हे भगवन् ! आम्ही नित्य आत्मसंतोषांत स्थित झालों आहों. आम्ही निसत्त्व पदार्थांमध्यें मोहित नाहीं. आम्हांला कधीं विशिष्ट भ्रम होत नाहीं. आम्ही केवल स्वरूपांतच संतुष्ट आहों. दुसऱ्याला पीडा देणें, इत्यादि क्लेशावह क्रियांपासून आम्ही मुक्त आहों. ब्रह्मन् ! आम्ही या आपल्या घरांत आपला काल लोटीत आहों. आम्ही जिवंत राहून कर्म करण्याची इच्छा करीत नाहीं. मरून देहाचा नाश व्हावा असेंही इच्छीत नाहीं. तर आतां जसे स्थित आहों तसेच पुढेंही सर्व कामनाशून्य व त्यामुळेंच नित्य सिद्ध निरतिशयानंदस्वभावानें राहूं. लोकांच्या जन्म-मरणादि दशा पाहिल्या. सर्व दृश्य मिथ्या आहे, असा निर्णय करविणाऱ्या स्वप्नादि दृष्टांतदृष्टि पाहिल्या, खरोखर आमच्या मनानें आपलें चंचल स्वरूप टाकलें आहे. ज्याच्यावर आत्मप्रकाश सतत आहे व जो नित्य त्रिविध तापशून्य आहे अशा या कल्पवृक्षावरील या स्थानीं बसून मी सदा कालाच्या कलांची गति जाणतो. म्ह० कल्पान्त होईपर्यंत या

कल्पवृक्षाच्या प्रभावांनेंच मला खेद होत नाहीं. हे ब्रह्मन ! रत्नगुच्छांच्या प्रकाशानें संपन्न असलेल्या या कल्पलतागृहांत मी प्राण व अपान यांच्या प्रभावानें-स्वरोदयशास्त्रांत सांगितलेल्या उपायानें नेहमीं कालकलागति-कल्प जाणतों. जेथें दिवस व रात्र यांचेंही भान होत नाहीं, अशा या उंच पर्वतशिखरावर आपल्या बुद्धीनें मी लोक, काल, क्रम व त्यांची स्थिति यांस जाणतों. हे मुने ! सारासाराचा निर्णय करणारें माझें मन आत्मबोधामुळें विश्रांतीस प्राप्त झालें आहे, त्यानें आपलें चापल्य सोडलें आहेत. तें शांत व अगदीं स्थिर झालें आहे; त्यामुळेंही मला खेद होत नाहीं. अल्पशा ध्वनीनेंही भयभीत होणाऱ्या भूलोकच्या कावळ्याप्रमाणें संसारांतील व्यवहारापासून उत्पन्न झालेल्या मिथ्या आशापाशांनीं मी व्याकुल होत नाहीं. अत्यंत उपशम धर्मानें युक्त व प्रकाशानें शीतळ अशा बुद्धीनें ही जगद्रूपी माया पाहणारे आम्ही पूर्ण धैर्यसंपन्न झालों आहों. हे महाबुद्धिमान् मुने ! दशांच्या क्रमाला अनुसरून भयंकर दशा जरी प्राप्त झाल्या तरी आम्ही स्फटिकादि निर्मल दगडाप्रमाणें होऊन स्थिरचित्त राहतों. ही चंचल जगत्स्थिति आरंभीं फार सुंदर दिसते, पण तिचा पुन: विचार केला असतां त्यांतील कांहींही आम्हाला पीडा करीत नाहीं. या जगांतील सर्वच भतें मरून जातात व जन्मून पुन: येतात किंवा परमार्थदृष्ट्या यांतील कांहीं जात नाहीं व येत नाहीं. तेव्हां भगवन् ! आम्हांला यांत भय कशाचें ? सर्व भूतसमुदाय हेच जिचे तरंग आहेत अशा कालसागरांत प्रवेश करणाऱ्या संसारनदीच्या तटावर जरी आम्ही आहों तरी त्या संसारनदीचा आदर करीत नाहीं. आम्ही त्यांतील कांहीं टाकीत नाहीं, कांहीं घेत नाहीं, येथें स्थित असलेले आम्ही येथून उठतही नाहीं. कांटे असलेल्या भूमीवरून मनुष्य जसा हळू हळू चालतो त्याप्रमाणें केवळ प्रारब्धप्राप्त व्यवहार सिद्ध होण्यासाठीं आम्ही त्यांतून मोठ्या सावधानपणें चालतों. पण तत्त्वदृष्ट्या संसाराचा उच्छेदच करीत असल्यामुळें आम्ही क्रूर आहों. सारांश अशा रीतीनें आम्ही या वृक्षावर स्थित आहों. शोक, भय, आयास, यांनीं रहित असलेल्या तुझ्यासारख्या संतुष्ट उत्तम पुरुषांकडून अनुगृहीत होत्साते आम्ही निरुपद्रव होऊन राहिलों आहों. भगवन् ! आमचें मन केवल व्यवहारसिद्ध होण्यासाठीं जरी इतस्तत: पसरत असलें तरी वृत्तीमध्येंच अडकून रहात नाहीं, व तें तत्त्वार्थाला सोडूनही कधीं असत नाहीं. मन निर्विकार व क्षोभरहित होऊन आत्म्यामध्यें शांत झालें असतां आम्ही चित्तरंगाच्या द्वारा प्रतिपदेच्या दिवशीं महासागराप्रमाणें अत्यंत वृद्धि पावलों आहों. चंद्रदर्शनानें समुद्राला जसें भरतें येतें त्याप्रमाणें आत्मानुभवानें आमच्या वृत्तिरूप आनंदाला भरतें आलें आहे. हे ब्रह्मन् ! मंदरपर्वताच्या योगानें क्षीरसागराचें अंग अमृताच्या उद्देशानें जसे क्षुब्ध केलें जातें, तसेच आज आम्ही आपल्या आगमनानें हृष्टचित्त झालों आहों. ज्यांनीं सर्व एषणांचा त्याग केला आहे असे संत आपल्याकडे येतात, याहून आपलें अधिक कुशल कांहीं आहे, असें मला वाटत नाहीं. विचार केला नाहीं तोंपर्यंतच रम्य वाटणाऱ्या भोगांपासून काय मिळणार ? कांहीं नाहीं. पण सत्संगरूप चिंतामणीपासून सर्वसार ( ज्ञान ) प्राप्त होतें. ज्याची वाणी स्निग्ध, गंभीर, रम्य, मधुर, उदार व धीर आहे असा तूंच एक या त्रैलोक्यकमलाच्या मध्यभागीं भ्रमराकार आहेस. ज्याला परमात्म्याचा साक्षात्कार झाला आहे अशाही माझें दुष्कर्म आपल्या दर्शनानें शांत झालें आहे, त्यामुळें हे साधो !

आज हें माझें जन्म सफल झालें आहे, असें मी समजतों. कारण साधूंचा संग सर्व भयाचा अपहार करणारा असतो.

---

# सर्ग २१

—:*:—

१. कल्पवृक्षाचें माहात्म्य, २. प्रलयांतील धारणास्थिति, ३. नियति व ४. अनेक विचित्र अर्थांचें स्मरण.

भुशुंडः—युगांतीं घोर क्षोभ झाले असतां व भयंकर वावटळी सुटल्या असतांही हा अत्यंत स्थिर असलेला कल्पवृक्ष केव्हांही कंप पावत नाहीं. हा वृक्ष लोकांतरीं विहार करणाऱ्या सर्व भूतांना अगम्य आहे. त्यामुळें हे साधो! आम्ही येथें सुखानें राहतों. हिरण्याक्षानें सप्तद्वीपांनीं परिवेष्टित असलेल्या या पृथ्वीला जेव्हां मोठ्या वेगानें हरण केलें तेव्हांही हा वृक्ष कंपायमान झाला नाहीं. वराहानें पुनः जेव्हां त्या पृथ्वीची स्थापना केली त्यावेळीं ज्या ला सर्व बाजूंनीं इतर पर्वतरूपी दगडांचा खालून सारखा आधार दिला आहे असा अमर पर्वतही चंचल झाला, पण तेव्हांहि हा कल्पवृक्ष कंप पावला नाहीं. जेव्हां नारायणानें आपल्या दोन भुजांनीं मेरूला खालीं दाबून दुसऱ्या दोन हातांनीं मंदराला उपटलें तेव्हांही हा वृक्ष हालला नाहीं. जेव्हां देव व दानव यांचा संग्राम होऊन चंद्र-सूर्यांचीं मंडलेंही खालीं पडलीं व सर्व जगत् क्षुब्ध झालें तेव्हांही हा वृक्ष ढळला नाहीं. जेव्हां उत्पातवायु वाहूं लागले, त्यांनीं मोठमोठ्या पर्वतावरील शिलाही कोसळून टाकल्या व मेरूसह त्यावरील वृक्षांना कांपविलें तेव्हांही हा वृक्ष हालला नाहीं. जेव्हां क्षीरसागरांतील चंचल मंदरपर्वताच्या दऱ्यांतून निघालेल्या वायूमुळें अस्थिर झालेल्या कल्पांत मेघांच्या पंक्ति इतस्ततः संचार करूं लागल्या, तेव्हांही हा वृक्ष ढळला नाहीं. ज्या वेळीं कालनेमि राक्षसाच्या दोन भुजांच्या मध्यें मेरुपर्वत थोडासा सर्व बाजूंनीं उपटल्यासारखा होऊन राहिला होता तेव्हांहि हा वृक्ष कंपित झाला नाहीं, अमृताचें हरण करून आणण्याच्या वेळीं जो मोठा संग्राम झाला त्यांत, ज्यांच्यामुळें सिद्धही भराभर खालीं पडत आहेत असे गरुडाच्या पंखांपासून उत्पन्न झालेले वायू वाहूं लागले, पण त्यावेळींही हा वृक्ष हालला नाहीं जिचें पृथ्वीला धारण करणें हेंच कार्य अद्यापि संपलेलें नाहीं अशा शेषाकृतीला संकर्षण रुद्र, जेव्हां प्राप्त झाला व गरुड ब्रह्मांडास उड्डाण करून गेला तेव्हांही हा वृक्ष कंपित झाला नाहीं. जेव्हां पर्वत, समुद्र व सर्व प्राणी यांना दुःसह होणाऱ्या कल्पान्ताग्नीच्या ज्वाला शेष आपल्या सहस्र फणांनीं सोडूं लागला तेव्हां हा वृक्ष डगमगला नाहीं. मुनिश्रेष्ठा! अशा प्रकारच्या श्रेष्ठ वृक्षावर राहणाऱ्या आम्हांला आपत्ति कोठच्या? दुष्टस्थानीं राहिल्यास आपत्ति ओढवतात.

श्रीवसिष्ठः—हे महाबुद्धे! कल्पाचा अन्त करणारे उत्पातवायु वाहूं लागले असतां व त्यामुळें चंद्र, नक्षत्रें आणि सूर्य हेही गळून पडूं लागले असतां तूं पीडा न होता कसा राहतोस?

श्रीभुशुंडः—जेव्हां सहस्रयुगांचा एक पर्याय संपून जगत्स्थितींतील व्यवहार शांत होतो तेव्हां एकदा कृतघ्न आपल्या सन्मित्राला जसा सोडतो त्याप्रमाणें मी या घरट्याला सोडतों, नंतर

---

१. पृथ्वीबरोबर त्याचेंहि हरण झालेंच, तथापि दिव्य प्रभावामुळें तो कंपित झाला नाहीं, असा भावार्थ.

१. गरुड उत्पन्न होतांच सर्व लोक कांपूं लागले पृथ्वी व सात द्वीपें थरथर कांपूं लागलीं. त्या उत्पातामुळें बुडणाऱ्या पृथ्वीला संकर्षण रुद्र आपल्या सहस्र मस्तकांनीं नावेप्रमाणें धारण करूं लागला या कथेला अनुसरून हें वर्णन आहे.

ज्याचीं सर्व अंगें निश्चलस्वभाव झालीं आहेत व सर्व कल्पना शांत झाल्या असा मी वासना-शून्य मनाप्रमाणें आकाशांतच राहतों. ज्यानीं पर्वतांचीं शकलें केलीं आहेत असे बारा आदित्य जेव्हां तप्त होतात तेव्हां 'मी वरुणच आहें' अशी वारुणी धारण करून धीरबुद्धि होऊन राहतों. जेव्हां मोठमोठ्या श्रेष्ठ पर्वतांचे तुकडे उडवून मलयवायु वाहूं लागतात, तेव्हां मी पार्वती धारणा धरून म्हणजे 'मी पर्वत आहें,' अशी धारणा धरून आकाशांत अचल राहतों. ज्यांतील मेरु वगैरे सर्व पर्वत विरघळून गेले आहेत असें हें सर्व जगत् जेव्हां एक सागररूप होतें तेव्हां मी वायवी धारणा धरून स्थिरबुद्धि होतो व आकाशांतच तरंगत राहतों. स्थूल व सूक्ष्म समष्टीची परमावधिच अशा अव्याकृतास प्राप्त होऊन नामापासून प्राणापर्यंत छान्दोग्यात[१] जीं तत्त्वें सांगितलीं आहेत त्यांच्या शेवटीं भूमाख्य पदीं सुषुप्ताप्रमाणें एकरसनिर्विकल्पसमाधि-अवस्थेनें मी राहतों. त्या अवस्थेंत मी, ब्रह्मदेव पुनरपि सृष्टिकर्मामध्यें जोंवर स्थित होई तोंवर, राहतों. नंतर सृष्टिकर्माचा आरंभ झाला म्हणजे मी ब्रह्मांडांत प्रवेश करून या आम्हां पक्ष्यांच्या घरांत राहतों;

**श्रीवसिष्ठः**—हे पक्षिश्रेष्ठा ! कल्पांतीं तूं जसा धारणांच्या योगानें अखंडित राहतोस त्याप्रमाणें दुसरे योगी कां रहात नाहींत ?

**भुशुंडः**—हे ब्रह्मन् ! प्रारब्धानुसार मी असें व्हावें व दुसऱ्यांनीं तसें व्हावें ही परमेश्वराची नियति-सत्यसंकल्प अत्यंत दुर्लंघ्य आहे. अवश्यंभाविनी जी भवितव्यता ती ह्याची अशीच कां असावी, व दुसऱ्याची अशी कां अशी तुलना कोणाला करतां येत नाहीं. जें ज्या प्रारब्धानुसार जसें प्राप्त असतें तें तसेंच योग्य होय. कारण नियतीचा हाच निश्चय आहे, माझ्या संकल्पामुळेंच प्रत्येक कल्पांत पुनः पुनः या पर्वतावरील या शृंगावर हा असा वृक्ष होतो.

**श्रीवसिष्ठः**—आपल्या दीर्घायुष्याला उपमा दीर्घ व अपरिच्छिन्न मोक्षाचीच आहे, तेव्हां फार पुरातन वस्तूंचा निर्देश करण्याचे वेळीं आपल्याकडेच श्रेष्ठत्व ( नायकत्व ) येणार. तूं धीर, ज्ञान-विज्ञानवान् व ज्याची मनोगति योगाला योग्य आहे असा तूं आहेस ! तूं अनेक प्रकारच्या मोठमोठ्या सृष्टींची उत्पत्ति, स्थिति व लय पाहिले आहेस. यास्तव हे कल्याणरूपा ! तूं या जगत्क्रमांतील काय काय चमत्कार तुला आठवतात !

**भुशुंडः**—हे श्रेष्ठा ! शिला व वृक्ष यांनीं रहित, तृण व वेली न उगवलेल्या अशी, आणि पर्वत, वन व विविध वृक्षांचे समुदाय नागवेली मेरूच्या खालची पृथ्वी मी स्मरतों. अकरा हजार वर्षें ही भूमि मेरूच्या खालीं भस्माच्या ढिगांत बुडलेली होती, असें मीं पाहिलें आहे. ज्यांत अद्यापि सूर्य उत्पन्न झालेला नाहीं व चंद्रमंडलही गुप्त होतें व मेरूच्या प्रभा दिवसाच्या प्रकाशा सारख्याच ज्यावेळीं होत्या, अशा पृथ्वीला पाहिलेलें मला आठवतें, तळाशीं पसरलेल्या मेरूवरील रत्नांच्या प्रकाशांनीं ज्याचें अर्धें कोटर प्रकाशयुक्त झालें आहे व त्यामुळें जें लोकालोक पर्वताप्रमाणें दिसत आहे व ज्यांत कोठें कोठें प्रकाशयुक्त पर्वत आहेत अशा भुवनाचें मला स्मरण आहे. असुरांचा संग्राम अतिशय वाढला असतां जिच्यांतील प्राणी क्षीण ( नष्ट ) होत आहेत व जिच्यावरील लोक

१. नाम, वाक्, मन, संकल्प, चित्त, ध्यान, विज्ञान, बल, अन्न, आप्, तेज, वायूसह आकाश, स्मृति, आशा व प्राण अशी उत्तरोत्तर कारणभूत तत्त्वें सनत्कुमारांनीं नारदाला उपासनेसाठीं छान्दोग्याच्या सातव्या अध्यायांत सांगितलीं आहेत.

सगळीकडे पळत आहेत, अशा या पृथ्वीला मी आठवतों. चार युगेंपर्यंत जणुं काय मदोन्मत्त असुरांनीं या पृथ्वीला व्यापून सोडलें होत व ती दैत्यांच्या अन्तःपुर रहाणारी झाली होती, हें मीं पाहिलेलें आहे. जिच्यीं मेरूवांचून दुसरीं सर्व मंडळें क्रमानें समुद्रानें व्यापून सोडलीं आहेत व ब्रह्मा-विष्णु-रुद्रसंज्ञक तीन अज देव मात्र जिच्यामध्यें अवशिष्ट राहिले आहेत, अशा जगत्कुटीला मी स्मरतों. दोन युगांच्या काला इतका काल निघून जाईपर्यंत ही पृथ्वी केवल रानटी झाडांनीं दाट भरून गेली होती, तिच्यामध्यें वृक्षावांचून दुसरें कांहींच होत नव्हतें, अशा त्या पृथ्वीलाही मी स्मरतों. तशीच ती संपूर्ण चार युगांपर्यंत पर्वतांनींच दाट व्यापलेली होती, त्यामुळें जिच्यामध्यें लोकांचा संचार मुळींच होत नव्हता, अशा पृथ्वीला पाहिल्याचें मला आठवतें. दहा हजार वर्षें ही पृथ्वी मेलेल्या दैत्यांच्या हाडांच्या पर्वता सारख्या राशींनीं व्यापलेली व सर्वतःपरिपूर्ण अशी मीं पाहिली आहे. ज्यांमध्यें विमानांतून संचार करणारे आकाशचर देवादिक भयानें लपले आहेत अशा अन्तरिक्षादि लोकांस आणि वृक्षरहित व तमोमय सर्व पृथ्वीस मीं पाहिलेलें मला आठवतें. दक्षिणदिशेला अगस्त्या नव्हता असें मीं पाहिलें आहे. पृथ्वीमध्यें मलय--दर्दुरादि पर्वत जेव्हां नव्हते आणि पृथ्वीवर एकच पर्वत होता असें मीं पाहिलें आहे. मेरूशीं स्पर्धा करीत असतांना मत्त होऊन अतिशय वाढले.१ विंध्यपर्वत मीं जगत्कुटीवर पाहिल्याचें मला आठवतें. हें व असेच दुसरेही असंख्य वृत्तान्त मला आठवतात. ते सर्व सांगत बसण्यांत काय अर्थ आहे ? थोडक्यांत सार ऐक. हे ब्रह्मन् ! मी असंख्यात मनूंना स्मरतों. ते शतशः गेलेल्यांची मला चांगली आठवण आहे. ते सर्व अतिशय प्रभावसंपन्न होते, शेंकडों चतुर्युगें गेलेलींही मला स्मरतात. जव्हां ब्रह्मांड हेंच ज्याचें शरीर आहे असा विराट्--पुरुष उत्पन्न होतांच स्वात्मतत्त्वाचें आलोचन करण्यासाठीं कांहीं काल शांतचित्त झाला तेव्हां त्याचें ते एकच, स्वयं, शुद्ध, पुरुषासुररहित व प्रकाशसमूहरूप स्वरूप मीं पाहिलें आहे. ६० त्याही अशा एका सृष्टीला मी स्मरतों. ज्यांत मद्यपान करणारे ब्राह्मण आहेत, ज्यांत देवतांचा निषेध करणारे शूद्र आहेत, व ज्यांत स्त्रियांनी अनेक पति केले आहेत, अशाही एका कलियुगाला मी स्मरतों. ज्यांत वृक्षांनीं भूपृष्ठ भरून गेलें आहे, ज्यांत महासागराची रचना अद्यापि झालेली नाहीं, ज्यांत स्त्रीपुरुषसंगाशिवाय मनुष्य उत्पन्न होत होते, म्हणजे मानस सृष्टीनेंच भृग्वादि ऋषि झाले, अशाही एका सृष्टीला मी स्मरतों. पृथ्वी जलांत निमग्न झाली असतां जनलोकादि प्रकाशमय लोकांचाच मात्र जेव्हां व्यवहार होत असे त्यावेळीं पर्वत व भूमि यांनीं रहित, चंद्र, सूर्य व प्रकाश नसलेल्या व ज्यांत देव आणि योगसिद्ध मानव आकाशांत स्थित आहेत, अशा एका सृष्टीला मी स्मरतों. ज्यांत इंद्र नाहीं, राजा नाहीं, उत्तम, मध्यम व अधम हा विभाग नाहीं, तर एक सारखें अधःकारपूर्ण दिक्-चक्र आहे अशा कोणा एका सृष्टीला मी स्मरतों. या चालू कल्पाचा वृत्तान्त तर पुष्कळ दीर्घायु जीवन्मुक्तांना अवगत आहे. प्रथम सृष्टीच्या आरंभासाठीं स्रष्ट्याचा संकल्प, त्यानंतर त्रिभुवनांत द्वीपादि अवांतर विभागाची कल्पना, त्यानंतर हिमालयादि सात कुलपर्वतांच्या यथायोग्य प्रदेशाची कल्पना, त्यानंतर पृथक् स्थित असलेलें जंबुद्वीप, ब्राह्म-

१. प्रियव्रत राजानें समुद्र निर्माण केला हें इतिहास-पुराणादिकांतून प्रसिद्ध आहे. त्या पूर्वीच्या अवस्थेचें हें वर्णन आहे.

णादि वर्ण, त्यांचे धर्म, ब्राह्मणादिकांना योग्य अशा विद्यांचे प्रकार, मंडलाकार पृथ्वीचा विभाग, नक्षत्रमंडलाची रचना, ध्रुवाची उत्पत्ति, चंद्र-सूर्यादिकांची उत्पत्ति, इंद्र व उपेंद्र यांची व्यवस्था, हिरण्याक्षानें पृथ्वीचें केलेलें अपहरण व वराहानें केलेलें तिचें पुनरुद्धरण. देव-दानव-मनुष्यादिकांमध्यें राज्याची जांची कल्पना, मत्स्यावतारीं वेदांना आणणें, मंदर पर्वताचें उन्मूलन, अमृतासाठीं समुद्राचें मंथन, ज्याला अजून पंख फुटले नाहींत असा गरुड, व समुद्रांची उत्पत्ति इत्यादि जे स्मरण करण्यास योग्य असलेले याच कल्पांतील मागील जगत्क्रम ते माझ्या वयाहून कमी वयाच्या तुझ्यासारख्या बालकांनाही आठवतात; तेव्हां त्यांविषयीं काय सांगवयाच आहे? ज्याला दीर्घ आयुष्य प्राप्त झालें आहे, अशा मीं या कल्पांत जो गरुडवाहन विष्णु म्हणून प्रसिद्ध आहे, यालाच पूर्वी हंसवाहन होऊन देवदैत्यादिकांच्या सृष्टीचा अधिकार चालवितांना पाहिलें आहे. त्याचप्रमाणें हंसवाहन ब्रह्मदेवाला वृषभवाहन शंकर होऊन सहाराधिकावर चालविनांना अवलोकन केलें आहे. त्याचप्रमाणें वृषभवाहन रुद्राला गरुडवाहन विष्णुशरीर होऊन पालनाचा अधिकार चालवितांना प्रत्यक्ष पाहिलें आहे. खरोखर हें सर्व आश्चर्यांतील महत् आश्चर्य आहे.

---

# सर्ग २२

—:※:—

१. वसिष्ठाचे आठ जन्म, वारवार पाहिलेले विचित्र सर्ग व समुद्रमंथनादि प्रकार.

भुशुंड:—त्यानंतर हे भगवन्! या जगांत कांहीं थोड्याशा कमीजास्त भूतकाळीं व याच सर्गांत तुम्ही श्रेष्ठ उत्पन्न झाला. वसिष्ठ, भरद्वाज, पुलस्थ, अत्रि, नारद, इंद्र, मरीचि. पुलह, उद्दालक, क्रतु, भृगु, अंगिरस, सनत्कुमार इत्यादि ब्रह्मर्षि, व सिद्धर्षि भृंगी, ईश-स्कन्द, गजानन इत्यादि शिवगण, गौरी, सरस्वती, लक्ष्मी, गायत्री इत्यादि त्यांच्या असंख्य शक्ति, मेरु--मंदर--कैलास--हिमालय दर्दुर इत्यादि पर्वत, हयग्रीव--हिरण्याक्ष--कालनेमि-बल इत्यादि दानव, हिरण्यकशिपु क्राथ-बलि-प्रल्हाद इत्यादि दैत्य, शिबि-न्यंकु-पृथुल-वैन्य-नाभाग--केलि-नल-मान्धातृ--सगर-दिलीप-नहुष इत्यादि राजे, आत्रेय--व्यास वाल्मीकि-शुक--वात्स्यायन इत्यादि शास्त्रप्रणेते मुनि, उपमन्यु, मणि, मंकी, भगीरथ, शुक इत्यादि पुरुषार्थी लोक झाले. त्यांचें निमग्ण होणें शक्यच नसल्यामुळें त्याची गणना करावयाला स्मरण काय करावयाचें आहे? हे मुने! ब्रह्मदेवाचा पुत्र असा जो तूं त्या तुझा हा आठवा जन्म आहे. आठव्या सर्गांत तुझी माझी संगत होती हे मला स्मरतें. तूं केव्हां आकाशापासून होतोस, केव्हां वायूपासून, व केव्हां अग्नीपासून होतास. हा सर्ग ज्या प्रकारचा आहे, ज्या आचाराचा आहे, त्याची जी रचना, व जी दिद्गणं आहे तशाच प्रकारच्या तीन सर्गांत मी स्मरतों. ज्यांतील सर्व आचार, आकृति, पृथ्वी, व अमर: एकरूप आहेत, ज्यांचें आयुष्य समान आहे, व ज्यांचें स्थैर्य स्थिर आहे, अशा दहा सृष्टींना मी स्मरतों. मुने अंतर्धान पावलेली पृथ्वी कूर्मानेंच पांच

वेळां समुद्रांतून वर काढली. मंदर पर्वताच्या आकर्षणाचा जो वेग त्यानें ज्यात देव दानव अतिशय आकुल झाले आहेत असें अमृतासाठीं आरंभिलेलें जें हें समुद्रमंथन तें बारावें आहे, असें मला स्मरतें. स्वर्गापासूनही कर घेणाऱ्या हिरण्याक्षानें सर्व औषधि व रस यांनीं युक्त असलेल्या पृथ्वीला तीनदां खालीं नेलें. मधल्या पुष्कळ सृष्टींत हरि हा परशुराम झालाच नाहीं; तथापि तो सहाव्यांदां रेणुकेचा पुत्र होऊन त्यानें हा क्षत्रियांचा क्षय केला आहे. शंभर कलियुगांत हरीचे शंभर बौद्धावतार कीकटांतील शौकदेशाचा राजा ( शुद्धोदन राजपुत्रत्व घेऊन ) झालेले मला स्मरतात. तीस कल्पांत तीस त्रिपुरासुरांचें दहन, प्रत्येक कल्पांतील स्वायंभव व चाक्षुष मन्वंतरांत होणारे दोन दक्षयज्ञाचे ध्वंस, शंकराचा अपराध केल्यामुळें इंद्राला झालेले दहा दंड--दहा वेळ पदच्युत करून पर्वतगुहेंत कोंडून ठेवणें किंवा वज्रयुक्त हाताचें दहा वेळ स्तंभन करणें--हें मीं पाहिलेलें स्मरतों. बाणासुराच्या कृत्यामुळें माहेश्वर, वैष्णव, इत्यादि ज्वरांना व प्रमथांना बोलावणाऱ्या, त्याचें शौर्य व उत्साह यांस वाढवून त्यांना प्रवृत्त करणाऱ्या व देवसैन्याला क्षुब्ध करणाऱ्या, हरि व रुद्र यांच्या झालेल्या आठ संग्रामास मी स्मरतों. हे मुने ! प्रत्येक युगांत पुरुषांच्या बुद्धि न्यूनाधिक होत असल्यामुळें ब्रह्मचर्य, गुरुशुश्रूषा, भूमिशयन इत्यादि क्रिया, शिक्षादि अंगें, स्वर--वर्णादि--उच्चार यांमध्यें वैचित्र्य उत्पन्न होऊन त्यामुळें ज्यांचा प्रभावही विचित्र झाला आहे अशा वेदांना मी स्मरतो. हे निष्पाप मुने ! प्रत्येक द्वापारयुगाच्या शेवटीं पुराणांचा कर्ता निरनिराळा असल्यामुळें सर्व पुराणांचा अर्थ जरी एकच असला तरी पाठ भिन्न भिन्न होतात. अर्थात द्वापाराच्या शेवटीं उत्पन्न होऊन विस्तार पावलेलीं पुराणें कलियुगांत प्रवृत्त होतात. प्रत्येक युगामध्यें वेदवेत्त्याकडून पुनः पुनः तेच ते किंवा त्याहून भिन्न असे रचले गेलेले इतिहास मला स्मरतात. 'महारामायण' या नांवाचा दुसरा एक मोठा आश्चर्यकारक इतिहास मला आठवतो त्याचें ग्रंथप्रमाण एक लक्ष आहे. तें ब्रह्मदेवानें वसिष्ठ-विश्वामित्रादिकांना उपदेशिलेलें ज्ञानशास्त्र आहे. त्यांत रामाप्रमाणें व्यवहार करावा, रावणाप्रमाणें दुराचरण करूं नये, असें ज्ञान बुद्धिमानांच्या हातांत फलाप्रमाणें अर्पिलेलें आहे. हे रामायण वाल्मीकीनें केलें आहे. आतां यापुढें तो जें दुसरें करणार आहे त्याचाही मला दिव्य ज्ञानदृष्टीनें अनुभव आलेला असून तें मला आठवत आहे, तुलाही तें लवकरच समजेल. हे वसिष्ठरामसंवादरूप रामायण त्याच किंवा दुसऱ्या वाल्मीकि-नांवाच्या जीवानें केलें आहे; आतां विसरलेलें तेंच रामायण बारा वेळ पुनःपुनः केलें जाईल. याच्यासारखेंच भारत या नांवाचें दुसरें -वृत्त प्राचीन व्यासानें केलेलें मला आठवतें. तें या वेळीं जगात विस्मृत झालें आहे. व्यास या नांवाच्या त्याच त्या किंवा दुसऱ्या जीवाकडून तें केलें जातें. आतां विसरलेलें तें पुनः सातव्यांदां केलें जाईल. प्रत्येक युगांत ज्यांची रचना विचित्र आहे अशीं विसरून गेलेलीं आख्यानें व शास्त्रें हे मुनीश्वरा ! मला आठवतात. हे साधो ! पुनः पुनः तेच ते किंवा दरयुगांत निरनिराळे झालेले पदार्थांचे समूह मी पाहतों व त्यांस आठवतों. राक्षसांचा नाश करण्यासाठीं पृथ्वीवर अवतार घेणाऱ्या

१. मध्ये पुष्कळ सर्गांत तो अवतीर्ण झाला नाहीं, तरी आजवर सहा अवतार झाले. अर्थात् दर सृष्टींत जर तो झाला असता तर याहून त्याचे अधिक अवतार झाले असते.

विष्णूचा आतां त्रेतायुगांत 'राम' या नांवाचा अकरावा जन्म होईल. सिंह जसा हत्तीला मारतो त्याप्रमाणें हरीनें नारसिंहाच्या आकारानें आजवर तीनदां हिरण्यकश्यपूला मारलें आहे. हे मुनीश्वरा! भूमीचा भार कमी करण्यासाठीं विष्णूचा वसुदेवाच्या घरांत आतां द्वापराच्या शेवटीं हा सोळाव्या वेळीं जन्म होईल! हें सर्व उत्पन्न होतें, अशी जगाविषयीं भ्रांति आहे ती वस्तुत: कोणच्याही काळीं विद्यमान नाहीं. तथापि पाण्यावरील बुडबुड्याप्रमाणें ती केव्हां केव्हां विद्यमान आहे, असा भास होतो. ही मनांतील दृश्य भ्रांति अनित्य आहे, जलांत जशी चंचल लाट तशी ती चिदात्म्यामध्यें उत्पन्न होते व पुन: लीन होते. हे तीन लोक क्वचित् एकसारख्याच समान आकाराचे असतात, पुष्कळ विषय भिन्न भिन्न आकाराचेही असतात व कांहीं अर्धवट समान आकाराचे असतात, असें मीं पाहिलें आहे. मनु-प्रभृति अधिकारी पुरुषांचा आकार, चारित्र्य वगैरेही सर्वथा समानच नसतें. म्हणूनच तींच तीं भूतें तशीच कर्में करणारीं, तसेंच आचरण करणारींही मीं पाहिलीं आहेत व दुसरीं कांहीं निरनिराळीं कर्में व आचरण करणारींही माझ्या दृष्टीस पडलीं आहेत. हे मुने! प्रत्येक मन्वंतरांत जगाचा क्रम विपरीत झाला असतां, त्याची रचना पहिल्यापेक्षां अगदीं निराळी झाली असतां व प्रत्यात जन नष्ट झाला असतां माझे दुसरेच मित्र होतात, दुसरेच बंधु बनतात, पहिल्यापेक्षां निराळेच नवे भृत्य होतात व निवासस्थानेंही पहिल्यापेक्षां दुसरींच होतात. केव्हां मीं एकांतांत विंध्याद्रीच्या खोऱ्यांत आपलें घर करून राहिलों होतों. केव्हां सह्याद्रीवर आपलें घरटें बांधलें होतें. केव्हां दर्दुर पर्वतच माझें निवासस्थान होतें. क्वचित् मी हिमालयावर निवास करीत असें, केव्हां केव्हां मलयगिरीवर राहिलेलों आहें. केव्हां केव्हां मी प्राचीन आकारानेंच ह्या पर्वतावर येऊन आम्रवृक्षाच्या शाखेवर आपलें घर करतों. हें मुनिश्रेष्ठा! असंख्यात युगें गेलीं असतां हा वृक्ष पूर्वीच्याच आकाराचा झाला आहे. हे साधो! एक वेळ देहाचा त्याग करून हा वृक्ष पुन: तसाच झाला आहे. म्हणजे हा मजप्रमाणें चिरंजीवी नाहीं; याची रचना पूर्वीच्या रचनेहून निराळी झाली नाहीं. माझा पिता जिवंत असतांना या सुंदर वृक्षाची जी शोभा होती तीच रचना हल्लीं आहे, म्हणजे त्याचा जीवही पूर्वीचा नाहीं. फक्त रचना मात्र सारखी तशी आहे. अर्थात् हा वृक्ष पूर्वीच्या आकारानेंच उत्पन्न झाला व मी त्याच्यावर येऊन राहिलों आहें. पूर्वीं हीच उत्तर दिशा नव्हती. तर हिच्याहून निराळीच उत्तर दिशा होती. तसाच पूर्वीं हाच हा पर्वत नव्हता तर दुसराच पर्वत हा पर्वत झाला होता. अर्थात् तोच हा वृक्ष, तोच हा पर्वत ही प्रत्यभिज्ञाही सारख्या आकारामुळेंच होते. 'तर मग तूंही तसाच निराळा असशील' म्हणून म्हणशील तर तसें मात्र नाहीं. मी एकच असून माझ्या एकाच देहानें ब्रह्मदेवाचे अनेक दिवस-रात्र अनुभविले आहेत. कारण वर वर्णन केल्याप्रमाणें वारुणी प्रभृति धारणा धरून मी निर्विकल्प समाधींत स्थिर होतों; व ती समाधि सोडून व्युत्थान पावतांच या सृष्टीला पाहून तोच हा मेरु, तोच हा वृक्ष अशा रीतीनें ओळखल्या जाणाऱ्या तत्त्वांतच मी या सृष्टीला जाणतों. मी जर निराळा असतों तर 'तोच हा' अशी ओळख पटलीच नसती. सूर्य, चंद्र व नक्षत्रें यांच्या उदय–अस्तादि नियत सचारामुळें नियमानें उत्तर दिशेंतच असणाऱ्या मेरुप्रभृति पर्वतांच्या स्थानांमुळें दिशा प्रसिद्ध

होतात. त्यामुळें मेरु प्रभृति पर्वतांचें स्थान बदललें कीं दिशाही बदलतात. ही सर्व जगद्रचना अशी वारंवार बदलणारी असल्यामुळें तिला सत् असेंही मी समजत नाहीं व असत असेंही म्हणत नाहीं. हा केवळ बुद्धीचा भ्रम आहे. आत्म्याची जी मिथ्या विक्षेपशक्ति तिचें हें सर्व वैभव विकास पावत आहे. एका कल्पांत जो एकाचा पुत्र असतो तोच दुसऱ्या कल्पांत त्याचा पिता होतो. एका वेळीं जो एकाद्याचा मित्र असतो तोच दुसऱ्या वेळी त्याचाच शत्रु बनतो. शेंकडों पुरुष स्त्रीत्वास प्राप्त झालेले मला आठवतात. हे मुनीश्वरा ! कलियुगांत कृतयुगाचे आचार, कृतयुगांत कलियुगाची स्थिति, त्रेता व द्वापर यांत कृतयुगाचार व कलियुगाची स्थिति मीं पाहिलेली मला आठवते. वेद व वेदार्थ यांना ज्यांनीं पाहिलेलें नाहीं, आपल्या संकेताप्रमाणें जे यथेच्छ विहार करितात, व जे निरर्गल आचार करीत असतात अशा कांहीं सर्गांना मी क्वचित् पाहिलें आहे, व त्यांना मी चांगलें स्मरतों. हे ब्रह्मन् ! एक सहस्त्र चतुर्युगें संपल्यावर स्वरूपांत जगाचा उपसंहार करून वेधा एकाच एक समुद्रात्मकसारख्या जलांत शयन करतो व योगनिद्रेच्या मिषानें तो परमात्म्याचें ध्यान करूं लागला असतां, देव, दानव, मनुष्य इत्यादिकांसह सर्व जगत् जणु काय अभावरूपसें होऊन राहिलेलें मला आठवतें. तें याप्रमाणें लीन झालें. असतां ऐंदवाच्या मनोव्यापारानें निर्माण झालेले, पार्थिव आकारानें रहित व वायुरूप भूतांनीं व्याप्त अशा पूर्वी सांगितलेल्या दहा सर्गांस मी स्मरतों. मी ब्रह्मदेवाच्या प्रत्येक दिवसांतील ५८ कल्पांतील विचित्र स्थानांनीं युक्त असे विशिष्ट देशविचित्र कार्यें करण्यांत व्याकुळ झालेल्या भूतांचे-प्राण्यांचे कोश व विचित्र रचना, विलास आणि वेष यांनीं भरलेले सर्व सर्ग यांस आठवतों.

# सर्ग २३

—:*:—

१. ज्या दोषांचा त्याग केला असतां मृत्यु मनुष्यास पीडा देत नाहीं ते दोष, व मन कशामध्यें तत्पर करावें तें सर्व येथें सांगितलें जातें.

**श्रीवसिष्ठः**—हे पराक्रमी रामा ! त्यानंतर त्या कल्पवृक्षाच्या शाखेच्या अग्रावर मी आपली जिज्ञासा तृप्त करण्यासाठीं त्या काक पक्ष्याला पुनः असें विचारलें. हे श्रेष्ठ पक्षिराज ! या जगाच्या कोशांत संचार करणारी व्यवहार करणाऱ्यांच्याही शरीराला मृत्यु पीडा कशी करीत नाहीं ?

**भुशुंडः**— सर्वज्ञ ब्राह्मणा ! स्वतः जाणत असूनही केवल माझी परीक्षा पाहण्यासाठीं तूं मला असें विचारीत आहेस. समर्थ लोक नेहमीं असेच सेवकाचें वाक्चातुर्य प्रकट करण्यासाठीं त्यांना बोलावयास लावीत असतात. तथापि मला तूं जें विचारीत आहेत तें मी तुला सांगतों. संतांच्या आज्ञेप्रमाणें अनुवर्तन करणें हेंच त्यांचें मुख्य आराधन आहे, असें म्हणतात. ज्याच्या हृदयांत दोषरूपी मोत्यें ओवलेली वासनातंतूची माळ गुंफलेली नसते त्याला मृत्यु मारीत नाहीं. ज्यांच्यापासून निःश्वासरूप देहवृक्षास तोडणारे करवत संभवतात व ज्या सर्व देहावयवांना किड्याप्रमाणें आंतून पोंखरून सोडतात अशा (आधि) मनोव्यथा ज्याला त्रास देत नाहींत, त्याला मारण्याची मृत्यु इच्छा करीत नाहीं. शरीररूप वृक्षाच्या ढोलींतील सर्पांच्या समुहाप्रमाणें असलेल्या व ज्यांनीं असल्या चिंतारूपी फणा डोक्यावर ठेवल्या आहेत अशा, आशा ज्याच्या चित्ताला आंतल्या आंत जाळीत नाहींत, त्याला मारण्याची मृत्यु इच्छा करीत नाहीं. ज्याच्यामध्यें रागद्वेषरूपी विषाचे पूर, आणि मनोरूपी बिळ मंदिरांत रहाणारा असा लोभ-

सर्प ज्याला दंश करीत नाहीं, त्याला मृत्यु मारीत नाहीं. विवेकरूपी सर्व जल पिऊन टाकणारा शरीरसागरांतील वडवाग्निकोप ज्याला जाळीत नाहीं, त्याला मृत्यु मारीत नाहीं. उग्र व कठिण घाणा, तिळांच्या मोठ्या राशीलाहा जसा पिळून टाकतो त्याप्रमाणें मदन ज्याला ग्रासून पीडा देत नाहीं, त्याला मारण्याची इच्छा मृत्यु करीत नाहीं. ज्यानें एका निर्मल व परम पावन पदाचा चित्तविश्रांतीसाठीं आश्रय केला आहे---ब्रह्मपदावर चित्ताला शांत केलें आहे, त्याला मारण्याची इच्छा मृत्यु करीत नाहीं. शरीररूपी फुललेल्या उपवनांतील ताटव्यावर वेगानें येऊन पडलेल्या वानराप्रमाणें ज्याचें मन चंचल होत नाहीं त्याला मृत्यु मारूं शकत नाहीं, हे ब्रह्मन्! संसाररूपी व्याधीचीं कारणें असे हे महादोष केवल एका समाहितचित्तालाच यत्किंचितही नागवूं शकत नाहींत. शरीराचे रोग व मनाच्या चिंता ह्यांच्यापासून मोठ्या श्रमानें उत्पन्न झालेलीं दुःखें समाहित चित्त असणाऱ्याला त्रास देऊं शकत नाहींत. ज्याचें चित्त समाहित झालेलें असतें त्याचें ते चित्त अस्त पावत नाहीं, उदय पावत नाहीं, त्याला कशाची चांगली स्मृति होत नाहीं व कशाची विस्मृतिही होत नाहीं. ते निजलेलेंही नसतें व जागेंही नसतें. ज्यांनीं हृदयाकाशाला अंधःकारमय केलें आहे अशा काम-क्रोधविकारांपासून झालेल्या चिंता, चित्त समाहित--शांत असल्याची सर्व प्रकारें हिंसा करण्यास समर्थ होत नाहींत. ज्याचें चित्त समाहित असतें तो यथाशास्त्र कार्यें करीत असला तरी कांहीं देत नाहीं, घेत नाहीं, कांहीं टाकीत नाहीं व कशाची याचना करीत नाहीं. ज्याचें चित्त समाहित असतें त्याला दुष्ट अर्थ, दुष्ट कर्में, राग--द्वेषादि दुष्ट गुण, दुष्ट मर्मभेदक वाक्यें व दुष्ट नीति ह्यांतील कांहींही संताप देत नाहीं. ज्याचें चित्त समाहित असतें त्याच्या मागोमाग प्रकाशमान, पुष्कळ लाभयुक्त, मोठमोठीं व गुणयुक्त अशीं सर्व सुखें धांवत सुटतात. जें परिणामीं हितावह सत्य, निर्बाध, भ्रमरहित व विषयाशारहित सुख असतें, त्यामध्यें मन तत्पर करावं. चित्ताला पुरुषार्थ रहित करणाऱ्या अशुद्ध द्वैतापिशाचानें न पाहिलेलें सुखामध्यें मनाला तत्पर करावें. आरंभीं सुंदर, मध्येंही मधुर, शेवटीं पथ्यकर--सर्व दुःखाचें निवारण करणारें आणि चिरकाल अत्यंत उचित, असें जें ज्ञान, तत्पर मन करावें. अनंत, मनाला: हितावह, तथ्य, आदि---अन्त--मध्य अवस्थांमध्यें अनुगत आणि समस्त साधूंनीं सेवन केलेल्या आत्मसुखामध्यें मन तत्पर करावें. जें बुद्धीचा परम प्रकाश, जें आद्य परम अमृत व जें सर्वांहून श्रेष्ठ सौभाग्य त्या निरतिशय आनंदामध्यें मनाला तत्पर करावें. देव, असुर, गंधर्व, विद्याधर, किन्नर, व देवस्त्रीसमुदाय यांनीं युक्त असलेल्या स्वर्गांत कांहींही सुस्थिर व शुभ नाहीं. बा वसिष्ठा! वृक्ष, राजे, पर्वत, नगरांचे समूह व समुद्र यांनीं युक्त असलेल्या भूतळीं कांहींच सुंदर नाहीं. नाग, असुरांचा समूह, व त्याचप्रमाणें असुरस्त्रियांचा समुदाय यांनीं युक्त असलेल्या समस्त पाताळांत कांहींही सुंदर व स्थिर नाहीं. स्वर्ग, भूलोक, पाताळ व सर्व दिशांचे तट यांसहवर्तमान या जगांत कांहींएक सुंदर व स्थिर नाहीं. आधि-व्याधींनीं अत्यंत चंचल झालेल्या व दुःखाच्या ओघानें व्यापलेल्या अशा सर्वदा तुच्छ असलेल्या या सर्व क्रियाफलामध्यें कांहींही अत्यंत स्थिर व शुभ नाहीं. ज्यांनीं चित्ताला चंचल केलें आहे व हृदयाला उद्विग्न केलें आहे अशा चित्तविकाररूप मानसक्रियाफलामध्येंही कांहींएक अत्यंत स्थिर व शुभ नाहीं. हृदयरूप क्षीरसागराला

क्षुब्ध करण्यासाठीं मंदरपर्वताप्रमाणें वागणाऱ्या अत्यंत अस्थिर अशाही आपल्या संकल्प-विकल्पांमध्यें सुस्थिर व कल्याणकर असें कांहीं नाहीं. सतत उत्पत्ति विनाशयुक्त, अति अद्भुत, म्हणूनच तरवारीच्या धारांप्रमाणें असलेल्या तीक्ष्ण इंद्रियांच्या व्यापारांत सुस्थिर व शुभ कांहीं नाहीं. सर्व भूलोकांचें राजपद सुद्धां चांगलें नाहीं, अत्यंत ज्ञानसंपन्न असलेले जे इंद्र-बृहस्पति वगैरे देव त्यांचा आकार प्राप्त होणेंही श्रेयस्कर नाहीं. पाताळांतील शेष-नागस्वरूपही चांगलें नाहीं. कारण विवेक्यांचें मन सुस्थिर होईल असें त्यांतील कांहीं नाहीं. अत्यंत अनित्य व विस्तीर्ण असलेल्या नाना शास्त्रांचा विचार करणेंही चांगलें नाहीं, म्ह०[1]पुराण-न्यायादि चवदा विद्यामध्यें पूर्ण पांडित्यही चांगलें नाहीं, लोकांचीं इच्छित कामें आपल्या बुद्धिसामर्थ्यानें सिद्धीस नेऊन लोकानुरंजन करण्याचें सामर्थ्यही चांगलें नाहीं, भारतादि श्रेष्ठ कथांचें वर्णन करण्याचें सामर्थ्यही श्रेष्ठ नाहीं, कारण विवेकी संतांचें मन त्यांतील कशांतही स्थिर होत नाहीं. मानसिक व्यथांनीं भरलेलें दीर्घ जीवित चांगलें नाहीं, सर्व दुःखांचें निराकारण होईल असें मानण्याची दृढमूढता ज्यांत आहे असें मरणही चांगलें नाहीं. पुनः पापयोनींत जन्म घ्यावा लागत असल्यामुळें नरकही चांगला नाहीं. सर्व भुवनांचें अधिपत्यही चांगलें नाहीं, त्यांतील कशांतही विचारवानाचें मन आसक्त होत नाहीं. मुने अशाप्रकारचे जे हे सर्व विविध जगत्क्रम ते खरोखर पुरुषाच्या मतिमूढतेमुळें रम्य भासणारे आहेत, पण ते विवेक्याला तसे भासत नाहींत, कारण अत्यंत अशाश्वत म्हणून मानलेल्या पदार्थांमध्यें महात्मे नित्य विश्रांतीस कसे प्राप्त होतील ?

# सर्ग २४

—:•:—

१ येथें प्राणचिंतेचें वर्णन केलें आहे.

भुशुंडः—अपायरहित, भ्रमरहित, सर्व ज्ञानांमध्यें श्रेष्ठ, व सहज आरूढ होतां न येईल इतकी उन्नत केवल एकच दृष्टि आहे. साक्षात्कार होईपर्यंत केला जागारा आत्मविचार (आत्मचिंता) सर्व दुःखांचा अंत करणारी आहे. ती अनादिकालापासून काम-कर्मवासनांनीं प्रवृत्त झालेल्या दुःखस्वरूप संसारभ्रमाचें हरण करणारा आहे, ज्यांतील अविद्याकामादि मल घालविले आहेत अशा निष्कलंक मनोमार्गानें निरतिशय भूमानंदरूप प्रत्यगात्म-अंगण्यांत तो संचार करणारा आहे. तसाच तो प्राप्त झालेल्या सर्व दुःखांचा व भावि दुःखांचें अनुसंधान केल्यामुळें उत्पन्न होणाऱ्या चिंतादि सर्व अनर्थांचा नाश करणारा आहे. चंद्राचा प्रकाश काळोखाला जसा घालवितो त्याप्रमाणें अज्ञान व त्याचीं भ्रमरूप कार्यें यांचा त्या आत्मचिंतेनें पूर्णपणें अंत होतो. भगवन् ! ती सर्व संकल्परहित आत्मचिंता-साक्षात्कारापर्यंत आत्मविचार तुमच्यासारख्यांच्या ठिकाणीं सहज प्राप्त होणारा आहे; पण आमच्यासारख्यांच्या ठिकाणीं ती आत्मचिंता दुष्प्राप्य आहे. कारण, समस्त संकल्पांनीं विरहित, व पराकाष्ठेस प्राप्त झालेलें जें हें पद त्याला अशुद्ध प्राकृतबुद्धि कशी प्राप्त होणार ! ( मग तुला तें पद कसें प्राप्त झालें ? असें विचारशील, तर मी तिची एक

---

[1] पुराण न्याय-मीमांसा-धर्मशास्त्रांगमिश्रिताः। वेदाः स्थानानि विद्यानां धर्मस्य च चतुर्दश ।। याज्ञ. स्मृति अध्याय १. श्लो. ३.

यात ब्राह्मादि पुराणें, तर्कविद्या, मीमांसा-वेदवाक्यविचार, मानवादि धर्मशास्त्र, शिक्षा-व्याकरणादि सहा अंगें व वेद ही चवदा पुरुषार्थांचीं साधनें व धर्माचीं स्थानें आहेत.

सखी वश करून घेतली. ) हे महामुने ! त्या आत्मचिंतारूपी विलासिनीच्या कांहीं सख्या आहेत. त्या तिच्या कांहींशा साम्यावस्थेस पोंहोंचलेल्या आहेत. त्या आत्मसाक्षात्काररूप चंद्राच्या योगानें शीतळ झाल्या आहेत. हे मुनीश्वरा ! आत्मचिंतेसारख्याच असलेल्या त्या नानाप्रकारच्या आत्मचिंतेच्या मैत्रिणींतील एकीला मीं वश करून घेतलें आहे. सर्व दुःखांचा क्षय करणारी, सर्व सौभाग्य वाढविणारी व या लोकीं जीविताचें कारण अशा प्राणचिंतेचा मीं आश्रय केला आहे.

श्रीवासिष्ठः—असें बोलणाऱ्या त्या मुनिरूप भुशुंडपक्ष्यास, मीं सर्व जाणत असूनही केवल कौतुकानें अव्यग्र होऊन, पुनरपि असें विचारलें. सर्व संशयांचा विच्छेद करणाऱ्या व अत्यंत दीर्घकाल जिवंत राहणाऱ्या साधो ! प्राणचिंता कशाप्रकारची आहे तें मला यथार्थ सांग.

भुशुंडः—मुने ! तूं सर्व वेदान्तवेत्ता आहेस. सर्व संशयांचा नाइक-त्यांना घालविणारा आहेस, थट्टा करण्यासाठींच तूं मला कावळ्याला हें विचारीत आहेस ! किंवा तुमच्यासारख्या पूज्यांच्या समोर मी तुमच्या प्रश्नाचें उत्तर देतों. म्हणजे त्यामुळें मला ह्या प्राणदर्शनाचें सर्व प्रकारें ज्ञान होईल; त्यांत माझी काय हानि होणार आहे ? भुशुंडाचें दीर्घजीवित करणारें, त्याला स्वात्मलाभ करून देणारें असें हें मी आतां क्रमानें सांगत असलेलें प्राणसमाधान ऐक. भगवन् ! हें सर्व मनोरम देहरूपी घर पहा. त्याला वात-पित्त-कफरूप तीन प्रकारचे मोठे आधारस्तंभ आहेत. तें नऊ द्वारांनीं युक्त आहे. पुर्यष्टक ज्याचें कलत्र आहे व पुर्यष्टकच ज्याचे बांधव आहेत, असा अहंकाररूप गृहस्थ या गृहाचें सर्वतः परिपालन करतो. मी वर्णन करीत असलेल्या या देहगेहास तूं अंतःसाक्षित्वानें साक्षात् अनुभवीत आहेस. दोन कान या कानवल्याच्या आकाराच्या दोन सत्य चंद्रशालांनीं-शिरोगृहांनीं (झरोक्यांनीं) तें देहगृह युक्त आहे. मस्तकावरील केंस हेंच त्यावरील छप्पर आहे. मोठाले नेत्र याच त्याला खिडक्या आहेत. तोंड हेंच त्याचें मुख्य द्वार आहे. दोन्ही भुजा व कुशी ह्याच त्याच्या बाजूच्या पडव्या आहेत. दंतपंक्ति याच केसरपंक्तींनीं—तोरणांनीं त्याचें मुख्य द्वार भूषित केलें आहे. रूप-रसादि बाह्य विषयांची आंत सतत वर्दी पोंचविणारीं पांच ज्ञानेंद्रियें हेच त्याचे द्वारपाळ आहेत, लिंगदेहाच्या व्याप्तीच्या द्वारा सर्वत्र व्याप्त असलेल्या आत्मप्रकाशानें तें व्याप्त आहे. विशेषतः जागृतींत नेत्रांतील दोन कनीनिकारूप मुख्य द्वाराच्या उंच प्रकोष्ठांत गृहस्थ राहिलेला असतो. जल, माती व शेण यांनीं लौकिक घर जसें सारवतात त्याप्रमाणें हें देहगृह, रक्त, मांस व वसा यांनीं लिंपलेलें आहे. शिरांच्या परंपरेनें तें बांधून ठेवलेलें आहे. जाड अस्थिरूप काष्ठांनीं तें युक्त आहे. त्यामुळेंच त्याच्या भींति बळकट व स्थिर आहेत. अशा रीतीनें तें सुंदर गृह उत्तम प्रकारें रचलेलें आहे. हे मुनिश्रेष्ठा ! या देहाच्या मध्यभागीं इडा व पिंगला अशा दोन सूक्ष्म नाड्या उजव्या व डाव्या बाजूच्या कोठ्यांत फारशा व्यक्त नसलेल्या आहेत, त्या नासिकेमध्यें प्राणसंराच्या चिन्हावरून अभिव्यक्त होतात. त्यांत कमलाच्या तीन जोड्यांचें ( षट्चक्राचें ) एक यंत्र आहे ते सर्व प्राणशक्तीचा आश्रय आहे. बाहात्त[र] हजार नाड्यांचें तें जाळें आहे. त्याला 'पुरितत्' असें म्हणतात. तें अस्थिमांसमय अस[ले] तरी मृदु आहे. त्याला एक उर्ध्वनाळ आहे [व] व एक अधोनाळ आहे. त्यांच्या पाकळया एकमेकांशीं मिळून संपुटाकार होतात. नासिकेच्या अग्रापासून पायांपर्यंत सर्व देहाकाशांत संचा[र] करणाऱ्या चंद्र नांवाच्या अपानवायूच्या अमृत

सेकानें त्यर्चीं दळें-पाकळ्या विकास पावतात, त्याचप्रमाणें प्राणसंचारानें तीं थोडीं मिटतात. म्हणज त्या कमलाच्या पाकळ्या प्राणवायु व अपानवायु यांनीं व्याप्त होऊन थोडींशीं हलतात; म्हणजे उच्छ्वासाबरोबर विकास पावतात व निःश्वासाबरोबर संकोच पावतात. रानात वारा लागला लतांचीं पानें हलल्यामुळें वारा अधिक उत्पन्न होतो त्याप्रमाणें प्राणापानांच्या योगानें आंतील कमलांचीं पानें हालूं लागलीं असतां तो शरीरसंचारी वायु वाढतो, याप्रमाणें वृद्धि पावलेला तो वायु हृदय, वायु, ( गुरुद्वार ) नाभि, कंठ, सर्वांग इत्यादि अनेक स्थानीं जाऊन (पंच) प्राणादिसंज्ञक होऊन, खालीं व वर असणाऱ्या, ज्यांतील प्रत्येक नाडीला बाहात्तर हजार शाखानाड्या आहेत, अशा एकांतरशत नाड्यांमध्यें प्रवेश करून देहात पसरतो. त्यामुळें तो हृदयवायु विचित्र—निरनिराळी क्रिया व चेष्टा करतो, म्हणून त्याला प्राण. अपान, समान इत्यादि नांवें तज्ज्ञ देतात, चद्रबिंबापासून किरण पसरतात त्याप्रमाणें हृद्यकमलत्रयामध्यें असलेल्या सर्व प्राणशक्ति शरीरांत खालीं व वर पसरतात. सर्व देहभर अन्नरस पोहोंचविण्यासाठीं त्या प्राणशक्ति नाड्यांत शिरतात, त्यांतून बाहेर येतात, अन्नरस नाड्यांत भरतात, तेथून घेऊन जातात, इतस्ततः विहार करितात, वर एकदम नेतात व सत्वर खालीं आणतात. हे मुने ! हृदयांत असलेल्या त्या वायूला ज्ञानी लोक प्राण असें म्हणतात. त्याचीच एक शक्ति नेत्रांची उघडझाप करविते. दुसरी शक्ति स्पर्शाचें ग्रहण करते. तिसरी शक्ति नासिकेच्या द्वारा वाहते. चवथी अन्नाला जिरविते. पांचवी वचनें बोलते. पुष्कळ सांगून काय करावयाचें आहे ? जसा एकादा यंत्रचालक यंत्राकडून सर्व चेष्टा करवितो त्याप्रमाणें हा भगवान् वायु शरीरांत सर्व कांहीं करितो. त्यांत प्राण व अपान या नांवाचे दोन वायु वर गमन करणें व खालीं गमन करणें, या दोन क्रिया करण्याचें पतकरून वर व खालीं पसरले आहेत. ते दोन्ही श्रेष्ठ वायु सर्वांना माहीत आहेत. हे मुने ! त्यांच्या गतीचें नित्य अनुसरण करीत मी स्थित आहें. ज्यांचें स्वरूप क्रमानें उष्ण व शीत आहे, जे नेहमीं आकाशांतील वाटसरू आहेत, शरीररूपी महायंत्राचे जे घोडे आहेत, ज्याना इतर इंद्रियाप्रमाणें श्रम होत नाहींत, जे हृदयाकाशांतील सूर्य-चंद्र आहेत, जे अग्नि-सोमस्वरूप आहेत, शरीररूपी नगराचें पालन करणारें जें मन त्याच्या रथाचीं जे दोघे चाकें आहेत, या अहंकारसंज्ञक राजाचे जे प्रशंसनीय व इष्ट घोडे

१. पुरितत्-धीं संबद्ध असलेल्या नाड्यांच्या छिद्रांत प्रवेश करून तो वायु पसरतो.

१. वायु शरीरातच परिच्छिन्न होऊन राहिला आहे, अशी जी साधारण समजूत आहे, तिचा परित्याग करून ' मी अधिदैव सूत्रात्मा आहे,' अशा धारणेने इंद्रियांच्या व्रताचा त्याग करणे व केवल प्राणव्रतच धारण करणे, हेंच प्राणापानाचें अनुसरण आहे. वाक् मी भाषणच करीन असें व्रत धरून बसली, चक्षु मी पाहीनच, असे म्हणाले. श्रोत्रादि इतर इंद्रियांनींही असेंच श्रवणादिकाचें व्रत धरलें. पण सर्व इंद्रियांचीं तीं सर्व व्रतें आसक्तिरूप पापानें दूषित झालीं होतीं. म्हणून श्रमरूपी मृत्यूनें त्याच्या त्या व्रताचा भंग केला, प्राणाचें मुख-नासिकादि स्थानातून संचार करणें हेंच व्रत होतें. तें विषयासक्तीनें दूषित झालेलें नव्हते. त्यामुळे श्रमरूप मृत्यु त्याचा भंग करण्यास समर्थ झाला नाहीं. त्यामुळें व्रतभंग न झालेला एकटा प्राणच मृत्यूकडून ग्रासला जात नाहीं. वास्तव तोच मी आहें, अशी धारणा व केवळ त्याच्या व्रताचें आचरण एतद्रूप प्राणचिंतेनें मीं मृत्यूला जिंकले आहे, असा भुशुंडाचा आशय आहे. बृहदारण्यकांत ही व्रतमीमांसा आहे.

आहेत अशा प्राण व अपान या नांवाच्या त्या दोघां शरीरवायूंच्या गतींचें अनुसरण करणाऱ्या मीं यावज्जीव त्यांची उपासना सोडली नाहीं. ते दोघेही माझ्या जाग्रत, स्वप्न व सुषुप्ति या तीन अवस्थांमध्यें सदा समरूप असतात. म्ह० मी तसा अतिशय अभ्यास केला असल्यामुळें बाहेर व आंत ते बारा अंगुळें, सोळा अंगुळें, इत्यादि नियत प्रदेशांतच संचार करितात, कधीं न्यूनाधिक होत नाहींत. त्यामुळें सुषुप्तिमध्यें असल्याप्रमाणें पूर्ण सुखानें माझे सर्व दिवस जातात. कमलनालांतील तंतू फाडून हजार विभाग केले असतां त्याचा जो अत्यंत सूक्ष्म भाग होतो त्याहूनही अत्यंत सूक्ष्म असलेल्या नाड्यांतून होणारी या प्राणापानांची गति विद्यमान असूनही दिसत नाहीं. हे महात्मन्! हृदयादि स्थानांमध्यें ज्यांचा सतत संचार होत असतो त्या प्राणापानांची अनेक श्रुतींमध्यें प्राणोपासनप्रकरणांत वर्णिलेली जी–निर्दोषत्व, श्रमरहितत्व, अभग्नव्रतत्व इत्यादि विविधगति तिची पुढें सांगितलेल्या प्रकारानें उपासना केल्यामुळें ज्याचा मृत्युपाश सर्वथा नष्ट झाला आहे असा पुरुष तत्त्वज्ञानानें जीवन्मुक्त होऊन या संसारांत पुनः उत्पन्न होत नाहीं.

---

# सर्ग २५

—:※:—

१. प्राणापानांच्या गतीमध्यें रेचकादिकांची योजना. २. प्राणापानांच्या उदयाचें व लयाचें स्थान ब्रह्म.

**श्रीवासिष्ठः**—राघवा! याप्रमाणें सांगणाऱ्या त्या पक्ष्याला 'प्राणवायूची गति असते कशी?' असें मीं पुनः विचारलें.

**भुशुंडः**—हे मुने! स्वतः सर्व जाणत असूनही मौजेनें मला कशाला विचारतोस? पण तूं विचारलें आहेस म्हणून मी सांगतों, ऐक. हे ब्रह्मन्! हा स्पंदशक्तियुक्त सदागतिमान् प्राण सतत सबाह्य-अभ्यंतर देहांत राहतो. ह्या प्राणाची गति ऊर्ध्व आहे. वसिष्ठमुने! हा अपानही स्पंदशक्तिमान्, सदा गमन करणाराच असून सबाह्य-अभ्यंतर देहांत आहे, पण हा अपान अधोगतिमान् आहे. त्याअर्थी जागेपणीं व निजल्यावरही हा उत्तम प्राणायाम चालूच असतो त्याअर्थी प्रथम तोच प्राणायाम करण्याणासाठीं, हे तज्ज्ञा! तूं ऐक. हृदयकमलछिद्रांतून प्राणाचें जें स्वभावतःच यत्नावाचून बाह्योन्मुखत्व म्हणजे स्वभावतःच बाहेर येऊं लागणें, त्यालाच रेचक असें बुद्धिमान् योगी समजतात. (हृदयापासून मूर्धास्थानापर्यंत प्रश्वासगतीचा जो अर्धा मार्ग तो आंतील रेचक आहे, असें चिंतन करावें.) मूर्धादिस्थानापासून बाहेर बारा अंगुळेंपर्यंत संचाराच्या अर्ध्या वाटेपर्यंत प्राणाचा जो अंगस्पर्श त्याला पूरक म्हणतात. यत्नावांचून स्वभावतःच अपानवायु बाहेरून आंत जोरानें प्रवेश करूं लागला असतां जो नासाग्रापासून मूर्धपर्यंत व मूर्धपासून हृदयापर्यंत वायूचा स्पर्श होतो (अशा दोन प्रकारचा अन्तःपूरक म्हणतात. अपान अस्त पावला असतां प्राण पुनः हृदयांत जोंवर उदय पावत नाहीं, तोंवर जी अवस्था असते ती (अंतः) कुंभकावस्था होय; योगीलोक तिचा अनुभव घेतात. नासाग्राच्या बाहेर बारा अंगुळापर्यंत जें अपानाचें उदयस्थान आहे त्यांतही रेचक, कुंभक व पूरक असा तीन प्रकारें प्राणायाम होतो. सर्वकालीं असणारा व कोणत्याही प्रकारच्या यत्नावांचून आपोआप होणारे जे रेचकादिक बुद्धिमानांनीं सांगितले आहेत ते हे महामते! तूं ऐक. बारा अंगुल प्रमाणाच्या बाह्य प्रदेशापासून अभिमुख होऊन राहिलेला जो वायु त्याच्या त्या स्वाभाविक बाह्य पूरकादिकांचें बाह्य प्रदे-

शांतच चिंतन करावें. तयार होऊन माती बाहेर न आलेल्या घटाची स्थिति होते त्याप्रमाणें अपानाची नासाग्राच्या अगदीं समोरील द्वादशांगुल प्रदेशांतील वायूमध्यें जी नित्य स्थिति तिलाच ज्ञानी बाह्य कुंभक म्हणतात. बाहेर जाण्यास तयार असलेल्या वायूची जी हृदयापासून नासाग्रापर्यंत गति तिला योगवेत्ते जन पहिला बाह्य पूरक असें म्हणतात, नंतर नासिकाग्रापासूनही निघून बारा अंगुलांपर्यंत जी बाहेरील गति त्या वायूच्या गतीला बुद्धिमान् दुसरा बाह्य पूरक समजतात. प्राण बाहेर अस्त पावल्यापासून पुनः अपानाचा उद्गम होईतोंवर जो पूर्ण सम अवस्थेंत असलेला वायू त्याला बाहेरील कुंभक समजतात. अपानाच्या स्पंदावांचून ( अपानाचा प्रस्पंद उत्पन्न होण्यापूर्वीं ) त्याचें जें अंन्तर्मुखत्व--प्रस्पंदास तयार होणें, त्यास बाह्य रेचक समजावें; त्याचें चिंतन केलें असतां तो मुक्ति देतो. बाहेर अंगुल प्रदेशापासून उत्पन्न होऊन नासाग्रापर्यंत चलनानें अपानाची जी स्वरूपाभिव्यक्ति व त्यामुळें त्याची होणारी जी पुष्टि तिला बाहेरील दुसरा पूरक म्हणावें. जो योगी प्राणापानांच्या स्वभावभूत बाह्य व आभ्यंतर कुंभकादिकांची सतत उपासना करतो तो पुनरपि उत्पन्न होत नाहीं. हे महाबुद्धे ! देहवायूंच्या स्वभावभूत असलेल्या या आठ अंगभूत प्राणाचें रात्रंदिवस चिंतन केलें असतां ते मुक्ति देणारे होतात, हें मीं तुला सांगितलें. स्वभावतः अतिशय चंचल असलेले हे वायु जातां--येतां, स्थिर असतांना, जागेपणीं व झोंपेंतही वर सांगितल्याप्रमाणें अभ्यास केला असतां कांहीं कालानें निरोधावस्थेस प्राप्त होतात. मनानेंच या कुंभकादिकांचें सतत अनुस्मरण करणारा मनुष्य जें करतो व जें खातो त्याचा आंत कर्ताही नसतो. म्हणजे यांच्या अनुसंधानानें त्याचा कर्तृत्वभोक्तृत्वादि अभिमानही जातो. ह्याप्रमाणें अभ्यास करणाऱ्याला कांहीं दिवसांनीं कैवल्यपद प्राप्त होतें. ब्राह्मण कुत्र्याच्या चामड्याच्या पिशवीवर ( त्यांतील दुग्धादिकांवर ) जशी प्रीति ठेवीत नाहीं, याप्रमाणें या प्राणायामाचा अभ्यास करणाऱ्या पुरुषाचें चित्त बाह्य विषयवृत्तींमध्यें आसक्ति धरीत नाहीं. या दृष्टीचा आश्रय करून जें कृतकृत्य होऊन राहिलेले असतात त्यांना सर्व प्राप्तव्य प्राप्त झालेले असतें. तेच खरोखर अखिन्न असतात. उभेराहातांना, जातांना, निजतांना, जागतांना वगैरे सतत जर या दृष्टीनें चिंतन केलें तर बंधन प्राप्त होत नाहीं. प्राणापानांच्या चिंतनानें ज्यांना यथार्थ बोध झाला आहे ते कामादि मल व मोह अगदीं शांत झालेला स्वस्थ चित्तानें हृदयस्थ प्रत्यगात्म्यामध्यें राहातात. सदा सर्व कर्मे करणाराही निर्मल ज्ञानी पुरुष प्राणापानांच्या गतीचें चिंतनांत लागला तर सर्वथा स्वरूपांत स्थित होतो व

१. श्वास हृदयांतून बाहेर येऊं लागला म्हणजे हृदयापासून मूर्धेपर्यंत जी त्याची अर्धी गति तो रेचक, त्याचेंच बाहेर बारा अंगुलप्रमाणें प्रदेशांत गमन हा बाह्य पूरक, अपान आंत प्रवेश करूं लागला असतां नासाग्रापासून मूर्धेपर्यंत एक व मूर्धेपासून हृदयापर्यंत दुसरा जो वायूचा स्पर्श तो दोन प्रकारचा अन्तःपूरक होय. हे बाहेर जाऊन आंत शिरणाऱ्या प्राणाचे चार प्रकार झाले. अपानाचेही असेच चार प्रकार होतात. बाहेर यावयास तयार झालेल्या वायूची जी हृदयापासून नासाग्रापर्यंत गति तो बाह्य पूरक, नासाग्रापासून बाहेर जी बारा अंगुल प्रदेशांतील गति तो दुसरा बाह्य पूरक, अपानानें नासाग्रांतून हृदयांत आवयास तयार होणें हा बाह्य रेचक व प्रत्यक्ष आंत जाऊं लागणें हा दुसरा रेचक आहे. असे हे एकंदर आठ अंगभूत प्राणायामाचे प्रकार आहेत. त्यांत आंतर कुंभक व बाह्य कुंभक मिळविले असतां एकंदर दहा प्रकार होतात. पण कुंभक प्रधान असल्यामुळें त्यांची अंगांबरोबर गणना केलेली नाहीं.

सुखानुभव घेतो. हे ब्रह्मन् ! प्राणाचा अभ्युदय हृदयस्थ कमलपत्रापासून होतो व बाहेर बारा अंगुलप्रमाण प्रदेशांत हा प्राण अस्त पावतो. हे मुने ! अपानाचा उदय बाहेरील बारा अंगुल प्रमाण प्रदेशापासून होतो व हृदयांतील कमलांत त्याचा अस्त होतो. प्राण ज्या बाहेरील द्वादश अंगुल प्रमाण आकाशप्रदेशांत समाप्त होतो त्याच आकाशस्थानांतून हा अपान त्यानंतर आंत येतो. बाह्य आकाशांत जावयास तयार झालेला प्राण अग्नीच्या ज्वालेप्रमाणें ( उर्ध्व गतीनें ) वर वाहतो व हृदयाकाशाकडे जावयास तयार झालेला अपानपाण्याप्रमाणें निम्नभागीं ( खालीं खालीं ) वाहतो. अपान चंद्रमा आहे, तो बाहेरून देहाला पुष्ट करतो. व प्राण सूर्य किंवा अग्नि आहे, तो आंतून या शरीराला पक्व करतो. प्राण सूर्य आहे, असें चिंतन करावें. तो प्रतिक्षणीं हृदयाकाशाला संतप्त करून अगदीं उंच जाऊन मुखाच्या अग्रभागाच्या आकाशाला संतप्त करतो. अपानाचें चंद्रदृष्ट्या चिंतन करावें. तो अगोदर मुखाच्या अग्रभागाला आर्द्र करून मागून एका निमेषानंतर हृदयाकाशास पुष्ट करतो. अपानचंद्राची शेवटची कला--अन्त्य भाग जेथें--ज्या हृदयस्थ ब्रह्मामध्यें प्राणसूर्यानें ग्रासलेली असते त्या पदास प्राप्त झालेला पुरुष पुनरपि शोकांत पडत नाहीं. त्याचप्रमाणें प्राणसूर्याची अन्तस्थ(शेवटची) कला ज्या द्वादशांगुलपर्यंत बाह्य आकाशानें उपलक्षित होणाऱ्या ब्रह्मांत अपानचंद्रानें ग्रासली आहे, त्या पदाला प्राप्त झाल्यावर मनुष्य पुनः जन्माला येत नाहीं. सबाह्य-अभ्यंतर आकाशांत प्राणच सूर्य होतो आणि मागून तोच आल्हाद देणारा चंद्र होतो. पुढें तो प्राणच शरीराला अल्हाद देणाऱ्या चंद्रत्वाचा त्यागकरून एका क्षणांत सूर्यत्वास म्हणजे संशोषण करणाऱ्या पदास प्राप्त होतो. अर्थात् पर्यायानें एकाच वायूच्या वर सांगितलेल्या दोन शक्ति उद्भवतात, असें चिंतन करावें. बाहेर बारा अंगुल प्रमाण प्रदेशांत पसरलेला प्राण जोंवर सूर्यत्व म्हणजे उष्णत्व सोडून शीततेस प्राप्त झाला नाहीं तोंवर प्राणापानांची संधिअवस्था असते. ह्या अवस्थेंत देहाच्या बाहेर प्राणाचा लय झालेला असल्यामुळें आत्म्याचें देहरहितत्व, निष्क्रियत्व, निर्मनस्त्व इत्यादि वास्तविक स्वभाव कसे संभवतात त्याचा विचार केला जातो. त्या बाह्य कुंभकाच्या वेळीं देहादि देशपरिच्छेद व सूर्यचंद्ररूप प्राणापानांच्या क्रियेमुळें होणारा आयु:कालपरिच्छेद यांचा अभाव असल्यामुळें योगी देशकालरहित स्वात्म्यामध्येंच प्रतिष्ठित होतो; आणि त्यामुळें शोक करीत नाहीं. त्याचप्रमाणें अन्तःकुंभकाचे वेळीं हृदयांतील प्राणापानाच्या संधींत प्रतिष्ठित झालेल्या मनाला त्याचें अधिष्ठान जें परमात्मतत्त्व त्याचा साक्षात्कार अवश्य होत असल्यामुळें तें मन पुनरपि उत्पन्न होत नाहीं. किंवा हृदयस्थ स्वात्मा हाच प्राणसूर्य आहे, तोच अपान होऊन चंद्ररूपानें उदय व अस्त पावतो व तोच व्यानादि किरणांच्या रूपानें शरीरांत जाणें-येणें इत्यादि व्यवहार करतो; त्यावांचून दुसरा कोणी नाहीं, अशी जो उपासना करतो त्याला आत्मज्ञान होतें. उदय व अस्त यासहित चंद्र, त्याचे किरण, त्यांचें जाणें येणें, आणि सूर्य देव, ह्यांना जो हृदयांत पाहूं शकतो, तोच खरा ज्ञानी. बाहेरील अंधकार क्षीण झाला किंवा न झाला तरी आत्मसाक्षात्काररूप सिद्धि मिळत नाहीं. यास्तव हृदयांतील अज्ञानरूप अंधकाराचा क्षय करावा. त्याचा क्षय झाला असतां उत्तम सिद्धि प्राप्त होते. शिवाय बाह्यतमाची कल्पनाही हृदयस्थ तमामुळें होत असते. यास्तव हृदयस्थ अज्ञानाख्य तमाचा क्षय झाला कीं बाह्य अज्ञानावरणरूप तमाचाही क्षय अवश्य होतोच,

बाह्य तमाचा क्षय झाला असतां जगद्रूपाचा प्रकाश होतो. पण हृदयस्थ तमाचा क्षय झाला कीं हे मुने ! आत्मप्रकाश होतो. यास्तव मोठ्या यत्नानें हृदयांतील अज्ञानाचा क्षय करणाऱ्या, व ज्ञात झाल्यानें विशेष मुक्ति देणाऱ्या प्राणसूर्याला उदय व अस्त यांसह अवलोकन करावें. हृदयकमलाच्या ज्या गुहेंत अपानचंद्र अस्त पावतो त्याच स्थानापासून बाहेर जाण्यासाठीं उन्मुख झालेला प्राणसूर्य आंत उदय पावतो, म्ह० छाया क्षीण झाली असतां तेथेंच जसा प्रकाश तत्काल दिसतो त्याप्रमाणें अपान अस्त पावला असतां हृदयकमलापासून प्राण उदय पावतो. ऊन सर्व बाजूंनीं नाहींसें झालें असतां त्याच्या मागोमाग छाया जशी येते, त्याप्रमाणें प्राण अस्त पावला असतां तो जेथें अस्त पावतो त्याच बाह्य आकाशापासून अपान तत्क्षणीं उदय पावतो. हे सद्बुद्धे ! प्राणाच्या जन्मभूमींत अपान नष्ट झाला आहे व अपानाच्या जन्मभूमींत प्राण नष्ट झाला आहे, असें तूं जाण. प्राण अस्त पावला असतां व अपान उदयोन्मुख झाला असतां बहिःकुंभकाचा चिरकाल आश्रय केल्यानें योगी पुनः शोक करीत नाहीं. त्याचप्रमाणें अपान अस्त पावून प्राण किंचित् उदयोन्मुख झाला असतां अन्तःकुंभकाचा चिरकाल आश्रय केल्यानें योगी पुनः शोक करीत नाहीं. अर्थात् प्राण व अपान यांच्या उदयोन्मुखतेचाच निरोध करावा. बारा अंगुलप्रमाणाचें जें अपानाच्या उदयाचें बाह्याकाशांतील स्थान त्याच्या पलीकडे म्ह० सोळा अंगुळें दूर पसरणाऱ्या प्राण्याच्या रेचकाचा आश्रय करून निःशेष वायूचें रेचन केल्यामुळें स्वच्छ झालेल्या कुंभकाचा अभ्यास करणारा पुनः दुःखी होत नाहीं. अपान नासाच्छिद्रांतून आंत प्रवेश करूं लागला असतां तो बाह्य रेचकाचा आधार व प्राणाचें पूरण करण्यासाठीं आंत प्रविष्ट झालेला देहान्तर्गत पूरक आहे, अशी उपासना केल्यास योगी पुनः जन्म घेत नाहीं ज्या हृदयाकाशांत--म्ह० आंत प्राण व अपान हे दोन्ही विलय पावलेले असतात त्या शांत आत्मपदाचा आश्रय केल्यानें पुरुष संतप्त होत नाहीं. अपान प्राणाचें भक्षण करण्यास तयार झाला असतां बाहेर म्ह० प्राणाच्या लयाचें अधिष्ठान अशा चित्--मध्यें किंवा आंत--प्राण जेथून बाहेर पडतो त्या चित्--मध्यें सर्वांचा बाध करून देश, काल व वस्तु चिन्मात्रस्वभाव आहे असा विचार केल्यानें मनुष्य पुनः शोक करीत नाहीं. त्याचप्रमाणें हृदयांत प्राण अपानाचें भक्षण करण्यास तयार झाला असतां, आंत व बाहेर सर्वाधाररूपानें असलेल्या चित्--मध्यें देशादिकांचा बोध करून देश-कालाला तद्रूप पाहाणारें मन पुनः उत्पन्न होत नाहीं. बाहेर व आंत अशा ज्या स्थानीं प्राण अपानाकडून व अपान प्राणाकडून भक्षण केले जातात त्या स्थानानें प्राणापानांसह देश व कालही खाल्ले आहेत असें जाण, प्राणाचा अस्त झाला आहे व अपानाचा उदय झालेला नाहीं असा जो संधिक्षण त्यांतील ती अवस्था सर्व प्राण्यांच्या परिचयाची आहे. पण सामान्य प्राणी तिला जाणत नाहींत. योगी जाणतात. अनायासानें सिद्ध बाह्य कुंभकाला योगी ब्रह्मपदच समजतात. तसाच यत्नावांचून सहज सिद्ध असलेला जो अंतःस्थ कुंभक तो परमपद आहे, हेंच तें आत्म्याचें रूप, हीच ती शुद्ध परमा चित् आहे. हेंच तें सदा प्रकाशमान पद आहे. याला प्राप्त होऊन योगी शोक करीत नाहीं. पुष्पाच्या आंत जसा वास त्याप्रमाणें प्राणाच्या आंत तें तत्त्व अवस्थित आहे. पण तो आत्मा प्राण नव्हे व अपानही नव्हे. तथापि त्याचा परिचय होण्यासाठीं तो प्राणाच्या आंत आहे असें म्हटलें आहे. सारांश आम्ही

त्या निरुपाधिक चिदात्म्याची उपासना करतों. जलाच्या आंत जसा आस्वाद (माधुर्य) त्याप्रमाणें अपानाच्या आंत अवस्थित असलेल्या चिदात्म्याची आम्ही उपासना करतों. तो सजीव नव्हे व निर्जीवही नव्हे. प्राणक्षयाची अखेर आणि अपानाच्या शेवटचा अंत, अशा प्राणापानाच्यामध्यें असणाऱ्या चिदात्म्याची आम्ही उपासना करतों. प्राणाच्या प्राणनादि व्यापाराचें निमित्त, जीवाचें श्रेष्ठ जीवननिमित्त व देहाचें श्रेष्ठ धारण अशा चिदात्म्याची उपासना करतों. मनाच्या मननाचें अबाधित, निमित्त, बुद्धीचें मुख्य ज्ञानसामर्थ्य, अहंकाराच्या अहंकृतीचें निमित्त अशा चिदात्म्याची आम्ही उपासना करतों. ज्याच्यामध्यें हें सर्व आहे, ज्याच्यापासून हें सर्व झालें आहे, जें हें सर्व व जें सर्वतः आहे, जें सर्वमय व नित्य आहे, त्या चित्तत्त्वाची मी उपासना करतों. जी सर्व ज्योतींची पुण्यकारक ज्योति, जें सर्व पावनांचें पावन, जें खरोखर मन-बुद्धि इत्यादि विकारानीं स्वभावापासून च्युत न होणारें, त्या चित्सत्त्वाची आम्ही उपासना करतो. जेथें अपान अस्त पावला व प्राण उदय पावला नाहीं अशा संधिक्षणांत जें कल्पनारूप कलंकानें रहित असलेलें चित्तत्त्व त्याची आम्ही उपासना करतों. जेथें अपान उदय पावला नाहीं व प्राण अस्त पावला आहे अशा नासाग्रानें उपलक्षित होणारा बारा अंगुल प्रमाण आकाश हाच आवर्त[१] आहे त्या चित्तत्त्वाची आम्ही उपासना करतों. जेथें प्राण अस्त पावतो व जेथें अपान अस्त पावतो आणि जेथें दोन्ही उत्पन्न झालेले नाहींत त्या चित्तत्त्वाची आम्ही उपासना करतों. योगी ज्यांना प्राप्त होतात अशीं जीं दोन प्राण व अपान यांच्या उत्पत्तीचीं क्रमानें आंत व बाहेर असलेलीं स्थानें त्यांचें अधिष्ठान चित्तत्त्व आहे; त्याची आम्ही उपासना करतों. जें प्राण व अपान या रथावर आरूढ झाले आहे, जें परिच्छिन्न होऊन प्राणापानांच्या समुदायरूप महाप्राणन व अपानन या शक्तिरूप होतें आणि जें सर्व इंद्रियांच्या शक्तीचेंही शक्तिरूप आहे, त्या चित्तत्त्वाची आम्ही उपासना करतों. जें हृदयांतील प्राणकुंभकरूपानें, बाहेर अपानकुंभकरूपानें व त्यांचा त्याग करणें एतद्रूप रेचकपूररूपानें विवर्त पावतें त्या चित्तत्त्वाची उपासना आम्ही करतों. प्राण व अपान यांच्या गतीचें निमित्त, सत्तात्म व ज्ञानस्वरूप, रूपरहित असें जें प्राणोपासनेच्या फलरूपानेंही प्राप्त होणारें चित्तत्त्व त्याची मी उपासना करतों. इंद्रियांनीं विषयाजवळ जाण्याचें व विषयोपभोगाचें जें निमित्त आणि जें सर्व कारणांचेंही कारण त्या चित्तत्त्वाची आम्ही उपासना करितों. सारांश, वस्तुतः जें सर्व कल्पना कलंकांनीं रहित, पण अविद्यादृष्ट्या जें जीवोपाधिभूत प्राणादि सोळा कलांनीं[१] परिवेष्टित झाल्यासारखें दिसतें, यथार्थ अनुभव हेंच ज्याचें निरतिशय वैभव आहे व ज्याला सर्व देवांनीं प्रणाम केला आहे, अशा त्या श्रेष्ठ पदाला मी शरण आहें. मी त्याची उपासना करतों.

---

१. प्राण व अपान यांच्या प्रवाहाचा संधि एकमेकांच्या विरुद्ध असलेल्या दोन प्रवाहांच्या संघर्षांतच आवर्त–भोंवरे होतात, असें आपण जल, वायु इत्यादिकांच्या प्रवहांत पाहतों.

१. प्राण, श्रद्धा, आकाश, वायु, तेज, जल, पृथिवी, इंद्रियें, मन, अन्न, वीर्य, तप, मंत्र, कर्म, लोक व नाम अशा प्राणादि सोळा कला प्रश्नोपनिषदांत सांगितल्या आहेत. याचें सविस्तर वर्णन बापटकृत प्रश्नोपनिषद्भाष्यार्थ पृ. १२१ वर पहा.

# सर्ग २६

—:*:—

१. दीर्घ जीवनाचीं कारणें.

भुशुंड:—मीं स्वतःच या वर सांगितलेल्या क्रमानें प्राणामध्यें चित्त स्थिर करून निर्मल आत्म्यामध्यें चित्ताची विश्रांति चांगल्या रीतीनें संपादन केली. हे महामुने! या दृष्टीचा आश्रय करून मी अगदीं स्थिर झालों आहे. मेरूहूनही मी अचल आहें, एक निमेषभरही मी स्वस्थानापासून चळत नाहीं. आत्म्याच्या ठिकाणीं प्राप्त झालेली ही उत्तम समाधि मी जात असतांना, उभा असतांना, जागतांना, निजतांना, व स्वप्नांतही, ढळत नाहीं. जगाच्या चंचल नित्यानित्य इष्टानिष्ट लक्षण स्थितींमध्यें मी विक्षेपरहित आहें, मी अन्तर्मुख आहें. स्वच्छंदानें मी स्वरूपानें आत्म्यामध्यें राहतों. प्रवह या नांवाच्या ज्योतिश्चक्राधार वायूचाही निरोध होईल, महानद्यांच्या जलाचा प्रवाहही अडवून धरतां येईल, पण या समाधानापासून ढळविणारा एकही विरुद्ध विषय मला दिसत नाहीं. हे महातपस्विन्! प्राणापानांच्या चिंतनानें व परमात्म्याच्या दर्शनानें मी आतां, तें शोकरहित आद्य पद झालों आहें. हे ब्रह्मन्! महाप्रलयापर्यंत भूतांचें उन्मज्जन व निमज्जन पहात बुद्धीला धैर्ययुक्त करून मी अद्यापि जिवंत राहिलों आहें. मीं केव्हांही भूतकालांतील गोष्टींचें स्मरण करीत नाहीं व भविष्यकालच्या गोष्टींचें चिंतन करीत बसत नाहीं. तर नित्य वर्तमानस्वभाव साक्षिदृष्टीचा मनानें आश्रय करून राहत आहें. यदृच्छेनें जशीं कार्यें प्राप्त होतील त्याप्रमाणें त्यांत त्यांच्या फळांच्या एषणेचा-इच्छेचा त्याग करून निरभिमानत्वामुळें सुषुप्तीसारख्या बुद्धीनें केवळ परिनिष्ठित होतों. इष्ट व अनिष्ट या भावनांनीं युक्त असलेली जी भावाभावमय चिंता ती त्याज्य आहे, असा निश्चय करून मी चिरकाल सर्वशोकरहित होऊन राहतों. प्राण व अपान यांच्या संधींतील जें प्रकाशमय ब्रह्म त्याचें उत्तम प्रकारें अनुस्मरण करीत मी स्वतः आत्म्यामध्यें संतुष्ट होतों; व सर्व पीडारहित होऊन दीर्घकाल जिवंत आहें. हें मला आज प्राप्त झालें व ती सुंदर वस्तु मला लवकरच प्राप्त होईल, ही चिंता मला नाहीं; त्यामुळें मी दीर्घकाल सर्व दुःखशून्य होऊन स्थित आहें. हे साधो! मीं केव्हांही व कोठेंही थोडीसुद्धां आपली स्तुति करीत नाहीं व दुसऱ्यांची निंदा करीत नाहीं. त्यामुळें मी या शुभ दशेस प्राप्त झालों आहें. माझें मन शुभप्राप्ति झाली असतां संतुष्ट होत नाहीं व अशुभप्राप्ति झाल्यानें खिन्न होत नाहीं, तर तें नेहमीं सम असतें; त्यामुळें मी या शुभ जीवनास प्राप्त झालों आहें. सर्व द्वैताला मिथ्या समजणें, एतद्रूप परमत्यागाचा आश्रय करून मी जीवितादि सर्वांचाच सर्वदा त्याग केला आहें, त्यामुळें मी या शुभ जीविताचा अनुभव घेत आहें. हे मुने! माझें मन सर्व चापल्यरहित सर्व शोकरहित, स्वस्थ आत्मस्थ, समाहित व शांत झालें आहे, त्यामुळें मी निरुपद्रव होऊन जिवंत आहें. लांकुड, सुंदर स्त्री, पर्वत, गवत, अग्नि, बर्फ व आकाश या सर्वांला मी सर्वत्र सम पाहतों, त्यामुळें मी सुखानें राहिलों आहें. आज मला काय मिळालें व उद्यां काय मिळेल हा चिंताज्वर मला नाहीं, त्यामुळें मी अनामय राहिलों आहें. जरा-मरणादि दुःख प्राप्त झालीं असता मी भीत नाहीं व राज्यलाभादि सुखें प्राप्त झालीं तरी तुष्ट होत नाहीं, त्यामुळें सर्व-उपद्रवरहित होऊन मी स्थित आहें. हे ब्रह्मन्! हा बंधु आहे, हा शत्रु आहे, हा माझा आहे व हा दुसऱ्याचा आहे, असें मी म्हणत नाहीं. त्यामुळें मी निरुपद्रव राहतों. अनेक वस्तुरूपानें

पासगारें हें सर्व आदि-अंतरहित निरुपद्रव ब्रह्मच आहे, हा माझा आत्माही चितच आहे, असें मी जाणतों, त्यामुळें मी निरुपद्रव राहत आहें. मी वस्तूंचा स्वीकार करतों, विहार करतों, उभा राहतों, खालीं बसतों, उच्छ्वास सोडतों, निजतों. पण मी देह आहें, असें केव्हांही म्हणत नाहीं, त्यामुळें मी चिरंजीव आहें. हें सर्व संसारांतील कार्यजात आहे तें मिथ्या आहे असें मी जाणतों व सुषुप्तावस्थेंत असल्याप्रमाणें निर्विकार राहिलों आहें. त्यामुळें मी अनामय आहें. यथाकाल प्राप्त झालेल्या[१] अर्थाला व अनार्थाला शरीरांतील दोन हातांप्रमाणें मी समान समजतों, त्यामुळें नाश पावत नाहीं. मी स्थिर शक्तीनें व स्निग्ध आणि मुग्ध सुदृष्टीनें सर्वत्र सरळ आत्मतत्त्व पाहतों, त्यामुळें माझा नाश होत नाहीं. अहंकाररूपी मळ धुवून टाकलेल्याची माझी या नखशिखान्त शरीरावर ममता नाहीं, त्यामुळें मी दीर्घ जीवितांचा अनुभव घेत आहें. मी जें करतों व जें भोगतों, त्यांच्याविषयींचा अभिमान सोडून शरीरानें तें तें जरी करीत असलों तरी माझें मन नैष्कर्म्याचा म्ह० अकर्तृ-अभोक्तृस्वभावाचा स्वीकार करतें, त्यामुळें मी चिरकाल आनंदानें जिवंत आहें. हे मुने ! जेव्हां जेव्हां मी कांहीं जाणतों तेव्हां तेव्हां माझी बुद्धि नम्रपणा सोडीत नाहीं; त्यामुळें मी सुखानें चिरकाल जगतों. मी दुसऱ्याचा पराभव करण्यास समर्थ असूनही तो करीत नाहीं मला पीडा दिली तरी मी दुःखी होत नाहीं. मी दरिद्री असलों तरी कशाचीही इच्छा करीत नाहीं, त्यामुळें मी सुखानें राहतों. हें शरीर चेतनप्राय आहे, असें जरी भासत असलें तरी मी त्यांतील केवळ चिदात्म्यासच पाहणारा आहें, त्याप्रमाणें चिदात्मा सर्व भूतांमध्यें समभावनेनें स्थित असल्यामुळें सर्वभूतस्थ आत्मा होऊन भूतसमूहाला मी आपल्या शरीराप्रमाणें पहाणारा आहें, त्यामुळें दीर्घकाल आनंदानें जिवंत राहतों. मी सर्वदा एकाग्रचित्त होत्साता आशापाशांनीं प्रेरित झालेल्या चित्तवृत्तीला हृदयांत प्रवेशच करूं देत नाहीं, त्यामुळें मी चिरंजीव आहें. मी बाह्य दृष्टिविषयामध्यें निजलेला असा होऊन जगाचें मिथ्यात्व पहातों, पण अंतरांत जागा राहून आत्म्याचें सत्यत्व हातांतील बेलफळाप्रमाणें प्रत्यक्ष पाहतों, त्यामुळें मी चिरंजीवित आहें. जीर्ण झालेल्या, फुटलेल्या, शिथिलावयव झालेल्या, कृश झालेल्या, क्षुब्ध होऊन हालचाल करणाऱ्या, चूर्ण झालेल्या व क्षय पावलेल्या सर्व वस्तूंनीं मी नव्या वस्तूंप्रमाणें पाहतों, त्यामुळें निरुपद्रव होऊन जीवंत राहतो. मी आपत्तींत पर्वताप्रमाणें धीर असतों व संपत्तीच्या वेळीं जगन्मित्र होतों. वित्तादिकांची वृद्धि झाली किंवा त्यांचा क्षय झाला तरी माझीच वृद्धि झाली व मी क्षीण झालो असा मी अभिनिवेश धरीत नाहीं. सुखी जीवाला पाहून मी सुखी होतो व दुःखी जीवाला पाहून दुःखी होतों, सर्वांचा मी प्रिय आहें, त्यामुळें निरुपद्रव दीर्घजीविताचा अनुभव घेतों. मी हें शरीर नाहीं, दुसरा कोणी माझा नाहीं, मी दुसऱ्या कोणाचा नाहीं, अशा भावानें माझें चित्त भावित झालें आहे. त्यामुळें मी निरुपद्रव आहे. मी जगत् आहें, मी आकाश आहें, मी देश व काल यांचे क्रम आहें, मीच क्रिया आहें, अशी माझी बुद्धि आहे; त्यामुळ मी दीर्घकाल जिवंत राहतों. घट चित् आहे, पट चित् आहे, आकाश चित् आहे, वन चित आहे व गाडी चित् आहे, याप्रमाणें सर्व चित् आहे, असा माझा भाव आहे, त्यामुळें मी अनामय जिवंत राहतों. हे मुनिश्रेष्ठा ! याप्रमाणें हा मी त्रैलोक्यकमलांतील एक क्षुद्र अळी-

१. प्रारब्धामुळें भोगकालानुसार प्राप्त झालेल्या.

सारखा असणारा 'भुशुंड' या नांवाचा चिरंजीव काक आहें, हे मीं तुला सांगितलें. उत्पत्यादि भावविकारांनीं विचित्रस्वरूपाचें झालेलें, पुनः पुनः उत्पन्न होऊन नाश पावणारें व त्यामुळेंच आकुल होऊन परिभ्रमण करणारें आणि साक्षिदृश्य बुद्ध्यादिकांचा विषय होणारें जे चंचल त्रिभुवन त्याला व्युत्थानदशेंत या ब्रह्मार्णवांतील तरंगाप्रमाणें पाहणारा व समाधिदशेंत विलीन करणारा असा मी चिरकाल स्थित आहें.

---

## सर्ग २७

१. भुशुंडाची प्रशंसा, २. वसिष्ठाची पूजा. ३. आकाशमार्गानें स्वलोकप्राप्ति.

**भुशुंडः**—हे ज्ञानपारंगत ब्रह्मन् ! मी ज्या प्रकारें चिरजीव झालों आहें व या शरीरेंद्रियसमूहात परमार्थतः जें मी आहें त सर्व केवल तुझी आज्ञा पाळावी म्हणून मी धाष्टर्यानें सांगितले आहे.

**श्रीवसिष्ठः**—भगवन ! अहाहा, खरोखर तूं मोठा विचित्र व श्रवणेंद्रियाचें भूषण असा हा आपला वृत्तान्त सांगितला, तो अत्यंत आश्चर्याचें कारण आहे. साक्षात् दुसऱ्या ब्रह्मदेवाप्रमाणें असलेल्या तुझ्यासारख्या अत्यंत चिरंजीव महात्म्याचे ज्यांना दर्शन घडतें, ते धन्य होत. माझ्या दृष्टि आजपर्यंत ज्या राहिल्या त्यानें आज सार्थक्य झालें. बुद्धीला पावन करणारा आपला सर्व वृत्तान्त तूं मला जशाचा तसाच सांगितलास. मीं सर्व दिशांमध्यें भ्रमण केलें, देव व विद्वान् यांच्या ज्ञान व ऐश्वर्य रूपी संपत्ति पाहिल्या, पण जगांत तुझ्यासारखा महात्मा मीं कोठे पाहिला नाहीं. मोठ्या यत्नानें दीर्घकाल शोध केल्यास एखादा मोठा तत्त्वज्ञ जन कसाबसा सांपडलो, पण तुझ्यासारखा महात्मा या जगांत कोठेंच सुलभ नसतो. वेळूच्या बेटांतील कदाचित् एखाद्याच वेळूंत जसें मोतीं होतें, त्याप्रमाणें या जगांत कोठें एखाद्याच ठिकाणीं तुझ्यासारखा पुरुष दिसतो. पुण्यदेही व विमुक्तात्मा अशा तुला आज मीं अवलोकन केलें, हे फार मोठें शुभकार्यच संपादन केलें. यास्तव तुझें कल्याण असो; तूं आपल्या शुभ गृहेंत प्रवेश कर, कारण माझा माध्यान्ह कर्म करण्याचा समय झाला आहे, यास्तव मी आपल्या-सप्तर्षि लोकांतील घरीं जातो. हें ऐकून भुशुंडानें वर उठून आपल्या संकल्पित हातांनीं त्या झाडावरून सुवर्णपात्र घेतलें. ज्याची बुद्धि पूर्ण आहे अशा त्यानें तें पात्र कल्पवृक्षावरील सुवर्णवर्ण लतापुष्पकेसरांनीं व मौक्तिकयुक्त अर्घ्यानें भरलें आणि त्या आर्घ्यपाद्य-पुष्पानीं त्या चिरंजीव भुशुंडानें माझी पायापासून मस्तकापर्यंत भक्तीनें शंकराप्रमाणें पूजा केली. 'हे पक्षिश्रेष्ठा ! माझ्या मागोमाग पोंचवावयास येण्याचे श्रम तूं उगीच करूं नकोस,' असें बोलून मी आसनावरून उठलों आणि त्या वृक्षावरून पक्ष्याप्रमाणें उड्डाण केलें. तोही माझ्या मागोमाग आकाशांत एक योजनपर्यंत आला. तेव्हां आपल्या हातानें त्याचा हात धरून त्या भुशुंडपक्ष्याला मीं बलात्कारानें परत फिरविलें. मी एका क्षणांतच आकाशात अदृश्य झालों असता तो पक्षिश्रेष्ठ आपल्या घराकडे परतला. खरोखर सज्जनसंगति सोडवत नाहीं. आम्ही दोघेही एकमेकांस दिसेनासे झालों. सागरांत जसा तरंग त्याप्रमाणें मी आकाशांत अदृश्य झालों असतां त्यानंतर भुशुंडाचें अखंड स्मरण करीत मी सप्तर्षिमंडलास प्राप्त झालों. व इतर मुनींचें दर्शन घेतलें. माझ्या भार्येनें म्ह० अरुंधतीनें माझी पूजा—सत्कार केला. पूर्वीं कृतयुगाच्या आरंभीं दोनशें वर्षें होऊन गेलीं असतां मेरूच्या शिख-

रावरील वृक्षावर माझी भुशुंडांशीं भेट झाली. हे रामा! आज तें कृतयुग संपून जाऊन आतां त्रेता चालू आहे. या त्रेतायुगाच्या मध्यें शत्रुमर्दना! तूं झाला आहेस. पुनःपि आतां आठ वर्षांपूर्वी त्याच मेरुपर्वतावर भुशुंड तसाच (जरारहित) तरूण मला भेटला होता. असा हा जो मीं भुशुंडाचा विचित्र व अत्यंत श्रेष्ठ वृत्तान्त तुला सांगितला आहे तो एकून व त्याचा मनांत विचार करून जें तुला युक्त दिसेल तें कर.

श्रीवाल्मीकीः—याप्रमाणें जो कोणी शुद्धमति पुरुष या उत्तममतिमान् भुशुंडाची सत्कथा एकून तिचा चांगला विचार करील, तो जन्मादिकांनीं व्यापलेले व त्यामुळेच व्याकुळ झालेले जीव या प्रसिद्ध मिथ्या माया नदीला स्वतःच्या प्रयत्नानें याच शरीरांत तरून जाईल.

---

# सर्ग २८

—:•:—

१. आख्यायिकेशीं प्रकरणाचा संबंध. २. देहांच्या अनित्यत्वाचें वर्णन. ३. देहादिकांचे भ्रान्तिमात्रत्व.

श्रीवसिष्ठः—हे निष्पापा रामा! अशाप्रकारें मीं हा भुशुंडाचा वृत्तान्त तुला सांगितला. या उपासनेनें भुशुंड अविवेकजन्य संकटापासून तरला. महापराक्रमी रामा! प्राणायामाच्या या दृष्टीचा अभ्यासपूर्वक आश्रय करून भुशुंडाप्रमाणें तूंही या महासागराचें उल्लंघन कर. त्याप्रमाणें सतत अभ्यास केल्यामुळें प्राप्त झालेल्या ज्ञानानें व योगानें भुशुंड प्राप्य ब्रह्मवस्तूस प्राप्त झाला त्याप्रमाणें तूं त्या ब्रह्मास प्राप्त हो. प्राण व अपान यांची वर सांगितल्या प्रमाणें उपासना करणारे व आपल्या बुद्धीला कोठेंही भ्रामक न होऊं देणारे सर्व भुशुंडाप्रमाणें परतत्त्वामध्यें अवस्थितीस प्राप्त होतात. या विचित्र विज्ञानदृष्टि तूं एकल्या आहेस. आतां बुद्धीचा आश्रय करून तुला योगाभ्यासपूर्वक किंवा उपासनापूर्वक, जशी स्वात्मप्रतिष्ठा संपादन करावयाची इच्छा असेल तशी कर.

श्रीरामः—भगवन्! भूमीवर अवतीर्ण झालेल्या सूर्याप्रमाणें असलेल्या तुम्हीं आपल्या ज्ञानरूप किरणांनीं अनात्मा देहच मी आहें, अशी भ्रामक समजूत व त्यामुळें होणारीं दुष्कर्में हीं दोन्हीं ज्याच्यामुळें होतात त्या हृदयस्थ तमाला—अज्ञानाला अगदीं नाहींसें केलें आहे. दुसरे तुम्हीच असे हे आम्ही चांगले ज्ञानी झालों आहों, त्यामुळें अत्यंत हृष्ट झालों आहों. आम्ही आत्मस्वरूप अधिष्ठानांत प्रविष्ट झालों आहों. ज्ञेय ब्रह्माला जाणून आम्ही विज्ञानवान् होऊन राहिलों आहों. अहाहा! भुशुंडाचें चरित्र किती आश्चर्यकारक आहे? भगवन्! आपण उत्तम अर्थाचा म्ह० आत्मतत्त्वाचा बोध करविणारें तें चरित्र मला सांगितलेंत. ब्रह्मन्! आपण सांगितलेल्या त्या भुशुंडचरित्रांत जें मांस, चर्म व अस्थि यांनीं निर्मिलेलें शरीररूपी गृह सांगितलेंत ते कोणीं बरें रचलें आहे? तें कोणापासून उत्पन्न झालें आहे? तें कोणामुळें अवस्थित झालें आहे? व त्यांत राहतो कोण--त्याचा स्वामी कोण आहे?

श्रीवसिष्ठः—राघवा! परमार्थाचा बोध होण्यासाठीं व दोषाचें निराकरण होण्यासाठीं मी जें तत्त्वतः सांगणार आहें तें हें आतां एक. हाडें हेंच ज्याचे आधारस्तंभ आहेत, ज्याला नऊ द्वारें आहेत, रक्त व मांस यांनीं जें लिंपलेलें आहे, असें हें शरीररूपी गृह हे राघवा! कोणींही रचलेलें नाहीं. आकाशांत दोन चंद्र आहेत असा तिमिररोग्याला जसा

भ्रम होतो त्याप्रमाणें हें केवल आभासमात्र आहे. त्याला निर्माण करणारा[१] कोणी नसतांनाच तें हे असें भासत आहे. तें सत व असत् अशा रूपानें व्यवस्थित आहे. जोंवर आपल्याला दोन चंद्र दिसत असतात तोंवरच तें दोन वाटतात. वस्तुतः चंद्र एकच आहे, तसाच देहही जोंवर प्रतीत होत असतो तोंवर त्याची स्थिति वाटते. वास्तविक तो असतच असतो, तथापि अनादि सत् हें त्याचें अधिष्ठान असल्यामुळें त्याला सत् म्हणतात त्यामुळें तो सद्रूप व असद्रूप आहे. स्वप्नांत दिसणारे पदार्थ स्वप्नदशेंत सत् असतात व इतर अवस्थांमध्यें असत् होतात. जेव्हां पाण्यावर बुडबुडा दिसतो तेव्हां तो खरा असतो, पण पुढे तो पाण्यांत लीन झाला म्हणजे असत् होतो. त्याच न्यायानें जेव्हां देह प्रतीत होतो तेव्हां तो 'सत्' पण त्याची प्रतीति येईमाशी झाली व शुद्ध आत्म्याचें दर्शन झालें कीं असत् होतो. जोंवर आपल्याला मृगजळाचा प्रतिभास होत असतो तोंवर तें मृगजळ सत् असते, पण मरुभूमीचें ज्ञान झालें म्हणजे तें असत् होतें. त्याच न्यायानें प्रतिभासाच्या वेळीं देह सत्य व जेव्हां अधिष्ठान चिदात्म्याचा साक्षात्कार होतो तेव्हां असत् आहे सांप्रतकाळीं हें सर्व आभासमात्रच भासत आहे. मी हा अमुक नांवाचा आहें. असा पूर्वी धरलेला जो देहाहंकार त्याचे संस्कार दृढ झालेले असल्यामुळें मी देह आहें असा भ्रम पुनः पुनः होतो व त्यामुळें तो नित्य आहे, असें भासतें. यास्तव रामा! मांस, अस्थि इत्यादिमय देहच मी आहें हा भ्रम सोड. कारण संकल्पामुळें निर्माण झालेले हजारों देह आहेत. तूं एका देहानें मोठ्या सुखानें शय्येवर जेव्हां निजलेला असतोस तेव्हांच ज्या स्वप्नातल्या देहानें तूं दशदिशा फिरत असतोस तो तुझा देह कोठें असतो? जागृतावस्थेंतील मनोराज्यांत तूं ज्या देहानें स्वमार्गांतील अमरावत्यादि नगरांत किंवा मेरूवर संचार करतोस तो तुझा देह कोठें असतो? स्वप्नांतही दुसरें स्वप्न पडून त्यांत तूं ज्या देहानें पृथ्वीवरील निरनिराळ्या प्रदेशांत फिरतोस तो तुझा देह कोठें असतो? एका मनोराज्यांतील दुसऱ्या मनोराज्यांत तूं ज्या देहानें मोठ्या वैभवभूमींत संचार करतोस तो तुझा देह कोठें असतो? कल्पना सुटतांच कल्पित देहही सुटतो. अशा मनोराज्यांतील ज्या गत देहांनीं तूं विचित्र जगत्क्रिया करतोस, ते तुझे देह कोठें आहेत? तूं संकल्पजन्य प्रिय व सुंदर स्त्रीशीं ज्या शरीरानें समागम करून सुखी होतोस तो तुझा देह कोठें आहे? हे रामा! वर सांगितलेले हे देह जसे संकल्पापासूनच सदसन्मय उत्पन्न होतात तसाच व त्याचप्रमाणें आचार करणारा हा जागृतींतील देहही संकल्पापासून झालेला व मिथ्या आहे. हें धन, हा देह, हा देश, असा जो हा विभ्रम तो सर्व चित्ताच्या बळामुळें होणाऱ्या संकल्पाचा विलास आहे. रघुनंदना! या संसाराला तूं दीर्घ स्वप्न जाण, किंवा दीर्घ

१ जलांतील चंद्राच्या प्रतिबिंबाचा कोणी कर्ता नसतो. आकाशांत तिमिररोगामुळें दिसणाऱ्या दोन चंद्रांचाही कर्ता कोणी असत नाहीं. कर्त्यावाचूनच पाण्यांत चंद्रप्रतिबिंब व आकाशांत दोन चंद्र दिसतात. श्रुतींत ईश्वर निर्माण करणारा आहे, असें सांगितलें आहे, पण तें ईश्वरकर्तृत्वही मुख्य नव्हे, गौण आहे. कारण पुरुषाच्या श्वासोच्छ्वासाप्रमाणें त्याच्यापासून हे सर्व होते, असा श्रुतींतच दृष्टान्त दिला आहे. जीवही शरीराचा निर्माता नाहीं. कारण ते त्याच्या बुद्धिपूर्वक होत नाहीं व जीवच जर शरीराचा स्वतंत्र कर्ता असता तर त्यानें आपल्यासाठीं देवादि इष्ट शरीरच उत्पन्न केलें असतें. अनिष्ट शरीर कधींच उत्पन्न केलें नसतें.

चित्तभ्रम समज अथवा हें दीर्घ मनोराज्य आहे अशी भावना कर. सूर्योदय झाला असतां सर्व जसें स्पष्ट दिसतें त्याप्रमाणें परमात्म्याच्या स्वाभाविक इच्छेनें जेव्हां तूं आत्मज्ञानास चांगल्याप्रकारें प्राप्त होशील तेव्हां तूं हें उत्तम प्रकारें पाहशील. स्वप्नांतील संकल्पसमूहानें जशी विचित्र जगत्स्थिति होते त्याप्रमाणें ही संकल्परचनाही कांहीं अनिर्वाच्य आहे. जशी मीं पूर्वी उत्पत्तिप्रकरणांत ब्रह्मदेवाची उत्पत्ति सांगितली, तशीच मनाची उत्पत्ति आपोआप केवल कल्पनेनें होते. मन विचित्र रचनेनें युक्त आहे, तें विभ्रमांनीं युक्त आहे, तें केवल संकल्पकलामात्र आहे, तसेंच हें जगाचें अवभासन आहे. ज्याप्रमाणें मनाचा कल्पित आभासच ब्रह्मदेवत्वास प्राप्त झालेला आहे त्याचप्रमाणें पूर्वदेह सोडण्याचे वेळीं कल्पिलेला उत्तर देह उपस्थित होतो. पूर्वसंकल्पांच्या प्रवाहानें ज्याचा दीर्घकाल अभ्यास केलेला असतो त्याविषयींचीच वासना दृढ होते; आणि त्या दृढ वासनेनें तसाच देह दिसतो. जशा आकृतीची भावना केलेली असते तशाच आकृतीचा उदय होतो. रामा! दीर्घ प्रयत्नानें मनाला अन्तर्मुख करून हा देहादिकाविषयींचा संकल्प चित्च आहे, अशी भावना दृढ करावी. रामा! आपण जर विपरीत भावना केली तर तिचा परिणामही विपरीत होतो. हा देहच मी व हा संसार माझा आहे. अशी भावना केली असता तसाच अनुभव येतो. रामा! दृढ भावनेनें जो सत्य आहे, अशी वासना केली जाते तो सत्यच भासतो. ज्याची भावना तीव्र वेगानें केली जाते तेंच अनुभवाला येतें. रामा! सर्व दिवसभर अत्यंत सुंदर कांतेचा ध्यास केला असतां तीच जशी स्वप्नांत दिसते त्याप्रमाणें भावनेनें ज्याचा पुष्कळ अभ्यास केला आहे असा हा संसारही अवलोकन केला जातो. एक क्षणही स्वप्नांत जसा संपूर्ण दिवस भासतो त्याप्रमाणें हें क्षणिक जगतही स्थिर दिसतें. सूर्यकिरणांनीं तापलेल्या वाळवंटांत (आकाशांत) ही ज्याप्रमाणें मृगजळाची नदी दिसते त्याप्रमाणें ही पृथिवी वस्तुतः विद्यमान नसतांनाही संकल्पामुळें विद्यमान असल्यासारखी दिसते. दृष्टीच्या वैरूप्यामुळें आकाशांत मोरांच्या पिसांचा झुबका दिसतो, त्याप्रमाणेंच ही जगद्रूपी लक्ष्मी भ्रमामुळें भासते. पण दृष्टि निर्दोष झाली असतां आकाशांत दिसलेला मोरांचा पिसारा जसा दिसत नाहीं, त्याप्रमाणें यथार्थ ज्ञान झाल्यावर ही जगपसारा भासत नाहीं. आपणच आपल्या संकल्पानें कल्पिलेल्या व्याघ्र-सिंहादिकांस जसा एखादा भितरा मनुष्यही भीत नाहीं, त्याप्रमाणें संकल्पामुळें उत्पन्न झालेल्या संसारास ज्ञानी भीत नाहीं. स्वतः आत्माच या बहिर्मुख दर्शेत हा असा भासत आहे, त्यामुळें या संसारमार्गातील स्थितींत, कोण कोणाला भिईल? व तें भय तरी कोठचें? जो भितो त्याचेंच विवेचन करावें. विवेचनानें तो निरुपाधिक झाला असतां त्या अद्वय शुद्ध आत्म्यामध्यें हा जगाचा भयादिरूप मोह दिसत नाहीं. आत्म्याचें यथार्थ स्वरूप जाणल्यानें आत्मा शुद्ध म्ह० निरुपाधिक होतो; आणि त्यानंतर चांगली परीक्षा करून हें सोनें आहे, असें ठरल्यावर पुनः तें तांबें आहे अशा भ्रमाला जसें पात्र होत नाहीं त्याप्रमाणें शुद्ध आत्मा पुनः अहंकारादि मळाचा स्वीकार करीत नाहीं हे त्रिभुवन आभासमात्र आहे, त्याला सतही म्हणतां येत नाहीं व असतही म्हणतां येत नाहीं; वास्तव जगाच्या कल्पनेचा त्याग करणें हेंच यथार्थ ज्ञान होय, असें ज्ञानी म्हणतात. मरण, जीवित, स्वर्ग, ज्ञान, अज्ञान इत्यादि कांहींही चित्प्रकाशाहून निराळें नाहीं, अशी जी एकता-चिन्मात्रपरिशेष तेंच यथार्थ दर्शन

होय. तूंपणा, मीपणा, इत्यादि सर्व संसार व या सर्व दशदिशा माझ्याहून पृथक् नाहींत, तर हें सर्व स्वप्रकाश आत्मस्वरूप आहे, असें ज्याणें हें यथार्थ दर्शन आहे, असें ज्ञानी समजतात. सत् व असत् या शब्दांच्या मिश्रणानें झालेल्या या जगांत असंभवत्व आहे तसेंच अवलोकन केल्यानें मन उत्पन्न होत नाहीं व अस्त पावत नाहीं. यथार्थ ज्ञानानें मन सर्व पदार्थांच्या असत्त्वाचा म्हणजे बाधाचा व सत्त्वाचा म्हणजे अधिष्ठान सन्मात्राचा निर्णय करून निष्काम बनतें व त्यामुळें शांत होतें. यथार्थ ज्ञानानें मन कोणाची निंदा करीत नाहीं व स्तुति करीत नाहीं. तें द्रष्टा होत नाहीं व शोक करीत नाहीं. तर तापत्रयरहित समत्वास प्राप्त होतें. माझ्या सर्व संबंधी जनांना अवश्य मरावयाचें आहे. तेव्हां बंधुवियोग झाला असतां वृथा संतप्त कशाला होतोस ? मला अवश्य मेलें पाहिजे हा निश्चय आहे. तेव्हां स्वतःचें मरण प्राप्त झालें असतां तूं वृथा कशाला संतप्त होतोस ? उत्पन्न झालेल्या पुरुषाला उत्तम वैभव वगैरे प्राप्त होणें अवश्य आहे. त्यांत हर्षाला अवकाश कोठें आहे? या संसारांत व्यवहार करणाऱ्या दरिद्र्यांमध्ये प्रत्येक मनुष्यावर आपत्ति येणें अवश्य आहे. तर शोकाला अवकाश कोठचा ? सागरांतील बुडबुड्यांप्रमाणें हें जगजाल वाढतें, लयास पावतें व स्फुरण पावतें. त्याविषयीं तुझें काय करावयाचें आहे ? जें सत्-अबाधित आहे तें केव्हांही झालें तरी सत्‌च असणार व जें असत् तें असत्-च ! तेव्हां केवळ मायेच्या विकारांचें वैचित्र्य हेंच ज्याचें स्वरूप आहे अशा या प्रपंचांत दुसरें आहे की ज्याच्यासाठीं हा शोक केला जातो ! मी अहंकारात्मा वर्तमानसमयीं नाहीं. भूतकाळीं नव्हतों व भविष्यत्काळींही नसेन. हा देह काम-कर्म-वासना-अविद्या इत्यादि विचित्र दोषांपासून उत्पन्न झालेला आहे. तेव्हां आतां तुम्ही कशाविषयीं शोक करावयाचा ? अरे वत्स ! मी चित्प्रकाशात्मा देहाहून अगदीं निराळा आहें तर ते सद्रूप माझे कोण कीं, ज्याच्याकरितां शोक केला जातो ? याप्रमाणें यथार्थज्ञानरूप मुनीचें जें अंतःकरण निश्चययुक्त असतें, तें अस्त पावत नाहीं, उदय पावत नाहीं. व शांत झालेलें असल्यामुळें संतप्तही होत नाहीं. आपलें घरटें बनविण्यासाठीं सभोंवतालच्या मुळाजवळचा कठिण भाग टाकून मृदु [illegible] तेवढें जसा तित्तिरपक्षी घेतो त्याप्रमाणें सर्वोत्तमदर्शी स्थिर झालेला ज्ञानी सर्व अनात्म्याचा बाध झाल्यावर अवशिष्ट राहिलेल्या आत्मत्वाचाच स्वीकार करतो. यास्तव या असत्य प्रपंचावर थोडीशीही आस्था ठेवूं नये. दोरीनें मोठा बैल जसा बांधला जातो त्याप्रमाणें आस्थेनें प्राणी बद्ध होतो. यास्तव हे निष्पापा ! तूं आपल्या बुद्धीनें या श्रेष्ठ मताचा पूर्वोक्त युक्तीनें पूर्ण निर्णय करून आस्थारहित बुद्धीनें विहार करावास आस्था सोडून शुद्ध तूं यथेष्ट आचरण करूं नयेस. तर अकर्तव्याची उपेक्षा करून, आस्था व अनास्था यांचा सहज-प्रभावांतून त्याग करून, आपलें विहित कर्तव्यच करीत जा. जसा हें सर्व आभासमात्रच भासते तो, सूर्यास्त झाला असतां सर्व भुवन जसें शांत होतें त्याप्रमाणें, मनांत शीतलतेस प्राप्त होतो. हे निष्पापा ! या सर्व पदार्थसमूहांतील विशेष आकारांचा त्याग करून तूं हा सर्व आभासमात्र सामान्य सत्तेनें पहा, म्हणजे तुला सर्वानुगत सन्मात्राचा साक्षात्कार होईल. पण हे रामा ! तो आभासमात्र चिदाभास विशेष आकाराच्या कल्पनेनें कलंकित झालेला असतो, म्हणून त्याचाही त्याग करून तूं निराभास हो. हे उत्तमा ! तूं चिदाकाशमय, नित्य सर्वगामी-पूर्ण व सर्ववर्जित हो. आत्मस्वरूप

आभासाचा परित्याग केल्यावर तूं नित्य निर्मल होशील. मी नाहीं व हे माझे भोग सत्य नाहींत, असें चिंतन केलें असतां हें वृथा अवडंबर अनर्थ करण्या इतकें प्रतीत होत नाहीं. चित्ताच्या ठिकाणीं या सर्वांचा बाध होतो किंवा सर्व चिदात्मरूपच आहे, हें दोन प्रकारचें चिंतन सत्य व अत्यंत सिद्धि देणारें आहे. रामा! वरील दोन प्रकारच्या चिंतनांतील जें एक चिंतन तुला रम्य वाटत असेल त्याचा आश्रय कर; किंवा वरील दोन्ही चिंतनांचा आश्रय करावा, असें जर तुला वाटत असेल तर तसेंही केलेंस तरी चालेल. निष्पापा रामा! त्या दोन्ही दर्शनांनी व्यवहार करून तू रागद्वेषांचा परिहार कर. जें कांहीं फळ या लोकांत, भुवर्लोकांत किंवा स्वर्लोकांत सांगितलेलें आहे तें सर्व, रामा! राग-द्वेषांचा सर्वथा क्षय केला असतां प्राप्त होत. रामा! राग-द्वेषांनीं दूषित झालेल्या बुद्धीनें मूढाचें जें जें आचरण होतें तें तें सर्व तत्काल विपरीत फळ देतें. दावाग्नीनें जळून गेलेल्या वनभूमिमध्यें हरिणें जशीं रहात नाहींत त्याप्रमाणें रागद्वेषाच्या ऊर्मींनीं व्यापलेल्या चित्त-वृत्तींत चांगलें गुण रहात नाहींत. हे रामा! राग व द्वेष हे दोन सर्प ज्या कल्पवृक्षाच्या मनोरूपी बिळांत लीन झालेले नाहींत त्याला कोणतें दुःखफळ मिळत नाहीं? जे बुद्धिमान् शास्त्रांचें परिशीलन करणारे व विद्वान्ही असून चांगल्या प्रकारें नियत न झालेले व त्यामुळेच रागद्वेषमय असतात ते जन अरण्यांतील जंबुक होत; त्यांना धिक्कार असो. माझ्या धनाचा उपभोग दुसऱ्यानें घेतला, मला दुसऱ्याकडून घेण्यास अवश्य असलेलें धन मीं चुकीनें सोडलें, अशा प्रकारें मिळालेल्या किंवा नष्ट झालेल्या वगैरे धनाविषयीं अभिनिवेश ठेवून तें पुनः मिळविण्यासाठीं प्रतिपक्ष्याला मारणें, बांधून ठेवणें इत्यादि व्यवहार करण्याची इच्छा करणें एतद्रूप रागद्वेषांचे क्रम वस्तुतः तुच्छ आहेत. कारण धन, बांधव, मित्र, पुनः पुनः येतात व जातात, अशा वस्तूंमध्यें विवेकी पुरुष अनुरक्त किंवा विरक्त कसा होणार? संसाररचना ही परमेश्वराची माया आहे. प्रिय विषयाच्या कल्पनेनें व अप्रिय विषयाच्या त्यागानें संसाराचा विस्तार होत असतो; त्यांत अत्यंत आसक्त होणाऱ्या पुरुषाला ती संसाररचना सर्वथा अधोगर्ताला पोचविते. राघवा! धन, जन व शरीर वस्तुतः सत्य नाहीं, तें मिथ्या आहे, असा निश्चय केला असतां मिथ्याच दिसतें. कारण हें सर्व उत्पत्तीच्या पूर्वी व नाशानंतर असत् असतें. व मध्येंही अस्थिर म्हणून उत्तरोत्तर भावविकारांनी ग्रासलेलें व सोपद्रव असतें. तेव्हां विचारी पुरुष यातील कशात लंपट होणार? दुसऱ्यानें कल्पिलेल्या आकाशवृक्षामध्यें तिसरा आसक्त कसा होईल? आकाशांत एकानें वृक्षाची कल्पना करावी व दुसऱ्यानें तिचा उपभोग घ्यावा, तद्वत् लोकाच हा प्रकार आहे. रामा! संसाराची रचना ही अशी आहे, निश्चयामुळें तूं भ्रान्त होऊं नकोस. हा सर्व भूतांचा मोठा समुदाय वर्तव्यें करण्याच्या आवेशानें अतिशय चंचल व त्यामुळें कार्याकुल झालेला आहे. पण विद्वान् लोक याला आकाशांत भासणाऱ्या गंधर्वनगराच्या मिथ्या विलासाप्रमाणें मानतात. स्वप्नांतील संकल्पनगराप्रमाणें हें सर्व खोटेंच उद्भवलें आहे आणि कल्पनेचा सर्वत्र संभव असल्यामुळें व अधिष्ठान चैतन्याचाही सर्वत्र सद्भाव असल्यामुळें तें मिथ्या जगत् स्वप्नादिभावास प्राप्त झालेल्या सुषुप्तप्रमाणें सर्वत्र उत्तम प्रकारें स्थित आहे. तूं या संसार-दीर्घस्वप्नांतील नगर-वृक्षास सर्वत्र पहात आहेस. अज्ञानरूपी निद्रेंत स्फुरण पावण्याचा याचा स्वभावच आहे व ती स्वभावापासून केव्हांही च्युत न होणारी आहे

तूं हा येथें संसारस्वप्नानें अतिशय भ्रान्त होऊन स्थित आहेत, वास्तव ज्याला मोठें निधान सापडलें आहे असा उत्तम पुरुष अलक्ष्मीचा म्ह० दारिद्र्याचा जसा त्याग करतो, त्याप्रमाणें या निबिड अज्ञानमय दीर्घ निद्रेचा तूं त्याग कर. रामा ! जागा हो, प्रातःकाळीं सूर्याला उदय पावलेलाच जसें कमल पाहतें त्याप्रमाणें तूं निर्विकल्प चित्प्रकाशरूप आपल्या आत्म्याला सदा उदित असलेला पहा. जागा हो, जागा हो रामा ! मी हा तुला पुनः पुनः जागा करीत आहें. हे महाबाहो ! हा अनामय आत्मसूर्याला पहा. रामा ! मेघाच्या स्थानीं असलेल्या मीं तुजवर या शीतल सुशब्दानें शोभणाऱ्या ज्ञानजलानें अभितः वृष्टि केली आहे. याच्या योगानेंच मीं तुला बोध केला आहे. राघवा ! सर्वोत्तम बोधास प्राप्त हो. तूं आज श्रेष्ठ ज्ञानी होऊन सत्य आत्मतत्त्वाला पहा. या मिथ्या जगद्भ्रमाला सोड. तुला जन्म नाहीं, तुला दुःख नाहीं, तुला दोष नाहींत व तुला भ्रमही नाहीं, तूं सर्व संकल्प सोडून स्वरूपांत उत्तम प्रकारें स्थित हो. हे महात्मन् ! तुझे सर्व विकल्पदोषसमूह सर्वथा गळून गेले आहेत. तुझी दृष्टि या जागरावस्थेंतही सर्व वासनाबीजयुक्त सुषुप्तीप्रमाणें विक्षेपरहित झाली आहे. अशा प्रकारचा तूं हें नित्य अपरोक्ष अतिविस्तृत ब्रह्मच आहेस वास्तव अत्यंत शुद्धीसाठीं तूं त्याच अत्यंत रामस्वरूप आत्म्यामध्यें शांत चित्तानें रहा.

---

## सर्ग २९

—:*:—

१. बोधामुळें रामाची विश्रांति. २. पुनः उक्त अर्थाचाच विस्तार. ३. पूर्वी कैलासावर शिवानेंही वसिष्ठाला असाच उपदेश केला.

श्रीवाल्मीकः—राघवा ! स्वस्थ व समचित्त होऊन असें ऐकत असतां, तो स्वात्मस्वरूपांत स्थैर विश्रांति पावला असतां, परमानन्दास प्राप्त झाला असतां, त्या सभेंत बसलेले सर्व श्रोतेही उपशमानें अत्यंत शोभूं लागले असतां, राघवाला प्राप्त झालेली आत्मविश्रांति कांहींवेळ तशीच स्थिर व्हावी म्हणून मेघापासून शेतावर कोसळणारा पाऊस जसा कांहीं वेळ थांबतो त्याप्रमाणें मुनीनें वचनामृत थांबविलें. नंतर अर्धा मुहूर्त तशाच अवस्थेंत लोटल्यावर वक्त्यांतील श्रेष्ठ वसिष्ठानें राघवाला पुनः देहभानावर आणलें, व पुनः तोच अर्थ दृढकरण्यासाठीं तो वसिष्ठ सांगूं लागला.

श्रीवसिष्ठः—रामा ! तूं चांगला प्रबुद्ध झाला आहेस निजअभ्यास जाऊस पोंचला आहेस, तरी असाच या परमार्थ आत्मतत्त्वाचा अवलंब करून रहा, या संसारांत स्थित होऊं नकोस. या संसारचक्राची संकल्प ही नाभि आहे, तिला आडवून धरलें कीं, हे रघुनंदना. हे संसारचक्रही आपली नित्यगति सोडून स्थित होतें; आणि संसाराच्या मनोरूप नाभीला रागद्वेषांनीं क्षुब्ध केलें असता या संसारचक्राला मोठ्या यत्नानें जरी आडवून धरल तरी तें वेगानें फिरूं लागतें. यास्तव अभ्यास व वैराग्य यांना दृढ करणें त्या श्रेष्ठ यत्न बल व प्रज्ञा इतक्याचा आश्रय करून युक्तीनें संसारचक्राची नाभि असें जें चित्त त्याचाच निरोध करावा. **प्रज्ञा व सौजन्य यांसहवर्तमान शास्त्रयुक्त जें पौरुष त्यानेंही जें प्राप्त होत नाहीं, तें कांहींच या सृष्टींत प्राप्त होणें शक्य नाहीं.** मूढाच्या बोधासाठीं कल्पिलली दैवैकपरता सोडून स्वतःच्या प्रयत्नाचा जोरावर प्रथम चित्ताचा निरोध करावा. ब्रह्मदेवापासून प्रवृत्त झालेल्या अज्ञानरूपी भ्रमानें हें वस्तुतः असत् असलेलें जगत्च 'सत्' आहे, असें भासतें. हे जगद्रूपी दृश्य आकार अज्ञानामुळें होणारे भ्रमाचेच नुस्ते विस्तार आहेत. सर्व विकल्प उत्पन्न

करणाऱ्या संकल्पापासून झालेले हे देह येथें भ्रमण करीत आहेत; त्यामुळें केवल या देहाच्या नुसत्या नाशानेंच इष्टसिद्धी होत नाहीं, कारण पुनः देहपरंपरा उत्पन्न करणारा संकल्प राहतोच. यास्तव हे रामा! देहाला होणाऱ्या सुखदुःखांचा शाहण्यानें विचार करूं नये. ज्यांचें मुख दुःखानें म्लान झालें आहे व अश्रु आणि घाम यांनीं आर्द्र झालें आहे, अशा मनुष्याचा देह प्रसन्नमुख व क्लेशरहित चित्रांतील नरदेहाहूनही अधिक तुच्छ आहे. चित्रांतील पुरुषाला जितकी स्थिरता असते तितकी आधिव्याधींनीं अत्यंत म्लान झालेल्या व स्वतःच झिरपून नाश पावणाऱ्या खऱ्या देहालाही नसते. चित्रस्थ देहाला कोणी जर मुद्दाम पुसून नाहींसें केलें तरच तो नाश पावतो, एरवीं तो नाश पावत नाहीं. पण हा अवश्य नाश पावणारा मांसाचा देह स्वतःच आपोआप नाश पावतो. मानवाच्या चित्रांला जर चांगल्या प्रकारें जपलें तर तें फार दिवस अतिशय शोभा देतें, पण ह्या देहाचें जरी चांगलें पालन केलें तरी तो नाश पावतोच, वृद्धि पावत नाहीं. त्यामुळें चित्रदेह श्रेष्ठ ठरतो, हा संकल्पापासून झालेला देह तसा नाहीं; कारण जे गुण चित्रदेहांत आहेत ते या संकल्पदेहांत नाहींत. जड चित्रदेहाहूनही हा जो प्रसिद्ध मांसदेह तो अधिक तुच्छ आहे; तेव्हां त्या मांसमय देहावर तुझी इतकी आस्था ती कशाला? हे निष्पापा! हा दीर्घ संकल्पदेह आहे, त्यावर आस्था ठेवणें योग्य नव्हे. स्वप्नांतील संकल्पदेहाहून अतिशय तुच्छ हा आहे. कारण, अल्पसंकल्पापासून झालेला स्वप्नांतील देह फार वेळ सुखी किंवा दुःखी होत नाहीं, पण दीर्घसंकल्पापासून झालेला हा जागृतींतील देह दीर्घ काल दुःखानें दुःखी होतो. देहसंकल्पमय आहे, तो स्वतः नाहीं किंवा आमचाही नाहीं, मग त्याच्यासाठीं हा मूढ व्यर्थ क्लेश का भोगतो? चित्रांतील पुरुषाला क्षत झालें किंवा त्याचा नाश झाला असतां त्या चित्राच्या मालकाला कांहीं वाटत नाहीं, त्याप्रमाणें स्वप्नांतील संकल्पदेह क्षत किंवा क्षीण झाला असतां आत्म्याला कांहीं क्षिति वाटत नाहीं. ज्याप्रमाणें मनोराज्यांतील देहाला क्षत झालेलें किंवा तो क्षीण झाला तरी मनोरथ करणाऱ्या पुरुषाला कांहीं होत नाहीं. ज्याप्रमाणें तिमिरदृष्टीला भासलेला दुसरा चंद्र क्षत किंवा क्षीण झाला असतां खऱ्या चंद्राला कांहीं होत नाहीं, जसा स्वप्नांतील समारंभ क्षत किंवा क्षीण झाला असतां पुरुषाला कांहीं क्षति नाहीं, जसें नदीचें जल पाणी झालें किंवा आटलें तर नदीला कांहीं क्षिति नाहीं, त्याप्रमाणें केवल संकल्पानें रचलेल्या, स्वभावतःच नाशिवंत असलेल्या या शरीरयंत्राला कांहीं क्षत झालें किंवा तो क्षीण झाला तर आत्म्याची कांहीं हानि होत नाहीं. दीर्घ स्वप्नमय या संसारांत चित्तसंकल्पानें कल्पिलेल्या देहाला कोणीं दूषित केलें किंवा भूषित केलें तरी चित्‌ची कांहीं हानि किंवा लाभ नाहीं, त्यानें राघवा! चित् अन्त पावत नाहीं, आत्मा चलन पावत नाहीं, किंवा ब्रह्म विकार पावत नाहीं. तेव्हां देहाचा क्षय झाला असतां आत्म्याचें काय न्यून होणार? भ्रमण करीत असलेल्या चक्रावर बसलेला पुरुष स्वतःच्या चक्राच्या समीप उलट दिशेनें भ्रमण करीत असलेल्या दुसऱ्या मोठ्या चक्राप्रमाणें हें सर्व दिङ्-मंडळ भ्रमण करीत आहे, असें अत्यंत मोहित होऊन जसा पाहतो, त्याप्रमाणें अकस्मात् उत्पन्न झालेल्या व वाढणाऱ्या मिथ्या अज्ञानामुळें मिथ्या अज्ञानचक्रावर आरूढ झालेल्या अज्ञजीवाला हें देहपरंपराचक्र तसेंच उलट भ्रमण करीत असलेलें दिसतें. ते देहचक्र भ्रम देणारें, स्वतः भ्रमण करणारें, पतन पावणारें, सर्वथा पतन पावलेलें, मारलें गेलेलें

व मारलें जाणारें दिसतें. यास्तव पूर्ण धैर्याचा अवलंब करून या मोठ्या भ्रमाचा त्याग करावा. हा देह संकल्पानें केलेला आहे; व मिथ्या अज्ञानानें तो 'सत्' आहे, अशी जरी प्रतीति येत असली तरी तो असत् असतां सत् कसा होईल ? दोरीच्या ठिकाणीं जशी सर्पबुद्धि होते त्याप्रमाणें ब्रह्ममध्यें हा देह मिथ्याच उद्भवला आहे, तो जगाची असत क्रियाही सत्यशीच करतो. रामा ! जें जडाकडून केलें जातें तें केलें गेलें, असें म्हणत नाहींत, त्यामुळें देह जरी कांहीं करीत असला तरी तो केव्हांही कर्ता होऊं शकत नाहीं कारण देह जड आहे, जडाला इच्छा असत नाहीं. व निर्विकार आत्म्यामध्येंही ती संभवत नाहीं, व त्यामुळें कोणीच कर्ता नाहीं; आत्मा केवल देहाचा द्रष्टा आहे. जसा वारा वहात नसलेल्या प्रदेशांतील दिवा मूळ असतो तसाच रहातो, त्याप्रमाणें साधकानें या जगत्स्थितींत सर्व भावांमध्यें साक्षीप्रमाणें रहावें. जसा सूर्य आकाशांतच सर्व दिवसाचीं कर्में करतो, त्याप्रमाणें हे रामा ! तूं हीं सर्व राज्यकृत्यें कर. या असन्मय, शून्य, मिथ्याच उत्पन्न झालेल्या, देहरूपी गृहांत अज्ञ मनुष्यानें किंवा बालकानें खोट्याच कल्पिलेल्या यक्षाप्रमाणें हा निःसार, सर्व सज्जनांनीं वर्ज केलेला चित्तनांवाचा अहंकाररूपी दुष्ट वेताळ कोठून तरी येऊन शिरला आहे. तूं या दुष्ट अहंकाराचा चाकर होऊं नकोस, कारण रामा ! त्याचें प्राबल्य स्वीकारल्यास नरक–दुःख हे फळ निश्चयानें प्राप्त होतें. देहरूपी गृहांत स्वसंकल्पाच्या विलासानें दुष्ट आकाराचा उन्मत्त चित्तवेताळ लीलेनें सर्वतः संचार करतो. शून्य देहरूपी गृहांत प्रवेश करून चित्तरूपी यक्षानें असें भयंकर काम केलें आहे कीं, त्याला भिऊन मोठमोठे साधकही समाधींत नेहमीं राहतात. त्या चित्तवेताळाला आपल्या क्षुद्र शरीररूपी मंदिरांतून घालवून दिल्यावर या संसाररूपी शून्य नगरांत साधक कदापि भीत नाहीं. चित्तरूपी भूतानें ज्याला व्याकुळ केलें आहे अशा या शरीरगृहांत जे आसक्त असतात ते अनंत कोटी देह नष्ट झाले असतांही, अद्यापि देहालाच आत्मा समजून कां रहातात तें कळत नाहीं. देहालाच आत्मा मानल्यामुळें सतत होणाऱ्या दुःखाचा अनुभव येत असतांनाही ते त्याला देहाहून भिन्नपणें ओळखण्याचा यत्न करीत नाहींत, हें मोठें आश्चर्य आहे ! चित्तपिशाचानें देह-गृहाला ग्रासलें असतां जे मरतात त्यांची बुद्धि पिशाचासारखीच होते, पिशाचाशिवाय इतरासारखी होत नाहीं. अहंकाररूपी मोठ्या यक्षाचें गृह असलेल्या दुष्ट शरीरावर आस्था ठेवून विहार करणारा पुरुष पिशाचच आहे. हे साधो ! तें गृह स्थिर नाहीं, म्हणून त्यावर आस्था ठेवणें अनुचित आहे. यास्तव अहंकाराची चाकरी सोडून व त्याला सर्वथा विसरून तूं आपल्या विशाल बुद्धीनें स्वात्म्याचाच सत्वर आश्रय कर. अहंकार-पिशाचानें ज्या नरकेच्छूंना ग्रासलें आहे त्या मोहमदानें अंध झालेल्या जीवांना कोणी मित्र नसतात व कोणी बांधव नसतात; कारण, त्यांच्यामध्यें विनयाचा अभाव असतो व उद्धटपणाही पूर्ण असतो, त्यामुळें त्यांच्याशीं कोणी स्नेह करीत नाहींत. अहंकारानें दूषित झालेल्या बुद्धीनें जी क्रिया केली जाते तिचें विषवल्लीसारखें कलह-वैर इत्यादि मरणात्मक फळ मिळतें. विवेक व धैर्य नसलेल्या मूर्खानें अहंकारमहोत्सवाचा आश्रय केला कीं तो तत्काल नष्टच झाला आहे, असें तूं समज. ज्या मूढांना अहंकार-पिशाचानें पछाडलें आहे, ते हे राघवा ! नरकाग्नीचें इंधनच झाले आहेत. ज्याच्या हृदयछिद्रांत अहंकार सर्प चळवळ करीत असतो ते मूर्ख आपला देहवृक्ष लव-

करच पाडून घेतात. हे मोठ्या लोकांतील श्रेष्ठा ! अहंकारपिशाच देहांत राहो की निघून जावो तूं त्याच्याकडे मनानें पाहूंही नकोस. तूं याप्रमाणें त्याच्याकडे दुर्लक्ष करतेस, त्याची अवज्ञा केलीस, त्याचा तिरस्कार केलास म्हणजे तो अहंकारपिशाच तुला कांहीं करणार नाहीं. चित्त-पिशाचाची उपेक्षा केल्यावर तें या देह गृहांत जरी स्फुरण पावत राहिलें व त्याचे यांत अनंत विकास चालले तरी आत्म्याला त्याची कांहीं पीडा होत नाहीं. चित्तयक्षानें पछाडलेल्या पुरुषांना ज्या विपुल आपत्ति भोगाव्या लाग-तात त्यांची शंभर वर्षांतही गणना करतां येत नाहीं. हे निष्पापा ! हाय हाय मी मेलों आहें, मी जळलों आहें, अशा प्रकारच्या ज्या दुःख-वृत्ति त्या अहंकार-पिशाचाच्याच शक्ति आहेत; दुसऱ्या कोणाच्याही नाहींत. आकाश सर्वत्र आहे, पण त्याचा येथें कोणाशींही कांहीं संबंध नाहीं; त्याचप्रमाणें आत्मा जरी सर्वगामी–सर्व व्यापी असला तरी त्याचा अहंकाराशीं संग नसतो. वातरज्जूनें–सुत्रात्म्यानें युक्त असलेलें हें चंचल देहरूपी यंत्र जें करतें व जें घेतें तें सर्व अहंकाराचें चेष्टित आहे. वृक्षाचा कर्ता नसले-लेंही आकाश वृक्षाच्या उत्पत्तीला जसें कारण होतें त्याप्रमाणें स्वरूपांत स्थित असलेला आत्मा चित्ता च्या चेष्टांचें कारण होतो. दीपाच्या केवळ सांनि-ध्यानें भिंतीचें निर्मल रूप जसें व्यक्त होतें त्याप्रमाणें केवळ आत्म्याच्या सांनिध्यानें मन स्वतः सत्तायुक्त व कल्पितशरीरयुक्त होऊन स्फुरण पावतें. रामा ! त्रिकालींही एकमेकापा-सून भिन्न असलेल्या चित्-आत्मा व जड-चित्त यांचा पृथिवी व द्युलोक यांच्याप्रमाणें संबंध असा होणार ? हे रघुनंदना ! चपल स्पंदनाना प्रेरणा करणाऱ्या प्राणाच्या शक्तींनीं वश केलेलें चित्तच आत्मा आहे, असें मूर्खपणामुळें दिसतें. आत्मा आकाशरूप, नित्य, सर्वगत व विभु आहे. फसविणारें चित्तच अहंकार असून तेंच हृदयांतील मोठें तम आहे, असें तूं जाण-तूं वस्तुतः सर्वज्ञ आत्मा आहेस, मन नव्हेस. मनोदेहाला अगदीं दूर कर. तू त्याच्याशीं अगदीं मिळून कसा गेला आहेस ? शून्य देह-रूपी गुहांत स्थित झालेलें मनोरूपी भूत फार दुष्ट आहे. हे उत्तमा ! तें आत्म्याला स्पर्श न करतांच 'मी त्याला स्पर्श केला आहे, आत्मा माझ्याशीं सुसंगत झाला आहे,' असें वृथा समजतें. वास्तव हे आणि या मनःपिशाचाला सोडून जसा जो तूं आहेस तोच स्थिर हो. चित्तयक्षानें ज्याला पूर्णपणें पछाडलें आहे अशा मानवाचें रक्षण करण्यास शास्त्रें, बांधव व गुरु समर्थ होत नाहींत. पण ज्याचा चित्त-वेताळ शांत झाला आहे अशा मानवाला थोड्याशा चिखलातून हरणास जसें वर काढतां येतें त्याप्रमाणें गुरु, शास्त्रार्थ व बांधव वर काढूं शकतात. या जगद्रूपी शून्य नगरांतील सर्व देहगृहांस वल्गना करणाऱ्या प्रमुख चित्तक्षयानें अतिशय दूषित करून टाकलें आहे. देहरूप मर्यादित भागांत उत्पन्न झालेली ही चित्त–वेताळयुक्त सर्व शून्य जगरूपी अरण्यभूमि को-णाला भयप्रद होत नाहीं ? कारण या जगद्रूपी नगरांतील चित्त–पिशाच शांत झालेल्या देहरूप गृहाचा कांहीं थोडे सज्जन अनुभव घेत रहातात. रघुनंदना ! येथें जी जी दिशा चांगल्या प्रकारें ऐकूं येते ती ती प्रमत्त मोहवेताळांनीं पूर्ण व्यापलेल्या देहस्मशानांनीं भरलेली आहे. या जगद्रूपी मोठ्या अरण्यांत अज्ञ बालकाप्रमाणें मोहित होणाऱ्या स्वतःचा तूं, धैर्यांशाचा अवलंब करून, स्वतःच उद्धार कर. हे रामा ! ज्यांत संचार कर-णारीं भूतें हाच पशूंचा समुदाय आहे अशा या जगद्रूपी जीर्ण अरण्यांत हरणाच्या पोराप्र-माणें तृणासारख्या तुच्छ विषयरसांनीं तूं संतुष्ट

होऊं नकोस. या भूतलरूपी अरण्यांत हरिणांचीं पोरें खुशाल फिरतात, पण तूं अज्ञानगजाला खाऊन सिंहाच्या वृत्तीचा आश्रय कर, रामा ! हरणांच्या पोरांप्रमाणें दुसरे मूढ नरपशु या जंबुद्वीपांतील स्वजंगलांत विषयतृणाचा स्वाद घेत जर संसार करीत असले तर त्यांना खुशाल तसें करूं दे. पण तूं मात्र त्यांच्यासारखा होऊं नको. रेडा जसा पाण्यानें भरलेल्या डबक्यांत लोळत राहतो तसा फारच अल्पकाळ सुखावह होणाऱ्या व अंगाला चिखलाचा लेप मात्र करणाऱ्या बंधुरूप डबक्यांत तूं डुंबू नकोस. भोगाच्या विस्ताराला मनांतून बाहेर काढून टाक, श्रेष्ठांच्या मार्गाचें अनुसरण कर आणि आपल्या मोठ्या लाभाचा चांगला विचार करून एका स्वात्म्याचाच आश्रय कर. अपवित्र, तुच्छ दुर्भग व दुराकार, अशा देहासाठीं तूं आसक्तिरूप चिखलांत रुतूं नकोस, कारण त्यांत रुतलेल्या पुरुषांना उग्र चिन्तारूपी राक्षसी खाऊन टाकते. कर्मानें देहाला निर्माण केले-ल्यांना अहंकाररूपी राक्षसानें आश्रय केला. दुःख हा मनाचा धर्म आहे, पण जीव त्याचा भोग घेतो ! अशी ही मूर्खपणाची परंपरा अतिशय आश्चर्यकारक आहे. पाषाणाची घनता जशी एकरूप असते त्याप्रमाणें आत्म्याची सदैकरूपता आहे; सदेकथन आहे, केवल सत्ता हेंच त्याचें सामान्य आहे, व तें अनात्मपदार्थांमध्यें संभवत नाहीं, जशी पाषाणाची घनता ( कठीण ) पण त्याहून पृथक नसते त्याप्रमाणें समष्टिव्यष्टिमनांचा समूह स्थूलप्रपंच वगैरे आत्म्याहून पृथक विद्यमान नाहीं, कारण केवल सत्तास्वभाव असलेल्या आत्म्याशीं त्यांचा अभेद असतो, त्यामुळें या मानसादिकांची पृथक स्थिति संभवत नाहीं जशी पाषाणाची पाषाणता व घटाची घटता, त्याहून भिन्न नसते त्याप्रमाणें सत्तामात्र आत्म्याहून मानसादि सर्व अभिन्नच आहे. याविषयीं ही दुसरी महामोहाची विनाश करणारी दृष्टि एक. ज्याच्या मस्तकावर अर्धे चंद्र आहे अशा देवानें संसारदुःखाच्या शांत्यर्थ पूर्वी मला ही कैलासपर्वताच्या गुहेंत सांगितली. चंद्राच्या किरणांच्या समूहाप्रमाणें प्रकाशमान व द्युलोकाच्या पार गेलेला कैलास म्हणून एक पर्वत श्रेष्ठ आहे. तें गौरीपतीचें मंदिर आहे. तेथें चंद्रकला धारण करणारा भगवान् देव हर असतो. मी पूर्वी एकदा त्याच पर्वतावर गंगेच्या तटाकीं आश्रय करून त्या महादेवाची पूजा करीत राहिलों होतों. तपासाठीं मी बरेच दिवस तेथें तपस्व्याप्रमाणें कृच्छ्र-चांद्रायणादि आचार करीत राहिलों. माझ्या बरोबर तेथें सिद्धांचा मोठा साधूत्व होता. मी शास्त्रार्थांचा संग्रह केला. विचार व पुष्पासाठीं मीं पर्णपात्रें केलीं, पुस्तकांच्या समूहांचा मोठा संग्रह मजपाशीं होता. रामा ! कैलासपर्वतावरील वनकुंजांत एवंगुणविशिष्ट होऊन तप करणाऱ्या माझा पुष्कळ काळ लोटला. नंतर एकदां श्रावणमहिन्याच्या कृष्णपक्षांतील अष्टमीच्या दिवशीं रात्रीचें अग्र म्ह० प्रदोषकाळ पूजाजप-ध्यान इत्यादिकांच्या योगानें घालविल्यावर सर्व प्राण्यांचा संचार वगैरे शांत झाल्यामुळें सर्व दिशा काष्ठमौनव्रत[1] धारण केल्याप्रमाणें अगदीं शांतरूप झाल्या असतां, त्या गहन कुंजांत दाट अंधकार पसरला असतां, व इतक्यांत रात्रीचा पहिला अर्धा प्रहर संपला असतां मीं आपली समाधि किंचित् शिथिल केली; आणि बाहेर दृष्टि लावून क्षणभर बसलों. इतक्यांत अरण्यांत एकाएकीं उत्पन्न झालेलें तेज मीं पाहिलें. तें शेंकडों शुभ्र अभ्रांसारखे होतें. त्याला चंद्रबिं-

१ हाताच्या खुणांनींही आपला आशय ज्यांत दुसऱ्याला कळविला जात नाहीं त्या मौनाला काष्ठमौनव्रत म्हणतात.

वाऱ्या समूहाची उपमा होती. त्यानें दिक्समूहाला प्रकट केलें. त्या तेजाला पाहून मी आश्चर्यचकित झालों व आंतील प्रकाशानें शोभणाऱ्या बुद्धिदृष्टीनें मी जो त्या समोरील पर्वतशिखरास पहात आहें, तों चंद्रकला मस्तकावर धारण करणारा हर तेथें आला. त्यानें गौरीच्या खांद्यावर हात ठेवला होता, नंदी त्याच्या पुढील प्रदेशांतील प्राण्यांना हटवीत पुढें चालला होता. तेव्हां तेथें असलेल्या शिष्यांना सावध करून व स्वतः सावधान होऊन, अर्घ्य घेऊन, संतुष्ट मनानें त्याच्या दृष्टीनें पवित्र झालेल्या अग्रभागीं मी गेलों तेथें पुष्पांजलि समर्पण करून व अर्घ्य देऊन मीं त्रिलोचन देवाला दुरूनच प्रणाम केला व अभिवादन केलें, तेव्हां त्यानें चंद्रप्रभेची सखी अशी जी त्याची शीतळ, सरळ व सर्व दुःखाचें हरण करणारी दृष्टि, माझ्याकडे बराच वेळ लाविली. नंतर पुष्पयुक्त पाषाणावर बसलेल्या त्या त्रैलोक्यसाक्षी शंकराच्या जवळ जाऊन अर्घ्य, पुष्प व पाद्य मीं समर्पण केलें, त्याच्यापुढें मी पुष्कळ मंदारपुष्पांच्या अंजली अर्पण केल्या, नानाप्रकारच्या नमस्कारांनीं व व स्तोत्रांनीं शंकराची पूजा केली, त्यानंतर भगवती गौरीची मीं तशाच पूजासंभारांनीं सख्यांसह पूजा केली. गणमंडळीचीही पूजा केली. पूजा केल्यावर मी तेथें बसलों. त्यानंतर शिवाच्या आज्ञेनें त्या पर्वताशिखरावर बसलेल्या मला चंद्रकला धारण करणारा तो पूर्णचंद्र शीतळ वाणीनें म्हणाला, "हे ब्रह्मन् ! प्रशांतीनें शोभणाऱ्या, परमपदीं विश्रांतीस प्राप्त झालेल्या व त्यामुळेंच कल्याण करणाऱ्या तुझ्या चित्तवृत्ति परमात्मवस्तूमध्यें स्थित आहेतना ? तुझें तप निर्विघ्नपणें कल्याणाचें अनुवर्तन करीत आहेना ? तुला प्राप्त करून घेण्यास योग्य असलेलें पद प्राप्त झालें आहेना ? तुझ्या सर्व भीति शांत झाल्या आहेतना ?" हे रघुनन्दना ! याप्रमाणें सर्व लोकांचा कर्ता असा तो देवेश बोलल्यावर मीं विनयशाली वाणीनें म्हटलें, "हे महेश्वरा ! त्रिनयनाचें सतत स्मरण केल्यामुळें ज्यांचें कल्याण झालें आहे अशा पुरुषांना येथें दुष्प्राप असें कांहीं नाहीं, व कोणत्याही प्रकारची भीति नाहीं. तुझ्या अनुस्मरणाच्या आनंदानें ज्यांचें चित्त मग्न झालें आहे, त्यांना जे प्रणाम करीत नाहींत, असे या जगत्कोशांत कोणी प्राणीच नाहींत. तुझ्या अनुस्मरणांतच ज्यांच्या चित्तवृत्ति नित्य गढून गेल्या आहेत असे जन जेथें असतात ते देश, ते प्रदेश, त्या दिशा व ते पर्वत अत्यंत प्रशस्त होत. हे प्रभो ! अनुस्मरण पूर्वीं संचय केलेल्या वृक्षस्थानीय पुण्याच्या फळास अनन्त कोटिपट विस्तृत करतें, या वर्तमान देहानें आरंभिलेल्या पुण्यवृक्षाला अमृताच्या सकानें वाढवितें, व पुढें केल्या जाणाऱ्या पुण्याच्या वृद्धीसाठीं बीज पसरतें. प्रभो ! तुझें अनुचिंतन ज्ञानामृताचा मुख्य कलश आहे, संतोषरूपी चांदणें देणारा चंद्रमा आहे, व मोक्षपुराचें द्वार आहे. हे भूतपते ! तुझें अनुसंधान हाच चिंतामणि आपल्यापाशीं बाळगणाऱ्या मीं सर्व आपत्तींच्या डोक्यावर पाय दिला आहे." असें बोलून सुप्रसन्न केलेल्या त्या भगवान् महेश्वरास रामा ! मीं नम्र होऊन पुनः काय म्हटलें तें ऐक. "भगवन् ! आपल्या प्रसादानें माझ्या सर्व दिशा इष्टार्थांनीं भरलेल्या आहेत, पण मी एक संदेह विचारतों त्याचा निर्णय प्रसन्न मनानें मला सांग. ज्याच्यामध्यें चित्ताला उद्वेग होण्याचें कांहीं कारण नाहीं, त्यामुळें जें निरुपद्रव आहे, जें सर्व पापांचा क्षय करणारें आहे, सर्व कल्याणाला वाढविणारें आहे, असें देवपूजेचें विधान कोणत्या प्रकारचें आहे तें हे प्रभो ! मला सांग."

ईश्वरः—हे ब्रह्मवेत्त्यांतील श्रेष्ठा ! मी तुला अति उत्तम देवार्चन सांगतों, तें ऐक. जें पूजन एकदांच केल्यानें पुरुष मुक्त होतो. निरंतर देवार्चन करून ज्यानें आपला बाहु सफळ केला आहे अशा हे द्विजा ! देव कोण हें तूं जाणतोस का ? पुंडरीकाक्ष विष्णु हा देव नव्हे त्रिलोचन शंकर हा देव नव्हे, ब्रह्मदेव हा मुख्य देव नव्हे, इंद्र मुख्य देव नव्हे, वायु देव नव्हे, सूर्य देव नव्हे, अग्नि देव नव्हे, चंद्र देव नव्हे, ब्राह्मण देव नव्हे, राजा देव नव्हे, मी देव नाहीं व हे उत्तम द्विजा ! तूंही देव नव्हेस. देहरूप देव नाहीं, देव चित्तरूप धारण करणारा नाहीं.(कमला)देहादिकांची शोभा हा देव नव्हे, व शरीरांतील बुद्ध्यादि कोणता भावही देव नव्हे,तर जो अकृत्रिम,नित्य,निरतिशय, आनंद चित्प्रकाश तो मुख्य देव होय, आकारादिकांनीं मर्यादित झालेल्या परिमित वस्तूंमध्यें तसला आनंद चित्प्रकाश कोठून असणार ! अर्थात् स्वाभाविक. आदि-अंतरहित आनंदप्रकाशरूप जी चित् तिलाच विद्वान् शिव समजतात. ती चितच देवशब्दानें सांगितली जाते. तिचीच पूजा करावी. कारण सत्ता व असत्ता यांचा आकार धारण करणारें तें चित्तत्त्वच सर्व आहे. ज्यांना हें शिवतत्त्व ज्ञात झालेलें नसतें त्यांच्यासाठीं पुंडरीकाक्षादि आकारांचें पूजन विहित आहे. एक योजन मार्ग चालत जाण्यास जो समर्थ नसतो त्याला एक कोसाचाच टप्पा सांगितला जातो. रुद्रादिकांपासून मर्यादित फळ मिळतें आणि आत्म्यापासून नित्य आनंद हें स्वाभाविक व आदि-अंतरहित फळ आहे. असलें अकृत्रिम फळ सोडून जे कृत्रिम फळाच्या मागें लागतात ते मंदारवनाला सोडून कडू व कांटेच्या करंजाच्या वनांत घुसतात. ज्ञान, सर्वत्र आत्मोपम्यतें सुखदुःख पाहणें, व चित्ताचा शम हीं या मुख्य देवाच्या पूजेंतील उत्तम पुष्पें आहेत. पूज्य आत्म्याला जाणणारे ज्ञानी निर्मल चिन्मात्र शिवाला पूज्य समजतात. शम, बोध इत्यादि पुष्पांनीं मुख्य देव जो आत्मा त्याची पूजा करणें, हेंच देवार्चन आहे, असें तूं समज. आकारांचें पूजन करणें, हें खरें पूजन नव्हे. जे जन आत्मज्ञानरूप देवार्चन सोडून कृत्रिम अर्चेमध्यें आसक्त होतात ते दीर्घकाल क्लेश भोगतात. ज्यांना ज्ञेय ब्रह्म कळलें आहे असेंही विद्वान् केव्हां केव्हां, आत्मध्यान सोडून उठले असतां, साकार देवाची पूजा करीत असलेले जे दिसतात ते ती पूजा लहान मुलाच्या क्रीडेसारखी लीलेनें करितात, भोगांच्या लालसेनें कांहीं करीत नाहींत. आत्माच देव, भगवान्, शिव, परमकारण आहे. त्याचीच ज्ञानरूपी पूजासामग्रीनें सर्वदा सतत पूजा करावी. तूं जीवाला अकृत्रिम, अव्यय, चिदाकाश ब्रह्म जाण. त्याहून निराळ्या अनात्म्याचा तूं पूजा करूं नकोस. कारण आत्मपूजन हीच मुख्य पूजा आहे.

वसिष्ठः—हे प्रभो ! हें जगत् चेतनाकाशमात्र कसें आहे व चेतनालाच जीवादिभाव कसा प्राप्त झाला आहे, तें सांग.

ईश्वरः—या सृष्टींत पारावाररहित चिदाकाशच आहे, चेत्य कोठेंही संभवत नाहीं. कारण चेत्याची—विषयाची सत्ता चित्—च्या अधीन आहे. चित्-स्वरूपच कल्पान्तीं अवशिष्ट राहतें. सूर्य, चंद्र, प्रदीप, इंद्रियें मन इत्यादि जें

---

१ 'माझ्या दिशा इष्टार्थांनीं परिपूर्ण आहेत' या वाक्यावरून वसिष्ठाला विषयभोगाची वासना नाहीं, हें उघड होतें. त्याचप्रमाणें 'सर्वपापक्षयकरं' व 'सर्वकल्याणवर्धन' या विशेषणांवरून सर्व अनर्थनिवृत्तिपूर्वक निरतिशय आनंदरूप मोक्षाचें साधन वसिष्ठ विचारित आहे, असा निश्चय करून परम दयाळु ईश्वर हें तत्त्वज्ञानच त्याला सांगत आहे.

स्वतः प्रकाशाकारानें पसरतें तें तें प्रकाशाच्या द्वारा विस्तार पावूं लागलें असतां स्वरूपांत राहीनासें होतें, बाहेर पडतें, त्यांत बाहेरचे पदार्थ व्यक्त होतात. त्याच न्यायानें चैतन्य प्रकाशाच्या द्वारा विकास पावूं लागलें असतां त्यांचें जें स्पंदनसें होतें त्यानेंच हें सर्व जगत स्पष्टपणें भासतें. येणेंप्रमाणें हें विचित्ररूप जगत् चिन्मात्रच आहे. तथापि तें स्वप्नांतील नगराप्रमाणें चित्-हून पृथक् असल्याप्रमाणें भ्रांतीनें भासतें. याप्रमाणें हें जगत् काय आहे, म्हणून परमार्थदृष्टीनें पाहिलें असतां तें अमूर्त, स्वच्छ व चिदाकाशरूप आहे असा निश्चय होतो. दृश्य विषयाचा युक्तिदृष्टया अत्यंत असंभव असल्यामुळें तें चिदाकाशमात्र आहे. तथापि सृष्टीच्या आरंभीं अज्ञानावृत चित्स्वभावामुळें त्याची जी अन्यथाप्रतीति येते तेंच दृश्य जगत् होय. त्यामुळें स्वप्नांतील नगराच्या आकाराचें जें हें जगत भासतें तें आत्मरूप आहे. चिदाकाशमात्र आत्म्यामध्यें अनात्मत्व कोणतें व कां राहील? पर्वत चिन्मात्रच आहेत, जगत् चिन्मात्र, आकाश चिन्मात्र, जीव चिन्मात्रस्वरूप, व ही भूतपरंपरा चिन्मात्र आहे. सृष्टीच्या आरंभीं, सर्व ज्ञानांत, स्वर्गांत, आपल्या नगरांत, पाताळांत, चित्-हून भिन्न काय संभवतें तें सांग पाहूं. कारण जडाला स्वतः सत्ता व स्फुर्ति आहे, असें म्हटलें तर तें अजड ठरणार व नाहीं म्हटलें तर तें सर्व मिथ्या ठरणार. आकाश, परमाकाश, ब्रह्माकाश, जगत्, चित्ति हीं सर्व त्या एका तत्त्वाचीं झाडें व वृक्ष याप्रमाणें पर्याय नांवें आहेत, अशा प्रकारें हें द्वैत स्वप्न, संकल्प व माया यांसारखें आहे, असा जेव्हां तत्त्वदृष्टचा अनुभव येतो तेव्हां जगच चिदाकाश भासतें. जसें हें संविदाकाश स्वप्नांत जगदाकार भासतें त्याप्रमाणें 'जागृति' या नांवाच्या स्वप्नांतही आम्हांला तेंच जगद्रूपानें भासतें. जसें स्वप्ननगरांत चिदाकाशाला सोडून दुसरें कांहीं कोठेंच संभवत नाहीं त्याप्रमाणें जागृतींत महाचित्-ला सोडून दुसरें कांहीं ज्याअर्थीं संभवत नाहीं, त्या अर्थीं हें सर्व-चित् व चित्ताचे विषय एतद्रूप जगतही निर्विषय सद्रूपच आहे. ब्रह्माचा 'मीं बहु व्हावें, उत्पन्न व्हावें,' हा असा संकल्पच त्रिभुवन होऊन तें आपोआप उत्पन्न झालें आहे, चिदाकाशांत तें स्वप्नाप्रमाणें स्थित आहे. द्वैतवाद्यांना संमत असलेल्या सत्यवस्तूप्रमाणें ते स्थित नाहीं. स्वप्नांतील सर्व घट-पटादि पदार्थजात जसें चिदाकाशमात्र असतें त्याप्रमाणें हा जागृतींतील सर्व घटपटादिप्रपंच चिदाकाशमात्र आहे. स्वप्नांत दिसलेलें नगर शुद्ध ज्ञानमात्र असल्यामुळें त्याहून दुसरें कांहीं त्यांत जसें नसतें त्याप्रमाणें या भुवनत्रयांतही चित्-हून निराळें कांहीं नाहीं. ज्या कांहीं चित्तवृत्ति, देश, काल व चित्त यांसह जे जे त्रिकालांतील भाव व अभाव, ते सर्व चिदाकाशमय आहे. ज्या परमार्थतः पर असलेल्या देवाच्याविषयीं तूं पहिला प्रश्न केला होतास तोच हा आहे. जो तूं तोच मी; किंवा हें सर्व जगत्-हीं तोच पूर्ण परमात्मा आहे. सर्व पदार्थजातांचें, जगाचें, दुसऱ्या कशाचेंही, तुझें व माझें यथार्थ स्वरूप चेतनाकाश परमात्माच आहे, दुसरें कांहीं नाहीं. हे मुने! संकल्पमय स्वप्ननगरांत चिदाकाशाहून भिन्न जसा कोणताही आकार नसतो त्याप्रमाणें हिरण्यगर्भाच्या मुख्य सृष्टीपासून प्रवृत्त झालेल्या या सृष्टींत दुसरें रूप कांहीं नाहीं.

———

# सर्ग ३०

—:*:—

१. चिन्-ची सर्वात्मता. २. तिचे सर्व मोक्ष-भावानें अवस्थान. ३. चित्‌च जीवदशेला प्राप्त होतें.

श्री-ईश्वर:—याप्रमाणें हें सर्व विश्व केवल परमात्माच आहे. ब्रह्मच परमाकाश आहे व तोच श्रेष्ठ देव म्हटलेला आहे. या मुख्य देवाचें पूजनच बाकीच्या परिच्छिन्न देवांच्या पूजना-हून अधिक श्रेयस्कर आहे, त्याच्यापासून सर्व प्राप्त होतें. तेंच सर्व जगाच्या उत्पत्तीचा आधार आहे. हें सर्व त्यातच व्यवस्थित आहे. त्याच्या-पासून अकृत्रिम, आदि—अन्तरहित, अद्वितीय, अखंडित व बाह्य साधनांनीं साध्य न होणारें सुख प्राप्त होतें. हे मुनिश्रेष्ठा ! तूं विवेकी-मुख्य अधिकारी आहेस, म्हणून तुला हें सांगतों. या मोठ्या देवाच्या अर्चनामध्यें पुष्पांचा व धूप—दीपांचा समूह नको. ज्यांची बुद्धि फारशी सुसंस्कृत झालेली नसते व त्यामुळें ज्यांचें चित्त बालकाप्रमाणें चंचल असतें त्यांच्यासाठीं कृत्रिम मूर्तिमय देवार्चन सांगितलें आहे, म्ह० मूर्त्यादिरूप देवार्चनाचे ते अधिकारी आहेत. शम, बोध इत्यादिकांच्या अभावींच कल्पित आकारांची मिथ्याच कल्पित पुष्पादिकांनीं पूजा करतात. अज्ञ लोक मोठ्या आदरानें युक्त होऊन स्वसंकल्पानें निर्मिलेल्या कर्मांनीं पूजा करितात व पुष्प, धूप इत्यादि उपचार समर्पण करून संतुष्ट होतात. संकल्पा-नेंच निर्माण केलेल्या अर्थांनीं वृथा देवार्चन करून ते स्वप्नतुल्य विमानें, अप्सरा इत्यादि साधनांमुळें मिथ्यारूपच स्वर्गादि—फळ संपादन करितात. हे ब्रह्मन् ! पुष्प—धूपादिकांचें पूजन अज्ञजनांच्या बुद्धीसाठीं कल्पिलेलें आहे, पण तुझ्यासारख्याना जें पूजन योग्य आहे, तें मी तुला सांगतों. हे बुद्धिमानांतील श्रेष्ठा ! आम्हीं कल्पिलेल्या प्रपंचांतील नेत्रादि इंद्रियांचा विषय होणारा जो मूर्तिरूप देव तो मायामयच आहे, पण खरा देव त्रिभुवनाचा आधार परमात्माच आहे, दुसरा कोणी नाहीं. तो शिवस्वरूप, ब्रह्म विष्णु-रुद्रादि सर्व देवांहूनही श्रेष्ठ व सर्व मनोवृत्तींच्या पलीकडे असणारा असा आहे. सर्व विषयभोगसंकल्पांनीं वेष्टित असलेला ब्रह्म-विष्णु-रुद्रादि पदरूप देव साधनतः सर्व नाहीं, व फलतःही ज्यात सर्व भोगसुख नाहीं, असा आहे. कारण प्राण्याला आपापलें न्यूनाधिक कर्म व उपासना, यांच्या अनुसारच न्यूनाधिक साधनसामुग्री व त्यांचें फळ—सुखलेश यांची त्यांत प्राप्ति होते. पण आत्मदेव तसा नाहीं. तो पूजनदशा व फलदशा यांत नित्य, निरति-शय, परमार्थसत्य, पूर्ण आनंद एकस्वरूप आहे. म्ह० तो दिशा, काल इत्यादिकांनीं अवच्छिन्न झालेला नाहीं. सर्व कर्मांचा प्रकाश करणारा आहे. शुद्ध, चिन्मात्रस्वभाव आहे, यास्तव त्यालाच मुख्य देव म्हटलें जातें. [१]चित्—देवी सर्व कलारहित, सर्व पदार्थांच्या आंत अवस्थित असलेली, सर्वांना सत्ता देणारी, व बाकीच्या सर्व पदार्थांच्या मिथ्या सत्तेचा अपहार करणारी आहे. हे ब्राह्मणा ! सत् व असत् यांचा जो मध्य तेंच ब्रह्म असून त्यालाच देव म्हणतात. सूर्य, चंद्र, अग्नि, इंद्रियें यांच्या ज्योतीहून उत्कृष्ट असलेला आत्माच ज्याचा सर्वप्रकाश आहे असें तें पद 'सत्' 'ओं' इत्यादि शब्दांनीं [२]श्रुतींत सांगितलेलें आहे. व्यवहारांत त्याची सर्वत्र अनुवृत्ति असल्यामुळें सत्तासामा-

---

१. भाव व अभाव वर्तमानकाल व तदितर काल, मूर्त व अमूर्त, कारण व कार्य, व्यावहारिक व प्रातिभासिक यांच्या अन्तराळीं जें साक्षि-चिन्मात्ररूप किंवा अधिष्ठान तेंच मध्य होय.

२. ॐ तत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः। भगवद्गीता १७,२३.

न्यरूपानें तें सर्वत्र समत्वास प्राप्त झालें आहे. त्यालाच 'महाचित्' असें म्हटलें आहे व तेंच 'परमार्थ' असें श्रुत आहे. वेलीमध्यें जसा रस असतो त्याप्रमाणें तें सर्व तत्त्व व्यवहारांत सत्तासामान्यरूपानें व लयावस्थेंत महासत्तारूपानें सर्वत्र स्थित आहे. हे निष्पापा ! जें अरुंधतीचें चित्तत्त्व, जें तुझें चित्तत्त्व, जें पार्वतीचें चित्तत्त्व, जें गणांतील चित्तत्त्व, जें माझें चित्तत्त्व व जें ह त्रिभुवनांतील चित्तत्त्व तो देव आहे, असें उत्तमबुद्धीचे तत्त्वज्ञ समजतात. हात-पाय इत्यादिकांनीं युक्त असा जो दुसरा देव समजतात, त्याच्यांत तरी केवळ चिन्मात्राहून दुसरें काय सार आहे, तें सांग पाहूं. चिन्मात्रच संसाराचें सार आहे. याप्रमाणें सर्वांच्या सारत्वास प्राप्त झालेला तो पूर्ण देव मी आहें. त्याच्यापासून सर्व फळ मिळतें. हे ब्रह्मन् ! तो काहीं कोठें दूर राहिलेला नाहीं. तो कोणाला दुष्प्रापही नाहीं. तो नेहमीं देहांत उत्तम प्रकारें स्थित आहे. त्याचप्रमाणें आकाशांत सर्वत्र स्थित आहे. तो सर्व करतो, तो भोगतो, तो धारण करतो, व जातो. तो निःश्वास सोडतो. तो ज्ञाता आहे. तो प्रत्येक अंगाला जाणतो. हे मुनीश्वरा ! तो या विचित्र चेष्टांनीं युक्त असलेल्या, त्याच्यामुळेंच प्रकाश पावणाऱ्या, व त्याच्या स्वरूपानेंच निबद्ध असलेल्या या पुरींत असतो. तो आनंदमयकोशरूप गृहेश्वर शरीर हेंच ज्याचें महागृह आहे, व अन्नमय दिक हे जिचे यथार्थपणें न कळणारे कोश आहेत असा या चंचल ह यरूपी गुहेंत त्याच्या प्रसादानें राहतो. मनासह सहा इंद्रियांच्या व्यापाराचें व सत्तेचें ज्यानें उल्लंघन केलें आहे अशा त्या शुद्ध आत्म्याचाच उपदेशरूप व्यवहारासाठीं 'चित्' अशी संज्ञा केलेली आहे. तो हा चिन्मय, सूक्ष्म, सर्वव्यापी व निरंजन आहे. तो या प्रकाशाचा आभास व्यवहारदशेंत करतो व व्यवहार संपून इंद्रियें लीन झालीं असतां करीत नाहीं. म्ह० आरोपदशेंत तो प्रकाश करतो व अपवाददशेंत करीत नाहीं. हे मुने ! वसंतऋतु लतेला रसानें जसा सुशोभित करतो त्याप्रमाणें ती अत्यंत शुद्ध चित् या जगल्लक्ष्मीला अत्यंत शोभविते. चित्-चे जे सुंदर चमत्कार--आरोग्य जगाला सत्ता-स्फूर्ति देणें, या रूपाचे चमत्कार--ते मायाशबल ब्रह्मामध्यें पूर्व काम कर्मवासनादि जसें स्थित असत त्याच्या अनुरोधानें पदार्थांना प्रकट करितात. त्यामुळें त्यांतील कांहीं आकाशनामक आहेत, कांहीं जीवनामक आहेत, कांहीं चित्तसंज्ञक आहेत, कांहीं चित्तवृत्तिसंज्ञक आहेत, कांहीं देशसंज्ञक, कांहीं क्रियासंज्ञक, कांहीं द्रव्यसंज्ञक, कांहीं उत्पत्त्यादि भावविकार[1], गुण, जाति, औचित्य या नावांचे, कांहीं प्रकाश या नावाचें, कांहीं पर्वत व अंधकार या नांवांचे, कांहीं इंद्र, सूर्य या नांवांचे व कांहीं यक्षसंज्ञक आहेत. वसंताकडून निरिच्छ स्वस्वभावानें जसा अंकुर उत्पन्न केला जातो त्याप्रमाणेंच चित्-त्याकडून निरिच्छ स्वस्वभावानें ही जगल्लक्ष्मी पसरली जाते. या सर्व त्रैलोक्य लक्षण सागरांच्या तात्त्विक स्थितीचें वर्णन करूं लागलें असतां त्यांत मर्यादा एकही चित्च वास्तविक तत्त्व आहे, चित्च त्या सागरांतील जलसमूह आहे. ही चिद्रूपी ईश्वरी शरीररूपी कमलांत भ्रमण करीत असलेल्या मनोभ्रमरांनीं संग्रह केलेल्या संकल्परूपी मधाच्या सत्तेचा आस्वाद घेते. जलाच्या आवर्तांत जसें जल त्याप्रमाणें सुर, असुर, गंधर्व, पर्वत, समुद्र यासह सर्व जगत चित्--मध्यें स्थित असून प्रवाहरूपानें फिरत आहे. बाध-

१. उत्पत्ति, अस्तित्व, वृद्धि, विपरिणाम, अपक्षय व नाश हे सहा भावविकार आहेत. ते प्रत्येक पदार्थाला होतात.

णारा जो कर्तृत्व भोक्तृत्वरूप चित्तमय आचार त्यानें सुंदर व चंचल झालेल्या व्यष्टि जीवसंसरणचक्रिका ज्यांत आहेत असें हें मोठें समष्टिजीवचक्र मायाशबल चिच्चक्रांत भ्रमण करतें. वर्षर्तु इंद्रधनुष्यासह मेघाच्या आकारानें जसा उन्हाला नाहींसा करतो त्याप्रमाणें चित्नें चतुर्भुजरूपानें असुरमंडळास मारलें आहे. हे ब्राह्मणा ! चित् चंद्रचिन्हानें युक्त असा त्रिनेत्र झाली आहे, व त्या रूपानें ती गौरीकमलिनीच्या मुखकमलाचे ठिकाणीं भ्रमरत्वास प्राप्त झाली आहे. जिचें मानस चिद्व्यानाच्या अधीन आहे अशी चित् विष्णूच्या नाभिकमलांतील भ्रमरत्वासच जणु काय प्राप्त होऊन वेदरूपी नलिनीच्या महासरोवरत्वास म्ह० पितामहाच्या मूर्तीस धारण करते. वृक्षाच्या पानांप्रमाणें किंवा सुवर्णांतील केयूरादि विकारांप्रमाणें हे वसिष्ठा ! यथें चित्-पासून अनेक विचित्र शरीरें झालीं आहेत. चित् सर्व देवसेनेनें जिच्या पायांना वंदन केलें आहे अशा इंद्रलीलेनें त्रैलोक्याच्या चूडामणित्वास--वंद्यत्वास धारण करते. त्रैलोक्याच्या उदरकोशांत चित्‌ही सूर्यादि तेजोरूपत्वास प्राप्त होऊन समुद्रांतील जलाप्रमाणें स्वरूपांतच उद्भवते, उदय पावते व अस्त पावते. चिद्रूपी चंद्रिका चारी दिशांमध्यें आपला प्रकाश पाडीत सर्वभूतसत्तारूपी कुमुद्वतीस विकसित करते. गर्भिणी स्त्री आपल्या गर्भाला जशी धारण करते त्याप्रमाणें चिद्रूपी दर्पणाची महा शोभा--स्वच्छता किंवा वैष्णवी माया आपल्यामध्यें अनुग्रहाच्या योगानें जगद्रूपी प्रतिबिंब धारण करते. जशी जलाची रसशक्ति जलसमूहरूप होऊन समुद्राच्या स्वरूपसत्तेला संपादन करते त्याप्रमाणें चित् चवदा भुवनांत राहणाऱ्या भूतांची सत्ता संपादन करते. चित् ही एक लता आहे. विचित्र प्रकाश हीच तिची पुष्पें आहेत, दृढ संकल्प हीच तिचीं पल्लवें आहेत, मायाकाश हेंच शेत-जमीन असून त्यांत हिरण्यगर्भ या रूपानें तिचा अंकुर आहे. ती वेल सर्व पदार्थांची सत्ता--सत्यता हेंच फळ देते. जीवांचा समुदाय हाच परागपुंज असून ती वेल वासनारसानें पूर्ण झाली आहे. सविकल्प ज्ञान हीच त्या वेलीची त्वचा आहे. चित्तवृत्ति याच कळ्यांनीं ती वेल भरलेली आहे. मागें होऊन गेलेलीं जीं असंख्य त्रिभुवनें त्याच केसरांनीं तिचें रूप उज्ज्वल झालें आहे. एकसारखा तिचा चाललेला जो स्पंदाचा महाविलास तेंच तिचें डोलणें आहे. सर्व ऋतुरूपी पर्वांनीं ती पुरुष म्ह० कठिण झाली आहे. जड पर्वतादिक हेच तिचे गुल्म--कांद्यांचीं मुळें आहेत. चार प्रकारचीं शरीरें याच गांठींनीं ती वेष्टित आहे. मुळापासून शेंड्यापर्यंत ती प्रवृत्तिरूप प्रतानांनीं परिवेष्टित आहे. अशी ही चिद्रूपी लता विकास पावली आहे. हिनें या सृष्टींत विचित्र, सदसद्रूप, सर्वत्र नाजुक, म्ह० विचार सहन न करणारें, व चंद्रादिकांच्या कांतीप्रमाणें स्वच्छ दृश्य पुष्प उत्पन्न केलें आहे. या महा चित्‌च्या योगानेंच शरीरादिकांच्या ठिकाणीं अभिमान धारण केला जातो. पदार्थांचा विस्तार केला जातो गायन केलें जातें. क्रिया केली जाते. हिच्या योगानेंच सूर्यादिक नित्य प्रकाशमान होतात. चित्-मुळें सत्--सत्य, चेतन व जड हा विभाग होतो. पण अविवेकजन्य भोक्तृभोग्य इत्यादि विभ्रमांमुळें पति-पत्नींचे देह वस्तुतः अमंगल असूनही त्यांना ते सुमंगल भासतात व तीं दोघें मोठ्या प्रमानें परस्पराचा उपयोग घेतात. वायूच्या आवर्तांत असलेल्या चित्-मुळेंच सिद्ध झालेली, तिच्या सत्तेनेंच दर्शनाला योग्य असा आकार धारण केलेली जगत्समूहरूप

१. प्रत्येक जीवाचें संसारचक्र. २ इंद्ररूपानें त्रैलोक्याला वंद्य होते.

रजाची पंक्ति चितूहून निराळीशी होऊन अतिशय नाच करते. रूपयुक्त द्रव्याला दीप जसा प्रकट करतो त्याप्रमाणें त्रैलोक्याला प्रकाशित करणाऱ्या दीपांची अणुकाय ज्योतिच अशीही चित् या सर्व जगाच्या आरभास उत्तम प्रकारें प्रकट करते. प्रसिद्ध चंद्रांतील रसाप्रमाणें या चिद्रूपी अत्यंत शुद्ध चद्रबिंबाशीं संगम पावून जगांतील पदार्थश्री सर्व ठिकाणीं लक्ष्यत्वास प्राप्त होते. पावसानें शिंपलेल्या उत्तम वेलीप्रमाणें चिद्रूपी रसायनानें जिच्यावर वृष्टि केली आहे, अशी पदार्थान्य समुहाची पंक्ति स्वरूपास व फळास प्राप्त होते. घर पंचीकृत भूतांपासून बनलेलें असत. त्यामुळें त्यात सर्वत्र तेजाची व्याप्ति असते. तथापि इतर भूताच्या अंशांनीं तेजाच्या अभिव्यक्तीला प्रतिबध केलेला असतो. त्यामुळें बाहेर व्यक्त झालेल्या सूर्याच्या प्रकाशानें व्यापलें असतां आंत जशी त्याचाच छाया पडते, त्याचप्रमाणें शरीर चिन्मय जरी असलें तरी तें पंचीकृत भूतांपासून झालेलें असल्यामुळें चितूच्या अभिव्यक्तीला प्रतिबध होऊन तिच्या छायेनें शरीरांत जडत्वाचा स्पष्ट अनुभव येतो. हे चितूचे चमत्कार जर शरीरांत नसतील तर त्रैलोक्यांतील हे सर्व साकार पदार्थ छाया व जाड्य यांचा एकदा त्याग करून पुन: दुसरा आकार धारण करणार नाहींत, चिदाकाशाच्या प्रकाशानें प्रकाशमान होणाऱ्या या शरीरगृहात संकल्प या बालकाला धारण करणारी विहित व निषिद्ध कर्मातील प्रवृत्ति हीच चंचल कुलस्त्री स्फुरण पावते. या चित्प्रकाशाच्या अभावीं एकादा रस एकाद्या जीवाच्या जिव्हाग्रावर जरी ठेवलेला असला तरी तो कोठे तरी, कोणत्याही प्रकारं व केव्हां तरी प्रकट झालेला दिसतो का? नाहीं. वसिष्ठा! ऐक. हात--पाय इत्यादि अंगें याच ज्याच्या शाखा आहेत, केसांचा समूह हीच ज्याच्या वरील वेल आहे, असा हा देहवृक्ष चितच्या व्याप्तीवांचून कसा बरें शोभणार? चितूच वाढते, तीच गडबडा लोळते, तीच खाते, तीच चराचरसृष्टि करणारी आहे. चितूच आहे, दुसरें कांहीं नाहीं. हें सर्व चिन्मात्रच उदय पावलें आहे.

श्रीवसिष्ठः— रामा! याप्रमाणें तो त्रिनयन चंद्रासारख्या स्वच्छ वाणीनें मला बोलला. तेव्हां पुनरपि मीं चंद्रासारख्याच स्वच्छ वाणीनें त्याला विचारलें. "हे देवा! जर एकच चित् सर्वगत आहे, तर हा चिदात्माच देह, निद्रा, मरण व मूर्च्छा या अवस्थांमध्यें व दुसऱ्या दृश्यातही पृथ्वीवरील मृत्तिकेच्या थर प्रमाणें निश्चेष्ट कां होता! माती जशी नेत्रादिकांनीं रहित असलेल्या भिंतीप्रमाणें कांहीं पहात नाहीं तसाच हा अंध होऊन कसा राहतो? हा देहादिक पदार्थ दृश्यभावाच्या पूर्वीं व जीवनदशेंत चेतनावान् असून आतां त्याला दृश्यभाव आला असतां व मरणादि दशेंत चित्-हीन झाला आहे, ही कल्पना प्रत्यक्ष अनुभवास कशी येते? वास्तविक चित्-चा स्वभाव अविनाशी--नित्य असल्यामुळें व चित् अपरिणामी असल्यामुळें तिला जडत्व प्राप्त होणें कोणत्याच रीतीनं शक्य नाहीं.

श्री ईश्वरः— वसिष्ठा! हें सर्व ऐक. तूं जें विचारलस तेंच सांगतों. हे ब्रह्मदेवांतील श्रेष्ठा! तूं हा फार मोठा प्रश्न केला आहेस. शरीरांत खरोखर सर्वभूतमयरूप चित् आहे. पण तिचे बिंबभूत चित् व प्रतिबिंबभूत चित् असे दोन भाग झाले आहेत. एक चंचल समाष्टिव्यष्टिबुद्धींत आसक्त होणारी व दुसरी

१. चित्-लाच जीवादिभाव कसा प्राप्त झाला तें सांग, असा जो वसिष्ठानें पूर्वी प्रश्न केला होता त्याचें उत्तर अजून द्यावयाचेंच आहे. म्हणून त्या व या अशा दोन्ही प्रश्नांचें उत्तर ऐक, असा या सर्व शब्दाचा भावार्थ आहे.

निर्विकल्प कूटस्थ चित. मी आतां या तीन देवतांमध्यें-- चिह्नित भूपांपासून झालेल्या या शरीरांत जीवरूपानें प्रवेश करून नाम व रूप यास व्यक्त करतो, अशा अनुयुक्त संस्कारानें स्वरूपालाच जी जीव समजली आहे, अशी तीच चित् दुसरीशीच होऊन राहिली आहे. अशी एक सुशील स्त्री च स्वप्नांत दुसरा पति कल्पिल्यामुळें दुःखाप्रत प्राप्त होत असतां जणुं-काय दुसरीच स्त्री होते त्याप्रमाणें ती दुसरी होऊन राहिली आहे. तसेच पुरुष कंप आला असतां जसा येथें एका क्षणांत परिहित्यापेक्षां ि राळ्यानें स्वप्न वाचा होतो, राक्षसासारखा क्रूर बनतो, त्याप्रमाणें विकल्पानें चिह्नित झालेली चित् निराळ्या स्वरूपास प्राप्त झाली आहे. हे ब्रह्मणा! विकल्पानें कल्पिलेली चित् स्वरूपा पासून सर्वथा च्युत होऊन क्रमानें जडाशीं आपलें तादात्म्य आहे, अशी भावना करीत हेस्त.ती सविकल्पबुद्धीचा विषय होते. संकल्पनेनेंच तिला जडभाव प्राप्त होतो. चित स्वतःच त्रिपुटीनेस प्राप्त होते, म्ह० आकाशादि सूक्ष्मभागांच्या स्वरूपास -शब्द--स्पर्श--रूप--रस-गंधात्मक भोगांच्या बीजत्वास प्राप्त होते. त्यानंतर ती समष्टि प्रागभावास प्राप्त होते. सूक्ष्म भूतांना पंचीकारणानें स्थूलभाव प्राप्त झाला असतां तेच सप्तद्वीप, चतुर्दश लोक इत्यादि देशविभाग व निमिषादि द्विपरार्धपर्यंत कालविभाग यथावत् क्रमानें विकास पावते. नंतर त्यांत प्राणधारण करणें या कार्यामुळें तीच जीवरूप होते. बुद्धि, मन, अहंकार व चित्त बनते. मी चांडाळ आहें असें मनन केल्यामुळें ब्राह्मणही चांडालत्वास जसा प्राप्त होतो त्याप्रमाणें मनस्त्वास प्राप्त झालेली चित्त संसाराचा आश्रय करते. ब्रह्मचित्-च अज्ञानानें शबलरूपास प्राप्त होऊन तिचाच देह, जीव. इत्यादि रूपानें संकल्प केला असतां त्यांचें जडत्व तिच्या ठिकाणीं येते. त्यामुळें सर्वज्ञ असलेलीही ती असर्वज्ञ होऊन पुनः पुनः भागाचा संकल्प करून एकसारखी संसार करीत राहते. पाणी गोठून त्याचा जसा बर्फाचा दगड बनतो, त्याप्रमाणें अनंत संकल्पमयी, जाड्याच्या संकल्पानें पुष्ट झालेली चित् जाड्यामुळें 'मी जीव आहे' अशा भ्रमास प्राप्त होते. त्यामुळेंच चित्त, मनोमोह, माया, असें तिचें नांव ठरलें आहे. हे मुने! याप्रमाणें जाड्याचा-अज्ञानाचा पूर्णपणें आश्रय करून संसारांत ती चित् उत्पन्न होते, ती मोहरूपी मंदत्वास प्राप्त झाली आहे. तृष्णारूपी बेडीनें जखडली गेला आहे. ती काम, क्रोध भयांनीं युक्त आहे. वैभव व दारिद्र्य अनुभवणारी झाली आहे. तिनें आपला अपरिच्छिन्न आकार टाकला आहे. भार्या-पुत्रादिकांचा वियोग झाला असतां ती शोकादि विकारांस प्राप्त होते. दुःखरूपी दावाग्नीनें ती संतप्त होते. शोक व अकल्याण यांच्या योगानें ती कृपण बनली आहे. ही मी प्रत्यक्ष सुख,दुःखादि स्वभावाचीच आहें अशा भ्रमानें ती नाशाकडून ग्रासली जाते. केवळ देहावरच आस्था ठेवल्यामुळें ती अतिशय दैन्यास प्राप्त झाली आहे. अरण्यांतील म्हाताऱ्या हत्तिणी-प्रमाणें ती मोहरूपी महाचिखलांत रुतली आहे. भाव व अभाव याच लतांच्या झोपाळ्यावर जिचें शरीर अतिशय चचल झालें आहे अशी ती असार व अपार संसाराच्या कारांनीं व्यवहार करीत असते. संतापानें तिचें हृदय अतिशय संतप्त झालें आहे. प्रेम व क्रोध यांना ती व्याप्त झाली आहे. आपल्या कळपांतून चुकलेल्या हरिणीप्रमाणें ती सर्वथा परतंत्र झाली आहे. वैभवाचा आविर्भाव झाला असतां ती हृष्ट होते व त्याचा नाश झाला असतां खिन्न होते. वेताळाची कल्पना करून

एकादी बालिका जशी पळते त्याप्रमाणें चित् आपल्या संकल्पानेंच प्राप्त झालेल्या अन्य संभ्रमदृष्टींना पाहून भयभीत होऊन पळते. उंटीण कांट्यांपासून मधुर रसाची इच्छा जशी करते त्याप्रमाणें ती विषयांपासून इष्ट सुखाची इच्छा करते. पण मध्येंच परिभ्रष्ट होऊन दुःखाच्या परंपरेंत पडते व अधोगतीस जाते. संकटांच्या परंपरेंत पडून ती अति व अस्वस्थ होते. ती एका दुःखांतून दुसऱ्या दुःखांत पडते. एका विपत्तींतून दुसऱ्या विपत्तींत पडते. नानाप्रकारच्या अर्थांनीं ती युक्त होते. तिचा आशय चेष्टेच्या-प्रवृत्तींच्या अधीन झालेला असतो. ती नरकादिभूमींमध्यें अनेक कष्ट सतत भोगते. तिला एकामागून एक असे असह्य संताप होतात. तिला मनुष्यजन्म जरी मिळाला तरी बाल्यावस्थेपासून व्यवहारांतील कौशल्याचा अभ्यास केल्यामुळें काव्य-नाटक-तर्कादिकांच्या परिचयास प्राप्त होऊन गृह-क्षेत्र परिवार इत्यादि विचित्र बंधाला निर्माण करण्यांत जो पराक्रम त्यालाच प्राप्त झालेली असते. मोक्षोपयोगी विवेकास प्राप्त झालेली नसते. याप्रमाणें व्यवहार करीत असतांना तिचें वय संपलें असतां प्राणाचें उत्क्रमण होण्याचा प्रसंग येतो. त्यावेळीं ती चित् सर्वप्रकारें भयभीत होऊन सर्वविषयीं साशंक होते. एकाद्या जलाशयांतील पाणी संपलें असतां त्यांतील शफरी-लहान मासा जसा तडफडूं लागतो तशी ती प्राणोत्क्रमणप्रसंगीं तडफडूं लागते. व त्या अवस्थेंत तिचे सर्व भोग परवश असतात. तारुण्यांत ती स्त्री द्रव्य इत्यादि विषयांच्या चिंतनें व्याकुळ होते, वार्धक्यांतही ती अतिदुःखानें आर्त होते व शेवटीं कर्माधीन झालेली ती मरते. ती स्वर्गनगरांत उत्पन्न होते. पातालछिद्रांत नागी होते. दैत्यांच्या लोकांत आसुरी होते. भूलोकीं पुरुषवी होते, राक्षसांच्या लोकांत राक्षसी होते. वानरांत वानरी होते. पर्वताच्या शिखरावर सिंही होते. हिमालयादि कुलपर्वतांवर किंनरी होते. मेरूवर विद्याधरी होते. वनांतील गुहेंत व्याघ्री होते. वृक्षावर लता होते. घरट्यांत पक्षिणी होते. पर्वतशिखरावर गुल्मिनी होते. वनांत हरिणी होते. ती क्षीरसागरांत नारायण होऊन निर्जन, ब्रह्मपुरांत ध्यान करणारा ब्रह्मदेव होते. कैलासावर कांतेच्या अर्धांगाशीं संगत झालेला हर होते. स्वर्गांत देवश्रेष्ठ इंद्र बनते. ती सूर्य होऊन दिवस करते. मेघ होऊन वृष्टि करते. वायूचा भ्रमण हा व्यापार ती संवरण करते. तीच पर्वत सिंह महासागर बनते, ती ऋतुघटित संवत्सर होऊन ध्रुवस्वरूपानें वहाते. युगमन्वंतरादिरूप कालमंडल बनते, ती क्रमानें दिन व रात्र होऊन तेज व अंधकार यांस प्राप्त होते, वृक्षादि कांहीं पदार्थरूपानें ती बीजादि होते व रसात्मक उल्हास पावते, कांहीं ठिकाणीं पाषाणांच्या रूपानें मौन धारण करणारी होते, क्वचित् ती रसयुक्त नदी होते, क्वचित् चंद्रविकासी कमलें होते, विस्तार ती क्वचित् फलदंतांच्या पंक्तींनीं व कटें काष्ठ, अग्नि, इत्यादि रूपानें ती उपलक्षित होते, क्वचित् शैत्यानें बर्फाप्रमाणें थंड झालेलें जल ज्यांत आहे असा जलाशय ती होते, क्वचित् फक्त आकाश व वायु ज्यांत दुसरें कांहीं नाहीं अशी ती बनते, क्वचित् ती उज्ज्वल आकार धारण करते व क्वचित् दर्भ, कांटे यांच्या योगानें दुर्गम झालेली शिला बनते, ती कोठें नीलवर्ण होते, कोठें हरित होते. कोठें अग्नि होते, कोठें पृथिवी

---

१ नारायणादिपदप्राप्त ही सुद्धां एक जीवाची गतिच आहे. असा आशयानें हें वर्णन आहे. किंवा नारायणादिकांच्या सारूप्यमुक्तीस प्राप्त झालेल्या जीवाचें हें वर्णन आहे. किंवा येथून पुढें जीवाच्या गतीचें वर्णन नसून चितू च्या सर्व व्यापारवृत्तीचें वर्णन आहे, असें समजावें,

होते. ती सर्वात्मक असल्यामुळें, सर्वगामिनी असल्यामुळें, सर्व शक्तींनीं युक्त असल्यामुळें, आणि तिला सर्वात्मत्व असल्यामुळें जगद्रूपच होऊन राहिली आहे, पण परमार्थतः परा-निरुपाधिक असलेली चित् आकाशाहूनही स्वच्छच आहे. जलाच्या चचलतेमुळें त्यालाच तरंगादिरूपत्व असें भास होतें त्याप्रमाणें चित् आपल्याला जेथें ज्या भावानें कल्पित त्याच भावाचा अनुभव घेते. हंसी, क्रौंची, बकी, काकी, सारसी, घोडी, झाडगी, बलाका, विशेष आकाराची बकी, हरिणी, वानरी, किन्नरी, कुत्री, घटिका, पिंगली, शाली, माशी, भ्रमरी, पोपटीण, धी, श्री, ऱ्ही, प्रीति, रति, माया, रात्री, चंद्र, या व अशाच दुसऱ्याही योनींमध्यें जन्म घेऊन तृण जसें चंचल वावटळींत भ्रमण करतें त्याप्रमाणें या परिवर्तन पावणाऱ्या संसारामध्यें परिभ्रमण करते. गर्दभी जशी आपल्याच कर्कश आरडण्यास भ्याली तशी ती स्वसंकल्पालाच भिते. हिच्यास रखी खुळी, चचल, निर्बल बाला दुसरी काणी नाहीं. महामुने ! ही मीं तुला जीवनशक्ति सांगितली. ती प्राकृत आचारांनीं अत्यंत पराधीन झाली आहे. ती वराकी पशुधर्मिणी आहे. हिचा स्वभाव कर्मानुसार आहे. त्यामुळें अनंत व दुःखप्राय विभ्रमांचा स्वतः आश्रय केलली ती या परमात्म्याला कर्मात्मा असें नांव देऊन शोच्यावस्थेस प्राप्त झाली आहे, हिनें मिथ्या, विनाशी स्वाभाविक मलाचें आक्रमण केलें आहे व तांदळ जसा कवचानें आच्छादित झालला असतां त्याप्रमाणें हिनें वस्तुतः स्वतःहून भिन्न नसलेल्या अविद्येनें अनियत कवच धारण केलें आहे. अनन्त वैभवापासून भ्रष्ट झालेली, दुर्भाग्यानें संतप्त होणारी, व जीवनत्वास प्राप्त होऊन शोक करणारी ही चित् पतिहीन नायिकेप्रमाणें अनाथशी होऊन राहिली आहे. हे रामा ! तू अविद्येचें सामर्थ्य पहा. कारण जी पूर्ण ब्रह्मस्वभाव असलेली चित् ती रहाटगाडग्याच्या माळेला बांधलेल्या मडक्यांतील आकाशाप्रमाणें स्वतःच्या निरतिशय आनंदपूर्ण स्वभावाला न स्मरल्यामुळें अधःपतनासाठीं उत्तरोत्तर कष्टदशेस प्राप्त होते. मेघ, समुद्र इत्यादि सकल जलावरून उपलक्षित होणाऱ्या सर्व जगाचा आपल्या विभु स्वरूपांत अन्तर्भाव करण्याचें जें आकाशाचें सामर्थ्य त्याला विसरून मडक्यांतील आकाश विहिरींतून आणलेलें पाणी आतून टाकताच मी रितें झालें आहे, असें ज्याप्रमाणें समजतें व पुनः स्वतः जलपूर्ण होण्यासाठीं खालीं खालीं जातें, त्याप्रमाणें चित् आपल्या स्वभावास विसरते, मी देहपरिच्छिन्न आहें, असें समजतें, भोगाला कारण होणारें पुण्य क्षीण झालें कीं मी रिती झालें, असें मानतें व पुनः पुनः स्वपतनासाठींच खालीं खालीं जाते; खरोखर हें फार वाईट आहे.

---

## सर्ग ३१

—:※:—

१. जीवनादिकांचा निषेध करून शुद्ध चित् सांगतात. २. ती मन, इंद्रियें, प्राण यांच्या द्वारा आत व बाहेर प्रकाश पावते.

श्री ईश्वरः—वर सांगितल्याप्रमाणें चित् अज्ञानानें जीव-जगद्भाव खोटाच आपल्यावर लादते, ज्याप्रमाणें स्वप्नांतील मदिरामदामुळें प्राप्त झालेल्या मोहामध्यें ती पडते तशीच मी दुःखी आहें, अशा भावनेनें ती दुःखी होते. जशी एकादी वेडी मुलगी तिच्या मतीला भ्रम झाला असतां वस्तुतः मेलेली नसतांनाही मी मेलें आहें, असें समजून रडते, त्याप्रमाणें नष्ट न झालेलीच चित् मी नष्ट झालें आहें, असें समजते. कांहीं कारणावांचूनच विपर्यास पावलेली मति भ्रमण करीत असलेल्याही कुंभा-

राच्या चक्रादिकांना जशी स्थिर पाहते, त्याप्रमाणें चिति अहंताभ्रमामुळें या जगाला ही स्थिर पहाते. या चितीला संसाराचा अनुभव येण्याचें कारण चित्त आहे, पण तें चित्त ही कांहीं वस्तुच नाहीं. कारण त्याला चित्त्वही संभवत नाहीं व अचितही म्हणतां येत नाहीं. कारण चित्त चिद्रूप आहे असें म्हटल्यास त्याला विकार होणार नाहीं व तें अचित्-जड आहे, असें म्हटल्यास त्याचा अन्तर्भाव जगांतच होतो; आणि चित् या कारणाचाच अभाव असल्यामुळें चित्ताचा विषय जें जगत् त्याचाही अभाव होतो. त्यामुळें ज्या चित्-कडून चित्त प्रयत्न तें विषय केलें जातें, जाणलें जातें. ती चित् चित्त किंवा चित्ताच्या अधीन असलेलें चेत्य नाहीं, तर शुद्धच आहे, चित्तादि विषयांहून भिन्न—पृथक् आहे. पाषाणांत असें तेल संभवत नाहीं किंवा चंद्रांत काळेपणा संभवत नाहीं, त्याप्रमाणें चितीमध्यें दृश्य-दर्शन द्रष्टृरूप किंवा कर्म कर्तृ-करण संभवत नाहीं. आकाशांत जसा नवा अंकुर संभवत नाहीं त्याप्रमाणें चैतन्यांत प्रमातृ-प्रमेय-प्रमाण संभवत नाहीं. नंदनवनांत खदिराचें झाड असें संभवत नाहीं त्याप्रमाणें चितींत चित्तवृत्ति, त्यांचा आश्रय जीव व विषय संभवत नाहींत. आकाशांत पर्वतत्व जसें शक्य नाहीं त्याप्रमाणें चितींत मीपणा, तूंपणा व तत्पणा संभवत नाहीं. काजळांत शुक्लत्व जसें अशक्य त्याप्रमाणें चितात संदेहत्व व अन्यदेहत्व अशक्य आहे. अणूमध्यें सुमेरु असा संभवत नाहीं त्याप्रमाणें जीवभेद व प्रत्येक शरीरांत आत्मभेद भास संभवत नाहींत. माळ जमिनीवर वेल जशी उगवत नाहीं त्याप्रमाणें चितींत नाम व रूप यांचें नांवही संभवत नाहीं. सूर्यमंडलामध्यें रजनी म्ह० रात्र जशी संभवत नाहीं त्याप्रमाणें चितींत शास्त्रांतील सर्व दृश्य पदार्थांचे निषेधही संभवत नाहींत. तुषारांत जशी उष्णता नाहीं त्याप्रमाणें चितींत वस्तुता व अवस्तुता नाहीं. शिळेच्या उदरांत वृक्ष जसा नाहीं त्याप्रमाणें चितींत शून्यता व अशून्यता नाहीं. कारण शून्यता म्ह० आकाशांतील प्रसिद्ध शून्यता व अशून्यता म्ह० केवलता-स्वरूप स्वच्छताच, विचार केला असतां, अवशिष्ट राहते, अणुमात्रही भिन्नता नसते. हिरण्यगर्भाच्या दोषभूत चित्तापासून उत्पन्न झालेल्या चितच्याकडूनच दुःखाचा अनुभव घेतला जातो असें नाहीं, तर त्यानें उत्पन्न केलेले जे शरीर-इंद्रिय-विषय त्यांच्या ठिकाणीं अहं-ममाभिमान ठेवल्यामुळ व त्यांना सत्य मानल्यामुळें हा प्रकृत संसाररूप अनर्थ उद्भवला आहे. त्यामुळें नुस्ती त्याची भावना न करणें याच उपायानें तत्त्वज्ञाच्या ठिकाणीं तो शांत होतो. म्हणूनच त्याला तृणाप्रमाणें तुच्छ मानतां येणें शक्य असतांही भावनेच्या बलामुळें अतत्त्वज्ञांना त्याला तुच्छ करतां येत नाहीं. वस्तुतः ही गोष्ट आपल्या हातची आहे; पण भावनेमुळें ती दुःसाध्य झाली आहे. गवताची काडी जरी उचलावयाची झाली तरी हात पुढें करणें, खालीं वांकणें, इत्यादि यत्नांवांचून ती उचलतां येत नाही. यावरून पुरुषाला प्रत्येक गोष्ट यत्नानेंच साध्य करावी लागते, हें उघड आहे. त्यामुळें पुरुषाकडून यत्नानें जें जें मिळविलें जात नाहीं तें त्याला कोठें, केव्हां व कसें मिळणार ? ही जी निर्विकल्प अद्वितीय चित् ती सर्वगामिनी सर्वश्रेष्ठ, भेदशून्य, अत्यंत निर्मळ व सूर्यादि तेजानांही प्रकाशित करणारी आहे. ती प्रकाश करणारी, सर्वगा, नित्य निर्मळ, नित्य उदित, मनोविरहित, निर्विकार, व निर्लेप आहे. ती घट, पट, वट, भिंत, गाडी, वानर, सुर, असुर, सागर, भूत, नर व नाग यांत

संस्थित आहे. जसा दीप इतर पदार्थांना प्रकाशित करण्यास स्वरूपस्थितीनेंच समर्थ होतो, तो स्वरूपानें स्थित होणें याहून दुसरें कांहीं क्रिया करीत नाहीं, त्याप्रमाणें ही चित साक्षीप्रमाणें राहून कोठेंही व कव्हांही स्पंद पावत नाहीं, हालचाल करीत नाहीं ती अशा प्रभावाची जरी असली तरी या शरीरादि भावनेमुळें अमलिन असूनही मलिनशी दिसते, निर्विकल्प असूनही विकल्प करणारीशी दिसते, अजड व आत्मस्वरूप असूनही जडशी दिसते. असंग असूनही सर्वांमध्यें व्यापून राहिलेलीशी दिसते; विशेष अभिमानादिकांनीं रहित असलेली सर्वगत व सूक्ष्म चित् व प्राणप्रधान लिंगदेहामध्यें प्रतिबिंबभावानें अनुगत होऊन हस्तपादादि अंग, हृदयादि मर्म व बहात्तरसहस्र नाड्या या सर्वांना व्यापून, आणि सर्वव्यापी संविद्रूप तत्त्वाच्याच भागांत ह्या आनखाग्र शरीरांत जणुकाय आक्रमण करून एकत्र गोळा करते. यामुळें ती प्रत्यक्ष शरीरांत अधिक व्याप्त झालेली दिसते. जसा कोळी फार लांब आलेल्या रेशमासारख्या सूक्ष्म सूत्रालाही गुंडाळून त्याचा बाहेर एवढी गुंडी करतो, त्याप्रमाणें ती प्रत्येक शरीरांत स्वतःला गोळा करते. त्यामुळेंच जागृत असलेल्या जीवांची चित् बाहेर रूपादिकांना पाहून व आंत मनन वगैरे करून बाह्य पदार्थमय असते. तो झोंप धरूं लागला असतां ती स्वप्नांत वासनामय रूप पाहणें व मनन करणें, यांच्या योगानें आंत बाधसाक्षी व बाहेर अबोधसाक्षी राहते. पण त्याला गाढ झोंप लागली असतां चित केवळ अज्ञानालाच पाहत असते. त्यामुळें ती असूनही नसल्यासारखी होते. ती अतिशय स्वच्छ असलेली ब्रह्मचित् देहच आत्मा आहे अशी भावना केल्यामुळें अनुकूलाची प्राप्ति कशी होईल व प्रतिकूलाचा परिहार कसा होईल, अशी चिंता करूं लागते. दुर्जनाच्या संगतीनें दुष्टविचाराचाच दीर्घकाल परिचय झाल्यामुळें एखाद्या साधूचें चित्तही त्या संस्कारांनीं व्याप्त होऊन दुष्ट वासना युक्त होतें, व तो साधुही असाधु बनतो. त्याप्रमाणें स्वच्छ चित्‌ही चिन्ता करूं लागते. जसें सुवर्ण मळाच्या संसर्गानें तांबें होतें, पण त्याचें शोधन करून त्याचा मळ घालविला असतां तें जसें पुनः शुद्ध सोनें होतें त्याप्रमाणें मी चित्तादि आहें, ही भावना टाकून ' मी ब्रह्म आहें ' अशी भावना दृढ केली असतां पुरुष चिद्रूपच होतो. आरशावर बसलेलें आगंतुक मळाचे पुट पुसून टाकलें असतां तो पुनः पहील पदार्थांचें प्रतिबिंब घेण्यास जसा योग्य होतो त्याप्रमाणें चित्‌ही अज्ञानामुळें जीव-जडभावादि सर्गासच जणुंकाय प्राप्त होऊन राहिलेली असते, परंतु तत्त्वबोधानें ती कैवल्यपदास प्राप्त होतें. हिच्या अज्ञानामुळें संसार प्राप्त होतो व हिच्या स्वरूपाचें ज्ञान झाल्यानें तो मिथ्या ठरून शांत होतो. जेव्हां ही चित् चित्स्वभावामुळें आंत खोट्या भेदाची कल्पना करते तेव्हां ती जणुंकाय अहंतेस प्राप्त होऊन वस्तुतः अविनाशिनी असूनही विनाश पावणारी होते. एखाद्या डोंगराच्या कड्यावर असलेल्या झाडाचें फळ देठापासून अलग होणें, या एवढ्याशाच संबंधानें जसें खालीं फार खोल जाऊन पडतें त्याप्रमाणें केवल ' मी ' ह्या एवढ्याशाच संबंधामुळें चितीचा फार मोठा अधःपात होतो व तिला जीवभाव प्राप्त होतो. रूपादि विषयांची सत्ता चित्-मुळेंच सिद्ध होते, चित् स्वतः अमलच आहे, द्वित्व व एकत्व हे दोन्ही भाव अज्ञानामुळें भासतात, पण ते बोधानें विलय पावतात. ज्याप्रमाणें केवल प्रकाशाच्या सत्तेनें सर्व क्रियांचा व्यवहार होतो त्याप्रमाणें

चित्तसाक्षीच्या केवळ सत्तेने चित्त-इंद्रियें इत्यादिकांमध्यें ज्ञानशक्ति येते. चित्च्या केवल सान्निध्यानें ज्याला प्रेरणा झाली आहे अशा व्यानवायूमुळें चक्षुरिंद्रिय व त्याचें स्थान कनीनिका याचा स्पंद होतो व त्यांत असलेली जी दीप्ति तिला तैजस इंद्रिय, दृष्टि, चक्षु असें म्हणतात. त्याच्या द्वारा अन्तःकरणवृत्ति बाहेर पडते. ती घटादिकांचा आकार, रूप इत्यादिकांना व्यापते; त्यामुळें त्या सर्वांचा जो बोध होतो तो पण चित्च आहे. त्याचप्रमाणें स्पर्शामध्यें त्वचा व वायु हे दोन्ही विकार जड व तुच्छ आहेत, त्यांना स्वतःची सत्ता व स्फूर्ति नाहीं. त्यामुळे चित्च्या सत्तेनें । स्फूर्तीनेंच त्याचा संग होतो, तोच स्पर्शेंद्रियाच्या कल्पनेचें निमित्त आहे, म्हणून त्याला स्पर्श म्हणतात. त्याच्या द्वारा स्पर्शेंद्रियाशीं संयुक्त झालेल्या शीतोष्णादि द्रव्यांविषयींचें जें मनन म्ह० तदाकार मनोवृत्ति तिलाच स्पर्शज्ञान असें म्हणतात. तें ज्ञान, स्पर्शेंद्रिय, विषय इत्यादि सर्व त्रिपुटीचा जो साक्षात्कार ती साक्षिचित्च होय. त्याचप्रमाणें घ्राणेंद्रिय व गंध यांच्या रूपानें विभक्त झालेल्या गंधतन्मात्राचा व नाकांत प्रवेश करणाऱ्या वायूचा जो संबंध तोच गंधाकार अन्तःकरणवृत्तीचें निमित्त असल्यामुळें त्याला गंधसंविति म्हणतात. या त्रिपुटीचें मननाला सोडून भिन्न असलेलें जें प्रकाशरूप वेदन ती श्रेष्ठ साक्षिचित्च होय, त्याच न्यायानें शब्दतन्मात्र, श्रवणेंद्रिय, व व्यानवायु यांच्या संगमापासून उत्पन्न झालेल्या ज्या मनोवृत्ति त्याच शब्दसंविति होत. त्यांतील मनाचा अंश सोडून सुषुप्तिसारखी असलेली जी साक्षिसंवित् ती परमा चित् होय. संकल्पामुळें अंतःकरण क्रिया करण्यास तयार होतें. संकल्प ही मनोवृत्ति आहे, मनन हेंच चित्ताचें कालुष्य आहे, पण सर्वांचा साक्षी आत्मा निर्मल चित् आहे. जशी स्फटिकशिला आपल्या उदरांत न-पर्वत-नदी इत्यादिकांचें प्रतिबिंब धारण करते त्याप्रमाणें ही प्रकाशात्मिका, नित्य, स्वरूपांतच स्थित असलेली चित् आपल्यामध्यें या जगाला धारण करते. अद्वितीय चित् आपल्यामध्यें विकारादिक न होता या जगाला धारण करते, ती अस्त पावत नाहीं, उदय पावत नाहीं, तो स्पंद पावत नाहीं व वृद्धि पावत नाही ती संकल्पामुळेंच जीवभावास प्राप्त झाली आहे, परंतु निःसंकल्परूपानें असलेली चित् 'जड जगत् जड नाहीं तर तें अजड आहे,' अशी त्याच्या वास्तविक भावाची भावना करीत स्वरूपांत सुस्थित होते. या चितीचा रथ-बाहेर पडण्याचें साधन-जीव आहे, जीवाचा रथ अहंकार आहे, अहंकाराचा रथ बुद्धि आहे, बुद्धीचा रथ मन आहे. मनाचा रथ प्राण आहे, प्राणाचा रथ इंद्रियगण आहे, इंद्रियसमूहाचा रथ देह आहे व देहाचा रथ कर्मेंद्रियसमूह आहे. संसारांत भ्रमण करणें हेंच कर्म या रथांचें साध्य आहे. जरा व मरण यांनीं उपलक्षित होणारे देह, हेच यांतील पिंजरे आहेत, असें हें जीवरूपी पक्ष्यांचें झोके घेण्याचें चक्र मुळकारण जो ईश्वर त्याच्या मायारूपी ऐश्वर्यानें उत्पन्न झालें आहे. कारण तें आत्म्याच्या ठिकाणीं स्वप्नाप्रमाणें प्रतिभासानेंच प्रसार पावलें आहे, तें लेशतःही खरें नाहीं, मृगजळाप्रमाणें आहे. हे मुनीश्वरा! मानसकल्पनेचें निमित्त प्राण असल्यामुळें त्याला कल्पनेचा रथ म्हटलेलें आहे. जेथें प्राणवायु तेथें कल्पना उभी राहते. जेथें प्रकाशाचा प्रभाव तेथेंच रूप जसें दिसतें त्याप्रमाणें सुत्ररूप असल्यामुळें धारण व चालन करण्यास समर्थ असलेला प्राण जेथें असतो तेथेंच चलन होतें. वनांत जेथें वावटळ उठते तेथेंच वन हालूं लागतें. तेजाचा अभाव झाला असतां रूप

जसें व्यक्त होत नाहीं त्याप्रमाणें मन हृदयाकाशांत स्थिर झालें असतां प्राणाचें स्पंदन होत नाहीं. वावटळ शांत झाली असतां धूळ जशी उडत नाहीं त्याप्रमाणें प्राणवायूला शांत केलें असतां मन आंत थोडेंसेंही चंचल होत नाहीं. प्राणवायु जेथें जातो तेथेंच मन राहते. जेथें जेथें रथ जातो तेथें तेथें सारथि असतो. प्राणाकडून प्ररणा केलें गेलेलें चित्त, गोफणींतून सोडलेल्या दगडाप्रमाणें, एका क्षणांत देशांतरीं जातें, पण प्राणाचा निरोध केला असतां मन क्षय पावतें. जेथें पुष्प तेथें वास, जेथें अग्नि तेथें उष्णता, जेथें समष्टिव्यष्टिरूप प्राण तेथें वायु, जेथें चंद्र तेथें चांदणें व जेथें मन तेथें त्याच्या वृत्ति. म्हणूनच प्राणवायूच्या स्पंदामुळें चाक्षुषादि ज्ञान होतें, असें मीं वर वर्णन केलें आहे. तो वायु सर्व अंगांत अन्नरस पोंचविण्यासाठीं सर्व नाड्यांना स्पर्श करतो. त्यामुळें चित्त-मन इत्यादिकांनीं बनलेल्या लिंगशरीरात्मक प्राणकोटारांत चित्‌-चा बिंब-प्रतिबिंब- भावानें द्विगुण आकार होतो. आकाशाप्रमाणें स्वच्छ असलेली संविद् जड व अजड अशा सर्व पदार्थांत असते. पण प्राणांच्या स्पंदनामुळें ती जणुं काय क्षुब्ध होते, स्पष्ट—अभिव्यक्त होऊन जणुं काय चलन पावते, असा अनुभव येतो. जड पदार्थांमध्यें ती सत्ता-मात्रस्वरूपानें आहे, पण जड देहांतही प्राणानें जिला क्षुब्ध केलें तर ती चित्ताशीं तादात्म्य पावून सर्व जाणते. जो देह पूर्वी—जीवनदशेंत नानाप्रकारच्या विस्तृत विलासांनीं व्यवहार करीत असतो तोच त्यांतील प्राण निघून गेला असतां मनोरहित होऊन हालचाल करीत नाहीं. आरशांत जशी प्रतिमा दिसते त्याप्रमाणें पुर्यष्टकांत परमा चित् प्रतिबिंबित होते. पाषाणादिकांत ती प्रतिबिंबित होत नाहीं. (अहो पण एकदा प्राणामुळें मनांत चित्-च प्रतिबिंब पडतें, असें सांगितलें व पुनः पुर्यष्टकांत तें पडतें असें म्हणता, तेव्हां हा पूर्वोत्तर विरोध नव्हे का ? उत्तर-) मनच पुर्यष्टक आहे, तेंच सर्व कार्यांचें मुख्य कारण आहे, असें समज. कांहीं आचार्यांनीं शिष्यांना सत्वर बोध व्हावा म्हणून त्या मनोरूप पुर्यष्टकाचेंच कल्पनांनीं आकुल झालेलें निराळ्या तऱ्हेनें कथन केलें आहे. ज्याच्यापासून हें सर्व दृश्य उदय पावतें, ज्याच्यामुळें तें चित्‌-मध्येंच स्थित झालें आहे, असें स्पष्ट अनुभविलें जातें व तिच्यांतच लीन होतें, आणि ज्याच्यामुळें मनच देहदृष्टीनें विपरिवर्तन--परिणाम पावतें तें परमतत्त्व हें सर्व विश्व आहे, दुसरें नाहीं, असें तूं समज.

१. पांच भूतें, पांच प्राण, अंतःकरणचतुष्टय, कर्मेंद्रियपंचक, ज्ञानेंद्रियपंचक हे पांच समूह व अविद्या, काम व कर्म हें पुर्यष्टक आहे.

## सर्ग ३२

१. चित् पुर्यष्टकांत प्रविष्ट होऊन देहादिकांस चचल करते. २. दुसऱ्या देहास तीच जाते.

श्रीईश्वरः—मुने ! परमा चित् पूर्वोक्त प्रकारानें जीवाच्या पुर्यष्टकांत प्रविष्ट होऊन ऐहिक व पारलौकिक कर्मे कशी करते, त्या कर्मांना अनुकूल अशा देहादि स्पंदानें कशी युक्त होते, व ती 'चालतो, स्नान करतो, भोजन करतो, याग करतो, ब्राह्मण, क्षत्रिय, देवदत्त' इत्यादि नांवांना कशी प्राप्त होते, तें सर्व मी तुला सांगतों, ऐक.. अनादि मायारूप ब्रह्मशक्ति आपल्या आवरणशक्तीनें स्वाश्रयभूत ब्रह्माला जणुं काय आच्छादित करते. तें नाहीं, भासत नाहीं, अशा प्रतीतीला त्याला योग्य करते. नंतर अनादि कालापासून संचय होत असल्यामुळें अतिशय पुष्ट झालेल्या विचित्र मानस, वाचिक व कायिक प्राक्तन विहित निषिद्ध

कर्मांनीं पुर्यष्टकात्मक मनोरूपानें परिणत होते, त्यानंतर ती शक्ति स्वतःचें अधिष्ठान अशी जी चिति तिच्या सत्तेनें चिद्रूपशी व स्वतःच्या स्वभावबलानें जडरूपशी होते. याप्रमाणें मिश्र-भावास प्राप्त झालेली ती ज्ञानव्यवहार व कर्मव्यवहार करण्यास योग्य होते. नंतर तीच शक्ति आपल्या शक्तिभूत ज्ञान-कर्मेंद्रियांच्या द्वारा द्रष्टृ-दर्शन-दृश्य, कर्तृ-करण-कार्य, भोक्तृ-भोग-भोग्य या नऊ प्रकारच्या संसाररूपानें नृत्य करते. हे मुने ! या मायाशक्तीच्या अविचाररूप प्रसादानें कलंकित झालेली ती चित् हें मिथ्या जगत् करते व विचाररूप प्रसादानें करीत नाहीं. ( तर मग चितूच्या सांनिध्यानें देहालाच सर्व करूं दे. चित्तादिकांची कल्पना कशाला करावयास हवी ? उत्तर--) चित्त, मन, बुद्धि व अहंकार यांच्या अभावीं देह भिंती-प्रमाणें मुका राहतो; व तीं चित्तादि विद्य-मान असलीं म्हणजे आकाशांत फेंकलेल्या दगडाप्रमाणें जोरानें चेष्टा करतो. जसें लोहचुंबकाच्या सांनिध्यानें अगदीं जड असलेलें लोखंड क्रिया करूं लागतें त्याप्रमाणें हा जीव सर्वव्यापी परब्रह्माच्या सांनिध्यानें प्राण, कर्मेंद्रियें इत्यादिकांच्या व्यापराचें साधारण निमित्त होतो; व हा जीव आत्मरूप चिच्छ-क्तीनें स्वतःला व इतरांना जाणण्यास समर्थ होतो. ( अहो पण जीवाची उपाधि असें जें लिंगशरीर तें भौतिक असल्यामुळे द्रव्यस्वभावांत गणलें जात आहे. तेव्हां तें अद्रव्यस्वभाव असलेल्या ब्रह्माचें प्रतिबिंब कसें ग्रहण करूं शकतें ? कारण द्रव्यांत द्रव्याचेंच प्रतिबिंब पडणें उचित आहे ! उत्तर- , आरसा द्रव्यरूप नसलेल्या गुणादिकांचेंही प्रतिबिंब ग्रहण करतो, त्यामुळें अद्रव्य ब्रह्माचेंही लिंगशरीरांत प्रतिबिंब पडणें, अशक्य नाहीं. ( अहो पण जीव जर ब्रह्माचें प्रतिबिंब आहे तर त्यांत अज्ञान निद्रा-आलस्य इत्यादिकांचा संभव कसा ? सूर्याच्या प्रतिबिंबांत अप्रकाश संभवत नाहीं, ' म्हणून म्हणाल तर सांगतों-- ) जीवाचा अत्यंत विस्मरणस्वभाव असल्यामुळें, जसा एकादा सद्ब्राह्मण मोहानें आपल्या ब्राह्मण्यास विसरून आपल्यास शूद्र समजतो, त्याप्रमाणें तो जीव विस्म-रणानें जड झाला आहे. जसा एकादा हरिश्चंद्रासारखा फार मोठा पुरुषही मोहामुळें विवेकशून्य होऊन दीनतेस प्राप्त होतो, त्याप्रमाणें अत्यंत विस्मरण या स्वभावामुळें चित् चित्तपणास प्राप्त झाली आहे. तरंगपंक्तीच्या योगानें जसें जल संचलन पावतें त्याप्रमाणें चित् प्राणाशी तादात्म्य पावून त्याच्यासारखी होते व त्या जड व परतंत्र प्राणशक्तीकडून देह हालविला जातो. वायूकडून नौकेच्या शिडाच्या योगानें नौकेंतील दगडही जसे हालविले जातात, पाहिजे तेथें नेले जातात, त्याप्रमाणें कर्मस्वभावत्वास प्राप्त झालेल्या, मननशक्तिमान् व उपाधिपरवश झाल्यामुळें अत्यंत दीन बनलेल्या या जीवाकडून देहयंत्रें हालविलीं जातात. हे ब्राह्मणा ! परमात्म्यानें या शरीररूपी गाड्यांना ओढण्यासाठीं मनःशक्ति व प्राणशक्ति या दोन शक्तिरूपी मजबूत बैल किंवा भृत्य जोडले आहेत. ' चित् जडरूपाचा स्वीकार करून जीवत्वास प्राप्त होते. स्वाप्न व्यवहार कर्तव्य असतां मन हाच त्याचा रथ आहे व मुख्य प्राण व इंद्रियें हे त्याला जोड-लेले घोडे आहेत अशी कल्पना करावी. जाग्रत्

---

१. चिदाभासाचें चलन शरीराच्या स्पंदाचें निमित्त आहे. मनोरूपानें परिणत झालेल्या व वास्तव चित्स्वभावाला आच्छादित करणाऱ्या माया-शक्तीचें चलन चिदाभासाच्या चलनांचें निमित्त आहे, व तिच्या मनोरूप परिणामाचे अनेक पूर्व-जन्मान्तरीचें संचित पुण्यपापकर्मच निमित्त आहे, असा भावार्थ.

व स्वप्न या अवस्थांमध्यें पदार्थ व्यक्त असतात व ते असंख्य असतात आणि क्वचित म्ह० झोपेंत ते नष्ट झालेले दिसतात; किंवा सुषुप्तींत ते सर्व अज्ञान रूपास प्राप्त होतात. सारांश, जलत्वच जसें तरंगत्वास प्राप्त होतें त्याःप्रमाणें चित्त् जणू काय अशा विविधतेस प्राप्त झाली आहे. पण ती जरी अशी परिणत होत असली तरी आपलें पारमार्थिक रूप न सोडतांच तत्त्वदृष्ट्या असत् असलेल्या जाग्रद-वस्थेप्रमाणें व व्यवहारदृष्ट्याही असत् असलेल्या स्वप्नाप्रमाणें किंचित् उदय पावल्यासारखी होते. या प्रसिद्ध प्रकाशाच्या जीवावर रूपश्री जशी अभनुवास येते त्याप्रमाणें आपल्या श्रेष्ठ सत्तेच्या जीवावर चित् वृतीमध्यें स्फुरते. घरांत दिवा असला तरच तें घर जसें प्रकाशयुक्त असतें त्याप्रमाणें चित् हेंच ज्याचें तत्त्व-पारमार्थिक रूप आहे असा निरामय-सुखस्वभाव परमात्मा स्थित असल्यामुळेंच जीव जिवंत राहतो. जल ला जसें तरंगत्व प्राप्त होतें, व तरंगापासून फेंस होतो त्याप्रमाणें या जीवाच्या आधि म्ह० मानसिक व्यथा व व्याधि म्ह० शारीर व्यथा परिपुष्ट होतात. तरंगत्व प्राप्त झालें असतां जल जसें विषमत्वास प्राप्त होतें त्याप्रमाणें आधि व व्याधि यांनीं ज्याला व्यापलें आहे अशा या शरीररूपी कमलातील जणुं काय भ्रमरच असा हा जीव दैन्य दुःखास प्राप्त होतो. जसा सूर्याकडूनच प्रकाशित झालेल्या मेघांच्या योगानें सूर्य आच्छादित होणें, म्लान होणें, इत्यादि परतंत्रतेस प्राप्त होतो असें वाटतें, त्याप्रमाणें चिच्छक्ति सर्व-शक्तिरूप असल्यामुळें मी चित् नाहीं, जड आहें, अशा भावनेनें ती जणु काय जड झाली आहे. ज्याप्रमाणें मद्यादिकांच्या मदानें विवेकशून्य झालेल्या पुरुषाला तरवार, चाकू इत्यादिकांच्या योगानें आपलें अंग कापत आहे यांचेंही भान नसतें त्याप्रमाणें अज्ञानामुळें कर्मपराधीन होऊन मूढयोनींत उत्पन्न होणाऱ्या चित्-ला स्वरूपाचें भान रहात नाहीं. मदोन्मत झालेल्या पुरुषाचा मद उतरला असतां त्याला स्वकर्माचें जसें स्मरण होतें त्याप्रमाणें दीर्घ दुःखानुभवानें तर स्वरूपाचे स्मरण होऊन हिचाही मोह नाश पावतो. ( आतां देह-त्यागाचा प्रकार सांगतात-) जसा कुष्ठरोगी सडून गेलेल्या आपल्या बोटें वगैरे अवयवांना हाल-विण्याची इच्छा करीत नाहीं त्याप्रमाणें प्राणाची नखशिखान्त पसरलेली स्पंदशक्ति हृदयांत लिंगशरीराचा उपसंहारामुळें जेव्हां बंद पडते, तेव्हां तो हस्त–पादादि अवयवाचें अनुसधान करीत नाहीं. जसें यज्ञांत ऋत्वि-जांनीं लांकडाचें भाडें उचलल्यावांचून जाग्या-वरून हालत नाहीं त्याप्रमाणें संवित स्पंद-रहित झाली असतां हृदयांतील पद्मपत्र स्फुरण पावत नाहीं, त्यामुळें शरीरांत प्राणाचाही व्यापार होत नाहीं. भुशुंडाच्या आख्यानांत सांगितलेले हृद्यातील कमलपत्र निश्चल झालें असतां, पंखा हालविण्याचें बंद केलें असतां बाहेरील वायूचें वाहणें जसें स्थिर राहते, त्याप्रमाणें हे प्राण अगदीं शांत होतात. आकाशांतील वायु शांत झाला असतां धूळ जशी वर उडतांना दिसत नाहीं त्याप्रमाणें प्राणवायूचा आंतील स्पर्श शांत झाला असतां, रूपोपाधीचा विलय झाल्यामुळें पूर्ण व नामो-पाधीच्या विलयामुळें मूक असलेला जो कार-णात्मा त्याच्या भावास प्राप्त होतो. तद्रूप बनतो. त्यानंतर स्वतःचा आधार असा जो रजोगुणप्रधान प्राण त्याचा उपरम झाला असतां रजोगुणरहित व आधारशून्य झालेलें मनही प्राणाबरोबरच कारणात्मपदास प्राप्त हो-ऊन तद्रूपानेंच अवशिष्ट राहते. पण ते सर्वथा नष्ट होत नाहीं. तर वृक्षादिकांचें बीज जलादि

भूतमात्रांचा आश्रय करून जसें राहतें त्याप्रमाणें तें आत्मपदास प्राप्त होऊन पुनरपि देहाचा आविर्भाव करण्यास तयार होऊन राहतें. याप्रमाणें चित् कारणसमूहांसह सर्वतः केवलभावास प्राप्त झाली असतां, पुर्यष्टक शांत झालें असतां, देह निश्चल होऊन पडतो. (हृत्कमलाच्या स्पंदामुळें पुर्यष्टकाचा उद्भव होतो. हृदयस्पंद पूर्व पूर्व भोक्ता, भोग्य इत्यादि भावाच्या स्मरणामुळें होतो, तें स्मरण वासनास्पंदामुळें होतें. वासनास्पंद चित्-नें स्वरूपाच्या अज्ञानामुळे विषयाकाराने—चित्तरूपाने परिणत होणें या कारणानें होतो. यास्तव चित्-च्या बहिर्मुखतेचा मोठ्या यत्नानें निरोध केला पाहिजे, अशा आशयानें ईश्वर म्हणतात-) चित्-नें स्वाभाविक मोहामुळें चेत्योन्मुख-बहिर्मुख होणें, या कारणानें वासना स्पंद पावतात. त्यांनीं प्रेरणा केल्यामुळें अनात्म वस्तूचें स्मरण होतें व स्वरूपाचें विस्मरण होतें. हृदयस्थ कमलपत्राच्या स्फुरणामुळें पुर्यष्टक व्यक्त होतें, यास्तव हृत्कमलयंत्राच्या स्फुरणाला निरोध केला असतां पुर्यष्टक क्षय पावतें. देहांत जोंवर पुर्यष्टक असतें तोंवर देह जिवंत राहतो. हे द्विजा! पुर्यष्टक शांत झालें असतां देह मृत झाला असें म्हणतात. परस्पर विरुद्ध असलेल्या वात-पित्त-कफसंज्ञक मलांचा आणि राग-द्वेष-वासनामलांचा, प्रकोप झाल्यामुळें व शस्त्रादिकांच्या योगानें शरीराला छेद-भेद इत्यादि दशा प्राप्त झाल्यामुळें जेव्हां देहांत हृदयकमलरूपी यंत्र हालेनासें होतें तेव्हां, पंखा वगैरे वायुचें निमित्त बंद केलें असतां वारा जसा शांत होतो त्याप्रमाणें पुर्यष्टक हळूहळू आकाशांत शांत होतें. जीव आपल्याच संकल्पामुळें मरणादि सहस्रावधि दुःखांस प्राप्त होतो. हृदयांतील पद्मायंत्र सर्वदा वाहात असतें, पण ज्यांच्या हृदयांतून रागादि मलरहित वासना जात नाहीं म्हणजे ज्याचें हृदय भोगवासना शून्य असतें, ते जीव स्थिर एकरूप असतात. ते जीवनमुक्त व चिरंजीव होत. पद्मयंत्राचा चांगला निरोध होऊन प्राण शांत झाला असतां हा धैर्यरहित देह काष्ठ किंवा ढेंकूळ यांसारखा होऊन भूमीवर पडतो. हे मुने! ज्याप्रमाणें हृदयाकाशांतील वायून म्ह० प्राणांत पर्यष्टक लीन होतें. त्याप्रमाणेंच त्या प्राणांत तेव्हांच मन लय पावतें. नंतर अनादि कालापासून निरनिराळ्या भोगांस योग्य अशा शरीरादि भावांचा ज्यानें अभ्यास केला आहे असें वासभाखचित मन त्या ठिकाणीं भ्रमण करील तेथें स्वर्ग-नरकादिकांचा अनुभव घेतें. घरांतील लोक निघून दूर गेले असतां जसें घर शून्य होतें त्याप्रमाणें मन व प्राणवायु यांनीं रहित झालेला देह शवत्वास प्राप्त होतो. ( आतां येथून दुसरा देहसंबंनो तो क्रम सांगतात. ) सर्वगामिनी चितूच 'मी या जीवरूपानें या शरीरांत प्रवेश करून नाम व रूप यांस अभिव्यक्त करतें' अशा प्रवेशसंकल्पानें जीव बनून मनांत राहते. तीच पुर्यष्टकरूपी होऊन पांच सूक्ष्म भूतांच्या संघातात्मक चित्ताचा आश्रय करून आतिवाहिक देह या नांवाची होऊन राहते व संकल्पानें स्वप्नभ्रमाप्रमाणें स्थूल आकार घेते. नंतर दृढभावनेनें त्या स्थूल आकारावर 'ही मी' असा अभिमान ठेवून लागलीच आपल्या सर्व आतिवाहिक देहत्वास विसरते. या असत्य शरीरांत जिनें कृत्रिय भावना केली आहे अशी ती चित् असत्य जगाला सत्य बनविते व आपल्या सत्य ब्रम्हभावाला अशक्य करते. सर्वगामिनी चित् अंशानें—चिदाभासानें जीव

१ मुळांत 'यत्र तत्र भ्रमन' असे शब्द आहेत. त्यावरून स्वर्ग, नरक इत्यादि नियत देश आहेत, या समजुतीचें निराकरण होते.

होऊन मन होतें, व मन पुर्यष्टकरथावर आरूढ होऊन त्यानंतर जगाचें आक्रमण करतें. जेव्हां सूत्रभूत प्राणप्रचुर पुर्यष्टक देहाला उत्थापित करतें तेव्हां शवाच्या हृदयांत प्रवेश करून नाच करणाऱ्या पिशाचाप्रमाणें तो देह जिवत आहे, असें म्हटलें जातें; व जेव्हां पुर्यष्टक क्षीण होऊन चित्त हृदयाकाशांतील ब्रह्मांत लीन होतें तेव्हां काष्ठादिकांप्रमाणें पडलेल्या या देहाला 'तो मेला आहे,' असें म्हणतात. झाडाचें पान जसें कांहीं कालानंतर जीर्ण होतें त्याप्रमाणें हा जीव आपल्या अजर-अमर ब्रह्मरूपास विसरून कालवशात् परतंत्र होऊन जरठदेहांत अशक्त होतो. मुने! पण वर सांगितल्याप्रमाणें चितला जीवशक्तींचें विस्मरण होऊन पद्मयंत्र निरुद्ध झालें असतां व प्राणाचाही पूर्णपणें निरोध झाला असतां मानव मरतो, जशीं वृक्षाचीं पानें कालवशात् पुनः पुनः निरनिराळीं उत्पन्न होऊत पनः पनः पिकून गळून पडतात त्याप्रमाणें मनुष्यांचीं शरीरें पुनः पुनः उत्पन्न होऊन मरतात. जशीं झाडांचीं पानें तशीं जीवांचीं शरीरें वारंवार उत्पन्न होतात व मरतात त्यांत दुःख कशाचें? चित्सागरामध्यें या देहरूपी बुडबुड्यांच्या रांगा प्रत्येक वेळीं पहिल्यापेक्षां दुसऱ्या निराळ्या, दुसऱ्यापेक्षां तिसऱ्या निराळ्या अशा उत्पन्न होतात, त्यांत बुद्धिमानाची आस्था नसते. सर्वव्यापक असलेली चित् या चित्तांत प्रतिबिंबित होते. आरशावांचून दुसरा कोणीही आपल्यामध्यें पदार्थांचें प्रतिबिंब ग्रहण करीत नाहीं. पूर्ण चिद्रप निर्मळ आकाशांत आपल्या शुभाशुभ प्रयत्नांचीं फळेंच, अशा स्वरूपाच्या कल्पना भासतात. त्या सुखभोगाच्या वेळचें हास्य व दुःखभोगाच्या वेळचें रडणें, यांच्या कोल्हाळांनीं शब्दयुक्त असतात. त्या चित्प्रचुर व अविद्याप्रचुर, वर वर रमणीय भासणाऱ्या जीवजगद्रूप कल्पना वस्तुतः विविध शरीरांमीं जन्ममरणादि भ्रांतीचा अनुभव घेऊन स्वतःला मोह व दुःख देण्यासाठींच भासतात.

------

# सर्ग ३३.

—:०:—

१. जीव–जगद्भेद मोह व कल्पना यांनींच कसे झाले आहेत, तें तर्कांनीं दाखवितात.

श्रीवसिष्ठः—हे शशिशेखर! सर्वव्यापी व अनंत परंतु एकरूप चित्तत्वाला द्वित्व कसें प्राप्त झालें आहे? त्याला द्वित्व स्वतःच आपोआप प्राप्त झालें आहे कीं तें सनिमित्त आहे? जर तें स्वतःच–कांहीं निमित्तावांचून उत्पन्न झालें असेल तर त्याचा संकोच होण्यास कांहीं कारण नसल्यामुळे तें असंख्य पर्यायांनीं व्याप्त होणार व अनादिकालापासून प्रवृत्त असणार ते तत्त्वबोधानें बाधित कसें होईल? एक, आगंतुक व त्यामुळेंच दुर्बल आत्मज्ञान त्याचें निवारण करून दुःखाचा आत्यंतिक नाश करण्यास समर्थ कसें होईल?

श्री ईश्वरः—तें ब्रह्म सर्वशक्ति, सत् व एकच आहे तेव्हां द्वित्व व एकत्व या कल्पनांचा उदय निर्मूलच आहे. जर द्वित्व असलें तर एकत्वाची कल्पना होत व एकत्व असेल तर द्विरूपता. पण चिद्रूपमध्यें त्या दोन्ही कला आहेत असें म्हणावें तर चिद्रूपत्वामुळेंच त्या दोन्ही कल्पना असत् आहेत. कारण त्यांना सत्य मानल्यास चिदेकसत्वाचा व्याघात होतो. मुळीं एकाचाच अभाव असल्यामुळें एकत्व व द्वित्व या दोघांचाही अभाव होतो. कारण एका वाचून द्वितीय नाहीं व द्वित्वावांचून एकता नाहीं. कारण व कार्य या दोघांचेंही सार एकच असल्यामुळें त्यांना एक रूपताच आहे. बीजापासून फलापर्यंत वृक्ष ही एकच वस्तु असूनही विकारामुळें जशी त्याविषयीं भिन्न भिन्न कल्पना

होते त्याप्रमाणें चित्-तत्त्व चेत्यविकारांच्या रूपानें स्वतः चिन्मयच स्फुरण पावतें. सर्व विकारांमध्यें चित् हाच परमार्थ व चित् सर्वांचें सार असल्यामुळें विकारांचा वास्तविक भेद नाहीं. कारण हा सर्व घटादि विकार त्या सद्वस्तूपासूनच उत्पन्न होऊन, जल आणणें इत्यादि अनेक कार्यांच्या योगानें सार्थकतेस प्राप्त होऊन सुखादि भोगांमध्यें पर्यवसान पावतो. भोग ह्म० चिद्-मध्यें पर्यवसान पावणेंच होय. यास्तव चित् हेंच त्यांतील सार आहे. यास्तव सर्व जगत कल्पनामात्र आहे, असें सिद्ध झालें असतां खऱ्या पाण्यांतील तरंग व पर्वतशिखरावरील माळ जमिनीवर भासणाऱ्या मृगजळांतील तरंग यांत कांहींच भेद रहात नाहीं. फार काय, पण तो पर्वतही सशाच्या शिंगासारखाच आहे. ज्या तत्त्ववेत्याला सशापासून उत्पन्न झालेला व्रीहि-यवादिकांचा अंकुर ब्रह्मरूपानें सत्य भासतो त्याला सशाच्या शृंगासारखा अत्यंत असत् पदार्थ व व्यवहारिक सत्य पदार्थ यांत कांहीं फरक दिसत नाहीं. जगांतील सर्व भिन्न भिन्न पदार्थांना आत्मबोध एकत्र सांधतो. यास्तव त्याविषयीं नुसत्या वाचिक युक्त्या व्यर्थ आहेत. कारण जोंवर अज्ञान नाहींसें झालें नाहीं तोंवर नुसत्या शाब्दिक युक्त्यांनीं साक्षात् अनुभवानें सिद्ध होणाऱ्या द्वैताचा उच्छेद होणें शक्य नाहीं. तरंग, त्याचे कण, लाटा, मोठे जलौघ इत्यादि जलाचे विकार जसे जलाहून भिन्न नाहींत, त्याप्रमाणें माणें ब्रह्माचें सर्वशक्तित्व तत्त्वदृष्टया ब्रह्माहून भिन्न असूं शकत नाहीं. पुष्पें, पल्लव, पानें इत्यादि जसें लतेहून निराळें नाहीं तसें द्वित्व, एकत्व, जगत्त्व, त्वंत्व, अहंत्व इत्यादि चितीहून पृथक् नाहीं. देश-काल-विकारादि जो चित्चा भेद केला आहे, तो जर चित्च आहे, तर द्वित्व नाहींच. तेव्हां हें द्वित्व कसें उत्पन्न झालें, असें जें तूं विचारीत आहेस तें असत् आहे, त्या असत्-विषयाविषयीं तूं जो प्रश्न केला आहेस तो उचित नाहीं. देश-काल-क्रिया-सत्ता-नियति इत्यादि सर्व शक्ति चिदात्मकच आहेत. कारण चित्च्या सत्त्वामुळेंच त्या सर्व शक्ति सत्तायुक्त आहेत. चित्, चेत्य व त्याचा व्यवहार यांचा समाहार हाच रूपप्रपंच असून तें सर्व चित्तत्त्वच आहे. त्याचप्रमाणें ब्रह्मादिस्तंबपर्यंत जो नामप्रपंच तोही चिद्रूपच आहे. जसें जलतरंगादिकांत अनुगत असलेलें रससामान्य तरंगादि नांवास योग्य होऊन राहिलेलें असतें त्याप्रमाणें सर्व नामप्रपंच चिद्रूप आहे. ज्याच्यामध्यें तरंगांचा संभवच नाहीं अशा चिद्विलासरूप महासागरावर तरंग उठल्यास रखा जो भास होतो तोच चेत्यसंबंध आहे. तेंच हें परमतत्त्व सत्य, ईश्वर, शिव, शून्य, एक, परमात्मा इत्यादि नांवांनीं सर्वतः गायलें जातें. याप्रमाणें रूप व नाम यांनीं अतीत असलेलें जें परमात्म्याचें रूप व तसेंच हें जें शुद्ध अमल अहंरूप तें वाक् व मन यांचा विषय होत नाहीं. हें जें जगत् दिसत आहे तें त्या चिद्रूप महालतेचें फल, पुष्प, पल्लव इत्यादि आहे. तें सर्व तन्मय असल्यामुळें त्याहून भिन्न नाहीं. तीच महाचित् अविद्या याच विचित्ररंगांनीं रंगविलेल्या चष्म्यानें युक्त जेव्हां होते तेव्हां जीवसंज्ञक होते आणि दोन चंद्राप्रमाणें स्वरूपाच्या बाहेर जीवभाव व जगद्भाव पाहते. मी परिछिन्न व जड आहें, अशा अस्वाभाविक स्थिती नाहींसें करावयाचें झाल्यास त्याला कारागिरीची कांहीं गरज लागत नाहीं, केवल दृढ संकल्पानें हें जें दुःख प्राप्त झालें आहे तें त्याविषयीं संकल्प न केल्यानेंच नाश पावतें. त्यांत क्लेश कशाचा ? कांहीं तरी संकल्प करून मनुष्य दुःखांत निमग्न होतो; आणि कशाच्या तरी

भावनेनें ती चित् स्वतः स्वविकल्परूपच अन्यतेचा अनुभव घेते. स्वतः कळंकरहित स्थित असतानाच ती संकल्पानें कलंकयुक्त पुर्यष्टकरूपशी होते आणि त्या रूपाने संसारनदीस प्राप्त होऊन औपाधिक चेतनानेंच स्फुरण पावते, आपल्या निष्कलंक चेतनानें स्फुरण पावत नाहीं. स्वतः चिद्रूप असलेली ती या पुर्यष्टकाशीं तादात्म्याध्यासरूप जीवनेस प्राप्त होते; आणि तो जीव चिन्मय--चित्प्रचुरच होऊन प्राणनादि क्रिया करतो, ( आतां स्थल देहाच्या प्राप्तीच क्रम- ) त्यानतर वर सांगितल्याप्रमाणें जीवत्वास प्राप्त झालेला आतिवाहिक देह-पुर्यष्टकमय सूक्ष्मशरीर--पांचभौतिक स्थूल देहसंसारात्मक होऊन देहाचा लाभ होण्यासाठीं व्रीहि-यव-तिल-माष इत्यादि द्रव्य मी झालों आहें असें मानतो प्राण्यानें खाल्लेलें तें द्रव्य तत्काल वीर्य बनते; ( वृक्षादिकांत बीजरूप बनते ) त्यानंतर त्याचा स्त्रीच्या ठिकाणीं गर्भाधान करणें, भूमींत पेरणें इत्यादिकांच्या द्वारा मी प्राणवान्--स्थूलदेह झालों आहे, असें तो सूक्ष्म देह मानतो. अनुभवात्मक ब्रह्मच पूर्वोक्त अहंतादि क्रमानें स्थूलदेहाचा अनुभव येतां या भ्रमानें चक्षुरादि बाह्य इंद्रियांच्या द्वारा बाह्य स्थावर व जगम जगत् पाहतें; आणि पुनः त्याच्या वासनेनें स्वतःही तसें तसेंच होतें. ( अहो पण पूर्वीचा मशकाचा देह सोडतांना त्या देहाच्या वासनारूपानें सूक्ष्मत्वानें राहिलेल्या पुर्यष्टकाच्या दृढ परिचित मशकाकाराची व सूक्ष्म देहाची निवृत्ति कशी होते व ज्याचा पूर्व शरीरांत अभ्यासच केला नाहीं त्या हत्तीच्या आकाराची व स्थूलतेची प्राप्ति कशी होते ? उत्तर--) कावळा टाळीवर येऊन बसायला, ती मोडायला व त्यामुळें तत्काल कावळा मरायला अदृष्ट कर्मच जसें कारण होतें, तसें दृढ अभ्यस्त वासनेचा क्षय होण्यास व फार प्राचीन वासनेचा अकस्मात् उदय होण्यास फक्त पूर्वकर्मच कारण आहे. त्यामुळें मशकादिजन्मांतील दृढ परिचित सूक्ष्मत्वाचाही क्षय होऊन अतिस्थूल शरीरादिकाचें मरणसमयीं स्मरण होतें, त्यामुळें तो सूक्ष्म देहाचा त्याग करतो. द्वित्वाची भावना केल्यामुळें जो एक आहे त्यलाही द्वित्व प्राप्त होतें पुरुषानें वेताळाची भावना केली म्हणजे त्याला भयंकर वेताळ दिसूं लागतो. मला द्वित्व नाहीं, अशा भावनेनें कल्पिलेलें द्वित्वही निवृत्त होतें. मी हें करीत नाहीं, अशा संकल्पानें पुरुषाचें कर्तृत्वही जसें निवृत्त होतें, त्याप्रमाणें मी द्विरूप नाहीं, एकरूप आहें, अशा भावनेनें आत्म्याचें द्वित्वही निवृत्त होतें. तात्पर्य, द्वित्वसंकल्पानें एक जो आत्मा त्यालाही द्वित्व प्राप्त होतें व अद्वैतभावनेनें अनेकाकार जगालाही एकरूपत्व प्राप्त होतें, आत्मा परमात्मरूप आहे, त्यामुळें त्यांत द्वित्व विद्यमानच नाहीं कारण तो अविकार्यादि धर्मांनीं युक्त आहे; व सर्वदा सर्वव्यापक आहे, जें आपल्या संकल्पानेंच रचलेलें असतें त्याच्याविषयींचा संकल्प सोडला कीं तें क्षीण नाहींसें होतें, हे मुने ! जसें मनोराज्य किंवा गंधर्वनगर संकल्पानेंच रचलेलें असतें. त्यामुळें संकल्प टाकतांच तें नाहींसें होतें, हें प्रसिद्ध आहे, जसा संकल्प करण्यांत क्लेश आहे तसा संकल्प सोडण्यांत क्लेश नाहीं, कारण, केवल औदासीन्य स्वीकारल्यानेंच त्याचा नाश होतो. गंधर्वनगराला उत्पन्न करण्याला संकल्पयक्ष हाच कारागीर आहे, तें नगर जोडण्याला कोणी लागत नाहीं. संकल्प पुष्ट होतांच दुःख जर आलें आहे,

---

१. 'ते इह व्रीहि-यवास्तिलमत्वा जायन्ते' अशी श्रुति याविषयीं प्रमाण आहे. याविषयीं छान्दोग्य भाष्यार्थ पृ. २७३ पहा. येथें व्रीह्यादिशब्दांवरून भाविदेहाला उचित असें द्रव्य तो होतो, असें जाणावें. म्हणजे स्थावर-स्वेदजादि देहाच्या बीजाचाही त्यांतच संग्रह होईल.

तर तो थांबतांच दुःख जाईल, यात काय संशय ? थोडा संकल्प करतांच मनुष्य दुःखांत बुडतो, व संकल्प न केल्यानें तुझी चेतना, संकल्पसर्पापासून जर सर्वथा मुक्त झालेली नसेल तर तू सर्व गुणांनीं श्रेष्ठ अशा नंदनवनांत जरी असलास तरी आनंदानें प्रसन्न होणार नाहींस. शरत्कालीं आकाशाचें उदर जसें निर्मळ असतें त्याप्रमाणें तूं आत्मविवेकरूपी वायूनें संकल्पमेघांना उडवून देऊन अत्यंत निर्मलतेस प्राप्त हो. वसिष्ठा ! तूं आपल्या अतिशय वेगयुक्त संकल्पनदीस मणिमंत्रानें सुकवून टाक आणि त्यांत वाहत जाणाऱ्या स्वतःला धीर देऊन मनोरहित हो. संकल्परूपी वायूमुळें अत्यंत चचल होऊन वावटळींतील पानें व गवत यांच्या तुकड्यांप्रमाणें भ्रमण करणाऱ्या चिदात्म्याचा सर्व भूतांच्या हृदयाकाशांत आश्रय देऊन त्याला पहा. स्वतःच स्वसंकल्प करणें हेंच तें कालुष्य घालवून व परमप्रसादास प्राप्त होऊन तूं परमानन्दवान् हो. आत्मा सर्वशक्तिमय आहे. तो ज्याची जशी दृढ भावना करतो तें तसें स्वसंकल्पाचें विकसनच पाहतो हे ब्राह्मणा ! हे मिथ्या जग केवल संकल्पानेंच उठलेलें आहे, त्यामुळें तें नुसत्या असंकल्पानेंच—त्याचा संकल्प न केल्यानें कोठें तरी जाऊन लपतें. संकल्परूपी पूर्व वायूकडून हालविलें जाणारें हें जन्मरूप मेघांचें जाळें असंकल्परूप पाश्चात्य वायूच्या स्पर्शामुळें परमपदीं विश्रांति पावतें. अतिशय वाढलेल्या या तृष्णारूपी विषवल्लीचें संकल्परूपी मूळ उपटून टाक म्हणजे ती आपोआपच सुकेल. अविद्या—काम—संकल्प यांच्या नाशानंतरही जर जगत् भासलेंच तर तें केवळ गंधर्वनगराप्रमाणें प्रतिभासमात्र भासत असतें. म्ह० जोंवर तो जीवन्मुक्त त्या जगाला मानतो तोंवरच तें प्रतीत होतें, त्यानें त्याला पाहण्याचें टाकलें कीं तें क्षय पावतें. एखादा राजा मी प्रभु आहें, ही गोष्ट विसरून जोंवर त्याला पुनः ‘ मी राजा आहे ’ असें स्मरण होत नाहीं तोंवरच शोक करतो. तत्त्ववेत्ताही जोंवर मी ब्रह्म आहें, असें जाणत नाहीं, तोंवर जगत्प्रतिभासामुळें दुःखी होतो. पण आप्ताच्या उपदेशानें राजाला ‘मी राजा आहें’ व तत्त्ववेत्याला ‘ मी ब्रह्म आहें ’ अशी स्मृति झाली म्हणजे जसा शरत्कालानें घालविलेला प्रावृट्-काल पर्जन्य करण्यास समर्थ होत नाहीं त्याप्रमाणें. मग त्या स्मृतीला पूर्वीची जाड्यदुःखस्मृति पुनः आच्छादित करूं शकत नाहीं. कारण जसा तार व मंद्र स्वरांतील जो अतिशय उंच स्वर असतो तोच इतर स्वरांना पराभूत करून श्रोत्यांच्या कानांपर्यंत जाऊन पोंचतो त्याप्रमाणें दोन प्रकारच्या चित्तवृत्तींतील जी वृत्ति चिरकाल मनन, निदिध्यासन इत्यादि अभ्यासरूप प्रयत्नानें दृढ प्रवाहरूप बनलेली असते तीच वाढते व अशी जी घनप्रवाहरूप नसते ती पराभूत होते. यास्तव मी एकअद्वितीय शिव देव आहे, मीच हा नित्य अपरोक्ष आनंद-एकरस आत्मा आहें, अशी भावना कर; या भावनेनें युक्त झाल्यावर तूं खरोखरच तोच होशील, याप्रमाणें तुझ्यासारख्यांना हें बाह्य पूजन असंभवनीयच आहे, कारण जे अविरक्त—तुच्छ फलविषयीं इच्छा ठेवणारे असतात त्यांच्या ठिकाणींच ते ठीक असतें; पण तुला परमार्थ सत्य, उत्तम पद, परब्रह्म हाच एक योग्य देव आहे. त्याच्या पूजनामध्यें पूजक पूजाद्रिद्रव्यांचा स्वामी, षोडशोपचारांनीं चांगलें पूजन व प्रतिमा—लिंग इत्यादि पूज्य कांहीं नाहीं; तें सर्व त्या पूजनात तुच्छ आहे. कारण तीं सर्व पूजक-पूजन-पूज्यादि सामग्री केवल मनःकल्पनामात्र आहे.

# सर्ग ३४

—:*:—

१. सौषुप्त, तुर्य व तुर्यातीत पदाचा उपदेश करून शेवटीं ईश्वर विश्रांति पावला.

श्री-ईश्वरः—येणेंप्रमाणें या देवपूजेनें पूजलें जाणारें विश्व बाधदृष्ट्या असत्, अधिष्ठानदृष्ट्या सत् व देवरूपी असणें युक्त आहे, द्वैत्य तत्त्वतः ऐक्यपदरहित व व्यवहारांत द्वैत ऐक्यरूप असणें युक्त आहे, मोहामुळें चितीला जडभाव आहे, अशी कल्पना केली असतां तेंच संसारत्वास प्राप्त होतें व तें असंसारी, मोहशून्य आहे, असें पाहिल्यानें अभिन्न व अद्वितीयरूप होतें, ही मी दृश्य देहादिरूप आहे, असा कलंक जिला प्राप्त झाला आहे ती चित् अत्यंत बद्ध होते; व देहादि दृश्याला जाणण्यास समर्थ असलेल्या याच चित्कलेला जाणून मुक्त होते. पदार्थांच्या आकाराची भावना केल्यामुळें द्वित्वास प्राप्त होऊन आपल्या अखंड सत्त्वाला विसरते आणि देहाच्या सुखदुःखांशीं तादात्म्य पावलेली जी असत्यच स्थिति तिलाच 'सत्' म्हणून क्षणांत धारण करते. हीच ती सकलंक स्थिति होय आणि शुद्ध, निरंश, सत्य किंवा असत्य इत्यादि विकल्पांनीं व शब्दांनीं मुक्त व व्यवहारात सर्व नामरूपात्मक असूनही शून्यस्वभाव अशी जी स्थिति ती अकलंक होय. पूर्ण, निरुपम, शांत, ब्रह्मच आकाशाप्रमाणें प्रथम विकास पावणाऱ्या आपल्या मायाशक्तीनें जाग्रत्स्वप्न—सुषुप्तिरूप, सृष्टि-स्थिति-संहाररूप, किंवा अध्यात्म, अधिभूत, अधिदैवरूप तीन मार्गांनीं प्रवृत्त झालेलें जगत् असून तें मनानेंच विकसित झालें आहे. त्यामुळें मनानें मनाचाच छेद केला असतां सत्य आत्म्याचा साक्षात्कार होतो इंद्रियादि अवयव देहाचे ठरून त्यांची आत्मभावना नाहींशी होते. नंतर हें जगज्जाल आत्म्यामध्यें गुप्त होऊन विलय पावतें; त्यामुळें अगोदरच शिथिल झालेली कल्पनात्मिका संसारकल्पना छिन्न-भिन्न होते. त्यानंतर जीवाची 'इति' नामक सत्ता तेवढीच भाजलेल्या बीजाप्रमाणें अवशिष्ट राहते. शरत्कालच्या आकाशकोशाप्रमाणें मनोमोहरूपी मेघांनीं रहित झालेली ती स्थिति चिराच्या विषयांचें पुनः पुनः प्रीतीनें स्मरण करण्याचें शील सोडून 'पश्यन्ती' या नावाची होते. सर्व दृश्याच्या बाध झाल्यानें अपरोक्षज्ञानमात्र अवशिष्ट राहिल्यामुळें तिला 'पश्यन्ती' हें दुसरें नांव प्राप्त होतें. ज्ञानाच्या पूर्वी ती विषयानुभवरूप चपलतेस जरी प्राप्त झाली होती तरी आतां ज्ञानानंतर ती शुद्ध चिन्मात्रस्वरूपांत राहणारी, सर्व पदार्थांच्या सत्तारूपानें अवशिष्ट राहिलेली व जीव या अवस्थेंतच जिनें भवार्णव तरला आहे, अशी होतें. पुनः जन्म न होणें, अशा सौषुप्त पदाला प्राप्त होऊन निरतिशय आनंदानें परिपुष्ट झालेली आणि परमात्म्यास प्राप्त होऊन अत्यंत व्यापक पदामध्यें विश्रांति पावलेली ती 'महासुप्त, पदनामिका होते. वसिष्ठा ! मन क्षीण झाल्यावर प्रथम प्राप्त होणारी जी स्थिति ती ही मीं तुला सांगितली, आतां या चिच्छक्तीचें दुसरें अत्यंत पावन पद ऐक. मनापासून सर्वथा मुक्त झालेली हीच चिच्छक्ति शांतीनें शोभू लागते. सर्व प्रकारच्या तमानें व सूर्यचंद्रादि सर्व ज्योतींनीं ती रहित असते. ती विस्तीर्ण आकाशासारखी सुंदर आहे. पूर्वीच्या स्थितीपेक्षां या परिपक्व स्थितींत गाढ सौषुप्तलेखाप्रमाणें, शिलेच्या उदरांतील निबिड रचनेप्रमाणें सैन्धवाच्या खड्यांतील रसाप्रमाणें, वायूच्या आंत राहणाऱ्या स्पंदशक्तीप्रमाणें, तो जेव्हां दीर्घ कालानें अत्यंत परिणत दशेस प्राप्त होते तेव्हां आकाशांत विद्यमान असणारी शून्यशक्ति निदेकपन ब्रह्माकाशत्वास प्राप्त झाल्याप्रमाणें विव-

योन्मुखतेला सोडते. जल असें आपलें चांचल्य सोडतें, वातलेखा चलन सोडते, पुष्पलेखा सुगंध सोडते, त्याप्रमाणें क्रिया ही कालाची कला व वस्तु ही आकाशाची कला सोडून दृश्यमात्राची ती कल्पना करीत नाहीं. त्यामुळें तिला जड म्हणतां येत नाहीं, चित् म्हणता येत नाहीं. सर्वव्यापिनी चित् त्यावेळीं अवर्णनीय सत्तेला धारण करते, ती दिशा, काल इत्यादिकांनीं अनवच्छिन्न अशा महासत्तापदास पोंचलेली असते. जाग्रत्स्वप्न-सुषुप्तींहून चतुर्थ व विराट्-हिरण्यगर्भ-ईशांहून ही चतुर्थ असा जो तुरीय अंश त्यानें ती प्रगट होते. ती कलंकरहित व सुखरूप आहे. त्यामुळेंच ती सर्व निमित्तें, सर्व काल, व सर्व वस्तु यांविषयींच्या प्रकाशाहून व आनंदाहून श्रेष्ठ व त्यामुळेंच अत्यंत स्पहणीय आहे. हे सुव्रता! मी तुला ही दुसरी स्थिति सांगितली, आतां तिसरी ऐक. ब्रह्माकार अखंड वृत्ति व तिनें व्याप्त असलेलें ब्रह्म यांचें दूध व पाणी याच्या मिश्रणाप्रमाणें मिश्रण, झाल्यामुळें शब्द व अर्थ यांनीं रहित अशा पदास प्राप्त झालेली व ब्रह्म, आत्मा इत्यादि शब्दार्थांहून अतीत असलेली, कानें विकृत होत नाहीं. अशी केवळ स्थिति उदय पावते, षड्भावविकारांनीं रहित असल्यामुळें ती स्थिर स्वरूपतःच कलंकरहित आहे. ती तुर्यातीतादि नावामुळें अतिशय श्रेष्ठ पदास प्राप्त झालेली आहे. ती सर्वोत्तम पुरुषार्थ आहे, श्रेष्ठांची पराकाष्ठा आहे, व ती परम मंगलरूप असल्यामुळें सर्व मंगलांहून श्रेष्ठ आहे, अशी ती मुख्य विच्छेदरहित चित्-मधील स्थिति अत्यंत पवित्र आहे. तीच जीवन्मुक्ताची तिसरी अवस्था होय. वसिष्ठ! ही स्थिति चिरकाल प्रतिष्ठित झाली असतां शैवशास्त्रांत प्रसिद्ध असलेले सहा मार्ग, श्रुतींतील दक्षिणोत्तर मार्ग इत्यादि सर्व मार्गांनीं प्राप्त होणारें श्रेष्ठ फळ जी प्रतिष्ठा, त्याहून फार दूर असलेल्या ठिकाणीं जीवन्मुक्त राहतो. त्या अवस्थेचें वर्णन करण्याचें सामर्थ्य माझ्याही वाणींत नाहीं. जाग्रदादि तीन मार्ग कल्पनेच्या पलीकडील तुर्यावस्था, या सर्वांहून अगदीं पलीकडे असलेला जो सनातन तो तुला सांगितला. तूं नेहमीं त्याच पदांत स्थिर हो. मुने! सर्व विश्वाचें उपादान हेंच पद आहे, असें पाहिल्यास हें सर्व तन्मय दिसतें. उपादानातीत अद्वितीय सत्य वस्तूला जाणल्यानें हें आहे व नाहींही, कारण ज्ञानानंतर हें प्रवृत्त होत नाहीं व निवृत्तही होत नाहीं, तर आकाशाच्या कोशाप्रमाणें तें शांत, सर्व सम पदार्थांहूनही अत्यंत सम असल्याचा अनुभव येतो, कारण तें अद्वैत आहे, त्यांत क्षोभ केव्हांही होत नाहीं; कारण त्याला पूर्ण चैतन्य आहे. त्याच्यामध्यें विकारादिमत्त्व नाहीं. चिरकाल नित्य व अनित्यरूपानें तेंच भासतें. मुलांनीं कल्पिलेल्या आकाशांतल्या दगडाच्या राशी इतकच सत् व असत् जगालाई. चिद्घनत्व आहे, त्यांत थोडासाही भेद नाहीं. पूर्ण, अत्यंत शांत कल्याणरूप, वाग्विलासाहून अतीत अशा ओं ही या आक्षराची चतुर्थमात्रा आहे तीच परमा गति आहे.

श्रीवाल्मीकिः—याप्रमाणें सांगून वसिष्ठमुनि व स्कन्द-नन्दि इत्यादि इतर गण यासहवर्तमान ओंकाराख्य नांवाचा शेवटचा स्वही ज्यांत शांत झाला आहे अशा सर्व संसाराच्या पार असलेल्या या तुरीयतुरीय पदांत निर्मूल भूमानंद चिद्रूपानें ईश्वर परिणाम पावल्यामुळें वृत्ति शांत होतसाता वसिष्ठांच्या आश्रमांत एक मुहूर्त निश्चेष्ट स्थित झाला.

———

# सर्ग ३५

—:*:—

१. ब्रह्म-विष्णु-हरादिकांचा जो परम पिता परात्मा तोच सर्वांत अधिक पूज्य आहे.

श्रीवसिष्ठः—त्यानंतर दोन घटिकांनीं गौरीरूपी कमलिनीचा आधार असा हर माझ्या भाग्योदयामुळें मला प्रबोध करण्यासाठीं स्वेच्छेनें नेत्रोन्मीलन करता झाला. ज्याप्रमाणें मेघांच्या संपुटांतून किंवा द्यावा-पृथिवीच्या संपुटांतून वर निघालेला किरणांचा राशि-सूर्य दिवसाला प्रकाशित करतो त्याप्रमाणें हराच्या मुखरूपी आकाशांत उदय पावलेला चंद्र-सूर्य अग्निरूप नेत्रांचा समुदाय त्यांचें समाधिपासून व्युत्थान व्यक्त करता झाला.

श्रीईश्वरः—हे मुने! तूं अगोदर मनन म्ह० विचार करून प्रत्यगात्म्याच्या सत्तेचाच प्रथम निश्चय कर, आणि वारा अचल आकाशालाच स्पंदत्वास प्राप्त करून ताप-रज-जाड्य इत्यादि दोषांस जसा पात्र करतो त्याप्रमाणें तूं त्या प्रत्यगात्म्याच्या ठिकाणीं सर्व अनर्थांचें मूळ असा जो अनात्मांश तो बहिर्मुख होऊन आणूं नकोस. ( अहो पण अनात्मांशामध्येंही द्रष्टव्य, हेय, उपादेय पुष्कळ आहे, तेव्हां त्याचा अनादर करून कसें चालेल? उत्तर—) आत्मदर्शन झालें म्हणजे मग द्रष्टव्य, श्रोतव्य इत्यादि कांहीं उरत नाहीं, कारण तत्त्वतः तें सर्व दृष्ट व श्रुतच झालेलें असतें. यास्तव आत्मज्ञानानंतर दृष्ट व अदृष्ट अशा भ्रमांशीं काय करावयाचें आहे? या भ्रांतिविषयांत तत्त्ववेत्त्याला हेय व उपादेय असें मी कांहीं पहात नाहीं. शांति देणारे व अशांति देणारे जे इष्टानिष्ट विकल्प त्यांना तोडणारा दृढ असि—तलवार तूं जर झालास तरच धीर आहेस, नाहीं तर तूं धीर नाहींस, यास्तव तूं आस्था धरून धीर व आत्मदृष्टि हो. ( अर्थात् वृत्तीला दृश्याकार होऊं न देतां चिदात्मस्वभावानें अवस्थित होणें हा मुख्य कल्प आहे.) किंवा तसें करण्यास जर तूं असमर्थ असशील तर त्याच्या प्राप्तीसाठीं कांहीं काल श्रवणादिकाला अनुकूल असा या बाह्य दृश्यदृष्टीचा आश्रय करून बाहेर असलेला जो आत्मा त्याच्या बोधासाठीं मी जें सांगत आहें तें ऐक. आत्म्याच्या लाभासाठीं प्रयत्न न करतां मुकाट्यानें बसण्यांत काय अर्थ आहे?

असें बोलून बाह्याकारदर्शनामध्यें देहात्मतादर्शन हाच महान् अनर्थ आहे, व तेंच सर्व अनर्थांचें बीज आहे, यास्तव त्याचाच मजकडून त्याग करविण्यासाठीं तो त्रिशूलधारण करणारा मला पुनः म्हणाला, " वसिष्ठा! तूं देहादि बाह्य पदार्थांना आत्मा जाणणारा होऊं नको. हें देहरूपी गृह यंत्राप्रमाणें प्राणाच्या योगानें सर्वतः स्फुरण पावत आहे. तेंच प्राणहीन झालें कीं हालचाल सोडून मुक्याप्रमाणें सर्वदा राहतें. देहांत असलेली जी चलनशक्ति ती वायुतत्त्वामुळें आहे व ज्ञानशक्ति ही आत्मचितिच आहे. चिति अमूर्त आहे, आकाशाहूनही स्वच्छ आहे, सद्रूप आत्म्याची सत्ताच तिचें कारण आहे. प्राण व देह यांचा वियोग झाला असतां क्रियाशक्ति व तिचा आश्रय देह यांचा विनाश होतो, परंतु प्राण वायुरूपच अवशिष्ट राहतो. चिदात्मा आकाशाहूनही स्वच्छ आहे. तो विनाश पावत नाहीं. वृथा भ्रांत कां होतोस? लिंगदेहयुक्त शरीरांत चित्तत्व अभिव्यक्त होतें. हे मुनिश्रेष्ठा! निर्मळ आरशांतच प्रतिबिंब पडतें. मळानें आच्छादित झालेल्या

---

१. 'सूर्यो यथा सर्वलोकस्य चक्षुः' इत्यादि श्रुतींत आत्मा निर्लेप आहे, या सिद्धान्तानें समर्थन करण्यासाठीं त्याचे सर्वप्रपंचबाह्यत्वानें प्रदर्शन केलें आहे. तो सर्वप्रपंचबाह्य आहे, असें दाखविलें आहे.

आरशांत पुढें असलेल्या वस्तूचेंही प्रतिबिंब पडत नाहीं, आणि प्रतिबिंब न पडल्यामुळें वस्तु जरी पुढें असली तरी ती असून नाहीं-शीच होते, त्याचप्रमाणें जड व मलिन देह जरी विद्यमान असला तरी तो गतप्राण झालेला असल्यास त्यांत चिदात्मा अभिव्यक्त होत नाहीं त्यासाठींच चित् सर्वगत जरी असली तरी मायाकलंकानें आच्छादित झालेली आहे त्यामुळें ती बाह्याकार चित्तवृत्तींच्या योगानें बाह्य पदार्थ पहाण्यास व स्पंदादि करण्यास समर्थ होते. पण ब्रह्माकार बोधामुळें ती स्वतःच मायाकलंकरहित परम कल्याणरूप आहे. वास्तव अभिव्यक्त झालेली चित्च सर्व सत्ता व स्फूर्ति यांचें निमित्त असल्यामुळें तिचें जें अभिव्यक्तरूप तोच मुख्य देव आहे, असें विद्वान् समजतात. तिच्या अभिव्यक्तीचा हरिहरादिकांच्या ठिकाणीं उत्कर्ष झालेला असतो त्यामुळेंच त्यांना उत्कृष्ट देवत्व आहे. तोच हरि, तो शिव, तो हिरण्यगर्भ, तो प्रजापति, तो इंद्र, तोच परमेश्वर वायु, अग्नि, चंद्र व सूर्य आहे. तो हा सर्वव्यापी आत्मा सर्व चैतन्याकार व चेतन म्हटलेला आहे. तो देवांचा ईश, देवांचें धारण करणारा, त्यांचें पोषण करणारा, देवांचा देव व द्युलोकाचा स्वामी आहे. जे कांहीं जीव महाचितीच्या निरतिशय अभिव्यक्तीस प्राप्त होऊन मोहित होत नाहींत, मिथ्या मोहपरवश होत नाहींत, तेच या जगांत ब्रह्मा-विष्णु महेशादिक महादेव म्हणून प्रसिद्ध आहेत. पण जो परब्रह्माख्य देव त्याच्या मानाने त्याच्या गुणांच्या एक-देशावर अभिमान ठेवणारे व सृष्टिकार्यासाठीं उत्पन्न झालेले हे ब्रह्मा-विष्णु-शिवादिक तापले-ल्या लोखंडापासून उडणाऱ्या कणांप्रमाणें किंवा समुद्रापासून उडणाऱ्या तुषारांप्रमाणें भासतात. (पण हें म्हणणें सुद्धां अशास्त्रीय, व्यवहार-दृष्ट्या आहे. परमार्थदृष्ट्या ही सर्व भ्रांतिच आहे. ) त्या चिद्ब्रह्मरूप परम पदापासून भ्रमरूप असे ते ब्रह्मादिक उत्पन्न झाले असतां व कल्पनासमूहांचे कर्ते व भ्रमांचीं बीजें अशा आकारानें ते स्थित झाले असतां ही अविद्या शेंकडों व सहस्रावधि शाखांनीं वृद्धि पावते. ती अविद्या म्ह० वेद, वेदार्थ, सृष्ट्यादि क्रम, सांगोपांग क्रियाकलाप, उपासनांचे प्रकार, ब्रह्म-तत्त्वाच्या प्रतिपादनाचे निरनिराळे उपाय, त्याचे अधिकारी जीव, काम-कर्म-वासना-जनन-मरण इत्यादि अनर्थांचे समूह यांची पंक्तिच —परंपराच आहे. तेव्हां अनन्त प्रकारांनीं विकास पावलेल्या, पुनः पुनः पसरणाऱ्या व देश-कालादिकांनीं संपन्न असलेल्या त्या अविद्येचें वर्णन करण्यास कोणता पुरुष समर्थ होणार आहे ? म्हणून हा चिदात्मा महादेव ब्रह्मा-विष्णु हरादिकांचा परम पिता आहे. बीज जसें वृक्ष-पल्लवांचें मूळ त्याप्रमाणें हा महादेव सर्वांचें मूळ बीज आहे. सर्व प्राण्यांची बळें व नावें त्यांचीच आहेत, तो सर्व आहे, सर्व प्रकारच्या ज्ञानांचा एक कर्ता तो आहे. तो सर्वांना सत्ता देणारा, स्वयंप्रकाश आणि ब्रह्मवेत्त्यांना वंद्य व पूज्य आहे. ज्याला त्याचा चांगला परिचय झाला आहे अशा पुरुषांच्या प्रत्यक्ष ज्ञानाचा विषय तोच आहे, त्याला तो सर्वदाच सर्व ठिकाणीं उदय पावलेला दिसतो. संवेदनात्मकत्वानें तो चिदात्मा सर्व विषयत्वास प्राप्त झाला आहे, तो सर्वच स्थित आहे व सर्वत्र प्रकाशमान होणारा आहे, त्यामुळें इतर देवांचे संनिधा-नासाठीं जसें आवाहन व प्रकाश-नासाठीं मंत्रांचा उपयोग करतात, त्याप्रमाणें त्याच्या ठिकाणीं आवाहन मंत्र इत्यादिकांचा कांहीं उपयोग नाहीं. सर्वत्र स्थित असलेला तो नित्य आहूत—आव्हान केलेलाच आहे, म्हणूनच तो सर्वत्र प्राप्त होतो. आत्मचित् ज्या ज्या वस्तुवृत्तीला प्राप्त होते

तेथें तेथेंच हे मुने ! ती कल्याणपदच होते, ती चित् रूपांचें, त्यांच्या अवलोकनांचें, त्यांच्या मननांचें व त्यांच्या साक्षिदृष्टींचें स्वरूप स्वतःच धारण करते. म्हणून तूं त्यालाच सर्व पूजादि व्यवहारांतील आद्य–प्रथम स्फुरण पावणारा, पूज्य, नमस्कार करण्यास योग्य, स्तुत्य, अर्घ्य, सुरेश्वर, व मोठमोठ्या ज्ञेय पदार्थांचीही परा काष्ठा जाण. जरा, मरण, शोक व भय यांना घालविणाऱ्या या आत्म्याला साक्षात् जाणणारा प्राणी भाजलेल्या बीजाप्रमाणें पुनः उत्पन्न होत नाहीं. जें सर्व प्राण्यांतील तत्त्व जाणलें असतां अभय देणारें, जें सर्वांहून पूर्वीं असलेलें व जें श्रमान पडत उपास्य असलेलें, आत्मगत अज परमपद तें तूंच आहेस. तेव्हां आतां बाह्य दृष्टींमध्यें व्यर्थ मोहित कां होतोस ?

---

# सर्ग ३६

—:※:—

१. आत्म्याच्या सर्वैश्वर्याचे वर्णन.

**श्रीईश्वरः**– ज्याअर्थीं वर सांगितल्याप्रमाणें आत्म्याला अवलोकन करून जीव पुनः जन्म घेत नाहीं त्या अर्थीं त्या चिद्रूपच, एक, सर्वसत्तेच्या आंत स्थित असलेल्या, स्वानुभवमय शुद्ध देवास तत्त्ववेत्ते रुद्र–पाहतांच संसारदुःखाला घालविणारा--ईश्वर, सर्व जगाचा स्वामी समजतात. सर्व बीजांचें बीज, संसाररूपी वेलीचें सार, कर्मांचें परम कर्म तें निर्मल चित्सार आहे असें जाण. स्वतः ज्याला कोणी कारण नाहीं असें तें शुद्ध चित्तत्व सर्व कारणसमूहांचें कारण आहे, सर्व क्रियाशक्तीचें मूळ आहे, स्वसत्तेनें सर्व पदार्थांना सत्ता देणारें आहे, पण तें परमार्थतः अकारण, अभाव्य व अभवात्मक आहे. सर्व बुद्धिवृत्तींना प्रकाशित करणारा, चेतनात्मा जो जीव त्याचें अन्तःसार--चेतन--चिद्रूप, प्रत्यग्भूत, बाह्य विषयांनाही बुद्धिवृत्तींच्या व्याप्तीनें अभिव्यक्त करणारें, विषयांचें अधिष्ठान, तत्त्वभूत व आत्म्यालाच मायेनें बहुरूपी बनविणारें, चक्षुरादि व सूर्यादिक प्रकाशांचेंही प्रकाशक, चक्षुःश्रोत्रादिकांनीं प्रकाशित न होणारें, अलौकिक प्रकाशरूप, बीजौघाच्या रूपानें स्थित असलेलें एकच बीज, असें तें शुद्ध चिद्घन आहे, असें ज्ञानी समजतात. ज्यांत पृथिवी-आप-तेज-वायु-आकाशरूप सत् —विद्यमान नाहीं, पण तें शांत, सन्मय, सत्यासत्यविरहित म्ह. व्यावहारिक सत्यानें व प्रातिभासिक सत्यानें-तीन अवस्थांनीं रहित, आहे. जगत्सत्ता व कारण--अव्याकृतसत्ता यांचा बाध झाल्यावर जें चिन्मात्र अवशिष्ट राहतें तेंच तूं तत्त्व जाण, दुसरें नव्हे. तो आत्माच स्वतः रंजनबीजावस्थेंत रागात्मा होतो, विषयस्मरण झालें असता स्वतः चित्ताला क्षुब्ध करणारा रंजक होतो, विषयसंबंध झाला असतां स्वतः रंजन होतो. त्याचा वियोग झाला असतां चित्ताच्या मालिन्याचें निमित्त होत असल्यामुळें रज होतो, व तो स्वतः अमूर्तस्वरूप असला तरी क्षणांत चित्रादिकांनीं रंजित झालेली मूर्त भिंत होतो. या विस्तीर्ण चिद्रूप चित्तांत कोट्यवधि जगद्रूपी मृगतृष्णिका आजवर स्फुरण पावल्या आहेत, हल्लीं स्फुरत आहेत व यापुढेंही स्फुरतील. या स्वप्रकाशामध्यें केवल स्वसत्तेनें हें जगद्रूपी पद जरी संपन्न झालेलें असलें तरी अग्नीमध्यें ज्वाळा, निखारे, ठिणग्या, प्रभा इत्यादि वैचित्र्य जरी प्रत्यक्ष प्रतीत होत असलें, तरी उष्णता हाच एक ज्याचा स्वभाव आहे अशा वन्हीहून त्यांत दुसरें कांहीं जसें नसतें, त्याप्रमाणें वस्तुतः दुसऱ्या वस्तूचा अभाव असल्यामुळें कांहीं झालेंच नाहीं. (म्हणूनच ‘अणोरणीयान् महतो महीयान्’ ही श्रुति सर्व विरुद्ध धर्मांचा त्या ब्रह्मांत समावेश झाला आहे, असें दाखविते.) ज्या

चित्तत्त्वानें महामेरूलाही आपल्या उदरांत साठविलें आहे असें तें परमाणूसारखें आहे असें ज्ञानी जाणतात. म्हणजे ज्यानें महामेरूलाही आच्छादित केलें आहे, असें तें परमाणूसारखें अत्यंत सूक्ष्म आहे, असें समजतात. ज्याने महाकल्पप्रमाण कालाला गिळून सोडलें आहे त्याला एक निमेष म्हटले आहे. ज्यानें कल्पालाही सर्वतः व्यापलें आहे त्यानें आपली स्वाभाविक निमेषता सोडलेली नाहीं. केंसाच्या शतशः विभागलेल्या अग्राप्रमाणें अत्यंत सूक्ष्म असलेल्या यानें सर्व पृथ्वी व्यापली आहे. पण सप्तमहासागर हेंच जिचें वस्त्र आहे अशी ती फार मोठी पृथ्वीही त्याचा अन्त-सीमा जाणत नाहीं, हा आत्मा वस्तुतः संसाररचना करीत नसतानाच कर्तृत्वास प्राप्त झाला आहे. म्ह० उपाधिद्वारा महाकर्म करीत असूनही स्वतः कांहीं करीत नाहीं. हा सर्वाधार असल्यामुळें जरी द्रव्य आहे तरी तो गुण--कर्मांचा वास्तविक आधार नसल्यामुळें निर्द्रव्य आहे आणि स्वतः असंग असल्यामुळें जरी सर्व द्रव्यरहित असला तरी हा मायोपाधीमुळें द्रव्यवान् झाला आहे. व तो वस्तुतः देहरहित आहे, तरी ब्रह्मांड हें त्याचें शरीर आहे. पण तो जरी कल्पित ब्रह्मांडशरीरानें महाकाय असला तरी वस्तुतः अशरीर आहे. हा साठ घटिकात्मक दिवस असला तरी तो पहिल्या सहा घटिकात्मक प्रातःकाळचे; आहे; पण वस्तुतः हा आद्य मुहूर्तही नाहीं, आजही नाहीं व प्रातःकाळही नाहीं; पण त्या प्रातरादि शब्दांचें अधिष्ठान चैतन्य हाच जर त्या शब्दांचा अर्थ असेल तर तो त्या सर्व शब्दांना योग्य आहे. त्याचप्रमाणें उन्मत्त पुरुष, बालक इत्यादिकांनीं उच्चारलेले भिंडी, भिंडी, विवित्, चलित, गुलुगुलु इत्यादि जे निरर्थक शब्द तेही तोच आहे. त्याचप्रमाणें नें सत्य-सार्थक वेदशास्त्रादि शब्दजाल तेंहि हाच आहे. तात्पर्य जें सत्य ब्रह्म नाहीं तें या सृष्टींत विद्यमानच नाहीं व जें हा पुरुष नाहीं तेंही येथें नाहीं. ज्याच्यामध्यें सर्व आहे, ज्याच्यापासून हें सर्व झालें आहे, हें जो सर्व आहे, व जो सर्वतः आहे, जो सर्वमय नित्य आहे त्या सर्वात्म्याला नमस्कार असो. म्लान न झालेल्या कोंवळ्या पालवींनीं व हिरव्याजून पानांनीं मालांप्रमाणें लोंबणाऱ्या लतांच्या, कांत ( म्ह० सर्व बाजूंनीं लतांकडून आलिंगन दिला गेलेला ) त्यामुळेंच ज्याच्या खांद्यांच्या वगैरे मध्यभागीं प्रवेश करतां येणें शक्य नाहीं, व जो स्वतः निर्मल आहे--म्लान झालेला नाहीं अशा या वृक्षानें पुष्पें, फळें, पल्लव, भ्रमर, पक्षी, इत्यादिकांच्या समृद्धीनें विलास करणाऱ्या व सहज श्रमावांचून चंचल मेघांचे विभ्रम उत्पन्न करणाऱ्या स्वतःच्या लक्ष्मीनें इतर वनादिकांतील लक्ष्मीरूपी लता आपल्यामध्येंच सांठविल्यामुळें जणुं काय सर्व सौंदर्याची घट्ट मूठ मिटली आहे. किंवा पल्लव व पानें यांनीं निर्मळ--सुशोभित अशा वनमालांनीं मालायुक्त झालेल्या, पुरुषांमध्यें मल्ल म्ह० श्रेष्ठ, अमल म्ह० परमार्थतः व वस्त्रभूषणादिकांच्या योगानें निर्मळ-सुंदर व जठरांत चवदा भुवनें सांठविल्यामुळें गहन अशा विष्णूनें जगाला मोहित करणारें सौंदर्य व विलास यांनीं युक्त असलेल्या व सहज चंचल मेघाचे विभ्रम उत्पन्न करणाऱ्या स्वदेहलक्ष्मीच्या योगानें स्वतःला आलिंगन देणाऱ्या लक्ष्मीरूपी ललनेलाही मिटलेल्या मुठीप्रमाणें अविरल-आपल्यापासून अपृथक् केलें आहे. किंवा परमार्थतः-मध्यें विचित्रकामकर्मवासनांच्या योगानें गहन झालेल्या, अवि-

---

१ विजेचें चमकणें, स्निग्धता, थंडपणा, श्यामवर्ण व त्याचें सौन्दर्य इत्यादि विभ्रम. २ हें एका वृक्षाचें वर्णन झालें. आतां भगवान विष्णूचें वर्णन त्याच श्लोकानें केलें जातें.

धारूप मळ्यानें, पल्लवासारख्या त्यांच्या सूक्ष्मभूतांनीं व पर्णासारख्या त्यांच्या कार्यभूत स्थूलभूतांनीं आणि भुवनरूपी मलांनीं मालेप्रमाणें परंपरारूप झालेल्या जगांची जी लक्ष्मीलता तिला आकाशांतील मेघांच्या गर्जनेप्रमाणें जिची सहज होणारी गर्जना आहे अशा महावाक्यश्रुतीनें एक मल्ल दुसऱ्या मल्लाला मारण्यासाठीं जशी घट्ट मुठ मिटतो त्याप्रमाणें केवळ चिदेकरस बनविलें आहे.

---

# सर्ग ३७

—:०:—

१. सद्रूप ब्रह्माच्या योगानें सर्व असत् पदार्थांना सत्त्व आहे, २. शिवाच्या अनन्तशक्ति आहेत. ३. मुख्य शक्ति नियतिचें नृत्य.

श्रीईश्वर:—ज्या ईश्वराच्या ठिकाणीं ३६ व्या सर्गाच्या शेवटच्या श्लोकांत वर्णन केलेल्या शब्दार्थांच्या मौजा सत्यशा भासतात त्या जगत्सत्तारूप मण्यांच्या संपुटासारख्या मायाशबल सर्वेश्वरांत—र्‍ा परम चिन्मणीमध्यें कोणत्या शुद्ध शक्ति विकास पावत नाहींत? ज्या बीजशक्ति जगांचा आरोप करितात त्या कोणत्या बरें शक्ति स्फुट होऊन प्रकट होत नाहींत? सर्व शक्ति कार्यरूपानें व्यक्त होतात. व्रीह्यादि बीजकणाच्या आंत असलेली ही ईश्वराची चित्सत्ता क्षेत्रांतील भाजून वगैरे तयार केलेली माती-काळ-पाणी इत्यादि सहकारी करणांना प्राप्त होऊन प्रथम अंकुर करते, नंतर क्रमानें तांदुळ होऊन शेवटीं साक्षात् पुरुषाला भोग्य असा भात करते. फेस, भोवरे, लाटा इत्यादि विकारांमध्यें अनुगत असलेली रसरूपिणी ईश्वराची शक्ति जलाचा पर्वतादि कठिण प्रदेशाशीं संबंध झाला असतां त्याला सखल प्रदेशाकडे वाहाण्यास लावते व रसनेंद्रियाशीं त्याचा संबंध झाला असतां उदरांत जाणें, या स्वरूपाचा स्पंद करते. ही पुष्पगुच्छांमध्यें परागसहित गंधरूपानें राहिलेली असते व ती घ्राणेंद्रियामध्यें विकास पावून व्यक्त होते. पृतिमेमध्यें असलेली ती प्रतिमेसारखी भासते, वस्तुतः ती आपलें द्रव्य जी शिळा तिच्याहून पृथक् विद्यमान नसते तथापि पृथक् असल्यासारखी भासते. म्ह० व्यावहारिक सत्यतेस प्राप्त होते. जसा मोठा पर्वत आपल्या स्थितिलीलेनें तृण-वृक्ष-लतादि कार्यांना धारण करतो त्याप्रमाणें ती स्वतः विकार न पावतांच कार्य व त्याचा आधार अशा भेदविकल्पदशेस धारण करते. वायुरूप जो सर्व क्रियांचा कोश तद्रूप होऊन ती शक्ति त्वगिंद्रियाला स्पर्शग्रहणासाठीं अनुकूल करते. जसा पिता आपल्या पुत्राला आपल्या कार्यांत प्रवृत्त करतो त्याप्रमाणें वायूंतील शक्ति त्वगिंद्रियाला स्पर्शग्रहणाची प्रेरणा करते. याप्रमाणें इतर इंद्रियांतिलही प्रवृत्तिशक्ति जाणाव्या. ज्याप्रमाणें ही ऐश्वरीशक्ति प्रवृत्तिशक्तीनें संसार करते त्याचप्रमाणें ती निवृत्तिशक्तीनें सर्व जगत्सत्तांचा एक गोळाच अशा आत्म्याची श्रवण-मनन निदिध्यासन इत्यादि उपायांनीं मोक्षासाठीं भावना करून 'नेति नेति' अशा सर्वप्रतिषेधानें सर्वांचें जणु काय शून्यत्वसें करते. आकाशरूपी आरशाच्या उदरांत आपल्या सत्तेच्या प्रतिबिंबासारखें कल्प निमेषरूप कालसंज्ञक निर्मल शरीर धारण करते. ब्रह्मा, विष्णु, रुद्र, ईश्वर व सदाशिव या उत्कर्षपरंपरेंतील पांचवा ईश जो सदाशिव तेथपर्यंत हे सर्व पदार्थ या शक्तीचेच परिणाम आहेत. 'हें असें व हें असें नाहीं' इत्यादि सर्व व्यवस्था करणारी नियति स्वतः ही मूलशक्ति आहे. घरांत दिवा असला म्ह० त्याच्या प्रकाशांत जशा सर्व क्रिया चालतात त्याप्रमाणें आप-

---

१. या श्लोकाचे असेच आणखींही अर्थ संभवतात.

रिच्छिन्न ज्योतिःस्वरूप सत्याच्या साक्षीमध्यें त्याच्या सत्तेनें जगांतील सर्व विचित्र परंपरा प्रकाशमान होतात. साक्षीप्रमाणें स्थित असलेली ती आपल्या शक्तीचा व्यापार म्ह० संसार गंधर्वनगरांतील नाटकशाळेंत चाललेल्या नाटकाप्रमाणें पाहते.

श्रीवसिष्ठः—हे जगन्नाथ! या शिवाच्या शक्ती कोणत्या आहेत? त्या कशा स्थित आहेत? साक्षिता कोणती? त्यांचा व्यापार कोणता व तो केवढा आहे?

श्रीईश्वरः—हे प्रियदर्शन वसिष्ठा! अप्रमेय, शांत, शिव, परमात्मा चिन्मात्ररूप, सर्व व आकाररहित अशाही त्याची ईच्छासत्ता प्रथम व्यक्त झाली. त्यानंतर आकाश अभिव्यक्त झालें. त्यामुळें आकाशसत्ता झाली. त्यांत कालात्मा सूत्रसंज्ञक हिरण्यगर्भ[1] अभिव्यक्त झाला. त्यामुळें कालसत्ता झाली. त्यानंतर ज्यांचा आकार नियत आहे अशीं भूतें व भौतिक पदार्थ यांचा आविर्भाव झाला असतां नियतिसत्ता व्यक्त झाली. त्या सर्वांत अनुगत असलेली महासत्ता झाली. (याप्रमाणें ईश्वराच्या शक्ति सांगून जीवाच्या शक्ति सांगतात.—) ज्ञानशक्ति, क्रियाशक्ति, प्रवृत्तिशक्ति, निवृत्तिशक्ति इत्यादि शिवस्वरूप आत्म्याच्या शक्तींचा अन्त लागत नाहीं.

श्रीवसिष्ठः—अहो पण, या शक्ति कोणत्या निमित्तानें उद्भवल्या आहेत? एक व अद्वितीय आत्म्यामध्यें यांना बहुत्व कसें? हे देवा! त्यांचा उदय कसा होतो? आणि शक्ति व शक्तिमान् यांचा भेद व अभेद उपपन्न कसा होतो?

श्रीईश्वरः—या अनन्तरूप शिव आत्म्याची ही चिन्मात्रता सर्व शक्तींचें निमित्त आहे. तिलाच शक्ति असें म्हटलें आहे, म्ह० ती मायाशक्ति स्वरूपतः अनन्त असलेल्या शिवाला गुणानें, शक्तीनें व कार्यानें अनन्त करते व त्यामुळें त्यांचें अनन्तत्व अधिकच वाढविते, त्याला न्यून करीत नाहीं, असा भावार्थ. तरंगादि भेदांनीं उदक जसें बहु होतें त्याप्रमाणें ज्ञत्व, कर्तृत्व, भोक्तृत्व, साक्षित्व इत्यादि विकल्पांमुळें शक्ति विविधरूप धारण करितात. काल या नर्तकानें ऋतु-मासादि कालनियतिक्रमानें उत्तम प्रकारें शिक्षण दिलेल्या नटांप्रमाणें या जगांतील ब्रह्मांडरूपी नृत्यमंडपांत त्या शक्ति नाचतात. ही जी 'परा' या नांवाची अवान्तर परार्धद्वयप्रमाण व अपरा या नांवाची कल्प व तदवयवरूप कालकला तीच ही 'नियति' म्हटली जाते. तिलाच वादी ईश्वराची क्रिया असें म्हणतात, यत्न म्हणतात, इच्छा म्हणतात, व काल असेंही कित्येकांनीं तिला नांव दिलें आहे. पण आम्हीं कलनामात्रत्वामुळें कालकल्पनेमुळें कल्प अशा विकल्पांच्या पर्यायनांवांनींच तिचें नांव ठेवलें आहे. ( काल या अर्थी नियति या पदाची व्युत्पत्ति ) तृणापासून महारुद्रापर्यंत हें असेंच, याच्या आकारांत कोठेंही फरक व्हावयाचा नाहीं अशी जी स्थिति तो आकारनियम व तृणापासून ब्रह्मदेवापर्यंत जो स्पंद तोही असाच, त्या विकारांत कोठेंही बदल व्हावयाचा नाहीं, हा विकारनियम; या दोन्ही प्रकारच्या नियमास नियति असें म्हणतातात. जोंवर या नियतीचें तत्त्वज्ञानानें परिमार्जन केलें जात नाहीं तोंवर ही नित्य उद्वेगरहित होऊन नृत्य करते. जगज्जालरूपी नाटक हेंच तिचें नृत्य आहे. तें नानाप्रकारच्या रसविलासांनीं संपन्न आहे. विवर्तरूप अभिनयांनीं युक्त आहे. प्रलयरूप

---

१. 'सोऽकामयत् बहु स्यां' अशी त्याला इच्छा झाली. मीं पुष्कळ व्हावें, अशी त्याला कामना झाली.

नाटक संपण्याचा जो क्षण त्यांतील विजाचे कडकडाट करणाऱ्या पुष्करावर्तसंज्ञक मेघाचे घर्घर आवाज हींच त्यांतील-नियतिनाटकांतील वाद्यें आहेत. सर्व ऋतूंतील पुष्पांनीं तें व्यापलेलें आहे, मेघधारांनीं युक्त असें ब्रह्मांडगोलकच त्याचें महानाट्यमंदिर आहे, वारवार होणारा जो जलाचा वर्षाव तोच त्यांत अंगांतून गळणारा घाम आहे, मेघ याच ज्याच्या दशा आहेत अशा आकाशरूपी चंचल नीलवस्त्रानें त्यांत दिनरात्र्यादि नानावेषांनीं भ्रम केले आहेत, अतिशय शुद्ध सप्ताब्धिरूप रत्नौघखचित वलयानीं तें नियतिनाटक आकुल झालेलें आहे. याम-पक्ष-दिन याच प्रेक्षाकटाक्षांनीं त्यानें आकाशाला प्रकाशित केलें आहे, वलयांच्या योगानें गुप्त होणें व उन्मज्जनांच्या योगानें प्रकट होणें याच्या योगानें व्यग्र झालेलीं जीं पर्वतांचीं कुलें तींच त्यांत मस्तकाग्रें आहेत, त्यांत भ्रमण करणाऱ्या शशिरूप मण्यांत गंगा हेच तीन हार ओवले आहेत, उत्तमप्रकारें दिसणारे संध्याकाळचे मेघ तेच त्यांतील चंचल करपल्लव आहेत, एकसारखे आवाज करणारे जे लोक किंवा भुवनें तद्रूप अलंकारांनीं मंजुळ, भूतळ-पाताळ-नभस्तल हींच ज्यांतील नटीच्या पादविन्यासाचीं स्थानें आहेत, वारवार उदय पावून अस्त पावणारे जे मोठमोठे अनेक तारे तेच ज्यांतील घर्मबिंदूंचे समूह आहेत, चंद्र व सूर्य या कुंडलांच्या स्पंदानीं व स्मितानीं ज्यांतील नटीचें नभोरूप मुख व्यक्त केलें आहे, अनेक ब्रह्मांडांच्या भींति हेंच ज्यांतील दाराच्या झडपासारखे पडदे आहेत, ज्यांतील असुरांनीं व्याकुल ऊर्ध्व व अधो-लोक हेच ज्यांत आवाज करणारे मोत्यांनीं गुंफलेले उत्तरीय व अंतरीय वस्त्राचे पदर आहेत, सुख व दुःख यांच्या आविर्भावादि दशा व त्या निमित्तानें उत्पन्न होणारे दोष हेच ज्यांतील स्थायिभाव संचारीभाव व शृंगारादि इतर रस आहेत, असें हें नियतिनाटक आहे. अनेक विकारांनीं युक्त अशा या नियतिरूप नटीच्या संसारनामक पुष्कळ वेळ चालणारे नाटकरूप नाट्यसारभूत विलासांत हा साक्षी परमेश्वर सदा प्रकाशस्वरूप व एक स्थित आहे, तथापि तो त्या नटीहून किंवा त्या नाट्याहून भिन्न दाखविता येत नाहीं.

---

## सर्ग ३८

१. अनन्तचिन्मूर्ति शिवाचें बाहेर ध्यानानें पूजन. २. ज्ञानाचें फळ महापुण्यकारक विमुक्ति.

श्रीईश्वरः—हा नियतिनाटकाचा साक्षी चिदात्माच परम देव आहे. तो सत्पुरुषांना सदा पूज्य आहे. तो चिन्मात्र, अनुभूतिरूप सर्वग व सर्वांचा आश्रय आहे. तो घट, पट, वट, भित, शकट—गाडी, वानर यांत स्थित आहे. शिव, हर, हरि, ब्रह्मा, शुक्र, कुबेर, यम, तोच आहे. यास्तव पुढें सांगितलेल्या प्रकारें पूजन केलें असतां त्यांत सर्व देवांच्या पूजनाचा अन्तर्भाव होतो. तो सर्वांच्या आंत व बाहेर सर्वात्मा आहे. तो सदा स्वात्मा आहे. हा भगवान् उत्तम बुद्धिमानांकडून पुढें सांगितल्याप्रमाणें बाह्य-आभ्यंतर इत्यादि अनेक प्रकारच्या क्रमांनीं पूजला जातो. हे महाबुद्धे तत्त्वज्ञा, अगोदर तो भगवान् बाहेर ज्या क्रमानें पूजला जातो तो क्रम एक; नंतर पूजनाचा अतःक्रमही एक. सर्व पूजाक्रमांमध्यें स्नान-आचमन इत्यादि शास्त्रोक्त संस्कारांनीं पवित्र केलेलेंही जें देहगृह तें प्रयत्न करून टाकावें आणि देहाचा जो अवबोध-अनुभव-साक्षिचित्प्रकाश तद्रूप परम पवित्रक मोठ्या यत्नानें अतिशय शुद्ध करून ध्यावें. मनांत ध्यान करणें हेंच पूजेचें साधन व स्वतः पूजा आहे, त्याहून दुसरें त्याचें यथार्थ

पूजनच नाहीं. यास्तव त्रिभुवनाचा आधार जो परमात्मा-साक्षी-अन्तर्यामी त्याचें नित्य ध्यानानें पूजन करावे. तो देव चिद्रूप आहे. एक लक्ष सूर्यांच्या तेजाइतकें त्याचें तेज आहे. सूर्यादि सर्व तेजें व बुद्धीच्या सर्व वृत्ति याना तें प्रकाशित करतें, अहंतेला उपाधिरहित केलें असतां तेंच तिनें अत्यंत शुद्ध सार अन्तस्थ चित्प्रकाश होतें, त्याचा आश्रय करावा. त्याची कंधरा-गळ्यापासून वरचा भाग-अपार व महाकाशाहूनही अतिशय विस्तीर्ण आहे. तसाच अनन्त असलेला जो खालच्या आकाशाचा कोश तींच त्याची पादकमलें आहेत. अपार असलेले जे सर्व दिशांचे तट, तेच त्याचे विस्तीर्ण भुजांचें मंडळ आहे; त्यानें तो फार शोभतो. नानाप्रकारच्या ब्रह्मांडांत जे सत्यादि महालोक आहेत, तींच दिग्रूपी भुजांनीं ग्रहण केलेलीं त्याचीं आयुधें आहेत, त्याच्या हृदयकोशांतील कोनात ब्रह्मांडौघाच्या परंपरा विश्रांति घेत आहेत, त्याचें शरीर स्वरूपप्रकाशरूप आहे. तें परमाकाशरूप तमाच्या पार गेलेलें आहे, व स्वतः अपार आहे. तें खालीं, वर, चारी दिशांमध्यें व उपदिशांमध्यें अवच्छिन्न आहे, तें ब्रह्मा, इंद्र, विष्णु, रुद्र, ईश इत्यादि देवांनीं मंडित झालेलें आहे. ही जी चतुर्विध भूतांची शोभणारी मंडळी ती त्याची रोमपंक्ति आहे, असें चिंतन करावें. प्राण्याकडून नानाप्रकारच्या क्रिया करविणाऱ्या व त्रिभुवनांतील पदार्थांच्या हालचालीकरितां यंत्राला जोडलेल्या दोऱ्यांप्रमाणें असलेल्या, ज्या त्याच्या इच्छादि शक्ति त्याच त्याच्या शरीरांतील नाड्या आहेत, असें चिंतन करावें. हा तो परम देव आहे, हा सज्जनांना सदा पूज्य आहे, तो चिन्मात्र, अनुभवात्मक, सर्वगामी व सर्वांचा आश्रय आहे. घट-पट-वट-भिंत, गाडी व वानर यांत स्थित आहे. तोच शिव, हर, हरि, ब्रह्मा, इंद्र, कुबेर व यम आहे. तो निरनिराळ्या आकारामुळें झालेले जे अनंत पदार्थ--शब्द त्यांचा आधार--अर्थ, व त्यांचा परित्याग केला असतां एकपदाचा आधार आहे. सर्व पदार्थांवरून लक्षित होणारी जी सत्ता तेंच त्याचें स्वरूप आहे. सर्व जगत्समूहाला ज्यानें चक्राप्रमाणें फिरविलें आहे असा काल त्याचा द्वारपाल आहे. तो अशुद्धिसमयीं मनाला आंत प्रवेश करूं देत नाहीं, पण तीच मनाची उत्तम शुद्धि झाली असतां त्याच्या आत्मप्रवेशाला तो अनुकूल होतो. पर्वत, लोक इत्यादिकांनीं विस्तार पावलेलें हें सर्व ब्रह्मांडमंडल या परमेश्वराच्या कोणत्या तरी एका देहाच्या कोपऱ्यांत मायाशबलरूपांतील एक अवयव होऊन राहिलें आहे. सर्व प्राण्यांचे जे श्रवण--नेत्रादि अवयव ते सर्व त्याचेच असल्यामुळें ज्याला असंख्य श्रवण व नेत्र आहेत, ज्याला अनन्त मस्तकें आहेत, सहस्रभुजाचें ज्याला भूषण आहे, अशा शांत महादेवाचें चिंतन करावें. तो देव सर्वत्र दर्शनशक्तीनें संपन्न आहे. त्याला सर्वतः घ्राणशक्ति आहे, तो सर्वतः स्पर्शनमय व सर्वतः रसनाशक्तियुक्त आहे, सर्वत्र श्रवणेंद्रिययुक्त व सर्वत्र मननयुक्त आहे, पण असें जरी त्याचें चिंतन करीत असलें तरी वस्तुतः तो देव असंग व अद्वय आहे, याचें विस्मरण होऊं देणें योग्य नसल्यामुळें तो सर्वतः मननातीत आहे, सर्वतः परमशिव आहे, असेंही चिंतन करावें. तो सर्वदा सर्वकर्ता, सर्व संकल्पित अर्थ देणारा, सर्व भूतांच्या अन्तःकरणांत अवस्थित होणारा, सर्व व सर्वांना सत्ता स्फूर्ति देणारा आहे, असें मनांत चांगलें चिंतन करून नंतर त्या देवेशाची यथाविधि पूजा करावी. हे ब्रह्मवेत्त्यांतील श्रेष्ठा ! त्याच्या पूजनाचें हें विधान ऐक. ह्या स्वसंविदात्मा--स्वानुभवात्मक देवाच्या पूजेला

गंध-पुष्पादि उपहार लागत नाहींत, दीप नाहीं, धूप नाहीं, पुष्पवैभवाचें समर्पण नाहीं, अन्नपानादि दान नाहीं, चंदनविलेपन नाहीं, केशर, कर्पूर इत्यादि भोग नाहीं व छत्र--चामर-दर्पण इत्यादि इतर उपचार त्याच पूजनाला जरूर नाहींत. तर नित्य क्लेशावांचून प्राप्त होणाऱ्या, शीतल, अविनाशी एक--अखंडसाक्षात्कारवृत्तीवर आरूढ झालेल्या-अमृत आत्मरूपप्रबोधानें त्या देवाची पूजा होते. मागें वर्णन केलेलें चिंतनही याचें अंग आहे. यास्तव हेंच परमपूजन आहे. जें सतत अन्तःस्थ शुद्ध चिन्मात्रसवेदन तेंच परमध्यान म्हणून म्हटलेलें आहे. यास्तव पाहतांना, ऐकतांना, स्पर्श करतांना, वास घेतांना, खातांना, जातांना, निजताना, श्वास घेताना, बोलतांना, त्याग करतांना, ग्रहण करताना तूं शुद्धसंविन्मय हो. ईश्वर- आत्म्याचें स्वतः ध्यानामृतानें पूजन करावें. कारण पुष्पादि विषयांचें समर्पण करणें हें देवाला साक्षात् अविच्छिन्न सुख देऊं शकत नाही, तर परंपरेनें तें त्याच्या स्वरूपभूत सुखाचा अल्प अंश मात्र उत्पन्न करतें. एकाद्या अत्यंत क्षुधित झालेल्या मनुष्याला एक मूठभर तांदूळ दिल्यानें जसा संतोष वाटत नाहीं त्याप्रमाणें देवही असल्या उपचारांनीं फारसा प्रसन्न होत नाहीं. अखंड ध्यान हें परमास्वादयुक्त पूजन आहे. कारण त्याच्या योगानें परमात्म्याच्या उपाधींचा बाध होतो, आत्म्याचें शोधन होतें, व त्यामुळ त्याचा निरतिशय आनंद स्पष्ट कळतो. यास्तव अशा अखंड एकरस आत्मानुभवानें प्रत्यगात्म्याला आनंदसागरांत बुडवून सोडणें, हें त्याचें अत्यत श्रेष्ठ पूजन मानलेलें आहे. शुद्ध संवेदनरूप ध्यान हेंच अर्घ्य आहे व तेंच पाद्य आहे. ध्यानानें अभिव्यक्त होणारें जें चैतन्य तेंच पुष्पाचें कार्य करीत असल्यामुळें पुष्प आहे. याप्रमाणें संवेदनच सव उपचार आहे, असें तत्त्वज्ञ समजतात. ध्यानावांचून दुसऱ्या कोणत्याही उपायानें हा आत्मा प्राप्त होत नाहीं. ध्यायानें हा आत्मा स्वरूपाभिव्यक्तीस प्राप्त होतो. मनुष्यापासून हिरण्यगर्भापर्यंत जे लोक आहेत त्यांतील विषयोपभोग हा प्रसन्न झालेला आत्मा भोगतो. हे मुने ! ज्याप्रमाणें देहाभिमानी पुरुष आपल्या घरांत बसून भोग भोगतो तसा हा आत्मा देहगृहांत भोग भोगतो. हे सुमते ! एकाद्या मूढानेंही तेरा निमेष जरी या ध्यानानें ईश्वराची पूजा केली तरी त्याला गोप्रदानांचें फळ मिळतें. जो शंभर निमेष त्याचें ध्यान करतो त्या मानवाला अश्वमेध यज्ञाचें फळ मिळतें. याप्रमाणें प्रभु स्वात्म्याचें अर्धा घटिका पूजन केलें असतां मानवाला सहस्र अश्वमेधाचें फळ मिळतें. ध्यानरूपी बलाचा उपहार समर्पण करून जो स्वयं आत्म्याची एक घटिकाभर पूजा करतो त्याला राजसूय यज्ञाचें फळ मिळतें. मध्याह्नापर्यंत असें पूजन केल्यानें त्याला एकलक्ष राजसूयांचें फळ मिळतें. तसेंच सर्व दिवसभर जो त्याची पूजा अशा ध्यानानें करतो तो पुरुष दीर्घकाल चित्ताचें ऐकाग्र्य झाल्यामुळें अवश्य ज्ञानवान् होऊन परमधामामध्यें राहतो. हाच तो परमयोग आहे, हीच ती सर्वश्रेष्ठ क्रिया आहे. हें मीं तुला आत्म्याचें उत्तम बाह्य पूजन सांगितलें आहे. हे आत्मन्[१] ! जो पुरुष खिन्न न होतां हे पवित्र व सर्व पापांचा विघात करण्यास कारण होणारें पूजन एक क्षणभरही करतो तो क्रमानें सर्व बंधांपासून मुक्त होईल, उत्तम पदास प्राप्त होईल व सर्व सुरासुरलोक अभिवादन, स्तुति इत्यादिकांच्या योगानें माझी जशी पूजा कर-

१. हें अतिशय प्रेम व्यक्त करणारें वसिष्ठाचेंच संबोधन आहे.

तात, त्याप्रमाणेंच त्याची ते या जगांत पूजा करतील.

## सर्ग ३९

१. अंगोपांगांना प्रकाशित करणाऱ्या प्रत्यगात्मस्वरूप शिवाची प्राप्त होणाऱ्या शब्दादि विषयांनीं अन्तःपूजा सांगतात.

श्रीईश्वर:—सर्व पावनांना पावन करणारें व सर्व अज्ञानाचा क्षय करणारें जें आत्म्याचें अन्तःपूजन तें आतां मी तुला सांगतों. जाणाऱ्या, उभ्या राहणाऱ्या, जागणाऱ्या व निजणाऱ्याही पुरुषाच्या सर्व व्यवहारांमध्यें ध्यानरूप पूजा नित्य अनुगत आहे. या शरीरांत स्थित असलेल्या, सर्व प्रत्ययांना केवल सानिध्यानें उत्पन्न करणाऱ्या व जाणणाऱ्या या परमकल्याणरूप आत्म्याचें स्वतः आपणच नित्य ध्यान करावें. निजलेल्या, उठलेल्या, जात असणाऱ्या किंवा स्थित असलेल्या, सर्व बाजूंनीं स्पृश्याला स्पर्श करणाऱ्या—विषयोपभोग घेणाऱ्या किंवा उद्वेगानें त्याचा त्याग करणाऱ्या म्ह० चांगल्या उपभोगामुळें विपुल झालेल्या भोगांचा उपभोग घेणाऱ्या किंवा त्याचा त्याग करणाऱ्या, जगदादि बाह्य विषयांना स्वाध्यारोपानें निर्माण करणाऱ्या सर्व कार्यांना आपली सत्ता देणाऱ्या, स्वदेह याच लिंगामध्यें निर्विक्षेपस्वभाव आत्म्यांत स्थित असलेल्या, आणि मृत्तिका-काष्ठ-शिला इत्यादि इतर लिंगास व प्रतिमास सर्वथा सोडून राहणाऱ्या बोधलिंगाची यथाप्राप्त अर्थसंवेदनानें चांगली पूजा करावी. प्रारब्धाच्या प्रवाहांत पडलेल्या भोगांमध्यें स्थित असतां असंग विशुद्ध आत्मबोधरूप स्नानानें वारंवार शुद्ध होऊन, नित्य अनुभवरूप पूजासामग्रीनें बोधरूप लिंगाची चांगली पूजा करावी. तसें पूजन करीत असतांना जर मन तमामध्यें निमग्न होईल तर आंत व बाहेर सर्वत्र संपूर्ण, अखंडित, अद्वय आदित्यमंडलच मी आत्मा आहें, असें चिंतन करावें. जर परिताप झाला तर तशाच आकाशांत परिपूर्ण चंद्रमंडलाच्या स्वरूपानें आपला उदय झाला आहे, अशी भावना करावी. बाह्य व आन्तर बुद्धिवृत्तिप्रतिभासामध्यें व त्या प्रतिभासानें भासमान होणाऱ्या सर्व पदार्थसमूहामध्यें अनुगत असलेली जी नित्य अनुभवरूप संविद् तद्रूप शरीराच्या द्वारांनीं आपल्या आभासांना बाहेर विषयप्रदेशीं पोंचविणाऱ्या, मुखांत प्राणस्वरूपानें संचार करणाऱ्या, शब्दादि विषयांना आपल्या स्वानंदरसानें मधुर करून जणुंकाय आस्वाद घेत असलेल्या, प्राण व अंतःकरण हेच ज्याचे उत्कृष्ट घोडे आहेत, अशा प्राण व अपान यांनीं युक्त अशा रथावर आरूढ झालेल्या, गूढ हृदयांतील गुहेंत राहणाऱ्या, सर्व विषयदृष्टींचा ज्ञाता, सर्व कर्मांचा कर्ता, सर्व भोग्यांचा भोक्ता व सर्व अनुभवांचें स्मरण करणारा, अशा ज्यानें उत्तमप्रकारें सर्व अगसमूहांना जाणलें आहे अशा सर्व विषय भावनांनीं व अभावनांनीं लक्षित झालेल्या, सर्व प्रकाशाहून अतिशय प्रकाशमान असलेल्या व सर्वगामी अशा शिवाचें चिंतन करावें. वस्तुतः निष्कल पण सोपाधिक अवस्थेंत सकल, देहांत स्थित असलेला हृदयाकाशांत संचार करण्याचें ज्याचें शील आहे परंतु असा वस्तुतः अरंजित पण रंजित होणारा, नित्य, अंगप्रत्यंगव्यापी, ज्ञानस्वरूप म्ह० मनाच्या मननशक्तींत स्थित असलेला, प्राण व अपान यांच्या मध्यांतून उदय पावलेला, हृदय, कंठ, तालु यांच्यामध्यें राहणारा, भ्रूमध्य व नासिकेच्या पुढें यात असणारा, शैवशास्त्रांत प्रसिद्ध असलेलीं जीं छत्तीस तत्त्वें त्यांच्या अन्त्यस्थानांत स्थित असलेला, काली, रौद्री, कलविकरणी, इत्यादि शक्तींतील मनोन्मनीच्या अन्त्य दशेचेंही

उल्लंघन करून राहणारा, अथवा शिवयोगामध्यें प्रसिद्ध असलेली जी उन्मनी या नांवाची सबीज-समाधिरूप अन्तदशा तिच्या पलीकडे असलेला, आंत शब्दादिक करणारा, मनोरूपी पक्ष्याला प्रेरणा करणारा, व्यवहारांत सविकल्प वाक्पथामध्यें व निर्विकल्प समाधि आणि मोक्ष यांत विकल्पशून्य म्ह० लक्ष्यरूप वाक्पथांत ह्या दोन्ही ठिकाणीं स्थित असलेला, तिळांत जसें तेल असतें त्याप्रमाणें सर्व सृष्टीमध्यें अगदीं आंत सुस्थित असणारा, स्वरूपतः प्राणादि कलारूपी कलंकानें रहित व सोपाधिक अवस्थेंत त्या सर्व कलांनीं शरीरावर परिणाम पावलेल्या भूतमात्रांनीं मूर्त, उत्तम हृदयकमल याच एक देशांत व्यक्त होऊन राहिलेला व जाग्रद्दशेंत सर्व देहांवर अभिमान ठेवणारा, अशा देवाचें पूजन करावें. चिन्मात्र, निर्मल, प्रकाशस्वभाव, अध्यास व विकल्प यांचें अधिष्ठान, प्रत्यक्ष अनुभवास येणारा, सर्वत्र स्वानुभवात्मक, प्रत्यक् चेतन पण स्वतःलाच विसरून भोगांची याचना करणारासा होऊन राहिलेला, स्वतःहून भिन्न असलेल्या पदार्थांचा वेष स्वतःच घेऊन आपल्या संकेतानेंच एका क्षणांत द्वित्वाला प्राप्त झाल्यासारखा होणारा, असा हा देव हात, पाय, केंस, दांत, नखें इत्यादि अवयवांसहवर्तमान आहे व स्वदेहाचीं विविध ज्ञानें हेंच त्याचा परिचय करविणारें आहे, असें चिंतन करावें. साध्वी स्त्रिया आपल्या कांताची जशी सेवा करितात त्याप्रमाणें मनोदृष्टींच्या-नानाप्रकारचे आचरण करणाऱ्या व विचित्र, अनेक शक्ति सतत माझी उपासना करितात मन हा माझा द्वारपाल आहे. तो मला त्रिभुवनाचें वृत्त निवेदन करतो. हीं चिंता माझी प्रतिहारी आहे, ती द्वारामध्यें स्थित असते व सन्मात्र हाच तिचा विषय असल्यामुळें ती शुद्धरूपिणी आहे. आत्म्याप्रमाणें अत्यंत प्रेमाचा विषय झालेली जी माझी ज्ञानशक्ति व क्रियाशक्ति तीच माझी श्रेष्ठ पत्नी आहे शास्त्रीय व लौकिक विचित्र ज्ञानें हीच माझ्या अगांतील भूषणें आहेत. ज्ञानेंद्रियांच्या समूहासह जीं कर्मेंद्रियें आहेत तीं माझीं द्वारें आहेत, अशा प्रकारचा हा मी अनन्तात्मा आहें. मीं सर्व मर्यादित आकार टाकून दिला आहे, मी सर्व पदार्थांना भरून एकरूपानें अवस्थित आहें, मी स्वतः पूर्ण व सर्वांना परिपूर्ण करणारा आहें, अशा अलौकिक स्वच्छ आत्म-चमत्काराचा म्ह. प्रत्यक्तत्त्वाच्या परिचयाचा आश्रय करून आंतून देवत्वानें परिपूर्ण होत्साता तो पूजक दीन टाकून देतो. अशा भावनेनें पूजा करणारा पूजक प्रतिकूल स्थिति प्राप्त झाली असतां अस्त पावत नाहीं व अनुकूल स्थिति प्राप्त झाली असतां उदय पावत नाहीं. म्ह० हर्षविषादयुक्त होत नाहीं, तो संतुष्ट होत नाहीं व कोप करीत नाहीं, त्याला विषयोपभोगाची तृप्ती नको होते, त्याला क्षुधा नसते, तो कशाची इच्छा करीत नाहीं, कशाचा त्याग करीत नाहीं, तो आंत सम असतो, बाहेर जीवन्मुक्तांसारखा आचार करतो. त्याचा आभास सम असतो. आकृतिही एकसारखी असते. तो अत्यंत सौम्यतेस प्राप्त झालेला असतो. सर्व बाजूंनीं त्याचा आशय सुंदर असतो. तो एकटाच आपल्या मतीला न ढळवितां देह असेपर्यंत दीर्घकाल प्रत्यहीं असेंच देवपूजन करतो. चित्तत्त्वानें चलित झालेला देह हाच याचा देव म्हणून म्हटलेलें आहे. जशी त्रिपटीरूप वस्तु प्राप्त होईल त्याचप्रमाणें ती सर्व त्याला अर्पण करून त्याची पूजा करतो. सर्व समबुद्धीनें सर्व इंद्रियप्रकाशाच्या पलीकडे असलेल्या चिन्मात्राची तो पूजा करतो. आपल्याला बाह्य व आंतर पदार्थ ज्या क्रमानें प्राप्त होतील तसेच ते सर्व अर्पण करून पूजा करावी. गंधपुष्पादि अपूर्व वस्तूंच्या प्राप्तीसाठीं थोडासाही यत्न करूं नये. ब्राह्मणादि जो देह प्राप्त

झाला असेल त्याला उचित अशा शास्त्रीय व्यवहारानें व केवल शरीरधारणास अवश्य अशा भक्ष्य, भोज्य अन्न-पानानें व अन्न-पानादिकांच्या सेवनानें सुंदर प्रभूचें पूजन करावें. नानाप्रकारच्या वैभवानें शोभणाऱ्या यथाप्राप्त शयन, आसन, वाहन, इत्यादिकांच्या योगानें शिवाचें पूजन करावें. कान्ता, अन्न, पान, इतर संभोगांचा संभार, इत्यादिकांपासून होणाऱ्या सर्वरूप सुखानें आत्म्याला तत्त्वत: जाणून पूजावें. आधि व व्याधि यांनीं व्याप्त, मोह व क्षोभ यांनीं युक्त अशा प्राप्त झालेल्या सर्व उपद्रव-दु:खानें आत्म्याला पुजावें. जगत्स्थितीशीं संबंध ठेवणाऱ्या सर्व चेष्टांच्या प्राप्तफलांनीं म्ह० मरण, जीवित, स्वप्न इत्यादि सर्व परिणामांनीं आत्म्याचें पूजन करावें. प्रारब्धप्रवाहानें प्राप्त झालेल्या दारिद्यानें किंवा राज्यानें आणि विचित्रचेष्टारूप पुष्पानें शुद्धात्म्याची पूजा करावी. नानाप्रकारचे कलहकल्लोळ व स्त्रियांचे उल्लास यांनीं शोभणाऱ्या राग-द्वेषविलासानें सौम्य आत्म्याची पूजा करावी. पण एवढ्यावरून कलहपरायण व्हावें, असा याचा अर्थ नाहीं; तर सज्जनांच्या हृदयांतील चंद्रासारख्या शीतळ व अत्यंत रूढ झालेल्या माधुर्यधर्मिणी मैत्रीनें हृदयस्थ आत्म्याचें पूजन करावें. ( कलहादिकांचा प्रसंग आला असतां-- ) हृदयांतील उपेक्षा, करुणा, मुदिता व क्रोधादिकांचा निग्रह करण्याचें सामर्थ्य या शुद्ध पद्धतीनें ज्ञानानें आत्म्याचें पूजन करावें. भोगांच्या समूहांतील अकस्मात् प्राप्त झालेल्या व कांहीं काळ टिकणाऱ्या एकाद्याच भोगानें आत्म्याचें पूजन करावें. निषिद्ध व अनिषिद्ध अशा दोन्ही प्रकारच्या विषयांच्या त्यागानें सर्वदा आत्मपूजन करावें, हा मुख्य पक्ष व क्वचित् अनिषिद्ध पदार्थांचा भोग घेऊन त्याचें पूजन करणें, हा गौण पक्ष आहे. इष्टानिष्ट विषय समूहाचा अयुक्तमय मनानें त्याग करून व युक्तमय मनानें त्याचा स्वीकार करून सर्व पदार्थांचा भोक्ता जो ईश त्याचें पूजन करावें. जें जें आपल्यापासून नष्ट झालें असेल त्याची उपेक्षा व जें जें यदृच्छेनें प्राप्त होईल त्याचें ग्रहण निर्विकार चित्तानें करावें हेंही आत्म्याचें श्रेष्ठ पूजन आहे. सर्वदाच समग्र इष्टानिष्ट दृष्टींमध्यें परम साम्य ठेवून नित्य आत्मपूजाव्रत करावें. सर्व ब्रह्मच आहे, अशा दृष्टीनें सर्व अत्यंत शुभ आहे, असेंच पहावें. सर्व ब्रह्माश्रित मायामय आहे अशा दृष्टीनें शुभाशुभ म्ह० अत्यंत मिश्रस्वरूप आहे, असें पाहावें म्हणजे यांतील कोणतीही दृष्टि जरी ठेविली तरी तिच्यामध्यें वैषम्याचें कांहींच कारण नसल्यामुळें सर्व आत्ममय आहे, असें जाणावें; व अशा रीतीनें नित्य आत्मपूजाव्रत करावें. जें विचार करीपर्यंत रमणीय वाटतें, व जें विचार करीपर्यंत अत्यंत दु:सह वाटतें. तें सर्व वर सांगितल्याप्रमाणें अगदीं सम आहे, असें जाणून नित्य आत्मपूजाव्रत करावें. हा मी व हा मी नव्हें, हा विभाग-हा भेद सोडावा व सर्व ब्रह्म आहे, असा निश्चय करून नित्य पूजाव्रत करावें. सर्वदा प्राप्त सर्व आकारानें विकार पावणाऱ्या सर्व प्रकारच्या नांवानीं व रूपांनीं सर्वात्मक आत्म्याचें पूजन करावें. इष्ट व अनिष्ट या दोघांचाही अनात्मबुद्धी त्याग करून व स्वात्ममात्रताबुद्धीनें त्या दोघांचाही स्वीकार करून नित्य आत्मपूजन करावें. सागर जसा प्राप्त नद्यांना आपण निर्विकार राहून आपल्या स्वरूपांत साठवितो त्याप्रमाणें दैववशात् स्वभावत: प्राप्त झालेल्या सुखदु:खहेतुभूत विषयांची वांच्छा न करतां व त्यांचा त्यागही न करतां, भोग घ्यावा. अपमानादि तुच्छ दृष्टीमध्यें व वध-बंध-सर्वस्वनाश इत्यादि अतुच्छ दृष्टीमध्यें प्राप्त होणारा जो उद्वेग त्याच्या

वश होऊं नये, तर निरनिराळ्या वाकड्या तिकड्या विचित्र वस्तूमध्यें आकाश जसें सारखेंच असतें तसें उद्वेग न मानतां रहावें. देश-काल-क्रिया इत्यादिकांच्या योगानें जें. शुभाशुभ प्राप्त होतें त्याचें निर्विकारमनानें ग्रहणकरून त्यानेंच आत्म्याचें पूजन करावें. ( अहोपण ! भोग्यद्रव्यापासून दुःखसुखादि अनेक प्रकारचे विकार होतात. तेव्हां त्यांचें निर्विकार चित्तानें सम रसानें ग्रहण कसें करतां येईल ? उत्तर--) या आत्मपूजनविधीमध्यें जे अनेक प्रकारचे द्रव्य समूह सांगितले आहेत, ते व सर्व एकाच समरसानें चिंतले आहेत. त्यांना आत्मरूप मानल्यामुळें ते सर्व मधुर एकस्वभाव झाले आहेत. त्यामुळें ते म्लान नाहींत, कडू नाहींत, तिखट नाहींत, तुरट नाहींत. स्वभावत: ते जरी विचित्र रसयुक्त असले तरी आत्मभावनेनें ते खरोखर मधुरच आहेत. समता मधुर आहे, रम्य आहे, ती अतींद्रिय आनंदशक्ति आहे, म्ह० समता हा साक्षात् आत्माच आहे. यास्तव त्या समतेनें ज्याची भावना केली जाते तें विषयजांत एका क्षणांत अमृत होतें. समतारूप अमृतरूपानें ज्याची ज्याची भावना केली जाते तें तें सर्व चंद्रापासून गळणाऱ्या अमृताप्रमाणें माधुर्यास प्राप्त होतें. ब्रह्मैक्यदर्शनरूप समतेनें स्वत: आकाशाप्रमाणें होऊन, मन लीन झाल्याप्रमाणें अनायासानें, व निर्विकार सत्तेनें जें राहणें तेच ईशपूजन होय. पूर्णचंद्राप्रमाणें संतुष्ट स्फटिक मण्याप्रमाणें स्वच्छ, अत्यंत समप्रकाशरूप व चिद्घन, आंत आकाशाप्रमाणें स्वच्छ, बाहेर प्रकृत कार्य करणारा, व आसक्तिरूप धुक्यापासून मुक्त झालला, असा तत्त्वज्ञच माझा पूजक आहे. स्वप्नांतही ज्यानें काम पाहिलेला नाहीं, ज्याच्यांतील अज्ञानरूपी अभ्रांचा क्षय झाला आहे, व त्यामुळें ज्याच्यांतील अहंता इत्यादि धुकें नाहींसें झालें आहे असा तत्त्ववेत्ता शरत्कालच्या आकाशाप्रमाणें शोभतो. यास्तव हे वसिष्ठा ! तूं आनंदामृतपरिपूर्णत्वामुळें सोमच होऊन, निष्कलंक स्वप्रकाशाच्या आधिक्यामुळें सूर्य होऊन ज्यांत मातृ-मान-मेय या मनोवृत्ति शांत झाल्या आहेत, असा होऊन, नुकत्याच प्रसूत झालेल्या बालकाच्या विज्ञानाप्रमाणें विकल्पविस्तारशून्य होऊन, चिदाभास व चित्त यांच्या मूळभूत स्वात्मशिवाला अत्यंत शांत मनानें पहात जीवन्मुक्तपदांतच स्थित हो, त्याच भावनेनें तूं रहा, तीच परा पूजा होय. देश, काल, साधनें यांच्या क्रमानें उत्पन्न झालेल्या सर्व वस्तूसंबंधीं सुखदुःखविभ्रमांनीं तूं शरीरनायकाची नित्य पूजा कर व जिचे सर्व मनोरथ शांत झाले आहेत अशा बुद्धीनें रहा.

---

## सर्ग ४०

—:०:—

१० पूज्य पूजक-पूजादिरहित परिशुद्ध चिदात्मा शिवच देवतातत्त्व आहे.

श्रीईश्वर:--तुझ्या सारखा आत्मवेत्ता यथाकालीं व यथाशक्ति जें करतो व जें करीत नाहींत, ते सर्व चिन्मात्र शिवस्वरूप अन्तरात्म्याचें पूजन आहे. त्या तसल्या पूजनानेंच तसल्या परमार्थिक स्वरूपानें स्थित असलेला ईश्वर आल्हादास म्ह० निरतिशय आनंदाभिव्यक्तीस व प्रकटतेस-आवरणभंगास प्राप्त होतो. ( त्याच्या वरील स्वाभाविक आवरणाचा भंग होऊन त्याचा पूर्ण आनंद प्रकट होतो. अहोपण, कोणत्याही प्रकाकाची स्वाभाविक चेष्टा रागद्वेषमूलक असते. त्यामुळें ती अनर्थालाच कारण होते. तव्हां ती पूजा कशी होऊं शकेल ? उत्तर--) राग-द्वेष इत्यादि शब्दांचे अर्थ अमल आत्म्याच्या ठिकाणीं, अग्नीच्या ठिकाणीं अग्नीचे कणाप्रमाणें त्याहून पृथक् संभव नाहींत. संपत्ति, दारिद्य

सुख, दुःख, भूक, तहान इत्यादिक आपल्या ठिकाणीं किंवा दुसऱ्याच्या ठिकाणी समर्पण करणें हें आत्म्याचें पूजन आहे. कारण व्यावहारिक पूजेंतही देवावर पुष्पें, पानें इत्यादिकांचा उपचार केला जातो. अर्थात नित्य शिवस्वरूप प्रत्यगात्म्याच्या ठिकाणी आकाशादि रूप व जाग्रदादिरूप विश्वाचा आरोप करणें हीच पूजा आहे. जसें ब्रह्म आकाशादिकापासून क्रमानें घटादिकांपर्यंत स्वतः त्या त्या रूपाचें बनतें, त्याप्रमाणें स्वतः प्रत्यगात्माहि जाग्रदादि क्रमानें घटादि रूपाचा केला जातो. ह्याप्रमाणें एक, शिवरूप, शांत ब्रह्म किंवा आत्मा स्वतः जगत्प्रत्ययरूपत्वास प्राप्त झाला आहे, जग स्वतः म्हणून अशाश्वित असतांना त्याच्या भासानें भास्वरसें दिसत आहे. व त्याच्या सत्तेमुळें हें सत्तायुक्त झालें आहे. याप्रमाणें विचार केला असतां स्वात्माच आतल्या आंत विस्मृतिमान्-सा होऊन जीवादिस्वरूप व घटादि इतर जगद्रूप होऊन राहिला आहे, हें खरोखर केवढें आश्चर्य आहे. सर्वात्मक, अनन्त, कल्याणस्वरूप आत्म्याला हा पूज्य-पूजक-पूजा ह्या त्रिपुटी परिच्छेदरूप विभ्रम कोणत्या कारणानें झाला ? त्याला कांहीं कारण नाहीं, म्हणूनच तो मिथ्या आहे. हे ब्राह्मणा ! ज्या नियत आकारतेंत पूज्य-पूजादिमय क्रमाचा संकल्प केला जातो,ती नियत आकारिता[१] शांत ईश्वराचे ठिकाणीं संभवत नाहीं. नित्य पूज्य-पूजादिकांनीं मर्यादित झालेला देव निर्मलस्वरूप, अनंत, सर्वशक्तिमान् ईश्वरत्वाचें भोजन--पात्र होत नाही. हे वसिष्ठा ! त्रिभुवनात पसरलेल्या, अत्यंत स्वच्छ, संविद्रूप. ईश्वर आत्म्याच्या आकृतीचा नुस्ता शब्दांनीं निर्देश करतां येत नाहीं. हे विद्वान् ! ज्यांचा परमेश्वर देश-काल-परिच्छिन्न असतो ते, आज्ञा आत्मज्ञाना उपदेश्य-उपदेश करण्यास योग्य आहेत. यास्तव त्या अज्ञाची दृष्टि सोडून व मीं सांगितलेल्या या दृष्टीचा आश्रय करून सम, स्वच्छंचित्त, शांत, निष्काम व निरुपद्रव हो. यदृच्छेनें प्राप्त झालेल्या विषयभोगरूप उपहारांनीं व सर्व प्रकारें सुख-दुःख शुभाशुभांनीं खिन्न चित्त न होता आत्म्याची पूजा करीत रहा. ज्यानें जीवाला उपाधिरहित केलें आहे, अशा अमानित्वादि गुणयुक्त, त्यामुळेंच एक स्वतत्त्व जाणणाऱ्या, व मायाकलंकरहित असलेल्या आणि मायाकार्यरूप प्रपंचशून्य झालेल्या तुझ्या ठिकाणीं जन्म-दुःख इत्यादि कांहीं लागत नाहीं. ज्याप्रमाणें स्फटिकमण्याच्या नव्या गृहात नाना रंगांच्या वस्तु असून त्या त्यांत जरी प्रतिबिंबित होत असल्या तरी त्यांचा कलंक जसा स्फटिकमण्याला लागत नाहीं, त्याप्रमाणें तुला सुखदुःखादिकांचा लेप लागत नाही.

१. मर्यादित आकारत्व परिच्छिन्न-रूपत्व, असा याचा भावार्थ.

---

# सर्ग ४१

१. शास्त्र आचार्य इत्यादिकांचें साफल्य. २. नामभेदाची कल्पना. ३. अध्यारोपाचा क्रम. ४. अपवाद

**श्रीवसिष्ठः**---हे देवा ! ब्रह्मामध्यें जर शब्दाची प्रवृत्तिच होत नाहीं तर त्याला शिव का म्हणतात? परब्रह्म कसें म्हणतात ? हे नाथ ! त्याला आत्मा का म्हणतात ? परमात्मा कशासाठीं म्हणतात ? हे भगवान् ! त्रिलोकेशः तत्, सत, किंचित्, न किंचित्, शून्य, विज्ञान, इत्यादि नामभेद कोणत्या कारणानें केला जातो ?

**श्रीईश्वरः**---येथें आदि-अंतरहित, स्वयंप्रकाश व सत्, असें कांहीं विद्यमान आहे, पण तें इंद्रियांचा विषय होत नसल्यामुळें

' न किंचित्-'कांहीं नाहीं, असें होऊन राहिलें आहे.

श्रीवसिष्ठः---हे ईश्वर ! जें बुद्ध्यादिकांसह कोणत्याही इंद्रियाचा विषय होत नाहीं ' तें आहे, ' ह्याबद्दल अधिकारी शंकारहित होऊन त्याच्याकडून तें कसें जाणलें जातें ? ब्रह्माचें ज्ञान होण्याला योग्य उपायच नसल्यामुळें त्याचा साक्षात्कार कसा होणार ?

श्रीईश्वरः---वेदान्तवाक्यरूप प्रमाणापासून त्याचा उत्पन्न झालेला शुद्धसात्त्विकभाग परिणाम ब्रह्माकारवृत्ती बनते, व तिनें अविद्येचें आवरण घालविलें जातें. आवरण गेलें असता ब्रह्म स्वप्रकाशच असल्यामुळें आपोआपच तत्त्वतः भासतें. हाच त्याचा साक्षात्कार होय. बुद्धि-वृत्तींत अभिव्यक्त झालेल्या चिदाभासानें ब्रह्माला व्यापणें हा साक्षात्कार नव्हे. कारण तो चिदाभास जड पदार्थांनाच व्यापूं शकतो, चेतन ब्रह्माला तो व्यापूं शकत नाहीं. मोक्षाची इच्छा करणारा मनोलक्षण मुमुक्षु शम-दमादि साधनांनीं संपन्न झाल्यावर तो केवल सात्त्विक अविद्यांशानें राहतो. तो सच्छास्त्र, सद्गुरु सत्सग इत्यादि नांवाच्या सात्त्विकच अविद्याभागांनीं संपादन केलेल्या श्रेष्ठ श्रावण-मनन-निदिध्यासन साक्षात्कारापर्यंत स्ववृत्तिपरंपरेनें श्रेष्ठ अविद्येचें तिच्या कार्यासच क्षालन करीत येथें राहतो. युक्ति जाणणारा परीट वस्त्रांचा मळ साबण वगैरे मळानेंच जसा घालवितो त्याप्रमाणेंच तो स्वच्छास्त्रादि सात्त्विक अविद्यांशानें अविद्यशांला घालवितो. त्यानंतर यदृच्छेनेंच अविद्येचा क्षय झाला असतां स्वतःच आत्म्यालाच पाहतो, हाच आत्मस्वरूपाचा निश्चय होय. ज्याप्रमाणें एकदा बालक दोन हातांत दोन कोळसे घेऊन ते एकमेकांवर घासूं लागला असतां त्याचे हात काळे होतात; व तो तें घांसण्याचें काम एकादां हात धुतल्यावर पुनः पुनः करीत राहिल्यास हात धुतले तरी ते स्वच्छ होत नाहींत; पण ते दोन्ही कोळसे अगदी संपेपर्यंत घासून त्याची खालीं पडलेली काजळीही हातांनीं पुसून नंतर हात धुतले तर आपल्या स्वाभाविक सौन्दर्यानें जसें चमकूं लागतात त्याप्रमाणे शास्त्रादि दुसऱ्या अविद्याभागाच्या साह्यानें आत्मविचार केला असता सात्त्विक व तामस अविद्याभाग नाश पावतो व त्यानंतर लागलाच स्वप्रकाश आत्मा आपोआप स्वरूपानें अभिव्यक्त होतो. बुद्धीनें आपण विचार करतो असें जरी भासलें तरी वस्तुतः बुद्धि जड असल्यामुळें ती स्वतः विचार करूं शकत नाहीं, तर आत्माच बुद्ध्यादि उपायांनीं विचार वगैरे करून अविद्येला बाधित करतो, व तोच आपण आपल्याला पाहतो. येथें आत्माच आहे, अविद्या नाहीं, असा निश्चय होणें हाच अविद्येचा क्षय आहे, असें विद्वान् समजतात. म्हणून आपल्याला ह्या ज्या अनेक वस्तु दिसतात, ते आत्मा नव्हे व गुरु-शास्त्रादि अनेक उपायांचें क्रम प्रतीत होतात, तो त्या आत्म्याच्या ज्ञानाचीं खरीं साधनेंही नव्हत, कारण आत्मस्वरूप व त्याचें ज्ञान याना साधनाची अपेक्षा नसते. गुरूपदेशादि क्रमही आत्मज्ञानाचें कारण नाहीं, कारण इंद्रियानीं बनलेलें जें पुर्यष्टक तद्रूप गुरु आहे; व ब्रह्म सर्व इंद्रियाचा क्षय झाल्यावर ज्ञात होणारें आहे. जी जी वस्तु ज्याचा क्षय झाल्यावरच प्राप्त होणारी असते ती, तो वस्तु विद्यमान असेपर्यंत प्राप्त होत नाहीं. तर मग गुरुशास्त्रादि सर्व व्यर्थच आहे कीं काय, म्हणून विचारशील तर तसें नाहीं. कारण हे वसिष्ठा ! वस्तुतः तीं जरी साक्षा-

१. दीर्घ अभ्यासानें काकतालीय न्यायानें भाग्याचा उदय, परिपाक होऊन उत्पन्न झालेल्या पूर्ण ब्रह्माकारावृत्तीनें अविद्येचा निःशेष उच्छेद होतो, त्यामुळें तो आपोआपच व्यक्त होतो.

त्काराचीं कारणें नसलीं तरी तीं अत्यंत कारण-रूप झालीं आहेत. गळ्यांतील विस्मृत झालेल्या दागिन्याची आठवण करून देणाऱ्या मनुष्याचें वचन जसें त्या दागिन्याच्या प्राप्तीचें कारण होतें त्याप्रमाणें गुरूपदेशादि क्रम आत्म्याचें कारण करून देण्यास कारण होतात. गुरूपदेशाचे क्रम प्रवृत्त झाले असतां शिष्याला परोक्ष बोध होतो व साधनानुष्ठानानें अनिर्देश्य व अदृश्य असलेलाही आत्मा स्वतः अभिव्यक्त होतो. वस्तुतः आत्मा शास्त्रार्थांनीं जाणला जात नाहीं व गुरूंच्या वचनानें समजला जात नाहीं, तर तो स्वतःच आपल्या बोधाच्या बळानें प्रतीतीला येतो. पण गुरूपदेश व शास्त्रार्थ यांच्यावांचून आत्म्याचा परोक्ष बोध होत नाहीं, कारण त्याचा संयोगाची सत्ताच आत्मज्ञानाला प्रकाशित करणारी आहे. दिवस असला म्हणजे जसा सर्व जावाचा व्यवहार होतो, तसें गुरु, शास्त्र व शिष्य यांचा चिरसंयोग झाला असतां आत्मज्ञान प्रवृत्त होतें. कर्मेंद्रियें, ज्ञानेंद्रियें. इत्यादिकांपर्यंत सर्व सुख-दुःखांचा क्षय झाला असतां सर्व मलरहित परमानन्दपूर्ण जो आत्मा अवशिष्ट राहतो तो शिवच 'तत्' 'सत्' इत्यादि नावांनीं सांगितलला आहे. जेथें हें सर्व जगत् नाहीं किंवा तें आत्मरूपानें आहे तें आकाशाहूनही अधिक स्वच्छ व अनन्त ब्रह्म व्यावहारिक सत्तेहून भिन्नस्वरूपानें म्ह० अबाधित सत्तेनें आहे. अधिकारी जनांना बोध करण्यासाठीं जीवन्मुक्तांना शास्त्रार्थरचना करावी लागते. पुराण, वेद, सिद्धान्त, बादरायणाचीं सूत्रें इत्यादिकांचें सार्थक्य दाखवावें लागतें. त्यासाठीं विचित्र जगाचें व शुद्ध तत्त्वाचें मनन करणाऱ्या व देहासह व्यवहारांत राहणाऱ्या श्रेष्ठांनीं चित्, ब्रह्म, शिव, आत्मा, ईश, परमात्मा, ईश्वर इत्यादि संज्ञा या संज्ञारहित सर्वेश्वराचे ठिकाणीं कल्पिल्या आहेत. हे वसिष्ठा! या प्रमाणें हें ब्रह्म आकाशादि सर्व जगाच्या आरोपाचें अधिष्ठान असल्यामुळें आत्मतत्त्व आहे. जें सर्वदा सर्व प्रकारें सर्व वस्तूंचा सर्व भावांचा निर्वाह करणारें तें केवल ब्रह्मसुखच आहे, दुसरें कांहीं नाहीं, असा निश्चय करून तूं रहा. प्राचीन विद्वानांनीं शिव, आत्मा, परब्रह्म इत्यादि शब्दांनीं भिन्नता केवल कल्पिली आहे. पण वस्तुतः त्यांच्यामध्यें भेद नाहीं. हे मुनिनायका! याप्रमाणें नित्य देवार्चन करणारा ज्ञानी, ज्या परम शिवपदीं आमच्यासारखे एकेका गुणावर अभिमान ठेवणारे देव चाकरांप्रमाणें सृष्ट्यादि कर्म करीत राहतात, त्या परमपदीं जातो.

**श्रीवसिष्ठः**-- भगवन्! शुद्ध चितीमध्यें वस्तुतः अविद्यमान असलेलाच हा जीवभाव व त्याचें संसरण विद्यमान असल्याप्रमाणें कसें राहिलें आहे तें मला थोडक्यांत सांगण्यास तूं योग्य आहेस.

**श्रीईश्वरः**--हा जो ब्रह्मादिशब्दार्थ ती शुद्ध संविद् आहे, असें तूं जाण. अणूच्या मानानें मेरु जितका स्थूल आहे तितकेंच शुद्ध व सूक्ष्म—निरवयव आकाश या संविदेच्या मानानें स्थूल आहे; कारण आकाश सूक्ष्म असलें तरी जड आहे व ब्रह्म निरतिशय सूक्ष्म असून चित् आहे, त्यामुळें त्या दोघांत अत्यंत अंतर आहे. ती चित् जेव्हां विषयाची कल्पना करण्यास सज्ज होते तेव्हां ती चित्-चेतना क्रिया करणारी, या नावास योग्य होते, पण तीच जेव्हां निर्विषय होते तेव्हां निर्विकल्पसमाधींत प्रसिद्ध असलेल्या चिदानन्दैकरसस्वभावांत स्थित होते. विषयाची भावना करताच ती एका क्षणांत अहंतेला प्राप्त होते; स्वप्नांत पुरुष मी वनगज आहें, [illegible] कल्यामुळें एका क्षणांत आपल्या [illegible]ला विसरून जसा हत्ती बनतो, त्याप्रमाणें चित्

भावनेनें अहंकार बनते. या अहंतादि रूप चितूच्या दशत्वास व कालत्वास प्राप्त झालेल्या ज्या दुसऱ्या वृत्ति त्या हिच्या शून्यत्वभावासार-ख्याच होतात. त्यांनी परिवेष्टित झालेली चित् सत्ताच वायूच्या स्पंदसत्तेप्रमाणें आंत प्राणस्पंदरूप हास्साती जीवसंज्ञक होते. तशा प्रकारची जीव-शक्ति, निश्चय याच एका रूपानी झाली कीं, या नांवाची बुद्धि होते व ती अज्ञ बनते. त्यानंतर वाचिक, कायिक व मानसिक व्यव-हाराचे संस्कार उद्बुद्ध झाल्यामुळें तीच अहंता-क्रमाचे शब्दशक्ति क्रियाशक्ति व ज्ञानशक्ति यांनीं युक्त होते आणि याप्रमाणें प्रत्येक वस्तूमध्यें ती आपलें तात्त्विकरूप अत्यंत झांकून ठेवून स्फुरण पावते. हा सर्व सत्तांचा समूह एकत्र जमून लागलाच स्मृतीला अनुकूल करून घेतां, व मन होतो. तेंच संकल्पवृक्षाचें जीवत्वरूप बीज आहे, तेंच 'आतिवाहिक देह' या नावांस पात्र आहे, असें ज्ञानी जाणतात. तें अन्तःस्थ ब्राह्मशक्तीनें ज्ञरूप असून स्वतःच स्वतःला पाहणारें आहे. प्रथम या चित्तामध्यें पुढील शक्ति उत्पन्न होऊन मागाहून त्या वस्तुतः बाहेर जरी उदय पावत नसल्या तरी उदय पावत असल्यासारख्या दिसतात. वातसत्ता, स्पन्दसत्ता स्पर्शसत्ता, त्वक्सत्ता, तेजःसत्तेला प्रकाशित करणारी चक्षुःसत्ता, रूपसत्ता, जल-सत्ता, माधुर्यसत्ता, रसनेंद्रियसत्ता, गंधसत्ता, भूसत्ता, ब्रह्मांडाच्या सुवर्ण रजतमय कपालांची सत्ता, फार मोठी ब्रह्मांडपिंडसत्ता, सर्व पदा-र्थांनीं संपन्न व निराकार देशसत्ता आणि काल-सत्ता या सर्व सत्ता प्रथम चित्तांत उदय पावून मागाहून बाहेर असल्यासारख्या भासतात. ज्याप्रमाणें वृक्षांचें बीज उत्तरोत्तर परिणाम पावून अंकुर, कांड, शाखा, पानें, इत्यादिकांस आपल्या स्वरूपांत अन्तर्भूत करून स्फुरण पावतें त्याप्रमाणें हें पुर्यष्टक या सर्व समूसत्ता-हास स्वरूपाप्रमाणें तादात्म्यानें आपल्यामध्यें अन्तर्भूत करून स्फुरण पावतें. अशारीतीनें ज्यानें आपल्यामध्यें सर्व सत्ताचा संग्रह केला आहे त्या स्वरूपास पुर्यष्टक समज. हा वासना-रूपानें आतिवाहिक देह आहे. अपरिच्छिन्न चैतन्य हेंच ज्याचें स्वरूप आहे असें ब्रह्मच वर सांगितलेल्या विकारांनी स्फुरण पावतें. हे वसिष्ठा! याप्रमाणें हें सर्व अज्ञदृष्टया बनलें आहे, पण तत्त्वदृष्टया कांहीं बनलेंच नाहीं; ज्ञान नाहीं, पुर्यष्टकरूप नाहीं व ठिकठिकाणीं चिदाभासानें व्यापलेलें चेतनही नाहीं, तर सागरांत जलाच्या द्रवाचा जसा विलास चालतो त्याप्रमाणें केवल परतत्त्वामध्यें केवल श्रेष्ठ आत्मतत्त्व स्फुरण पावलेलें आहे. कारण हें सर्व दृश्य संविदच आहे, असें जाणलें असतां तें एकात्मक होतें, पण तेंच संविदेहून पृथक् केलें असतां अचेतन होतें, त्यामुळें कोणत्याच प्रकारें तें जिवंत रहात नाहीं, त्याला आत्मरूपानें जाणलें नाहीं तोपर्यंत तें संकल्पनगरासारखें बनून राहतें, पण त्याला स्वरूपानें जाणलें असतां तें शिवत्वासच प्राप्त होतें, तर मग जें अज्ञात असतें तेंच वस्तुत्वाला प्राप्त कसें होतें? असें विचारल्यास यावर कोणी म्हणेल की, स्वतः चिन्मात्रस्वभाव असलेलेंही ब्रह्म 'मी बहु व्हावें' या संकल्पानें स्वतःमध्यें दृश्यांशत्वाला प्राप्त होतें, पण जें जें संकल्पानें कल्पिलेलें तें तें सर्व मिथ्या असतें. त्यामुळें त्या अतिसूक्ष्म आत्म्याची सत्ता तन्मा-त्रस्वभावानें प्रथम कल्पिलेल्या सूक्ष्म देहांतच दीर्घ अभ्यासामुळें स्थूलत्वास पाहाते. नंतर स्थूल देहाच्या संबंधानें आंतील चार[1] कोश व बाह्य विषयजात हें सर्व तत्काल स्थूलत्वास प्राप्त झालेलें ती पाहते. बाह्य रूपादि विष-

१. आनंदमय, विज्ञानमय, मनोमय व प्राण-मय हे चार कोश.

याच्या दर्शनासाठीं त्या अन्नमय कोशरूप स्थूल देहांत आत्मा आपापल्या विषयग्रहणांत व्यवस्थित असलेलीं चक्षुःश्रोत्रादिरूप तन्मात्र-द्वारें पाहतो, त्यानंतर हात-पाय इत्यादि अवयवांच्या संघातरूप देहांत व आंतील प्राणमयादि कोशांत पुरुषाकारानें एकत्वाची भावना केल्यामुळें तो पुरुषाकृति पाहतो. त्या आकारानें आपण व्यवहार करण्यास समर्थ आहों, असें पाहून तो अतिशय हृष्ट व पुष्ट होतो. ज्याप्रमाणें गंधर्वनगर किंवा स्वप्नांतील पुरुष दृष्टीनें पाहिलासे वाटतें. त्याप्रमाणें वस्तुतः असत् असलेल्याच देहाला तो जिव या व्यवस्थेंत आहे असें पाहतो.

श्रीवसिष्ठः—भगवन्! हें जगत गंधर्वनगरासारखें व स्वप्नातील मनुष्यासारखें जरी असलें तरी तें दुःख देतें. यास्तव त्या दुःखाचा क्षय होण्यास कोणता उपाय आहे ?

श्रीईश्वरः—वासनेमुळें दुःख होतें, जगत् विद्यमान आहे, असें समजल्यानें ती वासना होते. पण जगत्, अविद्यमान असून मृगजळाप्रमाणें ज्ञानानें बाधित होणारें आहे. जगत् अत्यंत असत आहे, असा दृढनिश्चय झाला असतां वासनेचा आश्रय जो विषय त्याचाच अभाव होतो. मग पुरुष वासना कशाची धरणार? कोणत्या साधनानें, व कोणत्या हेतूनें वासना संभवणार? वसिष्ठा! स्वप्नांतील पुरुष मृगजळ कसा पिणार? अहंता; मन, मनन, दृष्टा, इत्यादिकांसह सर्व जगत् अविद्यमान आहे. असें ठरलें असतां जें केवल ज्ञानस्वरूप सत् तेंच अवशिष्ट राहतें. त्यांत वासना नाहीं, वासना धरणारा जीव नाहीं. व वासनेचे विषय नाहींत; तर केवल शुद्ध केवलीभाव आहे,

२. अर्थात् वासनाक्षय होईपर्यंत जगत् मिथ्या आहे असा दृढ निश्चय करणें हाच दुःखनिवृत्तीचा उपाय आहे.

त्याच्या ठिकाणीं सर्व कल्पनाभ्रम अत्यंत शांत झाला आहे. व्यावहारिक सत्य किंवा प्रातिभासिक असत्य यक्ष ज्या प्रौढ मनुष्याच्या दृष्टीनें शून्य असल्यामुळें नित्य क्षय पावलेलाच असतो त्याला कैवल्यावांचून दुसर काय अविशिष्ठ राहणार? कांहीं नसतांनाच वेताल आहे असे जसें भासतें तशीच ' जगत् ' या नांवाची ही चित्तवासनाही उदय पावली आहे, तिची शांति झाली असतां अक्षय शांति प्राप्त होते. तें अहंतेमध्यें जगांत मृगजळांत आस्था ठेवतो त्या वृथा नराला धिक्कार असो, त्याला केव्हांही उपदेश करूं नये. विवेकी जीवालाच तत्त्वज्ञ येथें उपदेश करितात. आर्यांनीं ज्याची उपेक्षा केली आहे व जो अत्यंत भ्रांतिशाली आहे अशा मूर्खाला ते उपदेश करीत नाहींत, जो अज्ञाला उपदेश करतो तो आपली सुंदर कन्या स्वप्नांत पाहिलेल्या पुरुषालाच देतो.

# सर्ग ४२

:*:—

१. ईशादि भासद सर्व समष्टि व्यष्टिसंसारकल्पना मायाच आहे, असा उपदेश करून शंभु स्वस्थानीं गेला

श्रीवसिष्ठः—भगवन्! कल्पाच्या आरंभींचा जो अध्यासाचा क्रम आपण वर सांगितला त्यांत ' नंतर आकाशस्थ जीवानें देहरूप संभ्रम पाहिला ' असें म्हटलेंत. त्यानंतर जीव कोणत्या अवस्थेस प्राप्त होतो ?

श्रीईश्वरः—जसा स्वप्न पहाणारा पुरुष अत्यंत सूक्ष्म नाड्यांमध्यें अत्यंत विस्तृत जगाला पाहतो त्याप्रमाणें तो जीव अत्यंत सूक्ष्म चिदाकाशांतही पूर्वोक्त क्रमानें शरीर बनलें आहे, असें पाहतो. चिद्घन सर्वत्र व्यापून राहिलेला आहे, त्यामुळें तो शरीरांतील अत्यंत सूक्ष्म नाड्यांत

जरी प्रविष्ट झालेला असला तरी त्याच्या सर्व-शक्तिमत्त्वाला बाध येत नाहीं. स्वप्न पहाणारा पुरुष सर्व ब्रह्मांड कसें रचतो तें प्रसिद्ध आहे, शरीरधारी जीवही तसेंच हें सर्व ब्रह्मांड निर्माण करतो. तोच समष्ट्युपाधिक हिरण्यगर्भसंज्ञक जीव स्वात्म्यामध्यें व बाह्य वस्तूंमध्यें मी सनातन आहें, अव्यक्त आहें, पुरुष आहें, अशा नांवाचीहि कल्पना करतो, त्यामुळें प्रथम पुरुष म्हणून प्रसिद्ध झाला आहे. याच न्यायाने तो एकाद्या कल्पांत सदाशिव म्हणून प्रथम होतो. केव्हां तो 'विष्णु' असें म्हटला जातो. केव्हां तो नाभी-पासून उत्पन्न झालेला पितामह प्रथम होतो, कधीं कधीं तो पूर्वरामायणातल्याप्रमाणें आका-शापासून झालेला ब्रह्मा होतो. केव्हां केव्हां दुर्गा-भैरव-विनायकादि प्रथम होतात. तो संक-ल्पपुरुष संकल्पामुळें मूर्तिमान् झाला आहे. पुष्ट झालेला तो प्रथम संकल्पच समष्टिमूर्ति होऊन राहिला आहे. तो ज्याची जशी कल्पना करतो त्याचा तसा तत्काल अनुभव घेतो. पण तें सर्व शून्य वेताळाप्रमाणें असद्रूप आहे भ्रमदृष्टीनें सद्रूप आहे, असें भासतें. वसिष्ठा ! हा जगद्भ्रांति अशा-प्रकारची आहे. याप्रमाणें जो आदिपुरुष स्वतः उत्पन्न केलेल्या जगाचा द्रष्टा होतो तोच एक निमेषभर स्वरूपाचें पर्यालोचन केल्यानेंच चिदा-काशमात्र होतो, पण स्वरूपाला विसरल्यास एका क्षणांतच अनन्त अपार संसारांत पडतो. कल्पना करण्यास समर्थ असलेला पुरुष प्रतिभासाचा विपर्यास होतांच केवळ बहिर्मुख होऊन एका निमेषांत महाकल्पांच्या परंपरेचा अनुभव घेतो.

प्रत्येक परमाणूंत, प्रत्येक छिद्रांत, प्रत्येकक्षणीं, सर्ग, कल्प, महाकल्प, यांचे भाव व अभाव होतात. ते सर्गभेद जितक्या जीवांच्या एकसार-ख्याच वासनांचा उद्भव झाला असेल तित-क्यांना तितका काल दिसतात व त्यांचा परस्पर भेदव्यवहार होतो. पण कित्येकांना ते परस्पर दिसत नाहींत. अधिष्ठान अंशानें ते सर्वांना नित्य अपरोक्षच असतात, कारण सर्ग-रूपानें स्थित असलेल्या जीवाकडून ज्याची संभावना होत आहे असेच ते सर्ग संभवतात. पण ते परमार्थस्वभाव शिवाच्या ठिकाणीं संभवत नाहींत कारण तेथें ते सर्व आकाशस्वभावातच पर्यवसान पावतात. ते स्वतः सदसद्रूप आहेत. स्वप्नातील पर्वताप्रमाणें ते आपल्या अधिष्ठानांत लीन होतात. सर्गांनीं देशाचें आक्रमण केलें नाहीं. कालाला व्यापलेलें नाहीं. त्यांना कर्तेना नाहीं ! ते सत्स्वरूप नाहींत. सर्गांतील सत्त्व आरोपित आहे, असेंही म्हणतां येत नाहीं. कारण स्वतःच अध्यस्त असलेले ते सर्ग दुसऱ्या अध्या-साचें अधिष्ठान होऊं शकत नाहींत. वैशेषिकां-च्या सिद्धान्ताप्रमाणें त्यांना क्षणरूप सत्त्वही नाहीं. कारण त्यांचें क्षणरूप सत्त्वच जर मानलें तर त्याची प्रतीति येईपर्यंत त्याचें अवस्थान होऊं शकत नाहीं, प्रतीति [illegible] तरी त्याचें अस्तित्व मानावें म्हणून म्हटल्यास सशाच्या शिंगाचेंही अस्तित्व मानावें लागेल. शिवाय क्षणरूप सत्त्व मानल्यास [illegible] उत्पन्न होतें असेंही म्हणतां येणार नाहीं. त्याचा नाश होतो, असेंही म्हणतां येणार नाहीं, वास्तव चित्‌च संकल्पस्वरूपानें चित्-मध्यें चमत्कार करते, जगत् स्वप्नांतील नगराच्या उत्पत्तीप्रमाणें उत्पन्न होतें, वृद्धि पावतें व नाश पावतें. तें देशकालादि-कांशीं यत्किंचितही संबंध ठेवीत नाहीं. जसा पंकल्पपर्वत अनन्त देश-कालादिकांचें आक्रमण करतो असें जरी भासलें तरी वस्तुतः तो आक्र-

मी बहु व्हावें,' हा प्रथम संकल्पच सूक्ष्मभू-तांच्या उत्पत्तीच्या द्वारा पुष्ट होऊन तत्काल सम-ष्टिव्यष्टिमनोरूपांचें धारण करतो व हिरण्यगर्भादि रूप ज्या लोकांच्या प्रजेच्या वगैरे उत्पत्तीची जशी कल्पना करतो तशीच ती व्यवहाराला योग्य झालेली पाहतो, असा याचा भावार्थ.

मण करीत नाहीं, त्याप्रमाणें असत् जगत् देश-कालादिकांचें आक्रमण करीत नाहीं. त्याप्रमाणें उंच स्थित असलेल्या संकल्प मेरूनें देशकालादिकांचें आक्रमण केलें आहे असें जरी भासलें तरी वस्तुतः त्यानें त्याच आक्रमण केलेलें नसतें, त्याप्रमाणें असत् जगानेंही देशकालादिकांचें आक्रमण केल्याप्रमाणें भासलें तरी तसें केलेलें नाहीं. ऐहिक व पारलौकिक सर्व क्रिया करण्यास समर्थ असलेल्या या पुरुषानें आपल्या संकल्पानें हें विचित्र जगत् ज्या क्रमानें निर्माण केलें आहे, याचवर सांगितलेल्या क्रमानें तो क्षणांत कीट होतो. स्थावर योनी होतो आणि जीवांच्या स्वेदज वगैरे चार प्रकारच्या जाति बनतो, रुद्रापासून तृणापर्यंत सर्व वस्तुजात क्षणांत बनतो. यांत वासनाविकास प्रमाणें कांहीं पदार्थ परमाणूसारखे आहेत, कांहीं अणूसारखे आहेत. पण त्या सर्वांचा क्रम या सत् किंवा असत् जन्मांत हा असाच आहे.अशा प्रकारच्या तात्त्विक स्वरूपाची भावना केली. असतां या संसार मायेच्या भेदाची सर्वथा शांति होते आणि या परमार्थतत्त्वाच्या भावनेचा अभ्यास केला असतां शिवाचा साक्षात्कार होतो. परा चिति आपल्या स्वरूपापासून निमेषाच्या एक शतांश कालही जरी च्युत झाली तरी तेवढ्यामुळें ही संसाराची अनवस्था उदय पावते म्ह० चिदात्मा एक क्षणभर जरी बहिर्मुख झाला तरी दीर्घकालपर्यंत टिकणारा अनर्थ उद्भवतो. तत्त्ववेत्त्याकडून अनुभव घेतली जाणारी चित् जेव्हां शिलेंतील आकाशाप्रमाणें स्वरूपांत स्थित होते तेव्हां तीच अनादि नित्य प्रकाशरूप ब्रह्म म्हटली जाते. अभिमानाच्या वृद्धीनें हा सर्ग जसा जसा प्रौढीस प्राप्त होतो तसा तसा चिदात्म्याच्या प्रकाशाचा ऱ्हास होतो, आणि त्याची परिच्छिन्नता जशी जशी अधिक होऊं लागते तशी तशी आत्म्याला क्षुद्रता येते. त्याच्याशीं संबद्ध होणारे जे असत्य, दिशा देश व काल यांचे अंश त्याच्या योगानें आत्म्याला मशक, मुंगी, कीड, येथपर्यंत परम अणुता प्राप्त होते. हे वसिष्ठा ! देह, इंद्रियें इत्यादिकांनीं युक्त होणें, या क्रमानें जीवत्व प्राप्त झालेली चिति हरिणी, वेल, कीड, देव, असुर इत्यादि बनते आणि दृढ दोऱ्यांत ओवलेल्या माळेप्रमाणें तिच्यामध्यें गुंफलेलें हें सर्व विश्व राहतें. सत् व असत् पदार्थांनीं गुंफलेलें हें सर्व त्या अनन्त विश्वव्यापी विश्वकल्यामध्यें राहतें. पण त्या तत्त्वाचा विवेक झाला असतां तें दूर आहे, असें म्हणतां येत नाहीं, निकट आहे असेंही म्हणवत नाहीं, वर नाहीं व खालीं नाहीं, तें पूर्वीं होतें असें नाहीं, आज आहे, असेंही नाहीं; प्रातःकालीं असतें असें नाहीं. सत् नाहीं, असत् नाहीं, व मध्यस्थही नाहीं. याप्रमाणें सर्व विकल्पांचा त्याच्या ठिकाणीं अभाव असल्यामुळें स्वप्रकाशचैतन्यावाचून त्याचा अनुभव घेणारा दुसरा कोणी नाहीं.जिच्यायोगानें लौकीकव्यवहार होतात अशी प्रत्यक्षादि प्रमाणांची माळा त्या तत्त्वामध्यें पाण्यांत जसा अग्नि संभवत नाहीं त्याप्रमाणें कधींच रहात नाहीं. हे मुने ! तूं जसें विचारलें होतेस तसें तें सर्व मीं तुला सांगितलें आहे. तुझें कल्याण असो; आम्ही आतां इष्ट दिशेस जातों. पार्वति ! चल, उठ.

श्रीवसिष्ठः—असें बोलून तो नीलकंठ मीं पुष्पांजली अर्पण करितांच आपल्या सर्व परिवारासह आकाशकोटरांत निघून गेला. तो त्रिभुवनाचा अधिपति उमेश याप्रमाणें गेला असतां मी त्याच्या मागून एक क्षणभर चाललों व अगोदरच शमानें संपन्न असलेल्या मी, सुसंस्कृत व श्रद्धादिकांच्या योगानें पवित्र झालेल्या बुद्धीनें त्या श्रीगुरूचें स्मरण करीत त्यानें सांगितलेल्या नित्य अपरोक्ष देवाच्या पूजनाचें ग्रहण केलें; त्या पूजेचें अनुष्ठान करूं लागलों व पूर्वीचें जडदेवार्चन सोडलें.

# सर्ग ४३

—:*:—

१. वैराग्यासह स्वात्मरूप शिवाचें पूजन ऐकून राम ज्ञानी होऊन 'मी कृतकृत्य झालों आहें व त्याच पूजनात प्रतिष्ठित झालों आहें' असें वर्णन करतो.

श्रीवसिष्ठः—ईश्वरानें हें तत्त्वदर्शनामध्यें पर्यवसान पावणारें स्वात्मशिवाचें पूजन मला सांगितलें, व मी स्वतःही तें जाणतों. रामा ! हें जगत् कसें स्थित झालें आहे, त्याचें तत्त्व तूंही जाणतोस. ज्या संसारमायेंतील मिथ्याभ्रमात मिथ्या उपाधीमुळें बनलेल्या जीवाकडून हें मिथ्या जगत्च पाहिलें जाते, त्या संसारमायेंत सत्य काय असणार व असन्मय काय असणार ? एकदा कवि राजाचें मेरुरूपाने वर्णन करतो किंवा कल्पवृक्षाच्या रूपानें वर्णन करतो, तें ऐकून राजा संतुष्ट होतो व आपण मेरु किंवा कल्पवृक्ष आहों, असेंच क्षणभर समजतो, म्हणजे क्षणभर मेरुत्वादिकांचाच अनुभव घेतो. तसें जर नसतें तर हा कवि मिथ्यावादी आहे, असें म्हणून त्यानें त्याला शिक्षा केली असती, पण तसें न करितां तो राजा उलट त्याचा सत्कार करतो, व त्याला पुष्कळ वित्त देतो. तसाच जीवही मिथ्या कल्पनेला सत्य मानून संसारांत आनंद मानतो, पण पाण्यांत जसें द्रवत्व, वायूंत स्पंद व आकाशांत शून्यत्व तसें आत्म्यामध्येंच सृष्टिकर्तृत्व आहे. असो. रामा ! तेव्हांपासून मी सर्व व्यग्रता सोडून आजपर्यंत त्याच क्रमानें आत्म्याचें पूजन करीत राहिलों आहें. रामा ! व्यवहारानें युक्त असेही हे दिवस मी या पूजाविधीनें अखिन्न मनानें घालवीत आहें. जशा क्रिया व आचार प्राप्त होतील त्याप्रमाणें त्याच पुष्पांनीं मी आत्म्याचें पूजन करतों. झोंपेत माझें पूजन बंद पडते म्हणून तूं म्हणशील तर तसेंही नाहीं, कारण त्यावेळींही मी अविद्या वृत्तिरूप पुष्पान आत्म्याचें पूजन करतों. (मग इतर प्राणीहि तसेंच करतात, तेव्हां यांत विशेष फरक काय ?) ग्राह्य—विषय व ग्राहक इंद्रियादिक यांच्याशीं प्राण्याचा एकसारखाच संबंध होतो; पण योगी सावध राहून प्रत्येक संबंधस्थ पुष्पानें आत्मपूजन करतो व इतर पामर तें करीत नाहीत. हे रघुपते ! या दृष्टीनें या संसाररूपी विरल अरण्यांत संगरहित चित्तानें तूं विहार कर, म्हणजे खिन्न होणार नाहीस. धन, बंधु, इत्यादिकांच्या वियोगामुळें प्राप्त झालेल्या मोठ्या दुःखाचे वेळीं या दृष्टीचा आश्रय करून विचार कर. धन, बंधु, इत्यादिकांची प्राप्ति झाली असतां हर्ष मानूं नये व त्यांचा क्षय झाला असतां विषाद मानू नये, कारण या संसारातल्या सर्व गोष्टी अशाच नश्वर आहेत. पुरुषाला व्याकुळ करणाऱ्या या विषयाच्या विचित्र गति तूं जाणतोसच ते प्रथम कसे येतात, मागून कसे जातात व पुरुषाला आपलें व्यसन लावून कसे दुःखी करितात, तें तुला माहीत आहे. प्रेम व धन हीं दोन्हीं आकस्मिक कारणांनीं अशींच येतात व अशींच जातात. हे निर्मल रामा ! त्या जगत्क्रिया तुझ्या आंत नाहींत व तूं त्यांच्या आंत नाहीस, असें हें सर्व जगत् अत्यंत तुच्छ आहे, मग उगीच कां संतप्त होतोस ? तूं जर जगाची तुच्छता इच्छीत नसशील तर हें चिद्रूप अनन्तात्मन् ! तूंच जगद्रूप आहेस, तुझा आत्माच जगत आहे, असें पहा. तसें पाहिल्यानेंही तुझ्या बंधादिकांचा वियोग होऊन तुला हर्षशोकाची प्राप्ति होणार नाहीं. कारण आत्माच जग आहे. असें पाहिल्यावर त्यांतील कांहीं जरी गेलें व कांहीं आलें तरी तें आपले अवयव फिरविल्याप्रमाणेंच तुला वाटेल. बाबा ! तू चिन्मात्ररूप आहेस, व हें

जगत् तुझ्यापासून भिन्न नाहीं, तेव्हां यांतलि 'हें ग्राह्य आहे व हें त्याज्य आहे' अशी तुझी कल्पना कशी व कशाबद्दल होणार? याप्रमाणें चिन्मय जगत्सागरांत चिच्चक्राचें चांचल्य जरी अनुभवास आलें तरी त्यांत हर्ष व शोक यांना अवकाश कोठें आहे? समुद्रांत लाटा उठूं लागल्या म्हणजे तो दुःखी व त्या शांत झाल्या म्ह० सुखी होत नाहीं! यास्तव हे रामा! तूं चिदेकरूपत्वास प्राप्त हो. सुषुप्त स्थितीला प्राप्त हो, म्ह० झोंपेंत तुला जसें द्वैत दिसत नाहीं तसें जागृतींतही आत्मतत्त्वाहून निराळें कांहीं पाहूं नकोस. हे रामा! आजपासून तूं तुर्यावस्थारूप हो. सागराप्रमाणें तूं स्वतः परिपूर्ण व सम हो. जगदाभास केवळ एक जिनसी ब्रह्मरूप आहेत, असें पहा. तूं स्वयप्रकाशस्वरूप, व उदारबुद्धि हो, आणि सतत आत्मपूजनामध्यें रत होऊन रहा. रामा! तूं हें सर्व एकलें आहेस. तूं आतां परिपूर्णबुद्धि होऊन राहिला आहेस. आतां आणखी तुला कांहीं विचारावयाचें असेल तर विचार. तूं वैराग्यप्रकरणांत जे प्रश्न केले होतेस त्यांतील कांहीं अजून राहिले असतील, तर हे रघुनन्दना! ते आतां विचार.

श्रीरामः—महाराज! आतां माझा संशय निःशेष निवृत्त झाला आहे. मला जें जाणावयाचें होतें तें सर्व मीं जाणलें आहे. माझी अकृत्रिम तृप्ति झाली आहे. हे मुने! अज्ञान नाहीं, जीव-ब्रह्मभेद नाहीं, विषय नाहीं. व त्याची कल्पना करणारें मन नाहीं. त्यावेळीं माझ्या ठिकाणीं अज्ञान होतें, पण तें आतां शांत झालें आहे. आत्म्यामध्यें सुखदुःखादि कलंक आहे. अशी अज्ञानामुळें मला जी भ्रांति होती ती आतां तुमच्या प्रसादानें निवृत्त झाली आहे. आत्मा उत्पन्न होत नाहीं, मरत नाहीं, त्याला संसाररूप कलंकही नाहीं, हें सर्व ब्रह्ममय आहे, असें मीं जाणलें आहे. प्रश्न, संशय व वांच्छित यांपासून मुक्त झालेलें माझें मन विश्वकर्म्यानें चक्रावर ठेवून पाजळून चकचकीत केलेल्या सूर्याप्रमाणें अतिशय शुद्ध व निर्मल झालें आहे. साधूंनीं प्राप्त झालेल्या शिष्यांना उपदेश केलेल्या सर्व साधनांविषयीं मी आतां निराकांक्ष झालों आहें. मेरुपर्वत सोन्याविषयीं जसा निरिच्छ असतो त्याप्रमाणें साधनाविषयीं मी निरिच्छ आहें. ज्याविषयीं मला आशा आहे, असें कांहीं नाहीं, मला इष्ट असें कांहीं उरलें नाहीं, या चराचर जगांत मला आदेय—ग्रहण करण्यास योग्य असें कांहीं नाहीं, हेय-त्याज्य कांहीं नाहीं व उद्देश्यही काही नाहीं. हें त्याज्य आहे, हें ग्राह्य आहे, हें सत आहे व हें असत् आहे अशा प्रकारचा माझा चिंताभ्रम पूर्ण शांत झाला आहे. हे मुने! मी स्वर्गाची इच्छा करीत नाहीं व रौरव नरकाचा द्वेष करीत नाहीं. तर भ्रमण ज्याचें मंदर पर्वताप्रमाणें आत्म्यामध्येंच स्थिर राहतें. ज्यानें आपल्या यशानें सर्व त्रिभुवनाला व्यापलें आहे असा हा दीर्घकाल भ्रमण करीत असलेला रामरूपी मंदर पर्वत आज बोधामृताचा लाभ झाल्यामुळें भ्रमण सोडून स्थिर विश्रांति पावला आहे. हें जगत् जसें आपल्याला दिसत आहे तशाच प्रकारचें आहे, याहून याचें निराळें तत्त्व कांहीं नाहीं, असें ज्या मूढानें ठरविलें, त्याच्या हृदयांत कुसंदेहाच्या समूहानें पेटल्याप्रमाणें अधिक संताप देणारी 'ही वस्तु व ही अवस्तु' अशी कल्पना पूर्ण जागृत आहे. हे मुनीश्वरा मीं सांगितलेलें हें खरें आहे कीं खोटें तें तूंच आपल्या अनुभवावरून पहा. तो तशा प्रकारचा मूढ पुरुष ज्या धनादि विषयांविषयीं कृपण बनतो, तो जगत्संबंधी विषय आम्हांला तत्वदृष्ट्या उपलब्धच होत नाहीं. कारण आम्ही भूक-तहान इत्यादि विचित्र सहा ऊर्मि ज्यामध्यें आहेत अशा शुद्ध

चिंदकारवृत्तिशून्य जड भवसागरापासून तुझ्या प्रसादानें तरून पार झालों आहों. सर्व संपत्तींची सीमा पाहिली व आपत्तींचाही शेवट अवलोकन केला. हे परमेश्वरा! सर्वांचें सार असा जो भूमानन्द तोहि नित्य प्राप्त असल्यामुळें त्याविषयींही इच्छा नाहीं. व आम्हीं पूर्ण आहों. संसाररूप समरांत आशारूपी गजाचे तुकडे तुकडे करून दुसऱ्या कोणालाही पराजय करतां येणार नाही अशा उत्तम वीरत्वास माझें मन प्राप्त झालें आहे. माझें मन सर्व विकल्पशून्य झालें आहे, त्याच्या सर्व इच्छा शांत झाल्या आहेत. अकृपणतेमुळें त्याचें स्थैर्य दृढ झालें आहे. त्रिभुवनांत पूर्णचंद्र, क्षीरसागर, शरत्कालचें आकाश इत्यादि जें जें प्रसन्नरूप म्हणून प्रसिद्ध आहे त्याच्या वरच्या पायरीला माझें मन आपल्या प्रसन्नतेमध्यें नेलें आहे. तात्पर्य, आंतल्या आंत अत्यंत प्रमुदित झाल्या कारणानें माझें मन अतिशय उत्तम होऊन राहिलें आहे.

## सर्ग ४४

१ गुरु वसिष्ठ पुनः वाच्छात्यागापासून मनोनाशापर्यंत आसक्तीच्या क्षयाचे उपाय ज्ञान दृढ होण्यासाठीं सांगतात.

**श्रीवसिष्ठः**—रामा! राग-द्वेषरहित इंद्रियेंकरून प्राप्त विषयांमध्येंच राहणाऱ्या व त्यामुळेच कर्तृत्वाभिमानशून्य झालेल्या, मनानें तूं जें करतोस तें जणुंकाय केलें नाहींसच. वस्तूची जेव्हां प्राप्ति होते तेव्हां प्रथम—पहिल्याक्षणीं ती जशी संतोष देते तशी त्याच्याच पुढच्या क्षणीं देत नाहीं, याचा अनुभव कोणी घेतलेला नसतो? सर्वांनीं घेतलेला असतो. वस्तूचा जेव्हां लाभ होतो तेव्हां ती जसा आनंद देते तसा ती दुसऱ्यावेळीं देत नाहीं, म्हणून असल्या क्षणिक सुखामध्यें आसक्त होतो तो मूर्खच. दुसरा कोणी आसक्त होत नाहीं. इष्टवस्तु प्राप्त झाली म्हणजे तिच्याविषयींची इच्छा शांत होते. पण असा तो क्षणिक इच्छेचा निरोधहि जर सुखाला कारण होता तर सर्व इच्छांचा सर्वथा त्याग करणें अत्यंत सुखाला कारण होईल, हें निराळें सांगावयासच नको. पण वांच्छाच सर्व अनर्थ करणारी आहे. एक इच्छा पूर्ण झाली असतां जो संतोष होतो तो दुसरी इच्छा उत्पन्न होईपर्यंत टिकतो. म्हणजे इष्ट पदार्थाच्या प्राप्तीमुळें होणारा आनंद दुसऱ्या इच्छेकडून नाहींसा केला जातो; दुसऱ्या इच्छेचा उदय हाच पहिल्या आनंदाचा अंत आहे, यास्तव तूं सर्व वाच्छाच सोड. अहो पण, मी पूर्णानंदपदाला प्राप्त झालों आहे, मला हा उपदेश कशाला? म्हणून विचारशील तर पुनः दुसऱ्या वेळीं तूं अहंभावरूप चिखलांत बुडून जाऊं नयेस म्हणून तत्पदस्थितीच्या दृढतेसाठीं मी हा तुला पुनः उपदेश करीत आहें. हे रामा! तूं आत्मज्ञानरूप महापर्वताच्या शिखरावर आरूढ होऊन विश्रांति घेत आहेस, पण तेथून अहंभावरूप महा खड्ड्यांत पुनः पडणें तुला उचित नाहीं. कारण, अनन्त सद्-दृष्टीचें ज्याला स्मरण झालें आहे व जो ज्ञत्वरूपी मेरुशिखरावर स्थित आहे अशा तुझें—गर्भवासादि अनर्थपरंपरा उत्पन्न करणारा जो अहंभाव त्या-पातालांत पतन कोठून होणार? कारण ज्ञान दृढ झालें म्ह० अविद्येचा उच्छेद अवश्य होतो. किंवा मी हें पुनः दुसऱ्यावर उपकार करण्यासाठीं सांगत आहे. कारण तुझा हा समतासत्यतामय स्वभाव स्पष्ट दिसत आहे, त्यावरून तुझा सर्व विकल्प क्षीण झाला आहे व तुझी अविद्या नाश पावली आहे. हे प्रियदर्शन रामा! तुझी पूर्ण सागरासारखी निर्मल समताच मला जणुंकाय ‘ राम स्वभावांत उत्तम प्रकारें स्थित झाला आहे ’ असें सांगत आहे. असंग होऊन

जिवंत राहणाऱ्या तुझी आशा निराशत्वास प्राप्त होवो, अभवभावनेस प्राप्त होवो, व मन अमनस्त्वास प्राप्त होवो. मनोरथाचा भंग होणें इत्यादि कारणांनींही निराशत्वादिक वगैरे होतें, पण मी तसलें निराशत्व तुझ्या ठिकाणीं उपजो असें म्हणत नाहीं, तर तूं ज्या ज्या वस्तुदृष्टीस प्राप्त होशील त्या त्या दृष्टींत सत्तासामान्यरूपानें पूर्ण चिद्धन ब्रह्म अवस्थित आहे, असें जाणून १६० सर्वत्र निरतिशय आनन्दानें पूर्ण ब्रह्माचा लाभ झाल्यामुळें तूं निरिच्छ व्हावेंस, असें मी इच्छितों. जर तूं आत्मा जाणून घेत नाहींस तर बद्ध होशील व विज्ञातात्मा झालास तर बद्ध होणार नाहींस. यास्तव हे रामा! स्वतःच स्वतःला मनन वगैरे दृढ करून जाण. ( आता निर्वासनत्वाचें स्वानुभवगम्य लक्षण सागतात—) जेथें भोगसुख मनांत आवड वाढवीत नाही व प्रारब्धामुळें यथाप्राप्त दुःखही मनांत अप्रीति उत्पन्न करीत नाहीं, असें जें आकाशासारखें शुद्ध साम्य–समत्व तेंच अवासनत्व आहे, असें तूं जाण. वासनारहित अन्तरिंद्रियांनीं तूं क्रिया कर. त्या योगानें शेंकडों क्षोभांनींही आकाशाप्रमाणें आंत विकाररहित रहाशील. तूं ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय ह्या त्रिपुटीच्या एकाकारानें अभव्य -दुःखादिक यांचा आत्मत्वानें अनुभव घे म्हणजे त्यांची प्रतिकूलताही शांत होईल; याप्रमाणें तूं शांतात्मा झालास म्हणजे पुनः जन्म घेणार नाहींस. चित्ताचा उन्मेष-विकास हाच ससाराचा उदय व निमेष–लय हाच संसाराचा प्रलय आहे; यास्तव वासना व प्राण यांचा संरोध करून आपल्या मनाला अनिमेषनिमेषरहित कर. प्राणाचा उन्मेष किंवा निमेष यांच्या योगानें अनुक्रमें संसाराचा प्रलय किंवा उदय होत असतात; यास्तव अभ्यास व वैराग्यादि युक्ति यांच्या योगानें त्याला उन्मेषनिमेषरहित कर; किंवा अज्ञानाचा उन्मेष किंवा निमेष यांच्या योगानें कर्माचा प्रलय किंवा उदय होतो. यास्तव गुरू, शास्त्रार्थ व संयम यांच्या योगानें बलात्कारानें त्या अज्ञानाला नाहींसें करून टाक. वायु व धूळ यांच्या संगानें व स्पंदानें जसें आकाश मलीन व चचल झालें आहे असें वाटतें, त्याप्रमाणें चित्-च्या चित्तलक्षण स्पंदामुळें विषय या आकारानें हे सर्व अनर्थजात उपस्थित झालें आहे. अनेक छिद्रांतून प्रविष्ट झालेल्या सूर्याच्या प्रकाशाचा भिंतीवर जसा विचित्र आकार दिसतो त्याप्रमाणें दृश्य व दर्शन यांच्या संबंधस्पंदामुळें ही जगद्भ्रांति होत आहे. पण ज्याप्रमाणें चित्रांत काढलेल्या पुरुषांच्या मनांत आभास स्फुरत नाहींत, त्याप्रमाणें दृश्यदर्शन संबंधाच्या अभावीं मनांत जगाची भावनाच उत्पन्न होत नाहीं. जलाच्या हालण्यामुळें उत्पन्न झालेली लाट जल नसल्यावर जशी विलीन होते त्याप्रमाणें चित्तस्पंदामुळें उद्भवणारी माया चित्ताच्या नाशानंतर नाहींशी होते. वासनांचा पूर्ण त्याग केल्यामुळें आत्मबोधामुळें किंवा प्राणनिरोधामुळें चित्त स्पंदरहित झालें असतां त्यानंतर आत्मा आपल्या निर्विकार कूटस्थ स्वभावापासून च्युत कां होईल ? केवल संविदच्या अस्पंदामुळेंच ( वासनांचा पूर्ण त्याग केल्यानें ) चित्त अचित्तत्वास प्राप्त होतें, किंवा प्राणनिरोधानें तें अचित्तत्वास प्राप्त होतें व तेंच परम पद आहे. ( बोधामुळें चित्त स्पंदरहित कसें होते तें सांगतात.) विषय व इंद्रिय याना संबंध झाल्यामुळें जें सुख होतें तें परमार्थिक ब्रह्मसुखच आहे. असें जाणून तैत्तिरीयोपनिषदांत सांगितलेल्या मानुषानंदापासून उत्तरोत्तर शतपट अधिक आनंदाची जी परम अवधि त्याच्याच पूर्ण अनुभवावरून ब्रह्मदृष्टीनें मनाचा क्षय होतो. जेथें चित्ताचा अभ्युदय झालेला नाहीं तें तें अकृतिम सुख

आहे. माळ जमिनीवर सरोवर जसें संभवत नाहीं त्याप्रमाणें तें अकृतिम सुख स्वर्गादि भोगभूमींत संभवत नाहीं, कारण तेथें चित्त काम, असूया इत्यादि दोषांनीं कलुषित झालेलें असतें. चित्ताच्या उपशमापासून झालेलें निरतिशय सुख शब्दांनीं वर्णन करतां येण्यासारखें नाहीं, तें केवल स्वानुभवगम्य आहे, क्षय व आधिक्य यांनीं रहित असलेलें तें कधीं उदय पावत नाहीं व शांत होत नाहीं. आत्मबोधामुळें चित्ताचा नाश होतो, कारण दुर्बोधामुळें म्ह० भ्रांतीमुळें, बालकानें कल्पिलेल्या वेताळाप्रमाणें चित्ताच्या अस्तित्वाची प्रतीति येते आणि त्या दुर्बोधामुळेंच मोहश्री विस्तार पावली आहे. ज्याप्रमाणें किमयेनें ज्याचें सोनें बनविलें तें तांबें जरी विद्यमान असलें तरी नसल्यासारखें होतें त्याप्रमाणें ज्ञानी पुरुषाचाही व्यवहार दिसत असल्यामुळें त्याचें चित् विद्यमान असतेंच, तथापि बोधानें बाधित झाल्याकारणानें विद्यमान असूनही नसल्यासारखें होतें. ज्ञानी पुरुषाचें जें चित्त त्याला चित्त असें म्हणत नाहींत. तर ज्ञान्याच्या चित्ताला सत्त्व असे म्हणतात. सोनें बनविलेल्या तांब्याप्रमाणें बोधामुळें चित्त नावानें व अर्थानेंही अन्य होतें. बोधानें ब्रह्म शांत होतो त्यामुळें चित्ताला चित्त्वच संभवत नाहीं, कारण भ्रांतिबीजत्व हीच चित्ताची चित्तता आहे, पण ती बोधानें अगदीं लीन होऊन जाते. सत वस्तूचा अभाव होत नाहीं. शिवाय वस्तुबोध फक्त कल्पित अवस्तु अशाचाच बाध करतो, अशी प्रसिद्धी आहे. त्यामुळेंही चित्ताच्या वास्तविक सत्त्वांशाचा अभाव संभवत नाहीं. विकल्परूप चित्तादि सर्व सशाच्या शिंगाप्रमाणें अवस्तु आहे, तें सर्व नित्य आत्म्याचा विवर्त, विपरीत भास आहे. म्हणून ज्ञानानें त्याचा बाध होतो. ( तर मग जीवन्मुक्ताचें चित्त व्यवहार करीत असतें, म्हणजे व्यवहार करण्यास योग्य असणें ही त्याची वास्तविक अवस्था आहे म्हणून म्हणशील, तर तसें नाहीं. ) सत्त्व बनलेलें चित्त कांहीं काल जगत्स्थितींत विहार करून तुर्यावस्थेंत तुर्यातीत होतें. अर्थात् विहार-समाधि-साक्षात्कारापर्यंत जी त्याची अवस्था ती वास्तविक नव्हे,तर प्रारब्धामुळें प्रतिबद्ध झालेला जो अविद्यालेश त्यामुळें होणारी बाधितानुवृत्ति होय. विदेहकैवल्यामुळें अविर्भूत झालेली जी तुर्यातीत अवस्था तीच त्याची वास्तविक अवस्था आहे. रामा ! सम व एक ब्रह्मच याप्रमाणें अनेक भुवनाच्या भ्रम-विभ्रमांच्या ओघानीं नाना होऊन राहिलें आहे. ज्ञान होईपर्यंतच तें सर्वात्मक होऊं शकतें, वस्तुतः चित्तादिक दुसरें कांहीं संभवत नाहीं; कारण मनांत संकल्पानें कल्पिलेला पदार्थसमूह त्यांत त्याचा संनिवेश होणें शक्य नसल्यामुळेंच जसा वस्तुतः नाहीं त्याप्रमाणें परम सूक्ष्म अखंड चिदेकरसघन ब्रह्मामध्येंही जगाचा समावेश होणें शक्य नाहीं, म्हणून जगत् नाहीं.

---

## सर्ग ४५

१. येथें स्वानंदपूर्ण त्रिभुवनाच्या कल्पनेचें अधिष्ठान जें परब्रह्म त्याचें बिल्वफळाच्या रूपानें वर्णन.

**श्रीवसिष्ठः**--रामा ! याविषयीं मी एक तुला रम्य, विस्मयकारक, अपूर्व कथा सक्षेपानें सांगतों ती ऐक. एक मोठें बिल्वफळ आहे. तें सहस्रावधि योजनें विस्तीर्ण, विमल, व्यक्त व अनेक युगांनींही जीर्ण न होणारें आहे तें अविनाशी रसाचा आधार आहे. अमृताहून अधिक मधुर त्याचें सार आहे. तें जरी फार जुनें असले तरी बालचंद्राच्या किंवा कोमल पल्लवाच्याप्रमाणें तें मृदु असल्यामुळें तें फार सुंदर आहे. तें या सर्व लोकांच्या मध्यें असलेल्या महामेरूप्रमाणें आधार-

भूत आहे. मंदर पर्वताप्रमाणें दृढ आहे. महाकल्पाच्या अंतीं सुटलेल्या वावटळींच्या वेगानेंहि तें ढळविलें जात नाहीं. असल्यकोटी योजनें विस्तीर्ण असलेले तें अमर्याद असून जगाच्या स्थितीचें विधारण व नियमन करणारें ते आद्य मूळ आहे. पर्वताच्या खालीं राईच्या कणांसारखी धूळ जशी उडत असते त्याप्रमाणें या बिल्वफळाच्या जवळून ब्रह्मांडांचे ओघ सतत वहात असतात. राघवा! मधुरादि सहा रसांतील कोणताही रस अथवा सहा इंद्रियांनीं भोग्य असलेला जो ब्रह्मलोकांत सुखाचा लेश त्या बिल्फळाच्या थबथबलेल्या रसाच्या गोड चमत्कृतीचें अतिक्रमण करूं शकत नाहीं. तें फळ इतर फळांप्रमाणें परिपक्क जरी असलें तरी खालीं पडत नाहीं. तें नेहमीं परिपक्क जरी असले तरी जरेची बाधा पावत नाहीं, म्ह० जीर्ण होत नाहीं, ब्रह्मा, विष्णु, इंद्र, रुद्र इत्यादि दीर्घायु देवही त्याची उत्पत्ति, मूळ किंवा देंठ जाणत नाहींत. त्याचा अंकुर व वृक्ष कोणीं पाहिलेला नाहीं व ज्याच्या पुष्पाची आकृति कोणाच्या दृष्टीं पडलेली नाहीं, अशा या मोठ्या आकृतीच्या फळाला मूळ नाहीं व आधार नाहीं. एक पिंड धनाकार व अतिविस्तृत जें स्थौल्य त्यानें शोभणाऱ्या त्या फळाची उत्पत्ति, विकार इत्यादि परिणाम दिसत नाहींत. सर्व पुरुषार्थांमध्यें श्रेष्ठ असलेल्या या फार मोठ्या फळाची मज्जा दिसत नाहीं व आठळी दिसत नाहीं. शिळेच्या अन्तःप्रदेशाप्रमाणें घन, विस्तीर्ण निर्विकार व निरंजन असा त्याचा मध्यभाग आहे. अमृताचा स्राव करणाऱ्या चंद्रबिंबाप्रमाणें आत्मज्ञानानें अमृताप्रमाणें गोड निरतिय आनंदरसाचा तें स्राव करतें तें सर्व सौंदर्यांचा कोश आहे. ते शीतल प्रकाश करणारें आहे. तें शैलासारखें, अमृताच्या पिंडासारखें, मानुषानंदापासून हिरण्यगर्भाच्या आनंदापर्यंत जी कर्मफलाची स्थिति तिचें सार आहे. ही जी स्वात्मचमत्कृति तें त्या हिरण्यगर्भाच्या आनंदाच्या फलाहूनही परम जें अव्यक्त त्यांचेंही सार आहे. त्रिविधपरिच्छेदशून्य स्वभावानें रक्षिलेला व नित्य अनन्य असा आत्माच त्या श्रीफलत्वास प्राप्त झाला आहे. त्या स्वात्मचमत्कृतीनें आपल्यामध्यें भेदजाताच्या परमप्रयोजनतेला प्राप्त झालेलें चिदेकरसमज्जारूप पारमार्थिक स्वाकारवैचित्र्य न सोडतांच हें भेदादिक स्वतः उत्पन्न करून त्याची भावना केली आहे. ती स्वात्मचमत्कृति सूक्ष्म असली तरी अतिबाला आहे. ही मी आहे. अशा कल्पनेनें असंभवनीय असलेलाही भेदमळ तिने उत्पन्न केला आहे 'मी' या कल्पवेच्या उदयानंतर लागलीच ती आकाश त्याचा गुण शब्द इत्यादि अंगांनीं परिपूर्ण अशा व्यष्टि-समष्टि शरीररूपी परमाणूंनीं ती परिवेष्टित होते. अशा अनुक्रमानेंच संविद्रूप आत्मचमत्कृति व्यवहारसामर्थ्यास प्राप्त होते. पण ती आपल्या स्वाभाविक स्वरूपाचा त्याग न करतांच अशी शक्तिरूप झाली आहे. त्यानंतर अशा त्या चंचलरूप संविच्छक्तीनेंच आपल्या स्वाभाविक समरूपांत अशी ही जगदाकार दृष्टि पसरली आहे. हेंच अनन्त आकाश आहे, हाच अशान्तर भ्रम आहे. हीच रागहीच कालमयी कला आहे, हाच संकल्प आहे, रागद्वेषस्थिति आहे, हीच ग्राह्य व त्याज्य बुद्धि आहे. ही आत्मचत्कृतीच त्वत्ता-तूंपणा, मत्तामीपणा व तत्ता-तेंपणा होऊन राहिली आहे, हा ऊर्ध्व असलेला ब्रह्मांडौघही आत्मा आहे. तो स्वतः ऊर्ध्व आहे, असें जरी वाटलें तरी आत्मदृष्ट्या अधःच आहे, आत्माच पुढें आहे तोच मागें आहे. तोच बाजूला आहे व तोच फार दूर आहे. हेंच भूत, वर्तमान व भविष्यत्‌ही आहे, हेंच असंख्य कल्पनारूपी कमलांनीं भरलेलें सरोवर आहे. म्ह० यांतच सर्व जीव

अन्तर्भूत होतात, नंतच अनंत ब्रह्मांडमंडपां-तील निरनिराळे लोक हे जीवाचे क्रीडामंडप राहतात. ही हरीच्या हृदयकमलाची कर्णिका आहे. ती अनन्त रचनारहस्यांनीं सर्व बाजूंनीं पल्लवीत झालेली आहे. ती अनेक लोकरूपी कमलाक्षांची माळ आहे. हिचा मध्यभाग सर्वतः व्यापलेल्या महारुद्रगणांनीं भरलेला आहे.

ही आकाशाची पदवी आहे. ही हरीची हृत्कलकर्णिका विषयलंपट स्वर्गवासी जीवाना पुण्य क्षीण होताच अधोलोकीं ढकलविणारी आहे. त्यांना खालीं पाडणें या निमित्तानें ती आपला प्रभाव दाखवित असते. ही या उत्तर दिशेत मेरुत आहे. जगद्रूपी कमलाची कर्णिका आहे, जिच्यांतील चंद्राख्य अमृतरूप मकरंदा-मध्यें अमृतरूप भ्रमर लंपट झालेले आहेत. रजोगुणाचें कार्य असे राग-द्वेषादिक व दुःख हीं ज्यांचीं मुळे आहेत असा हा जगद्रूपी अनादिवृक्ष त्याची ही स्वर्गश्रीरूप पुष्पमंजरी आहे, तिचा सुगंध अतिशय उत्कट आहे, नक्षत्रें हेच तिचे किंजल्क आहेत. ती ब्रह्मसागराच्या तटावर स्थित आहे. तिचा वर पार लागत नाहीं. तिचा शेवट कोठें झाला तेंही कळत नाहीं. आकाशाकार कमलिनी हीच आहे. कर्मे हेच तिच्यांतील सर्व बाजूला असलेले नक्र आहेत. मास व ऋतु यांची पंक्ति हीच त्यांतील तरंग आहे. प्रजोत्पत्ति करणें याच कार्यांत निमग्न असलेली भूतपरंपरा त्यांत आहे. ती कालनलिनी प्राण्याच्या आयुःप्रमाणानें सर्वत्र पसरलेली आहे. क्षणापासून कल्पापर्यंत काळ-परिमाण हाच तिचा पल्लव आहे अग्नि, सूर्य, चंद्र या तेजांनी ती केसरयुक्त झाली आहे. काल व आकाश हेंच तिचीं कमलें आहेत. जन्मादि भाव विकारांनीं संपन्न अशी या जरा व मरण या विषूचिका[1] आहेत. विद्या व अविद्या यांच्या विलासांनीं संपन्न अशा या शास्त्रार्थदृष्टि आहेत. त्या बिल्वफलाची ही अशा प्रकारची आत्मचिच्चमत्कृति आहे. अशा प्रकारांनीं तिनें व्यष्टि-समष्टि संकल्पाच्या आंतच आपली संस्थिति केली आहे. पण वस्तुतः ती शांत, स्वस्थ, सर्वपीडारहित, सौम्य, सर्व भावनांनीं रहित आहे. भ्रामक कर्तृत्व लाही वारंवार अकर्तृत्व बनवीत ही राहिली आहे. ही वस्तुतः एकच आहे, तथापि ही नाना असल्यासारखी भासत. पण ही एकरूपही नाहीं. कारण तिला एक म्हटल्यास द्वैताची कल्पना होते व नानाही नाहीं. खरोखर तीच एकत्व आहे व तीच एक आहे. ती अबाधित रूपानें स्थित आहे. सर्व द्वैतविकल्पांच्या शांती-नें ती सम एकरूप आहे. ती सर्वात्मिका व अतिशय मोठी आहे, सारांश, चितिरूप शक्तीचेंच हें असें बिल्वफलरूपानें मीं वर्णन केलें आहे.

---

## सर्ग ४६

—:•:—

१. कागगिरीच्या मानानें पाहिलेल्या--कमलिनीनें मंडित झालेल्या--शिलोदराप्रमाणें ब्रह्माचे ठिकाणीं प्रपंचाचा आभास.

**श्रीरामः**—हे भगवन् सर्वसारज्ञ ! तूं ही बिल्वरूपी महाचिद्सत्ताच मला सांगितली आहेस, असें मी समजतों, अहंतादि हें सर्व चित्साररूपच आहे, द्वैत व ऐक्य या कल्पने-मध्यें अल्पही भेद नाहीं !

**श्रीवसिष्ठः**—ज्याप्रमाणें ब्रह्मांडरूपी कोव्हाळ्यांतील मेरुप्रभृति रचना ही मज्जा आहे, याप्रमाणेंही केवळ अहंतादिच नव्हे तर ब्रह्मांडादि सर्व जगांची स्थिति चिद्रूप बिल्वाची मज्जा आहे, ज्याप्रमाणें बेलफळाची कवची त्यांतील गराचा आधार असते त्याप्रमाणें सृष्टि

---

१ विषूचिका म्ह. महामारी रोग.

रूप मज्जेहून तिचा आधार निराळा आहे असे होईल. पण सर्वव्यापी ब्रह्माचा असा सर्वरूपानें अथवा एकदेशानें परिणाम होतो असें मानल्यास त्याचा विनाश दुर्वार आहे. पण आकाशाप्रमाणें निरवयव असलेल्या ब्रह्माचा मुख्य अंतःप्रवेश किंवा परिणाम संभवत नाहीं, यास्तव येथील मज्जा हा शब्द परिणामवाची नाहीं, तर चिद्रूप सूक्ष्म बीजाची ही जगद्रूप मिथ्या चमत्कृति आहे. शिल्पी दगड कोरणाराच्या मनानें कल्पिलेल्या, शिळेंतील वनासारखी ही सर्व रचना आहे, हे सुंदर रामा! याविषयीं मी तुला आणखी एक विचित्र, रम्य व विस्मयकारक कथा सांगतो तो ऐक. कोणा एके जागीं एक स्निग्ध, स्पष्ट, मृदु, अतिशय विस्तृत, निबिड, व कधींही क्षुब्ध न होणारी अशी एक महाशिला आहे, तिच्या आंत एकाद्या सरोवरांत जशीं कमलें असतात अशीं असंख्य रम्य प्रफुल्लित अनन्त कमलें आहेत कांहीं त्यांच्या पाकळ्या एकमेकांत गुरफटल्या आहेत. कांहींनीं एकमेकांना दूर केलें आहे, कांहीं एकमेकांना अगदीं चिकटून राहिल्या आहेत, सारांश तीं कमलें गूढही आहेत व प्रकटही आहेत, त्यांतील कांहीं अधोमुख आहेत, कांहीं ऊर्ध्वमुख आहेत, कित्येकांचीं तोंडें विकस आहेत, कित्येकांचीं मुळें एकमेकांस लागलीं आहेत व कित्येकांचीं तोंडें एकमेकांशीं भिडलीं आहेत, कित्येक कमलांचीं मुळें कर्णिकांच्या मध्यभागीं आहेत, कित्येकांच्या मुळांतच कर्णिका आहेत कांहीं कमळें ऊर्ध्वमूल आहेत, कांहीं अधोमूल आहेत, व कांहीं मुळांवांचून आहेत. त्यांच्याजवळ शतशः व सहस्रशः कमलाच्या कळ्यांसारखे शंख आहेत, फुललेल्या कमलांप्रमाणें ज्यांचा आकार आहे असें मोठ्या प्रमाणाचें चक्रसमूहही त्यांच्या जवळ आहेत.

श्रीरामः---हें खरें आहे, मीं तशी एक महाशिला हरीच्या धामामध्यें म्ह० शालग्राम क्षेत्रीं पाहिलेली आहे, ती कमळवनाच्या चिन्हांनीं परिवेष्टित झालेली आहे,

श्रीवसिष्ठः---बरोबर आहे, तूं त्या दृष्टान्तभूत शिलेला पाहिलें आहेस, तूं तिला जाणतोस, जो दृष्टांतभूत आत्मा, जशा स्वभावाचा, निरवकाश, चिद्घन, सम, प्राणांचाही प्राण निरतिशय आनंदरूप आहे त्यांत तूं तिला पाहिलें आहेस, पण मीं ही तुला येथें निराळीच शिला सांगितली आहे. जिच्या आंतील महा अवकाशांत सर्व आहे व नाहींही, मीं तुला चिच्छिला सांगितली आहे. तिच्या आंत हीं सर्व जगें आहेत. घनत्व, एकात्मत्व, अभेद्यत्व, एकरसत्व, कूटस्थत्व इत्यादि गुणांमुळें ही चित् शिलाच आहे. हिचें अंग अगदीं घन-दाट घट्ट आहे, व हिच्या आकारांत अगदीं सूक्ष्म असेंही छिद्र नाहीं, तथापि आकाशांत जसा हा मोठा वायु असतो त्याप्रमाणें हिच्या आंत हें सर्व जगज्जाल आहे. स्वर्ग, भूलोक, वायु, आकाश, पर्वत, नद्या, दिशा, त्या शिलेंत आहेत, पण तिच्यामध्यें छिद्र मुळींच नाहीं. या शिलेंतच जगद्रूपी कमलवन विकास पावतें तें वस्तुतः याच्याहून निराळें नाहीं, किंवा तें शुद्ध चिदात्मकही नाहीं, तर केवळ मायाच आहे. पाषाणावर शंख, कमल इत्यादि चित्रें जशीं खोदतात त्याप्रमाणे भूत, वर्तमान व भविष्यत्कालीन सर्व जगत् त्या महाशिलेंत आहे दगडावर खोदलेली बाहुली वस्तुतः जशी त्यावर असते त्याप्रमाणें त्या महाशिलेंत जगाची रचना खरी असल्यासारखी नानारूपांनीं विकास पा-

१. यथाकाशस्थितो नित्यं वायुः सर्वत्रगो महान् । तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानीत्युपधारय' गी. ९-६ या श्लोकाच्या अर्थाचाच हा अनुवाद आहे.

ते; दगडाच्या आंतील रचना नाना आकाराची जरी असली तरी ती जशी दगड या एका सामान्य आकारतेस धारण करते त्याप्रमाणें ही चित् ही घन एकाकारत्वास धारण करते. जसें कमल शिलाकोशाहून भिन्न नसतें तथापि कमलाच्या आकारानें भासतें, त्याप्रमाणें ही सर्व सृष्टि अभिन्न चिद्रूपच असली तरी स्वरूपानें भासते. शिलेच्या पोटांत चक्र, कमल इत्यादि आकार खोदण्याच्या पूर्वींही जसे मुखरूपानें असतात त्याप्रमाणें व्यक्ति होण्यापूर्वी चित्‌च्या उदरांत ही जगत्पंक्ति अव्यक्तरूपानें राहते. शिलेंतील पद्मपंक्ति व किरणांतील चमत्कार नित्य असल्यामुळें वस्तुतः जसे उत्पन्न होत नाहींत व अस्त पावत नाहींत त्याप्रमाणें चित्-मध्यें सृष्टि उत्पन्न होत नाहीं व अस्त पावत नाहीं. ज्याप्रमाणें साध्वी स्त्रीच्या मनात नेहमीं तिचा पति असतो, बेलफळांत गीर असतो, त्याप्रमाणें चितींत अनेक विचारानीं संपन्न अशीं ब्रह्मांडपंक्ति असते. विकारादि सर्व ती चित्‌च आहे, त्यामुळें ब्रह्मांडादि विकारांचा नाममात्रानें उल्लेख करणें व्यर्थ आहे, ती उक्ति अर्थरहित आहे. जलांत जलबिंदु जसा मिळून जातो त्याप्रमाणें ब्रह्मांडादि सर्व ब्रह्मरूपानें पाहतांच चिद्रूपत्वास प्राप्त होतें. चिति अनन्त आहे, त्यामुळें हें सर्व विकारादि चितिच आहे, असें म्हटलें जातें. पण जें केवळ शब्दानेंच निष्पन्न होणारें असतें तें शब्द लीन होतांच लीन होतें. ब्रह्मच हें सर्व विकारादि आहे, पण तें स्वतः विकारादि अर्थरहित आहे, अर्थराहित्य व अर्थसाहित्य हें सर्व ब्रह्मच आहे कारण ब्रह्म अनन्त आहे, त्यामुळें पदार्थांचा भाव व अभाव हीं दोन्ही त्यांतच अंतर्भूत होतात; ब्रह्मच विकारादिरूपानें स्थित आहे, तेच क्रमानें विकाररूपानें उत्पन्न केलें गेलें आहे. येथें अल्प कांहीं भर भासेल तर तें सर्व मृगजलाप्रमाणें होय बीजचपुष्पफलापर्यंत विकास पावतें, त्यामुळे ते सर्व बीजांतच अतर्भूत होते त्यामुळें तें बीजाहून निराळें नाही अंकुरादि पूर्व पूर्व विकारांमध्यें विद्यमान असलेलीं बीजसत्ताच उत्तरोत्तर कार्यांत—कांड, शाखा, पल्लव इत्यादिकांत अनुवृत्त होते. त्याचप्रमाणें चिद्घनामध्यें असलेलें जे चिद्घनत्व तेंच त्रिभुवनाचा उदय करीत आहे. बीज व त्याचें कार्य यांना एकत्व ( एक रूपत्व ) त्यालाच द्वित्व आलें आहे, तें खरें नव्हे. कारण बीजाच्या अभावीं त्याचाही क्षय होतो. चिद्भिन्न जाड्याची कल्पना केल्यामुळें जगाचा उद्भव होतो पण चित् केव्हाही जडस्वभाव असणें शक्य नाहीं. चित केव्हांही अचित् होत नाहीं, तर ते दोन्ही एका चित्-मध्येंच आहेत. वस्तुतः चित् एकच आहे. महाशिलेमध्यें जसा चित्राकार विविध भेद दिसतो, तसा चित्-मध्यें चिद्‌चिद्-भेद दिसतो. बिल्वफळांतील मज्जा जशी बिल्वरूपही आहे व मज्जेच्याच दृष्टीनें पाहिल्यास त्याहून भिन्नही आहे याप्रमाणें चिद्घनामध्यें हें त्रिभुवन आहे. जशी एक मोठी शिला रेखा उपरेखा यांनीं व्यापलेली असते त्याप्रमाणें एकच ब्रह्म त्रैलोक्यादि युक्त असलेलें दिसतें. ज्याप्रमाणें शिल्पी मनुष्याच्या वासन रूपानें शिलेमध्यें कमलादि सुप्तस्थितींत नित्य राहतें, व त्यामुळें तें कधीं उदय पावत नाहीं. व अस्त पावत नाहीं व अस्त पावत नाहीं, व ज्याप्रमाणें शिलेच्या आंतील रेखा वगैरे शिलेच्या उदराहून भिन्न वसतात,

१ ' स भूरिति व्याहरत् । भुवमसृजत् ' म्ह. प्रजापतीनें ' भूः ' असा नामोच्चार करून भूमीला उत्पन्न केलें. ' एते वै ' असें म्हणून देवांस उत्पन्न केलें. इत्यादि श्रुतींत सर्व सृष्टि नामोच्चारपूर्वक सांगितली आहे. त्यामुळें नामाचा लय होतांच तिचा लय होतो.

त्याप्रमाणें अहंताच ही जगाची भीत आहे. जगाला करणारा जीवेश्वर व त्याचें कार्य जगत् हें सर्व चित्च आहे. शिलेंतील कमलांचा अविर्भाव व तिरोभाव शिलारूप असतो, त्याप्रमाणें जगाचा स्पंद व अस्पंद चिन्मय आहे. ज्याप्रमाणें तत्त्व कळलें असतां शिला आपल्या ज्ञानाचा विषय होत नाहीं, त्याप्रमाणें जगाचें कर्तें तत्त्वदर्शनानंतर दिसत नाहींत. हें ब्रह्म केव्हांही केलें जात नाहीं व केव्हांही नाश पावत नाहीं, कारण तें गिरीशिखराप्रमाणें निर्विकार स्थित असतांनाच विकाररूपानें व्यक्त होत. आपण जें जेथें जशा आकाराचें पाहतो तें तेथें तसेंच दिसतें. सुषुप्तांत स्थित असल्याप्रमाणें सर्व ब्रह्मसत्तात्मक आहे, असें जाण. शिलेंतील कमलादिकांप्रमाणें हा जो अनेक विकारानीं संपन्न असलेला मोठा जगदविलास ते सर्व झोंपेंतील स्वप्न आहे असेंच जाण. ते सर्व वासनामात्र आहे, असें तूं समज, सर्व जगद्विलास हें सतत सुषुप्तपद आहे—असेंच जाण. कारण तें सर्व निराकार ब्रह्मरूप आहे. शिलेंतील कमलाप्रमाणें सृष्टि, स्थिति, लय इत्यादि दशा आत्म्यामध्यें जरी दिसल्या तरी त्या केव्हांही वास्तविक स्वरूपस्थितीस प्राप्त होत नाहींत, त्या तुच्छ, साररहित आहेत.

---

# सर्ग ४७.

—:०:—

१. वरील अख्यायिकांचें तात्पर्य.

श्रीवसिष्ठ:---चिद्रूप तत्त्व जोंवर स्वरूपानुसंधानानें रहित असतें, स्वरूपासंधान करीत नाहीं, तोंवरच त्यांत जगाच्या वासना असतात हें सुचविण्यासाठीं वर जड बिल्वफळाचा दृष्टान्त दिला आहे. प्रसिद्ध सुषुप्तीहून अन्य सुषुप्ति हाच चित्चा सर्ग आहे, म्हणजे तो स्वप्नरूपच आहे. तो युग, संवत्सर इत्यादि क्रमानें आपल्याच प्रातिभासिक सत्तेनें सत्तावान् झाला आहे. चित्-ची सत्ता जशी नित्य आहे तशी त्या सर्गाची नाहीं, म्हणजे सर्ग—सृष्टि हा चित्-चा स्वगतै[1] भेद नाहीं. देश, काल, क्रिया इत्यादिकांतही चिन्मयरूपत्व असल्यामुळें हें निराळें व हें निराळें, हा भेद येथें उत्पन्न होत नाहीं. समस्त शब्द, शब्दार्थ, वासना, कल्पना इत्यादिकांना जाणणाऱ्या आत्म्याला त्रिकालीं एकरूपत्व असल्यामुळें हें अमुक असत् आहे, असें कसें सांगतां येईल? कारण तिन्ही अवस्थांत एकरूप असणारा आत्मा सत्य आहे, त्यामुळें अत्यंत असत् पदार्थाचें त्याला ज्ञान होणें शक्य नाहीं. ज्याप्रमाणें फळाच्या आतील रचना केवळ नाममात्र भिन्न असते त्याप्रमाणेंच चित्-ची स्वसत्ताघनता नाना नाना व अनाना होऊन राहिली आहे, ती वस्तुतः अनाना असतांनाच नानाशी झाली आहे. व अक्षुभित असतानाच क्षुब्धशी झाली आहे. फळाच्या आत जसा त्याचा मगज त्याप्रमाणें चित्-च्या आत जगाच्या शक्ति असतात. चित् या आरशांत जगद्रूप नगर प्रतिबिंबित झालें आहे, अर्थात् शिलेंतील रचनेप्रमाणें जगत हें चित्चें स्वरूपच आहे, तें वस्तुत विकास पावणारें नसलें विकास पावत असल्यासारखें भासतें. चित्-मध्यें मायिक अनन्तशक्ति असल्यामुळें चिंतामणीमध्यें चिन्तकाच्या मनोरथाचीं फलें जशीं असतात त्याप्रमाणें त्या परम चिन्मणींत असंख्य जगें आहेत. या चित्-संपुटामध्यें हें जगद्रूप मौक्तिक भासत आहे, तें त्यात जणुंकाय कोंदणांतच बसविलें आहे. व तें चिन्मयच असलें तरी भिन्न असल्यासारखें भासतें. सूर्य उदय व अस्त यांच्या योगानें

---

[1] वृक्षाच्या शाखा, पाने, फुले, फळे इत्यादि हा स्वगतभेद आहे. तो सावयव पदार्थांतच संभवतो. निरवय चित्-मध्यें संभवत नाहीं.

दिवस व रात्र जसा करतो त्याप्रमाणें हा चिदादित्य सतत प्रकाशमान होतो व आपल्यामध्येंच जगद्रूपी द्रव्यें दाखवितो. तो स्वतःमध्यें पदार्थांचें ज्ञान व अज्ञान यांचा विकार करतो. समुद्रांतील जलाच्या स्फंदादि विलासाप्रमाणें किंवा शिलेंतील भावी आकाराप्रमाणें चित् अनाना असतांनाच नाना भासतें. वर्तमान समयीं जें आहे तें सर्व शिलेवर खोदलेल्या बाहुलीप्रमाणें चित्-मध्यें आहे व जें नाहीं तेंही शिलेवर खोदावयाच्या बाहुलीप्रमाणें चितीमध्यें बीजरूपानें आहे. पूर्वीं मीं बिल्वाख्यान जें सांगितलें त्याचेंही तात्पर्य सर्व जगाचें सार सत्य चित्-च आहे, या अर्थामध्य आहे. बेलफळांत जशी मज्जा तसें जगांत चित्-तत्त्व. शिलेच्या उदराचा त्याग केला असतां त्यातील कमलादि आकार जसे मिथ्या ठरतात त्याप्रमाणें चित्‌ला सोडलें असतां जगत् असत होतें. तें चित-हून निराळें आहे, असें म्हटलें कीं मिथ्या झालेंच. जगत् चिद्रूप आहे, चिन्मय आहे, असें जाणलें असतां तें नानारूप जरी दिसत असलें तरी अनाना एकरूप आहे. शिलेवर खोदलेलें कमळ जसें शिलारूप असतें तसें हें जगत् चिद्धनरूप आहे. ज्याप्रमाणें हरणाच्या दृष्टीनें मृगजल हा शुद्ध जलाशय आहे, पण तेथें जमीन वाळू आहे, असें जाणणाऱ्या विद्वानांच्या दृष्टीनें तो सूर्याचा प्रकाशच आहे. येथें सतच असलेला सूर्यप्रकाश ज्याप्रमाणें असत मृगजळासारखा भासतो त्याप्रमाणें चित्स्वभाव असलेला तूंही असत्-जडस्वरूपानें भासतोस. पण वस्तुतः तूं तसा सदसद्रूप नाहींस. जसा महासागर द्रवत्वभावामुळें मध्यें स्पंद पावतो त्याप्रमाणे हें चिद्धन तत्त्व वस्तुत स्पंदरहित असलें तरी त्याचा मध्यभाग स्पंद पावतो. या चिच्छिलेंत भासणारे नाना आकार वस्तुतः तन्मय आहेत, पण ते नसे नाहींत, जड आहेत असें अज्ञानामुळें वाटतें. हें जगत्ही तसेंच अज्ञानामुळें अचिन्मय भासत आहे, असें तूं समज. आम्हीं वर महाशिलेचा जो दृष्टांत दिला आहे त्यांतील ती महाशिलाही चिद्धनाचें मध्य आहे. तें नीरंध्र, निर्द्वय, स्वच्छ, अज अत्यंत शांत आहे. तथापि मायाशक्तिमुळें नाना आकारांनीं भासतें. जसा शरत्काल जगाला ताप देतो व चंद्र त्याला शीतळ करतो त्याप्रमाणें ब्रह्म जगाला प्रकाशित करत व तेंच जगद्रूपानें स्फुरण पावतें. ब्रह्मामध्यें जसें ब्रह्मत्व तसेंच त्यांत हें जगत् स्थित आहे, म्हणून तें त्यांत नित्य नष्ट किंवा नित्य स्थित आहे, असें म्हणतां येतें. झाड व वृक्ष यांचा जसा भेद नाहीं तसा ब्रह्म व जगत् यांचा भेद नाहीं. येथें जीं हीं विचित्र ब्रह्मांडें आहेत तीं चिदाकृतीहून निराळीं नाहींत. चिद् सदा एकरूप असल्यामुळें तिचा भाव किंवा अभाव जसा नाहीं तसाच त्या ब्रह्मांडचाही भाव किंवा अभाव केव्हांच नाहीं मरुभूमीवरील सूर्यकिरण जसें जल आहे जगद्रूपानें भासतें, पण प्रमाणपूर्वक विचार केला असतां भासणारे जल जसें सूर्याचीं किरणें बनतें त्याप्रमाणें यथार्थ दर्शनानें मेरूसारखे, स्थूल पदार्थ, तृणगुच्छादि मध्यम पदार्थ, चित्तादि सूक्ष्म पदार्थ इत्यादि आब्रह्मस्तंबपर्यंत सर्व जगत् शुद्ध ब्रह्म होतें. या सर्व-स्थूल, मध्यम सूक्ष्म, आंतर, बाह्य इत्यादि सर्व विभागांनीं युक्त असलेल्या जगाचें जें उत्तरोत्तर कारण त्याचें आलोचन करीत गेलें असतां भूततन्मात्रें अव्याकृत अक्षर येथपर्यंत त्याचा विभाग होऊन शेवटीं जें रूप अवशिष्ट राहतें तेंच परब्रह्म आहे असें ब्रह्मज्ञ समजतात. जीं स्थूलभूतें तो सूक्ष्मभूतांचा समुदाय आहे. सूक्ष्मभूतें हे चित्तच आहे. अशा क्रमानें ते परमतत्त्व जाणावें जे सूक्ष्मसृष्टींत असलेले सद्ब्रह्मरूप सार तेंच स्थूल सृष्टींत अत्यंत व्यक्त झालेलें सार आहे.

जलपरमाणूंत असलेली जी रसशक्ति तीच स्थूल जलांत इंद्रियांचा विषय होते. जलांत इंद्रियगोचर होणाऱ्या त्या ब्रह्मतेप्रमाणेंच जगातील सर्व पदार्थांतील ब्रह्मतच इंद्रियांचा विषय होते. एक रसशक्तिच ज्याप्रमाणें नानाप्रकारच्या तृण गुल्म-लतादिकांत नानाप्रकारची होऊन राहते त्याप्रमाणें ब्रह्मताच जगांतील अनंत पदार्थांत अनंतरूपानीं व्यक्त होते. ती प्रतिपदार्थांत भिन्न भिन्न नसली तरी भिन्नशी भासते. जसें रूपाच्या नील-पीत-शुक्लादि वैचित्र्याचें तेजःपरमाणु हें सामान्य कारण आहे, त्याप्रमाणें ही ब्रह्मसत्ताही या घटादि व्यक्तींच्या द्रव्य-गुण इत्यादि अवांतर सत्तावैचित्र्याचें सामान्यकारण आहे. ती परमात्मताच अवांतर सत्तारूपानें नटली आहे. मोराच्या अंड्यांतील रसामध्यें ज्याप्रमाणें त्याला पुढें फुटणारा विचित्र पिसारा पंख, कठिणपणा इत्यादि सर्व असतें, त्याप्रमाणे जगाचा महाप्रलय झाला असतां मायाशबल चितींत व अर्ध प्रलय, अवांतर प्रलय झाला असतां चित्तांत मेरुप्रभृति सर्व कार्यजातें असतें. मोराच्या अंड्यांतील रसांत जसा विचित्र पिसारा असतो त्याप्रमाणें नानात्वाला अभिव्यक्त करणें हेंच ज्याचें स्वरूप आहे अशा चितितत्त्वांत ही सर्व नानाता—द्वैत आहे. भेददृष्टीनें पाहिलें असतां मोर निराळा, त्याचा पिसारा निराळा त्याप्रमाणें भेददृष्टीनें पाहिलें असतां हें जगत् ब्रह्महून भिन्न स्थित आहे, असें भासतें. पण याप्रमाणें मयूरादिक नानारूप भासले तरी विवेकदृष्ट्या ते जसे नाना नाहींत त्याप्रमाणें ब्रह्म व जगत हा भ्रम अद्वैत व द्वैत यांच्या सत्तारूप आहे. म्ह. त्या दोघांचें कारण एकच सत्तासामान आहे. ज्याप्रमाणें सत व असत या दोघांचीही सत्तेच्या समतेतच अवस्थिति होते त्याप्रमाणें जगत् व ब्रह्म यांचें निरीक्षण केलें असता तीही सत्तासामान्यांत अवस्थित होतात, कारण सत् व असत् यांचें तत्त्व सद्रूपांत पर्यवसान पावतें, शून्यामध्यें त्याचें पर्यवसान होत नाहीं, कारण अभावही सद्रूपानें पतीत होतो. भूतलावर घट नाहीं, त्याचा अभाव आहे, असें आपण पाहतों, तें सत्त्व परब्रह्मच आहे. पण तें सद्रूप ब्रह्म अद्वय असल्यामुळें भिन्नाभिन्न स्वभावाचे जें हें जगत आपल्याला प्रतीत होत तें अनुपपन्न आहे, जसें जगांत चिदात्मक तत्त्व अनुगत--व्याप्त आहे, याप्रमाणेंच मयुरांत अंड्यांतील रस व्याप्त आहे. चित्तत्त्वांत जगत लीन झालेलें असते तसा रसांत मोर लीन असतो, नाना प्रकारच्या पदार्थांचे भ्रम एतद्रूप पिसानीं भरलेली आद्यब्रह्मचित्च जगल्लक्षण मोराच्या अंड्यांतील रस आहे. पण त्यांत भासणारें जें जगन्मयूररूप तें मयूररूप नसलेलें सत्तालक्षण पद--परमार्थ वस्तु आहे, असें तूं जाण. मग त्यांत भेद कोठून असणार ?

१. अविर्भावदशेंत कार्यरूपानें कारणच जसें असतें तिरोभावदशेंत कार्यही कारणरूपानें असतें.

---

## सर्ग ४८

—:०—

१. सत्ता स्फूर्ति व सुख यांचे प्रतिबिंब कल्पित जगांत पडत, तेच सच्चिदानंदघन आहे.

श्रीवसिष्ठः—अंड्यांतील मोराप्रमाणें वर वर्णन केलेलें अहंतादि आकाशादि सर्व अंतर्बाह्य जगत् ज्या शुद्ध तत्त्वामध्यें त्रिकालींही अनुत्पन्नच आहे तें शुद्ध ब्रह्मच वरील दृष्टान्ताचा तात्पर्यविषय आहे. शबल ब्रह्मामध्यें त्या दृष्टान्ताचें तात्पर्य नाहीं. जेथें परमार्थतः कांहीं उदय पावलेलें नाहीं तेथेंच सर्व जगत् अविद्येनें आहे तेंच या देहांतही अंगांचा रसभूत प्राण होऊन स्वर्गादि वैषयिक सुखाच्या साररूपानें विचित्र भोगाकारानें आरशांतील चंद्रबिंबाप्रमाणें प्रति-

बिंबित होतें. म्हणूनच मुनि, देवगण, सिद्ध, महर्षि, स्वात्मभूत भूमानंदाचा आस्वाद घेत सदा तुर्यपदीं स्थित आहेत. मग सर्वच त्या तुर्यपदाचा अनुभव कां घेत नाहींत, म्हणून म्हणशील तर सांगतो.--दृश्य जगत् व त्याचें दर्शन याविषयींची आसक्ति व प्राणस्पंद यामुळें होणारा विक्षेप, त्यामुळें सर्वांना त्या पदाचा अनुभव येत नाहीं. म्हणूनच त्या दोन्ही कारणांचा परिहार करण्यासाठीं योगी आपल्या नेत्रांना निमेषोन्मेषरहित करितात; आपली दृष्टि नासाग्रावर स्थिर करितात व दृश्यदर्शनाविषयींची आसक्ति व प्राणस्पंद यांचा त्याग करण्यामध्यें तत्पर होऊन राहतात. पण व्यवहार करीत असलेल्याही ज्या सहाव्या व सातव्या भूमिकावर आरूढ झालेल्या योग्याची बाह्य विषय सत्य आहेत, अशी थोडी सुद्धां भावना नसते व जे त्या पूर्वींच्या भूमिकामध्यें स्थित असलेले योगी विषयेंद्रियसंबंधत्यागरूप समाधींत स्थिर झालेले असतात, चित्रांतील पुरुषांप्रमाणें ज्यांचा प्राण व मन यत्किंचितही स्पंद पावत नाहीं, ते चित्तवेत्यसंबंधशून्य आत्मपदामध्यें स्थित असतात. सहाव्या व सातव्या भूमिकावर आरूढ झालेले योगी ईश्वराप्रमाणें[१] आंत ब्रह्माकार अखंडवृत्तिधारा अविच्छिन्न चालल्यामुळें त्या अंशानें निरतिशय आनंदाचा आस्वाद घेणें, एतद्रूप परम पुरुषार्थ जसा साधतात, तसाच बाहेर चित्तवेत्यादिकांचा प्रतिस्पंद होत असल्यामुळें व्यवहारसंस्थितिही करितात. जसा चंद्राचा स्वच्छ किरण पल्लवींत प्रवेश करून त्याला आल्हादयुक्त करतो त्याप्रमाणें आनन्दात्मा बाह्य विषयांमध्यें बुद्धिवृत्तींचा समागम झाला असतां त्रिपुटींत अभिव्यक्त होतो व अंतःकरणास आल्हादित करितो. अर्थात् सर्व व्यवहार सुखरूप आहे. चंद्राच्या बिंबापासून दूरवर पसरलेल्या पण अजून भिंतीपर्यंत येऊन न पोंचलेल्या चांदण्याचें जें रूप असतें तेंच शुद्ध संविद्चें रूप आहे. तें इंद्रियांचा विषय होत नाहीं, त्याचा उपदेश करितां येत नाहीं तें फार जवळही नाहीं व दूरही नाहीं. आत्म्याचें शुद्ध चिद्रूप केवळ अनुभवगम्य आहे. इंद्रियें, प्राण, चित्त, वासना, जीव, स्पंद, संवेदन, जगत्, सत्, असत्, सदसत्, शून्याशून्य, देश, काल, वस्तु इत्यादि सर्व उपाधींनीं रहित, असें तें आत्मतत्त्व आहे. हृदयामध्यें वासनारूपानें असलेल्या या अनन्तदेहादिकांनींही तें सर्वथा विरहित आहे. चित्तांत शतशः वासनाकोश विद्यमान असतांनाच हें सर्व दृश्य आविर्भाव व तिरोभाव यांच्या योगानें ज्याच्यामध्यें स्पंद पावतें तें सन्मात्र आत्मपदच आहे. येणेंप्रमाणें तें ब्रह्म कार्य-कारणविलक्षण आहे असा निश्चय करावा. जें ब्रह्म आद्य म्ह० अव्याकृतसंज्ञक कारण नाहीं, प्राकृतादि प्रलयरूप नाही तें वस्तु, देश, काल इत्यादि नाहीं. वायु-अग्नि इत्यादि पदार्थांनीं होणारे शोषणदहनादि जे विकार त्यांनीं तें आपल्या स्वाभाविक सद्रूपाला सोडून या लोकीं किंवा परलोकींही विकृत होणारें नाहीं. देहरूपी घट हजारों उत्पन्न होतात व नाश पावतात, पण सर्वांच्या सबाह्य-अभ्यंतरीं असणाऱ्या या आत्माकाशाची कांहीं हानी होत नाहीं. हे आत्मवेत्त्यांतील श्रेष्ठा ! तें देहादि सर्व आत्माच आहे, पण केवल बोधाच्या वैरूप्यामुळें तें किंचित् पृथक्सें होऊन राहिलें आहे. सर्व विश्व सर्वतः आत्ममय आहे, हे तूं श्रवणादि उपायांनीं परिष्कृत केलेल्या बुद्धीनें जाणलें आहेस; यास्तव आपल्या राज्याला योग्य अशा व्यवहारांत दक्ष असतांनाही तूं शांत व निर्मम हो. हें जें कांहीं चराचर जगत् दिसत आहे तें सर्व निर्धर्म,

---

१ ईश्वर आत स्वरूपानन्दामध्यें प्रतिष्ठित असला तरी बाहेर मायेनें जगाची व्यवस्था करतो, हे वेदिकांस माहित आहेच.

निर्गुण, निर्मलात्मक, निर्विकार, आदि-अन्त-रहित, नित्य, शांत व समात्मक ब्रह्म आहे. हे रामा! काल, क्रिया, करण, कर्तृ, आदि-कारण, कार्य, जन्म, स्थिति, प्रलय, स्मरण इत्यादि सर्व ब्रह्मच आहे, असें आत्मदृष्टया पाहणाऱ्या तुझें पुनरपि भ्रमण संभवतें तरी का? मुळींच नाहीं. कारण तूं समस्वरूपासच प्राप्त झाला आहेस.

---

# सर्ग ४९

—:०:—

१ विकाराहून विवर्त विलक्षण असतो. २ आत्म्याच्या अज्ञानामुळें अविद्या आहे. ३ ज्ञान होताच नाहीं.

**श्रीरामः**—भगवन्! सर्वव्यापक अखंड ब्रह्मामध्यें विकारादि कांहीं नाहीं तर हें भावाभावमय जगत कसें उत्पन्न होतें?

**श्रीवसिष्ठः**—दूध व्रीहि-भात इत्यादिकांमध्यें दहीं होणें, वरील साल काढतांच तांदूळ होणें, इत्यादि कार्य होतें. एकदां असें कार्य बनलें म्हणजे पुनः त्याला कारणावस्था प्राप्त होत नाहीं. ज्या कार्यांत क्षीरादि कारणाच्या स्वरूपाचाच पूर्ण बदल होऊन जातो, त्यालाच विकार, संस्कार, परिणाम इत्यादि म्हणतात. दहीं आपलें दधित्व सोडून पुनः दूध या भावास प्राप्त होत नाहीं. पण ब्रह्म तसें नाहीं. तें जाणलें असतां आदि-अंत मध्य या तिन्ही अवस्थांमध्यें तें निर्मल ब्रह्मच राहतें, त्यामुळें दुग्धादिकांप्रमाणें त्याला विकारत्व नाहीं. तर मग परमाणूंपासून द्व्यणुकादि-कार्यांचा आरंभ जसा होतो तसा ब्रह्मापासून जगाचा आरम्भ होतो, असें म्हणावें तर, आदि अंतरूप देशतः परिच्छेदानें व क्रिया, संयोग इत्यादि विभागांनीं, युक्त असलेल्या अवयवांनध्येंच अवयवीचा आरंम होऊं शकतो; पण ब्रह्म आदि-अंतरहित आहे, त्यामुळें त्याच्या मध्येंही आरंभ संभवत नाहीं. कार्योत्पत्तीच्या पूर्वीं व कार्याच्या नाशानंतर सम--एकरूप असलेल्या पदार्थाची ही जी क्षणांत विकृति--अन्यथाभाव प्रतित होते तो सविद्येचा विवर्त आहे, असें जाण. कारण जें विकाररहित असतें त्याच्या ठिकाणीं विकार संभवत नाहीं व ज्याचें ग्रहण करणारें इंद्रियादि नाहीं, तें ब्रह्मशब्दवाच्य तत्त्व सर्व संबंधशून्य चिदात्माच आहे. उत्पत्तीपूर्वीं व नाशानंतर जी वस्तु असते तशीच ती आहे असें म्हणतात, आणि त्या वस्तूंचें केवल मध्येंच जें अन्यत्व-विपरीतत्त्व भासतें तें अज्ञानामुळेंच होय. आत्मा आदि, अंत व मध्य या अवस्थांमध्यें सर्वत्र व सर्वदा सम आहे, त्यामुळें तो--आत्मतत्त्व स्व-

---

१ या आदिशब्दानें आरंभाचे ग्रहण करावें. ब्रह्मामध्यें अन्यथाभाव संभवत नाहीं. त्यांच्या पासून कार्यांचा आरंभही होऊं शकत नाहीं. मग हे जगत कसें झालें?

२ कारणांत कार्यांचा उद्भव पांच प्रकारें होतो. १ अतिरोहित प्रागवस्था, जसा मृगादिकांचा घटादिभाव. घट झाला तरी त्याची पूर्वावस्था लुप्त होत नाहीं, तर घटांतही माती दिसते. २ प्रतिबद्ध प्रागवस्था, पाण्याची गार बनली कीं त्याची पूर्व अवस्था म्ह० पातळपणा प्रतीत होत नाहीं. तो गार या कार्याकडून प्रतिबद्ध होतो. ३ प्रच्छन्न प्रागवस्था, जसा रज्जूचा सर्पभाव सर्पाचा भाव झाला कीं, त्याची पूर्वावस्था-रज्जुपणा त्यात गुप्त राहतो. ४ अप्रच्छन्न प्रागवस्था, जसा जलाचा तरंगभाव. जलामध्यें तरंग या कार्याचा उद्भव जरी झाला तरी त्याची पूर्वावस्था म्हणजे जलत्व गुप्त होत नाहीं. तरंगातही तें दिसते व ५ विनष्ट प्रागभाव, जसा दुधाचा दहींपणा, दहीं झालें कीं त्याची प्रागवस्था दूधपणा नष्ट होतो. या पांच प्रकारच्या कार्योद्भवापैकीं शेवटच्यामध्येंच जन्मादि भावविकार व परिणाम होतात. बाकीचे चार प्रकार हे विवर्तांचेच भेद आहेत.

भावतःही अन्यत्वास प्राप्त होत नाहीं. हा ईश्वर अरूपत्वामुळें, एकत्वामुळें, व नित्यत्वामुळें केव्हांही भावविकारांच्या आधीन होत नाहीं.

श्रीरामः सदा एकरूप अत्यंत शुद्ध ब्रह्म विद्यमान असतां त्यांच्या विपरीत स्वभावाची जी अविद्या तिचा कसा संभव आहे ?

श्रीवसिष्ठः—रामा ! हें सर्व पूर्वी निर्विकार, आदि-अंतरहित ब्रह्मतत्त्व होतें, आतांही ब्रह्मतत्त्व आहे आणि पुढेंही ब्रह्मतत्त्वच असेल. ' ब्रह्म ' या शब्दानें जो वाच्यवाचक क्रम -शब्द व अर्थ यांचा भाव उत्पन्न केला जातो तोही भेदभाव आहे हे सांगण्यासाठीं नाहीं तर शिष्याला उपदेश करण्यासाठीं तो क्रम कल्पिलेला आहे. तूं, मी, जगत्, दिशा, द्युलोक, भूमि, अग्नि वगैरे हें सर्व आदि-अंतरहित ब्रह्ममात्र आहे. तेथें अविद्या थोडीशीही नाहीं, अविद्या हें नुस्तें नामच आहे; तें नाम भ्रममात्र व असत् आहे, असें तत्त्वज्ञ समजतात. रामा ! जी विद्यमानच नाहीं ती सत्य कशी असेल ?

श्रीरामः—प्रभो ! आपण काल सांगितलेल्या उपशमप्रकरणांत ' ही अविद्याभ्रांति कशी आहे त्याचा हा असा विचार केला जातो. ' असें म्हटलें होतेंत. पण अविद्या जर मुळीं नाहींच तर तुम्हीं तिचा अगीकार करून असें कां म्हटलेंत ?

श्रीवसिष्ठः—हे रघुश्रेष्ठा ! तूं एवढा वेळ अतत्त्वज्ञ होतास, म्हणून त्या कल्पित स्वयुक्तींनीं तुला बोध करीत होतों, पण आतां तूं ज्ञानी झालों आहेस; म्हणून आतां तसल्या युक्तीची कांहीं गरज नाहीं. ही अविद्या आहे, हा जीव आहे, इत्यादि कल्पनांचा क्रम अज्ञाला चांगला बोध व्हावा यासाठीं वाक्वेत्यांत श्रेष्ठांनीं कल्पिला आहे. जोंवर मन अप्रबुद्ध असतें तोंवर अविद्यादि शास्त्रीय-व्यवहाराच्या कल्पनेवांचून तें शतशः आक्रोशांनींही प्रबोधास प्राप्त होत नाहीं. युक्तीनेंच बोध करून हा जीवाला आत्म्यामध्यें योजावा लागतो; कारण जें कार्य युक्तीनें साध्य होतें तें शेंकडों यत्नांनींही साध्य होत नाहीं. दुर्बुद्धिवान् अज्ञाला जो सर्व ब्रह्मच आहे, असें सांगतो तो जड खांबाला आपला सुहृद् समजून आपलें दुःखच निवेदन करतो. मूढाला युक्तीनें बोध करावा व प्रज्ञाला तत्त्वानें बोध करावा. युक्तीनें बोध केल्यावांचून मूढाची समज होत नाहीं. एवढा वेळ तूं अज्ञ होतोस म्हणून मीं तुला युक्तीनें बोध केला; आतां तूं चांगला प्रबुद्ध झाला आहेस, म्हणून मी तुला अशा प्रकारच्या उपदेशानें बोध करीत आहें, तें ऐक. मी ब्रह्म आहें, त्रिभुवन ब्रह्म आहे, व ही सर्व दृश्य भू ब्रह्म आहे, येथें ब्रह्मावांचून दुसरी कल्पनाच नाहीं; यास्तव आतां तुझी जशी इच्छा असेल तसें कर. तुझ्या इच्छेला येईल तसा व्यवहार केलास तरी वास्तविक ब्रह्मत्वाचा बाध होणार नाहीं. हें त्रिभुवन निर्विषय महासंवित्कोटिमात्र आहे, सर्व जगद्भ्रमाच्या बाधाचा अवधि-सीमा अशी जी निर्विषय महाचिति, तन्मात्र आहे; या एका प्रत्ययानें आंत युक्त होऊन तूं जरी बाहेरून व्यवहार करीत असलास तरी लिप्त होणार नाहींस. रामा ! तूं उभा असतांना, जात असतांना, श्वासोच्छास सोडीत असतांना व निजतांनाही मनांत ' मी स्वयंप्रकाशरूप, चेतन, व्यापी परमात्मा आहें, ' हा अनुभव घे. तुला जर यथार्थ अनुभव आला असेल तर तूं निर्मम, निरहंकार, चिदेकरस, शांत, सर्व भूतांमध्यें स्थित असलेलें ब्रह्म हो. सर्वगत एकात्मक शुद्ध चिन्मयरूप असा तो तूंच तें श्रुतिप्रसिद्ध आदि-अंतरहित परम पद होऊन राहिला आहेस. जें ब्रह्म, आत्मा, तुर्य, या

नांवांनीं प्रसिद्ध आहे, त्याचप्रमाणें जी अविद्या, प्रकृति व जगत् या नांवांनीं प्रसिद्ध आहे, तें सर्व शेंकडों घटांतील एका मातीप्रमाणें एक सद्रूप आहे. घटाहून मृन्मयता जशी भिन्न नाहीं त्याप्रमाणें आत्म्याहून प्रकृति भिन्न नाहीं. जसें घटाचें मृन्मयता हें वास्तव रूप त्याप्रमाणें आत्माच प्रकृतिचें रूप आहे. पाण्याचा जसा तरंग त्याप्रमाणें आत्म्याचा जो स्पंद-विवर्त तीच प्रकृति आहे. वास्तव या स्वविवर्तरूप प्रकृतींत व तिच्या कार्यांत आत्माच सन्मात्रस्वभावानें आहे, अणुमात्रही दुसरें कांहीं नाहीं. जसा वायु व त्याचा स्पंद हे नांवानें भिन्न पदार्थ आहेत, सत्तेनें नाहींत, त्याचप्रमाणें आत्मा व प्रकृति हीं नाममात्र भिन्न आहेत. वस्तुतः भिन्न नाहींत, तर एक आहेत, अज्ञानामुळें यांचा भेद भासतो, तो बोधानेंच विलीन होतो. रज्जूच्या अज्ञानामुळें सर्प जसा यथार्थ भासतो तसेंच हें जाणावें. चित्क्षेत्रांत हें जें कल्पनाबीज पडते तेंच चित्तांकुर होतें; त्यापासून स्फुरण पावणारा हा भावि संसाराचा समुदाय होतो. पण तेंच कल्पनाबीज आत्मविज्ञानानें भाजलें गेलें असतां त्याच्यावर सद्वासनाजल मोठ्या यत्नानें जरी घातलें, तरी त्याच्यापासून अंकुरोत्पत्ति होऊं शकत नाहीं. चित्क्षेत्रांत कल्पनाबीजच जर न पडलें तर त्याच्यापासून सुख व दुःख हीं फळें देणारें शरीर-वृक्ष ज्यापासून होतात असे चित्तांकुरच उद्भवत नाहींत. हे रामा! जगांत असत् भ्रांतीनें उत्पन्न झालेलें द्वित्व सोड, कारण तूं ज्ञानी झाला आहेस. आत्मैकत्वरूप निरतिशयानन्द वैभवाने अभयात्मा हो. दुःख कालत्रयींही नाहीं, हा आमचा यथार्थ उपदेश आहे.

---

# सर्ग ५०

—:※:—

१. कल्पनेनें जीवामध्यें लिंगरूप पुर्यष्टकाचा उद्भव. २. इंद्रियांनीं बाह्य विषयग्रहणाचा क्रम.

श्रीरामः—मीं सर्व ज्ञातव्य जाणलें, सर्व द्रष्टव्य पाहिलें, मी तुमच्या ब्रह्मज्ञानामृतानें अत्यंत संतुष्ट झालों. पूर्णब्रह्मापासून शरीरोपाधींत प्रवेश करून सर्व शरीराला नखशिखान्त व्यापणारें हें जीवरूप वस्तुतः पूर्णब्रह्म आहे; ज्या पूर्णापासून जं व्यष्टिसमष्टि—उपाधिरूप आकाशादि क्रमानें उत्पन्न होतें तेंही पूर्णच उत्पन्न होतें; आणि पूर्ण ब्रह्माच्या ज्ञानानें पूर्ण ब्रह्मानेंच तें जेव्हां परिपूर्ण होतें तेव्हां सर्व कल्पित उपाधींचा बाध होऊन पूर्वींची पूर्णताच अवस्थित होते. अनेक लोकांच्या बोधाची अभिवृद्धि व्हावी म्हणून मी हें आपल्याला लीलेनें विचारीत आहें; लीलेनें कांहीं तरी प्रश्न करणाऱ्या बालकावर पिता जसा कोप करीत नाहीं त्याप्रमाणें आपणही मजवर कोप करूं नये. भगवन्! मेलेल्या प्राण्याचें[1] श्रोत्र, चक्षु, स्पर्शन, रसन, घ्राण हीं सर्व इंद्रियें विद्यमान असतांना व स्पष्ट दिसत असतांना आपापल्या विषयाचें ग्रहण कां करीत नाहीं? व जिवत असलेल्या प्राण्याची ती सर्व आपापल्या विषयाचें ग्रहण कशीं करतात? इंद्रियें जड असून शरीरांत घटादि बाह्य पदार्थांचा अनुभव कशीं घेतात? व त्यांच्या अनुभवाचा काल संपतांच म्हणजे दुसऱ्या अनुभवाला आरंभ होतांच घटादि—अनुभव येईनासा कां होतो? म्हणजे चक्षुरादि इंद्रियें स्वतः बाहेर निघून घटादिकांच्या बाह्यत्वाचा अनुभव घेऊन आंत प्रवेश करितात व आपला अनुभव सांगतात म्हणून म्हणावें तर तीं जड आहेत त्यामुळें त्यांना

१. अर्थात् येथें श्रोत्रादिक म्ह० कान, डोळे इत्यादि गोलक विवक्षित आहेत.

स्वतंत्रपणें अनुभव घेता येत नाहीं व सांगतांहि येत नाहीं. बरें इंद्रियें बाह्य अर्थाला हृदयांत नेऊन स्थापितात, म्हणून म्हणावें तर तेंही जुळत नाहीं. कारण हृदयांत विषयाची स्थापना करितात म्हणून म्हटलें तर याचा हृदयात पुन: पुन: अनुभव यावयास पाहिजे, पण तो येत नाहीं. बरें 'घटादि विषयजात प्रथम इंद्रियांना आपल्याकडे आकर्षण करून घेतें. नंतर विषयांनीं आकर्षण करून घेतलेलें इंद्रिय विषयाला वेष्टित करून हृदयस्थ भोक्त्याकडे कांहीं अंशानें घेऊन जातें' म्हणून म्हणावे, तर इंद्रियें व विषय यांचा संबंधच संभवत नाहीं. दोरी व घट यांचा परस्पर संबंध होऊं शकतो, त्यामुळें आपण दोरीनें घटाला आपल्याकडे ओढून घेऊं शकतों. पण असंबद्ध विषय व इंद्रिय यांना परस्परांना आकर्षण करण्याचें सामर्थ्य कसें असणार ? त्याचप्रमाणें नेत्रादि अल्प छिद्रातून घटादि स्थूल पदार्थांचा आत प्रवेश कसा होणार ? तत्त्वज्ञानानें माझे सर्व संशय नाहीसे झाले आहेत. या मायामय व्यवहारांत अनुपपन्न असें कांहींच नाहीं, हें मी जाणतों. तथापि अज्ञ जनावर अनुग्रह करण्यासाठीं मी पुन: पुन: विचारीत आहें. यास्तव दया करून तें सर्व मला सांगा.

श्रीवासिष्ठ:—रामा ! कान, डोळे, नाक, या गोलकाहून इंद्रियें निराळीं नाहींत,' असें जें तुझें म्हणणें आहे तें अगदींच अल्प आहे. कारण इंद्रियादि, चित्तादिक, घटादिक इत्यादि कांहींही निर्मल चेतनाहून पृथक्त्वानें संभवत नाहीं. पण कल्पनेनें द्रष्टा व दृश्य यांची उपपत्ति जर तूं मानीत असशील तर इंद्रियादिकांनीं बनलेल्या पुर्यष्टकरूपानें पूर्व पूर्व वासनेच्या अनुसार कल्पना करणेंही उपपन्न आहे. अर्थात् आकाशाहूनही स्वच्छ असलेली जी चित् तिनें आपल्या मायाशबल स्वभावानें पुर्यष्टक कल्पना केली. ते पुर्यष्टकच या जगाच्या अवस्थितीची प्रकृति झालें आहे. तिच्या अवयवापासून हें इंद्रियादिक व घटादिक झालें आहे. याप्रमाणें पुर्यष्टकत्वास प्राप्त झालेलें चिद्रूप तत्त्वच स्वत:च स्ववृत्तिसंज्ञक अवयव होतो; कारण पुर्यष्टक चित्तादिकांनीं बनलेलें असतें, त्यामुळें त्याच्यापासून चित्तवृत्तिरूप अवयव होऊं शकतो. त्यांत घटादि बाह्य पदार्थ बाह्य आकारानेंच प्रतिबिंबित होतो. मृत शरीरांतून पुर्यष्टक निघून गेलेलें असतें, त्यामुळें त्यांत कान--डोळे इत्यादि गोलक जरी असले तरी दर्शनादि सामर्थ्य नसतें-

श्रीराम:—भगवन् ! सहस्रावधि जगांना निर्माण करण्याचें सामर्थ्य ज्याच्यामध्यें आहे अशा पुर्यष्टकसंज्ञक आरशाचें रूप कशा प्रकारचें आहे तें सांगा.

श्रीवासिष्ठ:—जे आदि-अन्तरहित, निरामय, प्रकाशरूप, शुद्ध, चिन्मात्र, कल्पनाशून्य जगद्बीज ब्रह्म आहे तेंच जेव्हां आंतल्याआंत कल्पनोन्मुख होतें तेव्हां त्याला जीव म्हटलें आहे. तो जीव खरोखर या देहांत वासनेच्या व अंगाच्या वृद्धीनें वृद्धि पावतो. आणि याप्रमाणें उपचय पावलेला तो बाहेर व आंत व्यापाररूपानें स्पंद पावतो. अहंभावामुळें तो अहंकार होतो. मननामुळें मन होतो. बोधनिश्चयामुळें बुद्धि होतो. इंद्रदृष्टीमुळे तो इंद्रिय होतो. देहाच्या भावनेनें देह होतो, घटाच्या भावनेनें घट होतो, याप्रमाणें ज्याचें स्वरूप सर्व व्यापार साधारण आहे अशा त्याला पुर्यष्टक असे म्हटलेलें आहे. ज्ञानेंद्रियांच्या व्यापारानें ज्ञत्व, कर्मेंद्रियांच्या व्यापारानें कर्तृत्व, त्याचें फल जें सुखदु:खादिक यांच्या आश्रयत्वानें भोक्तृत्व, त्याचें फल जें सुखदु:खादिक त्याच्या आश्रयत्वानें भोक्तृत्व, सर्वांविषयीं उदासीन राहून त्याला केवल प्रकाशित करण्यानें

साक्षित्व, त्याचप्रमाणें भोगसाधनत्व, भोगाश्रयत्व यांच्याशीं तादात्म्य पावलेली—अध्यासानें तद्रूप झालेली जी संवित् तीच चित्प्राधान्यानें जीव म्हणून म्हटलेली व जडांशाच्या प्राधान्यानें तेंच पुर्यष्टक आहे, असें विद्वान् समजतात. म्हणूनच स्वतादात्म्यानें कल्पिलेले बुद्धीचे आकार निरनिराळ्यां वेळीं निरनिराळे होत असल्यामुळें जीवही काम--क्रोध--हर्ष--विषाद इत्यादिकांनीं अनुरंजित होत्साता नानासा होतो. तो पुर्यष्टक स्वभावानें अनन्त वासना लेशांच्या उदयास म्हणजे अनुरूप आकारास योग्य वेळीं प्राप्त होतो. ज्याप्रमाणें जलाचा सेक केला असतां बीज अंकुर, कांड, पल्लव इत्यादि आकारांनीं विकास पावतें त्याप्रमाणें वासनेमुळें समष्टि व्यष्टि जीव सर्व जगदाकारास प्राप्त होतो. म्हणून मी शरीरादी-चरादि-स्थावरादि आकार आहें असें जीव मिथ्या अज्ञानानें पाहतों जो आद्य चिदात्मा तो तर मी नव्हे, पण सागरांतील काष्ठ लाटांच्या जोरानें खालीं व वर जसें जातें त्याप्रमाणें वासनांनीं वेष्टित झालेला जीव या जगात चिरकाल ऊर्ध्व-अधोगमनांनीं भ्रमण करीत राहतो. त्यांतील सनकादिकांसारखा कोणी विशुद्ध जन्मामुळें पूर्वकल्पांतील भवबंधनानंतर पहिल्या जन्मातच आत्म्याला जाणून आदिअंतरहित पदास प्राप्त होतो. कोणी अनेक जन्मांचा अनुभव घेऊन आतुर झालेला मानवजीव दीर्घ कालानें आत्मज्ञानानें आत्म्याच्या परमपदास प्राप्त होतो. हे सुमते रामा! अशा प्रकारचा जीव शरीरत्वास प्राप्त झालेला आहे. आता तो नेत्रादिकांच्या योगानें आंत घटादिकांना कसा जाणतो तें ऐक. चित्-तत्त्व पुर्यष्टकांत प्रतिबिंबित होऊन नखशिखांत शरीराला व्यापून जीव होऊन राहतें. त्यामुळें जीवचैतन्य सदा मनासुद्धां सहा इंद्रियांच्या देहानें परिमित व देहाच्या आंतच असतें; तें आंतच सुखदुःखादिकांचा अनुभव घेते, बाहेर नाहीं. जेव्हां दुसरा घटादि पदार्थ पाहावयाचा असतो तेव्हां तळ्यांतील पाणी बाहेर पडून मोरींतून जसें वाहतें त्याप्रमाणें सर्व शरीरांपासून निघालेलें चक्षुरादि इद्रिय नेत्रादि गोलकांच्या द्वारा बाहेरील घटादि पदार्थांपर्यंत असलेल्या आकाशांत जातें. त्यानंतर त्या घटादि बाह्य पदार्थांचा नेत्रादिकांच्या द्वारा इंद्रियरूपानें बाहेर पडलेल्या जिवाशीं संबंध होतो. तेव्हां तें जीवचैतन्य पदार्थाला व्यापतें. त्यामुळें बाह्य पदार्थ जीवाचा विषय होतो, जीवचैतन्याशीं एकत्व पावणें, म्हणजे आध्यात्मिक चित्तादात्म्य होणें, हेंच पदार्थानें जीवाचा विषय होणें आहे. अर्थात् बाह्य विषयाचें ज्ञान व्हावयास नेहमीं चित्तानें युक्त असलेल्या इंद्रियाचा संबंध व्हावा लागतो. जिवंत शरीरांतच त्याचा संभव आहे, मृत किंवा मुक्त पुरुषाच्या शरीरांत तो संभवत नाहीं. पण त्याचा आंत-अनुभव कसा येतो, म्हणून विचारशील तर सांगतों. जें जें अंतःकरणवृत्तिरूप किंवा नेत्ररश्मिरूप अत्यंत स्वच्छ असतें त्यांत बाहेरील आकाशांत असलेले घटादि पदार्थ प्रतिबिंबित होतात आणि तें प्रतिबिंब वृत्तीच्या आंत असलेल्या जीवाशीं संबद्ध होतें. तर मग बाहेर असलेलाच हा मी घटाचा अनुभव घेतों, असें कां वाटत नाहीं! म्हणून विचारशील[1]

( ही टीप १०७४ पानावरील आहे. )

१ 'मी बहु व्हावें' या संकल्पानें आकाशादि भूतसूक्ष्म उत्पन्न करून त्या अपंचीकृत पचभूतांनी लिंग व पंचीकृत पंचभूतांनीं ब्रह्मांड उत्पन्न करून त्याच्या आंत प्रतिबिंबरूप कलनामुखत्वास प्राप्त होतें. तें सूत्रभूत प्राणांच्या धारणामुळें. 'प्राणच मी' अशा अभिमानानें धारण केल्यामुळें त्यालाच जीव ही संज्ञा प्राप्त होते.

१ या विषयीं उत्पत्ति-प्रकरणांत सविस्तर वर्णन केलें आहे.

तर त्याचेंही उत्तर सांगतों, ऐक. जीव त्यावेळीं बाहेर असतो हें जरी खरें आहे तरी तो बाहेर प्राणांना धारण करीत नाहीं, आणि जेथें प्राणांची व्याप्ति असते तेथेंच अहंतेचा परामर्श होतो. 'असें जरी असलें तरी घटादिकांचा आकार आंत कसा शिरतो?' म्हणून विचारशील तर ऐक—नुकत्याच साणेवर घासून स्वच्छ केलेल्या इंद्रनील मण्याप्रमाणें नेत्रांतील कनीनिका जेव्हां स्वच्छ-सर्व दोषरहित असतात तेव्हां त्यांत बाहेरील पदार्थ प्रतिबिंबित होतो, म्ह० त्या पदार्थाच्या प्रतिबिंबासह असलेली चित्तवृत्ति त्यांत प्रवेश करते; याप्रमाणें नेत्रतारकांत प्रविष्ट झालेला पदार्थ हृदयांत ' मी ' अशा अभिमानानें युक्त असलेल्या जीवाशीं हृदयांतील प्रतिबिंबत्वानें संश्लिष्ट होतो, येणेंप्रमाणें घटादि बाह्य वस्तु बाहेर आहे, असें दिसत असतांनाच हृदयामध्यें अहंकारयुक्त जीवाचा तो विषय होतो. ज्या विषयाशीं चेतनाचा संबंध होतो त्याला लहान मूलही जाणतें. मग पशु व स्थावर जीव तरी कां जाणणार नाहींत? दूर असलेल्या विषयांचा गोलकांशीं संबंध कसा होतो? म्हणून कोणी पामर जीव विचारतात, त्याचें उत्तर असें--नेत्र, कान, इत्यादि गोलकाहून निराळ्या असलेल्या सूक्ष्म व अत्यंत स्वच्छ इंद्रियांचे किरण वर सांगितल्याप्रमाणें जीववेष्टित होत्साते पुढील विषयाला आलिंगितात व त्यामुळें जीव त्याला जाणतो स्पर्शज्ञानाचाही हाच क्रम आहे. रस व गंध यांनाही हाच न्याय लागू आहे. म्हणजे हे सर्व प्रत्यय इंद्रिय व विषय यांचा जीव चैतन्याशीं संबंध होऊनच येतात. पण शब्द आकाशनिष्ठ आहे. वास्तव कर्णाकाशांत स्वतःच म्हणजे वृत्तीमध्य प्रतिबिंबित झाल्यावाचून तो प्रवेश करतो व क्षणांत त्याच्याही आंतील जीवाकाशांत जातो. याप्रमाणें यथासंभव इंद्रियजन्य ज्ञानें उत्पन्न होतात.

श्रीराम:—-भगवन्! मन, आरसा, कांच, कांसें, रत्नें, जल, इत्यादि सर्व स्वच्छ पदार्थांत घटादि सर्व मूर्तामूर्त पदार्थांचें प्रतिबिंब पडतें. पण त्यांचें स्वरूप काय आहे.?

श्रीवसिष्ठ:—हे ज्ञानिश्रेष्ठा! बिंब जरी सत्य असलें तरी चित्प्रतिबिंबभूत समष्टि-व्यष्टि जीवांचें स्वरूप भ्रांतिमात्रच आहे. त्याचें बिंबभूत चित्-हून पृथक्त्वानें किंवा अपृथक्त्वानें वर्णन करवत नाहीं; आणि चित्-विषयींही जर असा प्रकार आहे तर मग अत्यंत जड असलेलें मुख, आरसा किंवा घट, चित्तवृत्ति यांचें परस्पर सापेक्ष असलेलें प्रतिबिंबरूप अनिर्वाच्य आहे, हें काय सांगावें! अर्थात् प्रतिबिंब ही दृष्टीची—चैतन्यात्म्याची भ्रांति आहे, असें समज केवल प्रतिबिंब भ्रांति आहे, असें नाहीं, तर हें जगत-ही भ्रांति आहे. त्यावर तूं विश्वास ठेवूं नकोस. ' अहं ' इत्यादि प्रपंच हा तरंग आहे. तो चिद्रूप जलाहून पृथक् नाहीं. सदा राहणार चित्--जल मात्र सत्य आहे. त्या परसागरामध्यें देश-काल क्रियादिक कांहीं नाहींच. तो केवळ तन्मय आहे. आत्मा नित्य एकरूपानें सर्वत्र व सर्वग आहे. हे रामा! तूं नित्य असक्तबुद्धि होऊन ज्याची बुद्धि शांत आहे, असा होऊन त्याचप्रमाणें सर्व संसारलक्षण रोग ज्याचे शांत झाले आहेत असा होऊन समेंतेत म्ह० ब्रह्मस्वभावांत आपली मति स्थिर करून रहा.

---

१ लाजरीच्या झाडाला हात लावताच तिची पानें मिटतात. उन्हाळ्यात पानें कोमेजतात. पाणी घालतांच तीं टवटवीत होतात. हें सर्व स्पर्शज्ञानावाचून संभवत नाहीं.

## सर्ग ५१

—:*:—

१ जीव, इंद्रियें, मन, देह, पुर्यष्टक इत्यादि भ्रम अज्ञानामुळेंच होतो. बोध झाल्यावर एक ब्रह्मच राहातें.

श्रीवासिष्ठ:---जीवसमाष्टि जो ब्रह्मा त्याच्याप्रमाणें तुझेंही सृष्टीच्या पूर्वी चक्षुरादिक कांहींच निष्पन्न झालेलें नव्हतें हें मी सांगितलेलें तूं जाणलेंच आहेस. हिरण्यगर्भाची समष्टिपुर्यष्टकाची सृष्टीच्या आरंभीं जशी विषयसंविद् उत्पन्न झाली तशीच सर्व व्यष्टिपुर्यष्टकाची संवित् उदय पावते. जो व्यष्टि जीव गर्भामध्यें असतांनाच चक्षुरादि पुर्यष्टकविशिष्ट सहाव्या महिन्यांत होतो तोच तेव्हांपासून जशा व्यवहार्य वस्तूची भावना करतो तशीच ती आपल्या वासनेनें पाहतो. हिरण्यगर्भाच्या मनोव्यापारांत जसे आत्मसंवेदनच इंद्रियें व विषय होतें त्याप्रमाणें तुझेंही तेंच झालें आहे. सृष्टीच्या पूर्वी संभवणारी जी व्यष्टि व समष्टि यांची एकच शुद्ध संवित् ती सृष्टीनंतर अहंवेदनरूप अनन्त जीवपुर्यष्टकयुक्त होतो, तथापि ती अनिंदित संवेदनस्वरूपच आहे. 'अहोपण, तिचा वेद्यविषयाशीं संबंध होतो ना? मग ती निंद्य कशी नाहीं?' म्हणून म्हणशील तर सांगतों-एक अनन्त व अवेद्य असलेलें जें निरामय संवेदन त्यांत त्याहून भिन्न असलेल्या पदार्थांची सत्यता संभवत नाहीं, कारण त्याला अभावत्व[१] आहे, अनेकत्व[२] आहे व अशून्यत्व[३] आहे. 'अहोपण, संवेदनच जर मनस्त्वादि भावास प्राप्त होत असेल तर मनस्त्वादि जसें असत् तसेंच संवेदनही असत् कां नाहीं?' म्हणून म्हणशील तर सांगतो. विषय, मन्तव्य इत्यादि विषयक बुद्धिवृत्तीचा नुस्ता आरोप होतो, पण ती खरी मनस्त्वप्राप्ति नव्हे, वस्तुत: ती जीवत्वाला प्राप्त होत नाही व ती पुर्यष्टकात्मकही नाहीं. वस्तुत: विद्याविलासही नाहीं. जो नाहीं, असें मूर्ख म्हणतात, तो आत्मा सदा आहे, त्यालाच परमात्मा असें म्हटलें आहे. तो पांच ज्ञानेंद्रियें व सहावें मन यांच्या पलीकडे आहे. तर मग परमात्म्यापासून अग्निविस्फुलिंगाप्रमाणें जीव उत्पन्न होतात, असें जें उपनिषदांत म्हटलें आहे त्याचा अर्थ काय?' म्हणून म्हणशील तर सांगतों—त्या परमात्म्यापासून चिन्मूर्ति मननात्मक जीव होतो, हा केवळ भ्रम आहे. अज्ञजनांना उपदेश करण्यासाठीं ती कल्पना केलेली आहे. हा कसा तरी व कोठून तरी उत्पन्न झालेला जो अविद्यामय रोग तो उपदेश्य व उपदेश या कल्पनेनें विचारबलानें नष्ट झाला असतां निर्विषय ज्ञान अवशिष्ट राहतें. यांत परमाणूच्या अपक्षेनें जसा महापर्वत तसें आकाशही स्थूल आहे. ज्याच्यामध्यें व्यवहाराच्या उपयोगी असल्यामुळें सत्--विद्यमानें भासणारें जगत असत-शून्य होऊन राहिलें आहे त्या निर्मल सत्य ब्रह्मामध्यें तूं जगांतील सर्व विषयांस सोडून राहा. अविद्येचें रूप असन्मय आहे. कारण अविद्येला पाहिलें असतां तें खरोखर नाशच पावतें. दिसत नाहीं. कारण जी वस्तुच नाहीं ती प्रमाणत: पाहूं लागलें असतां कशी सांपडणार? मृगजळ कोणाला तरी दीर्घ प्रयत्नानेंही प्राप्त होतें कां? असत्च सत् भासतें, कारण मिथ्या अज्ञानामुळें त्याला सत्यता आहे ज्ञान झाल्यावर वस्तु जशी असते तशी दिसते व भ्रम नाश पावतो. सत्य आत्म्याच्या संनिधानामुळें अत्यंत असत अशा अविद्येनेंही कल्पना झाली आहे. जीवाला उपदेश करण्यासाठींच ही जीवादिकांची कल्पना आहे, शास्त्रांनीं केलेल्या त्या कल्पनेमुळें जीवाला तत्त्वाचा बोध होतो,

१. त्याचा देशकालकृत परिच्छेद होतो. २. त्याचा वस्तुकृत परिच्छेद होतो. व ३. त्याला स्थूलत्व आहे.

यास्तव तूं एकाग्रमनानें ती कल्पना ऐक. जीवत्वाशी प्राप्त झालेली, पुर्यष्टकपदी स्थित झालेली कल्पनारूप कलंकानें रहित असलेली चिति बाह्य विषयाच्या दर्शनाविषयीं उत्सुकशी होऊन ज्याची जशी भावना करते त्याचा तसाच तत्काल अनुभव घेते. बालानें रात्रीं कल्पिलेला यक्ष सत्य असो कीं असत्य असो, पण तो त्याला दिसतो व त्याच्या मनावर परिणाम करतो. तो पंचतन्मात्रांचीं पंचीकरणात्मक देहकलना सत्यतेनें पाहतो, व त्याचप्रमाणें त्या देहात्म्यामध्यें वर सांगितल्याप्रमाणें श्रोत्रादि इंद्रियछिद्रें पाहतो. अंकुर जसा शतशाखांनीं विस्तार पावतो त्याप्रमाणें या पंचतन्मात्रापासूनच उत्पन्न झालेलें स्थूल भूतपंचक वस्तुतः त्याहून भिन्न नसतांना भिन्न असल्यासारखें पाहतो. नंतर हें इंद्रिय-मन-प्राणादि आंत आहे, हे घटादि बाहेर आहे, अशा निश्चयानें युक्त असलेला जीव त्यांविषयीं जशी भावना ग्रहण करतो तशीच ती दृढ करतो. चंद्रापासून जसा किरणांचा समूह त्याप्रमाणें आत्म्याचें विषयेंद्रियसंबंधापासून अभिव्यक्त झालेलें जें प्रतिभासन तेंच म्ह० जें विषयसुख तेंच आत्मसुख आहे, असें तो जीव समजतो. प्रकाशाची जी तीक्ष्णता, आकाशाची जी शून्यता व आत्म्याचें जें वेदन तें सर्व तत्तद्रूप असतांना अन्य असल्यासारखें स्थित आहे. म्हणजे स्ववेदन स्वाभाविक असलें तरी विषयाच्या संबंधामुळें झालेलें तें अहंकारात्म्याचा धर्म आहे, अशी जीव संभावना करतो. संसारांतील विषयभोगांमध्येंच सर्व पुरुषार्थांची परिसमाप्ति होते, असा निश्चय करून ऐहलौकिक व पारलौकिक कर्माचरणाचा नियम त्यानें अगदीं दृढ केला आहे; नश्वर सुखाला उद्देशून याच्यासाठीं हें लौकिक कर्म आहे व याच्यासाठीं हें पारलौकिक कार्य आहे, असा त्यानें नियम केला आहे. त्यांतील एक-प्रवृत्ति नियम स्वाभाविक रोगादिकृत आहे व दुसरी शास्त्रीय आहे. पण तो दोन्ही प्रकारचा नियम संकल्पमयरूप आहे. त्यांतील कोणता तरी कोणता तरी एकच स्वाभाविक पुरुषप्रयत्नानेंच इतरास जिंकून स्वतः होतो, त्यांवाचून होत होत नाहीं. पण त्या दोन्हींमध्यें अज्ञात आत्माच तो तो व्यापार, त्याचें साधन, फळ या रूपानें विकार पावतो. ज्याप्रमाणें खडीसाखर ऊसाच्या रसापासून होतें किंवा महाघट मातीचाच होतो त्याप्रमाणें हें सर्व द्वैत आत्माच बनलें आहे, पण तें मिथ्या असल्यामुळें एकरूप आहे, असें दिसतें. खडीसाखर व घट हें पदार्थ रस व मातीचा गोळा यांच्या बदलण्यानेंच होतात म्हणून ते विकारच आहेत; तथापि त्यांतील माधुर्य व माती यांचा विनाश होत नाहीं म्हणून त्या अंशीं ते एक प्रकारें विवर्तही आहेत. रस-माती यांमध्यें आकार, विकार, देश, काल इत्यादिकांचा संभव आहे. पण ईशांत ( ब्रह्मांत ) त्यांचा मुळींच संभव नाहीं. यास्तव त्याच्या ठिकाणीं तें सर्व विवर्तच मानले पाहिजे. अथवा ज्याप्रमाणें वृक्षामध्यें प्रविष्ट झालेला जलरस एकीकडे पान, दुसरीकडे पुष्प इत्यादि आकार वैचित्र्यानें उत्पन्न होऊन अद्वित्वामययेंही द्वित्व धारण करीत आहे, असें दिसतें, त्याप्रमाणें आमच्या स्वात्म्यामध्ये प्रसिद्ध सत्तारूप असलेलें ब्रह्मही इकडे पट, इकडे भिंत इत्यादि भेदाच्या द्वारा सर्व जगद्रूपानें आपल्यामध्यें द्वित्व आणतें, असें समज; किंवा जसा मेघ आज—ग्रीष्मांत मी सूर्याचा तापच आहे, असें मानून तद्रूपानेंच स्थित होतो, त्यानंतर आज वर्षा ऋतूच्या आरंभीं मी वारिद आहे, अशा रूपानें राहतो, त्यानंतर वृष्टीच्या योगानें पृथ्वीच शिरून, पृथ्वींतून अंकुरांत जलरूपानें प्रवेश करतो व मी आज अंकुर होऊन

राहिलों आहें, असें समजतो, तसाच आत्माही निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या आकाराचा होऊन राहतो. पण हा जो जगाच्या विवर्तनाचा क्रम आहे म्हणजे यानें असेंच व्हावें व यानें यात्र स्वभावाचें बनावें; हें असेंच या सर्वेश्वरांत प्रसिद्ध आहे, इत्यादि क्रम आहे. त्याला बदलण्याचें सामर्थ्य कोणामध्यें आहे ? आरशाप्रमाणें स्वच्छ असलेल्या आकाशांत स्वतःचा भाग किंवा कार्य प्रतिबिंबित होत नाहीं, कारण आकाशांत किंवा आकाशाचें कार्य असें जें दुसरें भूत त्यांत आकाशाचा भेद नाहीं, तर केवळ आकाशच प्रतिबिंबरहित दर्पणाच्या उदराप्रमाणें स्वच्छ स्वरूपानें स्फुरण पावत असतें. पण अविद्यायुक्त ब्रह्म तसें नाहीं, तें चिन्मयस्वभाव असल्यामुळें निराकार असलें तरी स्वभावतःच सर्व वस्तूंच्या शक्त्यादिकांच्या योगानें दीप्त होतें, जीवरूपानें प्रतिबिंबित होतें व भेदकल्पनेनें द्वैतरूप होतें. असें असल्यामुळें सृष्टीच्या आरंभीं ज्या वस्तूच्या स्वभावानें आत्मस्फुरण झालें त्या असत्य स्वभावालाही तो सत्य आत्म्याच्या रूपानें सत्य जाणतो. हा नियम केव्हांही बदलत नाहीं. याप्रमाणें ईश्वराची नियति सिद्ध झाली आहे. सुवर्णत्व व कटकत्व हीं दोन्हीं भांडारांतील सोन्यांत जशीं सत्यरूप व असत्यरूप राहातात, तशीं आत्म्यांत चित्त्वाचित्त्व राहतात. चिति सर्व कार्यांना व्यापून राहणारी असल्याळें तिचें पहिले कार्य जें मन त्यांत चित् व जड हीं दोन्ही रूपें दिसतात. त्यांतील चित्त्व कड्याच्या सुवर्णत्वाप्रमाणें नित्य आहे, म्हणून तें सत्य व जडत्व केव्हां केव्हां राहतें, म्हणून तें अनित्य. चित्त्व व जाड्य यांनीं युक्त असलेलें चित्त स्वतः जेव्हां ज्याची दृढभावना करतें, आणि जेव्हां ज्याप्रकारें तें जें बनतें तेव्हां त्याचा तसाच अनुभव घेतें. जीव निरनिराळ्या वेळीं चित्तांत वासनारूपी कळ्यांचा विकास होऊन भिन्नाभिन्न आकारांची भावना करतो व त्यामुळें त्याच्या ' अहं ' या आकारांतही भेद उत्पन्न होतो. जसा स्वप्नांत पाहिलेला ' ग्राम ' एका क्षणांत वनादिभावास प्राप्त होतो त्याप्रमाणें हा देहभूत जीवही एका देहाहून दुसऱ्या देहास प्राप्त होतो. कारण देह स्वप्नाप्रमाणेंच प्रतिभासात्मक आहे. ज्याप्रमाणें स्वप्नांत दिसणारा मनुष्य झटकन भिंत होऊन पटही बनतो त्याप्रमाणें मरणरूपी मूर्च्छादशा प्राप्त झाली असतां हें मिथ्या देहान्तर होतें. मरणारा जीव खोटेंच मरतो व खोटेंच जन्म घेतो. जीव आपल्या कल्पनेनें स्वप्नाप्रमाणें तें भिन्न भिन्न रूप धारण करतो. पण हा देह कालानें देहान्तरभावास प्राप्त होतो, . असें मात्र समजूं नकोस, कारण हें प्रकृत शरीर बाल्य-तारुण्य—वार्धक्य इत्यादि अवस्थांचा जरी भेद झाला तरी तेंच हें अशी प्रत्यभिज्ञा होते, त्यामुळें प्रत्येक अवस्थेबरोबर शरीर बदलतें, असें म्हणतां येत नाहीं. पण भूत देह व भविष्यत् देह यांविषयीं तशी प्रत्यभिज्ञा संभवत नाहीं, म्हणून ते अन्य आहेत व अन्य नाहींत, अशी भ्रांति होऊं शकते; यास्तव त्यांचा उद्भव जीवाच्या वासनेनेंच होतो. हें जगद्रूप जीवाच्या स्वप्नांत अंतर्भूत आहे असें समज. स्वप्नांत पूर्वी पाहिलेली व न पाहिलेली, अशा दोन्ही प्रकारच्या वस्तूंचा अनुभव येतो, पण स्वप्नात न पाहिलेल्या वस्तूचाही अनुभव येतो, हें म्हणणें ' या जन्मांत अनुभव न घेतलेल्या वस्तूचा ' अशा अर्थी आहे. कारण वस्तुतः या अनादिसंसारांत प्रायः न अनुभविलेलें असें कांहीं नाहींच. प्रत्येक जीवाचे अनेक योनींत अनेक जन्म झालेले असल्यामुळें त्याला बहुतेक सर्व वस्तूंचा कोणत्याना कोणत्या तरी जन्मांत अनुभव आलेलाच असतो. यास्तव मरणसमयीं पुढील देहाचा आरंभ कर-

णाऱ्या कर्मानें जागृत केलेल्या वासनेच्या अनुसारच दुसऱ्या देहाचा उद्भव होतो, असें जाणावें. ' असें जर आहे तर महावाक्यापासून उत्पन्न झालेला जो ब्रह्मसाक्षात्कार व त्यामुळें होणारा जो ब्रह्मभाव तोही देहान्तराप्रमाणें वासनामय स्वप्नच आहे, ' म्हणून म्हणाल तर तसें नाहीं. कारण ' शिवं, अद्वैतं, चतुर्थं मन्यन्ते ' या मांडुक्यश्रुतींत आत्माभिधानादिकांच्या योगानें सांगितलेला व तुरीय दृष्टीनें पाहिलेला जो परमात्मा त्याला वर सांगित लेल्या प्रकारचें त्रिविध स्वप्नच नाहीं. त्यामुळें जाग्रदवस्थेंत केव्हांही त्याचा अनुभव येत नाहीं. त्यामुळेंच त्याची वासनाही संभवत नाहीं. यास्तव ब्रह्मभावाला वासनामयत्व नाहीं. म्हणून तो स्वच्छस्वरूप चैतन्यमात्र आहे, तोच चिदात्मा चेतन जीव होऊन आतां नव्या वर्तमानकालीन अर्थाला जसा चित्स्वभावामुळेंच पाहतो, त्यावांचून पहात नाहीं, त्याचप्रमाणें पुढें पाहिलेल्या अर्थालाही पाहतो. म्हणून अदृष्ट विषयाविषयींही भावनेच्या जोरानें दृढ केलेली वासना प्राक्तन वासनेला पुरुषाच्या यत्नानें जिंकते. उद्यां जर आपल्याला कांहीं कुकर्म करावयाचें असलें तर तें आजच्या यत्नानें सुकर्म करतां येतें. अर्थात् जीवाला वासनेमुळेंच देहादिबंध प्राप्त होतो. तो मोक्षावांचून शांत होत नाहीं. कारण जीवांचे चक्षुरादि प्राण केवल देश-कालतः उन्मज्जन व निमज्जन पावत असतात. कारण चित्-ची देहाकार कल्पना-मी देह ही वासना मोक्षापर्यंत टिकते. जसा बालकानें कल्पिलेला यक्ष त्याच्यापुढें उभा राहतो त्याप्रमाणें या जीवाची वासनाच पांचभौतिक देह होऊन त्याच्यापुढें उभी राहते. अर्थात् वासना असेपर्यंत स्थूल देहाचें निवारण करतां येणें शक्य नाहीं; आणि स्थूल शरीराचें निवारण जरी कांहीं कारणानें करतां आलें तरी लिंगशरीराचें निवारण तर फारच दुर्घट आहे. कारण मन, बुद्धि, अहंकार व तन्मात्रपंचक, हें पुर्यष्टक आहे. तोच आतिवाहिक म्ह० सूक्ष्म देह होय. ' अहोपण, शास्त्रांत ज्ञानेंद्रियें, कर्मेंद्रियें, प्राण, भूतें, अंतःकरण, अविद्या, काम व कर्म यांना पुर्यष्टक म्हटलें आहे, पण तें तर पंचीकृत पंचमहाभूतघटित स्थूल शरीरापर्यंतही असूं शकेल. म्ह० तें मूर्तही असेल. मग अमूर्त बुद्ध्यादिअष्टकच पुर्यष्टक आहे असें कसें म्हणतां ? ' म्हणून विचारशील तर सांगतों-चित्तात्मा अमूर्तच आहे. पचीकत आकाशत्व हें याचें स्थूलपण आहे. पण पंचीकृत आकाशाचें स्थूलत्वही कोणत्या प्रकारचें तें सर्वांना माहीतच आहे. एक कोटि अमूर्त वासना जरी एकत्र केल्या तरी त्यांना स्थूल आकार प्राप्त होणें शक्य नाहीं. वातत्व हा याचा महागुल्म आहे. पण वायूला केव्हांही वृक्षासारखी स्थूलता येणें शक्य नाहीं. तेज, जल व पृथ्वी यांची स्थूलताही संभवत नाहीं. याप्रमाणें स्थूल भूतांचाच असंभव असल्यामुळें परमाणूहूनही अत्यंत सूक्ष्म असलेल्या या चित्तात्म्याची देहता परमाणूचा मेरु होणें शक्य नाहीं, त्याप्रमाणें, शक्य नाहीं. म्हणून स्थूल देहांत पूर्यष्टक सांगितलें जात नाहीं. शिवाय स्थूल भावाची कल्पना मुक्तीच्या अगदीं उपयोगी नाहीं. म्हणून मोक्षशास्त्रांत त्याच्या अस्तित्वाची कल्पना करणेंच योग्य नाहीं. कारण देहादि प्रपच मनोमात्रच जर असेल तरच वैराग्यादिकांच्या अभ्यासानें सर्व रजोगुणाचा अभाव होऊन कमादि साधनांची संपत्ति प्राप्त झाली असतां महावाक्यापासून ज्ञानाचा उदय होऊन मनःकल्पित स्वप्नप्राय प्रपंचाचा व त्याचें कारण जें अज्ञान त्याचा बाध झाला असतां सर्व बंधशून्य मुक्ति उत्पन्न होते. पण तेंच, स्थूल भूत व भौतिक मूर्त प्रपंचाला मानल्यास

त्याचा ज्ञानानें बोध होणें शक्य नाहीं, म्हणून मुक्तीचाही संभव नाहीं. यास्तव शेवटीं स्वप्न व सुषुप्ति या दोनच अवस्था राहतात. जाग्रत् या नांवाची स्थूल प्रपंचाला विषय करणारी तिसरी अवस्था आहे, असें कोणालाही उपपादन करतां येणें शक्य नाहीं. सुषुप्तता हीच एक याची अवस्था असून तिनें सर्व जडांना आपल्यामध्यें अन्तर्भूत केलें आहे. तशीच स्वप्न या नावाची दुसरी अवस्था आहे. ती देहाच्या प्रत्ययानें शोभत असते. याप्रमाणें हा आतिवाहिक देहच स्थावर जंगम आकारांनीं मोक्ष होईपर्यंत येथें भ्रमण करीत राहतो. तो हा सर्वांचाच आतिवाहिक देह कांहीं वेळ सुषुप्तस्थ असतो व कांहीं वेळ स्वप्न पहात राहतो. जेव्हां तो सुषुप्तभावामध्यें स्थित असतो तेव्हां वासनारूपानें आंत प्रविष्ट झालेल्या भावी दुःस्वप्नांनीं विद्ध झाल्याप्रमाणेंच तो स्मृतिशून्य होतो. म्हणून त्याची आकृति त्यावेळीं उदय न पावलेली अशी असते. पण तो चित्प्रतिबिंबाने खचित असतो व त्यानें त्यावेळीं आपल्यामध्यें जगाचा उपसंहार केलेला असतो. म्हणून तो त्या अवस्थेंतही कालाग्नीसारखा दीप्त होऊन राहतो. तो स्थावरादि अवस्थांमध्यें व कल्पवृक्षाच्या[१] दशेंत, अत्यत मोहित होऊन सुषुप्तस्थच होतो. अर्थात् चित्तानें अतिशय जड होणे हीच सुषुप्ति व त्याचें स्वप्नभ्रमण सुरू होणें, हाच संसार. तत्त्वाचा साक्षात्कार हीच मुक्ति व तुर्यता हीच याची जागृति होय. जीवाच्या प्रबोधानेंच मुक्ति होते. ज्याचा मल शोधून—काढून टाकला आहे, असे ताम्र जसें सुवर्णत्वास प्राप्त होतें त्याप्रमाणें आत्मसाक्षात्कारामुळें जीव परमात्मत्वास प्राप्त होतो. जीवाच्या प्रबोधामुळें होणारी जी मुक्ति ती येथें दोन प्रकारची सांगितली आहे. एक जीवन्मुक्तता व दुसरी विदेहमुक्तता जीवन्मुक्ति हेंच तुर्यत्व आहे. त्याच्यापुढें तुर्यातीत पद आहे. जीवाला होणारा बोध उत्कृष्ट चिन्मात्र ब्रह्मरूप होतो, तो पुरुषाच्या बुद्धिप्रयत्नानें होतो. ज्याला साक्षीच्या प्रमाणाचें ज्ञान झालें आहे, साक्षी आत्मा केवढा आहे, तो कोण आहे इत्यादि ज्याला कळलें आहे, असा जीव सर्वांच्या आंत राहून जो जाणतो तो तन्मयच, त्या साक्षीच्या रूपाचाच आहे. पण जो साक्षीचें प्रमाण जाणत नाहीं, तोही जीव वस्तुतः स्वरूपांतच स्थित असतो, तथापि त्याचें हृदय अज्ञानामुळें शिळेप्रमाणें दृढ होतें व त्या अत्यंत सुदृढ हृदयांत मिथ्याच उत्पन्न झालेला अति दीर्घ स्वप्नभ्रम व हें संसाराचें तीव्र भय पाहतो. परंतु वस्तुतः जीवाच्या हृदयात चित्कलेवांचून दुसरें कांहीं नसतें. तो त्या चित्कलेला स्वतःहून अन्यशी पाहून वृथा शोक करूं लागतो, पण जीवरूपी अणूच्या अंतर्मध्यें परमात्म्यावांचून कांहीं नसतें. जेथें जेथें जगत् दिसेल तेथें तेथें मायेचा विकास झाला आहे असें जाण चुलीवर ठेवलेल्या भांड्यातील पाणी शिजूं लागले असतां त्यात जसे नानाप्रकारचे भ्रम उत्पन्न होतात त्याप्रमाणें जीवाणूच्या आंत मिथ्यासंसाराचा उदय झाला आहे, असें समज, वासनाबंध हाच जीवाचा बंध आहे व वासनेचा लय हा त्याचा मोक्ष आहे. सुषुप्तस्थिति ही वासनांची सीमा आहे. कारण तुर्य व तुर्यातीत या अवस्था वासनाशून्य आहेत. ती वासनांची सीमाच स्वप्नांत द्वैतरूप वैचित्र्यानें स्फुट होते, ज्यांच्या वासनांचा एक घट्ट गोळा झालेला असतो तो, म्हणजे ज्याच्या प्रायः सर्व वासना

१. कल्पवृक्षाचे पुण्य इतर वृक्षांच्या पुण्याहून अधिक जरी असलें तरी त्यांना दुःख कमी होईल; पण त्याला मनुष्यांसारखे विशेष ज्ञान होणें शक्य नाहीं. म्हणून तो जीवही झोंपलेलाच असतो.

पापामुळें मोहांत गढून गेलेल्या असतात तो जीव स्थावरादि भावास पात्र होतो. जेव्हां वासनांचा थोडासा उदय झालेला असतो तेव्हां जीव पशुपक्ष्यादि तिर्यक् योनींत उत्पन्न होतो. सुषुप्ति सोडून जागृत होण्याच्या वेळीं देहाला नखशिखान्त व्यापणाऱ्या प्राणालाच 'हा मी आहें' असें मानणें, या जीवितानें 'मी हा देहाएवढाच आहें' असा जेव्हां अन्तःपरिच्छेद होतो तेव्हां घटादि पदार्थ बाह्य बनतात आणि मी देहाएवढाच आहें, त्याच्या बाहेर नाहीं, या अन्तःपरिच्छेदानें बाह्य पदार्थ जेव्हां जीवाहून निराळे होतात, तेव्हां चक्षुरादि इंद्रियांच्या द्वारा बाहेर पडलेल्या अंतःकरणाबरोबर बाहेर गेलेल्या वृत्त्यवच्छिन्न जीवानें घटादिकांना व्यापलें असतां 'मी घटाला जाणतों' अशी बाह्य व ग्राहक म्ह० विषय व वृत्ति यांची वासनात्मिका सत्ता त्या त्या विषयेंद्रियांच्या वैचित्र्यानें प्रकट होते. म्हणजे आंत स्थित असलेला आत्मा-जीव जेव्हां बाहेरील अनात्म्याशीं संयुक्त होतो तेव्हां चित्-च्या योगानें मृगजळाप्रमाणें ग्राह्य-ग्राहकवासना मिथ्या विभागानें उदय पावते. पण वस्तुतः सर्वच आत्मा असल्यामुळें येथें कांहीं टाकलें जात नाहीं व कांहीं ग्रहण केलें जात नाहीं. अर्थात् हें सुख उपादेय आहे, हें दुःख हेय आहे हा विभागही वासनेमुळें अध्यस्त आहे. एक चिदात्माच बाह्य व आन्तर या कल्पनांच्या आकारानें प्रकाशमान होतो. त्रिभुवन हा चित्चा चमत्कार आहे. भेदांचे विकल्प पुरे झाले. आम्ही तत्त्वबोधानें विराजमान झालों आहों. बाहेरील किंवा आंतील जगत् चित्-हून व्यतिरिक्त त्रिकालींही नाहीं. ज्याप्रमाणें समुद्राचा तत्त्वतः विचार केला असतां तें तरंग-बुद्बुदादिसमस्तभेदशून्य, आकाशाहूनही अत्यंत स्वच्छ एक जलच आहे त्याप्रमाणें हें सर्व जगही तत्त्वतः जाणलें असतां सर्व भेदरहित आद्य, पर, अनामय पदच आहे.

## सर्ग ५२

१ जीवाचें स्वप्न असें जें जगत् त्याचा अनासक्तीनेंच क्षय होतो, हें स्पष्ट करण्यासाठीं वसिष्ठ अर्जुनाचें आख्यान सुरूं करितात.

श्रीवासिष्ठः—'अहोपण स्वप्न, प्रत्येक जीवाचें भिन्न भिन्न असतें, आणि हा जाग्रत्प्रपंच सर्व जीवांना साधारण आहे, म्हणजे एकाला जो वृक्ष, गांव, नदी वगैरे दिसतात तेच व तसेच सर्वांना शेंकडों वर्षें दिसतात तेव्हां तो प्रपच स्वप्न कसें ?' म्हणून विचारशील तर हे रामा ! सांगतों—सर्वजीवसमष्टिरूप आद्य जीवाचें जें स्वप्न तीच ही आमची जाग्रत अवस्था आहे. हिरण्यगर्भाचें जें स्वप्न तोच हा आमचा काल्पित प्रपंच आहे. त्यामुळें तो सत्यही नाहीं व असन्मयही नाहीं. कारण आम्हां व्यष्टिजीवांच्या स्वप्नाप्रमाणें समष्टि जीवाचें दुसरें स्वप्न केव्हांच संभवत नाहीं. आमचे दुसरे जाग्रतींत प्रसिद्ध असलेले भूत-भुवनादि पदार्थ त्या समष्टि जीवाच्या जाग्रत् व स्वप्न या दोन्ही स्थानांत उदय पावलेल्या पदार्थांसारखे आहेत, त्यामुळें ते त्याच्या स्वप्नाहून भिन्न होऊं शकत नाहींत. त्याला स्वप्न म्हणण्याचें कारण ते असत्य व अवस्तु आहे, यास्तव हे ज्ञानी पुरुषांतील श्रेष्ठा ! हें जीवाचें दीर्घ स्वप्न आहे, असें तूं समज. आमच्या स्वप्नाप्रमाणें तें क्षणांत बाधित होत नसल्यामुळें त्याला दीर्घ स्वप्न म्हटलें पाहिजे, म्हणजे प्रत्येक जीवाच्या स्वप्नाहून या समष्टिजीवाच्या स्वप्नांत आपल्याला जें वैधर्म्य दिसतें त्याचें कारण हें दीर्घत्व आहे. हे रामा ! साधारण जीव एका स्वप्नांतून दुसऱ्या स्वप्नांत, दुसऱ्यांतून तिसऱ्या, याप्रमाणें प्रवास करीत

व असत्यच प्रपंच सत्यघन असल्यासारखा त्यांना प्रतीत होतो बा राघवा ! अजड ब्रह्मामध्यें भूत-भुवनादि जडता व जड अहंकारादिकांच्या ठिकाणीं आत्मत्वाची भावना केल्यामुळें अजडता उदय पावलेली आहे, त्याचप्रमाणें समष्टि जीवाचे एकदेशभूत जे व्यष्टि जीव त्याच्या अनुभवरूप मोहामुळें--भ्रमामुळें असत्याच्या ठिकाणीं सत्यत्वभ्रांति झाली आहे. सूर्याच्या आंतही सर्व त्रिभुवन पाहणारे व स्वप्नानें अत्यंत भ्रांत झालेले जीव भेदकल्पनापरंपरेनें भ्रमण करितात. साधारण जीव झालेल्या जीवाचेंही पारमार्थिक स्वरूप सर्वव्यापी व अपरिच्छिन्न सत्य असल्यामुळें व्यष्टि जीवही ज्याची ज्याची भावना करतात तें तेंच सस्वर सत्य असल्याप्रमाणें पाहतात. हे महाबाहो ! जिचा निर्देश श्रीकृष्णानें केला आहे अशा शुभ असंसक्तीनें तू श्रवण कर. तिचा आश्रय करून जीवन्मुक्त होऊन पांडुचा पुत्र अर्जुन आपलें जीवन्मुक्तिसुखविशिष्ट जीवित पुढें कलियुगांत दुःखरहित घालविणार आहे. तसेंच तूंही आतां आपलें जीवित सुखानें घालीव.

श्रीरामः—हे ब्रह्मन् ! तो पांडुपुत्र अर्जुन केव्हां होणार आहे व त्याला हरि कशाप्रकारची असंसक्ति सांगणार आहे ?

श्रीवसिष्ठः—रामा ! एक सन्मात्र तत्त्व आहे. 'आत्मा' असें त्याचें नांव कल्पिलेलें आहे. आकाशांतच जसें महा आकाश स्थित असतें त्याप्रमाणें तें सन्मात्र आपल्याच आदि-अंतशून्य तत्त्वांत स्थित आहे. सोन्यांत जसें कडें, गोफ वगैरे, किंवा पाण्यांत जसे तरंग वगैरे त्याप्रमाणें त्या शुद्ध तत्त्वामध्येंच हा संसारविभ्रम भासत आहे. एकाद्या मोठ्या जाळ्यांत जसे अनेक पक्षी कोंडलेले असतात त्याप्रमाणें या संसाररूप जाळ्यांत चवदा प्रकारच्या भूतजाति उत्तमप्रकारें आनंद पावतात. त्या भूतजातींमध्यें ज्यांचें चरित्र श्रुति-स्मृत्यादिकांनीं वर्णिलें आहे असे हे यम, चंद्र, सूर्य, इंद्र इत्यादि देव या पंचीकृत तन्मात्रलक्षण संसारांत लोकपाल झाले आहेत. हें श्रुति-स्मृतींनीं सांगितलेलें सदाचारलक्षण-पुण्य उपादेय--ग्राह्य आहे, त्यांनीं निषिद्ध केलेलें हे पाप होय-- त्याज्य आहे, अशी आपापल्या अधिकारानुरूप केलेल्या संकल्पघटित संवेदनानें स्थित म्ह० मर्यादा त्यांनीं स्थापिली आहे. हे निष्पाप रामा ! यमाचें मन आजवर आपल्या अधिकार कर्मामध्यें अगदीं निश्चल स्थित होतें. पण प्रत्येक चतुर्युगाच्या समाप्तीनंतर तो भगवान् यम कांहीं काल सर्व भूतांना मारल्यामुळें आपल्याला कांहीं पाप लागलें असेल अशा शंकेनें कांहीं तप करतो. केव्हां तो आठ वर्षें तप करतो, केव्हां दहा वर्षें, केव्हां बारा वर्षें, केव्हां पांच, सात, वर्षें व केव्हां केव्हां सोळा वर्षेंही तप करतो. तो यम-नियम पाळून तपामध्यें उदासीनासारखा स्थिर झाला असतां मृत्यु अफाट-जगांतील कोणत्याही प्राण्यांना मारीत नाहीं. त्या अहिंसेच्या कारणानें सर्व भूतल असंख्य भूतांनीं भरून जातें. त्यांची त्यांत इतकी दाटी होते कीं, कोणाला इकडे तिकडे संचार करितांही येत नाहीं. ज्याप्रमाणें पावसाळ्यांत मदस्राव करणाऱ्या हत्तीच्या अंगावर असंख्य मशकांची दाटी होते व त्याचें शरीर त्यांनीं झाकून जातें त्याप्रमाणें भूतल भूतांनीं आच्छादित होतें. तेव्हां हे रामा ! विष्णुप्रभृति देव अंशावतार घेऊन भारतयुद्धादिसारख्या अनेक युक्तींनीं भूमीचा भार त्या विचित्र भूतांना कमी करण्यासाठीं मारतात. अशा प्रकारें आजवर असंख्य युगें होऊन गेलीं आहेत, असले शेंकडों व्यवहारही त्यांत झाले आहेत, व आजवर अनन्तभूतें व जगें होऊन गेलीं आहेत.

आज जो सूर्यपुत्र यम पितृनायक आहे तो हे साधो, आणखी एक दोन युगें क्षीण झालीं असतां आपल्या पापाचा क्षय करण्यासाठीं बारा वर्षे व्रतचर्या करणार आहे. त्यावेळीं तो लोकांना मारण्याची आस्था सर्वथा सोडील. त्यामुळें माणसें मरणार नाहींत. तीं मरेनाशीं झालीं म्हणजे ही पृथ्वी भरून जाईल, त्या भार-भूत प्राण्यांकडून पीडली गेलेली ती दीन व व्याकुळ होईल. भारानें क्लिष्ट झालेली ती हरीला शरण जाईल. चोरांनीं जिला पिडलें आहे अशी प्रिय भार्या जशी दीन होऊन पतीला शरण जाते तशी पृथ्वी हरीला शरण जाईल. तेव्हां हरि दोन देहांनीं भूमीवर अवतीर्ण होईल. नर व नारायण या स्वरूपानें अवतीर्ण होणाऱ्या त्याला साह्य करण्यासाठीं सर्व देवही भुलोकीं अंशांनीं अवतीर्ण होतील.त्यांतील नारायण हा एक देह वसुदेवाचा पुत्र वासुदेव म्हणून प्रसिद्ध होईल व दुसरा पांडव अर्जुन होईल. युधिष्ठिर म्हणून प्रख्यात धर्मपुत्र होईल. तो धर्मज्ञ पांडुपुत्र समुद्रवलयांकित पृथ्वीचा राजा होईल. दुर्योधन म्हणून त्याचा पितृव्यपुत्र चुलत-भाऊ प्रसिद्ध होईल. सापाशीं मुंगुस जसें दृढ वैर करतें त्याप्रमाणें दुर्योधनाशीं दृढ वैर करणारा युधिष्ठिराचा भीम म्हणून भ्राता होईल. दुर्योधन पांडवांच्या पृथ्वीचें हरण करील. त्यामुळें त्या दोघांचा मोठा संग्राम होईल. त्यांत भयंकर अठरा अक्षौहिणी सैन्याचा विनाश होईल. त्यांच्या क्षयानें विष्णु भूमीचा भार कमी करील. राघवा ! मोठ गांडीव धनुष्य धारण करणाऱ्या अर्जुनदेहानें भगवान् हे भूभार--अवतरणाचें कार्य करील. विष्णूचाच दुसरा देह अर्जुन या नांवाचा होईल. तो प्रथम प्राकृत भावाचा आश्रय केलेला, हर्ष--क्रोधयुक्त व अज्ञप्राय असा असेल. तो आपलेच स्वजन मरणास तयार होऊन दोन्ही सैन्यांत उभे आहेत, असें पाहून अतिशय खिन्न होईल व युद्धाचा उद्योग करणार नाहीं. युद्धापासून निवृत्त होईल. हे राघवा ! त्या आपल्या अर्जुननांवाच्या देहाला केवळ प्राप्त-कार्याची सिद्धि व्हावी म्हणून ज्याचा आत्मबोध स्वतःसिद्ध आहे अशा श्रीकृष्णदेहानें हरि बोध करील. तो कसा बोध करील तेंही मी तुला दिग्दर्शनार्थ सांगतों--आत्मा केव्हांही उत्पन्न होत नाहीं किंवा मरत नाहीं. तो एकदा उत्पन्न होऊन पुनः मरून नाहींसा होणारा आहे, असेंही नाहीं. कारण आत्मा अज आहे, नित्य आहे, शाश्वत आहे, सनातन आहे, व शरीर जरी मारलें गेलें तरी त्याच्याबरोबर तो मारला जात नाहीं. जो हा आत्मा मारणें या क्रियेचा कर्ता आहे असें समजतो व जो हा मारणें या क्रियेचा कर्म आहे, असें जाणतो, ते दोघेही आत्म्याला बरोबर ओळखीत नाहींत, अनन्त, एकरूप, सत्, आकाशाहूनही सूक्ष्म व परमेश अशा आत्म्याचें काय, कसें व कोणत्या उपायानें नाश पावणार ? हे ज्ञानरूप आत्मन् ! अनन्त, अव्यक्त, आदि--अंत--मध्य--रहित, आत्म्याचें अवलोकन कर. तूं अपरिच्छिन्न व त्यामुळेंच सर्वदोषरहित असा चैतन्यस्वरूप आहेस, म्हणूनच तूं अज आहेस, नित्य आहेस व निरामय आहेस.

---

# सर्ग ५३

—:*:—

१. अहंकाराचा त्याग, आसक्तीच्या त्यागादिकांचें स्वरूप. २ उपास्य व ज्ञेय ब्रह्माचें स्वरूप.

श्रीभगवान्:—अर्जुना, तूं मारणारा नाहींस, तूं हा अभिमान सोड. तूं स्वतः जरा-मरणरहित शाश्वत आत्मा आहेस. ज्याला 'मी कर्ता आहें' असा अहंकारभाव नाहीं, ज्याची बुद्धि वासनेनें लिप्त होत नाहीं, तो या सर्व लोकांना मारूनही वस्तुतः मारीत नाहीं व हिंसादोषानें लिप्तही होत नाहीं. मनांत जी कल्पना उत्पन्न होते तिचाच बाहेर अनुभव घेतला जातो, यास्तव 'हा मी व हें माझें' ही चित्तांतील वासना टाक. हे अर्जुना! या वासनेमुळेंच मी हंतृत्वादि धर्मांनीं युक्त आहें, व त्यामुळें लागणाऱ्या पापांनीं नष्ट झालों आहें, तसाच मी बधुनाशादि ऐहिक अनर्थांशीं व नरकपातादि आमुष्मिक अनर्थांनीं युक्त आहें, अशा भ्रांतीमुळें तुला सुख-दुःखांचा ताप होतो. आत्म्याचें अणुकाय: अंशच अशा सत्त्वादि गुणांकडून केल्या जाणाऱ्या कर्मांचा मी कर्ता आहें, असें, अहंकारानें अत्यंत मोहित झालेला पुरुष समजतो. चक्षुरिंद्रिय पाहूं दे, श्रोत्रेंद्रिय ऐकूं दे, हें त्वगिंद्रिय स्पर्श करूं दे, रसना रसाचा स्वाद घेऊं दे, त्या कार्यकरणसंघातांत मी कोण? कोणी नाहीं; व 'मी' अशी स्थिति कोणत्या प्रकारची आहे? ती मुळींच युक्त नाहीं. संकल्पादिक स्वकर्मामध्यें प्रसक्त झालेल्या या कार्यकरणसंघातात मी कोणी नाहीं. असें पाहणाऱ्या तुझ्या क्रमागामध्यें कोणता पदार्थ प्रविष्ट झाला आहे, कीं ज्याच्यासाठीं तूं शोक करीत आहेस? हे अर्जुना! अनेक इंद्रियें, प्राण, शरीर इत्यादि बहुतांनीं मिळून केलेल्या कर्मावर एकटा तूं अभिमान ठेवतोस व त्यामुळें होणाऱ्या दुःखानें दुःखी होतोस, हें केवळ आश्चर्य आहे. त्यामुळें तूं विद्वान लोकांच्या उपहासाला मात्र कारण होतोस? योगारूढ होण्याची इच्छा करणार साधक अहंकार व फलासक्ति सोडून केवळ शरीर, इंद्रियें, मन व बुद्धि यांच्या योगानें चित्तशुद्धीसाठीं शास्त्रीय कर्म करितात. ज्याच्या शरीराला अहंकार या विषाच्या चूर्णानें मारलेलें नाहीं, पुनः पुनः मृत्यूला कारण होणाऱ्या भोगलंपटतेनें प्रवृत्त केलें नाहीं, ते रागादि सर्व उपद्रवांनीं रहित असल्यामुळें लौकिक व शास्त्रीय कर्म जरी करीत असले व त्याचें आनुषंगीक फळ भोगीत असले तरी ते कांहीं करीत नाहींत व कशाचा भोग घेत नाहींत. एकादा अतिशय बुद्धिमान् व बहुश्रुत असलेलाही मानव दुःशील असल्यास जसा शोभत नाहीं त्याप्रमाणें ममतारूपी अपवित्र पदार्थानें दूषित झालेला देह लौकिक किंवा शास्त्रीय व्यवहारांत शोभत नाहीं, निर्मम, निरहंकार, दुःखसुखाला समान लेखणारा, क्षमावान् पुरुष कार्य किंवा अकार्य जरी करणारा असला तरी तो लिप्त होत नाहीं. हे पांडुपुत्रा! युद्ध हें तुझें क्षात्रकर्म आहे. तें जरी क्रूर असलें तरी अत्यंत श्रेयस्कर आहे. तें तुझ्या सुखाला व उदयाला कारण होईल. पूज्य व आप्त यांची हिंसा होणार असल्यामुळें तें अत्यंत कुत्सित जरी असलें, पूज्यांवर शस्त्र उगारणे इत्यादि अधर्मप्रचुर जगीं तें असले तरी तो स्वधर्म आहे म्हणून तें तुला श्रेष्ठ आहे. यास्तव शास्त्रप्रामाण्यानें श्रेष्ठ ठरलेलें व म्हणूनच सत्य अशा स्वकर्मानें तूं अमृतवान् हो, या युद्धात विजयी हो. मूर्खालाही स्वकर्मच श्रेयस्कर आहे, मग तत्त्वज्ञाला तें श्रेयस्कर आहे हे काय सांगावें! जिचा अहंकार पार निघून गेला आहे अशी मति महापापादिकांनीं पतित जरी झाली

तरी ती लिप्त होत नाहीं. हे धनंजया ! तूं समत्वबुद्धिरूप योगांत स्थिर होऊन व फलासक्ति सोडून कर्मे कर. जसें कर्म प्राप्त होईल तसें आसक्तिरहित करणारा तूं झालास म्हणजे मग बद्ध होणार नाहींस, अथवा तूं शांत ब्रह्ममय होऊन ब्रह्ममय कर्म कर, व आपला सर्व आचार ब्रह्मार्पण कर, म्हणजे क्षणांत ब्रह्मच होशील. ज्यानें आपले सर्व अर्थ ईश्वराला अर्पण केले आहेत, जो निरामय ईश्वरात्मा झाला आहे, असा तूं ईश्वर, सर्व भूतांचा आत्मा, व ज्यानें भूतलाला भूषित केलें आहे असा हो. तूं सर्व संकल्पाचा संन्यास कर, [illegible] शांत चित्त मुनि हो. स्वचित्ताला युक्त [illegible] मुक्तमति हो.

श्रीभगवान्:—हे भगवन् ! [illegible] ग, कर्म ब्रह्मार्पण करणें, तें ईश्वरा[illegible] प्रकारें संन्यास आणि ज्ञान व योग [illegible] भाग कशा प्रकारचा आहे तें मला [illegible] संसार मोहनिवृत्तीसाठीं सांग.

अर्जुनः—सर्व संकल्पांची शांति झाली असतां ज्यांतील घन वासनाही शांत झाल्या आहेत, व ज्याला कोणत्याही प्रकारचा भावनाकार नाहीं असें जें पर तत्त्व त्याला ब्रह्म असें विद्वान् समजतात. म्ह० निर्विकल्प समाधीच्या परिपाकामुळें होणारा जो साक्षात्कार त्यानें सिद्ध असें जें निष्प्रपंच प्रत्यगात्मरूप तेंच ब्रह्म आहे, असा याचा भावार्थ. चित्तवृत्तीला त्या ब्रह्माकार करणें हेंच ज्ञान आहे. त्याच्या योगानें अज्ञाननिवृत्ति हे फळ प्राप्त होतें. ब्रह्माकार वृत्ति होण्यास अनुकूल अशी जी चित्तवृत्तीची नुस्ती धारा तिला शास्त्रसंस्कारयुक्त जन योग म्हणतात. सर्व जगत् व मी ब्रह्म आहें, असें समजून 'जगत्' व 'अहं' यांचा बाध करणें हें ब्रह्मार्पण आहे. पाषाणाच्या हृदयाचीच ज्याला उपमा आहे, असें अन्तःशून्य बाह्यशून्य, शांत, आकाशकोशाप्रमाणें स्वच्छ अदृश्य व जें दुसऱ्या कशाचें दृश्य नाहीं, असें तें ब्रह्मतत्त्व आहे. तशा स्वभावाच्या ब्रह्मापासून थोड्याशाच अन्यत्वानें उदय पावलेलें जें समुत्थान तोच हा जगत्प्रातिभास आहे. तो गंधर्वनगराकाशाप्रमाणें शून्यताच आहे. चितीपासून प्रत्येक शरीरांत उत्पन्न झालेला जो 'अहं' असा भाव तो अनिर्वाच्य आहे. ब्रह्माच्या कोट्यंशाचा कोटीभाग अशा अत्यंत सूक्ष्म एका अंशावर तो अध्यारोपित आहे. अशा त्याच्या विषयीं आग्रह तो काय धरावयाचा आहे ! [illegible] पृथक्‌मूनच असताना पृथक् अस[illegible] आहे. कारण पृथक्त्व [illegible] ब्रह्म[illegible] संभवत नाहीं. [illegible] 'अहं' असें [illegible] अर्थात 'जाणणें' यावरून [illegible] उत्पन्न होतें व पृथक्त्वावरून 'मी' असें ज्ञान होतें, म्हणजे तीं दोन्ही परस्पर सापेक्ष आहेत. त्यामुळें त्यांतील एकाचा त्याग अवश्य करावा लागतो. पण तो कोणाचा करावा ? तर जें उपपत्तिरहित असलेलें पृथक्त्व तेंच त्याज्य होय. जसा अहंभाव पृथक् नाहीं त्याचप्रमाणें प्रत्यगात्म्यामध्यें घटादिममतारूप मर्कटही पृथक् नाहीं. त्यामुळें अहंता व ममता हे दोन्ही भाव पूर्ण सागराप्रमाणें आत्माच आहेत. यास्तव 'अहं' हा ग्रह योग्य नाहीं. दुसरें असें कीं अहं-मम-इत्यादि विषयवैचित्र्यामुळें विचित्र झालेले विकल्पभेद जर चिन्मात्ररूप आत्म्यामध्येंच भासत आहेत तर त्याचें एकत्वही प्रतीत होतच आहे. मग अहं-मम इत्यादिकांविषयीं जसा आग्रह करावयाचा तसाच त्या प्रत्यगात्म्याच्या एकत्वाविषयीं धरावयास नको का ? असा विचार केल्यामुळें ज्याला सार काय आहे व असार काय आहे, हा विभाग कळला आहे त्या पुरुषाच्या बुद्धींतील अहं-ममताग्रहाचा

क्षय होतो. तो झाल्यामुळें अर्थातच होणारा जो कर्मफलांचा त्याग—फलाविषयीं स्पृहा न राहणें त्यालाच ज्ञानी संन्यास समजतात. त्यामुळें अनायासानेंच होणारा जो सर्व संकल्पाचा त्याग तोच असंसर्ग होय. सर्व द्वैतजात केवल ईश्वर-मात्ररूप आहे, अशा दृढ भावनेमुळें द्वैताचा अनुभवच न येणें हेंच ईश्वरार्पण आहे. अज्ञानामुळेंच चिदात्म्यामध्यें सर्व द्वैत पदार्थांचा नाममात्रभेद प्रतीत होतो. शब्द व अर्थ एतन्मय असलेलें हें सर्व जगत् एक बोधात्मा आहे, यात कांहीं संशय नाहीं. मीच कर्माचा आश्रय आहें, कर्मही मीच आहें. मी काल आहें, मी अद्वैत आहें, मीच द्वैत आहें व मीच जगत् आहें. यास्तव अर्जुना ! तूं आपलें मन माझ्या ठिकाणींच लाव, तूं माझाच भक्त हो, माझेंच पूजन कर, मला नमस्कार कर, अशारीतीनें तूं माझ्यामध्येंच जर आपलें चित्त स्थिर केलेंस तर मत्परायण होत्साता तूं मलाच प्राप्त होशील.

अर्जुनः—हे देवेशा ! तुझीं पर व अपर अशीं दोन रूपें आहेत, त्यांतील कोणत्या रूपाचा आश्रय करून मी स्वतःच्या सिद्धीचा प्रयत्न करूं ?

श्रीभगवान्ः—निष्पाप अर्जुना ! माझीं दोन रूपें आहेत, असें तूं समज. एक सामान्यरूप व दुसरें परमरूप. हात-पाय इत्यादि अवयवानीं युक्त असलेलें व शंख-चक्र-गदाधर रूप हें सामान्य होय. तें सर्व जनसाधारण, सर्वांना सुबोध आहे. पण पररूप ज्यांचें चित्त अशुद्ध आहे, अशांना कळणें शक्य नाहीं. कारण तें माझें परमरूप एक, आदि-अंतरहित व अनामय आहे. त्याचा उल्लेख ब्रह्म, आत्मा, परमात्मा इत्यादि शब्दांनीं केला जातो. जोंवर तूं अज्ञ व अनात्मरूपानें स्थित आहेस, तोंवर चतुर्भुजाकार देवाच्या पूजेंत तत्पर हो. त्यानंतर चित्तशुद्धि, श्रवणादि यांच्या क्रमानें चांगला ज्ञानी झाल्यावर तूं तें परम—माझें आदि-अंतर-हित रूप जाणशील आणि त्याला जाणल्यावर पुनः जन्म घेणार नाहींस. पण हे शत्रुनाशका ! तुझें चित्त जर शुद्ध झालें असेल व तें जर ज्ञेय ब्रह्माला जाणण्यास समर्थ असेल तर तूं माझें शुद्ध स्वरूप व आपलें शुद्ध स्वरूप यांना एकरूप करून अखंड सच्चिदानन्दरूपाचा आश्रय कर. त्याला जाणून तूं तन्निष्ठ हो. ' हें मी, हें मी ' असें जें तुला मी वारंवार सांगत आहें, तो मी तुला आत्मतत्त्वाचाच उपदेश करीत आहें. कारण तूं चांगला ज्ञानी आहेस, आत्मपदीं विश्रांति पावला आहेस, व संकल्पांनीं तुला सर्वथा सोडलें आहे, असें मी समजतों, यास्तव तूं आतां सत्य एकात्ममय हो. तूं सर्वत्र योगयुक्तात्मा होऊन, सर्वत्र समदृष्टि होऊन आत्म्याला सर्व भूतांमध्यें व सर्व भूतें आत्म्यामध्यें पहा. आत्म्याचें एकत्व जाणून जो सर्व भूतामध्यें स्थित असलेल्या आत्म्याला भजतो तो समाधिवृत्तीनें किंवा व्यवहारवृत्तीनें जरी वागत असला तरी पुनः जन्म घेत नाहीं. ' सर्व भूतें ' येथील सर्व शब्दाचा अर्थ एक आहे. तो एक शब्द प्रत्यगात्म्यामध्यें पर्यवसान पावतो; पण जो आत्माही सत् म्ह० तेज, जल व पृथ्वी या मूर्त भूतत्रयाच्या स्वभावाचा नाहीं. व असत् म्ह० वायु व आकाश या अमूर्त भूतद्वयाच्या स्वभावाचाही नाहीं. तर अखंड-आनंद-एकत्व-भाव आहे. त्याचा ज्याला अनुभव येतो त्याला त्या अनुभवाच्या क्षणींच जन्मादि सर्व विक्रिया-रहित भूमानन्दात्मक कैवल्य प्राप्त होतें. सर्व त्रैलोक्याच्या अंतःकरणात जो हा प्रकाशक अनुभवात्मक प्रकाश आहे तोच मी आत्मा आहें असा निश्चय करावा. त्रैलोक्यांतील दूध, दहीं इत्यादि गव्यें, समुद्रांतील लवण, ऊंसाचा रस, मध इत्यादि जिव्हाग्रार्शी संसर्ग पावलेल्या

जलाच्या आंत जो हा रसानुभव स्थित आहे तोच सर्वव्यापी आहे, त्यामुळें तो परोक्ष नाहीं तर अपरोक्षच आहे. सर्व शरीराच्या आंत विषय-जातानें रहित व त्यामुळेंच अत्यंत सूक्ष्म असा जो हा अनुभव स्थित आहे तो सर्वव्यापी आत्मा आहे. सर्व प्रकारच्या दुधाच्या आंत जसें घृत स्थित असतें त्याप्रमाणें सर्व पदार्थांच्या आंत अधिष्ठानत्वानें व सर्व देहांच्या आंत प्रकाशत्वानें तो परमात्मा उत्तमप्रकारें स्थित आहे. ज्याप्रमाणें समुद्रांतील सर्व रत्नांत स्थित असलेलें तेज आंत व बाहेरही प्रकाशित करतें त्याप्रमाणें मी सर्व देहांच्या आंत स्थित नसल्याप्रमाणेंच जणुकाय स्थित आहें. ज्याप्रमाणें सहस्रावधि कुंभाच्या आंत व बाहेर आकाश असतें त्याप्रमाणें मी जगत्त्रय शरीरांचा आत्मा निर्लेप अवस्थित आहें. शेंकडों मोत्यांच्या समुहाला धारण करणारा त्यांच्या आंतील तंतु त्यांत जसा व्याप्त असतो त्याप्रमाणें हा आत्मा लक्षावधि देहाच्या आंत अन्तर्यामिरूपानें राहून त्यांचें विधारण करतो. त्यामुळें तो सर्वांतच दिसत नाहीं. हिरण्यगर्भाच्या शरीरापासून तृणापर्यंत सर्व पदार्थसमुहांत जें सत्तासामान्य आहे त्यालाच विद्वान् अज आत्मा समजतात. तें किंचित् स्फुरिताकारानें व्यक्त होणारें ब्रह्म सर्वव्यापकच होऊन राहिलें आहे. अहंता, जगत्ता इत्यादि भ्रमकारी क्रमानें तेंच नटलें आहे. आत्माच हें जगद्रूप आहे. तेव्हां त्यांतील मारणार कोण व मारलें जाणार कोण ? हे अर्जुना ! हा आत्मा शुभ, अशुभ जीं जगद्दुःखें त्यांनीं लिप्त कसा होणार ? प्रतिबिंबामध्यें जसा आदर्श त्याप्रमाणें हें आत्मतत्व साक्षीप्रमाणें अवस्थित आहे. शरीरें जरी नाश पावलीं तरी नाश पावत नाहीं, अशा त्या आत्म्याला जो पाहतो तो पाहणारा खरा. हे अर्जुना ! हं मी आहें व हें मी नाहीं. असें जें मी बोलतों तें सर्व आत्माच मी आहें, मी सर्वांचा निर्लेप आत्मा आहें, असें तूं जाण. समुद्रामध्यें जलाचे स्पंद जसे प्रवृत्त होतात, त्याप्रमाणें या सर्व उत्पत्ति-प्रलयरूप विक्रिया आत्म्यामध्यें प्रवृत्त होतात. त्या अहंकारवृत्तीनें युक्त असलेल्या आत्म्यांत स्थित होतात. जसें पर्वतांचें पाषाणत्व, वृक्षांचें काष्ठत्व, व तरंगांचें जलत्व तशी सर्व पदार्थांची आत्मता सत्य आहे. जो आत्म्याला सर्व भूतांमध्यें पाहतो व सर्व भूतांना आत्म्यामध्यें पाहतो तो आत्म्याला अकर्ता समजतो. हे अर्जुना ! नाना आकार व विकार अशा तरंगामध्यें जसें पय-जल असतें, किंवा कडें, गोप इत्यादिकांमध्यें सोनें असतें, तसा भूतांमध्यें आत्मा असतो. ज्याप्रमाणें नानाप्रकारचे चंचल तरंग पाण्यात असतात किंवा कडें वगैरे आकार सोन्यामध्यें असतात तशीं भूतें परमात्म्यामध्यें असतात. सर्व पदार्थ, भूतें व अतिशय मोठें ब्रह्म हें सर्व एकच आहे, त्यात पृथक्त्व मुळींच नाहीं असें तूं जाण. सर्व निर्विकार एक ब्रह्मच जर आहे तर मग जन्मादि विकारांचें आश्रयभूत असें दुसरें काय असणार ? किंवा ते बंधुवधादि भावविकार कोठें राहणार किंवा दुसरें जगतही काय असणार ? कांहीं नाहीं. मग तूं उगाच अत्यंत मोहित कां होतोस ? गुरुमुखानें असें श्रवण करून मनांत अमय ब्रह्माचा चांगला अनुभव घेऊन ज्याचें चित्त समरस झालें आहे असे संत या लोकांत जीवन्मुक्त होऊन राहतात. ज्यांना मान व मोह नाहीं, ज्यांनीं आसक्तिदोषाला जिंकले आहे, जे आत्म्यामध्यें निश्चल स्थित आहेत, त्यांच्या सर्व कामना तृप्त झाल्या आहेत, जे सुखदुःखादि द्वंद्वांपासून सर्वथा मुक्त झाले आहेत ते शहाणे पुरुष त्या अव्ययपदाला प्राप्त होतात.

# सर्ग ५४

—:*:—

१ सुखदुःखाचें कारण, २ त्याच्या त्यागाचा क्रम, ३ कशाचा आश्रय करून त्यांचा त्याग करावा.

श्रीभगवान्:—हे महापराक्रमी अर्जुना! प्रेमानें तूं ऐकतोस म्हणून तुला जें मी हित-बुद्धीनें पुनः सांगणार आहें तें ऐक. हे कुंतिपुत्रा! इंद्रियें व विषय यांचे संबंध शीत व उष्ण देऊन त्यांच्या योगानें सुख व दुःख देणारे, उत्पन्न होऊन विनाश पावणारे व अनित्य आहेत, ते तूं सहन कर. कारण, ते आत्म्याहून पृथक् नाहींत, तेव्हां असा बोध झाल्यावर दुःख कोठचें व सुख कोठचें! आदि-अंतरहित व निरवयव अशा आत्म्यामध्यें र्म। पुत्रादिकांनीं पूर्ण आहें व त्यांनीं हीन आहें अशा प्रकारचें सुख व दुःख कोठचें? विषय व इंद्रियें सत्य आहत, अशी प्रतीति ज्याच्या ठिकाणीं नाहीं तो मात्रास्पर्शांना भ्रमरूप मान-णारा व सुखदुःखांना समान लेखणारा विद्वान् मोक्षप्राप्तीला समर्थ होतो. निरतिशय-आनंद-एकरस आत्माच सर्व आहे, त्यामुळें हे सर्व सुखदुःखादि भेद केवळ काल्पनिक आहेत, ते असद्रूप आहेत,:मग असद्रूप तें कसें सहन केलें जाणार नाहीं? खरें जर पाहिलें तर सुख व दुःख यत्किंचित्हि नाहीं, कारण आत्म्याला सर्वात्मकत्व आहे. तेव्हां जगांत अनात्म्याची सत्ताच कशी संभवणार! असत् पदार्थ विद्य-मान् स्थितीस प्राप्त होणें शक्य नाहीं, व सत्प-दार्थाचा अभाव होणें शक्य नाहीं, त्यामुळें सुखदुःखादि नाहींच, तर सर्वव्यापी परमात्मा आहे. जगत् सत्य आहे व निरतिशय आनंदा-त्मा नाहीं, ही मति टाकून, त्या दोघांच्यामध्यें असलेल्या—त्यांची संघटना करणाऱ्या मनाचा व अज्ञानाचाही त्याग करून बाकी अवशिष्ट राहिलेला जो आत्मा त्याच्यामध्यें स्थिर हो. हे अर्जुना! आत्मा सुखांनीं हृष्ट होत नाहीं व दुःखांनीं खिन्न होत नाहीं. तो साक्षिरूपानें हर्ष-विषाद इत्यादि दृश्यांना पहाणारा जरी असला, चेतनात्मा जरी असला व शरीरांत जरी रहात असला तरी हर्षादिक हे त्याचे धर्म होऊ शकत नाहींत. देहत्वास प्राप्त झालेलें जड चित्तादिक हें दुःखाचें पात्र आहे त्या चित्तादि-काला जरी कांहीं क्षति झाली किंवा तें क्षीण झाले तरी आत्म्याला कांहीं होत नाहीं. हें जें देहादिदुःखाचें भाक्तृ-भोग घेणारें चित्तादि-घटित जीवरूप बनून राहिलें आहे तो मायाभ्रम आहे, अबोधामुळें उत्पन्न झालेला आहे, असें तूं समज. देहादि व दुःखादि यांतील कांहींच आत्म्याहून निराळें असें नाहीं. तेव्हां कशाचा व कशानें अनुभव घेतला जाणार? म्हणून मी सांगत असलेल्या उपायानेंच त्याचा नाश होईल. दुःख ही अज्ञानामुळें झालेली भ्रांति आहे, यामुळेंच ती यथार्थज्ञानानें विनष्ट होईल. रज्जू-च्या अज्ञानामुळें रज्जूच्या ठिकाणीं उत्पन्न झालेलें सर्पाचें भय जसें रज्जुज्ञानानें नष्ट होतें त्याप्रमाणें अज्ञानजन्य देहादि दुःखादि वगैरे आत्मज्ञानानें नाश पावतें. सर्व पूर्ण ब्रह्मच आहे, त्यामुळें कांहीं उत्पन्न होत नाहीं व कांहीं नाश पावत नाहीं, हेंच श्रेष्ठ सत्य आहे, असें तूं जाण. हाच श्रेष्ठ बोध आहे. ब्रह्मरूप सागरा-मध्यें कांहीं तरंग होऊन विलीन होतें; तूं आतां या ज्ञानोदयसमयीं ब्रह्मरूप आवर्तांत स्फुरण पावत आहेस, त्यामुळें निरामय ब्रह्मच आहेस. सर्व काल, क्रिया, आदेश, तूं, मी, हे सैनिक इत्यादि सर्व ब्रह्मांतील अणुंकाय परि-स्पंदच आहे, त्यामुळें यांत भाव व अभाव हे विकल्प नाहींत. अर्जुना! तूं मान, मद, शोक, भय, इच्छा, सुख, दुःख यांना सोड, कारण हें सर्व असद्रूप द्वैत आहे, तूं एक सद्रूप हो.

तूं ज्यांचा क्षय करणार आहेस अशा या पुरुषांच्या अक्षौहिणींचा क्षयहि ब्रह्मच आहे, यास्तव तूं अनुभवरूपानें शुद्ध ब्रह्मच ब्रह्ममय कर. सुखदुःख, लाभालाभ, जयाजय यांचा विचार न करितां ब्रह्मैकरूप हो. हे अर्जुना! तूं ब्रह्मसागर आहेस. लाभ व अलाभ यांना समान मानणारा होऊन व खरोखर दुसरें कांहीं जगत्संबंधीं देहादिरूप न होऊन गुहादिकांनीं परिच्छिन्न झालेल्या वायूप्रमाणें केवल स्पंदन करणारा असा होऊन प्रकृत कार्य कर. हे अर्जुना! तूं जें करतोस, जें खातोस, ज्याचा होम करतोस, जें देतोस, व जें तप करतोस तो आत्मा आहे, असें समजून स्थिर हो. मनुष्य मनांत ज्याच्या भावनेनें युक्त होतो तें निःसंशय त्याला प्राप्त होतें. तूं सत्य ब्रह्माला प्राप्त करून घेण्यासाठीं ब्रह्म—सत्यमय हो. ब्रह्मज्ञ पुरुष अपेक्षाशून्य फल, असें ब्रह्म होऊन 'हें ब्रह्म आहे' अशीच ज्याच्याविषयीं भावना केली आहे, असें केवल कर्म जसें प्राप्त असेल तसेंच करतो. शरीराचें जें कर्म तें आत्म्याचें कर्म नसल्यामुळें त्या कर्मालाही जो अकर्म समजतो व शरीर जरी स्थिर असलें तरी आंत मानसिक संकल्प सुरू असल्यामुळें त्या शरीराच्या अकर्मामध्येंही जो कर्म पाहतो तो मनुष्यांमध्यें बुद्धिमान् आहे, तो योगी आहे व त्यालाच सर्व कर्में करणारा' म्हणून म्हटलें आहे. हे धनंजया! तूं फळाच्या इच्छेनें कर्माचा हेतु होऊं नकोस, हेतु पुरःसर कर्म करूं नको; पण तुझी आसक्ति अकर्मामध्यें न होवो. कर्में करणार नाहीं' असाही आग्रह धरूं नको; तूं योगस्थ होऊन व आसक्ति सोडून कर्में कर. कर्माची आसक्ती न धरतां, तत्त्वज्ञानाचा प्रमाद म्हणजे मूढतेचा आश्रय न करतां, व नैष्कर्म्याचाही आश्रय न करितां जसा आहेस तसाच रहा. कारण जो कर्मफलाची आसक्ति सोडून नित्य तृप्त झालेला असतो व कर्तृत्वाचा अभिमान धरीत नाहीं, तो कर्मामध्यें जरी प्रवृत्त झाला तरी कांहीं करीत नाहीं. आसक्तीलाच कर्तृत्व म्हणतात. पण तें कर्तृत्व साक्षात् कर्म न करणाराच्या ठिकाणींही संभवतें; कारण मनांत मूर्खता-अज्ञान असलें म्हणजे आसक्ति सहज राहूं शकते, यास्तव मूर्खत्वाचा परित्याग करावा. परतत्त्वाचा आश्रय करून आसक्तिरहित झालेला महात्मा सर्व कर्मांमध्यें रत जरी असला तरी त्याची ती कर्तृता म्हणत नाहींत. कर्तृत्व नाहीं, कीं भोक्तृत्व नाहीं, व भोक्तृत्व नाहीं कीं सम एकता सिद्ध होते; सम एकत्व आलें म्हणजे अनन्तत्व आलें व अनन्तत्वामुळें त्याचें ब्रह्मत्व सर्वत्र पसरलेलें दिसणार. हे अर्जुना! नानात्व सर्वथा टाकून परमात्मरूप झालेला तूं कार्य किंवा अकार्य जरी केलेस तरी त्यांचा कर्ता तूं नव्हेस. ज्याचीं सर्व कर्में काम व संकल्प यांनीं रहित असतात, व ज्याचीं कर्में ज्ञानाग्नीनें दग्ध झालेलीं असतात, त्याला विद्वान् लोक पंडित असें म्हणतात. जो सम, सौम्य, स्थिर, स्वस्थ, शांत व सर्वार्थांविषयीं निस्पृह राहतो तो सक्रिय जरी असला तरी अक्रियत्वास प्राप्त झालेला असतो. तूं सुखदुःखादि द्वंद्वरहित, नित्यसत्त्वस्थ, योगक्षेमरहित[१], सर्वदा सावधान, जें प्राप्त होईल त्या प्रमाणें वर्तन करणारा, व ज्यानें या सर्व गुणांमुळें भूतलाला भूषित केलें आहे. असा हो. कर्मेंद्रियांचा मात्र संयम करून जो अत्यंत मूढचित्त पुरुष मनानें विषयांचें चिंतन करीत राहतो त्याला ढोंगी म्हणतात. पण हे अर्जुना! जो मनानें ज्ञानेंद्रियांचा निग्रह करून कर्मेंद्रियांनीं कर्मयोगाचा आरंभ,

१. अप्राप्त वस्तूची प्राप्ति हा योग व प्राप्त वस्तूचें रक्षण हें क्षेम, यांनीं रहित.

आसक्त न होतां, करतो तो श्रेष्ठ होय. ज्याप्रमाणें समुद्राला सर्व नद्या प्रतिक्षणीं मिळतात, व त्यांच्या पाण्यानें तो भरतो, तरी तो आपली मर्यादा सोडून वाढत नाहीं, व नद्या त्यांत गडप होतात, त्याप्रमाणे ज्याच्या हृदयांत सर्व कामना येतात पण तेथें जिरून जातात, त्यालाच शांति ( ब्रह्मस्थिति ) प्राप्त होते; जो त्या कामनांच्या मागें लागतो, त्याला ती मिळत नाहीं.

---

# सर्ग ५५

—:०:—

१. देहाचा जरी नाश झाला तरी मूढ व तत्त्वज्ञ यांचा आत्मा एकसारखाच अविनाशी आहे. मूढ भ्रांतीनें जन्मादिकांस पात्र होतो पण ज्ञानी होत नाहीं.

**श्रीभगवान्ः**—देहधारणेला कारण होणाऱ्या अन्न-पानादि अवश्य भोगांचा त्याग करूं नये, म्ह० हित, मित, मेध्य अन्नादिकांचें ग्रहण करावें; पण इतर अनावश्य भोगांचें चिंतन करूं नये; त्याचा लाभ व अलाभ झाला असतां अगदीं समवृत्तीनेंच राहावें; जें प्राप्त होईल त्याप्रमाणें वर्तन करावें. जन्मादि विकार पावणारा अनात्मा जो देह तो आत्मा आहे अशी भावना करूं नको; तर सत्य, निर्विकार जो आत्मा तोच आत्मा समज. हे महापराक्रमी अर्जुना ! देहाचा जरी नाश झाला तरी कांहीं नाश पावत नाहीं; पण आत्मनाश हाच खरा नाश आहे. तो तर नित्य आहे, म्हणून आत्मा नाश पावत नाहीं. देहादि परिग्रहच मी आहें, अशा अभिमानाचें निमित्त जें चित्त त्याच्यापासून पृथक् करून जाणलेला जो आत्मा तो कधीं क्षीण होत नाहीं. ज्यानें देहादि सर्व भोग्य वस्तूंचा त्याग केला आहे तो कर्मांमध्यें जरी प्रवृत्त झाला तरी कांहीं करीत नाहीं. आसक्तीलाच कर्तृत्व म्हणतात, म्हणून साक्षात् कर्म न करणारालाही आसक्तीमुळें कर्तृत्व संभवतें. मन अज्ञानी असलें म्हणजे आसक्ति संभवते, म्हणून अज्ञान सोडावें. परम तत्त्वज्ञ आत्म्याचा आश्रय करून आसक्तिरहित झालेला महात्मा सर्व कर्मांमध्यें जरी रत असला तरी त्याला कर्तृता केव्हांही जडत नाहीं. आत्मा अविनाश, आदि-अंतरहित, आहे, असें विद्वान् समजतात. वास्तव आत्मा नाश पावतो हा दुःखद दुर्बोध तुला येथें नसो. जे उत्तम आत्मज्ञ आहेत ते तसें म्हणत नाहींत, तर आत्म्यालाच आत्मा समजतात आणि देहादिकांना आत्मा समजत नाहींत.

**अर्जुनः**--हे त्रिभुवनाच्या नाथा ! असें जर असेल तर अज्ञ लोकांनीं देहच आत्मा म्हटला तरी काय बिघडलें ? मूढांचाही देह नाश पावला तरी वस्तुतः त्यांत अनर्थ कांहींच नाहीं; कारण आत्मा नित्य असल्यामुळें कांहींच नाश पावत नाहीं.

**श्रीभगवान्ः**--अर्जुना ! हें खरें आहे व कोठेंच कांहीं नाश पावत नाहीं; कारण सर्वत्र अविनाशी आत्मा आहे, त्यामुळें त्याचें कोठें काय नाश पावणार ? हें देहपुत्रादि नष्ट झाले व हें प्राप्त झाले, ह्यांत फक्त मोहभ्रम आहे दुसरें कांहीं नाहीं; वांझेचा पुत्र जसा मला दिसत नाहीं त्याप्रमाणें तें कांहीं मला दिसत नाहीं. जी त्रिकालीं असत् असलेली वस्तु ती विद्यमान होणार नाहीं व जी त्रिकालीं सत्वस्तु आहे तिचा अभाव होत नाहीं; असा दोहोंबद्दल निर्णय तत्त्वदर्शी जनांनीं दिलेला आहे, ज्यानें हें सर्व जगत् व्यापलें आहे तें अविनाशी आहे असें तूं समज; त्या अव्यय आत्मतत्त्वाचा विनाश कोणी करण्यास समर्थ नाहीं. हे अर्जुना ! क्षय न पावणाऱ्या, नित्य व अप्रमेय देही आत्म्याचे

हे देह नाश पावणार आहेत. यास्तव तूं युद्ध कर. आत्मा एक आहे; तेथें द्वित्व नाहीं; तेव्हां असत् द्वित्वाचा समज कोठून होणार? हा आत्मा विनाश न पावणारा व अनंत आहे; यास्तव त्या सद्रूप आत्म्याचा विनाश होत नाहीं, द्वित्व व एकत्व यांचा परित्याग केला असतां जें कांहीं ज्ञान, सत् व असत् याचें मध्यरूप अवशिष्ट राहातें तेंच येथें परम पद आहे.

अर्जुनः—तर मग भगवन्! मी मेलों आहें हीं लोकांची स्थिति—नियति कोणत्या कारणानें आहे? त्याचप्रमाणें त्या स्थितीत सुख व दुःख लोकांना कोणत्या कारणानें होतें?

श्रीभगवानुः—भूमि, जल, तेज, वायु, आकाश या पंचतन्मात्रांपासून झालेल्या मन बुद्धि इत्यादिकांनीं बनलेलें जें व्यष्टि-समष्टि स्थूल-सूक्ष्म शरीर, त्याच्याशीं तादात्म्य पावणें हाच आत्म्याचा जीवभाव आहे. देहामध्यें राहणारा तो जीवच जन्म-मरण-सुख-दुःखादि भ्रमनियतीचें निमित्त आहे; दावें पशूंच्या पोराला जसें ओढतें त्याप्रमाणें वासना त्याला ओढते, नादविते; पिंजऱ्यांत जसा पक्षी राहतो तसा तो देहांत-शरीरांत राहतो. जर्जर झालेल्या पिंपरीच्या पानांतून रस जसा निघून जातो त्याप्रमाणें काल व देश याच्या योगानें जर्जरतेस प्राप्त झालेल्या देहापासून तो जीव वासनावशात निघून जातो. वायुपुष्पादिकांतील सुवासाला घेऊन जसा जातो तसा तो पूर्वशरीरांतून श्रोत्र, चक्षु, त्वक्, रसन व घ्राण यांना घेऊन जातो. म्हणूनच याचा स्थूल देहही वासनात्मकच आहे. दुसऱ्या कोणत्याही युक्तीनें तो झालेला नाहीं. वासनात्याग केला असतां तो क्षीण होतो आणि वासनाक्षय होतांच लिंगशरीरासह स्थूल देहाचा क्षय होऊन स्वतःच परमपदाला प्राप्त होतो. वासनावान् लिंगदेह परमात्म्यानें अवच्छेद व प्रतिबिंब अशा दोन प्रकारांनीं प्रवेश केल्यामुळें अभिव्यक्त होऊन भ्रमानें भ्रमण करणारा तो जीव आकाशात भ्रमण करणाऱ्या जादुगाराप्रमाणें निरनिराळ्या योनींतून हिंडत राहतो. वायू पुष्पाचा वास आपल्या बरोबर घेऊन जसा जातो त्याप्रमाणें वासनावश झालेला जीव इंद्रियांच्या विषयग्रहणशक्तींना घेऊन शरीरांतून निघून जातो. हे कुंतीपुत्रा! जीव शरीरांतून निघून गेला असतां देह निःस्पंद होतो, आणि तसें झालें असतां वायु शांत झाला असतां वृक्ष जसा स्थिर होतो तसे देहाचे सर्व अवयव निश्चेष्ट होतात. याचेंच नांव मरण. निश्चेष्ट झालेल्या देहाचा छेद-भेद केला तर, तो नाहींसा होतो. त्यामुळें जीवित निघून गेलेला देह 'मृत झाला' असें म्हणतात. तो प्राणमूर्ति-प्राणाकार झालेला जीव चिदाकाशांत ज्या ज्या देह, देश, काल, भोग्य इत्यादि आकारांत राहातो त्याला त्याला आपल्याच वासनाभ्यासामुळें पाहतो. म्ह० त्याच्या अदृष्टानुसार वासनेचा उद्भव झाला असतां त्या त्या विस्तार पावलेल्या आकारालाच 'हा मी' असें समजतो. याप्रमाणें या जीवानें हा देह असतूच पाहिला आहे, यास्तव तूंही, या देहाचा नाश झाला असताही, याप्रमाणें त्याला असत् पहा. किंवा ज्याप्रमाणें निजलेला पुरुष कांहीं पहात नाहीं त्याप्रमाणें तूं देहाला, त्याच्या नाशाला व त्याच्या असत्त्वालाही पाहूं नकोस. ज्याप्रमाणें तो कल्पित आकारांना पाहतो त्याप्रमाणेंच त्यांच्या कल्पित नाशांनाही पाहतो. आदिसर्गांत चतुर्मुखानें या-गाय, घोडा, मनुष्य इत्यादि आकारांत पूर्वसर्गांतील अनुभवाच्या वासनानुसारच असें रूप कल्पिलें आहे. कुंभार माती, दंड, चक्र इत्यादि सामग्री जमवून त्याच्या योगानें जशी घटादि सृष्टि रचतो त्याप्रमाणें ही सृष्टि रचलेली नाहीं. उत्पत्तिकाळीं

पाहिल्याच क्षणीं देह-घटादि जें रूप जसें-सत्य किंवा मिथ्याभूत दिसतें तसेंच तें मरेपर्यंत राहातें. त्याचा स्वभाव मरेपर्यंत बदलत नाहीं, कारण त्याची अधिष्ठानभूत संविद् तें जसें उत्पन्न झालेलें असतें तशाच स्थितींत त्याला ठेवण्यास कारण होते. असो, याप्रमाणें देहादि आकार वासनामय आहेत, त्यामुळें ज्याप्रमाणें आजच्या प्रयत्नानें कालचा दोष घालवितां येतो त्याप्रमाणें पूर्वींच्या वासनामुळाला पुरुषार्थानें जिंकतां येतें. अहोपण, ज्ञानासाठीं यत्न करणाऱ्या पुष्कळ सज्जनांच्या यत्नाला पूर्वाभ्यस्त प्रबळ कामक्रोधादिकांकडून प्रतिबंध होत असल्याचा अनुभव येतो. तेव्हां पुढील प्रयत्न पूर्व प्रयत्नाला नियमानें बाध करतो, असेंच कांहीं म्हणतां येत नाहीं, म्हणून म्हणशील तर सांगतों. धर्म-अर्थ-काम व मोक्ष यांतील जो पुरुषार्थ मला अवश्य मिळाला पाहिजे, असा अभिनिवेश मनुष्य धरतो तोच पूर्वोत्तर प्रयत्नांतील विशेष अंश असून त्याचाच विजय होतो, म्हणून विंध्यादि-पर्वत फुटायला लागोत कीं प्रलयवायु वाहवयास लागोत बुद्धिमानानें यथाशास्त्र यत्न सोडूं नये. प्रयत्न मंद असल्यामुळेंच पूर्ववासनांच्या वैचित्र्यानें अनादि अज्ञानामुळें ज्याची बुद्धि मोहित झाली आहे असा जीव दीर्घपरिचित स्वर्ग-नरक-सर्गादिकांस पाहातो.

अर्जुनः---जगत्पते! जगाच्या स्थितीचें निमित्त अशा या जीवाच्या नरक-स्वर्गसर्गादि संभ्रमाचें कारण काय आहे?

श्रीभगवान् शास्त्रीय प्रयत्नावांचून केलेल्या दीर्घ अभ्यासानें प्रौढ झालेली जी स्वप्नोपम वासना तीच हा सर्व संसारभ्रम देणारी आहे. यास्तव तत्त्वज्ञानाच्या अभ्यासानें समूळ वासनाक्षय करणें श्रेयस्कर आहे.

अर्जुनः-हे देवाधिदेवा! वासना कशापासून उत्पन्न झाली आहे, व ती क्षीण कशी होते?

श्रीभगवान्--वासना अज्ञानापासूनच उत्पन्न झालेली असून अनात्म्याच्या ठिकाणीं आत्मभावना करणें हें तिचें स्वरूप आहे; ती आत्मज्ञान या महाबोधामुळें विलय पावते. हे कुंतिपुत्रा! विचारामुळें तुझा आत्मस्वरूपाशीं परिचय झाला आहे, खरोखर तूं आत्मज्ञानी झाला आहेस; पण तेंच ज्ञान दृढ होण्यासाठीं 'हा देह मी आहें' व 'हे त्याचे संबंधी बंधु वगैरे माझे आहेत,' ही वासना सोड. 'अहं' व 'मम' एवढ्या वासनेचा क्षय करणेंच आतां बाकी आहे.

अर्जुनः---पण भगवान्! वासनांचा विलय झाला असतां जीव स्वतः विलीन होतो, कारण जो ज्याच्या सत्तेनें सत्तावान् झालेला असतो तो त्याच्या नाशानें विलीन होतो. तेव्हां याप्रमाणें वासनांच्या क्षयानें देशकाल इत्यादिकामुळें विचित्र आकार धारण करणाऱ्या जीवाचा क्षय झाल्यावर परमानन्दाविर्भावरूप परम पुरुषार्थाचें व अनर्थाच्या आत्यंतिक नाशाचें पात्र कोण होणार? (म्ह० त्यानंतर मुक्त होईल असा जीव उरत नाहीं.)

श्रीभगवान्--अर्जुना! तूं म्हणतोस तसा दोष प्राप्त झाला असता, पण तो कव्हां? संसारी जीव प्रतिबिंबमात्रच असून तो बिंबाहून निराळा आहे, तो भूतमात्रांच्या आधीन अस-

---

१. आज केलेल्या प्रायश्चित्तादि प्रयत्नानें कालच्या अधर्मानुष्ठानाची निवृत्ति होते. आज आग लावणें इत्यादि प्रयत्नानें काल केलेलें गवताचें घर जसें जाळतां येतें त्याप्रमाणें.

२. अशुभ वासनेनें कल्पिलेल्या देहादि आकारांचा शुभ वासनेच्या अभ्यासानें उत्पन्न झालेल्या ब्रह्माकार वृत्तीनें समूळ नाश होतो.

३. श्रवण मननादि पुरुषप्रयत्नानें उत्पन्न झालेल्या अखंडाकार ज्ञानानें त्याचा बाध होतो.

लेल्या जन्मादि-देश-कालभेदांनीं भिन्न आहे, असें जर आम्हीं मानलें असतें तर तो दोष अवश्य आला असता; पण आम्हीं तसें मानीत नाहीं. तर परमार्थतः शुद्ध असलेलें ब्रह्मच आपल्या मिथ्या अविद्येनें आच्छादित होऊन स्वरूपाला जाणेनासें होतें आणि स्वरूपांतच जीव-जगत् इत्यादि भेदकल्पना करून जणुं काय संसाराचा अनुभव घेतें. पुढें तेंच शास्त्रीय श्रवणादि प्रयत्नानें स्वतत्त्वाला जाणून आपल्या वासनारूप अविद्येचा नाश करून स्वस्वभावांत अवस्थित होतें, हीच जणुं काय त्याची मुक्ति; त्यामुळें वरील दोष येत नाहीं. अर्थात् संकल्पानें मलिन झालेलें जें आत्मरूप तोच वासनाकार जीव आहे असें तूं समज. जें स्वतंत्र, संकल्प-शून्य, अव्यय, आत्मरूप तेंच ज्ञानानें वासना-रहित झालें असतां मोक्षरूप होतें. यास्तव हे पराक्रमी अर्जुना, जिवंत असतांनाच तत्त्व जसें अवस्थित आहे तसेंच पहा. जो वासनाजलांतून मुक्त झालेला नाहीं तो खरोखर सर्वधर्मपरायण व सर्वज्ञ जरी असला तरी पिंजऱ्यांतील पक्ष्या-प्रमाणें सर्व बाजूंनीं बद्धच आहे. आपल्या मायेनें आच्छादित झाल्यामुळें ज्याचें दर्शन दुर्लभ झालें आहे व जो वेदान्तप्रमाणाला प्राप्त झालेला नाहीं, अशा ज्या परमात्म्याच्या आंत आकाशांत गारुड्यानें उत्पन्न केलेल्या मोराच्या पिसाऱ्याप्रमाणें नानाप्रकारचे भ्रम उत्पन्न करणारी सूक्ष्म वासना स्फुरण पावत आहे—जीवजगदा-कारानें भासत आहे, तोच, वेदान्तनयास प्राप्त होऊन म्हणजे त्याला तत्त्वज्ञान झालें असतां, समूल वासनाबंधापासून मुक्त होतो; कारण समूलवासना हाच बंध व त्याचा क्षय हाच मोक्ष आहे.

---

# सर्ग ५६.

—:०:—

१ जीवन्मुक्तिप्रतिष्ठा, चित्सत्तत्त्व, जगद्रूप व मनश्चित्र यांचें वर्णन.

श्रीभगवान्:—अर्जुना ! याप्रमाणें तूं वासनारहित हो, व जीवन्मुक्तत्वामुळें अन्तः-शीलत्वास प्राप्त होऊन बंधुवधदुःखाचा त्याग कर. हे निष्पाप अर्जुना ! जरा व मरण यांची शंका सोड, आपला आशय ( चित्त ) आका-शासारखा स्वच्छ कर, इष्टानिष्ट संकल्प सोड व आसक्तिरहित हो. शिष्टांच्या व्यवहारपरंपरेनें प्राप्त झालेलं जें कर्म म्हणजे आतां प्राप्त झालेलें युद्ध व युद्धानंतर प्राप्त होणारीं यागादि कर्मे तीं तूं अवश्य कर, त्यांच्या योगानें तुझ्या तत्त्व-ज्ञानाची कांहींएक हानि होणार नाहीं. शिष्ट-व्यवहारप्राप्त स्वधर्मरूपच कर्म स्वतः करणें हा जीवन्मुक्तांचा स्वभाव आहे. जीवन्मुक्तता ही अशाच स्वभावाची आहे; देहाच्या सर्व हालचाली सोडणें ही जीवन्मुक्तता नव्हे. हें कर्म मी सोडतों व हें स्वीकारतों असा निर्णय करणें हें मूढाच्या मनाचें रूप आहे, पण ज्ञानाची स्थिति सम असते. प्रवाहपतित कर्म करणारे शांतचित्त जीवन्मुक्त निजलेल्या पुरुषाप्रमाणें स्वरूपांत निःसंकल्प राहतात, त्यामुळें ते केवल स्वयंज्योतिस्वरूप असतात. जसें कासवाचे हातपाय झटकन त्याच्या शरीरांत त्याला आखडतां येतात, त्या-प्रमाणें ज्यांचीं इंद्रियें स्वभावतःच विषयांपासून निवृत्त होऊन हृदयांत निश्चल स्थितीस प्राप्त होतात, तो जीवन्मुक्त होय. तर मग जीवन्मुक्त पुरुष :व्यवहारसमर्थी जगाला कसें पाहतात म्हणून विचारशील तर सांगतों. चित्तरूपी चित्रकार सर्व विश्वांचें अधिष्ठान जो आत्मा त्याच्यामध्यें सर्व लोक-प्रसिद्ध अनन्त वैचित्र्यानें हें सर्व भिंतिरहित-निराधार त्रिजगद्रूपी चित्र तयार करतो. चित्त-

रूपी चितार्‍यानें अज्ञानाकाशांत आकाशरूपच असें हें अद्भुत चित्र चिदाभासयुक्त अन्तकरण-वृत्तिरूप कलमांनीं चित्र काढण्याच्या साधनांनीं अगोदर अगदीं स्पष्टपणें विस्तारिलें व त्यानंतर ही त्याची आकाशरूप भिंत केली. केवढा हा भ्रम ! ही रचना एक अपूर्व अतिशयाच आहे. ती गवताच्या कुडाप्रमाणें जरी अत्यंत असार असली तरी भ्रांत पुरुषाच्या दृष्टीनें अत्यंत शुभ आहे, इतर लौकिक चित्रांमध्यें. त्या चित्राहून त्याचा आधार—भिंत निराळी असते, पण या चित्तचित्रापासून झालेल्या ज्या आकाशादि भिंती उपलब्ध होतात, त्यांचा आधार-आधेयभाव अगदीं स्पष्टपणें प्रतीत होत असला तरी त्या दोघांमध्यें एक चित्तत्त्वच असल्यामुळें भेद यत्किंचित्‌ही नाहीं, हें मोठें आश्चर्य आहे. हे कमलनयना अर्जुना! त्या मनश्चित्ररचना आकाशाहूनही अत्यंत शून्य आहेत, असें समज. तथापि स्वप्नामध्यें एक क्षणांत जसा विचित्र भ्रम होतो त्याप्रमाणें हा लोकांचा क्षय व उदय भ्रमानें भासतो. मन व तसेंच हें त्यांचें कार्य जगत् सबाह्य-अभ्यंतर आकाश आहे, शून्य-असत् आहे. तथापि तें चिरकाल अनुवृत्त होणारें मनोराज्य असल्यामुळें त्याला सत्यता आहे, असा भास होतो. पण भ्रांतिकल्पित पदार्थजातांतील जें सत्यसंकल्पत्व तें कालत्रयीं-ही नाहींच, तेव्हां तें तत्त्वज्ञानाच्या पूर्वी तरी कोठून असणार ? पण वसन्तादिकालक्रम, बाल्यादि अवस्थाक्रम किंवा षड्भाव विकारक्रम यांच्यायोगानें भासणारें जें व्यावहारिक सत्यत्व तें तत्त्वदर्शनरूप प्रकाशानें विलय पावतें. सूर्य प्रकाशामुळेंच शरत्कालीं अभ्रमंडल आकाशभर पसरलेलें जरी दिसलें तरी सूर्य प्रकाशाकडूनच तें सुकविलें जात असल्यामुळें जसें खरें नव्हे तसेंच व्यावहारिक सत्यत्व खरें नव्हे. त्याच न्यायानें चित्तचित्रकाराच्या चित्रांत चित्रपुत्रिका बाहुल्या चांगल्या प्रकारें दिसतात. त्रिभुवनादिक बाह्य आकारांना वास्तविक आधार नाहीं, त्यामुळें ते निराकारच आहेत, म्हणून वस्तुतः ते आकार नाहींत, व तूंही नाहींस तेव्हां कोणाकडून कोण मारला जाणार ? यास्तव अर्जुना तूं ते वध्य मी घातक याप्रकारचा संमोह सोडून ब्रह्माकाशांत निर्मल हो. कारण चिदाकाशाची वधादि प्रवृत्तिच होत नाहीं, आणि जी प्रातिभासिकी प्रवृत्ति दिसते ती ब्रह्माकाशरूपच आहे. यास्तव काल, क्रिया, भिंत, चित्ररचनाकौशल्य, पदार्थांचें वैचित्र्य, इत्यादि सर्व निर्मल ब्रह्मच आहे. जसें चित्तांतील मनोराज्यचित्र सर्व प्रपंचरूप जरी असलें तरी शून्यत्वामुळें आकाशस्वरूप असतें त्याप्रमाणें हें प्रत्यक्ष प्रतीत होणारेंही सर्व जगत् आकाशाहूनही अतिशय शून्य आहे, असें तूं जाण. जें चिद्रुपी भिंतीवर काढलेलें चित्र तें सर्व शून्यच आहे असें ठरतें, त्यामुळें आकाशांत व त्यांत थोडासुद्धां फरक नाहीं. त्याप्रमाणें मनोराज्यांत एका क्षणामध्यें जगाची उत्पत्ति व क्षय होतात तसेच हे लौकिक उत्पत्ति नाश आहेत, असें तूं समज. तुझ्या नानानुभवरूप मनोराज्यांत एक क्षणभरच भावना केलेल्या मोहानें कल्पिलेली जी वध्यघातकभावादिकल्पना ती आज माझ्या उपदेशानें क्षीण झाली आहे. ( अहोपण, क्षणभरच भावना केलेल्या मोहानें अनादि व अनन्त कल्पभर विस्तारलेलें संसाररूप मनोराज्य कसें केलें ? उत्तर- ) जसें मन असत् जन्मादि करण्यास समर्थ आहे तसेंच तें क्षणाला कल्प बनविण्यासही समर्थ आहे. मन क्षणाला कल्प करतें, अल्पाला बहु करतें, व असतला सत् जगत् तत्काल करतें, अशी ही भ्रांति उत्पन्न झाली आहे. मनोराज्य स्वभावतः क्षणांतच व्यक्त होतें, अशा प्रकारचें हें विचित्ररूप जगज्जाल स्थित आहे. तें आत्म्यामध्यें आरोपित असल्यामुळें तुच्छ आहे, तें जरी

क्षणिकच भासणारें आहे, तरी अज्ञ त्याला वज्राप्रमाणें दृढ समजतात. पण तें युक्त नव्हे, कारण ज्याला आत्मतत्त्वाचें ज्ञान नसतें त्याला तें केवल विपरीतभावनेमुळें भासतें. तेव्हां वस्तुतः अशा स्वरूपाच्या जगाचा आत्म्यावर आरोप झाला किंवा त्याची निवृत्ति–बाध झाला तरी त्यांत वज्रसारता ती कोणती? चित्तरूप चित्रकारानें काढलेलें हें चित्स्थ जगचित्र केव्हां स्थित झालें आहे? केव्हांच नाहीं. तेव्हां जें मुळीं स्थितच नाहीं त्याचें निरसन करण्यास प्रयत्नाची काय अपेक्षा आहे? कांहींच नाहीं. आधारावांचून, रगावांचून व इतर सामग्रीवाचूनच हें चित्र समोर दिसत आहे, हें मोठेंच आश्चर्य होय. आधारावांचूनच हें जगचित्र उज्ज्वल दिसत आहे, तें मोठें रमणीयही दिसतें, पण हें केवल दृष्टीचें प्रलोभन आहे. तें मन, चित्त इत्यादिकांना प्रलोभित करणारें आहे. अनेक प्रकारचें अज्ञान याच शाईनें तें चित्र काढलेलें आहे. सूर्यादि नानाप्रकारच्या तेजानें तें रंगविलें आहे. नाना कल्प व त्याच्या अंगभूत युगें हेच त्याचे अवयव आहेत. नानाप्रकारचे अनुभव हेच त्याचे नेत्र आहेत. नानाप्रकारचे ग्रह हेंच अग्रभागीं होणारें विकसन होय. सूर्याचा उदय, अस्त इत्यादि कालीं ज्यांतील पूर्व व पश्चिम या दिशा नाना आकाराच्या भासतात असें तें चित्र आहे. आकाश हेंच त्यांतील नीलवर्ण सरोवर असून त्यांत चंद्र सूर्य, नक्षत्रें हीं नानाप्राकरचीं कमलें प्रफुल्लित झालीं आहेत, शरदादिकालभेदानें विचित्र रचनांनीं ऊर्ध्वभागीं युक्त असलेली जी मेघपंक्ति तीच त्यांतील पानें व मंजऱ्या आहेत. त्यांत लोकत्रयरूप तीन मजले आहेत व त्यांतून देव, असुर, मनुष्य इत्यादि बाहुल्या काढल्या आहेत. त्या चित्ताची आधारभूत भिंत आकाश आहे. त्याला सूर्य-चंद्रादिकांच्या प्रकाशाचा लेप दिला आहे व त्यामुळें ती त्याची आधारभूत भिंतही अतिशय शोभत आहे. ( जातां त्रिलोकींच देवनटीरूप चित्रपुत्रिका आहे अशी कल्पना करून वर्णन -) कामुक चित्तरूप चित्रकारानें आपल्या अधिष्ठानभूत ब्रह्माकाशांतच ही जगत्त्रयरूप मनोहर नटी रचली आहे. प्रतिभा म्ह० नवी नवी कल्पना करणारी बुद्धि हेंच एक तिचें रंगस्थान–नृत्यशाला आहे. नृत्यशाळेंतील प्रदीपाप्रमाणें असलेल्या साक्षिचैतन्याच्या चक्राप्रमाणें स्फुरण पावणाऱ्या व प्रतिबिंबाचें ग्रहण करणाऱ्या बुद्धिवृत्ति--आभारणांनीं सर्वतः तिनें लोकांना प्रकाशित केलें आहे. आणि नृत्य–हाव–भावविलासलीलांनीं ती आकुल झाली आहे. हिरण्यमय ब्रह्मांड हीच तिची दृढ अंगयष्टि आहे. मेघ हेच तिचे कशपाश आहेत. धर्म, अर्थ, काम व मोक्ष हींच ज्यांचीं व्यावर्तनें आहेत अशीं प्रवृत्तिनिवृत्तिशास्त्रें हींच तिचीं दोन वस्त्रें आहत. तल, अतल, वितल, सुतल, रसातल, महातल, व पाताल हीं सात पाताळें हेच तिच्या पायांचे–मांड्या, गुडघे, जांघा, घोटे, पाय, खोंट व बोटें हे सात अवयव आहेत. उंच भूमि हाच तिचा नितंबप्रदेश आहे. ती ब्रह्मा, इंद्र, रुद्र व हरि या चार बाहूंनीं उग्र झाली आहे. सत्त्वगुणरूप चोळीनें आच्छादित झालेल्या विवेक वैराग्यरूप उन्नत स्तनांनीं तिची अंगयष्टि शोभत आहे. शेषादि उत्तम सर्पांनीं वेष्टिलेलें भूतल हेंच तिचें पद्माकार आसन आहे. मध्यलोक हेंच तिचें उदर असून मेरु-हिमालय इत्यादि नाना रंगाचे पर्वत हीच त्यावरील पत्ररचना- कस्तुरीप्रभृतींनीं लावलेली नकशीदार उटी आहे. रात्रीच्या चपल अंधकाराला घालविणारी चंद्र-सूर्यांची चेष्टा हेच तिचे नेत्रकटाक्ष आहेत. नक्षत्रें हेच तिच्या अंगावरील कठोर रोम आहेत. विज हीच तिची दंतपक्ति आहे. चवदा भुवनांतील

निरनिराळे व परस्पर अगदीं विलक्षण असे जे चवदा प्रकारचे प्राणी त्यांचा आविर्भाव होऊं लागणें हेच तिच्या शरीरावरील रोमांच आहेत. त्या भूतांत प्रसिद्ध असलेले जे भूत-भुवन-पर्वत —प्रलय इत्यादि वाद तींच कदबपुष्पें असून त्यांची बुद्धिरूप केसरें सर्वतः पसरलीं आहेत. जे वाद ऐकून जीवांच्या मनांत वैराग्य, विवेक, सद्वासना इत्यादि सुगंध उत्पन्न होतो, अशा उत्तम पुष्पांची पायापर्यंत लोंबणारी माळ तिनें गळ्यांत घातली आहे. ती व्यष्टि व समष्टिजीवानें युक्त आहे. सारांश विचित्र वासना, काम व कर्मे या चित्राच्या उपकरणास प्राप्त होणाऱ्या व त्यामुळेंच त्यानंतर थोड्याशाच कालानें चित्र निर्माण करण्यास समर्थ होणाऱ्या चित्तानें वर वर्णन केलेल्या स्वरूपाची त्रिलोकीरूप श्रेष्ठ बाहुली आपल्या अधिष्ठानभूत चिदाकाशांतच केली आहे.

---

## सर्ग ५७

—:*:—

१. ज्या दृष्टीने मन वासनाशून्य होतें व सुखरूप अद्वितीय आत्मा अवशिष्ट राहतो, त्या दृष्टीचा उपदेश.

**श्रीभगवानः**---अर्जुना! मन कांहीं आश्रयावांचूनच जगदाकाराची कल्पना करीत असल्यामुळें पूर्वी जगच्चित्र उत्पन्न होतें व मागून त्याला आधारभूत--भुवनात्मक विराटरूप भिंत उत्पन्न होते, हें खरोखरच फार मोठें आश्चर्य आहे, असें तूं समज. भिंतीवांचूनच चित्र उदय पावलें म्हणजे मग त्याचा आधार --भिंत--समष्टिविराट् सर्वत्र पसरतो. खरोखर! ही विचित्र माया आहे; कारण तिचें स्वरूप अत्यंत असंभाव्य आहे, तें अत्यंत विरुद्ध आहे, यथें भोपळा पाण्यांत बुडला व पाषाण पाण्यावर तरंगत आहे. अशासारखें आहे. अर्थात् हें सर्व स्वप्न, इंद्रजाल इत्यादिकांप्रमाणेंच उत्पन्न होतें. अर्जुना! या जगच्चित्राची आश्चर्यता राहूं दे. पण चित्रस्थ चित्रासारख्या शून्यरूप जगत्त्रयांत शून्यरूपच असलेल्या तुझी ही शून्यरूप--अहंता कां उदय पावली आहे? हें त्याहूनही अधिक आश्चर्य नव्हे का? तूं जगांतही जर चिदाकाशताच पाहशील तर हें सर्व चिदाकाशकृत आहे, त्या आकाशानें आकाशांत आकाश अत्यंत लीन होतें, आकाशांत आकाशाचा भोग घेतला जातो आणि चिदाकाशांत चिदाकाशच पसरलें आहे, असें सिद्ध होईल. ज्यांत दीर्घसंसारभ्रमण होतें असें हें जगच्चित्र दाव्याप्रमाणें पसरलेल्या वासनारज्जूनें वेष्टिलेलें आहे. तें चिदाकाशही या जगांत वासनांच्या उद्वेष्टनामुळेंच उद्वेष्टित होतें. आरशांत जसें प्रतिबिंब तसें हें जग स्वतः ब्रह्मांत आहे. आधार व अनन्यत्व यामुळें तें छेद-भेदादिकांचा अविषय आहे. छेद-भेदादि व्यवहारजात व त्याचा विषय जगत् ब्रह्माशीं अनन्य आहे. तें चिदाकाशच आहे. तेव्हां कोणत्या कर्त्याकडून, कोणत्या साधनानें कोणत्या प्रकारें, कोणत्या फलासाठीं, कोणत्या देशीं व कोणत्या कालीं त्याचा छेद, भेद इत्यादि व्यवहार होणार! अर्जुना! या उपायानें तुला ब्रह्म-साक्षात्कार झाला असतां तुझ्या वासनांचाही ब्रह्माहून भिन्नत्वानें अभाव झालाच. अशा रीतीनें जो वासनारहित झालेला नसतो तो सर्व धर्मामध्यें तत्पर जरी असला व मोठा बुद्धिमान्-ज्ञानी जरी असला तरी पिंजऱ्यांतील सिंहाप्रमाणें किंवा पोपटाप्रमाणें अतिबद्धच आहे. ज्याच्या चितिभूमीमध्यें अत्यल्पही वासनाबीज आहे, त्याचे ठिकाणीं त्या बीजापासून फार मोठें संसाररूप अरण्य पुनः उत्पन्न होतें. पण अभ्यासामुळें हृदयांत चांगल्या रूढ झालेल्या आत्मज्ञानाग्नीनें ज्याच्या मनांतील वासनाबीज अगदींच जळून गेलें आहे तो पुनः उदय, जन्म

पावत नाहीं. वासनारहित मनाचा पुनः संभव होत नाहीं. ज्या चित्तांतील वासनाबीज जळून गेलेलें असतें तें चित्त वस्तूमध्यें निमग्न होत नाहीं; तें सुख-दुःखादिकांमध्यें पाण्यांतील कमलाच्या पानाप्रमाणें स्वच्छ असतें. हे अर्जुना! तूं सर्व विपुल आशांचा त्याग कर, मीं केलेला हा पवित्र उपदेश ऐकून व तत्त्वाला उत्तम प्रकारें जाणून मनोमोहरहित हो, बंधुवधादिकांच्या कल्पनेनें होणाऱ्या शोकाचा नाश कर, आणि आपल्या वासनारहित स्वरूपांत शांतचित्त, एक शांत ब्रह्मरूप हो, आणि त्यामुळेंच निर्भय होत्साता परम संतुष्ट होऊन राहा.

---

# सर्ग ५८

१ तत्त्वबोधानें अविद्येसह वासनाक्षयाचा संभव. २. त्यामुळेंच अर्जुनाची कृतार्थता.

अर्जुनः—हे अच्युता! तुझ्या प्रसादानें माझा मोह नष्ट झाला. मला आत्मतत्त्वाची स्मृति झाली. मी आपल्या बंधूंच्या वधाचा कर्ता आहें, इत्यादि प्रकारचा मला जो संदेह होता तो आतां नाहींसा झाला आहे. यास्तव 'नित्य तत्त्वनिष्ठ हो. व प्रारब्धप्राप्त व्यवहार समबुद्धीनें कर,' जें असें, तूं सांगत आहेस त्याप्रमाणें मी वागेन.

श्रीभगवान्ः—हे अर्जुना! तत्त्वबोधानें तुझ्या हृदयांतील रागादि सर्व वृत्ति जर शांत झाल्या असतील तर तुझें वासनायुक्त चित्त शांत होऊन निर्वासनत्वास प्राप्त झालें आहे, असें तूं समज. त्या निर्वासनावस्थेंत जें व्यवहारांत प्रत्यक्चेतन या नावानें तत्त्व असतें तेंच सर्वविशेषरहित सर्व, सर्वत्र असणारें निर्विषय ब्रह्म आहे. त्या पदाला चक्षुरादिक इंद्रियें व अज्ञजन यांतील कोणी जाणत नाहींत. भूमीवरून आकाशांत उंच उडून गेलेल्या पक्ष्याला जसे कोणी पाहात नाहींत त्याप्रमाणें त्याला कोणी जाणत नाहींत. प्रत्यक्चेतन, क्षेत्राला प्रकाशित करणारा शुद्ध, संकल्पशून्य व निर्विषय अशा या आत्म्याला सर्व वृत्तींपासून अगदीं दूर असलेला पाहा. लोकाची स्थूल दृष्टि परमाणूंना जशी पाहूं शकत नाहीं त्याप्रमाणें स्ववासना सर्वातीत, स्वच्छ, व शुद्ध पदाला पाहूं शकत नाहीं. ज्याची प्राप्ति झाली असतां हे सर्व घटादि स्थूल पदार्थही बाधित होतात त्या परम पदीं ही बिचारी वासना काय करणार? ज्याप्रमाणें अग्नीच्या पर्वताला प्राप्त होऊन बर्फाचा लहानसा तुकडा विलीन होतो त्याप्रमाणें शुद्ध चित्तत्वास प्राप्त होऊन अविद्या लीन होते. भोगबंधनरूप व रजःकणाप्रमाणें अतितुच्छ असलेली ही बिचारी वासना कोठें व सर्व जगाला भरून सोडणारा हा चित्तस्वरूप विपुल वायु कोठें! जोंवर शुद्ध चित्तानें हा शुद्ध आत्मा चांगल्याप्रकारें जाणला नाहीं तोंवर ही नाना आकारांनीं विकार पावणारी अविद्या स्फुरण पावत आहे. त्या सर्वव्यापक आत्म्यामध्यें सर्व विषयवृत्ति क्षीण झाल्या आहेत. आकाशाप्रमाणें त्यांत केवळ स्वच्छताच उदय पावली आहे! ती परवस्तु पूर्णतारूप आहे. सर्व जगदाकारांनीं रहित आहे. वाणीचा विषय न होणाऱ्या त्या वस्तूला उपमा कशाची देता येणार आहे. हे अर्जुना! यास्तव तूं पूर्ण आत्मदर्शनानेंच इष्ट कामांचा परिहार कर. त्याच युक्तीनें अंतःकरणांतील सर्व प्रवृत्तींचें कारण अशी जी अहंस्थिति-अंतःकरणस्थ वासना तिचा सर्वथा त्याग कर. संसारबंधनरहित हो. सर्व अनर्थांचें अस्थान असा जो अभयस्वभाव भगवान्-मी तोच तूं हो.

श्रीवासिष्ठः—त्रिलोकनाथ असें बोलून मौन धरून पुढें बसला असतां शुभ्र कमलाच्या ताटव्यांत जसा भ्रमर ध्वनि करूं लागतो त्याप्र-

माणें पांडुपुत्र असें बोलेल. "हे भगवन् ! माझी ही मति सर्व शोकरहित होऊन, सूर्यामुळें कमलिनी जशी प्रफुल्लित होते त्याप्रमाणें तुज लोकभर्त्याच्या वचनानें उदय पावली आहे." रामा ! असें बोलून हरी ज्याचा सारथी आहे, असा तो गांडीवधन्वा अर्जुन युद्धास सज्ज होऊन उठेल व रणलीला करील. तो स्वतःच्या बाणांनीं छिन्न-भिन्न झालेल्या हत्ति-घोडे-सारथि, रथी इत्यादिकांच्या अगांतून वाहणाऱ्या रक्ताची नदी भूमीवर वहावयास लावील व बाणसमूहांच्या वेगानें उडालेली जी धूळ तिच्या योगानें द्युलोकाच्या सूर्यरूप नेत्रास झांकून सोडील.

इति अर्जुनोपाख्यानं समाप्तं.

---

# सर्ग ५९

—:०:—

१ ज्या दृष्टीनें चित्ताची स्थिति जीवन्मुक्तपदीं निश्चल, निर्विषय व सुस्थित होईल ती दृष्टि येथे वर्णितात.

**श्रीवसिष्ठः**—राघवा ! पापाचा विनाश करणाऱ्या या दृष्टीचा आश्रय करून निःसंगरूप जो संन्यास-सर्वत्याग व सर्व जगाचें ब्रह्मामध्यें बाधरूप जें ब्रह्मार्पण त्यांनीं युक्त होऊन तू रहा. ज्याच्यामध्यें हें सर्व आहे, ज्याच्यापासून हें सर्व आहे, जो हें सर्व आहे, जो सर्वतः आहे, व जो नित्य सर्वमय आहे, तो परमात्मा आहे, असें तूं समज. तो अज्ञांच्या दृष्टीनें फार दूर असला तरी सर्वांचा आत्माच असल्यामुळें अगदीं जवळ आहे. त्याचप्रमाणें तें तत्त्व आकाशाप्रमाणें सर्वव्यापी असलें तरी जातीप्रमाणें प्रत्येक वस्तूंत पूर्ण आहे वास्तव तूही सर्वप्रकारें तें तत्त्वच आहेस. त्यामुळें तूं स्वतःला परिच्छिन्न जरी मानीत असलास तरी त्यांतच स्थित आहेस. त्याच्या सत्तेनेंच तूं सत्तावान् होतोस. तेव्हां आतां मी आहें, असा परिच्छिन्न अभिमान धरण्यांत काय अर्थ आहे ? निःसंशय तूं तें आहेस. जें निर्विषय, अकृत्रिम चेत्यरहित चिदाभास--संवेदन--स्वयंप्रकाश ज्ञान तेंच परम पद आहे, असें जाण. तीच आनंदोत्कर्षाची पराकाष्ठा आहे. तीच सर्व दृष्टींची सर्वोत्तम दृष्टि आहे, तो सर्व महिम्यांचें--सर्व प्रकारच्या माहात्म्यांचें माहात्म्य आहे. ती सर्वमान्य गुरूंचा गुरु आहे. तोच आत्मा, तेंच विज्ञान. तोच शून्य व तेंच परब्रह्म आहे. तेंच परमकल्याण आहे. तो शिवस्वरूप आहे, शांत आहे. तीच विद्या व तीच परा गति आहे. हा जो शांत सर्वानुभवरूप चिदात्मा आहे, जो सर्व आमद्रव्यांचा सत्तेनें अनुभव घेतो तो जगद्रूपी तिळांतील तैलात्मा आहे. तो जगद्रूपी गृहांतील दीप आहे. तो जगद्रूपी वृक्षांतील रस आहे. तो जगत्पशूंचा पालक आहे. तो सर्वभूतरूपी मोत्यांचा तंतु आहे. तो प्रत्येक भूताच्या हृदयरूप आकाशांत ओंवलेला आहे. त्याचप्रमाणें तो भूतरूपी किरणसमूहाची तीक्ष्णता आहे. तो पदार्थांतील पदार्थत्व आहे. तो अत्युत्तम तत्त्व आहे. तो सद्वस्तूंचें सत्त्व आहे व असत् वस्तूंचें असत्त्व आहे. जो आपल्या तात्त्विक बोधरूप अलौकिक उपायानें सर्व स्वतःलाच प्राप्त होतो. हे सर्व जगद्भाव अविचारानें सुंदर दिसतात. परमात्म्याचे वस्तुतः अविद्यमान असणारे भाव विचारानें विनाश पावणारे आहेत, मिथ्याभ्रमरूप जगांतील 'मी' व इतर पदार्थ यांचा विचार केला कीं ते विनाश पावतात. 'मी' हा कोण बरें आहे ? अत्यंत शुद्ध असलेल्या माझ्यामध्यें बुद्धीची आस्था कशी झाली म्ह० माझ्यामध्यें आस्था उत्पन्न होण्याचें

---

१ येथे सन्यास म्ह० त्वंपदशोध व २ ब्रह्मार्पण म्ह० तत्वपदाची शुद्धि असे समजावें.

कारण काय ? बुद्धि तरी मज असंग आत्म्याला कशी प्राप्त होते ? आदि-मध्य-अन्त हे परिच्छेद व संकल्पकल्पना मीच आहे. मी अनादि अनन्त ब्रह्माकाश आहें. तेव्हां मज आत्म्याला इयत्ता कशी व कोठून असणार ? असा ज्याचा आंत निश्चय असतो, तो बाहेर शास्त्रीय व लौकिक अविरुद्ध व्यवहार करीत असला तरी त्याची ती स्थिति बाधित होत नाहीं. कारण तो व्यवहारसमयींहि सर्वदा आंत हर्षविषादशून्य असतो. अत्यंत सम ब्रह्मामध्यें निश्चल झालेलें त्याचें मन अस्त पावत नाहीं व उदय पावत नाहीं. आकाशाप्रमाणें ज्याचें शून्यत्व असतें तो शून्यरूप महात्मा येथें भावनेनेंच अद्वैतपदावर आरूढ झालेला असतो, व्यवहारतः नाहीं. झोंपेंत जशी चित्ताची स्थिति निर्विकार असते तशीच त्याची व्यवहारसमयींही राहते. तो व्यवहार जरी करीत असला तरी चित्रांतील नराप्रमाणें क्षोभ पावत नाहीं. चित्रांतील पुरुषाप्रमाणें व्यवहार करतानाहीं ज्याच्या मनांत मानापमानादिकांमुळें थोडेंसेंही दुःख होत नाहीं तो मुक्तीला प्राप्त होतो. ज्याप्रमाणें आरशांत दिसणारा लोकांचा व्यवहार स्वतः आरशांत कोणत्याही प्रकारचा वैचित्र्यविकार उत्पन्न न करतांच दिसतो त्याप्रमाणें त्याच्या चिन्मणींत सर्वव्यवहार त्याला विकृत न करतां होतो. चिती अत्यंत निर्मल आहे, त्यामुळें त्यांत दिसणारा सर्व व्यवहार ही चिच्चमत्कृतिच आहे; ती चिच्चमत्कृतिच जगद्रूपानें भासते. येथें ऐक्य नाहीं, द्वित्व नाहीं व द्वैतमय माझा उपदेशही नाहीं, तर शब्द, त्याचा अर्थ, शिष्य, त्याची इच्छा, गुरु, त्याचें व्याख्यान इत्यादि कल्पनाचमत्कारांनीं तें सर्व चिन्मयच आहे. फार काय, पण मी जो तुला उपदेश केला आहे तोही चिन्मय आहे. शांत चित्च आपल्या स्वरूपामध्येंच चमत्कार करते विवर्त पावते. हा संसार चित्--चाच प्रस्पंद विवर्त आहे व तिचा प्रस्पंद न होणें हेंच परम पद आहे. चित्स्पंदाच्या शमनानेंच हा संसार शांत होतो. तुझें चित्त अपरिच्छिन्न ब्रह्माकार परिणत झालें असतां अंशभावाचा म्ह० जीवजगद्रूप एकदेशभावाचा जो नाश होणें तोच परम पुरुषार्थ व तोच वासनाक्षय होय. ज्याअर्थीं असत् संवित्स्पंदही वर सांगितलेल्या जडभावास प्राप्त होतो त्याअर्थीं स्पंदशून्यत्व, हेंच चितीचें अजड स्वरूप आहे, असें अनुभवनिष्ठ मानतात. संसार भावनेच्या अधीन आहे; तो खरा आहे अशी भावना केली असतां तसाच अनुभवाला येतो, व त्याची भावना न केली कीं तो लय पावतो, म्हणून तो निःसाररूप आहे. जीवन्मुक्ताचें स्वरूप केवळ निरुपाधिक असतें. त्यामुळें त्याचा ससारही तसाच अवशिष्ट राहतो, म्ह० तो चिन्मात्रच आहे. यास्तव सोन्यांतील कटकत्वादिकांप्रमाणें प्रमाता प्रमेय, प्रमाण इत्यादि सर्व चिद्रूपचक्राचें वाहणेंच आहे. पण तो चित्स्पंद चित्--हून पृथक् नाहीं, असें अज्ञान--असा अविवेक हाच संसार आहे. चित्-चा अबोध होताच सोन्यांतील कटकत्वाप्रमाणें चित्स्पंद उत्पन्न होतो. हे रामा ! केवल बोधानें त्याचा विलय झाला असतां शुद्ध चित् अवशिष्ट राहते. आत्मतत्त्वाचा नुस्ता बोध होतांच भोगवासना क्षय पावते. भोगांची भावना न करणें हेंच हे रामा ! ज्ञानित्वाचें मोठें लक्षण आहे. त्यामुळें तत्त्वज्ञाला स्वभावतःच सर्व भोग अभिमत नसतात. कारण जो मिष्टान्नानें अतिशय तृप्त झालेला असतो तो कदन्नाची इच्छा कशी करील ? हेंच ज्ञान्याचें श्रेष्ठ लक्षण तूं जाण. स्वभावतःच जें भोगांचें अभावन--भोगाची वांच्छा न करणें, व सर्व विषयांच्या स्वरूपानें चित्स्पंदच ..टून राहिलेला आहे, असें समजणें. हाच आंत दृढ

निश्चय असणें यालाच ज्ञत्व म्हणतात. जा लोकांच्या अनुरोधानें विषयांचा भोग जरी घेत असला तरी वस्तुतः घेत नाहीं, तो तत्त्ववेत्ता होय. तो लोकाचें अनुकरण करण्यासाठीं भ्रांति मानाबरोबर आपणही काठीनें आकाशाला मारूं लागतो. अर्थात् इतर लोकांप्रमाणें त्याची होणारी जी देहधारणनिमित्त भोगांमध्यें प्रवृत्ति ती वृथा चेष्टा आहे. पण कृत्रिम बुद्धीवांचून निरतिशय आनंदरूप आत्मतत्त्व प्राप्त होत नाहीं, म्हणून सर्वच जरी चिदात्मरूपच असलें तरी प्रथम परिच्छिन्न दृष्टीचा अंगीकार करून नंतर तिचा निरास करावा लागतो. तर मग देहात्मबुद्धीचा निरास करून, त्याच्या द्वारा तत्त्वदर्शनोपयोगी असल्यामुळें आपल्या हस्त-पादादि अंगांना तोडून टाकणें इत्यादि साहसाचाही, सर्वात्मदर्शनाप्रमाणें, तत्त्वज्ञानाला उपयोग होईल म्हणून म्हणाल तर तें खरें आहे. पण कोठेंही-शास्त्रावरून अथवा विद्वदनुभवानें आपली अंगें तोडणें हा ज्ञानाचा उपाय आहे, असें सिद्ध होत नाहीं. कारण ही चित् जोंवर अज्ञानानें आच्छादित असते तोंवर ती विषयकोटींत प्रविष्ट होत्साती स्वतःही स्पंदरूपिणीशी होऊन बाह्यविषयांस पाहते व त्यामुळें भ्रमाचा अनुभव घेते. पण जेव्हां आंत सम्यक् बोधाचा उदय होतो तेव्हां विझलेल्या दिव्याप्रमाणें, सर्व स्पंदास्पंददशांचा क्रम त्याच्या नांवासह कोठें तरी निघून जातो, म्ह० तो बाधित होतो, असा भावार्थ. शांत झालेल्या दीपज्योतीप्रमाणें स्वभावतःच अत्यंत शांतरूप असलेल्या चितीच्या स्पंदास्पंदमयीं परिणामाची यत्किंचित्‌ही वार्ता उरत नाहीं. स्पंदरहित वायूचें रूप सत् आहे, कीं असत् आहे, कीं अनिर्वचनीय आहे, हें कळत नाहीं. त्याचप्रमाणें ज्या चितीला अज्ञान व स्पंद नाहीं ती प्रशांत आहे, तिलाच मोक्ष म्हणतात. जेव्हां चिदात्मा चित्स्पंद ज्ञानाकार धारण करतो तेव्हां तो बंधाला व मोक्षालाही कारण होत नाहीं तो केवळ आत्मस्वरूपांत स्थित होतो त्यामुळें तो बंधालाही कारण होत नाहीं व मोक्षाच्याही उपयोगी नाहीं चित्ताकार व त्याची शांति या दोन व्यर्थ देशांना जर चित्त प्राप्त न होईल तर बंध व मोक्ष या पक्षांचें नांवही ऐकूं येणार नाहीं. मोक्ष होवो, मला मोक्ष मिळो, असें वाटणें हेंच आंतील पूर्णत्वाच्या क्षयाचें कारण आहे. मोक्ष मला नको, असें वाटणें हाही बंध आहे; यास्तव कांहीं संवेदन न होणें, हें तुझें परमश्रेय आहे. जें विषयाभासरहित व अजड तें परमपद होय. विषयोन्मुखरूप न होणें हेंच चितीचे स्वरूप आहे. महाचितीचा जो—'संकल्पन' हा शब्द व त्याचा अर्थ, एतद्रूप स्पंद तोच बंध-मोक्ष इत्यादिकांला योग्य आहे. त्याचें प्रमाणतः निरूपण करूं लागलें असतां तो नाश पावतो. केवल यथार्थदर्शनानेंच अहंभाव निराधार होऊन अगदीं शांत झाला असतां कशानें कोणाचें काय बद्ध होतें व काय मुक्त होतें तें आम्हांस कळत नाहीं. विवेकी स्वतः रचलेल्या संकल्पांतील हें माझें संकल्पित व हें असंकल्पित हा विभाग जर टाकील तर तो आपोआप नाश पावेल व त्यामुळें कोणत्याही प्रतिबंधावांचून सर्व संकल्पशून्य, स्पंदरहित होईल. ज्ञानी चैतन्यानें आपला संकल्पमय स्पंद सोडला व प्राणवायुही स्पंदरहित झाला म्हणजे चित् आपल्या चिद्घन स्वरूपांत अवस्थित होते आणि स्पंदमय वात क्षीण झाला असतां तन्मूलक संसारही क्षीण होतो. चित्-चा प्रकाश हाच चित्स्पंद आहे. असें नित्य ज्ञान झालें असतां चित्-हून निराळा स्पंद राहत नाहीं. जो या दृश्यमय दीर्घ स्वप्नांत दुसर स्वप्न पाहूं लागतो तो मोह पावतो. पण जो आत्मसंविद्‌ला सर्वात्मक पाहतो तो ज्ञानी भ्रमांत पडत नाहीं. ज्याच्यामध्यें

बलात्कारानें सतत जगदाकार भ्रमांच्या सत्तेचा उदय होतो, ज्यांत हे सर्व संकल्परूप मळ लीन होतात, व विषयानुभवजन्य आनंद उद्भवतात त्या प्रत्यगात्म्याला मनांत ध्यानानें तूं साक्षात् जाण.

## सर्ग ६०

**१. अद्वितीय, शुद्ध परमात्म्याची विस्मृतिस्वमायेनें सर्वाकारांनीं स्थिति.**

**श्रीवसिष्ठः**—असे हें पर तत्त्व आहे, तेंच चिद्धन परम पद आहे; हे ब्रह्म-विष्णु-हर महादेव त्याच्यातले आहेत. त्यांच्याच विभूतींनीं संतुष्ट झालेले जन राजांसारखे सुखी होतात. स्वर्गांत राहणारे देवादिक स्वर्गलोकीं जसे आनंदित होतात त्याप्रमाणें तत्त्वनिष्ठ जन येथें आकाशगमनादि क्रीडांनीं चिरकाल रममाण होतात. हे रामा! तें परम पद प्राप्त झालें असतां जीव मरत नाहीं व त्याची प्राप्ती झाल्यावर तो शोक करीत नाहीं. त्याला प्राप्त होऊन कोणी प्राणधारणादिकांनें निमित्त, अशा क्षुधातृषा इत्यादि ऊर्मींनीं पीडित होत नाहीं. हे रामा! तत्त्वबोधानें ब्रह्माला प्राप्त होऊन भिंत, झाड इत्यादिकांकडून तो प्रतिबद्ध होत नाहीं. अपार परमाकाशरूपी परमात्म्याच्या सत्तासामान्यरूपाचें तूं जर थोडेंसेंही चिंतन केलेंस तर तूं एका निमेषांत सामान्यजन्तु असलास तरी मुक्तचित्त मुनि होशील; आणि मग सर्व संसारकर्में जरी करीत राहिलास तरी पुनः परितप्त होणार नाहींस.

**श्रीरामः**—मन, बुद्धि, अहंकार, चित्त, इत्यादि सर्व द्वैत जेथें क्षय पावतें तें निर्विशेष आभानपूर्ण चिन्मात्रच सत्तासामान्य आहे कीं मनआदि सर्व विशेषवान् सर्वात्मा ईश्वर हें सत्तासामान्य आहे?

**श्रीवसिष्ठः**—जें हें सर्व देहस्थ ब्रह्म जाग्रत् व स्वप्न या अवस्थांत अन्नादि खातें, जलपान करतें वल्गना करतें, वस्तु उचलून घेतें, झोंपेंत सर्वांना निश्चेष्ट करून सोडतें, तुरीयावस्थेंत वृत्ति व विषय यांनीं रहित होतें, तें सर्वगत, आद्यन्तरहित, असलेलें, विसरलेल्या कंठस्थ अलंकाराप्रमाणें स्मरणानें पुनः मिळविलेसें होणारें, तेंच ब्रह्म सर्वसत्तासामान्य येथें वस्तुतत्त्व म्हणून म्हटलें जातें. तें आकाशांत शून्यतेनें स्थित आहे, शब्दांत शब्दत्वानें स्थित आहे, स्पर्शांत स्पर्शत्वानें स्थित आहे, त्वचेंत त्वग्रूपानें स्थित आहे, रसांत रसत्वानें लीन आहे, रसनेंत रसनतेनें स्थित आहे, रूपांत रूपत्वानें, नेत्रांत दृग्रूपानें, घ्राणांत घ्राणत्वानें व गंधांत गंधत्वानें तें उदय पावलेलें उपलब्ध होतें. तें शरीरांत कायत्वानें पुष्ट आहे, भूमींत भूत्वानें, दुधांत पयस्त्वानें व वायूंत वायुत्वानें स्थित आहे. तेजांत तेजस्त्वानें व बुद्धींत तें बुद्धित्वानें अनुगत आहे. तें मनांत मनस्त्वानें, अहंकारांत अहंकृतीनें व संविदेंत संवित्तीनें रूढ आहे व चित्तांत चित्तत्वानें उत्थित झालें आहे. तें वृक्षांत वृक्षत्वानें लग्न आहे, पटांत पटत्व या रूपानें उदय पावलें आहे घटांत घटत्वानें रूढ झालें आहे, वडाच्या झाडांत वटत्वानें उद्भवलें आहे. स्थावरांत स्थावरत्वानें, जंगमांत जंगमत्वानें, पाषाणांत पाषाणत्वानें, चेतनांत चेतनत्वानें, देवांमध्यें अमरत्वानें, नरांमध्यें नरत्वानें, पशु—पक्ष्यादि तिर्यक् प्राण्यांमध्यें तिर्यक्त्वानें, क्रिमींच्या अवस्थेंत क्रिमित्वानें, कालक्रमात कालत्वानें तसेंच ऋतूंमध्यें ऋतुत्वानें, व तो प्रभु घटिका, क्षण, निमेष इत्यादिकांत त्या त्या रूपानें संस्थित आहे. तें आत्मतत्त्व शुक्लपक्षांत शुक्लत्वानें झालें आहे, कृष्णपक्षांत कृष्णत्वानें स्थित आहे, क्रियांमध्यें स्पन्दरूपानें, नियतींत नियमानें, व संस्थितींत संस्थितीनें स्थित आहे. नाशांत नाशरूपानें स्थित आहे.

उत्पत्तींत उत्पत्तिरूपानें परमेश्वर स्थित आहे. तो व त्यांत बाल्यानें विश्रांत झाला आहे, तारुण्यांत तारुण्यानें स्थित आहे. जरारूपांत जरेनें स्थित आहे, व मरणांत मरणानें स्थित आहे. समुद्रांत लाटा, तुषार, तरंग, इत्यादि रूपानें जलसामान्यच जसें राहतें त्याप्रमाणें, तो परमेश्वर सर्व पदार्थांशीं अभिन्न—एकरूप आहे. लहान मुलानें वेताळ जसा कल्पिलेला असतो त्याप्रमाणें या सत्य चित्स्वभावानें मिथ्याच नानापणा कल्पिला आहे. हे महात्मन्! सर्वत्र संस्थितिमान् चिद्रूप आत्म्यानें स्वतःच ही जगद्रूपानें रचना कल्पिली आहे. 'हें सर्व मीच आत्म्यानें विविध विलासांनीं व्यापलें आहे. ही विभूति माझीच आहे. यास्तव माझ्याहून व्यतिरिक्त कांहीं नाहीं,' असें समजून शांतचित्त होऊन तूं आपल्या महिम्यांत रहा.

**श्रीवाल्मीकिः**—मुनि जों असें बोलत आहे तों दिवस संपला सूर्याचा अस्त झाला. सर्व सभा पूज्यांना नमस्कार करून सायं स्नान करावयास गेली व ती रात्र संपल्यावर सर्व सभा सूर्यकिरणांसह पुनः सभास्थानीं आली.

दिवस सोळावा समाप्त.

---

# सर्ग ६१

—:*:—

१ जगत् स्वप्न व माया यांसारखेंच आहे व भ्रांतीनें सर्व संभवतें, असें सिद्ध करण्याची युक्ती.

**श्रीरामः**—हे मुने! जसें आमचें स्वप्नांतील नगर, पुर, इत्यादि भासतें तसाच जर ब्रम्हदेवाचा वगैरे देहपरिग्रह असेल, व हें सर्व जर असन्मयच उत्पन्न झालें असेल, तर मग आम्हांला त्याचा खरा असा अत्यंत दृढ प्रत्यय कसा येतो? प्रपंच सत्य कसा भासतो?

१. अशा तऱ्हेचा श्लोक पुनः पुनः आल्यामुळें काव्याचा सुरसपणा कमी होतो.

**श्रीवसिष्ठः**—रामा! जेव्हां हा वर्तमान कल्पांतील पद्मज पूर्वकल्पामध्यें उपासकावस्थेंत होता तेव्हां त्याला तत्त्वज्ञान नव्हतें. त्यामुळें त्याला त्या वेळचा सर्ग हल्लीं आपल्याला जसा हा सर्ग दिसत आहे त्याचप्रमाणें चार प्रकारच्या भूतसमुदायाच्या रूपानें सत्य वाटत होता. पण आतां त्याला तत्त्वज्ञान झालेलें असल्यामुळें तो बाधित झाला आहे, म्हणून खरा नव्हे. जोंवर अज्ञान असतें तोंवर चिति सर्वगा असल्यामुळें जीव सर्व होतो व सर्वत्र त्याचा संसार सत्यसा भासतो, पण तो तत्त्वाच्या अज्ञानामुळें उत्पन्न झालेला असल्याकारणानें तत्त्वज्ञानानें नाश पावणारा आहे. म्हणूनच प्रजापतीच्या तत्त्वज्ञानानें बाधित झालेला स्वप्नसारखा जो हा नाजुक प्रपंचप्रतिभास उपस्थित झाला आहे तो अज्ञ जीवांच्या अहंताप्रत्ययाशीं एकरूपसा होऊन अतिदृढ—सत्यसा झाला आहे. तर मग प्रत्येक कल्पांतील प्रजापतीला आपण कल्पिलेला हा प्रपंच तत्त्वज्ञानानें क्षणांत विनाश पावणारा आहे, असा अनुभव का येत नाहीं, म्हणून विचारशील तर सांगतों. ज्याप्रमाणें निजलेल्या पुरुषाला स्वप्नभोगप्रद कर्मानें प्रतिबंध केल्यामुळें स्वप्नांत विद्यमान असलेलेंही क्षणविनाशित्व दिसत नाहीं तर तो तें स्वप्न खरेंच मानतो, त्याचप्रमाणें प्रत्येक कल्पांतील प्रजापतीला जीवांच्या अदृष्टामुळें प्रतिबंध होतो व त्यामळें त्याला हें जगत विनाशी आहे असें वाटत नाहीं. हे रामा! या सुप्त पुरुषाच्या प्रतिभासानें हें स्वप्न जसें अनादि—अनन्त भासतें त्याप्रमाणें प्रजापतीलाही हा सर्व विशाल प्रपच सत्य भासतो. जें स्वप्नपुरुषापासून झालेलें तें स्वप्न पुरुषात्मकच असतें, या गोष्टीचा आपल्याला नेहमीं अनुभव येतो, जसें बीज असतें तसेंच फळ होतें. जें असत्य मनः—पुरुषाकडून साधलें जातें तें असत्यच असतें.

यास्तव हा प्रपंच व त्यांतील जीवांचें कर्म जन्मान्तर–स्वर्ग–नरक इत्यादि व्यवहारास जरी समर्थ असलें तरी त्याला अबाधित सत्य मानणें युक्त नव्हे. यास्तव असत् जगाची दृढ भावना करणें अयोग्य आहे. त्या भावनेचा त्याग करावा. स्वप्नपुरुषापासून जें दृढ प्रत्ययानें आत्म्यामध्यें उद्भवलेलें असतें तें सर्गादि सर्व सत्यच होतें. हा प्रजापतीचा स्वप्नसर्ग पावसाळ्यांतील पुराप्रमाणें निमेषमात्र आहे. तथापि त्या एका निमेषांतच ह्या सर्व दीर्घ स्वप्नाची कल्पना होते. प्रजापतीचा जसा हा स्वप्नसर्ग उदय पावला आहे तसाच सर्व भूतांचा संसाराख्य प्रत्यय उद्भवला आहे प्रत्येक जीवाचा सर्ग निरनिराळा झाला आहे. चित्तत्त्वाच्या सत्तेनेंच ही सर्व सर्गाची परंपरा उभ्दवली आहे. जसें जल लाटा, भोंवरें इत्यादि रूपानें द्रवत्वामुळें विवर्त पावतें त्याप्रमाणें ही सर्गलक्ष्मी स्वप्नरूपच आहे, खरी नव्हे तें प्रजापतीचें पद सर्गादिकांसह अत्यंत असत आहे. तथापि आपण जशा भावनेनें जें पाहतों तसाच त्याचा अनुभव येतो. आपण त्याला सत्य मानलें तर तें सत्य होतें, असत्य मानलें तर असत्य होतें. परमात्म्याची अज्ञानाख्य माया अघटित घटना करण्यांत मोठी पटाईत आहे. त्यामुळें स्वप्न-भ्रम इत्यादिकांविषयीं, असें कसें होऊं शकेल, असें म्हणताच येत नाहीं. भ्रमांत संभवत नाहीं, असें येथें कांहीं नाहीं या त्रैलोक्यांत विचित्र वस्तुदृष्टि उपलब्ध होतात; जलामध्यें अग्नि पेटतो. जसा समुद्रांत वडवाग्नि; आकाशांत नगरें असतात, जशीं देवांचीं गृहें; दगडावर कमलें उगवतात; जसें मृत्तिकेचा लेशही नसलेल्या मेरूवर वृक्ष; एकाच प्रदेशीं पुण्यफळें–इष्ट वस्तु राहतात; जसें कल्पवृक्षावर सर्व पदार्थ असतात; शिळा वृक्षाप्रमाणें फळें देतात; जसे चिंतामणी; पाषाणांत प्राणी असतात; जसे दगडांत बेडूक; दगडाला पाझर फुटतात; ज्याप्रमाणें चंद्रकांतमण्यापासून द्रव सुटतो. झोंपेंतील (स्वप्नांतील) भ्रामक ज्ञानांत एका क्षणामध्यें घटाचा पट होतो. स्वप्नांत आपलेंच मरण आपण पाहतों, त्यावरून असत्य पदार्थांचाही बोध होतो, असें ठरतें. आकाशांत आकस्मिक जल धारण केलें जातें; जसें ढग आकाशांत पाणी छताप्रमाणें पसरून राहतें; जशी मंदाकिनी. स्थूल शिळाही पक्ष्याप्रमाणें उड्डाण करितात; जसे पक्षयुक्त पर्वत. शिळेपासून सर्व प्राप्त होत; जसा चिंतामणी देवांच्या उद्यानांत ज्याची ज्याची इच्छा करावी नें तें पुढें उपस्थित होतें, पण भलतेंच चिंतिलेले सर्व पदार्थ मिळत नाहींत. उदाहरणार्थ राघवा! मोक्ष उत्पन्न होवो, ब्रह्माचा नाश होवो; प्रपंच सत्य असो, भोग शाश्वत टिकोत, नियतीचा भंग होवो, वेद अप्रमाण होवो, इत्यादि संकल्प जरी ( कल्पवृक्षाखालीं ) केले तरी ते फलद्रूप होत नाहींत. अचेतन देहही कर्म करितो; जशी कळसूत्री बाहुली सारांश हे व असेच दुसरेही असंभवनीय ठरलेले विचित्र आरंभ व भ्रम, शंबर, गंधर्व इत्यादिकांच्या मायाविलासानीं दिसतात. दूरदेशीं असलेला विस्तृत चंद्र टीचभर दिसतो. उत्पातसमयीं आकाशांत कबंध-मुंडकी तोडलेली शरीरें दिसतात, मंत्रप्रयोगादि क्रियेनें, औषधादि द्रव्यांनीं, संचरणीय रत्नांनीं, पिशाच--मद इत्यादिकांच्या आवेशांनीं उत्पन्न झालले विचित्र विभ्रम दिसतात. गंधर्वांनीं निर्माण केलेले अनन्त पदार्थ सत्य आहेत असा प्रत्यय येतो. कारण सत्य असल्याप्रमाणें त्यांच्याशीं व्यवहार होऊं शकतो, त्याचप्रमाणें एवढ्या मोठ्या या ब्रह्मांडाचा विनाश कसा होईल, तो संभवनीय दिसत नाहीं असें जरी वाटलें तरी कल्पांतीं त्याचाही विनाश संभवतो. तात्पर्य, याप्रमाणें

या सृष्टिकालीं संभवणाराही हा सर्गरूप स्वप्न-विभ्रम तत्त्वबोध झाला असतां असंभवनीय होऊन सिद्धीला म्ह० स्वरूपविश्रांतीला कारण होतो, अर्थात् ब्रह्मदृष्ट्या पाहिल्यास असत्य कांहीं नाहीं व जगद्रूपानें पाहिल्यास सत्य काहीं नाहीं. तर सृष्टि-सर्ग या नांवाच्या या स्वप्नांत सर्वत्र सर्वप्रकारें सर्व संभवतें. स्वप्नांत ज्याची बुद्धि निमग्न झाली आहे अशा मनुष्याला जसें सर्व सत्य वाटतें, त्याप्रमाणें या सर्गरूप स्वप्नांत ज्याची बुद्धि निमग्न झाली आहे. असाल सृष्टी स्थिर दिसते. एका स्वप्नांतून दुसऱ्या स्वप्नांत जाण्याप्रमाणें एका भ्रमांतून दुसऱ्या भ्रमांत पडणारा प्राणी हें सर्व स्थिर आहें, असा अनुभव घेतो व त्यामुळें मोहित होतो. खड्डयांत पडल्यासारख्या स्वमोहदोषामुळें एकादा मूढ हरिण जसा एका खड्डयांतून दुसऱ्या खड्डयांत पडतो त्याप्रमाणें संसारांत पाडणारे जे रागद्वेषादि दोष त्यांनीं मूढ होत्साता ह्या प्राण्याला देह धारण करण्याचा भ्रम हातो

## सर्ग ६२

१. विचित्र वासनांमुळें नानादेहधारिरूप भ्रम. २. जीवनाख्यानांतील भिक्षूच्या मनाच्या चेष्टा

**श्रीवासिष्ठः**--भ्रमांच्या परंपरेंत जीव पडतो, असें जें वर वर्णन केलं आहे त्याचें उदाहरण असा हा इतिहास ऐक. मनन करणाऱ्या एका भिक्षूची काय मौज झाली ती सांगतों. समाधीच्या अभ्यासांत तत्पर असा कोणी एक महा वैराग्य संपन्न भिक्षु होता. तो आपल्या वर्णाश्रम कर्मांत सर्व दिवस घालवीत असे. जलावर जसा एका क्षणांत तरंग-त्याप्रमाणें समाधीच्या अभ्यासानें शुद्ध झालेलें ते त्याचें चित्त जें जें चिंतन करी तें तें क्षणांत तसेंच घडे. एकदा समाधीतून व्युत्थान पावलेला तो एकाग्रचित्त होऊन आपल्या आसनावर बसला. व कांहीं चिंतन करूं लागला. चिंतन करीत असतां त्याच्या मनांत आपोआप अशी प्रतिभा उत्पन्न झाली कीं मी आतां सामान्यजनाच्या म्ह० शास्त्रसंस्कारहीन जनांच्या चित्ताचें अनुकरण एक क्षणभर गमतीनें करतों. असा विचार करून त्याचें चित्त, पाणी आपला समप्रवाहाकार सोडतांच भोंवऱ्याच्या आकारानें जसें फिरूं लागतें त्याप्रमाणें, क्षणांत पामर पुरुषाच्या आकाराचें बनलें; अर्थात् यतिधर्माचें नियंत्रण सुटलें. नंतर लागलेंच नांवाची इच्छा करतांच त्यानें आपलं 'जीवट' असें नांव कल्पिलें. काकतालीय न्यायानें तें नांव त्याला अकस्मात् प्राप्त झालें. तो जीवट या नांवाचा चिरकाल कांणा एका स्वप्ननिर्माण नगरींतील राजमार्गांत विहार करीत राहिला मत्त भ्रमर पद्मातील रस जसा पितो त्याप्रमाणे त्यानें तेथें पान केलें. तो लीलेनेंच मत्त झाला; व गाढ निद्रेनें व्याकुळ केल्यामुळे स्वस्थ निजला त्याला स्वप्न पडलें. त्यांत त्यानें 'मी ब्राह्मण आहें,' असें पाहिलें. त्याचें तें ब्राह्मण्यनाममात्र नसून वेदशास्त्राध्ययन व सत्कर्मानुष्ठान यांनीं परिपूर्ण झालेलें होतें. चित्तांत देशांतरप्राप्तिप्रमाणें केवल प्रतिभामात्र संपन्न अशीच त्यानें ती दशा पाहिली. एकदा तो ब्राह्मण दिवसा केलेल्या अनेक कार्यांनीं श्रांत होऊन बीजांत वृक्षाचे सर्व संस्कार जसे गुप्त असतात त्याप्रमाणें सर्व व्यवहाराचे संस्कार मनांत ठेवून तो निजला. तेव्हां त्या ब्राह्मणालाही एक स्वप्न पडलें. त्यांत 'मी मांडलिक राजा झालों आहें,' असें त्यानें पाहिलें. एकदा तो राजाही भोजन करून गाढ झोंपी गेला असतां 'मी सर्व दिङ्मंडलाचें पालन करणारा चक्रवर्ती राजा आहें,' असें स्वप्नांत पाहता झाला. पुष्पांच्या समूहानें लता

जशी फुलतें त्याप्रमाणें भोगसमूहानें त्याची सार्वभौमता पूर्ण होती. एकदा तो राजा सर्व कर्तव्यें करून झाल्यावर स्वस्थ चित्तानें झोंपी गेला. तेव्हां त्यालाही स्वप्न पडलें कारण तो जेव्हां निजला तेव्हा कारणांत जसें कार्य गुप्त असतें त्याप्रमाणें पुढें होणारा सर्व व्यवहार त्याच्या चित्तांत गुप्त राहिला होता. त्यानें स्वप्नांत आनंदित आपण अप्सरा झालेले असें पाहिलें. वृक्षाच्या कोशांतील रसाचा उल्लास झाला असतां त्याला मंजरी जशी येते त्याप्रमाणें त्याचें पूर्वकर्म फलद्रूप झालें. ती अप्सरा रतीने श्रात होऊन गाढ झोंपी गेली. तिनें स्वतःला स्वप्नात हरणी झालेलें पाहिलें. जिचें नेत्र अतिशय चंचल आहेत, अशा हरणीलाही एकदा झोंप आली. दृढ अभ्यासामुळें तिनें आपल्याला वेल झालेलें पाहिलें. पश्वादि तिर्यक् जीवही चित्तस्वभावामुळें स्वप्न पाहतात. कारण दृष्ट व श्रुत वस्तूंचें मनांत स्मरण होणें, हा अखंड स्वभावच आहे. ती वेल पुष्पें, फळें, पल्लव इत्यादिकांनीं शोभणारी झाली वनदेवींच्या वनांतील लतागृहाप्रमाणें ती दिसत होती तिनें आंतल्याआंत साक्षिचैतन्यानें सुषुप्तीचा अनुभव घेतला. आपल्याला कोणीं तोडलें आहे, असें तिनें पाहिलें. बीजांतील भावि अंकुराकाराप्रमाणे जिचें रूप आहे अशा स्वप्नोन्मुख झालेल्या बुद्धीनें तिनें स्वतःला भ्रमर झालेलें पाहिलें. तो भ्रमर वनांतील वनलतांमध्यें विहार करूं लागला. तरुण स्त्रियांमध्यें वल्लभ जसा सुखसंचार करतो, त्याप्रमाणें तो फुललेल्या पद्मिनींतून विहार करीत राहिला प्रिय स्त्रीच्या--पिकलेल्या तोंडल्यासारख्या लाल --अधरोष्ठाचें अमृतपान करणाऱ्या तरुणाप्रमाणें, मोत्यांच्या सरांप्रमाणें शोभणाऱ्या चंचल पुष्पसंघांतील पुष्परस पीत होता. सरोजिनीमध्यें अत्यत आसक्त झालेला तो कमलांच्या नालावरच बसून राहिल., कारण जडबुद्धि जीवाचेंही चित्त कोठें कोठें असें आसक्त होतें. त्या नलिनीला उपटून टाकण्यासाठीं एक गज आला, कारण मूढांचें कार्य रम्य वस्तूचा क्षय करणारेंच असतें. त्या गजानें नलिनीला चुरून तोंडांत टाकलें, त्याबरोबर तो भ्रमरही त्याच्या दाढेंत सांपडून भाताच्या गोव्याप्रमाणे चुरडून गेला व त्याचें पीठ झालें. भ्रमरानें मरतांना त्या हत्तीला पाहिलें होते व त्याच्याच आकाराची भावना केली, त्यामुळें त्यानें स्वतःला मत्त हत्तीच्या रूपानें उत्पन्न झालेलें पाहिलें हत्तींना धरण्यासाठीं बनविलेल्या शुष्क व अतिशय खोल खड्ड्यात तो पडला. अज्ञाननें गाढ अंधकाराप्रमाणें शून्य बनलेल्या संसारात जसा जीव पडतो तसाच तो त्या गर्तेत पडला. त्याला शृंखलादिकांनीं बांधून राजाकडे नेले. ती राजाला अतिशय प्रिय झाला, कारण तो शत्रूच्या मोठ्या सेनेचा अन्तकच होता, तो सदा मदबलानें मत्त व डोळे गरगर फिरवणारा होता. एकदा रात्रीं युद्ध चाललें असतां त्यांत शत्रूच्या सैन्यामध्यें घुसलेल्या त्याला शत्रूंनीं तरवारी, भाले, इत्यादि शस्त्रांनीं तोडून टाकलें, त्यामुळें विवेकवायूनें ज्याचें स्वरूप समूल नष्ट केलें आहे असा जीव जसा आत्म्यामध्यें अस्त पावतो त्याप्रमाणें तो गज अस्त पावला त्याला गजसमूहाच्या गंडस्थलावर उडत असलेल्या भ्रमराना नेहमीं पाण्याची संवय झाली होती, त्यामुळें त्या दृढ परिचयानें भ्रमरविषयींचेच त्याचे संस्कार उद्बुद्ध होऊन तो स्वतः पुनः भ्रमर झाला, वनलतेचें सेवन करणारा तो पुनः पद्मिनीकडे आला, कारण तत्त्वज्ञानशून्य लोकांना वासनांचा दुरभ्यास सोडणें फार कठिण पडतें. तेथें पुनः हत्तीच्या पायाखालीं चिरडून त्याचा चेंदामेंदा झाला. तेथें जवळच असलेल्या हंस-

पक्ष्याच्या दृढ ध्यानामुळें तो कलहंस झाला. तो कलहंस अनेक योनींत आणखी पचायशीं जन्म घेऊन पुनः हंस झाला आणि अनेक हंसांशीं मिळून तो विहार करूं लागला. त्या हंसांच्या सभेंत त्यानें ब्रह्मदेवाच्या हंसाचे गुण, आकार इत्यादिकांचें वर्णन ऐकलें. त्यामुळें त्याच्या मनांत त्याचा आकार, नांव इत्यादिकांविषयींची वासना दृढ झाली. यावेळीं हंस झालेल्या त्या भिक्षूच्या मनांत पूर्वोक्त अंड्यातील रसांत राहिलेल्या मोराच्या पिसाऱ्याप्रमाणें ती वासना पुष्ट झाली. पुढें तो हंस ब्रह्मदेवाच्या हंसाविषयींची वासना वारंवार दृढ करीत व्याधीनें पीडित होत्साता मरण पावला; आणि त्या पूर्वपिराचत वासनेचें दृढ अनुसंधान केल्यामुळें ब्रह्मदेवाचा हंस झाला. त्या जन्मांत ब्रह्मलोकीं ब्रह्मदेवानें सतत केलेल्या विवेक, वैराग्य, तत्त्वज्ञान यांच्या उपदेशांनीं तो यथार्थज्ञानी झाला. त्यामुळेंच लौकिक वस्तूंत कांहीं सार आहे, ही त्याची बुद्धि पार नाहींशी झाली. तो तेथें जीवन्मुक्त होऊन राहिला; आणि जिवत असतांनाच जर त्याला निरातिशय आनंद मिळाला होता, तर मग द्विपरार्धकालात्मक युगान्तीं ब्रह्मदेवाबरोबर विदेहमुक्त होऊन त्याला आणखी अधिक काय मिळवावयाचें होतें ! याचा ज्ञानी लोकांनीं विचार करावा.

---

# सर्ग ६३

—:-:—

१. तो हंस रुद्र झाला. २. पूर्व देहाचे स्मरण ३. त्याचे शतरुद्रत्व व ऐकात्म.

**श्रीवसिष्ठः**—त्या ब्राह्महंसानें एकदा रुद्रपुरांत रुद्राला सहज पाहिलें; ब्रह्मदेवाचें आसनभूत जें कमल त्याच्यावर क्रीडा करण्याचें भाग्य प्राप्त झाल्यामुळें त्याला ब्रह्मसामीप्य मुक्ति प्राप्त झाली होती; तिच्या बलानें तो एकदा ब्रह्मदेवाबरोबर रुद्रपुरास गेला असतां त्याला तेथें अनायासानें रुद्रदर्शन झालें तेथें रुद्राच्या ज्ञान–ऐश्वर्यादि गुणांचा उत्कर्ष पाहून त्या हंसाला मीही 'मी रुद्रच आहें' या भावनेनें रुद्र होईन, असो दृढमति झाली. आरशांत प्रतिबिंब जसें पडतें त्याप्रमाणें त्याच्या मनांत ती वासना दृढ झाली. ( अहो, पण वासनाशून्य व त्यामुळेंच जीवनमुक्त झालेल्या त्या हंसाला रुद्र होण्याची इच्छा कशी झाली ? व त्या भावनाभ्यासानें देहत्याग करून त्यानें पुनः रुद्रशरीर कसें धारण केलें ? म्हणून विचारशील तर हा रुद्रभाव खरा नव्हे. तर प्रतिबिंबाप्रमाणें तत्सारूप्यमुक्ति आहे. तर प्रारब्धविशेषवशात् उद्भवलेल्या इच्छेनें योग्याप्रमाणें मानस देहान्तराच्या कल्पनेनें केवल पूर्व देहाचा त्याग आहे. ) तो धारण करता रुद्राच हंसतनु सोडून रुद्राचे शरीर झाला. ज्याप्रमाणें पुष्पांतील सुगंध वायूबरोबर जाऊं लागला असतां पुष्पगुच्छाला सोडतो त्याप्रमाणेंच त्यानें पूर्वशरीराला सोडलें. तो पद रुद्रभवनांत गणसमूहांतील श्रेष्ठ अशा गाणपत्य पदवीनें त्या शिवपुरांतील आचारांनीं यथेच्छ विहार करता झाला. तो रुद्र अत्युत्तम ज्ञान व ऐश्वर्यविलास यांच्या योगानें मुख्य रुद्राशी साम्य पावलेला असल्यामुळें आपल्या अतिशुद्ध बुद्धीनें आपला मागील सर्व वृत्तान्त त्याला आठवला; कारण तो भगवान् त्यावेळीं निरावरण विज्ञानरूप होता. आपल्या शेंकडों स्वप्नांनीं विस्मित झालेला तो एकान्तांत आपल्यापाशींच म्हणाला—अहाहा ! खरोखर विश्वाला मोह पाडणारी ही विचित्र माया पसरलेली आहे. ती असत्यच आहे, तथापि मरुभूमीवरील जलाप्रमाणें सत्यशी भासते. हां ! मी प्रथम प्राचीन पारमार्थिक स्थि-

तीनें चित्‌च आहें. पण त्यानंतर मायेनें चित्त्वास प्राप्त झालों; मी बहु व्हावें, असा संकल्प केला, हें मला आठवलें. तसल्या संकल्पामुळेंच मी सर्वरूप झालों व चिंदशामध्यें सर्वज्ञ व जडांशांत आकाशादि विभागवान् झालों. त्यानंतर यदृच्छेनें व्यष्टि-समष्टि लिंग-स्थूल देहांत चिदाभासरूपानें अनुप्रवेश केला असतां स्थूल व सूक्ष्म देहांशीं तादात्म्य संसर्गाध्यासानें त्यातील वासनावैचित्र्यानीं चित्रपटाप्रमाणें रंजित होऊन जीवरूपानें मी स्थित आहें. तो जीव अनादिकालापासून जन्मपरंपरेचा अनुभव घेता घेता कोणा एका सर्गांत वैराग्य व समाधि यांच्या पटुत्वामुळें सर्वतः विषयांनीं अक्षुभित होणारा संन्यासी झाला. त्या भिक्षूनें स्थिर पद्मासन घातलें व स्थूल देहाच्या हस्तपादादि व सूक्ष्म देहाच्या प्राणेंद्रियादि अवयवाचा निरोध करून आणि बाहेर देवतादि विषयांत मन स्थिर करून तो भिक्षु जेव्हां जी मानसपूजादिलीलाही रम्य आहे अशा भावनेनें आरभतो तेव्हां तो त्याच लीलेचा अभ्यासानें अनुभव घेतो. त्यावेळीं त्याच्या दुसऱ्या सर्व भावांचा विरोध होतो. तो ज्या लीलेचा अनुभव घेतो तिला सोडून दुसऱ्या कोणत्याही विषयाविषयीं त्याच्या मननाचा उदय होत नाहीं. चित्तामध्यें जी चमत्कृति रूढ होते तीच बाहेर विकास पावते. मागून रूढ झालेली चमत्कृति पूर्वी रूढ झालेल्या चमत्कृतीचा नाश करते. वसंत ऋतूंत प्यालेलें जल ग्रीष्म ऋतूंत वेल बाहेर टाकून देऊन सुकते हें प्रसिद्धच आहे. तो भिक्षु जरी शास्त्रदृष्टि होता तरी लीलेनेंच त्याची अनादि वासना प्रबळ झाल्यामुळें जीवट या नांवाचा पामर जीव बनला आणि भूच्छिद्रांतून मुंगी जशी फिरते त्याप्रमाणें तो निरनिराळ्या योनींत भ्रमण करीत राहिला. तो ब्राम्हणांचा भक्त असल्यामुळें प्रथम आपल्याला ब्राह्मणच पाहता झाला; कारण अद्‌भूत झालेल्या व उद्‌भूत न झालेल्या संस्कारांचा विपर्यास व्हावयाचा असला म्हणजे अभ्यासपाटवादि कारणानीं जो वासनासमूह बलवान् झालेला असतो तोच प्रथम उद्भवतो व दुसरा गुप्त होतो. नंतर तो ब्राह्मण सतत चिंतनानेंच मांडलिक राजा झाला. वृक्ष जो रस एकसारखा पितो त्याचेंच पुढें फळ बनते. राज्यासाठीं त्यानें धर्मकार्यें केलीं व त्यामुळें तो सम्राट् झाला. तो राजा कामुकत्वामुळें अप्सरा बनला. त्या अप्सरेला हरिणीच्या नेत्रांचा लोभ सुटला, त्यामुळें ती चंचल व रसशालिनी हरिणी झाली. खरोखर प्राण्यांच्या ठिकाणीं वासनामोह त्यांच्या दुःखासाठींच होत असतो. त्या हरिणीच्या मनात अरण्यांतील वेलीचेच संस्कार दृढ झाले. व त्यांच्या अनुसार ती वेल बनली. वेलीच्या अवश्य होणाऱ्या छेदाचा तिनें अनुभव घेतला. आंतल्या आंत तिला तिच्या अंगावर फिरणाऱ्या भ्रमराचा दृढ परिचय झाला होता, त्यामुळें छेदनाच्या योगानें तिचा नाश झाला असतां त्याच वासनेनें वासनामुक्त झालेल्या ती भ्रमर झाली. त्या भ्रमराला हत्तीच्या पायाखालीं आपल्या शरीराचें चूर्ण होण्याचा अनुभव आला. त्यानंतर त्यानें वारंवार भावना करून हत्ती, भ्रमर, हंस, इत्यादि अनेक जन्म घेतले. अनेक मोठमोठ्या संसारसंभ्रमांचा त्यानें अनुभव घेतला आणि आतां हा मी तोच भिक्षु या शंभराव्या जन्मांत रुद्र होऊन राहिलों आहें. केवळ स्वतःच्या मनाचा संभ्रम अशा या संसारचक्रांत, अशा या अत्यंत विचित्र अनेक संसारारण्यभूमींत मीं अतिशय भ्रमण केलें, वस्तुतः त्या भूमि शून्य असतांना मला अशून्यशा - सत्यशा भासल्या एका सृष्टींत मी जीवट या नांवाचा झालों; दुसऱ्या जन्मांत ब्राह्मणश्रेष्ठ झालों, एका

जन्मांत पृथ्वीपति झालों. कमलवनांत हंस झालों. विंध्यपर्वतांतील खोऱ्यांत गज व हरिण झालों. याप्रमाणें मी या देहयंत्रांत व मनोयंत्रांत या दशेस प्राप्त झालों आहें. प्रथमसर्गकालापासूनच चिदेकरसरूप परमपदापासून प्रच्युत झालेल्या माझीं या संसारांत हजारों वर्षें, अनेक चतुर्युगें, व असंख्य दिन-ऋतुचर्या निघून गेल्या आहेत. भिक्षु झाल्यावर तत्त्वज्ञानी होण्यासाठीं जो श्रवण-मननादि-अभ्यासरूप योग्यताक्रम कर्तव्य असतो तो जरी केला व चांगला रूढ झाला होता तरी प्रमादानें त्याचें उल्लंघन करून पुनः पुनः जन्ममरणपरंपरेनें ब्रह्मदेवाच्या हंसत्वास मी प्राप्त झालों व शेवटीं रुद्राचा संगम होतांच तोच माझा प्राक्तन अभ्यासक्रम तत्त्वज्ञानफलानें फलित झाला. यावरून शास्त्रीय साधनाभ्यास श्रेष्ठ आहे. कारण तो अभ्यास केल्यावर भावनादोषामुळें मध्यें अनेक विरुद्ध जन्म जरी झाले तरी तो पुनः अनुकूल जन्म मिळतांच उद्भूत होऊन पुरुषार्थ साधून देतो. जीवानें केलेला दृढ अभ्यास केव्हांही फुकट जात नाहीं. पुण्यवान् जीवाला अकस्मात् साधुसमागम घडतो व त्याचे पूर्वसंस्कार निर्विघ्नपणें आपलें शुभकार्य करूं शकतात. अशुभ वासनांना मात्र हा न्याय लागू नाहीं. तर जीवाचा अशुभवासनाभ्यास निवृत्त होतो, तथापि दुर्वासनांचा त्याग करण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषाचा हा प्राक्तन वासनाभ्यास कालान्तरीं उदय पावण्यास सत्पुरुषाचा समागम व प्रयत्न यांची अपेक्षा करतो; आणि तो यत्न अनेक जन्मांत सतत केला असतांच सद्वासनाच्या दृढतेनें दुर्वासनांचा क्षय करण्यास समर्थ होतो. मिथ्या देवतादिकांची उपासना करणें, इत्यादिरूप प्रयत्नही जर जाग्रत् व स्वप्न कालांतील सत्य अनुभावास योग्य असें देवताभावादि फळ देण्यास समर्थ होतो, तर परमार्थवस्तुविषयक श्रवणादि प्रयत्न परमार्थ सत्य स्वभावप्राप्ति हें फळ देऊं शकेल हें काय सांगावें ? म्हणूनच अनात्मविषयींचा शास्त्रीय भावनाभ्यासही त्या त्या उपास्यदेवतेचें शरीर, तिचा भोग इत्यादि प्राप्त होणें, या व्यवहारास जरी समर्थ असला तरी दुःखमिश्रित सुखालाच कारण होतो. यास्तव तसल्या अनात्मविषयचिंतनाचा त्याग करणें हाच जय आहे. जसा अंकूर मिथ्या विस्तारयुक्त गुल्मस्वरूपास पाहतो त्याप्रमाणे भावनाच आपल्या आत्म्याला हा देह असें पाहते. पण तत्त्वदृष्टच्या त्या भावनेचें निरीक्षण केलें असतां कांहीं अवशिष्ट राहत नाहीं. ती वस्तुतः जर नाहींच तर तिचा उच्छेद तरी काय करावयाचा आहे ? यास्तव आम्हांला या भ्रमाची कांहीं गरज नाहीं. आकाशाच्या वर्णाप्रमाणें उत्पन्न झालेल्या या जगद्रूपी भ्रमाचें केवल असंवेदनच आम्हांला होवो. त्यांचें चिंतन न केल्यानेंच त्याचें परिमार्जन होईल. किंवा तो भ्रम आपल्या प्रत्ययाला जरी आला तरी काय हानि आहे ? जगदाकारभावना अधिष्ठान स्वरूप आहे, ? असें पाहिले म्हणजे ती कौतुकालाच कारण होते; ती प्रातिभासिक सत्तेनें युक्त आहे, असें कळल्यावर कांहींच अनर्थ करण्यास समर्थ होत नाहीं. म्हणून कौतुकानेंच मी उठून जाऊन ज्ञानाचें सम्यग्दान करून त्या उपाधींपासून आत्म्याला अगदीं पृथक् व एकरूप करतों.

असा विचार करून तो रुद्र जेथें गुहेंत भिक्षु गाढ झोंप लागून शवासारखा पडला होता त्या मार्गास गेला. त्या भिक्षूला जागें करून स्वतःच्या चित्तत्वाचा अंश अंशा चित्तानें व स्वांशभूत--चिदाभासरूप चेतनानें व तत्वज्ञ जीवानें युक्त केलें त्याबरोबर भिक्षूला आपल्या स्वरूपाचें भान झालें व त्याला आ-

पला भ्रम कळला, मी रुद्र आहें, व त्याचप्रमाणें जीवटादिमय आहें, पाहून तो भिक्षु तत्त्वज्ञानामुळें वस्तुतः जरी विस्मय करण्यास योग्य नव्हता तरी विस्मित झाला. त्यानंतर रुद्र व तसाच तो भिक्षु असे ते दोघे उठून कोठें चिदाकाशाच्या एका कोपऱ्यांत असलेल्या जीवटाच्या संसारात गेले. त्या जीवटाच्या दुसऱ्या ब्रह्मांडातील त्या भुवनांत, त्या द्वीपांत, त्या देशांत व त्यांतील त्याला त्या नगरांत व त्या नगरींतील त्याच्या गृहांत जाऊन ज्यानें हातांत तरवार धरली आहे, अशा शवाप्रमाणें निःसंज्ञ—निश्चेष्ट पडलेल्या जीवटास त्यांनीं पाहिलें, भिक्षु व रुद्र यांनीं त्या जीवटाच्या संसारभूमींत आपला सर्व प्रभाव गुप्त ठेवला होता, त्यामुळें ते दोघे तेथें कोणाला दिसले नाहींत. असो; त्याला बोध करण्याच्या इच्छेनें गेलेल्या रुद्रानें पूर्वीप्रमाणेंच आपल्या चित्तानें व चिदाभासानें त्याला संयुक्त केलें. तेव्हां रुद्र, भिक्षु व जीवट हे शरीरांनीं जरी त्रिरूप होते तरी आंतून एकरूप झाले. ते ज्ञानीअसूनही अज्ञ असल्यासारखे, विस्मित झालेले असूनही विस्मित न झाल्यासारखे चित्राप्रमाणें एक क्षणभर अगदीं गप्चुप राहिले. त्यानंतर ते सर्व आकाशांतील काण्याएका प्रदेशीं असलेल्या जीवटाच्या चित्तापासून परिणत झालेल्या ब्राम्हणाच्या संसारास गेले. तो संसार चोहोंकडून निरनिराळे शब्द करणाऱ्या प्राण्यांनीं व्यापला होता असो; ते त्या भूलोकास, त्या द्वीपास, त्यांतील त्या देशास, त्यांतील ग्रामास व त्या ग्रामांतील त्या ब्राम्हणाच्या गृहास प्राप्त झाले त्यांत त्यांना स्त्रीसहवर्तमान शयन केलेल्या ब्राह्मणास पाहिलें. ब्राम्हणीनें त्याच्या गळ्यांत हात घातला होता व तो तिला बहिश्वर प्राणासारखा प्रिय होता, त्याला जागे करून रुद्रानें आपल्या चित्तानें व चिदाभासानें संयुक्त केलें. तेव्हां त्यांना व इतरांनाही विस्मय वाटला व विस्मय वाटलाही नाहीं. त्यानंतर ते चौघेही चिदाकाशपूर्ण व चितीपासूनच विकास पावलेल्या मांडलिक राजाच्या संसारास गेले. तो संसार अनेक भ्रमांच्या विस्तारांनीं सुंदर झाला होता. तो मांडलिक राजा मत्त होऊन पर्यंकरूप कमलावर निजला होता. तो स्वतः गौरवर्ण असून गौरांगीनें त्याला हृदयाशीं घट्ट आलिंगन दिलें होतें, त्यामुळें कमलकोशांत भ्रमरीसह निजलेल्या भ्रमराप्रमाणें तो दिसत होता. सुंदर मंजरींनीं आच्छादित झालेल्या वृक्षाप्रमाणें तो अनेक कांतांनीं परिवेष्टित झाला होता. रत्नांच्या समूहांतील सुवर्णाप्रमाणें तो अनेक दीपांच्या समूहामध्यें निजला होता. त्याला जागें करून तत्काळ रुद्रानें आपल्या चित्तानें व चिदाभासानें त्याला संयुक्त केलें.ते बाह्यतः जरी अनेक होते तरी आंतून एक होते.ते विस्मययुक्त व विस्मयरहित होते.त्यानंतर ते सर्व सम्राट राज्याच्या संसारास गेले. तेथें त्याला जागें करून रुद्रानें आपल्या चित्तादिकांनीं युक्त केलें. तसेच ते सर्व आपल्या आतिवाहिक शरीरानें दुसऱ्या जगांतल्या संसारभूमींतही गेले, त्यामुळें ते सर्व त्या ब्रम्हदेवाच्या हंसानें इच्छिलेल्या त्या रुद्रतेस प्राप्त होऊन एक शत रुद्र झाले, व एकत्र जमलेले ते सर्व फारच शोभले. त्या सर्वांचें ज्ञान एकरूप होतें, पण शरीरें वेगळीं होती. त्या परमेश्वराचें रूप जरी वस्तुतः एकरूप होतें तरी अनेककार दिसत होतें. ते विचित्र कर्मांनीं परिवेष्टित झालेलें होते. तें शंभर रुद्र आवरणशून्य चिन्मय होते. तें रूप सर्व संसाराचें आधारभूत आहे आणि सर्व जगांत अन्तर्यामित्वानें स्थित आहे. हे रामा! येथें अत्यंत प्रभावशाली सहस्रावधि रुद्र आहेत हल्लीं जो हा आपला संसार आहे तो वर वर्णन केलेल्या रुद्रांतील अकराव्या भ्रमररुद्राचा आहे. ' भिक्षूचे सर्वच स्वप्नसंसार सर्वांच्या

अनुभवास कां येत नाहींत' म्हणून विचारशील तर सांगतों. वर सांगितल्या प्रकारचा जीवाचा जो जो संसार सर्वतः उदय पावतो त्या प्रत्येकांस तत्त्वज्ञानरहित असलेले जीवसंघ परस्परांस पाहू शकत नाहींत. पण सागरांतील तरंगाप्रमाणें तत्त्ववेत्ते मनानें त्या जीवांशीं मिळतात व त्यामुळें ते सर्व पाहतात आणि जे अप्रबुद्ध असतात ते तन्मात्रनिष्ठ होऊन मातीच्या ढेंकळाप्रमाणें स्थित होतात. जसें तरगांतील जल द्रवत्वामुळें एकमेकांशी अगदीं मिळून जातें त्याप्रमाणें ज्ञानी जीवसमूह चित्त्वामुळें एकमेकांशीं अगदीं मिळून जातात प्रत्येक जीवाचा निरनिराळा संसार उदय पावला असतां त्यांत असलेल्या या सर्व जीवरांशी चिद्धातु—ब्रह्म सर्वव्यापी असल्यामुळें वस्तुतः असत्य असूनही सत्य असल्याप्रमाणें स्थित आहेत. भूमीचा जो जा भाग खणावा तें तें जसें आकाश आहे, त्याप्रमाणें सर्वगामिनी चितीहून जें जें असत्य समजून दूर केलें जातें तें तें आकाशाप्रमाणें चित्च अवशिष्ट राहते. हे सर्व विशेष व त्यांनीं युक्त अशीं हीं पंच भूतें जशीं तूं सर्वत्र अनुभवीत आहेस तसेंच सर्व ठिकाणीं हें सर्व भूतात्मभूत चित्त्वच आहे, त्याचा अनुभव घे तें सर्वगत कसें आहे. व त्याच्याच ठिकाणीं या सर्वांची कल्पना कशी झाली आहे, म्हणून जर म्हणशील तर सांगतो—ज्याप्रमाणें वृक्षावर-काष्ठावर किंवा शिळास्तंभावर तासून किंवा टांकीनें शिल्पीजनांनीं त्यावर कोरावयाच्या प्रतिमेच्या अनुसार छिद्रें करून पुरुष-हत्ती-घोडा इत्यादि आकार निर्माण केलें असतां तेच विचित्र आकार दिसतात, त्याप्रमाणें एकरूप सद्रूप सर्वाकार ब्रह्म दिसतें व त्या चिद्रूपामध्यें हें जगतही तचेंस स्थित असलेलें दिसतें. निर्विषय, पर शुद्ध तत्त्वामध्यें जें विषयत्वमासिरूप विपरीत ज्ञान तेंच 'जगत्' या परिच्छेदाचें निमित्त आहे. चिद्रस ब्रह्म मध्यें जें जगदाकार, जाड्य आहे तें कांहीं निमित्तावांचूनच आकाशांतील शून्यत्वाप्रमाणें स्थित आहे. अर्थात् त्याला तसें जाणणें हाच याचा दृश्यबंध व ब्रह्माला जगदाकारानें न पाहणें हाच मोक्ष आहे. यास्तव रामा! यापैकीं तुला जें योग्य दिसत असेल तेंच सत्वर दृढ कर. सर्ग व असर्ग, बंध व मोक्ष हे वेदना वेदनरूप आहेत; ते दोन्ही त्या उभयतांच्या साक्षीहून निराळे नाहींत; यास्तव आतां तुझी जशी इच्छा असेल तसें कर. नुसत्या अदर्शनानेंच जो नाहींसा होणारा अनर्थ त्याच्या नाशाला आयास ते काय होणार! आणि नुसत्या प्राप्त होणारें सुख, तें प्राप्तच आहे. त्याच्यासाठीं आयास करावयास नकोत. ज्याचें स्वरूप केवल संकल्पमात्र असतें त्याचा संकल्पत्यागानेंच क्षय होतो, जगाच्या ज्ञानचर्चा जें ज्ञान--साक्षिचैतन्य तें प्राप्तच आहे; यास्तव जें इष्ट वाटेल तेंच करावें. हे रघुनन्दना! तरंग । जसा जलाचा स्पंद आहे तसाच जगत् हा चितींतील स्पंद आहे, याच्यांत भेद हा एवढाच आहे, त्याचप्रमाणें दृष्टान्त व दार्ष्टान्तिक यांत एवढेंच वैलक्षण्य आहे. म्हणजे देश-कालस्वरूपादिकांची सिद्धि झाली असता जलांत तरंगता वगैरे उदय पावते व जगाच्या विवर्तोपादानभूत ब्रह्मामध्यें देशादि पूर्वी नसतांनाच मागाहून आरोपिले जातात व कार्यभूत जगत्कोटींतच पाहिले जातात. जें स्वप्रकाश आत्मरूप चैतन्य तेंच अविद्यावरणामुळें किंचित् प्रकाशमान असल्यासारखें झालेलें त्रिजगत् असें स्वरूपाला सोडून भासतें; पण त्या चिद्रूपाचें पारमार्थिक स्वरूप ज्ञानच आहे, जड नव्हे. यास्तव या सर्व दृश्याच्या कारणाकडे दृष्टि देऊन या भेदयुक्त त्रिभुवनाचा उपसंहार कर, म्हणजे तें केवळ वाङ्मात्र स्थित होईल,

पण परमात्मा शिव अनिर्वाच्य आहे, त्याच्या ठिकाणीं वाणीचाही व्यवहार होऊं शकत नाहीं. याप्रमाणें आत्मचैतन्य व जगत् हे दोन्ही शब्द व अर्थ अभिन्न झाले; त्यांच्यामध्यें भेद केव्हांच होणें शक्य नाहीं. कारण पाणी व लाटा हे दोन तत्त्वतः भिन्न पदार्थ आहेत, असें म्हणणें उचित नाहीं; पण त्याच्या स्वरूपाचें ज्ञान जेव्हां नसतें तेव्हां हेंच--जगद्भेदच युक्त आहे, ज्ञानावस्थेंत तो युक्त नाहीं.

---

# सर्ग ६४.

—:*:—

१. जीवटाच्या निरनिराळया देहांनीं घेतलेला बाकीचा भोग. २. रुद्रगणत्वाची प्राप्ति. ३. सकल्पस्थिरतेचा क्रम.

**श्रीरामः**—हे मुनीश्वरा! त्या भिक्षूच्या जीवट-ब्राम्हणादि व हंसादि स्वप्नशरीरांचें त्यानंतर काय झालें?

**श्रीवशिष्ठः**—ते सर्वही रुद्रांशीं मिळून जाऊन ज्ञानी झाले. त्या रुद्रांशांनीं परस्पराचे पूर्वोत्तर संसार पाहिले आणि कृतकृत्य झाल्यामुळें ते सुखी होऊन राहिले. तें सर्व कौतुक पाहण्यासाठीं प्रथम प्रवृत्त झालेल्या रुद्रानें त्या पूर्वोक्त सर्व मायेला—जिवटादिकांच्या संसारस्थितीला पाहून पुनः त्या आपल्या अंशाना त्याच संसारस्थितीस पाठविलें.

**श्रीरुद्रः**—तुम्ही आतां सत्वर आपापल्य स्थानीं जा. तेथें आपापल्या कुटुंबासह कांहीं काल भोग भोगून माझ्यापाशीं याल व मंदरा, माझे गण व माझ्या नगराचीं भूषणें व्हाल. त्यानंतर महाप्रलय झाला असतां आपण सर्व त्या परमपदास प्राप्त होऊं.

**श्रीवशिष्ठः**—तो भगवान् रुद्र असें बोलून अन्तर्धान पावला. त्यावेळीं त्या सर्व रुद्रांतील अंत्य रुद्रसंसाराचें जें साक्षिचैतन्य होते तें, स्वप्नसाक्षी जसा जागरास प्राप्त होतो त्याप्रमाणें जीवटादि प्रत्येक त्या संसारास प्राप्त झाले. ते जीवट-ब्राह्मणादिकही आपापल्या स्थानीं गेले. आतां ते आपआपल्य कुटुंबांबरोबर कांहींकाल संसार करून देहत्याग करतील आणि रुद्रलोकास प्राप्त होऊन उत्तम गण होतील. एकादेवेळीं ते आकाशांत तारकांच्या आकारानेंहि दिसतील.

**श्रीरामः**—भिक्षूच्या संकल्परूप असे ते जीवट-ब्राम्हणादिक सत्यत्वास कसे प्राप्त झाले? संकल्पजन्य पदार्थांत सत्यता कोठची?

**श्रीवशिष्ठः**—संकल्पांतील अधिष्ठानचिदंशामध्येंच सत्यता असते. यास्तव अध्यस्त अंशांतील संकल्पाची सत्यता तूं विवेकानें टाक. संकल्पित अर्थ सत् व असत् अशा दोन अशांनीं युक्त असतो. त्यांतील जें रूप पूर्व व उत्तर कालीं नसतें तेंच असत् होय. ते नाहीं. पण त्याचें अधिष्ठान जें सत् तें ज्याअर्थी सर्वात्मरूप आहे त्याअर्थीं ते आहेच. त्याच्या सत्तेनेंच जीवाच्या अदृष्टानुसार पदर्थ उत्पन्न होतात व त्याच्या सत्तेनेंच ते जरी कल्पित असले तरी व्यवहार करण्यास समर्थ होतात. जें स्वस्वप्नांत दिसतें व जें संकल्पानें पाहिलें जातें तें त्रिकालीं असणारें जे सत अधिष्ठान तद्रूप होऊन तद्देशकालरूपानें त्यांत सदा असतें. ज्याप्रमाणें मथुरादि देशांतून निराळा असलेला जो पाटलिपुत्रादि देश तो तेथें जरी विद्यमान असला तरी गमन करणें, मन व चक्षुरादि इंद्रियें यांचें पटुत्व, दिवस वगैरे काल इत्यादि कारणसमूहावांचून प्राप्त होत नाहीं त्याप्रमाणें स्वप्नही जाग्रत् व सुषुप्ति यांच्या मध्यावस्थेवांचून प्राप्त होत नाहीं. चितच्या कोशासारख्या सर्व वासनांच्या आधारभूत अज्ञानात सर्व आहे. यांत हा जीव वासनांच्या उद्बोधानुसार जसें जसें पर्यालोचन करतो तशा तशा समग्र विष

यत्वास चित् प्राप्त होते. वासनानुसार तिला दृश्य भासूं लागतें, कारण ती सर्वात्मक आहे, स्वप्नांतील संकल्प ज्या दशेनें प्राप्त होतो ती दशा मीं सांगतों ऐक. अत्यंत अभ्यास व योग यांच्या परिपाकावांचून संकल्पित वस्तु प्राप्त होत नाहीं. पण ज्या ईश्वरांच्या योगविज्ञानदृष्टि सिद्ध झालेल्या आहेत ते शंकरादि सर्व सर्वत्र पाहतात. माझ्या पुढें असलेली ही वस्तु नुसत्या संकल्पानेंच मला मिळूं शकत नाहीं. कारण इष्ट वस्तूचा एकाग्र व अनन्य मतानें संकल्प केल्यासच ती मिळतें, कारण मनाचें ऐकाग्र्य नसल्यास तें अनेक विषयांमध्यें आसक्त होऊन उभयतोभ्रष्ट होतें; त्यामुळेच सत्यसंकल्प नाहींसें होतें. पण जो एकनिष्ठ असतो त्याचें सर्व अभिमत कार्य सिद्ध होतें; कारण जो दक्षिण दिशेकडे जावयास निघालेला त्याला उत्तर दिशा कशी प्राप्त होणार ? जे संकल्पित अर्थामध्यें अनन्यत्वानें तत्पर होतात त्यांना संकल्पार्थ प्राप्त होतो. पुढें दिसेल त्या पदार्थामध्यें जे आसक्त होतात त्यांना पुढें स्थित दिसलेला पदार्थ दिसतो मात्र, पण तो पुढें स्थित असलेला पदार्थ पूर्वींच बुद्धीमध्यें स्थित असलेला पदार्थ या दोघांनाही प्राप्त होण्याची जो इच्छा करतो त्याचें मन एकनिष्ठ नसल्यामुळें तो आपल्या उभय संकल्पानें त्या दोघाचाही नाश करतो. भिक्षूचा जीव एकनिष्ठ होता. म्हणून तो रुद्रत्वास सर्व प्रकारें प्राप्त झाला व प्रसिद्ध रुद्राप्रमाणेंच सर्वज्ञ होऊन राहिलेल्या त्याने सर्व त्याच्या प्रमाणेंच संपादन केलें. पण भिक्षु व शेवटचा रुद्र यांच्या मधील जे अठ्याण्णव जीवटादिक भिक्षुसंकल्पि जीव त्यांतील प्रत्येकजण ज्याअर्थी निरनिराळा होता व त्यांतील प्रत्येकाचें जगतूही पृथक् पृथक् होतें त्याअर्थी रुद्राला जें ज्ञान होतें, तें त्यांना नसल्यामुळें ते एकमेकांस पहात नव्हते; त्यामुळें ते अप्रबुद्ध जीव होते. रुद्राच्या इच्छेनेंच त्यांनीं परस्परांचा निरनिराळा संसार पाहिला आणि त्याच्या इच्छेनेंच ते या जगांत रुद्ररूप व बहुरूप होतात. पण त्यांनील प्रत्येकाला जो निरनिराळा संसार दिसतो त्याचें कारण त्यांतील प्रत्येकाची इच्छा, मी येथ विद्याधर होईन, मी येथें पंडित होईन, असें एकच ध्यान केलें असतां त्यांचें साफल्य होतें. अन्य जीवांचीही क्रिया अशीच सिद्ध होते, याविषयीं भिक्षूचा संकल्पसर्ग हाच दृष्टान्त आहे. हा जीव धारणा, ध्यान इत्यादि यत्नाच्या अनुसार स्वतःला इष्ट असलेलें सर्व म्हणजे एकत्व, बहुत्व, मूर्खत्व, पांडित्य, देवत्व, मानुषत्व इत्यादि देश,काल,क्रिया यांच्या क्रमानें किंवा एकाच वेळीं करण्यास समर्थ आहे. कारण हा जीव वस्तुतः अनन्त आहे, त्यामुळें त्याला सर्वशक्ति आहेत; आणि ज्याअर्थी हा एकैक देहाभिमानलक्षण अनन्त परिच्छेदानें युक्त झाला आहे त्यामुळें याला एका कार्यमात्राची शक्ति आहे, व त्या शक्तीच्या स्वभावानुसार याचा तें तें कार्य करण्याचा स्वभावही नियत आहे. म्हणूनच प्राण्यांच्या कर्मानुसार स्वर्ग-नरकादि अनेक अनर्थरूप सर्गाच्या आकारान विकास पावणारा व सर्व प्राण्यांच्या संहारानें प्रलयरूपानें संकोच पावणारा जगदीश्वर हिंसाप्रयुक्त वैषम्यनैर्घृण्यदोषरहित आहे. कारण हा सर्व जीवसंघ स्वतः जें इच्छितो तेंच त्याला त्याच्या इच्छेच्या अनुसार ईश्वराच्या संकल्पामुळें प्राप्त होतें.त्यामुळें ईश्वर कोणाचेंच कांहीं अनिष्ट करीत नाहीं तो देश, काल इत्यादिकांच्या अनुसार प्राण्यांवर अनुग्रह करणें व त्यांचा निग्रह करणें, एतद्रूप क्रीडादिकांच्या आधिकारिक क्रियाक्रमांनीं प्राणी जें ज इच्छितात व जसा जसा यत्न करितात तसच तो करतो.योगिनी स्त्रिया व योगी येथे स्वगृहांत किंवा जेथें इच्छितात तेथें नानादेहादिकांच्या कल्पनेनें राहतात.

ते या लोकीं किंवा परलोकीं एकाच वेळां प्रारब्धभोगानें राहतात, अशा प्रकारचें योगिचरित्र अनेक वेळां अनुभवास आलेलें आहे कार्तवीर्य सहस्रार्जुन आपल्या घरांत असतांनाच चोरादि पापी जनांना पाप करताना पुढें दिसत असे व त्यांना भीति दाखवून त्याचें शासन करीत असे. विष्णु क्षीरसागरात असतांनाच भूलोकीं अवतार घेऊन धर्मरक्षणादि व्यवहार करतो. योगिनी स्वर्गलोकीं योगिनींच्या समुदायात असतांनाच भूलोकीं पशु पेय इत्यादि आणावयास जातात. इंद्र स्वर्गातील आपल्या स्थानावर बसलेला असतांनाच यज्ञांतील हविर्भाग घेण्यासाठीं भूलोकीं यज्ञमंडपांत जातो जनार्दन या रामावतारात जनस्थानांत राक्षसाना मारण्यासाठीं सहस्र आकारांचा होऊन पुनः एक होतो. भक्तानीं नमस्कारादिकांनीं प्रार्थना केल्यामुळें तो शेंकडों भक्तावर अनुग्रह करण्यासाठीं पुनः यदुकुलांत मनुष्य होतो व कौरवांच्या सभेंत दुर्योधनादिकांना मोह पाडण्यासाठीं सहस्ररूप होतो. तो अंशावतार घेतलेल्या देवादिकांशीं क्रीडा करून जगाची स्थिती करतो. तो एकटाच एकाच वेळीं सोळा सहस्र कांतांचा उपभोग घेतो. तो कसा? निमेषाप्रमाणें. जसा निमिराजर्षि विदेहतेस प्राप्त होऊन सर्व प्राणांच्या नेत्रांत राहतो व एकाच वेळीं सर्वांच्या नेत्रांची उघडझांप करतो. या प्रमाणें ते भिक्षूच्या संकल्पामुळें झालेले जीवटब्राह्मणादिक रुद्राच्या अनुज्ञेनें आपापल्या संकल्पपुरीस गेले. तेथें ते चिरकाल भोग भोगून व त्यानंतर रुद्रपुरास जाऊन रुद्रगण होत्सात सर्व उपकरणांसह राहतील. ते गण त्यावेळीं ज्यानां बहुरत्नस्तबक आहेत अशा प्रफुल्लित नवकल्पलतागृहात त्याचप्रमाणें नानाप्रकारच्या भुवनांत, कल्याणरूप कैलास-वैकुंठ-ब्रह्मलोक इत्यादि पुरांत व नगरांत रुद्रासहवर्तमान विहार करणारे असे होत्साते गीत-वाद्य-नाट्य इत्यादिकांत कुशल असलेल्या विद्याधरींमध्यें अमरांना वंद्य होऊन राहिले.

१ सहस्रार्जुनाला दत्तात्रेयाच्या प्रसादामुळें हें सामर्थ्य प्राप्त झालें होतें, असें मार्कंडेय पुराणात वर्णन आहे

स्वप्नशतरुद्रीय आख्यान समाप्त.

---

# सर्ग ६५

—:०:—

१ भिक्षूचाच न्याय सर्व जीवांना लागू आहे. २ सभेचें विसर्जन.

श्रीवसिष्ठः—त्या भिक्षूनें वर सांगितल्या प्रमाणें आपल्या चित्तात जो भ्रम थोडासा आणला, तोत्याचा प्राक्तन शुभाशुभ लक्षण प्रयत्न बनला, व त्यालाच फलावस्थेंत आपल्याहून पथक्रूपें करून त्यानें पाहिलें. सर्व आभासमय जीवाची मरण-जन्ममय स्थिति जरी आकृतीला प्राप्त झाली तरी चिदाकाश रूपिणीच होते. प्रत्येक जीव याच न्यायानें आपल्या संसाराला पृथक करून त्याच्याशीं ऐक्य पावतो. मेलला प्रत्येक जीव मरणसमयीं उद्बुद्ध झालेलें स्वकर्मच स्वप्नाप्रमाणें जगद्रूपानें मोक्षापर्यंत पाहतो. याप्रमाणें आत्मा वस्तुतः जरी सर्व व्यापक असला तरी होईपर्यंत आकुल होऊन राहतो. रामा! या भिक्षूच्या कथेनें मी तुला जीवसमुदायच सांगितला आहे. परिपूर्ण ब्रह्मस्वरूपापासून प्रस्पंदितरूप झालेला सर्व जीव हा असाच आहे, केवळ भिक्षुच असा आहे, असें नाहीं. ज्याप्रमाणें पर्वताच्या शिखरावरून घसरलेला दगड खालीं खालींच जातो त्याप्रमाणें जीव प्रत्यहीं एका मोहापासून दुसऱ्या मोहांत, दुसऱ्यापासून

तिसऱ्यांत असा जात रहातो, हें आम्हांला प्रत्यक्ष माहीत आहे. परमात्म्यापासून परिभ्रष्ट झालेला हा जीव या दृढ स्वप्नास पाहतो, व या स्वप्नांतून पुनः दुसऱ्या स्वप्नास प्राप्त होतो. याप्रमाणें एका स्वप्नांतून दुसऱ्या स्वप्नांत धांवणारा व मायेनें जर्जर केलेला हा जीव हें जन्मादि दुःख वस्तुतः खोटेंच असतांना खरें असल्याप्रमाणें कोठें तरी कोणत्या तरी निमित्तानें केव्हां तरी पाहतो. देहाला अहं असें समजणें हाच बंध व त्याला साक्षि-चिदात्मा जाणणें, त्याचें स्वरूपावस्थान, हाच मोक्ष आहे.

श्रीरामः—अहाहा! खरोखर या जीवाला हा अत्यंत कठिण मोह पडतो. मद, श्रम इत्यादि अल्पशा निमित्तानेंही निजलेल्या पुरुषाला नाना प्रकारचे विकार करण्याऱ्या व मिथ्या अज्ञानानें उग्र झालेल्या रात्रीसारख्या मनःस्वाप्नमायेनें जसें अत्यंत भयंकर दुःखसंकट भासावें व तें जसें त्याला सत्यसें किंवा आपलेंचसें वाटावें तसेंच हें महदाश्चर्य आहे. भगवन्! या जगात्स्थितींत सर्व सर्वत्र सर्वदा संभवतें, असें जें आपण म्हटलेंत तेंही माझ्या प्रत्ययाला आलें आहे. पण भगवन्! आपण जशा गुणांनीं विशिष्ट असा तो जीवटादि मोहरूप भिक्षु मला सांगितलात तसा तो कोठें खरोखरच आहे, कीं माझ्या बोधासाठीं आपण कल्पून तो सांगितला, तें अंतर्योगानें पाहून मला सांगा.

श्रीवसिष्ठः—तुझ्या बोधासाठीं मीं जरी त्याची कल्पनाच केली होती, तरी माझें वाक्य अन्यथा होणें शक्य नसल्यामुळें तसा भिक्षु कोठें तरी अवश्य असेलच. पण आतांच येथें योगदृष्टीनें पाहूं लागल्यास विलंब लागेल. म्हणून मी आज रात्रीं समाधींत स्थित होऊन या त्रैलोक्यरूपी गृहांत तसा भिक्षु आहे कीं नाहीं तें पाहून तुला उद्यां सकाळीं सांगेन.

श्रीवाल्मीकिः—वसिष्ठमुनि असें जों बोलत आहेत तों बाहेर प्रलयकालीं क्षुब्ध झालेल्या मेघांच्या गर्जनेप्रमाणें भयंकर मध्यान्हकाळचा नगारा वाजूं लागला. तेव्हां वायूनें हालविलेले वृक्ष जसा पुष्पांचा वर्षाव करितात त्याप्रमाणें पौरजन व राजे वसिष्ठांच्या पायांवर पुष्पांची परंपरा सोडते झाले. मुनिश्रेष्ठांची पूजा करून, त्यानंतर सर्व सभा परस्परांस प्रणाम करून आपल्या आसनावरून उठली आणि आदल्यादिवशींच्या क्रमानेंच आकाशचर व भूचर आपापल्या निवासस्थानीं गेले. त्यांनीं आपापल्या धर्माप्रमाणें यथाशास्त्र आपला धर्म अनुष्ठिला व दिवसव्यापार केला. त्यानंतर त्या भूचर व नभश्चर लोकांनीं मुनींनें सांगितलेल्या शास्त्राचें चिन्तन करीत ती रात्र शास्त्रार्थानुसंधानसुखानें क्षणासारखी घालविली. पण रामानें विचारलेल्या प्रश्नाचें उत्तर ऐकण्याची उत्कंठा झाल्यामुळें त्यांना निद्रा आली नाहीं. म्हणून ती रात्र त्यांना कल्पासारखीही भासली. नंतर आकाशचर व भूचर भूतांचा संघ व ते सर्व जन रात्र घालवून प्रातःकाळीं आपापली कार्यपरंपरा संपवून दशरथाच्या सभेंत आले व पूर्व दिवसाप्रमाणेंच व्याख्यान ऐकावयास येईल अशा उचित रचनेनें सभेंत स्वस्थानीं बसले.

## सर्ग ६६ वा.

१. रात्रीं समाधींत भिक्षूचे व तशाच दुसऱ्या मुनींचें दर्शन झाले, असें वसिष्ठ सांगतात.

श्रीवाल्मीकिः—वसिष्ठमुनि व विश्वामित्रादि मुनि यांसह आकाशचारी सिद्धांचे ओघ आपापल्या स्थानीं बसले. त्यानंतर राजे व इतर श्रेष्ठ जन बसले. राम-लक्ष्मणादि राजपुत्र बसले. वारा शांत झाला असतां कमलिनी जशी शो

भते तशी ती सौम्य व निश्चल बसलेली सभा शोभूं लागली. नंतर रामाच्या प्रश्नाची अपेक्षा न करितांच मुनीश्वर बोलूं लागला. दयाळु साधु लोकांची इच्छा नसली तरी बलात्कारानें बोध करितात.

**श्रीवसिष्ठः**—हे राजन्! हे रघुकुलाकाशांतील चंद्रा रघुनंदना! मीं काल रात्रीं ज्ञानदृष्टीनें तो भिक्षु चिरकाल शोध करून शेवटीं पाहिला. त्या तसल्या भिक्षूला पाहण्यासाठीं ध्यानानें फार वेळ सात द्वीपांत, कुलपर्वतांत व बाकीच्या भूपृष्ठावरही हिंडलों. पण मला तो तसला भिक्षु कोठेंच मिळेना. कारण मनोराज्य बाहेर तसेंच दिसणार कसें? त्यानंतर पाहाटेस एक तृतीयांश रात्र राहिली असतां मी पुनरपि आपल्या बुद्धीनें, समुद्रकांठचा वारा समुद्रास जसा जातो, त्याप्रमाणें उत्तरदिशेंतील देशांचें पर्यालोचन केलें. त्या दिशेंत 'वल्मीक' या नांवाचा मोठा देश आहे. त्यांत 'विहार' म्हणून एक अनेक जनांचा आश्रयभूत प्रदेश आहे. त्यांतील स्वतःच्या कुटींत ज्याचे केंस पिंगट आहेत असा 'दीर्घदृश' या नांवाचा भिक्षु समाधि लावून बसलेला मला आढळला. अशा स्थितींत तो एकवीस रात्री बसला होता. त्याच्या घराला आंतून घट्ट आडणा लावलेला असून त्याच्या ध्यानाचा भंग होईल या भीतीनें त्या भिक्षूचे प्रिय भृत्यही घरांत शिरत नव्हते. त्या भिक्षूच्या विदेहकैवल्यासाठीं शेवटचा साक्षात्कार प्राप्त होण्याचा आजचाच दिवस नियत होता. कारण त्याच्या आयुष्याचें नियमन करणाऱ्या विधात्याची तशीच स्थिति ठरलेली होती. ध्याननिष्ठ होऊन राहिलेल्या त्याच्या एकवीस रात्री गेल्या. कोणा एका प्राचीन कल्पामध्यें मागें असा एक भिक्षु झाला. तो चित्तानें सहस्रावधि वर्षे स्थिर झाला होता. आतां या कल्पांत हा आज मीं पाहिला. पण असला तिसरा भिक्षु दिसेल म्हणून जगत्-कमलांत भ्रमराप्रमाणें भ्रमण करणाऱ्या मीं आपल्या चतुर चित्तानें पुष्कळ शोध केला. पण या सर्गांत तसला तिसरा भिक्षु मला मिळाला नाहीं. म्हणून मीं लीलेनें दुसरे सर्ग पाहिले. तेव्हां त्या चिदाकाशकोशांत असलेला तसला तिसरा भिक्षुही मला दिसला. म्हणजे त्या ब्रह्मांडांतील ब्रह्मदेवानें निर्माण केलेला भिक्षुही आहे. या भुवनक्रमासारखाच इतर भुवनांचा क्रम आहे. तात्पर्य, त्याच त्याच आकारानें अनेक पदार्थ या सृष्टिसंततींत असंख्य आहेत. ते पूर्वींहि होते व पुढेंही होतील. या सभेंतही जे मुनि व ब्राह्मण आहेत, तसेच दुसऱ्या दुसऱ्या ब्रह्मांडांतही अनेक मुनि व ब्राह्मण संभवतात. यांच्या आचारासारखाच त्यांचा आचार व यांच्या आकारासारखाच त्यांचा आकारही असणें शक्य आहे. हा नारद असाच पुनः दुसरा होईल. याच्यासारखेंच ज्यांचें ज्ञान व कर्म आहे, असे दुसरे अनेक जीव संभवतात व ते असेच होतील हेंही शक्य आहे. व्यास, शुक, शौनक, क्रतु, पुलह, अगस्त्य, पुलह, भृगु, आंगिरस इत्यादि मुनि अशाच जन्मादिकांच्या योगानें होतील. तेच ते किंवा दुसरे दुसरे अशा आकाराचे, अशाच क्रिया करणारे व असेच ज्ञानी दीर्घ दीर्घ कालानें होतील. कारण ही ईश्वराची माया सर्वत्र पसरलेली आहे. त्यामुळें तेच ते किंवा दुसरे दुसरे तशाच आचाराचे तसाच जन्म घेऊन उत्पन्न होतात. पाण्यांत त्याच त्या लाटा जशा पुनः पुनः उत्पन्न होतात, त्याप्रमाणें सृष्टींत तेच तेच आकार पुनः पुनः विवर्त पावतात. त्यांतील कित्येक अत्यंत सदृश असतात. कित्येक अर्धसदृश असतात, कित्येक किंचित् सदृश असतात, कित्येक अगदीं निराळ्या आकाराचे असतात. याप्रमाणें ही अति विस्तृत मोहिनी

मोठमोठ्यांनाही पडते. एका क्षणांत म्ह० अत्यंत सूक्ष्म कालांत मनाची चेष्टाही संभवत नाहीं. मग स्थूल शरीरादिकांची चेष्टा तर दूरच राहिली. अर्थात् ही सर्व भ्रांतिच विकास पावत आहे. हे निष्पापा! एकवीस रात्री कोठें व अनंत आकृति कोठें? आणि त्यांचा अनुभव कोठें? खरोखर मनोगति अतिशय भयंकर आहे. प्रातःकाळीं जलांत कमल जसें विकास पावतें, तसें हें सर्व प्रतिभासमात्र विकास पावलें आहे. कमलावरील भ्रमरांच्या कलहाप्रमाणें व जलाच्या कल्लोलांप्रमाणें या जगांत प्राण्यांचे कलह व कल्लोल सुरू आहेत. शुद्ध चिन्मयापासूनच हें अशुद्धिमत् सर्व संसारजाल, अग्नीच्या कणापासून इंधनाचें साह्य होतांच जशी ज्वाला निघते, त्याप्रमाणें उद्भवलें आहे. तात्पर्य, भिक्षूच्या मनांत जसा तसाच प्रत्येक जीवाच्या मनांत हा जगद्रूप प्रतिभासखंड उदय पावला आहे, व त्या त्या जीवखंडांतही दुसरा विचित्र सर्गखंड उदय पावला आहे. यास्तव मायादृष्टीनें त्याविषयीं अनास्थाच करणें योग्य आहे. पण ते प्राथमिक खंड व त्यांच्या आंतील दुसरे जगत्खंड आपापल्या व्यवहाराच्या दृष्टीनें मिथ्या नाहींत. तर ते सत्यच आहेत. कारण ते यां चिदेकरस सर्वात्म्यामध्यें तादात्म्यानें स्फुरण पावतात. त्यामुळें स्वतत्त्वबोधानें जगद्भावाचा त्याग केला असतां कांहीं सत्य रहात नाहीं.

## सर्ग ६७ वा.

१ समाधींत मुक्त झालेल्या भिक्षूचा देहनाश, २ भिक्षूच्या भ्रांतीप्रमाणेच इतराचा बंध व बोधानें मोक्ष, यांचें वर्णन.

**दशरथः**—हे मुनिश्रेष्ठा! मीं पाठविलेले हे नर तेथें जाऊन त्या भिक्षुला समाधींतून जागें करतील व कुटींत असलेल्या त्याला येथें शीघ्र आणतील.

**श्रीवसिष्ठः**—राजा! त्या महाभिक्षूचा तो देह प्राणरहित झाला आहे. प्राणांचा आधार जो अन्नरसभाग तो सुकून निस्तेज झाला आहे. त्यामुळें तो जीविताचें भाजन राहिला नाहीं. त्या भिक्षूचा हा जीव ब्रह्मदेवाचा सारस होऊन जीवन्मुक्तदशेंत स्थित आहे. त्यामुळें तो आतां पुनः संसाराचें पात्र होणार नाहीं. एक महिनाभर माझ्या घराचें दार उघडूं नका, असें सांगून ठेवलेले त्याचे भृत्य त्या गृहाचें रक्षण करीत आहेत. त्यामुळें तुझ्या लोकांना त्या घरांत जातांहि येणार नाहीं. एक महिन्यानंतर तें भिक्षूचें शरीर घरांतून बाहेर काढून तें जलांत बुडवून टाकतील व त्याच्या त्या कुटींत त्याच्याच आकाराचा दगडी पुतळा करून बसवितील व तो भक्तांच्या मनःकल्पित देवतारूपास प्राप्त होईल. याप्रमाणें तो भिक्षु या देहानें मुक्त होऊन राहिला आहे. तेव्हां प्राणचेष्टादि व्यवहार करण्यास असमर्थ असलेलें त्याचें शरीर पुनः सजीव कसें केलें जाईल? ही गुणमयी माया भ्रांतिपरंपरेला कारण होणाऱ्या विक्षेपशक्तीनें दुरुल्लंघ्य आहे. सत्य आत्म्याच्या ज्ञानानें तिचें सतत अनायासानें उल्लंघन करता येतें. सोन्याची जशी कटकता, तशी ती खोटीच—अविद्यमान असतांनाच तिनें जगाचा आरंभ केला आहे. प्रतिभासाचा जो विपर्यास त्याच एका कारणामुळें तिचा उदय झाला आहे. मृत्तिकाच सत्य आहे, घटादि विकार वाङ्मात्र आहे, इत्यादि दृष्टान्त-श्रुतिवाणीवरून दार्ष्टान्तिकभूत मायाही तशी मिथ्यास्वभावच आहे, असें अनुमान होतें. ती जलांतील तरंगपंक्तीप्रमाणें केवळ विचारानेंच विनाश पावणारी आहे. परमात्माच एका दृश्यमय दीर्घ स्वप्नामासून दुसऱ्या दीर्घ

स्वप्नास प्राप्त होतो आणि अशा अविवेकानेंच जीवत्वास प्राप्त होतो. पण विवेकामुळें तो सर्व आत्माच आहे, असें पाहतो. त्यामुळें केवळ चिन्मात्र अवशिष्ट राहतो. ज्याला जो प्रतिभास होतो तो आत्मबोधानें आत्माच आहे व अज्ञानानें तोच अत्यंत दुःखमय संसार होतो. प्रत्येक भूतशरीराचें भ्रांतीनें निरनिराळें जगन्मंडल उदय पावलें आहे. पाण्यापासून जशी लाटांची परंपरा उदय पावते, किंवा भिक्षुच्या स्वप्नांत जसे अनेक संसार उदय पावले, तसेंच हें समज. प्रस्तुत जगद्रूपी स्वप्न ब्रह्मदेवापासून जसें उदय पावलें आहे, त्याप्रमाणेंच अस्वच्छ चित्तापासून उदय पावलेला हा प्रपंच सर्व जीवांच्या चित्तांत रूढ झाला आहे. पण चित्त शुद्ध झालें ह्मणजे तो त्या जीवालाही पितामहाप्रमाणेंच असत्य भासतो. नंतर तसा भास झाल्यावर आत्माच कोट्यवधि ब्रह्मांडांप्रमाणें उदय पावतो, असा प्रत्येक जीव निश्चय करतो. हा जीव व्यष्टिप्रपंचरूपानें किंवा समष्टिप्रपंचरूपानें, साधारण प्रपंचरूपानें किंवा प्रत्येक असाधारण प्रपंचरूपानें किंवा कसाही स्फुरण पावत असो, तथापि हृदयांत तो प्रतिभानसमर्थ असा दीर्घ भ्रम पाहतो. म्हणून तो स्वप्नाप्रमाणें मिथ्याच आहे. कारण केवल चित्सत्तेचा आश्रय करून तात्त्विक प्रतीतीपासून च्युत झाल्यामुळें तो देव-तिर्यक्-मानवादि देहांत जरा-मरणदुःखाचें क्वचित् पात्र झाला आहे. त्या स्वप्नांत विचित्र सुकृतशालिनी जीवचित् आपल्या केवल चित्तांशाच्या स्पंदानेंच पाताल किंवा ब्रह्मलोक पुनः पुनः कल्पून त्याचा भोग घेत राहते. परमात्माचित्च प्राणकल्पनेनें स्पंदरूपिणी होऊन स्वतःमध्यें देहाकाराचा संभ्रम करून व बाहेर जाऊन विषयाकार संभ्रम करून त्यांतल्यात्यांत तुडबुडत राहते. पण याप्रमाणें भ्रांतीनें त्याला चित्तता, जीवता, देहता, विषयता जरी प्राप्त झाली तरी तो परमात्माच आहे. 'तो ब्रम्ह नव्हे, ब्रम्हच प्रत्यगात्मा नव्हे,' असें म्हणतां येत नाहीं. कारण मुख जसें आरशांत प्रतिबिंबित होतें तसें ब्रम्हालाच उपाधिवशात् जीवादि नांव प्राप्त होतें. शुद्ध आकाशांतच जसें औपाधिक घटादि आकाश राहतें, किंवा निर्मल जलांत दुसरें जल राहतें, त्याप्रमाणें व्यवहारदृष्टीनेंहि जर परब्रह्मच ब्रह्मांत स्थित आहे, तर परमार्थदृष्ट्या समूल उपाधिबाध झाल्यावर, सर्व ब्रम्हच आहे, असें म्हणण्यास कोणती हरकत आहे? हा सर्व जीवलोक स्वात्मभूत अभय ब्रम्हाच्याच मूर्तामूर्तात्मक जगद्रूपांत राहतो, त्यामुळें आरशांत स्वतःहून भिन्न पाहिल्या जाणाऱ्या प्रतिबिंबाची बालकाला भीति वाटण्याचा जसा क्वचित् संभव आहे, तसाहि या जगांत कोणाला भिण्याचा फारसा संभव नाहीं. तथापि केवळ अज्ञानानें हा जीव अन्यत्वाची कल्पना करून वृथा भितो. त्या अन्यत्वकल्पनेचें कारण बुद्धीचा स्पंद आहे. यास्तव तो बुद्धीचा स्पंद समाधीच्या अभ्यासानें अस्पंद केला असतां भेदबुद्धिरूप संज्ञा आपोआप बुद्धींत लीन होते. नंतर ती बुद्धिही पूर्ण ब्रम्हाकारानें—चरम ब्रम्हसाक्षात्काररूप परिणामानें, अग्नींत होम केलेल्या घृताप्रमाणें त्या दीप्त ब्रम्हांत लीन होते. चित्स्पंदच चित्स्पंदरूप सर्वात्म्यामध्यें विकास पावला आहे; पण तो स्पंद, अस्पंद, जृंभण इत्यादि सर्व कल्पित आहे, सत्य नव्हे. तत्त्वदृष्ट्या येथें स्पंद नाहीं, अस्पंद नाहीं, एकता नाहीं व द्वित्व नाहीं, तर शुद्ध चिन्मात्रसर्वस्व जसें आहे तसेंच तें स्थित आहे. विचारानें सर्व हा शब्द व त्याचा अर्थ यांचा सम—एकरस स्वभाव ज्ञात झाला असतां चिन्मात्र हेंच परमार्थसत्य आहे, असा निश्चय होतो. नंतर 'नाहीं' असा हा

अभावभूत प्रपंचही विद्यमान नाहीं. मग भावभुत प्रपंच नाहीं, हें काय सांगावें ? भेद-कल्पनेनें भेद उदय पावतो. तो प्रकृतीचें चिन्ह आहे. पण अभेदबोधानें सर्व भेद गळून गेला असतां परतत्त्व अवशिष्ट राहतें हे रामा ! तु अबोधानेंच नानात्व आहेस. पण त्या अबोध-रूप नानात्वाचें चिंतन न केल्यानें तूं पूर्ण चिद्रूपच आहेस. याविषयीं तूं वाटेल त्याला विचार. परमार्थ हा असाच आहे. म्हणून तुझी, माझी व दुसऱ्या सर्वांची परा निःशंकता प्रतिष्ठित आहे. त्या निःशंकतेच्या बळानेंच स्वप्न नाही, जागृति नाहीं, सुषुप्ति नाहीं, तुर्यता नाहीं, बंध नाहीं, मोक्ष नाहीं, व दुसरीही कोणती विपरीत कल्पना नाहीं, असा सर्व द्वैताचा निषेध प्रवृत्त होतो. अबोधामुळेंच द्रष्टा, दृश्य इत्यादि त्रिपुटीरूप जगत् आहे. पण तो अबोधच जेव्हां असत्य ठरतो, तेव्हां शुद्ध आत्मरूप त्याची एक शांतिच जगत् या नांवाची होते. कारण ती शांतिच ' सर्वतः जाते व्यापते ' या व्युत्पत्तीनें ' जगत् ' या नांवास योग्य होते. त्या वेळीं द्रष्टा, दृश्य, दर्शन एतद्रूप त्रिपुटी तर अत्यंत अप्रसिद्ध आहे. त्यामुळें तिला जगत् हें नांव नाहीं तूं सर्व संकल्प सोडलास म्हणजे तुझा स्पंदही अस्पंद होईल. कारण संकल्परहित चित् स्पंद व अस्पंद यांनीं भेद पावत नाहीं. चित्च्या अदर्शनामुळें द्वैत, ऐक्य इत्यादिरूप संकल्प उदय पावतो. पण तो दर्शनमात्रानें गेल्यावर केवल चित्-ब्रम्हच अवशिष्ट राहतें. चिच्चंद्रबिंबामध्यें जो संकल्पकलंक स्फुरणसा पावतो, तो कलंक नव्हे. तें चिद्घनाचें घनस्वरूप आहे. तूं चिद्घनाच्या व्यापक पदांत स्थिर हो. कारण पूर्णभावावस्थानापासून संकल्पादिक तुझ्या एकरूपत्वास प्राप्त झाला आहे. तो त्याहून पृथक् नाहीं, पण त्वद्रूपानें विद्यमान आहे. याच युक्तीनें तूं सर्व वस्तूंच्या आत्मैकरस्यसंपादक निर्दोष बोधसाराचें अवलंबन कर. चिच्चंद्रबिंबा ! हे असंकल्पकलंका ! भावाभावक्षयात्मक अशा तूं ज्याला चांगला स्पर्श केला आहेस, असा सर्वही पदार्थ अमृताकार होतो. तुझें माहात्म्य काय वर्णावें ? भावाभावादि कल्पनेला चिन्मयत्वास प्राप्त करून तूं चित्च्या सम-उल्लासविलासांत चांगली विश्रांति घे. हे रामा ! तूं आनंदसमुद्राख्य स्वरूपानें स्थित होऊन स्पंद व अस्पंद, संकल्प व विकल्प इत्यादि जेवढा म्हणून चित्तभ्रांतिभेद आहे तो सर्वही सर्वाकार सुखैकरूप शांतिसत्ताच आहे, त्याचप्रमाणें पूर्ण व अपूर्ण अशा या दोन दशाही एकच—माझें स्वरूप आहेत असें जाण.

## सर्ग ६८ वा.

१ चार प्रकारच्या मौनांचें लक्षण, २ त्यांतही सुषुप्तमौन तुर्यातीतपदीं प्रतिष्ठित आहे, असें वर्णन.

**श्रीवसिष्ठः**—रामा ! तूं सुषुप्तमौनवान् होऊन, चित्तविलासत्वाचा—चित्ताच्या स्वाभाविक प्रवृत्तींचा त्याग करून संकल्पमलरहित होऊन तत्पदाचा आश्रय करून रहा.

**श्रीरामः**—हे सर्व मौनांच्या ईश्वरा ! वाङ्मौन, अक्षमौन, व काष्ठमौन मी जाणतों. पण सुषुप्तमौन कशाला म्हणतात, तें मला सांगा.

**श्रीवसिष्ठः**—हे रामा ! मुनिवरांनीं या सृष्टींत दोन प्रकारचा मुनि सांगितला आहे, एक काष्ठतपस्वी व दुसरा जीवन्मुक्त. आत्मतत्त्वपर्यालोचनशून्य, अशा अनुभवरसरहित कृच्छ्रचांद्रायणादि क्रियेमध्यें ज्याचा दृढनिश्चय आहे, व त्यामुळें जो बलात्कारानें इंद्रियसमूहाचा निग्रह करतो, तो काष्ठतापस मुनि आहे. पण जो आत्मतत्त्वाचें पर्यालोचन करून हें सर्व

जसें आहे तसेंच जाणून आत्म्यामध्यें स्थित आहे, तो व्यवहारांत इतर तपस्वी जनांप्रमाणें जरी दिसत असला तरी आंत निरतिशय आनंदानें तृप्त झालेला असतो. म्हणून त्याला मुक्तमुनि असें ह्मणतात. या दोन्ही प्रकारच्या शांत मुनिनाथांचा जो चित्तनिश्चयरूप भाव आहे, ज्याला मौन असें म्हटलें आहे, तें मौन चार प्रकारचें आहे, असें मौनवेत्ते जन सांगतात; वाङ्मौन, अक्षमौन, काष्ठमौन व सौषुप्तमौन. वाणीचा रोध हें वाङ्मौन, बलात्कारानें इंद्रियांचा निग्रह करणें हें अक्षमौन, व सर्व शरीरव्यापारांचाही निरोध करणें हें काष्ठमौन आहे. पण याप्रमाणें विभाग करूं लागल्यास पांचवें मनोमौनहि संभवेल. तथापि तें काष्ठतापसांमध्यें मूर्छा व सुषुप्ति या अवस्थेंतच संभवते, दुसऱ्या वेळीं नाहीं. ह्मणून ते त्याची गणना करीत नाहींत. आत्मतत्वाचा अनुभव आला असतां जीवन्मुक्त चवथ्या सौषुप्त मौनावर आपला निर्वाह करतो. पहिल्या तीन प्रकारच्या मौनांचा काष्ठतापस अधिकारी आहे. सुषुप्त मौनावस्थेंत ती चवथी अवस्था जीवन्मुक्तांमध्यें धारण केली जाते. वाङ्मौनादिक तीन मौनांमध्यें मौनत्व सिद्ध आहे. तथापि तीं तिन्ही मौनें मलिन मनाच्या दृढ निश्चयरूप आहेत. त्यामुळें तीं जीवाच्या बंधालाच कारण होतात. त्यांत स्थित असलेला काष्ठतापस बलात्कारानें मनोनिग्रह करून आंत अहंभावाचें अनुसंधान करीत नाहीं, बाहेर दृश्यरूप प्रपंचाला व नामप्रपंचाला स्पर्श करीत नाहीं व अज्ञानावृत्त आत्म्यालाही पहात नाहीं; तर सुषुप्तींत जसा, त्याप्रमाणें नित्य आत्मदृष्टीचा विलाप न झाल्या कारणानें, भस्मांत आच्छादित झालेल्या अग्नीप्रमाणें साक्षिमात्र ज्योतीनें पहात राहतो. पण व्युत्थानसमयीं हें मौनत्रय स्फुरण पावणारें चित्तचलनच आहे. त्यांत पहिले तीन मौनी असतात. पण तज्ज्ञांच्या चित्ताचा बाध झालेला असल्यामुळें त्यांच्या व्युत्थान-निरोधादि लीलेनें ते त्या मौनांत नसतात. तज्ज्ञ पहिल्या तीन प्रकारच्या तुच्छ मौनावर ‘ हें बंधस्वरूपच आहे, त्यामुळें त्याचें निरसन केलें पाहिजे,’ असें म्हणून रागावोत, किंवा हा चिदानंदाचा विलास आहे असें समजून न रागावोत, पण कांहीं झालें तरी ते त्याला ग्राह्य समजत नाहींत. त्यामुळें ते पूर्णात्मस्थितिलीलेनें राहतात. पण हें सौषुप्तमौन जीवन्मुक्तांच्या अनुभवांत स्थित आहे. तें ज्याला पुनर्जन्म घ्यावयाचा नसतो, त्या जंतूला प्राप्त होतें. यास्तव तूंही तें ऐक. तत्त्वदर्शन सिद्ध झालें ह्मणजे तें यत्नावांचूनच सिद्ध होतें. त्यामुळें त्या मौनांत प्राणाचा संयम केला जात नाहीं. ऊर्ध्व-अधो-मध्यसंचारभेदानें तीन प्रकारचा प्राणायामहि करावा लागत नाहीं. सर्व इंद्रियांच्या वृत्ति विषयलाभहर्षानें उल्हास पावत नाहींत व निरोधक्लेशानें म्लान होत नाहींत. ही नानात्वकल्पना विकास पावत नाहीं, व शांतहि होत नाहीं. ज्ञानानें बाधित झालेलें चित्त चित्त या आकारानें रहात नाहीं, अचित्त होत नाहीं. तें सत् नाहीं, व असत् नाहीं, व सदसत्‌ही नाही. विकल्प व तारतम्यदृष्टि यांनीं रहित असलेलें तें सर्व विभागशून्य होतें. त्यामुळेंच त्याला अभ्यासाची अपेक्षा नसते. तर तें ध्यान करीत असतांना व ध्यान करीत नसतांनाही आदि-अंतरहित होऊन राहतें. कारण तें अपरिच्छिन्न आत्मरूप असतें. या अवस्थेला सौषुप्त मौन म्हणतात. ज्यांत द्वैत हा विभ्रम आहे, अशा त्या आत्मतत्त्वाला यथार्थस्वरूपानें पाहून आत्म्याप्रमाणेंच निःसंदेह व अचल होऊन राहणें हेंच सौषुप्त मौन आहे. अनेक प्रकारच्या संविद्रूपांचा—वृत्तींचा आत्मा जो शिव त्यानेंच हें परिपूर्ण आहे, असें

समजून जें अवस्थित होणें तें सौषुप्तमौन आहे. तें शून्यरूप नाहीं, व अशून्यही नाहीं. सर्व आहे असें नाहीं, व नाहीं असेंही नाहीं, अशी खात्री झाल्यामुळें चित्त जें सम व शांत होतें तें सुषुप्तीसारखें मौन आहे. सर्वशून्य, निराधार, शांति-विज्ञप्तिमात्र, सदसद्विलक्षण असें जें जीवन्मुक्तदशेंतील अवस्थान तेंच उत्तम मौन होय. भावाभावदशा, देश इत्यादि विशेषांनीं जो संविदेचा विवर्त न होणें तें श्रेष्ठ मौन होय. ज्ञानानें बाधित झाल्यामुळें अत्यंत असत् व वृत्तिशून्य अशा चित्तानें संविद्वृत्तीचा अन्यथाभाव न होणें हेंच अक्षय मौन आहे. मी नाहीं, दुसरा कोणी नाहीं, मन नाहीं. विकल्प नाहीं, अशा ज्ञानानें बाधित झालेल्या संविदेनें प्रतिभास न होणें, हीच अविच्छिन्न अति मौनिता आहे. या जगांत मी आहें, मला अनामय असो, इत्यादि शब्द-अर्थमात्र सर्व सत्तासामान्यच आहे असें समजणें, हें सौषुप्त मौन आहे. ज्या अर्थीं संविद् चरम साक्षात्काररूप प्रमाणालाहि ग्रासणारी आहे, त्या अर्थीं स्वतः, अन्य इत्यादि कल्पना कोठच्या? हें सौषुप्त अनन्तच आहे. यापासून बाकीचें सर्व मौन विस्तार पावलें आहे. हे रामा! हें सुषुप्त मौनच अनंत असल्यामुळें प्रबोधाप्रमाणें अविद्येचा बाध करतें. म्हणून त्याला निर्मल तुर्यपद जाण; व तें प्रबोधाला प्रतिबंध करणाऱ्या वृत्तींनाही बाध करणारें असल्यामुळें तुर्यातीत पद आहे, असें समज. पूर्वीं ज्या सात भूमिका सांगितल्या आहेत, त्यांतील पांचवी, सहावी, व सातवी, अशा तीन भूमिका हे समाधीचेच प्रकार आहेत. त्यांना क्रमानें सौषुप्तक समाधान, तुर्यसमाधि व तुर्यातीत समाधि असें म्हणतात. या तिन्ही समाधि जाग्रदवस्थेंतही तत्त्ववेत्त्याच्या ठिकाणीं होतात. हे ब्रह्मीभूत साधो! जाग्रदवस्थेंत समंततः उत्तम प्रकारें व्यवहार करणारा ज्ञानी सदेह असो कीं व्यवहार सोडून समाधींत स्थित असो, ज्याची सर्व निर्मल शांतवृत्ति आहे असा तो तुर्यस्थच व तसाच विदेहच आहे. ही स्थिति स्थूल व सूक्ष्म या दोन आकारांचा बाध करून जो चिदाकाश होणारा त्यालाच प्राप्त होते; दुसऱ्या कोणाला प्राप्त होत नाहीं. मांडूक्योपनिषदांत वर्णन केल्याप्रमाणें ओंकाराच्या मात्रा व आत्म्याचे पाद यांचा उत्तरोत्तर प्रविलाप करून सर्व वासनांचा ज्यांत पूर्णपणें नाश झाला आहे असें एक तुर्यरूप होऊन तूं रहा. तूं, मी व हें दुसरें सर्व यांतील कांहीं एक सत्य नाहीं. तें सर्व आहे, असें जें व्यवहारांत वाटतें, तें नाडयांच्या आंत अनुभवास येणारें जें स्वप्न त्यासारखें आहे, असें जाणून तूं जीवन्मुक्त हो व केवल चिदाकाशकोशमय होऊन रहा. केवल चिन्निष्ठ हो.

---

## सर्ग ६९ वा.

-:०:-

१ गणांनीही रुद्रत्व, २ मुक्तांची ऐच्छिक स्थिति, ३ योगानें प्राणाचा विलय, व ४ मरणापासून उद्भव यांचें वर्णन.

श्रीरामः—हे मुनिनायक! जीवटादि सर्वांनाही उत्तम रुद्रता प्राप्त झाली, असें आपण अगोदर सांगितलेंत नंतर रुद्राच्या आज्ञेनें ते शंभरहि जीव आपापल्या देहांत प्रारब्धशेष भोगून पुनः ते शंभर गण रुद्ररूप झाले, असें म्हटलेंत. त्यामुळें मला संशय आला आहे. हें रुद्राचें शतत्व कोठून आलें? जे गण तेच रुद्र, कीं रुद्र निराळे व गण निराळे, हें मला सत्वर सांगा.

श्रीवसिष्ठ. रामा! मीं पूर्वीं वर्णन केलेल्या त्या त्या जन्मांवरून तुला सर्व कळलेंच आहे. म्हणून मीं रुद्रांच्या शतसंख्येचीं नांवानें

गणना केली नाहीं. भिक्षूच्या स्वप्नांत जे जीवटादि आकार झाले, तद्रूपच ते शंभर गण होत. जे शंभर गण तेच शंभर रुद्र होत. कारण गण हे जरी रुद्राचे सेवक असले तरी मुख्य रुद्र व ते त्याचे सेवक यांचे भोग-ऐश्वर्यादि धर्म समान असल्यामुळें तेही रुद्रच होत. पूर्वसिद्ध मुख्य रुद्राची परिचर्या वगैरे करतांना मात्र ते गणच होतात. कारण त्यांना मुख्य रुद्राच्या प्रसादानेंच रुद्रांचें साम्य प्राप्त होतें.

श्रीराम:—पण भगवन्! भिक्षूच्या स्वप्नानें केलेल्या रुद्रानें, एका दिव्यावर जसे शंभर दिवे लावून घ्यावे त्याप्रमाणें, एका चित्तापासून शंभर चित्तें कशीं केली?

श्रीवसिष्ठ:—ज्ञानैश्वर्यानें अज्ञानावरणशून्य व योगैश्वर्यानें सत्यसंकल्प ईश्वर भूमानंदाचा स्वीकार करणारी जी माया—प्रतिबिंबसंविद, जिला सर्वज्ञत्व, सर्वशक्तित्व इत्यादि नांवें आहेत तिच्या बलानें जें जसें कल्पितात, त्याचा तसाच अनुभव घेतात. सर्वात्मा सर्वव्यापी असल्यामुळें ज्याची जेथें जशी भावना केली जाते तसाच तेथें सर्वज्ञबुद्धीनें अनुभव घेतला जातो.

श्रीराम:—हे ब्रह्मन्! तो ईश्वर नरकपालांच्या माळा हेच अलंकार कां धारण करतो? भस्म कां लावतो? दिगंबर कां आहे? स्मशानांत कां राहतो? व तो इतका कामुक कां आहे?

श्रीवसिष्ठ:—जे जीवन्मुक्तशरीरी, सिद्ध, महेश्वर, त्यांच्या क्रियांचा या जगांत नियम[1] नाहीं. क्रियानियम अज्ञांसाठींच आहे. कारण त्यांचें चित्त राग-द्वेष-लोभादि अनेक दूषणांनीं खंडित झालेलें असतें. त्यामुळें त्यांना क्रियांचें नियमन नसल्यास प्रबळानें दुर्बलास खाणें या माशांच्या न्यायानें जन्म-मरणपरंपरा-नरकदु:ख भोगावें लागतें. जे ज्ञानी असतात ते इष्ट व अनिष्ट वस्तूमध्यें निमग्न होत नाहींत. कारण ते जितेंद्रिय, ज्ञानी व वासनाशून्य असतात. ते नेहमीं अकस्मात् प्रादुर्भूत झालेली क्रिया करितात, व कांहीं करीतही नाहींत. त्यांचा कशाविषयीं आग्रहही नसतो. पूर्वी अकस्मातच विष्णु अशा कर्मांनीं विशिष्ट असा उदय पावला. शंकर अशा कर्मांचा झाला व ब्रह्मदेव अशा कर्मांचा झाला. ज्ञानी पुरुषाला कांहीं निंद्य नाहीं, कांहीं अनिंद्य नाहीं; कांहीं ग्राह्य नाहीं. कांहीं त्याज्य नाहीं. कोणतेंही कर्म आत्मसंबंधीं नाहीं व कांहीं परकीय नाहीं. सृष्टीच्या आरंभीं अग्न्यादिकांचें उष्णत्वादिक जसें रूढ झालें आहे, तसेंच हरादिकांचें कर्म व ब्राह्मणादिकांच्या जाति वगैरे रूढ झाल्या आहेत. (अग्नीचें उष्णत्व, जलाचें शीतत्व इत्यादि जसें मुख्य-ईश्वरेच्छानुरूप अनादि नियतीनेंच सिद्ध आहे, तसेंच हरादिकाचे चरित्र-वेष व ब्राम्हणादिकांची चर्या वगैरे अनादि नियतीनें व्यवस्थित आहे.) पण अज्ञ जीवांची चर्या अग्न्यादिकांच्या धर्मांप्रमाणें सृष्टीच्या आरंभीं नियतीनें अभिव्यक्त झालेली नाहीं; तर सृष्टि रूढ झाल्यावर त्या त्या वर्णादिविभागसंकेतानें शास्त्रीय क्रिया निराळ्या व स्वाभाविक क्रिया निराळ्या, अशी कल्पना केली आहे. असो, हे रामा! वर सांगितलेल्या सदेह मुक्तांच्या चार प्रकारच्या मौनांहून निराळें विदेहमुक्तविषयक तुर्य मौन मीं तुला अजून सांगितलें नाहीं. आकाशाहूनही अत्यंत स्वच्छ असें जें चिदात्मक आत्माकाश तद्रा-

[1] जीवन्मुक्त विधिकिंकर नसतात. म्हणून त्यांनीं शास्त्रीय, मंगलरूप व सुखभोग देणाऱ्याच क्रिया कराव्या असा नियम करता येत नाहीं. अज्ञ लोकांच्या दृष्टीनें ज्या अत्यंत मंगलरूप क्रिया असतात, त्या सर्व त्यांच्या दृष्टीनें अत्यंत अमंगल असतात. त्यांना अशुभ कर्मांच्या अभावीं दु:खही होत नाहीं. ते सर्वदा सुखस्वरूप असतात.

याची प्राप्ति हें परम श्रेय आहे. तें कसें प्राप्त होतें तें मी सांगतों, ऐक. यथार्थ ज्ञानाच्या प्राप्तीनें नित्य एक-समाधीनें जे विचारविवेक-प्रयुक्त राजयोगानें आत्मज्ञानी झालेले असतात, ते सांख्ययोगी होत. प्राणादि वायूंची शांति झाली असतां जे युक्तीनें[१] अनामय आदि-अन्त-शून्य प्रदास प्राप्त झालेले असतात, ते योग-योगी—कर्मयोगी म्हणून म्हटलें आहे. सर्वांना अकृत्रिम शांत पदच तत्त्वसाक्षात्कारानें प्राप्तव्य आहे. त्याला कित्येक याच देहानें विवेकानें प्राप्त झाले आहेत व कित्येक योगानें प्राप्त झाले आहेत. यास्तव सांख्य व योग एकच आहे, असें जो पाहतो तोच तत्त्वज्ञ होय. जें परम स्थान सांख्यांकडून प्राप्त केलें जातें, तेंच योग्यांकडून मिळविलें जातें. प्राण व मन या दोघांच्याही वृत्तींचा आत्यंतिक विलय होऊन त्यामुळें वासनाजालांतून सुटलेली अशी स्थिति उत्पन्न होते. तीच स्थिति परमपद आहे. वासनेला चित्त म्हणतात. तेंच संसाराचें म्ह० बाह्य व आंतर करणें व प्राण यांच्या चेष्टेचें कारण आहे. तें सांख्य किंवा योग यांतील कोणत्या तरी एका उपायानें विलीन होऊन, तत्त्वज्ञानरूपानें परिणत झालेलें तें, इंद्रिय व प्राण यांच्या व्यापारांचें अकारण होतें. यास्तव सांख्य व योग हे दोन मनोनाशाचे पृथक् उपाय आहेत. लहान मूल जसें वेताळाला पाहतें, तसें मन देहाला पाहतें. पण वरील दोन उपायांतील कोणत्या तरी एका उपायानें त्याचा विलय केला असतां सर्व संसाराची शांति होते. ( कारण ' देहच मी ' असें मानल्यामुळेंच सर्व संसाराची प्रवृत्ति होते. ) पण मन वृथाच उदय पावलें आहे. त्यामुळें तें असत् स्वप्नांतील स्वमरणासारखें मिथ्या आहे, असें पाहिल्यानेंच तें नाहींसें होतें. आणि ज्ञानानें मनाचा बाध झाला असतां त्याचें कार्य असा जो अहं-ममतादि बंधापासून मोक्षापर्यंत संसार तो बाधित होतो. मनोनाश झाल्यावर मी, माझें, हा उपदेश्य, हा उपदेश इत्यादि कल्पना कशा व कोठून होणार? एकाच आत्म-तत्त्वाचा घनाभ्यास, प्राणांचा निरोध व मनाचा नाश हीं अधिकारिभेदानें मोक्षार्थी तीन साधनें सांगितलीं आहेत. सर्व शास्त्रांचें तात्पर्य या तीन साधनांत आहे.

श्रीराम:—मुने ! प्राणाचा विलय हेंच जर मोक्षाचें कारण असेल तर सर्व प्राणी मरतांच विमुक्त होतील, असें मला वाटतें. कारण मरणसमयीं सर्वांचा प्राणविलय होतो.

श्रीवसिष्ठ:—या[१] तिन्ही उपायांमध्यें मनः-प्रशांति हेंच श्रेष्ठ साध्य आहे, असें तूं समज. तेंच तत्काल कल्याण करणारें आहे. ज्यांतील घुर्घुरादि शब्द शांत झाला आहे, असें हें शरीर प्राण जेव्हां सोडतात, तेव्हां वासना, काम, कर्म यांनीं उपस्थापित केलेल्या भावि देहाकाराचा अनुभव घेऊन बाह्य आकाशांत तशा देहाच्या

१. हठयोगाने.

१ वरील तिन्ही उपाय मनोनाशाच्या द्वाराच मोक्षाचे हेतु होतात. मरणसमयीं मनोनाशही होत नाहीं व प्राणांचा नाशही होत नाहीं. तर मूर्च्छा-समयीं पाण्यांत विरघळून गेलेल्या मिठाप्रमाणें अवि-द्येत वासनारूपाने त्यांचें अवस्थान होतें व उत्क्रमण-समयीं पुन: त्यांचा आविर्भाव होतो. कारण बृहदार-ण्यकांत ' तो सविज्ञान होतो व सविज्ञानच शरीरां-तून निघून जातो. ' असे म्हटलें आहे. ( बापटकृत बृह. भाष्यार्थ, अ. ४ पृ. २४९ पहा ) उत्तरदेहाचा संकल्प करूनच तो पूर्व देह सोडतो, याविषयीं तृण-जळूचा दृष्टान्तही तेथेंच दिला आहे. ( बृह. भाष्यार्थ, अ. ४ पृ. २६१ पहा. ) कारण विलीन झालेल्या प्राणांचें चक्षुरादि छिद्रांच्या द्वारा बाहेर पडणें शक्य नाहीं. बरें, स्थूल देह हा आधार नसल्या-मुळें बाहेर निघून गेलेल्या प्राणांचा विलय होतो म्हणावें, तर तसेंही नाहीं. कारण प्राणांबरोबरच बाहेर गेलेल्या भूतमात्रांनीं तत्कालिक व्यवहाराच

आरंभास अनुकूल अशा भूतमात्राशीं ते संगम पावतात. ( पण त्या भूतमात्रा, बाहेरील जीवांच्या प्राणाशीं कशा संगम पावत नाहींत? उत्तर— ) तीं तन्मात्रें त्या त्या जीवाच्या वासनामात्रात्मक असतात, असें तूं जाण. तीं तसल्या वासनायुक्त मनोविशिष्ट प्राणांशींच संयुक्त होतात, इतरांशीं होत नाहींत, असा निश्चय आहे. प्राण दुसऱ्या देहांत त्या देहाच्या वासनेसहवर्तमानच उत्पन्न होतात. कारण ते पूर्व देह उत्तर देहाच्या वासनेसहच सोडतात, व दुसऱ्या देहांत त्याच्या हृदयांतील आकाशाशीं—त्यांतील वायूशीं संश्लेष पावतात. ज्याप्रमाणें पुष्पाचे सुगंध तिळांत प्रवेश करून त्यांतील तेलाशीं संश्लेष पावतात, व त्यामुळें घाण्यांत चिरडले जाण्याचे क्लेशही भोगतात, त्याप्रमाणें प्राण त्या शरीरांतील हृदयाकाश व वायु यांच्याशीं दुःख भोगण्यासाठीं मिळतात. ज्याप्रमाणें पाण्यानें भरलेला घट समुद्रांत बुडाला असतां बाहेरच्या लोकांना जरी न दिसला तरी नाश पावत नाहीं, त्याप्रमाणें वासनायुक्त असलेलें मन मरणानेंच नाश पावत नाहीं. तेजावांचून सूर्य जसा संभवत नाहीं, त्याप्रमाणें मनावांचून प्राण संभवत नाहींत. तित्तिर पक्षी दुसरें तृण मिळाल्यावांचून पहिल्या तृणाची काडीही जशी सोडीत नाहीं, त्याप्रमाणें ज्ञानावांचून मन प्राणांना केव्हांही सोडीत नाहीं. म्हणून ज्ञानानें वासनांचा क्षय झाला असतां मन स्वतः नाश पावतें; व प्राणापासून स्पंदही घेत नाहीं. त्यामुळें केवल शांतिच अवशिष्ट राहते. ज्ञानामुळें सर्व पदार्थ असत् आहेत अशी भावना उदय पावते. त्यामुळें सर्व वासनांचा क्षय होतो. त्याच्यायोगानें प्राण व चित्त यांचा वियोग होतो. त्यानंतर अत्यंत शांत झालेलें मन पुनः देहत्वास पावत नाहीं. स्व-नाशानेंच ब्रह्मपदाची प्राप्ति होते. वासनाच मन आहे, असें विद्वान् समजतात. वासनामात्रच चित्त आहे. वासनेच्या अभावीं तें परमपदच आहे. ज्ञान वासनेसह सर्वांचा बाध करून आत्मतत्त्वच बनतें. तें तत्त्व अचल ज्ञानच आहे, व मनोनाशानंतर तेंच अवशिष्ट राहतें, असें ब्रह्मनिष्ठ सांगतात. रामा! असा या संसाराचा शेवट केवल विचारानें आपोआप होतो. कारण संसार रज्जुसर्पभ्रमासारखा आहे. एकाच पदार्थाचें सतत अनुसंधान करणें, प्राणांचा निरोध करणें, व चित्ताचा परिक्षय करणें या तीन उपायांतील कोणता तरी एक चांगला सिद्ध झाला कीं ते तिन्ही परस्पर सिद्ध होतात. ज्याप्रमाणें पंखा हालविणें बंद केलें म्हणजे वायु शांत होतो, त्याप्रमाणें प्राणवायूचा स्पंद शांत झाला कीं मन शांत होतें. ( अहो पण शरीर मागें राहून प्राण जेव्हां त्यांतून निघून जातात तेव्हां हा क्रम असूं दे; पण जेव्हां शाप, छेद इत्यादि कारणानें शरीराचा नाश होतो तेव्हां कोणता क्रम असतो? उत्तर— ) शरीराचा नाश होतांच प्राण आकाशांतील वायूंत मिळून जातो; किंवा त्याची वासना जशी दृढ झालेली असते त्याप्रमाणेंच तेथें सर्व पाहतो. देहरहित झालेले मनोयुक्त प्राण आकाशांत जशा देहाला पाहतात, तशाच देहाला व त्याच्या व्यवहाराला ते अनुभवितात. वायूचा स्पंद थांबला असतां ज्याप्रमाणें गंध

---

योग्य अशा देहाची कल्पना होईल, असें समजून श्रीवसिष्ठ हें उत्तर देत आहेत. १ याविषयीं 'जसा सोनार सोन्याचे तुकडे घेऊन दुसरें चांगलें रूप -चांगला दागिना बनवितो, त्याप्रमाणें हा आत्मा या शरीराला मारून निश्चेष्ट करून दुसरें पहिल्यापेक्षां चांगलें पितराचें, किंवा गंधर्वाचें, किंवा देवाचें, किंवा प्रजापतीचें किंवा आणखी एखाद्या भूताचें रूप करतो.' असें वर्णन बृहदारण्यकांतच केलें आहे. ( बृह. भाष्यार्थ, अ. ४ पृ. २६४ पहा. )

शांत होतो त्याप्रमाणें मनस्पंद शांत झाला असतां प्राणवायु शांत होतात. प्राण्यांचे प्राण व चित्त हीं दोन्ही नित्य परस्परांना सोडून न राहणारीं आहेत. पुष्प व त्याचा सुगंध यांप्रमाणें तीं परस्पर संमिश्र झालेलीं आहेत. किंवा तीं दोन्ही तीळ व त्यांतील तेल याप्रमाणें स्थित आहेत. मनाचें स्पंदन हाच प्राण आहे व प्राणाचें स्पंदन हेंच मन आहे. रथ व सारथि हे जसे परस्परांच्या चलनाला कारण होतात, त्याप्रमाणें प्राण व चित्त एकमेकांच्या स्पंदाला संपादन करितात. आधार व आधेय याप्रमाणें हे दोन्ही पदार्थ एकाचा अभाव झाला असतां नाश पावतात, आणि आपल्या नाशानें मोक्षाख्य उत्तम कार्य करितात. एकाच तत्त्वाचा दृढ अभ्यास केल्यानें ज्यांतील द्वैतवासना बाधित झाली आहे, असें मन सर्वथा शांत होतें, आणि प्राणाचा स्वभाव मनांत लीन झाला असतां त्यामुळें प्राणही शांत होतो. यास्तव जें अनन्त आत्मतत्त्व त्याचा विचार करून मनाला तूं तन्मय करून सोड. म्हणजे त्या आत्मतत्वांत त्याचा लय झाल्यानें तद्रूपत्वच स्थिर होतें. किंवा अज्ञान व त्याचा बाध करणारी ब्रम्हाकार वृत्ति हीं दोन्ही निवृत्त झालीं असतां जो अवशिष्ट राहतो त्या चिन्मात्रामध्यें प्राणधारणेनें स्थिर हो. जोंवर त्या एक तत्त्वामध्यें वृत्ति अत्यंत दृढ होई, तोंवर तदाकारवृत्तीची धारा स्थिर होण्याचा यत्न करावा; व शेवटीं ती वृत्तिधाराहि चरमसाक्षात्कारानें दग्ध होऊन अभावत्वास प्राप्त होई तों चांगला अभ्यास करावा. चित्ताला विषयांपासून परतविणाऱ्या पुरुषाचें चित्त भोग्यक्षयोमुळें[1] जसें, तसेंच प्राणांसह विलीन होतें व मग परम तत्त्वच अवशिष्ट राहतें. यम, नियम, आसन प्राणायाम व प्रत्याहार या पांच अंगांनीं मनाच्या बाह्याकाराचा क्षय झाला असतां धारणा, ध्यान व समाधि या तीन अंगांनीं ब्रह्मैकतानता प्राप्त होते. ती होतांच चित्त एका क्षणांत दीर्घ अभ्यासाच्या बलानें सर्वविशेषशून्य होतें. अविद्या नाहींच, असें बुद्धीनें युक्तीच्या बलानें जाणून, ज्ञानानेंच परब्रम्हाची प्राप्ति होते, असा निश्चय करावा व त्यानंतर धारणादिकांचा अभ्यास करावा. शरदृतूंत मेघ क्षीण झाले असतां त्या कारणानेंच आलेली मिहिका—धुकें—काळोखी जशी नाहींशी होते, त्याप्रमाणें चित्त शांत झालें असतां ही संसारमृगतृष्णाही शांत होते. हे रामा ! अविद्या चित्तमात्रच आहे. यास्तव ब्रम्हाकार परिणत झालेल्या त्या चित्ताचा क्षय कर. त्या चित्तक्षयाचें रूप तर चित्ताचें अधिष्ठान आत्माच आहे. शून्यता हें त्याचें रूप नव्हे. कारण अभाव हें परम पद नव्हे. चित्त एक क्षणभरही जर परमपदीं विश्रांत झालें तर तें ब्रम्हच झालें आहे असें समज. नंतर तें निरतिशय स्वप्रकाश आनंदाचा स्वाद घेत राहतें. नंतर तें तेथून व्युत्थान पावण्याची इच्छा करीत नाहीं. हें विचारानें आत्म्यांत विश्रांत होवो कीं योगानें होवो, पण एकदा एक क्षणभरही जर का तद्रूपत्वाम—सत्त्वतेस प्राप्त झालें तर पुनः संसारांत उदय पावत नाहीं. अविद्यारहित झालेल्या चित्ताला सत्त्व म्हणतात. ज्यांतील संसारबीज दग्ध झालें आहे असें तें पुनः ब्रम्हत्वाला अंतर देत नाहीं—आपलें ब्रम्हत्व सोडीत नाहीं. रामा ! कोणी सहस्रावधि लोकांत एकादाच अविद्याशून्य, सत्त्वस्थ, ज्याच्या वासना शांत झाल्या आहेत, असा होतसाता अज्ञदृष्टया शून्याप्रमाणें असलेली ती स्वयंप्रकाश ज्योति पाहतो व शांत होतो. हे सुभगा ! वर सांगितलेल्या तीन उपायांच्या

[1] आहाराचा क्षय केला असतां देह जसा आपोआप क्षय पावतो त्याप्रमाणं.

अभ्यासानें जाग्रत्स्वप्न-सुषुप्तिरूप भ्रांति व तिचें बीज, एतद्रूप पदें ज्याचीं क्षीण झालीं आहेत व जें स्वतःही अविद्याक्षयामुळें बाधित झालें असून दग्धपटाप्रमाणें प्रतिभासमात्र अवशिष्ट राहिलें आहे, असें मन या जविन्मुक्तावस्थेंत सत्व असें म्हटलें जातें. तें वासनाबीजशक्तीचा दाह झाल्यामुळें पुनः रागद्वेषाभिमानादि कलांनीं मलिन होणाऱ्या संसारपदास प्राप्त होत नाहीं. परिसाच्या स्पर्शानें सोनें बनलेलें तांबें जसें पुनः तांबें होत नाहीं, त्याप्रमाणें तें निर्मल मन—सत्व संसारपदास प्राप्त होत नाहीं.

---

## सर्ग ७० वा.

—:०:—

१ मायाभ्रांति जाऊन चिदात्मपरिशुद्धि होण्यासाठीं वेताल व राजा यांच्या संवादाची शुभ कथा.

**श्रीवसिष्ठ**:—विचारानें जीव तत्काल अजीव होतो व चित्त अचित्तत्वास प्राप्त होतें. अशा उपायानें झालेला जो कार्याविद्येचा व कारणाविद्येचा नाश त्यालाच मोक्ष म्हटलें जातें. मृगजळाप्रमाणें मन, अहंता इत्यादि मिथ्याच दिसतें. पण थोडासा विचार करतांच तें सर्व विलीन होतें. हे रामा! प्रसंगतः मला आठवलेले हे वेताळानें केलेले शुभ प्रश्न तूं या संसारस्वप्नभ्रांतीविषयीं ऐक. विंध्याद्रीजवळच्या महाअरण्यांत एक अतिधिप्पाड वेताळ आहे. तो वधाला योग्य असलेल्या अज्ञ जनांविषयींच्या अनादरानें एका देशांत अनात्मक लोकांची हिंसा करण्याच्या इच्छेनें आला. तो वेताळ पूर्वी एका सज्जन राजाच्या देशांत राजानें दिलेल्या अनेक वध्यजनांचा बळी खाऊन नित्यतृप्त होऊन निर्विक्षेप मनानें रहात होता. निरपराधी मनुष्य त्याच्यापुढें आला व त्या वेळीं तो वेताळ अतिशय क्षुधित जरी असला, तरी कारणावांचून त्याला तो मारीत नसे. कारण साधु न्यायदृष्टि असतात. अरण्य हेंच ज्याचें घर आहे असा तो पुष्कळ दिवस वध्य जनाचा लाभ न झाल्यामुळें, क्षुधेनें अतिशय प्रेरणा केली असतां न्याययुक्तीनें लोकांना खाण्यासाठीं नगरांत गेला. तेव्हां तेथें त्याला नगरांतील दुष्टजनांना जाणण्यासाठीं व चोरादिकांना मारण्यासाठीं रात्रीं फिरावयास निघालेला राजा भेटला. तेव्हां तो उग्र निशाचर मेघासारख्या घोर शब्दानें त्याला म्हणाला—

**वेताळः**—राजन्! तूं आतां मज भयंकर वेताळाच्या हातांत सांपडला आहेस. आतां जातोस कोठें? तूं आतां मेलास, असें समज. आज तूं माझें भोजन हो.

**राजाः**—हे निशाचरा! मला तूं न्यायाला सोडून जर बलात्कारानें खाशील तर तुझें मस्तक सहस्रधा फुटेल, यांत संशय नाहीं.

**वेताळः**—मी तुला अन्यायानें खाणार नाहीं. मी तुला असा न्याय सांगतों. तूं राजा आहेस. यास्तव याचकांच्या सर्व आशा पूर्ण करणें तुला उचित आहे. राजन्! माझी ही इच्छा तूं पूर्ण कर. ती तुला पूर्ण करतां येणार नाहीं, अशीहि नाहीं. मीं विचारलेले हे प्रश्न चांगल्या प्रकारें सांगण्यास तूं योग्य आहेस. ( तूं जर प्रश्नांचीं उत्तरें न देशील तर तुझ्या हातून असंख्य अपराध घडणें शक्य आहे. व उत्तरें देशील तर अपराधी नाहींस. ) कोणत्या सूर्याच्या किरणांचे ब्रह्मांडें हे परमाणु आहेत? कोणत्या वायूमध्यें महा आकाशरूपी रेणु उडत असतात? शेंकडों, हजारों स्वप्नांतून स्वप्नांत जाणारा व पुढच्या पुढच्या स्वप्नांत पूर्व पूर्व स्वप्नाची सत्यता सोडणारा असा कोण बरें आपलें अत्यंत प्रकाशरूप व स्वच्छ स्वरूप सोडीत नाहीं? ज्याप्रमाणें केळीच्या खांबांत एकाच्या आंत दुसरें, त्याच्या आंत तिसरें,

अशीं केवळ सोपटेंच असतात, त्यांत सारभूत असें कांहीं नसतें, त्याप्रमाणें सर्व पदार्थांच्या आंत आंत राहाणारा तोच तो एक अणु कोण बरें आहे? ज्या अणूच्या अपेक्षेनें अति मोठे म्हणून प्रसिद्ध असलेले—ब्रह्मांडें, आकाश, भुवनें, सूर्यमंडल, मेरु इत्यादि पदार्थही अत्यंत क्षुद्र आहेत व असें असलें तरी जो अणु आपलें अणुत्व सोडीत नाहीं, तो अणु कोण आहे? निरवयव व परम अणु असलेल्याच कोणत्या महापर्वताची—शिळेच्या मध्यभागीं असलेल्या निबिडतेप्रमाणें—केवळ सत्ता हेंच जिचें सार आहे अशी ही जगत्त्रयी आहे? हे राजा! या माझ्या सहा प्रश्नांचीं उत्तरें जर न दिलींस, तर दुष्ट देहादिकच ज्याचा आत्मा आहे असा तूं होशील. त्यामुळेंच अपरिच्छिन्न आत्म्याचा देहपरिच्छेदानें तूं घात केला आहेस असें होईल. अर्थात् प्रश्नांचीं उत्तरें न सांगणें, या अपराधामुळेंच, यम जसा जगाला खातो त्याप्रमाणें मी तुला एखाद्या फळाप्रमाणें बलात्कारानें गिळून तुझ्या देशांतील जनांनाही खाऊन टाकीन.

---

## सर्ग ७१ वा.

—:०:—

१ अनन्तकोटि ब्रह्मांडें हेच फलवृक्षादि आहेत, अशा कल्पनेने पहिल्या प्रश्नाचें समाधान.

**श्रीवासिष्ठः**—वेताळ असें बोलला असतां ज्यानें आपल्या शुभ्र दांतांच्या किरणांनीं आकाशाला धवल केलें आहे, असा तो राजा हसून प्रश्नांचीं उत्तरें सांगूं लागला.

**राजाः**—वेताळा! तूं व मींही ज्याचा आश्रय केला आहे, असें हें एक ब्रम्हांडफळ आहे. तें अज्ञांच्या दृष्टीनें अजर आहे. तें भू-जलादि उत्तरोत्तर दशगुण आवरणांनीं परिवेष्टित झालेलें आहे. या ब्रम्हांडफळासारखीं सहस्रावधि फळें जिच्यावर आहेत अशी एक फार मोठी विस्तृत शाखा आहे. तिच्यावर चंचल पल्लवांसारखीं भुवनें आहेत. तशा प्रकारच्या सहस्र शाखा ज्याला आहेत असा एक महावृक्ष आहे. त्याची आकृति अतिशय विपुल असून तो दुर्लक्ष्य आहे. तसे महावृक्ष जेथें सहस्र आहेत असें एक महावन आहे. त्यांत अनन्त वृक्षांचे गुल्म आहेत. तशा प्रकारचीं हजार वनें ज्यांत आहेत अशा शिखरानें युक्त असा एक सर्व बाजूंनीं विस्तार पावलेला पर्वत आहे. तसे सहस्रावधि पर्वत ज्यांत आहेत, असा एक अतिविस्तीर्ण देश आहे. त्याचा अन्तर्भाग फार मोठा आहे. तशा आकाराचे सहस्त्रावधि देश ज्यांत आहेत; असें एक मोठें द्वीप आहे. तें मोठमोठे डोह व नद्या यांनीं युक्त आहे. तशीं सहस्त्रावधि द्वीपें ज्यांत आहेत असें एक विचित्ररचनायुक्त महीपीठ आहे. तशा प्रकारच्या सहस्त्रावधि पृथ्वी ज्यांत आहेत असें एक अतिशय मोठें महाभुवनमंडळ आहे. तशीं सहस्र जगें ज्यांत आहेत असें एक फार मोठें व भयंकर आकाशपीठासारखें अंडें आहे. तशा प्रकारचीं सहस्र अंडीं हेच करंडे ज्यांत आहेत अशा तऱ्हेचा एक निश्चल विस्तीर्ण सागर आहे. तसले एक लक्ष सागर हा ज्यांतील एक बारीकसा तरंग आहे असा एक निर्मल व स्व-विलासरूप महासागर आहे. तसले सहस्त्रावधि महार्णव हें ज्याच्या उदरांतील जल आहे, असा एक पुरुष—विष्णु आहे. त्याचा आकार सर्व बाजूंनीं दाट भरलेला आहे. तशा लक्षावधि पुरुषांची माळा ज्याच्या वक्षःस्थळावर आहे व जें सर्व सत्तांचें प्रधान कारण आहे, असा पर पुरुष—रुद्र आहे. तसल्या महात्म्या पुरुषांची एक सहस्र संख्या शरीरावरील केंस व लोम यांप्रमाणें ज्याच्या स्वरूपांत स्फुरत आहे, असा महा आदित्य आहे. बाह्य-

दृष्टीनें रुद्रापासून ब्रह्मांडापर्यंत ज्या या असंख्य कल्पना—अनेक प्रतिभास आहेत, ते सर्व या आदित्याच्या दीप्ति आहेत. या आदित्याच्या दीप्तीचे ब्रह्मांडें हे त्रसरेणु आहेत. चिदात्माच हा अशा प्रभावाचा सूर्य आहे. असें मी तुझ्या प्रश्नाचें उत्तर देत आहें. हा या सर्व जगाला प्रकाशित करतो. विज्ञानात्माच हा शुभाशय परम सूर्य आहे. हे जे ब्रम्हांडांचे विस्तार आहेत ते याचेच त्रसरेणु होत. सूर्याच्या प्रकाशानें जशा दिनलक्ष्मी भासतात, त्याप्रमाणें विज्ञानरूपी परम सूर्याच्या प्रकाशानें या जगलक्ष्मी अनुभवास येतात व सत्तायुक्त होतात. अरे वेताळा ! वर वर्णिलेला शबल ब्रम्हलक्षण त्रैलोक्यमंडपाचा मणी जो सूर्य त्याच्या पारमार्थिक—तत्त्वभूत स्वरूपांत कर्तृत्व-भोक्तृत्वादि अनंत संभ्रमाचे हे सर्व उल्लेख आहेत. तें तत्त्व ज्ञानी पुरुषांच्या दृष्टीनें केवल विज्ञानमात्र आहे व अज्ञांच्या दृष्टीनें तें अस्फुट आहे. आत्मसाक्षात्कारवानांना तें प्रत्यगात्मरूपानें प्रतीत होतें, व अज्ञानी जनांस अज्ञात असतें. असो; पण याप्रमाणें त्यांत जरी हे सर्व भ्रम भासत असले तरी परमार्थदृष्टीनें ते मुळींच नाहींत. यास्तव तूं प्रश्नाच्या भानगडींत न पडतां शांत रहा.

---

## सर्ग ७२ वा.

—:०:—

१ या सर्गांत बाकी राहिलेल्या पांच प्रश्नांचीं उत्तरें राजा सांगतो.

**राजाः**—( वर सांगितल्याप्रमाणें पहिल्या प्रश्नाचें उत्तर सांगून राजा " कोणत्या वायूंत महाकाशरेणु उडतात ? " या दुसऱ्या प्रश्नाचें उत्तर सांगतो— ) कालसत्ता, आकाशसत्ता, चिन्मयी क्रियाशक्तिप्रधान सूत्रात्मसत्ता व शुद्धचेतनाहून निकृष्ट असलेल्या चिदाभासाची सत्ता इत्यादि सर्व अत्यंत सूक्ष्म असल्यामुळें पवित्र रज आहे. तें परमात्ममहावायूंत कल्पित अनेक विकारांनीं चंचल होऊन स्फुरतें. ' अहो, पण परमात्मा सर्वानुगत सत्तास्वरूप असतांना त्यांत कालादि सत्ता स्फुरते, असा आधार-आधेयभावानें निर्देश कसा करितां ?' म्हणून म्हणशील तर सांगतों—जसें पुष्पच आपल्या अंगांत सुवासरूप भेदाला कल्पून आधार-आधेयरूपानें तें स्वतःच राहतें, त्याप्रमाणें परमार्थसत्ता आपल्यामध्यें कालादि सत्ता कल्पून स्थित आहे. ( ' एका स्वप्नापासून दुसऱ्या स्वप्नांत जाणारा ' इत्यादि तिसऱ्या प्रश्नाचें उत्तर— ) या जगद्रूप महास्वप्नांत एका स्वप्नांतून दुसऱ्या स्वप्नांत जाणारें ब्रम्ह आपलें रूप सोडीत नाहीं; तर तें त्या त्या स्वप्नदोषांनीं रहित—त्या दोषांनीं लिप्त न होणारें असें असंग ज्योतिःस्वरूप आहे. त्याच्या केवल बोधानें ब्रम्ह—शांतीची निरतिशय वृद्धि होते. ( चवथ्या प्रश्नाचें उत्तर— ) केळीचा खांब जसा एकांत एक अशा केवळ सोपटांनीं बनलेला असतो, तसेंच हें जगत् ब्रह्माच्या आंत आंत विवर्त पावणारें आहे. त्याचप्रमाणें अवांतर कारणांत परिणाम पावणारें आहे. यास्तव तो अणु त्याच्याहि आंत आंत आहे. विवर्तरूप जगाला परिपुष्ट करणें इत्यादि निमित्तानेंच ब्रम्ह, सत्, आत्मा इत्यादि शब्दांनीं त्याचा निर्देश केला जातो. पण वस्तुतः तो अणु आत्मा सर्वधर्मशून्य आहे. त्याचा शब्दांनीं उल्लेख करतां येत नाहीं. म्हणूनच पटसत्ता तंतूच्या सत्तेंत पर्यवसान पावते, तंतुसत्ता कार्पाससत्तेंत, कापसाची सत्ता त्याच्या बोंडाच्या—फळाच्या सत्तेंत, फळाची सत्ता कापसाच्या झाडाच्या सत्तेंत, झाडाची सत्ता बीज-माती-पाणी इत्यादि कारणसत्तेंत, इत्यादि क्रमानें ज्या ज्या सत्तेची कल्पना करावी ती ती त्या त्या अनुभवानें

निर्मिलेल्या आकारास सोडून केळीच्या खांबाप्रमाणेंच त्या त्या पदार्थांच्या अनुभवरूप चिन्मात्रांत पर्यवसान पावते. यास्तव तेंच निर्मल चिन्मात्र जगदाकारानें विस्तार पावलें आहे. ( तर मग त्याला अणु कां ह्मणतात? उत्तर— ) हा परमात्मा अतिशय सूक्ष्म आहे व त्यामुळेंच तो कोणत्याही बाह्य किंवा आंतर इंद्रियांनीं उपलब्ध होत नाहीं. म्हणून तो अत्यंत अणु आहे. अनन्त—अपरिच्छिन्न असल्यामुळें तोच मेरुप्रभृति पांच पदार्थांचाही मूळ आधार झाला आहे. अणु म्ह० अत्यंत सूक्ष्म असलेल्याही या अनंत पुरुषाच्या अपेक्षेनें हे जगापासून ब्रह्मांडापर्यंतचे पांच पदार्थ परमाणूप्रमाणें भासतात. कारण ते अत्यंत अणु असलेल्या तत्तदाकारवृत्तींनीं परिच्छिन्न झालेले जे चित्कण त्यांनीं परिच्छेद्य असल्यामुळें निःस्वरूप आहेत. स्वप्नांत दिसलेल्या ब्रह्मांडादिकांप्रमाणें जागृतींत अत्यंत सूक्ष्म नाड्यांत भासणारें जगदादिकही परमाणुप्रमाणेंच आहे. ( या उत्तरानेंच पांचव्या प्रश्नाचें उत्तरहि दिलें आहे, असें समजून आतां शेवटच्या सहाव्या प्रश्नाचें उत्तर राजा देतो— ) हा परमात्मा चक्षुरादि इंद्रियांनीं अग्राह्य असल्यामुळें परम अणु आहे व सर्वतः व्याप्त असल्यामुळें महापर्वत आहे. अध्यारोपदृष्टीनें हा पुरुष सर्वावयवरूप जरी असला, म्ह० मूर्त व अमूर्त असें सर्व त्याच्या अवयवरूप जरी असलें, तरी अपवाददृष्टया निरवयव आहे. हा जो केवळ ज्ञप्तिरूप पुरुष त्याच्या साररूप ही जगत्रयी आहे. कारण हे साधो! हृदयाकाशरूप विज्ञानमात्राच्या आंत जगत्त्रय मज्जेप्रमाणें स्थित आहे. असें तूं समज. हे वेतालबालका! सर्व जगें हें विज्ञानमात्राच्या कौशलांचें प्रकट होणेंच आहे. तें आत्मविज्ञानरूप तुझ्यासारख्या वेतालमूर्खांना उल्लंघन करतां येण्याजोगें नाहीं. यास्तव माझ्या उपदेशानें तूं अशा स्वभावाच्या आत्म्याचा अनुभव घे व सर्व दर्प सोडून शांत रहा. ७१.

---

## सर्ग ७३ वा.

१ वेताळाच्या प्रश्नांचा निर्णय करून भगीरथाचा वृत्तांत सांगण्यास आरंभ करितात.

**श्रीवसिष्ठः**—असें राजाच्या मुखांतून ऐकून वेताळ शांत झाला. विचारोचित बुद्धीनें त्यानें आत्म्याची भावना केली. त्याचें मन उपशांत झालें. आणि एकान्तच अनिंदित आहे असें समजून व असह्य क्षुधेलाहि विसरून तो समाधिस्थ झाला. हे रामा! मीं हा तुला वेताळाच्या प्रश्नांचा समूह सांगितला. राजानें वर्णन केलेल्या क्रमानें हें जगत् चिद्रूप अणूमध्यें संस्थित आहे. लहान मुलाच्या भ्रांतीनें कल्पिलेल्या वेताळशरीराप्रमाणें चिदणूच्या उदरांत असलेलें हें जगत् विचारानें विलीन होतें. त्यानंतर जें अवशिष्ट राहतें तेंच तें पद आहे. स्थिर चित्तानें चित्ताचा सर्व बाजूंनीं उपसंहार करून परमात्म्यामध्यें त्याला प्रतिष्ठित कर आणि निरिच्छ व शांतचित्त होऊन रहा. हे मननशीला! मनानेंच मनाला आकाशासारखें स्वच्छ करून एकाच वस्तूमध्यें सर्व वृत्तींचा लय कर. त्यामुळें शांतात्मा—शांतचित्त व त्यामुळेंच समब्रह्मदर्शी, स्थिरबुद्धि व असंमूढ हो. म्हणजे जें प्रारब्धानें प्राप्त होईल त्याचेंच अनुवर्तन करणाऱ्या भगीरथ राजाप्रमाणें, इतरांना कष्टसाध्य असलेलें कार्यही तुला अनायासानें सिद्ध करतां येईल. ज्याचें मन संपूर्ण व शांत आहे, ज्याची वृत्ति सर्वतः तृप्त आहे, व जो आंतून सम व सुखमय आत्म्यामध्यें नित्य स्थित आहे, त्याचे वांछित अर्थ अत्यंत दुर्लभ जरी असले तरी सगर, अंशुमान्, दिलीप

इत्यादिकांना अत्यंत दुर्लभ झालेल्या, व सगर-पुत्र व त्यांनीं खणलेला सागर यांना संजविन देणाऱ्या मण्याप्रमाणें असलेला गंगावतार शांति-तृप्ति-समदर्शितादि गुणसंपन्न असलेल्या भगीरथाला अनायासानें जसा साध्य झाला, तसे साध्य होतात. ७३.

---

## सर्ग ७४ वा.

१ या सर्गात भगीरथाचे गुण, विचारजन्य चिन्ता, त्रितलाशीं संवाद व त्यागेच्छा यांचे वर्णन केले जातें.

**श्रीराम:**—हे प्रभो! राजा भगीरथाच्या पूर्णतादिलक्षण चित्तचमत्कारानें गंगावतरण कसें झालें, तें मला सांगा.

**श्रीवसिष्ठ:**—भगीरथ ह्मणून समुद्रयुक्त भूमीचा एक परम धार्मिक राजा होता. आपल्या कोसलमडलीचा तो जणुं काय तिलकच होता. या चंद्रासारख्या प्रसन्नमुख भगीरथ राजापासून याचकांना याचनेचा संकल्प केल्या-नंतर लागलीच, चिंतामणिपासून जसा, त्याप्रमाणें यथाभिमत–इष्ट अर्थ प्राप्त होत असे. तो साधूंच्या व्यवस्थेसाठीं (सत्पात्रीं) सतत दान देत असे. कामधेनु ही जसें तृणही भक्षण करते, टाकीत नाहीं, त्याचप्रमाणें तो राजा धर्मानें प्राप्त झालेलें तृणही सोडीत नसे. जसा वज्राला वेध करणारा मणि खालून वट्ट आवळून धरलेल्या दुसऱ्या अतिशय वज्रसाराला वेध करतो, त्याप्रमाणें तो सर्व दुर्जनांच्या चेष्टांना वेध करून त्यांना बंद करीत असे. अहोरात्र प्रजापालनासाठीं सर्वत: परिभ्रमण केल्यामुळें तो स्वत: जरी श्रांत होत असे, तरी सूर्य घरांतील रात्रींच्या अंधकाराला व व्यवहारदैन्याला जसा घालवितो, त्याप्रमाणें धूमरहित अग्नीप्रमाणें ज्याची देहशोभा आहे असा तो, लोकांचें अधर्माला कारण होणारें अज्ञान व दारिद्र्य घालवीत असे. आपल्या पराक्रमापासून उद्भवलेल्या अग्निकणांच्या धारांचा वर्षाव करणारा तो भगीरथ शत्रूंच्या ठिकाणीं मध्यान्हकालीं उत्पन्न झालेल्या सूर्यकान्त शिळेच्या अग्नीप्रमाणें प्रदीप्त होत असे. स्निग्ध चंद्राच्या समीप चंद्रकांतमणि जसा द्रवतो, तसा तो राजा ज्याचा स्पर्श मृदु व शीतळ आहे असा होत्साता, ब्रम्हवेत्त्यांच्या सांनिध्यांत त्यांच्या मनाला आल्हाद देऊन द्रवयुक्त करीत असे. त्यानें स्वर्ग व पाताळ यांतून वाहणाऱ्या जगाच्या यज्ञोपवीतरूप गंगाप्रवाहाचा तिसरा पदर या पृथ्वींत तिला उतरावयास लावून पुरा केला. चातकांच्या मोठ्या संघाला मेघ जसा तृप्त करतो, त्याप्रमाणें त्यानें अगस्तीनें शोषून टाकलेल्या व त्यामुळें दुष्पूर झालेल्याही सागराला गंगेच्या पुरानें भरून सोडलें. त्या लोकबंधूनें, भूतांचा द्रोह केल्यामुळें व ब्रह्मदंडानें दग्ध झाल्यामुळें पाताळांत राहणाऱ्या–अधोगतीस प्राप्त झालेल्या बांधवांना–सगरपुत्रांना गंगारूप सोपानपद्धतीनें ब्रम्हलोकांत नेऊन प्रतिष्ठित केलें. ब्रम्हदेव, शंकर, जन्हु यांचें तपानें आराधन करणाऱ्या त्याला, ज्याचा निश्चय अविच्छिन्न आहे, अशा त्याच्याच मनापासून वारंवार खेद होत असे. असो. अशा त्या तुजप्रमाणेंच अगदीं भर तारुण्यांत असलेल्या व अत्यंत आकुल झालेल्या या लोकयात्रेचा विचार करणाऱ्या राजाच्या मनांत, मरुस्थळीं जशी वेल उगवावी त्याप्रमाणें अत्यंत वैराग्यचमत्कार व त्यामुळेंच विचाराचा लेश अगदीं तरुण वयांतही उत्पन्न झाला. तो राजा एकान्तांत बसून या जगद्यात्रेचा असा विचार करूं लागला. सतत असमंजस व आकुल असा

१ दान देताना त्याला मोठा संतोष वाटे. खिन्न होऊन तो दान देत नसे.

२ याचकाला संकल्प केल्यावर राजाकडे जाण्याचे वगैरे आयास करावे लागत नसत.

हा दिवस पुनः पुनः येतो. रात्र पुनः पुनः येते. तेंच तें दान व तेंच तें आदान पुनः पुनः अनुभवास येतें. ज्याचें फल पुनः पुनः भोगल्यामुळें त्याविषयींची रुचि अगदीं नाहींशी झाली आहे, असेंच कर्म सर्व प्राणी पुनः पुनः करीत असलेले दिसतात. एकादें अपूर्व किंवा परमार्थ हें ज्याचें फळ आहे, असें कर्म करीत असलेले कोणी फारसे आढळत नाहींत. जें प्राप्त झालें असतां या लोकांत कांहीं अधिक प्राप्य अवशिष्ट रहात नाहीं, तेंच करणें याला मी सुकृत समजतों. बाकीच्या क्षुद्र फळांच्या प्राप्तीचें साधन असें जें कर्म तें अशुद्धि व दुःख हेंच फळ देणारें आहे. पुनःपुनः तेंच तें कर्म करणाऱ्या मूढबुद्धि मनुष्याला लाज वाटत नाहीं. पण मूर्खाप्रमाणें हें असें दुसरा कोणता विचारी मनुष्य करील ? याप्रमाणें आपल्यापाशींच पुष्कळ विचार केल्यावर एकदा उद्विग्नचित्त झालेला व संसाराला फार भ्यालेला तो भगीरथ आपल्या त्रितल गुरूला असें विचारता झाला.

भगीरथः—प्रभो ! दीर्घकाल भ्रमण करणाऱ्या जीवांच्या या निःसार रागद्वेषादि संसारवृत्तींत, व त्यांच्या फलभुत स्वर्ग-नरक-मानुष्यादि अरण्यांत आम्ही अत्यंत खिन्न झालों आहों. भगवन् ! या जरा-मरण-मोहादिरूप संसारकारी सर्व दुःखांचा अंत कसा होईल ?

त्रितलः—राजन् ! साधनचतुष्टय-श्रवण-मनन इत्यादि उपयांनीं दीर्घ काल ज्याचा अभ्यास केला आहे अशा साम्यानें—विक्षेपवैषम्यशून्य समाधीनें व अनादिसिद्ध ब्रम्हाकारानें आविर्भूत झालेल्या प्रत्यक्तत्त्वाच्या पूर्ण व एकरस बोधानें सर्व दुःखें क्षीण होतात. सर्व ग्रंथि—कामना सर्व बाजूंनीं तुटतात; संशय व सर्व कर्मे समत्वास प्राप्त होतात. विवेकी संशुद्ध व ज्ञप्तिरूप आत्म्याला ज्ञेय समजतात. तो सर्वगत व नित्य आहे. तो उदय पावत नाहीं व अस्त पावत नाहीं.

भगीरथः—हे मुनीश्वर ! चिन्मात्र, निर्गुण, शांत, निर्मल व अच्युत—निर्विकार तत्त्व आहे, देहादि दुसरें कांहीं नाहीं, असें मी आपल्या सांगण्यावरून समजतों. पण त्याचें अमान करविणारा अज्ञानांश व द्वैत भासविणारा विक्षेपांश शांत होत नाहीं. ह्म० सदसद्विवेक व बोध यांतील सदात्मबोधरूप प्रतिपत्ति हातावर ठेवलेल्या आंवळ्याप्रमाणें स्पष्टपणें होत नाहीं, याचें काय बरें कारण आहे ? भगवन् ! मी सर्व विक्षेपांच्या शांतीनें केवल त्या तेवढ्याच संवित्तीनें युक्त कसा होईन ?

त्रितलः—चित्त हृदयाकाशांत अमानित्वादि ज्ञानोपायांनीं ज्ञेयनिष्ठ होतें. त्यामुळें जीव पूर्णस्वभाव होऊन त्यापासून पुनः च्युत होत नाहीं. कर्मामध्यें व त्याच्या फळामध्यें आसक्ति न ठेवणें, पुत्र, स्त्री व गृहादिक यांत हीं माझीं असा अभिनिवेश न ठेवणें, इष्ट व अनिष्ट यांची प्राप्ति झाली असतां नित्य समचित्त असणें, आत्म्याशीं अनन्य योगानें मिळून जाणें व सतत त्याचीच भावना करणें, एकांत व पवित्र देशाचें सेवन करणें, जनसमूहांत रति नसणें, श्रवण-मनन-निदिध्यासनाचा अभ्यास करणें, तत्त्वज्ञानानें परमार्थतत्त्वाचें स्पष्ट दर्शन, हे ज्ञानाचे उपाय ह्म० ज्ञान आहे. याच्या जें उलट तें सर्व अज्ञान. हें ज्ञान राग व द्वेष यांचें क्षय करणारें आहे. संसाररूप व्याधीचें हें औषध आहे. सर्व साधनांचें अनहंकार हें मूळ साधन आहे. यास्तव हे राजन् ! अहंभावाची शांति झाली असतां ज्ञान प्राप्त होतें.

भगीरथः—हे महाभाग ! पर्वतावरील वृक्षाप्रमाणें आपल्या या शरीरांत दीर्घकालापासून आरूढ झालेला हा जो अहंभाव त्याचा कसा त्याग करतां येईल तें मला सांगा.

त्रितलः—पुरुष-प्रयत्नानें विषयांविषयींची वासना सोडून व कामोपहत न झाल्यामुळें स्पष्ट झालेल्या शुद्ध आत्माकारतेस प्राप्त होऊन राहिलेल्या पुरुषाचा अहंकार विलीन होतो. 'मीं राज्य टाकलें तर लोक मला मानणार नाहींत, शत्रु मला हंसतील. सर्वांच्या इच्छा पूर्ण करण्यास समर्थ असलेल्या मीं भिक्षाटन कसें करावें? कदन्नानें व हलक्या पानानें मीं जिवंत कसा राहूं शकेन?' इत्यादि चिंतांमुळें प्राप्त झालेली लज्जा, अभिमान इत्यादिकांमुळे गृहांत पूर्वीप्रमाणेंच अडकून राहणें, हाच पिंजरा जोंवर सर्वस्वत्यागानें भग्न झाला नाहीं, तोंवर अहंकार अत्यंत विकसित होऊन नाच करणारच. यास्तव आपल्या विवेकशालिनी बुद्धीनें तूं त्या सर्व लज्जादिकांचा त्याग करून जर निश्चल राहशील, तर तुझा अहंकार तत्काल विलय पावून तूंच परमपद होशील. ज्याचीं अनेक छत्र-चामरादि विशेषणें शांत झालीं आहेत, असा, निर्भय, ज्यानें सर्व एषणांचा त्याग केला आहे असा, व खरोखर अकिंचन होऊन, तूं सर्व श्री शत्रूंच्या ठिकाणीं सोपवून सर्व देहाभिमान टाकून दे. शत्रूंच्या घरीं भिक्षा माग. मज गुरूचाही संतुष्टचित्त होऊन त्याग कर. कारण तूं जर अशा मुमुक्षूंच्या सर्व उच्च लक्षणांनीं संपन्न झालास तर तूं सर्वोत्तम ब्रह्मच आहेस. मग तुझ्या ठिकाणीं संसाराची संभावनाही नाहीं.

---

## सर्ग ७५ वा.

१ यज्ञाच्या मिषानें राजाचा सर्वस्वत्याग. २ भैक्ष्यचर्या, व ३ एका पर्वतावर त्रितलासह स्थिति.

श्रीवासिष्ठः—नंतर त्या गुरूच्या तोंडून असें ऐकून भगीरथ आपल्या मनांत पुढील कर्तव्याचा निश्चय करता झाला, आणि आपल्या व्यापारांत तत्पर झाला. त्यानंतर कांहीं दिवस लोटल्यावर सर्वस्वत्याग हेंच एक इष्ट सिद्ध होण्यासाठीं अग्निष्टोमापासून विश्वजित्क्रतूपर्यंत सोमसंस्था त्यानें करण्यास आरंभ केला. त्यानें गायी, भूमि, घोडे, सोनें, इत्यादि सर्व धन, हा श्रुताध्ययनसंपन्न आहे कीं नाहीं याचाही फारसा विचार न करितां द्विजांना व आपल्या बंधूंना दिलें. फक्त तीनच दिवसांत सर्वस्वाचा परित्याग करणारा तो राजा भगीरथ, प्राणच ज्याचे अवशिष्ट राहिले आहेत असा झाला. नंतर ज्यांतील प्रकृतिप्रधानादिक व नागरिक अतिशय खिन्न झाले आहेत व जें सर्व प्रकारच्या वित्तानें हीन आहे असें राज्य त्यानें आपल्या समीपवर्ती शत्रूला तृणाप्रमाणें दिलें. त्याबरोबर शत्रूनें त्याचें राज्य, राजगृह व देश यांना व्यापलें असतां केवळ कौपीन व त्यावरील आच्छादन एवढेंच ज्याचें अवशिष्ट राहिलें आहे असा तो मुनि आपल्या देशांतून निघाला. जेथें त्याला नांवानें कोणी ओळखीत नाहीं व लोकांच्या तोंडून आपलें नांवही ऐकूं येत नाहीं, अशा दूरच्या गांवांत व अरण्यांत तो धैर्यवान जाऊन राहिला. अशा रीतीनें राहणारा तो थोड्याच कालांत सर्व एषणारहित झाला. त्याच्या पुत्रवित्तलोकैषणा शांत झाल्या. तो परम शमानें आत्म्यामध्यें विश्रांति पावला. तो एकदां कालयोगानें नदी-नद इत्यादिकांनीं अंतरित झालेल्या भूलोकच्या द्वीपांतून भ्रमण करीत असतांना, त्याचें चित्त आत्मदर्शनाधीन झाल्यामुळें, आपण कोठें जात आहों याचेंही भान न राहून शत्रूनें व्यापलेल्या आपल्याच त्या पुरांत आला. तेथें तो शमसंपन्न मुनि क्रमानें पुढें आलेल्या निरनिराळ्या घरांत जाऊन नागरिक जन व मंत्री यांच्यापाशीं भिक्षा मागूं लागला. तेव्हां त्या नगरवासी जनांनीं व मंत्र्यांनीं भगीरथ राजाला ओळखलें व मोठ्या खिन्न चित्तानें अर्घ्यादि

पूजासामग्रीनें त्याची पूजा केली. 'हे प्रभो! तूं हें आपलें राज्य संभाळ' असें ह्मणून शत्रूनें जरी प्रार्थना केली, तरी त्यानें त्याचा स्वीकार केला नाहीं. त्यानें सर्वांचा अनादर केला. फक्त अन्नावांचून दुसऱ्या कशाचाही—कस्पटाचाही तो संग्रह करीत नसे. असो. याप्रमाणें त्या पुरांत कांहीं दिवस घालवून तो दुसऱ्या कोठें गेला. त्याला पाहून 'हाय हाय! या भगीरथाची काय ही दशा!' असें म्हणून त्याला जाणणारे सर्व लोक अतिशय हळहळत असत. नंतर चित्त अतिशय शांत झालें आहे आणि आत्म्यावांचून दुसऱ्या सर्व वस्तूंविषयीं ज्याचें मन विश्रांति पावलें आहे असा तो अत्यंत सुखी राजा एकदा आत्म्यामध्येंच आराम पावलेल्या आपल्या त्रितल गुरूपाशीं आला. त्याला वंदनादि करून त्यासहवर्तमान भगीरथ कांहीं काल पर्वत, वन, ग्राम, पुर व जन यांत राहिला. ते दोघेही गुरुशिष्य समत्वास प्राप्त झाले, सम राहिले; व स्वरूपांत स्थित असलेले ते देहधारण करणें हा विनोद आहे, असें समजले. हा देह आम्ही कशाला धारण करीत आहों? किंवा याला सोडलें ह्मणून तरी आमची काय हानि आहे? किंवा त्याला सोडून तरी काय करावयाचें आहे? शास्त्रोक्त क्रमानें व वृद्धांच्या आचाराला अनुसरून हा जसाच्या तसाच राहो, असा निश्चय करून राहणारे ते दोघे एका वनांतून दुसऱ्या वनांत, दुसऱ्यांतून तिसऱ्यांत असा संचार करीत ज्यांत विषयानंदाचा लेशही नाहीं अशा परानंदास प्राप्त झाले. तो परानंद दुःखरहित व सुखदुःखांच्या अन्तरालावस्थेनेंही रहित होता. ( मनुष्यभोगांप्रमाणें दिव्यभोगांविषयींही ते दोघे अत्यंत विरक्त झाले होते, असें सांगतात—) त्यांच्या चरित्रांनीं संतुष्ट झालेल्या ब्रह्मदेवादि सिद्धांनीं धनें, घोडे, अणिमादिसंज्ञक आठ प्रकारचें ऐश्वर्य त्यांना दिलें. पण त्यालाही त्यांनीं वाळलेल्या तृणाप्रमाणें जाणलें. हा देह आयुष्य संपेपर्यंत प्रारब्धकर्मानेंच धारण करणें उचित आहे, असें समजून मोठ्या नाखुषीनें ते स्वकर्माचें आचरण करीतच राहिले. ते दोघे अभीष्टरहित मुनि आपल्या पूर्वकर्माच्या क्रमानें प्राप्त झालेलें सुख व दुःख या दोघांचेंही एकसारखेंच अभिनंदन करीत असत. कारण ते समाहूनही अत्यंत सम असें जें ब्रह्म त्यांत आतिसम—एकरसीभूत झाले होते आणि स्वतः तत्स्वभावामुळेंच परमशांतिमन्त होते.

## सर्ग ७६ वा.

—:०:—

१. या सर्गांत भगीरथाची पुनः राज्यप्राप्ति व २ ब्रह्म-रुद्रादिकांच्या आराधनेनें गंगेचें अवतरण सांगतात.

**श्रीवसिष्ठः**—नंतर एकदा कोसलदेश व भगीरथाचा राहण्याचा देश या दोन्ही देशांहून एका अगदीं निराळ्या देशांतील एका श्रेष्ठ नगरांत, मत्स्य जसा क्षुद्र माशाला मारतो त्याप्रमाणें, मृत्यु एका अपत्यहीन राजाला मारता झाला. त्यामुळें जिच्या देशपालनाची मर्यादा नष्ट झाली आहे अशी खिन्न झालेली तेथील प्रजा पालन करण्यास समर्थ अशा विशाल गुणलक्ष्मीनें युक्त असलेल्या राजाचा शोध करूं लागली. तेव्हां त्या प्रजेला हा भगीरथ राजा आढळला. हा स्थिर भिक्षाचर मुनि सर्व गुणलक्ष्मीनें युक्त आहे, असें जाणून व त्याला सैन्यांत आणून तिनें अभिषेक केला व राजा बनविलें. जसें एकादें सरोवर पावसाळ्यांत पाण्यानें भरून जातें, त्याप्रमाणें एका क्षणांत फार मोठ्या सैन्यानें वेष्टित झालेला राजा भगीरथ झटकन हत्तीवर आरूढ झाला. 'जगाचा

नाथ जो भगीरथ राजा त्याचा जयजयकार असो!' अशा लोकांच्या आरोळ्यांनीं मोठमोठ्या पर्वतांच्या मोठाल्या गुहा भरून गेल्या. तेथें त्या राज्याचें पालन करणाऱ्या त्या भगीरथ राजापाशीं त्याच्या पूर्वीच्या—मंत्री, पुरोहित वगैरे प्रकृति मोठ्या आदरानें आल्या, व त्या नृपाला असें बोलल्या.

प्रकृतिः—हे राजन्! तूं पूर्वी राज्यत्याग करतांना आह्मांला जो सामन्त शत्रु राजा करून दिला होतास त्याला, मत्स्यानें मृदु आमिषाला जसें खावें त्याप्रमाणें, मृत्यूनें गिळून टाकलें आहे. यास्तव त्या आमच्या राज्याचें पालन करण्याचीही कृपा आह्मांवर करण्यास तूं योग्य आहेस. इच्छा न करितां यदृच्छेनें प्राप्त झालेल्या अर्थाचा त्याग करणें उचित नाहीं.

श्रीवसिष्ठः—याप्रमाणें प्रार्थना केला गेलेला राजा त्या प्रकृतीच्या त्या वचनाचा अंगिकार करता झाला. सात सागर हेंच जिचें चिन्ह आहे अशा पृथ्वीचा तो पति झाला. तो सर्वत्र समदृष्टि, शांतचित्त, मौनी, आसक्तिशून्य, मत्सररहित, प्राप्त होईल तेवढेंच कार्य करणारा, ज्याचा सर्व विस्मय गुप्त झाला आहे, म्हणजे तत्त्वज्ञानानें त्याचा विस्मय बाधित झाल्याकारणानें फार मोठें कौतुक पाहूनही आश्चर्यचकित न होणारा, असा होता. 'तुझे पितामह सगरपुत्र पित्याचा अश्व हुडकण्यासाठीं भूमीला खोदते झाले. त्यांनीं पृथ्वीला खणून सागराकार छिद्र केलें, पण तेथें तपश्चर्या करणाऱ्या कपिलाचा त्यांच्या हातून अवमान झाला. त्यामुळें कपिलाला क्रोध आला. त्या क्रोधाग्नीनें त्या साठ सहस्र सगरपुत्रांना भस्म करून अधोगतीला नेलें. भस्मीभूत झालेल्या त्यांचें गंगाजलानें पावन झालें असतां, गंगाजलानें तें त्यांचें भस्म भिजून वाहून गेलें असतां व गंगेच्या पाण्यानें त्यांना उद्देशून जलांजलि दिली असतां त्यांचा उद्धार होईल,' हें गरुडाचें वचन त्या राजानें लोकांच्या तोंडून ऐकलें. त्या वेळीं गंगा भूतळीं वाहत नव्हती. ती स्वर्गांतच होती. त्या भगीरथामुळेंच गंगाजलांजलि अन्य पितरांचाही उद्धार करणारी आहे अशी प्रख्याति झाली. त्या दिवसापासून भगीरथ राजानें गंगेला स्वर्गांतून भूलोकीं आणण्याचा नियम केला, आणि त्यानंतर मंत्र्यांवर राज्याचा भार टाकून तो शमसंपन्न राजा, गंगेला भूमीवर आणणें, या कार्यासाठींच जें तप वगैरे अनुष्ठान त्याकरितांच सर्व क्रिया करणारा असा होत्साता निर्जन वनास गेला. तेथें असंख्य वर्षांनीं पुनः पुनः ब्रह्मदेव, शंकर व जन्हु यांची आराधना करून त्यानें गंगेला भूमीवर आणलें. तेव्हांपासून निर्मल तरंगांनीं अत्यंत कुटिल होणारी—सुंदर दिसणारी, जगत्पति शंकराच्या मस्तकाशीं संगत झालेली त्रिमार्गगा[१]—गंगा आकाशांतून महात्म्यांच्या बहुपुण्यसंततीप्रमाणेंच पृथ्वीवर पडूं लागली. स्फुरण पावणारे जे तरंग त्यांनीं कुटिल गमन करणारी, आपल्या फेनपुंजांनीं जणुं काय हंसणारी, प्रसन्न पुण्यमंजरीनें युक्त अशी जणुं काय धर्माची वेलच, आणि भगीरथ राजाचे ठिकाणींच्या यशाचा समुद्रापर्यंत प्रचार होण्यासाठीं जणुं काय मार्गच, अशी ती त्रिमार्गगा भूतलीं त्या वेळीं अवतीर्ण झाली.

---

१ स्वर्ग, भूतळ व पाताळ या तीन मार्गांनीं जाणारी.

## सर्ग ७७ वा.

—:०:—

१ रामाचा बोध दृढ होण्यासाठीं चूडालेच्या आख्यानाचा आरंभ, शिखिध्वजाचें माहात्म्य, विवाह, क्रीडाक्रम.

**श्रीवसिष्ठः**—भगीरथानें मागाहून राज्याच्या वेळीं बुद्धीनें धारण केलेल्या या दृष्टीचा आश्रय करून तूं सम, स्वस्थ व शांतबुद्धि होऊन कार्य जसें प्राप्त होईल, तसेंच तें कर. अगोदर या सर्व वैभवाचा त्याग करून व मनोरूप पक्ष्याला हृदयांत निरुद्ध करून तूं शिखिध्वज राजाप्रमाणें आत्म्यामध्यें शांत रहा.

**श्रीरामः**—हा शिखिध्वज म्हणून कोण आहे? त्याला परम पदाची प्राप्ति कशी झाली? हें मला पुनरपि ज्ञानाच्या विशेष वृद्धीसाठीं सांग.

**श्रीवसिष्ठः**—एक दांपत्य—पतिपत्नी पूर्वकल्पांतील द्वापरांत होतें व पुढें या अठ्ठाविसाव्या चतुर्युगांतील द्वापरांतही तें त्याच आकाराचें पुनः होईल. ती पत्नी व तो तिचा पति यांचें एकमेकांवर अतिशय प्रेम होतें.

**श्रीरामः**—हे वक्त्यांतील श्रेष्ठा! जें पूर्वीं होतें तेंच आतां पुनः तसेंच कां होईल? तें मला सांगा.

**श्रीवसिष्ठः**—रामा! जगाला उत्पन्न करण्याविषयीं नियतिरूप अशी जी ब्रह्मदेवादिकांची सत्यसंकल्पात्मक संविद् तिची अशीच अवस्थिति आहे. तिचा स्वभाव अनिवार्य आहे. म्हणजे एकाच आम्रवृक्षावर निरनिराळ्या प्रकारचीं पुष्कळ फळें येऊन पुनः तसलीं तसलीं फळेंही अनेक होतात. वडाच्या झाडाची शाखा पूर्वीं वृक्ष नसतांनाच, तिला तोडून जमिनींत लाविलें असतां ती वृक्ष बनते. पण त्याला तोडून टाकलें असतां पुनः त्यापासून वृक्ष होत नाहीं. तात्पर्य, सरोवरांतील लहरीप्रमाणें कांहीं पदार्थ पूर्वीच्या आकाराचे होतात व कांहीं अगदीं निराळ्या आकाराचे होतात. ससारांत त्याच त्या किंवा त्याहून निराळ्या व्यवस्था दिसतात. म्हणून पूर्वीच्या राजासारखाच पुनरपि पुढील कथेचा महातेजस्वी ईश्वर होईल. त्याचा हा वृत्तान्त ऐक. पूर्वीं होऊन गेलेल्या सातव्या मनूच्या अन्तरांत, चवथ्या चतुर्युगांतील द्वापरांत, याच सर्गांत कुरूच्या कुलामध्यें जंबुद्वीपांत प्रसिद्ध असलेल्या विंध्यपर्वताच्या अगदीं समीप मालवांच्या उज्जयिनी नगरांत श्रीमान् शिखिध्वज म्हणून राजा झाला. धैर्य, औदार्य या दशांनीं युक्त, क्षमा, शम, दम, यांनीं संपन्न, शूर, शुभ आचारसंपन्न, मौनी, गुणसमुदायाचा आकर, सर्व यज्ञांचें आहरण करणारा, सर्व धनुष्मानांना जिंकणारा, वापीकूपतडागादि सर्व कार्यांचा कर्ता, भूमीचा पूर्वशरीरीच भर्ता, नाजुक, स्नेहयुक्त, प्रिय भाषण करणारा, लोक-शास्त्रनिष्णात, प्रेमाचा सागर, सुंदर, शांत व सौभाग्यलक्षण, प्रतापी, धर्मवत्सल, दुसऱ्यांनाही विनयाचा उपदेश मिळेल असें भाषण करणारा, सर्व संपत्तींचा दाता, भोक्ता, सत्संग करणारा, सर्व श्रुतींचें उत्तम प्रकारें श्रवण करणारा, सर्व जाणणारा तथापि अभिमानशून्य, स्त्रीव्यसनादिकांना तृणाप्रमाणें स्पर्श न करणारा, असा तो शिखिध्वज होता. त्याचा पिता मांडलिक राजाच होता. पण तो स्वर्गलोकीं गेला असतां लहानपणींच आपल्या बाहुबलानें सोळा वर्षें दिग्विजय करून स्वतः जितेंद्रिय असलेला तो भूमंडलाला सम्राज्यसंपत्तीनें युक्त करता झाला. धर्मतः प्रजेचें पालन करणारा तो बुद्धिमान् राजा आपल्या यशानें सर्व दिशांना धवल करीत मंत्र्यांसहवर्तमान निःशंक होऊन राहिला. त्यानंतर कांहीं वर्षें निघून गेलीं असतां त्याला तारुण्यदशा प्राप्त झाली. वसंत ऋतु लागला. त्याबरोबर पुष्पें विकास

पावली. चंद्राचे किरण स्फुरण पावूं लागले. शाखारूप अंत:पुरांत मंजरीसमूहरूप गहन झोंपाळयावर भ्रमरांचीं जोडपीं गायन करीत असतां, या राजाचें मन कांतेविषयीं अत्यंत उत्सुक झालें. तें भ्रमरांचें अंत:पुर धुळीचे कण याच कापुरानें धवल झालें होतें. इकडे तिकडे हालणारीं पानें हींच त्या अंत:पुराच्या द्वारांचीं झडपें होतीं. ज्यांच्यापासून चित्ताकर्षक वास सभोंवार पसरत आहे, असे पुष्पगुच्छ हेंच त्याचें छत होतें. असो, त्या वेळीं त्या राजाची स्त्रीविषयींची उत्सुकता वाढविण्यासाठींच चंद्र व तुषार यांच्या योगानें शीतळ झालेला मधुर वायु वाहूं लागला. त्यामुळें केळी व कदली यांचे कच्छप्राय तळ व पानें नाचूं लागलीं. चूडाला या नांवाची राजकन्या गुणादिकांच्या योगानें आपल्याला अनुरूप आहे, असें त्याला अगोदरच माहीत होतें. त्यामुळें तो तिच्याविषयींच उत्सुक झाला. पुष्पसंभारांच्या सौगंध्यलक्षण मधुर आसवांनीं मत्त व वसंत ऋतूंतील वनाप्रमाणें रागयुक्त झालेलें त्याचें मन कान्तेहून निराळ्या विषयास स्पर्शही करीत नसे. त्याच्या मनाला अशी उत्सुकता झाली:—उद्यानें व वनें यांतील झोंपाळयावर व लीलेसाठीं केलेल्या कमलिनींमध्यें, सुवर्णकमलाच्या कळ्यांप्रमाणें जिचे स्तन आहेत अशा सुंदर, प्रिय, केशराची उटी लाविलेल्या कामिनीला मी पर्यंकावर बसून मांडीवर केव्हां घेईन ? कमलवल्लीरूप झोंपाळ्यावर भ्रमर, चंचल भ्रमरीला जसा— तसाच मी माझ्या भुजलतांत सांपडलेल्या व त्यांतून सुटण्यासाठीं यत्न करणाऱ्या चंचल बालेला पाणिग्रहणविधीनें केव्हां स्वीकारीन? चंद्राप्रमाणें सुंदर असलेली ती माझ्यासाठीं मदनतापानें संतप्त केव्हां होईल ? व त्यामुळें कमलांचे देठ, मोत्यांचे हार, कुंदाचीं फुलें, पुष्पित लतागृहें, यांचा अभिलाष केव्हां करील! असा चिन्तापरायण झालेला तो राजा पुष्पांचा ढीग करण्यास उन्मुख झाला व त्यानें वनांतून व पुष्पांच्या उपवनांतून विहार केला. वनें व उपवनें यांच्या पंक्तींत, लीलाकमलिनींत, वेलींच्या वलयांनीं बनविलेल्या लतागृहांत, नानाप्रकारच्या उद्यानभूमींमध्यें आणि वनें व उपवनें यांच्या वर्णनांनीं युक्त अशा शृंगाररसप्रधान गोष्टींमध्यें उन्मत्त झालेला तो रममाण झाला. मला तर असें वाटतें कीं, तो राजा त्या वेळीं आपल्या मनांत गळ्यांतील हारांनीं ज्यांचीं शरीरें शोभत आहेत व सोन्याच्या कुंभाप्रमाणें ज्याचे स्तन आहेत, अशा चंचल व कुरळ्या केंसांच्या कुमारींची पूजाच करीत होता. शाहण्या मंत्र्यांनीं राजाचा तो निश्चय जाणला. इंगित व आकार यांवरून दुसऱ्याचा आशय ओळखणें, हेंच श्रेष्ठ मंत्रिपद आहे. नंतर त्याच्या विवाहासाठीं विचार करणाऱ्या मंत्रिवर्गानें तारुण्यानें युक्त अशा सुराष्ट्राधिपतीच्या कन्येची मागणी केली व त्या नवयौवनसंपन्न उत्तम कन्येशीं शिखिध्वजाचा यथाविधि विवाह केला. ती त्या राजाला अनुरूप भार्या होती. ती राजाची सुंदरी ‘ चूडाला ’ या नांवानें भूलोकीं प्रसिद्ध होती. त्या राजाला भर्ता संपादन करून प्रफुल्लित कमलिनीप्रमाणें ती शोभली. सूर्यदेव ज्याप्रमाणें अब्जिनीच्या शोभेला वाढवितो, त्याप्रमाणें शिखिध्वज नीलकमलाप्रमाणें जिचे नेत्र आहेत अशा चूडालेला स्नेहानें विकासयुक्त करता झाला. ज्यांनीं एकमेकांस आपापलें चित्त अर्पण केलें आहे अशा त्या दोघांची प्रीति अतिशय वाढली. हावभावादि शृंगारचेष्टांनीं युक्त असलेल्या तिच्या अंगांच्या योगानें ती एखाद्या नव्या लतेप्रमाणें शोभली. धार्मिक मंत्र्यांनींच सर्व याचकांना त्यांचे त्यांचे इष्ट अर्थ देऊन सुखी केल्यामुळें ज्याची प्रजा सुस्थित आहे

असा तो सुखी राजा, राजहंस अब्जिनीशीं जसा, तसा त्या प्रियेशीं रममाण झाला. अंतः-पुरांतील झोंपाळ्यावर, लीलाकमलिनींमध्यें, उद्यानांत, विहारांमध्यें, लतापुष्पगृहांत, कदम्ब-वनपंक्तींत, चंदन व अगुरु यांच्या वनांत, मंदारपुष्पांच्या माळांनीं सुंदर झालेल्या कदली व कंदिली यांच्या वनांत, नगरांत, दिगन्तरीं, सरो-वरांत, जंगलांत, लोकसमूहांत, जंबू जंबीर इत्यादि वृक्षांच्या समूहांत तो तिच्याशीं रममाण झाला. त्या दोघांना त्यांचा परस्पर सर्व व्यवहार आल्हादकारक झाला. श्रेष्ठ बैलांनीं शेतांना उत्तम प्रकारें नांगरलें असतां ज्यांत सुंदर वृष्टि झाली आहे व त्यामुळें मेघ व सस्यसंपत्ति यांच्या योगानें जी सुंदर दिसत आहेत, अशा द्यौ व पृथ्वी यांप्रमाणें सुंदर दिसणाऱ्या त्या दोघांचें सर्व कृत्य त्यांना आनंददायी झालें. ती दोघें एकमेकांना सोडून एक क्षणभरही रहात नसत व त्यांचें चेष्टित—प्रत्येक कार्य त्यांना अत्यंत प्रिय असे. त्यामुळें तीं दोघें परस्परांचें इष्ट जाणणें या कलेंत फार निष्णात झालीं. मित्रत्वास प्राप्त झालेलीं तीं दोघें एकमेकांच्या हृदयांत स्थित असल्यामुळें दोन देहांचा आश्रय करून राहिलेलें तें एका जीवाचेंच स्वरूप होतें. चित्रादि शिल्पशास्त्रांतील नैपुण्याचाही अभ्यास त्या त्या कलेंतील निष्णात मनु-ष्याच्या तोंडून—त्याच्या द्वारा करून, एखादा ब्रह्मचारी बटु बारा वर्षांत वेदशास्त्रविद्येचें जसें ग्रहण करतो, त्याप्रमाणें ती चूडाला सर्व विषयांमध्यें पंडिता झाली. शिखिध्वजानेंही चूडालेच्या तोंडून नृत्य-वाद्यादि कलांचें ज्ञान संपादन केलें; व तोही कलांचा मोठा ज्ञाता झाला. अमावास्येस प्राप्त होऊन ज्या-प्रमाणें चंद्र व सूर्य परस्परांच्या कलांनीं वि-लास पावतात, त्याप्रमाणें एकमेकांच्या हृदयांत स्थित असलेलीं तीं दोघेंही ऐक्यास प्राप्त झालीं. तीं दोघेंजणें पुष्प व त्याचा सुगंध यां-प्रमाणें एकरूप होऊन त्यांची परस्पर रुचिही एकच झाली; म्हणजे जें चूडालेला प्रिय वाटे तेंच शिखिध्वजाला प्रिय वाटे व जें त्याला आवडे तेंच तिला. याप्रमाणें भूतलीं स्थित अस-लेल्या शंकर-पार्वतीप्रमाणें तीं दोघें एकमेकांना अतिशय प्रिय झालीं. चातुर्यानें त्या दोघांचीही मति सुंदर झाली होती. सर्व शास्त्रार्थांमध्यें तीं दोघें अत्यंत पंडित होतीं. त्यामुळें तीं कांहीं कार्यासाठीं भूलोकीं आलेल्या लक्ष्मी-नारायणां-प्रमाणेंच दिसत होतीं. तीं स्नेहानें प्रसन्न व मधुर होतीं. त्यांना एक प्रकारचेंच विज्ञान असून त्याला अनुसरून तीं दोघें बोलत. तीं एकमे-कांचें अनुवर्तन करणारीं होतीं. लोकांचा वृत्तांत जाणणारीं होतीं. शास्त्राचें रहस्य त्यांना कळत होतें. कलासमूहांनीं तीं संपन्न होतीं. त्यांच्या ठिकाणीं शृंगारादि नवरसलक्षण रसायनें चमकत होतीं. तात्पर्य उदय पावलेल्या दोन चंद्रांप्रमाणें त्यांचीं शरीरें शीतल, स्निग्ध व मुग्ध होतीं. ब्रह्मांडाचा एक अवयव अशा सत्यलोकाच्या अवकाशांतील गंभीर सरोवरांत राजहंसाच्या जोडप्याप्रमाणें अंतःपुरांत ज्याची शोभा अत्यु-त्तम आहे, असें तें जोडपें रतिभोगविलासांनीं अत्यंत सुंदर शोभत असे.

---

## सर्ग ७८ वा.

१ राजा व राणी यांना क्रमानें वैराग्य. २ सच्छास्त्राभ्यासनिष्ठा, ३ चूडालेचा विवेक व ४ ज्ञानलाभ यांचें वर्णन.

श्रीवसिष्ठः—याप्रमाणें तें जोडपें रोज-रोज वाढणाऱ्या यौवनलीलांनीं अनेक वर्षें मोठ्या विषयासक्तीनें रममाण झालें. नंतर पुनः पुनः आवृत्ति पावणारीं अनेक वर्षें जाऊन, फुटलेल्या कुंभांतून जसें पाणी, त्याप्रमाणें हळू

हळू त्यांचें आयुष्य क्षीण झालें असतां, त्या दोघांनीं असा विचार करून आत्मसंबंधीं शास्त्राचें चिंतन करण्यास आरंभ केला:—तरंगांच्या समूहाप्रमाणें क्षणभंगुर असलेल्या या व्यवहारांत, पिकलेलें फळ पडणें जसें अनिवार्य आहे, त्याप्रमाणें मरण दुर्निवार आहे. कमलावर हिमरूपी वज्राचा पात जसा व्हावा तशी जरा येण्यास तयार होऊन राहिलेली आहे. ओंजळींतील पाणी जसें सतत गळतें, त्याप्रमाणें आयुष्य एकसारखें गळतें. पावसाळ्यांत कडु भोपळीचा वेल जसा अतिशय विस्तार पावतो त्याप्रमाणें भोग व त्यांचीं साधनें याविषयींची तृष्णा अतिशय वाढते. पर्वतांतील नदीच्या पुराप्रमाणें तारुण्य क्षणांत निघून जातें. इंद्रजालाप्रमाणें असत्य असलेलें जीवन—देहादिक ही फार जुनी संस्थिति आहे. धनुष्यापासून सुटलेल्या बाणाप्रमाणें सुखें वेगानें पळून जातात. गृध्रपक्षी जसे आमिषावर तुटून पडतात, त्याप्रमाणें दुःखें चित्तावर पडून त्याला पीडतात. पावसाळ्यांतील पाण्यावरील बुडबुड्यांप्रमाणें शरीर क्षणभंगुर आहे. विचार केला असतां हा सर्व व्यवहार केळीच्या खांबांतील सोपटाप्रमाणें असार आहे. अप्रिय कामी पुरुषापासून जशी कांता, त्याप्रमाणें तरुणता सत्वर निघून जाते. वृक्षाचें वसंत ऋतूंतील सरसत्व जाऊन त्यामध्यें लवकरच जसें नीरसत्व येतें, त्याप्रमाणें या संसारांत इष्ट वस्तूचा लाभ न झाल्यामुळें विरसता आली आहे. तेव्हां अशा या संसारांत शुभ, स्थिराकार व अतिशोभन काय बरें आहे? कीं ज्याला प्राप्त होऊन जन्म-मरणादि दुर्दशांमध्यें दुःख होणार नाहीं? तें जोडपें असा विचार करून व त्यांत अध्यात्मशास्त्र हेंच संसारव्याधीचें औषध आहे, असा निर्णय करून दीर्घकाल अध्यात्मशास्त्राचाच विचार करतें झालें. केवल एका आत्मज्ञानानेंच ही संसारसंज्ञक महाव्याधि सर्वथा शांत होते, असा निश्चय करून तीं दोघें तत्परायण झालीं. त्या वेळीं तीं दोघेजणें ज्ञाननिष्ठ झालीं. त्यांचें चित्त व प्राण त्यांतच रममाण झाले. त्यांची श्रद्धा ज्ञानांतच स्थिर बसली. त्या दोघांना अध्यात्मशास्त्रच आश्रय वाटला. अध्यात्मज्ञानाचा आदर करण्यांत तीं गढून गेलीं आणि त्यांची सर्व चेष्टा ज्ञानासाठींच झाली. याप्रमाणें तीं फार शोभलीं. त्यांनीं त्या शास्त्राचाच अतिशय अभ्यास केला. तीं एकमेकांस त्याचा बोध करीत असत. त्या अध्यात्मशास्त्राविषयींच त्यांचा सर्व उद्योग होत होता. त्यांतच त्यांचें चित्त अत्यंत संतुष्ट होत असे. एकमेकांशीं तीं दोघें त्याविषयींच भाषण करीत. हे रामा! नंतर ती चूडाला अध्यात्मवेत्त्यांच्या तोंडून रमणीय व तारण्यास समर्थ असे शास्त्रार्थ ऐकून आपल्या आत्म्याचा अहर्निश असा विचार करूं लागली. ती व्यवहारांतील शरीरचेष्टा करीत असतांना व ती करीत नसतांनाही आत्मविचार करीत असे. 'मी आपल्या शुद्ध व ज्ञानानें दीप्त झालेल्या बुद्धीनें या शरीरेंद्रियसमूहांत हा चिद्रूप आत्मा कोण आहे तें विवेचन करून पाहतें. हा संसाररूप मोह कोणाला प्राप्त झाला आहे? त्याचें अभ्युत्थान कसें झालें? व तो कोठें आहे? देह तर जड व मूढ आहे. त्यामुळें 'तो मी चिदात्मा नाहीं,' हा निश्चयच आहे कारण मी स्थूल आहें, गोरा आहे, इत्यादि बुद्धिवृत्ति जेव्हां असते तेव्हांच त्याचा अनुभव येतो. स्वतः त्याचा त्यालाच अनुभव येत नाहीं. यास्तव तो जड आहे. कर्मेंद्रियांचा समुदाय या स्थूल देहाहून भिन्न नाहीं. तर ते त्याचेच अवयव आहेत. अवयव आणि अवयवी यांचा भेद नसतो. तसाच

१ हिम म्ह० बर्फ किंवा थंडी. कमळें त्या दोन्हीमुळें करपून जातात.

तो कर्मेंद्रियगण जडच दिसतो. याच न्यायानें ज्ञानेंद्रियगणही जडच आहे, असा अनुभव येतो. कारण भूमीवर काठीनें मातीचें ढेंकूळ जसें उडविलें जातें, त्याप्रमाणें ज्ञानेंद्रियगण मनाकडून प्रेरित केला जातो. अर्थात् मन काठीप्रमाणें जड आहे. त्याच्यामध्यें संकल्प करण्याची वगैरे शक्ति आहे. गोफणीनें दगड जसे फेंकले जातात, त्याप्रमाणें बुद्धिनिश्चयाकडून त्याला प्रेरणा होते. तशीच निश्चयरूप बुद्धिही जाड्यस्वभावाचीच आहे, हा निश्चय आहे. दोन उंच डगरींच्या मधील सखल प्रदेशांतून नदी जशी वाहते, त्याप्रमाणें ती बुद्धि अहंकाराकडून प्रेरित होते. अहंकारही निःसार, जड, व शवात्मक आहे. बालक भ्रमात्मक यक्षाला जसा उत्पन्न करतो, त्याप्रमाणें जीव त्या अहंकाराला उत्पन्न करतो. जीवानें म्ह० प्राणावच्छिन्न चिदाभासानें त्याचा आरोप केलेला असल्यामुळें तो यक्षाच्या अध्यस्त देहाप्रमाणें जड आहे. जीव चेतनाकाश आहे. प्राण ही त्याची उपाधि आहे, व तो हृदयांत स्थित आहे. तो फार सुकुमार आहे. तो आंतून स्वान्तर्यामिबिंबचैतन्यानें परिपूर्ण होऊन जिवंत राहतो. त्याच्यामुळें हा सत्तावान् होतो. अहो, मीं जाणलें, मला सर्व समजलें, या साक्षिभावानें विषयांना प्रकाशित करणें, या कलंकानें जणुं काय दूषितसा झालेल्या या नित्य चिद्रूप आत्म्याकडून हा जीव जिवंत राखला जातो. त्याच्या बळावर हा जगतो. सुगंध वायूच्या योगानेंच जसा पसरतो, व नदीचा वेग सखल प्रदेशांतून वाहतो, त्याप्रमाणें विषयाचा भ्रम ज्याला झाला आहे, अशा या चिद्रूपानेंच जीव जगतो. असत्य, जड विषयांशीच्या तादात्म्य व संसर्ग अध्यासामुळें तो चिद्रूप असूनही जडासारखा झाला आहे. तापलेल्या पाण्यांत संसर्गानें शिरलेला किंवा समुद्रजलांत नित्य असलेला अग्नि जसा आपलें प्रकाशस्वरूप सोडतो त्याप्रमाणें आत्मा अनात्म्याशीं संसर्ग पावून आपलें भास्वररूप सोडतो. त्यामुळेंच सत्ता या अंशीं जणुं काय चित् हून विलक्षणत्वास प्राप्त होऊन ‘ घटः सन् पटः सन् ’ इत्यादिरूप सत्ता घट-पटादि अचिदाकारशी भासते. सत्ता जड असल्यासारखी भासते; आणि घटादि आकारांचा मृत्तिकेंत लय झाला असतां घट नाहीं, पट नाहीं, असा प्रत्यय येतो. ह्मणजे त्यांतील सत्ता आपला सत्ताकारही सोडून अभावरूप बनते. चित्च्या सांनिध्यांत वासनेमुळें जें सद्रूप किंवा असद्रूप प्राप्त होतें—स्वतः भासतें, तेंच एका क्षणांत आपलें पूर्ण स्वरूप सोडून ती स्वतः होते. याप्रमाणें हें परमार्थतः जरी चिद्रूप आहे तरी अविद्यावरणामुळें विषयोयोन्मुख होऊन अध्यासपरंपरेनें जड, शून्य, असत्सें झालें आहे. हें असें असत्कल्प झालेलें जगद्रूप बुद्धींत अनावृत स्वभावाच्या चैतन्याकडूनच तत्तदाकार वृत्तिव्याप्तीनें मूलावरणभंगद्वारा जाणलें जातें. असा विचार करून चूडाला ‘ तर मग मूल अविद्येच्या आवरणाचा भंग करून ही ब्रह्मचित् कोणत्या उपायानें या दृश्य भ्रमाला सोडून साक्षात्कारयुक्त होईल बरें ?’ असा पुष्कळ वेळ विचार करती झाली; आणि दीर्घकाळ विचार केल्यावर पुढें सांगित्याप्रमाणें तिला आत्मतत्त्वाचा बोध झाला. “अहो! खरोखर दीर्घ कालानें मला अनामय ज्ञेय आत्मतत्त्व कळलें! विज्ञेयत्वास प्राप्त करून घेतल्यावर कोणीही पुरुष परमार्थापासून च्युत होत नाहीं. त्याला ब्रह्मप्राप्तीनेंच सर्व कामनांची प्राप्ति होत असल्यामुळें त्याच्या कोणत्याही काम्य अर्थाची हानि होत नाहीं. तो कोणत्याही वस्तूला, ही दुःखाचें साधन आहे, अशा बुद्धीनें टाकीत नाहीं. कारण त्याला सर्व आनंदमय झालेलें असतें. त्याच न्यायानें तो

कशाचाही संग्रह करण्याची इच्छा करीत नाहीं. मन, बुद्धि, इंद्रियें, हे सर्व चिद्विलासाच्या परिच्छेदाचे हेतु आहेत. ते सर्व असत्च आहेत. पण काय चमत्कार सांगावा! ते तिमिररोग्यानें कल्पिलेल्या दुसऱ्या चंद्राप्रमाणें स्थित आहेत. महासत्ता असें जिला म्हणतात ती एक महाचितच येथें आहे. ती सर्व कलंकरहित, सम, शुद्ध व निरहंकाररूपिणी आहे. शुद्ध संवेदन हेंच तिचें स्वरूप आहे. तें अखंड आनंदात्मक असल्यामुळें परम मंगल सन्मात्र आहे. तें त्या आपल्या तसल्या स्वभावापासून केव्हांही प्रच्युत होत नाहीं. ती चित् मूल-अविद्येच्या आवरणाचा भंग करून प्रकाश पावते व मग तिला कोणीही आच्छादित करूं शकत नाहीं. ती अत्यंत शुद्ध आहे. म्हणूनच नित्य उदय पावलेली आहे. तिचा अस्त केव्हांच होत नाहीं. वेदान्तादि अध्यात्मशास्त्रामध्यें ती ब्रह्म, परमात्मा, इत्यादि नांवांनीं लक्षणेनें बोलली जाते. विषय, इंद्रियें, चित्तादिक हें त्रिपुटीजाल या चित्-हून भिन्न नाहीं. कारण ही त्रिपुटी त्या साक्षिभूत नित्य चित्-कडून प्रकाशित केली जाते. ती प्रमाणतः सिद्ध नाहीं. ती ही साक्षिचित् त्रिपुटीची प्रवृत्ति होण्यापूर्वी स्वतःसिद्ध असल्यामुळें तिला 'आद्या चित्' असें म्हटलें आहे जें हें निर्विषय चित्तत्त्व तें तिचें अक्षत—अखंड रूप आहे. मन, बुद्धि, इंद्रियें इत्यादि रूपांनीं तीच विवर्त पावते. चिदात्म्याला प्रमातृभाव प्राप्त झाला असतां त्यांत तरंगादिकांप्रमाणें ही जगद्रूप पदार्थांची सत्ता स्फुरण पावते. जें हें जगत्सत्तारूप प्रसिद्ध आहे, तें या अधिष्ठानभूत महाचितीचेंच दुसरें रूप आहे. कारण ती शुद्ध चित्च[1] स्फटिकमण्याप्रमाणें जगाचें प्रतिबिंब स्वतः असंग राहूनच धारण करते. ही जगत्सत्ता व्यावहारिक व प्रातिभासिक पदार्थांमध्यें समसमा म्ह० आपापल्या अधिष्ठानानुसार उदय पावली आहे. जगत्सत्ता जगाला विकसित करणाऱ्या एकरूप शक्तीनें स्थित आहे. त्यामुळेंच ती अधिष्ठानसत्तेहून निराळी आहे असें निरूपण करतां येणें शक्य नाहीं. म्हणूनच ती भिन्न भासणारी सत्ता मायामात्र आहे. सोन्याच्या दागिन्यांतील विचित्रता जशी सुवर्णत्वानें अवशिष्ट राहते, त्याप्रमाणें नाम-रूपविशेषांचा प्रलय झाला असतां जगत्सत्ता मायाशबलब्रम्हसत्तेनेंच अवशिष्ट राहते आणि त्यांतील मायेचा बाध झाला असतां आनंद-एकरस-सन्मात्ररूप आत्म्याचा स्वतः अनुभव येते. ज्याप्रमाणें स्वप्न, इंद्रजाल इत्यादिकांमध्यें द्रवत्वानें परिणत झालेल्या स्वचित्तानेंच सिद्ध झालेल्या समुद्रादि जलांतील तरंगादिक वस्तुतः उदय पावलेले नसतांनाही उदय पावल्यासारखे भासतात, त्याप्रमाणें महाचितिरूप ब्रह्मांतही समचित्तापासून जगत् वस्तुतः उदय पावत नसलें तरी उदय पावल्यासारखें वाटतें. स्वप्नांत चिद्रूप आत्माच चित्तकल्पित जलरूपानें रूपवान होऊन तरंगादि आकाराचाही बनतो; पण त्यांत आत्मव्यतिरिक्त कांहींच अणुमात्रही नाहीं. त्याचप्रमाणें मी चिन्मात्रच जगद्भानविशेषभेदांनीं संपन्न झालें आहें. पूर्णचिदात्मरूप अशा मजहून निराळें अणुमात्रहि कांहीं नाहीं. असा प्रकार असल्यामुळें अहंभावही अवशिष्ट रहात नाहीं. अर्थात् अहंभावशून्य चिन्मात्रच पसरलें आहे. त्या चिन्मात्राला जन्म नाहीं, मरण म्ह० देहाचा वियोग नाहीं. त्याला स्वर्गगति नाहीं व नरकगतिहि नाहीं. या चिन्मात्र आकाशाचा नाशही—ध्वंसही संभवत नाहीं. हा चिन्मात्रात्मा अच्छेद्य—

---

[1] 'ब्रम्हाचीं मूर्त व अमूर्त अशीं दोन रूपे आहेत' इत्यादि बृहदारण्यकश्रुतींत त्यांचें सविस्तर वर्णन आहे. ( बापटकृत बृह. भाष्यार्थ अ. २ पृ. १३१–१३२ पहा. )

तोडतां न येण्यासारखा आहे, अदाह्य आहे. हा चिदादित्य अतिशय निर्मल आहे. अहाहा! मी फार दिवसांनीं शांत झालें आहें. सर्वतः सुखी आहें. मी आतां सर्व विक्षेपशून्य झालें आहें. मंदर पर्वत काढून घेतल्यावर सागर जसा भ्रमणरहित असतो, त्याप्रमाणें ज्यांत दृश्यमान आभास असत् आहे असें हें अतिस्वच्छ, अनन्त, अज, अच्युत आत्माकाश आहे. तें बाधशून्य, अमल, श्रेष्ठ, कालपरिच्छेदशून्य, देशपरिच्छेदरहित, असें हें आकाशच ब्रह्मादिस्तंबपर्यंत प्राणिकर्मांचे फलसमूह, त्यांच्या साधनांचें अनुष्ठान, व इतर वृथा चेष्टा आहे. त्या चिदाकाशाहून आणखी दुसरें कांहीं नाहीं. हें सर्व देवासुरयुक्त विश्व अकृत्रिम चिन्मय आहे. कुमारादि पुरुषांनीं केलेली जी मातीची सेना ती सर्व मातीचीच जशी असते, त्याप्रमाणें ही सर्व द्रष्टृदृश्यमयी सत्ता चिन्मात्र ऐक्यमयी आहे. हें ऐक्य, हें द्वित्व, हा मी, हा मी नव्हे, हा भ्रमसंमोह आपल्या पारमार्थिक रूपास प्राप्त होऊन कसा, कोणाला, कोणत्या कारणानें व कोठें संभवणार? मी आपल्या अनन्त व निरामय स्वरूपांत अगदीं शांत होऊन स्थित आहें. मोक्षसुखांत सर्वतः सुखमग्न होत्साती मी संसारज्वररहित, विस्मृतकंठालंकाराप्रमाणें प्राप्त झालेलें स्वरूपच होऊन राहतें. जें अचेतन किंवा चेतन भासतें व जो हा त्याचा भोक्ता स्फुरत आहे, तें दोन्ही प्रकाशरूप आत्म्याहून भिन्न नसलेलें ब्रह्मच—चिदाकाशच आहे. तें महाचितीमध्यें स्थित आहे. इदंभाव, अहंभाव व अन्यत्व इत्यादि कोणत्याही भावाभावाचा संभव नाहीं. तर सर्व शांत, निराधार, केवल परतत्त्व स्थित आहे." याप्रमाणें विचारांत तत्पर झालेली ती मोहनिद्रेचा आत्यंतिक नाश झाल्यामुळें या यथार्थ परमात्मतत्त्वाला जाणून जिचे राग-भय-मोह व अवस्थात्रयरूप स्वप्न-तमोविलास अगदीं शांत झाले आहेत अशी होत्साती शरत्कालच्या मेघपंक्तीप्रमाणें शांत झाली.

---

## सर्ग ७९ वा.

१ चूडाला अपूर्व शोभेनें युक्त झाली. २ राजानें त्याचें कारण विचारलें व ३ तिनें स्वतःच्या शोभेचें कारण 'बोध' हें सांगितलें.

श्रीवासिष्ठः—याप्रमाणें चूडाला प्रत्यहीं अधिकाधिक स्वात्माराम झाल्यामुळें व अन्तर्मुख झाल्यामुळें वारंवार स्वाभाविक रूपांत प्रतिष्ठित झाली. कारण तिच्यामध्यें हीं लक्षणें दिसत होतीं:—ती रागरहित होती. तिच्याठिकाणीं आसक्ति नव्हती. ती शीत-उष्ण, सुख-दुःख इत्यादि द्वंद्वांनीं रहित होती. तिला कशाचीही इच्छा नव्हती. प्राप्त आचार मात्र करणारी ती कशाचें ग्रहण करीत नसे व कशाचा त्याग करीत नसे. तिनें भवसागराचें उल्लंघन केलें होतें. तिचे सर्व संदेह शांत झाले होते. तिला परमात्म्याचा महालाभ झाला होता. त्यामुळें ती देहाच्या व इंद्रियांच्याही आंत असलेल्या पूर्ण प्रत्यगात्म्यामध्यें विश्रांति पावलेली होती. संसारांतील यातायातीनें दीर्घ काल श्रान्त झालेली ती निरतिशयानंदघन परमपदीं विश्रांति पावली. तिला कोणतीच उपमा देतां येत नसे. तिनें सर्व उपमांचें उल्लंघन केलें होतें. त्यामुळें जिचें शब्दांनीं वर्णन करतां येत नाहीं अशा अवस्थेस ती पोंचली. याप्रमाणें राजाची ती सुंदर राणी चूडाला थोडक्याच कालानें ज्ञातज्ञेया झाली. तिला ज्ञेय ब्रम्हतत्त्वाचें ज्ञान झालें. (थोडक्याच अवकाशांत हें कसें घडलें? उत्तर—) जसा हा अनिर्वचनीयरूप स्पंदविभ्रम अविद्वानाच्या ठिकाणीं अकस्मात् आला आहे, तसाच तो

तत्त्वज्ञानी पुरुषाचे ठिकाणीं अकस्मात् निःशेष विलीन होतो. ज्यांत द्वैताचा गंधही नाहीं अशा शांत पदीं विश्रांति पावून संभ्रमरहित होत्साती ती शरत्कालच्या स्वच्छ अभ्रपंक्ती-प्रमाणें शोभूं लागली. जशी एखादी वृद्ध गाय ज्याच्यावर चढून जाणें अशक्य आहे, पण जें तृण व उदक यांनीं भरलेलें आहे व ज्याच्यावर उन्हाचा व थंडीचाही त्रास होत नाहीं अशा पर्वताग्रास दैवयोगानें प्राप्त होऊन सुखानें तेथें राहते, त्याप्रमाणें चूडालाही जाग्र-दादि सर्व अवस्थांमध्यें एकरूप प्रकाशास—प्रत्यगात्म्यास जाग्रदादिकांशीं असंगस्वभावानें प्राप्त होऊन त्याच आत्म्यामध्यें आकुल न होतां राहिली. आत्मविवेकाचा दृढ अभ्यास केल्यामुळें व आत्म्याच्या स्वरूपदर्शनानें पूर्ण आनंदस्वरूपाचा आविर्भाव झाल्यामुळें ती नवीन उत्पन्न झालेल्या पुष्पलतेप्रमाणें शोभली. तेव्हां जिला अपूर्व शोभा प्राप्त झाली आहे, अशा त्या सुंदरीला पाहून एकदा राजा शिखि-ध्वज हंसत हसत तिला म्हणाला—" हे सुकुमार चूडाले ! पूर्णचंद्रयुक्त पृथिवी जशी शोभते तशी तूं पुनः यौवनयुक्त झाल्याप्रमाणें व पुनः पुनः मंडित झाल्याप्रमाणें अधिक शोभत आहेस. अमृताचा रस प्राशन केल्याप्र-माणें, प्राप्यपद प्राप्त झाल्याप्रमाणें व आनंदाच्या पूरानें पूर्ण झाल्याप्रमाणें हे प्रिये ! तूं फारच शोभत आहेस. अत्यंत शांत व त्यामुळेंच अत्यंत रम्य असें सुंदर शरीर धारण करणारी ही तूं हे कामिनि ! चंद्राचा पराभव करून विलक्षण शोभेस प्राप्त झाली आहेस. प्रिये ! तुझें चित्त भोगासाठीं दीन झालेलें नाहीं. तें शांत आहे, विवेकानें उन्नत झालें आहे, सम-त्वास प्राप्त झालें आहे, गंभीर झालें आहे, त्यानें आपलें चापल्य सोडलें आहे, असें मी पाहतों. प्रिये ! तुझें मन त्रिभुवनाला तृणा-सारखें लेखून, सर्व जगद्रसाचें प्राशन करून स्थिर व सौम्य झालेलें मला दिसतें. मरु-भूमि जशी रूक्ष असते, तसें रूक्ष—विरक्त व क्षीरसागर जसा पूर्ण असतो तसें पूर्ण व त्यामुळेंच सुंदर झालेलें तुझें चित्त हे महाभाग्यवति ! कोणत्याही ऐश्वर्यानंदाच्या तुलनेस प्राप्त होत नाहीं. बालकदली किंवा मृणालांकुर यांप्रमाणें कोमल असलेल्या तुझ्या त्या पूर्वींच्याच, पण आतां चांचल्य सोडून स्थिर झालेल्या अंगांनीं तूं जणुं काय वृद्धि पावल्यासारखी दिसत आहेस. शिशिर ऋतु संपून वसंत लागतांच पूर्वींचीच लता जशी दुसरी असल्यासारखी वाटते, त्याचप्रमाणें तूं त्याच आकारानें जरी युक्त असलीस, तरी पहिल्यापेक्षां निराळीच झाल्यासारखी दिसत आहेस. तूं काय अमृत प्याली आहेस ? कीं तुला साम्राज्यच प्राप्त झालें आहे ? कीं रसाय-नादि प्रयोग व मंत्रादि सिद्धि यांच्या योगानें अमृत्यूलाच प्राप्त झाली आहेस ? हे नीलकमल-नयने ! तुला पूर्वीं प्राप्त नसलेलें असें राज्या-हून, चिंतामणीहून, किंवा त्रैलोक्याहून अधिक कांहीं तूं प्राप्त करून घेतलें आहेस कीं काय ?

चूडालाः—मी हें सर्व मूढजनांना प्रसिद्ध असलेलें शरीरात्मत्व—शरीरच मी हा भ्रम—सोडून ज्यांत नामरूपादि कांहीं नाहीं अशा या ब्रह्मात्मत्वास तत्त्वबोधानें प्राप्त झालें आहें. केवल मंत्र-रसायनादि साधनांनींच नव्हे, तर निरनिराळ्या तुच्छ सिद्धींनींही या अवस्थेस मी प्राप्त झालेली नाहीं. त्यामुळें अशी कांति-युक्त होऊन राहिलें आहें. किंवा मी जाग्रत्स्वप्न-रूप दोन अवस्थांस प्राप्त झालेली नाहीं, व सुषुप्तरूपासही प्राप्त झालेली नाहीं. तर या तिन्ही अवस्थांस सोडून तुरीयस्वभावास प्राप्त झालें आहें. त्यामुळें अशी श्रीमती दिसतें.

किंवा मी कर्म-उपासनादि साधांननीं इंद्र-चंद्रादि-हिरण्यगर्भान्त किंचित्किंचित् पदास भावनाकृत तादात्म्यसिद्धीनें प्राप्त झालेली नाहीं. त्याचप्रमाणें अकिंचित्किंचिदाकार जें अव्यक्त त्यासही प्राप्त झालेली नाहीं, तर हें सर्व सोडून स्वस्वरूपांतच स्थित आहें. त्यामुळें अशी श्रीमती दिसतें. अथवा मी या लिंगदेह-परिच्छिन्न जीवाकारास सोडून, ज्याला सर्वात्मक आकार नाहीं व जें परमार्थतः किंचित्किंचिदाकारही नाहीं, तशा ब्रह्मास प्राप्त झालें आहें. त्यामुळें अशी सुशोभित दिसतें. हें सर्व परिच्छिन्न जगत् सोडून मी अपरिच्छिन्न वस्तूचा आश्रय केला आहे. ती अपरिच्छिन्न वस्तु सत्—अबाधित आहे व त्यांत मूर्त व अमूर्त असत्य प्रपंच नाहीं. त्याच्या आश्रयामुळें मी अशी श्रीमती होऊन राहिलें आहें. उदयाच्या अनुसार जें हें कांहीं दिसत आहे व जें प्रलयानुसार दिसत नाहीं, तें सर्व ज्या कूटस्थ भूमानंदस्वभावानें स्थित आहे, त्याला मी जाणतें व त्यामुळें मी अशी श्रीमती झालें आहे. फार दूर असलेल्या व न भोगलेल्याही भोगांनीं मी त्यांचा भोग घेऊन तृप्त झाल्याप्रमाणें हृष्ट होतें. मी इष्टप्राप्तीनें हृष्ट होत नाहीं व अनिष्टप्राप्तीनें क्रुद्ध होत नाहीं. त्यामुळें अशी श्रीमती झालें आहें. मीं एकटीच आकाशासारख्या केवळ हृदयस्थ ब्रह्मांत रममाण होतें व राजलीलांमध्यें रममाण होत नाहीं. त्यामुळें मी श्रीमती आहें. आसन, उद्यानभूमि इत्यादिकांत देह जरी स्थित असला तरी मी पूर्ण आत्म्यांतच स्थित असतें. भूषण, सन्मान इत्यादि शारीर-मानस भोगांत किंवा ते न मिळाल्यामुळें प्राप्त होणाऱ्या लज्जेंत मी निमग्न होत नाहीं. त्यामुळें मी श्रीमती आहें. मी सर्व जगांची स्वामिनी आहें. हें जें कांहीं अनात्मरूप आहे तद्रूप नाहीं. अशा भावनेनें मी श्रीमती होऊन स्थित आहें. हें सर्व देहादि अधिष्ठानदृष्टीनें मी आहें, पण आरोपित-दृष्टया मी त्यांतील कांहीं नाहीं. मी स्वरूपानें सत्य आहे. जगद्रूपानें सत्य नाहीं. मी सर्व आहें व मी कांहीं नाहीं. त्यामुळें मी श्रीमती आहें. मी सुखाची इच्छा करीत नाहीं. मीं अर्थाची इच्छा करीत नाहीं. अनर्थाला सोडण्याची इच्छा करीत नाहीं व आहे या स्थितीहून निराळ्या स्थितीची इच्छा करीत नाहीं. जें प्राप्त होईल त्यानें हृष्ट होतें. त्यामुळें मी श्रीमती होऊन स्थित आहें. ज्यांच्यामुळें विद्वेष व राग—आसक्ति हे दोष कृश झाले आहेत अशा, सात्त्विक प्रज्ञा व शास्त्रदृष्टि, याच माझ्या सख्या आहेत. त्यांच्याबरोबर मी रममाण होतें. मला माझ्या करमणुकीसाठीं बाहेरच्या दुसऱ्या सख्यांची गरज नाहीं. हे नाथ! या जगांत मी नेत्रांतील किरणांनीं किंवा दुसऱ्या इंद्रियांनीं व चित्तानें जें पाहतें तें कांहीं नाहीं. तें सर्व खोटें आहे. म्हणून मी जें इंद्रियें व मन यांच्या वृत्तींनीं न दिसणारें निर्विषय—निर्विकल्प आत्मतत्त्व तें आंत पाहतें. मी आंत व बाहेरही ज्याअर्थीं अबाधित तत्त्व पहात आहें त्याअर्थीं अशी सतत परम अभ्युदययुक्त झालें आहें.

१ 'नाकिंचित्किंचिदाकारामिदं त्यक्त्वाहमागता न किंचित्किंचिदाकारं तेनास्मि श्रीमती स्थिता' या श्लोकाचेच वेगें हे चार अर्थ केले आहेत.

## सर्ग ८० वा.

—:०:—

१ अथ राजा तिचें वाक्य असंबद्ध आहे, असें वर्णन करतो. २ आकाशगमनादि सिद्धींचें बीज.

श्रीवशिष्ठः—याप्रमाणें आत्म्यामध्यें विश्रांति पावून आपल्या अतिशय शोभेचें कारण सांगणाऱ्या त्या सुंदरीच्या भाषणाचा अर्थ न जाणून राजा हंसून असें ह्मणालाः—

शिखिध्वजः—हे राजकन्ये ! तूं कांहीं तरी असंबद्ध प्रलाप करीत आहेस. तूं बाला आहेस–तुझी बुद्धि प्रौढ झालेली नाहीं. हे सुंदरि ! तूं राजलीलांनीं जशी रममाण होत आहेस तशीच रममाण हो. प्रत्यक्ष स्थित असलेल्या साकार वस्तुला सोडून जो मूढ निराकारत्वास प्राप्त होतो, तो शून्यासारखा होतो. तेव्हां ज्यानें प्रत्यक्ष सद्रूप टाकलें आहे तो शोभणार कसा ? न भोगलेल्या भोगांनींच मी संतुष्ट झालों आहें, असें ह्मणून जो जणुं काय रुसूनच आसन, शय्या इत्यादिकांचा त्याग करतो, तो शोभणार कसा ? जो साक्षात् भोग व त्याची सामग्री यांस टाकून शून्य आकाशांत–एकांतांत पिशाचाप्रमाणें एकटाच सर्व सोडून रममाण होतो तो कसा शोभणार ! वस्त्रें, आसन, शय्या इत्यादिक सर्व पदार्थांस सोडून केवळ धैर्याच्या बळावर शीतोष्ण, सुखदुःख इत्यादिकांस सहन करणारा जो एकटाच राहतो तो कसा शोभेल ? मी देह नाहीं, तर देहाहून व्यतिरिक्त आहें, मी कांहीं नाहीं व मी सर्व आहें, असे परस्परविरुद्ध प्रलाप जो करतो तो कसा बरें शोभेल ! मी साक्षात् डोळ्यांनीं वगैरे जें पाहतो तें पहात नाहीं, व जें इंद्रियांना दिसत नाहीं तें पाहतों, असा असत् प्रलाप जो करतो तो खरोखर शोभेल कसा ? तस्मात् हे विलासिनि ! तूं बाला—मूर्ख आहेस. वेडी आहेस, चपल आहेस. हे सुंदरि ! मी जसा नानाप्रकारच्या आलापविलासानें क्रीडा करीत आहे, तशी तूंही क्रीडा कर, रममाण हो.

रामा ! शिखिध्वज राजा आपल्या प्रियेला असें बोलून व तिला उद्देशून मोठ्यानें हंसून त्या स्त्रीगृहांतून उठून माध्यान्हसमयीं स्नान करावयास गेला. इकडे चूडाला ' अरेरे ! हा राजा आत्म्यामध्यें विश्रांति पावलेला नाहीं; व त्यानें माझें म्हणणेंही ऐकलें नाहीं, ' असें ह्मणून अतिशय खिन्न झाली, व आपल्या नियत कार्यांत तत्पर झाली. त्यानंतर हे रामा ! ज्यांचा असा परस्पर भिन्न आशय आहे अशा त्या दोघांचा तेथें राजलीलांनीं पुष्कळ काल लोटला. एकदा नित्य तृप्त व आशारहित झालेल्याही चूडालेला आपोआप लीलेनें आकाशांतून आपल्याला जातां-येतां यावें, अशी इच्छा झाली. तेव्हां ती राजकन्या आकाशांतून जाणें व येणें यांची सिद्धि होण्यासाठीं सर्व भोगांचा अनादर करून निर्जनस्थानीं एकटीच राहिली. ती एकांतामध्यें अत्यंत आसक्त झाली. तिनें आसनावर आपलें शरीर स्थिर धारण केलें. ऊर्ध्व गमन करणाऱ्या प्राणवायूच्या निरोधाचा तिनें दीर्घकाल अभ्यास केला. भ्रूमध्यादि देशीं प्राणवायूचा निरोध करणें हें आकाशगमन सिद्धीला अनुकूल आहे, ह्मणून तिनें त्याचाच अभ्यास केला.

---

१ माझ्यासारख्या शहाण्याला पटेल असें भाषण करण्यांत तूं कुशल नाहींस.

१. कारण या मनुष्यजन्मांतच जर आत्म्याला जाणलें तर ठीक आहे, नाहीं तर फार मोठा विनाश होतो, असें केनोपनिषदांत ह्मटलें आहे. (बापटकृत केनो० भाष्यार्थ पृ. ५९–६० पहा.)

२. अर्थात राजा विजयादि कांहीं कार्यासाठीं कोठें दूर गेला असतां ही एकांतांत एकटीच जाऊन बसली, असें समजावें. त्याशिवाय शिवाय एका ठिकाणीं जाऊन बसणें शक्य झालें नसतें.

श्रीराम:—भगवन् ! जें हें स्थावरजंगम जगत् आहे तें सर्व क्रियेनें उत्पन्न केलें आहे, असें दिसतें. पण कर्ता, करण, इत्यादि कारकांच्या स्पंदावांचून कशाचीही उत्पत्ति होत असल्याचें दिसत नाहीं. तेव्हां 'क्रिया' या नांवाच्या स्पंदाची उत्पत्ति कशी होते ? केवळ यत्नशाली पुरुषाला आकाशगमनादि सिद्धिरूप फळ जें मिळतें तें कोणत्या दृढ अभ्यासरूप स्पंदविलासाचें फळ आहे? व अनात्मज्ञ सिद्धीसाठीं व आत्मज्ञ केवल लीलेनें ह्या सर्व सिद्धि कोणत्या क्रमानें साधतो, तेंही मला सांगा.

श्रीवसिष्ठ:—रामा ! सर्वतः साध्य वस्तु येथें तीन प्रकारची संभवते:—उपादेय, हेय व उपेक्ष्य. स्वतःला जें अनुकूल असतें तें उपादेय होय. तें प्रयत्नानें साध्य केलें जातें. जें प्रतिकूल असतें तें हेय—त्याज्य होय; आणि जें अनुकूलही नसतें व प्रतिकूलही नसतें, तें उपेक्ष्य होय. हे सद्बुद्धे ! जें जें आल्हादकर असतें तें तें आदेय—उपादेय—ग्राह्य असतें. जें त्याच्या उलट म्ह० आल्हादकर नसतें तें हेय—त्याज्य; व जें या दोन्ही कोटींच्या मध्यवर्ती असतें तें उपेक्ष्य होय. पण हे तिन्ही पक्ष अज्ञानी जीवांमध्यें संभवतात. जो सन्मति, विद्वान, आत्मज्ञ असतो, त्याला जेव्हां सर्व आत्ममय होतें, तेव्हां त्याच्या ठिकाणीं या तीन पक्षांतील कोणताच पक्ष संभवत नाहीं. तो एकादे वेळीं सहज लीलेनें उपेक्षापक्षांत पडलेलेंही हें सर्व पाहतो; किंवा पहातही नाहीं. जें ज्ञानी पुरुषाला उपेक्षात्मक वाटतें तेंच मूढाला आदेय—ग्राह्य वाटतें, आणि ज्याची विरक्ति पराकाष्ठेस पोंचली आहे त्याला तें सर्व त्याज्यच वाटतें. आतां सिद्धींचा क्रम कसा तो ऐक. वसन्त भूतलाला जसा आल्हादित करतो, त्याप्रमाणें देश, काळ, क्रिया, द्रव्य, यांच्या योगानें साध्य होणाऱ्या सर्व सिद्धि येथें जीवाला आल्हादित करितात. या देशादि चार साधनांतील श्रीशैलादि उत्तम देशादिकांचा लाभ झाला असतां सिद्धीचा लाभ सत्वर होतो. त्यामुळें तेथील योग, मंत्र, जप इत्यादि क्रियेला इतर देशादिकांत केलेल्या क्रियेहून प्राधान्य आहे, अशी कल्पना होते, आणि त्याच्याच अनुरोधानें फलाचाही उत्कर्ष होतो. कारण ते सिध्यादि फलोत्कर्षाचे क्रमही तन्मयच असतात. आकाशगमनादिकांचीं साधनें सिद्धगुटिका, सिद्धांजन, सिद्धखड्ग, सिद्धपादुका इत्यादि अनेक आहेत. तीं उड्डामरतंत्र, योगिनी' कल्पादि मोठमोठ्या ग्रंथांत प्रसिद्ध आहेत. तुझ्या प्रश्नाप्रमाणें त्यांचें निरूपण करावयास पाहिजे. पण तें करूं लागल्यास विस्तार फार होईल. तोही मीं केला असता, परंतु तो ऐकून अजिज्ञासु व अतत्त्ववेत्ते यांना त्या सिद्धींचीच इच्छा होईल व ते त्यांतच प्रवृत्त होतील. त्यामुळें ते तत्त्वार्थापासून दूर जातील. शिवाय आत्मतत्त्व श्रवण करण्यालाच प्रवृत्त झालेल्या तुला तो सिद्धींचा विस्तार विघ्नकारक होईल, म्हणून त्याचें येथें सविस्तर निरूपण करणें उचित नाहीं. रत्न, औषधि, तप, मंत्र इत्यादि क्रियाक्रमाचें निरूपणही त्यासाठींच राहूं दे. कारण हा विस्तारही प्रकृत अर्थाचा विघात करणारा आहे. श्रीशैलपर्वतावर, सिद्धदेशीं, किंवा मेरुप्रभृति प्रदेशीं राहणाऱ्या साधकाला सिद्धि मिळते, इत्यादि विस्तारही प्रकृत अर्थाचा विघात करणारा आहे. यास्तव हे कृतार्थ रामा ! शिखिध्वज राजाच्या कथाप्रसंगानें प्राप्त झालेली व

१ साक्षात् किंवा परंपरेनें सुखकर, म्हणूनच दुःखनिवारणाचें साधनही उपादेय होतें. त्याच न्यायानें दुःख देणारें साधनही दुःखाप्रमाणें हेय होतें.

सिद्धिफल देणारी ही प्राणादि पवनाभ्यास-क्रिया ऐक. साध्याविषयींच्या मनांतील सर्व वासना सोडून गुदादिद्वारांचा संकोच करावा. सिद्धासनादि आसनांचा अभ्यास करावा. शरीर, मान, मस्तक, यांस सम धारण करावें. नासाग्र-दृष्टि ठेवावी. भोजनशुद्धि करावी. योगशास्त्राचें चिंतन करावें. त्याच्या अनुष्ठेय अर्थाची चांगली भावना करावी. उत्तम आचार पाळावा. सुजनांचा समागम करावा. सर्वस्वाचा त्याग करावा. सर्व चिंतांचा त्याग करून सुखानें बसावें. प्राणायामाचा फार अभ्यास करावा. असें केलें असतां हे सुव्रता ! कोप, लोभ इत्यादि क्षीण होतात, भोगांचा त्याग होतो आणि कुंभक, रेचक व पूरक यांचा चांगला अभ्यास केला असतां योगज्ञ पुरुषाचे सर्व प्राण चाकराप्रमाणें त्याच्या अधीन होतात. कारण तो योगी प्राणांचा स्वामी होतो, आणि त्यामुळें लौकिक स्वामीचे नोकर त्याच्या अधीन जसे राहतात, तसे सर्व प्राण त्याच्या अधीन राहतात. हे राघवा ! राज्यापासून मोक्षापर्यंत सर्व सिद्धि शरीरांतील प्राणवायूशीं संबद्ध असल्यामुळें अधिकारी योग्याला त्या साध्य होतात. शरीरांत सुषुम्ना ह्मणून एक नाडी आहे. ती सभोंवार पसरलेल्या शाखांनीं परिवेष्टित झालेली असल्यामुळें परिमंडलिताकार आहे. त्या शाखानाड्यांनीं आंतड्यांना वेढलेलें असल्यामुळें आन्त्रवेष्टनिका असें तिचें नांव आहे. तिनें मर्मस्थानांचा आश्रय केला आहे. तिच्यापासून शंभर नाड्या निघाल्या आहेत. वीणादण्डाच्या मूलभागीं असलेला जो तारा जोडण्याचा आवर्त किंवा पाण्याचा भोवरा त्यासारखी ती नाडी आहे ॐकाराच्या शेवटच्या ॰ अशा अर्ध्या भागाच्या आकारासारखा तिचा आकार आहे. किंवा कुंडलाच्या आवर्तासारखी तिची रचना आहे. देव, असुर, मनुष्य, पशु, नक्र, पक्षी इत्यादिकांत कीटापासून ब्रह्मदेवापर्यंत सर्व प्राण्यांमध्यें ही उदय पावली आहे. थंडीनें व्याकुळ होऊन पडलेल्या मोठ्या सर्पाच्या वेटोळ्याप्रमाणें तिनें मंडल केलें आहे. ती शुभ्र आहे. कल्पाग्नीनें विरघळून जाणाऱ्या चंद्राप्रमाणें तिनें आपला वलयाकार केला आहे. गुदापासून भ्रूमध्यापर्यंत जीं रंध्रें आहेत त्यांत अनुवृत असलेली, मनोवृत्तीच्या योगानें आंत अतिशय चंचल झालेली व बाहेर प्राणवायूच्या योगानें एकसारखी स्पंदन करणारी अशी ती सुषुम्ना नाडी आहे. तिच्या मुळाशीं आंत साडेतीन वलयांच्या आकाराची कुंडलिनी या नांवाची चिच्छक्ति आहे. त्या मूळाधारांत वीणेच्या मूलप्रदेशीं तार जशी वेगानें झणत्कार करीत असते त्याप्रमाणें अत्यंत सूक्ष्म पराशक्ति स्फुरण पावते. तीच शब्दब्रह्मात्मिका स्फूर्ति आहे. तीच प्राणाच्या संगानें नाभि, हृदय, कंठ, या स्थानीं उत्तरोत्तर अधिक व्यक्त होत जाऊन पश्यन्ती, मध्यमा, वैखरी, इत्यादि भेदांस प्राप्त होते. केळीच्या गाभ्याप्रमाणें कोमल असलेल्या त्या मूळाधारांतील ती पराशक्ति कुण्डलिनी या नांवानें प्रसिद्ध आहे. कारण ती कुंडलाकार धारण करते. ती प्राण्यांची परम शक्ति आहे. ती प्राण, इंद्रियें, बुद्धि इत्यादि सर्वांच्या शक्तींना सत्ता व स्फूर्ति देते व त्यांची प्रवृत्ति करते. अतिशय रागावलेल्या भुजंगीप्रमाणें ती एकसारखी आपल्या तोंडानें प्राणाला वर फेंकते व अपानाला खालीं ओढते, याप्रमाणें ती सदा निःश्वासरूप होऊन राहिली आहे. जेव्हां हृदयांत स्थित असलेला प्राण कुंडलिनीनें आकर्षण केलें असतां अपानवृत्तीनें कुंडलिनीपदास प्राप्त होतो, तेव्हां अपंचीकृत पंचतन्मात्राच ज्याचें उपादान आहे अशा अंतःकरणांत असलेली जीवसंविद् स्मरण, संकल्प, निश्चय, अभिमान

राग इत्यादि वृत्तिभेदांनीं आंत उदय पावते. कमलांत जशी भ्रमरी, त्याप्रमाणें कुंडलिनी देहांत स्फुरण पावते. प्राणामध्यें क्रियाशक्ति व बुद्धीमध्यें ज्ञानशक्ति वर वर्णन केल्याप्रमाणें ती उत्पन्न करते. नंतर देहांत ज्याचा मृदुस्पर्श—विषयसंनिकर्ष आहे अशा चक्षुरादिकांचा उदय करून ती देहांत जीवाच्या पूर्वकर्मानुसार जशी जशी सामग्रीवैचित्र्यानें स्फुरण पावते, तशी तशी त्या त्या इंद्रियांनीं विशेष विषयाची स्फूर्ति, त्यांचा फलभोग इत्यादि आकाराची संवित् बनते. कुंडलिनी वेगानें अशी उदय पावते:—मृदु चक्षुरादिकांच्या योगानें विषयस्पर्शन प्रथम उदय पावतें. नंतर वृत्तीच्या द्वारा बाहेर निघालेल्या प्रमात्याचा बाह्य विषयांशीं संसर्ग होतो. त्या वेळीं ती कुंडलिनी विषय व विषयी यांच्या परस्पर आलिंगनरूप होते. वृत्तिव्याप्ती-मुळें तिची व्याप्ति उदय पावते. त्या व्याप्तीनें विषयावरणाचा भंग झाला असतां जशी जशी अगदीं स्पष्ट घटादि प्रथा उदय पावते, त्या त्या प्रकारानें कुंडलिनी वेगानें स्फुरते. मूलाधारांत स्थित असलेल्या तिच्यापासून चक्षुरादि इंद्रियांची प्रवृत्ति होण्यास हृदयकोशांत असलेल्या नाड्या हें द्वार आहे. कारण त्या सर्व नाड्या तिच्याशीं संबद्ध आहेत. त्या तिच्यापासून विस्तार पावतात व महासागरांत जशा नद्या तशा तिच्यामध्यें विलय पावतात. प्राणरूपानें ऊर्ध्वगमन करण्यास उत्सुक झालेल्या व अपानरूपानें अधोगमन करण्यास उत्सुक झालेल्या तिच्या योगानें नाड्यांचा विस्तार व संकोच होतो. ती एक कुंडलिनीच सर्व वृत्तींचें बीज आहे. तिला 'सामानी-' सर्वांना साधारण असलेली असें म्हटलें आहे,

**श्रीराम:**—भगवन्! कल्पाच्या आरंभापासून अंतापर्यंत अपरिच्छिन्न असलेल्या चित्चा मूलाधारभूत नाडीमूलांत परिच्छिन्न झालेल्या



कुंडलिनी या नांवाच्या स्वांशापासूनच उद्भव कसा व कशासाठीं होतो?

**श्रीवसिष्ठ:**—हे निष्पाप रामा! सर्वत्र, सर्वदा व सर्वरूपानें चित्संविद्च विद्यमान आहे. परंतु भूततन्मात्रांच्या योगानें तिचा केव्हां केव्हां उदय होतो. ती संविद् सर्वत्र विद्यमान जरी असली तरी ती देहामध्यें बुद्धीनें अवच्छेद व प्रतिबिंब यांच्या योगानें द्विगुणित होऊन प्रवेश केल्यामुळें विस्तार पावून जलांतील चंद्राप्रमाणें, बुद्धिचांचल्यामुळें, चंचल होते. सूर्याचें ऊन सर्व आकाशाला व्यापीत असलें तरी भिंत, डोंगर, झाडें इत्यादिकांवर व्यक्त होतें, हें प्रसिद्धच आहे. अर्थात् उपाधींच्या योग्यतेप्रमाणें व्यापक वस्तूची न्यूनाधिक अभिव्यक्ति होते. चिद्वस्तु माती, दगड इत्यादिकांत व्यक्त होत नाहीं. तर त्यांतील जाड्यामुळें तिचा अभिभव होतो. म्हणून त्या जड पदार्थांत तापलेल्या पाण्यांतील शीतत्वाप्रमाणें चित् दिसत नाहीं. पण ती देव-मनुष्यादि लिंगशरीरांत स्पष्ट अभिव्यक्त होते. वृक्षादिकांच्या लिंगांत अगदीं गुप्तशी असते. ती बाहेर व्यक्त होत नाहीं, पण आंतल्याआंत अनुभव घेते. पण चिदंशामध्यें हा तारतम्यभाव जसा दिसतो, तसा सत्ता या अंशीं दिसत नाहीं. तर त्या सर्व उपाधींत सत्ता त्या त्या रूपानें व्यक्त झालेली दिसते. रामा! हीच गोष्ट मी तुला पुन: क्रमानें सांगतों, ती तूं ऐक. आपल्या म्हणजे मनुष्यांच्या व पश्वादिकांच्या देहांत संविन्मय क्रम कशा तारतम्यभावानें उदय पावतो, तें मी तुला सांगतों. सर्व चेतन व अचेतन भूतजात चिन्मात्र व सन्मात्र आहे. आकाश जसें सर्व शून्यमात्र, तसें तें सर्व चिन्मात्र. तें अविकार व अत्यंत निरुपद्रव आहे. आकाशाप्रमाणें असंग, विभु व सूक्ष्म आहे. तें स्वरूपानें तसेंच स्थित असतांना त्याच्या माया-

कल्पित एकदेशांत आकाशादि सूक्ष्मभूतांचा क्रमानें अध्यास झाल्यामुळें तेंच भूतमात्रारूप होऊन राहिलें आहे. तें तन्मात्रपंचक प्राण, मन, बुद्धि, ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें असें पांच प्रकारचें लिंगशरीर झालें आहे. त्यांत प्रतिबिंबरूपानें प्रविष्ट झालेला तूं एका दिव्यावर लावलेल्या शंभर दिव्यांप्रमाणें बनला आहेस; आणि जन्मादि विकार व जाग्रदादि अवस्था ज्यांत आहेत अशा द्वित्वास म्ह० जीवभावास तूं पहात आहेस. लिंगाचा आरंभ करून राहिलेलीं कांहीं भूतपंचकें जीवाच्या देव मनुष्यादि आकारविषयींच्या वासनानुसारी संकल्परूप स्वसत्तेनेंच पंचीकरणाच्या द्वारा स्थूलदेहत्वास प्राप्त होतात. त्यांतील कांहीं पशु पक्ष्यादि तिर्यग्रूपत्वास, कांहीं स्थावररूपत्वास, कांहीं सुवर्णरजतादिरूपत्वास म्हणजे तदुपलक्षित ब्रह्मांडभावास, त्या ब्रह्मांडांतील भुवनत्वादिकांस व द्रव्यत्वादि विषयाकारास प्राप्त होतात. याप्रमाणें हें जगत् पंचभूतात्मक आहे, हें सिद्ध झालें. हे रघुनंदना ! या जगांत सर्वत्र चित्संवित् आहे. ती वस्तुतः घटादि जड पदार्थांतही विद्यमान असते. पण मनुष्यादि देहांमध्यें चैतन्याला अभिव्यक्त करणाऱ्या प्राणादि पंचकघटित लिंगदेहाचें प्राधान्य असल्यामुळें त्याला चेतन अशी संज्ञा आहे. पश्वादि तिर्यक् प्राण्यांच्या शरीरांत स्थूल व लिंग यांचें एकसारखेंच प्राधान्य असल्यामुळें त्यांना जडाजड संज्ञा आहे. स्थावरांत लिंग आंतल्या आंत अनुभव घेत असल्यामुळें व लोकांना बाहेर त्यांचें चेतनकार्य प्रतीत होत नसल्यामुळें जड अशी संज्ञा आहे. चेतन, जडाजड व जड यांमध्यें चित् तारतम्यानें कशी राहते तें मी दृष्टांत देऊन सांगतों, ऐक. जसा एकादा घृताचा समुद्र दिवसा वितळून सर्वत्र द्रवरूप असतो, पण संध्याकाळीं शीतळ वायूच्या संपर्कामुळें वेलातटावर क्रमानें गोठून जातो, व त्यामुळें निश्चल राहतो, पण मध्यभागीं तसा गोठून जात नाहीं; त्यामुळें तेथें चंचल असतो. जेथें किंचित् गोठलेला असतो तेथें किंचित् हालतो व जेथें अतिशय गोठून घट्ट झालेला असतो तेथें स्थळासारखा अचल राहतो. त्याचप्रमाणें ही चित् मनुष्य, पश्वादि व स्थावर जीव यांच्या शरीररूपी पंचकांत चंचल, किंचित् चंचल, व जड, अशी तीन प्रकारची होऊन राहते. रामा ! सागर एके ठिकाणी स्थिर आहे व दुसऱ्या ठिकाणीं तोच अतिशय चंचल झाला आहे, म्हणून तो सागर नव्हे. असें म्हणतां येईल का ? नाहीं. त्याचप्रमाणें देव, मनुष्य, पशु, स्थावर इत्यादिकांत ही चित् समान आहे, किंवा हा जड व अजड विकल्प या चित्वर आरोपिलेल्या पंचकाचा धर्म आहे; चित्चा नव्हे. कारण स्वतः चित् सर्वधर्मरहित आहे. पंचकामध्यें स्वभावतःच असे पुष्कळ विकल्प संभवतात. देहादिकांच्या आकारानें परिणत झालेलें भूतपंचक, प्राणधारणामुळें होणारा स्पंद व चैतन्य यांच्या योगानें जीव—चेतन, त्याचा प्रयोजक—प्रवर्तक स्पंद, पर्वतादिक जड, बाहेरच्या वायूनें हालणारे वृक्षादि स्थावर, इत्यादि अनेक व्यवस्थित विकल्प स्वभाववशात् अनुभवास येतात. "अहो, पण स्वभाव म्हणजे प्रत्येक पदार्थाचें स्वरूप. मग असा स्वभाव विरुद्ध विकल्पात्मक कसा ? कारण विरोधाला दुसऱ्याची अपेक्षा असते व स्वरूपाला दुसऱ्याची अपेक्षा नसते. तेव्हां स्वभाव परसापेक्ष विकल्पाचें स्वरूप किंवा निमित्त कसा होईल ?" असा प्रश्न करशील तर मी तुला असें सांगतों कीं तूं स्वभावाला सोडून वाक्—विषयींच प्रश्न कर. त्या वाक् चित्—जड इत्यादि शब्दरूप आहेत. त्या स्वतःची पुनरुक्ति होऊं नये

म्हणून स्वार्थाची व्यावृत्ति करून परस्पर-विरुद्ध असलेलें चैतन्य व जाड्य यांचा बोध करून देतात. याच न्यायानें शीतोष्णादि धर्म-पर व हिम, अग्नि इत्यादि धर्मिपर सर्वही वाक् सर्वत्र अशीच अनुभवास येते. किंवा वाक्-विषयींही प्रश्न करणें उचित नाहीं. कारण ती वाक् वासनांनीं कल्पिलेल्या विकल्पयुक्त पंच-काचा नुस्ता अनुवाद करणारी आहे. यास्तव ती त्या पंचकाच्या अधीन आहे. म्हणून वासनांचे अंश ज्यांनीं ग्रहण केलेले आहेत अशा परस्परविरोधी लिंगात्मक पंचकाच्या विकारांच्या स्थितीविषयींच प्रश्न करणें उचित आहे. कारण विकल्पच न केल्यास सर्व विरो-धांचा आपोआप उच्छेद होतो. किंवा त्या स्थितींचाही कांहीं दोष नाहीं. कारण त्या पूर्व-पूर्व सहस्रावधि विकल्पांच्या वासनानुसार असतात. यास्तव परस्परविरुद्ध विकल्पांच्या कल्पनेचें मूळ हुडकणाऱ्या विद्वान पुरुषानें चित्ताला इकडे तिकडे सहस्रावधि विरुद्ध विकल्पांत नेण्यासाठीं विक्षिप्त झालेल्या वासने-विषयींच सुखानें प्रश्न करावा; स्वभाव, वाक्, पंचकांच्या स्थिति, याविषयीं आक्षेप करूं नये. पुरुषाच्या तिर्यक्-स्थावरादि अशुभ भावांत किंवा देवादि शुभ भावांत भूतपंचक सुप्तवासन व प्रबुद्धवासन होऊन राहतें; म्हणजे एकांत वासना निजलेल्या असतात व दुसऱ्यांत जा-गृत असतात. यास्तव त्यांचें कारण जी वासना तिच्याचविषयीं प्रश्न केला जातो. वासनेविषयीं प्रश्न करणें व्यर्थ नाहीं. त्याचा उपयोग आहे. कारण वासनेचा विचार करूं लागलें असतां तिच्या क्षयाचा उपाय सुचतो व त्याच्या अनुष्ठानांत प्रवृत्ति होते. यास्तव वासनेविषयींच विचार करावा. स्वभावादिकांचा विचार जरी केला तरी त्याचें फळ कांहीं नाहीं. यास्तव आकाशाला ताडण करीत बसूं नये. विचार व उपायानुष्ठान यांच्या योगानें वासनाक्षय झाला असतां पूर्ण आत्म्याचा लाभ होतो. त्यामुळें मेरुप्रभृति सुवर्णाचे पर्वतही कस्पटासा-रखे तुच्छ ठरतात. विवेकनिष्ठ देवादि भोगशाली देहही कीटादिकांप्रमाणें अतिशय तुच्छ होतात. म्हणूनच कित्येक प्राण्यांतील वासना अगदीं गाढ निजलेल्या असतात. जशा स्थावर जाती. कि-त्येकांतील वासना जाग्या असतात. जसे-मनुष्य, देव इत्यादि. कित्येकांचें चित्त वासनांनींच अस्वच्छ असतें. जसे हे पश्वादि तिर्यक् प्राणी. कित्येकांनीं वासनांचा त्याग केलेला असतो. जसे—हे मोक्षाला जाणारे अधिकारी. वासना-वैचित्र्यामुळेंच देव-मनुष्यादि पंचकराशि, आका-शगमन, भूमिगमन इत्यादि विचित्र व्यवहारास योग्य असे हस्तपादादि अवयव—कर्मेंद्रियें यांनीं युक्त झाल्या आहेत. कर्मेंद्रियांनीं युक्त असलेल्या त्या देवादि पंचक राशींनीं आपापल्या व्यवहा-रास योग्य अशा मन, बुद्धि, अहंकार, चित्त, चक्षु, श्रोत्र, घ्राण, रसन, स्पर्श इत्यादिक अंतर्बाह्य करणरूप संज्ञा केलेल्या आहेत. म्ह-णूनच त्या प्रत्येक प्राण्यामध्यें विचित्र स्वभा-वाच्या दिसतात. पश्वादि तिर्यक् प्राण्यांनीं चार पाय, दोन शिंगें, पुच्छ अशा आपल्या निराळ्याच अवयवांची कल्पना केली आहे. तिर्यक् प्राण्यांतील पक्ष्यांनीं चोंच, दोन पंख, पुच्छ, पाय यांची कल्पना केली आहे. सर्पांनीं फणा, शरीर, पुच्छ यांची कल्पना केली आहे. व कृमि-कीट-दंश-मशकादिकांनीं आपापल्या वासनारूप व्यवहारास योग्य अशा अवयवादि-कांची कल्पना केली आहे. हे साधो! याप्रमाणें हे विचित्र पंचकराशि आदि, अंत व मध्य यां-मध्यें विकारी, जड, पण अधिष्ठानसद्रूपानें अचल, अजड अशा रूपांनीं स्फुरण पावतात. याप्रमाणें पंचक या नांवाचे लिंगभेद अनेक आहेत. त्यांतील एकाला, कर्म व उपासना यांचें

समुच्चयानें अनुष्ठान केलें असतां त्याचें समष्टिअहंभाव हें फळ प्राप्त होतें. त्याचा एक संकल्पपरमाणु या संसाररूपी आकाश-वृक्षाचें बीज आहे आणि पुनः त्यांत हीं सर्व पंचकें आहेत. खरोखर हें मोठें आश्चर्य आहे. त्या आकाशवृक्षाचीं इंद्रियें हींच फुलें आहेत. त्यांत विषयरूप सुवास प्रधान आहे. इच्छा याच भ्रमरी आहेत. चंचल कर्मेंद्रियांच्या क्रिया याच शोभणाऱ्या मंजऱ्या आहेत. स्वर्गादि दुसरे लोक ह्याच त्यांच्या शाखा आहेत. मेरूसह दुसरे सर्व पर्वत हें मूळ आहे. नीलवर्ण मेघ हेच त्या वृक्षाचे पल्लव आहेत. दहा दिशा ह्याच चंचल लता आहेत. हे रघुनंदना! वर्तमान, भूत व भविष्यत् अशीं जीं चार प्रकारचीं भूतशरीरें तीं त्या वृक्षाचीं असंख्य फळें आहेत. रामा! हे पंचक वृक्ष पंचबीज आहेत. म्हणजे पंचभूतें हें त्यांचें बीज आहे. ते स्वविवेकशून्य आत्म्यापासून उत्पन्न होतात, व स्वतः कालानें नाश पावतात. ते स्वतःच नानात्वास प्राप्त होतात व दीर्घकाळ अज्ञानामुळें स्फुरण पावतात; आणि विवेकदृष्टीनें त्यांना पाहिलें असतां, समुद्रांत जसे तरंग तसे शांत होतात. बाह्यदृष्टच्या ते विकास पावतात व प्रत्यग्दृष्टच्या स्वतःच शांत होतात. समुद्रांतील तरंगांप्रमाणें ते अज्ञानानें वृद्धि पावतात व विवेकानें शांत होतात. हे रामा! जे पंचकविलाससमूह चित्त वासनाशून्य होऊन नाश पावेपर्यंत विवेकवश झालेले असतात, ते पुनः या संसारांत जन्म-मरण-देहधारणादि संस्थितीस प्राप्त होत नाहींत. पण बाकीचे सर्व पूर्वीप्रमाणेंच जगांत भ्रमण करितात.

---

# सर्ग ८१ वा.

१ कुंडलिनीच्या प्रसंगाने रोगांचा उद्भव व शम यांचे क्रम, व सिद्धांच्या दर्शनाचे उपाय वगैरे येथें सांगितले जातात.

श्रीवसिष्ठः—त्या स्थूलदेहरूप पंचकांच्या आंत मूलाधारीं वर वर्णिलेल्या कुंडलिनींत या लिंगात्मक पंचकांचें बीज म्हणजे उपादानरूप सूक्ष्म भूत प्रथम प्राणपंचकरूपानें सर्वदा स्फुरण पावतें. ती प्राणरूपानें आंत स्फुरण पावलेली कुंडलिनी वायुधर्मानें व स्वधर्मानें स्पंद, स्पर्श, संविद, अशी त्रिरूप शुद्ध कल्पना बनते. तिला कल्पनेमुळें कला, चेतनामुळें चित्, जीवनामुळें जीव, व मननामुळें मन ह्मणतात. संकल्पामुळें ती संकल्परूप झाली आहे. बोधामुळें बुद्धि झाली आहे. 'अहं' अशा अभिमानामुळें अहंकार झाली आहे. ती पुर्यष्टक या नांवाची आहे. ही कुंडलिनिच देहांत अत्युत्तम जीवशक्ति होऊन राहिली आहे. ती अपानत्वास प्राप्त होऊन सतत अधोभागीं वहाते. समानरूप हाऊन नाभीमध्यें स्थित होते. उदानसंज्ञक होऊन ऊर्ध्वभागीं स्थित आहे. ती खालीं नेहमीं अपानरूपच असते. मध्यें सौम्य असते. तिला खालीं अपानवृत्ति, व उदानवृत्ति वर जरी ओढीत असली, तरी ती स्वतः निश्चलच राहते; आणि त्या मधल्या समानवृत्तीनें घट्ट धरून ठेवल्यामुळेंच ऊर्ध्ववृत्ति जरी अत्यंत बलाढ्य असली तरी ती उदानरूपच बनून स्वस्थ राहते. लिंगशरीराला बाहेर घालवीत नाहीं. त्या मधल्या सामान्य वृत्तीनें जर अपान प्रवृत्तीलाहि यत्नानें धारण केलें नसतें, तर ती जीवसंवित् सर्व बळानें आकर्षण केली जाऊन अधोमार्गानें बाहेर निघून गेली असती, आणि बलात्कारानें ती निघून गेली ह्मणजे पुरुष मेलाच. त्याचप्रमाणें सामान्यवृत्तीनें युक्तीनें

ऊर्ध्ववृत्तीलाही जर धरून ठेवलें नसतें तर तीही बलानें बाहेर निघून गेली असती व पुरुष मरण पावला असता. पण ऊर्ध्वगमन व अधोगमन सोडून प्राण्याच्या देहांत प्राणापानगतिनिरोधाभ्यासानें ती सर्वशरीरांत समानवृत्तीनें जर राहील, तर इतर वृत्तींचा लय होऊन सर्व व्याधींचा क्षय होईल व मृत्यूलाही जिंकतां येईल. शरीरांत शंभर प्रधान नाड्या आहेत. त्यांच्या ज्या शाखा त्याच सामान्य नाड्या होत. त्यांत अन्नरस पोंचविणारी समानवृत्ति जेथें कफ-पित्त वगैरे सांठल्यामुळें व्यापार करीनाशी होते, तेथेंच इतर वायु वैषम्यानें अन्नरसाला आकर्षण करून घेतात आणि त्यामुळें सामान्य नाड्यांच्या अव्यापारानें सामान्य व्याधि व प्रधान नाड्यांच्या अव्यापारामुळें महाव्याधि उत्पन्न होतात.

श्रीरामः—हे मुनीश्वरा! या शरीरांत आधि व व्याधि कशापासून उत्पन्न होतात व कशानें विनाश पावतात, तें मला यथार्थपणें सांगा.

श्रीवसिष्ठः—आधि व व्याधि हीं दोन्ही दुःखाचीं कारणें आहेत. त्यांची निवृत्ति हेंच सुख आहे, असें समजावें व त्यांच्या क्षयाला मोक्ष म्हटला जातो. कारण त्यांचा समूल नाश ज्ञानानेंच होतो. केव्हां केव्हां त्या दोन्ही एकाच वेळीं उद्भवतात. केव्हां केव्हां एकमेकींचें निमित्त होतात. केव्हां केव्हां एकदां नुस्ती व्याधिच उत्पन्न होते व एकदा नुस्ती आधिच उद्भवते. देहदुःखाला व्याधि समजतात. वासनामय दुःखाला आधि म्हणतात. त्या दोघींचेंहि मूळ अज्ञान आहे. म्हणून तत्त्वज्ञान झालें असतां त्यांचा सर्वथा नाश होतो. तत्त्वज्ञान नसल्यामुळें, आपल्या इंद्रियनिग्रहाच्या अभावीं हृदयांतील स्वास्थ्य नष्ट झाल्यामुळें व 'हें मला प्राप्त झालें; हें प्राप्त झालें नाहीं' अशा चिंतेनें राग-द्वेषांमध्यें सतत प्रसक्ति झाल्यामुळें किंवा जाड्यामुळें, भय व शोक यांचें निमित्त प्राप्त झालें असतां त्याचा प्रतिकार कसा करावा हें न समजणें, एतद्रूप घन मोह देणाऱ्या आधि, वर्षाकाळीं जशी काळोखी, तशा प्रवृत्त होतात. इच्छा अतिशय स्फुरण पावूं लागल्या असतां व अज्ञान चित्तांत विकास पावत असतां शरीरव्याधि उद्भवतात. दुष्ट अन्न खाल्ल्यानें, श्मशानादि दुष्ट देशांचें आक्रमण केल्यानें, मध्यरात्र, प्रदोष इत्यादि दुष्ट काळीं भोजन, स्त्रीसंग इत्यादि व्यवहार केल्यानें, दुष्ट क्रिया केल्यानें, दुर्जनांच्या संगदोषानें, विष, सर्प, व्याघ्र, चोर इत्यादिकांविषयींची शंका मनांत आणल्यानें, नाड्यांच्या रंध्रांत अन्नरसाचा प्रवेश न झाल्यामुळें त्या क्षीण झाल्यानें, किंवा दुप्पट रसवात इत्यादिकांच्या प्रवेशानें त्या अधिक भरल्यानें, प्राण कफ-वात-पित्तप्रकोपानें व्याकुळ होतो व शरीर आघातादिकांनीं विकल होतें. त्यामुळें देहांत व्याधि उत्पन्न होतो. तो शरीराच्या अस्वास्थ्याचें कारण आहे. पावसाळा व उन्हाळा यांच्या योगानें नदीच्या आकारांत जसा फरक होतो, त्याप्रमाणें देहाच्या आकारांत फरक होणें हाच व्याधि आहे. त्या आधि-व्याधींची सामग्री पूर्वजन्मींची किंवा या जन्मींची शुभ किंवा अशुभ मति आहे. त्यांतील जी अधिक असेल तीच शरीरादिकांना त्या क्रमांत योजते. याप्रमाणें सर्व आधि व व्याधि भूतपंचकांत उत्पन्न होतात. आतां त्या विनाश कशा पावतात तें, हे रघुनायका! तूं ऐक. या जगांत दोन प्रकारचा व्याधि आहे. एक साधारण व दुसरा अतिशय दृढ. भूक लागणें, तहान लागणें, स्त्री, पुत्र इत्यादिकांची लालसा, यांमुळें होणारा जो व्यावहारिक व्याधि तो साधारण व जन्मादि विकारांचें जें मूळ तें

सार—अति दृढ व्याधि आहे. अन्न-पान, स्त्री-पुत्र इत्यादि अभीष्ट वस्तूंचा लाभ झाला असतां व्यावहारिक व्याधि नाश पावतात. मानसिक व्यथांचा क्षय झाला असतां आधींपासून झालेले व्याधिही पूर्णपणें क्षय पावतात. पण सार या नांवाचा जो दृढ व्याधि आहे, तो आत्मज्ञानावांचून नाश पावत नाहीं. प्रकाशादिकांच्या साह्यानें रज्जुतत्त्वाचा अवबोध झाल्यावांचून रज्जुसर्प बाधित होत नाहीं, हें प्रसिद्ध आहे. पावसाळ्यांतील नदी ज्याप्रमाणें कांठावरील सर्व लहानथोर झाडांचा नाश करते, त्याप्रमाणें हे रामा! साररूप आधीचा संक्षय सर्व आधिव्याधिविलासांचें मूळ नाहींसें करणारा आहे. सामान्य व्याधींमध्यें, आधींपासून न झालेल्या ज्या व्याधि आहेत त्या चिकित्साशास्त्रांत सांगितलेल्या द्रव्य, यंत्र, शुभ कर्म, यांनीं किंवा वृद्धपरंपरेनें प्राप्त झालेल्या उपायांनीं नाश पावतात. लोलार्कादि-तीर्थांमध्यें स्नान, मंत्र, औषधें, इत्यादि उपाय, वृद्ध जनांनीं सांगितलेलीं औषधें व चिकित्साशास्त्रें तुला माहीत आहेतच. तेव्हां त्यांविषयीं आणखी अधिक काय सांगावयाचें आहे?

**श्रीराम:**—आधींपासून व्याधि कसा होतो व त्याचा द्रव्याहून इतर मंत्र-पुण्यादिरूप युक्तींनें विनाश कसा होतो?

**श्रीवसिष्ठ:**—चित्त आधींनीं क्षुब्ध झालें असतां त्याच्या मागोमाग देह पूर्णपणें क्षुब्ध होतो. कारण ज्याचे नेत्र धुळीनें भरले आहेत असा प्राणी आपल्या पुढील मार्गही पाहूं शकत नाहीं; आणि पुढील मार्ग न दिसल्यामुळें अमार्गानेंच धावत सुटतो. बाणानें आर्त झालेला हरिण प्रकृत मार्ग सोडून जसा जातो, त्याप्रमाणें शरीराच्या क्षोभामुळें प्राणवायु साम्य सोडून वाहूं लागतात. नदीच्या तीरावरील जलप्रवाह नदींत हत्ती शिरला असतां जसा क्षुब्ध होतो, त्याप्रमाणें प्राणवायु क्षुब्ध होतात. प्राण असम वाहूं लागला असतां नाड्या कफ-पित्तादिकांनीं भरल्यामुळें विषम अवस्थेला प्राप्त होतात. कांहीं नाड्या त्या दोषांनीं अगदीं भरून जातात व कांहीं रिकाम्या होतात. प्राणांनीं देहाला सर्वत: विह्वल केलें असतां नद्यांप्रमाणें नाड्यांची दशा होते. प्राण आपला व्यापार क्रम सोडून करूं लागला असतां तो अन्नदोष उत्पन्न करण्यासच कारण होतो. चांगलें जीर्ण न होणें, मुळींच जीर्ण न होणें, किंवा अति जीर्ण होणें हे अन्नाचे दोष आहेत. जसा नदीचा वेग काष्ठांना पूर्वदेशास नेतो तसा प्राणवायु—समान अन्नांना स्वाश्रयभूत सर्व शरीरांत रसरूपानें नेतो. जीं अन्नें निरोधानें शरीरांत राहतात तींच परिणामस्वभावानें व्याधित्वास प्राप्त होतात. येणेंप्रमाणें आधीपासून व्याधि होतो; आणि आधीचा अभाव झाला असतां तो नाश पावतो. आतां मंत्रांच्या योगानें व्याधि कसे नाश पावतात त्याचा क्रम ऐक. जसे हिरडे स्वभावत:च विरेचन करितात, त्याप्रमाणें य-र-ल-व इत्यादि अक्षरें[१] भावनेच्या बळानें कार्य करितात. हे माधो! कसोटीवर घांसल्यानें सोनें जसें निर्मळ होतें, त्याप्रमाणें शुद्ध व पुण्य क्रियेनें आणि साधूंच्या सेवेनें मन निर्मल होतें. हे राघवा! पूर्णचंद्राचा उदय झाला असतां या भुवनांत जशी निर्मलता पसरते, त्याप्रमाणें चित्त शुद्ध झालें असतां देहांत आनंद वाढतो. चित्तशुद्धीनें हे प्राणवायु क्रमानें वाहतात. त्याचप्रमाणें अन्नाला जिरवितात व त्यामुळें व्याधींचा नाश होतो. रामा! कुंडलिनीच्या कथाप्रसंगानें

१ अग्नि, वायु, भूमि, जल इत्यादिकांच्या बीजरूप हे वर्ण आहेत. यास्तव मांत्रिकाच्या भावनेनें व्याधीच्या आकारानें परिणत झालेल्या अन्नरसाचें उत्सारण, पाचन इत्यादि कार्य ते करितात.

तुझ्या ठिकाणच्या आधींचा व व्याधींचा नाश व उत्पत्ति यांचा क्रम सांगितला. आतां सिद्धींच्या हेतूंचें निरूपण ऐक. पुष्पमंजरी सुवासाचा जसा आधार असते, त्याप्रमाणें पुर्यष्टकसंज्ञक लिंगात्म्या जीवाची प्राण या नांवाची कुंडलिनी आधारभूत आहे. पूरकाच्या अभ्यासानें तिला सर्वतः भरून म्ह० कंठाच्या खालीं —उरांत कूर्माच्या आकाराची जी नाडी आहे तिच्यामध्यें प्राणाला स्थिर करून जेव्हां पुरुष स्थिर राहतो तेव्हां शरीराला पुष्टि येते, गरिमा या नांवाची सिद्धि प्राप्त होते. शरीराला मेरूसारखें स्थैर्य प्राप्त होतें. पूरकानें देहाचा अंतर्भाग पूर्ण झाला असतां, मूलाधारापासून ब्रह्मरंध्रापर्यंत दीर्घ करून प्राणवायूचें वर आकर्षण केलें असतां कुंडलिनीला—प्राणनिरोधामुळें उद्भवलेला उष्मा, त्यामुळें होणारा शारीर क्लेश व मानस श्रम यांना अभ्यासपाटवानें व अमृतवृष्टीनें सहन करण्यास समर्थ करण्यासाठीं जेव्हां वर नेलें जातें, तेव्हां ती वर नेली जाणारी कुंडलिनी आकर्षणामुळें दंडासारखी दीर्घ व सरळ होते; आणि नागिणीसारखी झटकन् अभ्यासपाटवामुळें ऊर्ध्वगमन करते. ती त्वरेनें जातांना देहांतील सर्व नाड्या आपल्याबरोबर आकर्षण करून घेते. त्यामुळें त्या वेळीं ती लतेसारखी दिसते. तेव्हां हें शरीर नाड्यांच्या द्वारा वायूनें सर्वतः भरलेलें असतें. त्यांत थोडासाही अवकाश नसतो. त्यामुळें अगदीं हलकें झालेलें हें सर्व आपादमस्तक शरीर विहिरींतून वर ओढली जाणारी मोट आपल्यांत असलेल्या पाण्याला जशी वर उडविते त्याप्रमाणें वर उडतें. हलकें झालेलें शरीर प्राण्याप्रमाणें उडूं लागतें. हेंच त्याचें आकाशगमन आहे. याप्रमाणें अभ्यासविलासरूप शरीराकाशसंबंधसंयमरूप योगानें दीन पुरुषांना जशी इंद्रावस्था प्राप्त व्हावी, त्याप्रमाणें योग्याला ऊर्ध्वगमनसिद्धि प्राप्त होतें. (आतां आकाशांतील सिद्धांचें दर्शन कसें होतें तें सांगतात—) जेव्हां रेचक वायूच्या प्रयोगानें वर आकर्षण केली गेलेली कुंडलिनी शक्ति सुषुम्नानाडींतील प्राणप्रवाहानें मस्तकसंबंधीं कपालद्वयाचा संधि, याच कपाटाच्या—द्वाराच्या बाहेर द्वादशांगुल परिमित मूर्धेतील षोडशान्त नांवाच्या स्थानांत एक क्षणभर स्थित होते, तेव्हां आकाशांतून गमन करणाऱ्या सिद्धांचें दर्शन होतें.

**श्रीरामः**—भगवन्! आमचीं इंद्रियें अदिव्य आहेत. म्हणजे तीं दिव्य नाहींत. त्यामुळें आमच्या चक्षुरिंद्रियाचा सिद्धांच्या शरीराशीं संनिकर्ष जरी झाला तरी त्यांचें तत्त्व कळणें शक्य नाहीं. कारण चक्षूंतील प्रभेचा त्यांच्याशीं संनिकर्ष झाल्यावांचून केवल षोडशांतस्थानीं प्राणाचें धारण केल्यानेंच त्यांचें दर्शन कसें होईल? व तें कशा प्रकारचें होईल?

**श्रीवसिष्ठः**—हे महापराक्रमी रामा! वायुभूत झालेले आकाशचर सिद्ध पुरुषांच्या मलिन इंद्रियांनीं किंवा दुसऱ्या एकाद्या अदिव्य उपायानें भूचर मनुष्याला दिसणें शक्य

---

१ या विषयीं 'कायाकाशयोः संबंधसंयमाल्लघुतूलसमापत्तेश्चाकाशगमनम्' असें योगसूत्र आहे. त्याचा अर्थः—काय म्ह० शरीर, त्याचा आकाशाशीं अवकाश देणें इत्यादिरूप जो संबंध त्यांत चित्ताचा संयम करून व कापसासारख्या अतिशय हलक्या पदार्थांत 'मी तन्मय आहें' अशी भावना करून योग्याला अत्यंत हलकेपणा येतो. त्यामुळें प्रथम तो भूमीवर आपल्या इच्छेप्रमाणें संचार करतो, मोठमोठ्या नद्या व समुद्र यांतून चालून जाऊं शकतो. पुढें कोळ्याच्या जाळ्यासारख्या तंतूच्या आधारानें तो संचार करूं लागतो. पुढें सूर्याच्या किरणांच्या आधारानें तो चालूं लागतो आणि ह्या क्रमानें शेवटीं तो आपल्या इच्छेप्रमाणें आकाशादिकांतून गमन करतो.

नाहीं, असें जें तूं म्हटलेंस तें सत्य आहे. पण हे राघवा! योगाभ्यासानें सुसंस्कृत झालेल्या मनामुळें दूर असलेल्या ज्ञानदृष्टीनें आकाशगामी सिद्ध दिसतात व स्वप्नाप्रमाणें ते स्वार्थ देणारेही आहेत. जसें स्वप्नाचें दर्शन होतें, तसेंच सिद्धांचें दर्शन होतें. सिद्धदर्शनांत सिद्धाशीं संभाषण, वरदान, फलप्राप्ति इत्यादि खरा व्यवहार होऊं शकतो व स्वप्नांतील व्यवहार तसा खरा नसतो, एवढाच त्या दोघांमध्यें विशेष आहे. ( आतां परकायाप्रवेशाचा उपाय सांगतात—) मुखाच्या बाहेर बारा अंगुलप्रमाण प्रांतांत रेचकाचा अभ्यास करणें, या युक्तीनें प्राणाला चिरकाल स्थित केलें असतां योगी दुसऱ्याच्या शरीरांत प्रवेश करूं शकतो.

श्रीरामः—हे ब्रम्हन्! स्वभावाची अचल स्थिति कशी होते, तें मला सांगा. वक्ते मोठे दयाळु असतात. प्रश्नकर्त्यानें वाईट प्रश्न जरी केला तरी ते खेद मानीत नाहींत.

श्रीवसिष्ठः—आत्म्याची म्हणजे सत्यसंकल्प ईश्वराची सृष्टीच्या आरंभीं केलेल्या संकल्पानें ठरलेली जी वस्तुस्वभावनियति तीच स्वभाव नांवाची शक्ति आहे. ती सृष्टीच्या आरंभीं जशी स्फुरते तशीच ती प्रलयापर्यंत स्थित होते, हा निश्चय आहे. पण अविद्या अवस्तु असल्यामुळें कालभेदानें जशी तशीच देशभेदानेंही केव्हां केव्हां वस्तुशक्ति बदललेली दिसते. जसें—वसंत ऋतूंत शरत्कालचें व्रीह्यादि फळ प्राप्त होतें. नाना व अनाना अशा अनियत स्वभावानें स्थित असलेलें हें सर्व ब्रम्हच आहे. पण तें स्वतः स्वभावतःच नियत एकरूप आहे. आतां अग्नीचें उर्ध्वज्वलन इत्यादि जी नियति आहे, तीही ब्रम्हरूपच आहे. कारण प्राण्यांचें कर्म, त्याचा फलभोग इत्यादि व्यवहारासाठीं अज्ञात ब्रम्हच कांहीं काल त्या त्या नियत स्वभावानें विकास पावतें.

श्रीरामः—भगवन्! सूक्ष्म छिद्रादिकांतून गमन करण्यासाठीं किंवा आकाशाला भरून सोडण्यासाठीं हा देह अणुत्वास किंवा स्थूलत्वास कसा प्राप्त केला जातो?

श्रीवसिष्ठः—रामा! काष्ठ व करवत यांच्यासंबंधानें जसें लांकडाचें छेदन सुरू होतें, त्याप्रमाणेंच प्राण व अपान या दोघांच्या संघर्षापासून स्वभावतःच जाठर अग्नि उत्पन्न होतो. या निंद्य देहयंत्राच्या उदरप्रदेशीं नाभीच्या वर व खालीं मिळणारें असें भस्त्राद्वयरूप स्थूल मांस आहे. त्या दोन पिशव्यांतलि एक आमाशय व दुसरा पक्वाशय आहे. पाण्यांत जलाच्या वेगानें व वर वायूनें परस्पर विरुद्ध बाजूंस हलविल्या जाणाऱ्या वेताच्या बेटाप्रमाणें तें स्थूलमांस परस्परविरुद्ध दिशेस आकर्षण केलें जात राहिलें आहे. पद्मराग मण्याच्या संपुटांत मोत्यांची पंक्ति जशी असते त्याप्रमाणें त्या मांसाच्या खालच्या पिशवीच्या मूलभागीं आपल्या स्थानीं म्हणजे मूलाधारांत पूर्वोक्त कुंडलिनी राहते. ती सर्व शरीरेंद्रियसमुदायाला प्राण देणारी असल्यामुळें लक्ष्मी आहे. जप करितांना फिरविल्या जाणाऱ्या रुद्राक्षादि फळांच्या माळेप्रमाणें ती प्राण व अपान यांच्या ऊर्ध्व व अधोगतीनें कंपित होऊन अव्यक्त शब्द उत्पन्न करते. ती दंडाचा प्रहार केलेल्या नागिणीप्रमाणें ऊर्ध्वमुख होऊन उलटणारी आहे. स्वर्ग व पृथ्वी या दोन लोकांमध्यें प्राण्यांची ऊर्ध्वगति व अधोगति होण्यास विहित व निषिद्ध क्रिया जशी कारण होते, त्याप्रमाणें ती प्राण व अपान यांच्या ऊर्ध्व व अधोगमनास कारण होते. त्यामुळें ती स्पंदधर्मिणी आहे. ती चक्षुरादि इंद्रियांच्या द्वारा होणारा जो रूपादि विषयांचा अनुभव त्याचा विकास करविणारी आहे.

अर्थात् कमलांचा विकास करणाऱ्या सूर्यासारखी ती स्थित आहे. ज्याप्रमाणें बाह्य वायूकडून वृक्षाचा पल्लव हालविला जातो त्याप्रमाणें ज्ञान-कर्मेंद्रियादि शक्ति, पूर्वोक्त हृत्कमल, व नाडी-समूह यांस ती हृदयांत आंतील वायूंनीं हालविते. ज्याप्रमाणें बाह्य आकाश विशाल असल्याचा अनुभव येतो व त्यांत स्वभावतःच वायु काष्ठ-पाषाणादि बळकट व पान, तृण इत्यादि मृदु पदार्थांस कालानें जीर्ण करितात, त्याप्रमाणें देहांतील आकाशांतही प्राणवायु खाल्लेल्या अन्नादिकांस जिरवितात. ज्याप्रमाणें वसंत ऋतूंत झाडांत शिरलेला भूमींतील रस पल्लव, मंजऱ्या, पुष्पें, फळें इत्यादि रूपांनीं परिणत होतो, त्याप्रमाणें अन्नाचा शरीरांत विचित्र परिणाम होतो. तें पूर्वोक्त हृदयकमल, त्या नाड्या, त्या मांसाच्या पिशव्या इत्यादि, लोहाराच्या भात्याप्रमाणें, प्राणवायूकडून भरल्या गेल्या असतां चंचल होतात. तें सर्व यंत्र हालूं लागलें कीं हृदयांत प्रविष्ट झालेल्या अन्नाचा प्रथम रस होतो. रसापासून रक्त, रक्तापासून मांस, मांसापासून त्वक्, त्वचेपासून मेद, मेदापासून मज्जा, मज्जेपासून अस्थि, अस्थींपासून शुक्र, असा विचित्र परिणाम होतो. वनांतील वेळू एकमेकांवर घांसल्यामुळें जसा अग्नि उत्पन्न होतो, त्याप्रमाणें सर्व देहांमध्यें वायु प्रतिक्षणीं अन्योन्य संघर्षानें जठराग्नीस अभिव्यक्त करतो. प्रत्येक धातूला उत्तरोत्तर जीर्ण करीत शेवटच्या धातूचा परिपाक होईपर्यंत वायूची अग्नीला अभिव्यक्त करण्याची ही क्रिया चालते. ज्याप्रमाणें उदय पावलेल्या भानूकडून सर्व भुवन उष्णतायुक्त केलें जातें, त्याप्रमाणें स्वभावतः शीत-वातरूप असलेला देह सर्व अंगांत उत्पन्न झालेल्या व प्रदीप्त झालेल्या त्या जाठराग्नीनें उष्णतेस प्राप्त होतो. या शरीरांत सर्वतः संचार करणाऱ्या त्या तेजाची योगी हृदयांत तारकारूपानें उपासना करितात. त्याचेंच चिद्रूपानें चिंतन केलें असतां दिव्य ज्ञान प्राप्त होतें. त्याच्या योगानें शेंकडों योजनें दूर असलेली वस्तु नेहमीं दिसते वाडवाग्नीचें इंधन समुद्राचें जल आहे. त्याचप्रमाणें मांसरूप कमलांच्या ताटव्यांनीं संपन्न असलेल्या हृदयसरोवराच्या आंत राहणाऱ्या त्या जाठर अग्नीचेंही शरीरांतील अन्नरसरूप जल हेंच वाळलेलें इंधन आहे. या शरीरांतील जें स्वच्छ व शीतल रूप त्याला इंदु म्हणतात. त्या इंदूपासून तो जाठर अग्नि उत्पन्न झाला आहे. यास्तव देह अग्निषोमात्मक आहे. बाहेरही जें उष्णात्मक आहे तें सर्व सूर्य व अग्नि या नांवाचें तेज आहे, असें विद्वान् समजतात आणि बाहेर जें शीतात्मक आहे तें सोमसंज्ञक आहे. अर्थात् बाह्य जगत्ही प्रकाश व उष्णता यांच्या योगानें अग्निरूप आणि शैत्य व जाड्य यांच्या योगानें सोमात्मक आहे, असें विद्वान् जाणतात. अथवा चित् व जड या उभयस्वरूपांनीं बनलेलें हें सदसद्रूप विद्याशबल ब्रह्मच जगदाकारानें परिणत झालें आहे. म्हणून तेंच हें अशा प्रकारें प्रकाश-जाड्यरूपानें अग्निषोमात्मक आहे, असा त्याचा विभाग केलेला आहे. वृत्तिज्ञान, आत्मतत्त्वाची स्फूर्ति, बाह्यविषयांचा अनुभव हा सूर्य किंवा अग्नि आहे, असें ज्ञानी समजतात. त्याचप्रमाणें विद्वान् असत्, जाड्य व तम याला सोम म्हणतात.

श्रीरामः—भगवन्! आपल्या पूर्वीच्या कथनानुसार देहांत व देहाच्या बाहेर अग्नि, सूर्य इत्यादिकांचा उद्भव, उदय वगैरे वायूच्या अधीन आहे, असें प्रत्यक्ष दिसत असल्यामुळें अग्नि वायुरूप सोमापासून उदय पावतो, हा अर्थ मीं जाणला आहे. यास्तव आतां हे वक्त्यांतील श्रेष्ठा! मला सोमाची उत्पत्ति सांगा,

श्रीवसिष्ठः—अग्नि व सोम हे परस्पर कार्य व कारण या रूपानें स्थित आहेत. ते दोघे पर्यायानें परस्परांस अतिशय जिंकण्याची इच्छा करितात. या दोघांचा जन्म बीज व अंकुर यांप्रमाणें परस्परकारणत्वानें होतो. म्ह० बीज अंकुराचें उपादान कारण होतें व तोच अंकुर दुसऱ्या बीजाचें कारण होतो, त्याचप्रमाणें अग्नि व सोम परस्परांचें उपादान होतात. दिवस व रात्र याप्रमाणें एकमेकांच्या निमित्तानें ते दोघे होतात; आणि त्यांची स्थिति छाया व प्रकाश याप्रमाणें एकमेकांचा उपघात करणारी आहे. त्या दोघांचा एकाच वेळीं उपलंभ न होण्याविषयीं छाया व प्रकाश यांचा दृष्टांत आहे. म्हणजे छाया व प्रकाश यांचा जसा एकाच वेळीं उपलंभ होत नाहीं, त्याप्रमाणें अग्नि व सोम यांचा एकाच वेळीं उपलंभ होत नाहीं. पर्यायानें म्ह० एकाच वेळीं एकाचाच अनुभव येण्यास दिवस व रात्र यांच्या स्थितीचें उदाहरण दिलें आहे. या दोघांचा कार्य-कारण-भावही दोन प्रकारचा सांगितलेला आहे. एक सद्रूप परिणामानें होणारा व दुसरा विनाश-परिणामानें होणारा. अंकुरापासून होणाऱ्या बीजाप्रमाणें एकापासून दुसऱ्याचा जो संभव होतो तो विनाशपरिणामापासून होणारा कार्य-कारण-भाव आहे. दिवस व रात्र यांप्रमाणें एकाचा नाश झाला असतां दुसऱ्याचा होणारा जो भाव—जें दुसऱ्याचें अस्तित्व—उत्पत्ति तो विनाशपरिणामजन्य कार्यकारणभाव आहे. सद्रूप परिणाम प्रत्यक्ष उपलब्ध होतो. कार्य-दर्शनें कारणाचें अस्तित्व प्रतीत होतें. घट हें कार्य आहे; व हा मातीचा आहे, असा प्रत्यय प्रत्यक्ष येतो. त्यामुळें सद्रूप परिणामांत अनुमानादिकांचा कांहीं उपयोग नसतो. याचप्रमाणें विनाशपरिणामाचें अभाव हें प्रमाण आहे. दिवस व रात्र हें त्याचें उदाहरण आहे. त्यांत कार्यदशेमध्यें कारणाचा अभाव होतो. त्यामुळें दिवसां रात्रीचा अनुभव येत नाहीं. असा एक वस्तुस्थ—केवल एका वस्तूचेंच ग्रहण करविणारा अभाव म्ह० अनुपलब्धि हें त्याविषयीं मुख्य प्रमाण आहे. " अहो, पण जें कार्य करणारें त्याला कारण म्हणतात. कारणाला कार्याचा अभिनिवेश असणें हीच त्याविषयींची आस्था असून त्या आस्थेंतच कर्तृत्व असतें. पण दिवसाला रात्र निर्माण करण्याविषयीं व रात्रीला दिवस निर्माण करण्याविषयीं आस्था असणें शक्य नाहीं. त्याचप्रमाणें अचेतन मृत्तिकादिकांना घटादि कार्य उत्पन्न करण्याविषयीं आस्था असणें शक्य नाहीं. त्यामुळें कोणापासूनही कोणाची उत्पत्ति किंवा विनाश संभवत नाहीं. तर सर्वच स्वभावतःच उत्पन्न होतें व नाश पावतें. पण कांहीं अविवेक्यांना माती पूर्वी असते व घट मागून होतो, बीज पूर्वी असतें व अंकुर मागून होतो, इत्यादि पौर्वापर्य पाहून, पूर्वी असतें तें कारण व मागून होतें तें कार्य, असा भ्रम होतो; व ते त्याच दुर्युक्तीनें बोलूं लागतात. त्यांचें स्वानुभवविरोधानें निरसन करावें. तिरस्कारानें त्यांना तत्त्वविचारांतून वगळावें. त्यांना तत्त्वविचारांत घेऊं नये. कारण ते स्वतःच्या अनुभवाविरुद्धही बोलत असतात. कारण त्या दुर्वाद्यांनाही आपलें म्हणणें कांहीं कारण दाखवूनच सिद्ध करावें लागतें. जसें—अनास्थादि युक्तिबुद्धि अकर्तृत्वादि बुद्धीला उत्पन्न करते, असें ते म्हणतात. अर्थात् पहिली बुद्धि कारण असून दुसरी बुद्धि कार्य आहे.

१ प्रत्यक्ष सिद्ध वस्तूची अनुमानानें सिद्धि करावयाची म्हणून म्हटल्यास अनुमानादिक प्रमाणेंहि संभवतात. पण त्यांची अत्यंत आवश्यकता नसते, असा भावार्थ. कारण, हत्ती प्रत्यक्ष दिसल्यावर त्याच्या चीत्कारावरून त्याच्याविषयीं अनुमान करण्याची कोणी फारशी खटपट करीत नाहींत.

तसेंच कांहीं दुर्वादी अनुपलब्धीला प्रमाणच मानीत नाहींत. पण हे रघुनन्दना ! प्रत्यक्षाप्रमाणें अभावही प्रमाणच आहे. कारण अग्नीचा अभावही शीताच्या अनुमानाचें कारण होऊं शकतो. अग्नि धूम बाष्प इत्यादिकांच्या आकारानें मेघरूपत्वास प्राप्त होतो आणि याप्रमाणें सद्रूपपरिणामानें अग्नि सोमाचें कारण होतो. तोच अग्नि नाश पावून शैत्यरूपानें मेघरूपत्वास प्राप्त होतो. याप्रमाणें विनाशपरिणामानें अग्नि सोमाचें कारण आहे. वाडवाग्नि सप्त सागरांचें जल पिऊन धूमाच्या उद्गारानें मेघरूपत्वास प्राप्त होतो; व त्याच मेघजलास उत्पन्न करतो. सूर्य अमावास्येपर्यंत चंद्राचें पुनः पुनः प्राशन करून शुक्ल पक्षांत, सारस जसा मृणालाला खाऊन पुनः ओकतो, त्याप्रमाणें पुनः ओकतो. वसंत व ग्रीष्म हे दोन ऋतु लागले असतां प्राण म्हणजे ऊष्म्यासह वायु भूमीवरील जल पिऊन वर्षाऋतूंत मेघाकारानें पुष्ट होऊन वृष्टीनें पुनः जगद्रूपी शरीरास पुष्ट करतो, अथवा शरीरांतीलच प्राण अपानाच्या मुखानें अन्न-पानादिक उदरांत आलें असतां त्याचा अमृतप्राय रस पिऊन पुष्टत्वास प्राप्त होत्साता अभ्राप्रमाणें सर्व नाड्यांना व्यापून शरीराला पुष्ट करतो. तोच याचा पुनः सोमपरिणाम आहे. ( बरें, वायु पृथ्वीवरील रस पीत नसून सूर्याचे किरण त्याला प्राशन करितात म्हणून म्हणशील, तर त्यांचेंच उदाहरण घे—) सूर्याच्या किरणांनीं जलाचें प्राशन केलें आहे, सूर्यकिरण पृथ्वीवरील जलाचें प्राशन करतात, अशी जरी कल्पना केली, तरी जल सद्रूपपरिणामानें सूर्याच्या किरणत्वास प्राप्त होतें. त्यामुळें तें जल अग्नीचें कारण आहे. जल नाशपरिणामानें उष्णरूप बनतें आणि उष्णत्वामुळें त्याला अग्नित्व येतें. याप्रमाणें विनाशपरिणामानें तें जल अग्नीचें कारण आहे. अग्नीचा विनाश झाला असतां चंद्र हा सद्रूपपरिणाम होतो व चंद्राचा विनाश झाला असतां त्याचा सद्रूपपरिणाम अग्नि होतो. जसा दिवस नाश पावून रात्र होते तसाच अग्नि नाश पावून सोम होतो. अंधकार व प्रकाश, सावली व ऊन, आणि दिवस व रात्र यांच्यामध्यें विलक्षण रूप मोठ्या ज्ञान्यांनाही उपलब्ध होत नाहीं. तम व प्रकाश यांचा संधिही शून्यरूप आहे. त्यांत दोन्हींहून विलक्षण असें कांहीं नाहीं, म्हणून म्हणशील तर तें बरोबर नाहीं. कारण त्यांचा संधिही शून्यरूप नाहीं. कारण त्यांचा संधि हेंच त्यांचें स्वरूप आहे. तें परस्परसंलग्न आहे. कारण त्यांचा संधिच वस्तुतः शून्यरूप आहे. अर्थात् परस्पराविरुद्ध असलेले ते दोन पदार्थ भाव व अभाव यांच्या योगानें एका आस्थेमध्यें निश्चयानें स्थित आहेत. संधींतही सर्वानुगत सद्रूप असतें. ज्याप्रमाणें भूतळीं तम व प्रकाश यांच्या योगानें दिवस व रात्र होतात, त्याप्रमाणें चैतन्य व जाड्य यांच्या योगानें सर्व भूतें स्फुरण पावतात. चंद्राची मृदु व शीत तनु मिश्र झालेलें जल व अमृत यांच्या योगानें जशी, त्याप्रमाणेंच ही जगत्स्थिति चिद्रूप व जडरूप यांच्या योगानें आरब्ध आहे. हे राघवा ! प्रकाश, अग्नि, सूर्य, हें जगांतील चिद्रूप आहे, आणि जडात्मक सोमशरीर तमोरूप आहे, असें समज. जगांत आकाशांतील सूर्य दिसला असतां जसें कृष्णपक्षांतील रात्रीचें तम नाश पावतें, त्याप्रमाणें निर्मल चित्सूर्य दिसला असतां जन्माचा आरंभ नाश पावतो. ज्याप्रमाणें अर्धरात्रीं चंद्र विलसत असतांना त्यांत प्रवेश करून चमकणारा सूर्याचा प्रकाश चांदणें बनलेला असतो व स्वतःच्या सत्तेनें असत्सा होतो, कारण त्यावेळीं सूर्याचा प्रकाश नसतो, ही गोष्ट सर्वांच्या

अनुभवाची आहे; त्याप्रमाणें चिद्रूप प्रत्यगात्म्यांत जड सोमदेह पाहिला असतां तो असत्यसा होतो. चंद्रमंडलांत प्रविष्ट झालेला सूर्यप्रभारूप अग्नि सोमाला म्ह० जलमय चंद्रबिंबाला प्रकट करतो, पण देहांत चिद्भावानें अनुप्रविष्ट झालेली चिद् आयुष्य संपेपर्यंत देहाला अहंभावादिकांनीं प्रकाशित करते. याप्रमाणें त्या दोघाचें परस्पर मेलन झालें असतां तादात्म्याध्यासानें सूर्याचें रूप—प्रभामंडळ चंद्र होतें, आणि चिद् मी मनुष्य आहें, चेतन आहें इत्यादि स्वानुभवानुसारी देहस्थ रूप होते. चित् क्रियारहित व नामरहित आहे. त्यामुळें ती केवल—निरुपाधिक उपलब्ध होत नाहीं. तर अग्नीचा प्रकाश दीपानें जसा ज्ञात होतो, त्याप्रमाणें ती देहानेंच उपलब्ध होते. अज्ञानानें आवृत झालेल्या चित्-नें विषयोन्मुख होणें हाच अनर्थ किंवा संसार आहे. ती निर्विषय झाली कीं शुभ मोक्षाची प्राप्ति होते. तेंच निर्वाण होय. याप्रमाणें भिंत व सूर्यप्रकाश यांच्याच न्यायानें एकमेकांच्या तादात्म्यानें सद्रूप बनून वाग्व्यवहाराच्या विषयत्वास प्राप्त झालेले हे दोघे देहदेहीही अग्निषोमात्मक आहेत, असें जाणावें. निर्वाण म्हणजे उपाधीच्या निवृत्तीनें होणारा आनंदाचा आविर्भाव, तो अतिशय सिद्ध झाला असतां अग्नीची केवल स्थिति होते, आणि जल, शिला इत्यादि पदार्थांत जाड्य अतिशय सिद्ध झालें असतां केवल सोमाची स्थिति होते. उष्णप्रकृति प्राण अग्नि आहे, व शीतल अपान शशि आहे. याप्रमाणें मुखमार्गांत गमन करणारे हे दोघे छाया व प्रकाश याप्रमाणें स्थित आहेत. आरशांत जसें प्रतिबिंब त्याप्रमाणें शीतळ अपानांत उष्ण प्राणवायु सत्तेस प्राप्त होतो, त्याचप्रमाणें प्राणांत अपान सत्तेस प्राप्त होतो. मूलप्राण-कुंडलिनीरूप चिदग्नि आधारापासून कंठापर्यंत जीं चतुर्दल, षड्दल इत्यादि कमलें आहेत त्यांच्या पाकळ्यांवर असलेल्या परा, पश्यन्ती, मध्यमा, वैखरी, इत्यादि वाग्रूप सोमास आपल्या कांतीनें—अर्थप्रकाशनरूप शक्तीनें व अनुभवात्मक स्फूर्तीनें प्रगट करतो—जसा सूर्य बाहेरच्या भिंतीला प्रकट शीतोष्णरूपिणी करतो त्याप्रमाणें. जशी सृष्टीच्या आरंभीं मायाशबल ब्रह्मसंविद् ब्रह्मांडाकारानें अग्निषोम संज्ञेस प्राप्त झालेली आहे, त्याचप्रमाणें व्यष्टिदेहांच्या सृष्टींतही ती त्या संज्ञेस प्राप्त झाली आहे. ज्याप्रमाणें अंतरिक्षांत कृष्णपक्षामध्यें अग्निरूप सूर्य सोमाच्या शीतल पंधरा कलांना प्रतिपदादि तिथींस ग्रासतो व एका ध्रुवसंज्ञक चिद्रूप कलेला शिल्लक ठेवतो, त्यानंतर शुक्लपक्षांत क्रमानें उष्ण कलांना ओकतो व त्यांच्या योगानें क्रमानें ती अवशिष्ट राहिलेली ध्रुवकला परिपूर्ण होऊन पूर्ण चंद्र होतो, त्याप्रमाणें हृद्यांत स्थित असलेला प्राणसूर्य अपानरूप सोमाच्या मुख व नासिका यांच्या द्वारा प्रविष्ट झालेल्या पंधरा शीत कलांना ग्रासून मुखाबाहेर ध्रुवाख्य एका कलेला उरवून पुनः त्या उष्ण कलांना बाहेर टाकतो. त्यांच्या योगानें परिपूर्ण होणारी ती ध्रुवकला बाहेर अपानसंज्ञक पूर्णसोम होते. त्यांत बाहेरील प्राणापानसंधीचा जो काल ती पूर्णिमा व हृदयांतील संधीचा जो काल ती अमावास्या, इत्यादि योगशास्त्रांत अनेक कल्पना आहेत. यास्तव त्यांच्या अनुसार हे रामा! मुखाच्या बाहेर जेथें सूर्यानें ग्रासलेली अपानसंज्ञक चंद्राची ध्रुवा नांवाची सोळावी कला प्राणानें बाहेर सोडलेल्या कलांनीं परिपूर्ण होऊन एक क्षणभर पूर्व दिशेंत पौर्णिमेच्या वीतभर चंद्राप्रमाणें होते, तेथें भुशुंडाच्या उपाख्यानांत सांगितल्याप्रमाणें बाह्य कुंभकानें—मनोधारणेनें स्थिर हो. त्याचप्रमाणें

ज्या हृदयाकाशांत कलांच्या ग्रासानें क्रमानें ग्रासला जाणारा अपानाख्य सोम, अमावास्येला जसा बाह्य सोम त्याप्रमाणें, केवल एका शुद्ध चिन्मात्र ध्रुवकलेनें राहतो, त्यांत तूं कुंभकानें स्थिर हो. उष्ण अग्नि हा चिदादित्य आहे व शैत्य हा सोम आहे. अर्धरेचक व अर्धकुंभक यांच्या योगानें अंतराळींच प्राणांचा दोन्हीं-कडून निरोध करून जेथें ते दोघे बिंबप्रतिबिंबा-प्रमाणें तुल्यरूप होतात, तेथें कुंभकानें स्थिर हो. हे निष्पाप रामा! तूं शरीरांतील सोम व सूर्य-अग्नि यांच्या संक्रांतींना जाणणारा हो. त्या संक्रान्तिकालापुढें हे बाह्य संक्रान्तिकाल तृणासारखे तुच्छ सांगितलेले आहेत. हे रामा! तूं देहवातांच्या योगानें संक्रान्त, उत्तरायण, विषुवसंक्रमणें इत्यादि संवत्सरात्मक कालास शरीरांत बाहेर स्थित असल्याप्रमाणें जर स्वानुभवानें जाणशील, तरच या योग्यांच्या कथांमध्यें शोभशील. मीं सांगितलेल्या तत्त्वाहून इतर गोष्टींत जर आसक्त झालास तर शोभणार नाहींस. अर्थात् तूं तदेकपरायण हो.

## सर्ग ८२ वा.

१ अणुता व स्थूलता याचे उपाय, योग्यांचे ज्ञान-साध्य परकायाप्रवेश इत्यादिकांचें युक्तींनीं वर्णन.

श्रीवसिष्ठः—योग्यांचा देह अणुत्वास किंवा स्थूलत्वास कसा प्राप्त होतो तें मी तुला यथावत् सांगतों, ऐक. हृदयांतील कमलकोशा-च्या ऊर्ध्व कर्णिकेवर अग्नीचा कण सोन्याच्या भ्रमराप्रमाणें स्फुरत असतो. मेघामध्यें संध्या-समयीं विजेचा कण जसा शोभतो, तसा तो शोभतो. तो दीप्त जाठराग्नीचा कण आहे. वावटळीच्या योगानें जसा वनांतील अग्नि अतिशय वाढतो, त्याप्रमाणें तो अग्नीचा कण सर्व देहाला व्यापून कोणत्या उपायानें दीप्त होतो हें जाणल्यानें—प्रवर्धनोपायाच्या ज्ञानानें अतिशय वाढतो. पण तो अतिशय वाढलेला अग्नीचा कण देहाला जाळीत नाहीं, तर सूर्या-प्रमाणें ज्ञानरूपानें अतिशय प्रकाश पावतो. अग्नि ज्याप्रमाणें सोन्याला वितळवून सोडतो, त्याप्रमाणें प्रातःकाळीं आकाशांत नुकत्याच उगवलेल्या सूर्याप्रमाणें भासणारा तो अग्निकण क्षणांत अतिशय वृद्धि पावून हस्तपादादि अंगांसह सर्व देहास वितळवितो, ह्मणजे शरी-रांतील पार्थिव गंध व कठिणपणा यांचा जलांत उपसंहार करतो. याप्रमाणें पायांच्या अग्रां-पर्यंत सर्व शरीराला तो द्रवरूप करूं शकतो. त्यानंतर शोषण करणें या युक्तीनें अग्नीच्या विशेष स्वभावामुळें जलाच्या शैत्यास सहन न करणारा तो अग्नि स्वतःच्या उष्णतेच्या बळानें

१ वसन्त, ग्रीष्म, वर्षा व शरत् या ऋतूंत क्रमानें शीताचा औष्ण्यानें ग्रास केल्यामुळे सोमाची अग्नि-संक्रांति होते व शरत्, हेमन्त व शिशिर यांत क्रमानें औष्ण्याचा शीतानें ग्रास केल्यामुळें अग्नीची सोम-संक्रांति होते. त्याचे संधि हीं दोन विषुववृत्तें होत. सूर्याच्या मेषादिकांत संक्रांति होतात, त्याचप्रमाणे शरीरांतही अपानशैत्याचा जठराग्नीनें ग्रास केला असतां सोमाची अग्निसंक्रांति होते.

१ तैत्तिरीयोपानिषदांत 'तस्य मध्ये महानग्निर्वि-श्वार्चीर्विश्वतोमुखः' ह्म० त्या हृदयकमलांत ज्याची ज्वाला सर्वतः पसरली आहे असा सर्वतोमुख मोठा अग्नि आहे, असा जाठराग्नीचा प्रस्ताव करून 'तस्य मध्ये वन्हिशिखा अणीयोर्ध्वा व्यवस्थिता। नीलतोय-दमध्यस्था विद्युल्लेखेव भास्वरा। नीवारशुकवत्तन्वी पीता भास्वत्यणूपमा। तस्याः शिखाया मध्ये परमात्मा व्यवस्थितः।'—त्याच्यामध्ये अग्निशिखा आहे, ती अत्यंत सूक्ष्म असून वर जळत असते, नीलवर्ण-मेघाच्यामध्यें असलेल्या विद्युल्लेखेप्रमाणें ती भास्वर आहे, साळ्यांच्या पुढील कुसळाप्रमाणें ती अतिशय पातळ आहे, अणूसारखी असलेली ती पिवळी आहे, त्या शिखेच्या मध्यें परमात्मा व्यवस्थित आहे, असें या जठराग्नीच्या कणाचें वर्णन केलें आहे.

त्या जलालाही सुकवितो. अशा रीतीनें देहापासून सुटून बाहेर आलेला तो जीव मनोरूप आतिवाहिक देहांत अवस्थित होतो. त्यानंतर अशा प्रकारें पार्थिव व जलीय अशा दोन्ही शरीरांस सोडून राहिलेला तो अग्नि अतिशय क्षुब्ध झालेल्या प्राणांकडून उपसंहृत होत्साता वावटळीकडून उडविलेल्या धुळ्याप्रमाणें कोठें तरी जाऊन लीन होतो. तेव्हां कुंडलिनीशक्ति ही मूलाधारस्थ सुषुम्ना नाडीनें हीन होऊन तत्संस्कारशाली आतिवाहिक देहाकाशांत, अग्नीपासून निघालेल्या धूमलेखेप्रमाणें अवस्थित होते. मनोबुद्धिमय जीवादिघटित लिंगशरीरावर जिनें अहंकार—अहंभाव ठेवला आहे अशी ती तेथें स्थित असलेली कुंडलिनी नगरांतून निघणाऱ्या धूमपंक्तीप्रमाणें अनेक चमत्कारांनीं युक्त असते. तिच्यामध्यें चित्प्रकाशाचे चमत्कार व स्वेच्छाविहारशक्तीचे चमत्कार असतात. अशा प्रकारें चमत्कारयुक्त असलेल्या तिला अतिशय सूक्ष्म असलेलें कमलनालाचें छिद्र, पर्वत, तृण, भिंत, दगड अंतरिक्ष, भूतल इत्यादिकांतील ज्यांत शिरकवून बाहेर निघून जाण्यास लावावें त्यांतून ती पार निघून जाते. ती कुंडलिनी म्हणजे योग्यांची जीवनशक्ति अग्नींत पूर्वी उपसंहृत केलेल्या जलभागाला जेव्हां सोडते, तेव्हां विहिरींत सोडलेली चामड्याची पिशवी जशी पाण्यानें भरते, त्याप्रमाणें रसानें सर्वतः भरून जाते. रसानें सर्वतः भरलेली ती पूर्वी उपसंहृत भागाच्या ज्या आकाराची भावना करते तो तत्काल धारण करते. रामा ! चित्रकाराच्या बुद्धींतील रेखा जशी वाटेल तो आकार एका क्षणांत धारण करते त्याचप्रमाणें कुंडलिनी इष्ट आकार सत्वर धारण करते. त्यानंतर दृढभावनेच्या बळानें ती त्यांत हाडांची वगैरे कल्पना करते. मातेच्या गर्भाशयांत स्थित असलेल्या कललादिकांत अत्यंत सूक्ष्म असलेली बीजशक्ति हाडें, हात, पाय इत्यादि अंकुरस्थितीला जशी धारण करते, त्याप्रमाणेंच ती कुंडलिनी हाडादिकांची कल्पना करते. हे राघवा ! याप्रमाणें जीवशक्ति आपल्या इच्छेच्या अनुसार सुमेरुप्रभृति फार मोठ्या व तृणादि फार लहान आकारास किंवा प्रमाणास प्राप्त होते. असो. हे रामा ! तूं अणिमादि सिद्धींचें योगसाध्य साधन ऐकलेंस. आतां श्रवणाचें भूषणच असें ज्ञानसाध्य ऐक. येथें केवल एक चिन्मात्र आहे. तें शुद्ध, सौम्य, अलक्षित, सूक्ष्माहून सूक्ष्म, व शांत आहे. जगत् नाहीं व जगत्क्रिया नाहीं. संकल्पोन्मुख झालेलें तें अध्यासानें आपणच आपल्याला जेव्हां उपचित करतें, तेव्हां कलुषित झालेल्या त्यालाच जीव असें म्हटलें आहे. एकादा बालक उद्भूत यक्षाला जसा स्वसंकल्पानें पाहतो त्याप्रमाणें मूढात्मा जीव संकल्पभ्रमानें या असत्यच शरीरास पाहतो. तोच याचा स्थूलभाव आहे. पण जेव्हां ज्ञानदीपानें सम्यक् प्रकाश आलेला असतो, तेव्हां शरदृतूंतील अभ्राप्रमाणें जीवाचा संकल्पमोह क्षीण होतो. त्या वेळीं हे रामा ! तेल संपलें असतां दीप जसा क्षीण होतो त्याप्रमाणें सर्व संकल्पांचा पूर्णपणें क्षय झाला असतां हा स्थूल देह निःशेष शांत होतो. निद्रा गेली असतां जसा प्राणी स्वप्न पहात नाहीं त्याप्रमाणें सत्याची भावना केली असतां जीव देहाला पहात नाहीं. अतत्त्वाला तत्त्व समजल्यामुळें जीव देहानें आवृत होऊन राहिला आहे. पण तो केवळ तत्त्वाची भावना केल्यामुळें देहरहित, श्रीमान् व सुखी होतो. राघवा ! शरीरादि अनात्म्यांच्या ठिकाणीं जी आत्मभावना करणें तेंच भयंकर हृदयस्थ तम आहे. सूर्यादिकांच्या प्रकाशानें त्या हार्द तमाचा उच्छेद होत नाहीं. आत्म्याच्या

ठिकाणींच आत्मभावना करून मी सर्वव्यापी, निरंजन, चिन्मात्र व अमल आहें, या ज्ञान-सूर्यानेंच त्याचा नाश होतो. दुसरेही आत्म-साक्षात्कारवान् जीवन्मुक्त ज्याची जशी भावना करितात, विनोदासाठीं ज्या स्थूल-सूक्ष्म प्राति-भासिक देहाची कल्पना करितात, त्यालाच त्या दृढ भावनेनें सत्वर पाहतात. रामा ! अत्यंत मूढ असलेले विषकृम्यादि जीवही दृढ भावानु-संधानानें विषाला अमृतत्वास पोंचवितात व दुग्धादि अमृतास यांत विष आहे, अशा भाव-नेनें विषासारखें घातुक बनवितात. येणें-प्रमाणें या लोकीं ज्याची दृढ भावनेनें अतिशय कल्पना केली जाते तेंच तत्काल अनुभविलें जातें असें आपण व्यवहारांत पुष्कळ वेळां पाहतों. हा देह सत्य आहे, अशा भावनेनें देहाला पाहिलें असतां तो सत्यच होतो; व तो असत्य आहे, मिथ्या आहे, अशा भावनेनें पाहिलें असतां तो असत्य—शून्य होतो, ब्रह्माकाशत्वास प्राप्त होतो. हे रामा ! तूं अणिमादि पद-प्राप्तीविषयींची ही ज्ञानयुक्ति ऐकलीस. आतां दुसरी युक्ति ऐक. ( अगोदर पूर्वदेहा-च्या परित्यागाचा उपाय सांगतात—) बाह्य-वायूमध्यें असलेला पुष्पाचा सुगंध वायूतून ओढून घेऊन घ्राणांत जसा योजला जातो त्याप्रमाणें रेचकाच्या अभ्यासयोगानें जीव कुंडलिनीच्या गृहांतून बाहेर काढून जो पर-शरीरांत योजला जातो, तों हा देह काष्ठ किंवा लोष्ठ यांप्रमाणें निश्चेष्ट होऊन पडतो व तो त्याच्याकडून टाकला जातो. पाणी घाल-णारा माळी आपल्या हातांतील घटांत असले-ल्या पाण्यानें ज्या वृक्षाला किंवा लतेला शिंप-ण्याची इच्छा करतो त्यालाच जसा शिंपतो त्याप्रमाणें योगी आपल्या इच्छेप्रमाणें आपल्या जीवाला दुसऱ्याच्या देहांत, जीवांत किंवा मतींतही त्याच्या संपत्तीचा उपभोग घेण्यासाठीं योजतो. त्यांत त्याला प्रविष्ट करतो. याप्रमाणें परदेहांत सिद्धीचें ऐश्वर्य भोगून तृप्त झालेला योगी आपलें पूर्वीचें शरीर स्थित असल्यास त्यांत पुनः परत येतो, नसल्यास त्याला जें दुसरें शरीर आवडतें त्यांत शिरतो, व जोंवर तेथें रहावेंसें वाटतें तोंवर राहतो. किंवा पर-शरीरांतील भोग भोगून योगी आपल्या अंतःक-रणाला विपुल बनवितो आणि त्याच्या योगानें सर्व जगाला व्यापून स्थावर-जंगम सर्व देहादिप्रतिबिंबोपाधींस, तत्प्रतिबिंबभूत जीवांस, तद्बिंबोपाधि सत्त्वादि गुणांस, व तदव-च्छिन्न चिल्लक्षण बिंबांस व्यापणाऱ्या आत्मसं-विदेनें संपूर्ण होऊन राहतो. सारांश, योगैश्वर्य-संपन्न जीवचित्प्रकाश सर्व दोषरहित नित्य-प्रकाश आत्मतत्वाला जाणून जें जें इच्छितो त्याला त्याला लवकरच प्राप्त होतो. असें असतां तत्त्ववेत्ते अल्पसिद्धींना फारसा मान देत नाहींत, तर अनावरणत्व हेंच निरतिशयानन्द सम्यक्पद आहे, असें जाणतात.

---

१ देह असत्य आहे, या भावनेने ब्रह्माकाश होणे हीच अणिमादि ऐश्वर्यप्राप्ति आहे. आतां परशरीरांत प्रवेश करून भोगप्राप्तिरूप दुसरी सिद्धि ऐक, असा भावार्थ.

## सर्ग ८३ वा.

१ चूडालेच्या सिद्धीचें ऐश्वर्य, २ राजाचें अज्ञान, ३ गुरूपदेशाच्या साफल्याविषयीं किराटाख्यान.

श्रीवसिष्ठः—ती राजाची राणी चूडाला वर सांगितलेल्या प्रकारें प्राणधारणादि घनाभ्यासानें युक्त होत्साती अणिमादि-गुणैश्वर्ययुक्त झाली. गंगेप्रमाणें अमल व शीतल असलेली ती गंगेप्रमाणेंच आकाश-मार्गानें गमन करूं लागली. सागराच्या काटेरांत

शिरली व पृथ्वीच्या पाठीवरही संचार करूं लागली. ती एक क्षणभरही पतीच्या वक्षःस्थळापासून व चित्तापासून दूर झाली नाहीं. ती सर्व राष्ट्रांत व भुवनांतही राहिली. अर्थात् एकाच वेळीं अनेक शरीरें धारण करण्याचें सामर्थ्य तिच्यामध्यें आलें. आकाशांत गमन करणारी ती श्यामा मेघमालेप्रमाणें भ्रमण करीत असे. तिचीं भूषणें त्या वेळीं विजांच्या चमकण्याप्रमाणें चमकत असत. भूतळीं ती पर्वतपंक्तीप्रमाणें संचार करीत असे. दोरा जसा मोत्यांत प्रवेश करतो त्याप्रमाणें ती काष्ठ, तृण, दगड, प्राण्यांचीं शरीरें, आकाश, वात, अग्नि, जल इत्यादि सर्वांत निर्विघ्नपणें शिरत असे. ती मेरूच्या उच्च शिखरांवरून, लोकपालांच्या नगरांतून, दिशा व आकाश यांच्या अवकाशांतून अनायासें विहार करूं लागली. ती पश्वादि तिर्यक् प्राणी, भूतें, पिशाचें, नाग, अमर, असुर, विद्याधर, अप्सरा, सिद्ध यांसह वर्तमान संभाषणादि व्यवहार करूं लागली. तिनें मोठ्या यत्नानें आत्मज्ञानामृताविषयीं आपल्या भर्त्याला पुष्कळ बोध केला. पण त्याला आत्मज्ञान झालें नाहीं. ही माझी भार्या संभाषणादि कलांमध्यें अनिष्णात, मुग्ध व अविवेकी आहे, असेंच केवळ राजा त्या चूडालेविषयीं समजत असे. तिच्या सहवासांत त्याचा एवढा काल जरी जात होता तरी एकादा विद्यार्थी वेदाध्ययनाच्या वेळीं वेदविद्या सर्व पुरुषार्थांचीं साधनें सांगणारी आहे, हें जसें जाणत नाहीं त्याप्रमाणें तो त्या आपल्या गुणशालिनी चूडालेला बरोबर ओळखीत नसे. शूद्राला जसें यज्ञकर्म दाखविलें जात नाहीं, त्याप्रमाणें ज्याला आत्मविश्रांति प्राप्त झालेली नाहीं अशा त्या राजाला चूडालेनेंही आपली सिद्धिश्री दाखविली नाहीं.

श्रीरामः—प्रभो ! चूडाला मोठी सिद्ध योगिनी होती. पण तिच्या यत्नानेंही जर शिखिध्वजाला बोध झाला नाहीं, तर तो दुसऱ्या कोणाच्या बोधानें होणार ?

श्रीवसिष्ठः—हे राघवा, उपदेश करणें हें केवल शास्त्रीय व्यवस्थेचें परिपालन करणें आहे. पण साक्षात्काराचें कारण केवल शिष्याची शुद्ध प्रज्ञाच आहे. अनात्मविद्येंतील प्रावीण्यानें किंवा स्वर्गादि फलासाठीं केलेल्या पुण्यानें आत्म्याचें ज्ञेय स्वरूप कळत नाहीं. तर सर्पाचीं पावलें सर्पच जसा जाणतो, त्याप्रमाणें आत्मशास्त्रश्रवणानें व चित्तशुद्धिकर कर्मानें विचाराची प्रवृत्ति झाली असतां चरमसाक्षात्कारानें रूढ झालेल्या एकाग्रबुद्धीनेंच आत्मा जाणला जातो.

श्रीरामः असें जर आहे तर हे प्रभो ! या जगत्स्थितींत गुरूपदेश या नांवाचा क्रम कोणत्या मार्गानें स्वात्मज्ञानाचें कारण होतो ?

श्रीवसिष्ठः—जसा एकादा कुटुंबी ब्राह्मण असावा, त्याप्रमाणें विंध्यारण्याच्या भागांत कोणी एक किराट या नांवाचा धनधान्यवान् पण अत्यंत कृपण रहात होता. रामा ! तो एकदा विंध्यपर्वताजवळील जंगलांतून जात असतांना त्याची एक कवडी गवताच्या समूहानें आच्छादित झालेल्या जाग्यांत पडली. कृपणपणामुळें त्या कपर्दिकेसाठीं त्यानें तीन दिवस मोठ्या यत्नानें शोध केला. येथील गवत, तुष वगैरे सर्व त्यानें चहूंकडे फेंकून दिलें, व तो त्या कवडीला शोधीत राहिला. त्या वेळीं त्याच्या मनांत असा विचार चालला होता—ही कवडी मिळाली असतां माझ्या हातांत असलेल्या तिची थोड्याच वेळांत चौपट होईल. कारण त्या कवडीचें कांहीं घेऊन मी तें विकीन व त्यामुळें एका कवडीच्या चार कवड्या होतील. कांहीं कालानें त्यांच्याच आठ कवड्या होतील. त्यांच्या शंभर, सहस्र, इत्यादि कवड्या होतील. इत्यादि मनोराज्य करीत

तो दीन झालेला किराट त्या जंगलांत अहोरात्र आळस सोडून कवडी हुडकीत राहिला. लोक त्याचा नानाप्रकारें उपहास करूं लागले, पण त्यानें तिकडे लक्ष दिलें नाहीं. त्यानंतर तीन दिवस संपल्यावर त्याला त्या जंगलांत पूर्ण चंद्रबिंबाप्रमाणें मोठा चिंतामणि सांपडला. तो मिळाल्यामुळें त्याचें चित्त अतिशय संतुष्ट झालें. नंतर तो आपल्या गृहास येऊन, ज्याला सर्व सांसारिक भोग प्राप्त झाले आहेत व ज्याचे सर्व दारिद्र्यादि दोष शांत झाले आहेत असा होत्साता तेथें सुखानें राहिला. रामा ! अहोरात्र खिन्न न होतां कवडीला निग्रहानें शोधीत राहणाऱ्या त्या किराटाला जसें वर वर्णन केल्याप्रमाणें सर्व जगाच्या मोलाचें रत्न मिळालें, त्याप्रमाणें ज्यानें गुरूचा उपदेश ऐकला आहे अशा अधिकाऱ्यानें अहर्निश आत्मचिंतन केल्यास त्याला आत्मसाक्षात्कार होतो. गुरूपदेशक्रमानें शाब्द परोक्षप्राय तत्त्वाचा शोध केला जातो; पण त्यामुळें शेवटीं नित्य अपरोक्ष आत्मतत्त्व प्राप्त होतें. कारण ब्रह्म सर्व इंद्रियांच्या विषयांच्या पलीकडचें आहे. शब्दश्रवण, शाब्दबोध इत्यादि चित्त-वृत्ति इंद्रियांच्या द्वारा उद्भवतात. गुरूपदेशा-मुळें शाब्दवृत्तिच उत्पन्न होतात. त्यांतील अत्यंत स्वच्छ असलेली जी चरम वृत्ति तिच्या-मध्यें होणारें नित्य अपरोक्ष ब्रह्माचें स्फुरण शिष्याच्या बुद्धीची स्वच्छता व ब्रह्माचा स्व-भाव यामुळें होतें. उपदेश हें त्या स्फुरणाचें कारण नव्हे. तथापि ‘ आचार्यवान् पुरुषो वेद ’ ज्याला आचार्यापासून उपदेश मिळाला आहे, तोच आत्म्याला जाणतो, अशी श्रुति असल्या-मुळें गुरूपदेशावांचून आत्मतत्त्वाचा साक्षात्कार होत नाहीं. कवडीला अनन्य चित्तानें हुडकल्या-शिवाय किराटाला चिंतामणी मिळाला नाहीं. वास्तव अन्वेषण—शोध या श्रेष्ठ उपायाच्या द्वारा कवडी चिंतामणीच्या प्राप्तीचा उपाय जशी होते, त्याप्रमाणें मननाच्या द्वारा गुरूपदेश, वस्तुतः आत्मज्ञानाचें कारण नसला तरी, कारण होतो. राघवा ! मोठमोठ्यांनाही मोह पाडणारी ही माया पहा. यत्नानें एकाचा शोध केला जातो व दुसरेंच फळ प्राप्त होतें ! पुरुष एक करतो व त्याला दुसरेंच फळ मिळतें, असें या त्रिभुवनांत ज्याअर्थी पाहिलें व ऐकलें जातें, त्या अर्थी आत्मलाभानंतर प्रार-ब्धशेषामुळें प्राप्त झालेल्या जगद्भ्रमाचा असं-गत्वानें व उपेक्षेनेंच निर्वाह करणें श्रेय-स्कर आहे. ८३.

---

## सर्ग ८४ वा.

१ शिखिध्वजाचें वैराग्य, २ चूडालेनें त्याचें केलेलें समाधान, ३ राजाचें वनांत निर्याण व ४ मंदर-पर्वतावर स्थिति.

श्रीवसिष्ठ:—त्यानंतर शिखिध्वज राजा, ज्याची संतति नष्ट झाली आहे असा पुरुष शोकादि तमानें जसा अंधत्वास प्राप्त होतो, त्याप्रमाणें तत्त्वज्ञानरूप विश्रांतिस्थानावांचून अत्यंत मोहास प्राप्त झाला. त्याचें मन दुःखा-ग्नीनें जळून गेलें. सामंत राजांनीं आणून दिलेल्या रत्नादि विभूतींमध्यें तो, अग्निशिखांमध्यें जसा, त्याप्रमाणेंच रममाण झाला नाहीं. ज्या-च्यावर बाण फेकला आहे पण दैववशात् तो अंगांत शिरला नाहीं असा हरिण त्याचाला भिऊन जसा एकान्तस्थानीं, दिगन्तामध्यें, निर्झरांवर किंवा गुहांमध्यें रतीस प्राप्त होतो, त्याप्रमाणें तो राजा एकान्तादि स्थानांत रति पावला. राघवा ! तुझ्याप्रमाणेंच तोही भृत्यां-कडून सांत्वन, बोध, इत्यादिकांच्या योगानें पुष्कळ प्रार्थना केली गेल्यावरच रोजच्या स्नान-संध्यादि व भोजनादि क्रियाही करीत

असे. त्याचें वैराग्य रोजच्या रोज अतिशय वाढत असे. एकाद्या संन्याशाप्रमाणें त्याची बुद्धि अतिशय शांत झाली; व संन्याशाप्रमाणेंच स्थित असलेला तो महाभोग व श्री यांचा भोग घेतांनाही खिन्न होत असे. हे मानदा! त्यानें देव, ब्राम्हण व स्वजन यांस गो-भूमि-सुवर्णादि यांची अतिशय दानें दिलीं. तप करण्यासाठीं त्यानें कृच्छ्र-चांद्रायणादिक व्रतांचें अनुष्ठान केलें. तीर्थें, वनें व पवित्र स्थानें यांतून तो परिभ्रमण करूं लागला. तथापि निधानाची इच्छा करणारा जेथें निधान नाहीं तेथेंच जर खणूं लागला तर त्याला जसें तें प्राप्त होत नाहीं, त्याप्रमाणें त्याच्या मनाला थोडेंसेंही समाधान वाटलें नाहीं. तो राजा अहोरात्र चिन्तारूपी अग्नीनें अतिशय सुकून गेला. त्यानें संसाररूपी व्याधीच्या औषधाचें चिंतन केलें. तो चिन्तापरवश झाला. दीन झाला. त्याला त्याचें राज्य विषासारखें वाटूं लागलें. खिन्न झालेल्या बुद्धीनें त्यानें पुढें असलेलें मोठें वैभवही पाहिलें नाहीं. नंतर एकदा एकान्तांत जवळ आलेल्या चूडालेला तो शिखिध्वज राजा मधुर वाणीनें असें बोलला.

शिखिध्वजः—मीं चिरकाल राज्याचा उपभोग घेतला. ऐश्वर्ययुक्त स्थानांचा अनुभव घेतला. आतां मी विरक्त झालों आहें. यास्तव अरण्यांत जातों. कारण हे कोमलांगि! वनांत राहणाऱ्या मुनीला सुखें, दुःखें, आपत्ति व संपत्ति यांतील कांहीं लिप्त करीत नाहीं. आपल्या देशाचा भंग होईल कीं काय? ही त्याला भीति नसते. संग्रामांत लोकांचा क्षय होत नाहीं. त्यामुळें वनांत राहणाऱ्या मुनींना राज्याहूनही अधिक सुख होतें, असें मी समजतों. हे सुंदरि! वनपंक्ति तुझ्यासारख्याच मला दिसतात. पुष्पस्तबक हेच स्तन त्या धारण करितात. कोमल रक्तपल्लव हेच त्यांचे तळहात आहेत. त्यांनीं आपल्या परागांचाच अंगराग लाविलेला असतो. आपल्या पुष्पांचींच भूषणें त्यांनीं केलेलीं असतात. सेवन करण्यास योग्य अशा ज्या सोन्याच्या शिला, त्याच नितंबप्रदेशांनीं त्या सुशोभित झालेल्या असतात. तरंगरूप मोत्यें ओवलेल्या नदीरूपी मोत्यांच्या माळांनीं त्या आच्छादित झालेल्या असतात. लतारूपी सख्यांनीं त्यांना आलिंगन दिलेलें असतें. अतिशय मुग्ध व सुंदर हरिणें हींच त्यांचीं अपत्यें आहेत. स्वाभाविक उत्तम सुगंधानें त्यांचीं अंगें सुगंधित झालेलीं असतात. त्या क्षुधित जीवांना फळांचें भोजन देत असतात. पुष्पांनीं भरलेल्या लता हींच त्यांचीं बाहुप्रभृति अंगें आहेत भ्रमरांच्या पंक्ति हेच त्यांचे नयन आहेत. तुझ्या अधरोष्ठाप्रमाणें स्वाद घेण्यास योग्य असा ज्यांचा तरंग-प्रस्ताव आहे, अशा भावास त्या प्राप्त झाल्या आहेत. त्यांचीं गात्रें शीतल व निर्मळ आहेत. सारांश त्या वनपंक्ति तुझ्याप्रमाणेंच मला रममाण करितात. पवित्र झालेलें मन एकान्तांत जसें शांत होतें, तसें तें चंद्रांत किंवा ब्रम्हा व इंद्र यांच्या लोकांतही होत नाहीं. या माझ्या वनगमनाविषयींच्या उत्तम विचारांत तूं मला विघ्न करूं नकोस. हे सुंदरि! कुलस्त्रिया भर्त्याची इच्छा स्वप्नांही मोडीत नाहींत.

चूडालाः—हे नाथ! योग्य समयीं केलेलें कार्यच शोभतें, दुसरें शोभत नाहीं. वसन्तांत फूल शोभतें व शरदृतूंत फल शोभतें. ज्यांचीं शरीरें जरेनें जर्जर झालेलीं असतात, त्यांनींच वनाचा आश्रय करणें योग्य आहे. तुमच्यासारख्या तरुणांनीं वनाचा आश्रय करणें अगदीं अनुचित आहे. म्हणून मला हा विचार अगदीं आवडत नाहीं. हे महाराज! पुष्पांनीं वृक्षाला जोंवर सोडलें नाहीं, तोंवरच

वृक्ष जसे शोभतात, त्याप्रमाणें तारुण्यानें आम्हांला जोंवर सोडलें नाहीं तोंवर आम्ही गृहांत शोभत आहों. ज्यांच्यावर पुष्पें आलीं आहेत अशा लतांशीं मैत्री करण्यासाठीं आमचीं मस्तकें जरेनें पुष्पांसारखीं शुभ्र झालीं म्हणजे तसल्या जरेसह जाऊं. हंस जसे सरोवरापासून निघून जातात, त्याप्रमाणें आम्हीही जरेसह बरोबरच गृहांतून निघून जाऊं. राजन्! योग्यकाल प्राप्त झालेला नसतांना प्रजापालनरूप मुख्य धर्म सोडणाऱ्या क्षत्रियाला मोठें पाप लागतें व तें राज्यच्छिद्राचें निमित्तच आहे. अप्राप्त कार्य करणाऱ्या राजाला प्रजा रोध करितात, त्याचें त्या कार्यापासून निवारण करितात. भृत्य प्रभूला अकार्यापासून परतवितात व प्रभुही भृत्याचें अकार्यापासून निवारण करितात, हें प्रसिद्ध आहे.

शिखिध्वजः—हे कमलनयने! मला अत्यंत प्रिय असलेल्या गोष्टीला असें विघ्न तूं करूं नको. मी येथून दूर एकान्तवनांत गेलोंच आहें, असें तूं समज. तूं स्त्री आहेस, कोमलांगी आहेस, यास्तव तूं वनांत येऊं नकोस. कारण हे कोमलांगि! पुरुषांनाही वनवास अतिशय कठिण व असह्य होतो. कठोर स्त्रियाही वनांत वास करण्यास समर्थ नाहींत. अरण्यांतील पुष्पमंजरी शत्रपंक्ति सहन करण्यास अक्षम आहेत. यास्तव तूं राज्याचें परिपालन करीत येथेंच रहा. कारण पति कोठें प्रवासांत गेला असतां कुटुंबाचा भार वाहणें हें स्त्रियांचें व्रत आहे.

श्रीवसिष्ठः—त्या चंद्रमुखी दयितेला असें बोलून तो जितेंद्रिय राजा स्नान करावयास उठला. त्यानें सर्व दिवसकार्य—आन्हिक केलें. त्यानंतर प्रजेच्या नियमनाचें कार्य सोडून सूर्य अस्ताचलास गेला, तसाच शिखिध्वज राजाही सर्व जनांना दुर्गम असलेल्या वनास जाण्याचा निश्चय करून राजकार्य सोडून गृहांत गेला. सूर्याची प्रभा आपल्या विस्तृत रूपाचा उपसंहार करून त्याच्या मागोमाग गेली. तशीच पतीवर अत्यंत प्रेम करणारी चूडालाही आपल्या राजकार्यांतून निघालेल्या नाथाच्या मागोमाग गेली. तिच्या मागोमाग भस्मानें ज्याचें अंग धूसर झालें आहे अशा आकाशगंगेला धारण करणाऱ्या शिवाला आलिंगन देण्याच्या इच्छेनें यमुना ही जशी यावी त्याप्रमाणें श्यामा रात्री आली. तमालरूप बालक ज्यांच्या मांड्यांवरून आहेत व संध्यासमयींचे मेघ हेच ज्यांचे दांत आहेत, अशा दिशा वरील यमुनेचें चरित्र पाहूनच जशा काय चंद्रप्रकाशरूप हास्यानें चिन्हित होऊन व सभोंवार मंडल करून स्थित झाल्या. दिनश्री व दिननाथ यांचें जोडपें देवोद्यानानें युक्त अशा मेरूच्या अपर भागांत रममाण होण्यासाठीं जावयास निघालें. निशा व निशानाथ यांचें जोडपें मेरूच्या अलीकडील भागांत येऊं लागलें. कारण सूर्य त्याच्या अपर भागांत गेल्यामुळें हा भाग सूर्याच्या तापदायक चंडकिरणांनीं रहित व त्यामुळेंच शीतळ झाला होता. असो; अशा विविध गोष्टी घडत असतां तो राजा आकाशरूपी गच्चीवर इतस्ततः पसरलेला तारागण पाहता झाला. तो दिशारूपी वधूंनीं अर्पण केलेल्या मंगल लाजांच्या ओंजळीप्रमाणेंच शोभत होता. आपल्या नाथाला शोधानें व त्याच्या उदयाची प्रतीक्षा करून थकलेली, तमानें काळी झालेली, चंद्रानना, कुमुदादि पुष्पांच्या द्वारा हंसणारी व कमलांचे कळे हेच जिचे स्तन आहेत अशी रात्र क्रमानें तारुण्यास प्राप्त झाली. तेव्हां ज्यानें संध्याकाळचा सर्व आचार केला आहे असा राजा इष्ट चूडालेसह, मैनाक जसा सागरांत शयन करतो, त्याप्रमाणें शयन करता झाला. नंतर

अर्ध रात्रीच्या समयीं सर्व प्रदेश शब्दरहित झाला असतां, सर्व जन गाढ झोपेंत लीन झाले असतां, चूडालाही मृदुवस्त्र हांतरलेल्या कोमल शय्येवर गाढ झोपीं गेली असतां, कमलांत अशी भ्रमरी तशी ती अगदीं निद्रापरवश झाली असतां, शिखिध्वज राजानें आपल्यापाशीं निजलेल्या त्या दयितेला आपल्यापासून दूर केलें. ज्याप्रमाणें राहूचें मुख चंद्राला सोडण्याचे वेळीं चंद्रप्रभेला हळू हळू पूर्व दिशेकडे सोडतें, त्याप्रमाणें ज्यांत पत्नी झांकून गेली आहे अशा पांघरायच्या अर्ध्या वस्त्रांतून आपल्याला हळू हळू काढून घेऊन तसल्या वस्त्रानें युक्त असलेल्या पर्यंकावरून तो राजा उठला. लक्ष्मीच्या कांतींनीं युक्त अशा चंचल ऊर्मि ज्यांत आहेत अशा प्रकारच्या क्षीरसागरापासून हरि जसा उठतो, त्याप्रमाणेंच राजा पर्यंकावरून उठला. चोरांचा निग्रह करण्यासाठीं मी जातों असें सांगून व त्याच कार्यांत अनुचरवर्गास नियुक्त करून तो निस्पृह राजा नगरांतून निघून गेला. 'हे राज्यलक्ष्मि! तुला नमस्कार असो,' असें म्हणून आपल्या देशांतून बाहेर पडलेला तो राजा, एखादा नद वेगानें अरण्यांत जसा शिरतो त्याप्रमाणें एकटाच भयंकर अरण्यांत प्रविष्ट झाला. घन अंधकारानें संपन्न असलेली रात्र व गर्द गुल्मांनीं युक्त असलेलें तें अरण्य या दोघांतून तो राजा एकाच वेळीं उत्तीर्ण झाला. ती रात्र व तें अरण्यही क्षुद्र भूतसमूहांनीं कर्कश झालें होतें. प्रातःकाळ झाल्यावरही तो राजा त्या शून्य अरण्यांतून तसाच चालला. तो सर्व दिवस चालण्यांतच घालवून शेवटीं संध्याकाळीं वनांतील कोणा एका जागीं विश्रांति घ्यावयास बसला. सूर्यही अस्त पावला. सूर्यास्त होतांच राजानें स्नानादि नित्य क्रिया करून व कांहीं फलादि खाऊन ती रात्र घालविली. पुनः प्रातःकाळीं उठून तो पुढेंच चालला. त्यानें मोठ्या वेगानें मोठमोठीं नगरें, देश, पर्वत व नद्या यांचें उल्लंघन केलें. याप्रमाणें त्यानें बारा दिवस प्रवास केला व शेवटीं तो मंदरपर्वताच्या तटावरील अरण्यास पोहोंचला. तें अरण्य इतर जनांना दुर्गम होतें व तेथून जनसमूह व नगरें अतिशय दूर होतीं. ज्यांतील पाणी वेळूच्या पन्हळांतून खळखळ असा आवाज करीत वहात आहे अशा वापींनीं त्या अरण्यांतील वृक्ष अत्यंत बलाढ्य केले गेले होते. फुटून पडलेले ओटे व गृहें, यांवरून त्यांत पूर्वी द्विजांचे आश्रम होते, असें ज्ञान होत असे. तेथील लतागृहांचा क्षुद्र प्राण्यांनीं त्याग केलेला असून सिद्धांनीं त्यांचें सेवन केलें होतें. प्राणाचें जीवन करणाऱ्या उत्कृष्ट फलांनीं त्यांतील वृक्ष व लता ओथंबलेल्या होत्या. त्यांतील सम, शुद्ध, जलपूर्ण, शीतल, कोमल, हिरव्या गवतानें श्याम, स्निग्ध व फलवृक्षयुक्त अशा एका स्थानीं तो राजा मंजरींनीं युक्त अशा वेलींनीं पर्णशालारूप गृह करता झाला. वर्षाकाल विद्युल्लतेसह नील अभ्रांनीं जसा आकाशांत पिंजरा बनवितो, तसें त्यानें तेथें आपलें गृह केलें. गुळगुळीत वेळूचा दंड, फलभक्षणाचें पात्र, अर्घ्यपात्र, पुष्पांचें पात्र, अक्षमाला, कमंडलु, शीताचें निवारण करण्यासाठीं कंथा—गोधडी, दर्भासन व मृगाजिन, इतकी सामग्री जमवून त्या राजानें ती आपल्या मठींत ठेवली. विधाता आपल्या निर्माण केलेल्या ब्रह्मांडांत व्यवहारसाधनजात जसें सिद्ध करून ठेवतो, त्याप्रमाणें तापसकर्मामध्यें आवश्यक अशी जी दुसरी सामग्री होती तीही त्यानें त्या मठींत आणून ठेवली. तो प्रातःकाळीं पहिल्या प्रहरांत संध्यापूर्वक जप करीत असे. दुसऱ्या प्रहरांत फुलें आणून स्नान व देवार्चन करीत असे. नंतर वनांतील फळें व

वनांतील कंद, बिसें वगैरे कांहीं खाऊन जपपरायण होऊन रहात असे. नंतर तो जितेंद्रिय एकाकीच रात्र घालवी. मालवदेशाचा ईश्वर शिखिध्वज याप्रमाणें मंदर पर्वताच्या समीपप्रदेशीं निर्माण केलेल्या पर्णकुटींत बसून मनांत अगदीं खिन्न न होतां पुष्कळ दिवस घालविता झाला. पूर्वी अनुभविलेल्या किंवा नव्या राजविलासांस त्यानें आठवलें नाहीं. कारण अंतःकरणांत विवेक स्फुरत असतांना राज्यलक्ष्मी कोणत्या दरिद्री पुरुषालाही आपल्याविषयीं इच्छा उत्पन्न करून स्ववश करूं शकणार? कोणालाही नाहीं. ८४.

---

## सर्ग ८५ वा.

१ रात्रीं जागृत झालेल्या राणीनें राजाचा शोध केला, २ मार्गांत त्याला पाहिलें, ३ भावी अर्थाचें दर्शन व ४ बोध.

**श्रीवसिष्ठ:**—याप्रमाणें शिखिध्वज राजा वनांत पर्णमठिकेंत राहिला. आतां इकडे चूडाला गृहांत काय करती झाली तें ऐक. इकडे अर्धरात्रीं शिखिध्वज दूर गेला असतां गांवांत निजलेल्या हरिणीप्रमाणें चूडाला भयानें जागी झाली. राजाच्या वियोगाला भिऊन ती जरी सदा जागत असे, तरी त्या रात्रीं दैववशात् निद्रापरवश झाली. पतीनें जिला टाकलें आहे, अशा त्या साध्वीनें ती शय्या, सूर्य व पूर्णचंद्र यांनीं ज्याचा त्याग केला आहे व त्यामुळें जें सर्व शोभारहित झालें आहे अशा आकाशाप्रमाणें पाहिली. त्याबरोबर ती शय्येवर उठून बसली. क्षारजलानें किंवा चिखलानें शिंपलेली महावल्ली जशी कोमेजते—तिच्या शाखा व पानें टवटवीत दिसत नाहींत, त्याप्रमाणें तिचें वदन अतिशय म्लान झालें व ती अतिशय खिन्न दिसूं लागली. चित्तात व्याकुळ झालेली ती फारशी प्रसन्नही दिसली नाहीं व अगदीं मलिनही दिसली नाहीं, तर धुक्यानें धूसर झालेल्या दिनश्रीप्रमाणें होऊन राहिली. शय्येवर बसूनच तिनें एक क्षणभर चिंतेनें असा विचार केला:—"अरेरे! माझा प्रभु राज्याचा त्याग करून गृह सोडून वनास गेला. आतां मला येथें राहून काय करावयाचें आहे? मी त्याच्या जवळच जातें. कारण शास्त्रानें स्त्रियांचा पहिला आश्रय भर्ताच सांगितलेला आहे. त्याच्या अभावीं पुत्रादिक दुसरे आधार उक्त आहेत." असा विचार करून ती भर्त्याच्या मागोमाग जावयासाठीं उठली. आपल्या योगसिद्धीच्या बळानें ती खिडकींतूनच निघून आकाशांत शिरली. ती योगिनी आकाशमार्गानें वातस्कंधांतून भ्रमण करूं लागली. त्या वेळीं ती सुंदरी आपल्या मुखानें सिद्धांच्या समूहाला दुसऱ्या चंद्राचा भ्रम पाडीत होती. कांहीं वेळानें तिनें आपल्या पतीला मार्गानें जातांना पाहिलें. तो रात्रीं घरांतून तरवार घेऊन जसा निघाला होता, तशाच त्याला तिनें अवलोकन केलें. तो एकटाच एकांतांत भ्रमण करीत होता. रात्रीही तो प्रकाशमान होत होता. तशा स्थितींत त्या पतीला पाहून व आकाशकोटरांत स्थित होऊन तिनें आपल्या पतीच्या भावी सर्व परिस्थितीचें अखंड चिंतन केलें. हे राघवा, भविष्यत्काळीं ज्याप्रकारें, ज्या निमित्तानें, जेव्हां, जेथें, जेवढ्या क्रियेनें, ज्या उदयापर्यंत अखंड भूमानंदविश्रांति त्या राजाला मिळावयाची होती, त्या सर्वांचा तिनें विचार केला. भर्त्याला पुढें कोणती अवस्था अवश्य प्राप्त होणार आहे, हें तिनें पुढें उपस्थित असल्याप्रमाणें पाहिलें, आणि योगसामर्थ्यानें तिला पुढील गोष्टी पूर्वींच कळल्यामुळें त्याप्रमाणेंच स्वतः आचरण करण्यासाठीं ती म्हणाली—"या वेळीं मला पतीपाशीं

जाणें योग्य नाहीं, यास्तव आज आतां तें राहूं दे." असें बोलून ती पुढें जावयाची थांबली. 'लवकरच मला त्याच्यापाशीं जावें लागेल. कारण नियतीचा असाच निश्चय आहे.' असें चिंतन करून चूडाला पुनः आपल्या अन्तःपुरांत परत आली, आणि चंद्राची कला जशी शंभूच्या शिरावर, तशीच ती आपल्या शय्येवर निजली. राजा या वेळीं कांहीं कारणानें कोठें गेला आहे, असें सर्व पुरवासी जनांचें सांत्वन करून ती स्त्री नगरांत शांत मनानें राहिली. साळीच्या शेताचें रक्षण करणारी स्त्री पिकलेल्या क्षेत्राचें जसें दक्षतेनें रक्षण करते, त्याप्रमाणें तिनें भर्त्याचें तें राज्य क्रमानें व समदृष्टीनें रक्षिलें. याप्रमाणें स्थित असलेल्या त्या दोघांचा—चूडाला व राजा यांचा—बराच काळ निघून गेला. त्यांना त्या वेळीं एकमेकांचें मुख दिसलें नाहीं. कारण त्यांतील एक राज्याचें पालन करीत होती व दुसरा वनाचें रक्षण करीत होता. शिखिध्वजाचा दिवस, पक्ष, मास व ऋतुसहित संवत्सर हा काल अरण्यांत गेला व चूडालेचा आपल्या मंदिरांत गेला. त्याचें फार वर्णन काय करावयाचें आहे? याप्रमाणें अठरा वर्षे चूडाला स्त्री राजगृहांत राहिली व शिखिध्वज वनगुच्छांत राहिला.

अशीं पुष्कळ वर्षे निघून गेल्यावर महापर्वताच्या तटावरील पर्णकुटींत राहणाऱ्या शिखिध्वजाला जरा आली. राजाच्या रागद्वेषादि वासनांचा परिपाक व्हावा म्हणून चूडालेनें तितके दिवस प्रतीक्षा केली. पण त्या वेळीं त्याचीं तीं वर्षे लोटून वनांतच त्याला जरा आली असतां, आपल्या भर्त्याला बोध करण्याचें कार्य आपल्यालाच केलें पाहिजे अशी भावितव्यताच असल्यामुळें—आपल्या उपदेशानेंच त्याला बोध व्हावयाचा असल्यामुळें, आतां मला त्याच्या समीप जाण्यास हा योग्य काळ आहे, असा विचार करून चूडाला मंदरपर्वताच्या समीप जावयास सिद्ध झाली. तिनें तेथें जाण्याचा निश्चय केला. ती अंतःपुरांतून रात्रीं निघाली. आकाशमार्गास उल्लंघून गेली; आणि वातस्कंधानें पुढें जाऊं लागली. जातां-जातां तिनें आकाशांत कल्पवृक्षांशुकांनीं झांकलेल्या, रत्नस्तबकांनीं भूषित झालेल्या, नंदनवनांत वास करणाऱ्या, कांतांच्या ठिकाणीं अनुरक्त झालेल्या सिद्धांच्या अभिसारिका-कामुकांकडे जाणाऱ्या कामिनी पाहिल्या. तिनें चंद्रशकलांस ज्यांनीं स्पर्श केला आहे, देवांच्या कणांचा जे वर्षाव करीत आहेत, उत्तमोत्तम सिद्धांपासून मंदारमाला, हरिचंदन, कस्तुरी इत्यादिकांचा सुगंध ज्यांनीं घेतला आहे अशा वायूंना स्पर्श केला. आकाशाच्या अन्तर्वर्तित्वास प्राप्त झालेली—आकाशांत असलेली—ती साध्वी चंद्रबिंबरूपी अमृतसागराच्या महातरंगपरंपरेसारख्या निर्मल चांदण्यास पाहती झाली. मेघांमधून जाणाऱ्या तिनें मेघांशीं संलग्न असलेल्या—भर्त्यापासून वियुक्त न झालेल्या विजांना पुनः पुनः पाहिलें, आणि आपल्यापाशींच म्हणाली—'काय हो चमत्कार आहे! जीवांचा स्वभाव मरेपर्यंत शांत होत नाहीं. म्हणूनच माझेंही विवेकपूर्ण मन यांना पाहून उत्कंठित झालें आहे. सिंहाप्रमाणें ज्याचे स्कंध आहेत, अशा त्या माझ्या प्रेमप्रवण कांताला मी केव्हां बरें पाहीन, असें म्हणून माझें मन, मीं त्याला वारंवार बोध करीत आहें तरी उत्कंठित होतें! मंजऱ्यांच्या समूहानें आच्छादित झालेल्या वेली वृक्षरूपी आपल्या पतीला एक क्षणभरही सोडीत नाहींत, हें पाहून माझेंही मन उत्कंठित होतें. जशी ही देवयोनींत उत्पन्न झालेली सिद्धाभिसारिका आपल्या कांताकडे जात आहे तशी मी केव्हां जाईन, असें म्हणून

माझेंही मन अतिशय उत्कंठित होत आहे. काय सांगावें? हे मंद वायु, हे शीतल चंद्राचे किरण, व या पुष्पयुक्त वनपंक्ति माझ्याही मनाला उत्कंठित करितात. हे जड चित्ता! तूं आंतल्याआंत उगीचच असें विक्षिप्त होऊन कां राहिलें आहेस? हे साधो! तुझी ती आकाशासारखी निर्मल विवेकिता कोठें गेली? अथवा हा कांहीं दोष नाहीं. कारण हे चित्ता! हे मित्रा! तूं स्वतःच्या भर्त्यासाठीं उत्कंठित होत आहेस, ठीक आहे. तूं असेंच उत्कंठायुक्त होऊन रहा. तूं जरी उत्कंठित झालेस तरी त्यांत माझी कांहीं हानि नाहीं. हे मूर्ख स्त्रीशरीरा! तूं व्यर्थ कशाला उत्कंठित होतेस? तूं ज्याच्या आलिंगनादिकांसाठीं असें उत्कंठित होत आहेस, तो भर्ता आतां जरेला प्राप्त झाला असेल. तो तपस्वी झाला आहे. त्यामुळें त्याचें गात्र कृश झालें असेल. त्यामुळें तो आतां तुझ्याविषयीं वासनाशून्य झाला असेल. त्या राजाचें मन राज्यादिकांच्या अभोगासाठीं निर्मलत्वास प्राप्त झालें असेल, असें मला वाटतें. जशी पावसाळ्यांतील एकादी कुनदी मोठ्या नदीला जाऊन मिळते व त्यानंतर पृथक् रहात नाहीं, त्याप्रमाणें त्याची वासनालता पृथक् विद्यमान नसेल. एकान्तांत रत म्ह० आसक्त झालेला तो एकात्मा नीरस, निरिच्छ झाला असेल. त्याची वासना शांत झाली असेल. त्यामुळें माझा भर्ता शुष्क वृक्षासारखा होऊन राहिला असेल. तथापि हे क्षुद्र चित्ता! तूं इतकें उत्कंठायुक्त कशाला होतेस? मी पुढील उपायानें आपल्या पतीला तत्त्वज्ञ करून, प्रारब्धशेषाचा भोग घेण्याविषयींच्या उत्कंठेनें युक्त झालेल्या त्याचा तुझ्याशीं संबंध करवितें. तूं अशी उत्कंठा करूं नकोस. मुनि बनलेल्या त्या भर्त्याच्या विकल्पयुक्त मनाला निर्विकल्प करून मी राज्यांतच नियुक्त करीन, आणि मग आम्ही उभयतां दीर्घकाल सुखानें राहूं. अहाहा! खरोखर फार दिवसांनीं मी या आपल्या शुभ मनोरथास प्राप्त होईन. कारण माझा भर्ता तत्त्वबोधानें मजप्रमाणेंच ज्यानें अंतर्बाह्य विषयास तुल्यरूप मानलें आहे, असा होईल. समान मनोवृत्तींच्या मनुष्याच्या समागमाचें सुख अनुभविणें हें सर्व आनंदसमूहाच्या अग्रभागीं स्थित आहे. तें सुख इतर सर्व सुखांहून श्रेष्ठ आहे.' याप्रमाणें चिंतन करणारी ती चूडाला पर्वत, देश, मेघ, दिशांचे अंतर्भाग या सर्वांस ओलांडून मंदरपर्वताच्या गुहेस प्राप्त झाली. ती अदृश्य व आकाशांत स्थित होऊनच तेथील वनामध्यें शिरली. वृक्ष व लता यांच्या हालण्यावरून तिचें तेथील जाणें-येणें कळत होतें. त्या वनाच्या एकदेशांत निर्माण केलेल्या पर्णशाळेंत पतीला पाहून तिनें जणुं काय दुसऱ्या देहांतच स्थित असलेल्या त्याला समाहित चित्तानें ओळखलें. हार-केयूर-कटक-कुंडल इत्यादि भूषणांनीं भूषित झालेला जो पूर्वी मेरुपर्वताच्या गौरकांतीनें शोभत होता, त्यालाच तिनें येथें पाहिलें. या वेळीं त्याचें शरीर अतिशय कृश झालें होतें. वर्ण काळा पडला होता व तो पिकलेल्या पानाप्रमाणें निस्तेज दिसत होता. तो काजळाच्या पाण्यानें स्नान केलेल्या 'भृंगीश' या नांवाच्या रुद्रगणांप्रमाणें दिसत होता. तो निस्पृह होता. फाटकीं वस्त्रें धारण करीत होता. तो त्या पर्णकुटींत शांत व एकाकी अवस्थित होता. तो त्या वेळीं जमिनीवर बसून देव-अतिथि इत्यादिकांच्या पूजासाठीं फुलांच्या माळा गुंफित होता. त्यानें जटा वाढविल्या होत्या. अशा प्रकारच्या त्या राजाला पाहून जिचीं अंगें निर्दोष व स्तनें पुष्ट आहेत अशी ती चूडाला किंचित् खिन्न होऊन आपल्याशींच असें बोलली:—

" हर हर ! आत्म्याला न जाणणें हें भयंकर मूर्खत्व आहे. कारण त्या मूर्खत्वाच्या प्रसादानें अशा दशा प्राप्त होतात. कारण हा तो लक्ष्मीवान् राजा—माझा अतिशय प्रिय पति गाढ मोहानें हृदयांत अतिशय आघात केल्यामुळें अशा या कष्टकर दशेस प्राप्त झाला आहे. यास्तव मी येथें आजच या माझ्या नाथाला ज्ञातज्ञेयत्वास अवश्य प्राप्त करतें, त्याचप्रमाणें भोग-मोक्षसंपत्तीस प्राप्त करवितें, यांत कांहीं संशय नाहीं. आतां मी या स्वरूपाचा परित्याग करून दुसऱ्या कोणत्या तरी रूपानें याच्यापाशीं उत्तम बोध देण्यासाठीं जातें. कारण मीच याला तत्त्वज्ञान सांगू लागल्यास ही माझी कांता बाला आहे, अशा अवज्ञेनें मीं सांगितल्याप्रमाणें पूर्णपणें हा वागणार नाहीं. म्हणून मीं तापसरूपानें या माझ्या पतीला एका क्षणांत बोध करतें. हा माझा स्वामी राग-द्वेषादि कषायांच्या परिपाकामुळें ज्याची बुद्धि परिपक्व झाली आहे, असा होऊन राहिला आहे. आतां याच्या शुद्ध चित्तांत आत्मतत्त्व बरोबर प्रतिबिंबित होईल."

असा विचार करून चूडाला ब्राह्मणपुत्र झाली. जलतरंगाप्रमाणें किंचित् ध्यानानेंच ती एका क्षणांत अन्य स्वरूपास—पुरुषत्वास प्राप्त झाली. ती त्या अरण्यांत ब्राह्मणपुत्राच्या रूपानें आकाशांतून खालीं पडली; आणि मंदस्मितानें जिचें मुख अतिशय चमकत आहे अशी ती मर्त्याच्या अग्रभागीं आली. तेव्हां शिखिध्वजराजानें त्या समोर येणाऱ्या ब्राह्मणपुत्राला पाहिलें. तो दुसऱ्या वनांतून आलेला आहे, असें त्याला वाटलें. तें मूर्तिमंत तपच आहे, असें त्याला भासलें. पातळ केलेल्या सोन्याच्या रसाप्रमाणें त्याचें शरीर गौरवर्ण होतें. तो मोत्यांच्या हारांनीं अतिशय भूषित झालेला होता. त्याच्या देहावर शुक्लवर्ण यज्ञोपवीत शोभत होतें. त्यानें दोन शुभ्र वस्त्रांनीं आपल्या देहाला आच्छादित केलें होतें. त्यानें कमंडलु धारण केला होता. तो रम्य ब्राम्हणपुत्र शिखिध्वज राजाच्या पुढेंच येत होता. त्यानें आपल्या मणगटाला रुद्राक्षाच्या माळेचे दोन फेरे घातले होते. मणगटांतील त्या दुहेरी माळेनें तो फारच शोभत होता. त्याचें शरीर भूमीला स्पर्श करीत नव्हतें. तर भूमीला सोडून एक हातावर अंतराळींच चालत होतें. त्याचें मस्तक कुरळ्या केंसांनीं व्यापलेलें होतें. त्यामुळें तें भ्रमरपंक्तियुक्त कमलाप्रमाणें शोभत होतें. आपल्या शरीराच्या दीप्तिमंडलांनीं तो त्या प्रदेशास प्रकाशमान करीत होता. त्याचें मुख कुंडलांनीं भूषित झालें होतें. त्यामुळें तो नुकत्याच उगवलेल्या सूर्याप्रमाणें दिसत होता. त्यानें आपल्या शेंडींत मंदारपुष्प खोंवलें होतें. त्यामुळें ज्याच्या शृंगावर चंद्र जणूंकाय संलग्नच झाला आहे अशा पर्वताप्रमाणें तो दिसत होता. त्याचें उत्कृष्ट शरीर सुंदर व शांत होतें. तो जितेंद्रिय होता. बर्फासारख्या शुभ्र भस्माचा तिलक त्यानें लाविला होता. त्यामुळें तो भूषितालोकाप्रमाणें सुंदर दिसत होता. मेरूच्या सुवर्णतटाजवळून वाहणाऱ्या गंगाप्रवाहांत प्रतिबिंबित झालेल्या पूर्णचंद्राप्रमाणें तो चंचल होता.

असो. त्या द्विजपुत्राला पाहून हा देवपुत्रच आला आहे, अशा बुद्धीनें पायांतील पादुका काढून शिखिध्वज राजा उठून उभा राहिला. आणि ' हे देवपुत्रा ! नमस्कार. हें आसन, यावर बैस. ' असें म्हणून त्यानें त्याला हातानें पानांचें आसन दाखविलें. चंद्र चंद्रविकासी कमलांच्या पाकळ्यांवर दंवाचे दाट बिंदु जसे ठेवतो, त्याप्रमाणें राजानें ब्राम्हणपुत्राच्या तळ-

१ ज्यानें ज्ञेय—आत्मतत्त्व जाणलें आहे, अशा अवस्थेस पोंचवितें.

हातावर पुष्पांची अंजलि अर्पण केली. तेव्हां 'हे राजर्षे! तुला नमस्कार असो;' असें तो द्विजपुत्रही म्हणाला, आणि त्याच्यापासून ती पुष्पांजलि घेऊन पानांच्या आसनावर बसला.

**शिखिध्वजः**—हे महाभाग देवपुत्रा! आपण कोठून आगमन केलेंत? ज्याअर्थी मीं आज तुला पाहिलें आहे, त्याअर्थी हा दिवस सफल आहे, असें मी समजतों. हे मान देणाऱ्या! हें अर्घ्य, हें पाद्य, हीं पुष्पें, व ह्या गुंफलेल्या माळा घे. तुझें कल्याण असो.

**श्रीवासिष्ठः**—रामा! असें बोलून पाद्य, अर्घ्य, माळा व पुष्पें, शिखिध्वज राजा त्या इष्ट देवीला यथाशास्त्र देता झाला.

**चूडालाः**—मीं भूतळावरील पुष्कळ आयतनांतून परिभ्रमण केलें, पण मला आज तुझ्यापासून जशी पूजा प्राप्त झाली आहे, तशी दुसऱ्या कोणापासूनही प्राप्त झाली नाहीं. हे निष्पाप राजा! तुझ्या या सुंदर व अनुरूप विनयानें मी असें समजतों कीं तूं अत्यंत चिरंजीव होशील. कारण या गुणांनीं संपन्न असलेले लोक चिरंजीव होतात. हे साधो! फलाविषयींची कामना दूर टाकून शांत मनानें तूं निर्वाणासाठीं उत्तम तपाचा संचय केला आहेस काय? हे सौम्य! विस्तीर्ण राज्याचा त्याग करून अशा महावनाचा आश्रय करणें हें तुझें असिधाराव्रतासारखें अतिशय कठिण तप आहे. क्रोधरहित यति व वानप्रस्थ यांचें हें व्रत आहे. तेच अनायासानें त्याचें परिपालन करितात.

**शिखिध्वजः**—भगवन्! तूं सर्व जाणतोस. कारण तूं देवच आहेस. तेव्हां माझा सर्व वृत्तान्त जर तूं जाणलास तर त्यांत आश्चर्य कसलें? चिन्हरूप लोकोत्तर शोभेनेंच तुझें देवत्व ज्ञात होत आहे, असें मला वाटतें. किंवा फार कशाला? उत्तम प्रकारचें अवलोकन व देहकांति यांच्या योगानें तूं जणूं काय अमृतानेंच सेक करतोस. माझी प्रिय कांता आहे, ती आतां माझ्या त्या राज्याचें परिपालन करीत आहे. हे सुंदरा! तुझ्यासारखींच तिचीं तीं अंगें मीं पाहिलीं आहेत. तुझें हें शरीर पायांपासून मस्तकापर्यंत अत्यंत शांत व सुंदर आहे. मेरूचें शिखर जसें शुभ्र मेघानें, त्याप्रमाणें मीं दिलेल्या या पुष्पमालेनें तूं आपल्या शरीरास आच्छादित कर. पुष्पाच्या पाकळीप्रमाणें कोमल असलेलें हें तुझें शरीर व निष्कलंक चंद्राप्रमाणें असलेलीं हीं तुझीं अंगें सूर्याच्या तेजानें म्लान होतात, असें मी समजतों. देवांच्या पूजेसाठीं मीं जमविलेल्या या सर्व पुष्पांना या अशा वैचित्र्यानें गुंफलें आहे. हे श्रेष्ठा! तुझ्या अंगसंगानें तें कृतार्थतेस प्राप्त होवो. अभ्यागताच्या पूजेनें आपलें जीवित सफलतेस प्राप्त होतें. अभ्यागत जन सज्जनांना देवाहूनही अधिक पूज्य आहे. असो; तर मग आतां हे चंद्रसुंदरा! मीं दिलेल्या या पूजेचें ग्रहण करून, तूं कोण? कोणाचा पुत्र? कां आला आहेस? या माझ्या संशयांचें निरसन कर.

**ब्राह्मणः**—राजन्! तू जसें विचारलें आहेस त्याच क्रमानें मी तुला त्याचें अखंडित उत्तर सांगतों, तें ऐक. प्रश्न करणाऱ्या नम्राला कोणता उत्तम पुरुष फसवील? या जगत्कोशामध्यें शुद्धात्मा नारदमुनि आहे. त्याला पुण्यलक्ष्मीच्या सुंदर मुखावरील कर्पूरतिलकाचीच उपमा आहे. एकदा तो देवमुनि मेरूच्या गुहेंत ध्यान करीत बसला होता. त्या पर्वताच्या सोन्याच्या तटाजवळून मोठमोठ्या तरंगांनीं युक्त असलेली गंगा वहात होती त्यामुळें मेरूच्या शोभेमध्यें जिचें रूप स्फुरत आहे, अशा हारलतेप्रमाणें ती भासत होती. एकदा तो नारदमुनि ध्यान करून उठला असतां नदीच्या

तटावर ज्यांत कंकणांचा ध्वनि होत आहे, असा जलक्रीडाकोलाहल ऐकता झाला. तेव्हां हें काय आहे, असें म्हणून ज्याच्या मनांत थोडेसें कौतुक उत्पन्न झालें आहे, असा तो मुनि सहज पाहूं लागला. तों त्याला नदींत स्त्रीसमूह दिसला. रंभा, तिलोत्तमा यांसारख्या श्रेष्ठ प्रतीच्या स्त्रियाच ज्यांत अधिक आहेत असा तो स्त्रीसमूह जलांतून बाहेर पडला. तो समूह एकमेकींवर जल शिंपडणें इत्यादि क्रीडा करीत होता. त्या पुरुषरहित देशांत त्या सर्वजणींनीं आपलीं वस्त्रें सोडून ठेवलीं होतीं. सुवर्णकमळांच्या कळ्यांसारख्या स्तनमंडलांनीं उपलक्षित होणाऱ्या त्या एकमेकींना घट्ट आलिंगनही देत असत. त्या स्तनांच्या योगानें त्या स्त्रिया फळांनीं शोभणाऱ्या वृक्षाप्रमाणेंच दिसत होत्या. सुवर्णरसाचा जसा मोठा प्रवाह तशा विस्तारानें भासुर दिसणाऱ्या मांड्यांनीं त्या काम मंदिराच्या स्तंभांचा संचय करीत होत्या. आपल्या जलाच्या निर्मलतेनें त्या चंद्राच्या प्रतिबिंबाला निर्मल करीत होत्या व तसल्या प्रतिबिंबचंद्रानें सर्वतः व्यापलेल्या आकाशांतील मंदाकिनीला त्या आपल्या देहलावण्यरसाच्या प्रवाहानें जणुं काय तुच्छ करीत होत्या. त्या स्त्रिया कामाच्या नंदनवनांतील क्रीडेंत रथचक्राप्रमाणें झालेल्या नितंबतटलक्षण सेतूंनीं गंगेच्या जलाला अडवून निराळ्या मार्गानें जावयास लावीत होत्या. त्यांची अंगकांति अतिशय स्वच्छ असल्यामुळें त्या आरशाप्रमाणें एकमेकींचें प्रतिबिंब ग्रहण करणाऱ्या होत्या. त्यामुळें तो स्त्रीसमूह ' सर्वतः पाणिपादं तत् सर्वतोऽक्षिशिरोमुखं ' या श्रुतींत वर्णन केल्याप्रमाणें प्रसिद्ध कालरूप भगवानापासून उत्पन्न झालेल्या विश्वरूपाप्रमाणें स्थित होता. ( कालरूप कल्पतरूचें वर्णन—) प्रभव-विभव इत्यादि साठ संवत्सर हेच त्या कल्पतरूचे स्कंध आहेत. नानाप्रकारचे ऋतु हेंच त्याचें लताजाल आहे. दिनश्री याच कळ्यांनीं तो कल्पवृक्ष व्यापलेला आहे. प्रकाश हेंच त्याच्या पुष्पांतील रस आहे. तो कालकल्पवृक्ष आकाशरूप अरण्यांत उत्पन्न झालेला आहे. स्फुरण पावणाऱ्या देवांनीं तो व्यापलेला आहे. आणि सात समुद्र हेंच त्याचें एक अळें आहे. अशा त्या कालात्मक विष्णुरूप कल्पतरूपासून तें स्त्रीसमूहरूप विश्वरूप उत्पन्न झाल्यासारखें दिसत असे. एकमेकींच्या स्तनस्तबक-समूहांत व कमलमुकुलांत सौंदर्याचें साम्य दिसत असल्यामुळें त्या स्त्रियांना त्या कमलमुकुलांचा मोठा राग आला व त्यामुळें त्यांनीं स्पर्धेनें ते सर्व कळे नाळापासून वारंवार उपटून त्यांच्या पाकळ्या फाडून टाकण्याचें काम चालविलें होतें. त्यामुळें अर्थात् त्यांच्या मुखकमलांवर चंचल कुरळ केंस, लांब केंस, नेत्रांतील तारका, हेच भ्रमर भ्रमण करीत होते. अमृतकलांच्या कोशाचा संग्रह करणाऱ्या देवांनीं अमृताला लुबाडून नेणाऱ्या राहु, गरुड इत्यादिकांपासून प्राप्त होणाऱ्या आपत्तीचें निवारण करण्यासाठीं मेरूच्या एकान्तीं असलेल्या गुप्त गुहेंत एकत्र आणून ठेवलेल्या चंद्रबिंबाच्या कलापुराप्रमाणेंच तो स्त्रीगण दिसत होता. ती गुप्त गुहा सर्व भूतसंघांना दुष्प्राप होती. तेथें सुवर्णकमलें फुललेलीं होतीं. पद्मिनीच्या पल्लवांनीं ती आच्छादित झालेली होती. ती गुहा गंगेच्या तीरावर असून, तिचा मळ गंगेच्या जलानें वारंवार धुतला जात असे, व त्यामुळेंच तें गुप्त स्थान अतिशय शीतल होतें; अशा त्या एकान्तस्थानीं देवांनीं तो स्त्रीसमूहरूप चंद्रबिंबकलापूर आणून ठेवला. असो; अशा प्रकारचा तो अत्यंत रमणीय स्त्रीसमूह पाहून मुनीचें मन एकाएकींच विवेकांशाचा आश्रय न करतां प्रमत्त झालें. तें चंचल झालें. चित्त असें प्रमादयुक्त होऊन प्राण-

वायु क्षुब्ध होऊन राहिला असतां त्या हृष्ट मुनींचें वीर्यस्खलन झालें. ज्याप्रमाणें रसानें भरलेल्या फलांतून रस गळतो किंवा वर्षाकाळीं मेघ वृष्टि सोडतो, अथवा हे उत्तम राजा! ज्याच्या शाखामूलस्थानीं क्षत झालें आहे अशा कोंवळ्या वटादि वृक्षापासून जसा चीक गळतो, किंवा चंद्रापासून जसें दंवाच्या कणांचें स्यंदन होतें; किंवा बिसाला मधोमध चिरलें असतां जसा रसस्राव होतो, त्याप्रमाणें त्या मुनीच्या चित्तांत विकार होऊन सर्वांगापासून वीर्यच्युति झाली.

शिखिध्वजः—ब्रह्मन्! तो तशा प्रकारचा बहुज्ञ, जीवन्मुक्त, निरिच्छ, अनासक्त, सर्वथा निरुपम व सबाह्य-अभ्यंतर नित्य आकाशासारखा निर्लेप असलेलाही नारदमुनि मदनस्खलित कसा झाला?

चूडालाः—हे राजर्षे! * या जगत्त्रयांत असलेल्या सर्व भूतजातीचा, फार काय पण देवादिकांचाही हा देह स्वभावतः द्वयरूप आहे. अज्ञ असो कीं तज्ज्ञ असो, जोंवर हें शरीर जगांत असतें, त्याचा अंत होत नाहीं, तोंवर तें सर्वच सुखदुःखमय म्हटलेलें आहे. एखाद्या पदार्थानें, तृप्ति वगैरे होऊन, दीपाच्या योगानें जसा प्रकाश किंवा चंद्राच्या योगानें समुद्र, त्याप्रमाणें सुख वाढतें व क्षुधादि कांहीं प्रकारांनीं मेघपटलानें जसें रात्रीं तम, तसें दुःख वाढतें. स्वभाव हेंच त्याचें कारण आहे. निर्मल सत्य स्वरूपाला एक क्षणभर जरी विसरलें, तरी पावसाळ्यांत जसा मेघ त्याप्रमाणें दृश्य वृद्धि पावतें. (अर्थात् तत्त्वज्ञानीही एक क्षणभर तत्त्वाला विसरल्यास जर असा अनर्थ होतो, तर सर्वथा जे अतत्त्वज्ञ असतात त्यांच्याविषयीं काय सांगावें? म्हणून—सदाच दृश्याचा उल्लास न व्हावा म्हणून सर्वदा स्वरूपाचें विस्मरण न होईल असेंच चित्त स्थिर ठेवावें, असें चूडाला सांगते—) सतत स्वरूपाचें अनुसंधान केल्यानें, एक क्षणभरही त्याचें विस्मरण न झाल्यास, चित्तांत हा दृश्यरूप यक्ष वृद्धि पावत नाहीं. ज्याप्रमाणें अंधकार व प्रकाश यांच्या योगानें रात्र व दिवस हे स्थित झाले आहेत, त्याप्रमाणेंच शरीर सुख व दुःख यांच्या योगानें स्थितीस प्राप्त झालें आहे. याप्रमाणें ज्ञानी व अज्ञानी यांचें प्रारब्धकर्माचें फळ भोगणें, एवढ्या एका गोष्टींत जरी साम्य असलें, तरी अज्ञ देहादिकच आत्मा आहे असें समजतो, त्यामुळें वस्त्रावर केशराचा रंग जसा दृढ बसतो, त्याप्रमाणें त्याचे 'मी सुखी, मी दुःखी' हे दोन भाव दृढ होतात. तो त्यांत आसक्त होतो. पण तत्त्वज्ञाला आत्मा देहादिकांहून अगदीं विलक्षण आहे, असा साक्षात्कार झालेला असल्यामुळें त्याच्याच बळानें त्याला त्यांचा स्पर्श होत नाहीं. ज्याप्रमाणें स्फटिकमण्याच्या आंत तादात्म्यानुरंजनानें व तत्प्रयुक्त इंद्रनील-पद्मरागादि अध्यासानें अतिशय आक्रांत झालेलेही शुभाशुभ वर्ण जसे वस्तुतः वस्त्रादिकांप्रमाणें त्या मण्याला लागत नाहींत, किंवा वस्त्रादि त्या रंगांनीं जसें रंगित होतें तसा मणी रंगित होत नाहीं; त्याप्रमाणें तज्ज्ञ—आत्मज्ञानामुळें ज्याची मति जीवन्मुक्त झाली आहे असा मुनि —त्या सुख-दुःखांनीं सुखी किंवा दुःखी होत नाहीं. स्फटिक जवळच्या वस्तूच्या संसर्गानें तेवढ्या वेळेपुरता तरी रंजित होतो, पण जीवन्मुक्त हा सुख दुःखदर्शनेंतही सुखी व दुःखी होत नाहीं. अज्ञाची बुद्धि केवल वस्तूच्या संसर्गानें अत्यंत रंजित होते त्यामुळें ती वस्तु जरी गेली तरी तिला अत्यंत परिताप होतो.

---

* अत्यंत प्रबल प्रारब्धानें तत्त्वज्ञान्यांच्या विवेकांचाही केव्हां केव्हां बाध होतो व ते देहधर्माचें अनुवर्तन करितात, असें उत्तर चूडाला सांगते.

आंत ठेवलेलें कुंकुम-केशर जरी दूर केलें तरी त्याला जसा त्याचा रंग लागतो, त्याप्रमाणें मूढाचा विषय जरी दूर झाला तरी त्याचें चित्त विषयानुरंजन टाकीत नाहीं. याच क्रमानें हे बंध-मोक्ष व्यवस्थित आहेत. बुद्धींत विषयरंजनवासनांचा उपचय होणें, हाच बंध असून त्यांचा क्षय हाच मोक्ष आहे.

शिखिध्वजः—हे प्रभो ! राज्य-पुत्रादि दूर असतांना किंवा समीप असतांना त्यांचा लाभ होणें किंवा नाश होणें. हें कारण झालें असतां त्याविषयीं 'हें माझें' असा अभिमान धरणाराला सुख व दुःख कोणत्या क्रमानें होतें, तें मला सांग. कारण तुझें वचन अतिशय उदार, अतिशय स्वच्छ व बह्वर्थ आहे. त्यामुळें मेघरवाविषयीं जसा मयूर, तसाच मी तें ऐकत असतांना तृप्त होत नाहीं.

चूडालाः—शरीर, इंद्रियें व हात यांनीं जवळचा विषय; व शब्द, अनुमान इत्याकांनीं दूरचा विषय हृद्य—सुंदर—रम्य आहे, असें समजून, (कारण तसें समजणें हेंच सुखोत्पत्तीचें कारण आहे,) अपरिच्छिन्न आत्मतत्त्वाला न जाणल्यामुळें बाला ह्म० मूढ असलेली ही बुद्धिस्थ आत्मसुखसंविद् बुद्धीच्या क्षोभामुळें स्वतः क्षुब्ध होऊन कुंडलिनींतील जीवापुढें प्रत्यगात्मतत्त्वापासूनच अग्निविस्फुलिंगाप्रमाणें आविर्भूत होते. कारण सर्व विषयानन्द हे आत्मानंदाचेच लेश आहेत, असें श्रुतींत वर्णन आहे. हृदयस्थ जीवाला—भोक्त्याला नयन—रसन—श्रोत्र इत्यादि प्रतिनियत भोगस्थानीं नेण्यासाठीं देहांत निरनिराळ्या नाड्या स्थित आहेत. स्फुरण पावणारा जीव त्या त्या विषयांच्या संस्पर्शानें तदेकाग्रप्रवाहात्मा होऊन प्राणानें भरलेल्या त्या नाड्यांचें आक्रमण करतो. झाडांच्या मुळांशीं घातलेलें पाणी नाड्यांच्या द्वारा सर्व झाडभर किंवा सर्व वेलींत जसें प्रवेश करतें, त्याप्रमाणें जीव नाड्यांच्याद्वारा सर्व देहभर प्रवेश करतो. जीवाच्या निरनिराळ्या नाड्या पृथक् देहस्थितीस प्राप्त झाल्या आहेत. सुखाचा अनुभव घ्यावयास प्रवृत्त झालेल्या या जीवाची स्वस्थता प्रकट होते. पण दुःखाचा अनुभव घेणाऱ्या जीवाची स्वस्थता तशी प्रकट होत नाहीं; कारण तो त्या वेळीं आपल्याला अस्वस्थ, चंचल, संतप्त होत असलेला असा अनुभवितो. त्यामुळें त्या दुःखी जीवाचा नाडीमार्ग पित्त, ऊष्मा इत्यादि संतापकर रसानें भरलेला व चंचल असावा असें अनुमान होतें. चांगला वेष धारण करणाऱ्या मनुष्यांचे ह्म० सज्जनांचे जे मार्ग असतात, ते कुवेषवानांना—दुर्जनांना शुभ नसतात. यास्तव हा जीव जोंवर अत्यंत चंचल नाडीमार्गांत प्रवेश न करितां स्वतः तरलताशून्य असतो, तोंवर त्याला दुःखप्रसक्ति होत नाहीं. त्या वेळीं स्रक्-चंदन-वनितादि-आकारवृत्तीनें त्याच्यामध्यें स्वल्प आत्मसुख अभिव्यक्त होतें. पण ब्रह्माकारवृत्तीनें पूर्ण सुखाचा अनुभव येतो. त्यामुळें त्याच्या मनांत विक्षेप नसतो. तो त्या वेळीं अतिशय शांतच होतो. यास्तव तो जोंवर अशा स्वस्थावस्थेंत असतो तोंवर मुक्तच आहे, असें तूं समज. कारण सुखाला आविर्भूत करणारी स्वस्थता हेंच मुक्तीचें लक्षण आहे. क्षुब्ध झालेला वायु जितका जितका अधिक प्रमाणानें स्फुरतो, तितका तितका हा जीव अधिक बद्ध आहे असें समज. दुःखाप्रमाणेंच सुखाचा अनुभव, त्यासाठीं रागादिबाह्यस्पंद, सुखाचा विच्छेद झाला असतां चंचलपणा, त्याच्या उपायांना संपादन करतांना प्राप्त होणारे हजारों अनर्थ, हाच सर्व बंध आहे. सुखविश्रांतीचा अंशही बंध नव्हे. कारण

एक क्षणभर जरी सुखविश्रांति मिळाली तरी तो मोक्षच आहे. कारण त्या वेळीं वरील बंधाचा अभाव असतो. याप्रमाणें संसरण व असंसरण यांच्या योगानें बंध व मोक्ष यांची दोन प्रकारची व्यवस्था मीं तुला सांगितली. शठ इंद्रियांनीं जोंवर सुखदु:खदशा आणल्या नाहींत, तोंवर जीव सुखमय, सौम्य व शांतसा राहतो. इंद्रियांचा विषय न होणारा—स्वप्रकाश जीव सुख किंवा दु:ख पाहून, चंद्राला पाहून जसा सागर त्याप्रमाणें आंत चंचलस्वरूप होऊन उल्लास पावतो. हे राजन्! उंदिराला वगैरे पाहून मांजर जसें क्षुब्ध होतें, त्याप्रमाणें दृष्ट सुख, त्याचें साधन विषय, विषयांचा उपाय धनादिक, त्याविषयींची आसक्ति इत्यादिकांच्या संविदेनें जीव क्षुब्ध होतो. निरतिशय आनंदस्वतत्त्वाचें अज्ञान हेंच त्याचें कारण आहे. शुद्ध स्वात्मज्ञानरूप आत्मबोधानें सुख-दु:खादि हे आत्मधर्म नव्हेत असें जेव्हां कळतें, तेव्हां त्या यथार्थ बोधानें जीव विश्रांतीस प्राप्त होतो. तें सुखादिकच संभवत नाहीं, व मिथ्या मायेनें मृगजलाप्रमाणें तें जरी संभवलें तरी तें माझें नव्हे, हा मी वृथाच स्थित आहें, असा प्रबुद्ध झालेला जीव निर्वाणास प्राप्त होतो व शांत होतो. सुखादि अवस्तु आहे, व तें आत्मरूप नव्हे, या आंतील बोधसंविदेनें जीव सुख-दु:खादिकोन्मुख होत नाहीं. त्यामुळें केवल शांत होतो. सर्वच चिदाकाश ब्रह्म आहे, असा दृढ निश्चय स्थिर झाला असतां तैलरहित दीपाप्रमाणें जीव शमास प्राप्त होतो. सुखादि स्नेहाचा—रागाचा क्षय झाला असतां तो दीपाप्रमाणें शांत होतो. ऐक्यभावनेनें सर्व जगत् चिन्मात्रच आहे, आणि सर्व चिदाकाशच आहे असें ज्ञान झाल्यानें; आणि सर्व जगत् शून्य आहे अशा ज्ञानानें जीव क्षोभास प्राप्त होत नाहीं. या ब्रह्मैक्यविभावनेनें पृथक्त्वशून्य अथवा बंधशून्य झालेल्या जीवाला क्षोभविभ्रम कसा होणार? तथापि असल्याच कल्पित आद्य जीवानें—हिरण्यगर्भानें "मी सर्व जीवरूपानें असा संसार करीन व स्वतत्त्वबोधानें असा क्रमानें मुक्त होईन." अशा स्वसंकल्पनेनेंच बंधमोक्षमार्ग कल्पून त्याचेंच अद्यापि अनुवर्तन चालविलें आहे—तो त्याच मार्गानें जात आहे.

शिखिध्वजः—हे देवपुत्रा! सुखानें संचार करण्यास योग्य अशा नाड्यांतून जीव संचार करीत असतांनाच त्याच्या वीर्याचें स्खलन कसें होतें?

चूडालाः—राजन्! स्त्रीशरीराला पाहतांच रागादि वासनांचा उद्बोध होतो. त्यामुळें जीव स्वतः क्षुब्ध होऊन प्राणादि वायूंनीं कलुषित झालेल्या शरीरास क्षुब्ध करतो. ( तो कसा? उत्तर— ) प्रवृत्तिस्वभाव जे प्राणादिक त्यांची अधिष्ठात्री जी प्राणसंविद् तिनें उद्भवलेल्या रागादि वृत्तींच्या अनुरोधानें चालणें हीच तिची आज्ञा होय. त्या आज्ञांशानेंच राजा सेनेला जसा क्षुब्ध करतो त्याप्रमाणें जीव शरीरादिकांना क्षुब्ध करतो. हाडें वगैरे यांतून संचार करणाऱ्या व्यानवाताच्या प्रेरणेनें सर्वांगांत संस्थित असलेल्या मेदाच्या आंतील सार व मज्जासार सत्वर आपल्या सूक्ष्म अंशास सोडतात. पुष्पांतील पराग, पानें, फळें वगैरे सुगंधास जसे सोडतात, त्याप्रमाणें मेदसार व मज्जासार आपल्या सूक्ष्म अंशास सोडतात. नंतर त्यांनीं सोडलेलें तें रज—सूक्ष्म अंश सर्व अंगापासून निघून नाडीद्वारा खालच्या मूलाधारस्थानास जातें व ज्याप्रमाणें आकाशांत सर्वतः पसरलेलें जल पुरोवातामुळें एकत्र मेघरूप होऊन व वृष्टि करण्यास सज्ज होऊन भूमीवर पडतें, त्याप्रमाणें देहांतील नाड्यांच्या द्वारा

शुक्र स्वभावतःच देहाच्या बाहेर जातें.

शिखिध्वजः—हे देवपुत्रा! तूं आत्मतत्त्वज्ञ आहेस. त्यामुळें तूं सांसारिक पदार्थसंस्थितींला तर्कादि कौशल्यानें जाणतोस. कारण तुझ्या वचनावरूनच हें कळत आहे. आतां स्वभाव * कशाला म्हणतात तें सांग?

चूडालाः—सृष्टीच्या आरंभीं सृष्टि करण्यास तयार झालेलें ब्रह्म ःपूर्वकल्पांतील प्राणिकर्माच्या अनुसार ज्या ज्या धर्मानें ज्या ज्या पदार्थाच्या रूपानें स्वरूपांत स्फुरण पावलें, त्या त्या पदार्थाच्या प्रलयापर्यंत तोच तो धर्म नियमानें राहणें हाच स्वभाव होय. स्वभाव म्हणजे पदार्थधर्मनियति. पण सृष्टि झाल्यानंतर त्या सृष्टींतील घट, वट, पट इत्या पदार्थांच्या स्वभावाचें वैचित्र्य दृष्ट सामग्रीच्या वैचित्र्यामुळेंही संभवतें. पण सृष्टीच्या आरंभीं तशी दृष्ट सामग्री संभवत नाहीं. त्यामुळें कावळा यायला, डहाळी मोडून त्याच्या डोक्यावर पडायला व तो मरायला जशी एकच गांठ पडते, त्याप्रमाणें त्या वेळीं जें पदार्थवैचित्र्य उद्भवतें तें केवळ अदृष्टामुळें होय. म्हणून स्वभावाचा अर्थ सांगतांना मीं वर आद्य सर्गाचेंच ग्रहण केलें आहे. पण वर्तमानकाळींही प्रत्येक वस्तु, देश व काल यांचें जें नियत स्वभाववैचित्र्य दिसतें, तेंही दृष्ट सामग्रीमुळेंच आहे, असेंही म्हणतां येत नाहीं. म्हणून ज्ञानी लोक पाण्यावरील बुडबुड्यांच्या उत्पत्ति-नाशांप्रमाणें किंवा किड्यानें पोखरलेल्या लांकडांत जशीं अकस्मात् अक्षरें दिसतात त्याप्रमाणें तो स्वभाव आहे, असें समजतात. वर सांगितलेल्या प्रकारच्या स्वभावामुळें अत्यंत रूढ झालेल्या—उद्भवलेल्या या जगांत विविधविकारात्मक अंडजादिक चतुर्विध देह भ्रमण करितात. त्यांतील कित्येक ज्ञानदेहवान् असतात. त्यांची वासना क्षीण झालेली असते. त्यामुळें ते पुनः जन्म घेत नाहींत. जे दुसरे अज्ञानदेहवान् असतात, ते पुनः जन्म घेतात. कारण त्यांची आस्था भोगामध्येंच असते. ८५.

* या सर्गाच्या आरंभीं 'देवादिकांचाही हा देह स्वभावतः द्वयरूप आहे' असें जें आपण म्हटलेंत त्यांतील स्वभाव शब्दाचा अर्थ काय?

---

## सर्ग ८६ वा.

१ कुंभाचें जन्म, २ त्याची वाढ, ३ ब्रम्हसमागम व ४ शिष्याचें सर्वज्ञत्व.

चूडालाः—वर वर्णिलेल्या आत्मस्वभाववशात् हें मोठें जगत् उत्पन्न झालेलें आहे. वासनेनें तें स्थितीस प्राप्त होऊन धर्माधर्माधीन झालें आहे. वासनेचा ज्ञानाभ्यासानें अपक्षय करून पुरुष धर्म व अधर्म यांच्या अधीन होत नाहीं; आणि त्यामुळें प्राणी पुनः जन्म घेत नाहीं. हे मुने! आमचें दर्शन हें असें आहे.

शिखिध्वजः—हे वक्त्यांतील श्रेष्ठा! तूं अतिशय उदार व मोठ्या अर्थानें युक्त असें भाषण करतोस. तुझें म्हणणें अनुभवारूढ झालेलें, गूढ व परमार्थानें युक्त असतें. हे सुंदरा! तुझा हा वाग्विस्तार ऐकून आज मी अमृत प्राशन केल्याप्रमाणें मनांत शीतळ—तृप्त झालों आहें. यास्तव आतां थोडक्यांत तूं आपली उत्पत्ति मला सांग. त्यानंतर मी मोठ्या यत्नानें तुझी ज्ञानपूर्ण वाक् ऐकेन. त्या ब्रम्हपुत्र नारदमुनीनें—त्या आर्यानें तें वीर्य काय केलें? कोठें ठेविलें? त्याचें काय झालें? तें आतां प्रथम मला सांग.

चूडालाः—त्यानंतर त्या मनोरूपी मत्त हत्तीला विवेकरूप बंधनस्थानीं शुद्धबुद्धिरूप चर्मरज्जूनें बांधणाऱ्या त्यानें, कल्पांतीं कालाग्नीच्या योगानें वितळलेल्या चंद्राच्या रसाची

ज्याला उपमा आहे, व जें पारद, सुवर्ण, रूप्य इत्यादि शंभुवीर्यरूप धातूंचें अनुकरण करीत आहे, असें तें वीर्य जवळच असलेल्या स्फटिकाच्या अद्भुत व आपल्या कांतीनें चमकणाऱ्या कुंभांत, चंद्रामध्यें चंद्राचेंच जसें आधान करावें त्याप्रमाणें ठेविलें. त्या अतिशय सुशोभित मेरुपर्वतावर, पश्चिमभागीं, दोन्ही बाजूंस स्थूल व म्हणूनच ज्याचें उदर फार गंभीर आहे, व जो दगडावर आपटला तरी न फुटणारा, असा तो कुंभ नारदानें संकल्पित दुग्धानें भरला. स्वसंकल्पानें उत्पन्न केलेल्या अमृताच्या पुराच्या आकारानें भिन्न झालेल्या सृष्टिकर्त्यानें ब्रह्मलोकीं 'अर' व 'ण्य' या नांवांनीं प्रसिद्ध असलेले अमृतार्णव जसे भरले, तसाच नारदानें तो कुंभ संकल्पित क्षीरानें भरला. त्या क्षीरांत मुनीला अग्निकार्याहुतींत मंद मंद प्रवृत्त करणारा तो शुभ गर्भ एका महिन्यांत वृद्धि पावला. अमृतसागरांत इंदूपासून झालेला प्रतिबिंबेंदु जसा वाढतो त्याप्रमाणें तो वृद्धि पावला. मास जसा आपूर्ण चंद्राला व वसंत पुष्पाला, त्याप्रमाणें तो घट योग्य काल गेल्यावर कमलपत्राप्रमाणें ज्याचे नेत्र आहेत अशा गर्भाला प्रसवला. ज्याचीं समस्त अंगें परिपूर्ण झालीं आहेत, असा गर्भ त्या कुंभांतून सूक्ष्म-घटपरिच्छिन्न सागरापासून क्षयरहित दुसऱ्या चंद्राप्रमाणें बाहेर पडला. शुक्लपक्षांत जसा चंद्रमा, त्याप्रमाणें ज्याचें सौंदर्य अनुपम आहे असा तो गर्भ कांहीं थोड्या दिवसांतच वृद्धि पावला. एका भांड्यांतील धन दुसऱ्या भांड्यांत जसें ठेवावें, त्याप्रमाणें नारदमुनीनें आपल्यापाशीं असलेलें सर्व विद्याधन जातकर्मादि उपनयनान्त सर्व संस्कारांनीं संपन्न झालेल्या त्या पुत्रामध्यें ठेवलें—त्याच्या ठिकाणीं सर्व विद्याधनाची योजना केली. थोडक्याच दिवसांत त्या मुनिश्रेष्ठानें पुत्राला सर्व वाङ्मय उत्तम प्रकारें शिकविलें व जणुं काय आपलें प्रतिबिंबच बनविलें. स्फटिकपर्वतांत प्रतिबिंबित झालेल्या पूर्ण चंद्राच्या योगानें चंद्र जसा शोभतो, त्याप्रमाणें त्या मुनि बनलेल्या पुत्राच्या योगानें तो मुनिनायक शोभला.

नंतर तो नारद त्या पुत्राला घेऊन ब्रम्हलोकीं आपल्या पित्याकडे गेला. तेथें गेल्यावर त्यानें ब्रम्हदेवाला वंदन केलें. तेव्हां ज्यानें अभिवादन केलें आहे अशा त्या पौत्राची परीक्षा घेण्यासाठीं—त्याचें ग्रहणधारणसामर्थ्य कसें आहे तें पाहण्यासाठीं ब्रम्हदेवानें त्याच्याकडून वेदादि सर्व विद्यास्थानें म्हणून घेतलीं, आणि त्याचें विद्वत्त्व पाहून संतुष्ट झालेल्या त्यानें आपल्या पौत्राला मांडीवर बसवून घेतलें, आणि कमलोद्भवानें नुस्त्या आशीर्वादानेंच त्या आपल्या कुंभ नांवाच्या पौत्राला सर्वज्ञ व ज्ञानपारंगत केलें. हे साधो! तो हा मी कुंभ आहें. मी कमलासनाचा पौत्र व नारदमुनीचा कुंभापासून झालेला कुंभनामक पुत्र आहें. मी आपल्या पित्यासहवर्तमान ब्रम्हलोकीं सुखानें राहतों. चार वेद हे माझे लीलाविलासी सुहृद् आहेत. गायत्री ही माझी मावशी असून माझी माता सरस्वती आहे. ब्रम्हलोकीं माझें गृह असून तेथें मी ब्रम्हपौत्र सुस्थित आहें. मी आपल्या इच्छेप्रमाणें लीलेनें

१ 'तदरश्च ह वै ण्यश्चार्णवौ ब्रम्हलोके' येथें ब्रम्हलोकांत प्रसिद्ध 'अर' व 'ण्य' असे दोन समुद्र आहेत. (छान्दोग्योपनिषद्भाष्यार्थ पृ. ३०५—३०६ पहा.)

१ तत्वज्ञान हें सर्व ज्ञानाचें परतीर—परमावधि आहे. त्यांत त्याला स्थिर केलें. २ पति हें स्त्रियांचें परदैवत आहे. तेव्हां त्याच्यासमक्ष धर्मज्ञ चूडालेनें, असें मिथ्या कथन कसें केलें, असें कोणी म्हणेल. तर तो दोष येत नाहीं. कारण पतीचें सर्वथा हित करणें हा पत्नीचा परम धर्म आहे. चूडाला स्वतःच जर त्याला ब्रम्हविद्येचा उपदेश करूं ला-

सर्व जगांत विहार करतों. पण कोणत्याही कार्याच्या उद्देशानें भटकत नाहीं. कारण मी मनांत परिपूर्ण आहें. मी पृथ्वीवरून संचार करीत असतांनाही, देवयोनींत उत्पन्न झाल्यामुळें माझे पाय भूतळास स्पर्श करीत नाहींत. माझ्या अंगांना पृथ्वीवरील धूळ स्पर्श करीत नाहीं. माझे शरीराला केव्हांही ग्लानि येत नाहीं. आज मीं आकाशमार्गानें जात असतांना तुला खालीं पाहिलें, आणि त्यामुळें हा येथें तुझ्यासमोर आलों आहें. राजा! तूं जें विचारलें होतेंस, तें सर्व तुला सांगितलें. हे वनवासाचें तत्त्व जाणणाऱ्या राजा! वर सांगितल्याप्रमाणें ज्याचा जन्म वगैरे आहे, अशा ह्या मीं तूं विचारलेलें सर्व तुला निवेदन केलें आहे. आर्यजनांतील श्रेष्ठ विचारूं लागले असतां संत सर्व सांगतातच. कारण ते सज्जनांसह प्रश्नोत्तरादि व्यवहार करण्यांत दक्ष असतात.

श्रीवाल्मीकिः—मुनि वसिष्ठ जों इतकें सांगत आहे तों दिवस गेला. सूर्य अस्त पावला. भारद्वाजादि मुनींची सभा वसिष्ठमुनीला नमस्कार करून संध्याकाळचें संध्यावंदन, अग्निहोत्रादि विधीसाठीं स्नान करावयास गेली आणि रात्रीचा क्षय झाला असतां प्रातःकाळीं सूर्याच्या किरणांसह ती सभा पुनः वसिष्ठांपाशीं आली. ८६.

---

गली असती तर शिखिध्वजाला तो पटला नसता. कारण ही आपली भार्या अज्ञ आहे, अशी तिच्याविषयीं त्याची भावना होती. म्हणून तिनें सर्वव्यापी आत्मदृष्टीनें स्वतःला मुनिपुत्र कल्पून राजाच्या हितासाठीं असें मिष केलें. तिनें असें जर केलें नसतें तर राजाचा तिच्या वचनावर विश्वास बसून त्याला ज्ञान झालें नसतें. म्हणून तिला अनृतभाषणाचा दोष लागत नाहीं.

१ वनवासाचे गुण व चित्तशुद्धि हें त्याचें फळ, यास जाणणाऱ्या, असा याचा आशय.

# सर्ग ८७ वा.

१ राजा कुंभाची प्रशंसा करतो, २ आपल्या दुःखाचें निवेदन करतो, ३ शिष्यत्व पतकरतो, ४ व त्यानें केलेल्या उपदेशावर आपला पूर्ण विश्वास आहे, असें वर्णन करतो.

शिखिध्वजः—या जन्मपरंपरारूप संसारांत संचय केलेल्या व दैवयोगानें एकाच वेळीं स्फुरण पावलेल्या—परिपक्व होऊन फलोन्मुख झालेल्या माझ्या अदृष्ट पुण्यांनीं, पुरोवात जसे मेघाला प्रेरणा करितात त्याप्रमाणें तुला या मंदरपर्वताकडे येण्याची प्रेरणा केली, असें मी समजतों. ज्याचें अमृताचा स्राव करणारें वचन आहे अशा तुझ्याशीं माझा ज्या अर्थी समागम झाला आहे, त्या अर्थीं हे साधो! आज मी धर्मतः सर्व धन्य लोकांच्या अग्रभागीं स्थित झालों आहें. जसा साधुसमागम माझ्या चित्ताला अतिशय शीतळ करतो, त्याप्रमाणें हे दुसरे राज्यलाभादि कोणतेच भाव मला संतुष्ट करीत नाहींत. कारण, साधुसमागमांत राग-द्वेषादि मननरहित असा अपरिच्छिन्न ब्रह्मानंद दरिद्रादि-सर्व-जनसाधारणत्वानें विकास पावतो. पण राज्यलाभादिक केवळ काल्पनिक तुच्छ सुखावह असून शिवाय तें सर्वजनसाधारण नसतें.

श्रीवसिष्ठः—राजा असें बोलत आहे तों मुनिपुत्ररूपिणी चूडाला मध्येंच त्याला निरोध करून पुनः असें बोलली.

चूडालाः—माझ्या प्रशंसेची ही वार्ता आतां पुरे झाली. तूं जें विचारलें होतेंस तें मी तुला सर्व सांगितलें. आतां हे साधो! तूं कोण व या पर्वतावर काय करतोस तें मला सांग. ही तुझी वनवासिता किती काळ टिकणारी आहे? या वनवासानें तुला कोणतें प्रयोजन साधावयाचें आहे, तें खरें सांग. छपवून ठेवूं नकोस.

कारण तुझ्यासारखे तापस खोटें बोलावें कसें हेंही जाणत नाहींत.

शिखिध्वजः—तूं देवपुत्र आहेस. सर्वच यथास्थित जाणतोस. तूं लोकवृत्तांत जाणणारा आहेस. तेव्हां आतां मी तुला आणखी काय सांगूं? संसारभयाला भ्याल्यामुळें मी वनांत रहात आहें. हे आर्य! तूं मला जाणतच आहेस. तरी पण मी थोडक्यांत सांगतों. मी शिखिध्वज राजा आहें. मी राज्य सोडून येथें राहिलों आहें. हे तत्त्वज्ञा! या संसारांतील पुनर्जन्माला मी अतिशय भ्यालों आहें. हे तत्त्वज्ञा! पुनः सुख होतें व पुनः दुःख होतें. पुनः जन्म व मरण येतें. त्यामुळें या संसारवनमार्गांत मी अतिशय तापलों आहें. एकाद्या निर्धनाला निधि जसा सांपडत नाहीं, त्याप्रमाणें मी दिगन्तामध्यें जरी भ्रमण करीत आहें व परम तप आचरीत आहें, तरी मला क्षणैक विश्रांति मिळत नाहीं. माझा सर्व यत्न जरी कुंठित झाला आहे, मला फळ जरी प्राप्त झालेलें नाहीं, मी जरी एकाकी आहें, अपूर्ण आहें, ज्याची राज्यकालीन संगति अस्त पावली आहे असा मी काष्ठकीटांनीं खालेल्या वृक्षाप्रमाणें वनांत शुष्क होत आहें, मी उपवासदेवातिथिपूजा इत्यादिरूप ही क्रिया अगदीं अखंडितपणें जरी करीत आहें, तरी एका दुःखांतून दुसऱ्या दुःखांत, दुसऱ्यांतून तिसऱ्यांत असा जात आहें. ह्मणजे मला अमृतही विष होऊन राहिलें आहे.

चूडालाः—मीं पूर्वी एकदा पितामहाला हें विचारलें होतें. 'हे प्रभो! क्रिया व ज्ञान यांतील जें एक श्रेयस्कर—मुक्तिकारण असेल तें मला सांग' असें मीं त्यास म्हटलें.

ब्रह्मा:—ज्ञान हेंच परम श्रेष्ठ आहे. त्या ज्ञानानें पुरुष कैवल्याचा—केवलभावाचा साक्षात् अनुभव घेतो; आणि क्रिया स्वर्गादिभोगांच्या योगानें चित्तविनोदासाठीं प्रवृत्त झालेली असून ती क्षुद्र फळ देते. यास्तव तिला पुरुषार्थत्व नाहीं. अर्थात् श्रुतीनें आयुष्याचा काळ घालविण्यासाठींच क्रिया सांगितलेली आहे. पुत्रा! ज्यांना ज्ञानदृष्टि प्राप्त झालेली नाहीं, त्यांना क्रिया हेंच परम साधन आहे. कारण तें स्वाभाविक दुराचरणाची व्यावृत्ति करतें. ज्याला उंची वस्त्र नाहीं तो कंबलही टाकतो कीं काय? नाहीं. अज्ञाचें वासना हेंच सार—बल असल्यामुळें त्याच्या क्रिया सफळ होतात. पण ज्ञानी पुरुषाच्या सर्वच वासनांचा क्षय होत असल्यामुळें त्याच्या सर्व क्रिया निष्फळ होतात. वेलींना पाणी न घातल्यास त्या जशा व्यर्थ होतात—फळें देत नाहींत, त्याप्रमाणें वासनांच्या अभावीं सर्व अशुभ व शुभ फळ देणाऱ्या प्रारब्धक्रियाही अफल होतात. दुसरा ऋतु लागला असतां पहिल्या ऋतूंतील सर्व शोभा जशी पार नाहींशी होते, त्याप्रमाणें वासनानाश झाला असतां क्रियाफळ नाश पावतें. जसें कुडूचें झाड स्वभावतःच फळ देत नाहीं, त्याप्रमाणें हे पुत्रा! वासनारहित क्रिया फळ देत नाहीं. ज्याच्या मनांत यक्षाची वासना असते तो बालकच यक्षाला पाहतो. वासनारहित बालक यक्षाला पहात नाहीं. त्याचप्रमाणें जो दुःखवासनायुक्त असतो तोच मूढ दुःख पाहतो. दुःखवासनेवांचून प्राणी दुःखी होत नाहीं. फुललेली कुडूची वेल जशी नाहींशीच होते त्याप्रमाणें तत्त्वज्ञाची शुभ किंवा अशुभ साहंकारादिरूपिणी वासना येथें नाहींच. अहंकारादिरूपिणी वासना अज्ञानामुळें मरुभूमीवर जसा सागर तशी असतच उदय पावली आहे. सर्व ब्रह्मच आहे, अशा भावनेनें ज्याचें अज्ञान

१ नियतकालीं—नियमानें.

क्षय पावलें आहे, त्या प्राज्ञाची वासना, ही मरुभूमि आहे असें जाणणाराला मरुभूमीवर असा सागर दिसत नाहीं, त्याप्रमाणें ती उदय पावत नाहीं. केवल वासनेचा त्याग केल्यानेंच जीव पुनर्जन्मरहित, जरा-मरणशून्य पदास प्राप्त होतो. वासनेसह असलेलें जें मन तेंच मन असून वासनारहित मन हें ज्ञानच आहे. यास्तव ज्ञानानें ज्ञेयास प्राप्त होऊन जीव पुनः उत्पन्न होत नाहीं.

चूडालाः—हे राजर्षे ! याप्रमाणें ज्ञानच परम श्रेय आहे असें ते ब्रह्मादिक मोठे देवही सांगतात. मग तूं असा अज्ञानाचा आश्रय करून कां राहिला आहेस ? हे भूपाला ! इकडे कमंडलु, इकडे दंडकाष्ठ, इकडे आसन, अशा या अनर्थविलासांत कां रममाण होतोस ? मी कोण ? हें कसें झालें ? व याची शांति कशी होईल ? या गोष्टींचा विचार कां करीत नाहींस ? असा अज्ञासारखा कां बसतोस ? बंध कसा होतो ? मोक्षाचा उपाय काय ? इत्यादि प्रश्न विचारीत संसारसमुद्राच्या परतीरास व अपर तीरास म्हणजे चिन्मात्ररूप परमानन्द समुद्रास जाणाऱ्या आत्मवेत्त्यांच्या पादांची सेवा कां करीत नाहींस ? जिच्यामध्यें आत्मसंविद् व्रत-उपवास, शीत-उष्ण इत्यादि दुःखद प्रवृत्तीला उन्मुख झालेली असते, अशा या तपःक्रियेनें या पर्वतकोटरांत बसून तूं आपलें आयुष्य, शिळेंतील बेडकाप्रमाणें, व्यर्थ कां घालवितोस ? समदृष्टि साधूंच्या सेवेनें, त्यांना प्रश्न करून व त्यांचे समागमानें जिच्या योगानें जीव मुक्त होतो ती युक्ति मिळते. तुला इष्ट असलेल्या विश्रांतिसुखाचा लाभ करून देणारी ज्ञानयुक्ति वरील उपायांनीं प्राप्त होते. यास्तव तूं ही सर्व तपश्चर्यादि बहिर्मुख दुश्चेष्टा सोडून गुरूसहवर्तमान आहार करून, त्याच्या सेवेमध्यें तत्पर राहून त्यानें उपदेशिलेल्या अर्थामध्यें भूछिद्रांतील कीटाप्रमाणें निश्चल रहा.

श्रीवसिष्ठः—त्या देवरूपिणी कांतेनें ज्याला असा बोध केला आहे त्या शिखिध्वज राजाच्या नेत्रांत अश्रु आले व तो असें वाक्य बोलला.

शिखिध्वजः—हे देवपुत्रा ! फार दिवसांनीं तूं मला आज हा बोध केला आहेस. मी अज्ञानामुळें आर्यांचा उत्तम संग सोडून वनांत येऊन राहिलों आहें. अहाहा ! आज माझें सर्व पाप क्षय पावलें आहें, असें मी समजतों. त्यामुळेंच तूं स्वतः मजकडे येऊन मला येथें बोध करीत आहेस. हे सुंदरा ! तूं माझा गुरु आहेस, तूं माझा पिता आहेस, व तूं माझा मित्र आहेस. मी तुझा शिष्य आहें. मी तुझ्या पायांस आज वंदन करतों, मजवर कृपा कर. जें अत्यंत उदार तत्त्व तूं जाणतोस, जें जाणलें असतां पुरुष शोक करीत नाहीं, ज्याच्या योगानें मी सुखानें विश्रांति पावेन, त्या ब्रम्हाचा मला सत्वर उपदेश कर. ज्ञानामध्यें घटज्ञानादि अनेक विभाग आहेत, त्या सर्वांतील कोणतें परम ज्ञान तारणारें होईल ! 'ज्ञानमेव परं श्रेयः' असें जें तूं वर म्हटलेंस तें परम ज्ञान कोणतें ?

चूडालाः—हे राजर्षे ! माझ्यावर जर तुझा विश्वास असेल, माझें वचन ग्राह्य आहे असें जर तुला वाटत असेल, तर मी माझ्या ज्ञानाप्रमाणें तुला कांहीं सांगेन. स्थाणुपुढें कावळ्याचें कर्कश ओरडणें जसें व्यर्थ होतें तसें वृथा भाषण मी करणार नाहीं. अंधकारांत नेत्रांतील सूक्ष्म दर्शनशक्तिही जशी निष्फळ होते, त्याप्रमाणें अनास्थेनें कोणीं प्रश्न केला असतां त्याचेंही उत्तर सांगणाऱ्या पुरुषावर

---

१ ज्ञानाला सोडून तपच मोक्षाचें कारण आहे, असा निश्चय करून कां स्थित आहेस ?

ऐकणाराचा विश्वास जर नसेल, त्याचें वचन ग्राह्य जर वाटत नसेल, तर त्याचें सर्व बोलणें व्यर्थ जातें.

शिखिध्वजः—जें तूं सांगशील तें मला श्रुतीच्या विधीप्रमाणें कांहीं विचार न करितांच ग्राह्य आहे. हें माझें अगदीं सत्य वचन आहे.

चूडालाः—ज्याप्रमाणें बालक पित्याचें वचन, हेतूंनीं उपपादन करीत न बसतां, प्रमाणबुद्धीनेंच ग्रहण करतो, त्याच्या युक्तायुक्ततेचा वगैरे विचार करीत नाहीं, त्याप्रमाणें तूं या माझ्या वचनाचें विश्वासानें ग्रहण कर. तें श्रवण केल्यावर बुद्धीनें हें माझें हितच आहे अशी भावना ठेवून, हेतूंनीं त्याचें परीक्षण न करितां, कर्णसुखावह गायन जसें प्रीतीनें ऐकतोस त्याप्रमाणें माझें वचन ऐक. राजन्! तुझ्या चारित्रासारखेंच असलेलें, त्याचप्रमाणें दीर्घकालानें उदय पावणाऱ्या मंदमतीच्या बुद्धीलाही बोधयुक्त करणारें, महा बुद्धिमानाच्या संसारभयाला तत्काल घालविणारें, असें हें सुंदर कथानक मी तुला सांगतों तें ऐक.

---

## सर्ग ८८ वा.

१ कोणी एक मूर्ख प्राप्त झालेल्या चिंतामणीचा त्याग करून दीर्घकाल तपानें काचेला हा मणी आहे, अशा बुद्धीनें ग्रहण करता झाला, अशी कथा.

चूडालाः—जसा सागर वाडवाग्नि व जल या दोघांचें स्थान आहे, त्याप्रमाणें नित्य विरुद्ध असलेल्या—गुण[१] व लक्ष्मी—यांचें पूर्णपणें स्थान असा कोणी एक श्रीमान् पुरुष होता. तो सर्व कलांना जाणणारा, अस्त्रविद्येंत कुशल, व्यवहारांत निपुण, सर्व संकल्पाचा अवधि असा जरी होता तरी त्याला परमात्मपदार्थाचें ज्ञान नव्हतें. वाडवाग्नि समुद्राला सुकविण्यासाठीं जसा प्रवृत्त झाला आहे, तसा तो जप, तप, देवताप्रार्थना इत्यादि अनेक यत्नांनीं साध्य होणाऱ्या चिंतामणीला संपादन करण्यासाठीं तपादिकांत प्रवृत्त झाला. त्या दृढनिश्चयी पुरुषाच्या मोठ्या यत्नानें थोड्याच कालानें त्याला एक चिंतामणी प्राप्त झाला—त्याच्या पुढें येऊन उपस्थित झाला. दृढनिश्चयानें उद्योग करणारांना काय साध्य होत नाहीं? कधींही खिन्न न होणाऱ्या एकाद्या पुरुषानें प्रज्ञेचा आश्रय करून प्रवृत्ति व उद्यम यांचा जर प्रयोग केला तर तो अकिंचन जरी असला तरी निर्विघ्नपणें शक्रत्वास प्राप्त होतो, समर्थ होतो. पण ज्याप्रमाणें उदयाचलाच्या शृंगावर बसलेला एकादा मुनि तेथेंच उदय पावलेल्या चंद्राला, तो हातांत धरतां येण्यासारखा जरी असला तरी भ्रांतीनें मेरूवर उदय पावलेला, अतिशय दूर असलेला व त्यामुळें दुष्प्राप पाहतो, त्याप्रमाणें त्यानें पुढें स्थित असलेल्या व त्यामुळें हस्तप्राप्य अशाही मणीला दूर असल्यासारखें पाहिलें. ज्याप्रमाणें एकाद्या अतिशय पामर व दीन दरिद्री पुरुषाला साक्षात् राज्य जरी प्राप्त झालें, तरी त्याची त्याविषयीं खात्री नसते, त्याप्रमाणें त्याचा त्या श्रेष्ठ मण्याविषयीं निश्चय होईना. हा चिंतामणिच आहे, असें त्याला वाटेना. विस्मयशाली व दीर्घ दुःखानें भ्रान्त झालेल्या मनानें प्राप्त झालेल्या त्या चिंतामणीची उपेक्षा करून त्यानें असें चिंतन केलें:—त्याला प्रथम हा मणि आहे, असें वाटलें. पण इतक्यांत छे, हा मणि नव्हे, असा भ्रम झाला. कारण हा जर मणि असता, तर मला असा प्रत्यक्ष दिसला नसता. असें जरी आहे, तरी हा मणीच आहे कीं नाहीं, याचें त्याला हातांत घेऊन परी-

---

१ वैराग्य, सर्वस्वत्याग, औदार्य, इत्यादि गुण व संपत्ति यांचा एकत्र वास होत नाहीं, हें प्रसिद्ध आहे.

क्षण करावें, असें वाटलें. पण इतक्यांत 'याला स्पर्श करणेंही बरें नव्हे; कारण मीं जर याला स्पर्श केला तर कदाचित् मज अभाग्याच्या स्पर्शानेंच तो गुप्त होईल. कारण एवढ्याशा थोड्या कालांत चिंतामणि सिद्ध होणें शक्य दिसत नाहीं. मरेपर्यंत यत्न जेव्हां करावा तेव्हां चिंतामणि लाभतो, असें याविषयीं ऐतिहासिक प्रमाण मिळतें. तस्मात् मज कृपणाला, माझ्या कार्पण्यदोषामुळें, माझी नजर भ्रांतीनें संकुचित होऊन गरगर फिरणाऱ्या अलाताच्या[1] भ्रांतिकल्पित लतेप्रमाणें हा रत्नाचा प्रकाश मिथ्या दिसत आहे. भ्रमानें दोन चंद्र जसे दिसावेत त्याप्रमाणें मला हा चिंतामणि भ्रमानें दिसत आहे. माझें एवढें मोठें भाग्य कोठचें ! कीं ज्या भाग्यसंपत्तीमुळें इतक्यांतच मला सर्वसिद्धि देणारा श्रेष्ठ मणि प्राप्त होईल ! ज्यांना थोड्याच कालांत संपत्ति अभिमुख होतात असे महाभाग्यशाली महात्मे कांहीं थोडेच असतात. माझें तप अगदीं अल्प आहे. मी अगदीं दुर्बल मनुष्य आहें. तेव्हां अभाग्यांचें एक आश्रयस्थान अशा मला सिद्धि कशा मिळणार ! " असे विकल्प व संकल्प करून फार वेळ विचार करीतच बसलेल्या त्या अज्ञानें, अज्ञानानें मोहित होऊन तो मणि उचलून घेण्याचा यत्न केला नाहीं. ज्याला जेव्हां एकादें कांहीं मिळावयाचें नसतें, तेव्हां तें कांहीं झालें तरी मिळतच नाहीं. याप्रमाणें प्राप्त झालेलाही चिंतामणि त्यानें दुर्बुद्धीनें अनादरानें टाकला. तेव्हां हा मूढ आपला अव्हेर करून स्थित आहे, असें पाहून तो मणिही उड्डान करून कोठें निघून गेला. फेंकलेला बाण जसा गुणाला सोडून जातो, त्याप्रमाणें सिद्धि अवमान करणाराला टाकून जातात. 'अहो पण तो व्यवहारांत मोठा कुशल होता, असें तुम्हींच त्याचें प्रथम वर्णन केलें होतें' म्हणून म्हणशील तर तें खरें आहे; परंतु सिद्धि आल्या असतां पुरुषाला त्या प्राज्ञपद देतात. पण त्यांना जो सहन करूं शकत नाहीं किंवा त्यांची उपेक्षा करतो त्याच्यापासून त्या निघून जातात; आणि त्या जात असतांना त्या पुरुषाचें पूर्वीं असलेलें शहाणपणही घेऊन जातात. असो. त्या पुरुषानें पुनः चिंतामणीला साध्य करून घेण्यासाठीं क्रियारूप यत्न चालविला. निश्चयी लोक आपल्या कार्याविषयीं कधीं उद्विग्न होत नाहींत. खरा चिंतामणी सोडून पुनः चिंतामणीसाठीं तप करणाऱ्या त्याला हंसणाऱ्या थट्टेखोर सिद्धांनीं, त्याच्या दृष्टी न पडतां, एक चकचकीत कांचेचा तुकडा त्याच्या पुढें ठेवला. त्याला त्यानें पाहिलें. त्या मूढानें हा चिंतामणि आहे, असें मानून तो ग्राह्य आहे, असा निश्चय केला. अज्ञ पुरुष मोहानें मातीला सोनें समजतो, हें प्रसिद्ध आहे. मनुष्याच्या चित्तांतील मोह संख्येविषयींच्या भ्रमामुळें आठालाही सहा बनवितो, शत्रूला मित्र करतो, रज्जूला सर्प समजतो, स्थलाच्या जागीं जलाचा भास करवितो, एका चंद्राचे दोन चंद्र करतो, व अमृताला विष मानतो. त्या खोट्या तुच्छ मण्याला घेऊन 'या चिंतामणीपासून मला सर्व कांहीं प्राप्त होईल, आतां या तुच्छ धनांना घेऊन काय करावयाचें आहे ?' असें म्हणून त्यानें पूर्वींची आपली सर्व संपत्ति टाकली. 'हा देश अगदीं सुखरहित आहे, स्निग्धजनशून्य आहे, पापी लोकांनीं भरलेला आहे, हें जीर्ण अरण्य मला काय करावयाचें आहे ! माझे बंधु कोण आहेत ! कोणी नाहींत. आतां मी

---

१ अलात म्ह० कोलीत जळणारी उदकाडी रात्रीं जोरानें हालविल्यास भ्रमानें लाल रेघ, वर्तुळ इत्यादि आकार दिसतात; हें प्रसिद्ध आहे. मांडूक्योपनिषद्भाष्यार्थ अलातशांतिप्रकरण पृ. २७५ पहा.)

दूर जाऊन या संपत्तीनें आपल्या इच्छेप्रमाणें सुखानें राहतों,' असें म्हणून व माणि घेऊन तो मूढ शून्य अरण्यांत गेला. तेथें त्या कांचेच्या तुकड्यामुळें त्याला ऐश्वर्याबद्दल मरण प्राप्त झालें. अर्थात् मूर्खत्व हाच पराकाष्ठेचा दुःखहेतु आहे. कारण मूर्खपणाच्या प्रभावानें जीं दुःखें प्राप्त होतात तीं, सर्वस्वनाशरूप आपत्तीपासून, जरेपासून किंवा मरणामुळेंही उद्भवत नाहींत. तत्त्वदर्शनानें अज्ञानाचा नाश झाला असतां हजारों आपत्ति जरी कोसळल्या तरी ज्ञानी पुरुषाला दुःख होत नाहीं व अज्ञ पुरुष सोन्याच्या पर्यंकावर जरी निजला असला तरी त्याला हजारों दुःखें होतात. असें दिसतें. यास्तव सर्व जनांच्या डोक्यावर काळ्या केंसांचें जाळें जसें असतें त्याप्रमाणें सर्व आपत्तींच्या डोक्यावर एक अज्ञान राहतें. अज्ञान हीच श्रेष्ठ आपत्ति आहे. ८८.

## सर्ग ८९ वा.

—:०:—

१ बद्ध विंध्य--गजेंद्रानें यत्नानें बंधन तोडलें, शत्रूला मारलें नाहीं, त्यामुळें तो खड्ड्यांत पडला असें वर्णन.

चूडालाः—हे राजा! आतां हा दुसरा रम्य विचार ऐक. तो तुझ्या वृत्तान्तासारखाच आहे; त्यापासून बुद्धीला श्रेष्ठ बोध होतो. विंध्यवनांत एक फार मोठा यूथपांचा यूथप —हत्ती होता. दीर्घकाल आज्ञेचें परिपालन केल्यामुळें प्रसन्न झालेल्या अगस्त्याच्या अनुग्रहबुद्धीनें जणुं काय तो विन्ध्यच आपल्या पूर्वीच्या उन्नत-रूपानें प्रकट झाला होता. त्याचे फार लांब व शुभ्र असे दोन दांत होते. ते वज्राच्या ज्वालेप्रमाणें असह्य होते, कल्पाग्नीच्या ज्वालेसारखे व सुमेरूचें उन्मूलन करण्यासही समर्थ असे होते. त्याला एका हस्तिपानें लोखंडी जाळ्यानें सर्व बाजूंनीं बांधलें. अगस्त्यानें जसें विंध्याद्रीला किंवा उपेंद्रानें बळीला बांधावें तसें त्यानें त्यास बांधलें. शंकराच्या शरापासून उत्पन्न झालेल्या अपूर्व अग्नींत जळणाऱ्या त्रिपुराला जी व्यथा झाली तीच व्यथा शस्त्रानें गंडस्थळीं प्रहार केला गेलेल्या त्या हत्तीला झाली व तो सर्वथा प्रतिबद्ध झाला. त्याचा शत्रु जो हस्तिपक तो दूर लपून राहिल्यामुळें त्याला दिसला नाहीं. त्या लोखंडी सांपळ्यांत त्यानें तीन दिवस घालविले. त्याला त्यामुळें फार खेद झाला. त्यानें त्या पिंजऱ्यांतून सुटण्याचा मोठा यत्न केला. तो आपल्या मुखाच्या आघातांनीं क्षुद्र घंटांच्या ध्वनीसारखा ध्वनि करूं लागला. त्यानें दोन मुहूर्तांनीं मोठ्या यत्नानें आपल्या त्या दोन दांतांनीं, बलि स्वर्गाची अर्गला जशी तोडतो त्याप्रमाणें तें शृंखलाजाल तोडलें. त्याच्या शत्रूनें म्ह० हस्तिपकानें, त्यानें केलेला तो निगडच्छेद दुरून पाहिला. बलीनें केलेला स्वर्गाचा विध्वंस मेरुतळावरून हरीनें जसा पाहिला तसाच त्यानें त्या गजाचा निगडच्छेद अवलोकन केला, आणि ज्यानें पाश तोडून टाकला आहे अशा त्या हत्तीच्या डोक्यावर तो हस्तिपक ताडवृक्षावर चढून तेथून उडी मारता झाला. ज्याप्रमाणें बलीच्या यज्ञांत तीन पावलें भूमीचें दान घेऊन पहिल्या पावलानें भूमीचें व दुसऱ्या पावलानें स्वर्गाचें आक्रमण करणारा हरि तिसऱ्या पावलाच्या पूर्तीकरितां मेरूपासून बलीच्या मस्तकावर पडला, त्याप्रमाणें तो महात हत्तीच्या डोक्यावर पडला. पण दुर्दैवानें तो आपल्या पादकमलांनीं हत्तीच्या मस्तकास पोंचला नाहीं. तर पाय चुकून, वाऱ्यानें हाललेलें पक्क फळ जसें भूमीवर पडावें, तसा तो आकुळ होऊन पृथ्वीवर पडला. तो आपल्यापुढें पडला आहे, असें पाहून त्या महागजाला त्याची करुणा आली. तिर्यक् जातींतही श्रेष्ठ

गुणांनीं विकास पावणारे संत असतात. ' माझ्या समोर पडलेल्या या माझ्या शत्रूला जरी मीं मारलें तरी त्यांत माझें पौरुष तें काय ? ' असा विचार करणाऱ्या त्या हत्तीनें त्या शत्रूला मारलें नाहीं. विस्तीर्ण सेतूला फोडून पाण्याचा मोठा ओघ जसा निघून जातो त्याप्रमाणें केवळ त्या निगडव्यूहाचें विदारण करून तो गेला. आकाशांत सूर्य मेघसंघाताचें विदारण करून जसा जातो त्याप्रमाणें तो हत्ती दयेचा आश्रय करून व तें लोखंडी जाळ तोडून गेला. याप्रमाणें तो गज गेला असतां ज्याचा देह व बुद्धि स्वस्थ आहे असा हस्तिप उठून उभा राहिला. त्या हत्तीबरोबरच त्याची व्यथा अगदीं दूर गेली. अतिशय उंच व चंचल तालवृक्षावरून जरी तो पडला होता, तरी त्याचे हातपाय वगैरे अवयव तुटले नाहींत. कारण दुरात्म्यांचे देह दुर्भेद्य असतात, असें मला वाटतें. पावसाळ्यांत अभ्र जसें वाढतें तसें कुकार्यांमध्यें असतांचें बळ वाढतें. तेव्हां तो पायांनीं चालण्याविषयीं अधिकच उत्साही झाला. हत्ती ज्याचा शत्रु झाला आहे, आणि ज्याचे दोन्ही उपाय असिद्ध झाल्यामुळें तो निघून गेला आहे, अशा त्या हत्तिपाला अतिशय वाईट वाटलें. निधान एकाद्या निर्धनाजवळ येऊन जसें गुप्त व्हावें, तसें त्याला वाटलें. मेघांनीं आच्छादित केलेल्या चंद्राला खाण्यासाठीं राहु जसा आकाशांत हुडकून काढतो, त्याप्रमाणें झाडीच्या आड गेल्यामुळें दिसेनाशा झालेल्या त्या गजाला त्यानें मोठ्या यत्नानें शोधून काढलें. पुष्कळ वेळ शोध केल्यावर त्याला तो गज, समरांतून निघून झाडाखालीं विश्रांति घेत बसलेल्या वीराप्रमाणें दुसऱ्या एका अरण्यांत स्थित असलेला दिसला. नंतर जेथें तो हत्ती बसला होता तेथें, त्याच्याजवळच, त्याला बांधण्यास समर्थ असें एक खातवलय— खंदक, त्याच्या सभोंवार ज्यांत गजाविषयीं आसक्त असलेल्या लोकांचें आधिक्य आहे अशा रागप्रमुख श्रेष्ठ सामग्रीनें केला. भूमीला जसें स्रष्ट्यानें निर्मिलेलें समुद्राचें वेष्टन आहे, त्याप्रमाणें अरण्यांत त्याच्या सभोंवार त्या हस्तिपानें मोठा खंदक केला. शरत्काल तंतुजालासारख्या शुभ्र मेघपटलानें आकाशाला जसा झांकून टाकतो, त्याप्रमाणें त्या शठानें त्या खंदकास वाळलतासमूहानें आच्छादित केलें. नंतर कांहीं दिवसांनीं त्या वनांत विहार करणारा तो हत्ती, शुष्क सागरांत जसा पर्वत तसा, त्या खळ्यांत पडला. खोल खंदकासारख्या शुष्क सागरांतून नेहमीं संचार करणाराही तो हत्ती पाताळतलाप्रमाणें भयंकर असलेल्या त्या वर्तुळाकार कूपांत पडल्यामुळें तो खंदक जणूं काय गजरूपी रत्नाचा करंडा बनला. असो; याप्रमाणें त्या हस्तिपकानें त्या गजाला पुनः दृढ बद्ध केलें. त्यामुळें तो बळीप्रमाणें त्या भूगृहांत अद्यापि मोठ्या दुःखानें राहिला आहे. त्या हत्तीनें अनायासानें आपल्यापुढें पडलेल्या त्या शत्रूला जर पूर्वींच मारलें असतें तर त्याला त्या खळ्यांत अडकून पडल्यामुळें पुढें झालेलें दुःख भोगावें लागलें नसतें. तात्पर्य, जो पुरुष अज्ञानानें पुढील काळाचें वर्तमानक्रियाक्रमांनीं शोधन करीत नाहीं, त्याला या विंध्यगजाप्रमाणें दुःख होतें. मी शृंखलानिगडापासून मुक्त झालों आहें असें समजून हत्ती संतुष्ट झाला आणि तो जरी दूर जाऊन बसला होता तरी पुनः बंधांत पडला. अर्थात् अज्ञान कोठें गेलें तरी पीडा देतेंच. म्हणून त्याची निवृत्ति करणें हाच पुरुषार्थ असून अद्वितीय आत्मज्ञानानेंच त्याची निवृत्ति होत असल्यामुळें तें ज्ञानच मोठ्या यत्नानें संपादन करावें. हे महात्मन् ! सदा बंधनशून्य असलेला आत्मा

स्वतः बद्ध आहे, असें जें चित्तांतील मौर्ख्य—अज्ञान तेंच श्रेष्ठ बंधन आहे. यास्तव त्यांतून मुक्त होण्यासाठीं समस्त त्रिजगत् आत्म्यापासूनच उदय पावलें आहे, तें आत्ममय आहे, असें तूं जाण. तसल्या ज्ञानाच्या अभावीं अज्ञानांत स्थित असलेल्या पुरुषाच्या सर्व दुःखबीजांचें स्थान आत्माच आहे.

## सर्ग ९० वा.

१ कुंभरूपिणी चूडाला मणि व काच यांच्या शुभ आख्यानांचें तात्पर्य राजाला सविस्तर सांगते.

शिखिध्वजः—हे देवपुत्रा! मण्याचा साधक व विंध्यगजाचें बंधन इत्यादि कथाजालांवरून जें तात्पर्य सूचित होतें तें मला पुनः प्रकट करून सांग.

चूडालाः—मी वाक्यार्थदृष्टीच्या निष्पत्तीनें हृदयगृहांत चित्तरूप भूमीवर विचित्र कथारूपी चित्र व्यक्त करून दाखवितों, तें तूं पहा. एकाद्या चित्राच्या बाह्य रेखा जशा अगोदर काढाव्या त्याप्रमाणें मीं सामान्यतः सांगितलेल्या कथांचें स्वरूप विचित्र व्याख्यारूपानें अधिक व्यक्त करतों, तें ऐक. हा जो शास्त्रार्थामध्यें कुशल पण तत्त्वज्ञानामध्यें अपंडित असलेला रत्नसाधक मीं सांगितला तो हे राजा! तूंच आहेस. तूं शास्त्रामध्यें तज्ज्ञ आहेस, पण पाण्यांत जसा दगड मिळून जात नाहीं त्याप्रमाणें तूं तत्त्वज्ञानांत विश्रांति पावलेला नाहींस. हे साधो! अकृत्रिम सर्वत्याग हाच चिंतामणि आहे, असें तूं समज. ज्याची बुद्धि शुद्ध आहे असा तूं तो सर्व दुःखांचा अन्त साधीत आहेस. हे निष्पापा! शुद्ध सर्वत्यागानें सर्व प्राप्त होतें. आत्यंतिक पूर्णकामिता हाच सर्वत्याग आहे. चिंतामणीपासून आणखी अधिक तें काय होणार? हे साधो! सर्वत्यागाला सिद्ध करण्याविषयीं यत्न करणाऱ्या तुझा—हिरण्यगर्भपदापर्यंत जगत्प्रसिद्ध ऐश्वर्यपरंपरेला ज्यानें तुच्छ केलें आहे असा विद्यालक्षण स्वात्मोदय ज्याच्यापासून झाला आहे असा—सर्वपरित्याग सिद्ध झाला आहे. आपल्या रात्रीचा प्रारंभ होतांच ब्रह्मदेव सर्व जगत्सर्गाचा व्यापार जसा सोडतो, त्याप्रमाणें तूं स्त्री-धन-बांधव यांसह सर्व राज्याचा त्याग केला आहेस. आपल्या देशापासून अति दूर असलेल्या या स्थानीं तूं आला आहेस. गरुड कच्छप, गज व न्यग्रोधवृक्षाच्या दोन शाखा यांसह विश्रांतीसाठीं भूमीच्या अन्तास जसा प्राप्त झाला त्याप्रमाणेंच तूं या पवित्र आश्रमास प्राप्त झाला आहेस. अभ्र, धुकें इत्यादि सर्व कलंक ज्यानें उडवून दिले आहेत असा शरत्कालचा वायु आकाशांत आपली सत्ता जशी उरवितो त्याप्रमाणें तूं सर्वसंगत्याग करून केवळ अभिमानरूप अविद्या बाकी ठेविली आहेस. केवल मनाचा हृदयापासून त्याग केला असतां जगत् पूर्णत्वास प्राप्त होतें. कारण अहंकाराचा त्याग केल्यावर अवशिष्ट राहिलेला पूर्णानन्दात्मा परम पुरुषार्थ स्वतःच हृदयामध्यें साक्षात् स्फुरतो. म्हणून सर्वत्याग हाच मोक्ष व तोच चिंतामणि होय. तो तुला अनायासानें प्राप्त झालेला आहे. पण 'मी सर्वत्याग करणारा आहें' हा तुझा अभिमान अद्यापि सुटलेला नाहीं. त्यामुळें आकाश जसें अभ्रांनीं आच्छादित होतें त्याप्रमाणें तूं त्याग, अत्याग इत्यादि विकल्पांनीं आच्छादित झाला आहेस. सर्वत्याग तुला प्राप्त झाला असून केवळ विकल्पानें तुझा त्याच्यावर विश्वास बसला नाहीं, व हा महोत्कर्षरूप परमानन्दात्मक सर्वत्याग नव्हे, तर तो फार मोठा असून पुष्कळ दिवसांनीं साध्य होणारा दुसराच कोणी आहे, असें तुला वाटलें; आणि अशा चिंतेनें तुझा संकल्प अति-

प्राप्य वाढला असतां तुझा तो त्याग वावटळीनें वनांतील तृणादिक जसें उडून जातें त्याप्रमाणें तुझ्यापासून उडून दूर गेला. जो चिंतेचा थोडासाही स्वीकार करतो त्याला त्यागित्व कोठचें ? वाऱ्याच्या स्पंदानें युक्त असलेल्या वृक्षाला निश्चलत्व कोठचें ! चिंतेलाच चित्त असें म्हणतात. संकल्प हें त्याचेंच दुसरें नांव आहे. ती चिंता जोंवर स्फुरण पावत आहे तोंवर चिंत्य विषयाचा त्याग कसा होणार ! चित्ताचा त्याग हाच मुख्य सर्वत्याग आहे. पण त्रिभुवनाविषयींची चिंता चित्ताला भरून जोंवर बसली आहे तोंवर निर्लेप सर्वत्याग कसा प्राप्त होणार ! मोठा आवाज ऐकतांच कपोतादि ग्रामपक्षी जसा उडून जातो त्याप्रमाणें संकल्पग्रहणानें तुझ्या मनांतील त्याग उडून गेला. चिंताराहित्य हें सर्वत्यागाचें फळ आहे. पण तुझ्या अहंकारामुळें तुला सोडून जाणाऱ्या त्यागानें आपल्या बरोबर त्या सर्वश्रेष्ठ चिंताराहित्याला नेलें आहे. आमंत्रण न करितां आलेल्या पूज्याची पूजा न केल्यास कसा अनर्थ ओढवतो, तें दक्षयज्ञादि प्रसंगीं प्रसिद्ध आहे. मग एकाद्या पूज्याला आमंत्रण करून जर त्याचा अनादर केला तर तो दुःख नाहीं का देणार ? हे कमलनयना ! याप्रमाणें सर्वत्यागरूप चिंतामणि निघून गेला असतां तुला संकल्पचक्षूनें तपोरूप काचमणि दिसला. जशी चंद्राच्या प्रतिबिंबामध्यें, हा चंद्रच आहे अशी दृष्टि ठेवावी, त्याप्रमाणें तूं दृष्टिभ्रमामुळें उदय पावलेल्या त्या दुःखरूप तपामध्यें ‘ हें ग्राह्य आहे ’ अशीच एक भावना दृढ केलीस. पूर्वी वासनाशून्य अशा अनासक्तीनें सर्वत्यागाचा आरंभ करून तूं मागाहून अनंत वासनायुक्त तपःक्रिया स्वीकारलीस ! पण ती आदि, अंत व मध्य या तिन्ही काळीं विषम आहे. त्यामुळें ती दुःखालाच कारण होते. जो सुसाध्य अमितानन्दाला सोडून दुःसाध्य परिच्छिन्न वस्तूमध्यें प्रवृत्त होतो, तो शठ आत्मघातकी म्हणून म्हटलेला आहे. सर्वत्यागाचा आरंभ करून वर सांगितल्याप्रमाणें वनगृहांत दुःखदायक तप व अज्ञान यांनीं बद्ध होऊन तूं तो साधला नाहींस. हे साधो ! विस्तार पावलेल्या दुःखांनीं भरलेल्या राज्यबंधापासून निघून वनवाससंज्ञक दृष्ट बंधनांनीं तूं बद्ध झाला आहेस. पूर्वी वनवासाचा ज्यांनीं अनुभव घेतलेला नाहीं अशा सुकुमारांचा वनवास अधिक दुःखदायी आहे, असें मी समजतों. कारण तुला येथें शीत, वात व आतप यांमुळें दुप्पट चिंता लागली आहे. तपःक्रिया हा चिंतामणिच मला प्राप्त झाला आहे, असें तूं वृथा समजला आहेस. पण हे साधो ! तुला स्फटिकाचा तुकडाही लाधलेला नाहीं. हे कमलनेत्रा ! मीं याप्रमाणें तुझेंच चरित्र चिंतामणीविषयींच्या प्रयत्नकथेसारखें आहे, हें चांगल्या प्रकारें प्रकट केलें आहे. यास्तव आतां तूं त्यांतील निर्मल बोध्य अर्थ स्वतःच जाणून व तोच आपल्या चित्तकोशांत दृढ करून त्याला फलप्राप्तिपर्यंत परिपक्व कर.

---

## सर्ग ९१ वा.

१ आतां विंध्यगजाच्या वृत्तान्ताचें रहस्य कुंभ राजाला सांगतो.

चूडाला:—हे राजश्रेष्ठा ! आतां तत्त्वाचा यथार्थ बोध होण्यासाठीं विंध्यगजाच्या वृत्तान्ताचें आश्चर्यकारक विवरण ऐक. तो जो विंध्यवनांतील हत्ती तोच या भूतलावरील तूं आहेस. तुझें वैराग्य व विवेक हेच ते त्याचे दोन शुभ्र दांत आहेत. तो जो हत्तींना पकडण्याच्या कामांत तत्पर असलेला हास्तिप तेथें होता, तेंच तुझें आक्रमण करण्यास तत्पर असलेलें व

तुला दुःख देणारें अज्ञान आहे. हे राजा! तूं अतिशय शक्तिमान् आहेस, तथापि हस्तिपकाकडून जसा हत्ती, तसा तूं या अशक्त अज्ञानाकडून दुःखापासून दुःखास व भयापासून भयास पोंचविला जात आहेस. लोखंडी वज्रासारख्या दृढ निगडानें तो हत्ती सर्व बाजूंनीं बांधला गेला, असें जें म्हटलें आहे, त्याचा अर्थ तूं आशापाशजालानें राज्यकालीं नखशिखान्त बांधला गेला होतास, हा आहे. कारण लोखंडी सांखळदंडाहून आशा अतिशय कठिण, मोठीच मजबूत आहे. लोखंड कांहीं काळानें घांसून घांसून झिजून जातें, पण आशा उत्तरोत्तर वाढते. गजाचा शत्रु हस्तिपक दूर लपून राहून त्याला पहात होता. तसेंच एकच अज्ञान क्रीडेसाठीं बांधलेल्या तुला पहात आहे. गजानें शत्रूचें शृंखलाजालबंधन तोडलें, म्हणून जें म्हटलें आहे, त्याचा अर्थ तूं भोगाची भूमि असें जें निष्कंटक राज्य, त्याला सोडलेंस, हा आहे. हे साधो! शत्रुशृंखलाजालाचें बंधन तोडणें एकादे वेळीं सुकर असतें, पण मनापासून भोगाशेचें निवारण करणें सुकर नाहीं. हत्तीनें बंधन तोडलेलें पाहून हस्तिपक तालवृक्षावरून उडी मारीत असतांना पाय चुकून हत्तीच्या पुढें पडला, असें जें म्हटलें आहे, त्याचा अर्थ तूं त्या राज्याचा त्याग जेव्हां केलास तेव्हां अज्ञानाला सपशेल पाडिलेंस, असा आहे. जेव्हां विरक्त पुरुष भोगाशेचा त्याग करण्याची इच्छा करतो, तेव्हां वृक्षाला तोडूं लागलें असतां त्यावरील पिशाच जसें कांपतें, तसें अज्ञान अतिशय कांपूं लागतें. जेव्हां विवेकी पुरुष भोगांचा त्याग करून बसतो, तेव्हां वृक्षाला तोडलें असतां पिशाच जसें पळून जातें, त्याप्रमाणें अज्ञान पलायन करतें. वृक्षाला करवतानें तोडलें असतां त्यावरील पक्ष्यांचें घरटें जसें पडतें, त्याप्रमाणें भोगांचा समुदाय निश्चयानें नष्ट झाला असतां अज्ञानसंस्थिति पडते. जेव्हां तूं वनांत जावयास निघालास, तेव्हां तूं अज्ञानाला तोडलेंस. तें तुझ्यापुढें पडलें होतें, पण निर्मनस्कतारूप महाखड्गानें तूं त्याचा नाश केला नाहींस. त्यामुळें तो तुझा शत्रु पुनः उठला व आतां त्या पहिल्या सर्वत्यागरूप पराभवाला आठवून त्यानें तुला या तपःप्रपंचरूप गहन खातांत पाडलें आहे. जेव्हां तूं राज्याचा त्याग केलास, तेव्हांच तूं निर्जीव झालेल्या त्या अज्ञानशत्रूला जर मारलें असतेंस, तर क्षय पावलेल्या त्यानें तुला असें या संकटांत पाडलें नसतें. हत्तीच्या त्या वैऱ्यानें जें खंदकाचें वर्तुळ केलें, तेंच अज्ञानानें तुला अर्पण केलेलें सर्व तपोदुःख आहे. हे श्रेष्ठ राजा! त्या गजारीची राजानें दिलेली जी खातसामग्री वरील गोष्टींत सांगितली आहे, ती विचाराचा अनादर हीच हस्तिपकराजाची अंतरंग ऐश्वर्यभूत चिंता होय. हे साधो! तूं वस्तुतः अगम असूनही हा या दीर्घवनांत गजेंद्रसा झाला आहेस व या अज्ञानरूप वैऱ्यानें तुला या सभोंवार असलेल्या खातांत वेगानें फेकलें आहे. बालतांनीं तें खातवलय वरून आच्छादित केलें होतें, असें जें म्हटलें आहे, त्याचा अर्थ तें तपोदुःख शांति, क्षांति इत्यादि गुणांनीं व साधुजनसमागमांनीं किंचित् आच्छादित झालेलें आहे. हे राजा! याप्रमाणें, पाताळांत जसा बलि त्याप्रमाणें तूं अद्यापि या दुःखकर अतिदारुण तपःखातांत स्थित आहेस. तात्पर्य, तूंच गज, आशा हा लोखंडी सांपळा, मोह हा तुझा वैरी, उग्र तपाविषयींचा जो आग्रह तोच मोठा वर्तुळ खंदक, भूतल हाच विंध्य, अशा रीतीनें हा तुझा वृत्तांतच सांगितला आहे. असें हें तत्त्व जाणून या तपोरूप

खातांतून वर नीच; आणि त्या शत्रूच्या नाशासाठीं तुला जें करावेंसें वाटेल तें कर. ९१.

## सर्ग ९२ वा.

१ कुंभवचन ऐकून सर्वत्याग करावयास सज्ज झालेला राजा वनादिकांचा त्याग करून आपलें पात्रादि सर्व जाळतो.

चूडालाः—राजा ! तुझ्या ज्ञातज्ञेय नयशालिनी चूडालेनें जें पूर्वीं तुला सांगितलें तें ज्ञान तूं कां स्वीकारलें नाहींस ? ती तत्त्ववेत्यांमध्यें मुख्य असून जें जें बोलते व करते, तें सर्व हे राजा ! सत्यच आहे. त्याचें आदरानें अनुष्ठान करणेंच तुला योग्य होतें. बरें, तिचें वचन तूं ऐकलें नाहींस तर नाहीं; पण आपल्या बुद्धीनें तरी तूं सर्वपरित्याग चांगला करावयाचा होतास कीं नाहीं ? तो असा अर्धवट कां केलास ?

शिखिध्वजः—मीं राज्य सोडलें, घर सोडलें, तो तसला श्रीमान् देश टाकला, सुंदर स्त्रीचा त्याग केला, व पुन: त्यांतील कशाचाही स्वीकार केला नाहीं; तेव्हां मीं सर्वत्याग केला नाहीं, असें तूं कसें ह्मणतोस ?

चूडालाः—धन, पत्नी, गृह, राज्य, भूमि, छत्र, बांधव, इत्यादि सर्व, हे राजन् ! तुझें नव्हेच. तेव्हां तुझा सर्वत्याग तो कोणता ? या सर्वांहून अत्यंत श्रेष्ठ असा भाग तूं अद्यापि सोडलेला नाहींस. त्याचा जेव्हां निःशेष त्याग करशील तेव्हां शोकराहित्यास प्राप्त होशील.

शिखिध्वजः—राज्य हें जर माझें सर्वस्व नसेल तर वन हेंच माझें सर्व आहे. यास्तव शैल-वृक्ष-गुल्म इत्यादिकांनीं युक्त असलेलें हें वनही मी सोडतों.

श्रीवसिष्ठः—हे रामा ! असें ह्मणतच कुंभाच्या वाक्यानें प्रेरित झालेला तो जितेंद्रिय वीर शिखिध्वज एका निमेषांत अतिदृढ निश्चय करून, वर्षाप्रवाह तटावरील धुळीच्या प्रवाहास स्वतःच जसा धुवून टाकतो, त्याप्रमाणें वनांतील त्या सर्व संपत्तीस सोडता झाला.

शिखिध्वजः—वृक्ष, पर्वत, वन, श्वभ्र—छिद्र, अरण्य या सर्वांपासून मी खरोखर सर्व वासना सर्वथा सोडली आहे. अर्थात माझा सर्वत्याग स्थित झाला आहे.

कुंभः—पर्वताचा तट, वन, श्वभ्र, जळ, वृक्ष, स्थल, इत्यादिकांतील कांहींच तुझें नाहीं. मग त्यांना सोडल्यानें तुझा सर्वत्याग कसा सिद्ध होणार ? तूं न सोडलेला असा सर्वांहून उत्तम भाग आहेच. त्याला निःशेष सोडून तूं अत्यंत अशोकत्वास प्राप्त होशील.

शिखिध्वजः—हें जर माझें सर्व नसेल तर माझा स्वाश्रम हें सर्व माझें आहे. यास्तव वापी, स्थल, पर्णशाला यांसह त्या स्वाश्रमालाही मी सत्वर सोडतों.

श्रीवसिष्ठः—हे रामा ! असें बोलत कुंभाच्या वाक्यानें प्रेरित झालेला तो वशी वीर शिखिध्वज, एक निमिषभर ध्यान करूनच शुद्ध संविदेनें, वायु धूलिपंक्तीला केवल स्फुरणानेंच जसा उडावितो त्याप्रमाणें, हृदयांत स्फुरण पावणाऱ्या त्या आश्रमाविषयींच्या आस्थेला सर्वथा सोडता झाला.

शिखिध्वजः—वृक्ष, पर्णशाला, लता इत्यादिकांसहवर्तमान या स्वाश्रमापासूनही मीं आपली वासना टाकलेली आहे. त्यामुळें खरोखर माझा सर्वत्याग सिद्ध झाला आहे.

कुंभः—राजन् ! वृक्ष, वापी, स्थल, पर्णशाला, तृणादिकांचे झुबके, वेलींचें कुंपण इत्यादिकांतील तुझें कांहीं नाहीं, तेव्हां त्याला सोडल्यानें तुझा सर्वत्याग कसा सिद्ध होणार ? यांहून निराळा आणखीही उत्तम भाग अद्यापि तूं न सोडलेला असा आहे. त्याला निःशेष

सोडल्यावर तूं अशोकत्वास प्राप्त होशील.

शिखिध्वजः—हें जर माझें सर्व नसेल तर हीं पात्रें वगैरे, हें अजिन, ह्या भिंती, ही अल्पकुटी इत्यादि हें सर्व माझें आहे. त्याचा मी त्याग करतों.

श्रीवसिष्ठः—असें बोलून, एखाद्या पर्वतशिखरावरून शरत्कालचा मेघ जसा उठतो त्याप्रमाणें तो अक्षुब्धचित्त शमसंपन्न शुद्धात्मा आपल्या आसनावरून उठला. पण त्याची ती सर्व चेष्टा किंचित् हंसत पाहणारा कुंभ स्वतः, सूर्य सर्व लोकांचा विविध व्यवहार चालला असतांना जसा आपल्या रथावरच स्थिर बसलेला असतो, त्याप्रमाणें आपल्या आसनावरच आश्चर्यानें त्याच्या क्रिया पहातच बसला. "हा जें जें करीत आहे. तें तें याला खुशाल करूं दे. कारण याला हें सर्व परम पावन करणारें आहे." असें मनांत आणून मुकाट्यानें बसलेला कुंभ शिखिध्वजाला पाहत राहिला. समुद्राच्या उदरांतील सखल भूमि उंच भूमीवरील नद्यादिकांचें पाणी जशी एकत्र आणते, त्याप्रमाणें शिखिध्वजानें तें सर्व पात्रादि उपकरणजात आश्रमांतून एकत्र जमविलें आणि किरणांच्या योगानें सूर्यकांतमण्यांत आलेला सूर्य सूर्यकांतमण्यांतील अग्नीला जसा प्रज्वलित करतो, त्याप्रमाणें त्यानें शुष्क काष्ठांनीं अग्नि पेटविला; आणि तें पात्रादि उपकरणजात त्या अग्नींत टाकून राजा आसनावर बसला. एक मन्वंतर संपून दुसरें मन्वंतर लागेपर्यंतचा जो प्रलय काल त्याला ध्वंसिका म्हणतात. त्या मन्वंतरसंधिकालीं सूर्य आपल्या किरणांनीं प्रदीप्त केलेल्या अग्नींत सर्व जगाचें हवन करून स्वतः मेरुशृंगावर जसा बसतो, त्याप्रमाणें राजा आसनावर बसला. नंतर अक्षमाला अग्नींत टाकण्याची इच्छा करणारा तो तिला म्हणतो—"हे स्वामिभक्ते! परिक्लेशामुळें ज्याच्या स्वार्थसाधनबुद्धीचा भेद—उच्छेद झालेला नाहीं, अशा मीं तुला इतके दिवस वारंवार फिरवून जे श्रम दिले, त्यांच्या योगानें तूं माझी जितकी सेवा केली आहेस तितकीच ती पुरे झाली. आतां तप, जप, इत्यादि अवश्य केलें पाहिजे, ही भ्रांति निघून गेली असतां तूं आतां माझ्या उपयोगाची राहिली नाहींस. यास्तव मीही तुला आतां श्रम देत नाहीं. तुझ्याबरोबरच मीहि जपभ्रमानें नानाप्रकारच्या मंत्ररूप अरण्यांत कर्मानें साध्य होणाऱ्या ज्या क्षुद्रसिद्धि त्यांच्या मार्गांतून परिभ्रमण केलें. तपोवन, सिद्धिक्षेत्र इत्यादि धर्मस्थानें पाहिलीं. हे सखि! आतां तुझ्याबरोबरच मीही विश्रांति घेतों." असें बोलून शिखिध्वजानें अक्षमालेला अग्नींत टाकलें. जसा वायु कल्पान्ताग्नींत आकाशांतून निर्मल नक्षत्रमालेला फेंकतो, त्याप्रमाणें राजानें आपल्या हातांतील स्फटिकांची माळ त्या अग्नींत टाकली. "हे अजिना! मीं नरमृगानें, वनमृगापासून वियुक्त झालेल्या तुला अज्ञानामुळें दीर्घकाल दर्भासनावर धारण केलें. हाच तुझा मोठा उपकार आहे. आतां तूं मूलकारण मायास्वभावाला प्राप्त हो. तुझे अवांतर कारणांत प्रविलय होण्याचे जे मार्ग ते शुभ असोत. तुझ्यावर पांढरे ठिपके आहेत, त्यामुळें तूं नक्षत्रयुक्त आकाशासारखें दिसतेस. यास्तव आतां अग्नीच्या योगानें तूं आकाशत्वास प्राप्त हो." असें बोलून राजानें दर्भासनावरील अजिन हातांनीं ओढून काढून अग्नींत टाकलें. जसा प्रलयवायु पर्वतांना सागरापासून ओढून घेऊन दावाग्नींत फेंकतो, तसेंच त्यानें केलें. "हे साधो कमंडलो! अतिशय वर्तुलाकार ह्म० फार सद्वृत्त अशा तूं माझें पाणी आपल्यामध्यें धारण केलेंस. पण मी तुझ्यावर कांहींच प्रत्युपकार केला नाहीं. सौहृद, सौंदर्य, सौजन्य,

अत्यंत स्थैर्य व सर्व प्रकारचें साधुत्व या गुणांचें तूंच परम स्थान आहेस. ज्या अग्नीनें तूं आपल्या देहाचें चांगलें शोधन करून माझ्यापाशीं आला आहेस, त्याच अग्नीनें पुनः आपलें संशोधन करून तूं दुसऱ्या कोणाच्या उपयोगीं पड. हे मित्रा! तुझे मार्ग तुला सुखकर होवोत." असें बोलून राजानें आपला कमंडलु श्रोत्रियाला दिला. कारण आपलें जें उत्तम उपकरण असेल तें अग्नीला किंवा एकाद्या श्रेष्ठाला द्यावें, असा नियम आहे. "हे दर्भासना! मूर्खांची मति नेहमीं प्रच्छन्न पापांतच जशी पडते, तसें तूं नेहमीं माझ्या गुह्यप्रदेशींच पडतेस. यास्तव तुला मूर्खांच्या मतीप्रमाणें दाह-संताप हें फळ प्राप्त होणेंच उचित आहे. यास्तव तूं आतां जळून राख हो." असें बोलून व त्या अति मृदु आसनाला उचलून त्यानें भासुर अग्नींतच टाकलें. कारण त्याला यापुढें ब्रह्मचैतन्यांत विश्रांति घ्यावयाची होती, बाह्य दर्भासनावर नाहीं. नंतर तो कुंभाला म्हणाला—"हे साधो! जें त्याज्य असतें तें खरोखर अतिशय शीघ्रच टाकणें उचित आहे. त्याला उशीर लावणें योग्य नव्हे. कारण तीं उपकरणें असलीं म्हणजे संग्रहास योग्य अशा दुसऱ्या उपकरणांचाही विस्तार मनुष्य करतो, हें प्रसिद्ध आहे. यास्तव मी हें सर्व भांडजातही—सर्व पात्रादि उपकरणेंही सत्वर अग्नींत टाकतों. कारण सर्व दाह्य पात्रांना अग्नीनें एकाच वेळीं जर जाळलें तर मला सर्वत्याग केल्याचा संतोष होईल. हे साधो! मी हा जो सर्वत्याग करीत आहें, त्याविषयीं तूं खेद करूं नको. कारण व्यवहारांतही अयोग्य वस्तूचें धारण कोणी करीत नाहीं. सर्व क्रियारहित असलेल्या मला क्रियांचीं उपकरणें जवळ ठेवणें योग्य नव्हे" असें बोलणारा तो राजा वनवासाच्या विलासाला योग्य असें भोजनपात्रादि सर्व, प्रलयकाल सर्व जगाला प्रदीप्त कल्पान्ताग्नींत जसा एकाच वेळीं टाकतो, त्याप्रमाणें एकाच वेळीं झटकन् टाकता झाला. ९२.

१ यावरून राजानें तो कमंडलु कोणा श्रोत्रियापासून अग्नींत शुद्ध करून घेतला असें दिसतें.

## सर्ग ९३ वा.

१ सर्व उपकरणांचा त्याग करून देहाचा त्याग करण्याची इच्छा करणाऱ्या शिखिध्वजाचें निवारण करून कुंभ चित्तत्यागाचा बोध करतो.

श्रीवसिष्ठ—त्यानंतर तो राजा उठला, व त्यानें अज्ञ-मनानें वृथा संकल्पानें कल्पिलेलें तें शुष्क तृणमंदिर जाळलें. तेथें आणखी जें कांहीं दर्भकाष्ठें इत्यादि अवशिष्ट राहिलें होतें तेंही त्या अक्षुब्धचित्त मौनी शिखिध्वजानें क्रमानें समबुद्धीनें जाळून टाकलें. परळ, लोटकें इत्यादि जें न जळण्यासारखें होतें, तें त्यानें फेंकून दिलें व फोडून टाकलें. तात्पर्य, सर्व प्रकारचीं भांडीं, आपलें वस्त्र, अन्न खाण्याचें साधन, पानाचा द्रोण वगैरे, यांचा मोठ्या संतुष्ट चित्तानें त्याग केला. त्यामुळें तो त्याचा आश्रम वीरभद्राच्या बलानें उध्वस्त केलेल्या दक्षयज्ञाच्या आश्रमाप्रमाणें दृष्ट-नष्ट जनस्थिति झाला. म्हणजे ज्यांतील लोकस्थिति पूर्वीं दृष्ट आहे व मागाहून नष्ट झाली आहे, असा झाला. अग्नीनें जळूं लागलेल्या श्रेष्ठ नगरांतून अतिशय भ्यालेले जन जसे निघून जातात, त्याप्रमाणें त्या आश्रमांतून हरिणांचे कळप रवंथ करावयाचें टाकून निघून गेले. याप्रमाणें त्या शुष्क इंधनाबरोबर तें सर्व नानाप्रकारचें पात्रजात अग्नींत जळूं लागलें असतां ज्याचा केवळ देह अवशिष्ट राहिला आहे असा स्नेहरहित संतुष्टचित्त भूपति असें म्हणालाः—

शिखिध्वजः—या सर्व उपकरणांविषयींची

वासना—ममता टाकून मी आतां सर्वत्यागी होऊन राहिलों आहें. हे देवपुत्रा! खरोखर तूं मला फार दिवसांनी हा उत्तम बोध केलास. मी आतां निरुपाधिक व शुद्ध बनलों आहें. मी सुखानें उत्तम बोधवान् झालों आहें. 'हें माझें' असा संकल्प केल्यानेंच आपलेंसें होणारें जें हें उपकरण-जात त्यांत सार काय आहे? जितके जितके विविध हेतु सोडले जातात तितकें तितकें मन परम निर्वृतीस—शांतीस प्राप्त होतें. मी आतां शांत होत आहें, सर्व प्रकारें सुखी होत आहें. मला सुख झालें आहें, माझा सर्वप्रकारें उत्कर्ष होत आहे. नानाप्रकारचे बंधहेतु—विषय सर्वथा क्षय पावले आहेत. कारण मीं सर्वत्याग केला आहे. दिशा हेंच ज्याचें वस्त्र आहे, दिशा हेंच ज्याचें गृह आहे, जो दिशांसारखा बनला आहे, असा हा मी येथें या वेळीं स्थित आहें. हे देवपुत्रा! आतां महात्यागांतलि आणखी काय टाकावयाचें राहिलें आहे?

कुंभः—हे राजन् शिखिध्वजा! तूं सर्वाचा त्याग केलाच नाहींस. मीं सर्वत्याग केला आहे, असें मानून तूं उगीच परमानंदाचा अभिनय करूं नको. अद्यापि तूं न सोडलेला असा सर्वाहून उत्तम भाग आहें. त्याचा निःशेष त्याग केलास ह्मणजे तुला श्रेष्ठ अशो कता प्राप्त होईल.

श्रीवसिष्ठः—हे महाबाहो राजीवलोचना रामा! असें ऐकणाऱ्या त्या राजानें थोडासा विचार केला व असें ह्मटलें.

शिखिध्वजः—हे देवपुत्रा! इंद्रियरूपी सर्पाचा संघात व ज्याची आकृति रक्तमांसमय आहे असा हा देह सर्वांचा त्याग केल्यावर आतां अवशिष्ट राहिला आहे. यास्तव आतां पुनः उठून या कड्यावरून निर्विघ्नपणें मी आपल्या शरीराला टाकून देतों व त्याला विनाश रूपत्वास प्राप्त करतों, आणि सर्वत्यागी होतों.

श्रीवसिष्ठः—असें बोलून तो आपल्या देहाला पुढेंच असलेल्या कड्यावरून खालील खोल दरींत टाकून देण्यासाठीं जों वेगानें वर उठत आहे तो कुंभ त्याला म्हणाला.

कुंभः—हे राजन्! तूं या निरपराधी देहाला महाभृगूवरून कां टाकून देतोस? अज्ञ बैल रागावला असतां आपल्याच वत्साला मारतो, तसा हा बिचारा देह जड, अचेतन व क्षुद्र आहे, हा तुझा कोणी नव्हे, यास्तव तूं व्यर्थ शरीरत्याग करूं नकोस. हा बिचारा जड देह मूक होऊन ध्यान करीतसा बसतो. तरंग ज्याप्रमाणें काष्ठाला, त्याप्रमाणें याला दुसराच कोणी हालवितो. जसा एकांतांत बसलेल्या तपस्व्याला मत्त चोर क्षुब्ध करतो, तसा निग्रहयोग्य असा दुसराच कोणी या देहाला अत्यंत क्षुब्ध करतो. सुखदुःखादिकांचें उत्पत्तिस्थान असें हें क्षुद्र शरीर अपराधी होत नाहीं. कारण फलांनीं युक्त असलेला वृक्ष जो हालतो तो वायूमुळें हालतो ह्मणून तो अपराधी नसतो. जोरानें वाहणारा वारा झाडाचीं फळें, लहान शाखा, पुष्पें इत्यादिकांना खालीं पाडतो. त्यांत त्या बिचाऱ्या वृक्षाचा काय अपराध? हे कमलनयना! तूं जरी या शरीराचा त्याग केलास, तरी तुझा सर्वत्याग सिद्ध होणार नाहीं. कारण तो फार कठिण आहे. या कड्यावरून तूं केवळ निरपराधी शरीराला वृथा टाकीत आहेस. देहत्याग केल्यानें सर्वत्यागिता सिद्ध होत नाहीं. मत्त हत्ती जसा वृक्षाला क्षुब्ध करतो त्याप्रमाणें हा देह ज्याचा योगानें क्षुब्ध केला जातो त्या पाप्याला जर तूं टाकशील, तर मात्र तूं महा त्यागवान् खरा. हे राजा! त्याचा त्याग केला असतां देहादि सर्व सोडल्यासारखें होतें आणि त्याचा जर त्याग

न केला तर या देहादिकांना पाण्यांत बुडवून, अग्नींत जाळून वगैरे जरी तूं नाहींसें केलेंस तरी त्या जन्म व कर्म यांच्या बीजभूत देह-चालकापासून तें देहादिक पुनः पुनः उत्पन्न होईल.

शिखिध्वजः—हा देह कोणाकडून चंचल केला जातो? जन्म व कर्म यांचें बीज काय आहे? हे सुंदरा! कशाचा त्याग केला असतां सर्वांचा त्याग केला, असें होतें?

कुंभः—हे साधो! देहाच्या त्यागानें, राज्य सोडल्यानें, पर्णशालादिकांच्या जाळण्यानें सर्वत्याग सिद्ध होत नाहीं. जें सर्व वासनांचें आश्रयस्थान असल्यामुळें सर्व आहे, सर्व विषयांमध्यें पसरलेलें असल्यामुळें सर्वतः आहे, संकल्पानें सर्वाला उत्पन्न करणारें असल्यामुळें जें सर्वांचें एक कारण आहे, त्या एकाचा त्याग केला असतां सर्वत्याग केला असें होतें.

शिखिध्वजः—हे सर्व तत्ववेत्त्यांतील श्रेष्ठा! सर्व, सर्वगत, सर्व प्रकारें हेय, व सर्वदा त्याज्य असें जें तूं सांगत आहेस तें काय आहे? तें मला सांग.

कुंभः—हे साधो! ज्याचा आकार सर्वगत आहे, चित्प्राधान्यानें ज्याला जीव म्हटलें जातें व क्रियाप्राधान्यानें प्राणादि म्हटलें जातें, तें भ्रांत चित्त—लिंग हेंच सर्व आहे. तें जडही नाहीं व अजडही नाहीं. चित्तच भ्रम आहे, असें तूं जाण. हे राजा! चित्तच व्यवहार करणारा पुरुष आहे, असें समज. चित्त हेंच जगज्जाल आहे, असें जाण. चित्तच सर्व म्हणून म्हटलेलें आहे. हे पृथिवीपते? वृक्षाचें जसें वृक्षबीज असतें तसें राज्यादिक, देहादिक, व आश्रमादिक या सर्वांचेंच बीज मन आहे. हें सर्वांचें बीज टाकलें असतां सर्व टाकल्यासारखें होतें. कारण बीजाचा त्याग केला असतां सर्वत्याग संभवतो व बीजत्याग न केल्यास सर्वांचा त्याग संभवत नाहीं. सर्व धर्मादिक, अधर्म किंवा राज्यादि अथवा अरण्यादि त्यांच्या फलभोगाचीं स्थानें हें सर्व सचित्त पुरुषाला परम दुःख असून निश्चित्त पुरुषाला परम सुख आहे. हें सर्व चित्तच जगद्रूपानें विवर्त पावतें. बीज जसें वृक्षरूपानें परिणत होतें, तसें चित्तच देहादि आकाररूपानें परिणत होतें. वाऱ्यानें जसा वृक्ष किंवा भूकंपानें पर्वत, अथवा धिसाड्याकडून चामड्याचा भाता हालविला जातो, त्याप्रमाणें हा देह चित्ताकडून चंचल केला जातो. सर्व भूतांना प्रसिद्ध असलेल्या उपभोगांचा, जरा-मरणादि देहधर्मांचा व महामुनींच्या शम-दमादि श्रेष्ठ गुणांचा आश्रय वासनांनीं दृढ झालेलें चित्तच आहे, असें तूं जाण. अशांत चित्तच मननामुळें मनोमय व आंत प्राणचेष्टेमुळें जीव होऊन बाहेर स्थूल देह, त्याचा व्यवहार इत्यादि जगद्रूपानें परिणाम पावतें. हे मुने! शांत चित्तच बुद्धि, महत्, व प्राण इत्यादि क्रियानुरूप नांवांनीं बोललें जातें. चित्तालाच सर्व असें म्हणतात. यास्तव हे राजन्! त्याचा त्याग केला असतां सर्व आधि व व्याधि यांच्या पराकाष्ठेपर्यंत सर्वत्याग केला असें होईल. हे त्यागवेत्त्यांतील श्रेष्ठा! श्रेष्ठ चित्तत्यागालाच सर्वत्याग समजतात. तो सर्वत्याग सिद्ध झाल्यावर हे महाबाहो! सत्य वस्तूचा—भूमानन्दाचा अनुभव कां येणार नाहीं? अवश्य येईल. चित्ताचा त्याग केला असतां कार्यविभागांच्या आविर्भावाची परंपरा व कारणांतील कार्यांच्या लयाचा क्रम हीं दोन्ही सर्वतः लय पावतात, आणि त्यानंतर परम शांत, स्वच्छ, निरुपद्रव आत्मस्वरूप अवशिष्ट राहतें. या संसाररूपी धान्यसंपत्तीचें क्षेत्र चित्त आहे, असें ज्ञानी समजतात. क्षेत्रच अक्षेत्र झाल्यावर त्यांत

साळीचा संभव कसा होणार? पाणी जसें तरंगरूपानें विवर्त पावतें, त्याप्रमाणें हें चित्तच विचित्र अहंभाव व त्याचा अभाव या रूपानें विकास पावणाऱ्या पदार्थाकारानें विवर्त पावतें. हे भूपते! चित्तोत्सादनरूप सर्वत्यागानें साम्राज्याच्या योगानें जसें त्याप्रमाणें सर्वदा सर्व उत्तम प्रकारें प्राप्त होतें. हे त्यागिन् राजन्! परिच्छिन्न असलेला जो तूं, त्या तुझ्या सर्वत्यागाचा जसा दुसरा विषय आहे, तसा तूंही तुझा त्याग करणाऱ्या दुसऱ्याच्या त्यागाचा विषय आहेस. अर्थात् त्याज्य विकारालाच तूं आत्मत्वानें जाणत आहेस, म्हणून तुझा सर्वत्याग सिद्ध झालेला नाहीं. ज्यानें सर्वांचा त्याग केला आहे त्यानें मोत्यांच्या माळेंतील सूत्र जसें मोत्यांना त्याप्रमाणें सर्व त्रिकालांतील जगत् आपल्या अधीन करून घेतलें आहे. ज्यानें सर्वांचा परित्याग केला तो शून्यरूप झाला. तथापि त्यानें टाकलेलें हें सर्व त्रिकालस्थ जगत् दुसरा आश्रय न मिळाल्यामुळें जोंवर हा व्यवहार आहे तोंवर तंतुमध्यें जशी मोत्यांची पंक्ति त्याप्रमाणें त्यांतच स्थित असतें. तैलरहित दीपाप्रमाणें ज्यानें सर्वत्याग केला आहे, त्यानें तैलयुक्त दीपाप्रमाणें सर्वाला प्रकाशित केलें आहे. स्थित असलेल्या सर्वांचा परित्याग करून तो स्नेहरहित दीपाप्रमाणें शांत होतो. तो प्रकाशात्मा सस्नेह दीपाप्रमाणें सर्वत्र सम शोभतो. येथील समस्त वस्तूंना काढून टाकल्यावर जसा तूं एकटा अवशिष्ट राहिला आहेस, त्याप्रमाणें सर्वत्याग केला असतां केवल विज्ञान अवशिष्ट राहतें. समस्त वस्तूंचा दाह केल्यावरही जसा तूं राहिला आहेस, व दुसरा कोणी नाहीं, त्याचप्रमाणें हे राजन्! सर्वत्याग केल्यावर परमपुरुषार्थही तुझ्याहून निराळा रहात नाहीं. सर्वत्याग हा शून्यात्मा आहे, तथापि सर्व ज्ञानांचा त्यांत अन्तर्भाव होतोच. सूर्य–चंद्र–नक्षत्रादिकांचा आकाश हा जसा आधार आहे, त्याप्रमाणें अनंत उत्तम वस्तूंचा तो आधार आहे. सर्वत्यागाचा आनंद थोडासा जरी अनुभविला तरी असंग व उदासीन आकाशाला टांकी जशी छिद्र करूं शकत नाहीं, त्याप्रमाणें जरामरणभीति त्या त्यागी पुरुषाला कांहीं पीडा करूं शकत नाहीं. सर्वत्याग ज्याच्यापासून निर्मल स्वरूपस्फूर्ति होते त्या महत्त्वाचें कारण आहे. कारण तूं जर सर्वांचा त्याग केलास तर फारच मोठें बुद्धिस्थैर्य होईल. सर्वत्याग हाच श्रेष्ठ आनंद असून बाकीचें सर्व अति दारुण दुःख आहे. असा विचार करून आणि 'ॐ' असें म्हणून त्याचा अंगीकार करून तुला जशी इच्छा होईल तसें आचरण कर. जो सर्व सोडतो त्याला प्रारब्धवशात् सर्व अनायासानें प्राप्त होतें. समुद्रांतील पाणी जसें जसें वडवाग्नींत शिरतें, तसें तसें तें नद्यांच्या द्वारा समुद्रांत येतें. अज्ञान व त्याचें कार्य या सर्वांच्या त्यागांतच आत्मप्रसाद करणारें ज्ञान अवश्य आहे. करंड्यांत जें रत्नादिकांनीं रहित असें स्थान असतें त्यांतच रत्न रहातें, ही गोष्ट प्रसिद्ध आहे. सर्वत्यागाच्या योगानेंच अत्यंत पापिष्ठ कलिकालांतही अतिनीच मुनि शाक्यानें सुद्धां निःशंकपणें मेरुप्रमाणें स्थिर अवस्थान केलें. मग या पुण्य द्वापरकाळीं वेदमार्गावलंबी व त्यामुळेंच अति पुण्यवान् अशा तूं सर्वत्याग करून आकाशाप्रमाणें निःशंक रहावेंस, हें काय निराळें सांगावयास पाहिजे? हे महाराज! सर्वत्याग हाच सर्व संपत्तींचा श्रेष्ठ आश्रय आहे. जो कांहीं घेत नाहीं त्यालाच दिलें जातें. हे राजन्! सर्वपरित्याग करून शांत, स्वस्थ, आकाशासारखा व सौम्य असा तूं ज्या रूपाचा होशील तद्रूप हो. हे महास्वभाव भूमिपाला! तूं प्रथम सर्व त्याज्यांचा मनानें त्याग करून, नंतर ज्या

मनानें तो त्याग करतोस त्या मनाचाही त्याग करून शेवटीं त्यागाभिमानलक्षण अहंकारमलाचाही त्याग करून जीवन्मुक्त हो. ९३.

---

## सर्ग ९४ वा.

१ या सर्गांत चित्ताचा परित्याग करण्यासाठीं त्याच्या मूळाचें परिशोधन व देहादिवेश्यांच्या बाधानें पूर्णचितीचा अवशेष सांगितला जातो.

**श्रीवासिष्ठः**—कुंभ असें म्हणत असतां चित्तत्यागाच्या उपायाचा वारंवार मनांत विचार करणारा सौम्य राजा असें वचन बोलला.

**शिखिध्वजः**—हृदयाकाशांतील पक्षी किंवा हृदयवृक्षावरील मर्कट अशा मनाचें पुनः पुनः जरी निरसन केलें—त्याला त्या आकाशांतून किंवा वृक्षावरून हाकलून लाविलें—हें माझें नव्हे, असें म्हणून त्याचा त्याग केला, तरी तें माझ्या हृदयांत पुनः येतेंच. हे उत्तमा! जाळें व्याकुळ झालेल्या मत्स्याला जसें धरावयास जाणतें, त्याप्रमाणें मी या चित्ताचें ममत्वानें ग्रहण कसें करावें, हें जाणतों. पण याच्यामध्यें मूर्तत्व नसल्यामुळें द्रव्याप्रमाणें त्याचा त्याग कसा करावा हें जाणत नाहीं. यास्तव हे पूज्या! अगोदर मला या चित्ताचें स्वरूप यथावत् सांग. त्यानंतर हे प्रभो! चित्ताचा परित्याग कसा करावा तेंही यथावत्-जसेंच्या तसेंच-सांग.

**कुंभः**—हे महाराज! वासना हेंच चित्ताचें स्वरूप आहे असें तूं जाण. वासनाशब्दाचा चित्त हा पर्यायशब्द आहे, असें म्हटलें आहे. त्याचा त्याग फार सुकर आहे. तो स्पंदनाहूनही अतिशय सुसाध्य आहे. राज्याहूनही तो अधिक आनंददायी आहे व पुष्पाहूनही सुंदर आहे. पण पामराला—दरिद्र्याला साम्राज्य जसें दुःसाध्य किंवा तृणाची सुमेरुता—तृणाला सुमेरु पर्वत बनविणें जसें दुःसाध्य आहे, त्याप्रमाणें मूर्खाचा मनस्त्याग खरोखर अतिशय दुःसाध्य आहे.

**शिखिध्वजः**—भगवन्! तुझ्या या उपदेशावरून चित्ताचें स्वरूप आकुल व वासनामय आहे, हें मला कळलें. पण वज्राला गिळण्यापेक्षांही चित्ताचा त्याग दुःसाध्य आहे, असें मला वाटतें. संसार हेंच ज्याचें सुगंधी पुष्प आहे, जो दुःखरूपी दाह करणारा अग्नि आहे, जगद्रूपी कमलाचें जें नाल, मोहरूपी वायूचें जें आकाश, शरीररूपी यंत्राला जें प्रवृत्त करणारें, व हृदयरूपी कमलांतील जो भ्रमर आहे, अशा या चित्ताचा अनायासानें त्याग कसा करतां येतो तें मला सांग.

**कुंभः**—या चित्ताचा जो समूळ नाश तोच संसाराचाही क्षय आहे आणि तोच चित्ताचा सर्वथा त्याग आहे, असें अपरिच्छिन्न आत्मदर्शी जनांनीं सांगितलें आहे.

**शिखिध्वजः**—भगवन्! चित्ताच्या त्यागापेक्षां चित्ताचा नाश करणेंच उत्तम सिद्धीचें साधन आहे असें मला वाटतें. चित्त हा मोठा व्याधि—रोग आहे. 'ते माझें नव्हे' असें म्हणून नुस्ती त्याविषयींची ममता सोडल्यानें, नुस्ता त्याग केल्यानें त्याचा अभाव कसा होईल? चिकित्सा करून, उपायानेंच त्याचा नाश केला पाहिजे. यास्तव त्याच्या उच्छेदासाठीं चित्ताचें मूळ वगैरे काय आहे, तें सांग.

**कुंभः**—ह्या चित्तरूपी वृक्षाचें अहंकार हें बीज आहे. तो शाखा, फळें व पल्लव यांनीं युक्त आहे. त्याचें तूं समूल उन्मूलन कर. वृक्षाला तोडावयाचें झाल्यास तेथें जसा अवकाश असावा लागतो त्याप्रमाणें येथेंही अवकाश असावा म्हणून तूं आपल्या हृदयाला आवरण—विक्षेपशून्य कर.

**शिखिध्वजः**—हे मुने! चित्ताचें मूळ काय आहे? अंकुर कोणता? त्याचें क्षेत्र कोणतें? त्याच्या शाखा कोणत्या? स्कंध कोणते? व

त्याचें उन्मूलन कसें केलें जातें ?

कुंभः—अज्ञात आत्म्यापासून ज्याचा उदय होतो असा जो हा अभिमानी अहं—अर्थ तें या चित्तवृक्षाचें बीज आहे, असें तूं समज. परमात्म्याचें पद-नीड अशी जी माया तेंच याचें क्षेत्र आहे. यास्तव चित्ताचेंही तेंच क्षेत्र आहे. प्रथम उत्पन्न झालेल्या या बीजापासून परिच्छिन्न अहं असा निश्चयात्मक व चिदाभासानें व्याप्त असल्यामुळें अनुभवात्मक अंकुर उत्पन्न होतो. तो निराकार असून त्याला बुद्धि असेंच म्हटलें जातें. या बुद्धिसंज्ञक अंकुराची जी आधिक्यानें वृद्धि—पुष्टि ती देहादि आकाराच्या स्मरणामुळें चित्त या नांवाची व संकल्परूपिणी असल्यामुळें मन या नांवाची होते. त्या वृक्षाचा जीव परमार्थतः निर्विकार असल्यामुळें सर्वविकारशून्य आहे. ह्मणून तो दगडासारखा आहे. तो मिथ्याभूत असलेलें जें चित्त व त्याचे धर्म यांचे संबंध जाणणारा साक्षी आहे. मूळापासून शाखेपर्यंत जो वृक्षाचा भाग त्याला स्तंभ—मध्यप्रदेश ह्मणतात. या चित्तवृक्षाचा स्तंभ हें शरीर आहे. तो स्नायु, अस्थि व रस यांनीं रंजित झालेला असतो. स्तंभदेशाहून दुसऱ्या—अग्रप्रदेशीं स्कंधशाखादि उगवण्यासाठीं जो अंकुराचा आरंभ त्याचें कारण वसंतादि काल आहे. त्याचप्रमाणें त्या त्या जीवाच्या भोगप्रद कर्मांच्या परिपाककालीं रागद्वेषप्रवृत्त्यादि अंकुरपल्लवादि आकारानें जो विकास पावणारा रस ती वासनाच होय. या चित्तवृक्षाच्या लांब लांब—दूरवर पसरलेल्या विस्तृत शाखा हींच इंद्रियें आहेत. जन्म-मरणरूप सहस्रावधि अनर्थांचीं तीं कारणें आहेत. अल्प भोग हेच या वृक्षाचे मोठाले अवान्तर शाखासमूह आहेत. ते शुभाशुभ फलांनीं आकुल झालेले आहेत. अशा प्रकारच्या या चित्तरूपी दुर्वृक्षाच्या शाखांचें प्रतिक्षणीं छेदन करीत रहा व त्याचें मूळ तोडण्याचा अतिशय यत्न कर.

शिखिध्वजः—हे मुने! मी या चित्तवृक्षाच्या शाखादिकांचें छेदन करतों, पण त्याच्या मूळाचा निःशेष छेद कसा करूं ?

कुंभः—नानाप्रकारच्या वासना ह्याच फळ, स्पंद इत्यादिकांनीं युक्त अशा शाखा आहेत. आसक्तीचा त्याग करून त्यांना मनांत उत्पन्नच होऊं दिलें नाहीं, ह्मणजे त्या विचारसंविद्रूलानें आंतल्याआंत विच्छिन्न होतात. ज्याचें मन असंसक्त असतें, जो मौनी असतो, ज्याचा वाद व विचार शांत झाला आहे, आणि जो प्राप्त होईल तेवढेंच करणारा असतो, त्याची चित्तलता आंतून विच्छिन्न झालेली असते. चित्तरूपी वृक्षाच्या शाखासमूहास जो पौरुषयत्नानें तोडतो तो त्याचें मूळ उपटून टाकण्यास योग्य होतो. चित्तावृक्षाच्या शाखा तोडणें हें गौण कार्य असून त्याचें मूळच उपटून टाकणें हें मुख्य कार्य आहे. हे महाबुद्धे! मूलोन्मूलनाला मुख्यत्व असल्यामुळें या चित्तरूपी कंटकसमूहाच्या—करंजवनाच्या मूळाचा दाह पूर्णपणें कर. असें केल्यानेंच अचित्तता प्राप्त होईल.

शिखिध्वजः—हे मुने! चित्तवृक्षाच्या अहंभावरूप बीजाचा दाह करावयाचा झाल्यास त्याच्या उपयोगी असा अग्नि कोणता ?

कुंभः—राजन्! ‘मी कोण बरें?’ अशा स्वरूपाचा जो हा साक्षात्कारान्त विचार तोच या चित्तरूपी दुष्ट वृक्षाच्या बीजाचा दाह करण्यास समर्थ असा अग्नि सांगितलेला आहे.

शिखिध्वजः—मुने! मी आपल्या बुद्धीनेंच देहादि अहंकारापर्यंत बाह्य व आंतर पदार्थ अनात्मे--अनृत आहेत, असें जाणलें आहे. पण अन्तरात्मतत्त्वाचा परिचय न झाल्यामुळें जड अहंकाराच्या ठिकाणीं पुनः पुनः होणारी आत्मत्वभ्रांति निवृत्त होत नाहीं. ह्मणजे मी पूर्णपणें जगत् नाहीं, पृथ्वी नाहीं,

वनमंडलानें मंडित झालेल्या पर्वताचा • तट नाहीं, अरण्य नाहीं. पानें हालणें वगैरे हें कांहीं मी नाहीं. जडत्वामुळें देहादि मी नाहीं. मांस, अस्थि, रक्त मी नाहीं. कर्मेंद्रियेंही मी नव्हे. ज्ञानेंद्रियेंही मी नव्हे. मन, बुद्धि व अहंकारही मी नाहीं. कारण हीं सर्व जड आहेत. सोन्यामध्यें जसें कटकत्व तसें चिदात्म्यामध्यें अहंत्व विवर्तरूप आहे. शुक्तिरजत, मृगतृष्णिका, इत्यादि जड असत् असल्याचें प्रसिद्ध आहे. त्यामुळें म्हणजे जडत्वामुळें तें अहंत्वादि असत्–मिथ्याच आहे. ब्रह्मांडादिक सर्व जडवर्ग अधिष्ठान सद्रूपाहून अन्य असल्यामुळें परमपदीं म्हणजे चितीमध्यें, आकाशांत जसा महावृक्ष नाहीं, त्याप्रमाणें विद्यमान नाहीं. कारण तो जडवर्ग सर्व आकारांचा व विषयांचा आधार आहे. पण भगवन् ! मी हें या रीतीनें अहंत्वरूप मलाचें मार्जन केलें पाहिजे असें जाणत असूनही आंत असलेलें–प्रत्यगेकरस जें साक्षिचैतन्य त्याला जाणत नाहीं.

कुंभः—हे राजन् ! अहंकारापर्यंत जितके दृश्य पदार्थ आहेत ते सर्व जड असल्यामुळें त्यांतील जर तूं कोणी नव्हेस, तर हे निष्पाप महाबुद्धे ! तूं जो कोणी आहेस तेंच मला सांग.

शिखिध्वजः—हे विद्वानांतील श्रेष्ठा ! मी केवल चिद्रूप आहें. मी स्वच्छ आत्मज्ञान आहें. ज्या आनंद-एकरस चिन्मात्र आत्म्याच्या सत्तेनें हे सर्व आनंदशून्य विषय अनुभविले जातात किंवा वृत्तींवर उपारूढ झालेल्या ज्याच्या योगानें त्यांचा इष्ट-अनिष्ट विभागानें निर्णय केला जातो, अशा स्वरूपाच्या माझ्या ठिकाणीं ' हा मी ' अशा तऱ्हेचा तादात्म्याभिमानलक्षण मल लागला आहे. पण तो सकारण आहे कीं निष्कारण, हें मला समजत नाहीं. तसेंच जें वेद्य ब्रह्मपद त्यालाही मी जाणत नाहीं. हे मुने ! ह्या असत् व अनात्मसंबंधी आत्ममलाचें सर्वथा प्रमार्जन करण्यास मी समर्थ नाहीं. त्यामुळें मी अतिशय संतप्त होत आहें.

कुंभः—हे महापराक्रमी राजा ! तूं सत्य मलानें संसारी होऊन स्थित आहेस कीं असत्य मलानें संसारी झाला आहेस तें सांग.

शिखिध्वजः—चित्तरूप वृक्षाचें जें बीज तें सत्य आहे कीं मिथ्या आहे हें मी जाणत नाहीं. पण सर्व अनर्थ हें ज्याचें फळ आहे, अशा या चित्तवृक्षाचें सामान्यतः अहंभाव व ममभाव हें मूळ आहे इतकें मी जाणतों. पण त्याचा त्याग कसा करावा हें मी जाणत नाहीं. कारण त्याचा पुनः पुनः त्याग जरी केला तरी त्याचा मूलोच्छेद न झाल्यामुळें तो पुनः पुनः प्राप्त होतो. यास्तव त्याच्या मूलोच्छेदाचा उपाय मला सांग.

कुंभः—राजन् ! कारणापासून जें कार्य होतें तें सर्वत्र संभवतें आणि असें कारणापासून झालेलें जें नसतें तें दुसऱ्या चंद्रासारखें असत् असतें. कारण त्याचें प्रमाणतः परीक्षण करूं लागलें असतां, तें आहे असें वाटत नाहीं. ज्याप्रमाणें अहंभावापासून मनो-बुद्ध्यादिरूप संसारांकुर हें कार्य होतें, असेंच आतां अहंभावाचेंही कारण शोधून मला सांग.

शिखिध्वजः—मुने ! देहादि आकाराचें वेदनच न झाल्यास ' देहच मी ' असा अभिमानहि होत नाहीं. यास्तव देहादिकांचें ज्ञान हेंच अहंकाराचें कारण आहे, असें मी समजतों. यास्तव त्याचा उपशम कसा होईल तें मला सांग. चित्-नें विषयोन्मुख होणें, हाच मोठा दोष आहे. अर्थात् चित्-च्या चेत्योन्मुखत्वानें देहादिक दुःख भोगण्यासाठींच ' हा मी ' असा स्थित आहें. यास्तव हे मुने, त्याच्या

उपशमनासाठीं चेत्याचें उपशमन कसें होईल तें मला सांग.

कुंभः---वेदनानें वेद्योन्मुख होण्यास वेद्यच --देहादि विषयच कारण आहे, असा तूं जर कारणज्ञ असशील तर तुला अभिप्रेत असलेलें कारण सत्वर सांग; ह्मणजे मग तुला इष्ट असलेलें कारणच अकारण कोणत्या क्रमानें होतें तें मी तुला सांगेन. सामान्यतः वेद्य-वेदनरूप व विशेषतः विषयज्ञान हीं दोन्ही मिथ्या असल्यामुळें कारण होण्यास असमर्थ असलेलेंच वेद्य कारणत्वास प्राप्त झालें आहे, असें जें तुला अभिप्रेत असेल तेंच सांग.

शिखिध्वजः--हे मुने! विषयांच्या सामान्य व विशेष ज्ञानाचें कारण बाह्य व आध्यात्मिक पदार्थांची सत्ता हेंच आहे. कारण, वेदन--ज्ञान शरीरादि वस्तुसत्तेच्या निमित्तानें मुशींत ओतलेल्या--सोनें, तांबें इत्यादिकांच्या रसाप्रमाणें शरीरादि आकारांनीं उदय पावतें. पण अमूर्त वेदनामध्यें उदय पावणारा जो मूर्त देहादि आकार त्याला वस्तुत्व संभवत नाहीं; म्हणून स्पंद जसा वायूच्या पंक्तीनें उदय पावतो त्याप्रमाणें असत्य आभासानें वेदन साकार होतें. पण चित्ताचें बीजच--अहंत्ववेदन--शांत होईल, असें देहादिवस्तुसत्तेचें असत्त्व मला अवगत होत नाहीं. यास्तव त्याचें मिथ्यात्व मला कळेल असा उपदेश कर.

कुंभः--देहादि वस्तूंची सत्ता जर विद्यमान असेल तर त्याच्या निमित्तानें वेदनाला तदाकारत्व प्राप्त होतें असें जें तुझें ह्मणणें आहे तें बरोबर आहे, असें ह्मणतां येईल. पण देहसत्ता इत्यादिकांचाच जर अभाव आहे, तर तुझ्या वेदनाचा विषय काय? तें निर्विषयच आहे, असें होणार!

शिखिध्वजः--अहो पण महाराज! ज्याचें हें कांहीं स्वरूप उपलब्ध होत आहे तें कल्पनात्मक व असद्रूप कसें असेल? प्रकाश अंधकार कसा होईल? हे मुने हस्तपादादि अवयवांनीं युक्त असलेला, व क्रिया-फल इत्यादि स्वरूपानें विलास पावणारा असा जो हा सदा अनुभवास येणारा देह, तो नाहीं कसा!

कुंभः---हे राजा! ज्या कार्याचें कारण नसतें तें कार्य येथें विद्यमान नसतें. अर्थात् त्याचा येणारा जो अनुभव तो शुद्ध भ्रम होय. कारणावांचून शरीरभूत कार्य केव्हांही संभवत नाहीं. ज्याचें बीजच विद्यमान नाहीं तें द्रव्य कोठें बरें उत्पन्न होणार? जें कार्य कारणावांचूनच पुढें विद्यमान असल्यासारखें प्रतीत होतें तें मृगजळाप्रमाणें द्रष्ट्याच्या विभ्रमामुळेंच भासतें, असें जाण. हें विद्यमान नसतांनाच मिथ्या भ्रमानें उदय पावलें आहे, असें तूं जाण. अति यत्न न करणाऱ्या जीवालाही हें मृगजळ उपलब्ध होतें.

शिखिध्वजः---तर मग काय हा सर्व देहादि पदार्थवर्ग वंध्यापुत्राच्या देहादिकांप्रमाणें असतच आहे? तो जर असत् असेल तर मग दोन चंद्रबिंबांप्रमाणें त्याचेंही कारण शोधण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं. कारण वंध्यापुत्राच्या सर्वांगाला अलंकारांनीं भूषित करण्यास कोण प्रवृत्त होणार? व तें त्याचें सर्वांगमंडन कोणाला सुशोभित दिसणार?

कुंभः--शरीरादिक अस्थिपंजर हें कारणावांचूनच कार्य आहे. हे राजन्! असंभवामुळें तें अविद्यमानच आहे, असें समज.

शिखिध्वजः---हे मुनीश्वरा! नित्य दिसणाऱ्या या हस्त-पादादियुक्त शरीराचें कारण त्याचा पिता कां नव्हे?

कुंभः--हे राजन्! कारणाच्या अभावामुळें पिता ह्मणून कोणीच नाहीं. जें असत्-पासून उत्पन्न झालेलें तें असत्-च म्हटलें जातें. कार्यरूप पदार्थांचें जें कारण त्याचाच त्याचें

बीज ह्मणतात. हे राजन् ! या जगांत बीजावांचून अंकुर संभवत नाहीं. यास्तव ज्या कार्याचें कारण येथें संभवत नाहीं, तें बीजाच्या अभावीं नाहींच. त्याचा अनुभव हा शुद्ध भ्रम आहे. जें अवश्य विद्यमान नाहीं, जें निर्बीज असतें, तो मतीचा भ्रम होय. तें दोन चंद्र, मृगजळ, वंध्यापुत्र यांच्यासारखें मिथ्या आहे.

शिखिध्वजः—अहो पण पहिला पितामह जो हिरण्यगर्भ--सूक्ष्म भूतलिंगसमष्ट्यात्मा तो पुत्र-पिता-पितामह इत्यादि व्यष्टिसमष्टि स्थूल शरीरांच्या उत्पत्तीचें कारण कां नव्हे ?

कुंभः—हे राजा ! तूं जो आद्य पितामह ह्मणून म्हणतोस तोही वस्तुतः नाहींच. कारण कारणाच्या अभावीं कोणत्याच कार्याचा भाव नाहीं, हा जर नित्य नियम असेल, तर तो आद्य कर्ताही नाहींच. पण 'यो देवानां प्रभवश्चोद्भवश्च' इत्यादि मंत्रांत हिरण्यगर्भाचा उत्पादक व उत्पन्न होणाऱ्या त्याला कृपादृष्टीनें पाहणारा ईश्वर त्याचें कारण असल्याचें प्रसिद्ध आहे; ह्मणून जर म्हणशील तर परमात्मा ईश्वर आहे, ही गोष्ट खरी. तथापि तो मायेनें स्वरूपांत भेदाची कल्पना करून जरी अन्यथा दिसतो तरी तो भ्रमानें दिसणारा पितामह त्या परमात्म्याहून अन्य नाहीं. कारण तो मृगजळाप्रमाणें भ्रांतिरूपच भासतो. पितामहाचें अर्थक्रियाकारित्वही—प्रपंचोत्पादनादि व्यवहारही भ्रमात्मकच आहे. असो; याप्रमाणें मीं सांगितलेल्या युक्तीनें पितामहापासून आपल्या शरीरापर्यंत जो हा कार्यकारणपरंपराप्रबंध आहे तो मिथ्या आहे, हें तुझ्या ध्यानांत आलें आहे, व त्यामुळें तो सत्य आहे अशी जी तुझी समजूत तीही निवृत्त झाली आहे. आतां प्रातिभासमात्र अवशिष्ट असलेला दुसरा अंशही तत्त्वसाक्षात्कारान्त उपदेशानें मी घालवितो.

हे भूमिपाला ! वर सांगितलेल्या युक्तीनें चिद्व्यतिरिक्त पदार्थाला असत्त्व आहे, त्यामुळें चिद् हाच देवदेव-ईश्वर आहे. तो हिरण्यगर्भादिस्तंबपर्यंत सर्गपरंपरेनें नित्य जो विकास पावतो तो चिद्रूपानेंच विकास पावतो. स्वरूपांतच तो सर्व विवर्त होतो. तो स्वरूपाहून भिन्न अणुमात्रही होत नाहीं किंवा करीत नाहीं. त्यामुळें आत्माच स्वतः स्वरूप, पद्मज इत्यादि नांवांनीं सांगितलेला आहे, आणि असें पर्यालोचन केलें असतां हें समस्त द्वैत शांत ब्रम्हच आहे. ९४.

---

## सर्ग ९५ वा.

—:०:—

१ अविद्येच्या उपशमाचा क्रम, २ व बोधानें शिखिध्वजाची विश्रांति.

शिखिध्वजः—आब्रह्मस्तंबपर्यंत जो हा व्यवहारास समर्थ असा भ्रम आहे तो दुःखाचें कारण कसें ?

कुंभः—शीतानें गोठलेल्या जलाच्या रूक्षतेप्रमाणें या जगद्भ्रमाचें हें भावन असें पसरलें आहे. म्हणूनच मूल अज्ञान ज्ञानाभ्यासाच्या परिपाकक्रमानें शिथिल झालें असतां जगाला क्रमानें सूक्ष्मता येऊन त्याचा अज्ञानासह नाश होतो, असें विद्वान् समजतात आणि अज्ञानाच्या नाशावांचून जगद्रचनेचा बाध होत नाहीं. अज्ञान शिथिल होण्यास निरोधाभ्यासानें बाह्य बुद्धिवृत्तींना क्षीण करणें अवश्य आहे. यास्तव परम पदाचा साक्षात्कार झाला असतां सहज होणारें जें सर्व बोधांचें तनुत्व तें सर्गाच्या शांतीचें कारण आहे. व्यवहारांतही ज्या देहादि स्थूल पदार्थांचें तनुत्व होतें. त्यांची क्रमानें

---

१ 'सर्वाणि रूपाणि विचिंत्य धीरो नामानि कृत्वाऽभिवदन्य आस्ते' या वचनाप्रमाणें.

२ तनुत्व म्ह० अपक्षय.

पूर्वरचना नाहींशी होऊन शेवटीं नाश संभवतो. हे राजा! तूं याच क्रमानें तो आदिपुरुष मृगजळाप्रमाणें भ्रमाकारानें उदय पावला आहे, असें जाण. पितामहाच्याच अभावीं ही भूतसंततिही मिथ्या आहे. कारण जें स्वतः असिद्ध असलेल्या पदार्थाकडून केलें जातें, तें केव्हांही सिद्ध होत नाहीं. हा भूतांचा अनुभव मृगजळाच्या अनुभवाप्रमाणें उदय पावला आहे. शुक्तीच्या ठिकाणची रजत-प्रतीति जशी, तसाच तो विचारानें विलय पावतो. कारणाच्याच अभावामुळें कार्य वस्तुतः न होतांच जें होतेंसें वाटतें त्याचें रूप मिथ्या ज्ञानावांचून संभवतच नाहीं. जें मिथ्या दृष्टीनें पाहिलेलें तें केव्हांही विद्यमान् नसतें. कोणीं केव्हां तरी मृगजळानें घट भरले आहेत का?

शिखिध्वजः—आद्य स्रष्ट्याचें कारण अनन्त अज, अव्यक्त आकाशस्वरूप शांत व अच्युत परब्रह्म कां नव्हे?

कुंभः—'तदेतद् ब्रह्मापूर्वमनपरं' इत्यादि श्रुतीवरून त्याला कोणत्याही कार्याचें कारणत्व नाहीं, तसेंच त्याला कार्यत्वही नाहीं, असें सिद्ध होतें. 'नेह नानास्ति किंचन' इत्यादि श्रुतीनें सर्व प्रकारच्या द्वैताचा निषेध केला आहे. 'असंगो ह्ययं पुरुषः' या श्रुतीवरून त्या असंग ब्रह्माची अनुवृत्ति संभवत नाहीं. कारण कार्यांत अनुवृत्त असतें असें तार्किकांचें म्हणणें आहे. कूटस्थाचा परिणाम होऊं शकत नाहीं. अर्थात् सर्व प्रपंचाचें अतिक्रमण करणारा आत्मा—शुद्ध ब्रह्म कार्य नाहीं व कारण नाहीं. जें स्वतः कर्ता, कर्म किंवा कारण नाहीं, जें स्वतः कोणाचें कारण नाहीं व ज्याचें दुसरें कांहीं कारण—निमित्त व उपादान नाहीं, ज्याच्याविषयीं कांहीं तर्क करतां येत नाहीं व त्यामुळेंच जें विशेषतः ज्ञानसाधनांचा विषय होत नाहीं तें ब्रह्म जगाचें कर्तृ कसें होईल! याप्रमाणें जगाचें कांहीं कारणच नसल्यामुळें तें कार्यत्वरहित आहे. तें द्वैत-ऐक्यरूप वस्तुकृत परिच्छेदानें व आद्यन्तरूप देशकालकृत परिच्छेदांनीं रहित आहे. त्यामुळें तें चिदेकरस ब्रह्मच बनलें आहे. जें अप्रतर्क्य, अविज्ञेय, शिव, शांत, अव्यय ब्रह्म, तें कसें, कोणाचें, कोणत्या साधनानें व केव्हां कर्तृ व भोक्तृ होणार? यास्तव हें कांहीं केलेलें नाहीं. जगदादिक विद्यमान नाहीं. तूं कर्ता नाहींस व भोक्ता नाहींस. सर्व शांत, शिव, अज आहे. कारणाच्या अभावामुळें हें जगत् कोणाचेंही कार्य नव्हे; आणि कारणावांचूनही जें कार्यत्व दिसतें तें भ्रमामुळें दिसतें, असें तूं समज. अकार्यत्वामुळें हें जगत् नाहींच. याप्रमाणें हा सर्ग विद्यमान नाहीं. आणि हें जगत् जेव्हां कोणत्याही कारणाचें कार्य नाहीं तेव्हां पदार्थांच्या अभावाचीच उत्तम प्रकारें सिद्धि होते; आणि ती झाल्यावर वेदन कोणाचें होणार? याप्रमाणें वेदनाचा अभाव झाला असतां अहंत्वाचें कारणच उरत नाहीं. यास्तव तूं शुद्ध व विमुक्त आहेस. मग बंध व मोक्ष यांची वार्ता कोठची?

शिखिध्वजः—भगवन्! मीं जाणलें. तूं फार उत्तम व युक्तियुक्त वचन सांगितलेंस. कारणाच्या अभावामुळें हें ब्रह्म कर्तृ नाहीं, हें मी जाणतों. कर्त्याच्या अभावीं जगत् नाहीं, त्यामुळें पदार्थदृष्टि—नामरूपदृष्टि नाहीं. त्यामुळेंच त्याचें चित्तादि बीज नाहीं. म्हणूनच अहंतादि कांहीं नाहीं. आणि अशी वस्तुस्थिति असल्यामुळें मी विशुद्ध आहें, विबुद्ध आहें, व मी शिव आहें. मला नमस्कार असो. चित्स्वरूपाहून निराळें चेत्य—विषय कांहीं नाहीं, असा तूं मला बोध केला आहेस. तूं उपदेश केलेल्या या युक्तीनें सर्व पदार्थांचा विचार करून अध्यारोपापवादन्यायानें 'अहं' पर्यंत

सर्व दृश्यजात असतूच भासत आहे, असें मीं जाणलें व त्यामुळें आतां आकाशाच्या मध्याप्रमाणें मी शांत राहिलों आहें. अहाहा! देश, काल, क्रिया, दिशा, कला इत्यादिकांच्या समूहासह माझी जगत्पदार्थविभागदृष्टि दीर्घकालानें आज शांत झाली आणि आतां शांत निर्विकार ब्रह्मच अवशिष्ट राहिलें आहे. मी शांत व सुखी झालों आहें. मी सर्वतः पूर्ण भावानें स्थित आहें. मी जात नाहीं, हृष्ट होत नाहीं, व खिन्न होत नाहीं. मी हा असा अवस्थित आहें तूंही प्रत्यगेकरस यथार्थ स्वरूपानें अवस्थित हो. अशा स्थितींत तुझा आत्माच मी शुभ परमपुरुषार्थरूप, वागगोचर, व निरतिशय सुखच सदा आहें. ९९.

---

## सर्ग ९८ वा.

—:०:—

१ ज्ञानी राजाला कुंभ दृश्यसत्तेचें निःशेष निराकारण कसें होतें, तें सांगतो.

श्रीवसिष्ठः—याप्रमाणें ब्रह्मामध्यें विश्रांति पावून तो शिखिध्वज एक क्षणभर वातरहित प्रदेशांतील दीपाप्रमाणें अगदीं शांतचित्त होऊन बसला. तो राजा अखंडाकारवृत्तिरूप विकल्पाचेंही निरसन करून क्षीरसागरांत पडलेल्या उदकाच्या बिंदूप्रमाणें मनाला ब्रह्मरूप करून एकरस ब्रह्मामध्यें प्रवेश करण्यास जेव्हां तयार झाला, तेव्हां त्याची ती अवस्था लागलीच ओळखून कुंभानें पुढील उपदेशासाठीं त्याला लागलेंच जागें केलें.

कुंभः—हे राजन्! तूं अज्ञाननिद्रेपासून जागा झाला आहेस. तूं आतां शिवस्वरूप होऊन राहिला आहेस. त्यामुळें तुला आतां सर्व दृश्याचा अस्त झाला तरी व न झाला तरी त्याचें कांहीं प्रयोजन नाहीं. तूं नित्य प्रकाशस्वरूप आहेस. तुझें अविद्यास्वरूप नष्ट झालें आहे. तूं सर्व कल्पनाशून्य झाला आहेस. आतां खरोखर तूं जीवन्मुक्त आहेस.

श्रीवसिष्ठः—कुंभानें ज्याला असा बोध केला आहे, असा तो राजा ज्ञानी झाला. महामोहरूप संपुटांतून बाहेर आलेला तो अतिशय शोभला. ज्याची बुद्धि विश्रांति पावली आहे असा तो एका क्षणांतच दृश्य वस्तूची असत्ता पाहणारा व मुक्तात्मा होत्साता कुंभाच्या परिपक्व बोधाशीं आपला बोध ताडून पाहण्याच्या इच्छेनें सहज लीलेनें असें बोलला.

शिखिध्वजः—मला प्रायः सर्व तत्त्वार्थ कळला आहे. तथापि मला आनंद देणाऱ्या व मान देणाऱ्या देवपुत्रा! पुनः चांगला बोध होण्यासाठीं मी हें जें कांहीं विचारीत आहें तें सांग. अविद्येनें आवृत झालेल्या व त्यामुळेंच ज्याचें स्वरूप प्रकट नाहीं अशा या शांत, शिव, निराभास पदांत हा जगद्रूप द्रष्टृ-दर्शन-दृश्यसंज्ञक अनुभव कोणत्या कारणानें येतो?

कुंभः—हे महाराज! फार चांगला प्रश्न केलास. आत्मज्ञानानें तुझें अज्ञानावरण नष्ट झाल्यामुळें तूं अतिशय तेजस्वी होऊन फार शोभत आहेस. तुला आतां हें एवढेंच कळावयाचें राहिलें आहे. यास्तव याचें आतां उत्तर ऐक. हें जें कांहीं स्थावरजंगमात्मक जगत् दिसत आहे तें सर्व प्रकारांनीं संपन्न असलेलें सर्व कल्पांतीं विनाश पावतें. त्यानंतर महाकल्पविलासाच्या शेवटीं स्तिमित, गंभीर, तेजही नव्हे व तमही नव्हे, असें सर्वत्र पसरलेलें सत्सार अवशिष्ट राहतें. चिन्मात्र, अमल, शांत, प्रकाशमान, परम आकाश, सर्व संकल्पांनीं रहित, आत्मसाक्षात्कारबुद्धीनें युक्त, नित्य प्रकाशस्वरूप, अति निर्मल, शांत, सर्वव्यापक, उज्ज्वल, परमात्मस्वरूप,

---

१ जनकानें याज्ञवल्क्याला 'अभयं त्वागच्छताद्याज्ञवल्क्य यो नो भगवन्नभयं वेदयसे' (बृह. भाष्यं) हें जसें म्हटलें आहे तसें राजा कुंभास म्हणतो.

ज्ञप्तिमात्र, स्तिमित तेज, अप्रतर्क्य, अविज्ञेय, सम, शिव, अनिंदित, ब्रह्मसुखरूप, परिपूर्ण, आत्मबोधानें पूर्ण, सर्व अणु पदार्थांहून अतिशय अणु, सर्व स्थूल पदार्थांहून स्थूल, सर्व गुरु पदार्थांहून अतिशय गुरु, व सर्व श्रेष्ठांहूनही श्रेष्ठ असें तें पद आहे. त्याच्यापुढें हें जें आकाश आहे तें, अणूजवळ जसा महामेरु स्थूल दिसावा, तसें स्थूल दिसतें. अशा प्रकारचें तें सूक्ष्म आहे. तसेंच ज्याच्यासमोर हें जगत् परमाणूप्रमाणें दिसतें व कोठें तर तें मुळींच दिसत नाहीं, अशा प्रकारचें तें परम स्थूल आहे. अशा प्रकारच्या मायाशबल अधिष्ठानावर जें अध्यासानें विश्वात्मक स्फुरण तेंच वासुदेवापासून उत्पन्न झालेल्या हिरण्यगर्भाचें अहंवेदन आहे; तोच ज्ञानाध्यास आहे, असें जाण; आणि त्याच्या ठिकाणीं जगत् विषयत्वानें स्थित आहे. तोच विषयाध्यास होय. वायु व वायूचा स्पंद यांचा जसा भेद नाहीं, त्याचप्रमाणें शून्यत्व व आकाशत्व यांची ज्यांना उपमा आहे असे चिन्मात्र व अहंत्व यांचा भेद नाहीं. देश व काल यांनीं ज्यामध्यें परिच्छेद होतात अशा जलांत तरंगादिक जसे सकारण असतात त्याप्रमाणेंच देश-कालपरिच्छेदशून्य परतत्त्वामध्यें जगत् अकारण भासतें. ब्रम्ह मूलकारण आहे. म्हणून त्याचें कार्य अकारण; व जल मध्यवर्ती कारण आहे, म्हणून तरंगादिक त्याच्या कारणानेंच सकारण आहेत. देश व काल यांनीं परिच्छिन्न झालेल्या सोन्यांत कटकादि जसें सकारण आहे, तसेंच देश-काल-परिच्छेदशून्य ब्रम्हांत जगत् अकारण आहे. तें वरिष्ठांतील वरिष्ठ कसें तें सांगतों ऐकः—सर्व जगत् हेंच त्याचें अक्षत राज्य आहे. ज्या अर्थीं जगत् त्याच्या ठिकाणीं अध्यस्त असल्यामुळें तृणाच्या लवाप्रमाणें तुच्छ आहे, त्या अर्थीं तें अद्वैत, अमल व शांत आहे. तें आतां सर्वांत अधिक श्रेष्ठ कसें तें पहा—तो सर्वेश्वर विद्यमान असल्यामुळेंच त्याच्या सत्तेनें जगत्पदार्थसमूहाची शोभा ज्ञानानें सत्तायुक्त होते. हे भूपते! या सृष्टींत तेंच एक सर्वव्यापक सार आहे. तें ऐक, केवल चिन्मात्रस्वरूप व निरुपाधिक प्रेमास्पद आहे. द्वित्वाच्या अपेक्षेनें असलेलें एकत्वही त्याच्या ठिकाणीं संभवत नाहीं. वास्तव या तत्त्वांत द्वितीय ही कांहीं कल्पनाच नाहीं. आत्मतत्त्व मात्र पूर्णपणें भासत आहे. तेंच सर्व प्रकारें पूर्ण व अक्षय आहे. तें सर्वदा सर्वाकारानें संस्थित आहे. तें सर्वाकारानेंसें उदय पावलेलें आहे. अदृश्यत्वामुळें व अलभ्यत्वामुळें तें कार्य नाहीं व कारणही नाहीं. ते प्रत्यक्षादि लौकिक प्रमाणांचाही विषय होत नाहीं. त्यामुळें तें सर्व प्रमाणांनीं सिद्ध होणाऱ्या वस्तूंहून अगदीं विलक्षण आहे. तें केवल स्वानुभवगम्य आहे. उत्तम—निरतिशय आनंदस्वरूप आहे. ते स्वतःच सर्व, सर्वांचा आत्मा व सर्व याचे आत्मे, अशा रीतीनें सर्वात्मक आहे. व्यवहारदृष्टींत शब्द व त्याचे अर्थ असे सर्व पदार्थ हें ज्याचें स्वरूप आहे, किंवा व्यक्त व अव्यक्त हें ज्याचें स्वरूप आहे, अशा स्व-ला स्वतःचीच कारणता कशी असेल? आत्माच आपलें कारण कसा होईल? परमार्थदृष्टींत आभासशून्य ज्ञानरूप एक आत्म्याला कारणता कोठची? शिवाय व्यवहारांत अद्वय असत् आहे व द्वैत सत् आहे. परमार्थांत अद्वय सत् व द्वैत असत्. त्यामुळें अशा सत्-असत् प्रपंच-परमार्थाला कार्य-कारणता आहे असें सांगतां येणें शक्य नाहीं. जें कोणाचेंही बीज नाहीं व अव्यक्त असल्यामुळें कोणाचें कारण नाहीं, त्या व्यापक आत्मस्वरूपापासून प्रमाणप्रमेयादि जगत् उत्पन्न होत नाहीं. आत्मरूप कर्तृ-कर्म-करणरहित, सत्य, चिद्घन, अक्षत, आभासरहित व स्वयंवेदन

आहे. यास्तव हे मुने ! परब्रह्मापासून कांहीं उत्पन्न होत नाहीं. मीं तरंग वगैरे जलविकार सकारण आहेत असें सांगितलें. पण विचार केला असतां तरंगादिक जलाहून भिन्न असतात का? नाहीं. मग देश-कालपरिच्छेदशून्य परतत्त्वाहून अकारण जगत् निराळें कसें असणार ?

शिखिध्वजः—जलादिकांत जें तरंगादिक असतें तें सकारण आहे व परमात्म्यांत जें अहंतादि जगत् आहे तेंही सकारण आहे, असें मी समजत नाहीं.

कुंभः—हे राजा, आतां तूं हें सत्य तत्त्वतः जाणलें आहेस. हें अहंतादि जगत् याच्या ठिकाणीं नाहीं. त्याला स्वतःची सत्ता नाहीं. जगत् या शब्दानें व त्याच्या अर्थानें रहित असें जगत् शिवात्मक आहे. ज्याप्रमाणें आकाशांत त्याहून सूक्ष्म अशा मायाकाशानें निर्माण केलेलें गंधर्वनगर मिथ्या असल्यामुळें नित्य शांत असतें, किंवा अशून्य आकाशांत त्याच्या विरुद्ध असलेलें शून्यत्व आकाशसत्तेनेंच राहतें, त्याप्रमाणें मायाशबल ब्रह्मामध्यें हें जगत् आहे. हें जगत् आत्मरूपासारखें म्ह० चिन्मात्रस्वरूप आहे असें सम्यक् जाणलें असतां किंवा तें कोणत्याच रूपासारखें नाहीं, म्हणजे सर्वथा शून्यच आहे, असें जाणलें असतां स्वतः साक्षात् शिव ब्रह्मच होतें. सम्यक्ज्ञानाच्या प्रभावानें विषही अमृतासारखें हितावह होतें, पण तत्त्वाला अयथार्थतः जाणल्यास तें शिवच अत्यंत दुःखप्रद जगत् होतें. विषबुद्धीनें अमृताचें जरी प्राशन केलें तरी तें विषरसासारखा परिणाम करते. त्याच न्यायानें चिदीश्वराला विद्यासहाय किंवा अविद्यासहाय जसें जाणावें तसाच तो शिव तत्काल तद्रूप होतो. तिमिररोगादिकांच्या योगानें जसे विचित्र भ्रम होतात त्याचप्रमाणें ब्रह्मसत्ता विचित्राकार विभ्रमांनीं जरी विकास पावलेली असली तरी एकरूपच स्थित आहे. जें चित्स्वरूपानें स्थित असलेलें परब्रह्म तेंच स्वरूपांत मंद प्रबोधयुक्त होऊन देह, देही इत्यादि व जगदादिरूपानें प्रत्ययास येतें. म्ह० तें मंद प्रबोधामुळेंच तसें भासतें. केवळ शिवस्वरूप परमात्मतत्त्वच हें असें भासत आहे. यास्तव जगत्, अहंता इत्यादिकांविषयीं प्रश्नच उचित नाहीं. जी वस्तु विद्यमान व सद्रूप असते तिच्याविषयीं प्रश्न केला तर तो शोभतो. ज्याचें प्रमाणतः निरूपण करूं लागलें असतां तें नाहींसेंच होतें, त्याचा अनुभव कसा येतो, असा प्रश्न करणेंही उचित नाहीं. कांहीं तरी आकार प्राप्त झाल्यावांचून सोन्याची सत्ता जशी सिद्ध होत नाहीं त्याप्रमाणें जगत्, अहंभाव यांवांचून ईश्वराची संस्थिति होत नाहीं. जगाचें योग्य कारणच नसल्यामुळें हें जगत् नाहीं, तर हें ब्रह्मच असें विकास पावलें आहे. (जर पृथिव्यादिक नाहींतच, तर मग यः पृथिव्यां तिष्ठन्० इत्यादि श्रुतींत अन्तर्यामी ईश्वराकडून प्रेरणा केले गेलेले हे सर्व भाव आपापल्या कार्यांत प्रवृत्त होतात' असें कसें म्हटलें आहे, म्हणून विचारशील तर सांगतों— ) सर्व भाव मायाशबल ईश्वरमय आहेत. त्यांना मायाशबल ईश्वरानें मायेनेंच परस्पर ग्रामाग्रिरूपानें मिळून जाण्यासाठीं प्रेरणा केली असतां पंचभूतात्मक पिंडांत मायिकच व्यवहार करितात. याविषयीं दृष्टान्त—जशीं स्त्रीपुरुषांचीं जोडपीं तारुण्यांत कामाकडून प्रेरित होत्सातीं परस्परांचा संभोग घेऊन पुत्रादिकांना उत्पन्न करणें हा चमत्कार करूं शकतात, किंवा जशीं भूमींत असलेलीं बीजें वृष्टिजलानें प्रेरित होत्सातीं अंकुरोदयानें चमत्कार करितात, त्याप्रमाणें ईश्वरप्रेरणेनें सर्व पदार्थ आपापलें कार्य करूं शकतात. तसेंच आवृत चिन्मात्रच

मार्थिक नानारूपानें नाना होऊन त्या त्या कार्यरूपानें परिच्छिन्न होतें. जसें तेंच चिन्मात्र स्वात्मज्ञानरूपानें स्वतःच व्याप्त होऊन पारमार्थिकरूपानें चमत्कार करतें, त्याप्रमाणें प्रलयसमयीं वासनामात्र अवशिष्ट राहून सर्व उपाधींचा प्रलय झाला असतां मायाशबल ब्रह्मांत लय पावलेले जीव कल्पाच्या आरंभीं भोक्त्या जीवांच्या अदृष्टाचा परिपाक झाला असतां पुनः आपापल्या व्यष्टि-समष्टि उपाधींस उत्पन्न करून जो उद्धार करितात, तो अपरिच्छिन्न कारण ब्रम्हापासून अपारीच्छिन्न ब्रह्मरूप कार्यांचाच मायेनें उद्धार करितात. तसेंच ते जीव स्थितिकालीं जें अवांतर कार्यजात–ऐहिक भोग व पारलौकिक मोक्ष यांचीं साधनें करितात, तींही पूर्णापासून मायेनें पूर्णरूपच करितात. त्यांनीं तीं पूर्णब्रम्हापासून पूर्णब्रह्मरूपच केलीं आहेत. त्यानंतर तत्त्वज्ञानानें ते जीव जे मुक्त होतात, तेहि मायेचा क्षय झाल्यामुळें पूर्णरूप होतात. मायेचा बाध होऊन भ्रामक भ्रमाची निवृत्ति झाली असतां पूर्ण ब्रम्हच अवशिष्ट राहतें. चिन्मात्रमय आत्म्यामध्यें जें सृष्टिज्ञान स्फुरतें, तें चिन्मात्रामध्यें चिन्मात्वच वस्तुतः स्फुरण पावलेलें नसतानांच स्फुरलेलेंसें भासतें. प्रत्यगात्मरूप चित्-च सृष्टीच्या आरंभीं आपलें निरामय स्वरूप न सोडतांच स्वतःच तेजोरूप, अनन्त मनोरूप होतें. त्यानंतर स्थूलत्वाची कल्पना करून भासणारें असें होऊन तें विराड्भावानें जणुंकाय संसरणरूपसें होतें. नंतर व्यष्टिजीवभावानें हें जगत् भ्रांतीनें तो सत्च पाहतो. किंवा परमार्थदृष्टच्या जगांत अधिष्ठान सत्च पाहतो. अर्थात् सत् या अंशीं केव्हांही भ्रांति नाहीं. तें चिन्मात्व भावनेमुळें चार प्रकारच्या भूतत्वास प्राप्त होतें व क्षणांत दृश्य बनतें. येणेंप्रमाणें शांत, स्वभावतः नाम-रूपरहित, म्हणूनच निर्देश करतां न येणारा, एक स्वप्रकाशरूप असलेला जो अनुभव तेंच आत्मरूप स्वचमत्करण, माया, तिचा अनुभव, अशा आकाराचें होऊन जगदाकारानेंसें अवस्थित आहे. ९६.



---

## सर्ग ९७ वा.

१ चित्‌ची दृश्यवेदनता येथें मोठ्या यत्नानें घालविली जाते.

कुंभः—देश व काल यांनीं परिच्छिन्न झालेल्या सोन्यांत विकाराच्या उत्पत्तीचा क्रम हा असा आहे. शांत ब्रह्मापासून कांहीं उत्पन्न होत नाहीं व त्यांत कांहीं विलीन होत नाहीं. ब्रह्म स्वसत्तेंत स्थित आहे. तें बीज नाहीं व कारणही नाहीं. तें शुद्ध अनुभवमात्र आहे. त्याहून दुसरें जगत्, अहंता इत्यादि कांहीं विद्यमान नाहीं. तेंच एक अनन्त–अपरिच्छिन्न आहे.

शिखिध्वजः—मुने ! शिवस्वरूप ब्रम्हामध्यें जगत्, अहंता इत्यादि नाहीं, हें मी जाणतों. पण शुद्ध चित्-ला या सृष्टीचें ज्ञान कसें होतें, तें मला सत्वर सांग.

कुंभः—तें आदि-अन्तरहित अधिष्ठानसन्मात्रच आपल्यावरील आरोपित पदार्थांचा अनुभवसें होऊन राहतें. म्हणूनच त्याच्यावर आरोपिलेलें भुवन तन्मात्र आहे. त्यालाच जगदाकार असें म्हटलें जातें. ( विज्ञानवादी बौद्ध ‘ भुवनादिरूप अर्थ आंतील विज्ञानाचा परिणामच आहे, पण तो अज्ञानानें बाहेर असल्यासारखा वाटतो, ’ असें म्हणतात. गौतम, कणाद, कपिल, पतंजलि इत्यादिक ‘ पृथिव्यादि भूतपंचकमय बाह्य अर्थ परमार्थभूत–खरा आहे, ’ असें ह्मणतात. माध्यमिक ‘ शून्यच बाह्य-ग्राह्य व आन्तर ग्राहक या भावानें अज्ञानामुळें अनुभवास येतें, त्यांत वास्तविक

असें कांहीं नाहीं,' असें म्हणतात. या तिन्ही मतांचें निरसन–) बाह्य पदार्थ विज्ञानमय नाहींत. परमार्थताही नाहीं व शून्यताही नाहीं. कारण वरील वाद्यांच्या कल्पना वेदना–संज्ञान असलें तरच उपपन्न होतात, त्याच्या अभावीं त्यांचा संभवच नाहीं. यास्तव त्या वेदनेला –ज्ञानाला शून्यत्व, क्षणिकत्व, जन्यत्व व परिणामत्व आहे, असें कोणालाही केव्हांही म्हणतां येणें शक्य नाहीं. यास्तव तें संवेदन हेंच या जगांतील सार आहे. आतां चित् हेंच सार कसें तें सांगितलें जातें. जसें–द्रवत्व हा पाण्याचा रस तसें सर्व वस्तूंचें चैतन्य हें सार आहे. कारण चैतन्य ही वस्तु जर नसेल तर त्याची सिद्धि करणारें प्रमाणच नसल्यामुळें सर्व जगत् ' आहे, नाहीं, ' इत्यादि निर्देशास योग्य होणार नाहीं. अर्थात् असें तें जगत् काय असेल, याचा विचार कर पाहूं. अशा रीतीनें रसभूत असलेल्या चित्चें अचित्त्व कारणांनीं निरूपण करतां येत नाहीं. ( तर तुम्ही तरी चित्च्या जगत्प्रत्ययतेचें उपपादन कसें करणार ? उत्तर–) तें चिद्रूप स्वात्म्यामध्यें जगदाकारानें किंवा परमार्थचिन्मात्ररूपानें अनुभवास येण्यास आपल्या मायेनें समर्थ आहे. यास्तव तें अविद्येसह किंवा अविद्येवांचून जसें स्थित आहे तसेंच प्रतीतीनेंही अवस्थित आहे. ( अहो, पण तें स्वच्छ व अस्वच्छ या दोन्ही भावांनीं अवस्थित होण्यास जर समर्थ आहे तर स्वच्छत्त्व हाच एक त्याचा स्वभाव आहे, असा निश्चय कसा करतां ? उत्तर–) स्वच्छता हा सत्त्वाचा स्वभाव आहे, व अस्वच्छता हा त्याच्याविरुद्ध भाव आहे. त्यानें स्वविरोधी सत्त्वाचा व्यवच्छेद जरी केला किंवा केला नाहीं, तरी तो स्वतः सिद्ध होणार नाहीं. अर्थात् सत्त्व व तद्विरोधी भाव यांना प्रतियोगिव्यवच्छेदाचा अभाव आहे. त्यामुळें अस्वच्छत्वाला असत्त्व आहे. म्हणून परम सद्वस्तूमध्यें केवल स्वच्छभावच आहे, अशी व्यवस्था करतां येते. ( अहो, पण अस्वच्छत्वाचा अत्यंत अपलाप कां करतां ? स्वच्छ चिद्रूपच अस्वच्छ जगाचें कारण होण्यास योग्य आहे, असें कां म्हणत नाहीं ? उत्तर–) जर शांत पदही कारण होण्यास योग्य होईल तर तें कूटस्थ, आभासरहित व अप्रतर्क्य कसें असेल ? ( श्रुति व विद्वानांचा अनुभव यांच्याशीं विरोध येत असल्यामुळें तशी कल्पना करतां येत नाहीं. ) यास्तव ब्रम्ह केव्हांही कोणत्याही कार्याचें कारण नाहीं व बीज नाहीं. त्यामुळें सर्ग विद्यमान नाहीं. चित्-वर जगाचा अध्यास झाला आहे, हाच एक पक्ष स्वीकारल्यावांचून–दुसऱ्या कोणत्याही प्रकारें या सर्गाची उपपत्ति लागत नाहीं. यास्तव जड सृष्टि विद्यमान नाहीं. हें जें कांहीं अहंभाव, जगत्, शब्द, शब्दार्थ इत्यादि रसांनीं रंजित झालेलें जगत् दिसत आहे, तें चैतन्यघनच जणुं काय उत्पन्न झालें आहे. ( हें सर्व कारणावांचूनच उत्पन्न झालें आहे, हा यदृच्छावाद्याचा पक्ष घेऊन त्याचें निरसन–) कारणाच्या अभावीं कार्य उपपन्न होत नाहीं. द्वित्व-ऐक्यादिरूप जगत् आकाशपुष्पाप्रमाणें आहे. म्ह० त्यांतील जडांश शब्दमात्र आहे. बरें, तें केवल चिद्रूपच असेल म्हणून म्हणावें, तर तसेंही म्हणतां येत नाहीं. कारण घटपटादि वस्तूंचा नियमानें नाश होतो. नाश कोणाला तरी कळला पाहिजे, त्यावांचून त्याची सिद्धिच होत नाहीं. घटादि जगत चिद्रूप जर असेल तर त्याचा नाश कळणार कोणाला ? चित–चा नाश चिद्रूपच आहे, त्यामुळें त्याला दुसऱ्या चित्ची अपेक्षा नाहीं, म्हणून म्हणावें तर तेंही बरोबर नाहीं. कारण चिद्रूप संविन्नाश आपल्या जन्माचा व त्याच्या

स्वप्रतियोगिचा प्रकाशक आहे. कारण आपली उत्पत्ति किंवा तत्पूर्वकालीन प्रतियोगी चित् नाशानें उपलब्ध होणें शक्य नाहीं; आणि त्या दोघांचाही उपलंभ न झाल्यास त्याचा नाश आपोआपच झाला आहे, असा अनुभव घेतां येत नाहीं. बरें, साक्षीच त्या दोघांचा अनुभव घेईल म्हणून म्हणावें, तर चित् चित्चा विषय होऊं शकत नाहीं. यास्तव विषयोत्पत्ति व नाश व जगत् यांना जाड्यच आहे. याप्रमाणें जगाचें जाड्य सिद्ध झालें असतां त्याच्या कारणाचें निरूपण करतां येत नाहीं, आणि कारणावांचूनच त्याची उत्पत्ति होते म्हणून म्हटल्यास जगाची नेहमींच उत्पत्ति व नित्य नाश होईल! कारण त्या दोघांचेंही निवारण करणारें कोणी नाहीं. तस्मात् हे स्वभाववादिन्! तूं प्रमाणशून्य व अनुभवाच्या विरुद्ध अशी ही जगाची उत्पत्ति व नाश जर मानीत आहेस, तर श्रुति व अनुभव यांनीं सिद्ध अशा अखंड-एकरस चित्तत्त्वाला मानण्याचें तुला इतकें संकट कां पडतें? कारण युक्तिशून्य मानणाराला युक्तियुक्त वस्तु मानण्यांत कांहींच व्यथा नाहीं. (सर्वच जर चिदेकरस आहे, तर चित् व अचित् असा दोन प्रकारचा अनुभव कां येतो? उत्तर—) हा जो अनुभव येतो तो सर्व चित्ताचा चमत्कार आहे. केवल चित्-तत्त्वाची सत्ता आहे. द्वित्व व एकत्व हीं दोन्ही वस्तुतः नाहींतच. याप्रमाणें पदार्थाच्या सत्तेचाच अभाव झाला असतां भावनांचा असंभव होतो, आणि त्यामुळें हे राजा! तुझी अहंता-भावना संभवत नाहीं. अहंभावाचाच जर असंभव आहे, तर चितूहून चित्त निराळें आहे, हें कसें म्हणतां येईल? याप्रमाणें अहंरूप चित्त नाहीं. त्यामुळें भिन्नता नाहीं. जीवब्रह्मभेद, चिदाचिद्भेद, द्रष्टृ-दृश्यभेद इत्यादि भेद नाहीं. तूं वासनाशून्य, सर्वथा शांतचित्त, मौनी, परमाकाशमय आहेस. तूं सदेह किंवा विदेह जरी असलास तरी पर्वतासारखा आत्मभावस्थ रहा. शुद्ध चिद्-दृष्टीचा लाभ झाल्यामुळें व जड पदार्थांची असिद्धि झाल्यामुळें त्याच्या भावनेमुळें प्राप्त होणारें अहं असें जीवरूपही नाहींच, त्यामुळें स्वयं आत्माच अवशिष्ट राहतो. तसला आत्माच ब्रह्म आहे, अशी वेदार्थाची भावना केल्यामुळें व त्याचा अनुभव आल्यामुळें व ब्रह्मचिंतनानें दृढ झालेला ब्रह्मरूप एक अर्थ सत्य असल्यामुळें ब्रह्मचिंतेचाही शेवटीं बाध होतो. त्यामुळें ब्रह्माच्या साक्षात्कारानंतर ब्रह्मातिरिक्त वस्तु अवशिष्ट रहात नाहीं. याप्रमाणें सर्व द्वैताचा बाध होऊन तूं निर्मल, अकारण, आदिमुक्त, शाश्वत ब्रह्मच आहेस. तें ब्रह्म सर्व आहे. अनेक व एक बनलेलें हें सर्व जगत् शून्य आहे. जगत्प्रतिभानरूप चित्ही अविकृत ब्रह्मच आहे. यास्तव तेंच एक निरामय ब्रह्म अवशिष्ट राहिलेलें आहे. ९७

---

## सर्ग ९८ वा.

१. चित्त नाहीं, हा बोध दृढ होण्यासाठीं विषयाच्या अभावीं अचित्त झालेलें तें सद्ब्रह्मच आहे, असें वर्णन.

शिखिध्वजः—‘चित्त नाहीं’ असा मला स्पष्ट बोध ज्या युक्तीनें होईल ती युक्ति मला सांग. कारण मला अद्यापि बरोबर बोध झाला नाहीं.

कुंभः—हे राजन्! चित्त केव्हांही व कोठेंही नाहीं. हें जें कांहीं चित्तासारखें भासत आहे तें अव्यय ब्रह्माख्य तत्त्व आहे. यास्तव जें अज्ञानात्मक जगत् तेंच विद्यमान् नाहीं. मग त्या जगांतील मी, तूं, तो इत्यादि कल्पित

संज्ञा कोठच्या! हें जगत्च नाहीं. हें जें कांहीं उदय पावलें आहे तें सर्व ब्रह्मच आहे. तेव्हां तें कोणाकडून कसें जाणलें जाणार? महाप्रलयानंतर होणारा जो सर्ग त्याच्या आरंभींच हें जगत् उदय पावलेलें नाहीं. तथापि तुझ्या बोधासाठीं मीं त्याचा 'हें' असा निर्देश केला आहे. या जगाच्या उपादानात्मक सर्व कारणांचा अभाव आहे; आणि सर्व पदार्थांचा कारणावांचून असंभव आहे. याप्रमाणें हें जगत् अज्ञानाचा परिणाम अशी जी बुद्धि तदात्मक आहे. त्यामुळें तें वस्तुतः विद्यमान् नाहीं. म्हणून हें जें कांहीं भासत आहे, तें भासन ब्रह्म आहे, दुसरें कांहीं नाहीं. नामरहित व रूपरहित अशा देवाच्या ठिकाणीं अज्ञान सर्व युक्तिशून्य असें हें सर्व करतें, म्हणून तें असत् आहे. श्रुति व विद्वदनुभव यांनीं तें बाधित झाल्यामुळें सत्य नाहीं. लौकिकांकडून त्याचा अनुभव घेतला जात नाहीं. ईश्वर नामरहित आहे. मनुष्य शीत-वातादिकांच्या प्रतिघाताचें निवारण करण्यासाठीं गृहादिकांना निर्माण करतो, हें प्रसिद्ध आहे. पण ईश्वराला कशाचा प्रतिघातच होत नाहीं. शिवाय तो स्वात्मा निराकार आहे. अर्थात् अशा प्रकारचा ईश्वर जगत् निर्माण करतो, हें अबुद्धिमानांचें बोलणें तज्ज्ञांच्या उपहासालाच कारण होतें. याच युक्तीनें चित्त विद्यमान नाहीं. हे साधो! जगत्च जर सत् नाहीं, तर त्यांतील चित्तादिक कोठचें? कारण चित्त वासनामात्र आहे. पण वासनेचा विषय असला तर वासना होणार. वास्य—वासनाविषय जगत् आहे. तें तर असत्, तेव्हां चित्ताचें अस्तित्व कोठचें? हें ब्रह्म स्वतः आपणच आपल्यामध्ये स्वरूपानें विकार पावतें त्यानें स्वतःचेंच चित्त असें नांव ठेवलें आहे. हें दृश्य जगत् वास्य म्हणजे वासनेचा विषय आहे. तें पूर्वींच कारणाच्या अभावामुळें उत्पन्नच झालेलें नाहीं. तेव्हां चित्तता कोठची? यास्तव चिदाकाशमात्रस्वरूप, परमाकाशनामक असें हें विस्तृत वेदनच स्फुरण पावत आहे. त्यांत जगत् कोठचें? परमाकाशरूप चिदादर्शांत हें जें कांहीं अनिर्वाच्य मायारूप अल्पसें चकाकत आहे तें वस्तुतः उत्पन्न झालेलें नाहीं. चित्त नाहीं व जगत्क्रियाही नाहीं. मी, तूं व जगत् ही कल्पना खरी नव्हे. सर्व अनर्थ करणारी 'अहं,' 'जगत्' इत्यादि ही कल्पना मज साक्षीला खरोखरच मिथ्या भासत आहे. वास्य जगाच्या अभावामुळें ज्याअर्थीं वासना नाहींच, त्याअर्थीं वासनात्मक चित्त कशा प्रकारचें, कोठें, कोणत्या कारणानें व कसें असणार? अज्ञानी जनांनीं चित्त, व त्याचें दृश्य असें हें जगत् जाणलें आहे. पण चित् असत् व निराकार आहे. तें अगोदरच उत्पन्न झालेलें नाहीं. कारणाच्या आभावामुळें तें सर्गाच्या आरंभींच सर्वदा उत्पन्न झालेलें नाहीं. बरें, तें उत्पन्न झालेलें नसल्यामुळें अनादि नित्य असेल म्हणून म्हणावें, तर दृश्य वस्तूचें अनादित्व किंवा जन्मादिविक्रियाराहित्य किंवा कूटस्थत्व लोकतः, शास्त्रतः किंवा अनुभवतः उपपन्न होत नाहीं. साकार, स्थूल, ज्याची आकृति प्रतिघाताला योग्य आहे, अशा या जगाचे लोक, शास्त्र व अनुभव यांच्या योगानें सिद्ध होणारे जे उलट क्रमानें[१] महाप्रलयापर्यंत सर्व विकार त्यांचें निराकरण करतां येणें शक्य नाहीं. कारण निराकरणाचीं उपपादक अशीं सर्व कारणें विद्यमान नाहींत. शास्त्र, अनुभव व वेदार्थसिद्धान्त यांनीं सिद्ध झालेले ते तिन्ही भाव अथवा प्रलय नाहींत असें जो म्हणतो, तो उन्मत्तच होय. ज्याच्या मतीला लोक, शास्त्रें व वेद प्रमाण नाहींत, तो अस-

१ ज्या क्रमानें उत्पत्ति होते त्याच्या उलट क्रमानें प्रलय होतो, हें प्रसिद्ध आहे.

ज्ञनांहून अतिमूढ आहे. सज्जनानें त्याचा आश्रय करूं नये. प्रतिघातयुक्त अशा या दृश्याचें अप्रतिघ ब्रम्ह केव्हांही कारण होण्यास समर्थ नाहीं. त्याचप्रमाणें त्या साकार दृश्याचें निराकार ब्रम्ह कारण संभवत नाहीं. हे मुने! याप्रमाणें सतत ब्रम्हमात्रत्वानें प्रतीत होणारें हें जगत् व्यवहार करण्यास समर्थ आहेच. त्यामुळें लोकविरोध येत नाहीं. त्याचप्रमाणें तें परमार्थतः ब्रम्हीभूत आहे. त्यामुळें तें अज्ञजनांच्या दृष्टीला जसें दिसतें तसें वस्तुतः नाहीं. त्यामुळें वेदविरोधही नाहीं. सारांश, निरंश, चिदाकाशरूप, अप्रतिघाकार, आकार-शून्य, अनन्त, पूर्वाहून पूर्व असें, निरवयव, पूर्णस्वभाव, शांत, सर्वव्यापी ब्रम्हाचें जें सर्वत्र सम स्वतःच आत्मस्फुरण तें स्वरूपच सर्ग-प्रलयरूप धारण करणारें जगत्-सें अज्ञान असेपर्यंत भासतें. पण तेंच स्वरूप ज्ञानकाळीं तत्त्वमस्यादि वाक्यांनीं ज्ञात झालें असतां आपल्या अद्वैत स्वभावांत ब्रम्हरूपच राहतें. यास्तव हें सर्व ब्रम्हच आहे. जगदादि बुद्धि कोठेंही नाहीं. मग केव्हां केव्हां होणारी द्वैतै-क्यादि कल्पना कोठची? याप्रमाणें जाणलें असतां सर्व जगत् अत्यंत शांत होऊन निरा-धार अज यथास्थित सद्ब्रम्हच आहे. पण हें अज्ञांना दिलेलें रूप अत्यंत असत् असल्या-मुळें नाना किंवा अनानाही नाहीं. यास्तव जसा प्रसंग येईल त्याप्रमाणें व्यवहार करीत वागादि व्यापारशून्य होऊन रहा ९८.

---

## सर्ग ९९ वा.

१ राजाचा बोध स्थूणानिखननन्यायानें दृढ व्हावा म्हणून कुंभ पुनः उपदेश करतो.

शिखिध्वजः—हे महामुने! माझा मोह नष्ट झाला. विस्मृत आत्म्याचा साक्षात्कार होणें हीच स्मृति असल्यामुळें तुझ्या प्रसाद मला ती स्मृतिही झाली. मी आतां निःसं होऊन स्थित आहें. माझी मति विश्र पावली आहे व मी अगदीं सावधान अ मला ज्ञेय तत्त्व ज्ञात झालें आहे. मी महाम आहें. मीं मायारूप महासागराचें उल्लं केलें आहे. मी शांत आहें, अहंकाररूप ना मी ज्ञानी व निरामय— स्वस्थ स्थित आ खरोखर मीं अत्यंत दीर्घकाल भवसाग अतिशय भ्रमण केलें, पण आतां अक्षय अक्षुब्ध स्थानास प्राप्त झालों आहें. हे मु असें असतां मूर्खाला दिसणारें हें अहंतादि सह जगत्रय नाहीं व जें भासत आहे तें आहे; असें मी जाणतों.

कुंभ—जेथें जगत्च नाहीं, तेथें मी असा हा भासणारा गंधर्व-नगर-व्यवहार क कोणत्या निमित्तानें व कसा असणार? या हे राजन्! तूं यथाप्राप्त व्यवहार करीत, मौ शांतचित्त, मुनि, सौम्य, सागराच्या उद अत्यंत शांत झालेल्या आवर्ताच्या परिस्पं प्रमाणें स्थिर रहा. हें शांत ब्रह्मस्वरूप अ यथास्थित आहे. मी व हें जगत् अशा प्रका शब्दार्थस्वरूप आकाशमय आहे. संसार नांवाचें हें सर्व आदिअंतरहित आहे. चि त्कृति या नांवाचें जें आत्मरूप आकाश स्वतःच्या चकाकीनें असें चमकत आहे. दा न्याचा आकार शांत झाला असतां सोनें अवशिष्ट राहतें, त्याप्रमाणें जगदादि विषय चांगली शांति झाली असतां हें ब्रह्मच शिष्ट राहतें. जसा समष्टि-अहंकारात्मा स्व संकल्पमात्र, तसा स्वतः व्यष्टि-अहंका संकल्पमात्रच आहे. यास्तव समष्टि-व्यष्टि व त्यांचा मोक्ष हे दोन्ही त्यांविषयींचा अ मान व त्याचा परित्याग यांच्या वेदना आहेत. 'अहं' हाच संकल्प बंधाला व अ

नाशाला कारण होतो, व मी नाहीं, हा संकल्प शुद्धस्वरूप मोक्षाला कारण होतो. सदा पर्यायानें असणाऱ्या बंध-मोक्षसंकल्पांचें जें साक्षिभूत स्वरूपवेदन त्यालाच सत्, ब्रह्म, कैवल्य असें म्हणतात. 'अहं' असें न जाणणें हीच सिद्धि व 'अहं' असें जाणणें ह्याच सर्व आपत्ति; तो तूं 'अहं' च 'अनहं' आहे, असा शुद्ध कैवल्यात्मबोधवान् हो. केवल संकल्प सोडल्यानेंच सम्यक् ज्ञानाचा उदय होतो, आणि असदात्मक संकल्प सिद्धी-साठीं आपोआप क्षीण होतो. ज्याचा तर्कच करतां येत नाहीं अशा शिवस्वरूपामध्यें कारणता नाहीं. कारणाच्या अभावामुळें कार्यरूप पदार्थही विद्यमान नाहीं. पदार्थांचा अभाव सिद्ध झाला असतां विषयज्ञान संभवत नाहीं. त्याच्या अभावीं अहंभावाचा केव्हांच उदय होत नाहीं आणि अहंभावाचाच जर अनुदय झाला तर संसार कोणाचा व कशा प्रकारचा? संसाराचा अभाव झाला म्हणजे सर्व पर ब्रह्मच अवशिष्ट राहतें. हें जें भासत आहे तें सत् पर ब्रह्मच स्वरूपांत स्थित आहे. तें तसें असलेलें तत्त्वज्ञानानें व्यक्त होतें. तें अपूर्वच ज्ञात होतें, असें नाहीं. तर पूर्वसमच स्वरूपांत असलेलें अभिव्यक्त होतें. त्यामुळें सर्व निस्तिमित, शिलांनीं व्यापलेल्या पर्वतासारखें, रश्मिमय आकाराचेंसें ब्रह्म जगत् होऊन राहिलें आहे, असें तूं जाण. नगराविषयींचा संकल्प नष्ट झाला असतां संकल्पनगराचें जें स्वरूप तेंच जगाचें आकाशाहूनही स्वच्छ सदसन्मय स्वरूप तूं जाण. रत्नांत पुरुषाचें प्रतिबिंब जसें, तसेंच अचल ब्रह्मांत हें जगत् आहे. तें वस्तुतः शांत व मननरहित आहे. तें जगत् हा शब्द व त्याचा अर्थ यांनीं रहित आहे, असें जो पाहतो तोच खरोखर पाहतो. सम्यग्ज्ञानाचा उदय झाला असतां बाह्य रूपालोक व आंतर मनस्कार निःसार आहेत, अशी आगमप्रमाण-जन्य भावना होते. तीच निर्वाणाला कारण होणारी असल्यामुळें तिला निर्वाण असें म्हणतात. जसा स्पंदरहित वात असतो, किंवा आकाशांतील प्रकाश दीपादि आधारावांचून असतो किंवा आकारावांचून सोनें असतें, तसें आकाररहित जगत् ब्रह्म आहे. ब्रह्मरूपी व जगाचा जगत् या आकारानें प्रत्यय देणारे हे सर्व रूपालोक व मनस्कार नीरस म्हणजे मिथ्या भासणारे आहेत. ज्याप्रमाणें समुद्रांत तरंगादिरूपानें असंख्य असलेलें जल, तरंग हा शब्द व त्याचा अर्थ यांनीं रहित एक जलच असतें, त्याप्रमाणें सृष्टि हा शब्द व त्याचा अर्थ यांनीं रहित असलेलें हें सर्गरहित एक ब्रह्मच आहे. कारण सर्ग हेंच पर ब्रह्म आहे व पर ब्रह्मच सर्वसाक्षी आहे. सर्ग हा शब्द व त्याचा अर्थ यांनीं रहित असा हा शाश्वत वाक्यार्थ आहे. ब्रह्म शब्दाचा 'फार मोठा' हा अर्थ कळावा म्हणून लोकांत सर्ग हा शब्द व त्याचा अर्थ यांची कल्पना केली आहे. त्याचप्रमाणें सर्ग म्ह० नामरूपांचा त्याग, असा 'सर्ग' हा शब्द व त्याचा अर्थ सिद्ध व्हावा म्हणून 'ब्रह्म' हा शब्द व त्याचा अर्थ यांची कल्पना केली आहे. समस्त शब्द व शब्दार्थ यांच्या भावनेचा व अभावनेचा उदय ज्याच्यापासून होतो तें सर्व भावनांचा त्याग केल्यावर राहणारें शुद्ध चिदाकाश ब्रह्मशब्दानें सांगितलें जातें. सम्यग्दर्शनाची सिद्धि झाली असतां शब्द व अर्थ या दोघांचेंही भान होत नाहीं. त्यानंतर जी अजर व शांत वस्तु अवशिष्ट राहते तिच्यापासून वाक्-ही निवृत्त होते. हे राजन्! हें सर्व जगत्स्वरूप असेंच्या तसेंच जें आहे तेंही अति दृढ असल्यामुळें वज्रपाषाण-रूप पर ब्रह्मस्वरूप आहेच. जेव्हां हें जगत् अज्ञानानें सर्वात्मक वेदनाला आच्छादित

करून राहतें तेव्हांही एकात्मकस्वस्वरूप सत् आहेच. त्यामुळें ब्रह्म व जगत् यांची एकच सत्ता आहे. कशाचेंही असत्त्व नाहीं. ९९.

---

## सर्ग १०० वा.

१ ब्रम्हाप्रमाणें जगाला सत्व असेल या भ्रांतीचें निवारण, व २ जन्मादि विकारशून्य ब्रम्हच सत् आहे, असें प्रतिपादन.

शिखिध्वजः—अहो, पण जगत् व ब्रम्ह यांची जर एकच सत्ता असेल तर त्या सत्तेनें ब्रह्माप्रमाणें जगत्‌ही परमार्थसत्य कां नाहीं? कारण मिथ्या वस्तूचें कारण निरूपण करतां येत नाहीं. यास्तव सत्य जगाचें सत्य ब्रह्मच कारण आहे, असें मी समजतों.

कुंभ—हे राजा! जेथें कारणता असेल तेथें त्याचें कार्य त्याच्यासारखेंच असतें, असें म्हणतां येतें. पण जें मुळीं कारणच नाहीं त्याच्यापासून कार्य कोठून होणार? या सर्गाचें कांहीं कारण नाहीं. त्यामुळें कार्यही केव्हांच नाहीं. हें सर्व विद्यमान असलेलें जगत् सर्व शांत अज ब्रह्म आहे. जें कार्य कारणापासून होतें तें कारणवत् असतें. पण जें मुळीं उत्पन्नच होत नाहीं त्यांत सदृशता कोठची? ज्याचें बीजच नाहीं तें उत्पन्न कसें होतें, तें सांग पाहूं! जें अप्रतर्क्य व अनिर्वाच्य त्याची बीजता कोठची? सर्व पदार्थ योग्य देश, काल यांच्या योगानें प्रमाणतः कारणरूप होतात. पण ज्या प्रमाणाचा अकर्तृ ब्रम्ह हा विषय आहे, त्या प्रमाणानें हेतु व उपादान कारण यांचें यथार्थज्ञान कसें होणार? कर्तृ-कर्म-करणरहित शिवामध्यें कारणता नाहीं. म्हणून तें शिव ब्रह्म त्याचें कारण नाहीं. जगत् हा शब्द व त्याचा अर्थ यांचें वेदन ब्रह्मच आहे. यास्तव तूं शुद्धाकाशासारखें जें निर्विशेष स्वरूप तेंच मी आहे असें तत्त्वदृष्टीनें हृदयांत धारण कर. अज्ञ पुरुषाच्या दृष्टीनें तेंच जगद्रूप होऊन राहिलें आहे. जें एक चिन्मात्र, अजर, शांत तत्त्व त्याच्या ज्ञानानेंच जगत् ब्रह्मभावानें संपन्न होतें; व अतत्त्वाकार मनोभ्रांतीनें ब्रम्ह जगाच्या आकारानें भासतें. हे राजा! चित्त नाशस्वभाव आहे. तें नाशात्मक आहे असें समज. ब्रह्मस्वरूपाची हानि हाच नाश आहे. चित्ताचा अन्यथाभाव होणें हाच स्वरूपनाश आहे, असा विद्वानांनीं अनुभव घेतला आहे. तो क्षणभर होणारा स्वरूपविस्मरणरूप नाश कल्पकाल विस्मृत चित्तशब्दानें सांगितला जातो. संकल्पाच्या नाशानें विश्वाचा नाश कसा होतो म्हणून म्हणशील तर सांगतों—विश्वानें आपल्या विश्व[1] या नांवानेंच अभावाचा अंगीकार केला आहे. अर्थात् अशा अर्थानें 'विश्व' म्हटलें जाणारें जगत् विद्यमान कसें असेल? जो हात वर उचलून मोठ्यानें ओरडून 'मी शूद्र आहें' असें म्हणतो तो ब्राह्मण कसा होऊं शकेल? त्याचें ब्राम्हणत्व कसलें! सन्निपातानें ज्याचे पित्त-वातादि धातु प्रकुपित झाले आहेत तो 'मी मेलों आहें' असें जर म्हणूं लागला तर त्याला मृतच समज. त्याचें जीवन हा संभ्रम आहे. जें भ्रमाकार आहे तें अलातचक्र, मृगजळ, द्विचंद्र, बालवेताल इत्यादिकांप्रमाणें आहे; तें सत्य कसें होणार! तें केवल भ्रमरूप, भ्रमात्मक आहे. आंतील अज्ञानभ्रांति हेंच चित्त आहे. अज्ञानालाच चित्त म्हणतात. तें ज्ञानानें बाधित होतें. म्हणूनच तें असत् आहे. तथापि सत्-सारखें अवस्थित आहे. स्वतःला न जाणणें, स्वरूपाला न ओळखणें, हेंच अज्ञान असून

---

१. 'विशति, परमात्मनि एकीभवति इति विश्वं; परमात्म्यामध्यें एकरूप होतें, म्हणून विश्व.

स्वरूपाला जाणणें हेंच ज्ञान आहे. अज्ञानदृष्टया जें आहे असा अनुभव येतो त्याचा ज्ञानदृष्टया क्षय होतो. हे साधो! मृगजळामध्यें जलाचें ज्ञान ही वृथा भ्रांति आहे. कारण हें जल नव्हे, असें ज्ञान झाल्यानें त्याचा बाध होतो. 'हें चित्त' असें म्हणून जें अज्ञान हृदयांत अतिशय वाढलें आहे, तें 'चित्त नाहीं' अशा ज्ञानानें समूल नाश पावतें. जसें रज्जूमध्यें भुजंगत्व अज्ञानभ्रमानें संभवतें, त्याप्रमाणें आत्म्यामध्यें मनोभूत अज्ञानभ्रमानें संभवतें. 'चित्त नाहीं' हें विज्ञान हृदयांत रूढ झालें असतां आंत चित्त, मन, अहंकार इत्यादि जेवढें अज्ञानापासून झालेलें विकारजात आहे तें सर्व विनाश पावतें. चित्त नाहीं, तसेंच हें अहंकारादियुक्त देहादि दुसरें कांहीं नाहीं. तर या जगांत नित्य निर्मल संविद् आहे. त्या मायेनें विमूढ झालेल्या संविदेनें 'संकल्प, चित्त इत्यादि सर्व केलें आहे. पण आतां प्रबुद्ध झालेल्या त्याच संविदेनें 'संकल्प न करणें' याच युक्तीनें त्या सर्वांचा परित्याग केला आहे. हे महाबाहो! अग्नीवर वारा घातला म्हणजे ज्वालासमूह जसा उत्पन्न होतो व वारा घालण्याचें बंद केलें म्हणजे ज्वाला थांबतात, त्याप्रमाणें संकल्पानें जें येतें तें संकल्प सोडल्यानें जातें. समुद्र जसा पाण्यानें व्यापलेला असतो त्याप्रमाणें आत्मतत्त्वैकघन सर्वव्यापक ब्रम्हसत्तेनें सर्व जगत व्यापलें आहे. मी नाहीं, दुसरा कोणी नाहीं, तूं नाहींस, हे सर्व पदार्थ नाहींत. चित्त नाहीं, इंद्रियें नाहींत व आकाश नाहीं. तर एक निर्मल आत्मा आहे. घटादि आकारानें जीवन्मुक्तांकडून तोच हा पाहिला जातो. हें चित्त व हा मी ही कुकल्पना काय आहे? या जगत्त्रयांत कांहीं उत्पन्न होत नाहीं, कांहीं मरत नाहीं. तर सदसद्भावनारूपानें केवल हा चिद्विलास आहे. सर्व आत्मा, पर ब्रह्म आहे. तें नित्य प्रकट व पसरलेलें आहे. द्वित्व व एकत्व नाहीं. भ्रांति नाहीं व क्षोभही नाहीं. मित्रा! सर्व इंद्रियसमूहांत व इंद्रियग्राह्य अग्न्यादि आकारांत सन्मात्रस्वरूप तूं आहेस. त्यामुळे दाहाला कारण होणाऱ्या आध्यात्मिकादि भावांनीं तूं जाळला जात नाहींस. हे मित्रा! निर्मल आकाशरूप व कैवल्य-अनन्तरूप अशा तुझें कांहीं नाश पावत नाहीं व कांहीं वृद्धि पावत नाहीं. इच्छारूप, अनिच्छारूप व क्रियारूप शक्ति तूंच आहेस. कारण किरणाहून भिन्नत्वानें चंद्र उपलब्ध होत नाहीं. जन्मरहित, परिणामरहित, वृद्धिरहित, जरारहित, कारणरहित, नित्य शुद्ध, प्रकाशरूप, निर्विकार, संकल्परहित, स्वस्वरूपपरिचय हीच ज्याची लीला आहे, सन्मात्ररूपानें उदय पावलेलें, सर्व व्यवहारांच्या पूर्वींच सिद्ध असलेलें जें वस्तु तेंच आत्मतत्व आहे. १००.

---

## सर्ग १०१ वा.

—:०:—

१ या सर्गांत ज्ञानाच्या दृढत्वानें राजाची कृतकृत्यता. २ जीवन्मुक्तींत अचित्तत्व, व ३ तत्वाची स्थिति सांगितली जाते.

**श्रीवसिष्ठः**—याप्रमाणें कुंभाच्या त्या अकृत्रिम वचनाची भावना करणारा राजा स्वतः त्या आत्मपदांत क्षणभर परिणत झाला, म्ह० पूर्वभाव सोडून तद्भावास प्राप्त झाला. त्याचे नेत्र स्वभावतःच मिटले, मन निश्चल झालें. त्याची वाक् शांत झाली. तो मुनि शिलातळावर खोदलेल्या प्रतिमेप्रमाणें निश्चल अवयव व आकार यांनीं युक्त झाला. रामा! यानंतर मुहूर्तमात्र वेळ जातांच देहभानावर आलेल्या व नेत्र उघडलेल्या त्या राजाला कुंभरूपिणी चूडाला असें म्हणाली.

**कुंभः**—राजन्! तूं या शुद्ध, अत्यंत

निर्मल, विस्तीर्ण, निर्विकल्प योग्यांचें सुतल्प —सुशय्या अशा निरतिशय आनंदपदीं सुखानें विश्रांति पावला आहेस का ? तूं आंत प्रबुद्ध झाला आहेस का ? तूं आपली भ्रांति सोडली आहेस ना ? तूं ज्ञेयाला जाणलें आहेस का ? सर्व द्रष्टव्य पाहिलें आहेस का ?

शिखिध्वजः—भगवन् ! तुमच्या प्रसादानें महावैभवाची—निरतिशय आनंदाची भूमिका-हिरण्यगर्भाच्या आनंदापर्यंत सर्व विषयानन्दाच्या उत्कर्षाच्या पराकाष्ठेंत स्थित असलेली फार मोठी पदवी मीं पाहिली. अहाहा ! खरोखर, ज्यांना वेद्य ब्रह्म ज्ञात झालें आहे अशा महात्म्या संतांचा संग, संसारांत कदापि न अनुभविलेला असा जो निरतिशय आनंद तत्प्रचुर आहे व त्यामुळेंच तो साररूप फळ देणारा आहे. जें महाअमृत मला सर्व जन्मांत लाधलें नव्हतें, तें आज मीं, महा अमृतस्वरूप होऊन, तुझ्या समागमानें अनायासानें मिळविलें. हे कमलनयना ! हे अनंत आद्य अमृत आत्मपद मला यापूर्वीच कां प्राप्त झालें नाहीं ?

कुंभः—सर्व इंद्रियसमूह व मन यांच्या भोगरूप मलाची निवृत्ति झाली असतां मन शांत होऊन त्यानें सर्व भोगेच्छांचा त्याग केला असतां चित्तांत सद्गुरूंच्या निर्मळ उक्ति, शुभ्र वस्त्रावर केशरी पाण्याचें थेंब जसे, त्याप्रमाणें विश्रांति पावतात. आतां तुझ्या शरीरांनीं संपादन केलेल्या स्ववासनास्वरूप अनंत कषायांचा पाक झाला आहे. हे कमलनयना ! बा साधो ! कालानें परिपक्क झालेलीं फळें वृक्षावरून जशीं खालीं गळतात, त्याप्रमाणें लिंगदेहापासून कालानें परिपक्क झालेले मळ गळतात. हे सखे ! वासनात्मक मळ निघून गेले असतां गुरु जें बोलतो तें, कमलनालांत जसा बाण, त्याचप्रमाणें



शुद्ध चित्तांत प्रवेश करतें. तुझ्या रागादि मळांचा परिपाक झाला असतां आज मीं तुला विशेष बोध केला. त्यामुळें हे महामते ! तुझ्या अज्ञानाचा क्षय आजच झाला; आजच तुझ्या चित्तमलांचा परिपाक झाला. आजच तूं ज्ञानासाठीं उपदेश ऐकलास व तो तात्पर्यतः जाणलास. उपदिष्ट अर्थाचें हृदयांत धारण केल्यामुळें तूं आज 'सोपदेश' झाला आहेस आणि आजच त्याचें फळ [ साक्षात्कार ] तुला मिळालें आहे. आज सत्संगाच्या निमित्तानें तुझ्या शुभाशुभ सर्व कर्मांचा क्षय निष्पन्न झाला आहे. हे राजा ! या दिवसाच्या मध्यान्ह कालापर्यंत तुझ्या चित्तांत 'अहं-मम' इत्यादि स्वरूपाचें अज्ञान होतें. पण आतां म्हणजे या दिवसाच्या उत्तरभागांत माझ्या बोधवचनानें तुझें हृदयापासून सोडलेलें चित्त क्षय पावलें असतां, हे राजा ! तूं आतां चांगला ज्ञानी झाला आहेस. हृदयांत जोंवर मनःसत्ता असते, तोंवर अज्ञानाची संस्थिति असते. चित्ताचा निःस्वरूपताबुद्धीनें त्याग केला असतां ज्ञानाचा अभ्युदय होतो. द्वित्व व एकत्व या दृष्टि हेंच चित्त आहे. त्यालाच अज्ञान म्हणतात. परमात्म्याची अभिव्यक्ति झाल्यामुळें या दोन दृष्टींचा जो लय होतो, तेंच ज्ञान व तीच परा गति आहे. हे राजा ! तूं आतां ज्ञानी झाला आहेस, विमुक्त झाला आहेस; कारण तूं चित्ताचा त्याग केला आहेस. कारण आत्म्यामध्यें अन्योन्याध्यासामुळें सदसत्तामयत्व हेंच चित्त आहे. तेंच असत् जगाचें कल्पनास्थान आहे, पण तूं तें सोडलें आहेस. त्यामुळें तूं आतां निःसंग, निरायास, शोकरहित, अनन्य, आत्मवान्, महोदय, मुनि व मौनी झाला आहेस. यास्तव आतां निर्मल स्वरूपांत स्थित हो.

शिखिध्वजः—भगवन् ! मूर्ख जंतूंचीच

चित्तभूमि आहे, व प्रभो! तज्ज्ञ प्रबुद्धाचें चित्त म्हणून कांहीं नाहीं, हें जर खरें आहे, तर हे जीवन्मुक्त व्यवहार कसे करितात? त्याचप्रमाणें ज्यांचें मन विद्यमान नाहीं, असे तुमच्यासारखे दुसरे पुरुष कोणत्या अंतःकरणानें व्यवहार करितात? हें सर्व मला सांग. दुसऱ्या कोणाला न सांगतां येण्यासारख्या प्रायः अशाच प्रकारच्या आपल्या वचनरूपी किरणांनीं माझ्या हृदयांतलि तूं अज्ञान चांगल्या प्रकारें घालीव.

कुंभः—हे तत्त्वज्ञा! तूं जें म्हणतोस तें तसेंच आहे. त्याहून निराळ्या प्रकारचें नाहीं. दगडांचा अंकुर जसा नाहीं तसें जीवन्मुक्ताचें चित्त नाहीं. पुनर्जन्माला योग्य अशी जी दृढ वासना तिलाच चित्त म्हणतात. तसली वासना तत्त्वज्ञाच्या ठिकाणीं नसते. तज्ज्ञ ज्या वासनेनें युक्त होऊन व्यवहारांत कर्मामध्यें विहार करितात, ती पुनर्जन्मरहित सत्त्वसंज्ञक वासना आहे, असें तूं समज. महात्मे सत्त्वस्थ, संयतचित्त, जितेंद्रिय, जीवन्मुक्त आसक्ति सोडून विहार करितात. ते केव्हांही चित्तांत स्थित नसतात. मूढ चित्ताला चित्त म्हणतात व ज्ञानसंपन्न चित्ताला सत्त्व म्हणतात. अप्रबुद्ध चित्तस्थ असतात व महाज्ञानी सत्त्वस्थ असतात. चित्त पुनः उत्पन्न होतें, सत्त्व पुन उत्पन्न होत नाहीं. हे राजन्! अप्रबुद्धाला बंध आहे, प्रबुद्धाला नाहीं. तूं सत्त्ववान् झाला आहेस. तूं महात्यागी होऊन राहिला आहेस. आज तूं अशेषतः चित्ताचा त्याग केला आहेस, हें मी जाणतों. हे राजन्! तूं समस्त वासनांपासून उन्मुक्त होऊन आजच शोभत आहेस. हे मुने! तुझें मन आतां आकाशाच्या साम्यास प्राप्त झालें आहे, असें मी समजतों. तूं परम शमास प्राप्त झाला आहेस. तूं सिद्ध झाला आहेस. तुझी स्थिति अत्यंत सम आहे. तूं सर्वरूप चित्ताला टाकलेंस, हाच तो तुझा सर्वत्याग आहे. महात्याग हाच होय. जिची उपदिष्ट अर्थ धारण करण्याची शक्ति जागृत झाली आहे व त्यामुळेंच जी परम बोधयुक्त आहे अशा बुद्धीनें केलेला जो चित्ताचा त्याग तोच स्वर्ग, अपवर्ग, वित्तादिक, तप, दान व त्याचें सर्व फल आहे. तप कितीशा दुःखाचा क्षय करणार? कारण मनस्त्यागरूप समतेपासून प्राप्त झालेलें जें ज्ञानफलरूप मोक्षसुख तें क्षयातिशयापासून निर्मुक्त झालेलें —अक्षय आहे. तें ज्ञानफल सत्य आहे व तें शाश्वत आहे. स्वर्गादि दुसरें सर्व सत्य नाहीं, उलट भंगुर आहे. तें आविर्भाव व तिरोभाव यांनीं व्यापलेलें आहे. पूर्वोत्तरकालीं अदृष्ट असतांना तें वर्तमानकालीच स्वप्नाप्रमाणें ज्ञानाचा विषय होतें. स्वर्ग हें तुच्छ सुख आहे. कारण तें अनेक आयासांनीं प्राप्त होतें. शिवाय अल्प अपराधानेंही त्याचा नाश होतो. ज्याला आत्मज्ञान झालेलें नसतें, त्यालाच कर्मकांड शुभ वाटतें. ज्यानें सोन्याचा अनुभव घेतलेला नाहीं तो पितळ कसा सोडील? चूडालादिकांच्या सहवासानें तुला अनायासानें ज्ञत्व प्राप्त झालें असतें. मग तूं या तपोमय अनर्थांत कां निमग्न झालास? वानप्रस्थ आश्रम, त्याला योग्य असें वय, कर्म, त्याचा अभिमान, त्याच्या साधनाची चिंता इत्यादि असंख्य विक्षेपांनीं साध्य होणाऱ्या या कुकर्मांत—क्लेशप्रचुर अनर्थांत आजवर कां निमग्न झालास? ( स्वर्गादि महासुखाला कारण होणारें तप अनर्थरूप कसें? म्हणून विचारशील तर सांगतों— ) बा सुमते! तपाचा आदिभाग म्ह० आचरणावस्था व अन्तभाग म्हणजे फलक्षयावस्था दुःखरूपच आहे. स्वर्गादि फलभोगावस्थेंतच सुख मिळतें. ( तर मग मीं आजवर केलेलें तप व्यर्थच झालें कीं काय? उत्तर— )

तथापि तपामुळेंच तुझ्या चित्ताचे मळ परिपक्व झाले व त्यामुळें तुला आतां तत्त्वबोधाचा समय प्राप्त झाला. यास्तव सर्व तपोरूप विकल्पांस त्या अविकल्प तत्त्वाज्ञानामध्यें परिणत होतात व त्या फळानें फलवान् होतात. त्या ज्ञानामध्यें तूं स्थिर हो. आकाशाहूनही अतिशय स्वच्छ अशा चिदाकाशापासून सर्व भाव उत्तम प्रकारें उद्भवलेले आहेत; त्याच्या योगानेंच अनुभवाला येतात व त्यांतच विलयास प्राप्त झाले आहेत. यद्यपि 'हें कार्य—इष्ट आहे व हें अकार्य—अनिष्ट आहे,' इत्यादि सर्व ब्रह्मसमुद्राचे बिंदु आहेत, तथापि तुच्छत्वामुळें तें सर्व निष्फळच आहे. यास्तव हे शिखिध्वजा! त्याचा त्याग करून पूर्ण-समुद्रस्थानीय निर्विशेष ब्रह्माचाच आश्रय कर. हे मित्रा! ज्याप्रमाणें प्रियपतीस प्राप्त न झालेल्या स्त्रीनें 'मजपासून इष्ट वस्तु माग' असें कोणीं म्हटलें असतां पतीविषयीं वर न मागतां दुसरेंच कांहीं इष्ट मागावें, त्याप्रमाणें स्वतः परमप्रेमास्पद—निरातिशयानंदस्वरूप आत्म्याचीच प्रार्थना करावयाची सोडून तूं आनात्म्याची इच्छा कां करतोस? कारण आत्मा प्राप्त झाला म्हणजे इतर सर्व प्राप्त होतें. महात्मे प्राज्ञ या संकल्परचित, आपत्तींनीं भासुर अशा भावाचें, जलांतील प्रतिबिंबरूप सूर्याप्रमाणें, ग्रहण करीत नाहींत. स्वर्ग, मोक्ष इत्यादि फळ देणारें जें कांहीं आहे तें सर्वच सोडून, एकाकार असा जो कोणी तूं आहेस तोच होऊन रहा. सर्व पदार्थामध्यें जो सदंश आहे त्याचें सत्त्वानेंच ग्रहण करावें; जो असदंश आहे त्याचें नित्यनष्टत्वानेंच ग्रहण करावें. तूं सर्व इच्छा सोडून या पदार्थसमूहाचें ग्रहण कर, व चित्ताला चांचल्यरहित कर. ज्याप्रमाणें पुरुषाच्या स्वाभाविक प्रवृत्तिरूप अपराधामुळें प्राप्त होणारी विपत्ति विवेकज्ञानाचा उदय झाला असतां प्राप्त होत नाहीं, त्याप्रमाणें ज्याचें चित्त परिस्पंदरहित असतें, त्याला संसार प्राप्त होत नाहीं. या त्रिभुवनांत जीं जीं दुःखें उद्भवतात, तीं तीं सर्व चित्ताच्या चापल्यामुळेंच होत. ज्याचें चित्त स्थिर, शांत, स्पंदरहित, व सर्वदाच चापल्यशून्य असतें, तो मोठा आनंदी होय. तो साम्राज्याचें पात्र आहे. यास्तव हे तत्त्वज्ञा! तूं चित्तांतील स्पंद व अस्पंद यास एकत्वास प्राप्त करून व चित्ताला शाश्वत ऐक्यास पोंचवून आपल्या इच्छेप्रमाणें रहा.

शिखिध्वजः—हे सर्व संशयाचा उच्छेद करणाऱ्या प्रभो! स्पंद व अस्पंद हे दोन्ही ऐक्यास कसे प्राप्त झाले, तें मला सत्वर सांग.

कुंभः—एक पाणीच जसा सर्व सागर, त्याचप्रमाणें एक चिन्मात्र वस्तुच सर्व जगत् आहे. शुद्ध जल तरंगांनीं जसें विवर्त पावतें, त्याप्रमाणें तें चिन्मात्रच बुद्धिवृत्तींनीं स्पंद पावतें. बाबारे! मूढ लोक ज्याला जगद्रूपानें पाहतात, तेंच हें ब्रह्म, चिन्मात्र, शुद्ध सत्त्व इत्यादि नांवांनीं उक्त आहे. सर्गांत निस्पंद हेंच सर्वस्व आहे. त्यामुळेंच संसार उद्भवतो. त्यांत विंध्यादिरूप परिस्पंद दुसऱ्या शब्दस्पंदासारखाच म्हणजे मिथ्या आहे. पण तो स्पंद व अस्पंद त्यांचा साक्षी आत्माच आहे. अशा रीतीनें एकरूपानें जर त्याची भावना केली तर हें शिव आत्मरूपच त्यांत अवशिष्ट राहतें आणि अशी सम्यक्दृष्टि उदय पावली असतां चित्स्पंदमात्ररूप सर्ग विलीन होतो. कारण तो अज्ञ जनांच्या दृष्टीनें रज्जूमध्यें जसा सर्प तसा उदय पावलेला असतो. कारण स्पंदयुक्त चित् 'सर्ग' या नांवाची आहे, पण ही पसरलेली निःस्पंद चित् तुर्यातीत पदीं आरूढ झालेली आहे. तिचें वाणीनें वर्णन करतां येत नाहीं. शास्त्र व सज्जन यांच्या संपर्कामुळें व सतत अभ्यासानें योग्य समयीं

ित्त निर्मलत्वास प्राप्त झालें असतां, चंद्रा-
माणें ती स्पंदता उदय पावते. हें केवल स्वानु-
वानें विस्तार पावलेलें आत्मतत्त्व प्रकाशमान
त आहे. ज्यांना आत्मानुभव आलेला
सतो त्यांनाच तें स्वयंस्वरूप स्वतः सांगितलें
तें. हे राजा! आदि-मध्यरहित स्व-सागरास
प्राप्त झाला आहेस. त्याच स्वपदीं तूं प्रवेश
रून रहा. भेद करणाऱ्या देहादि रूपांचाच
भाव झाल्यामुळें तूं सर्व देहांमध्यें भेदरहित
ला आहेस. त्यामुळेंच तूं महान् चिदात्मा
ला आहेस. तत्त्वबोधानें प्रादुर्भूत झाला
ाहेस व शोकरहित झाला आहेस. १०१

## सर्ग १०२ वा.

१ याप्रमाणें सांगून कुंभ गुप्त झाला. २ विस्मित
ाजा चिरकालविचार करूनसमाधींत विश्रांति पावला.

कुंभः—हे शिखिध्वज राजा! हें सर्व उत्पन्न कसें झालें व त्याचा लय कसा होतो तें सर्व मीं तुला येणेंप्रमाणें सांगितलें. हे मुनि-नायका! तें सर्व गुरु व शास्त्र यांच्या द्वारा ऐकून स्वतःच्या विचारानें मनन करून व यथार्थ जाणून परम पद स्पष्ट दिसल्यावर तुझी जशी इच्छा असेल त्याप्रमाणें कांहीं वेळ समाधींत व कांहीं वेळ व्यवहारांत रहा. मी आतां स्वर्गास जातों. या पर्वसमयीं नारदमुनि ब्रह्म लोकाहून परतून अमरसभेंत आला असेल, त्यानें जर मला तेथें न पाहिलें तर त्याला राग येईल. कल्याणेच्छु पुरुषानें श्रेष्ठांना कधींही उद्विग्न करूं नये. तूं सर्व संकल्पाचा त्याग करून कशाचीही इच्छा न करितां सदा रहा. हीच परम पवित्र करणारी दृष्टि आहे.

श्रीवसिष्ठः—हें ऐकून हातांत पुष्पें घेत-लेला शिखिध्वज जों प्रणामपूर्वक प्रतिवचन देत आहे, तों कुंभ अंतर्धान पावला. स्वप्नादि प्रतिभासानें दिसलेली धनादिवस्तु जागें होतां-क्षणीं जशी दिसत नाहीं, त्याप्रमाणें राजा शिखिध्वजानें कुंभाला आपल्या समोर पाहिलें नाहीं. याप्रमाणें कुंभ निघून गेला असतां राजा अतिशय विस्मित झाला आणि त्याच चित्राचें चिंतन करणारा तो चित्रांत काढल्या-प्रमाणें स्थिर झाला आणि "कुंभाच्या मिषानें मला जो शाश्वत स्वप्रकाश ब्रह्माचा बोध प्राप्त झाला आहे, तो दैवाचा विचित्र विलास आहे असें मी समजतों. नाहीं तर नारदाचा पुत्र कुंभ कोठें व मी शिखिध्वज राजा कोठें! केवल भाग्योदयाचा प्रसंग आल्यामुळेंच हा मी असा उत्तम बोध केला गेलों आहे. अहाहा! देव-पुत्रानें मला अगदीं यथार्थ व युक्तियुक्त बोध केला. खरोखर मोहनिद्रेनें आकुल झालेला हा मी दीर्घकालानें उत्तमप्रकारें बोधयुक्त झालों आहें. मी क्रियासमूहरूप दुस्तर चिखलांत रुत-लेला होतों. हें कार्य आहे व हें अकार्य आहे, अशा मिथ्या भ्रमचक्रांत पडलों होतों. खरो-खर ही शीतल, शांत, शुद्ध, रसायनोद्भवाकार निज—स्वाभाविक साक्षात्काररूप साम्राज्यपदवी माझ्या वासनाशून्य मनाला अत्यंत शांत करीत आहे. मी आतां शांत झालों आहें. परम आनंद भोगीत आहें. केवल सुखानें रहात आहें. मी तृणाचें अग्रही इच्छीत नाहीं: मला काडीचीही इच्छा नाहीं. मी आपल्या स्वाभाविक स्वरूपांत स्थित आहें." असें चिंतन करणारा राजा खरोखर वासनाशून्य झाला. त्याचें चित्त वासनाशून्य झालें. पर्वतशिळेवर खोदल्याप्रमाणें तो मौन धारण करूनच राहिला. त्यानंतर त्याच निःसंकल्प निराश्रय मौनांत—मुनींचें कर्म अशा समाधींत निश्चल प्रतिष्ठेस प्राप्त होऊन तो पर्वतशिखराप्रमाणें राहिला. त्या राजाला त्या समाधींत आपल्या अमल आत्म्याची प्राप्ति झाली. तो समरस

झाला. फार दिवसांनीं विश्रांतचित्त होऊन तत्काल भयशून्य—ज्याचें भय शांत झालें आहे असा होत्साता चिरकाल केलेल्या योगाभ्यासानें अखंडितस्वभाव झाला व निजलेल्या पुरुषाप्रमाणें विश्रांति घेता झाला. १०२

---

## सर्ग १०३ वा.

—०—

१ चूडाला तीन दिवसांनीं पुनः आली. राजाला तिनें यत्नानें उठविलें व ३ त्याच्याशीं तत्त्वाचा आलाप केला.

श्रीवसिष्ठः—येणेंप्रमाणें शिखिध्वज राजा निर्विकल्प समाधानामुळें काष्ठ किंवा भिंत यांप्रमाणें ज्याची स्थिति आहे, असा झाला. आतां हे रामा! तूं चूडालेचा वृत्तांन्त ऐक. ती त्या आपल्या शिखिध्वज भर्त्याला कुंभवेषानें प्रबोध करून अन्तर्धान पावली व वेगानें आकाशांत उड्डाण करून गेली. तिनें आपल्या योगशक्तीनें निर्माण केलेल्या देवपुत्राच्या आकाराचा आकाशांत त्याग केला आणि आपला—स्त्रीचा अतिनिपुण, मोह पाडणारा सुंदर वेष धारण केला. आकाशमार्गानेंच ती आपल्या नगरास प्राप्त झाली व क्षणांत अन्तःपुरांत शिरली. सर्व लोकांना तिनें दर्शन दिलें. राजकार्य केलें. तीन दिवसांनीं ती पुनः आकाशांत आली. पुनः योगसामर्थ्यानें कुंभ बनली, आणि शिखिध्वजाच्या वनास गेली. त्या वनभूमींत गेलेल्या तिनें तेथेंच त्या राजाला त्याच निर्विकल्प समाहित दशेंत पाहिलें. तो तिला त्या वेळीं खोदलेल्या वृक्षाप्रमाणें दिसला. "काय आश्चर्य आहे! मोठ्या दैवयोगानें हा राजा आत्म्यामध्यें विश्रांति पावला आहे. स्वस्थ, सम, शांत स्थित आहे." असें ती आपल्याशींच पुनः पुनः म्हणाली. "तर आतां याला मी या परम पदापासून जागृत करतें, याला देहभानावर आणतें. अद्यापि प्रारब्ध कर्म अवशिष्ट असतांनाच हा देहाचा त्याग कां करीत आहे? प्रारब्धक्षय होईपर्यंत हा अरण्यांतील भोगांनीं व राज्यांतील भोगांनीं या लोकीं राहो. आम्ही एकाच वेळीं तुल्य स्वभावानें युक्त होऊन कैवल्यावस्थेस प्राप्त होऊं. मी त्याला पूर्वीं केलेला विषम उपदेश यानें आतांच देहत्याग केल्यास सप्तमभूमिकावस्थितीपर्यंत परिणत होणार नाहीं. यास्तव मी आतां अगोदर याला अभ्यासयोगानें चांगला बोध करतें, म्हणजे याला जीवन्मुक्तिसुखाचा लाभ होईल." असा विचार करून चूडालेनें त्याच्या पुढें वनेचरांनाही भयप्रद वाटणारा सिंहनाद केला. पण पर्वतावरील मोठी शिळा जशी, त्याप्रमाणें तो त्या पुनः पुनः केलेल्याही नादानें जेव्हां स्वस्थितीपासून ढळला नाहीं, तेव्हां तिनें त्याला हातानें हालविलें. पण हालविलेला व जमिनीवर पडलेलाही तो राजा जेव्हां देहभानावर येईना, तेव्हां कुंभरूपिणी चूडालेनें असा विचार केला—'अहाहा! मोठें ऐश्वर्य आहे. हा पूज्य साधु सप्तमभूमिकेपर्यंत स्वपदीं परिणत झाला आहे. म्हणजे मीं पूर्वीं जी कल्पना केली होती खोटी ठरली. आतां याला मी कोणत्या युक्तीनें देहभानावर आणूं बरें? किंवा या महात्म्याला मी कशाला उठवूं? विदेहज्ञानास प्राप्त होऊन हा सुखानें राहू दे. मीहि या स्त्रीदेहाचा त्याग करून परम पदास पुनः जन्म न घेण्यासाठींच त्याच्याबरोबर जातें. येथें जिवंत राहण्यांत काय अधिक सुख आहे?' असा विचार करून ती आपला देह सोडण्यास तयार झाली. पण, अवश्य भोक्तव्य असें याचें प्रारब्धकर्म अवशिष्ट आहे, असें त्या महाबुद्धिमतीनें आपल्या बुद्धीनें पाहून पुनः असा विचार केला—' राजाच्या या देहांत प्रारब्धयोगानें राखून ठेवलेल्या मायालेशानें

युक्त अशा हृदयस्थ ब्रम्हामध्यें सत्त्व म्हणजे निर्वासन मन संस्कारलेशरूपानें अवशिष्ट आहे कीं नाहीं तें मी अगोदर पाहतें. तें जर असेल तर हा भगवान् योग्यसमयीं देहभानावर अवश्य येईल. ज्याप्रमाणें वसंतऋतूच्या आरंभीं वृक्षाच्या मूलकोशांत असलेला जो भूमीचा रस त्यांत लीन झालेला भाविपुष्पांचा समूह असतो, तसें याच्यांत जर सत्त्व असेल तर तो अवश्य जागा होईल. आणि मीं प्रबोध केल्यावर हा जीवन्मुक्त होऊन 'मजप्रमाणेंच विहार करीत राहील. बरें, याच्यामध्यें सत्त्वशेषही जर नसेल तर हा मुक्त होईल. तसें झाल्यास मी याच्याबरोबरच मुक्तीला जाईन.'

असें चिंतन करून तिनें त्याच्या शरीराला तें उष्ण आहे कीं नाहीं तें पाहण्यासाठीं स्पर्श केला आणि तो जिवंत असावा अशा साशंक वृत्तीनें नयानें त्याच्याकडे पाहून ती श्रेष्ठ स्त्री म्हणाली—"याच्या हृदयांत संबोधाचें—देहभानावर येण्याचें कारण असा सत्त्वशेष आहेच." जागृतीच्या हेतूवरून तिनें त्याच्या शरीरांतील सत्त्वशेष जाणला.

**श्रीरामः**—ब्रम्हन् ! ज्याचें चित्त अत्यंत शांत झालें आहे व त्यामुळेंच ज्याची अवस्थिति काष्ठ व लोष्ट यांसारखी आहे, अशा ध्यानशाली पुरुषाचा सत्त्वशेष कसा जाणला जातो ?

**श्रीवसिष्ठः**—( वर 'नयानें' असें जें म्हटलें आहे त्या नयाचेंच स्पष्टीकरण—) ज्याच्या हृदयामध्यें दुर्लक्ष अणूच्या आकाराचें प्रबोधकारण सत्त्वशेष, बीजांतील अदृश्य पुष्प-फळाप्रमाणें विद्यमान असतो, त्या चित्तस्पंदरहित, अस्पंदित सच्चिद्रूप, निर्विकल्प, सम, अचलास्थित पुरुषाचा अत्यंत साम्यावस्थेत असलेला देह खिन्न होत नाहीं व हृष्ट होत नाहीं. तो म्लान होत नाहीं व टवटवीत होत नाहीं. तर सम—एकरूप अवस्थित होतो. द्वित्व, एकत्व इत्यादिकांनीं युक्त असलेल्या ज्याचें मन प्रस्पंद पावत नाहीं, त्याचा देह अन्यत्वास—विकारावस्थेस प्राप्त होतो. जो स्पंदरहित असतो त्याचें शरीर केव्हांही विकृत होत नाहीं. हे रामा ! पुष्पांचा मधु त्याच्या सर्व भावी विकारांचें जसा कारण असतो त्याप्रमाणें चित्ताचा स्पंद जगद्व्यवहाराला कारण होणाऱ्या सर्व भावविकारांचें कारण आहे. म्हणूनच पुनर्जन्माचें बीज विद्यमान असतांना या देहांतून दुसऱ्या देहांत जाणाऱ्या चित्ताचा वारंवार मोठ्या यत्नानें जरी निग्रह करूं लागलें तरी हर्ष, कोप, मोह हे दोष वश होत नाहींत. त्यांचा निग्रह करतां येत नाहीं. चित्त अत्यंत शांत झालें असतां निर्वासनचित्तानें रहित—अप्रतिसंधानानें टाकलेला जो देह त्याला, आकाशाप्रमाणें चित्तविकारभूमि बाधा करीत नाहीं. सम जलसंततीवर तरंगपंक्ति जशी उदय पावत नाहीं, त्याप्रमाणें सम सत्त्वसंततीवर दोष[1] दिसत नाहींत. प्रारब्धाचा क्षय झाल्यावांचून शरीराचा क्षय होत नाहीं व शरीरक्षयावांचून त्या निर्वासन मनाचा— सत्त्वाचा क्षय होत नाहीं. तोंवर प्रातिभासिक वैषम्यानें शून्य तत्त्व प्रतीत होतें. तें केवळ प्रारब्धाचा क्षय होणें, याच एका कालामुळें क्षीण होतें. ज्या देहांत चित्तही नाहीं व सत्त्वही नाहीं, तो देह उन्हांत बर्फाचा तुकडा जसा, त्याप्रमाणें पंचत्वास प्राप्त होऊन विशेषतः लीन होतो. शिखिध्वजाचा हा देह निश्चित व तेजानें-ऊष्म्यानें युक्त असा आहे व सत्त्वांशानेंही युक्त आहे. त्यामुळें तो अप्रसन्न—म्लान झालेला नाहीं. तो कोमेजण्यास योग्य नाहीं. मर्त्याचा देह तसा आहे म्हणजे त्यांत उष्णता आहे व तो म्लानही झालेला नाहीं, असें पाहून तिनें

१ देहावर जरादि दोष व चित्तावर राग-द्वेषादि दोष दिसत नाहींत.

आपला देहत्यागाचा निश्चय सोडला व सत्वर असा विचार केला.

" मी आतां याच्या देहांतील सर्वगामी शुद्ध चित्तत्त्वांत प्रवेश करून याला देहभानावर आणतें. कारण हा आज जरी नाहीं तरी पुढें कांहीं काळानें देहभानावर अवश्य येणारच आहे. मग त्याला आतांच कां जागें करूं नये? मी याला आतांच जरी जागें न केलें, तरी तो दीर्घ कालानें आपोआप जागा होईल, ही जर गोष्ट निश्चित आहे, तर मी आतां एकटीच राज्यपालन करीत कां राहूं? यास्तव मी आतां याला जागें करतेंच." असा विचार करून चूडालेनें इंद्रियांचा पिंजरा असा जो आपला देह त्यास सोडून व त्याच्या शरीरांत प्रवेश करून त्याच्या हृदयस्थ ब्रह्मरूप चित्तत्त्वांत स्थिति प्राप्त करून घेतली. ती त्याच्या आद्यन्तरहित चित्तत्त्वांत स्थित झाली तेथें त्या सत्त्ववान् प्रभूच्या स्थिर चेतनेमध्यें पृथक्त्वानुभवास योग्य असा स्पंद उत्पन्न करून, एकादी पक्षीण आपल्या घरट्यांत जशी शिरते, त्याप्रमाणें ती पुनः आपल्या शरीरांत प्रविष्ट झाली आणि कुंभाकृति होऊन पुष्पयुक्त स्थळावर बसली. भ्रमरींच्या ध्वनी-सारखा जिचा मनोहर ध्वनि आहे अशी ती कुंभरूपिणी चुडाला सामगान करण्यास प्रवृत्त झाली. तो सामाचा ध्वनि ऐकून राजाच्या शरीरांतील सत्त्वगुणशालिनी चित् वसंतांत जशी कमलिनी त्याप्रमाणें जागृत झाली. सूर्य जसा कमलिनीला विकसित करतो, त्याप्र-माणें, ज्यानें सत्त्वसंपत्तीचें ग्रहण केलें आहे, असा शिखिध्वज राजा आपल्या दृष्टीला विक-सित करता झाला. त्याबरोबर त्यानें सामगा-यनांत तत्पर झालेल्या पुढील कुंभास पाहिलें. तो श्रेष्ठ शरीरानें युक्त असून जणुं साक्षात सामवेदच आहे काय, असा राजाला भास झाला. ' अहो! खरोखर आम्ही मोठे धन्य आहों. कारण हा मुनि पुनः स्वतः प्राप्त झाला आहे ' असें त्या वेळीं राजा म्हणाला; व त्यानें कुंभाला पुष्प अर्पण केलें आणि म्हटलें—

" भगवन्! माझ्या सुदैवानेंच आपल्या पवित्र चित्तांत माझी आठवण झाली. किंवा कोणते महासत्त्वपुरुष दुसऱ्यांवर अनुग्रह करण्यास तत्पर नसतात? तेव्हां आम्हांला पवित्र करणें, हेंच आगमनाचें प्रयोजन आहे कीं आणखी कांहीं कारण आहे? दुसरें कांहीं कारण असेल तर सांग."

कुंभः—हे अनिंदित राजा! मी तुझ्या-पासून जेव्हां निघून गेलों, तेव्हांपासून माझें चित्त तुझ्यापाशींच राहिलें आहे, तुलेंच स्मरण करीत आहे. आतां मी रम्य स्वर्गांत रहात नाहीं, तुझ्या समीप रहात आहें. हे श्रेष्ठा! अनेक रम्य पदार्थांतलि जो पदार्थ चित्ताला अत्यंत अभीष्ट असतो, तो उद्योगानेंच प्राप्त होतो, त्यावांचून नाहीं. अर्थात् तुझ्या दर्शनाच्या उत्कंठेनेंच माझें हें आगमन आहे. मी तर असें समजतों कीं, तुझ्यासारखा बंधु, आप्त, सुहृद्, मित्र, तसाच सखा, किंवा विश्वासपात्र शिष्य या जगांत मला नाहीं.

शिखिध्वजः—अहाहा! खरोखर कुलरूपी पर्वतावर आमचे पुण्यवृक्ष फलित झाले आहेत. त्यामुळें तूं असंग असूनही आमचा समागम इच्छितोस. तुला जर स्वर्ग आवडत नसेल तर येथें हें वन आहे, हे वृक्ष आहेत, व हा मी आदरयुक्त भृत्य आहें; यास्तव पाहिजे तर हे प्रभो! येथें रहा. हे साधो! तूं सांगितलेल्या योगयुक्तीनें मी जसा विश्रांति पावलों आहें तशी विश्रांति स्वर्गांतही नाहीं, असें मीं सम-जतों. त्याच स्वच्छ, स्वयंप्रकाश संस्थितीचा आश्रय करून स्वर्गाप्रमाणेंच या भूतळीं येथें यथेच्छ विहार कर.

कुंभः—महानंदयुक्त परमपदीं तूं विश्रांति पावला आहेस ना? हें भेदमय दुःख तूं टाकलें आहेस ना? हे राजन्! आपातरमणीय भासणारे जे संकल्प त्यांपासून आपली रति निर्मूल घालविली आहेस ना? तुझें चित्त भोगांविषयीं नीरस झालें आहे ना? तें हेय व ग्राह्य या दृशांचें उल्लंघन करून राहिलें आहे ना? तें शांत, शमानें समस्थित व प्राप्त झालेल्या व्यवहारांत उद्वेग सोडून स्थित आहे ना?

शिखिध्वजः—भगवन्! आपल्या प्रसादानें मीं दृश्याचे पलीकडे असलेली गति पाहिली. संसाराच्या परमावधीस प्राप्त झालों. लब्धव्य तत्त्वाचा निश्चय केला. दीर्घ कालानेंच मी तीन दिवस विश्रांति पावलों आहें. मी आतां निरामय झालों आहें. जें मला मिळवावयाचें होतें तें सर्व मीं मिळविलें आहे. मी आतां तृप्त होऊन अगदीं दृढसंस्थित झालों आहें. मला जें अज्ञात होतें तें ज्ञात झालें, जें अप्राप्त होतें तें प्राप्त झालें, जें मला त्याग करण्यास योग्य होतें त्याचा मीं त्याग केला आहे. माझ्या वासनाशून्य मनानें आत्म्याच्याच परत्वाचा—स्वरूपाचा आश्रय केला आहे. त्यामुळें माझें स्वतःचें असें मजहून निराळें कांहीं नाहीं. तर मी संसारशून्य, मोह-भयशून्य, आसक्तिशून्य, नित्य प्रकाशस्वरूप, अत्यंत साम्यानें युक्त असा ज्याचा आशय आहे असा, व त्यामुळें सर्वांत अधिक सौम्य, सर्वात्मक, सर्वकल्पनारहित, आकाशकोशाप्रमाणें स्वच्छ, व सम स्थित आहें. १०३.

---

# सर्ग १०४ वा.

—००—

१ रममाण होणाऱ्या कुंभाला राजाच्या संभोगाची इच्छा. २ स्वर्गाच्या मिषानें नगराव गमन व ३ खिन्न होऊन पुनरागमन.

श्रीवासिष्ठः—अशा प्रकारच्या विचित्र अध्यात्मकथांनीं एकमेकांशीं संभाषण करीत ते दोघेही ज्ञानी त्या वनांत कांहीं काळ सुखानें बसले. नंतर तेथून उठून स्निग्ध सारस पक्षी व कमलें ज्यांत आहेत अशा एका शिखरावर ते दोघे गेले आणि त्या आनंद देणाऱ्या सरोवरांत व फल-मूलादिकांनीं रक्षण करणाऱ्या वनांत विहार करूं लागले. त्या अरण्यपंक्तींत निरनिराळ्या स्थानीं त्या दोघांनीं त्याच जीवन्मुक्तांच्या आचारानें व तसल्याच कथांनीं आठ दिवस घालविले. नंतर कुंभ म्हणाला:—"राजा, आपण आतां या पर्वतावरील दुसऱ्या वनांत जाऊं या." त्यावर राजा 'बरें आहे' असें म्हणाला, व ते दोघे तेथून निघाले. नानाजातीचीं वनें, जंगलें, तट, सरोवरें, झाडांचे वगैरे गुल्म, लहान पर्वत, शिखरें, नद्या, देश, लहान गांवें, नगरें, उपवनें, सुंदर घोष—गवळीवाडे, पर्वत, कुंज, तीर्थें, आयतनें, इत्यादि स्थानीं ते दोघे मिळून एकसारखेच उदय पावून, चित्तवृत्तीनेंही एकसारखेच होऊन, एकमेकांवर एकसारखाच स्नेह करीत व परस्परांस आपआपला अनुभव सांगत राहिले. राघवा! त्यांनीं पितरांचें व देवांचें पूजन केलें. स्वतः अन्नादिकांचें सेवन केलें. उन्हानें तप्त व जलानें आर्द्र झालेल्या प्रदेशीं ते आपली एकसारखीच बुद्धि ठेवीत असत. तमालवृक्षांच्या ताटव्यांत व मंदारवृक्षांच्या दाट झाडींत ते दोघे सुहृद् व स्निग्धचित्त पुरुष म्हणजेच तें दांपत्य फार विराजमान झालें. वावटळ मेरूला जशी उडवीत नाहीं, त्याप्रमाणें

हें घर आहे व हें नाहीं, ही कल्पना त्या दोघांच्या मनाला हरण करूं शकली नाहीं. ते दोघे सुहृद् कोठें धुलिधूसर अंगांनीं, केव्हां चंदनाची उटी लावून व केव्हां भस्म फासून विहार करीत. केव्हां दिव्य वस्त्रें धारण करीत, केव्हां विचित्र वस्त्रें नेसत. एकादे वेळीं पल्लवांनीं आपलीं अंगें आच्छादित करीत, केव्हां पुष्पांनीं भूषित होत. कांहीं दिवसांनीं त्या वासनारहित चित्तानें उत्कृष्ट झालेल्या समचित्तत्वानें राजा कुंभाप्रमाणेंच शोभूं लागला.

त्यानंतर म्ह० मित्रभावानें राहण्याचा काल जाऊन प्रारब्धानुसार दंपतीभावानें एकत्र राहण्याचा काल आला असतां ती मानिनी चूडाला 'राजा शिखिध्वज अत्यंत शोभेला प्राप्त झाला आहे, तो देवपुत्रासारखा शोभत आहे' असें पाहून मनांत विचार करूं लागली.—"हा माझा पति आतां दीनचित्त झालेला नाहीं. या वनभूमि अतिशय रम्य आहेत. ही स्थिति आयासरहित आहे. अज्ञजनांचा धर्म जो राग (आसक्ति) त्यानें या स्थितीला दूषित केलेलें नाहीं. यथाप्राप्त भोगांचा अनुभव घेणाऱ्या जीवन्मुक्तांच्या बुद्धीनें एका भोगामध्येंच आग्रह ठेवणें म्हणजे त्या बुद्धीची तुच्छ मूढताच उदय पावणें होय. आपला पति उदारात्मा आहे. त्याला कोणत्याही प्रकारचा आधि किंवा व्याधि नाहीं. हें नूतन वय आहे, व हीं पुष्पांचीं लतागृहें आहेत. इतकी सर्व सामग्री असूनही जी आपल्या भर्त्याची इच्छा करीत नाहीं, ती जर जीवन्मुक्त नसेल तर भर्त्याच्या उपभोगाचा विघात करणें या पापानें मेलीच आहे, व जीवन्मुक्त असेल तर लोकसंग्रहाचा भंग करणें, यामुळें होणारी जी निंदा वगैरे त्यांच्या योगानें नष्ट झाली आहे, असें मी समजतें. भर्ता स्वाधीन असतांना जी प्रिय व दुःखरहित कामिनी वनांतील पुष्पलतागृहांत त्याच्याशीं रममाण होत नाहीं, ती दुर्दैवी स्त्री मेल्यासारखीच आहे. जी साध्वी स्त्री रम्य, विवाहित, कान्त पतीस निर्जन वनांत प्राप्त होऊन त्याच्याशीं रममाण होत नाहीं, त्या दुरंगनेला धिक्कार असो. वेद्य तत्त्वाला जाणणाऱ्या तज्ज्ञानें आपल्या प्रारब्धप्राप्त अनिंद्य व उदार विषयालाही जर टाकलें तर त्यानें अधिक तें काय केलें? वास्तव मी आतां आपल्या प्रज्ञेनें या वनांत सत्वर असा कांहीं प्रपंच रचतें कीं, ज्यामुळें हा माझा मानद पति राजा माझ्या ठिकाणीं रतिसुखाचा अनुभव घेईल."

असा विचार करून कुंभवेष धारण करणारी चूडाला अरण्यांतील दाट झाडींत बसून कोकिला आपल्या कोकिलपतीला जशी मंजुळ ध्वनीनें बोलते, त्याप्रमाणें शिखिध्वजास म्हणाली.

कुंभः—आजचा हा चैत्रमासाच्या शुक्लपक्षाचा मोठा पहिला दिवस आहे. आज चैत्र शुद्ध प्रतिपदा आहे. आज स्वर्गांत इंद्राच्या सभेंत देव व ऋषि यांचें मोठें संमेलन होतें. त्या वेळीं मला पित्याच्या जवळ अवश्य राहिलें पाहिजे. नियति जशी निश्चित झालेली असते तशीच ती पाळली पाहिजे. तिला केव्हांही टाकतां येत नाहीं. मी संध्याकाळपर्यंत येथें परत येईन. तोंवर तूं उद्विग्न न होतां नूतन पुष्पांनीं युक्त अशा या वनभूमींत क्रीडा करीत माझी वाट पहात येथेंच रहा. मी आज संध्याकाळीं स्वर्गांतून खचित येतों. कारण, मला स्वर्गापेक्षां तुझा समागम अतिशय संतोष देतो.

असें बोलून कुंभानें आपल्या मित्राला प्रीतीसाठीं, आपल्या प्रीतीप्रमाणेंच, कल्पवृक्षाच्या पुष्पाची मनोहर मंजरी दिली. आणि 'तूं शीघ्र ये' असें जों राजा म्हणत आहे तों निर्मल मेघाप्रमाणें तो वनांतून आकाशांत उड्डाण करून गेला, आणि आकाशांतून जाणाऱ्या

त्यानें पुष्पमाळेंतील पुष्पांची बनवायूनें इतस्ततः पसरणारी अंजलि, हिमकालांतील मेघ जसा हिम सोडतो त्याप्रमाणें, सोडली. आकाशांतून जात असलेल्या त्याला शिखिध्वज पहात राहिला. जागा झालेला मोर मेघाला जसा पाहतो तसा जोंवर राजाची दृष्टि पोंचत होती तोंवर त्याच्याकडे टक लावून राहिला. **कारण ज्ञानी पुरुषाची प्रीति कांहीं केल्या टाकवत नाहीं.** शिखिध्वजाच्या दृष्टीच्या आड गेल्यावर चूडालेनें आकाशांत कुंभाचें शरीर सोडलें, आणि ज्यांतील आवर्त शांत झाला आहे असें जल आपली स्वाभाविक शोभा जसें धारण करतें, त्याप्रमाणें त्या सुंदरीनें आपलें मूळरूप धारण केलें, आणि ती आकाशमार्गानें आपल्या नगरास प्राप्त झाली. त्यावर पताका फडकत होत्या. त्यामुळें तें मंजरींनीं आच्छादित झालेल्या कल्पवृक्षासारखें दिसत होतें व स्वर्गाप्रमाणें रम्य होतें. ती कोणाला न दिसतांच स्त्रियांनीं भरलेल्या अंतःपुरांत शिरली. वसंतऋतूची महालक्ष्मी—अत्यंत शोभा शाखांनीं शोभणाऱ्या वृक्षांत जशी शिरते, तशी ती अंतःपुरांत शिरली. तेथील सर्व राजकार्यें सत्वर संपवून पुनः शिखिध्वजाच्या पुढें, वृक्षावरून फूल किंवा फल जसें पडतें, त्याप्रमाणें ती अंतरिक्षांतून उतरली. भर्त्याच्या संनिधींत तिनें आपलें मुख किंचित् उतरलेलें व निस्तेजसें केलें. पण आंतून तिचें मन खिन्न झालें नव्हतें. रात्र नीहारयुक्त चंद्राला जशी मलिन करते किंवा कमल जसें म्लान होतें, तसें तिचें मुख खिन्न झालें. तशा प्रकारच्या त्या देवपुत्राला पाहून शिखिध्वज राजा वर उठला. तो स्वतः खिन्नचित्त झाला व मोठ्या आदरानें असें म्हणाला—" हे देवपुत्रा ! तुला नमस्कार असो; तूं उद्विग्नसा दिसत आहेस. पण तूं कुंभ आहेस. म्हणून हा सर्व क्षोभ सोड. या आसनावर बैस. कमलें जळाच्या आर्द्रतेस जशीं स्वीकारीत नाहींत, त्याप्रमाणें जे तत्त्वाला जाणणारे स्वरूपस्थ ज्ञानी असतात, ते हर्ष-विषादजन्य स्थितीचा आश्रय करीत नाहींत."

श्रीवसिष्ठः—त्या राजानें असें म्हटलें असतां आसनावर बसणारा कुंभ फुटलेल्या वेणूच्या ध्वनीसारख्या खिन्नवाणीनें म्हणाला—" जे शठ शरीर जिवंत असेपर्यंत प्राप्त होणाऱ्या सर्व अवस्थांमध्यें ज्ञानप्रयुक्त समचित्ततेमुळें अवश्य होणारी जी कर्मेंद्रियांची निवृत्ति तिनें शून्यसे राहतात ते तत्त्ववेत्ते नव्हेत. समचित्तत्व हें ज्ञानाचें फळ आहे. पण त्यामुळें प्रारब्धप्राप्त कर्मेंद्रियांच्या चेष्टेचा क्षय होत नाहीं. अर्थात् समचित्तत्वानें होणारीं जीं कर्में तीं वासनांचीं बीजें होत नसल्यामुळें कर्मेंच नव्हेत. हे राजन् ! जे अतत्त्वज्ञ मूढ असतात ते अज्ञानामुळेंच स्वभावतः प्राप्त झालेल्या अवस्थांपासून पलायन करितात. जोंवर तिळ असतात तोंवर त्यांत तेल असतें. त्याचप्रमाणें जोंवर देह असतो तोंवर हर्ष-विषादादि दशा असतात. देह असेपर्यंत जो देहदशांस प्राप्त होत नाहीं, तो तरवारीनें आकाशालाच कापतो. योगामुळें चित्ताचें जें साम्य हाच देहाच्या परस्परविरुद्ध दशांमुळें होणाऱ्या दुःखाचा सर्वोत्तम परित्याग आहे. हठानें कर्मेंद्रियांचा निग्रह करून दुःखांना सहन करणें हा त्याग नव्हे. दुःखांना हठानें सहन करण्यापेक्षां चित्तसमाधानाच्या बळावर त्यांच्याकडे लक्षच न देणें चांगलें. बा राजा ! तत्त्वज्ञानें देह असेपर्यंत सर्व दशांमध्यें कर्मेंद्रियांनीं सदाचारच करावा, त्याचें उल्लंघन करूं नये, एवढाच नियम आहे. मन, बुद्धि इत्यादि ज्ञानेंद्रियांनीं सदा साम्यानेंच रहावें, केव्हांही वैषम्य होऊं देऊं नये, असें नाहीं. ब्रम्हदेवादि सर्व जीवन्मुक्त कर्मेंद्रियांनीं अनिषिद्ध देहावस्थांचें अनुवर्तन करीत राहतात.

नियतीचा हा असाच निश्चय आहे. सर्व पाणी साक्षात् किंवा परंपरेनें जसें समुद्राकडेच धांवतें, त्याप्रमाणें अज्ञ व तज्ज्ञ भूतें आणि हें सर्व दृश्यजात नियतीकडेच धांवत असतें. प्रारब्धप्राप्त नियतीचें उल्लंघन कोणालाही करतां येत नाहीं. तत्त्वज्ञ देह असेपर्यंत बुद्ध्यादिकांच्या साम्यानें व हात-पाय इत्यादिकांच्या चालनानें ही नियति अखंडित चालवितात. पण अज्ञ सर्व क्षोभानें सुख-दुःखदशांनीं व्याकुळ होऊन लक्षावधि देहांनीं अत्यंत खंडित झालेल्या नियतीला घालवितात. हे राजा! या प्राण्यानें या जन्मांत सुखामध्यें असें रहावें व दुःखामध्यें असें रहावें असें अगोदरच ठरलेलें असतें. यास्तव जीवांनीं आपापल्या कर्मानुसार जें जसें प्राप्त झालें असेल त्यांत तसेंच राहिलें पाहिजे. ज्ञानी व अज्ञानी अशा सर्व भूतांमध्यें व्यक्त होणारा हा नियतविलास आहे, त्याचें उल्लंघन कोणालाही करतां येत नाहीं. १०४.

---

## सर्ग १०५ वा.

१ दुर्वासाच्या शापानें आपल्याला स्त्रीत्वप्राप्ति झाली आहे, असें कुंभाचें कथन, व २ एकमेकांचें समाधान करून संतुष्ट झालेल्या त्यांची स्थिति.

शिखिध्वजः—हे श्रेष्ठ ज्ञानी महाभागा! जीवसमूह जर असा आपापल्या नियतीच्या अनुसारच स्थित आहे, तर मग तूं देव असूनही असल्या उद्वेगास कसा प्राप्त झाला आहेस तें मला सांग.

कुंभः—राजा! आज स्वर्गांत माझें काय वर्तमान घडलें तें मी तुला सर्व सांगतों, लक्ष देऊन ऐक. कारण मित्राला आपलें दुःख सांगितलें असतां तें अत्यंत तनुत्वास प्राप्त होतें. दाट, जड व काळाकुट्ट मेघही वृष्टि केल्यावर जसा हलका होतो, त्याप्रमाणें आपलें दुःख मित्राला सांगितल्यानें हलकें होत असतें. कतकबीजाच्या योगानें जल जसें प्रसन्न होतें, त्याप्रमाणें विचारणाऱ्या मित्राच्या निमित्तानें स्वच्छत्वास प्राप्त झालेलें उत्तम चित्त प्रसन्नतेस प्राप्त होतें. मी आज सकाळीं तुला पुष्पमंजरी देऊन व येथून आकाशाचें उल्लंघन करून स्वर्गलोकास गेलों. तेथें पित्यासहवर्तमान महेंद्राच्या सभास्थानीं क्रमानें बसून व उठून, उत्थानसमयींच पित्यानें मला यथेष्ट गमन करण्याविषयीं अनुज्ञा दिली असतां येथें येण्यासाठीं मी स्वर्गाला सोडून आकाशमार्गांत आलों. सूर्याच्या घोड्यासहवर्तमान प्रवह नांवाच्या वायूच्या स्वानुकूल मार्गांत त्याच्या प्रवाहाबरोबरच मी आपल्या अभिमत देशापर्यंत वहात चाललों होतों. मला अभिमत असलेला प्रदेश येतांच त्या वायूकडून पुढें वाहून नेला जाणारा सूर्य एका मार्गानें गेला व मी दुसऱ्या मार्गानें खालीं येऊं लागलों. समुद्रांत पडलेला पुरुष जसा तरंगत असावा, तसा मी तरंगतच आकाशांत आलों. इतक्यांत पुढें पाण्यानें परिपूर्ण असलेल्या मेघांच्या मध्य मार्गानें वेगानें येणाऱ्या दुर्वास मुनीला मीं पाहिलें. तो त्या वेळीं मेघपटानें आच्छादितसाच झाला होता. विद्युल्लतांनीं अत्यंत भूषित झाला होता. अंगाला पाण्याच्या धारांप्रमाणें शुभ्र चंदनाची उटी लावली होती. त्यामुळें तो अभिसारिकेसारखा दिसत होता. तो त्या वेळीं भूतलीं असलेल्या उत्तम वृक्षांच्या सुच्छायायुक्त गंगेकडे आपल्या प्रिय तपोलक्ष्मीप्रमाणेंच, वेगानें जात होता. आकाशांतून जातांना मी त्याला नमस्कार करून म्हटलें "हे मुने, नील अभ्र हेंच ज्याचें वस्त्र आहे असा तूं अभिसारिकेसारखाच दिसत आहेस."

हे मानदा! हें ऐकतांच त्या क्रोधी ऋषीनें मला शाप दिला—"जा, या दुरुक्तामुळें तूं

रात्रीं स्तन व केश यांनीं युक्त, हावभावविलासिनी सुंदर स्त्री होशील." त्या जर्जर झालेल्या ब्राह्मणाच्या तोंडून निघालेलें हें अशुद्ध वाक्य ऐकून मी जों थोडासा विचार करीत आहें तोंच तो मुनि गुप्त झाला. हे साधो! यामुळें मी उद्विग्न मनानें आकाशतलांतून येथें आलों. हें मीं सर्व तुला सांगितलें आहे. मी आतां निशाङ्गना झालों आहें. रात्रीं प्राप्त झालेलें स्त्रीत्व मी आतां कसें घालवावें? मी रात्री स्तनवती स्त्री होऊन आपल्या पित्याला काय सांगूं? या संसारांत भवितव्याची गति खरोखर अतिशय विषम आहे. आज मीही दैववशात् तरुण पुरुषांच्या आमिषतेस प्राप्त झालों आहें. आतां स्वर्गलोकांत ज्यांची मति कामाकुल झाली आहे अशा देवकुमारांचा माझा अपहार करण्यासाठीं कलह होईल, ही खरोखर कष्टकर दशा आहे. रात्रीं स्त्री झाल्यावर मीं लज्जापरवश होऊन देव, गुरु, द्विज, यांच्यापुढें कसें उभें रहावें?

**श्रीवसिष्ठः**—असें बोलून व एक क्षणभर त्या मुनिस्थितींतच मुकाट्यानें बसून व धैर्य धरून, हे रामा! कुंभ पुनः म्हणाला—"पण मी अज्ञाप्रमाणें शोक कां करीत आहें? मज आत्म्याची त्यांत काय हानि आहे? माझ्याहून अगदीं अन्य असलेला हा देहच प्रारब्धप्राप्त स्त्रीत्वाचा अनुभव घेईल. त्यांत असंग चिन्मात्र मज आत्म्याची कांहीं हानि नाहीं.

**शिखिध्वजः**—हे देवपुत्रा! या परिदेवनेचा—शोकाचा काय उपयोग? देहाला जी दशा प्राप्त होईल ती होऊं दे. तिनें आत्मा लिप्त होत नाहीं. जीं कांहीं सुखें किंवा दुःखें प्रारब्धविहित आहेत तीं सर्व देहाचीं आहेत. आत्म्याचीं कांहीं नाहींत. प्रारब्धप्राप्त अवश्य भोक्तव्य फलांविषयीं खेद करण्यास तूं योग्य नाहींस. मग तूंच जर असा खेद करूं लागलास, तर मग इतरांना मार्गदर्शक कोण होणार? अज्ञ जनांना होणारा जो अविवेकप्रयुक्त खेद त्याची चिकित्सा करणारा तुझ्यासारखा शास्त्र व तत्त्व यांचा अनुभवसिद्ध उपदेशक कोठें मिळणार? हा तुझा वास्तविक खेद आहे, असें मला वाटत नाहीं. कारण खेदाच्या वेळीं खेदाला उचित असें बोललें पाहिजे, म्हणूनच तूं हें बोलत आहेस. पण आतां समत्वास प्राप्त होऊन प्राप्त स्थितींत अखिन्न रहा.

**श्रीवसिष्ठः**—अशा प्रकारच्या वाक्यांनीं एकमेकांचें आश्वासन करून ते दोघे वनांतील स्निग्ध सुहृद् खिन्न होऊन तेथें राहिले. याप्रमाणें त्यांनीं परस्परांचें समाधान केल्यानंतर, तेल संपल्यावर दीप विझतो त्याप्रमाणें जगद्दीप सूर्यही कुंभाला जणुं काय स्त्रीत्व देतसाच अस्त पावला. त्याबरोबर प्राण्यांच्या असंख्य व्यवहारांसह सूर्यकमलें संकोच पावलीं. सर्व मार्ग अंधकाराच्या योगानें संकोच पावले, स्पष्ट दिसेनातसे झाले. पांथस्थांसह पांथस्थांच्या स्त्रियांचीं हृदयेंही वियोगदुःखानें संकोच पावलीं. समुद्रतीरीं कोळी जाळ्यांत पक्षी धरणें व मासे मारणें, या उपायानें सर्व दिवसभर जमविलेल्या पक्ष्यादिकांस संध्याकाळीं एकत्र जमविते झाले. तारकारूपी रत्नसमूहाप्रमाणें संपन्न झालेलें भुवन त्यांच्या साम्यास प्राप्त झालें. ध्वनि करणारे चक्रवाक पक्षी व भ्रमण करणारे भ्रमर यांचा समूह विकास पावलेल्या चंद्रविकासी कमलांस जणुंकाय हंसत राहिला व नक्षत्रयुक्त आकाशांत गेला. इतकीं सर्व संध्याकाळचीं चिन्हें झालीं असतां त्या दोघां सुहृदांनीं जिच्यामध्यें चंद्र उदय पावत आहे अशा संध्येस वंदन केलें व जप करून ते वृक्षांच्या गुल्मांत बसले. त्यानंतर कुंभ तेथें हळुहळू स्त्रीशरीर धारण करूं लागला; आणि जवळच समोर बसलेल्या शिखिध्वजास सगद्गद स्वानें म्हणाला—"हे

राजन्! मी आपल्या अंगयष्टींनीं जणुं काय पडत आहें, स्फुरण पावत आहें आणि लज्जेनेंच तुझ्यापुढें जणुं काय द्रवयुक्त होत आहें. त्यामुळें मला वाटतें कीं, मी स्त्रीत्वास प्राप्त होत आहें. राजा! स्फुरण पावणाऱ्या तारका हीच ज्यांतील पुष्पमाला आहे अशा संध्याकाळच्या अंधकाराप्रमाणें हे पहा माझे केंस वाढत आहेत; हे पहा माझ्या उरावर वर तोंड केलेले स्तन उत्पन्न होत आहेत. ते दोन स्तन आकाशाकडे तोंड करून वसंतऋतूंत उत्पन्न झालेल्या पद्मिनीच्या दोन कळ्यांप्रमाणें दिसत आहेत. स्त्रीच्या वस्त्राप्रमाणें हळू हळू माझ्या देहापासून हीं माझीं वस्त्रें पायांच्या घोंट्यांपर्यंत लांब होत आहेत, पहा. वृक्षावरील पुष्पाप्रमाणें नानाप्रकारचीं भूषणें, रत्नें व पुष्पमाळा माझ्या देहापासूनच होत आहेत पहा. राजा! पर्वतावर जसें धुकें त्याप्रमाणें माझ्या मस्तकावर हें चंद्राच्या किरणांसारखें शुभ्र उत्तरीय रेशमी वस्त्र आपोआप होत आहे पहा. हे मानद राजा! माझ्या ठिकाणीं सर्व स्त्रीचिन्हें उत्पन्न झालीं आहेत. हरहर! धिक्, फार वाईट झालें. मला मोठा विषाद होत आहे. काय करूं? मी स्त्री झालों आहें. हाय हाय, धिक्, काय करावें? अहो साधो! मी स्त्रीच होऊन राहिलें आहें. मी आंत नितंब व जघन या प्रदेशांचा स्वसंवेदनानें अनुभव घेत आहें."

त्या अरण्यांत कुंभ असें बोलून मुकाट्यानें खिन्न होऊन बसला. राजाही त्याला पाहून तसाच खिन्न झाला. कांहीं वेळानें शिखिध्वज असें वचन बोलला—"अरेरे, फार वाईट! हा महाज्ञानी तरुण स्त्री झाला आहे. हे साधो! तूं सर्व वेद्याला जाणतोस. तूं ज्ञानी आहेस. तुला नियतीची गति ठाऊक आहे. अवश्य होणाऱ्या या गोष्टीविषयीं तूं खिन्नचित्त होऊं नकोस. ज्ञान्यांच्या केवल देहावर त्या त्या दशा येऊन पडतात. चित्तावर पडत नाहींत; पण अज्ञजनांच्या चित्तावरच त्या पडतात, देहावर पडत नाहींत."

कुंभः—बरें, असेंच होऊं दे. मी आपल्या यामिनी—स्त्रीत्वाचें अनुवर्तन करतों. मी खिन्न होत नाहीं. नियतीचें उल्लंघन कोण करणार?

असा निर्णय करून त्या दोघांनीं आपला खेद कमी केला आणि एकाच शय्येवर त्यांनीं मुकाट्यानें ती रात्र फार वेळानें घालविली. नंतर प्रभातसमयीं तें स्त्रीशरीर व तारुण्य सोडून कुंभ कुंभासारखा झाला. अर्थात् त्याची कुचादि चिन्हें लुप्त झालीं. याप्रमाणें ती तरुणी राजपत्नी चूडाला अगोदर कुंभत्वास प्राप्त झाली व भर्त्याच्या समक्ष स्त्रीत्वास प्राप्त झाली. कुमारीप्रमाणेंच जिचे धर्म आहेत अशी ती रात्रीं वनांत विहार करूं लागली व दिवसा कुंभरूप धारण करून ती भर्ता व मित्र यांच्याशीं संयुक्त झाली. कैलास, मंदर, महेंद्र, सुमेरु, सह्य, इत्यादि पर्वतांच्या शिखरांवरून जिचें जाणेंयेणें अस्खलित होत आहे अशी ती चूडाला आपल्या इच्छेप्रमाणें वर्तन करणाऱ्या प्रिय मित्रासह पुष्पमाळांनीं मंडित होऊन यथेष्ट विहार करती झाली. १०९.

## सर्ग १०६ वा.

—:०:—

१ महेंद्र पर्वतावर त्या राजा राणींचा अग्नीच्या समोर विवाह, व सौवर्ण गुहेत पुष्पशय्येवर संगम.

श्रीवसिष्ठः—त्यानंतर कांहीं दिवस गेले असतां ती कुंभरूप धारण करणारी चूडाला आपल्या भर्त्याला असें म्हणाली—"हे कमलपत्रनयन राजा! माझें वचन ऐक. मी प्रत्यहीं

१ राजाला कुंभाच्या विपत्तीविषयींच्या चिंतेनें व राणीला नृपसंगमाच्या उत्कंठेनें निद्रा आली नाहीं. त्यामुळें ती रात्र त्यांना दीर्घ वाटली.

रात्रीं स्त्री होतों, हें आतां स्पष्ट आहे. यास्तव मी आतां आपला स्त्रीधर्म सफल करण्याची इच्छा करतों. मी कोणा तरी भर्त्याला विवाह-विधीनें आपलें दान करतों. या त्रिभुवनांत मला तूंच भर्ता आवडतोस. रात्रीं सर्वदा तूं मला विवाहानें भार्यारूपानें पहा. हे साधो ! यत्न व इच्छा यांवाचून प्राप्त झालेल्या स्त्रीसुखाचा मी प्रिय मित्रासह उप-भोग घेण्याची इच्छा करतों. तरी ' नाहीं ' असें ह्मणून तूं मला विघ्न करूं नकोस. सृष्टि-कालापासून आरंभ होऊन देव-ऋषि इत्यादि-कांमध्यें आजवर क्रमानें प्रवृत्त झालेलें, अना-यासानें साध्य होणारें मनोरम प्रकृत विवाह-कार्य, इच्छा व अनिच्छा आणि त्यांचें कार्य यांस सोडून करणाऱ्या तुला दोष कोणता लागणार आहे ? कांहीं नाहीं. यास्तव आपण उभयतां सभोंवारच्या सर्व वस्तूंविषयीं सेच्छ नाहीं, अनिच्छही नाहीं, असे होत्साते हें आपलें अभीष्ट करूं या.

शिखिध्वजः—हे मित्रा ! या कार्यानें मीं कांहीं शुभ पहात नाहीं व अशुभही पहात नाहीं. यास्तव तुह्मी जशी इच्छा असेल तसें कर. समत्वास प्राप्त झालेल्या या चित्तानें हें जगत्त्रय स्वरूपच आहे, असें मी पाहतों. यास्तव जशी इच्छा असेल तसें तूं कर.

कुंभः—असें जर असेल तर हे राजा ! आजच शुभ लग्न आहे. आज या श्रावणमा-साची ही पूर्णिमा आहे. मीं कालच विवाह-लग्नादि सर्व गणित केलें. यास्तव आज रात्रीं परिपूर्ण कलांनीं अमल चंद्र उदय पावला ह्मणजे हे महाबाहो ! आह्मां दोघांचाच विवाह गांधर्व विधीनें होईल. आज या महेंद्र पर्वता-वरील मनोहर शिखरावर रत्नदीपप्रकाशानें संपन्न असलेल्या, पुष्पभारानें वांकलेल्या, उंच वृक्षपंक्तींनीं विराजमान झालेल्या व वनपुष्प-लतांचें नृत्य याच स्त्रियांच्या नृत्यांनीं मनोहर झालेल्या रत्नमय गुहारूपी मंदिरांत होणारा आह्मां दोघांचा विवाह, हे दीर्घ व सुंदर नेत्रांनीं शोभणाऱ्या राजा ! रात्रीं आकाशांतील तारा आपल्या पूर्णचंद्र भर्त्यासह पाहोत. मित्रा ! ऊठ, आपण आपल्या विवाहासाठीं रत्नयुक्त चंदन-पुष्पादि संभार या अरण्यकोट-रांतून जमवूं या.

असें बोलून कुंभ उठला; व त्या राजासह-वर्तमान पुष्पें गोळा करता झाला. त्यानें रत्ना-दिकांचाही संचय केला. त्यानंतर दोन घटि-कांतच सम व शुभ अशा रत्नमय शिखरा-वरील त्या अंगण्यांत दोघांनीं देवता-अग्नि-मदन इत्यादिकांच्या पूजेसाठीं पुष्पांच्या राशि केल्या. दुसऱ्या अंगण्यांत हार, वस्त्रें, श्रेष्ठ माणि इत्या-दिकांच्या राशि केल्या. त्या राशि म्ह० कामानें त्यांच्या सुकृत परिपाककालाच्या साह्यानें जणुं काय सौभाग्याचे कोशच संपादन केले होते. याप्रमाणें सुवर्णगुहेंत विवाहसंभार तयार करून ते दोघे महामित्र मंदाकिनी नदीस स्नान करावयासाठीं गेले. तेथें हत्तीच्या कुंभा-प्रमाणें ज्याचे स्कंध आहेत, अशा या महा-राजास कुंभानें मंगलपूर्वक मोठ्या आदरानें स्नान घातलें. त्यानंतर त्या भावी पतीनें भावी पत्नीरूप अंगनेला म्ह० त्या कुंभरूपधर चूडा-लेला स्नान घातलें. स्नान केलेल्या त्या दोघांनीं तेथें देव, पितर व मुनि यांचें पूजन केलें. ज्याप्रमाणें तीं दोघें क्रियाफलांविषयीं अनिच्छ होतीं, तशींच क्रियात्यागविषयींही निरिच्छ होतीं. जगत्स्थितीच्या व्यवस्थेंत तीं नित्य ज्ञानरसानें तृप्त होतीं. त्यांनीं एकमेकांना इष्ट असलेलें अन्न सिद्धींच्या बलानें तयार केलें व कल्याणावह भोजन केलें. त्यांनीं शुभ्र कल्पवृक्षांनीं दिलेलीं महावस्त्रें परिधान केलीं. कल्पवृक्षांचीं फळें खाऊन तीं क्रमानें विवाह-

स्थानीं आली. इतक्या अवधींत विवाहाविषयीं उत्सुक झालेल्या त्या दोघांचें प्रिय करण्यासाठीं सूर्य अस्ताचलास गेला. नंतर संध्यावंदन होऊन जप व अघमर्षण केल्यावर, विवाहदर्शनासाठींच तारासमूह आकाशांत आला असतां स्त्रीपुरुषांची एक सखी अशी रात्र कुमुदसमूहानें हसत व दंवाच्या थेंबांचा वर्षाव करीत आली. ब्रह्मदेव आकाशांत चंद्र-सूर्ययुक्त ज्योतींची जशी योजना करतो त्याप्रमाणें त्या शिखरावर कुंभानें अनेक रत्नदीपांची उत्तम योजना केली. स्त्रीत्वास प्राप्त होणाऱ्या कुंभानें रात्रीच्या आरंभीं राजाला चंदन, अगुरु, कर्पूर, कस्तूरी, केशर, हार, केयूर, कटक, कल्पलतांशुक यांनीं कानांवर लटकवण्याच्या उत्तम पुष्पमाळांनीं, नानाप्रकारच्या उचित हारांनीं, तसेंच कल्पलतागुच्छांनीं, मंदार पुष्पांनीं, परिजात—संतानवृक्षांच्या फुलांनीं, व पुष्कळ रत्नांनीं भूषित केलें. चंद्रासारख्या चूडामणीनें अलंकृत केलें. इतक्यांत कुंभ स्त्रीत्वास प्राप्त झाला. तो तत्काल घनस्तनभारानें आक्रांत व विलासवान झाला. त्यानें असें चिंतन केलें.—"हा मी वधू झालों आहें. मला आतां आपला आत्मा कामाला दिला पाहिजे. मला या कालाला उचित असेंच आचरण केलें पाहिजे. ही मी कांता वधू आहें. हा माझा भर्ता माझ्यापुढें स्थित आहे. हे हृदयस्थ कामा ! हा तुझा काल आहे. मला प्राप्त हो." असें मनांत चिंतन करून पुढील वनवेदीवर बसलेल्या, उदय पावणाऱ्या आदित्याप्रमाणें शोभणाऱ्या भर्त्यापाशीं, रति जशी कामापाशीं जाते त्याप्रमाणें ती गेली. "हे मानदा, मी मदनिका या नांवाची तुझी भार्या आहें. मी प्रेमानें तुझ्या पायांवर हा प्रणाम करतें." असें ह्मणून ती सुंदरी लज्जेनें नम्र झाली; आणि ज्याच्यावरील केंस चंचल झाले आहेत अशा मस्तकानें शोभणाऱ्या तिनें पतीला प्रणाम केला आणि ती म्हणाली—"हे नाथ ! तूं मला भूषणांनीं भूषित कर. त्यानंतर अग्नीला प्रज्वलित करून, त्यांत हवन करून, त्याची पूजा करून माझें पाणिग्रहण कर. हे राजन् ! तूं अतिशय शोभत आहेस. मला कामातुर करीत आहेस. तूं या वेळीं रतीच्या विवाहांतील प्रसिद्ध मदनालाही स्वशोभेन तुच्छ करून स्थित आहेस. हे राजन्! चंद्राचा जसा किरणसमूह त्याप्रमाणें तुझीं पुष्पें आहेत. तुझ्या वक्षःस्थलावरील हा हार मेरूवरील गंगाप्रवाहाच्या शोभेस धारण करतो. ज्यांत मंदारपुष्पें गुंफलेलीं आहेत अशा या केशांनीं तूं, केसरांना ज्यांनीं विघटित केलें आहे अशा चंचल भ्रमरांनीं सुवर्णकमल जसें शोभतें, तसा शोभत आहेस. रत्नांचे किरणसमूह, पुष्पें, शोभा, स्थैर्य, तेज, यांच्या योगानें रत्नांचें स्थान असा जो मेरु त्यालाही तूं तुच्छ करून राहिला आहेस."

याप्रमाणें बोलणारें तें पूर्वीचें प्रच्छन्न दांपत्य व आतां होणारें नवें दांपत्य परस्पर अत्यंत संतुष्ट झालें. सुवर्णशिलारूपी पर्यंकावर बसलेल्या त्या महाराज शिखिध्वजानें महाराज्ञी मदनिकेला स्वतः भूषित केलें. कर्णभूषणें, पुष्पमाळा, मणि व रत्नें यांचीं भूषणें, वस्त्रें, उट्या, व सुटीं पुष्पें उचित स्थानीं अर्पण करून त्यांच्या योगानें भूषित केलें. ती पुरुषाला मद देणारी सुंदरी मदनिका भूषित झाली असतां अतिशय शोभूं लागली. ती कामिनी विवाहास उत्सुक झालेल्या गिरिजेप्रमाणें किंवा कामपत्नी रतीप्रमाणें त्या वेळीं शोभली. त्या महाराणीला भूषित करून महाराज असें म्हणाला—"हे सुंदरी ! तूं नवीन उत्पन्न झालेल्या लक्ष्मीप्रमाणें शोभत आहेस. इंद्रासह शचीचें, हरीसह लक्ष्मीचें, व शंभूसह गौरीचें जें मंगल झालें, तें तुझें माझ्यासह मंगल होवो. तूं जणुंकाय पद्मिनीच

आहेस. तुझ्या हृदयावर कमलकोशांकुरासारखे स्तन दिसत आहेत. नेत्र चंचल नीलकमलासारखे आहेत व सुगंधांनीं शुभ असे तुझ्या भूषणांचे ध्वनि भ्रमरांच्या गुंजारवाच्या स्थानीं आहेत. सुंदरी ! तूं जणुं काय कामकल्पतरूची शाखा आहेस, असें मला वाटतें. त्याच्या अत्यंत लाल पल्लवासारखे तुझे तळहात आहेत, त्याच्या पुष्पगुच्छासारखे तूं स्तन धारण करीत आहेस. तूं अनेक फलांनीं संपन्न आहेस. तुझें अंग हिमाप्रमाणें शीत व निर्मल आहे. तुझें हास्य जोत्स्नाप्रसराप्रमाणें आहे. पूर्ण चंद्राच्या शोभेप्रमाणें उदित व हृष्ट असलेली तूं मला अत्यंत आह्लाद देत आहेस. यास्तव हे सुंदरि ! ऊठ व विवाहाच्या वेदीला स्वतः अलंकृत कर."

श्रीवसिष्ठः—ती वेदी पुष्प व लता यांच्या समूहांनीं व प्रत्येक कांडांमध्यें पुष्पगुच्छासारख्या नवरत्नाशिलांनीं चिन्हित झाली होती. स्तबकासारख्या मुक्तापुष्पांच्या थरांनीं ती आच्छादित झाली होती. त्या वेदीच्या चार दिशांमध्यें गंगाजलानें भरलेले चार कुंभ ठेवले होते व त्यांवर एकेक नारिकेल फळ ठेवलेलें होतें. त्या वेदीच्या मध्यें विवाहसंबंधी अग्नीची प्रतिष्ठापना करून त्याला चंदनकाष्ठांनीं प्रज्वलित केलें. ज्याच्या ज्वाला निघूं लागल्या आहेत अशा दक्षिणावर्त शिखांमुळें दक्षिणस्थ अग्नीची योजना करून व त्याला प्रदक्षिणा करून तें सुंदर दांपत्य अग्नीच्या अग्रभागीं पूर्वेकडे तोंड करून पल्लवांच्या आसनावर बसलें. शिखिध्वज राजानें तिल व लाजा यांचा अग्नींत होम केला. पुनः पुनः उठून दोन्ही हातांनीं त्यानें कांतेचें ग्रहण केलें. वनामध्यें मंगलस्वरूप असलेलीं तीं दोघें शंकर व पार्वती यांप्रमाणें एकमेकांस सुशोभित करतीं झालीं. त्या दोघांनीं मिळून अग्नीला प्रदक्षिणा घातली. त्यांनीं एकमेकांना त्या प्रसंगीं ज्ञानसर्वस्व हृदय व अचल प्रेम हें स्वधन दिलें. तीं दोघें एकमेकांकडे पाहून स्मित करीत असल्यामुळें त्यांच्या मुखावर उत्तम शोभा आली. तीन प्रदक्षिणा करून संतुष्ट झालेल्या त्या दोघांनीं एकाच वेळीं अग्नींत लाजांचा त्याग केला. त्यांचीं स्मितयुक्त सुंदर मुखें नुकत्याच उदय पावलेल्या दोन चंद्रांप्रमाणें दिसत होतीं. त्यानंतर पूर्वींच तयार करून ठेवलेल्या ताज्या पुष्पशय्येवर तीं बसलीं. इतक्यांत चंद्र जणुं काय यांची शोभाच पाहण्यासाठीं आकाशाच्या चवथ्या भागाचें हळूहळू आक्रमण करून वर आला. ज्याप्रमाणें कामुक पुरुषाची दृष्टि स्त्रीचें छिद्र पाहण्यासाठीं चहूंकडे आपले किरण पसरते, त्याप्रमाणें चंचल चंद्रानें त्या लतागृहांत आपल्या किरणांस पाठविलें. त्यानंतर चंद्र असा वर आला असतां संगममुहूर्ताची वाट पाहणारीं तीं दोघें निरनिराळ्या नव्या नव्या गोष्टी बोलत राहिलीं. पुढें शुभमुहूर्त प्राप्त होतांच तीं तेथून उठलीं व जेथें रत्नें हेच दीप तेवत आहेत अशा पूर्वी स्वतः रचलेल्या गुप्तसुवर्णगुहेंत त्यांनीं प्रवेश केला. तेथें त्यांना पुष्पांचें रचलेलें नवें तल्प दिसलें. ती शय्या सभोंवार पसरलेल्या सुवर्णकमलांच्या ढिगांनीं व मंदरादि म्लान न झालेल्या दिव्य पुष्पांनीं व्यापलेली होती. सारखीं फुलें हांतरून उत्तम प्रमाणांत ती शय्या उंच रचलेली होती. तीं फुलें दीर्घ चंद्रबिंबासारखीं दिसत होतीं. तुषारस्थलाप्रमाणें शीतल होतीं. क्षीरसागराच्या जलधारांसारखें व चांदण्याच्या समूहाप्रमाणें सुंदर दिसणारें तें तल्प जणुं काय भिंतीवर पडलेलें कामदेवाचें प्रतिबिंबच आहे असा भास होत होता. राज्य सोडल्यापासून अदंपतीत्वानें उदय पावलेलें तें जोडपें त्या सुगंधयुक्त, उंच, रम्य, शुभ शय्येवर मधोमध,

क्षीरसागरांत जसा मंदर, त्याप्रमाणें बसलें. त्या दोघां अत्यंत सुंदर पतिपत्नींची ती दीर्घ रात्रही प्रेमानें रमणीय झालेल्या निरनिराळ्या गोष्टींनीं त्या कालाला उचित अशा आलिंगनादि कार्यांनीं, सुंदर झालेल्या—गंध-पुष्प-तांबुलादिकांचें समर्पण करणें इत्यादि प्रेमळ उपचारांनीं व नव्या नव्या संभोगसुखानें एका मुहूर्तासारखी गेली. १०६.

## सर्ग १०७ वा.

—:०:—

१ नाना पर्वतांवरून विहार, २ मायिक इंद्राचें दर्शन, व ३ त्यानें राजाच्या अनासक्तीचें परीक्षण करण्यासाठीं स्वर्गांत येण्याविषयीं केलेलें आव्हान.

**श्रीवसिष्ठः**—त्यानंतर 'सूर्य' या नांवाच्या रंगानें भुवनोदर रंगित झालें असतां मदनाला उत्पन्न करणारी शिखिध्वजाची पत्नी प्रातःकाळीं कुंभत्वास प्राप्त झाली. ती कुंभ—नारदपुत्र बनली. याप्रमाणें महेंद्र पर्वताच्या दरींत ते दोघे कुंभ व शिखिध्वज स्वतः विवाह करून इष्ट देवदंपती बनले. देवांच्या भोगांसारख्या भोगानें संपन्न असल्यामुळें तें देवांचेंच दांपत्य होतें. त्यांनीं विचित्र वनपंक्तींत प्रत्यहीं विलास केला. त्या वनपंक्ति अतिशय परिपक्व झालेल्या फळांच्या भारानें ओथंबलेल्या आणि पुष्पें व पल्लव यांनीं युक्त होत्या. दिवसां अत्यंत प्रिय मित्र व रात्रीं इष्ट पति-पत्नी, याप्रमाणें राहणारे ते दोघे, प्रभा व दीप यांप्रमाणें एकमेकांशीं संश्लिष्ट होऊन राहिले. ते केव्हांही वियुक्त झाले नाहींत. तें जोडपें वनकुंजांमध्यें व पर्वतांच्या गुहांमध्यें रममाण झालें. तमालवृक्षाच्या समूहखंडांत मंदारांच्या अरण्यांत, गंधमादन, विंध्याद्रि, लोकालोक इत्यादि पर्वतांच्या तटांवर त्यांनीं सुखोपभोग घेतला. चूडाला दर तीन दिवसांनीं आपला प्रियकर निजला असतां आपल्या नगरास जात असे व तेथील राजकार्यें करून पुनः परत येत असे. कुंभ व राजा असे ते दोघे दिवसां परम मित्र होऊन व रात्रीं पति-पत्नी होऊन परस्पर नाना प्रकारच्या पुष्पांनीं वेष्टित व आनंदित होत्साते वनांत राहिले. ते दोघे एक महिनाभर देवदार वृक्षांनीं व्यापलेल्या रम्य महेंद्रपर्वतावर राहिले. तेथील रत्नांच्या भिंतींनीं युक्त असलेल्या गुहारूपी गृहांत देवकिन्नरींनीं त्यांची प्रशंसा केली. तेथें हातांनीं काढतां येतील अशीं, क्षुधा-तृषा-रोग-जरादिकांना घालविणारीं फुलें, फळें, पल्लव वगैरे ज्यांवर आहेत, अशा मंदारवृक्षांची पंक्ति होती. त्याचप्रमाणें शुक्तिमान् पर्वताच्या पृष्ठावर कल्पलतागृहांत तीं दोघें एक पंधरवडाभर राहिलीं. दोन महिने दक्षिणदिक्तटावरील पक्षयुक्त—पंख असलेल्या—मैनाकपर्वताच्या देवभोग्य पुष्पस्तबकांनीं भूषित झालेल्या पारिजातवनांत तीं राहिलीं. मेरूच्या सुवर्णमय दक्षिणपादीं जंबुद्वीपाचा केतुच असा जंबुवृक्ष प्रसिद्ध आहे. तो जंबुनदीच्या कांठीं आहे. त्या वृक्षाचीं फळें खालीं पडून त्याच्या बियांपासून तेथें एक मोठें जांभळाचें वनच झालें आहे. त्यांत मोठमोठ्या जांभळांच्या रसरूपी आसवाचा आस्वाद घेत ते दोघेजण एक महिनाभर राहिले. उत्तरकुरुदेशांत ते दहा दिवस राहिले. उत्तर कोसल देशांत त्यांनीं सत्तावीस दिवस निवास केला. याप्रमाणें पर्वताच्या दुसऱ्याही विचित्र प्रदेशांत ते दोघे महाभाग सुहृद् राहिले. रात्रीं तें स्त्री-पुरुषांचें जोडपें होत असे. त्यानंतर कांहीं महिने लोटले असतां देवपुत्ररूपिणी चूडाला मनांत म्हणाली—" मी आतां या शिखिध्वजराजाची सुरूप भोगांच्या भारानें परीक्षा पाहतें.

१ उपभोगानें ती शय्या चुरडून जावयाची असल्यामुळें हा—क्षीरसागराला क्षुब्ध करणाऱ्या मंदराचा दृष्टान्त दिला आहे.

परीक्षेनें ज्याची अनासक्ति दृढ केली आहे असा हा राजा भोगांमध्यें आसक्त न होवो." असा विचार करून तिनें आपल्या योगमायेनें त्या अरण्यभूमींत देव व अप्सरा यांसह इंद्र आला आहे, असें दाखविलें. इंद्र आपल्या परिवारासह आला आहे असें पाहून, वनांत असलेल्या शिखिध्वजानें त्याचें यथाविधि पूजन केलें.

शिखिध्वजः—हे देवराज! तूं स्वतः इतक्या दुरून येथें येण्याचे श्रम कशाला व कोणत्या उद्देशानें घेतलेस, तें कृपा करून मला सांग.

इंद्रः—ज्याप्रमाणें वनांतील पक्षी हृदयांत लागलेल्या सूत्रानें—पायाला बांधलेल्या दोऱ्यामुळें पराधीन होऊन मनुष्याच्या हातांत येतात, त्याप्रमाणें तुझ्या गुणाधिक्यामुळें आम्हांला स्वर्गांतून येथें यावें लागलें. तर आतां ऊठ व स्वर्गलोकीं चल. तेथें देवस्त्रियांचे समूह तुझे गुण ऐकून आश्चर्यचकित झाले आहेत व तुझ्याविषयीं अतिशय उत्कंठित होऊन राहिले आहेत. मला आकाशांतून गमन करण्याचें सामर्थ्य नाहीं म्हणून म्हणशील, तर पादुका, गुटिका, खड्ग, रस, विमान, दिव्य अश्व इत्यादिकांतील तुला कोणतें साधन पाहिजे तें सांग. वाटेल तें साधन घेऊन सिद्धमार्गानें स्वर्गमंडलाचा स्वीकार कर. स्वर्गास येऊन देवांच्या घरांत जीवन्मुक्त झालेला तूं विविध भोगांचा उपभोग घे. हें सांगून तुला स्वर्गलोकीं नेण्यासाठीं मी आलों आहें. तुझ्यासारखे साधु अनायासानें आलेल्या श्रीचा तिरस्कार करून अपमान करीत नाहींत, व न प्राप्त झालेल्या तिचा अभिलाष करीत नाहींत. भगवान् विष्णूच्या योगानें त्रिभुवन जसें, त्याप्रमाणें निर्विघ्नपणें आलेल्या व सुखानें विहार करणाऱ्या तुझ्याकडून स्वर्ग पवित्रतेस प्राप्त होवो.

शिखिध्वजः—हे देवांच्या राजा! मी सर्व प्रदेशांला स्वर्गाप्रमाणेंच समजतों. स्वर्गांत अनायासानें विहार होतो, हें खरें; पण मला सर्वत्र स्वर्गच आहे. कोठेंही नियत देशालाच मी स्वर्ग समजत नाहीं. हे प्रभो! मी सर्व ठिकाणींच संतुष्ट होतों. सर्वत्र रममाण होतों. माझें मन वांछारहित असल्यामुळें मी सर्वत्र आनंदवान् आहें. नियमानें एकाच ठिकाणीं असलेल्या अशा प्रकारच्या तुच्छ स्वर्गाला येण्याची माझी इच्छा नाहीं. हे इंद्रा! मी ही तुझी आज्ञा पूर्ण करीत नाहीं.

इंद्रः—ज्यांची बुद्धि पूर्ण आहे, अशा ज्ञानी पुरुषांना विषयांचा भोग घेणें व न घेणें, हें दोन्ही एकसारखेंच आहे. तथापि सज्जनांनीं प्रारब्धाच्या क्षयासाठीं विषयोपसेवन केलें आहे. यास्तव तेंच युक्त आहे, असें मी समजतों.

श्रीवासिष्ठः—तो देवांचा राजा इंद्र पुनः असें बोलला असताही स्वर्गाला जाण्याची इच्छा नसल्यामुळें राजा मुकाट्यानें बसला. तेव्हां 'तूं जर असा निरपेक्ष असशील तर मी येथें कशाला राहूं? जातों.' असें इंद्र म्हणाला. तेव्हां 'मी आजच स्वर्गाला येत नाहीं, तर पुनः राज्यावर प्रतिष्ठित झालों व तुझ्या शत्रूचा नाश करण्याचा प्रसंग आला, म्हणजे मी स्वर्गलोकीं येईन' असें शिखिध्वज म्हणाला. नंतर 'हे कुंभा! तुझें कल्याण असो! असें कुंभाला म्हणत इंद्र अंतर्धान पावला. ज्याप्रमाणें समुद्रांत वायु शांत झाला असतां ज्यांत मकर-फेंस-सर्प इत्यादि व्याकुळ होऊन स्फुरण पावत आहेत असा कल्लोलसमूह अदृश्य होतो, त्याप्रमाणें इंद्र अंतर्धान पावला असतां त्या स्वर्गेशासहवर्तमान बाकीचा सर्व देवसमूहही क्षणांत सर्वथा अदृश्य झाला. १०७.

---

## सर्ग १०८ वा.

—:०:—

१ राजाच्या क्रोधाची परीक्षा करण्यासाठीं राणी मायेनें विटसंग दाखविते व २ आपलें खरें रूप प्रकट करते.

**श्रीवसिष्ठ:**—त्या मायेला शांत करून चूडालेनें असा विचार केला—"हा राजा भोगेच्छेनें व्याकुल होत नाहीं, ही मोठी आनंदाची गोष्ट आहे. हा शांत, सदा निर्विकार राजा इंद्राच्या समागमप्रसंगीं आकाशादि सम पदार्थासारखी ज्याच्या मुखादि अवयवांची समस्थिति आहे, असा राहिला. त्यानें पूजनभाषणादि सर्व व्यवहार मनांत क्षुब्ध न होतां पण मनापासून केला. मी पुन: याची दुसऱ्या एकाद्या—चित्ताला क्षुब्ध करणाऱ्या—रागद्वेषप्रधान प्रपंचानें परीक्षा पाहतें." असें चिंतन करून रात्रीं वनांत चंद्राचा उदय झाला असतां तिनें स्त्रीरूप घेतलें. ती साध्वी कांता मदनिका झाली. त्या वनांत वायु वहात होता. तें फुललेल्या वृक्षांनीं संपन्न होतें. त्यांत पुष्कळ मधुर सुवास सुटला होता. त्या वेळीं शिखिध्वज राजा नदीच्या तीरावर संध्या व जप करीत बसला होता. इतक्यांत पुष्पगुच्छांनीं दाट झालेल्या संतानक लतागृहांत ती मदनिका मदानें युक्त होऊन प्रवेश करती झाली. तें लतागृह जणुं काय वनदेवींचें शुद्ध अन्त:पुरच होतें. त्या गृहांत संकल्पित पुष्पशय्येवर संकल्पानें उत्पन्न केलेल्या विंग या नांवाच्या कांताला आलिंगन देऊन ती बसली. त्या वेळीं ती पुष्पमाळांनीं अतिशय सुशोभित झाली होती. शिखिध्वज राजा नदीवरून संध्या आटोपून परत आला, व आपल्या प्रियेला हुडकूं लागला. तों त्याला लतागृहांत मनोहर विंगाला आलिंगन देऊन बसलेली मदनिका दिसली. त्या विंगाचा म्हणजे परस्त्रीगमन करणाऱ्या विटाचा स्कंध त्याच्या केसांनीं व तिच्या केसांनीं व्याप्त झालेला होता. मदनिकेच्या वक्ष:स्थळावरील चंदन त्या विटाच्या अंगाला लागलें होतें. शय्येवरील अस्ताव्यस्त परिवर्तनामुळें त्या दोघांचेही केंस व चूडामणी वगैरे विखुरले होते. मदनिकेच्या दुमदून उशाला घेतलेल्या व त्यामुळेंच द्विगुणित अशा बाहुलतेवर विंगाचा कान, अपांग प्रदेश, गाल, व केंस संसक्त झाले होते. एकमेकांकडे तोंड करून हंसत असलेल्या त्या जोडप्याला त्यानें पाहिलें. तें जोडपें एकमेकांच्या मुखांवर आसक्त झालें होतें. कल्पलतांशुकांनीं तें आच्छादित झालें होतें. त्यांच्या शयनाचीं पुष्पें हालत होतीं. तें जोडपें मदनातुर व आकुल झालें होतें. एकमेकांचीं अंगें एकमेकांस लागणें, या निमित्तानें त्यांनीं आपापला अंगराग दुसऱ्यास अर्पण केला. एकमेकांच्या तोंडास तोंड त्यांनीं लावलें होतें. त्यांना त्या वेळीं फार आनंद झाला होता. उत्कट मदनानें तें जोडपें मंद झालें होतें. तीं दोघें एकमेकांच्या अंगावर पुष्पें फेकीत होतीं. तीं आपल्या वक्ष:स्थळांनीं परस्परांच्या स्तनांस पीडा देत होतीं. तो त्यांचा कामविलास पाहून राजा निर्विकार चित्तानें अतिशय संतुष्ट झाला व म्हणाला—"अहो! हीं दोघें सुखानें स्थित आहेत, यांना आपापल्या इच्छेप्रमाणें असाच सुखानुभव घेऊं दे, यांना असेंच आनंदांत राहूं दे. मला पाहून भ्यालेल्या या दोघांना मी विघ्न करीत नाहीं." असें बोलून तो तेथून निघून गेला.

त्यानंतर दोन घटिकांनीं त्या मायिक प्रपंचाची उपेक्षा करून ती मदनिका विटाच्या संभोगानें विकासित व आकुल झालेलें आपलें शरीर राजाला दाखविण्याच्या उद्देशानें लतागृहांतून बाहेर आली. तिनें हेमशिलेच्या तळावर बसलेल्या राजाला पाहिलें. तो एकां-

तांत चित्ताला समाहित करून बसला होता. त्याचे नेत्र किंचित विकसित झालेले होते. तेथें त्याच्यापाशीं ती लज्जेनें मुख किंचित् खालीं घालून आली आणि खिन्न व म्लानवदन होऊन ती क्षणभर मुकाट्यानें बसली. इतक्यांत शिखिध्वज राजा ध्यान सोडून अगदीं अक्षुब्ध चित्तानें तिला असें अत्यंत मधुर वाक्य बोलला—"हे सुंदरि! तूं आपल्या आनंदाला विघ्न करून इतक्या लवकर कशाला आलीस? कोणताही प्राणी आनंदासाठींच यत्न करीत असतो. तूं पुनः जाऊन प्रेमवृत्तींनीं त्या आपल्या कांताला संतुष्ट कर. कारण या त्रिभुवनांत परस्परांना इष्ट असा स्नेह दुर्लभ आहे. हे मानिनि! मी या असल्या गोष्टीनें उद्विग्न होत नाहीं. ज्ञानी पुरुषानें आपल्याला जें जें अत्यंत इष्ट असेल तें तें सर्व असेंच—तुजप्रमाणेंच परोपभोग्य आहे, असें समजावें. हे सुंदरि! विरक्त कुंभ व मी यांचा स्नेह आहे तसाच रहाणार. तूं कुंभाहून निराळी आहेस. दुर्वासाच्या शापामुळें तूं स्त्री झाली आहेस. यास्तव तूं जें इच्छीत असशील तें खुशाल कर.

**मदनिकाः**—हे महाभागा! स्त्रियांचा स्वभाव हा असाच चंचल आहे. स्त्रियांचा काम आठपट आहे. मजवर तूं रागवूं नकोस. मी अबला आहे. रात्रीं दाट अरण्यांत तूं संध्या व जप करण्यास बसला आहेस, असें पाहून त्यानें माझी प्रार्थना केली. तेव्हां मी काय करावें? पतीच्या पराधीन असलेली स्त्री किंवा तरुण कुमारी एकान्तात जार भेटला असतां त्याच्या रतीला प्रतिबंध करूं शकत नाहीं. हा स्त्रीस्वभाव आहे. जारानें मनाला हरण केल्यावर दैववशात् रतिसुखांत जर कांहीं विघ्न आलें तर मनःप्राणादिक आपल्या शरीरांत स्थिर रहात नाहींत. ते अत्यंत चंचल होऊन संतप्त होतात. पुरुषांना वश करण्यास समर्थ अशा सौंदर्याचा लाभ न होणें, हेंच एक त्यांचा पुरुषाशीं समागम न होण्याचें कारण आहे. पुरुषांना वश करण्यास समर्थ अशा सौंदर्यास प्राप्त झालेल्या स्त्रिया एकांतांत सन्मुख जर झाल्या तर विवाहित पतीचा क्रोध, शास्त्रीय निषेध, जनापवाद व पातिव्रत्याचा भंग यांतील कोणीही त्यांचें निवारण करूं शकत नाहीं. कारण अतिप्रबल आसक्ति झाल्यावर, जाराच्या संगाला निरोध करण्यास त्या समर्थ नसतात. महाराज! मीं अबला आहें. स्त्री आहें, मूढ बाला आहे. अपराधिनी आहें. मला क्षमा कर. साधु क्षमावान् असतात.

**शिखिध्वजः**—बाले! आकाशांत जसा वृक्ष त्याप्रमाणें माझ्या मनांत क्रोध मुळींच नाहीं. केवल साधूंनीं निंद्य मानल्यामुळें यापुढें मी तुला आपली वधू मानीत नाहीं. हे अंगने! आपण पूर्वीप्रमाणें वनामध्यें मित्रत्वानें व विरक्तपणानें बरोबरच नित्य रममाण होऊं.

**श्रीवसिष्ठः**—याप्रमाणें त्या वेळीं राजा शिखिध्वज समत्वानें स्थित झाला असतां त्याच्या रागद्वेषवासनाशून्यत्वामुळें हृष्ट झालेली चूडाला मनांत असें चिंतन करती झाली—"खरोखर मोठें आश्चर्य आहे! हा भगवान् परम साम्यास प्राप्त झाला आहे. वैराग्यामुळें क्रोधशून्य झाला आहे व त्यामुळें जीवन्मुक्त होऊन राहिला आहे. याला इंद्रानें इच्छिलेलेही भोग व मोठमोठ्या सिद्धि हरण करूं शकत नाहींत. सुखें, दुःखें, आपत्ति व संपत्ति त्याला प्रिय वाटत नाहींत. मला इष्ट असलेल्या व जीवन्मुक्तलक्षणभूत अशा शांति-क्षमा-धैर्य-तृप्ति इत्यादि अनिंदित महाऋद्धि जणुं काय दुसऱ्या नारायणाप्रमा-

णेंच एकट्या याचाच आश्रय करून राहिल्या आहेत. यास्तव मी आतां आपल्या सर्व वृत्तान्ताचें याला स्मरण देतें. मी आतां हें कुंभरूप सोडून चूडालाच होतें." असें चिंतन करून चूडालेनें मदनिकेचें स्वरूप टाकलें व आपलें अक्षत स्वरूप तेथल्या तेथें तत्काल राजाला दाखविलें. करंड्यांतून जशी एकादी योगधारणावती स्त्री निघावी, त्याप्रमाणें जणुं काय त्या मदनिकेच्या देहांतून त्याच्यापुढें चूडाला निघालेली दिसली. राजानें मर्त्यांच्या चित्ताचें अनुरंजन करण्यांत कुशल असलेल्या त्या सुंदरीला पाहिलें. जी पूर्वी मदनिका कांता होती, तीच प्रिया चूडाला होऊन पुढें उभी आहे, असें त्यानें पाहिलें. वसंतऋतूंत उत्पन्न झालेल्या कमलिनीप्रमाणें, अथवा व्यक्त झालेल्या श्रीविष्णूच्या कमलहस्ता लक्ष्मीप्रमाणें किंवा रामावताराच्या शेवटीं भूमींत प्रवेश करून पुनः भूमींतून वर आलेल्या श्रीसीतेप्रमाणें, किंवा रत्नसंपुटांतून प्रकट झालेल्या रत्नश्रीप्रमाणें राजानें आपल्या चूडालाप्रियेला आपल्यासमोर पाहिलें. १०८.

— —

## सर्ग १०९ वा.

१ राजा ध्यानानें पुनः पुनः पाहून व सर्व जाणून अत्यंत विस्मित व तुष्ट झाला. आणि चूडालेची प्रशंसा करून तिला आलिंगन देऊन तेथेंच त्यानें ती रात्र घालविली.

**श्रीवसिष्ठः**—त्या प्रियेला पाहून विस्मयानें ज्याचे नेत्र प्रफुल्लित झाले आहेत असा शिखिध्वज आश्चर्याकुल वाणीनें असें बोलला—

"हे कमलनयने! तूं कोण आहेस? हे सुंदरि! तूं कोठून प्राप्त झाली आहेस? तूं येथें कां, किती वेळ व कशासाठीं रहात आहेस? तूं शरीराकृतीनें, व्यवहारानें, गालांतल्या गालांत हंसण्यानें, प्रेमळ—नम्र भाषणानें व माझ्या पत्नीसारख्या विलासानें तूं तिचीच मूर्ति आहेस, असें वाटतें.

**चूडालाः**—हे प्रभो! तूं तसेंच समज. मी चूडाला आहे, यांत संशय नाहीं. मी आज तुला सहज देहानें प्राप्त करून घेतलें आहे. मीं आतां तुला आपलें मूळ स्वरूप दाखविलें आहे. राजन्! या वनांत तुला बोध करण्यासाठींच माझा प्रपच कुंभादि देहांच्या उत्पत्तीनें शतशाखात्वास प्राप्त झाला. जेव्हां तूं मोहानें राज्य सोडून तप करण्यासाठीं वनांत आलास, त्यावेळेपासूनच मी तुला बोध करण्यास उद्युक्त झालें आहें. त्या कुंभदेहानें मींच तुला विशेष बोध केला. तुला बोध करण्यासाठींच मी कुंभादि देहांस मायेनें निर्माण केलें. हे राजा! त्यांतील कांहींच सत्य नाहीं. पूर्वोक्त योगधारणारूप ध्यानानें तूं अखंडित ज्ञातज्ञेय झाला आहेस. हे तत्त्वज्ञा! तूं ध्यानानें सर्व जाणूं शकशील. यास्तव सत्वर पहा.

चूडालेकडून याप्रमाणें सांगितला गेलेला तो राजा, कंबर बांधून—निश्चयानें ध्यान करावयास बसला आणि स्थिर मनानें त्यानें विशेषतः आपला शुद्ध वृत्तान्त पाहिला. एक मुहूर्तभर ध्यान करूनच त्यानें राज्याचा परित्याग केलेल्या क्षणापासून चूडालेचें आतां दर्शन होईपर्यंत घडलेला सर्व वृत्तान्त पाहिला. राज्यपरित्यागापासून वर्तमानक्षणापर्यंत सर्व वृत्तांताचें आलोचन करून शांतचित्त झालेला राजा विश्रांति पावला. कांहीं वेळानें समाधीपासून विरत झालेला तो राजा हृष्ट झाला. त्याचे नेत्र हर्षानें विकास पावले. रोमांचित झालेल्या आपल्या बाहूंना एकदम पसरून त्यानें तिला आलिंगन दिलें. त्या वेळीं त्याचे अवयव थरथर कांपत होते. त्याच्या नेत्रांतून अश्रु गळत होते, त्याची

तिच्याविषयींची स्पृहा वाढत होती व स्नेह पराकाष्ठेस पोंचला होता. नकुल—मुंगुस आपल्या मादीला जसें आलिंगन देतो, त्याप्रमाणें त्यानें आपल्या प्रियेला बराच वेळ आलिंगन दिलें एकमेकांना आलिंगन दिलें असतां त्या दोघांचा परस्परप्रेमरूप जो अवर्णनीय परमानंदरूप स्थायीभाव झाला. त्या वेळीं जो शृंगाररस उत्पन्न झाला त्याचें हर्षानें वर्णन करण्यास वासुकीही आपल्या जिव्हांनीं समर्थ नाहीं. तीं दोघें त्या वेळीं इतकीं संश्लिष्ट झालीं होतीं कीं अमावास्येस एकत्र जमलेल्या चंद्र-सूर्यांना चिखलानें जणुं काय लिंपून टाकल्याप्रमाणेंच तीं एकरूप दिसत होतीं. किंवा मोठ्या पर्वतावर एकमेकांस आलिंगन दिलेल्या दोन मूर्ति जशा खोदाव्या तशीं तीं दिसत होतीं. तात्पर्य, तीं दोघें तशाच आलिंगन दिलेल्या अवस्थेंत फार वेळ राहिलीं. दोन घटिकांनीं त्यांच्या अंगांतून घाम गळूं लागला. तेव्हां रोमांचांनी पुष्ट झालेले आपापले बाहु त्या दोघांनींही हळू हळू सैल करण्यास आरंभ केला. तीं दोघेंही एकमेकांस प्रिय वाटलीं. त्यांचीं हृदयें आनंदानें भरून गेलीं, त्या आनंदातिशयानें त्यांचें मन जड झालें. त्यामुळेंच मनांतील भाव बाहेर व्यक्त होईल, असें चिन्ह त्यांच्या मुखांवर दिसलें नाहीं. त्यामुळें तीं शून्यहृदय झाल्यासारखीं दिसत होतीं. त्यांनीं एकमेकांस सोडलें व तीं कोठें तरी पहात उभीं राहिलीं. याप्रमाणें एक क्षणभर घन आनंदांत मुकाट्यानें स्थित होऊन मग कांतेच्या हनुवटीला हात लावून राजा तिला अतिशय प्रेमानें ह्मणाला—" स्वकुलस्त्रियांना अत्यंत मधुर व स्निग्ध वाटणारा, रम्य, पुण्य, अमृताहूनही मधुर असा रतिसुखाचा अनुभव बालचंद्राप्रमाणें जिचें मुख आहे अशा तूं—सुंदर भार्येनें मला किती दिलास हा! हे सुंदरि! पतीच्या पुरुषार्थाची सिद्धि व्हावी, म्हणून तूं दीर्घकाल दारुण क्लेश सहन केलेस! जिनें आपल्या बुद्धीनें अशा अत्यंत दुस्तर संसारछिद्रांतून वर काढलें, तिची तुलना कोणाशीं करतां येणार? तुज सुंदरीच्या गुणश्रीनें अरुंधती, शची, गौरी, गायत्री, श्रीसरस्वती इत्यादि प्रसिद्ध स्त्रिया कोमेजून जातील. हे सुंदरि! तूं धी, श्री, कान्ति, क्षमा, मैत्री, करुणा, इत्यादि आकारांनीं रम्य दिसणाऱ्या स्त्रियांमध्यें पहिलीच दिसत आहेस. अत्यंत दृढनिश्चयानें तूं मला परिबोध केला आहेस. कोणत्या प्रत्युपकारानें तुझें मन संतुष्ट होईल? निश्चयी कुलस्त्रिया अनादिगहन व अनन्तगहन अशा मोहापासून पतीला तारीत असतात. स्नेहानें शोभणाऱ्या या कुलस्त्रिया जसा आपल्या भर्त्यांचा उद्धार करूं शकतात, तसे शास्त्रार्थ, गुरु, मंत्र इत्यादिकही त्यांचा उद्धार करण्यास समर्थ नाहींत. खरोखर! सखा, भ्राता, सुहृद्, भृत्य, गुरु, धन, सुख, शास्त्र, आधार, दास इत्यादि सर्व भर्त्याला कुलांगनाच आहे. ज्यांच्यामध्यें दोन्ही लोकांचें सर्व सुख उत्तम प्रकारें प्रतिष्ठित आहे, अशा कुलस्त्रिया सर्वदा सर्व यत्नानें पूज्य आहेत. निरिच्छ असलेल्या व संसारसागराच्या पार गेलेल्या तुझ्या या उपकाराची निष्कृति मी कशी करूं? या लोकांत मी तुलाच कुलांगना समजतों. लोकांत प्रसिद्ध असलेल्या सर्व कुलांगनांना तूं आज जिंकलें आहेस. स्त्रियांच्या सौजन्यादि गुणांची चर्चा चालली असतां त्यांत तुझें नांव प्रथम गणलें जाईल. गुणसमुद्रानें सर्वांहून अधिक, अशा तुला उत्पन्न करणाऱ्या ब्रह्मदेवावर खरोखर अरुंधत्यादिक स्त्रिया अतिशय रागावल्या असतील, असें मला वाटतें. रूप, सौजन्य, इत्यादि गुणरूप रत्नांचा तूं करंडा—आश्रय—आहेस. तूं साध्वी

आहेस. ये, तुझ्या गुणांनीं अत्यंत उत्सुक झालेल्या मला तूं पुनः आलिंगन दे.

श्रीवासिष्ठः—शिखिध्वज त्या मृगनयनेला म्हणजे आपल्या चूडाळा पत्नीला असें बोलून पुनः नकुल जसा नकुलीला कवटाळतो, त्याप्रमाणें दृढ आलिंगन देता झाला.

चूडालाः—हे देवा ! तूं शुष्क क्रियाजालामध्यें तत्पर व व्याकुलचित्त झाला आहेस असें पाहून मी वारंवार तुझ्यासाठीं अत्यंत दुःखित झालें. त्यामुळें तुला ज्ञान करून देणें हा स्वार्थच मीं संपादन केला आहे. तेव्हां आतां त्याविषयीं हे प्रभो ! तूं माझें गौरव कशाला करतोस ?

शिखिध्वजः—हे सुंदरि ! तूं जसा यावेळीं शुभ स्वार्थ संपादन केला आहेस, तसाच स्वार्थ सर्व कुलस्त्रिया संपादन करोत.

चूडालाः—हे कान्त ! हे विभो ! या जगल्लक्षण जालाच्या परमावधींत विश्रांति पावून तत्त्वतः तूं त्याला जाणणारा आहेस ना ? पयोव्रत, उपवास इत्यादि मोहाला तूं तुच्छ पहात आहेस ना ? मीं हें करतों व हें करीत नाहीं, मी या स्थितीस प्राप्त होतों, इत्यादि प्रकारच्या मनःस्थितीस म्ह० अपरिपक्वतेमुळें बुद्धीच्या कोमलतेस तूं आंतल्या आंत हंसतोस ना ? त्या तुच्छ तृष्णावृत्ति,त्या संकल्परूप कुकल्पना हे देवा ! तुझ्या ठिकाणीं, आकाशांतील पर्वताप्रमाणें, आतां दिसत नाहींत. हे प्रभो ! आतां तूं काय झाला आहेस ? तुझी निष्ठा कशामध्यें आहे ? तूं काय करीत आहेस किंवा कशाची इच्छा करतोस ? हे विभो ! तूं आपला प्राचीन देहचेष्टाक्रम आतां कसा पहातोस ? त्याला सत्य समजतोस कीं मिथ्या ?

शिखिध्वजः—पुष्पयुक्त नीलकमलाप्रमाणें जिचे नेत्र आहेत अशा हे चूडाले ! मला प्रत्यगात्मभूत तूंच आहेस. त्यामुळें ती तूं ज्या ज्या सत्य अथवा मिथ्या, मोह किंवा विवेक—तत्त्वदर्शन यांत प्रकाशक या रूपानें स्थित आहेस, त्या त्या पदार्थांच्या आंत मीही परम समीपभूत प्रत्यगात्मत्वानें स्थित आहें. त्यामुळें आतां तूं जसें पाहतेस, तसेंच मी तें सर्व पाहतों. अर्थात् तूं स्वानुभवानेंच माझ्या स्थितीचें अनुमान कर. मी निश्चेष्ट आहें, निरिच्छ आहें, निरंश आहें. मी आकाशासारखा स्वच्छ व निःस्पृह आहें. मी शांत आहें, परमार्थ सत्स्वरूप आहें. फार दिवसांनीं मी देहादि अनात्म्यांच्या ठिकाणचा अहंभाव सोडून स्वरूपाला जाणून आज स्थित आहें. प्रत्यगात्म्यामध्यें आसक्त झालेल्या चित्तरूपी मार्गांत अधिष्ठित होऊन मी अशा अवस्थेस प्राप्त झालों आहें कीं ज्या अवस्थेचा प्रतिषेध करावयासाठीं हरिहरादि महाप्रभाववान् देवांनीं हजारों प्रयत्न जरी केले तरी त्यांना तिचा प्रतिषेध करतां येत नाहीं. मी सर्वविशेषशून्य चिन्मात्रनिष्ठ होऊन राहिलों आहें. हे सुंदरि ! मी संसारभ्रमानें रहित आहें. मी दृष्ट नाहीं, हा दृश्यसमूह मी नाहीं व त्याचें कारणही मी नाहीं. मीं स्थूल नाहीं, तर हे सुंदरि ! अबाधित आत्मवस्तु आहें. सूर्यादि तेजोमंडलापासून निघालेल्या पण भिंतीसारख्या एकाद्या आधारावर विश्रांति न पावलेल्या आणि क्षय या अतिशयानें सर्वथा मुक्त असलेल्या प्रकाशाशीं माझें पूर्णपणें साम्य आहे. जगांतील सर्व वैषम्याचें निरसन करून त्याला साम्याला पोंचविणारा मी आहें. मी शांत आहें, स्वरूपांत स्थित आहें. मी निर्मनस्क आहें. मी पूर्ण परमानंदरूप आहें. हे पतिव्रते ! मी अगदीं तुझ्यासारखा आहें. सारांश, मी जो कोणी आहें तो आहें. मी यापलीकडे कांहीं बोलूं शकत नाहीं. हे चंचलनयने ! तूं माझा गुरु आहेस. तुला नमस्कार

असो. तुज विशालनयनेच्या प्रसादानें मी भव-सागरांतून तरलों आहें. शंभर वेळ अग्नींत घालून शुद्ध केलेल्या सोन्याप्रमाणें मी पुनः मळाचें ग्रहण करीत नाहीं. मीं शांत, स्वस्थ, मृदु, स्वरूपनिष्ठेंत अत्यंत उद्युक्त, निष्काम, ज्याची मति वासनाशून्य आहे असा, सर्व दृश्याहून अगदीं विलक्षण, सर्वव्यापी व आकाशाप्रमाणें स्थित आहें.

चूडालाः—हे प्राणेशा ! हे हृदयाप्रिया ! हे महसत्त्वा ! असें सिद्ध झालें असतां हे महामते प्रभो ! आतां तुला काय आवडतें तें सांग.

शिखिध्वजः—मला हें अमुक रुचत नाहीं, असें म्हणून मी प्रतिषेध करावयास जाणत नाहीं व अमुक एक मला इष्ट आहे, असेंही म्हणण्याचें मला माहीत नाहीं. हे सुंदरि ! तूं जें करतेस तें तसेंच मी व्युत्थान-समयीं जाणतों. हे प्रिये ! तुला जें जें अभिमत आहे तें सर्व पूर्णपणें तसेंच असो. आकाशाप्रमाणें स्वच्छ, निर्लेप, औदासीन्यपूर्णतेनें सुंदर असलेला हा मी कशाचेंही अनुसंधान करावयास जाणत नाहीं. यास्तव हे सुंदरि ! तूं जें कर्तव्य म्हणून जाणत असशील तेंच कर. मणि जसा प्रतिबिंबाचें ग्रहण करतो त्याप्रमाणें मीं आपल्या हृदयांत त्याचें कर्तव्यत्वानें धारण करीन. माझ्या चित्तापासून सर्व इष्ट दूर झालें आहे. यदृच्छेनें जें अनिंदित कार्य प्राप्त होईल त्याची मी स्तुति करीत नाहीं व निंदा करीत नाहीं. यास्तव जशी तुझी इच्छा असेल तसें आचरण कर.

चूडालाः—असें जर असेल तर हे महाबाहो ! माझें मत ऐक व तें ऐकून हे जीवन्मुक्तात्मन् ! तसेंच आचरण करण्यास तूं योग्य आहेस. आम्ही सर्वत्र ऐक्यावबोधानें सर्व भूतांमध्यें एक आत्मभावना करून, एकच आत्मा आहे असा अनुभव घेतल्यानें, अज्ञानाचा क्षय, या भूमीनें युक्त आहों, निरिच्छ आहों व आकाशासारखे निर्लेप होऊन राहिलों आहों. जशी आम्हांला राज्यादि भोगांची अपेक्षा आहे, तशीच ती नाहींही. कारण चक्षुरादिक गौण प्राण व मुख्य प्राण यांनीं आपापल्या उचित विषयांची इच्छाच करावयाची जरी सोडली तरी या परमात्म्यामध्यें कोणतें आधिक्य येणार ? अज्ञजन अन्तःकरण, देह, इंद्रियें, इत्यादिकांशीं आपला तादात्म्याध्यास करितात, पण तत्त्ववेत्ते तसा करीत नाहींत. त्यामुळें इंद्रियांना विषयभोगाभ्यासानें मालिन्य जरी आलें तरी आत्म्याला येत नाहीं. कारण कोणता निष्क्रिय-असंगचिन्मात्रभूत तत्त्ववेत्ता भोगांचा अभ्यास करणार ? कोणीही त्याचा वारंवार अनुभव घेणार नाहीं. केवळ प्रारब्ध-भोगानेंच घडणारा जो विषयभोगाभ्यास त्यामुळें ज्ञान्याला मालिन्य प्राप्त होत नाहीं. यास्तव आम्हीं त्यांच्या भोगाच्या आरंभीं, अंतीं व मध्यें मूळ ज्या स्वभावाचे आहों त्याच स्वभावाचे राहून भोगानें केवळ प्रारब्ध-शेषाचा क्षय करून राहिलों आहों. त्या स्वरूपापासून यत्किंचितूही ढळत नाहीं किंवा विपरीत भावाचा आश्रय करीत नाहीं. आपण आतां सांप्रत राज्यानें हा आयुःशेषरूप काल घालवून क्रमानें कांहीं कालानें हे प्रभो ! विदेहत्वास प्राप्त होऊं.

शिखिध्वजः—हे सुंदरि ! आम्ही आदि-अन्त-मध्य यांमध्यें कशा प्रकारचे आहों ? किंवा एका शेष आयुष्याचा भोगानें क्षय करून कसे राहूं, तें सांग.

चूडालाः—हे राजश्रेष्ठा ! आम्ही आदि-अन्त-मध्यावस्थेंत राजे आहोंत. केवळ एका मोहाचा त्याग करून आम्ही पुनः तेच होऊं. तूं आपल्याच नगरांत स्वासनावर स्थित

होऊन राजा हो. तूं अंतःपुरांतील स्त्रियांना भूषणभूत हो. मी तुझी राणी होईन. आपली ती नगरी फार दिवसांनीं राजानें युक्त होऊं दे. जिच्यांतील नगरवासी जन हृष्ट झाले आहेत अशी होऊं दे. जिच्यामध्यें नृत्य करणाऱ्या तरुण स्त्रिया आहेत, पताका लावल्या आहेत, मंगल वाद्यें वाजत आहेत व पुष्पांचा थर पडत आहे, अशी ती नगरी जिच्या मंजरीयुक्त वेली हालत आहेत व जिच्या पुष्पावरील भ्रमरपंक्ति ध्वनि करीत आहे अशा वसंतमासांतील लतालक्ष्मीसारखी होवो.

श्रीवसिष्ठः—असें चूडालेकडून बोलला गेलेला तो संताप-शून्य शिखिध्वज हंसून असें मधुर व अक्षुब्ध वाक्य बोलला. हे विशालनयने! तुला जर मजबरोबर भोग भोगण्याचीच इच्छा असेल तर स्वर्गांतील सिद्धभोगश्री आपल्या अधीन आहेत. कारण स्वतः इंद्र त्यांचा भोग घेण्याविषयीं प्रार्थना करून गेला, हें तुला माहित आहेच. मग त्यांचाच आम्हीं भोग कां घेऊं नये? त्या मानुष भोगांना घेऊन काय करावयाचें आहे?"

चूडालाः—राजन्! माझी भोगांविषयीं वांच्छा नाहीं व मला विभूतींचीही फारशी इच्छा नाहीं. तर स्वभाववशात् जशी अवस्था प्राप्त होईल तशीच माझी स्थिति होते. स्वर्ग मला सुख देण्यास समर्थ नाहीं, राज्य व क्रियाही मला सुखावह होणार नाहीं. तर मी जशी स्थित आहें तशीच अक्षुब्ध मनानें स्वस्थ चेष्टा करीत राहतें. हें सुख आहे व हें नाहीं, हें द्वंद्व क्षय पावलें असतां मी आतां शांत पदीं सुखानें सम स्थित आहें.

शिखिध्वजः—हे विशालाक्षि! तूं समबुद्धीनें हें योग्य सांगितलेंस. राज्याचें ग्रहण अथवा त्याग करण्यांत काय अर्थ आहे? सुख-दुःखदशांविषयींची चिंता सोडून निर्मत्सर मनानें स्वस्थतेस प्राप्त झालेलीं आम्ही दोघें जशींच्या तशींच स्थित आहों.

याप्रमाणें गोष्टी बोलत असतां त्या दोघां सुंदर पूर्व पतिपत्नींचा तो दिवस क्षीण झाला. तो केव्हां गेला हेंही त्यांना कळलें नाहीं. त्यानंतर उठून त्या दोघां अनिंदित कार्यज्ञांनीं यथाप्राप्त सायंसंध्यादि दिवसाचार केला. परस्परांना इष्ट असलेल्या संभोगाविषयीं तीं दोघें जरी उत्कंठित होतीं तरी वासनाशून्य असल्यामुळें उत्कंठाशून्य होऊन त्यांनीं आपापला आचार संपविला, आणि स्वर्गसिद्धीचा अनादर करून तीं पूर्णचित्त होऊन राहिलीं. नंतर जीवद्‌दवस्थतेच विमुक्त झालेल्या त्या दोघांची ती रात्र एकाच शयनावर निरनिराळ्या प्रणयचेष्टांनीं व्यतीत झाली. तात्पर्य परस्परांच्या अनुभवानें सिद्ध असें जें भोगसुख व मोक्षसुख तें प्रणयवाक्यविलासानें युक्त असें स्वयं सांप्रत असतांना त्या दोघांच्याही बुद्धीला उत्कंठतेस पोंचविणारी ती रात्र जरी दीर्घ होती तरी ती एका मुहूर्तासारखी गेली. १०९.

---

## सर्ग ११० वा.

१ संकल्पित सेन्यासह गजावर बसून तीं दोघें आपल्या नगरास गेलीं व २ दीर्घकाळ राज्य करून मुक्त झालीं.

श्रीवसिष्ठः—त्यानंतर संपुटांतूनच काढल्याप्रमाणें जगन्मणि सूर्य उदय पावला असतां आकाश अंधकारशून्य झालें. लोकांच्या लोचन उपान्तप्रदेशीं जसे नेत्र विकास पावतात त्याप्रमाणें कमलसमूह विकसित झाला असतां सर्व लोकांमध्ये जसा आचार तसे सर्वत्र सूर्यकिरण पसरले असतां तीं दोघेंजणें उठून व संध्याक्रम करून सुवर्णगुहेंतील मृदु व स्निग्ध पत्रासनावर बसलीं. नंतर कांता चूडाला आपल्या पुढें सात [illegible]

त्या पाण्यानें परिपूर्ण असा एक रत्नकुंभ संकल्पानें निर्माण करती झाली. त्या भार्येनें त्या मंगलकुंभानें पूर्वेकडे तोंड करून बसलेल्या त्या मर्त्याला एकान्तात स्वराज्यावर अभिषेक केला. केवल संकल्प करतांच प्राप्त झालेल्या, आपल्याला योग्य अशा सोन्याच्या सिंहासनावर उत्तम प्रकारें अभिषिक्त होऊन बसलेल्या त्याला ती देवरूपिणी सुंदर चूडाला म्हणाली—"हे प्रभो! केवळ मुनींना योग्य असें हें शांत तेज सोडून प्रजेचें अनुशासन करण्यास योग्य असें इंद्रादि अष्टलोकपालांचें तेज धारण करण्यास तूं योग्य आहेस." चूडालेकडून वनांत असें सांगितलें गेलेला तो राजा शिखिध्वज 'मी असेंच करतों' असें म्हणून राजत्वास प्राप्त झाला. नंतर द्वारपालाच्या स्थानीं स्थित असलेल्या मानिनीला तो म्हणालाः—"मी आतां तुला देवीपदावर अभिषिक्त करून राणी बनवितों." असें बोलून व सरोवरांत स्नान करून राजानें तिला महादेवीपदावर अभिषेक केला; व राजा त्या आपल्या प्रिय भार्येला म्हणाला—"हे कमलनयने प्रिये! तूं एका क्षणांत योगसंकल्पानें निर्माण केलेलें, भूषण-अलंकार, शस्त्र-अस्त्र इत्यादि महावैभवसंपन्न असंख्य सैन्य तयार कर." हें कांताचें आज्ञावचन ऐकून श्रेष्ठ चूडाला, वर्षा जशी भयंकर मेघाला उत्पन्न करते, त्याप्रमाणें सैन्याला संकल्पानें उत्पन्न करती झाली. हत्ती व घोडे यांनीं युक्त असलेलें तें सैन्य त्या दोघांनीं पाहिलें. त्या सैन्याच्या पताकांनीं अंतरिक्ष भरून गेलें. त्यानें त्या अरण्यांत फार मोठी दाटी केली. त्याच्या रणवाद्यांच्या ध्वनीनें पर्वताच्या गुहा व तें सर्व गहन अरण्य दुमदुमून गेलें. सैनिकांच्या चूडामणींच्या किरणांनीं अंतरिक्षांतील सर्व अंधकार छिन्नभिन्न होऊन गेला. त्या सैन्यांतील एका अतिशय मत्त गजावर तो राजा व राणी अशीं दोघेंही बसलीं. त्या हत्तीच्या सभोंवार इतर मांडलिक राजे उभे होते. हृष्ट झालेल्या सामंत राजांनीं त्याचें रक्षण केलें होतें. त्यानंतर तो अतिशय बलाढ्य शिखिध्वज राजा आपल्या इष्ट राणीसह पायदळ व रथ यांची ज्यांत गर्दी आहे अशा समूहाला आपल्याबरोबर आकर्षण करीत त्या वनांतून पर्वतालाही हलविणाऱ्या सैन्यासह निघाला. भूमीवरील वावटळ पृथ्वी व पर्वत यांना जशी व्याकुळ करते, त्याप्रमाणें तो सैन्यानें त्यांना जणुं काय छिन्नभिन्न करीत चालला. त्या महेंद्र-पर्वतावरून निघालेला तो राजा मार्गांत पर्वत, देश, नद्या, जंगलासह गांवें आपल्या प्रियेला दाखवीत व राज्य सोडून येतांना मार्गांत घडलेला वृत्तान्त सांगत थोड्याच अवकाशांत आपल्या स्वर्गाप्रमाणें शोभणाऱ्या नगरीस आला. तेथें त्याचे निरनिराळ्या प्रांतांवर नेमलेले मंत्री त्याचें आगमन ऐकून अतिशय हृष्ट झाले, ते मोठ्या उत्कंठेनें जयशब्द करीत नगरांतून बाहेर निघाले. शहरांतून सामोरें येणारें सैन्य व राजाच्या बरोबरचें सैन्य हीं दोन्ही एक झालीं. वाद्यांचा फार मोठा आवाज होऊं लागला आणि अशा मोठ्या समारंभानें तो राजा नगरांत शिरला. नगरांतील स्त्रियांनीं लाह्या व फुलें यांचा त्याच्यावर ओंजळींनीं वर्षाव केला. तो राजा परंपरेनें फार उत्तम रीतीनें वसविलेल्या बाजाराचा मार्ग पहात चालला. त्यांत पताका व ध्वज यांची गर्दी झाली होती. तो मार्ग मोत्यांच्या जाळ्यांनीं मनोहर दिसत होता. तेथील स्त्री-समूह नृत्य व गान यांत परायण झाला होता. तात्पर्य, उत्तरोत्तर उत्तम प्रकारें वसविलेला तो वणिग्मार्ग कैलासपर्वतासारखाच उंच व सुंदर दिसत होता. राजाला योग्य अशा लौकिक व शास्त्रीय मंगलांनीं युक्त असलेल्या आपल्या

गृहांत प्रवेश करून त्या राजानें आपल्या अतिशय नम्र प्रकृतिजनांचा उत्तम सन्मान केला. सात दिवसपर्यंत उत्तम नगरोत्सव करून त्यानें आपलीं राजकार्यें केलीं. आपल्या अन्तःपुरांतील व्यवहारही त्यानें यथाप्राप्त केला. हे रामा! याप्रमाणें चूडालेसहवर्तमान दहा सहस्र वर्षें भूलोकीं राज्य करून तो देहधारणेपासून विरत झाला. तैलशून्य दीपाप्रमाणें देहाचा त्याग करून हे रामा! तो महामतिमान् राजा पुनर्जन्म न घेण्यासाठीं निर्वाणास प्राप्त झाला. दहा सहस्र वर्षें समदृष्टित्वानें राज्य करून व चूडालेसह सर्व प्रकारच्या विषयसंबंधीं क्रीडा करून तो निरतिशय आनंदरूप पदास प्राप्त झाला. ज्याचें भय व खेद नाहींसा झाला आहे, मान व मात्सर्य यांपासून जो मुक्त झाला आहे, जो सहज प्रकृत कर्म मात्र करीत आहे, भोगलेल्या भोगांविषयीं ज्याची बुद्धि वासनाशून्य झाली आहे व याप्रमाणें ज्याची दृष्टि सर्व सम पदार्थांहूनही अतिशय सम झाली आहे, असा तो श्रेष्ठ शिखिध्वज राजा वर वर्णन केलेल्या प्रकारानें कामरूप मृत्यूचें उल्लंघन करून जंबुद्वीपांत दहासहस्र वर्षें ऐकराज्य करता झाला. भूलोकीं अनेक विषयांचा उपभोग घेऊन दीर्घकाल सर्व राजांच्या चूडामणित्वामध्यें स्थित होऊन सम्राजरूप होत्साता तो अमृत अजर पदास प्राप्त झाला. हे रामा! तूंही प्रारब्धप्राप्त प्रकृत कार्याचें अनुसरण करीत शोकरहित होऊन समाधींत स्थित हो. किंवा स्वतः हठानें भोग-मोक्षज्ञानलक्ष्मीचें अनुसरण करीत व्युत्थित होऊन रहा. तूं समाधि किंवा व्युत्थान यांतील कोणत्याही दशेंत जरी स्थित असलास तरी त्यांत कांहीं फलभेद नाहीं. ११०.

चूडालोपाख्यान समाप्त.

## सर्ग १११ वा.

१ राणीनें जसा राजाकडून त्याप्रमाणें देवगुरुपित्यानें कचाकडून सर्वस्वाचा त्याग करविला व २ शेवटीं अहंकारत्यागानें तो पूर्ण झाला.

श्रीवसिष्ठः—तुला मीं हें सर्व शिखिध्वजाचें आख्यान सांगितलें. या मार्गानें जाणारा तूं खिन्न होणार नाहींस. राग व द्वेष यांचा विनाश करणाऱ्या या दृष्टीचा आश्रय करून व त्या पदाचा अवलंब करून तूं नित्य निष्काम बुद्धीनें रहा. जसें शिखिध्वजानें राज्य केलें, त्याप्रमाणेंच तूं राज्यव्यवहार करीत रहा व भोगमोक्षमय हो. बृहस्पतीचा पुत्र कच शिखिध्वज राजाच्या क्रमानेंच बोधाला कसा प्राप्त झाला तें हे राघवा! तूं ऐक.

श्रीरामः—भगवान् बृहस्पतीचा तो पुत्र कच कसा ज्ञानवान् झाला, तें हे भगवन्! मला संक्षेपानें पण साकल्यानें सांगा.

श्रीवसिष्ठः—हे राजन् रामचंद्रा! ती कथा ऐक. शिखिध्वजाप्रमाणेंच तो श्रीमान् देवगुरूचा पुत्र कच श्रेष्ठ ज्ञानास प्राप्त झाला. बाल्यावस्था सोडून तारुण्यास प्राप्त झालेला व संसाराचें उल्लंघन करण्यास उन्मुख झालेला तो कच पद व त्याचा अर्थ यांस जाणणारा म्ह० वेदशास्त्रज्ञ होत्साता बृहस्पतीला असें म्हणाला.

कचः—भगवन्, सर्वधर्मज्ञा! जीव हाच ज्याला सहस्र बंध उत्पन्न करणारा तंतु—दोरा आहे अशा मजसारख्या जंतूकडून या संसारपंजरांतून कसें सुटलें जातें? तो त्यांतून मुक्त कसा होतो?

बृहस्पतिः—बाळा! अनर्थरूपी मकरांचें घर, अशा या संसारसागरापासून सर्वत्यागानें शीघ्र बाहेर निघतां येतें. पण तो सर्वत्याग उद्वेगरहित असावा लागतो. म्हणजे अतिशय दृढ विरक्तीमुळें विषयांचा त्याग

केल्यावर त्याबद्दल पश्चात्ताप होतां कामा नये. अशा सर्वत्यागानेंच पूर्वोक्त संसारसागरांतून तरून जातां येतें.

श्रीवसिष्ठ—असें पित्याचें परम पवित्र वचन ऐकून व सर्वांचा त्याग करून कच एका अरण्यांत गेला. त्याचें तें गमन बृहस्पतीच्या उद्वेगाला कारण झालें नाहीं. कारण महात्मे संयोग व वियोग या प्रसंगीं मेरूसारखे स्थिर असतात. त्यानंतर आठ वर्षें लोटलीं असतां हे निष्पाप रामा! तो कच पुनः एका मह्य अरण्यांत असलेल्या आपल्या पित्यापाशीं आला. त्याचें परिपूजन करून व अभिवादन करून ज्यानें पुत्राला आलिंगन दिलें आहे, अशा वाक्पतीला तो कच रम्य वाणीनें पुनः असें विचारूं लागला.

कचः—बाबा! मीं सर्वत्याग करून आतां आठ वर्षें झालीं. तथापि अद्यापि मला अनिंदित विश्रांति मिळत नाहीं, काय करावें!

श्रीवसिष्ठः—कच त्या अरण्यांत असें आर्तवचन बोलूं लागला असतां बृहस्पति 'सर्वांचा त्याग कर' असें बोलून स्वर्गास गेला. तो निघून गेल्यावर कचानें आपल्या अंगावरील वल्कलादिकांचाही त्याग केला; आणि ज्यांतील चंद्र, सूर्य, अभ्र व नक्षत्रेंही गेलीं आहेत अशा शरदृतूंतील आकाशासारखा तो झाला. शरत्कालीं नभस्तल जसें अभ्र, वृष्टि इत्यादिकांचा परिहार करतें, त्याप्रमाणें क्वचित् गिरिगुहादिकांच्या आश्रयानें तो वृष्टि, ऊन इत्यादिकांचा परिहार करता झाला. तीन वर्षें पुनः तो एका अरण्यांतील दिशेमध्यें बसून उपासना करता झाला. शांत व शून्य आकारानें युक्त झालेला तो एकटाच श्वासोच्छ्वास करीत राहिला. शरदादि इतर ऋतूंत तो उघड्या आकाशांतच रहात असे. तथापि त्याचें मन खेदरहित झालें नाहीं. म्हणून खिन्न मनानें तो पुनः आपल्या पित्यापाशीं आला. बृहस्पतीनें त्याला आलिंगन दिलें. कचानें भक्तीनें त्याची पूजा केली—अभिवादन केलें, आणि पुनः खेदानें सद्गदित वाणीनें म्हटलें—

कचः—बाबा! कन्था, दंड, आसन इत्यादि सर्वांचा त्याग केला तथापि स्वस्वरूपीं विश्रांति प्राप्त होत नाहीं. काय करूं!

बृहस्पतिः—हे पुत्रा! चित्ताला सर्व म्हणून म्हटलें आहे, यास्तव त्याचा त्याग केलास म्हणजे तूं शोभशील. सर्वज्ञ लोक चित्तत्यागालाच सर्वत्याग म्हणतात.

श्रीवसिष्ठः—पुत्राला असें सांगून वाक्पति वेगानें आकाशांत निघून गेला. इकडे कच खिन्नचित्त न होतां चित्ताचा त्याग करण्यासाठीं त्याचेंच अन्वेषण करूं लागला. त्या अरण्यांत पुष्कळ विचार केल्यावरही जेव्हां त्याला चित्त काय आहे हें कळलें नाहीं, तेव्हां त्यानें आपल्या बुद्धीनें पित्याचें स्मरण केलें. "देहादि पदार्थसमूह हें चित्त नव्हे, असें सांगितलें जातें. तेव्हां हें देहादिक चित्ताचें काय आहे! किंवा चित्त कोठें आहे! या गोष्टींचा निर्णय झाल्यावांचून मी विनाकारण देह-इंद्रियादिकांचा त्याग कसा करूं! देहाचा कांहींच अपराध नसतांना मीं त्याला कसें सोडावें! यास्तव मी आतां चित्त या महाशत्रूला जाणण्यासाठीं पित्याजवळच जातों. त्याला जाणून तत्काल टाकतों आणि निःशोक होऊन राहतों." असा विचार करून तो कच स्वर्गास गेला. वाक्पतीजवळ येऊन मोठ्या स्नेहानें त्यानें त्यास वंदन केलें. साष्टांग प्रणाम केला आणि एकांतांत त्याला असें बोलला—"भगवन्! मला चित्ताचें स्वरूप सांगा. म्हणजे मी त्याचा त्याग करीन."

बृहस्पतिः—चित्तवेत्ते मन आपला अहंकार हेंच चित्त आहे, असें जाणतात. प्रत्येक

जंतूच्या आंत हा जो अहंभाव आहे तेंच चित्त म्हटलें जातें.

कच:—हे तेहतीस कोटीप्रमाण देवांच्या महामते गुरो! हें कसें घडेल तें मला सांगा. मला तर अहंकाराचा त्याग अतिशय दुष्कर वाटतो. तो सिद्ध होत नाहीं. हे योग्यांतील श्रेष्ठा! अहंकाराचा त्याग कसा करतां येणें शक्य आहे?

बृहस्पति:—पुष्पाला खुडण्यापेक्षां व डोळे मिटण्यापेक्षां अहंकाराचा त्याग करणें सुकर आहे. त्यांत क्लेश मुळींच नाहीं. हे पुत्रा! तें कसें तेंच आतां मी तुला सांगतों, ऐक. केवल अज्ञानानेंच चांगली सिद्ध झालेली वस्तु ज्ञानानें नाश पावते. पुत्रा! मिथ्या भ्रम जसा नसतो तसा वस्तुत: अहंकार नाहीं. जसें रज्जूच्या ठिकाणीं भुजंगत्व किंवा मरुभूमीवर जलभ्रम तसा वस्तुत: असत् असलेला हा अहंकार सन्—विद्यमानसा होऊन बालानें कल्पिलेल्या वेताळाप्रमाणें स्थित आहे. जसा एकादा मिथ्या अवभास स्फुरतो तशी मिथ्या अहंकृति भासते. चंद्राच्या ठिकाणीं मोहामुळें जसें द्वित्व भासतें, तसा हा अहंकार भासतो. तो सत्य नाहीं व मिथ्याही नाहीं. तर आद्यन्तरहित, चिन्मात्र, केवल शुद्ध व आकाशाहूनही अत्यंत निर्लेप असें एक सर्ववेदन आहे. चंचल जलतरंगांमध्यें जसें सर्वत्र जल, तसें सर्वत्र, सर्वदा, सर्व प्राण्यांमध्यें तेंच एक सर्वप्रकाशतत्त्व भासतें. अशा या तत्त्वामध्यें हा अहंभाव कोण, कोठून, कसा उद्भवेल? जलामध्यें धुळीचा लोट केव्हां तरी उद्भवतो का? अग्नीपासून पाण्याचा प्रवाह सुरू होणें शक्य आहे का? वास्तव हे पुत्रा! 'हा मी, हें शरीरादिकच मी' हा वृथा भ्रम सोड. कारण तो तुच्छ आहे, परिमिताकार आहे; दिशा, काल यांनीं मर्यादित झालेला आहे. पण तूं स्वत: साक्षी, दिशा, काल, इत्यादिकांनीं अनवच्छिन्न आहेस. तूं स्वच्छ, नित्य उदय पावलेला, सर्वव्यापक, सर्वपदार्थमय, केवल चिन्मात्रस्वरूप व निर्मल आहेस. हे कचा! ज्याप्रमाणें सर्व दिशांमध्यें पसरलेल्या फळांचा, पुष्पांचा व पानांचा कारणभूत असा वृक्षांतील रस असतो, त्याप्रमाणें तूं नित्य, अत्यंत शुद्ध, अनन्त, चिदात्माच आहेस. तेव्हां हे कचा! अखंड अद्वय सन्मात्रस्वरूप अशा तुझा हा परिच्छिन्न 'अहं'—निश्चय कोण आहे? कोणी नाहीं. १११.

---

## सर्ग ११२ वा.

—:०:—

१ कचाच्या आख्यानानें ज्ञानी झालेल्या रामानें प्रश्न केल्यामुळें वसिष्ठ मिथ्यापुरुषाचें आख्यान सांगतात.

श्रीवसिष्ठ:—याप्रमाणें प्रत्यगात्मा व परमात्मा यांचा योग—ऐक्य ज्याच्या योगानें होतें त्या श्रेष्ठ अत्युत्तम उपदेशास प्राप्त होऊन त्यामुळें देवगुरूचा पुत्र कच जीवन्मुक्त झाला. तो ममताशून्य, निरहंकार, कामरूप हृदयग्रंथींनीं रहित, अत्यंत शांतचित्त कच जसा स्थित होता तसाच हे रामा! तूं निर्विकार रहा. अहंकार असत् आहे, असें तूं समज. त्याचा आश्रय करूं नकोस व त्याग करूं नकोस. कारण असत् सशाच्या शृंगाचा त्याग किंवा ग्रहण कोठचें? अहंकाराचाच असंभव झाल्यावर तुझें मरण व जन्म कोठचा? आकाशक्षेत्रांत पेरलेल्या बीजाचें फळ कोणाला प्राप्त होणार? निरंश, शांतसंकल्प, सर्वभावात्मक, व्यापक, परम अणूहूनही अतिशय सूक्ष्म, चिन्मात्र व अमनोमय असें तुझें तत्त्व अहंकाराचा बाध झाल्यावर अवशिष्ट राहतें. ज्याप्रमाणें जलापासून तरंगादिक, जसें सोन्यापासून बाहुभूषण वगैरे आपापल्या उपादान कारणरूप असूनही तसें नसल्यासारखें भासतें, त्याप्रमाणें अहंभावानें

भावना केलेला मीं निराळासा भासतों. अबोधामुळें सर्व जगत् मायामयत्वें स्थित् आहे. पण हे निष्पापा ! बोधानें सर्व ब्रम्हरूप होतें. तूं द्वित्व व एकत्वमति टाकून म्हणजे कार्य-कारणदृष्टि सोडून बाकी राहिलेलें जें सन्मात्रस्वरूप त्यांत स्थित हो. तूं मिथ्यापुरुषाप्रमाणें वृथा दुःखित होऊं नकोस. ही संसारसंबंधी माया अतिशय दुष्पार आहे. ती अतिशय दृढ झाली आहे. शरदृऋतूंत जशी मिहिका—धुकें, त्याप्रमाणें बोधानें ती माया क्षीण होते.

श्रीरामः—तुमच्या या ज्ञानामृतानें मी आंत परम तृप्तीस प्राप्त झालों आहें. वृष्टीचा अभाव झाल्यामुळें व्याकुळ झालेला चातक चांगला पाऊस पडल्यानें जसा तृप्त होतो, त्याप्रमाणें मी तृप्त झालों आहें. मी जणूं काय अमृतानेंच शिंपला गेलों आहें. मनांत अतिशय शीतळ झालों आहें. समस्त अतुल संपत्तीच्यावर अधिष्ठाता होऊन स्थित आहें. तृषित चातक चंद्राच्या किरणांनीं जसा तृप्त होत नाहीं, तसा मी बोलत असलेल्या तुझ्या वचनांनीं तृप्त होत नाहीं. मी ज्ञेय ब्रह्माच्या ज्ञानामुळें जरी तृप्त झालों आहें, तरी हे देव ! मी तुला पुनः हा प्रश्न विचारतों. कारण तृप्त झालेलाही कोणता पुरुष पुढें असलेल्या अमृतासवाला प्राशन करीत नाहीं ? हे मुनिश्रेष्ठ ! मिथ्या पुरुष कोणाला म्हणतात ? ज्या मिथ्या पुरुषानें सत्य वस्तूला मिथ्या केलें आहे व मिथ्या जगाला सत्य केलें आहे तो कोण तें मला सांग.

श्रीवसिष्ठः—राघवा ! मिथ्या पुरुषाच्या बोधासाठीं मी सांगत असलेली ही हास्योत्पाद शुभ कथा ऐक. हे महाबाहो ! कोणी एक मायामंत्रमय पुरुष आहे. लहान मुलाच्या कोवळ्या बुद्धीप्रमाणें त्याची बुद्धि मूढ आहे. तो अज्ञानानें आच्छादित झालेला आहे. तो कोठें एकान्त स्थानीं झाला व त्या शून्य स्थानींच राहिला आहे. तो आकाशांतील केसासारख्या काळ्या रेषेप्रमाणें किंवा मरुभूमीवरील मृगजळाप्रमाणें मिथ्या आहे. त्याच्या त्या आश्रयस्थानीं त्या मिथ्यापुरुषाहून दुसरें कांहीं नाहीं; आणि जें कांहीं आहे असें वाटतें तें त्याहून निराळें नाहीं. तो जें दुसरें पाहतों तें त्याच्या भ्रांतीनेंच भासतें. पण तो दुर्बुद्धि असल्यामुळेंच मीच हें सर्व दृश्य आहें, हें तो जाणत नाहीं. तेथें वृद्धि पावणाऱ्या त्याच्यापासून संकल्प उत्पन्न झाला. “आकाशाचा मी उपजीवक आहें, आकाश माझें उपजीव्य आहे, यास्तव आकाशच असलेला मी असा या आकाशाला आच्छादित करून त्याचें रक्षण करतों.” असें चिंतन करून त्यानें आकाशाच्या रक्षणासाठीं गृह निर्माण केलें. त्याच्या कोशावर ‘मी याचें रक्षण केलें आहे,’ अशी त्यानें आस्था ठेवली. हे रघुनन्दना ! तो त्या गृहाकाशानें संतुष्ट झाला. नंतर शरदृतु लागतांच मेघ किंवा वाऱ्यानें क्षुद्र तरंग जसा नाश पावतो, त्याप्रमाणें कांहीं कालानें त्याचें तें गृह नाश पावलें. तेव्हां ‘हाय हाय ! हे माझ्या गृहाकाशा ! तूं नष्ट झालेंस, एका क्षणांत कोठें गेलेंस ? हाय हाय ! तूं स्पष्ट भग्न झालें आहेस,’ असें म्हणून तो त्याच्यासाठीं फार शोक करूं लागला. असो. असे शतशः शोक करून त्या मूढमतीनें आपल्या रक्षणासाठीं तेथेंच एक कूप केला आणि पूर्वीच्या गृहाकाशावर तो जसा आसक्त होता तसाच या नव्या कूपाकाशावरही आसक्त झाला. त्यानंतर कालानें त्याच्या त्या कूपाचाही नाश केला. तेव्हां कूपाकाश गेला असतां तो पुनः शोकनिमग्न झाला. कूपाकाशाचा प्रलय झाल्यावर त्यानें सत्वर कुंभाकाश निर्माण केलें; आणि कुंभाकाशपरायण होऊन तो स्वतः निर्वाणास—तदभिमान-मुक्तास प्राप्त

झाला. हे रघुनायका! काळानें त्याच्या त्या कुंभाला आपल्या दुष्पूर उदरांत पचविलें. त्या कुंभाचाही—घटाचाही नाश झाला. तो दुर्भग—दरिद्री ज्या दिशेचा आश्रय करीत असे तीच नाश पावत असे. कुंभाकाशाचा प्रळय झाल्यानंतर त्यानें आपल्या रक्षणासाठीं कुंड बनविलें आणि पूर्वीप्रमाणेंच तो कुंभाकाशावर 'हा माझा' असा अभिमान धारण करता झाला. कांहीं काळानें त्याचें तें कुंड नाश पावलें. तेजाच्या योगानें जसें तम नाश पावतें, त्याप्रमाणें काळवशात् तें कुंडाकाश नाश पावलें. तेव्हां तो त्याच्यासाठीं शोक करूं लागला. कुंडाकाशाचा शोक करून झाल्यावर त्यानें स्वरक्षणार्थ चौसोपी मोठ्या सभागृहासारखें गृह केलें. 'तेंच मी' अशा आसक्तीनें तो तदाकाशमय झाला. पण ज्यानें सर्व प्रजेला गिळून टाकलें आहे अशा काळानें त्याचेंही सत्वर हरण केलें. वारा जीर्ण पानाला जसा पाडतो, त्याप्रमाणें काळानें त्या मोठ्या गृहालाही जमीनदोस्त केलें, म्हणून तो शोक करूं लागला. त्या चौसोपी चौकडीच्या घरासाठीं शोक करून झाल्यावर मेघाकार कुसूलाकाश त्यानें स्वसंरक्षणासाठीं केलें आणि तत्परायण होऊन राहिला. वारा जसा मेघाला त्याप्रमाणें काळानें त्यालाही लवकर हरण केलें. त्यामुळें त्या कुसूल-( धान्याचें कोठार—कणंग वगैरे ) आकाशासाठीं तो रडूं लागला. त्याच्या शोकानें तो अतिशय संतप्त झाला. याप्रमाणें गृह, कूप, कुंभ, कुंड, चौसोपी वाडा, व कुसूल इत्यादि निरनिराळीं आकाशें निर्माण करण्यांत, त्यांच्यावर आसक्ति ठेवण्यांत व त्यांविषयीं शोक करण्यांत त्याचा केव्हांही अंत न पावणारा सर्व काल जाऊं लागला. हे रामा! तो मिथ्यापुरुष याप्रमाणें गृहानें व ज्यांत प्रवेश होणें अतिशय कठिण आहे अशा कूप-कुंभादि उपाधीनें परिच्छिन्न होऊन त्या प्रत्येकांतील आकाशाचें 'हेंच मी' असें ग्रहण करीत त्याची गति, आगति इत्यादिकांविषयींच्या आसक्तीनें मूढ होऊन त्या त्या उपाधीवर अभिमान ठेवल्यामुळें त्याला निर्माण करणें, त्याचें रक्षण करणें, त्याचा विनाश होणें इत्यादि अवस्थेंत एका दुःखांतून दुसऱ्या दुःखांत, दुसऱ्यांतून त्याहून मोठ्या तिसऱ्या दुःखांत अशा रीतीनें पडतो व त्यांतून पुनः बाहेर निघतो. तात्पर्य, त्याचा सतत हा असा व्यवहार चालला आहे.

---

## सर्ग ११३ वा.

१ मिथ्यापुरुषादि शब्दांचा अर्थ, व २ आख्यायिकेचें तात्पर्य.

श्रीरामः—भगवन्! मिथ्या पुरुषाच्या प्रसंगानें आपण जो हा मायापुरुष सांगितला व त्याच्या आकाशरक्षणाचें जें वर्णन केलें तें कोणत्या अभिप्रायानें?

श्रीवासिष्ठः—रामा! याचा तत्त्वार्थ ऐक. मीं आतां तुला जी कथा सांगितली त्रिच्यांतील मिथ्या पुरुषाचा वृत्तान्त मी प्रकट करतों. हे रघुनंदना! मीं जो मायामंत्रमय पुरुष सांगितला, तो तूं हा अहंकारच आहे, असें समज. तो शून्य—माया-आकाशांत उत्पन्न झाला आहे. हे साधो! ज्या आकाशकोशांत हें जगत् स्थित आहे, तें अनन्त, असत्, शून्य असून सृष्टीच्या पूर्वीं स्वयं उत्पन्न होतें. पण तें अधिष्ठानशून्य नाहीं, तर त्याच्या आंत अत्यंत दुर्लक्ष्य असलेलें ब्रम्ह त्याच्या अधिष्ठानरूपानें स्थित आहे. आकाशापासून जसा शब्द उत्पन्न होतो, त्याप्रमाणें अतींद्रिय ब्रह्मापासून जगत् उत्पन्न झालें आहे. वायूपासून जसा स्पंद, त्याप्रमाणें त्या मायाकाशापासून मायारूप लिंगात्मा अहंकार उत्पन्न होतो. तो अनात्मा

असतांनाच भ्रांतीनें आत्मत्वास प्राप्त झाला आहे. तो आपलें कारण जें आकाश त्यांत वृद्धि पावून हजारों कल्पना करतो व हें मला इष्ट आहे, हें अनिष्ट आहे इत्यादि समजतो. अर्थात् त्याचें ' अहं ' हें नांव कल्पित आहे. त्यामुळेच तो इष्टप्राप्ति व अनिष्टनिवृत्ति यांसाठीं यत्न करतो. त्या अनात्मभूत आत्म्याच्या रक्षणासाठींच प्रवृत्त झालेला तो पूर्व देहाचा वारंवार नाश झाला असतां उत्तरोत्तर असंख्य देहांना काम-कर्म-वासनानुसार उत्पन्न करतो. प्रत्येक देहाच्या नाशाच्या वेळीं तो अतिशय आकुल होतो. तो अहंकारच मायापुरुष आहे. मिथ्यापुरुषही तोच होय. तो अहंकार मायेनें वृथा—असत्च उत्पन्न झाला आहे. कूप, कुंड, चतुःशाळ, कुंभ इत्यादि स्थूल देहांस निर्माण करून त्यांच्या योगानें मीं आत्म्याचें—आपलें रक्षण केलें आहे, असें समजतो व त्या त्या देहाकाशाशीं भावनेनें तादात्म्य पावतो. तोच मी असें समजतो. राघवा ! ज्या क्रियोपाधिभूत जगदाकार विभ्रमांनीं तो आपल्यालाच मोहित करतो, त्यांमुळें त्या अहंकाराला प्राप्त होणारीं त्याचीं हीं नांवें तूं ऐक. प्राणांचें—चक्षुरादि इंद्रियांचें धारण करणें, या क्रियोपाधिमुळें त्याला जीव हें नांव प्राप्त होतें. बाह्य विषयांविषयींच्या निश्चयामुळें बुद्धि, त्या बाह्यविषयांविषयीं मनन केल्यामुळें मन, चिन्तनामुळें चित्त, असत् कल्पनेमुळें माया, परिणामी स्वभावामुळें संकल्प, संकल्पित विषयाच्या अनुभवामुळें कला, त्यांचा परिपाक वगैरे करणें या कारणांमुळें काल, विषयादिकांच्या एकदेशादिभेदकल्पनेमुळें कला, इत्यादि प्रसिद्ध नांवांनीं तो बोलला जातो. या व अशाच असंख्यत्वास प्राप्त झालेल्या काम, संकल्प, संशय इत्यादि श्रुति-स्मृत्युक्त दुसऱ्याही नांवांनीं अहंकार सहस्ररूप झाला आहे. त्या नांवांनीं कल्पिलेल्या असंख्य अर्थांच्या रूपानें तोच विकास पावतो. पूर्ण ब्रह्मामध्यें प्रथम आपोआप शून्यरूप भूताकाश विस्तार पावलें असतां त्यांत वायु, तेज इत्यादि क्रमानें कल्पिलेलें जगत् गंधर्वनगरासारखें वास्तविक आधाररहितच आहे, असा युक्तियुक्त विचारानें निश्चय झालेला आहे. त्यांत तो पुरुष मिथ्याच सुख-दुःखांचा अनुभव घेत राहिला आहे. रामा ! जसा तो मिथ्यापुरुष घटादिकांमध्यें आत्मभावना करून त्यांचें रक्षण करीत राहतो व त्यांचा कालानें नाश झाला असतां क्लेश भोगतो, तसा तूं क्लेशवान् होऊं नकोस. जो आकाशाहूनही अतिशय विस्तीर्ण, शुद्ध, सूक्ष्म, शिव, शुभ आत्मा तो कोणाकडून कसा ग्रहण केला जाणार ? किंवा कोणाकडून कसा रक्षण केला जाणार ? हृदयाकाशमात्र असलेल्या त्याचा, शरीराचा क्षय झाल्यामुळें ' क्षय झाला ' ' आत्मा नष्ट झाला ' अशा शंकेनें मूर्ते व्यर्थ शोक करितात. पण घटादिकांचा प्रणाश झाला असतां ज्याप्रमाणें आकाशादिक अखंडित असतें, त्याप्रमाणें देह जरी नष्ट झाले तरी देही नित्य निर्लेप असतो. हा आत्मा शुद्ध, चिन्मात्र, सूक्ष्म, आकाशाहूनही अत्यंत सूक्ष्म आहे. हे रामा ! तो आकाशाप्रमाणें केवल स्वानुभूति—अंशभूत—अहंकाररहित स्वप्रकाश साक्षिचिन्मात्र आहे. तो नाश पावत नाहीं. केव्हांही व कोठेंही कांहीं सुद्धां उत्पन्न होत नाहीं व त्यामुळेंच नाश पावत नाहीं. जगद्रूप अन्यथा परिणामानें हें केवळ ब्रम्ह विकास पावत आहे. सत्य, एक, शांत, आदि-मध्य-अन्तरहित, भावाभावशून्य पद आहे, असें समजून तूं सुखी हो. रामा ! सर्व आपत्तींचें माहेरघर, अनित्य, अस्वातंत्र्य देणारें, नरकादि अधःपात ज्याच्या अगदीं समीप

आहे. सर्व प्रकारच्या विवेकाचा विरोधी, अनर्थ व अज्ञ अशा अहंकारपदार्थें मूळ आत्मज्ञानानें उपटून टाकून अवशिष्ट राहिलेल्या चिन्मात्रस्वरूपांत अत्यंत सुदृढ स्थित हो, म्हणजे तूं सर्वोत्तमत्वास प्राप्त होशील. ११३

## सर्ग ११४ वा.

१ सदसद्रूपाचें दृष्टान्तांनीं पुष्कळ विवेचन करून असद्रूपाचा निरास करितात व सद्रूपामध्यें स्थैर्य करावयास सांगतात.

श्रीवसिष्ठः—सृष्टीच्या आरंभीं परब्रह्मापासून प्रथम मन उत्पन्न झालें. तें त्या ब्रम्हामध्यें अपृथक्-सत्तेनें स्थित असतांना दुसऱ्या कल्पनांचें निमित्त होऊन या क्षणापर्यंत स्थित आहे. राघवा! पुष्पांच्या कोशांत जसा आमोद, सागरांत जशी मोठी लाट, सूर्यांत जसा किरणसमूह तसें ब्रम्हामध्यें मन आहे. अदृश्य आत्मतत्त्वाच्या अप्रतिसंधानरूप अज्ञानानेंच सर्व जगत्कल्पनेचें मूळ या रूपानें तें स्थितीस प्राप्त झालें आहे. जगत् रज्जुसर्पाप्रमाणें दुसऱ्या कोणापासूनही आलेलें नाहीं. राघवा! जो या किरणसमूहाला आदित्याहून भिन्नत्वानें कल्पितो, त्याला तें सूर्याहून भिन्नसें वाटतें. ज्यानें सुवर्णाहून भिन्नत्वानें बाहुभूषणाची कल्पना केलेली असते त्याला तें बाहुभूषणच दिसतें, तें त्याला सोनें दिसत नाहीं. ज्यानें आदित्याहून अभिन्नत्वानें किरणांची भावना केली आहे, त्याला ते सर्व आदित्यच दिसतात. त्याला तो सूर्य किरणभेद या विकल्पानें शून्य दिसतो. जलाहून तरंग भिन्न आहे, अशी ज्याची भावना असते त्याची केवळ एक तरंगबुद्धिच स्थित असते, जलबुद्धि नसते. ज्यानें जलाच्या अभिन्नत्वानें तरंगाची कल्पना केलेली असते, त्याची केवळ जलसामान्यबुद्धि असते. त्यामुळें तो पुरुष निर्विकल्प होतो. सुवर्णाच्या अव्यतिरेकानें ज्यानें केयूराची भावना केलेली असते त्याची सोनें ही एक व्यापकबुद्धि असते. म्हणून त्याला निर्विकल्प म्हणतात. अग्नीहून भिन्न ज्वालापंक्ति ज्यानें मानली त्याची अग्निबुद्धि गलित होते व ज्वालाबुद्धि अवशिष्ट राहते. अभ्रपंक्ति ज्वालासमूहाला जशी, तशीच बुद्धिवृत्ति भावित विषयाकार होऊन, त्याच्या ठिकाणींच आस्था ठेवून तन्मूलक अन्य कल्पनाही करते. ज्वालापंक्ति अग्नीहून भिन्न नाहीं, तद्रूपच आहे, अशी ज्यानें भावना केलेली असते त्याची केवळ एक अग्निबुद्धिच असते. त्यामुळें तो निर्विकल्प म्हटला जातो. कारण पुरुष कल्पना केल्यामुळें सविकल्प व ती सोडल्यामुळें निर्विकल्प होतो. जो निर्विकल्प असतो, म्हणजे ग्राह्यग्राहककल्पनाशून्य असतो तो महान् पुरुष होय. कारण त्याची फार मोठी मति संक्षीण झालेली असते. त्याला जें प्राप्तव्य प्राप्त करून घेण्यास योग्य असतें तें त्याला प्राप्त झालेलें असतें. त्यामुळें तो वैकल्पिक पदार्थांमध्यें सत्यबुद्धि करून निमग्न होत नाहीं. यास्तव हे राजा! तूं सर्व नानात्वाचा त्याग करून शुद्ध चिन्मात्रकोटरांत—विषयांपासून सर्वथा मुक्त झालेल्या संवित्तत्त्वांत स्थित हो. वायु जसा स्पंदरूपानें त्याप्रमाणें आत्मा स्वतः स्वयंप्रकाश आत्म्यानेंच जेव्हां संकल्प या नांवाची शक्ति बनतो तेव्हां पृथक-सें भासणारें संकल्पकल्पनामय मन होतें. आपली आकृति सर्वाकार आहे, अशी भावना केल्यामुळें आत्मा समष्टि मन होतें. तें संकल्पात्मक समष्टिचित्त जसा जसा या सर्व जगाचा संकल्प करतें, तसेंच तें एका क्षणांत होतें. कीटत्व, ब्रह्मदेवत्व, मेरुत्व, मरुभूमित्व, मन, जीव, अहंकार, बुद्धि, चित्त, इत्यादि संकल्पांनीं तें तत्तदाकार होतें. संक-

त्यामुळेंच द्वित्वास व एकत्वास प्राप्त होऊन चित्त हिरण्यगर्भ जगत्स्थितीचा विस्तार करतें. त्यानंतर त्या जगत्स्थितींतच तो स्वतः नानात्वास प्राप्त होतो. हें सर्व विस्तीर्ण जगत् संकल्पमयच दिसतें. तें सत्य नाहीं व मिथ्याही नाहीं. तर स्वप्नजाळाप्रमाणें अनिर्वचनीय उत्पन्न झालेलें आहे. प्राण्याचें मनोराज्य जसें नानाप्रकारच्या आरंभांनीं भासुर झालेलें असतें, तसेंच हें हिरण्यगर्भाचें विस्तीर्ण मनोराज्य शोभत आहे. पण त्याचें यथार्थ ब्रह्मस्वरूपानें चिंतन केलें असतां तें मिथ्या जगत् सर्वथा लीन होतें. त्याला परमार्थरूपानें पाहिलें असतां तें कांहींच नाहीं. पण अपरमार्थदृष्टीनें त्याच्याकडे पाहिल्यास तें शतशाखांनीं विस्तार पावतें,—जसा सागर वस्तुतः जलच असतांना ऊर्मि, तरंग, इत्यादि कल्पनांना योग्य असें रूप धारण करून सागराकार बनतो त्याप्रमाणें. हजारों कर्में करणाराही जन चिदाभासयुक्त मनाच्या स्पंदांवांचून कूटस्थ चैतन्याच्या ठिकाणीं विकारादि कांहीं एक करीत नाहीं. यास्तव तूंही अत्यंत तुच्छ भेदाचा त्याग करून गमनादि सर्व व्यवहार जरी करीत असलास, तरी अपूर्व असें कोणतेंही जगद्रूप सत्य नसून पूर्वसिद्ध ब्रह्मच परमार्थसत्य आहे, अशी भावना कर. तूं गमन, श्रवण, स्पर्शन, वास घेणें, बोलणें, व्यवहार करणें, झोंप घेणें इत्यादि जें जें कांहीं करीत आहेस तें तें सर्व शुद्ध चिन्मात्र आहे, तें व्यापक, अतिशय मोठा आकार ज्याचा आहे असें ब्रह्म आहे, त्याहून अन्य कांहीं नाहीं, असें समज. सर्व पदार्थजात संवित्सारमय स्थित असल्यामुळें हें सर्व जगत् संविद्रूप आहे, दुसरी कांहीं कल्पना नाहीं. संविदेचें केवळ स्फुरण अशा या जगज्जाल नांवाच्या भ्रमांत 'हें निराळें व तें निराळें' हा मिथ्याग्रह कोठचा? या सर्व आकारांमध्यें एका संविदेचाच संभव असल्यामुळें विषयही नाहींच, मग बंध व मोक्ष कोठचे? हा मोक्ष आहे व हा बंध आहे ही व्यर्थ अभिमान करविणारी सर्व चिन्ता बलात्कारानें—सर्व प्रयत्नानें टाकून तूं वागादि सर्व इंद्रियांच्या जयामुळें मौनी, वशी, मान व मद यांनीं रहित होऊन आपल्या वर्णाला उचित असें राज्यादि कार्य करणारा, निरहंकार व महात्माच होऊन रहा. ११४.

---

## सर्ग ११५ वा.

१ शंभु जिज्ञासु भृंगीला महाकर्ता इत्यादि शब्दांचें व्याख्यान करून जीवन्मुक्तांचीं लक्षणें सांगतो.

श्रीवसिष्ठः—हे निष्पाप रामा! तूं सर्व पुण्य-पापादि शंकांचा त्याग करून व शाश्वत स्थैर्याचा ह्मणजे कूटस्थ आत्मभावाचा आश्रय करून महाकर्ता, महाभोक्ता, महात्यागी हो.

श्रीरामः—प्रभो! महाकर्ता कोणाला ह्मणतात, महात्यागी कोणाला म्हणतात, व महाभोक्ता कोणाला म्हणतात, तें मला चांगल्या प्रकारें सांगा.

श्रीवसिष्ठः—हे रामा! हें व्रतत्रय पूर्वी शंकरानें भृंगीशाला सांगितलें व त्यामुळें तो शोकरहित होऊन राहिला. पूर्वी सुमेरुपर्वताच्या अग्नीसारख्या दीप्त उत्तरशिखरावर शशिकला धारण करणारा शंकर समग्र परिवारासह राहिला होता. त्याला अल्पविज्ञानवान् महातेजस्वी भृंगीशानें नमस्कार करून व हात जोडून असें विचारिलें.

भृंगीशः—भगवन् देवदेवेश सर्वज्ञ परमेश्वरा, मी जें विचारीत आहें तें कृपा करून मला सत्वर सांग. हे नाथ! तरंगाप्रमाणें तरल—चंचल असलेल्या या संसाररचनेस पाहून मी मोहित होतों. मी तत्वविश्रांतिरहित

आहें. मी या जगद्रूपी जीर्ण गृहांत कोणत्या रम्य निश्चयाचा स्वीकार करून सुस्थित व संतापरहित राहीन?

ईश्वरः—हे निष्पाप भृंगीशा! तूं पुण्यपापादि सर्व शंकांचा त्याग करून व शाश्वत स्थैर्याचा म्हणजे कूटस्थ आत्मभावाचा आश्रय करून महाकर्ता, महाभोक्ता, व महात्यागी हो.

भृंगीशः—प्रभो! महाकर्ता, महाभोक्ता व महात्यागी कोणाला म्हणतात तें मला उत्तमप्रकारें सांग.

ईश्वरः—हे महाभागा! जो मी अकर्ता व अभोक्ता आहे, अशा निश्चयामुळें कर्तृत्वादिशंकारहित झाला आहे व तशा निश्चयानेंच प्रारब्धप्राप्त धर्माधर्म करतो, त्याला महाकर्ता असें म्हणतात. राग, द्वेष, सुखदुःख, धर्माधर्म इष्टानिष्ट फल इत्यादिकांच्या उद्देशानें होणारी सर्व चेष्टा जो निष्काम मनानें केवल लोकसंग्रहार्थ करतो तो महाकर्ता म्हटला जातो. ज्याची मति दैववशात् घडलेल्या अश्वमेध-कलंजभक्षणादि शुभाशुभ कार्यांत मीं धार्मिक आहें, किंवा मीं पापी आहें, अशा कुशंकेनें कल्पिलेल्या धर्माधर्मांनीं लिप्त होत नाहीं तो महाकर्ता होय. जो सर्वत्र निःस्नेह असून साक्षीप्रमाणें अवस्थित असतो व कार्यामध्यें निरिच्छ वर्तन करतो तो महाकर्ता म्हटला जातो. जो सम व स्वच्छ बुद्धीनें उद्वेग व आनंद यांनीं रहित असतो, जो शोकाचें निमित्त झालें असतां शोक करीत नाहीं व उदयाचें—हर्षाचें निमित्त झालें असतां उदय पावत नाहीं, तो महाकर्ता म्हटला जातो. प्रारब्धप्राप्त यथोचित प्रयोजनसमयीं जो आसक्तिरहित मतिमान् मुनि कार्यानुरूप व्यवहार करतो, त्याला महाकर्ता म्हणतात. जो विहित व निषिद्ध कर्म स्वतः दैववशात् करणारा ज्ञानी शरीरेंद्रियांचा प्रेरक असल्यामुळें हेतुकर्तृत्वास प्राप्त होतो, पण 'मी अकर्ता आहें' असा मनांत दृढ निश्चय असल्यामुळें आंत त्याच वेळीं उदासीनही असतो आणि त्यामुळें आंत अत्यंत सम असतो त्याला महाकर्ता म्हणतात. जो स्वभावतःच शांत असून शुभाशुभाचें आचरण करीत असतांनाही समतेचा त्याग करीत नाहीं, तो महाकर्ता म्हटला जातो. ज्याचें मन जन्म, स्थिति, विनाश, उदय व अस्त या अवस्थेंत एकसारखेंच असतें, त्याला महाकर्ता म्हणतात.

कोणत्याही भोगाची आकांक्षा करीत नाहीं व अनिष्टाचा द्वेष करीत नाहीं, तर प्रारब्धप्राप्त सर्व निर्विकारचित्तानें भोगतो त्याला महाभोक्ता म्हटलें जातें. इंद्रियांनीं विषयाचें ग्रहण करीत असला तरी असंग, अद्वयपूर्ण, आत्मनिष्ठ असल्यामुळें जो वस्तुतः त्यांचें ग्रहण करीत नाहीं, त्याचप्रमाणें हस्तपादादि अवयवांनीं घेणें, चालणें इत्यादि व्यवहार करीत असला तरी निष्क्रिय आत्मबुद्धीनें करीत नाहीं, त्याचप्रमाणें अन्नादिकांचा भोग घेत असला तरी अशनादि-अतीत नित्य तृप्त आत्मदर्शनामुळें वस्तुतः उपभोग घेत नाहीं, तो महाभोक्ता म्हटला जातो. जो उदासीन साक्षीप्रमाणें सर्व लोकव्यवहाराचें अखिन्न मनानें व निरिच्छतेनें अवलोकन करतो, तो महाभोक्ता होय. विक्षेप देणारें सुख, दुःख, जयाजयादि क्रियायोग, लाभ-व्यय यांनीं ज्याची मति विक्षिप्त होत नाहीं, त्याला महाभोक्ता म्हटलें जातें. जरा, मरण, आपत्ति, राज्य, दारिद्र्य, इत्यादि सर्वांला जो रम्यच पाहतो तो महाभोक्ता होय. सागर जसा जलाला आपल्या उदरांत सांठवितो, त्याप्रमाणें जो मोठमोठ्या सुख-दुखांचा समचित्तानें उपसंग्रह करतो, तो महाभोक्ता होय. चंद्रबिंबापासून जसे शीतल किरण, त्याप्रमाणें

ज्याच्यापासून अहिंसा, समता, तुष्टि निघून जात नाहींत किंवा येत नाहींत त्याला महाभोक्ता म्हणतात. कडू, आंबट, खारट, तिखट, मिष्ट, अमिष्ट, उत्तम, अधम इत्यादि अन्न एकसारख्याच चित्तवृत्तीनें जो खातो, तो महाभोक्ता आहे. सरस, नीरस, उत्तम संतोष देणारें व चांगली रति न देणारें, यांना जो सौम्य सम पाहतो त्याला महाभोक्ता म्हटलें जातें. खारट पदार्थ किंवा मिठाई, शुभ किंवा अशुभ यांमध्यें ज्याची समता अत्यंत स्थिर असते, तो महाभोक्ता म्हटला जातो. हें भोज्य आहे व हें अभोज्य आहे, अशा प्रकारचा विकल्प टाकून जो अभिलाष सोडून प्राप्त अन्नाचा भोग घेतो, तो महाभोक्ता होय. आपत्ति, संपत्ति, मोह, आनंद, हलकें अन्न वस्त्रादि व दिव्य अन्नादिक यांचा जो समबुद्धीनें उपभोग घेतो, तो महाभोक्ता म्हटला जातो.

निरतिशय आनंदपूर्ण अद्वय आत्मबुद्धीनें ज्यानें सर्व इच्छा, सर्व शंका, वाङ्मनःकायादिकांच्या चेष्टा व सर्व निश्चय मिथ्या समजून सोडले, तो महात्यागी म्हटला जातो. धर्म, अधर्म, सुख, दुःख, मरण, जन्म इत्यादिकांचा मिथ्या बुद्धीनें ज्यानें त्याग केला आहे, तो महात्यागी होय. देह, मन, इंद्रियें, मनाची स्थिति यांच्या सत्तेचा त्यांच्या त्यांच्या दुःखांसह मिथ्यात्वबुद्धीनें ज्यानें त्याग केला, तो महात्यागी म्हटला जातो. देह माझा नव्हे, जन्मही माझा नव्हे, युक्तायुक्त कांहीं माझीं नव्हेत, असा जो आंत निश्चयवान् असतो तो महात्यागी म्हटला जातो. ज्यानें शारीर-धर्म, अधर्म, मानस धर्माधर्म व वाचिक धर्माधर्म सर्व आंतून सोडले, तो महात्यागी होय. ही सर्व दृश्यकलना जितकी दिसत आहे, ती ज्यानें यथार्थदर्शनानें उत्तम प्रकारें टाकली आहे तो महात्यागी होय.

हे निष्पाप रामा! पूर्वी देवाधिदेवानें भृंगीशाला असें सांगितलें. या दृष्टीचा आश्रय करून तूं शोकरहित होऊन रहा. हे रामा! तूं देहादि पंचकोश व तीन अवस्था यांचा निरास करून निरंजनतेस प्राप्त हो, व त्यानंतर अवशिष्ट राहिलेलें नित्यप्रकाश, विमल, आत्मरूप, अनंत, आद्य ब्रह्मच आहे, तदितर कांहींही कल्पनाकलना नाहीं, अशीच भावना कर; आणि सदा अशी भावना करतां करतां त्याच भावाची अभिव्यक्ति झाली असतां ज्याच्या वृत्ति कल्पना-मलापासून शांत झाल्या आहेत असा होत्साता तूं निर्वाणास प्राप्त हो. हे रामा! या संसारांत जें कांहीं भासतें तें सर्व कल्पांतील सर्व कार्यांचें मूलकारण अनामय—जन्मादि विकारशून्य परमात्मरूप ब्रह्मच आहे. तें मोठमोठ्या सर्गभावांनीं विकास पावलेलें जरी दिसलें तरी आकाशच—सर्व विकल्पशून्यच आहे. कारण येथें कोठेंही स्थूल, सूक्ष्म, कारण इत्यादि कांहीं सुद्धां सदेकरस ब्रह्माहून निराळें संभवत नाहीं, असा मनांत दृढ निश्चय करून हे साधो! तूं निःशंकविलास होऊन रहा. हे साधो! तूं जर अन्तर्मुख होऊन अहंकार-रहिततेस प्राप्त होशील तर बाहेरील सर्व कार्यजात करीत असलास तरी केव्हांही खेदाला प्राप्त होणार नाहींस. ११९.

## सर्ग ११६ वा.

१ सवव्या भूमीपासून पुढें गळणाऱ्या चित्ताचीं व गलित झालेल्या चित्ताचीं लक्षणें.

श्रीरामः—हे भगवन् सर्वधर्मज्ञ! अहंकार-नांवाचें चित्त गलित झालें असतां अथवा विगलित होत असतांना वासनाशून्य मनाचें लक्षण काय आहे?

श्रीवासिष्ठः—कमलपत्राला जलाचा लेश

जसा होत नाहीं त्याप्रमाणें बलात्कारानेंही उत्पन्न केलेले लोभ-मोहादिक दोष शुद्ध चित्ताला स्पर्श करीत नाहींत. प्रसन्नमुखता इत्यादि शोभा त्याच्या मुखाला केव्हांही सोडीत नाहींत. अहंकारमय चित्त व विषादाला कारण होणारें पाप ज्ञानाग्नीनें दग्ध होऊं लागलें असतां जीवन्मुक्ताच्या तोंडावर प्रसन्नतादि शोभा नित्य उदय पावलेल्या दिसतात. त्याच्या चित्तांतील वासनाग्रंथि हळू हळू शिथिल होत जाऊन शेवटीं पार तुटतात; कोप कमी होतो, मोह मंद होतो, काम म्लान होतो, लोभ कोठें तरी पळून जातो. इंद्रियें अतिशय उल्लसित होत नाहींत. खेद फारसा स्फुरण पावत नाहीं. दुःखें वृद्धि पावत नाहींत. सुखें फारशी कल्पना करीत नाहींत. हृदयांत शैत्य देणारी समता उदय पावते. कांहीं जीवन्मुक्तांच्या मुखावर सुख-दुःखादिकांची छटाही दिसते, परंतु ज्ञानमाहात्म्यानें ते त्यांना तुच्छ लेखीत असल्यामुळें सुखादिक त्यांच्या मनाला कलुषित—लिप्त करूं शकत नाहींत. चित्त गलित झालें असतां तो साधु देवगणाच्या स्पृहणीयतेस प्राप्त होतो. त्याच्या मनांत समतारूप शीतचंद्रिका उदय पावते. तो उपशांत, रम्य, सर्वांस सेव्य, दुसऱ्या कोणाच्याही इष्ट अर्थाचा विघात न करणारें, नम्र, ऊर्जित व स्वच्छ असें महच्छरीर धारण करितो. संसारविभ्रम भाव व अभाव यांच्या योगानें जरी विरुद्ध असला, तो जरी अति विचित्र व मोठा असला तरी जीवन्मुक्तांच्या आनंदाला किंवा खेदालाही कारण होत नाहीं. ज्यांत आपत्तींचा गंधही नाहीं अशा या प्रत्यगात्म-प्रवण बुद्धीच्या प्रकाशानें साध्य होणाऱ्या वस्तूमध्यें जो मोहानें प्रवृत्त होत नाहीं त्या नराधमाला धिक्कार असो. हे रामा! दुःखरूपी रत्नांच्या आकारभूत, जन्म-मरणोपकल्पित संसारसागराचें उल्लंघन करून जाणाऱ्या पुरुषाची संसारसागराच्या परतीरास असलेल्या निरतिशयानंदात्म्यामध्यें चिरकाल उचित विश्रांति प्राप्त करण्यासाठीं मी कोण, हें जगत् काय आहे, परमात्मतत्त्व कसें आहे, या तुच्छ भोगांनीं काय होणार, असा निरंतर अभ्यास केलेली मति हाच पहिला इष्ट उपाय आहे. यास्तव तूं त्याचाच आश्रय कर. ११६.

---

## सर्ग ११७ वा.

—:०:—

१ मी कोण व जगत् कसें, हें कळण्यासाठीं मनूनें इक्ष्वाकूला सांगितलेल्या विवेकाचा अनुवाद.

श्रीवसिष्ठः—इक्ष्वाकुवंशोत्पन्ना रामा! तुमचा आदिपुरुष इक्ष्वाकु नांवाचा राजा कसा मुक्त झाला तें तूं ऐक. आपल्या राज्याचें परिपालन करणारा इक्ष्वाकु नांवाचा राजा एकदां एकान्तांत बसून मनानें असें चिंतन करता झाला—'या दृश्य प्रपंचाचा हेतु कोण बरें असेल?' असें म्हणून त्यानें आपल्याशीच पुष्कळ विचार केला. पण त्याला जगाचें कारण कळलें नाहीं. तेव्हां त्यानें एकदां ब्रम्हलोकीं आपल्या सभेंत बसलेल्या, भगवान् प्रजापति मनूची पूजा करून त्याला असें विचारिलें.

इक्ष्वाकुः—हे करुणानिधे! हे भगवन्! आपला हा प्रसादच मला आपल्याला धैर्यानें साक्षात् प्रश्न करण्याची प्रेरणा करीत आहे. हा सर्ग (सृष्टि जगत्) कोठून आला? याचें स्वरूप कशा प्रकारचें आहे? हें जगत् संख्येनें व परिमाणानें केवढें आहे? हें कोणाचें आहे? श्रुति-स्मृत्यादि प्रमाणग्रंथ हे कोणी व केव्हां रचले ह्मणून सांगतात, तें मला सांग. दृढ बांधून व पसरून ठेवलेल्या जाळ्यांतून जसा पक्षी, त्याप्रमाणें मी या विषम संसारसंभ्रमापासून कसा मुक्त होईन?

मनुः—अरे! तूं फार दिवसांनीं विवे-

काचा चांगला विकास झाला असतां मिथ्या अनर्थाचा छेद करणारा हा साररूप प्रश्न केला आहेस. हे राजा! हें जें कांहीं दिसत आहे तें कांहीं नाहीं, तर जसें आकाशांतील गंधर्वनगर किंवा मरुस्थळावरील मृगजळ तसें तें आहे. ( अहो पण सांख्य ‘ उपादान कारणांत जें परम सूक्ष्मत्वानें असतें तेंच निमित्ताकडून अभिव्यक्त केलें जातें ’ असें म्हणतात; वेदान्ती ‘ सद्ब्रम्हच जगद्रूपानें मिथ्या विकास पावतें ’ असें म्हणतात. तेव्हां तें सर्वथा नाहींच असें कसें म्हणतां ? उत्तर— ) साक्षी किंवा इंद्रियें यांनीं जें दिसत नाहीं तें कांहींही आपल्या उपादानकारणांत स्थित नाहीं. कारण तें आहे, असें म्हणण्यास कांहीं प्रमाण नाहीं. जें मनासह सहा ज्ञानेंद्रियांचें उल्लंघन करून असलेलें तें असेल असेंही म्हणवत नाहीं. कारण त्याची संभावनाही नाहीं. जें अविनाश तें येथें आहे. त्याला सत् आत्मा असें म्हटलें जातें. हे राजन्! ही सर्व दृश्यांनीं संपन्न असलेली सर्गपरंपरा त्या अविनाश आत्मतत्त्वांतच, मोठ्या आरशांतील प्रतिबिंबाप्रमाणें स्थित आहे. स्वभावतःच उत्पन्न झालेले जे ब्रम्हस्फुरणशक्तिरूप चिदाभास त्यांतील कांहीं स्थूल समष्टि-अभिमानानें ब्रम्हांडत्वास प्राप्त झाले आहेत व कांहीं पृथिव्यादि अभिमानानें भूतत्वास प्राप्त झाले आहेत. आणखी कांहीं चतुर्विध भूतसमूहत्वास प्राप्त झाले आहेत. अशा प्रकारें ही जगत्स्थिति झाली आहे. अर्थात् बंधादि सर्व कल्पना भ्रामक असल्यामुळें वस्तुतः बंध नाहीं, मोक्ष नाहीं, तर निर्विकार एक ब्रम्हच आहे. त्यामुळेंच वास्तविक ऐक्य नाहीं व द्वित्व नाहीं. तर केवळ संवित्सार हें असें मिथ्या विकास पावत आहे. एकच जल जसें तरंगभेदांनीं नानाप्रकारें स्फुरण पावतें, त्याप्रमाणें चित्‌ही जगद्भेदांनीं परिस्फुरण पावते. पण तें स्फुरण मायामात्र असल्यामुळें वस्तुतः कांहींच नाहीं. यास्तव तूं बंध-मोक्षभ्रम दूर टाकून देऊन भवभवशून्य अभयब्रम्हरूप व स्वस्थ असाच हो.

---

## सर्ग ११८ वा.

—:०:—

१ ही सृष्टि कोठून, केव्हां, कोणाची, कोणीं केली इत्यादि प्रश्नांचें उत्तर व २ आत्मदर्शनोपाय.

मनुः—प्रत्येक जीवाच्या विचित्र संस्कारांनीं विचित्र झालेल्या अविद्येंतील शुद्धचैतन्याच्या प्रतिबिंबरूप संवित् संकल्पोन्मुख झाल्या असतां, जल जसें तरंगत्वास प्राप्त होतें त्याप्रमाणें, जीवत्वास प्राप्त होतात. ते जीव पूर्वींच उपाधिरूपानें आविर्भूत झालेल्या संसारांत म्हणजे समष्टिव्यष्टि मनाच्या कार्यांत संसरण करितात—पुनःपुन: जन्म-मरण-स्थिति या दशांचा अनुभव घेतात. पण सुखदुःखदशा माझ्याच, हा मोह मनामध्यें आहे, आत्म्यामध्यें नाहीं. चंद्राला ग्रासल्यावर अदृश्य असलेलाही राहु जसा दृश्य होतो, त्याप्रमाणें अनुभव हेंच एक ज्याचें स्वरूप आहे असा आत्मा दृश्य अन्तःकरणानें व परम साक्षात्काररूप त्याच्या परिणामानें अनुभवास येतो. परमेश्वर शास्त्रें किंवा गुरु यांच्या योगानें दिसत नाहीं, तर आत्मा आपल्या सत्त्वस्थ बुद्धीनेंच मात्र स्वतःकडूनच पाहिला जातो. प्रवासी ज्या मार्गानें जातात त्या मार्गावर आसक्ति ठेवीत नाहींत, अहं-ममाभिमान धरीत नाहींत; त्याचप्रमाणें या आपल्या देहेंद्रियादिकांस राग-द्वेषरहित बुद्धीनें पहावें. ज्ञानी सात्त्विकानें त्यांच्या ठिकाणीं आदर करूं नये. किंवा त्यांचा तिरस्कारही करूं नये. उपवासादिकांच्या योगानें त्यांना पीडाही करूं नये. तर त्या देहेंद्रियांना प्रत्येक पदार्थामध्यें त्यांच्या स्वभावानुसार

खुशाल राहूं द्यावें. उदासीन पदार्थाप्रमाणें देहादि प्रत्येक पदार्थाचा मनानें सर्वथा त्याग करावा, व अन्तःकरणांत अत्यंत शीतल होऊन रहावें. तूं शुद्धात्मदृष्टीनें आत्ममय होऊन रहा. मी देह आहें, अशी जी बुद्धि ती संसारांत निबद्ध करणारी आहे. यास्तव मुमुक्षूंनीं त्या बुद्धीचा स्वीकार केव्हांही करूं नये. 'ज्याच्यामध्यें दुसरें कांहीं नाहीं असा चिन्मात्ररूप मी आहें. आकाशाहूनही सूक्ष्म आहें.' अशी जी शाश्वत बुद्धि ती संसारांत बद्ध करणारी नाहीं. ज्याप्रमाणें स्वच्छ जलाच्या आंत व बाहेर व सर्वत्र तेज असतें, त्याप्रमाणें असंग चिद्रूप आत्मा सर्व वस्तूंमध्यें आहे. ज्याप्रमाणें बाहुभूषणादि आकारता हें सोन्याचेंच रचनावैचित्र्य आहे, त्याप्रमाणें जगत् व त्याचें मूळ माया हें आत्म्याचेंच रचनावैचित्र्य आहे. विनाशरूप वडवाग्नीनें ज्याला व्यापलें आहे, अशा भयंकर कालरूपी महासागराला प्राणिशरीरें हेच ज्यांच्यातील तरंग आहेत अशा जगज्जालरूपी नद्या प्रतिक्षणीं येऊन मिळत आहेत, तथापि म्हणजे सर्व जगज्जालाचें भक्षण करूनही अद्यापि अतृप्त असलेल्या कालरूपी सागराचें जो प्राशन करणारा आत्मा तो प्रसिद्ध सागराचें प्राशन करणारा अगस्त्य आहे, अशी भावना हे राजन् इक्ष्वाको! तूं सर्वदा कर. या देहादि दृश्यरूप अनात्म्याच्या ठिकाणीं असलेली मिथ्या आत्मत्वभावना टाकून निर्वासनीभावास प्राप्त हो आणि आनंदानें गूढ रहा. निजलेली माता आपल्या कुशींत निजलेल्या बालकालाही विसरून जशी पुत्रासाठीं स्वप्नांत आक्रोश करते, त्याप्रमाणें हा सर्व अज्ञ जन स्वतःसाठींच, आत्म्यासाठींच रडतो. अजर व अमर आत्म्याला न जाणून देहाचा नाश झाला असतां 'हाय हाय! मी मेलों! मी अनाथ आहें! माझा नाश झाला!' असें म्हणून तो रडतो. जसें जल परिस्पंदामुळें नाना आकारांचें दिसतें, त्याप्रमाणें संकल्पामुळें चिद्ब्रह्म जगद्रूपानें अन्यथाभावास प्राप्त होतें, कार्यपरंपरेनें वृद्धि पावतें. हे पुत्रा! तूं संकल्पकलंकापासून मुक्त झालेल्या चित्ताला आत्म्यामध्यें संस्थापित करून समूल सर्व संसाराचा उपशम झाला असतां प्रारब्धभोगाच्या उपयोगी असा जो त्याच्या प्रतिभासाचा अवशेष, त्यामुळें ज्याचा कल्प शांत झाला आहे असा होत्साता, व्यवहारासाठीं देहेंद्रियादिकांचा परिस्पंद जरी होत असला तरी तो प्रतिभासमात्रच असल्यामुळें, स्पंदरहित ब्रह्माप्रमाणें या संसारभूमींत स्वस्थ—सुखी रहा व आपल्या राज्याचें परिपालन कर. ११८.

## सर्ग ११९ वा.

—:०:—

१ पुरुष बंध व मोक्ष यांविषयीं स्वतंत्र आहे. आत्म्याच्या विद्याशक्तीमुळें सत्य आत्म्याचा निश्चय होऊन मोक्ष मिळतो व त्याच्या अविद्याशक्तीमुळें असत्य आत्म्याचा निश्चय होऊन बंध होतो.

मनुः—एकाद्या लहान मुलाप्रमाणें प्रभु—आत्मा आपल्या प्रसवधर्मिणी अविद्याशक्तीनें अविद्वानाप्रत सृष्टिरूप स्पंदाच्या योगानें स्वतःच क्रीडा करतो; आणि आपल्या संहाररूप शक्तीनें विद्वानांप्रत सर्व कार्यांचा उपसंहार करून स्वरूपांत राहतो. जिच्या योगानें तो स्वतःच बद्ध होतो अशी, रागतः प्रवृत्त झालेल्या त्याची अविद्याशक्ति स्वभावतःच उत्पन्न होते. त्याचप्रमाणें जिच्या योगानें तो मुक्त होतो अशी वैराग्यामुळें निवृत्त झालेल्या त्याची संहारशक्तिही आपोआपच उदय पावते. चंद्र, सूर्य, अग्नि, तापविलेलें लोखंड, रत्नें इत्यादिकांच्या ज्वाला—प्रभा जशा कल्पिलेल्या

१ हा दृष्टान्त मायाशबलब्रह्मासाठीं दिला आहे.

आहेत, वृक्षांचीं जशीं पानें वगैरे, व निर्झरांचे जसे कण कल्पित आहेत, तसें हें जगत्, बुद्धि इत्यादि कार्यजात अपरिच्छिन्न ब्रह्मामध्यें कल्पित आहे. तें ब्रह्मच अतत्त्वज्ञांना असत्, अप्रकाश व दुःखप्रदसें होऊन राहिलें आहे. बाळा! ही विश्वाला मोह पडणारी माया अत्यंत विचित्र आहे. त्यामुळें नखशिखान्त सर्व शरीरांत व बाह्यभावांत असलेल्या आत्म्याकडे कोणीच पहात नाहीं. सर्व जगत् आरशांतील नगराप्रमाणें ब्रह्मांत प्रतिबिंबरूप आहे, खरें नव्हे, अशी भावना करणारा जो सर्व इच्छा शांत करून राहतो, तो ब्रह्मकवच धारण करून सुखी होतो. तें कवच मोहशरांना अभेद्य आहे. 'अहं' हा भाव सोडून सर्व शून्य आहे, अशा अभावरूप भावानें सर्व जगत् शून्य आहे, निराकार चिद्रूप आहे, अशी भावना करावी. हें रम्य आहे व हें रम्य नाहीं, हेंच दुःखसंततीचें बीज आहे. तें ज्ञानाग्नीनें दग्ध झालें असतां दुःखाला अवसर कोठचा? हे राजन्! समाधीच्या अभ्यासानें सर्व दृश्यांची विस्मृति होणें, एतद्रूप अस्त्रानें रम्य व अरम्य पदार्थांची प्रिय व अप्रिय अशी वैषम्यकल्पना स्वतःच्या मोठ्या यत्नानें सत्वर आंतल्या आंत तोडून टाक. कारण ती रम्यारम्य पदार्थांची प्रियाप्रिय कल्पनाच राग-द्वेषांचें निमित्त आहे. समाधिरूप अभावनानें बाह्य विषयांची भावना व त्यांचें प्रयोजक धर्माधर्मलक्षण कर्मकानन यांचा छेद करून व परमाकाशाहूनही अधिक सूक्ष्मत्वास प्राप्त होऊन तूं निःशोकच होऊन रहा. हे पुत्रा! तूं प्रथम विवेकविलासवान् होऊन समाधीनें बाह्य विषयाभासाचें निरसन कर व आपल्या पूर्ण स्वरूपानें सर्व भुवनाच्या विस्तारास भरून सोड. अपरिच्छिन्न ब्रह्मसुखाचा स्पंद ज्याच्या अनुभवास आला आहे, असा हो. त्याच्या अखंड एकत्वास प्राप्त हो. ह्मणजे तुझ्या संसाररूप रोगाचें निरसन होईल. त्यानंतर तूं पांचव्या व सहाव्या भूमिकेंत चिरकाल राहून शेवटीं सातव्या भूमिकेंत विक्षेपाचा सर्वथा शम झाल्यामुळें सम, चंद्रिकापूर्णत्वामुळें शुभ्र व वासना-अज्ञानादि कालुष्याचा आत्यंतिक क्षय झाल्यामुळें स्वच्छ आहे आकार ज्याचा, असा तूं अभय व चिद्रूप हो. ११९.

१ कारण ती सर्वगत स्वप्रकाश आत्म्याचेंही अदर्शन व असत् अप्रकाश जगाचेंही स्पष्ट दर्शन करविते. हेंच तिचें अघटितघटनासामर्थ्य आहे.

---

## सर्ग १२० वा.

१ मुमुक्षूच्या तीन भूमिका, २ चवथी मुक्त होणाराची भूमिका व ३ पुढील तीन मुक्ताच्या भूमिका येथें दाखविल्या जातात.

मनुः—शास्त्र व सज्जन यांच्या संपर्कानें प्रथम आपल्या प्रज्ञेची वृद्धि करावी. ही योगाची पहिली भूमिका. हिला श्रवण म्हणतात. विचारणा ह्मणजे मनन ही दुसरी भूमिका आहे. असंग अद्वितीय आत्म्याचें भावनानिदिध्यासन ही तिसरी भूमिका आहे. तत्त्वसाक्षात्कारानें अज्ञानादि प्रपंचाच्या बाधाची सिद्धि करणारी विलापिनी या नांवाची चवथी भूमिका आहे. शुद्ध संविन्मय जो आनंद तद्रूप पांचवी भूमिका आहे. झोंप पुरी झाल्यावर जसा एकादा अर्धा निजलेला व अर्धा जागा असतो, बाह्य शब्दादिकांचें श्रवण करतो पण आंत स्वापसुखांत आसक्त झाल्यामुळें प्रतिवचनादि व्यवहार करूं इच्छीत नाहीं, तसा जीवन्मुक्त या अवस्थेंत राहतो. सहावी भूमिका स्वसंवेदनरूप असते. ह्मणजे त्या भूमिकेस पोंचलेल्या योग्याची ब्रह्माकारानुभववृत्ति स्वभावतःच क्षीण न होणारी

असते. ती स्थिति सुषुप्त पुरुषासारखी असते. तिचा आनंदरूप एक आकार असतो. पण ती तुर्यावस्थाही जेव्हां शांत होते, तेव्हां ती केवल मुक्तिच होय. कारण ती वृत्तिही जेव्हां क्षीण होते, तेव्हां व्यक्त झालेलें पूर्ण, स्वप्रकाश ब्रह्मच अवशिष्ट राहतें. तशा अवस्थेत जिवंत राहणाऱ्या पुरुषाची जी सातवी भूमिका तिचेंच मीं वर समता, स्वच्छता, सौम्यता असें वर्णन केलें आहे. अत्यंत निर्वाणरूपिणी जी तुर्यातीता नांवाची सातवी भूमिका तीच प्रौढ झाली असतां विदेहमुक्ति होते. ती अवस्था जिवंत योग्यांचा विषय होत नाहीं. पहिल्या तीन अवस्था हेंच येथें जाग्रत् होऊन राहिलें आहे. चवथ्या अवस्थेला स्वप्न असें म्हटलें आहे. त्या अवस्थेंत जगत् स्वप्नासारखें दिसतें. पांचव्या भूमिकेंत झोंपेप्रमाणें आनन्दाचा एक घनीभाव होत असल्यामुळें तिला ‘सुषुप्ता’ हें नांव आहे. असंवेदनरूप सहावी भूमिका ‘तुर्या’ या नांवाची आहे. सातवी उत्तम भूमिका ‘तुर्यातीतपदा’ या नांवाची आहे. तिचें मनानें चिंतन करतां येत नाहीं व वाणीनें वर्णन करवत नाहीं. ती स्वप्रकाशपदरूप आहे. त्याच अवस्थेंत सर्व दृश्याचा प्रत्यगात्म्यामध्यें उत्तम प्रकारें विलय केल्यामुळें बाह्य विषयाची कल्पना होत नाहीं. म्हणून तीच जीवन्मुक्तता होय. त्या अवस्थेंतील महासमतेमुळें त्याचा संदेह सर्वथा नष्ट झालेला असतो. कारण त्याची बुद्धि भोग, सुख, दुःख यांनी लिप्त झालेली नसते. असा ज्ञानीपुरुष सशरीर असो कीं अशरीर असो, त्याचा प्रत्यय त्या वेळीं असा असतो:—‘मी मरत नाहीं, जिवंत नाहीं; हा प्रपंच सत् नाहीं व असत्‌ही नाहीं.’ तो पुरुष आत्माराम होऊन राहतो. यालाच मुक्तत्व सांगितलें आहे. तो व्यवहारी असो कीं उपशांत असो, गृहस्थ असो कीं यति असो, मी दुसरें कांहीं नाहीं, केवळ चित् आहें, असें मानून तो शोक करीत नाहीं. मी निर्लेप, अजर, नीराग, वासनाशून्य व निर्मल चिदाकाश आहें, असें जाणून तो शोक करीत नाहीं. मी अनादिकांनीं रहित आहें; शुद्ध, बुद्ध, अजर, अमर आहें; शांत, आकाशादि सम पदार्थांहूनही अतिशय सम भासमान होणारा आहें, असें मानून तो पुरुष शोक करीत नाहीं. अतिक्षुद्र तृणाग्रामध्यें, अति महत् आकाशांत, अति तेजस्वी सूर्यामध्यें, मनुष्य—नाग—देव यांमध्यें जें सन्मात्र तत्त्व आहे, तेंच प्रत्यक्—चिन्मात्र मी आहें, असें जाणून पुरुष पुनः शोक करीत नाहीं. चिद्रूप असलेला माझा महिमा समोर, खालीं, वर, असा व्यापक आहे; असा त्या परमात्म्याचा महिमा जाणून मरणादि दुःखभाक् कोण होणार? जो विषय वासनायुक्त मनानें सेवन केला जातो तो पुरुषाला सुखी करतो. पण जी वस्तु सुखाला कारण होते तीच लागलीच नाशाच्या योगानें दुःखाला कारण होते. कारण सुख व दुःख एकमेकांशीं नित्य संबद्ध असतें, हें प्रसिद्ध आहे. जो विषय अति अल्पवासनेनें किंवा वासनाविरहित मनानें सेवन केला जातो, तो भोक्त्याला सुखी करीत नाहीं व नाशकालीं दुःखीही करीत नाहीं. हे निष्पापा! जें कर्म वासनाविरहित बुद्धीनें केलें जातें, तें दग्धबीजाप्रमाणें पुनः अंकुर उत्पन्न करूं शकत नाहीं. देह, इंद्रियें इत्यादि साधनांच्या समूहाकडून कर्म केलें जातें. पण त्यांच्याशीं तादात्म्याध्यासानें ऐक्य मानून मीच कर्मांचा कर्ता व त्यांच्या फलांचा भोक्ता आहें असा अभिमान धरल्यानें कर्मांचा लेप होतो. पण प्रत्येक कर्माचे अनेक कर्ते असतांना मीच एक कर्ता व भोक्ता आहें, असें समजणें युक्त कसें आहे? देहेंद्रियादि सर्व पदार्थांपासून ‘अहंतादि’ अध्यासाचा त्याग

करून अगदीं पृथक् झालेला ज्ञानी चंद्रासारखा शीतळ, पूर्ण व कांतीनें भास्करासारखा भासतो. देहरूपी शाल्मली वृक्षापासून संचित व क्रियमाण कर्मरूपी कापसाची शोभा ज्ञानरूपी वायूनें उडविल्यामुळें कोठें तरी दूर गेली आहे. प्राण्याची सर्वच कला अनभ्यासानें नाश पावते; पण ही ज्ञानकला मनांत एकदां उत्पन्न झाली, कीं ती इच्छा नसली तरी चांगल्या क्षेत्रांत पेरलेल्या शालीप्रमाणें प्रतिदिनीं वृद्धि पावते. जसें सर्व सरोवरांमध्यें व समुद्रांमध्यें केवळ एक जलच असतें, त्याप्रमाणें सर्व मायिक वस्तूंमध्यें तद्रूप होऊन राहिल्यामुळें विश्वरूप झालेला पण वस्तुतः सन्मात्रस्वभाव एकच आत्मा स्फुरतो. यास्तव हे पुत्रा ! सर्व जगत् भ्रांतिकल्पनारहित, तत्प्रयुक्त वैचित्र्यरहित, सत्तांशमात्र मीच आहें, असें तूं जाण. १२०.

## सर्ग १२१ वा.

—:०:—

१ जीवाचा उत्कर्ष व अपकर्ष ज्या भावनांनीं होतात त्या भावना मनु सांगतो.

मनुः—जोंवर विषयभोगांची आशा असते, तोंवर आत्म्याला जीव ही संज्ञा असते. ती आशाही त्याला अविवेकामुळें होते; वस्तुतः नाहीं. जेव्हां विवेकबलानें ती आशा क्षय पावते, तेव्हां अनामय आत्मा जीवत्वाला सोडून ब्रह्मत्वास प्राप्त होतो. संसाररूपी रहाटगाडग्याच्या चिन्तारूपी रज्जूला बांधलेला व दीर्घकाळ खालून वर व वरून खालीं जाणारा घट—मोघा तूं होऊं नकोस. ‘ हें माझें व मी याचा ’ अशा व्यवहाररूपी दृढ भ्रमाचें जे मोहानें परिसेवन करितात, ते शठ अधिक-अधिक खालीं जातात. ‘ याचा मी व हा माझा, हा मी व हा तो ’ अशा प्रकारचा मोह विवेकबुद्धीनें ज्यांनीं टाकलेला असतो, ते उत्तरोत्तर ऊर्ध्व गमन करितात. हे नृपा ! स्वप्रकाश स्व-आत्म्याचा सत्वर आश्रय करून जगामध्यें सर्वतः पूर्णपणें चिदाकाशच भरलें आहे, असें पहा, व स्वस्थ रहा. जेव्हां अशा रीतीनें चित्चें रूप अखंड पसरलेलें आहे असें समजतें, तेव्हांच तरून गेलेला हा संसार परमेश्वरत्वास प्राप्त होतो. ब्रह्मा, इंद्र, विष्णु, वरुण जें जें करण्यास चांगले उद्युक्त होतात, तें तें सर्व मीच चिद्रूप करतों, अशी भावना करावी. ज्या ज्या शास्त्रामध्यें जें जें सांगितलें जातें तें सर्वच हे राजा ! सत्य-निरंकुश चिद्विलास आहे. चिन्मात्र स्वरूपास प्राप्त झालेल्या, मृत्यूचें उल्लंघन केलेल्या व चित्तरहित झालेल्या पुरुषाला जो आनन्द होतो त्याची तुलना कोणाशीं करतां येणार ! त्याला उपमाच नाहीं. हें अशून्य नाहीं व शून्यही नाहीं, अचिद्रूप नाहीं व चिद्रूपही नाहीं, आत्मरूप नाहीं व अनात्मरूपही नाहीं, अशी भुवनाची भावना करीत रहा. कारण ब्रह्मसत्तेनें जगाला अशून्य म्हणावें, तर द्वैतापत्ति होते. ‘ नेति नेति ’ असा श्रुतीनें निषेध केलेला असल्यामुळें त्याला शून्य म्हणावें तर सर्वकर्तृतारूप ईशत्वाचा व्याघात होतो. जगाला अचिद्रूप म्हणावें तर चित्-लाही त्याचें भान होऊं शकणार नाहीं. कारण त्रिवृत्करणप्रक्रियेनें तेजसरूपानें अनुविद्ध असेंच तें जगत् प्रकाशक तेजानें प्रकाशमान् होतें. नीरूप जगत् कांहीं तेजाकडून प्रकाशित केलें जात नाहीं. त्याच्यामध्यें चित्ची अनुवृत्ति होण्यासाठीं जगत् हा चित्चा विकार आहे, म्हणून म्हणावें तर चित् सविकार आहे, असें होतें. तसेंच जगाला अनात्मरूप म्हणावें, तर असंग आत्म्याशीं त्याचा संबंध होऊं शकत नाहीं. त्यामुळें त्याला आत्म्याची सत्ता व स्फूर्ति यांचा लाभ होत नाहीं. बरें, जगत् आत्मरूप आहे म्हणून म्हणावें

तर त्याच्या ज्ञानानें बाध होऊं शकत नाहीं. वास्तव त्याला अशून्य, शून्य इत्यादि कांहींच न म्हणतां तें अनिर्वाच्य आहे, असें जाणावें. या आत्म्यांत पारमार्थिक स्वरूपाचा आश्रय करून—त्याला साक्षात् जाणून प्रकृति शांत होते. मोक्ष म्हणून कांहीं कोणी निराळा देश नाहीं, निराळा काळ नाहीं, किंवा निराळी स्थिति नाहीं. अहंकार या विमोहाच्या क्षयानें ही प्रकृति विलीन होते. साक्षात्कार या नांवाची जी भावना तोच हा मोक्ष होय. ज्याचें शास्त्रार्थ-विचाररूप चापल्य अगदीं शांत झालें आहे, नानारसप्रचुर काव्य-नाटकादिकांविषयींची जिज्ञासा ज्याची निवृत्त झाली आहे, ज्याचे लौकिक प्रियाप्रियादि सर्व विकल्प व त्यामुळें होणारे विक्षेप नाहींसे झाले आहेत तो सम व शाश्वत-रूप होऊन सुखानें राहतो. १२१.

---

## सर्ग १२२ वा.

१ तुर्यातीत पदीं स्थित झालेल्या दृढ आत्मज्ञानी मुक्ताची चर्या मनु लक्षणांनीं सांगतो.

**मनुः**—जो जें कांहीं यदृच्छेनें प्राप्त होईल त्यानें शरीराला आच्छादित करणारा, जें वेळेला मिळेल तें खाणारा, व जेथें झोंप येईल तेथें शयन करणारा असतो, तो सम्राटासारखा शोभतो. वर्णधर्म—आश्रमाचार यांचें प्रतिपादन करणाऱ्या शास्त्रांच्या प्रतिबंधांतून जो मुक्त झालेला असतो तो—पिंजऱ्यांतून जसा सिंह, तसा जगद्रूपी जाळ्यांतून निघून जातो. वाणीच्या पलीकडे असलेल्या निरतिशय आनन्दानुभवाचाच तो विषय असतो. विषयांची आशा या दशेंतून तो बाहेर पडलेला असतो. शरत्-काळीं जसें नभस्तल, त्याप्रमाणें तो कांहीं अवर्णनीय शोभेस प्राप्त झालेला असतो. तो पर्वतावरील मोठ्या सरोवराप्रमाणें गंभीर व प्रसन्न असतो. परमानंदरूप रसाच्या निरंतर आस्वादनापासून तो केव्हांही च्युत झालेला नसतो. तो स्वतःच स्वतःशीं स्वरूपांत रममाण होतो. तो सर्व कर्मफलांचा त्याग करणारा, नित्यतृप्त व निराश्रय आहे. तो पुण्यानें लिप्त होत नाहीं, पापानें लिप्त होत नाहीं, व हर्षविषादादिकांनींही लिप्त होत नाहीं. जसा स्फटिक प्रतिबिंबानें रंजित होत नाहीं, तसाच तो तज्ज्ञ कर्मफळानें आंत रंजित होत नाहीं. लोकसमूहांत विहार करणारा तो देहाला कोणीं कापलें तरी दुःखी होत नाहीं व त्याची कोणी पूजा केली तरी आनंदित होत नाहीं. प्रतिबिंबांतील पुरुषाप्रमाणें—चित्राप्रमाणें निर्विकार रहातो. तो पूज्य आहे म्हणून, त्याची जरी कोणीं पूजा केली तरी त्या पूजकाची प्रशंसा करीत नाहीं. कोणीं पूजा न केली तरी त्याच्यावर रागावत नाहीं. सर्व आचार, नय व क्रम यांनीं तो जरी संयुक्त झाला किंवा वियुक्त झाला, तरी त्याला हर्ष व विषाद होत नाहीं. त्याच्यापासून कोणाला उद्वेग होत नाहीं व तो कोणापासून उद्विग्न होत नाहीं. त्याला राग-द्वेष-भय-आनंद देणारे विषय प्रारब्धवशात् सोडतात व त्याच्या ठिकाणीं संयुक्तही होतात. तो महाशय कोणाच्याही यथार्थज्ञानाचा विषय होत नाहीं. मोठे मोठे ज्ञानीही त्याला तत्त्वतः ओळखूं शकत नाहींत. पण व्यवहारांत एकादा अल्पज्ञही त्याला स्ववश करूं शकतो. कारण तो सरळ स्वभावाचा असतो. तो एकाद्या तीर्थामध्यें शरीराचा त्याग करो कीं चांडाळाच्या घरांत त्याचा देहपात होवो, किंवा हे राजन् ! त्याचा देहपात या कल्पांत केव्हांच न होवो, अथवा या क्षणींच त्याला मरण येवो, तो वासनाशून्य असल्यामुळें ज्ञानप्राप्तीच्या वेळींच मुक्त झालेला असतो. अहं हीच भ्रांति बंधाला

कारण होते व ज्ञानानें तिचा क्षय होणें हाच मोक्ष आहे. असा मुक्त पुरुष पूजा करण्यास योग्य आहे. तो स्तुति करण्यास योग्य आहे, मोठ्या यत्नानें नमस्कार करण्यास तो योग्य आहे. त्याचें दर्शन घ्यावें. वैभव आणि सिद्धि यांची इच्छा करणारांना तो अभिवाद्य आहे. हे पुत्रा! **ज्यांचा भवरोग क्षीण झाला आहे अशा जीवन्मुक्तांना भजनानें ज्ञानद्वारा जें पद प्राप्त होतें, तें परम पवित्र पद यज्ञ, तीर्थ, तप किंवा उत्तम दान यांनीं प्राप्त होत नाहीं.**

श्रीवसिष्ठः—असें बोलून तो भगवान् मनु ब्रह्मलोकास गेला आणि इक्ष्वाकुही त्या दृष्टीचा आश्रय करून स्थिर झाला.१२२

## सर्ग १२३ वा.

—:०:—

१ ज्ञानी पुरुषाला योगसिद्धीची इच्छाच नसते.

श्रीरामः—भगवन्! हे आत्मवेत्त्यांतील श्रेष्ठा! तूं सांगितल्याप्रमाणें जीवन्मुक्ताचीं सर्व लक्षणें सिद्ध झालीं असतां त्या सन्मतीचा असा कोणता अपूर्व अतिशय होतो? त्याच्यामध्यें कोणतें आधिक्य येतें?

श्रीवसिष्ठः—इतर सिद्धांना अगम्य अशाच परमात्मतत्त्वांशामध्यें ज्ञानी जीवन्मुक्ताची बुद्धि आधिक्यानें राहते. तो नित्यतृप्त व प्रशांतचित्त होऊन आत्म्यामध्येंच अवस्थित होतो. मंत्र, तंत्र व तप यांनीं सिद्धि मिळविलेल्या लोकांनीं आकाशगमनादि केलेलें पुष्कळदा आढळतें. त्यांत अपूर्वता कोणती? तशा मंत्र-तंत्र-तपःसिद्धांनीं अणिमादिकांचीही प्राप्ति करून घेतलेली वारंवार दिसते. कारण यत्नानें अनात्मज्ञांनाही त्यांची प्राप्ति होऊं शकते. तत्त्ववेत्त्यानेंच त्यांना साध्य केलें पाहिजे, असें कांहीं नाहीं. शिवाय आत्मज्ञांना त्या सिद्धींचें फारसें कांहीं प्रयोजनही भासत नाहीं. इतर मूढबुद्धि अज्ञांसारखा तो नसतो. हाच याचा विशेष आहे. सर्वत्र आस्थेचा परित्याग केल्यामुळें त्या महाबुद्धिमानाचें मन निरासक्त—निष्काम व निर्मल असतें. तो सर्व भोग्य वस्तूंमध्यें निमग्न होत नाहीं. तत्त्वबोध झाल्यामुळें ज्याचा अनादिभ्रम अगदीं शांत झाला आहे व त्यामुळें ज्याला विश्रांति मिळाली आहे, अशा जीवन्मुक्ताची सर्वधर्मशून्य ब्रह्मचित् हीच मूर्ति आहे. तेंच त्याचें मिठाच्या खड्याप्रमाणें एकरस स्वरूप आहे. **जीवन्मुक्ताचें, काम-कोप-विषाद-मोह-लोभ-आपत्ति इत्यादिकांचा प्रतिदिवशीं अधिकाधिक अपक्षय होऊं लागणें हेंच लक्षण आहे.**१२३

## सर्ग १२४ वा.

—:०:—

१ जीवांचें निष्कारणत्व, २ ग्राह्य विषयाच्या आसक्तीनें बद्धता, ३ अवस्था व ४ मृगव्याधीय आख्यान.

श्रीवसिष्ठः—जसा एकादा ब्राह्मण शूद्रा स्त्रीची इच्छा करून तिचा संभोग, सहवास इत्यादि दुष्टवासनेनें आपल्याला उचित अशा ब्राह्मणाच्या सात्त्विक धर्माची हळूहळू उपेक्षा करून कांहीं कालानें शूद्रत्वाचाच अंगीकार करतो, त्याप्रमाणें ईश्वर बुद्धि, इंद्रियें, शरीर इत्यादिकांच्या संगतीनें जीवत्वाचा स्वीकार करतो. प्रत्येक सर्गामध्यें दोन प्रकारचींच भूतें स्फुरतात. उपाधिप्राधान्यानें भोग्यरूप व उपहितप्राधान्यानें भोक्तृरूप अशीं तीं दोन प्रकारचीं आहेत. तीं मायागत अनादि दोन प्रकारच्या संस्कारपरंपरेचें अनुसरण करणाऱ्या हिरण्यगर्भात्मक आद्यविस्पंदापासून माया—गंधर्वनगराप्रमाणें आविर्भूत झालेलीं आहेत. अर्थात् तीं मिथ्या असल्यामुळें निष्कारण म्हणजे

वास्तवसामग्रीची अपेक्षा न करणारीं आहेत. ( अहो पण ' जो चांगलें कर्म करतो तो चांगला —उत्तमशरीरी होतो व जो पापकर्म करतो तो पापी—पापशरीरी होतो. पुण्यकर्मानें पुण्य-शरीरी होतो व पापानें पापी होतो,' ' त्या लोकाहून पुनः अन्य लोकाला कर्म करण्या-साठीं व त्याचें फल भोगण्यासाठीं तो जातो, ' इत्यादि अनेक श्रुतींमध्यें जन्म व कर्म यांचा बीज व अंकुर यांप्रमाणें अनादि परस्पर कार्य कारणभाव ज्ञात होतो. तेव्हां कर्मशून्य ईश्व-राचा आद्य सर्गांत जीवभावानें जन्म कसा सांगितला जातो ? उत्तर— ) भूतें ईश्वरापासून जीवभावास प्राप्त होऊन स्वकृत म्हणजे उप-हित-जीवकृत कर्मांनींच जन्मान्तराचा अनुभव घेतात. ( ईश्वराला जीवभाव प्राप्त होण्यास कर्माची अपेक्षा नाहीं, तर जीवभावाची प्राप्ति झाल्यानंतर देहादिकांच्या जन्माला पूर्व पूर्व देहादिकृत कर्माची अपेक्षा असते. जसें—सूर्याचें जलांत प्रतिबिंब पडण्यास चलनादि क्रियांची अपेक्षा नसते, पण प्रतिबिंबाचें निरनिराळ्या तरंगांत संक्रमण होण्यास व त्यांतील विक्रि-यांचा अनुभव घेण्यास उपाधीच्या क्रियेची अपेक्षा असते. तसेंच हेंही समजावें. ) जन्म व कर्म यांचा कार्यकारणभाव हा असा आहे. सर्व जीव परम पदापासून कारणावांचूनच निष्पन्न होतात. त्यानंतर त्यांचीं स्वकर्मेंच सुख व दुःख यांचें कारण होतात. जो जशा आत्म्याला जाणतो, तो तदनुरूप संकल्प करतो आणि संकल्पानुरूप कर्म करतो. मनुष्यादि-देहच आत्मा आहे, अशा बुद्धीवांचून तो पुण्य-पापांचा संकल्प करीत नाहीं व तीं साक्षात् आचरतही नाहीं. अर्थात् संकल्प हेंच कर्माचें कारण आहे. संकल्पयुक्त असणें, हेंच पुण्या-पुण्यप्रवृत्ति, भोगवासना इत्यादिकांच्या द्वारा बंधाचें कारण आहे. यास्तव तूं त्याचा त्याग कर. निःसंकल्पित्व हाच मोक्ष आहे. यास्तव त्याच्या अभ्यासांत तत्पर हो. ग्राह्य विषय व ग्राहक इंद्रियें वगैरे यांच्या भेदाचा भ्रम झाला असतांच, हा विषय अनुकूल आहे, हा प्रतिकूल आहे, इत्यादि ग्राहक मनाचा संकल्प होतो. यास्तव तूं ग्राह्यग्राहकसंभ्रमा-विषयीं सावधान हो. तूं एकसारखा हळूहळू संकल्पदशांचा परिहार करीत रहा. तूं संकल्पानें ग्राह्य—विषयभावरूप होऊं नकोस व ग्राहक-भावरूपही होऊं नकोस. तर सर्व भावना टाकून जें अवशिष्ट राहिलेलें साक्षिस्वरूप तन्मय हो. हे निष्पाप रामा ! तुझा इंद्रियसमूह सतत ज्या ज्या विषयावर आसक्त होऊन पडतो, त्याला जर तूं अनुकूल मानलेंस, तर त्या-विषयीं तुझ्या मनांत आसक्ति अवश्य होईल व त्यामुळें तूं बद्ध होशील; पण त्याविषयीं जर तूं आसक्ति ठेविली नाहींस तर मुक्त होशील. तुला या संसारदशेंतील जर कांहीं आवडलें तर तूं बद्ध आहेस, व त्यांतील कांहीं एक तुला चित्तांत जर न आवडलें, तर तूं मुक्त आहेस. यास्तव या सृष्टींत तृणापासून देवशरी-रापर्यंत स्थावर-जंगमरूप जितके पदार्थसमूह आहेत त्यांतील कांहींएक तुला न आवडो. तूं जें करतोस, खातोस, हवन करतोस व देतोस त्यांतील कोणत्याही क्रियेचा तूं कर्ता नाहींस, भोक्ता नाहींस. यास्तव तूं त्या क्रिया करतां-नाहीं मतीला कूटस्थ आत्मनिष्ठ करून शम-संपन्न होऊन रहा. संत अतीत कर्माविषयीं शोक करीत नाहींत, पुढील कार्याचें चिंतन करीत नाहींत, वर्तमान प्राप्त कर्म मात्र सतत करितात. मनामध्यें तृष्णा-मोह-मदादिक भाव ग्रथित आहेत. यास्तव हे रामा ! ज्ञानी पुरुषा-नें मनानेंच मनाचा छेद करावा. बलात्कारानें लोखंडाला लोखंडानेंच जसें तोडतात, त्या-प्रमाणें अतितीक्ष्ण विवेकानें सर्व भ्रमाची

शांति होण्यासाठीं मनानेंच मनाचा छेद करावा. क्षालनकर्मामध्यें निपुण असलेले लोक क्षारादि मलानेंच मळ घालवितात. अन्नानेंच अन्नाचें निवारण करितात आणि प्रतिविषानें विषाचें शमन करितात. जीवाचीं स्थूल, सूक्ष्म व पर अशीं तीन रूपें आहेत. त्यांतील जें पर-रूप आहे त्याचें सेवन कर; व इतर दोन सोड. जो हा हस्त-पादादिमय देह विषयोपभोगासाठीं चेष्टा करतो तेंच जीवाचें स्थूल रूप आहे. तें त्याच्या भोगासाठीं येथें स्थित आहे. त्याचा आकार स्वसंकल्पमय आहे. जें संसाराचा उच्छेद होईपर्यंत असतें तें चित्तच जीवाचें आतिवाहिक— सूक्ष्मरूप आहे, असें तूं समज. जें आदि-अंतशून्य, सत्य, चिन्मात्र, निर्विकल्प व सर्व विश्वाला सत्ता-स्फूर्ति देणारें तें त्याचें तिसरें पर रूप आहे, असें तूं समज. हेंच शुद्ध तुर्यपद आहे. त्यांत तूं बद्धपद—स्थिर हो. पूर्वीच्या दोन पदांचा सर्वथा परित्याग कर. त्यांच्यामध्यें आत्मबुद्धि ठेवूं नकोस.

श्रीरामः—हे मुनिनायका! जाग्रत्स्वप्न-सुषुप्त या तीनही अवस्थांमध्यें जें गुप्त असलेलें तुर्य तेंच मला विशेषतः विवेचन करून सांगा.

श्रीवसिष्ठः—अहंभाव म्हणजे जाग्रत् व स्वप्न या अवस्थेंतील विक्षेप, आणि अनहंभाव म्हणजे सुषुप्तींतील त्या विक्षेपाचें मूळ—आवरण, या व्यष्टिजीवांच्या उपाधि सोडून आणि सत् व असत्—व्यक्त व अव्यक्त या समष्टि जीवांच्या उपाधि सोडून, जें कोठेंही सक्त न होतां सम स्वच्छ स्थित आहे तें तुर्य म्हटलें जातें. जी स्वच्छ व शांत समता, जीवन्मुक्तांची निरुपाधिक स्थिति, व्यवहारांत जी साक्षि-अवस्था प्रसिद्ध आहे, तिला तुर्यकलना म्हटलें आहे. त्या दशेंत संकल्पाचा असंभव असल्यामुळें तें जाग्रत् नव्हे व स्वप्न नव्हे. अज्ञानाच्या आवरणामुळें स्वरूपाचाही जणुं काय अभाव होत नसल्यामुळें तें सुषुप्तही नव्हे. (अद्वितीय तुरीय जाग्रदादि द्वैतकालीं जीवन्मुक्तांमध्यें कसें असतें? उत्तर—) जीवन्मुक्त ज्ञानी जीवांना हें जसेंच्या तसें असलेलें जगत् शांत वाटत असल्यामुळें तें ज्ञानबाधित तुर्यच आहे, असें म्हणतात; पण अज्ञानी जीवांना तें स्थिर स्थित आहे, असेंच वाटतें. अहंकारकलेचा परित्याग केला असतां, समतेचा उदय झाला असतां, चित्ताला पाण्यांत टाकलेल्या मिठाच्या खड्याप्रमाणें क्षीण केलें असतां तुर्यावस्था आपोआप उपस्थित होते. हे देवतुल्य रामा! आतां मी सांगत असलेला हा दृष्टान्त ऐक. म्हणजे तूं जरी अगोदरच प्रबुद्ध आहेस तरी आणखी अधिक दृढ बोधवान् होशील.

एका शिकाऱ्यानें एका मोठ्या अरण्यांत ज्याची वागादि इंद्रियांची चेष्टा ज्ञानानें बाधित झाली आहे, व त्यामुळें जो महामौन धारण करून बसला आहे, अशा एका अद्भुत मुनीला पाहून असें विचारलें. बाणाचा ज्याला वेध झाला आहे व त्यामुळें जो पळाला आहे अशा एका हरणाच्या मागें लागून तो लुब्धक त्या मुनीपाशीं आला होता. तो म्हणाला— "हे मुने! माझ्या बाणानें विद्ध झालेला हरिण येथें आला होता, तो कोठें गेला?" तेव्हां तो मुनि त्यास उलट बोलला—"हे साधो! आम्ही वनवासी मुनि समदृष्टि आहों. व्यवहार करण्यास जो समर्थ असतो तो अहंकार आम्हांला नाहीं. हे मित्रा! सर्व इंद्रिय-कर्में मन करतें. पण तें माझें अहंकारमय मन फार दिवसांपासून क्षीण झालें आहे. जाग्रत्स्वप्न-सुषुप्त या नांवांच्या कोणत्याच दशा मी जाणत नाहीं. मी केवल तुर्यावस्थेंतच स्थित आहें. त्या अवस्थेंत दृश्य नाहीं."

हे राघवा! त्या मुनिनायकाचें तें भाषण ऐकून त्याचा कांहींच अर्थ न कळल्यामुळें तो लुब्धक त्याला इष्ट असलेल्या दिशेस निघून गेला. यास्तव हे पराक्रमी रामा! मी म्हणतों कीं, तुर्यावस्थेहून दुसरी अवस्थाच नाहीं. निर्विकल्प चित् हेंच तुर्य आहे. तेंच एक आहे, दुसरें कांहीं नाहीं. जाग्रत्, स्वप्न व सुषुप्त हें त्रय चित्ताचें रूप आहे. त्या तीन अवस्थेंत आत्मचित्त घोर, शांत व मूढ असें त्रिगुणांमुळें तीन प्रकारचें होऊन राहतें. जाग्रन्मय चित्त घोर, स्वप्नमय चित्त शांत व सुषुप्तभावांत स्थित असलेलें चित्त मूढ होय. या तिन्ही अवस्थांनीं हीन असलेलें चित्त मृत होय. जें मृत चित्त त्यांत केवल एक सम सत्त्व स्थित असतें. सर्व योगी यत्नानें त्याचेंच संपादन करितात. कारण तसल्या 'सत्त्व' या नांवाच्या चित्तांत निर्मलतेचें आधिक्य असतें. त्यामुळें त्यांत स्वात्मसुखाचा सर्वदाच आविर्भाव होतो. म्हणून योगी इतर सर्व व्यवहार सोडून यत्नानें समाधीचा अभ्यास करितात. रामा! तूं समस्त संकल्पविलासांनीं रहित होऊन निरामयस्वरूपानें तुर्यपदीं स्थिर हो. कारण भेदरहित मुक्त महामुनि सदा त्यांतच स्थित असतात.

---

## सर्ग १२५ वा.

—:०:—

१ उपायांसह तुर्यपदांतील स्थैर्याचा उपदेश.

श्रीवसिष्ठः—सर्व द्वैतजालाचा निषेध हाच अध्यात्मशास्त्राचा सिद्धान्त आहे. येथें अविद्या नाहीं व माया नाहीं. सर्व अनर्थरहित असें हें नित्य अपरोक्ष ब्रह्म शास्त्राचा विषय होत नाहीं. शांत, स्वच्छ, चित्प्रकाशरूप, अत्यंत सम व समग्र शक्तींनीं परिपूर्ण, अशा ब्रह्म या कल्पित नांवाच्या तत्त्वाविषयीं आपआपल्या बुद्धीच्या अनुसार निरनिराळे सिद्धान्त कल्पून कोणी त्याला शून्य म्हणतो, कोणी विज्ञानमात्र म्हणतो, कोणी ईश्वर म्हणतो आणि असे अनेक वादी परस्पर विवाद करितात. पण हे निष्पाप रामा! तूं मायेपर्यंत सर्व दृश्यजाताचा परित्याग करून मनासह सर्व इंद्रियांच्या व्यापाराचा त्याग कर, व महामौनी हो. पूर्णानंद चिदात्म्यामध्यें निर्वाण पावून, सर्व मनन सोडून, चित्ताचा क्षय करून, बुद्धीला अगदीं शांत ठेवून आत्म्यामध्येंच रहा. मुका, आंधळा, बहिरा यांसारखा शांतात्मा हो. जाग्रदवस्थेंतच सुषुप्तस्थ होऊन, हे राघवा! तूं कर्मे कर. आंतून सर्वांचा परित्याग करणारा पण बाहेर प्राप्त होईल तसा व्यवहार करणारा हो. चित्तसत्ता हें परम दुःख असून चित्ताची असत्ता हें परम सुख आहे. यास्तव तूं चिदेकरूप होऊन प्रिय-द्वेष्य इत्यादिकांच्या अननुसंधानानें चित्ताला क्षीण कर. रम्य किंवा अरम्य वस्तु पाहून पाषाणाप्रमाणें सम रहावें. एवढ्याच आत्मयत्नानें संसाराचा जय होतो. सुखाचें चिंतन करूं नये, दुःखाचें चिंतन करूं नये, त्या दोघांच्या साधनाचेंही चिंतन करूं नये. एवढ्याच पुरुषयत्नानें दुःखाचा आत्यंतिक अन्त होतो. त्रिभुवनांतील सर्व वस्तूंचें सार ज्यानें साक्षात् जाणलें आहे, त्यामुळेंच स्वतः सर्वतः प्रकाशानें शोभणारें जें निरतिशय सुख व अमृत तन्मय जो झाला आहे, त्यामुळें जो परिपूर्ण मंडलानें शोभणाऱ्या चंद्रासारखा आल्हादकारक दिसत आहे, असा परमात्म्यास प्राप्त झालेला तज्ज्ञ जीवन्मुक्तिसुखास प्राप्त होतो. तो प्रारब्धप्राप्त व्यवहार जरी करीत असला तरी वस्तुतः करीत नाहीं. कारण तो प्रतिबिंबाच्या चेष्टेप्रमाणें आपलें कर्तृत्व पाहतो. १२९.

---

## सर्ग १२६ वा.

१ योगभूमींचा अभ्यासक्रम व लक्षण, २ योगी मध्येंच मृत झाल्यास भोग व ३ त्यानंतर जन्मांतरीं सिद्धि.

श्रीरामः—सात योगभूमींचा अभ्यास कसा केला जातो? आणि योग्याच्या भूमिकेचीं चिन्हें कशा प्रकारचीं आहेत?

श्रीवसिष्ठः—पुरुष प्रवृत्त व निवृत्त असा दोन प्रकारचा असतो. स्वर्ग व मोक्ष यांस क्रमानें प्रवृत्ति व निवृत्ति यांच्या योगानें जावयास तयार झालेल्या त्या दोघांचें लक्षण ऐक. ' निर्वाण निर्वाण म्हणून जें म्हणतात, त्याचें काय मोठें महत्व आहे? मला संसारच चांगला आहे,' असें ह्मणून जो आपलें शास्त्रविहित कर्म करणारा तो प्रवृत्त ह्मणून म्हटलेला आहे. हजारों जलजंतु, प्रचंड वायु, वडवाग्नि इत्यादिकांमुळें अतिशय चंचल होणाऱ्या व पूर्वापर सागरांच्या उदरांत विहार करणाऱ्या कूर्मांच्या माना थोडेंसें जरी भयकारण झालें तरी आंत शिरून पुनः जशा वारंवार बाहेर येतात, त्याप्रमाणें वारंवार अनेक जन्म-मरणपरंपरेचा अनुभव घेऊन पुरुष विवेकी होतो. खरोखर संसारव्यवस्था सर्वथा असार आहे. मला हिच्याशीं काय करावयाचें आहे? त्याच त्या शिळ्या कर्मांनीं मी दिवस वृथा कां घालवीत आहें? क्रियांमुळें होणाऱ्या उत्पत्ति, आप्ति, विकृति व संस्कार या अतिशयांनीं निर्मुक्त असलेलें ह्म० कूटस्थ नित्य अत्यंतविश्रमण काय बरें आहे? असा विचार करून त्याला मी अवश्य संपादन करीन, असा ज्याचा निश्चय झालेला असतो तो निवृत्त म्हटलेला आहे. मी विरागवान् होऊन संसारसागराला तरून जाईन, अशा विचारामध्यें जेव्हां तो सन्मतिमान् तत्पर होतो, तेव्हां भोग व त्यांचीं साधनें यांविषयीं आंत तो प्रत्यहीं वैराग्यास प्राप्त होतो. चित्तशुद्धीला अनुकूल अशा शौच-सत्संग-ईश्वरोपासन-जपादिरूप क्रियांमध्यें तो आसक्त होतो आणि त्यामुळें प्रत्यहीं उत्तरोत्तर चित्तशुद्धि होत जाऊन तृष्णाक्षयामुळें आनंदित होतो. ग्राम्य जडचेष्टांची त्याला सतत किळस येते. तो दुसऱ्यांच्या गुप्त दोषांचा तोंडावाटे उच्चारही करीत नाहीं. पुण्यकर्मांचेंच सेवन करतो. पापाला नेहमीं भितो. आपल्या किंवा दुसऱ्याच्या मनाला उद्विग्न न करणाऱ्या, अल्पायास व महाफल अशा यम नियमादि कर्मांचेंच सेवन करतो. भोगांची अपेक्षा करीत नाहीं. कारण त्यांत पाप अवश्य होतें. स्नेह व प्रेम यांनीं युक्त, कोमल, उचित व देश-कालानुरूप अशींच वचनें तो बोलतो. पुरुष जेव्हां या गुणांनीं विशिष्ट असा होतो तेव्हां तो पहिल्या भूमिकेस प्राप्त होतो. तो शरीर, मन व वाणी यांनीं शम-दम-ज्ञान-विज्ञानसंपन्न असलेल्या सज्जनांचें सेवन करतो. इकडून-तिकडून सेवानुकूल धनादि आणून त्याच्या योगानें त्यांची सेवा करतो व त्यांच्या तोंडानें पुराण, मोक्षधर्म, अध्यात्मसंहिता इत्यादि ज्ञानशास्त्रें श्रवण करतो. असा जो विचारवान् असतो, तोच संसाराचें उल्लंघन करून जाण्यासाठीं प्रथम भूमिकेंत प्रविष्ट झालेला आहे, असें म्हटलें जातें. पण जो असा साधनचतुष्टयसंपत्तियुक्त नसतो, तो अध्यात्मशास्त्रांत जरी आसक्त असला तरी रागादिदोषांनीं अनधिकारिजनांना फसवून धनादिकांचें अर्जन करतो. उदरभरण हेंच त्याचें ध्येय असल्यामुळें तो केवल स्वार्थी वंचक आहे. असो; ही 'शुभेच्छा ' या नांवाची प्रथम भूमिका आहे. तोच क्रमानें विचारनामक दुसऱ्या योगभूमिकेस प्राप्त होतो. तो श्रुति-स्मृति-सदाचार-धारणा-ध्यान-कर्में यांनीं साध्य होणाऱ्या समा-

धीनें व यम-नियमादि साधनांनीं योगशास्त्राचें प्रतिपादन करण्यास, त्याचें अध्ययन—अध्यापन करण्यास, स्वतः अनुष्ठान करून दुसऱ्याकडून अनुष्ठान करविण्यास समर्थ म्हणून प्रसिद्ध असलेल्या आणि आत्मतत्त्वानुभव व उपदेश यांत निपुण असल्यामुळें श्रेष्ठ असलेल्या गुरूंचा आश्रय करतो. श्रवणमननादि विचार करण्यासाठीं त्यांस शरण जातो. गृहपति जसा आपल्या गृहांतील कोने-कोपरे जाणतो त्याप्रमाणें चांगलें श्रवण करून तत्त्वाला जाणणारा व पदार्थांच्या विशेष विभागांस बरोबर ओळखणारा तो कार्य व अकार्य यांचा निर्णय जाणतो. सर्प जशी कात टाकतो त्याप्रमाणें तो बाहेरून लोकमर्यादेस्तव किंचित् आश्रय केलेली मद, अभिमान, मात्सर्य, लोभ यांची आतिशयिता सोडतो. अशी ज्याची मति झाली आहे, तो शास्त्र, गुरु व सज्जन यांच्या सेवनानें रहस्यासह समग्र तत्त्व यथावत् जाणतो. त्यानंतर एखादा कान्त निर्मल पुष्पशय्येस जसा प्राप्त होतो, त्याप्रमाणें योगी तिसऱ्या असंसंग-नांवाच्या पुढील भूमिकेस प्राप्त होतो. यथार्थ शास्त्रवाक्यार्थांत निश्चल मति धारण करून तापसांच्या आश्रमांतील विश्रमांनीं संसार-निंदक अध्यात्मकथाप्रसंगांनीं संसाराविषयींच्या वैराग्योत्पादक्रमांनीं शिलाशय्येवर बसलेला तो योगी आपलें दीर्घ आयुष्य क्षीण करतो. तो नीतिमान् वनवासांतील चित्तोपशमानें शोभणाऱ्या व असंगसुखानें सौम्य झालेल्या विहारानें आपला काळ घालवितो. अध्यात्मशास्त्राच्या अभ्यासानें व पुण्यकर्मांच्या आचरणानें योग्याची वस्तुदृष्टि उत्तम प्रकारें प्रसन्न होते. तृतीय भूमिकेस प्राप्त होऊन योगी स्वतः दोन प्रकारच्या असंसंगास जाणतो. त्याचा हा भेद तूं ऐक. सामान्य व श्रेष्ठ असा हा दोन प्रकारचा असंसंग आहे. मी कर्ता नाहीं, भोक्ता नाहीं, बाध्य नाहीं, बाधक नाहीं, असें जें विषयांविषयींचें असंगत्व तोच सामान्य असंसंग होय. सुख किंवा दुःख हें सर्व पूर्वकर्मनिर्मित व ईश्वराधीन आहे, तेव्हां त्यांत माझें कर्तृत्व कोठचें ? व भोग व अभोग हे महारोग आहेत; संपत्ति ह्याच परम आपत्ति आहेत; संयोग हे वियोग होण्यासाठींच आहेत, आणि आधि ह्या चित्ताच्या व्याधि आहेत. काल सर्व पदार्थांना सतत खाण्यास उद्युक्त झाला आहे, असें समजून त्यांवरील आस्था सोडून मनांत त्यांची भावना न करणें, हाच सामान्य असंसंग आहे. श्रवणादिकांच्या साह्यानें वाक्यार्थज्ञानामध्यें जो संसक्त झालेला असतो, त्याठिकाणीं वरील अनास्था संभवते. अनेक क्रमयोगानें, महात्म्यांच्या संयोगानें, असत्यांच्या वियोगानें, आणि मनांत श्रवणमननात्मक आत्मसंविदेच्या आवृत्तीनें, पौरुष प्रयत्नानें, सतत अभ्यासयोगानें, हातांत ठेवलेल्या आंवळ्याप्रमाणें संसारसागराचें परतीर—सारभूत परम कारण आत्मवस्तु स्पष्ट अनुभवास आली असतां ' मी कर्ता नव्हे, ईश्वरच कर्ता आहे, माझें पूर्वी केलेलें किंवा आतां केलें जाणारें कर्म नाहीं, ' इत्यादि शब्दार्थभावनाही खरोखर अगदीं दूर सारून जें शांत व मौन धरून राहणें, तो श्रेष्ठ असंसंग होय. जें आंत नाहीं बाहेर नाहीं, खालीं नाहीं, वर नाहीं, दिशांमध्यें नाहीं, आकाशांत नाहीं, पदार्थांत नाहीं, अपदार्थांत नाहीं, जडांत नाहीं, चेतनांत नाहीं, असें शांत स्वप्रकाशचिद्रूप, अन्यप्रकाशकरहित तत्त्व तें आकाशासारखें सम स्थित आहे. तें अनादि, अनन्त, अज, शान्त आहे, असें जाणणें व

१ ' तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत्समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठं '—मुंडकोपनिषद्भाष्यार्थ पृ. ४३.

यो. वा. २-७८

तद्रूप होणें हा श्रेष्ठ असंसंग आहे. विवेक हें कमल आहे. संतोष या सुगंधानें तें कमल मधुर झालें आहे. सत्कार्य हाच त्याचा निर्मल पल्लव आहे. चित्तरूप नालाच्या अग्रभागीं गुप्त असलेल्या रागादि वासनांपासून उद्भवलेल्या असंख्य विघ्नरूपी कंटकांनीं तें कमल व्यापलेलें आहे. अशा प्रकारचा तो विवेककमलवृक्ष चित्तांत रूढ झालेला असून विचाररूपी सूर्याच्या योगानें विकास पावला आहे. तो असंसंगरूप फल देतो. हीच तिसरी भूमिका आहे व तेंच असंसंगरूप फळ आहे. अनेक जन्मांतील संचित पुण्यकर्मांच्या परिपाकामुळें व ऐहिक पुण्यसंचयानें सत्समागम घडतो. त्यामुळें दैववशात् प्रथम—भूमिका उदय पावते. पण ज्या अर्थीं ती भूमिका अत्यंत शुद्ध कर्मांनीं उदय पावलेली असते त्याअर्थीं मेघांकडून प्रत्यहीं सेक केल्या जाणाऱ्या अंकुरित भूमीप्रमाणें प्रतिदिवशीं विवेकोपदेशलक्षण जलसेकानें ती म्लान न होईल अशा रीतीनें तिचें रक्षण करावें व तिला वाढवावी. दुष्ट कर्मांमध्यें प्रवृत्ति न होईल अशी खबरदारी घ्यावी. ही शुभेच्छा साधनचतुष्टयांतील ज्या वैराग्यरूप किंवा शांत्यादिरूप अंशानें प्रथम अंकुरित होऊन वाढूं लागेल, त्याच अंशाला विचारानें वाढवावें; आणि शेतकरी जसा अंकुरांची जोपासना करतो, त्याप्रमाणें प्रतिदिवशीं यत्नानें त्याची जोपासना करावी. त्या एका अंशाची वाढ झाली असतां दुसऱ्या भूमिही आपोआप वाढूं लागतात. कारण ती विचारानें उदय पावलेली एक भूमि इतर भूमींचें उत्पत्तिस्थान आहे. त्यानंतर यत्नानें दुसऱ्या भूमिकेस, व० तिसऱ्या भूमिकेस प्राप्त व्हावें. ही श्रेष्ठ असंसंगता आहे. तीच तिसरी भूमिका होय. या भूमिकेंत पुरुष, ज्यानें सर्व संकल्प सोडले आहेत असा होतो.

श्रीरामः—भगवन्! असत्कुलांत उत्पन्न झालेल्या मूढाचें, रागतः प्रवृत्त झालेल्या अधमाचें, व ज्याला योगी पुरुषाचा संग प्राप्त झालेला नाहीं अशा पुरुषाचें संसारांतून उत्तरण कसें होतें? त्याचप्रमाणें पहिल्या, दुसऱ्या, तिसऱ्या, किंवा चवथ्यां भूमिकेवर आरूढ झालेला योगी जर मध्येंच मरण पावला तर त्याची काय गति होते?

श्रीवसिष्ठः—जो अनेक दोषांनीं भरलेला मूढ पुरुष असतो, त्याचा संसार काकतालीय न्यायानें त्यालाच आपोआप विचार सुचेपर्यंत किंवा साधुसंगतीनें वैराग्य उत्पन्न होईपर्यंत शेंकडों जन्मांनीं पसरलेला असतो. मनुष्याच्या मनांत वैराग्याचा उदय झाला कीं भूमिकेचा उदय अवश्य होतो व त्यामुळें संसाराचा नाश होतो, हा शास्त्रार्थाचा संग्रह आहे. योगभूमिकेनें ज्याचे प्राण शरीर सोडून गेले आहेत, त्या जीवाचें पूर्वपातक भूमिकेच्या अंशानुसार क्षीण होतें. त्यामुळें तो देवांच्या विमानांतून, इंद्रादि लोकपालांच्या नगरांत, मेरुपवन इत्यादि कुंजांत रमणींबरोबर रममाण होतो. त्यानंतर फलभोगानें पूर्वीं केलेला पुण्यसंभार व पापसंचय क्षीण झाला असतां ते योगी पुनरपि भूलोकीं उत्पन्न होतात. अत्यंत पवित्र व श्रीमान् गुणी सज्जनांच्या सुरक्षित गृहांत उत्पन्न होऊन पूर्वजन्मींच्या योगवासनेनें वासित होत्साते योगाचाच अभ्यास करितात. त्या नव्या जन्मांत ते सुज्ञ पूर्वजन्माभ्यस्त योगभूमीच्या क्रमास आठवून पुढील भूमिकाक्रमावर आरूढ होतात. रामा! या भूमिकात्रितयाला जाग्रत् असें म्हटलें आहे. कारण पहिल्या तीन भूमिकांमध्यें भेदबुद्धि यथास्थित असते. म्हणून त्या त्रितयाला जाग्रत् म्हणतात. योगयुक्त पुरुषांची या तीन अवस्थांमध्यें केवळ आर्यता उदय पावते.

त्या आर्यतेला ह्मणजे पूज्यतेला पाहून मूढबुद्धि पुरुषांच्या मनांत मुमुक्षुता उदय पावते. कर्तव्याचें यथेच्छ आचरण करणारा व अकर्तव्याचें थोडेंसेंही अनुकरण न करणारा जो नित्य—नैमित्तिक कर्म करीत राहतो, तो आर्य म्हटलेला आहे. वृद्धांच्या आचारानुसार, यथाशास्त्र, जें केलें असतां चित्त प्रसन्न होतें—मागून पश्चात्ताप पावत नाहीं, असें यथास्थित कर्म किंवा लौकिक व्यवहारही जो स्वीकारतो तो आर्य होय. योग्यांचें आर्यत्व प्रथमभूमिकेंत अंकुरित होऊन द्वितीय भूमिकेंत विकास पावतें व तृतीयभूमिकेंत तेंच फलीभूत होतें. अशा आर्यतेमध्यें मेलेला योगी शुभसंकल्पानें संपादन केलेले भोग चिरकाल भोगून पुनः योगवान् उत्पन्न होतो. या भूमिकात्रितयाच्या अभ्यासानें अज्ञानाचा क्षय झाला असतां पूर्णचंद्राच्या उदयाचीच ज्याला उपमा आहे अशा चित्तांत ज्ञानाचा उदय होतो. त्यानंतर चतुर्थभूमिकेस प्राप्त झालेले नियतचित्त योगी सर्व विभागरहित आदि-अंतशून्य सम ब्रह्म पाहतात. चवथ्या भूमिकेस प्राप्त झालेले अद्वैतांत स्थिर झाले असतां व द्वैतप्रशान्त झालें असतां लोकांना स्वप्नाप्रमाणें पाहतात. ह्मणून पहिल्या तीन भूमिकांना जसें जाग्रत् म्हणतात तसें चवथ्या भूमिकेला स्वप्न म्हणतात. कारण पहिल्या तीन अवस्थांत व्यावहारिक सत्तेनें जगाचें भान होतें व चवथ्या भूमिकेंत प्रातिभासिक सत्तेनें जगाचें भान होतें. पांचव्या भूमिकेस प्राप्त झालेला योगी केवल सत्तारूपानें अवशिष्ट राहतो. शरत्कालीं विच्छिन्न झालेला अभ्रांश जसा विलीन होतो तसें त्या वेळीं त्याच्या चित्तांतील जगत् विलिन होतें. सुषुप्तपद या नांवाच्या पांचव्या भूमिकेस प्राप्त होऊन योगी सर्व विशेषरहित होतो व केवल अद्वैतांत अवस्थित होतो. ज्ञानी द्वैतनिर्भास गळून गेल्यामुळें मनांतल्या मनांत अत्यंत आनंदित होतो आणि पांचव्या भूमिकेस प्राप्त झालेला तो सुषुप्तघनच राहतो. तो बहिर्वृत्तिपर जरी असला तरी अन्तर्मुख होऊनच राहतो. नित्य अत्यंत शांत असल्यामुळें निद्रालु असल्यासारखा भासतो. या भूमिकेमध्यें वासना सोडून अभ्यास करणारा योगी क्रमानें 'तुर्या' या नांवाच्या पुढच्या सहाव्या भूमिकेस प्राप्त होतो. त्या अवस्थेंत तो सद्रूप किंवा असद्रूपही नसतो. अहंरूप किंवा अनहंरूपही नसतो. तर द्वैत व ऐक्य यांतून बाहेर पडलेला तो केवल मननरहित होऊन राहतो. त्याच्या हृदयग्रंथि तुटतात, सर्व संदेह शांत होतात, व तो जीवन्मुक्तदशेचा अनुभव घेतो. चित्रांतील दीपाप्रमाणें स्थित असलेला तो वस्तुतः निर्वाण पावलेला नसूनही निर्वाण पावलेलासा स्थित असतो. आकाशांत शून्य कुंभ जसा असतो, त्याप्रमाणें तो अन्तःशून्य व बहिःशून्य असतो. समुद्रांत जसा पूर्णकुंभ असतो त्याप्रमाणें तो अन्तःपूर्ण व बहिःपूर्ण असतो. तो जणुंकाय परम आश्चर्यरूप झाला आहे, असें वाटतें; पण वस्तुतः तो नित्यसिद्ध असल्यामुळें कोणत्याच अपूर्व दशेस प्राप्त होत नाहीं. याप्रमाणें या सहाव्या भूमिकेंत अवस्थित होऊन सातव्या भूमिकेस प्राप्त होतो. सातवी योगभूमिका हीच विदेहमुक्तता सांगितलेली आहे, ती शब्दांचा विषय होत नाहीं. ती शांत असून संसारभूमींची पराकाष्ठा आहे. कित्येक तिला शिव म्हणतात. कोणी ब्रह्म म्हणतात. कित्येकांनीं तिची 'प्रकृतिपुरुषविवेक' अशी भावना केली आहे. दुसऱ्या कित्येकांनीं स्वकल्पनेनें नाना प्रकारें

१ योगाभ्यासाला आरंभ केल्यावर ज्ञान होण्यापूर्वी मेलेल्या योग्यांचें पाप निष्काम कर्मानुष्ठानानें क्षीण होतें. त्यामुळें त्यांचा देवलोकादिभोगही शुभसंकल्पजन्य, सद्वासनायुक्त असल्यामुळें काम्य कर्में करणारांप्रमाणें रागादि दुर्वासनायुक्त नसतो. त्यामुळें तो भोग त्यांच्या अधःपतनाला कारण होत नाहीं.

तिला निरनिराळीं नांवें दिलीं आहेत. ती नित्य अनिर्देश्य आहे. तथापि कसा तरी तिचा उपदेश करितात. हे रघुकुलतिलका! मी तुला या सात भूमिका सांगितल्या. यांचा चांगला क्रमानें अभ्यास केला असतां दुःखाचा अनुभव येत नाहीं. रामा! एक अत्यंत मदोन्मत्त हत्तीण आहे ती मृदु व मंदमंद संचार करते. ती सदा समरांत-युद्धकर्मात व्यग्र असते. ती नेहमीं लढण्यास तयार असते. दोन मोठ्या दांतांनीं ती फार प्रख्यात झाली आहे. अनन्त अनर्थ करणाऱ्या तिला जर कोणीं मारिलें तर तो पुरुष या सर्व भूमिकांमध्यें विजयी होतो. जोंवर आपल्या बळानें त्या मदमत्त हत्तिणीला कोणीं जिंकलें नाहीं, तोंवर तिनें व्यापलेल्या क्षुद्र सांसारिक भूसंपत्तिरूप समरभूमींतही प्रवेश करण्यास कोण समर्थ होणार?

श्रीरामः—भगवन्! आपण सांगतां ती अत्यंत मत्त हत्तीण कोण आहे? त्या समरभूमि कोणत्या? तिला कसें मारलें जातें? व ती दीर्घकाल कोठें रममाण होते?

श्रीवासिष्ठः—'हें मला असावें' अशा स्वरूपाची जी इच्छा तीच प्रमत्त हत्तीण आहे. हे रामा! शरीररूपी अरण्यांत ती मत्त हत्तीण शोक-मोह-दैन्य-धावपळ इत्यादि नानाप्रकारचे विलास करते. मत्त इंद्रियें हींच तिचीं भयंकर पोरें आहेत. रसना हेंच तिचें सुंदर बृंहितसाधन आहे. मनोरूपी अरण्यांत ती लपून राहिलेली आहे. शुभ कर्म व अशुभ कर्म हेच तिचे दोन सुंदर दांत आहेत. वासनासमूह हाच हिचा सर्वतः पसरणारा मद आहे. हे रामा! संसारदृष्टि हाच तिच्या समरभूमि आहेत. त्यांत पुरुष वारंवार जय व पराजय यांचा अनुभव घेतो. ही इच्छारूपी हत्तीण कृपण म्हणजे अनात्मज्ञ जीवसमूहास मारते. वासना, इच्छा, मन, चित्त, संकल्प, भावना, स्पृहा इत्यादि नांवांचा समूह हिच्या चित्तकोशांत राहतो. धैर्य या नांवाच्या श्रेष्ठ अस्त्रानें सर्वत्र पसरलेल्या या सर्वात्मिका इच्छाकारिणीला तिरस्कारानें सर्वप्रकारें जिंकावें. जोंवर 'मला हें असावें' असें मनांत वाटतें तोंवर ही उग्र कुसंसारविषवल्लिरूप तृष्णा विकास पावते. 'मला हें असो' असें जें मन तोच संसार होय. तशा आकाराच्या मनाचा उपशम हाच मोक्ष होय. यांत सर्व ज्ञानाचा संग्रह होतो. निरिच्छ व शुद्धाकार पुरुषाचे ठिकाणीं आरशांत जसा तेलाचा बिंदु त्याप्रमाणें प्रसाद उत्पन्न करणारी स्वच्छ उपदेशवाक् विश्रांति पावते. म्ह० वैराग्यादि साधनांनीं संपन्न असलेल्या पुरुषाचे ठिकाणीं उपदेशाचा उपयोग होतो. त्याला केलेला उपदेश अविद्यामळाला घालवून चित्ताला स्वच्छ करतो. विषयांचें स्मरण न करणें याच उपायानें इच्छारूप संसारांकुर उदय पावेनासा होतो. विषवल्लीच्या अंकुराप्रमाणें मनांत किंचित् उदय पावलेल्या पण अनर्थ करणाऱ्या इच्छेला विषयांचें अस्मरण याच शस्त्रानें तोडावें. कारण इच्छेनें व्याप्त झालेला जीव दीनतेला सोडीत नाहीं. तो भोगाविषयीं कृपण होतो. सर्वथा विषयांचें अनुसंधान न व्हावें, म्हणून चित्ताचा निरोध करण्याचा यत्न करणें, विषयांपासून इंद्रियांना परतविण्याचा यत्न करणें, म्हणजे काय? तर चित्तानें कांहींएक व्यापार न करितां स्थिर राहणें. अभ्याससमयीं सावधान राहिल्यानें तें सिद्ध होतें व परिपाकसमयीं अवधान न ठेवलें तरी निजलेल्या किंवा मेलेल्या शरीरामध्यें जसें, तसेंच तें स्वभावतः सिद्ध असतें. यास्तव अहो श्रोते हो! त्या अनर्थकारिणी इच्छामत्स्यीला प्रत्याहाररूप गळानें बाहेर ओढून काढा व बांधून टाका. उत्तम ज्ञानी 'हें मला असो'

असें म्हणून चित्ताचें बाह्य विषयांकडे जें धांवत जाणें तीच कल्पना होय, आणि विषयांचें स्मरण न करणें हाच कल्पनात्याग आहे, असें म्हणतात. विषयस्मरण हाच संकल्प व विषयांचें अस्मरण हेंच शिवस्वरूप आहे, असें विद्वान् समजतात. पूर्वी न अनुभविलेलें व अनुभविलेलें या दोघांचीही भावना केली जाते. यास्तव अनुभूत व अननुभूत या दोन्ही प्रकारच्या स्मृतींला काष्ठाप्रमाणें विसरून व सर्वालाच सत्वर विसरून तूं गूढ व महामति होऊन रहा. मी दोन्ही हात वर उचलून हा मोठ्यानें ओरडत आहें. पण माझ्या त्या आक्रोशाकडे कोणी लक्ष देत नाहीं. असंकल्प हेंच परम श्रेय आहे. त्याची आंतल्या आंत लोक भावना करीत नाहींत. अहो, मुकाट्यानें बसल्यानेंच त्या परमपदाची प्राप्ति होते. हे रामा! त्या परम पदापुढें श्रेष्ठ साम्राज्यही तृणासारखें तुच्छ होतें मला अमुक एका प्रदेशीं जावयाचें आहे असा ज्याचा निश्चय झाला आहे, त्या वाटसरूच्या दोन्ही पायांची क्रिया जशी संकल्पावांचूनच होते, त्याप्रमाणें विद्वानाचा स्वकर्तव्याविषयींचा स्पंद—विद्वानाची अवश्य कर्तव्यक्रिया त्याच्या संकल्पावांचून होऊं शकते. याविषयीं उगीच अधिक बोलून काय करावयाचें आहे? मी हें थोडक्यांत तुला सांगतों. संकल्प हा श्रेष्ठ बंध आहे व त्याचा अभाव हीच विमुक्तता आहे. याप्रमाणें हें सर्व अज, शांत, अनन्त, ध्रुव, अव्यय, सत्य, चिद्रूप पहात तूं शांत होऊन यथेच्छ रहा. अहं-मम इत्यादि सर्व भेदांचें विस्मरण हाच जीवब्रम्हैक्यरूप योग आहे, असें ज्ञानी जाणतात. तीच शांत अक्षय स्थिति आहे. साम्यामध्यें स्थित होऊन वासनाशून्य मनानें कर्मे कर किंवा तूं समाधितत्पर असशील तर करूं नको. कारण पूर्वोक्त अस्मरण हा योग आहे. तोच स्वाभाविक चित्क्षय आहे, असें विद्वान् समजतात. यास्तव तूं अत्यंत तन्मय होऊन जसा आहेस तसाच रहा. हे रामा! शिव, सर्वगत, शांत, ज्ञानरूप, अज, शुभ जें ब्रह्म त्याचीच केवळ भावना करणें, हा सर्वत्याग होय. तूं नित्य आपल्या मनांत आत्म्याची भावना करीत स्वतःचें कर्तव्य कर्म कर. 'हा मी' व 'हें माझें' अशी भावना करणारा पुरुष दुःखापासून विशेषतः मुक्त होत नाहीं. पण जो अशी भावना करीत नाहीं, तो मुक्त होतो. यास्तव यांतील जें तुला इष्ट वाटेल तें कर.

---

## सर्ग १२७ वा.

—:०:—

१ रामाची विश्रांति, २ भरद्वाजाच्या उत्सुकोक्ति, ३ जाग्रदादिकांचें लक्षण व ४ तुरीय इ.चें वर्णन.

श्रीभरद्वाजः—हे गुरो! शुद्धबुद्धि श्रीरघूच्या कुलांतील श्रेष्ठ राम श्रीवसिष्ठमुनीनें याप्रमाणें अनेक प्रकारांनीं सांगितलेलें व ब्रह्मादिमहर्षींच्या संप्रदायानें प्राप्त झालेलें ज्ञानसार ऐकून पुनःही कांहीं जिज्ञासेनें विचारूं लागला, कीं एवढ्याच उपदेशानें त्याचे सर्व संदेह व मोह शांत होऊन तो विषयवैचित्र्यरहित साक्षात्कृत आत्मसुखानें परिपूर्ण होऊन पूर्णबोधात्माच झाला व तसाच अवस्थित झाला तें सांग. कारण तो राम आमच्यासारखा साधारण पुरुष नव्हता. तर तो परमयोगी, विश्ववंद्य, देवेश, जन्ममरणरहित, शुद्धचिन्मात्रबोधस्वरूप, सकल गुणांचें निधान, रमेचें संनिधान, व त्रिभुवनाचा उदय, रक्षण व अनुग्रह यांचा अधीश होता.

श्रीवाल्मीकिः—वसिष्ठांचें असें वेदान्तसंग्रहरूप वाक्य ऐकून सर्व विज्ञान ज्याला ज्ञात झालें आहे, असा कमलनयन राम शान्तिपात-

---

१ अखंडाकारवाक्यजन्यचित्तवृत्तींत नित्यानिरतिशय आनंदात्मकत्वाचा आविर्भाव होणें हाच येथील

वशात् अविद्यासंपुटाचें उद्घाटन करणें एतद्रूप उन्मेषानें ज्याचें शुद्धस्वरूप प्रकट झालें आहे, असा होत्साता कांहीं काल उद्बुद्ध झाला—स्व-स्वरूपांत जागृत व विकासित झाला. तो चैतन्यानन्दसागर झाला. तो प्रश्नोत्तरविभागादि परिपाठींनीं—मन-बुद्धि-इंद्रियादिव्यापारांनीं विरहित झाला. त्याचे प्राण आनंदामृतानें पूर्ण झाले. शरीर रोमांचांनीं कंटकित झालें. त्याचें प्रत्यक्-चैतन्य सर्वाधिष्ठान सन्मात्ररूप बनल्यामुळें तो सर्वतः चिद्व्यापकतेनें पूर्ण होऊन राहिला. तो अणिमादि अष्ट सिद्धींना तृणाप्रमाणें तुच्छ समजूं लागला. तो निरतिशय आनंदवस्तूमध्यें एकरसभूत झाला व त्यामुळें तो कांहीं बोलला नाहीं.

**श्रीभरद्वाजः**—खरोखर, राम केवल उपदेशानेंच महत्पदास प्राप्त झाला, या गोष्टीचें मला मोठें आश्चर्य वाटतें. हे मुनिश्रेष्ठा! अशा प्रकारची प्राप्ति आह्मांला कशी होणार? अविवेकी, गर्विष्ठ व किंचिज्ज्ञ असे माझ्यासारखे मूर्ख कोठें व ब्रह्मादि देवांनींही प्रार्थना करण्यास योग्य असलेली दुर्लभ रामाची स्थिति कोठें? अहो मुनीश्वर गुरो! मला विश्रांति कशी मिळेल? या अपार भवसागराच्या मोहजालांतून मी कसा तरून जाईन? तें मला सत्वर सांग.

**श्रीवाल्मीकिः**—बा शिष्या! वसिष्ठवाक्यानें व्यक्त झालेला व येथवर मीं तुला कथन केलेला जो रामाचा सर्व वृत्तान्त त्याचा अगदीं पहिल्यापासून आपल्या बुद्धीनें विचार करून त्याचेंच सतत अनुचिंतन कर. मीही तुझ्या अनुभवाला अनुकूल असें अवस्थात्रय-विवेचनादिक तुला सांगतों. हा अविद्येचा प्रपंच आहे. यांत रतिभरही सत्य नाहीं. ज्ञानी लोक त्यांतलि सत्यासत्याचें विवेचन करितात व अविवेकी वृथा विवाद करीत बसतात. चित्-हून भिन्न कांहींच नाहीं. मग प्रपंचाकडून तूं वृथा बद्ध कां होतोस? हे मित्रा! प्रणव, महावाक्यें, उपासना यांच्या अभ्यासानें तूं विशुद्धचित्त हो. प्रपंचविषयक वृत्ति हीच जाग्रत्. तिलाच निद्रा ह्मणून म्हटलें आहे. तिच्या आंत निरंजन चित्प्रदीप उत्तम प्रकारें प्रबुद्ध आहे. हे मित्रा! या प्रपंचाचें मूळ शून्य आहे व त्याचें शिखरही शून्य आहे. मिथ्याभूत अज्ञान हें त्याचें कारण असून तेंच त्याचें अग्र आहे. मिथ्याभूत अज्ञानांतच त्याचा अंत होतो. त्यांत कांहीं सार नसल्यामुळें स्थितिकाळींही विद्वानांची त्याच्या ठिकाणी आस्था नसते. अनादि वासनादोषामुळें हा असत् असलेला प्रपंच पाहिला जातो. गंधर्वनगराकार संसार अनेक विभ्रम उत्पन्न करणारा आहे. तूं कल्याणकारक चैतन्यामृत-कदलीचा परिचय करावयाचा सोडून वासना-विषयवेलीचा आश्रय करून उगीच कां मोहित होतोस? ज्ञानरूपी आधाराचा परिग्रह करण्यापूर्वींच म्हणजे अज्ञानदशेंतच ही जाग्रदवस्था प्राप्त होते. तुर्यदशेंत तिन्ही अवस्था नसतात. जे निरालंब ज्ञानी व योगी आहेत, त्या सर्वांच्या अनुभवानें सिद्ध झालेली ही गोष्ट आहे. जोंवर चतुर लोक आत्मरूपानें—अमृताकार रसानें भरलेल्या चिद्रूप महानदींत स्नान करीत नाहींत, तोंवरच ती दुस्तरंगांनीं प्रादुर्भूत होते. हे मित्रा! हें जगत् उत्पत्तीच्या पूर्वीं नसतें, नाशानंतरही नसतें. त्यामुळें तें

---

शक्तिपात आहे. तन्त्रशास्त्रांत प्रसिद्ध असलेला शक्तिपात येथें विवक्षित नाहीं. गुरूनें शिष्यावर अनुग्रह करण्यासाठीं त्याच्या शरीरांत प्रवेश करणें, त्याच्या नाड्यांचें परिशोधन करणें, त्याच्या कुंडलिनीला सात चक्रांत संचार करावयास लावणें व त्यामुळें सर्व भुवनांतील समाचार प्रत्यक्ष दाखविणें, हा तंत्रशास्त्रांतील शक्तिपात आहे पण तो स्वतः ईश्वर असलेल्या रामाच्या ठिकाणीं संभवतच नाहीं.

मध्यावस्थेंतही नाहीं. जगत् स्वप्नांतील वृत्तासारखें मिथ्या आहे. हे सर्व भेद बुडबुड्याप्रमाणें अविद्येपासून उद्भवलेले आहेत. ते एक क्षणभर उत्पन्न होऊन ज्ञानैकसागरांत लय पावतात. ही नदी सुशीतल उदकाची आहे, असें जाणून व त्यांत अवगाहन करून भ्रांतिरूप ग्रीष्मसमयानें संतप्त झालेले व दुःखाचा अनुभव घेतलेले असे जीव त्यांतून बाहेर पडोत. एक अज्ञानसागर सर्व जगाला व्यापून राहिला आहे. त्यांतील 'अहं' ही ऊर्मि फार मोठी आहे. ती अविद्या—अनादि—भ्रांतिवासना याच वायूमुळें उत्पन्न झाली आहे. चित्ताचें त्या त्या विषयांमध्यें होणारें जें विविध स्खलन त्याच्या परंपरेचे हेतु रागादिक असून तेच क्षुद्र तरंग होत. ममता हाच त्या सागरांतील मोठा भोंवरा असून तो स्वतःस्वैर प्रवृत्त होतो. राग व द्वेष हे त्या समुद्रांतील दोन मोठे मकर आहेत. त्या दोन सुसरींनीं तुला धरलेलें असल्यामुळें तुझ्या अगदीं समीप असलेल्या अनर्थरूप मृत्युमुखांतील प्रवेशाचें निवारण कोण करणार? तुला जर समुद्रांत बुडावयाचेंच असेल, तर अमृताचेच शांत कल्लोल ज्यांत आहेत अशा आनंदसागरांत बूड! द्वैतग्रहयुक्त क्षारसागरांत कशाला बुडतोस? आहे कोण? गेला कोण? व कोणाचें कोणत्या उपायानें काय आलें आहे? कांहीं नाहीं. मायेंत कां बुडतोस? विवेकी असलेला तूं त्यांत पडूं नकोस 'इदं सर्वं यदयमात्मा' इत्यादि वेदान्त हें सर्व जगत् एक आत्मतत्त्वच आहे, असें स्पष्टपणें प्रतिपादन करितात. तेव्हां आतां हे बाळा! तुझ्या शोकाचा विषय झालेला जो भूत विषय तो त्याहून निराळा कोठचा? सकल जगत् हा अज्ञ पुरुषांना झालेला ब्रह्माचा अन्यथा प्रतिभास आहे. कृतकृत्य पुरुष सदा आनंदाचा अन्यथा विपरिणाम न करितां स्वरूपांत स्थित आहेत. अविवेकी जन अकस्मात् शोक करतो व अकस्मात् अत्यंत हृष्ट होतो. पण तत्त्ववेत्ता नेहमीं हंसतच राहतो. तत्त्ववेत्त्यांनाही केव्हां केव्हां मोह होत असल्याचा अनुभव येतो, म्हणून म्हणशील, तर त्यांचा मोह हें केवल अज्ञजनांच्या चेष्टेचें अनुकरण आहे. तें हें अत्यंत सूक्ष्म तत्त्व अविद्येनें आच्छादित झालें आहे. ज्याप्रमाणें अज्ञ लोकांना जलाच्या ठिकाणीं स्थलाचा संशय येतो व मरुस्थलावर जलाचा भ्रम होतो, त्याप्रमाणें अनात्म्याच्या ठिकाणीं आत्म्याचा भ्रम होतो. पृथिव्यादि महाभूतांच्या परमाणुमय असलेलें हें जगत् जेव्हां जसेंच्या तसेंच स्थित आहे, तेव्हां त्यांतील गेलें तें काय, कीं ज्यासाठीं तूं शोक करीत आहेस! हे मित्रा! असत् वस्तूचा भाव व सत्‌चा अभाव नाहीं. आविर्भावतिरोभाव हे धर्म मायिक रचनाविशेषांचे आहेत. (हा सर्व प्रपंच जर मायिक आहे, तर शोक-मोहादि हजारों अनर्थ कां देतो? उत्तर—) पूर्व अनेक जन्मीं संचय करून ठेवलेला जो पुण्य-पापरूप पुरुषप्रयत्न तोच विषाप्रमाणें मरण-मूर्च्छादि सहस्रावधि अनर्थ उत्पन्न करतो. यास्तव ज्यानें भक्तांवर अनुग्रह करण्यासाठीं अर्धनारीनटेश्वरादि वेष धारण केला आहे, त्या जगद्गुरु परमेश्वरालाच भज. तुझीं सर्व पापें अद्यापि परिपक्व झालेलीं नाहींत, असें मी समजतों. प्राण्यांनीं केलेलें पुण्यपापात्मक-कर्मच पशुपति देवाच्या 'पाशत्व' या प्रसिद्धीस प्राप्त झालें आहे. श्रुत्यादि प्रमाणग्रंथांत प्राणिकर्म हेच प्राणिरूपी पशूंना बांधण्याचे पाश आहेत, असें वर्णन केलें आहे. यास्तव चित्त प्रसन्न होईपर्यंत तूं साकार देवाचेंच भजन कर. चित्तशुद्धीनंतर निराकार परतत्त्वामध्यें तुझी सहज स्थिति होईल. ईश्वरोपासनेनें झालेल्यां शुद्ध

चित्ताच्या बळानें सहस्रावधि व्यामोहांनीं उद्दाम झालेल्या अज्ञानाच्या व्यामोहशक्तीस जिंकून तूं गुरुशास्त्रोपदेशावर विश्वास ठेवलेल्या मनानें मनोनिग्रहरूप योगाचा मार्ग धर. एक क्षणभर चित्ताला स्थिर करून आत्म्याच्या योगानेंच प्रत्यगात्म्याला पहा. त्या आत्मदर्शनानें तुझी ही पूर्वी तमानें आच्छादित झालेली बुद्धिरूपी रात्र प्रभातभावास प्राप्त होवो. पुरुषकार व्यर्थ आहे. केवल सत्कर्मांनीं चित्तशुद्धि होत नाहीं. ईश्वराच्या अनुग्रहानेंच पुरुषांना प्राप्तव्य फळ प्राप्त होतें. ( अहो पण पूर्वी तुह्मीं उत्तम कुलांतील जन्म, सदाचार, तप, कर्म इत्यादि वर्तमान जन्मांतील पुरुषयत्न प्राक्तन कर्मांच्या अपेक्षेनें प्रबल आहे, असें ह्मटलेंत व आतां ईश्वराच्या अनुग्रहाची अपेक्षा आहे, असें सांगतां, हें कसें ? उत्तर— ) प्राक्तन कर्में असंख्य आहेत व या जन्मांतील पुरुषांचा यत्न अल्प आहे. त्यामुळें ईश्वराच्या अनुग्रहावांचून प्राक्तन कर्मांना जिंकतां येत नाहीं. पूर्वीही कुलीनत्व, सदाचार, न्याय, प्रयत्न या सर्वांना ईश्वराच्या अनुग्रहाची अपेक्षा आहे, असें मनांत धरूनच पुरुषप्रयत्नाची प्रशंसा केली होती. ( तर मग नुस्ती ईश्वराची उपासनाच पुरे झाली. यम-नियमादिक कशाला ? उत्तर तूं याप्रमाणें ईश्वराला जरी शरण गेलास, तरी पुरुषाच्या तर्कांचा विषय न होणाऱ्या व केवल श्रुतीवरूनच ज्ञात होणाऱ्या धर्मादिसहित ज्ञानलक्षण समूलसर्वकर्मनिरासोपायापासून उद्विग्न कां होतोस ? श्रुतिप्रोक्त ज्ञानरूप उपाय कां सोडतोस ? कारण उपासनेनें प्रसन्न करून घेतलेला ईश्वरही जीवाची ललाटस्थ अक्षरपंक्ति साक्षात् आपल्या हातानें पुशीत नाहीं, तर ज्ञानाच्या योगानें मूल अज्ञानाच्या उच्छेदानेंच तिचें परिमार्जन करतो. अखंड ब्रह्मचैतन्याचा वक्ता कोठें ? शिष्याचें कौशल कोठें ? व ही मोहवल्ली कोठें ? पण जिच्यामुळें ही सर्व सामग्री परस्परसंलग्न झाली ती नियति— ईश्वरेच्छा अचिंत्य आहे. हे भरद्वाजा ! तूं आपल्या मोहाला विवेकानें सर्वथा नाहींसें करून टाक. ह्मणजे तुला आतां असामान्य ज्ञान निःसंशय प्राप्त होईल. महाबलवान् राजा युद्धादि महाआपत्तींत जरी निमग्न झाला तरी साधनसंपन्न असल्यामुळें फार मोठा उत्साह धारण करतो. पण ज्याच्यामध्यें अगदीं अल्प बळ असतें तो थोडीशी जरी हानि झाली तरी फार शोक करतो. आत्मज्ञान पुण्यकर्मांच्या अनुष्ठानाधीन असतें. तें अनेक जन्मांनीं सिद्ध होतें. ज्ञानी जीवन्मुक्तांमध्यें ज्ञानरूप कार्य पाहिल्यानें त्याविषयीं अनुमान होतें. हे पुत्रा ! ज्या शत्रुरूप सकाम कर्मानेंच तुला हा असला बंध प्राप्त झाला आहे त्याच मित्ररूप निष्काम कर्मानें तूं मोक्षाला प्राप्त होशील. पुण्यातिशयानें प्राक्तन पापाचा नाश झाला असतां शमामृतानें तृप्त झालेल्या लोकांचा त्रिविध ताप शांत होतो. पावसाळ्यांत मेघसमूह दवाग्नीच्या शमनानें सर्व भूतांना जसा सुखी करतो त्याप्रमाणेंच पुण्यवान् शांत होतो. यास्तव हे मित्रा ! कर्मांचा त्याग करून श्रवणादि उपायांनीं ब्रह्मामध्यें आसक्त हो. ह्मणजे संसारचक्राचें वर्तुळाकार भ्रमण शांत होईल. जोंवर बाह्य अनात्मपदार्थांमध्यें आसक्ति असते तोंवर हें विकल्पापासून उत्पन्न झालेलें त्रिजगत् आहे. जल अतिशय चंचल झालें असतां तीरावर विक्षिप्त झालेला—मोठमोठ्या लाटांनीं जोरानें सागर ह्मपटत असलेला दिसतो. पण तेंच जल त्यांत निश्चल झालें असतां तो केवल सामान्य जल होतो. तूं विवेकदृष्टीला आच्छादित करणारा हा शोक कां करीत आहेस ? तूं शोकाचा आश्रय कां करतोस ? याप्रमाणें विनाकारण शोकान्ध झालेल्या तुला तुझी विवेकदृष्टि

उपदेशपर्यंत ही अभंगुर प्रज्ञायष्टिच तुझें रक्षण करो. नदीच्या तरंगांकडून गवत जसें वाहून नेलें जातें त्याप्रमाणें शोक-मोहांमध्यें जे वहात जातात, त्यांची श्रेष्ठांच्या समूहामध्यें कोणीच केव्हांही गणना करीत नाहींत. हें जगत् —जीवजात अहोरात्र हर्ष-विषादादि दशारूप झोंपाळ्यावर आरूढ झालेलें आहे. क्षुधा-तृषा इत्यादि सहा ऊर्मि, वसंत, ग्रीष्म इत्यादि सहा ऋतु, कामादि सहा शत्रु याच झोक्यांनीं इ० हे झोके देऊन काल खेळत असतो. तो क्रीडाकौतुक करणारा कालच अनेक पर्यायांनीं पदार्थांना प्रसवतो, लागलीच त्यांचा संहार करतो. पुनः उत्पन्न करतो, पुनः मारतो. (इतर सर्व प्राण्यांच्या शरीरांप्रमाणेंच आपलें शरीरही कालाचें अन्न आहे. ज्याचें जें अन्न आहे तो तें अवश्य खाणारच, असें समजून त्या शरीरादिकांवरील अहंभाव टाकावा, म्हणजे त्यासाठीं शोक करण्याचा प्रसंग येत नाहीं, अशा आशयानें म्हणतात—) कालरूपी सर्पाला बलात्कारानें पकडून खाण्यास योग्य असलेल्या प्राण्यांतील कोणीही दर्शनाचा विषय होत नाहीं. वस्तुतः कोणताही विशेष धर्म नाहीं व कोणी धर्मी नाहीं. देवांचीं शरीरेंही जेथें दुष्ट कालाच्या भक्ष्यस्थानीं पडतात, तेथें एक निमेषभरही न जगणाऱ्या मनुष्याच्या शरीराची काय कथा! अरे वेड्या! संपत्तीच्या वेळीं संतुष्ट होऊन तूं स्वतः असा नाचूं कां लागतोस व विपत्तीच्या वेळीं विकलेंद्रिय होऊन असा दुःखी कां होतोस! एक क्षणभर निश्चल—स्थिर होऊन—चित्ताला स्थिर करून हें संसारनाटक पहा. हे भरद्वाजा! या जगाला अनेक तरंगयुक्त व क्षणभंगुर पाहिल्यामुळें विद्वान् यत्किंचितही खिन्न होत नाहीं. तूं अमंगळ शोकाचा त्याग कर व मंगलाचें चिंतन कर. चिदानंदघन स्वच्छ आत्म्याची भावना कर. देव, द्विज व गुरु यांच्या वचनादिकांवर ज्यांची अत्यंत श्रद्धा आहे व त्यामुळें ज्यांचीं चित्तें कोमल झालीं आहेत, व ज्यांना आगमप्रमाण आहे त्यांना महेश्वर प्रसन्न होतो.

भरद्वाजः—तुझ्या प्रसादानें मी हें सर्व पूर्णपणें जाणलें. वैराग्याहून श्रेष्ठ बंधु नाहीं व संसाराहून निराळा शत्रु नाहीं. आतां वसिष्ठानें अनेक वाक्यरूप समग्र ग्रंथानें ज्या ज्ञानसागराचें उपपादन केलें, जें रहस्य सांगितलें तेंच संक्षेपतः ऐकण्याची मी इच्छा करतों.

श्रीवाल्मीकिः—हे भरद्वाजा! हें विमुक्ति देणारें महाज्ञान तूं ऐक. त्याचें नुस्तें श्रवण केल्यानेंच तूं भवसागरांत निमग्न होणार नाहींस. जो एक असूनही उत्पत्ति, स्थिति, संहार इत्यादि भेदांनीं अनेक प्रकारें स्थित आहे, त्या सच्चिदानंदमूर्तीला नमस्कार असो. प्रपंचाचा प्रविलय—बाध केला असतां तत्त्व कसें प्रकाशमान होतें त्याचा उपाय वेदांच्या आज्ञेप्रमाणें संक्षेपतः मी सांगतों, तो ऐक. पूर्वी तुझ्या ठिकाणीं दिसत असलेली पूर्वापर विचार करण्यास समर्थ अशी तुझी स्मृति नष्ट कशी झाली? कारण त्या स्मृतीच्या बलानेंच सर्व करास्थित आमलकाप्रमाणें स्वतः ज्ञात होतें. स्वतः आपणच आपल्या चित्तानें विचार केला असतां ज्याच्या प्राप्तीनें शोक करण्याचा प्रसंग येत नाहीं तें पद प्राप्त होतें. यास्तव पुनरपि सच्छास्त्र, सत्संग, व वैराग्ययुक्त विवेक यांनीं त्याची भावना करावी.

## सर्ग १२८ वा.

१ प्रविलापनयुक्तीनें भरद्वाजाची कृतार्थता, २ ज्ञानिकर्तव्य ३ रामाच्या व्युत्थापनाचा क्रम.

श्रीवाल्मीकिः—अंतःकरणाला शांत करून, बाह्य इंद्रियांचें दमन करून, निषिद्ध व काम्य कर्में आणि विषयेंद्रियसंयोगजन्य सुख यांपासून निवृत्त होऊन, मृदु आसनावर बसून

चित्त व इंद्रियें यांच्या क्रियांचें नियमन करून चित्त प्रसन्न होईपर्यंत ' ॐ ' असा उच्चार करावा. त्यानंतर अन्तःकरणशुद्धीसाठीं प्राणायाम करावा. विषयांपासून इंद्रियांचा हळू हळू प्रत्याहार करावा. देह, इंद्रियें, मन, बुद्धि, व क्षेत्रज्ञ यांतील ज्यांचा ज्यांचा ज्या ज्या भूतापासून किंवा देवापासून संभव झाला आहे तें तें त्या त्या आपल्या कारणाहून पृथक् नाहीं, असें स्मरावें. याप्रमाणें दृढ अनुसंधानानें आध्यात्मिक देहेंद्रियादि भाव सोडून ' त्यांचा कारणभूत देवतासमदृष्टयात्मा—अकारार्थ—विराट्च मी आहें, अशा भावनेनें प्रथम विराटांत स्थित होऊन, त्यानंतर त्याच्या कारणांत — उकारार्थांत — सूक्ष्मभूतलिंगसमदृष्टयात्म्यांत —हिरण्यगर्भांत स्थित होऊन, विराट् हिरण्यगर्भरूप आहे, असें चिंतन करून, त्यानंतर तत्कारणभूत त्रिगुणात्मक मायोपहित—मकारार्थ अव्याकृतांत स्थित होऊन त्यानंतर सर्व जगाचें मूलकारण अशा मायेनें उपलक्षित होणाऱ्या अव्याकृतासह सर्वांच्या अधिष्ठानांत —अर्धमात्रालक्षित शुद्ध ब्रह्मांत अव्याकृताचा विलाप करून स्थित व्हावें. म्ह० सर्व ब्रह्ममय आहे, अशी भावना करावी. म्हणजे मांसादि पार्थिव भागाचा पृथिवीमध्यें प्रविलाप करावा. तो पृथिवीमय आहे, अशी भावना करावी. तसाच रक्तादि जलविकारांचा जलांत, बुद्धयादि तेजाच्या विकारांचा तेजांत, प्राणादि वायुविकारांचा महावायूंत, उदरादि आकाशाचा भूताकाशांत प्रविलाप करावा. तीं तीं कार्यें कारणरूप आहेत, अशी भावना करावी. घ्राणादि इंद्रियांचा त्यांच्या त्यांच्या कारणभूत पृथिव्यादि देवतांमध्यें प्रविलय करावा. ' दिशः श्रोत्रं भूत्वा कर्णौ प्राविशन् ' या श्रुतींत वर्णन केल्याप्रमाणें कर्ता जो जीव त्याच्या शब्दादि भोगांची सिद्धि होण्यासाठीं कर्णादि गोलकांत अनुप्रवेश करून श्रोत्रादिरूप इंद्रियभावानें युक्त असलेल्या दिशा, आदित्य इत्यादि देवतांचा क्रमानें त्या त्या देवतेमध्यें प्रविलाप करावा. आपल्या श्रोत्रांचा दिशांमध्यें विन्यास करावा. त्वचेचा विद्युत्-मध्यें, चक्षूचा आदित्यबिंबांत, व जिह्वेचा वरुणदेवतेमध्यें विन्यास करावा. प्राणांचा वायूंत, वाणीचा अग्नींत, हस्तांचा इंद्रांत, आपल्या पायांचा विष्णूंत, वायूचा मित्रांत, व उपस्थाचा कश्यप—प्रजापतींत न्यास करून मनाचा चंद्रांत निवेश करावा. बुद्धीचा निग्रह चतुर्मुखांत करावा. कारण या सर्व इंद्रियदेवता आहेत. ' अग्निर्वाग्भूत्वा मुखं प्राविशत् ' या श्रुतिप्रमाणाला अनुसरून देवताच इंद्रियांच्या व्यपदेशानें स्थित आहेत, इंद्रियें म्हणून निराळ्या वस्तुच नाहींत; म्हणून तत्त्वोपदेशानें प्रविलाप करण्यासाठीं मीं त्यांचा उल्लेख केला आहे. मीं स्वतःच माझ्या कल्पनेनें ह्या गोष्टी प्रकट केलेल्या नाहींत. याप्रमाणें आपल्या देहेंद्रियांचा विराडात्म्यामध्यें न्यास करून ' मी विराट् आहें ' असें चिंतन करावें. ब्रम्हांडांत जो हा अर्धनारीश्वर प्रभु स्थित आहे, तो सर्व भूतांचा आधार आहे. तोच सर्वभूतांचा मातृपितृरूपानें कारण आहे. तोच हा पितृत्वामुळेंच स्वतः उत्पन्न केलेल्या देव-मनुष्यादि जगाच्या अन्न-पानादि जीवनोपायांत व्यवस्थित होऊन हवि-वृष्टि इत्यादिकांच्या योगानें सर्वांचा पोषक जो श्रौत-स्मार्त यज्ञ तत्स्वष्टिरूप होऊन ब्रम्हांडांत स्थित आहे. ब्रम्हांडाच्या बाहेर द्विगुण पृथ्वी, पृथ्वीच्या बाहेर द्विगुण जल, जलाच्या बाहेर द्विगुण तेज, तेजाच्या बाहेर द्विगुण वायु, वायूच्या बाहेर द्विगुण आकाश, अशीं हीं भूतांचीं एकेकाच्या पुढें उत्तरोत्तर दसपट अधिक आवरणें ब्रम्हांडावर आहेत. याप्रमाणें अपंचीकृत व पंचीकृत व्यापक भूतसमूहानें जगत् गुंफलेलें आहे. म्हणूनच पृथ्वीचा जलांत, जलाचा तेजांत

तेजाचा वायूंत, वायूचा आकाशांत प्रविलाप करावा. म्हणजे कार्यभूत कारणभूतरूप आहे, अशी भावना करावी. समस्त स्थूल प्रपंचाच्या उत्पत्तीचें कारण असें जें महदाकाश—हिरण्यगर्भाकाश त्यांत आकाशाचा प्रविलाप करावा. लिंगमात्रशरीर धारण करणाऱ्या योग्यानें त्यांत क्षणमात्र स्थिर राहून, सर्व तन्मात्र आहे अशी भावना करावी. वासना, सूक्ष्मभूतें, कर्म, अविद्या, दश इंद्रियें, मन, बुद्धि, यांला ज्ञानी लिंगशरीर म्हणतात. याप्रमाणें स्थूल उपाधींचा प्रविलाप करून जणुंकाय अर्धा संपन्न झालेला व ब्रम्हांडात्मतेचा अभिमान सोडल्यामुळें त्यांतून बाहेरसा पडलेला जो योगी त्यानें सूक्ष्मभूतात्मक लिंगसमष्टिदेहांत मी आत्मा—अधिष्ठाता—हिरण्यगर्भच आहें, असें चिंतन करावें. ( अहो, पण लोकांत चतुर्मुख पद्मसंभवदेह हिरण्यगर्भ म्हणून प्रसिद्ध आहे. हा सूक्ष्मभूताचा समष्टयात्मा चतुर्मुख नव्हे. तेव्हां त्याला हिरण्यगर्भ कसें म्हणतां ? उत्तर—) भूतसूक्ष्मामध्यें अभिमान ठेवून अवस्थित असलेला हाच ब्रम्हांडाच्या प्रविलापनाच्या पूर्वीं ब्रम्हांडैश्वर्य भोगण्यासाठीं आपल्या पद्मोद्भव देहाची कल्पना करून चतुर्मुख होतो. असो; मी हिरण्यगर्भच आहें, अशी भावना केल्यावर त्या लिंगाचा प्रविलाप अव्याकृतांत करावा. अपंचीकृत भूतांहूनही तें सूक्ष्म आहे. म्हणून मायेच्या—अंशभूत उपाधीच्या आकारानें अव्याकृतांत व उपहित चिदाकारानें अव्यक्तांत बुद्धिमानानें लिंगाचा प्रविलाप करणें उचित आहे. कारण जडांशाचा जडांत व चिदाभासाचा चित्-मध्यें प्रविलय करणेंच युक्त आहे. ज्यांत नामरूपरहित झालेलें जगत् अवस्थित असतें, त्याला सांख्य प्रकृति म्हणतात, वेदांती माया म्हणतात, तार्किक परमाणु म्हणतात, व तर्कीनी ज्याची चित्तें विभ्रांत झालीं आहेत असे बौद्ध संवृतिसंज्ञक अविद्या म्हणतात. प्रलयसमयीं सर्व पदार्थ त्या अव्याकृतांत लय पावून अव्यक्तरूपी होऊन त्याच्या सत्तेनेंच राहतात. ते परस्परसंसर्गशून्य, भिन्नभोग्यतालक्षण आस्वादशून्य होऊन राहतात. प्रलयानंतर सृष्टिसमयीं त्या प्रकृतिभूत अव्याकृतापासूनच उत्पन्न होतात. सृष्टीची प्रवृत्ति होईपर्यंत ते तत्स्वरूपच होऊन राहतात. आकाश, वायु इत्यादि क्रमानें सृष्टि प्रवृत्त होते व पृथिवी, आप, इत्यादि सृष्टीच्या उलट क्रमानें लय होतो. म्हणून जाग्रदादि स्थानत्रयाचा वर सांगितल्याप्रमाणें त्याग करून त्याचें अधिष्ठान जें तुरीय अव्यय पद त्याच्या प्राप्तीसाठीं त्याचें ध्यान करावें. ध्यानानें प्रदीप्त झालेल्या चरमसाक्षात्काररूप वृत्तीनें ध्यानकर्तृकरणरूप लिंगही मूल अज्ञानाच्या बाधानें प्रविलापित करून घट फुटला असतां घटाकाश महाकाशांत जसें, त्याप्रमाणें निरतिशयानंद परब्रह्मांत प्रवेश करावा. तीच याची कृतार्थता होय. पण “ नान्तःप्रज्ञं ” इत्यादि श्रुतींत लिंगाचा बाध दिसत नाहीं; तेव्हां त्याची निवृत्ति कशी होणार, म्हणून म्हणाल, तर जाग्रदादि तीन स्थानांचा बाध झाल्यावर लिंगाचा बाध अर्थसिद्धच आहे. कारण स्थूलसूक्ष्म भूतें, इंद्रियें, मन, बुद्धि, वासना, कर्म, प्राणवायु व अज्ञान यांतच लिंग प्रतिष्ठित आहे. ( अहो, पण ‘ अज्ञान ’ ही लिंगाची प्रतिष्ठा कशी ? उत्तर—) शुद्ध ब्रम्ह अज्ञानाच्या आवरणानें अव्याकृतावस्थेस प्राप्त झालें असतांच सूक्ष्म भूतांच्या द्वारा लिंगाची उत्पत्ति होते. अज्ञानावांचून ती होत नाहीं. यास्तव तेंच लिंगाची मूल प्रतिष्ठा आहे. अज्ञानाची निवृत्ति झाली असतां लिंगनिगडाचा भंग होतो.

भरद्वाजः—आतां मी लिंगरूप लोढण्यापासून सर्वथा मुक्त झालों आहे. कारण मी चिदंश असल्यामुळें चैतन्यानंदसागरांत प्रविष्ट झालों आहें. अभेदामुळें मी सर्व उपाधींनीं

रहित असा परमात्मा आहे. मी कूटस्थ, केवल, व्यापी व चिदचिच्छक्तिमान् आहें. एकाच घटाला घट, कलश अशीं अनेक नांवें असतात. तदुपहित आकाशाला घटाकाश, कलशाकाश अशीं नांवें प्राप्त होतात. त्याच न्यायानें एकाच अज्ञानाला जगद्रूप निरनिराळ्या नांवांची प्राप्ति होते, व त्या जगद्रूपरहित माझ्या ठिकाणीं जीव, ईश्वर, देव, नर, कुंजर, इत्यादि नामभेदकल्पना झाली आहे. पण दृष्टान्तांतील एका घटाचा भंग झाला असतां उपाधि व उपाहित या दोघांची निवृत्ति होऊन शुद्ध आकाशरूप ऐक्य जसें होतें, त्याचप्रमाणें एका अज्ञानाची निवृत्ति झाल्यानें सर्व नामादिभेदांच्या निवृत्तीनें चिदैक्यसाम्राज्य होतें. अग्नींत टाकलेला अग्नि समानत्वास प्राप्त होतो, आणि त्याच नांवाचा व तन्मय होऊन मग विशेषत: तो ग्रहण केला जात नाहीं. लवणाच्या ढिगांत टाकलेलें तृणादिक जसें लवण होतें, त्याप्रमाणें चैतन्यांत टाकलेलें अचेतन जगत् चेतनरूप होतें. जसा मिठाचा खडा समुद्रांत टाकला असतां नामरूपापासून सर्वथा मुक्त होऊन समुद्रत्वास प्राप्त होतो, जसें जलांत टाकलेलें जल, दुधांत टाकलेलें दूध, व घृतांत टाकलेलें घृत आपापल्या स्वरूपांत मिळून जातें व त्यानंतर ते ते पदार्थ विशेषत: ग्रहण केले जात नाहींत, त्याप्रमाणें मी सर्वभावानें सद्रूप, नित्यानंद, समस्तज्ञ, परमकारण सर्व श्रेष्ठ चेतनामध्यें प्रविष्ट झालों आहें. नित्य, सर्वगत, शांत, निर्दोष, निरंजन, निष्कल, निष्क्रिय, व शुद्ध असें तें परम पद ब्रम्ह मी आहें. तें हेयोपादेयरहित, सत्यरूप, इंद्रियरहित, केवल, सत्यसंकल्प, शुद्ध परब्रम्ह मी आहें. पुण्यपापशून्य, जगाचें परम कारण, अद्वितीय, पर, ज्योति:स्वरूप, आनंद, अव्यय ब्रम्ह मी आहें. या व अशाच दुसऱ्याही गुणांनीं युक्त, सत्त्वादिगुणरहित, सर्वांमध्यें अन्तर्यामिरूपानें प्रविष्ट झालेलें असें जें ब्रम्ह त्याचें श्रवण-गुरुशुश्रूषादि व वर्णाश्रमादि धर्म आचरणारानें ध्यान करावें. याप्रमाणें ध्यानाचा अभ्यास करणाऱ्या पुरुषाचें मन त्या ब्रम्हामध्येंच अस्त पावतें. मन अस्त पावलें असतां त्याचा आत्मा आपोआप प्रकाश पावतो. आत्मप्रकाश झाला असतां सर्व दु:खांची हानि होते व आत्मसुख प्रकट होतें व साधक स्वत:च आत्मानंदास प्राप्त होतो. चिदानन्दमय प्रभु मजहून निराळा कोणी नाहीं, मी एक पर ब्रम्ह आहें, असा आत्मा आंत प्रकाश पावतो.

श्रीवाल्मीकि:—मित्रा! सर्व कर्मांचा संन्यास करून तूं ब्रम्हामध्येंच आसक्त हो. संसारचक्रावरील हें गरगर फिरणें शांत व्हावें, असें जर तुला वाटत असेल, तुला विश्रांतिसुख जर हवें असेल व तें गृहस्थाश्रमांत मिळत नसेल तर कर्मसंन्यास करून ब्रम्हनिष्ठ हो.

भरद्वाज:—गुरो! तूं सांगितलेलें हें सर्व ज्ञान मीं जाणलें. माझी बुद्धि निर्मल झाली आहे. संसार आतां फार वेळ राहिलेला नाहीं. आतां ज्ञानी पुरुषाचें कर्म कशा प्रकारचें असतें तें जाणण्याची माझी इच्छा आहे. त्याचें कर्म प्रवृत्त आहे, निवृत्त आहे, कीं त्याला कांहींच कर्तव्य नाहीं?

श्रीवाल्मीकि:—सर्वकर्मसंन्याससहित ब्रम्हनिष्ठ होणें, हाच संसारभ्रमनिवृत्तीचा उपाय आहे, असें जें मीं वर सांगितलें तें तुला कळलें असल्यामुळें तुझ्यासारख्या मुमुक्षूंनीं जें कर्म केलें असतां श्रवणादिकाला विघ्न येणें हा दोष किंवा चित्तविक्षेप-मालिन्य-पातकादि दोष होणार नाहींत तेंच करावें. काम्य, निषिद्ध व दृष्टविक्षेप उत्पन्न करणारें असें कोणतेंही कर्म करूं नये. जेव्हां जीव मनोगुण सोडून ब्रम्हगुणांनीं युक्त होतो व त्याचा इंद्रियसमुदाय

अतिशय शांत होतो, तेव्हां तो सर्वव्यापी ब्रह्म होतो. देह, इंद्रियें, मन व बुद्धि या चार कोशांच्या पलीकडे आनंदमय कोश आहे. त्याच्या पलीकडे असणारा जो अधिष्ठान आत्मा—ब्रह्म, तेंच मी आहें, असें जेव्हां जीव ध्यान करतो तेव्हां तो मुक्त होतो. तो जीव कर्ता, करण, कार्य, भोक्ता, भोग्य, भोग, ज्ञाता, ज्ञान, ज्ञेय या त्रिपुटींहून सर्वथा रहित, सर्व उपाधिरहित, सुख दुःख-शून्य जेव्हां होतो तेव्हां सर्वथा मुक्त होतो. सर्व भूतांमध्यें आत्म्याला व आत्म्यामध्यें सर्व भूतांना जीव जेव्हां अभेदानें पाहतो तेव्हां मुक्त होतो. तो जेव्हां जाग्रत्स्वप्नसुषुप्त्याख्य स्थानत्रय सोडून तुरीय आनंदांत प्रवेश करतो, तेव्हां मुक्त होतो. जीवाची परमात्म्यामध्यें जी तुरीयसंज्ञक स्थिति ती बीजनिद्रादि—अज्ञानतत्कार्यादि-रहित अवस्था असल्यामुळें चित्सुखरूप आहे. किंवा जीवाची तुर्याख्य स्थिति निर्विकल्प समाधि किंवा साक्षात्काररूप ज्ञान यांची पराकाष्ठा आहे. त्या अवस्थेंत निरतिशय सुखाचा अनुभव येतो. योगाभ्यासानें—ज्ञानानें—निदिध्यासनानें मुमुक्षूंच्या मनाचा अस्त झाला असतां परमात्मतत्त्वाहून दुसरें कांहीं उपलब्ध होत नाहीं. 'हे शिष्या! तुला जर सागरांत बुडावयाचेंच असेल तर ज्यांत अत्यंत शांत अमृततरंग आहेत अशा केवल अमृतसागरांत बुड. द्वैतग्रहणरूप खारट पाण्याच्या तरंगांनीं युक्त असलेल्या क्षारसागरांत बुडूं नकोस. सर्वव्यापक परमेश्वर जगद्गुरूला भज.' हे भरद्वाजा! याप्रमाणें मीं तुला वसिष्ठाचा सर्व उपदेश सांगितला आहे. हे पुत्रा, महाप्राज्ञ भरद्वाजा! या ज्ञानमार्गानें किंवा योगमार्गानें तूं निश्चयानें सर्व जाणशील. शास्त्राच्या परामर्शानें गुरुवाक्याचा अर्थ यथार्थतः जाणल्यानें व अभ्यासानें सर्व सिद्धि होते, असें वेदाचें अनुशासन आहे. यास्तव तूं सर्व सोडून अभ्यासामध्येंच आपलें मन स्थिर कर.

भरद्वाजः—हे मुने! राम शोधित स्वात्मस्वरूपानें स्वात्म्यामध्यें—ब्रह्मांत परमयोगास—उपाधित्यागानें ऐक्यास प्राप्त झाला. नंतर त्या देवानें पुढील व्यवहार कसा केला? भगवन्! मी तें जाणून अभ्यासासाठीं तसाच यत्न करीन; व त्याच्याप्रमाणेंच व्युत्थानसमयी माझा व्यवहारही होईल.

श्रीवाल्मीकिः—ज्याचें चित्त अपरिच्छिन्न ब्रह्माकार झालें आहे असा तो राम जेव्हां स्वस्वरूपांत उत्तम प्रकारें परिणत झाला, तेव्हां विश्वामित्रऋषिश्रेष्ठ वसिष्ठास असें बोलला.

श्रीविश्वामित्रः—हे महाभाग ब्रह्मपुत्र वसिष्ठा! तूं फार थोर आहेस. वर सांगितलेल्या अनुग्रहदृष्टिमात्रप्रयुक्त शक्तिपातानें शिष्याला ब्रह्मरूप करून तूं आपलें गुरुत्व—शिष्योद्धारसामर्थ्य आतांच्या आतांच आम्हांला प्रदर्शित केलें आहेस. दर्शन, स्पर्श, शब्द किंवा केवळ कृपादृष्टि यांच्या योगानें जो शिष्यदेहांत शंभूचा समावेश करवितो, स्वशरीरांतून न निघतांच शिष्याच्या कुंडलिनीच्या षट्चक्रांचा भेद करून ब्रह्मरंध्रास्थित परशिवसमावेशरूप व जीवाच्या उपाधित्यागानें शुद्ध ब्रह्मसमावेशरूप शक्तिपात करतो, तोच खरा गुरु. हा रामही स्वभावतःच विशुद्धचित्त व विरक्त होता. तो केवल विश्रांतीची आकांक्षा करीत होता. त्यामुळें नुसत्या संवादानेंच ब्रह्मपदास प्राप्त झाला. गुरुवाक्यापेक्षां शिष्याची प्रज्ञाच बोधाचें कारण आहे. काम-कर्म-वासनात्मक तीन मळ पक्व झालेले नसल्यास ज्याचे मळ पक्व झाले आहेत अशा शिष्याप्रमाणें साधक कसा जाणूं शकेल? गुरु व शिष्य हे दोघेही जर योग्य असले तर कैवल्यसारख्या सर्व पुरुषार्थांचेही ते पात्र होतात. आतां कृपा करून रामाचें व्युत्थान करण्यास

तूं समर्थ आहेस. कारण तूं जरी कृतकृत्य असलास तरी आम्ही कार्यामध्यें निविष्टचित्त आहों. मी कोणत्या उद्देशानें आलों आहें व कशासाठीं स्वतः राजा दशरथाची प्रार्थना केली तें आठवून, हे मुने! शुद्ध मनानें तें सर्व वृथा करूं नको. रामाच्या व्युत्थापनानें अवताराचें प्रयोजन म्हणजे दुसरें देवकार्य आपण संपादन करूं. मीं सिद्धाश्रमास नेलेला राम राक्षसांचें मर्दन करील. त्यानंतर अहल्येची मुक्ति करून जनककन्येशीं धनुष्यभंग करून वाङ्-निश्चयपूर्वक विवाह करील. हा जामदग्न्य रामाची ध्रुवगति नष्ट करील. पितापितामह इत्यादि क्रमानें प्राप्त झालेलें राज्य सोडून निघालेला हा जीवन्मुक्त असल्यामुळें अभय व निःस्पृह राम वनवासाच्या मिषानें राक्षसांना मारून दंडकारण्यवासी मुनींचा भयापासून उद्धार करील. तीर्थें व नानाप्रकारचे प्राणी यांना पावन करील. सीतेचें रावणानें हरण करणें या दुर्गतीच्या मिषानें भूलोकीं आपल्याला फार शोक झाल्याचें दाखवील. त्याप्रमाणें रावणादिकांच्या वधानेंही सर्व स्त्रीसंगी पुरुषांना भूलोकीं अस्वास्थ्य व शोक कसा प्राप्त होतो तें दाखवील. त्याचप्रमाणें इंद्राच्या वरदानानें युद्धांत मेलेले वानर, ऋक्ष, इत्यादिकांचें पुनः संजीवन करून दाखवील. अग्निप्रवेशानें सीतेची विशुद्धि व्हावी अशी इच्छा करणारा तो आपल्याला लोकांच्या संतोषाचें किती महत्त्व वाटतें, शिष्टजनांना आपलें आचरण मान्य व्हावें अशी आपली किती उत्कंठा आहे, तें व्यक्त करील. तो स्वतः जीवन्मुक्त व त्यामुळेंच निःस्पृह असूनही, कर्माधिकारी जनांना कर्मानुष्ठानानेंच उचित फळ मिळतें हें दाखविण्यासाठीं कर्मकांडपरायण होईल. त्याचप्रमाणें उपासना व कर्म यांचें समुच्चयानें अनुष्ठान करण्याचा ज्यांना अधिकार आहे अशा लोकांना ब्रह्मलोकादिगति दाखविण्यासाठीं तो स्वतः ज्ञान—देवताज्ञान—उपासना व कर्में यांचें समुच्चयानें—सह अनुष्ठान करील. हा राम केवल वर्तमान जनांवरच उपकार करणारा आहे असें नाहीं, तर पुढेंही जे याचें शास्त्रदृष्ट्या दर्शन, स्मरण, कीर्तन, व चरित्रबोधन इत्यादि करून सर्व अवस्थांमध्यें भक्तीनें अनुगत होतील त्यांना हा जीवन्मुक्तिसुख देईल. याप्रमाणें या रामचंद्रानें—महात्म्या पुरुषानें त्रैलोक्याचें व माझेंही संपूर्णपणें हित करणें उचित आहे. त्याचें तें कर्तव्य आहे. अहो सर्वजनहो! तुम्ही सर्वजण या रामाला नमस्कार करा. त्याच्या नमस्कारानेंच तुम्हीं सर्व जिंकलें आहे. त्याहून निराळ्या साधनाची आतां तुम्हांला अपेक्षा राहिलेली नाहीं. तुम्हांपैकीं कोणी श्रेष्ठ पुरुष श्रीरामाप्रमाणें चिरकाल निर्विकल्पसमाधिविश्रांतीस प्राप्त होवो.

श्रीवाल्मीकिः—विश्वामित्रानें असें भाषण केलेलें ऐकून ते सर्व वसिष्ठप्रभृति सिद्ध, श्रेष्ठ योगींद्र, ज्यांनीं अत्यंत दुर्लभ अशी उत्तरचरित्ररूप रामकथा ऐकली आहे असे होत्साते, रामचरणकमलांस नमस्कार करणें व सदा रामस्मरण करणें यांमध्यें आस्थावान् झाले. मैथिलाधिपतीच्या या ऐकलेल्या कथेनें भगवान् वसिष्ठ व इतर महर्षिही संतुष्ट झाले नाहींत. म्हणूनच ते त्या गुणसागराचे दुसऱ्यांनीं सांगितलेले गुण स्वतः ऐकते झाले व ऐकलेलेच ते गुण दुसऱ्यांस सांगते झाले. भगवान् वसिष्ठमुनि विश्वामित्र मुनीस म्हणाला.

श्रीवसिष्ठः—हे विश्वामित्रमुने! हा राजीवलोचन राम जन्माच्या पूर्वी कोण होता? हा राघव देव होता कीं मनुष्य होता? तें सांग.

श्रीविश्वामित्रः—अहो जनहो! तुम्ही या रामाच्या ठिकाणींच हा साक्षात् भगवान् वासुदेव आहे, असा विश्वास ठेवा. हाच तो पुराणपुरुष आहे. ज्यानें सर्व विश्वासाठीं क्षीरसागराचें

मंथन केलें तो हा. उपनिषद्रूप गूढ आगमांचाच हा विषय आहे, अन्य प्रमाणांचा विषय नाहीं. तो परिपूर्ण, परानन्द, सम, श्रीवत्सलांछन आहे. भक्त्यादि साधनांनीं त्याला उत्तम प्रकारें प्रसन्न केलें असतां हा राम सर्व प्राण्यांना सर्व पुरुषार्थ देणारा आहे. हा कुपित झाला असतां मिथ्या विषयांचा नाश करतो व त्यांस उत्पन्नही करतो. हा सर्व विश्वाचें कारण आहे. विश्वाचा उत्पादक आहे. हा सर्वांचा पोषक व रक्षक आहे. हा महासत्वा आहे. या विस्तीर्ण आनंदसिंधूंत ज्यांनीं विचारानें निः-सार व मृदु संसारबंध—कार्यकारणबंध बाधित केले आहेत अशा, जगाला फसविणाऱ्या नि-ष्काम यतींकडूनच प्रवेश केला जातो. हाच क्वचित् ज्ञानानें मुक्त, क्वचित् नित्यमुक्त, क्वचित् तुर्यपदसंज्ञक, क्वचित् मायेंत बद्ध झालेला असा चार प्रकारचा होऊन राहिला आहे. हा क्वचित् मायेचा नियन्ता होतो क्वचित् तिच्यांत अडकून राहतो. असा हा पुरुष आहे. हा वेदशरीरी देव आहे. त्रैगुण्य-रूप अरण्यांतून पलीकडे गेलेला हा आहे. हा वेदात्मा अद्भुत पुरुष शिक्षाकल्पादि सहा अंगांनीं सर्वोत्कर्षानें राहतो. हा चतुर्भुज पालक विष्णु आहे. हाच विश्वस्रष्टा चतुर्मुख आहे. हाच संहर्ता त्रिलोचन महादेव आहे. हा अज आहे. पण मायाशक्तिसंबंधानें उत्पन्न होतो. तो सदा मोहनिद्रेनें आवृत्त झालेला नसल्या मुळें महान् जागरूक आहे. तो भगवान् विश्व धारण करतो. तो वस्तुतः रूपरहित असला तरी उपाधिसंबंधानें विश्वरूपवान् आहे. जसा परा-क्रमानें अवश्यभावी विजय प्राप्त केला जातो, तेजानें प्रकाशाचा निश्चय केला जातो, व शास्त्रावरून प्रज्ञेचा उत्कर्ष जाणला जातो, त्याप्रमाणें गरुडावरून याची कल्पना होते. ज्याचा हा परम पुरुष पुत्र झाला, तो हा दशरथ राजा धन्य आहे. हा ज्याचें आपल्या मनानें नेहमीं 'हा माझा प्रतियोद्धा' असें चिंतन करणार तो दशकंठही धन्य आहे. याच्या विष्णुशरीरानें रहित झालेला स्वर्ग-लोक अरेरे, अत्यंत शोच्य आहे! हाय हाय! हा पातालांतूनही येथें आला आहे. पण त्याच्या आगमनानें हा मध्यम लोक आज श्रेउत्वास प्राप्त झाला आहे. क्षीरसागरांत शयन करणारा हा पुरुष 'राम' म्हणून येथें अवतीर्ण झाला आहे. हा राम चिदानन्दघन आहे. हा अव्यय परमात्मा आहे. ज्यांनीं आपल्या इंद्रियसमू-हाचा निग्रह केला आहे असे योगीच या रामाला जाणतात. आम्ही याचें हें अवर—नि-कृष्ट—सगुण रूपच पाहण्यास समर्थ आहों. हा भगवान् रघूच्या वंशांत उत्पन्न होऊन त्याला पावन करणार आहे, असें आम्हीं ऐकलें आहे. हे वसिष्ठमुने! तूं आम्हांवर कृपा करून याला आतां व्यवहारपरायण कर.

श्रीवाल्मीकिः—असें बोलून विश्वामित्र मुनि मुकाट्यानें बसला. मग महातेजस्वी वसिष्ठ रामचंद्राला म्हणाला—

श्रीवसिष्ठः—हे रामा! हे महाबाहो रामा! हे महापुरुषा! हे चिन्मया! हा तुझ्या विश्रां-तीचा काल नाहीं. तूं लोकांना संतुष्ट करणारा हो. योग्याच्या ठिकाणीं लोकपरामर्श जोंवर रूढ झालेला नाहीं, लोकांचा अधिकार उत्पन्न करण्याचें सामर्थ्य जोंवर आलें नाही, तोंवर त्यानें समाधींतच गढून राहणें योग्य नव्हे. तोंवर त्याची ती अवस्था निर्मळही होत नाहीं. तस्मात् हे पुत्रा! तूं अत्यंत नश्वर अशा राज्या-दि विषयांचें पर्यालोचन करून कांहीं काळ अनुभव घेऊन व देवकार्यादि अधिकारभार कमी करून मागाहून सुखानें समाधीचें सेवन कर.

श्रीवाल्मीकिः—स्वरूपांत लय पावलेला राम वसिष्ठांकडून असें बोलला गेला तरी जेव्हां

कांहीं बोलला नाहीं, तेव्हां वसिष्ठही सुषुम्नेच्या द्वारा हळू हळू त्याच्या हृदयांत प्रविष्ट झाला, आणि त्याच्या विलीन झालेल्या जीवोपाधिलिंगास घन करून, बीजांत प्रविष्ट झालेला वायु त्यांतील अंकुराला जसा बाहेर ओढून काढतो त्याप्रमाणें बाहेर आकर्षण करता झाला. प्रथम प्राणादिबीजभुत आधारशक्तींत, त्यानंतर प्राणाचा आविर्भाव झाला असतां त्यांत, त्यानंतर मनाचा आविर्भाव झाला असतां मनांत चिदाभासभावानें अनुप्रवेश करणारा, म्हणूनच तत्प्रकाशात्मक तदुपाधिक जीव प्राणद्वारा सर्व नाडीरंध्रांमध्यें अनुप्रवेश करून ज्यानें सर्व ज्ञानकर्मेंद्रियरूप करणें आविष्कृत केलीं आहेत असा होऊन रामानें हळू हळू डोळे उघडले. बाहेर वसिष्ठप्रभृति पूज्यांस–विद्वानांस पाहिलें. पण तो स्वतः कृतकृत्य झाल्यामुळें सर्व एषणारहित होता. म्हणून कर्तव्य व अकर्तव्य व्यवहाराच्या गुणदोषांचा विचार करून व त्यामुळें हानोपादानवृत्तिरहित होऊन अशा प्रकारच्या मला हे काय सांगणार आहेत, असें मनांत आणून सर्वांच्या तोंडाकडे पहात राहिला. त्यानंतर वरील वसिष्ठांचें वाक्य ऐकून व 'हें गुरुवाक्य अनुल्लंघ्य आहे' असें पितृभ्रातृबंधवादिकांनीं सांगितलेलें ऐकून शांतचित्त भगवान् राम असें बोलला.

श्रीराम:—तुझ्या प्रसादानें हा मी विधीचा–अवश्य अनुष्ठेय अर्थाचा किंवा निषेधाचा विषय राहिलेलों नाहीं. तथापि तुझें वचन मला सर्वदा ग्राह्य मानलें पाहिजे. वेद, आगम, पुराणें यांत व स्मृतीमध्येंहीं हे महामुने! गुरुवाक्य हा विधि व त्याचें अतिक्रमण करणें हा निषेध आहे, असें सांगितलें आहे. असें बोलून व त्या महात्म्या वसिष्ठ मुनीचे चरण मस्तकावर धारण करून तो सर्वात्मा दयासागर सर्वांस ह्मणाला.

श्रीराम:—अहो जनहो! तुम्ही सर्व ऐका. माझा अत्यंत निश्चित झालेला निश्चय ऐका, तुमचें कल्याण असो. आत्मज्ञानाहून व आत्मवेत्त्या गुरूहून श्रेष्ठ कांहीं नाहीं.

श्रीसिद्धादिक:—हे रामा! आम्हां सर्वांच्या मनांत हाच एक निश्चय झाला होता व आतां तुझ्या प्रसादानें आह्मांला हा ग्रंथ ऐकावयास सांपडल्यामुळें व तुझ्या तशाच स्वानुभवकथनानें तोच आतां दृढ झाला आहे. हे महाराज रामचंद्रा! तूं सुखी रहा. तुला नमस्कार असो. वसिष्ठानेंही ज्यांना अनुज्ञा दिली आहे असे आम्ही आतां आपापल्या स्थानीं जातों.

श्रीवाल्मीकि:—असें बोलून सर्व निघून गेले; व रामाच्या उत्तम स्तुतीमध्यें रत झाले. रामाच्या मस्तकावर पुष्पांची वृष्टि पडली. हे भरद्वाजा! मीं हें सर्व रामचंद्राचें कथानक तुला सांगितलें आहे. या क्रमयोगानें तूं सुखी हो. श्रेष्ठमुनि वसिष्ठाच्या वचनपंक्तिरूप रत्नमालेनें भूषित झालेली अशी ही रघुपतीची जीवन्मुक्तिसिद्धि मीं तुला सांगितली. सर्व कविकुलांना व योग्यांना सेवनीय असलेली ती सिद्धि परमगुरूंच्या कटाक्षानें मुक्तिमार्ग देते. श्रवणादिकांच्या द्वारा पूर्वोक्त भूमिकाक्रमांत आरोपित करते. राम व वसिष्ठ यांचा हा संवादप्रकार जो नित्य ऐकतो तो मोहमालिन्य-रागद्वेष-महापातक-उपपातक इत्यादि सर्व दोषावस्थांनीं युक्त जरी असला, तरी केवळ श्रवणानेंच सर्व दोषांपासून मुक्त होतो व ब्रह्माला प्राप्त होतो.

---

निर्वाणप्रकरण पूर्वार्ध समाप्त.